


# प्रस्तावनाखंड.

## विभाग तिसरा बुद्धपूर्वजग.

### ग्रंथप्रवेश.

बुद्धपूर्वजगासंबंधानें माहिती या भागांत दिली आहे. ही माहिती वाचकास प्रसंगीं अपुरी, प्रसंगीं अतिविस्तृत अशी वाटेल. मिसरदेश किंवा असुरदेश यांविषयीं जितकी निश्चित बुद्धपूर्व माहिती आहे तितकी आज हिंदुस्थानासंबंधानें नाहीं, असें असतां हिंदुस्थानावर पुष्कळ पानें खर्चिलीं आहेत आणि मिसर व असुर देश यांना पानें थोडीं दिलीं आहेत. याला स्वदेशाभिमानाखेरीज निराळें कारण आहे वेदकालासंबंधीं जी माहिती प्रस्तुत ग्रंथापूर्वी प्रसिद्ध झाली आहे ती आमच्या मतानें अनिश्चित अपुरी व कांहींच निश्चयात्मक न सांगणारी आहे. जास्त पानें व्यापण्यास माहितीची निश्चितता कारण होत नसून अनिश्चितता कारण होते. वेदांसंबंधीं आम्हांस जें कांहीं सांगावयाचें तें संशोधकवर्गामधील प्रचलित मताविरुद्ध असल्यामुळें अधिक सविस्तर विवेचन करणें प्राप्त झालें. इजिप्त व असुर यांच्या इतिहासाविषयीं आणि संस्कृतीविषयीं लेखांत जी माहिती दिली आहे ती प्रचलित ग्रंथांवरून दिली आहे. आम्ही आमच्या जबाबदारीवर लिहिलें असें त्यांत कांहींच नाहीं.

हिंदुस्थानाच्या राजकीय इतिहासाची साधारण स्थूल कल्पना आणावयाची झाल्यास पहिलें महत्त्वाचें वृत्त म्हटलें म्हणजे दाशराज्ञयुद्ध होय. हें कुरुयुद्धापूर्वी सुमारें ६०० वर्षें झालें असावें. रामरावणयुद्ध त्यापूर्वी झालें होतें असें खात्रीनें सांगतां येत नाहीं, तथापि तें झालें असणेंहि अशक्य नाहीं. तें झालें असल्यास तें दाशराज्ञयुद्धापूर्वी सुमारें दोनशें वर्षें झालें असावें. तें झालें असल्यास तें दाशराज्ञयुद्धापूर्वीचें महत्त्वाचें राजकीय वृत्त होय. कुरुयुद्ध ख्रिस्तपूर्व १५०० वर्षें या सुमारास झालें असलें तर दाशराज्ञयुद्ध ख्रि. पू. २१०० वर्षें या सुमारास झालें असावें, आणि रामरावणयुद्ध ख्रि. पू. २३०० वर्षें या सुमारास झालें असावें. दाशरथी रामचंद्रापूर्वीची राजावलि विचारांत घेतल्यास मगधांची इतिहास आपणास ख्रि. पू. ३५०० पासून ४००० पर्यंत फार तर नेतां येईल. इतकें झालें तरी इजिप्त व असुर यांचा इतिहासप्रारंभ व भारतीय इतिहासप्रारंभ यांमध्यें ४००० वर्षांचें भगदाड पडतेंच.

बुद्धपूर्व जगाच्या इतिहासामध्यें बराचसा भाग अनिश्चित आहे, असुर व मिसर यांचें ख्रि. पू. ८००० वर्षांपासून राष्ट्ररूपानें आणि संस्कृतिरूपानें अस्तित्व असलें, व हिंदुस्थानचें ख्रिस्तपूर्व चार हजार वर्षें तरी संस्कृतिरूपानें अस्तित्व असलें पाहिजे असें धरलें तरी भारतीय संस्कृतीस अर्वाचीनत्व येतें. ऐक्ष्वाकु वगैरे राजघराणीं जमेस धरलीं तरी त्यांच्या अगोदरची संस्कृति कशी काय होती कळत नाहीं तसेंच दक्षिणेकडे कोणतीं राष्ट्रें होतीं, त्यांची इक्ष्वाकुपूर्वसंस्कृति काय असावी, हेंहि सांगतां येत नाहीं. कुरुयुद्धाचा काळ आज पूर्णपणें निश्चित झाला आहे असें आम्हांस वाटत नाहीं. ख्रि. पू. १५०० हा अजमासें काळ म्हणून घेतला आहे. कित्येकांच्या मतें हा ख्रि. पू. १८०० पर्यंत जातो, तर कित्येक हें युद्ध ख्रिस्तपूर्व १२०० पर्यंत आणून ठेवतात. वेदांत धार्तराष्ट्रांचा व पारिक्षिताचा उल्लेख असून देखील कुरुयुद्धाचा उल्लेख नसल्यामुळें हें युद्ध झालें होतें किंवा नाहीं अशाहि शंका प्रदर्शित केल्या गेल्या आहेत. या विषयावर वाङ्मय पुष्कळ असल्यामुळें आणि मतवर्ग हें युद्ध झालें किंवा न झालें याविषयीं बिलकूलच संशय दाखवीत नसल्यामुळें, आणि उल्लेखाचा अभाव अस्तित्वाविरुद्ध सार्वत्रिक पुरावा नसल्यामुळें हें युद्ध झालें असलें पाहिजे असें गृहीत धरलें आहे आणि त्याचा अजमासें काळ ख्रि. पू. १५०० हा धरला आहे.

दुसऱ्या व तिसऱ्या भागांतील वेदविषयाचें विवेचन एकंदर तपासलें तर कांहीं ठिकाणीं थोडीशी परस्परविरुद्धता आढळून येईल. आणि याचें कारण असें कीं, दुसऱ्या भागाचें मुद्रण बहुतेक संपल्यानंतर या भागांत व्यक्त केलेलीं आमचीं मतें दृढ झालीं. दुसरा भाग मुद्रित झाला त्या वेळेस, ऋग्वेद हें आर्यन् लोकांचें देशप्रवेशवाङ्मय नव्हे, सर्व ऋग्मंत्रापूर्वी दाशराज्ञयुद्ध झालें, दाशराज्ञयुद्धापूर्वीच देश्य आर्यन् कृतसंस्कृति अनेक शतकें असावी, आर्यदासभेद जातिमूलक नसून धर्मविषयक

होता, वर्ण शब्दाचा जुना अर्थ आचार किंवा संप्रदाय असावा इत्यादि मतें निश्चित झालीं नसल्यामुळें संशोधकवर्गांत असलेल्या जुन्या कल्पनांची छाया मधून मधून त्यांत दिसेल. पण ती फार थोडी आहे.

प्रस्तुत भागांत वेदकालीन शब्दसृष्टी हें प्रकरण दुसऱ्या भागांत घालण्यासाठीं तयार केलें होतें, तें फारसा बदल न करतां तसेंच मुद्रित केलें आहे. या प्रकरणांत वर दिलेल्या मतांशीं संगति उत्पन्न करण्याकरितां फेरफार करावयाचे ते केले नाहींत, उलट भिन्न ग्रंथकारांचीं मतें मांडलीं आहेत. हीं मांडतांना मॅकडोनेल आणि कीथ यांच्या 'वेदिक इंडेक्स' चा बराच उपयोग केलेला आहे आणि जेव्हां वेदिक इंडेक्सनें दिलेल्या आधाराचें विशिष्ट पुस्तक हाताशीं नसेल तेव्हां वेदिक इंडेक्समधलें विधान जसेंच्या तसेंच ठेवलें आहे.

बुद्धपूर्व जगाच्या इतिहासास आरंभ केला आहे तो विश्वोत्पत्तिविषयक विचारांपासून केला आहे. जडापासून जीवाची उत्पत्ति कशी झाली हें शास्त्रास अजून मोठें गूढ आहे. स्पेन्सरनें आपल्या विकासवादाच्या मांडणींत तेवढाच भाग वगळला आहे. विकासवादाच्या मांडणीचा तो भाग भरून काढावा म्हणून अनेक प्रयत्न झाले आहेत ते सर्वस्वी यशस्वी झाले नाहींत. तथापि ती मांडणी कशी करतां येते हें दाखविण्यासाठीं प्रो. सहस्रबुद्धे यांचा एक लेख दिला आहे. जीवोत्पत्तीपासून मनुष्यविकासापर्यंत ज्या अनेक पायऱ्या आहेत त्यांचें विवेचन येथें केलें नाहीं. तें शरीरखंडांत येईल. मनुष्यप्राणी प्रथम कोठें विकसित झाला, त्याचें प्राथमिक स्वरूप कसें होतें हीं अजून कोडींच आहेत. त्या विषयावर कित्येक ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत. मनुष्यप्राण्याचा विकास आणि आज उपलब्ध असलेले अनेक मानववंश व अनेक भाषा यांचा वंशवृक्ष पद्धतशीर तयार करतां येईल इतकी शास्त्राची प्रगति झाली नाहीं. मनुष्यभ्रमणाचा इतिहास तयार झाला नाहीं, म्हणून हा तयार करण्याचा प्रयत्न कसा चालू आहे हें दाखविण्यासाठीं या इतिहासक्षेत्रास उपयोगी पडण्यासारखी शास्त्रीय पद्धति येथें मांडली आहे. भाषाशास्त्रविषयक अभ्यासामध्यें शब्दसंग्रह व भाषांचें व्याकरण यांच्या प्राचीन इतिहासाचें अवगमन करण्यासाठीं बलाबल किती आहे हेंहि मांडलें आहे. हें विवेचन सामान्य वाचकास एतद्विषयक शास्त्रीय पद्धतींमध्यें प्रवेश करून देण्यास उपयोगी पडेल अशी आशा आहे.

ज्ञानकोशाच्या प्रस्तावनाखंडाचे पांचहि विभाग मिळून एक पूर्ण ग्रंथ होतो. तिसरा आणि चौथा विभाग मिळून सामाजिक व राजकीय इतिहासाची संगति मांडली आहे, आणि पांचव्या विभागांत ज्ञानाच्या वाढीचा इतिहास आहे. पहिला विभाग जगाचें अवलोकन भारतीय दृष्टीनें करीत आहे, आणि आपले अत्यंत व्यापक हितसंबंध पहात आहे. दुसरा विभाग हा तिसऱ्या व पांचव्या विभागाचा सामान्य आरंभ होय. वेद हें साहित्य राजकीय व सामाजिक इतिहासासाठीं तिसऱ्या विभागांत उपयोजिलें, तर वैज्ञानिक इतिहासासाठीं तें अवगाहन करून त्यापासून उत्पन्न होणारें ज्ञान पांचव्या विभागांत मांडलें. वैज्ञानिक सामाजिक आणि राजकीय इतिहासाचा प्रारंभ जे वेद त्यांच्याच अस्तित्वाचें स्पष्टीकरण अत्यंत व्यापकपणें करणें हें दुसऱ्या विभागाचें कार्य होय. वेदविषयक अभ्यासावर ज्ञानकोशाच्या प्रस्तावनाखंडांतील सुमारें एक हजार पृष्ठें खर्ची पडलीं आहेत, व त्यांत जें संशोधन मांडलें आहे तें करण्यासाठीं तीस हजार रुपयांवर रकम खर्च झाली आहे.

बुद्धपूर्व जगामध्यें जैन मताची संस्थापना धरतां येईल. जैन मत महावीरापूर्वी होतें असें धरलें तर जैनांची प्राचीनता बुद्धाच्या पुष्कळच पूर्वीची होईल. बुद्धपूर्व जगाच्या इतिहासामध्यें जैन मत घ्यावयास हवें पण जैन वाङ्मय मात्र अत्यंत जुन्या बौद्ध ग्रंथानंतरचें आहे. या संप्रदायाची अशी स्थिति असल्यामुळें हें वाङ्मय व संप्रदायाची हकीकत शेवटीं परिशिष्टांत दिली आहे. जैन वाङ्मयाचा हा इतिहास डा. विंटरनिट्झ यांच्या ग्रंथाधारें लिहिला आहे.

हा भाग तयार करतांना राजश्री य. रा. दाते, म. धा. देशपांडे, चिं. श. दातार, सिद्धेश्वरशास्त्री चित्राव, ल. के. भावे, चिं. ग. कर्वे व मि. एच. कोहन यांची उल्लेख करण्याजोगी मदत झाली आहे.

श्रीधर व्यंकटेश केतकर

# महाराष्ट्रीय ज्ञानकोश–प्रस्तावनाखंड

## विभाग तिसरा–बुद्धपूर्वजग

### ग्रंथसंक्षेप

---

### प्रकरण १ लें.

#### इतिहासविषयक प्राचीन कल्पना

( पृ. १—९ ).

हिंदुस्थानेतिहासाच्या अनुषंगानें जगाचा इतिहास लिहिला जाईल, कारण अत्यंत प्राचीन राष्ट्रांच्या इतिहासांशीं हिंदुस्थानचा संबंध पोंचतो. अत्यंत प्राचीन भाषा व शब्द हा इतिहासोपयोगी माल येथें आहे. शिवाय इतिहासलेखनकला भारतीयांस अगदींच कांहीं अपरिचित नव्हती, पृ. १.— लोकरंजन व तत्त्वप्रचार यांच्या प्रयत्नांत इतिहास गुरफटला गेला आहे. इतिहासग्रंथांत जें खोटें लिहिलेलें असतें त्याची कारणमीमांसा शोधून सदितिहास निराळा केला पाहिजे, पृ. २.— इतिहास लिहितांना ज्या क्रिया होत असतात त्याचें यथार्थ्य अवगमिलें पाहिजे. पुराण म्हणजे फार जुनी माहिती; ही माहिती पुष्कळ वेळां काल्पनिक असते, कारण माहितीच्या अभावीं कल्पनाशक्तीची भर घालण्याचा सर्वत्र परिपाठ आहे. इतिहास हें शास्त्र आहे कीं नाहीं याविषयीं वाद आहे; पृ. ३.— मानवेतिहासावरून मानसिक क्रियाविषयीं सिद्धांत बसविण्याचें एक अभ्यासक्षेत्र यूरोपांत आढळतें. आपल्याकडील पुराणग्रंथकारांना ऐतिहासिक तत्त्वज्ञानाचें महत्त्व ठाऊक होतें, पृ. ४.— राजकीय, सांस्कृतिक व पारमार्थिक इतिहासांत इतिहासाचे नियम सांपडतात. धर्म, ज्ञान व उपासना या तिहींची समाजाला आवश्यकता असून त्यापैकीं एखाद्याचें अधिक प्राबल्य झालें कीं दुसऱ्या प्रकारच्या विचाराचा पुरस्कर्ता निघतो; पृ. ५.— याप्रमाणें भारतीयांस ऐतिहासिक भावना असतांहि संस्थानांच्या उत्कर्षाविषयीं त्यांनीं इतिहास लिहिला नाहीं याचें कारण राजकीय परिस्थितीसंबंधानें त्यांची बेफिकीर वृत्ति होय; पृ. ६.— शिवाय त्यांची इतिहासदृष्टि फार व्यापक होती. " फिलॉसफी ऑफ हिस्टरी " या सदरांत पडण्याजोगे सिद्धांत प्रत्येक काळीं भारतीयांनीं काढलेले आहेत; पृ. ७.— माहितीच्या अभावीं अनियंत्रित असलेली प्राचीन वेदपुराणांतली कल्पना सध्या दुरुस्त केली पाहिजे. पुराणकारास जगदुत्पत्तिकाल व समकालीन राष्ट्रें यामधील दुवे जोडावयाचे होते. हिंदुस्थानचा इतिहास ऋग्वेदपूर्वकालापासून लिहिला पाहिजे; पृ. ८.

[ संदर्भ ग्रंथ.— हाल— दि एन्शंट हिस्टरी ऑफ दि निअर ईस्ट. राजतरंगिणी. वंशग्रंथ. गेट— हिस्टरी ऑफ आसाम. हे— आराकान पास्ट-प्रेझेंट-फ्यूचर. वेद व पुराणें. हिरोडोटस. भगवद्गीता. शंकरदिग्विजय. अर्वाचीनकोश. मॅक्डोनेल अँड कीथ— वैदिक इंडेक्स. फ्लिंट— फिलॉसॉफि ऑफ हिस्टरी इन यूरोप. हेगेल— लेक्चर्स ऑन फिलॉसॉफि ऑफ हिस्टरी. ]

---

### प्रकरण २ रें.

#### विश्वोत्पत्तीपासून असुरराष्ट्रसंस्थापनकालापर्यंत

( पृ. ९— २५ )

ज्यांचे अवशेष दहा हजार वर्षांइतके जुने आहेत अशीं राष्ट्रें मुळींच नाहींत. भौतिक शास्त्रांच्या साहाय्यानें इतिहासाचा अज्ञात भाग भरून काढतां येतो. मनुष्योद्भवापूर्वी ज्योतिष-भूस्तर-प्राणी-वनस्पतिशास्त्रविषयक क्रिया विश्वांत घडल्या व जडापासून जीवोत्पत्ति झाली; पृ. ९.— वनस्पतिकोटि व प्राणिकोटि यांमध्यें अनेक बाबतींत सादृश्य दिसून येतें. सेंद्रियसंयुक्त पदार्थ मनुष्याला तयार करितां येतात. सजीवांतील विशेष गुणधर्म निर्जीवांतहि आढळतात; पृ. १०.— उदाहरणार्थ एखादा सचेतन जीव व स्फटिक यांची गुणधर्मांत तुलना केल्यास बरेंच साम्य दिसून येतें. प्रतिस्फटिकजातित्व हें सचेतन सृष्टीचें भेददर्शक लक्षण नव्हे. संवेदनशीलता जडसृष्टींतहि आहे. उत्पत्ति, अवस्था व आयुर्मर्यादा या कृत्रिम उपायांनीं बनवितां येतात; पृ. ११.— अदृश्यशक्तीच्या योगानें होतात म्हणून मानल्या जाणाऱ्या पुष्कळशा क्रिया सामान्य सृष्टिनियमानुसार घडत असतात. याप्रमाणें सजीव व निर्जीव सृष्टींमधील भेद खरा नाहीं असें सिद्ध होत आहे; पृ. १४.— मनुष्य हा विकासाच्या शेवटल्या पायरीवरील प्राणी आहे. मनुष्यप्राणी एकवंशसंभव कीं अनेकवंशसंभव याविषयीं एकमत नाहीं. मनुष्यप्राण्याचा विकास व प्रसार यामधील इतिहासाला भाषाशास्त्र फार उपयोगी आहे. भाषा बदलणें, सहजासहजीं होत नाहीं, पृ. १५.— मनुष्यभ्रमणाच्या इतिहासास वनस्पति व पशु यांच्या गृहीकरणाचा इतिहास, भाषा, निवासस्थान यांसारखीं अनेक प्रमाणें

ण्याची लागतात. शरीरलक्षणावरून मनुष्याचें वर्गीकरण करण्यांत येतें. पृ.१७.—मानववंश हा मर्कटापासून झालेला नव्हे. पृथ्वी थंड झाल्यापासून आतापर्यंतच्या अजमासें दहा कोटी वर्षांच्या कालांत चार युगें झालीं; त्याचे कालावधी निरनिराळे आहेत. मानवाच्या मूलस्थानाचा निश्चित शोध लागलेला नाहीं; पृ. १९ — मानववंशविस्तारांत मूळवंश कोणते ध्यावे यासंबंधीं निरनिराळीं मतें आहेत. शिद्दी आफ्रिका व ओशियानिया या भागांत असून यांची संस्कृति अति हीन आहे. मंगोलियन मानववंशाचे मंगोलोतातेर व इंडोचायनीज असे दोन मुख्य विभाग आहेत. अमेरिकन महावंश कोणी मंगोली वंशाचा भाग तर कोणी स्वतंत्र आहे असें मानतात. कॉकेशियन महावंशांत सेमेटिक, हेमेटिक व आर्यन असे तीन समुच्चय धरले जातात; पृ, २० —भाषेच्या दृष्टीनें तीन काळ पडतात: ( १ ) मूल-आर्यन भाषाकाळ, ( २ ) पर्शुभारतीय काल व ( ३ ) संस्कृत-अवेस्ता काल. तौलनिक व्युत्पत्तिशास्त्र व वाशिक संबंधशास्त्र हीं भाषासाहित्याचा ऐतिहासिक अभ्यास करण्यास उपयोगी पडतात, पृ. २३ —मुख्य भाषासंघ सोळा म्हणता येतील. शरीरलक्षणें व भाषा यांखेरीज दिसरें इतिहाससाहित्य म्हणजे संस्कृति होय इतिहासपूर्वकालाचे संस्कृतिदृष्ट्या पुढील भाग पडतात; अश्मायुधयुग प्रथम व द्वितीय काल, आणि आयसयुग; पृ. २४.—असुराचें राष्ट्र व इजिप्तचें राष्ट्र हीं दोन अत्यंत प्राचीन राष्ट्रें असून त्यांचें प्राचीनत्व ख्रि. पू ८००० वर्षांपर्यंत संशोधकांनीं नेलें आहे. या दोन राष्ट्रांच्या संस्कृती हिंदुस्थानी संस्कृतीच्या अगोदरच्या कीं नंतरच्या हें निश्चयानें सांगता येत नाहीं. म्हणून येथें प्रथम भारतीय संस्कृतीचा इतिहास घेऊन या विभागाच्या उत्तरभागांत भारतेतर राष्ट्रांचा प्राचीन इतिहास दिला आहे; पृ. २५

[ संदर्भ ग्रंथ.—कीन-एथ्नॉलॉजी. डार्विन-डिसेंट ऑफ मॅन. ज्ञानकोश-विभाग १ ला. कोल—डिस्कव्हरन्स ऑन क्लायमेट अँड कॉस्मॉलॉजी. फ्लॉवर व लिडेकर—इंट्रोडक्शन टु दि हिस्टरी ऑफ मॅमल्स. ब्लुमेनबाक—एलेमेंट्स ऑफ फिजिऑलॉजी. टिळक—आर्टिक होम इन दि वेदाज. हॉवेलॅक—सायन्स ऑफ लँग्वेज. स्मिथ—मॅन अँड एप्स. राईटमॅन अँड दि ग्लेशियल पीरियड. लॅथॅम—मॅन अँड हिज मायग्रेशन. डेनिकर—रेसेस ऑफ मॅन. हेडी—एव्होल्यूशनरी पाथॉलॉजी. बोस—रेस्पॉन्स इन दि लिव्हिंग अँड नॉनलिव्हिंग. अगाईल-ऑर्गेनिक एव्होल्यूशन. हर्टर—बायोलॉजिकल ॲस्पेक्ट्स ऑफ ह्यूमन प्रॉब्लेम्स. हाल—ह्यूमन एव्होल्यूशन. पेरी—आर्यन फायलॉलॉजी. साइस—प्रिन्सिपल्स ऑफ कंपॅरिटिव्ह फायलॉलॉजी ]

## प्रकरण ३ रें.

### असुरराष्ट्रसंस्थापनेच्या नंतरच्या इतिहासार्थ वेदावलोकन

( पृ, २५—११८ )

वेदविद्या विभागांत यज्ञसंस्थेचा विकास, ब्राह्मणजाति व वेदसंहितीकरणें कशीं बनलीं याविषयीं जें विवेचन आहे त्याचें फलदर्शक सिंहावलोकन करणें पुढील विवेचनास अवश्य आहे. मागील विभागांत मंत्रपूर्व आणि मंत्ररचनेच्या कालाचें ऐतिहासिक विवेचन समजण्यासाठीं मनोभूमिका तयार केली आहे; पृ. २५.—भारताचा इतिहास व भारतीयांचा इतिहास या दोन गोष्टी भिन्न आहेत व आर्य आर्यन, हे शब्द समानार्थक म्हणून उपयोजितात तें बरोबर नाहीं. यूरोपियन लोकांनीं भारतीय आर्यांचा इतिहास जो काढिला आहे तो मुळींच चुकीचा आहे; पृ २७.—आर्य हा शब्द वेदांत महावंशवाचक किंवा राष्ट्रवाचक नसून शिष्ट अगर यजनशील या अर्थानें आला आहे, पृ. २८ —चातुर्वर्ण्याचें मूळ हिंदुस्थानांत नसून तें मूलगृहकालीन आहे. मंत्रकालीन वर्ण हा शब्द वर्गविषयक होता पण तो ब्राह्मणादि वर्णांना लागत नव्हता, पृ. ३९ —अवेस्त्यांत वर्ण ( वरेन ) शब्द पंथवाचक आहे. वर्ण शब्दाचें स्वैच चार वर्गांच्या कल्पनेचें इराणी लोकांत (म्ह. पर्शुभारतीय कालांत) अस्तित्व असल्यामुळें गोऱ्यांनीं काळ्यास जिंकून रंगभेदावर वर्णभेद निर्माण झाला ही कल्पना ग्राह्य होत नाहीं, पृ. ४२. —ऋग्वेदांत दस्यु हा शब्द देवांचे व आर्यांचे शत्रू या अर्थानें आला असून दास हा शब्दहि त्याच अर्थी उपयोजिलेला आहे. दस्यु शब्द उत्तरकालीन वाङ्मयांत येत नसून दास शब्दाचा मात्र वेळ सेवक या अर्थानें उपयोग झाला आहे; ४३.—आर्य आणि दास हे परस्पराचे विरोधी आहेत ही कल्पना वेदांत तशीच अवेस्त्यांतहि असल्यामुळें, त्यांचा संग्राम झाल्याचें वर्णन ऋग्वेदांत आहे व हा संग्राम भारतभूमीवर झाला ही कल्पना ग्राह्य होत नाहीं. या वृत्तान्ताच्या स्पष्टीकरणार्थ मूलगृहकालाकडे धाव घेतली पाहिजे. आर्य आणि दस्यु यांचा विरोध वर्णविषयक नसून यजनविषयक आहे; पृ. ५२.—सारांश, दास, आर्य, दस्यु, वर्ण इत्यादींविषयीं उल्लेख आर्यन राष्ट्रानीं नॉन आर्यन लोकांपासून, हिंदुस्थान जिंकलें अशा इतिहासाचे सूचक मुळींच नाहींत; पृ. ५४.—ऋग्वेदांत देवासंबंधीं आलेल्या कथा तौलनिक पुराणशास्त्राच्या साहाय्यानें कथावृद्धीच्या ज्ञातव्य इतिहासाचा भाग होत. सरमा सूक्तांतील पणींना राजारामशास्त्री भागवत फिनीशियन म्हणतात. बोस, विश व वोमपैती, विश्पति हे शब्द घनिष्ट्यावर व होम व सोम म्हणजे वीर या शब्दाचा मादक रसाच्या एका झाडास असलेल्या शब्दाशीं शोधक उडून गेल्यावर संस्कृतापासून अवेस्तिक शाखा निराळी

झाली—लॅटिन व ग्रीक भाषा यांच्याहि अगोदर यथाक्रम निराळ्या झाल्या होत्या; पृ. ५४—ऋग्वेदांतील असुर व देव हे मनुष्यजातीच्या विभागांचे दर्शक दिसतात; पृ ५७—देवविषयक व असुरविषयक कथा ऐतिहासिक असल्यास त्या गोष्टी दाशराज्ञयुद्धापूर्वी घडल्या असाव्यात मंत्रवाङ्मयाच्या अगोदर दाशराज्ञयुद्ध झालें असलें पाहिजे आर्यन राष्ट्रांच्या वसाहतींचा इतिहास वेदपूर्वकालीन आहे, पृ ५८.—ऋग्वेदांतील आगमन आर्यांचें नसून ग्रमनशीलांचें होतें आर्यन राष्ट्रांचें काळ्यांशीं सामुच्चयिक वैर दिसत नाहीं मंत्रकालीं झालेलें आगमन आर्यन लोकाच्या भारतीय इतिहासांत प्राचीन नसून *अर्वाचीन आहे.* पृ. ५९—शक व मग या जाती वेदवक्त्या लोकांपूर्वी आल्या असाव्यात असें दिसतें, पृ. ६१—ऋग्मंत्रवाङ्मय हें सर्वभारतीय *आर्यन लोकांचें नसून कांहींशा उत्तरकालीं आलेल्या भारतीयांचें* आहे, आणि ब्राह्मणें हें वाङ्मय जुनें सूतवाङ्मय व नवें मान्त्रवाङ्मय यास जोडणारें आहे यज्ञसंस्थेचें आवरण *ज्याप्रमाणें स्थानिक धर्मावर टाकलें गेलें, त्याप्रमाणें स्थानिक* धर्म, इतिहास व पुराणें हींहि यज्ञसंस्थेंत शिरलीं, पृ. ६४.—ऋग्मंत्रांत जे मनुष्यांचे उल्लेख सापडतात ते दाशराज्ञयुद्धाशीं बहुतेक जोडून घेतां येतात ऋग्वेदांतील गोत्रमंडळांचा प्रतिपाद्य विषय दाशराज्ञयुद्ध होय, पृ ६६—दाशराज्ञयुद्धांतील व्यक्तींशीं ज्या दुसऱ्या नांवांचा संबंध येतो त्याचा हिशेब. जीं सूक्तें या व्यक्तींचा निर्देश करीत असतील तीं युद्धाशीं फार तर समकालीन पण बहुतकरून युद्धोत्तरकालीन होत, पृ. ६७.—सूक्तांची युद्धोत्तरता व तीं जाणण्यासाठीं उपयोगी पडणाऱ्या व्यक्ती व्यक्तींचा दाशराज्ञयुद्धाशीं संबंध किंवा तिची उत्तरता दिसली म्हणजे तिचा उल्लेख करणारें सूक्त दाशराज्ञयुद्धोत्तर समजावें, पृ ६९.—प्रत्येक ऋग्वेदसूक्तांची दाशराज्ञयुद्धाशीं पूर्वोत्तरता दाखविणारें कोष्टक, पृ. ८७—वरील विवेचनावरून दाशराज्ञयुद्ध हें ऋग्वेदमंत्रांतील अत्यंत जुन्या मंत्राच्या अगोदर अनेक दशकें किंवा शतकें होऊन गेलेलें दिसतें, पृ ११६—ऋग्मंत्रांतील इतिहास—ऋग्मंत्र हे भरतांचें आर्यन लोकांची वसाहत असलेल्या हिंदुस्थानांत आगमन दाखवितात. जुन्या राज्यांत पुरोहितांचें वर्चस्व उत्तम प्रस्थापित झालेलें होतें पुराणांतील व भारतांतील कुरुयुद्धपूर्व राजांचे इतिहास हे दाशराज्ञयुद्धपूर्व इतिहाससाहित्य होय. शक-मगांची वसति मंत्रकर्त्या लोकांपूर्वीची असावी मंत्रपूर्व-संस्कृति आर्यन असावी, पण ब्राह्मणी नसावी देश्यांचा पुरोहितवर्ग मेला किंवा मान्त्रांच्या पुरोहितांत लोपला, परंतु देश्यांचा सूतवर्ग टिकला, पृ. ११६

[ संदर्भग्रंथ—या व यापुढील एकंदर वैदिक प्रकरणांचे संदर्भग्रंथ ग्रंथाच्या अखेरीस एकत्रच दिले आहेत ]

---

## प्रकरण ४ थें.

## दाशराज्ञयुद्ध अथवा भरतदिग्विजय

(पृ ११८–१५४)

ऋग्वेदांत सर्वव्यापक प्रसंग दाशराज्ञयुद्धच होय या युद्धावर इतकें वाङ्मय झालें त्यास त्या युद्धाचें ऐतिहासिक महत्त्व हें कारण होय, पृ ११८.—ऋग्वेदांत भरत नांवाच्या लोकांच्या विजयाचें वर्णन असून त्यांचें तृत्सूंशीं नातें किंवा कदाचित ऐक्य दिसून येतें मंत्रोत्पन्न माहिती ही दुष्यन्तपुत्र भरताच्या नांवानें देशास नांव मिळालें या पुराणग्रंथांच्या विधानाविषयीं संशय उत्पन्न करते, पृ.११९—मंत्रोक्त इतिहासाचें पुराणें व ब्राह्मणें यांनीं विस्तरण केलें आहे, पृ १२०—भरतदीप्यतीवर राष्ट्रनाम पडणें अशक्य दिसतें; पृ १२१—ऋग्वेदांतील ७ व्या मंडळांतील १८ वें सूक्त महत्त्वाचें असून त्यावरून असें दिसतें कीं, सुदासाचे सहायक म्हणून तृत्सु, भरत, पृथु व पर्शु हे चार समुच्चय होते सुदासाविरुद्ध असलेल्या राजांबद्दल मतभेद आहे. सुदास हा पैजवन असून दिवोदासाचा पुत्र किंवा नातू होता सुदासाचे प्रतिस्पर्धी बलवान् असल्याविषयीं वसिष्ठाचें मत होतें, पृ १२१.-दुसऱ्या कांहीं ऋचांच्या मदतीनें कळतें कीं वसिष्ठ व विश्वामित्र पैजवनाच्या पौरोहित्यासाठीं स्पर्धा करीत होते आणि पृथु व पर्शु हीं सुदासाच्या मदतीस असलेलीं राष्ट्रें पूर्वेकडे चाल करून जात होतीं, पृ १२४—तिसऱ्या मंडळांतील ३३ व्या व ५३ व्या सूक्तावरून विपाश् आणि शुतुद्री यांचें आक्रमण भरतांकडून अश्वमेधापूर्वी झालें असें दिसून येतें, पृ. १२७.—दिवोदास किंवा सुदास हा भरत राजा असावा, भरत व तृत्सु हे एक नसावेत, *आणि वसिष्ठामुळें तृत्सु व भरत यांचें* एकीकरण झालें असावें, पृ १२८—यमुना व परुष्णी यांमधील प्रदेश तृत्सूंचा दिसतो दाशराज्ञयुद्धापूर्वी सुदासाचा बाप किंवा आजा दिवोदास अतिथिग्व यानें पुरु, कुत्स आणि आयु यांच्या मदतीनें तूर्वयाण (पक्थ, = अफगाण) यांच्या बरोबर जी लढाई केली तींत दिवोदासाचा पराभव झाला, परंतु पुढें त्यानें डोंगरांतील जातींचा पुढारी शंबर याचा अनेकदा पराभव करून शिवाय तुर्वश, यदु, पर्णय, करंज व शुंगु यांच्याशीं लढाया करून त्यांना हरविलें,पृ १३०—दाशराज्ञयुद्धापूर्वी सुदासाच्या कारकीर्दीत मित्रसंघानें तूर्वयाणाचा पराभव केलेला दिसतो या पराभवानंतर तूर्वयाणानें दडपलेलीं राष्ट्रें स्वतंत्र होऊन आपसांत भांडूं लागलीं व पुरु सुदासाचे शत्रू जे यदुतुर्वश त्यांना मिळाले; पृ. १३३—सुदासाचा बाप दिवोदास पिजवन, आणि वध्र्यश्व आणि देववत् आणि बायको सुदेवी होती त्यानें एक अश्वमेध यज्ञ केला होता तो अहिंसक व त्याचे शत्रू हिंसक असा स्तोत्रकर्त्यांनीं भेद केला आहे, पृ १३३.— दाशराज्ञयुद्धांत ज्यांचा सुदासानें पराभव केला त्यांत शिम्यु हा एक होता. नहुषाचा दाशराज्ञ दाशीं

संबंध दिसत नाहीं पृ १३४ — तुर्वश हे दाशराज्ञयुद्धातील सुदासाचे जाड प्रतिस्पर्धी असून ते अनु व द्रुह्यु याच्याप्रमाणें पाण्यांत बुडून न मरता पराजय पावून यदूसहजिवंतच सुटले तुर्वश इंद्रपूजक होत, पृ १३५ —तुर्वशानीं पदप्णी श्रोलांडली असून ते बहुतेक पश्चिमेकडून पूर्वेकडे गेले असावे, पृ १३६ — वृचीवान् आणि तुर्वश यांचा सृंजय राजा दैववात यानें पराभव केला असा एक उल्लेख आहे सृंजय दैववात व अभ्यावर्तिन् चायमान हे एकच दिसतात, पृ १३९ — तुर्वश व तुर्वीति यांचा कांहीं संबंध होता की काय तें सांगता येत नाही पाश्चात्य संशोधक म्हणतात त्याप्रमाणें क्रिवि नांवाचें राष्ट्र होतें से दिसत नाहीं, पृ. १४० —प्रमाणें क्रिवि नावाचें राष्ट्र होतें से दिसत नाहीं, पृ. १४० — दुर्ह्यूंचा यदुतुर्वशाबरोबर उल्लेख असून सुदासाविरुद्ध लढतांना त्यांच्यांतील लोक मारले गेले, पृ १४१— पुरु हें समाजाचें नाव असून त्यांपैकीं पुरुकुत्स व त्रसदस्यु हे राजे होते, पृ १४१ — पुरुकुत्स सुदासशीं समकालीन होता असें म्हणण्यास आधार नाहीं पण सुदासानें दाशराज्ञ युद्धात पुरूचा पराभव केला त्यामुळें पुरुकुत्स तुरुंगात पडून तेथेंच त्याचा अंत झाला असण्याचा संभव आहे पृ १४३.— पुरूनाच पुढें इक्ष्वाकू म्हणू लागले असावे कालांतरानें कुरु व पुरु हे लोक एक झाले, पृ १४४ -- पुरु, तृत्सु, भरत व कुरु हे एकच लोक असावेत, पृ १४७ — महाभारतातील वंशावळींवरून यदुतुर्वशादि पंचजनांच्या पूर्वजाचें आपणांस ज्ञान होतें, पृ १४७ — महाभारतातील व ऋग्वेदातील देवापि व शन्तनु हे एकच, पृ १४८ — दाशराज्ञयुद्धांत सुदासाविरुद्ध दहाहून अधिक राजे असून त्या सर्वांचा पराभव एकाच ठिकाणीं व एकाच वेळीं झालेला दिसत नाहीं, पृ १५० — दाशराज्ञयुद्धाचा काल पार्गिटरच्या मताप्रमाणें कुरुयुद्धापूर्वी २५० वर्षे असावा हें युद्ध फार तर ५० वर्षे चाललें असेल ऋग्वेदांतील अनेक सूक्तें अशीं दिसतात कीं त्या काळात दिवोदास व सुदास या व्यक्ती पुराणपुरुषांच्या कोटींत जाऊन पडल्या होत्या, पृ १५२ -- पुरूरवसउर्वशी कथा व सरमापणी कथा या देखील फार जुन्या आहेत, पृ १५३.— दासकल्पना पश्चिमभारतीयकालीन असावी दाशराज्ञयुद्धाचा आर्यदासविरोधाशीं काहीं संबंध नाही वर्ण हा शब्द त्या काळीं संप्रदाय या अर्थानें वापरीत पृ १५४

---

## प्रकरण ५ वें.

## वेदकालातील शब्दसृष्टि

## (पृ १५४-४७२)

प्राचीनकाळच्या परिस्थितीचा इतिहास लिहिण्यास सहितान्तर्गत शब्दसृष्टि हें एक साहित्य आहे पृ.१५४ —शब्दसंग्रहाच्या यास्कीय वर्गीकरणपद्धति व अनिश्चितार्थी, अनेकार्थी आणि दुर्बोधशब्द, पृ १५४ —दैवतसृष्टीच्या देवतानामें नामक वर्गांतील आदित्यनामें, उपनामें, अग्निदूतनामें, अप्सराभिमानी देवता, मरुद्गण रुद्र, जलदेवता, मासाधिष्ठित देव, मेघोपयोगीदेवता, वायुदेवता वत्सराभिमानी प्रजापति, पुरुषमेधांतील देवता व देवताविशेष पृ १५५ —देवताविशेषणें नामक वर्गांतील अग्निविशेषणें, इंद्रविशेषणें, उषाविशेषणें, मरुद्विशेषणें रुद्रविशेषणें सूर्यविशेषणें व सामान्यदेवताविशेषणें पृ १६० –देवयोनिनामक वर्गांतील अप्सरागंधर्व वगैरे, पितर व पितरसंबंधी व पिशाच, पृ १६८ — असुर नामक वर्गांतील असुरविशेषनाम व विशेषणें पृ १७० —स्वर्ग विषयक नामक वर्गांतील स्वर्गनामें, पृ १७३ — अजीवसृष्टीच्या पृथ्वीनामक वर्गांतील पृथ्वीनामें व सृष्टचमत्कार, पृ. १७४ —ध्वनिनामक वर्गांतील ध्वनिवाचक, शब्दवाचक व ध्वनिविषयक विशेषणें, पृ १७५ —धातुनामक वर्गांतील हिरण्यनामें आणि धातु व धातुसंबंधी पृ १७६ — जमीननामक वर्गांतील जमीन व तिचे प्रकार, पृ १७८ –उदक नामक वर्गांतील उदकनामें व जलाशयसंबंधी, पृ १७९— उष्णता नामक वर्गांतील किरणनामें, तेजोवाचक, तेजोविशेषणें, तेजस्वी ( क्रियापदें ) ज्वालानामें व जाळणें ( क्रियापद ) पृ १८१.—गतिनामक वर्गांतील गतिवाचक नाम, गतिवाचक क्रियापदें व त्वरावाचक,पृ १८३ -ग्रहनक्षत्रादि वर्गांतील ग्रह व नक्षत्रनामें व ज्योतिषविषयक, पृ १८८ –संख्या नामक वर्गांतील क्रमवाचक व संख्यावाचक, पृ १९७ — कालनामक वर्गांतील ऋतु, महिने व युगें, दिवसनामें, रात्रिनामें आणि काल व कालसंबंधी, पृ १९९ --स्थान नामक वर्गांतील स्थान अंतिकनाम, दूरनामें, आकाशनामें, ग्रामनामें, देशविशेष, नदी सामान्यनामें, नदी विशेषनामें, पर्वतनामें, दिग्वाचक, स्थलविशेष, स्थलदर्शकविशेषणें व विभागदर्शक, पृ २०६ जीवसृष्टी (मानवेतर) च्या वनस्पतिनामक वर्गांतील वनस्पतिविषयक,पृ २२६ –प्राणी नामक वर्गांतील अश्वनाम, अश्वसंबंधी, गोनामें, पक्षिनामें, सर्पनामें, प्राणिविशेष, प्राणिसंबंधी विशेषणें व पुरुषमेध यज्ञांतील पशु , पृ.२३५.–मानव सृष्टीच्या मनुष्यनामक वर्गांतील मनुष्यनामें, मनुष्यसामान्यनामें, मानवविशेष, मानवी स्त्रिया राजेविशेष व स्तोतृनामें,पृ २५८ —शरीरावयवनामक वर्गांतील अंगुलिनामें प्राण्यवयव, प्राणवाचक, बाहुनामें व शरीरसंबंधी, पृ २७४.—वैद्यकनामक वर्गांतील रोग व आरोग्य व औषधिनामें, पृ २८१ —अन्ननामक वर्गांतील अन्ननामें, खाणें ( क्रियापदें ), खाद्य पेयविशेष, खाद्यपेय किरकोळ व धान्यनामें पृ २८८ — नातेंगोतें नामक वर्गांतील अपत्यनामें व नातेवाईक, पृ. २९५ —अवस्थानामक वर्गांतील मानवी अवस्था, कांतवाचक, ऐश्वर्यबोधक, उपभोगवाचक, धननामें, धनिकनामें, निर्णीत व अंतर्हितनामें, नाविन्यवाचक, पुराणनामें, बलनामें, बहुनामें, महन्नामें, विस्तारदर्शक विशेषणें, सत्यनामें,

सामान्यस्थितिदर्शक, विशेषस्थितिदर्शक विशेषणें व सामान्य स्थितिदर्शक क्रियापदें, पृ १०८—मनोविकार वर्गांतील इच्छादर्शक क्रोधनाम, रागावणें (क्रियापदें), बुद्धिनामें, मानसिकस्थितिदर्शक विशेषणें, मनोविकारविशेषणें, मनोविकारदर्शक क्रियापदें, मेधाविनामें व सुखनामें, पृ. ३१८—उपासनावर्गांतील ऋत्विक् सामान्य व विशेषनामें, ऋत्विक् सबधी, यज्ञपात्रें, यज्ञविशेषनामें, यज्ञसामान्यनामें, यज्ञ साधनें, यज्ञिय परिभाषा, परिभाषा—उपसर्गाक्षरें, वेदिनामें, यज्ञसबधी किरकोळ, यज्ञविषयक किरकोळ विशेषणें यज्ञ विशेषणें, यज्ञ करणारे, यज्ञिय विशिष्ट स्थलें, सोमनामें, सोमविशेषणें, सोम व सोमाभिषवसंबधी, सामनामें, स्तुति करणें, स्तुतिनामें स्तोमनामें, हविर्नामें व विशेषणें यजन पूजन करणें (क्रियापदें) आणि धर्मशास्त्र, पृ ३३१—युद्धवस्तुनामक वर्गांतील कवचनामें, धनुष्यबाण, ध्वजनामें, युद्धांतील हत्यारें, युद्धनामें, योद्धे, युद्धपराभव, युद्धविषयक किरकोळ, सैनिकांचे प्रकार व सेनाप्रकार, पृ ३३९—सार्वजनिक नामें नामक वर्गांतील कूपनामें जलाशय व मार्ग, पृ ३१०—खेळनामक वर्गांतील खेळ व खेळसंबंधी, पृ ३५०.—गृहनामक वर्गांतील गृहनामें, गृहविशेष, गृहाचे अवयव, गृहांतील सामान व रज्जुनामें, पृ ३५२.—जाती, कुलें व वंशनामक वर्गांतील जाती व कुलें, वर्णाश्रम व पैतृकनामें, पृ ३६३—दाननामक वर्गांतील दातृनामें, दान व दाते, दानविषयक विशेषणें, दान करणें (क्रियापदें), दान व दानाचे प्रकार आणि याचना करणें, पृ ३७०—सामाजिकनामक वर्गांतील समाजांतील कांहीं विशेष, सामाजिक किरकोळ, स्तेननामें, सामाजिक क्रियापदें व सामाजिकस्थितिबोधक विशेषणें, पृ ३७०—भाषा नामक वर्गांतील उपमावाचक शब्द, उपसर्ग, छंद, भाषा व भाषणसबंधी, वाङ्नामें, सर्वनामें, सामान्य अव्ययें, क्रियाविषयक अव्ययें, तद्धित अव्ययें, तुमर्थ अव्ययें, ल्यबन्त अव्ययें, वीप्सा अव्ययें व शब्द करणें (क्रियापदें), पृ ३८१—पुण्य, पाप व प्रशस्य नामक वर्गांतील पापनामें व प्रशस्यनामें, पृ ३९५—गुणनामक वर्गांतील भाववाचक नामें, मानव विशेषणें, रूपनामें, वर्ण (रंग) वाचक, सबंधदर्शक, सौंदर्यदर्शक, ह्रस्वनामें, विभाग दर्शक व सामान्य विशेषणें, पृ ३९६—वस्त्र व भूषणें नामक वर्गांतील वस्त्रें आणि भूषणें, पृ ४०८—शत्रु वर्गांतील शत्रुनामें व शत्रुविशेषणें, पृ ४१२—व्यापार व कृषि नामक वर्गांतील कृषि व मापें, पृ ४१२—दळणवळणनामक वर्गांतील नौकानामें, मार्गसबंधी, मार्ग व त्यांचीं विशेषणें, रथ व रथसंबंधी, रथावयव सारथिनामें आणि दळणवळण किरकोळ, पृ ४१६—वाद्यें नामक वर्गांतील वाद्यें, पृ. ४२३—विचार नामक वर्गांतील ब्रह्मविशेषणें व वेदान्त, पृ ४२५—ऋषि नामक वर्गांतील ऋषिनामें, यज्ञांतील ऋत्विज, गुरु शिष्यसंबंध आणि पैतृकनामें, पृ ४२७—राजकीय नामक वर्गांतील अधिकारी, राजकोश व सभानामें, पृ ४५१—अभिचार नामक वर्गांतील अभिचार, तार्हेत, गंडे दोरे वगैरे, पृ ४५१.—इतर कर्म नामक वर्गांतील कर्मनामें कर्मविशेष, इंद्रियकर्में (क्रियापदें) धंदवाले, धंद्याचीं साधनें, धंदेसूचक (क्रियापदें) धारणपोषण करणें (क्रि), पाहणें (क्रि), प्रातिवाचक क्रियापदें, रक्षणपालन, सेवा करण, विनाशवाचक, हिंसाविशेषण, विनाशदर्शक क्रियापदें, पृ ४५२—वरील शब्दांच्या याद्यांवरून वेदकालीन सामाजिक परिस्थितीचें चित्र काढता येतें वेदविषयक विचारास चालन देऊन अभ्याससामुग्री वाचकाच्या पुढें ठेवीत आहे दृष्टाच्या मदतीनें सामाजिक चित्र केवळ सिद्धान्त रूपानें मांडलें नाहीं, पृ ४७१

---

## प्रकरण ६ वें

### ब्राह्मण्याचा इतिहास

### (पृ ४७२–५११)

ब्राह्मणजातीचा आणि तिच्या विशेषा इतिहास हें प्राचीन संस्कृतीच्या इतिहासाचें एक मुख्य अंग आहे, पृ ४७२—अथर्वा हें समाजांतील प्रथम वर्गाचें ब्राह्मणपूर्व नांव होतें बृह (म्ह स्तोत्र) + मन = ब्रह्मन् हा शब्द सोमसंस्थेच्या पूर्वी तयार झाला असावा व सोमसंस्थापूर्वीच हा वर्ग बराचसा वंशपरंपरेनें चालू असावा, पृ ४७३—ऋग्वेदाच्या इतिहासांतील महत्त्वाचा भाग सूक्तकर्तृत्व होय प्रत्येक सूक्ताचा द्रष्टा देण्याचें ओझें डोक्यावर घेतल्यामुळें, परंतु परपरागत माहिती तर नसल्यामुळें कांहीं ठिकाणीं कांहीं तरी दडपून देण्याची बुद्धि सर्वानुक्रमणीकारास झालेली दिसते, पृ. ४७४—सर्वानुक्रमणींत सूक्तद्रष्टे म्हटलेल्या पैकीं ऋग्मन्त्रांत उल्लिखिलेले लोक व ब्राह्मणोल्लिखित सूक्तकर्ते —ऐतरेय ब्राह्मणकाराची संहिता व सध्याची शाकल संहिता एक नाहीं पृ ४७५—सर्वानुक्रमणींत सूक्तद्रष्टे म्हणून उल्लेखिलेले पण मंत्रांत मागमूसहि नसलेले असे अनेक लोक आहेत त्यांची यादी, पृ ४७५—उत्तरकालीन ब्राह्मण जी गोत्रनामें आपल्या पूर्वजांचीं नांवें समजतात आणि त्या पूर्वजास ऋषी समजतात त्यांमध्यें कांहीं मंत्रकालीन ऋषी असणें अशक्य नाहीं सूत्रोक्त गोत्र म्हणून उल्लेखिलेल्या ऋषींपैकीं ज्यास सर्वानुक्रमणीकारांनीं मन्त्रद्रष्टे म्हटलें आहे अशा व्यक्ती व त्यांपैकीं ऋग्मन्त्रांत न उल्लेखिलेले लोक, पृ ४७७—पारमार्थिक इतिहासांत परमार्थोद्यम करणारा वर्ग कसा होत गेला याचें ज्ञान पाहिजे व त्या वर्गाचें योगक्षेम चालविणाऱ्या वर्गाचेंहि ज्ञान पाहिजे ऋषी व त्यांना दान देणारे राजे यांची यादी, पृ ४७७—मंत्रकालांत वंशपरंपरेचें ब्राह्मण्य स्थापित झालें होतें सूक्तकर्तृत्वकालीन ब्राह्मण्याचा उत्तरकालीन

ब्राह्मण्याशीं संबंध जुळविण्यास सर्वानुक्रमणी व गोत्रप्रवरावली हीं दोन साधनें आहेत. आंगिरस, कण्व, अत्रि, भृगु, कश्यप, भरद्वाज, विश्वामित्र, गोतम, वसिष्ठ व अगस्त्य यांच्या कुलांची व कुलविरहित सूक्तकारांची, सर्वानुक्रमणीसिद्ध व ऋग्मंत्रसिद्ध कुल व वंशसंबंध, सर्वानुक्रमणीसिद्ध कुलसंबंध व ऋग्मंत्रसिद्ध वंशसंबंध आणि केवल सर्वानुक्रमणीसिद्ध वंशसंबंध व कुलसंबंध या सदराखालीं, सूक्तकारांच्या नांवावरील सूक्तें, त्यांपैकीं त्या सूक्तकाराचा उल्लेख असलेलें सूक्त व सूक्तकाराचें कुल व वंशसंबंध सिद्ध करण्यास साधनीभूत झालेले ऋग्मंत्र इत्यादि गोष्टींसह सविस्तर माहिती, पृ ४७८.—गोत्र हा भूमिसंरक्षक वर्ग या अर्थानें शासनविषयक विभाग असेल, परंतु असगोत्रविवाहाची चाल इण्डोयूरोपीय काळापासून अस्तित्वांत असावी असें समजण्यास साधन जी भारतीयांतील गोत्र प्राचीनता तीच खरी दिसत नाहीं. इण्डोयूरोपीय काळांत बहिर्विवाह होत असेल तर मधल्या मांत्रसंस्कृतीच्या लोकांत तो तात्पुरता नष्ट झाला असला पाहिजे, पृ ४९१.—गोत्राचा वैदिक धर्मसंस्थेंत महत्वाचा संबंध दिसत नाहीं, पृ ४९२.—गोत्रविशिष्ट श्रौतधर्म अर्वाचीन आहे. गोत्राप्रमाणें आप्रीसूक्ताचा उपयोग करण्याचा भेद सूत्रकालीन दिसतो, पृ. ४९३.—गोत्राच्या बाबतींत ब्राह्मणांनीं ब्राह्मणेतरांचें अनुकरण केलें, पण लौकिक गोत्र व आध्यात्मिक गोत्र असा निराळा भेद उत्पन्न करून ब्राह्मणांनीं आपलीं गोत्रें ब्राह्मणेतरांवर लादलीं; पृ ४९४.—सूत्रकारांनीं प्रवरऋषी हे व्यक्तींचे गोत्रसंस्थापकापूर्वीचे पूर्वज बनविले आहेत—पण या विधानास वेदांत प्रमाण नाहीं. यज्ञसंस्था आज जी चार संहितांनीं युक्त अशी दिसते ती तशी तयार होण्यापूर्वी प्रवरसंस्थापक ऋषींचे संप्रदाय व दुसरे अनेक संप्रदाय चालू असलेले दिसतात, पृ. ४९४.—द्विरात्र, षड्रात्र व द्वादशाह हे क्रतु सत्रागच होते, पृ. ४९५.—प्राचीन कालीं सामुच्चयिक सोमयाग भटकणाऱ्या टोळ्यांच्या भटकण्याच्या क्रमांत नऊ, दहा किंवा बारा महिने एकसारखे चालत असावेत व हींच त्या काळचीं सत्रें होत. ऋग्वेदांत सत्र हा शब्द एकदम, बरोबर, सरोबर असा सामुच्चयिक यागेतर अर्थासाठीं आला आहे, पृ ४९७.—गोत्रप्रवराच्या संबंधानें भिक्षुकी कारणाकरितां काल्पनिक इतिहास तयार होण्याचा संभव दिसतो. सर्व गोत्रांचा विशिष्ट आप्रीशीं संबंध जोडण्याकरितां प्रवरांची यादी तयार होणें अवश्य होतें; पृ. ४९८.—प्रवरसंस्थापक ऋषी हे सात कुलांचे पूर्वज असावे असें वाटत नाहीं. प्रवरण म्हणजे निवड व आपल्या पूर्वजांच्या नांवाचा उच्चार करण्याऐवजीं संप्रदायांतील प्रमुख आचार्यांच्या नांवाचा उच्चार करण्याच्या प्रवृत्तीशीं या गोष्टीचा संबंध आहे; पृ. ४९९.—मान्य झालेल्या व्यक्तींनींच प्रवरण करावें व तें उत्तरकालीनांनीं स्वीकारावें असा प्रयत्न झाला होता, पृ. ५००.—एकाच गोत्राचीं मंडळी ऋग्वेदी व यजुर्वेदीहि आहेत. सूत्रविशिष्ट गोत्रें असल्यास थोडकीं. कात्यायन शाखेच्या गोत्रांची व प्रवरांची त्याच्या सूत्राप्रमाणें यादी, पृ.५००.—ब्राह्मण्याच्या इतिहासांत ऋग्वेदी व यजुर्वेदी हें वर्गीकरण कार्यभिन्नत्वामुळें झालें, पण पुढें शाखा व सूत्रें निघालीं तीं पक्षभेदरूपी चळवळीमुळें निघालीं; पृ. ५०५.—आपला यज्ञविषयक संप्रदाय वाढविण्यासाठीं दुसऱ्या संप्रदायाचा निषेध केल्याचीं उदाहरणें तैत्तिरीय संहिता, तैत्तिरीय ब्राह्मण, शतपथ ब्राह्मण वगैरे ग्रंथांतून अनेक आहेत; पृ. ५०७.—विशिष्ट कर्माचा प्रघात सुरू करण्यास ऐतिहासिक गोष्टींची जोड देण्यांत आली, पृ ५०९.—या सर्वांच्या मुळाशीं भिक्षुकीपासून प्राप्ति एका वर्गास व्हावी व दुसऱ्यापासून जावी हेंच कारण आहे. शेंदोनशें वर्षांतच मांत्रसंस्कृतीचा पराजय होऊन देश्यांच्या दैवतांची पुनःस्थापना झाली असावी ब्राह्मण्याच्या इतिहासाचे दाशरथी रामचंद्राचा [ब्राह्मण अस्तित्वांत येण्यापूर्वीचा] काळ दाशराज्ञयुद्धकाल, होते, आध्वर्यु व ब्रह्म यांच्या स्वतंत्र हवनपरंपरा तयार होण्याचा काल, सोमसंस्था तयार होण्याचा काल, सोमसंस्थाविकासाचा काल, शाखाभेदाचा काल, सूत्रकाल व मनुस्मृतीचा काल असे निरनिराळे विकासावस्था दर्शविणारे काल पडतात, पृ ५१०.—ब्राह्मणांचें इतरांपासून वियुक्तत्व व जातींत इतरांचा अप्रवेश हीं यज्ञसंस्था मोडल्याबरोबरच झालीं शाखावार पोटजाती कुरुयुद्धकालीन असून त्या वेळेसच प्रादेशिक जाती पडण्यास प्रारंभ झाला. पृ. ५११.—बौद्धिक इतिहासांत ब्राह्मण जातीचें स्थान मोठें आहे, तरी पारमार्थिक व नैतिक इतिहासांत त्यांचें कार्य फारसें अभिमान बाळगण्याजोगें नाहीं. तथापि राष्ट्रास एकस्वरूप देण्याच्या बाबतींत त्यांनीं मोठी कामगिरी केली आहे, पृ. ५११

[संदर्भग्रंथ—ज्ञानकोश विभाग २ रा. एगलिंग—शतपथ ब्राह्मण (भाषांतर) सर्वानुक्रमणी वेदसंहिता ब्राह्मणें. महावंसो व दीपवंसो. छान्दोग्योपनिषद. बौधायनस्मृति धर्मसूत्रें. श्रौतसूत्रें गृह्यसूत्रें. मनुस्मृति. सेनार्ट—ला कास्ट अन्स इंडे (पॅरिस १८९६). वज्रसूची टीका. भा. इ. सं. मं.—प्रथमसंमेलनवृत्त. वि. विस्तार—जानेवारी १९२० मॅक्समुल्लर—एसेज; हिस्टरी ऑफ एन्शंट संस्कृत लिटरेचर. ग्रीनिज—ए हँडबुक ऑफ ग्रीक कॉन्स्टिट्यूशनल हिस्टरी]

---

## प्रकरण ७ वें.

## सूतसंस्कृति

पृ (५११–५२८)

आर्यन भाषेनें व्यापलेलें क्षेत्र आज जेवढें आहे तेवढेंच जवळजवळ दाशराज्ञयुद्धकालीं म्हणजे वेदपूर्वकालीं असावें, पृ. ५११.—राजस्थानांतील भाटांनीं आपल्या राजांकरितां

त्याप्रमाणें कवनें केलीं त्याप्रमाणें प्राचीन कालींहि कवनें झालीं असावींत; पृ. ५१२.—यजुर्वेदीय संहिता व ब्राह्मणें यांचा काळ हा सूत व मांत्र संस्कृतीच्या मिलाफाचा काळ होय. स्थानिकाच्या शिव, विष्णु, वैश्रवण, कुबेर, प्रजापति वगैरे कांहीं मुख्य देवतांना प्राधान्य देऊन मंत्रांस व क्रियांस महत्त्व दिलें गेलें. गंगेच्या पूर्वेस अग्निपूजनास फारसें प्राधान्य नसावें. आरण्यकीय धर्म हा देश्य संस्कृतीचें पुनरुज्जीवन व मांत्रसंस्कृतीचा विनाश दाखवितो; पृ ५१३.—राजवंशावळी अनेक इतिहासपुराणांतून दिलेल्या आहेत. उलटपक्षीं ब्राह्मणांत गुरुशिष्यपरंपरेची महती असल्यानें त्यांच्या वंशावळींचा मागमूस लागत नाहीं. या वंशावळ्यांत व तदनुषंगिक कथांत बरीच खरी इतिहासपरंपरा आहे; पृ. ५१४.—ऋग्मंत्र हें मांत्रसंस्कृतीचें व पुराणें हें देश्य ऊर्फ सूतसंस्कृतीचें वाङ्मय आहे. मांत्रवाङ्मयांत पौराणिक राजांच्या अनुल्लेखाचें कारण मांत्रसंस्कृतीचे लोक त्या वेळीं अद्याप गंगेच्या पश्चिमेकडेच असल्यामुळें त्यांना गंगेच्या पूर्वेकडील या पौराणिक राजांची माहिती नसावी; पृ. ५१५.—अध्वर्यूंनीं यज्ञसंस्थेंत इतिहासपुराणाचा समावेश करून त्यास पांचवा वेद असें नांव दिलें. इतिहासपुराणें म्हणून एखादा ग्रंथ नव्हता; पृ. ५१६.—इतिहासपुराणाचा उल्लेख मंत्रवाङ्मयांत व्रात्यस्तोम-कांडाशिवाय इतर कोठेंहि नाहीं. ब्राह्मणवाङ्मयांतील इतिहासपुराणभाग यज्ञसंस्था इतिहासपुराणाशीं संबद्ध आहे असें दाखविण्याचा प्रयत्न करीत आहे; पृ. ५१७.—हल्लीं पौराणिक कथा सामान्यतः सत्य असें मानण्याचा प्रघात पडला असून एखादी कथा ऐतिहासिकदृष्ट्या त्याज्य म्हणणारावर तें सिद्ध करण्याचा बोजा पडतो. तथापि प्राचीन वंशावळींत मधल्या दीर्घकालांत कांहीं चुका, लोप व लबाडी होणें संभवनीय आहे; पृ. ५१८.—वंशावळ्यांत पुढच्याचें मागच्याशीं नेहमीं निश्चित नातें दिलेलें नसतें; पृ. ५१९.—कोसलवंश पूर्वेकडे असल्यानें तो हैहय, तालजंघ, शक, पह्लव, कांबोज इत्यादि टोळ्यांच्या हल्ल्यापासून बचावून अखंड राहिलेला सांपडतो; पृ. ५२०.—कालक्रमें काढल्याशिवाय वंशावळ्यांस महत्त्व नाहीं. तीं काढतांना पैतृक नामावरून पितापुत्रांचें नातें नेहमींच निघतें असें नाहीं, कधीं कधीं एकच नांव अनेक व्यक्तींचें असतें वगैरे गोष्टी लक्षांत ठेविल्या पाहिजेत; पृ. ५२०.—वैवस्वतमनूच्या इक्ष्वाकु पुत्रापासून सूर्य आणि विदेह वंश, नेदिष्ठ पुत्रापासून वैशाल घराणें व त्याची कन्या इला हिच्या पुरूरवस् पुत्रापासून इतर सर्व घराणीं निघालीं; पृ. ५२०.—पुराणांतील वंशावळ्यांचें कालक्रमदर्शक कोष्टक. मनूपासून निघालेल्या यादव, पौरव, काशी, सूर्य दिष्ट व अनु या वंशांपैकीं यादव, सूर्य व विदेह घराण्यांच्या वंशावळी बऱ्याच मोठ्या व स्मृतिपरंपरेनें बहुतेक अबाधित तशा चालत आलेल्या आहेत. पौरव व अनु कुलांत बरींच नांवें दिसतात तरी त्यांच्या वंशावळींत मध्यंतरी मोठमोठीं रिक्तस्थानें आहेत. काशी व दिष्ट या त्यानंतरच्या महत्त्वाच्या वंशांचा लोप दाशरथी रामाच्या सुमारास झालेला आढळतो. बाकीचे वंश कमी महत्त्वाचे असून त्यांतील कांहींचा आरंभ बराच उत्तरकालीन आहे; पृ. ५२२.—सोमवंशाचा मतिनार सूर्यवंशी प्रसेनजिताचा, यादववंशी शशबिन्दु प्रसेनजितपुत्र दुसऱ्या यौवनाश्वाचा (किंवा युवनाश्वाचा) व कान्यकुब्जवंशी जह्नु सूर्यवंशी पुरुकुत्साचा समकालीन होता गाधिपिता पुरुकुत्साच्या चारपांच पिढ्या मागचा होता. विश्वामित्र, त्रिशंकु, हरिश्चंद्र व जमदग्नि, हे समकालीन व शुनःशेप आणि जामदग्न्यराम हेहि समकालीन होते; पृ. ५२४—भार्गव रामानें एकवीस वेळां पृथ्वी निःक्षत्रिय केली ही कथा रामाच्या जागीं तालजंघ हैहय घातल्यास काहींशी सत्य होईल. काशीचा प्रतर्दन व सूर्यवंशी सगर हे समकालीन असून त्यांनीं तालजंघ हैहयाचें वर्चस्व मोडलें. दिष्टवंशी चक्रवर्ती मरुत्ताला अजमासें जामदग्न्य रामाच्या कालीं टाकतां येईल. पौरववंशी भूमन्यु सूर्यवंशी नाभागाचा समकालीन होता, आणि भरत पहिल्या दिलीपाशीं व दुष्यन्त अंशुमानाशीं समकालीन होता पृ. ५२५.—सोमवंशी उत्तरपंचाल घराण्यांतील अजमीढाची पिढी सूर्यवंशी ऋतुपर्णाच्या किंवा त्याच्या नंतरच्या पिढीशीं जोडतां येईल. त्या घराण्यांतील सृंजय रामाचा समकालीन होता. राम आणि शत्रुघ्न यांचा यादव घराण्याशीं संबंध जोडणाऱ्या कथेंत बरेंच तथ्य सांपडतें. यादववंशी भीम रामाच्या कालीं गादीवर होता; पृ. ५२६.—पौरववंशी पहिला ऋक्ष उत्तरपंचाल घराण्यांतील दिवोदासाचा, संवरण हा सुदास किंवा सहदेव यांचा आणि कुरु हा सोमक किंवा जन्तु यांचा समकालीन ठरतो. नवीन चेदि व मगध घराणीं स्थापन करणारा वसु चैद्योपरिचर दुसऱ्या जनमेजय परिक्षितानंतरचा होता; पृ ५२७.—वंशावळींच्या यादी कौरवपांडवयुद्धापर्यंतच आहेत. इक्ष्वाकूपासून भारतीय युद्धापर्यंतचा काल १४०० वर्षांपेक्षां कमी असणार नाहीं. आमच्या मतें अजमीढापासून कांहीं राजांकडे दिवोदासाचें पूर्वजत्व स्थापित झालें असावें, पुरुकुत्स व त्रसदस्यु यांशीं समकालीन एक दिवोदास पारगिटेरनें काशीवंशांत दाखविला आहे तें कालक्रम भ्रामक आहे. आणि ऋग्वेदांतील राजांमागें सूर्यचंद्रसंभवाचें लिगाड लावलें गेलें नाहीं तें देश्यांस सूतसंस्कृतीमुळें लाविलें गेलें असावें; पृ. ५२८.

[संदर्भग्रंथ.—संहिता, ब्राह्मणें व उपनिषदें, महाभारत, रामायण. पारगिटर-पुराण टेक्स्ट ऑफ दि डिनॅस्टिज ऑफ दि कलि एज. नेशन्स ऑफ इंडिया ॲट दि बॅटल बिटवीन पांडवाज ॲंड कौरवाज. वेदविद्या (ज्ञानकोश). अमरकोश. पुराणें. शांखायन श्रौ. सूत्र. तैत्तिरीय आरण्यक. पतंजलि-पाणिनीवरील वार्तिक व महाभाष्य. निरुक्त. ओल्डेनबर्ग—डाय रिलिजन डेस वेद. ओल्डन—इंडियन लिटरेचर ॲंड कल्चर. विंटरनिट्झ—हिस्टरी ऑफ इंडियन लिटरेचर.]

## उत्तरभाग

## प्रकरण १ लें.

### पश्चिमेकडील प्राचीन संस्कृतींचें स्थूल विवेचन

(पृ. १-४)

उर्वरित बुद्धपूर्वकाळाच्या इतिहासाचे तीन विभाग पडतात: १ मिसरी-असुरी-बाबिलोनी-ईजिअन-चिनी-सांस्कृतिक इतिहास; २ भारतीयांच्या पूर्वजांचा इतिहास; व ३ अवगत राष्ट्राविषयी संशोधन प्राचीन भारतीय संस्कृतीचें अवलोकन करितांना बाह्य जगाचेंहि संस्कृतिसंवर्धन लक्षांत आणिलें पाहिजे; पृ. १.—जेथें योग्य उष्णता व पाणी मुबलक असेल त्याच ठिकाणीं संस्कृतीची वाढ होते. खि पू १५०० च्या पूर्वीच्या कालाचें वर्णन देण्यासाठीं इजिप्त व क्रीट, सायप्रस, बाबिलोनिया वगैरे फिनिशिया पालेस्टाईन, हिटाइट आणि चिनी देश विचारात घ्यावे लागतात; पृ. २.—बाबिलोनी व मिसरी संस्कृतींचा परस्परसंबंध अनेक गोष्टींवरून व्यक्त होतो. इजिप्तची संस्कृति बाबिलोनीपासून निघाली असावी असेंच सिद्ध होतें; पृ. ३

[संदर्भग्रंथ.—होमेल—सिव्हिलिझेशन ऑफ दि ईस्ट सीनोबॉस—हिस्टरी ऑफ एन्शंट सिव्हिलिझेशन. फेब्रिएर—सिव्हिलिझेशन अँड प्रोग्रेस बोस—ट्रॉबल्स ऑफ सिव्हिलिझेशन. अंडरसन—स्टोरी ऑफ दि एक्सटिंक्ट सिव्हिलिझेशन ऑफ दि ईस्ट. मढाकि-प्रिमिटिव्ह सिव्हिलिझेशन्स अँड देअर फिजिकल कंडिशन्स. साईस—बाबिलोनियन लिटरेचर; रिलिजन्स ऑफ एन्शंट इजिप्त अँड बाबिलोनिया.]

---

## प्रकरण २ रें.

### मिसर अथवा इजिप्त देशाचा प्राचीन इतिहास

(पृ. ४-२१).

इजिप्तच्या अति प्राचीन इतिहासावर अलीकडे बराच प्रकाश पडला आहे. मिसरी लोकांचें चित्रकलेचें ज्ञान प्राथमिक अवस्थेंत असलेलें दिसतें; पृ. ४.—पुढें राजघराण्यांच्या सुरवातीस ही कला पूर्णावस्थेस पोंचली असावी. १२ व्या घराण्याच्या काळीं शिल्पकलेंत भव्यपणा व ठळठशीतपणा जो आला तो १८ व्या व २० व्या घराण्याच्या काळीं लोपून जाऊन त्या जागीं भावना जागृत करणाऱ्या गोष्टी दिसूं लागल्या. या काळीं चित्रकलेची अभिवृद्धि झाली; पृ. ५ —या देशांतील प्राचीन हत्यारें व मातीची भांडीं संशोधिलीं आहेत पण त्यांचा काळ निश्चित करतां येत नाहीं. तथापि त्यांतील कांहीं प्रागैतिहासिक काळांतली आहेत हें खास; पृ. ५—अति प्राचीन काळच्या राजकीय इतिहासाविषयीं कांहीं अनुमान करणें शक्य झालें आहे. पहिल्या राजघराण्याविषयीं माहिती कबरस्थानें व त्यांतील सामान, तसेंच शिलालेख यांवरून मिळते; पृ. ८.—मिसरदेशानें वैशिष्ट्य जे मनोरे ते बांधण्याचा क्रम "नवीन राज्य" स्थापन होईपर्यंत चालला होता. पांचव्या व सहाव्या राजघराण्यातील राजांची हकीकत त्यांच्या स्मारकांवरून चांगली कळते; पृ. १०.—नवव्या व दहाव्या घराण्याच्या काळीं मेंफिसचें राज्य लयाला गेलें. थीबीजच्या राजांनीं अकराव्या घराण्यांची स्थापना केली व राज्यविस्तारहि केला. १२ व्या घराण्यांतील राजे चांगले कार्यकर्ते व मोठे दक्ष असत; या घराण्याचा लौकिक फार मोठा आहे; पृ. ११.—यापुढें १८ व्या घराण्यापासून सुरवात होणाऱ्या नूतन युगापर्यंत इजिप्तचा इतिहास अगदीं अज्ञात राहिला आहे. हिक्सॉस राजघराणें मात्र संस्मरणीय वाटतें; पृ. १२.—अठराव्या घराण्यानें मोठें वैभव संपादन केलें; त्या काळीं मिसरदेश मोठा धनाढ्य व बलाढ्य झाला. पहिला व तिसरा टेथमॉसिस, तिसरा व चवथा अॅमेनोफिस हे प्रसिद्ध राजे होऊन गेले. हाटशेपसूत नावाची एक अद्वितीय राजकन्या या इतिहासात झळकत आहे; पृ. १३.—एकोणिसाव्या घराण्यांत दुसरा रामेसीस याची कारकीर्द मोठी महत्त्वाची होती. विसाव्या घराण्यांत ९ रामेसीस नांवाचे राजे होऊन गेले; या काळीं इजिप्त समृद्ध होतें पण अंतर्व्यवस्था नीट नव्हती; पृ. १६.—इ. स. पू. १२ व्या शतकांत नीलमुखामध्यें एक स्वतंत्र राजघराणें स्थापिलें गेलें. २२ वें घराणें बरेच दिवस टिकलें. २३ व्या घराण्याच्या काळीं इथियोपियांत दुसरें एक राज्य स्थापन झालें. या घराण्यांत व असुरी लोकांत युद्ध होऊन इजिप्त परतंत्र झालें; पृ. १८.—२६ व्या घराण्यांतील सामेटिकस राज्याच्या अमदानींत इजिप्तला पुन्हा चांगले दिवस आले पण त्याच्या मागें इराणी लोकांची सत्ता सुरू झाली; पृ. १९.—इ स. पू ४०५ मध्यें इजिप्त पुन्हा स्वतंत्र बनलें. ३० वें घराणें हें शेवटचेंच फारो घराणें असून त्यापुढें इजिप्त इराणीवर्चस्वाखालीं गेलें व यानंतर कधींहि कोणी देश्य राजा फारोच्या तख्तावर बसला नाहीं; पृ.२०.

[संदर्भग्रंथ.—बर्च-इजिप्त फ्रॉम दि अर्लिएस्ट टाईम्स टु बी. सी. ३००. रालिन्सन—एन्शंट इजिप्त. पेट्री-आर्ट्स अँड क्रॅफ्ट्स ऑफ इजिप्त, हिस्टरी ऑफ इजिप्त. केरिन्क-एन्शंट इजिप्त अंडर दि फॅरोज्. बेलझोनी—इजिप्त अँड न्युबिया. इजिप्त एक्स्प्लोरेशन फंड; आर्किऑलॉजिकल रिपोर्ट. नॉर्डेन—इजिप्त, न्युबिया अॅन्ड थीबीज. कॅपर्ट-प्रिमिटिव्ह आर्ट इन इजिप्त. शार्प-इजिप्शियन हायरोग्लिफिक्स. ब्रेस्टेड—ए हिस्टरी ऑफ इजिप्त फ्रॉम दि अर्लिएस्ट टाईम्स टु दि पर्शियन कॉन्क्वेस्ट, व याच लेखकाचीं इजिप्तवरील आणखी तीन पुस्तकें. बाज-ए हिस्टरी ऑफ इजिप्त. विंक्लर—दि टेल एल अमर्ना लेटर्स. मॅस्पेरो-लाइफ इन् ॲसिरिया अॅन्ड एन्शंट इजिप्त.]

## प्रकरण ३ रें.

## ईजियन संस्कृति

### ( पृ. २१-२३ ).

ईजियन संस्कृतीचे अवशेष म्हणजे इमारती, नक्षीकाम, चित्रें, सामानसुमान व लेख होत; दुसरे पुरावे म्हणजे समकालीन उल्लेख व परकीयांत अवशिष्ट असा ईजियन अंश या अवशेषांवरून तेथें स्वतंत्र राज्यें असावींत असें वाटतें. पारमार्थिक कल्पना ख्रि पू. १५०० मधील ग्रीक विचारपद्धतीशीं जुळते; पृ. २१.—राहणी सुखाची असे. या संस्कृतीचा उगम प्रास्तरायुध युगांतला आहे व वाढ ३००० वर्षांची आहे. मृतास सर्व सामुग्रीसह पुरीत. या लोकांत कलाकौशल्य उत्तम दिसून येतें. दुसऱ्यांशीं न जमणारे असे कांहीं विशिष्ट धर्म याच्यांत दिसतात; पृ. २२.—मीट बेटातील वसाहती इतरापेक्षा लवकर सुधारल्या व त्याच्यात राजकीय, धार्मिक, सामाजिक व्यवस्था सुरु होऊन एक विशिष्ट संस्कृति बनली; पुढें रानटी लोकांच्या स्वाऱ्या होऊन ती आजियात नष्ट झाली; पृ. २३.

[सं द भं ग्रं थ.-मुरे-एक्सकॅव्हेशन्स इन सायप्रस. रिजवे-अर्ली एज ऑफ ग्रीस. हॅाल-दि ओल्डेस्ट सिव्हिलिझेशन्स ऑफ ग्रीस. सोटस आणि मॅनाट-दि सिसेनियन एज. ह्रोगार्थ-ईजियन रिलिजन ( सायक्लोपीडिया ऑफ रिलिजन अँड एथिक्स ). एनसायक्लोपीडिया ब्रिटानिका-ईजियन सिव्हिलिझेशन. मॅनाट—ईजियन डेज. ]

---

## प्रकरण ४ थें.

## असुरी बाबिलोनी संस्कृति

### ( पृ. २३-४२ ).

आशियांतील तुर्कस्तानात खि. पू. १५०० च्या सुमाराचे बरच प्रांत मोडत. असुरांची संस्कृति बाबिलोनीच होती तरी दोहींमध्यें थोडा फरक होता. सेमेटिक बाबिलोनी वाङ्मय मिश्र भाषालून असे; पृ. २३.— प्राचीन बाबिलोनी वाङमयग्रंथ उपलब्ध झाले आहेत, त्यांवरून गणित व ज्योतिष शास्त्रांत या लोकांची केवढी प्रगति झाली होती हें दिसून येतें. बाबिलोनियांत दगड नसल्यामुळें बांधकामें विटांची असत व त्यामुळें कलाकौशल्य वेतावाताचें असे; पृ. २४.— असुरिया-बाबिलोनियांत जातिभेद नव्हता, मात्र एखाद्या विशिष्ट वर्गाचें प्राबल्य असे. रहाणी सुधारलेली दिसते. बाबिलोनियन संस्कृतीचा उगम 'एरिडु' व 'निप्पुर' या दोन निकटवर्ती संस्कृतींपासून झाला असावा; पृ. २५.— कायदेपद्धतीवर प्रकाश पाडणारे ग्रंथ बरेच संशोधिले गेले असून त्यांत 'हमुराबीचें कोड' हें महत्त्वाचें आहे. या कोडावरून असें दिसतें कीं, त्या वेळीं लोकांचे तीन वर्ग असत: (१) कुटुंबांतील मुख्य मनुष्यांचा;(२)गुलाम नसलेल्या लोकांचा व(३)गुलामांचा वर्ग. राजाची सत्ता अनियंत्रित नसे. देवालयें संस्थानांप्रमाणें स्वतंत्र व समृद्ध असत; पृ २६.— मालमत्तेचा क्रयविक्रय फार कसोशानें होई. शेतकी खुद्द मालक पाहात असे. घरभाडें, मजुरी, व्याज वगैरेचे दर ठरलेले असत. व्यापार एजंटांमार्फत चाले वैवाहिक पद्धति वायकांना हितावह अशीच असे. घटस्फोट व दत्तक यांची परवानगी असे. फौजदारी गुन्ह्यास "जशास तसें" या न्यायानें शिक्षा होई. न्यायदानाची पद्धत आधुनिक पद्धतीहून फार निराळी वाटत नाही; पृ.२७— बाबिलोनियाचा प्राचीन इतिहास शिलालेख व भांड्यांवरील लेख यावरून थोडाबहुत मिळतो. केंगी, किश व गिझ्बन यांचीं राज्यें ख्रि पू ५ व्या शतकांत होऊन गेलीं. शिर्पुर्लचें राज्य मोठें प्रौढ व सुसंस्कृत दिसतें; पृ ३१.— अगडच्या राजघराण्यांत सार्गन व नरमसिन यांच्या कारकीर्दी प्राचीन पौरस्त्य इतिहासांतील अत्यंत सुधारलेल्या होत. ईरेक्षें व इसिनचें अशीं दोन सेमेटिक राज्यें या काळीं होऊन गेलीं. ऊरचीं तीन राजघराणीं होऊन गेलीं; या घराण्यांत सार्वभौमसत्ता नादत होती; पृ ३२.—बाबिलोनच्या राज्यांत आठ राजवंश आढळतात. ख्रि. पू २४५०-७२८ पर्यंत हें साम्राज्य टिकलें. या साम्राज्याच्या काळीं बाबिलोनिया मोठ्या भरभराटींत होता. असुरियनांच्या स्वाऱ्यामुळें साम्राज्य डबघाईस आलें; पृ ३४.— असुरियन साम्राज्याच्या प्रथम कालीं ( ख्रि पू. १८३०-११२० ) बाबिलोनवर असुरियाचें वर्चस्व बसण्यास सुरुवात झाली. द्वितीय कालीं ( ख्रि. पू. ११२० -८८५ ) असुरियाचें साम्राज्य विस्तार पावलें तृतीय कालीं ( ख्रि. पू. ८८५—७२२ ) बाबिलोन असुरियन प्रांत बनला, साम्राज्य बागलच बळावलें व सुधारलें. चतुर्थ कालीं ( ख्रि. पू. ७४५-६०६ ) साम्राज्यसत्तेचा कळस होऊन शेवटीं तें बाबिलोनियनांनीं जिंकलें. याच काळांत विख्यात असुरबनिपाल होऊन गेला; पृ. ३५.— पुन्हा नवीन बाबिलोनियन साम्राज्य उदयास आलें ( ख्रि. पू. ६०६ ), पण थोड्याच वर्षांत त्याची समाप्ति होऊन बाबिलोन प्रांत इराणी सत्तेखालीं गेला; पृ ३९ — असुरिया बाबिलोनियांतील व भोंवतालच्या शहरांचा विकास तत्कालीन कल्पना येण्यासाठीं देणें अवश्य आहे; पृ ४०.

[ सं द भं ग्रं थ.—रिच-मेसॉपटेमिया न दि रुइन्स ऑफ बाबिलोन. लेयर्ड-निनेव्हे अँड बाबिलोन साइस-रिलिजन ऑफ दि एन्शंट बाबिलोनियन्स. बॉल-रेकर्ड्स ऑफ दि पास्ट. ऑरियन-हिस्टरी ऑफ अलेक्झांडर्स एक्स्पिडिशन. स्ट्रेबो- जिऑग्रफी. झेनोफोन-अ-ॅनाबिसिस. चे-ने-एक्स्पिडिशन फॉर दि सर्व्हे ऑफ युफ्रेटीझ अँड टायग्रीस. हेरोडोटस. प्लिनी. टॉलेमी अल्मजेस्ट. हिल्प्रेक्ट-दि बाबिलोनियन एक्स्पेडिशन. पीटर्स-निप्पुर. पिंचेस—दि बाबिलोनियन क्रॉनिकल. किंग-लेटर्स ऑफ हमुराबी. रॉॅ-अर्ली बाबिलोनि-

वन हिस्टरी. रॉजर्स–हिस्टरी ऑफ बाबिलानिया अँड असि-रिया हापर–दि कोड ऑफ हमुरबी राशीसन–ॲसिरिया जेस्ट्रो–सिव्हिलिझेशन ऑफ बाबलोनिया अँड असिरिया बम–ॲसिरियन टवरस्म कुमिंग–फॉल ऑफ बाबिलोनिया ]

---

## प्रकरण ५ वें.

## असुरकालीन आशियांतील राष्ट्रें व संस्कृति

(पृ ४२—६१)

सिरिया व पूर्व–आशियामायनर यामधील हिटाइट राष्ट्र इ. स. पू १६ व्या शतकापासून प्रामुख्यानें वावरूं लागलें व शेजारच्या असुरराष्ट्राबरोबर साम्राज्यस्थापनेसाठीं झगडूं लागलें क्रि पू ६ व्या शतकानंतर हिटाइट लोकांचा पुरा नायनाट झालेला दिसतो, पृ ४२ —अर्वाचीन संशोधनावरून हिटाइट चांगले पराक्रमी व सुसंस्कृत दिसतात यांचा मिसरी व असुरी लोकांशीं विशेष राजकीय संबंध होता, पण तो शत्रुत्वाचा होता मित्रत्वाचा संबंध हिब्रू लोकांशीं असे हिटाइट लोकांच कलाकौशल्य अभिनव किंवा स्वतंत्र दिसत नाहीं, पृ ४३ —मितनि राष्ट्र प्राचीन महत्त्वाच्या राष्ट्रांपैकीं एक असून इजिप्तशीं त्याचा झगडा चाललेला दिसून येतो क्रि पू १४ व्या शतकांत असुरियन राजांनीं हा प्रांत जिंकून आपल्या राज्यास जोडला, पृ ४५—पॅलेस्टाइनमध्यें प्रागैतिहासिक कालांत एक ठेंगणा मानववंश होता पण पुढें तेथें सेमेटिक लोक राहूं लागले तेथें क्रि पू. १७ व्या शतकाच्या सुमारास इजिप्तचें व क्रि पू १४ व्या शतकाच्या सुमारास बाबिलोनियाचें वर्चस्व होतें प्राचीन पॅलेस्टाइनवर आशियामधील संस्कृतीचा इजिप्तमधील संस्कृतीपेक्षा अधिक परिणाम झाला होता, पृ ४५ –फिनीशिया हें प्राचीन काळचें प्रसिद्ध व्यापारी राष्ट्र होय तेथील लोक सेमेटिक वंशाचे असून त्यांनीं फिनीशियन भाषा व लिपी निर्माण केली फिनीशिया क्रि पू. १६०० पासून इजिप्शियनांच्या अमलाखालीं, क्रि पू ९७० पासून स्वतंत्र, क्रि पू ८७६ पासून असुरियनांच्या व क्रि पू ६०५ पासून उत्तर बाबिलोनियन राजाच्या अमलाखालीं राहून क्रि. पू ५३८ पासून इराणच्या अमलाखालीं गेला फिनीशियन लोक व्यापारांत प्रवीण होते पण राष्ट्र स्वतंत्र व प्रागतिक करण्यास लागणारे गुण त्यांच्या अंगीं नव्हते, पृ ४८ —सीरियांत मानवाची वस्ती फारच प्राचीन काळापासून दिसते. क्रि. पू १६०० च्या सुमारास तेथें इजिप्शियन व बाबिलोनी या संस्कृतींच्या संयोगानें एक नवीन संस्कृति जन्मास आली व फिनीशियन लोकांच्या व्यापारी चळवळीमुळें भूमध्यसमुद्राच्या पश्चिमेकडील भूभागापर्यंत ती गेली. अरब लोकांवरहि तिचे परिणाम झाले, पृ ५२.—यांशिवाय पश्चिम आशियांत लीडिया, मीडिया वगैरे लहान राष्ट्रें होतीं. पूर्वआशियांतल या काळांतील मोठें राष्ट्र चीन होय यांच्या इतिहासास फुहि बादशहापासून (क्रि पू २८५२–२७३८) सुरवात होते त्यापूर्वींचे लोक रानांत पशुप्रमाणें राहात होते अशी चिनी लोकांचीच समजूत आहे फुहि बादशहानें अनेक सुधारणा करून चिनी लोकांना संस्कृतीच्या पहिल्या पायरीवर आणून सोडलें नंतरच्या दोन बादशहांनींहि बऱ्याच सुधारणा केल्याचें चीनच्या इतिहासांत आहे, पण ही हकीकत काल्पनिक दिसते, पृ ५४—हिया घराणें क्रि पू १७६६ त लयाला गेलें नंतर चिन घराणें आलें तेंहि त्यांतील एका बादशहाच्या दुर्गुणामुळें क्रि पृ ११२२ त बुडालें, पृ ५७—कनफ्यूशिअस संप्रदाय लोक समजतात त्याप्रमाणें परमार्थपर नाहीं, त्यांत व्यावहारिक नीति व राजधर्म उपदेशिला आहे, ताओ संप्रदाय लौझेनें स्थापन केला असें मानण्यांत येतें 'ताओ तह किंग" हा ग्रंथ ताओ तत्त्वांची ओळख करून देतो शील व कर्म यांचें विवरण करणारा 'ताओ' हा एक गुण आहे व यांच महत्त्व प्रत्येकाला आहे, अशी या संप्रदायाची शिकवण असते लौझेनंतर सुमार ५०० वर्षांनीं हा पंथ अस्तित्वांत आला पुढें त्यांत अनेक वेडावाईट भरी पडून सध्या तो हीन बनला आहे, पृ ५८

[म द भ म य—एवर्स–इजिप्त साइस–दि हिटाइट्स पेरट आणि चिपीझ–हिस्टरी आफ आर्ट इन सार्डिनिया, ज्युडिया, सिरिया, अँड दि एशिया मायनर हिल प्रेक्ट–एक्सप्लोरेशन इन बायबल लँड्स राइट–एपायर ऑफ दि हिटाइटस होगार्थ–आयोनिया अँड दि ईस्ट साइस, होमेल आणि इतर यांचे 'प्रोसीडिंग्स, सोसायटी ऑफ बायबल आर्किऑलॉजी' मधील विविध लेख मिस बेल–दि थाउजंड अँड वन चर्चस कॉडर–हिटाइट इन्स्क्रिप्शन्स अँड अल्टाइक हायरोग्लिफ्स गारस्टग–दि लँड ऑफ दि हिटाइट्स हिस्टोरियन्स हिस्ट्री ऑफ दि वर्ल्ड ए ब्रि (ताओइझम, कनफ्यूशिअस) ए रि ए (कन्फ्यूशिअन रिलिजन, कनफ्यूशिअस) रॉलिन्सन–फिनीशिया लेग्गे–रिलिजन्स ऑफ चायना]

---

## प्रकरण ६ वें.

## प्राचीन युरोपीय संस्कृति

(पृ ६१–७१)

ग्रीक, रोमन, ट्यूटन व स्कॅंडिनेव्हियन या युरोपीय संस्कृतींचा मूळ उगम बुद्धपूर्व काळांत सांपडतो ग्रीक संस्कृतीची कल्पना होमरच्या काव्यावरून येते होमरच्या काव्यांतील ईश्वरकल्पना निराकार दैवतपर नाहीं किंवा सर्वेश्वरी मतासारखीहि नाहीं होमरपूर्वकालीं 'एकेका जातीचा

एकेक स्वतंत्र देव ' ही कल्पना प्रथम उद्भवून नंतर तिचा विकास होत गेला; पृ. ६१ —मिनोआयमिनी लोकांत स्त्री-देवता श्रेष्ठ असे. हेलेनपूर्व लोकांत कौटुंबिक व राजकीय धर्मविधी पाळण्यांत येत; त्या वेळीं दैवतकल्पनांत नैतिक स्वरूप दृष्टीस पडे; उपासनेंत कलांचें अस्तित्व असे; देवळें, पुजारी, धर्मोपाध्याय, यज्ञ वगैरे गोष्टी आढळून येतात. होमरोत्तर काव्यांतल्याप्रमाणें होमरपूर्वकाळींहि पूर्वजांबद्दल उत्सव करीत व प्रायश्चित्तविधी आचरीत. या सुधारलेल्या धर्मकल्पनांबरोबरच समाजदोषदर्शक अप्रबुद्ध कल्पनाहि या प्राचीन लोकांत होत्या; पृ. ६३ —पशुदेवता व क्रियावाचक देवता यांची उपासना असे; तसेंच सर्ववस्तुगत देवतेची कल्पनाहि दृष्टीस पडे. जादूटोणा व मनुष्यबलीसारखे प्रकारहि होत. प्रथम कालविभागांत ग्रीकांची धार्मिक कल्पना बरीच अवस्थांतरें होऊन तयार झालेली आढळते. पृ. ६६.—खि. पू. १० व्या शतकाच्या सुमारास हेलेन लोकांत नव्या कल्पना व डायोनिसस नांवाची नवी देवता शिरतांना दिसते. या देवतेची उपासना मोठी विलक्षण व रानटी असे; पृ. ६८.—ट्युटॉनिक संस्कृति प्राचीन पाषाणयुगांत कशा प्रकारची होती तें त्या काळांतील संशोधित अवशेषांवरून दिसतें; फ्रान्सपेक्षा ती जास्त सुधारलेली नव्हती. नवपाषाणयुगांतील मनुष्य प्रत्येक बाबतींत प्रगत झालेला दिसून येतो. जर्मन किंवा ट्युटॉनिक संस्कृतीचें कास्ययुग दक्षिण जर्मनींत खि. पू. २०००—१००० हें होतें. हेलस्टट युगाला लोखंडाच्या शोधापासून सुरवात झाली. स्वित्सर्लंडांतील सरोगृहभूमीवरून ' ला-टेने ' हें युगाला नांव पडलें; हें युग खि. पू. ४-१ शतकापर्यंत धरितात. रोमनी व राष्ट्रस्थानांतर युग यांत रोमनसंस्कृतिसंबंधदर्शक व विशेषतः मेंनीचे पदार्थ दृष्टीस पडतात. मेरोविंगियन युगांतल्या (इ.स.५००—८००)रेहेनेवर कबरी संशोधिल्या गेल्या; पृ ६९.— स्कँडिनेव्हियामध्यें पूर्वप्रास्तरयुगांत मनुष्यवस्ती नव्हती; पुढील युगांत ही संस्कृति प्रगत होत गेलेली दिसते; पृ. ७१.

[ संदर्भ ग्रंथ.— ए. रि. ए. ईजिअन रिलिजन; ग्रीक रिलिजन ). ए. ब्रि. ( जर्मनी; स्कँडिनेव्हिया ) बोटसफर्ड-हेलेनिक सिव्हिलिझेशन. शुसोट-जनरल हिस्टरी ऑफ सिव्हिलिझेशन इन यूरोप. फॉरेस्ट-दि डेव्हेलपमेंट ऑफ वेस्टर्न सिव्हिलिझेशन. हॅरिसन-स्टडी ऑफ ग्रीक रिलिजन व इतर ग्रीकसंबंधीं ग्रंथ. फार्नेल-एव्होल्यूशन ऑफ रिलिजन वगैरे. ]

## प्रकरण ७ वें.

### मूलगृहकालीन उर्फ इंडोयुरोपीय संस्कृति

( पृ. ७१—९२ )

हिंदुस्थानांतील वैदिक आर्य हे बाहेरून हिंदुस्थानांत आले, ते आणि इराणी लोक व कित्येक यूरोपीय लोक मूळ एकाच वसतींतले असून ते फार प्राचीन काळीं एकत्र रहात होते वगैरे कल्पना पाश्चात्य लोकांनीं संस्कृत व अवेस्ता भाषेशीं परिचय झाल्यानंतर १९ व्या शतकांत पुढें मांडल्या; यासंबंधाचा श्रोडरचा ग्रंथ विशेष महत्वाचा आहे; पृ.७१.—श्रोडरनें संस्कृत. अवेस्ता ( झेंद ), आर्मीनियन, लॅटिन, गॉथिक, ग्रीक, जर्मन वगैरे भाषांतील प्राणी, वनस्पति, कालगणना, भक्ष्यपदार्थ, पोषाख, कौटुंबिक नातीं, वगैरे बाबतींतील शब्दविषयक साम्यें दाखवून त्यावरून या निरनिराळ्या भाषा बोलणारे लोक पूर्वीं एकत्र रहात असले पाहिजेत व एकच भाषा बोलत असले पाहिजेत असें अनुमान काढलें; पृ. ७३.—या मूळ आर्यवंशी लोकांचें एकत्र राहण्याचें ठिकाण कोणतें याबद्दल मतभेद होऊन पिक्टेट, होमेल, मॅक्समुल्लर वगैरे विद्वानांनीं मध्यआशिया लॅथॅम, बेनफी, व्हिटने, वगैरे विद्वानांनीं मध्य-यूरोप आणि बा. गं. टिळक यांनीं उत्तर ध्रुवप्रदेश, हें मूलगृह होय असें मत दिलें; पृ. ८८.—शिवाय इंडो यूरोपीय लोकांचा एकत्रवसतिकाल खि. पू. ४००० वर्षांपूर्वींच होय असेंहि टिळक यांनीं आपल्या 'ओरायन' ग्रंथांत प्रतिपादिलें आहे; पृ ९०.

[ संदर्भ ग्रंथ.—श्रोडर-प्रीहिस्टॉरिक ॲंटिक्विटीज ऑफ दि आर्यन पीपल्स. ऋग्वेद लबक—प्रीहिस्टॉरिक टाइम्स. हिरोडोटस महाराष्ट्रीय ज्ञानकोश-' मूलगृह ' शब्द होमर-इलियड व्हाबेरी-प्रिमिटिव्ह कुल्टुर. टोमाश्चेक—पामिर भाषा. अथर्ववेद. प्लिनि—हिस्ट नॅच. ऐतरेय ब्राह्मण. रॉसबॅक—रोमन एथ्नॉलॉजी. बा. गं. टिळक—ओरायन व आर्टिक होम इन् दि वेदाज ना. भ पावगी—आर्यावर्तिक होम ॲंड आर्टिक कॉलनीज.

## प्रकरण ८ वें

### पर्शुभारतीय संस्कृति

( पृ. ९२—११९ ).

आद्य आर्यवंशीयांनीं मूलगृह सोडल्यानंतर त्यांची एक शाखा यूरोपकडे गेली व दुसरी पूर्वेकडे वळून इराणांत राहिली. इराणांतील आर्यशाखेची संस्कृति ती पर्शुभारतीय संस्कृति होय व तीहि वेदपूर्वकालीनच होय; कारण वैदिक उर्फ भारतीय आर्य हे इराणांतून हिंदुस्थानांत शिरून नंतर पुढें त्यांनीं वेदरचना केली; पृ. ९२.—भारतीय आर्य हिंदुस्थानांत शिरण्यापूर्वीं इराणी लोकांबरोबर इराणांत एकत्र रहात होते याला पुरावा अवेस्ता व संस्कृत या दोन भाषांतील शब्दसाम्याचा, वेद व अवेस्ता या धर्मग्रंथांतील विषयसाम्याचा, आणि इराणी व भारतीय यांच्यामधील आचारविषयक साम्याचा आहे; पृ. १०१

[ संदर्भ ग्रंथ—भांडारकर स्मृतिग्रंथ-कीथचा लेख अवेस्ता ऋग्वेद गायजर—सिव्हिलिझेशन ऑफ ईस्टर्न इराणियन्स दि स्टोरी ऑफ दि नेशन्स—पर्शिया काथवर्ट—पारशांचा इतिहास कावसजी इ. कागा—क्ष्युद डिक्शनरी ऑफ दि अवेस्ता लँग्वेज गेल्डनेर—अवेस्ता मिल्स—एक्स्पोझिशन ऑफ दि लोअर ऑफ अवेस्ता कागा—प्रॅक्टिकल ग्रामर ऑफ अवेस्ता लँग्वेज ]

---

## प्रकरण ९ वें
### आर्य-असुर-संबंध
### ( पृ ११९—१२३ )

भारतीयांचा वेदपूर्वकालांत इराणी लोकांशीं व यूरोपीय आर्यांशीं संबंध होता, त्याप्रमाणें आर्येतर वशी असुर व खाल्डियन लोकांशीं संबंध होता मेसापोटेमियांत खि पू ५००० च्या सुमारास तुराणियन नांवाच्या जातीचे लोक राहिले होते, त्यांनीं विटांवर खोदून ठेविलेले लेख अलीकडे उपलब्ध झाले आहेत, त्यांच्या प्राचीनत्वामुळें त्यांना 'खाल्डियन वेद' म्हणतात, खाल्डियनसंस्कृतीच्या साह्यानें असुरियन लोक सुसंस्कृत बनले, पृ ११९.—खि पू ४ थ्या किंवा ५ व्या सहस्रकांतील खाल्डियन व आर्य संस्कृतींच्या लोकांत दळणवळण होतें ही गोष्ट या दोन वेदांतील शब्दसाम्यावरून व कल्पनासाम्यावरून सिद्ध होते, पृ. १२०—आशियामायनरमध्यें हिटाइट व मिटनी लोक यांच्यामधील तहाचा एक शिलालेख सांपडला असून त्यांत इंद्र, मित्रावरुण, नासत्य या भारतीय देवतांचीं नांवें आहेत, मिटनी लोकांच्या शेजारीं असीरियन किंवा असुर्यन लोक राहात होते असीरिया हाच वेदांत अनेकवार उल्लेखिलेल्या असुरांचा प्रदेश असावा, आणि आर्य लोक मध्यआशियांत किंवा इराणांत राहात असतां आर्य व असुर यांची परस्पर धार्मिक, वाङ्मयविषयक वगैरे देवघेव झाली असावी, पृ १२१

[संदर्भ ग्रंथ—भांडारकर स्मृतिग्रंथ—लो टिळकांचा लेख व डॉ रा गो भांडारकर यांचा लेख अथर्ववेद. ऐतरेय उपनिषद पातंजलमहाभाष्य शतपथ ब्राह्मण बृहदारण्यकोपनिषद ]

---

## प्रकरण १० वें.
### उपसंहार
### ( पृ १२३—१२९ )

या भागांत सात आठ हजार वर्षांचा इतिहास दिला आहे मानवाची वस्ती भूतलावर किती लक्ष वर्षे आहे तें ठरविण्याचा व मानवजातीचा वंशवृक्ष तयार करण्याचा प्रयत्न पुराणवस्तुशास्त्र, प्रस्तरावशेषशास्त्र वगैरे शास्त्रांच्या साह्यानें चालू आहे, पृ १२३—भारतीय आर्य व त्यांचे पूर्वज यांच्या इतिहासाचे मूलगृहकाल, पर्शुभारतीयकाल, व तिसरा भारतीय काल असे मुख्य कालविभाग असून तिसऱ्याचे सूतसंस्कृति व मांत्रसंस्कृति असे दोन पोटभाग पडतात मांत्रसंस्कृतिकाल दाशराज्ञयुद्धापासून सुरू होतो व सूतसंस्कृतिकाल तत्पूर्वीचा असून त्याच्या इतिहासाचें साहित्य उपलब्ध नाहीं, पृ १२४—ऋग्वेदाच्या दहाव्या मंडळांत व्यापक विचार बरेच आहेत पण त्यांत पुनर्जन्म व कर्मवाद या कल्पना नाहींत अद्वैतवाद व एकेश्वरीमत, पतिपत्नीधर्म, गृहस्थधर्म, वगैरे गोष्टी त्यांत आहेत, पण गोत्रप्रवरकल्पना त्यांत नाहीं वैदिक वाङ्मय, ब्राह्मणजाति, व यज्ञसंस्था यांचा अन्योन्याश्रय निकट आहे तो ज्ञानकोशाच्या 'वेदविद्या' या भागांत सविस्तर दिला आहे, पृ १२५—इजिप्त व असुर या लोकांचा प्राचीन इतिहास खि पू आठ हजार वर्षांपूर्वीपासून सुरू होतो भारतीयांना इतिहास फार तर खिस्तपूर्व तीन हजार वर्षें पर्यंत नेतां येतो पण त्याच्याहि पूर्वी चार पांच हजार वर्षें पश्चिमेकडे या दोन संस्कृती नांदत होत्या आर्यांचा अगदीं आद्य म्हणजे मूलगृहकाल घेतला तरी त्या वेळीं असुर्य व इजिप्त या दोन राष्ट्रांचा संस्कृति चांगलीच वाढली होती असें म्हटलें पाहिजे कारण असुरायनाचा कायदाग्रंथ( हमुरबीचें कोड)त्या वेळेसच तयार झाला होता तसेंच या दोन संस्कृतींचे मोठमोठ्या इमारती, मनोरे, वगैरेंचे अत्यंत प्राचीन अवशेष आज उपलब्ध होतात पृ १२८—सांस्कृतिक दृष्ट्या पर्शूंचे कार्य भारतीय कार्यापेक्षां कमी महत्त्वाचें व अधिक उत्तरकालीन होतें, पृ १२९.

---

## परिशिष्ट
### जनवाङ्मय
### [पृष्ठ १२९—१३७]

बौद्ध धर्मग्रंथांत 'नीगंठ नातपुत्त' यांचा वारंवार उल्लेख येतो जैन व बौद्ध धर्मांत फार साम्य असल्यामुळें जैन संप्रदाय हा बौद्ध संप्रदायाचा पोटभाग असें बराच काळ मानीत असत, पृ. १२९—जैनसंप्रदायांत श्वेतांबर व दिगंबर असे दोन पंथ असून त्यांच्या धर्मग्रंथास 'सिद्धांत किंवा आगम' म्हणतात व ते अर्धमागधी भाषेंत आहेत, पृ १२९—जैन धर्मग्रंथांचें आयारंगसुत्त, सूयगडांग, ठाणांग, समवायांग भगवतीवियाह,नायाधम्मकहाओ उवासगदसाओ, अंतगडदसाओ, अणुत्तरोववाइयदसाओ, पण्हावागरणा इम, विवागसूयम् व दिठ्ठिवाय अशीं बारा अंगें असून पुढें उपांगें आहेत, पृ १३१—यांशिवाय छेदसूत्र, मूलसूत्रें व इतर कित्येक महत्त्वाचे ग्रंथ आहेत, त्यांपैकीं जे दोन्ही पंथांना मान्य आहेत ते फार प्राचीन होत, हें उघड आहे, पृ १३१

# महाराष्ट्रीय ज्ञानकोश.

## प्रस्तावनाखंड.

## विभाग तिसरा.

### बुद्धपूर्व जग.

### प्रकरण १ लें.

#### इतिहासविषयक प्राचीन कल्पना.

जगाचा इतिहास लिहिण्यास सुरवात करावयाची ती हिंदुस्थानच्या इतिहासाच्या अनुषंगानें करण्यास हरकत नाहीं. हिंदुस्थानचा इतिहास लिहावयाचा म्हणजे त्या इतिहासाशीं संलग्न असे अनेक इतिहास येतात. अत्यंत प्राचीन काळचीं राष्ट्रें म्हटलीं म्हणजे इजिप्त व असुर हीं होत. इजिप्तचा हिंदुस्थानाच्या इतिहासाशीं संबंध बराच अनिश्चित आहे. सेसोस्त्रियस नांवाच्या एका इजिप्तच्या सम्राटानें हिंदुस्थानावर स्वारी केली होती, अशी कांहीं वर्षांपूर्वी एक समजूत होती; पण ती कल्पना ज्या आधारावर रचली गेली त्या आधाराची विश्वसनीयता फारशी नसल्यामुळें ही समजूत निराधार आहे असें आज इतिहासज्ञ समजतात. असुर संस्कृतीचे खिस्तपूर्व ६००० वर्षांपूर्वीचे संस्थापक सुमेर म्हणून लोक होते. ते भारतीय द्राविड वंशांतील असावेत असें हाल (H. R. Hall. The Ancient History of the Near East) नांवाचा ग्रंथकार म्हणतो. आम्हांस याविषयीं आज हालचें मत सांगण्यापलीकडे कांहीं करतां येत नाहीं. द्राविड-सुमेरकल्पना वगळतां दुसरा संबंध सेमीरामीसमार्फत लावतात. असूर्या देशाच्या सेमीरामीस राणीनें हिंदुस्थानावर स्वारी केली अशीहि एक समजूत होती. ती देखील त्यागिली गेली आहे. इराणचा बादशहा कुरुस (Cyrus) याच्या पदरीं पुष्कळ हिंदू फौजेंत होते, याबद्दल हिरोडोटसच्या वाक्याचा पुरावा आहे. इराणचा कुरुसनंतरचा एक सम्राट् दर्युस यानें हिंदुस्थानचा बराच भाग काबीज केला असावा असें दिसतें. इराणी लोकांनंतरचें महत्त्वास पावलेलें राष्ट्र ग्रीकांचें होय. त्यांचा हिंदुस्थानाशीं संबंध पूर्वीपासून जरी असला तरी शिकंदराच्या स्वारीनें दृढ झाला असें दिसतें. रोमन पातशाहीचा हिंदुस्थानाशीं प्रत्यक्ष संबंध कमी आला तरी हिंदुस्थानांतील कांहीं राजांचे वकील रोमन दरबारीं होते. यावरून व्यापारी संबंध पूर्वांपार असावा असें दिसतें. बुद्धापूर्वीच्या चीन देशाशीं असलेल्या संबंधाचें संशोधन अद्याप झालें नाहीं. लाउत्सेची "ता ओ" नांवाची विचारोपासनापद्धति उपनिषन्मूलक असावी असें म्हणतात. येणेंप्रमाणें अत्यंत प्राचीन राष्ट्रांच्या इतिहासाशीं हिंदुस्थानचा संबंध सांगतां येईल आणि इजिप्ती, चिनी, असुरी, इराणी, ग्रीक, रोमन या प्राचीन संस्कृतींचा इतिहास भारतीय इतिहासाच्या विशिष्ट काळाच्या इतिहासाच्या अनुषंगानें विवेचितां येईल, एवढेंच नव्हे तर हिंदुस्थानचा यूरोपांतील लोकांशीं जो एकवंशसंभवसंबंध दिसतो त्यामुळें इतिहासाशीं अत्यंत निकट संबंध असलेल्या भाषाशास्त्र, तौलनिक दैवतशास्त्र इत्यादि शास्त्रांशीं ओळख देखील हिंदुस्थानाच्या इतिहासाच्या अनुषंगानें देता येईल.

जगाच्या इतिहासाशीं परिचय करून देण्यासाठीं हिंदुस्थानाच्या इतिहासाच्या अनुषंगानें सुरवात करावी हें कित्येकांस बौद्धिक औद्धत्य वाटेल. कां कीं, इतिहासाविषयीं हिंदुस्थानाची अनास्था प्रख्यात आहे. भारतीयांचा इतिहास स्पष्ट करण्यासाठीं परस्थांची मदत घ्यावयाची ही जर पद्धति आहे, तर भारतापासून प्रारंभ करून जगाची ओळख करून देण्याचा प्रयत्न आपण कसा करणार? या प्रश्नास उत्तर एवढेंच कीं, जगाच्या अत्यंत प्राचीन इतिहासावर प्रकाश पाडणारा माल म्हणजे अत्यंत प्राचीन भाषा व शब्द हे भारतांत शिल्लक आहेत. त्यांचे निरनिराळ्या काळांतले अवशेषहि शिल्लक आहेत. फक्त या अवशेषांचा पृथ्वीच्या सूर्याभोंवतीं होणाऱ्या परिभ्रमणाच्या आंकड्यांशीं संबंध लावावयाचा, हा इतिहाससंशोधकांचा कर्तव्यभाग आहे.

शिवाय हेंहि लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, इतिहास लिहिण्याची कला भारतीयांस अगदीं अपरिचित होती असें नाहीं. ज्या भावना इतिहासोत्पत्तीस व इतिहासरक्षणास कारणीभूत होतात त्या भावना भारतांत जागृत होत्या.

त्या भावनांचे परिणाम ज्या स्वरूपांत आपणांस दृष्टीस पडतात त्या परिणामांस आपण आज कदाचित् इतिहास म्हणणार नाहीं. शिलालेखांवरील राजावली व पुराणांतील कथा व कुलपरंपरा यांस आजचे लोक इतिहास म्हणणार नाहींत. तथापि ज्या भावना इतिहासग्रंथांच्या उत्पत्तीस कारण झाल्या त्या याहि कृतींच्या उत्पत्तीस कारण झाल्या. काश्मीरची राजतरंगिणी, सिंहलद्वीपांतील वंशग्रंथ व आसाम आराकानकडील राजांचे इतिहास, यांसारखे प्रकार पाश्चात्य लोकांस इतिहासासारखे वाटतात; परंतु राष्ट्राच्या ज्या अनेक उलाढाली झाल्या, त्यांचे वर्णन करणारे हे वंशग्रंथ खास नाहींत. ऋग्वेदांत ज्याप्रमाणें ब्राह्मणांस गाईंचें दान करणाऱ्या राजे

लोकांच्या जरी मानवतात, त्या लंकेस पौराणिक, काल्पनिक, भाट-कथांची जोड दिली असता जें स्वरूप येईल तें या वंशग्रंथाचें आहे. पुष्कळ वेळ्ां तर ज्या कथा हिंदुस्थानातील कित्येक राजाच्या नांवांनीं खपत होत्या त्या सिंहलांतील काही राजाच्या नावानीं दडपून दिल्या आहेत. आहोम राजाच्या इतिहासाचे आहोमी (आसामी) भाषेंतील ग्रंथ भाषांतरित झाले नाहीत आणि त्यामुळें त्या ग्रंथावर विवेचन करतां येत नाहीं, परंतु पौराणिक ग्रंथात जे दोष असतील अथवा जे दोष बखरींत आढळतात तेच दोष तेथेहि असतील अशी आमची समजूत आहे.

इतिहास लिहिण्याची मनुष्याची प्रवृत्ति झाली तिचें कारण आपण काय केलें तें लिहून ठेवावें ही मनुष्याची इच्छा होय. या इच्छे-मुळें हिंदुस्थानातील अनेक राजांनीं आपले विजय शिलालेखांत कोरून ठेविले, ते सर्व इतिहास होत. इतिहासावर भारतीयांची आस्था नव्हती असें नाहीं. तथापि इतिहास या स्वरूपाचें वाङ्मय भारतात फारसे वाटलें नाहीं, हें मात्र कबूल केलें पाहिजे. याच मुख्य कारण त्यांची इतिहासविषयक अनास्था होती असें नाहीं वेदरक्षण झालें तें वाङ्मयरक्षणाच्या हेतुमुळें झालें असें मुळीच नाहीं तर प्राचीन ऋचांचा यज्ञाकडे उपयोग करण्यांत येई, यज्ञ करण्यासाठीं तें ज्ञान शिकावें लागे, अशी परिस्थिति असल्यामुळें त्या ग्रंथाचें जतन तरी झालें भाटांचा जो वर्ग होता त्यानें राजस्थानाच्या बऱ्याच इतिहासाचें जतन केलें. तथापि भाट हे वाङ्मयाचे कर्ते होते काव्ये करणें हें त्यांचें कार्य असून इति-हासरक्षण करणें हें त्यांचें कार्य नव्हतें. त्यांचें कार्य लोकरंजन किंवा दात्याचें रंजन करण्याचें होतें आपणास या प्रवृत्तीमुळें थोडासा इतिहास उपलब्ध झाला आहे. करमणूक हा जेव्हां उद्देश असतो तेव्हां इतिहास हा चांगला काळजीपूर्वक रक्षिला जातो असें नाहीं. जीं कथानकें मनोरंजक असतात त्यांस प्राधान्य दिलें जातें. जो मोठा दिग्विजयी योद्धा असेल त्याच्या चरित्रापेक्षां ज्याच्या प्रेमविषयासंबंधानें लोकांना अधिक मौज वाटेल त्याचेंच चरित्र रक्षिलें जातें श्रोत्यां-वर परिणाम घडवावयाचा असतो तेव्हां साध्या वर्णनापेक्षां तिखट-मीठ लाविलेलें वर्णन लोकास सहजच अधिक आवडणार. लोक-रंजनास जेव्हां प्राधान्य दिलें जातें तेव्हां व्यक्तीचें ऐतिहासिक महत्त्व आणि सत्य या दोन्ही तत्त्वांची खाबुगोळी होते. बाजी-रावाच्या मोठमोठ्या लढायांपेक्षां सामान्य लोकांस त्याच्या मस्तानीचें नांव अधिक परिचित आहे. हिंदुस्थानात इतिहासरक्षणाचे प्रयत्न आपणास वारंवार दृष्टीस पडतात. पण ते प्रयत्न लोकरंजन-प्रयत्नांत किंवा विशिष्ट उपासनेचा किंवा तत्त्वाचा पुरस्कार कर-ण्याच्या प्रयत्नांत विलीन झालेले दृष्टीस पडतात.

प्रत्येक इतिहासग्रंथामध्यें खोटें लिहिण्याची इच्छा लेखकास नसून असते आणि पुष्कळदां खोटें लिहिण्याकरितांच इतिहास जन्मास येतात. खरी ऐतिहासिक भावना किंवा इतिहास-महत्त्वाची जाणीव खरें लिहिण्याच्या प्रयत्नावरून जशी दिसून येणार आहे तशीच खोटें लिहिण्याच्या प्रयत्नावरूनहि दिसून येणार आहे. जो खोटें लिहून ठेवितो तो भावी वाचकास फसविण्याच्या उद्देशानें लिहून ठेवितो आणि त्यास इतिहासमहत्त्व असल्या-शिवाय तो खोटें लिहिण्याचे परिश्रम करील असें संभवत नाहीं. प्रत्येक इतिहासग्रंथामध्यें काहीं तरी खोटें अगर पक्षाभिमानानें अर्धमुर्धें खरें लिहिणें दृष्टीस पडतेंच. तर जो ग्रंथ अगोदरच काव्य आहे त्यावर वैयक्तिक इच्छेनें किंवा आकांक्षेनें परिणाम होऊन त्याचें स्वरूप विकृत होतें हें आपल्या रामायण महाभारतादि ग्रंथा-वरून व पुराणांवरून स्पष्ट होतें खोट्या व लपडावांच्या विधाना-वरून खोटेपणाची व लपडावीची कारणें शोधिलीं असतां आजच्या संशोधकास इतिहास अधिक खुला होतो. त्याप्रमाणेंच आपल्या देशांतील सर्व प्रकारचे ग्रंथ घेऊन आपणास इतिहास खुला करावा लागेल

ग्रीकांचा प्रख्यात इतिहासकार हिरोडोटस याचे स्तोम बरेंच माजविलेलें आपणास दृष्टीस पडतें. त्यास सत्यवक्ता म्हणणारे लोक आढळे आहेत असें वाटण्यास लागतें. हिरोडोटसचा ऐतिहासिक प्रामाणिकपणा देखील वर्णिला जातो. आज आपण हिरोडोटसचा ग्रंथ वाचूं लागलों म्हणजे कर्णोपकर्णी ऐकलेल्या कित्ती तरी गोष्टी त्यानें लिहून ठेविलेल्या दृष्टीस पडतात. शिवाय लोकरंजन हा हेतु त्याच्या ग्रंथांत प्राधान्यानें दृष्टीस पडतो. त्याच्या इतिहासांत कादंबरीवजा अनेक गोष्टी त्यानें भरल्या आहेत असें दिसून येतें. जिज्ञासूस ज्ञान देण्याच्या करामतीपेक्षां द्वाड व चावट गोष्टींचे शोकी असे जे गृहस्थ आहेत त्यांना खूष करण्याच्या करामतीवर त्याच्या ग्रंथाची लोकप्रियता स्थली गेली असावी आणि त्यानेंहि लोकप्रिय-ता मिळविण्यासाठीं खटपट केली असावी असें ग्रंथ वाचतांना वाटतें, असें वाटण्यास एकच कारण देतों. हिरोडोटसनें हिंदुस्थानातील लोकांसंबंधानें ते मनुष्यभक्षक आहेत अशी आपली समजूत व्यक्त केली आहे (Herodotus III-99). त्यास सत्य जाणण्याची संधि होती, तथापि जी गोष्ट मनोरंजक आहे, तिच्यांतील सत्य शोधून तिचा मनोरंजकपणा कमीस घालवावा या भावनेनें तरी त्यानें सत्य शोधलें नसावें किंवा मुद्दाम असत्य प्रसृत करण्याची त्याची इच्छा असावी असें दिसतें. हिरोडोटसचा ग्रंथ इतिहास या दृष्टीनें पुन्हां मांडणी करण्यास अवश्य असा आहे हिरोडोटसची इतिहासविषयक कल्पना फारशी उज्ज्वल दिसत नाहीं. आणि वाङ्मय या दृष्टीनें देखील हा ग्रंथ अव्यवस्थित दिसतो. तो ऐतिहासिक टीपांनी युक्त व थोड्या-बहुत चावट गोष्टींनीं लोकप्रिय झालेलें असें प्रवासवर्णन होय असें आम्ही म्हणूं

इतिहास लिहितांना ज्या काहीं क्रिया होतात त्यांकडे आपण थोडेंसे लक्ष देऊं.

(१) माहिती जमा करणें.

(२) वृत्तांचें महत्त्वमापन करणें.

(३) माहितीच्या अभावाच्या प्रसंगीं माहित असलेल्या गोष्टींवरून संयोजक कल्पना करणें.

(४) लेखनीय माहितीची व्यापकता नियमित करणें.

(५) जगाच्या किंवा राष्ट्राच्या विकासक्रमाविषयीं सिद्धांत करणें.

या क्रियांपैकीं प्रत्येक क्रिया प्राचीन वाङ्मयांत झालेली दिसते. रामायण, महाभारत व पुराण यांत जुनी माहिती जमा करून ठेवल्याचे पुरावे वारंवार दिसतात.

इतिहास कसा लिहावा यासंबंधानें विचार नेहमी चालला. असे तीन कालचा स्थिति आणि रामचारी हे मर्यादा यांत. पण कालच्या कोणत्या गोष्टीस महत्त्व यासंबंधें यासंबंधानें कल्पना असेल तर इतिहास लिहिण्यास दिशा मिळेल. वृत्ताच्या महत्त्वासंबंधानें प्राचीनांची जी बुद्धि असेल ती अवगमिली पाहिजे. 'कार्यमहत्त्वविवेकता" हा इतिहासकाराचा अवश्य गुण तो प्राचीनांत होता काय हें आपणास पाहिले पाहिजे. हा गुण त्यांत होता असें केवळ पुराणाच्या व्याख्येवरून दिसतें.

प्राचीनांची इतिहास विषयक कल्पना आणि पुराण विषयक कल्पना आज आपणांस जाणणें अवश्य आहे. पुराण म्हणजे फार जुना इतिहास. प्राचीन पुराणाची व्याख्या येणेंप्रमाणे आहे.

सर्गश्च प्रतिसर्गश्च वंशा मन्वन्तराणि च ।
वंशानुचरितं चेति पुराणं पंचलक्षणम् ॥

पंचमहाभूतात्मक जगाची उत्पत्ति कशी झाली, मूलभूततत्त्वापासून इतर वगैरे क्रमें निर्माण झालें, निरनिराळे वंश कोणते झाले, त्याच्या कामगिऱ्या काय झाल्या, कालाचे अत्यंत मोठे विभाग म्हणजे जी मन्वन्तरें, त्या निरनिराळ्या मन्वन्तरांत कोणकोणत्या गोष्टी होऊन गेल्या, या सर्वांची माहिती पुराणांत दिली पाहिजे अशी प्राचीनांची भावना होती. अत्यंत जुन्या गोष्टींची माहिती फारशी कालानुक्रमानें सांगतां येत नाहीं आणि त्या गोष्टींतील महत्त्वाच्या गोष्टी केवळ जुन्या म्हणून विशेष कालविषयक चर्चा केल्याशिवाय उतरून घेणें व प्रथम रामायिक करणें याशिवाय दुसरा कोणताहि पण प्रथकाराम उरत नाही. असा अवगल्यामुळें पुष्कळशा प्राचीन कथा कालानुक्रमानें मांडणीशिवाय व कालविषयक निर्णय केल्याशिवाय पुराणांत ग्रथित केलेल्या दिसतात.

इतिहासाचा एक हेतु असा असतो कीं, आज लोकांना जें दिसत आहे त्याचा उत्पत्ति आणि विकास सांगून तें स्पष्ट करावें. या हेतूचा इतिहास हा एक शास्त्र परिणाम आहे तथापि तो एकटा नाहीं. या हेतुमुळें जें वाङ्मय उत्पन्न होतें तें केवळ इतिहासरूपी होत नाहीं. जेव्हां एखाद्या गोष्टीची आपणास यथार्थ माहिती नसते किंवा ती माहिती उपलब्ध होण्याजोगी नसते तेव्हां पुढील प्रश्न सोडविण्यासाठीं मनुष्य कल्पना लढवूं लागतो. विश्व उत्पन्न कसें झालें ? जाती उत्पन्न कशा झाल्या ? राष्ट्रें उत्पन्न कशीं झालीं ? इत्यादि जाडे प्रश्न एखाद्या काळच्या जाणते म्हणून गणल्या जाणाऱ्या लोकांना साहित्य असो अगर नसो सोडविणे भाग पडते, आणि ते त्यास उपलब्ध असलेल्या माहितीप्रमाणें कल्पना करूं लागतात. या कल्पनांचें परीक्षण न होतां शेंकडों वर्षें त्या कल्पना लोकांत पसरल्या म्हणजे त्यांवर लोकांची इतकी श्रद्धा बसूं लागते कीं, त्या कल्पनांवर विश्वास न ठेवणारा मनुष्य लोकांस नास्तिक अगर पाखंडी वाटावयास लागतो. पुष्कळ काळ त्या कल्पनांनीं एखादा काल्पनिक इतिहासहि तयार होऊं लागतो. या तऱ्हेचा " इतिहास " आपल्या पुराणांतून व रामायणमहाभारतादि आर्ष काव्यांतून आणि त्याप्रमाणेंच वेदांतील अर्थवादांतून पुष्कळ दृष्टीस पडतो. भारतीयांस इतिहासविषयी अनास्था असलेले लोक म्हणून शिक्का मिळाला आहे आणि यांत तथ्यहि पुष्कळ आहे, पण यासंबंधानें हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, प्राचीनांस इतिहासजिज्ञासा होती व ज्या गोष्टीचा इतिहास ठाऊक नाहीं तो ज्ञानाचा सरळ विचार करून आणि तत्त्वज्ञान लावून भरून काढणें ही क्रिया ते करीत होते. पुष्कळदां ही क्रिया करतांना केवळ काव्यरूपी कल्पनाच उत्पन्न होत. काव्यरूपीच त्याची कल्पना होई ही गोष्ट प्राचीन भारतीयांच्या विरुद्ध मांडतां येईल. पण या बरोबर हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, माहितीचा अभाव निव्वळ कल्पनेनें भरून काढणारे लोक भारतीयातच केवळ नाहीत तर ते बाहेरहि आहेत. प्रत्येक राष्ट्र आदामपासून किंवा त्याच्या वंशांतील एखाद्या पुरुषापासून झालें आहे असा समजुतीना भिकावे, अरबांचे व मुसुलमानांचे इतिहास यथास्थित भरलेले दिसतात. बौद्ध ग्रंथकारांनीं देखील असल्या कथांचे चांगलें यथास्थित ग्रहण केलेलें दिसतें. येथे हेंहि सांगितलें पाहिजे कीं जेथें माहिती नसेल तेथें इतिहासकारानें वस्तुस्थिति कशी असावी यासंबंधानें कल्पना करणें ही क्रिया आपल्या शास्त्रीय पद्धतीनेंहि इतिहासलेखनाचें अंग आहेच. फरक हा का आपला इतिहासलेखक कल्पनेस कल्पनाच म्हणून पुढें मांडील. प्राचीन पुराणकार तसे करीत नसत.

इतिहासाचें क्षेत्र काय व त्याचें इतर ज्ञानक्षेत्रांपासून पृथक्करण कसें करावें हें अजूनहि निश्चितपणें ठरलें नाहीं. लोकांच्या इतर ज्ञानावर क्रियांच्या महत्त्वाचें ज्ञान अवलंबून असणार आणि त्यावर लेखन अवलंबून असणार. जगांत झालेल्या सर्व प्रकारच्या घडामोडी या इतिहासाचा विषय होत. इतिहास या विषयाचें स्वरूप दिवसानुदिवस अधिकाधिक निश्चित होऊं लागलें आहे. इतिहास या शब्दाचा म्हणजे इति+ह+आस या शब्दसमुच्चयाचा मूळ अर्थ 'असें झालें' असा आहे. ग्रीक लोकांमध्ये हिस्टोरिया हा शब्द प्रथम जन्मास आला आणि त्याचा अर्थ शोध किंवा माहिती असा होता. ज्ञानाचें वर्गीकरण करूं इच्छिणारे लोक इतिहास हें शास्त्र आहे किंवा नाहीं याची चर्चाच फार करतात. रे म्हणतात कीं, इतिहास हें शास्त्रच नव्हे. कोणी म्हणतात, मनुष्य हा एक प्राणी आहे, तेव्हां मनुष्याच्या जगावरील क्रिया हा एकंदर प्राणिशास्त्राचा विषय होईल. किंत्येक असें म्हणतात कीं, इतिहास हें जगांतील एकच शास्त्र होय. इतर शास्त्रें म्हणजे मनुष्यप्राण्याचें ज्ञान या सदराखालीं इतिहास या शास्त्रांत सर्व कांहीं समाविष्ट करतां येईल. कारण कोणतेंहि वास्तविक ज्ञान होतच नाहीं. वस्तूंचें इंद्रियगोचर स्वरूप व त्यावर रचलेलीं अनुमानें तेवढीं मनुष्यास ठाऊक आहेत. तेव्हां शास्त्रीय ज्ञान हा केवळ मनुष्येतिहासाचा भाग होय.

मनुष्याचा ऐतिहासिक घडामोडीवर विचार होऊं लागतो आणि त्यावें जगाच्या क्रमाविषयीं सिद्धांत बनूं लागतात. ही क्रिया देखील आपल्या वाङ्मयांत दृष्टीस पडते. 'फिलॉसफी ऑफ हिस्टरी'

म्हणून एक अभ्यासक्षेत्र यूरोपांत दृष्टीस पडतें त्यावर पुष्कळ ग्रंथ निर्माण झाले आहेत त्या ग्रंथांचे विषय साधारणपणें खालील प्रकारचे दृष्टीस पडतात

जगांतील अनेक घडामोडी पाहून त्यांतून कांहीं ईश्वरी संकेत दृष्टीस पडतो काय हें पाहावयाचें आणि त्यांतून ईश्वराचे हेतू ओळखावयाचे समाजाचा क्रम पाहून त्यांतून ईश्वराचे हेतू व नियम आढळून आपला ईश्वरविषयींचा भाव दृढ करावा या इच्छेनें कित्येक ग्रंथकार प्रवृत्त झाले आहेत

कित्येक ग्रंथांतून इजिप्त, खाल्डिया, ग्रीस, रोम इत्यादि राष्ट्रांचा विकास व विनाश हें पाहून संस्कृतीची मशाल एका हातातून ... हातांत अधिक प्रभावयुक्त होण्याकरितां कशी दिली इत्यादि गोष्टी लिहिल्या आहेत

कित्येकांनीं असें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे कीं, 'सिव्हिलेशन मध्ये जे विचार केला आहेत तेंच इतिहासाचें तत्त्व ज्ञान होत

समाजशास्त्रामध्यें समाजविकासात्मक जे नियम सापडले त्यासहि कोणी 'फिलॉसफी ऑफ हिस्टरी' असें नाव दिले आहे

कित्येकांनीं जगाच्या इतिहासांत दूरदूरच्या काळास एकत्र जोडणारे कांहीं अर्थशास्त्रीय नियम सापडतात काय यासाठीं झालेल्या शोधाच्या फलास 'फिलॉसफी ऑफ हिस्टरी' हें नाव दिले आहे कोलंबियाचे प्रोफेसर डॉक्टर सेलिग्मन यांनीं यास 'एकानामिक इंटरप्रिटेशन ऑफ हिस्टरी' म्हणजे जगाच्या इतिहासाचें अर्थशास्त्रीय स्पष्टीकरण असें नाव दिले आहे

प्राचीनांचें इतिहासविषयक ज्ञान शोधावयाचें म्हणजे जगांतील क्रियांचें महत्त्व ते मोजीत होते काय, आपल्या महत्त्वाच्या गोष्टीस कारण शोधून त्या गोष्टींच्या अस्तित्वाचें स्पष्टीकरण करणें यास ते महत्त्व देत होते काय, व्यवहारनियम इतिहासावरून शिकण्याचें ते पत्करीत होते काय आणि मनुष्यक्रियाविषयक वाङ्मय त्यास आवडत होते काय हे प्रश्न उपस्थित होतात या सर्व प्रश्नांस होय म्हणूनच उत्तर द्यावें लागतें एवढें खरें कीं, इतिहासशास्त्राची जोपासना पाश्चात्त्यांमध्यें जितक्या प्रमाणानें झाली तितक्या प्रमाणानें आपल्याकडे झाली नाहीं

आपल्याकडे इतिहासावर जे तत्त्वज्ञान तयार झालें त्यांत जे अनेक सिद्धांत मांडले गेले, आणि लेखनविषयक वृत्ति तयार झाली त्यांचें सामान्य स्वरूप येणेंप्रमाणें :—

(१) इष्ट काय व अनिष्ट काय याविषयीं विचार करून ... विषयक ग्रंथाची व्याख्या करणें

(२) युग अवतार, मन्वंतर असे महत्त्वाचे कालविभाग निर्दिष्ट

(३) मोठ्या कार्यकर्त्या पुरुषाचें अस्तित्व विशिष्ट क्रियांचे कामाचे सिद्धांत सांगून स्पष्ट करणें

(४) युद्धें राज्यक्रान्त्या यांचे युक्तायुक्त परिणाम व्यक्त करणें

(५) मानवी क्रिया पाहून त्या क्रियांचा अंतिम हेतु काय या विषयीं विचार करणें आणि त्या हेतूंशीं क्रियांची योग्यायोग्यता ठरविणें

(६) इतिहासविकासाचे नियम राजकीय घडामोडींतच केवळ व्यक्त होतात असें नाहीं तर वैचारिक इतिहासांत व पारमार्थिक नियामध्यें व्यक्त होतात हें जाणून वैचारिक व पारमार्थिक इतिहासाचा प्रयत्न करणें

(७) विशिष्ट राजकीय घडामोडींविषयीं औदासीन्य ठेवणें

(८) राजवंशावली व गुरुपरंपरा यांचें रक्षण करणें

या सर्व क्रिया व भावना पुराणग्रंथांत दिसत आहेत आणि त्या पुराणग्रंथकारांना ऐतिहासिक तत्त्वज्ञानाची भावना तीक्ष्णपणें होती हें दाखवितात

प्राचीनांचें इतिहासविषयक तत्त्वज्ञान पुराणाच्या व्याख्येंत अंशात आहे ती व्याख्या व तिचें स्पष्टीकरण मागें दिलेंच आहे आपल्या इतिहासविषयक तत्त्वज्ञानाची एक महत्त्वाची कल्पना म्हटली म्हणजे युगकल्पना होय गेला तो दिवस सोन्याचा या शिशुकल्पनेचेंच हें जास्त उत्तान स्वरूप होय कृतयुगामध्यें चतुष्पाद धर्म होता, त्रेतायुगामध्यें त्रिपाद धर्म होता, द्वापारामध्यें द्विपाद धर्म होता आणि कलियुगामध्ये एकपाद धर्म राहणार या तऱ्हेची कल्पना आपल्याकडे पुराणांतून व धर्मशास्त्रांतून प्रवृत्त केली गेली

आपल्याकडील दुसरी एक कल्पना म्हटली म्हणजे अवतारकल्पना होय अवतारकल्पना

**यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत।**
**अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥**
**परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ।**
**धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥**

या गीतावाक्यांत स्पष्टपणें मांडला आहे जगांत जी मोठालीं कार्यें होत असतात, त्या कार्यांचा कर्ता म्हणून कोणीतरी पुरुष उदयास येतो अशा पुरुषास अवतारी पुरुष म्हणण्याचा प्रघात आहे. अवतारी पुरुष म्हणजे स्वर्गांतील एखादा देव नाहींसा होऊन मनुष्यरूपानें वागतो अशी प्राचीनांची समजूत होती असें दिसत नाहीं कारण, धर्म आणि विदुर या दोघांस यमाचे अवतार महाभारतकारांनीं मानले आहे आणि ते दोघेहि पृथ्वीवर असतां यमधर्महि आपल्या लोकांत होता असें धरलें आहे

अवतारी पुरुष अधिक महत्त्वाचे किंवा परिस्थिति अधिक महत्त्वाची याविषयीं परस्परविरुद्ध भावना देखील लोकांच्या विचारांत दृष्टीस पडतात कार्यकर्ता पुरुष अनेक प्रसंगीं असें म्हणताना दाखविला आहे कीं, 'मी केवळ होणाऱ्या कार्याला निमित्तमात्र आहे, कार्य करणारी आणि कार्य माझ्या हातून घडविणारी शक्ति निराळीच आहे'

इतिहासाचा विषय जगांतील राजकीय घडामोडी होत एवढेंच केवळ नाहीं तर जगांतील ज्ञान हाहि इतिहासाचा विषय होय असें प्राचीन मानीत असत आणि प्रत्येक शास्त्राचा इतिहास देण्याचा ते

तत्क्षणं रक्षितं स्यात्सकलं जगतीतलम् ।
तदधीनत्वता वर्णाश्रमधर्मस्ततस्तत ॥
इदानीमिदमुद्धार्यमितिदृत्तिमतं पुरा ।
मम गुहाशयविदौ विष्णुशर्षौ समीपगौ ॥
मध्यमं काण्डमुद्धर्तुमनुज्ञातौ मयैव तौ ।
अवतीर्णांशतो भूमौ सङ्कर्षणपतञ्जली ।
मुनी भूत्वा सुदोपास्तियागकाण्डकृतौ स्थितौ ।
अग्रिमं ज्ञानकाण्डं तूद्धरिष्यामीति देवता ॥

(शंकरदिग्विजय १,४८-५०.)

या वरील वाक्यांचें विस्तृत स्पष्टीकरण कै० रघुनाथशास्त्री गोडबोले यांनीं येणेंप्रमाणें केलें आहे.

- "बौद्धमत वैदिक धर्माच्या जरी मागचें आहे, तरी तें लपून छपून बरेंच प्राचीन असल्याचें वाल्मीकिरामायणावरून दिसून येतें त्या मतांतील लोकांच्या मनांतून अहिंसाधर्ममिषानें यज्ञ बंद पाडावेत असें तेव्हांपासून असताहि, त्या काळचे राजे व ऋषी यांच्यापुढें त्यांना कांहीं उपाय चालेना त्यामुळें तो मद, ही संधि केव्हां येईल तिची मार्गप्रतीक्षा करीत असता, गेल्या द्वापरयुगाच्या अंतीं भारती युद्धांत प्राय सर्व राजे नाश पावले, तसेच ऋषीहि अल्प झाले, असें पाहताच चार्वाकाच्या व क्षपणकाच्या रूपानें प्रगट झाला आणि त्यानें ईश्वर नाहीं, परलोक नाहीं इत्यादि प्रकारचें नास्तिक शास्त्र प्रवृत्त करून, लोकास यज्ञकर्मापासून परावृत्त केलें असें वृत्त त्याच्याच ग्रंथावरून दिसून येतें

ही नास्तिक मताच्या आघाडीची चार्वाकक्षपणकरूप जोडी, युधिष्ठिरशकाच्या सहाशें साठाव्या वर्षाच्या सुमारास प्रगट झाल्यावर, मागून बुद्ध व अर्हत् क्रमानेंच उत्पन्न झाले त्यांनीं जरी त्यांच्या मतांचें खंडन केल्याचें व ईश्वर आणि परलोक आहेत असें मानल्याचें जैन ग्रंथांवरून दिसतें, तरी वेद हे पौरुष होत हा जो त्यांचा सिद्धांत, तो त्यांनीं जीवापरीरक्षणाचा समजून, अहिंसाधर्ममिषानें कर्मकांड बंद पाडलें तें इतकें कीं, तो शब्द थोड्याच काळांत कानांनीं मात्र ऐकावा, असी दशा त्यास येऊन पोंचली अर्थात् ज्ञानकांडहि त्याच पंथास लागून राहिलें होतें

याप्रमाणें कर्म आणि ज्ञान या दोहोंचा ह्रास करून, बौद्ध व जैन आपला तृतीय पंथ विस्तृत करीत सर्व भरतखंडांत सुमारें दीड हजार वर्षेंपर्यंत एकमार्गी धुमधडाका उडवीत असतां, त्याच सधीनें वैदिक लोक मध्यम काण्डास (उपासनाकांडास) अनुसरले. परंतु तें मध्यमकांड आगमोक्त व श्रुतिविरुद्ध असें यामुळें, एकंदरीत सर्व गोंधळच होऊन गेला असें पाहून, स्वामी कार्तिक, ब्रह्मदेव, आणि इंद्र, हे तिघे ईश्वराज्ञेनें प्रथम पृथ्वीवर पुढें आले व त्यांनीं कुमारिलभट्ट, मंडनमिश्र व सुधन्वा या नावांनीं अवतीर्ण होऊन, तसेंच कर्मकांडाची पुनरपि स्थापना करून, बौद्ध व जैन यांचा अगदीं धुरा धुवा उडवून दिला

असें जरी झालें, तरी कर्मकांड ज्ञानमार्गानें चालावें हें योग्य असतां, तें अथवा पानेंच चालू झालें, व वेदविरुद्ध अनेक उपासना प्रचलित झाले यांत समाधान राहिलें असें पाहून, स्वत ईश्वर शंकराचार्य या नावानें पृथिवीवर आला, व त्यानें शैव, शाक्त, वैष्णव, गाणपत्य आणि सौर इत्यादिकांचीं आगमोक्त मतें खंडित करून व मंडनमिश्राचार्यांदि सोड जिंकून, श्रुतिप्रतिपाद्य कर्म, उपासना व ज्ञान, यांची यथायुक्त स्थापना केली व आपलें मत शुद्धाद्वैत अशा नावानें संतत चालू केलें *"

एवंच भारतीयास ऐतिहासिक भावना होती तीं विजयाचा उल्लेख करणें, राजवंशावली रक्षण करणें, जगाच्या क्रमाविषयीं नियम बांधणें, अनेक समूहांच्या युद्धादि क्रिया यांचे परिणाम जाणणें, राजनीतिव्यवहारानें नियम प्राप्त करून घेणें या प्रकारच्या प्रयत्नांत दृश्य होते ज्यांनीं गुरुपरंपरा कायम राखल्या, निरनिराळ्या काळचे ग्रंथ दुसऱ्या कोणत्याहि राष्ट्रापेक्षां अधिक जतन करून ठेवले आणि ग्रंथामध्यें जे फेरफार होत, जे आवृत्तिकार निघत त्यांचा इतिहास फार काळजीनें जतन केला, त्या लोकांनीं संस्थानांच्या उत्कर्षापकर्षाच्या इतिहासाविषयीं अत्यंत उदासीन रहावें याचें कारण काय असावें ? हें औदासीन्यकारण समजण्यास ज्या काळांत भारतीयांचें इतिहासपुराणरूपी वाङ्मय तयार झालें त्या काळच्या सामाजिक व बौद्धिक परिस्थितीची कांहीं अंगें लक्षांत घेतलीं पाहिजेत. सामाजिक व राजकीय परिस्थितिच अशी होती कीं, राज्यांच्या उलटापालटीविषयीं सामान्य लोकांस तसेंच तत्त्ववेत्त्यास अनास्था असावी. कोणता राजा आला आणि कोणता राजा गेला याचें महत्त्वच प्राचीनांस फारसें नसावें. मेगास्थिनिस साक्षी देतो कीं, शेतकरी, भोंवतालीं जरी राज्यक्रान्ति होत असली तरी आपलें शेत संथपणें नांगरीत होते आणि कदाचित् चौकशी केली तरी कुतूहलवृत्तीनें करीत कीं, लढाई कोणाची व कशाबद्दल चालली आहे. ज्याप्रमाणें एखाद्याचें दुकान मोडून दुसऱ्या कोणाचें दुकान आलें ही क्रिया झाल्यामुळें सामान्य जनांत फारशी खळबळ होत नाहीं, त्याप्रमाणेंच बंदोबस्त ठेवण्याचा धंदा जी पेढी करते त्या पेढीची मालकी या घराण्यांतून त्या घराण्यांत गेली तर त्याचें महत्त्व तें काय ? एखाद्या पेढीवाल्यानें आपल्या शाखा पुष्कळ ठिकाणीं उघडल्या आणि अधिक ठिकाणचा बाजार काबीज केला तर त्याचें एखाद्या कर्मचाऱ्यास जेवढें महत्त्व तितकेंच बंदोबस्त ठेवण्याचा धंदा करणाऱ्या पेढीचा व्याप वाढला असतां त्यास महत्त्व. आजच्या युरोपीय लोकांस प्राचीन काळीं दोन राजघराण्यांमधील भांडणाबद्दल सर्व राष्ट्रानें लढावयास उठावें हा प्राचीनांच्या रानटीपणाचा मासला वाटत नाहीं काय ? एक संस्कृति स्थिर झाली आणि राष्ट्राचें महत्त्व सार्वराष्ट्रीय संस्कृतीच्या विकासामुळें कमी झालें म्हणजे राष्ट्राराष्ट्रांतील लढाया देखील अधिक निरर्थक होणार नाहींत काय ? अर्वाचीन जगास प्राचीन भारतीयांच्या राष्ट्रविषयक अनास्थेविषयीं नीट समज पडण्यासाठीं सर्व जग एका संस्कृतीनें व्यापिलें आहे आणि जवळ जवळ साऱ्याच व्यवहारनियमांनीं बद्ध आहे अशा परिस्थितीची कल्पना करावी लागेल. ही कल्पना त्यास आली म्हणजे राष्ट्राच्या उत्कर्षापकर्षाविषयीं अनास्था

* अर्वाचीन कोश-प्रस्तावना.

कशी उत्पन्न होणे शक्य आहे आणि त्यामुळे संस्थानाचे इतिहास लिहीत बसणें ही किती कमी महत्त्वाची गोष्ट होते याची कल्पना येईल.

आता व्यापारी मनु आला आहे, आणि त्यामुळे जीं व्यापारी घराणी मोठाले व्याप करितात त्यांचे इतिहास तयार होऊं लागले आहेत. अमेरिकेंतील मोठमोठ्या व्यापारी घराण्यांनीं आपले पैसे कसे जमविले हें सांगणारे इतिहास दृष्टीस पडत आहेत. तसेच मोठमोठ्या कंपन्यांचेहि इतिहास तयार होत आहेत.

गतस्थाच्या उलाढालींविषयी लोकांची व लेखकांची अनास्था असण्याचें सामाजिक कारण वर सांगितलें. सामाजिक कारण हें या अनास्थेस एकच कारण होतें असें नाहीं. तर बौद्धिक कारण देखील होतें तें येणें प्रमाणें.

जेव्हां इतिहासज्ञान तयार होतें तेव्हां तत्त्ववेत्ता त्यापासून जगद्विवर्ताचे नियम काढूं लागतो, आणि आपल्या माहितीची मांडणी या नियमानुरूप करतो. अशा तऱ्हेची मांडणी इतिहास, पुराणकारांनी केली आहे.

जेव्हां ज्ञानाचें एकीकरण करण्याचा प्रयत्न होऊं लागतो, तेव्हां पुष्कळसें ज्ञान थोडक्यात कसें आणावें हा विचार उत्पन्न होऊं लागतो. रक्षणीय काय? बारीकसारीक भानगडींचीं बाडें अगर तत्त्वें? या दोहोंत तत्त्वें रक्षणीय हें कोणीहि कबूल करील. तत्त्वें म्हणजे कोणती? तर कार्यव्यवहाराचे नियम. ते जतन करण्यासाठीं प्राचीनांनीं आस्था थोडी थोडकी दाखविली नाहीं. जगात जेव्हां एखादें राष्ट्र उत्कर्षापकर्ष पावतें आणि त्यांत जे उत्कर्षापकर्षांचे नियम दिसून येतात तेच इतर राष्ट्रांच्या उत्कर्षापकर्षांतहि दिसतात, आणि त्यामुळें ज्ञानेच्छूस एकाच संस्कृतींतील अनेक राष्ट्रांच्या भानगडींचें ज्ञान बरोबर अनावश्यक आहे. असो.

प्राचीन काळच्या इतिहासकारांना ज्या गोष्टी रक्षणीय वाटल्या त्या व त्यांत त्यांनीं जी ऐतिहासिक दृष्टी दाखविली ती येणेंप्रमाणें.

प्राचीनांच्या दृष्टीनें इतिहासामध्यें ज्या एका मोठ्या गोष्टीचें स्पष्टीकरण केलें पाहिजे अशी मोठी गोष्ट "सर्ग" म्हणजे विश्वाची उत्पत्ति मानली आहे.

त्यांच्या दृष्टीनें इतिहासविषय अशी दुसरी मोठी गोष्ट म्हटली म्हणजे मानवाचे मोठे वंश आणि त्यांची कार्ये होत.

आणखी त्यांच्या दृष्टीनें मोठी इतिहासविषय अशी गोष्ट म्हटली म्हणजे कालाचे मोठमोठे विभाग पाडणें होय. हे विभाग असे असावे कीं, एकंदर सर्वच समाजव्यवस्था अगर जगद्व्यवस्था जेव्हां पालटेल तेव्हां तो महत्त्वाचा भाग समजावा. या दृष्टीनें या कालाचा विवर्तदर्शक शब्द त्यांनीं मन्वंतर हा योजला आणि तो एक महत्त्वाचा इतिहासविषय धरला.

या सर्व कल्पना खऱ्या ऐतिहासिक भावनेस अनुसरून नाहीत असें कोण म्हणेल? इतिहासाची पुराणकारांच्या दृष्टीदतरी व्यापक कल्पना आज आपण करूं लागलों आणि इतिहास लिहिला तर त्या इतिहासाचें बाह्य स्वरूप आजच्या पाश्चात्त्य इतिहासाच्या पुस्तकांपेक्षां इतकें भिन्न होईल कीं, तो तत्त्वज्ञानाचा किंवा वेदांताचा ग्रंथ आहे असेंच लोकांस वाटेल.

पुराणांतून ज्या इतिहासविषयक कल्पना आपणांस दृष्टीस पडतात, त्या साधारणपणे अधिक प्रगत काळच्या आहेत. पुराणकर्त्यांनीं अनेक राष्ट्रांचे उदय व अस्त पाहिले होते आणि त्यास पृथ्वीच्या निर्माणप्रकारांची काहीं कल्पना होती. पुराणांतून दधिसमुद्र मधाचे समुद्र इत्यादि कल्पना आहेत, त्यावरून पुराणकाराचा हेतु थापा लिहिण्याचा होता असें खास म्हणता येत नाहीं. ग्रीक इतिहासकारांनीं घोड्याच्या तोंडाचे लोक, सोनें जमा करणाऱ्या मुंग्या इत्यादि भाकडकथा लिहून ठेवल्या नाहींत काय? ज्याप्रमाणें धर्मराजास सोनें आणून देणाऱ्या महाभारतोक्त पिपीलिका नावाच्या राष्ट्राचें सोनें जमा करणाऱ्या मुंग्यामध्यें ग्रीकांनीं पर्यवसान केलें त्याप्रमाणें बाहेर देशाच्या माहितीसंबंधानें तिखटमीठ लावलेल्या कथा पुराणकारांच्याहि कानीं आल्या नसतील काय? आल्या असल्यास त्यांनीं ग्रंथांत निर्देश केला तर ते प्राचीन ग्रीक भूगोलवेत्त्यापेक्षा अधिक प्रमादास्पद खास होत नाहींत.

वरील विवेचन भारतीयांस इतिहासभावनेचा अभाव होता या कल्पनेची असत्यता दर्शवील व हेंहि दाखवील का, त्यांची ऐतिहासिक भावना अधिक व्यापक व कमी सूक्ष्म होती. व्यापक भावनेनें जें वाङ्मय तयार झालें त्याच्या बरोबर काहीं सूक्ष्म भावनेनें तयार झालेले वाङ्मय वाढलें नसेलच असें म्हणवत नाहीं. पण तें असले तरी नष्ट झालें असावें असे दिसतें. इतिहास या शास्त्राकडे भारतीयांचे लक्ष किंपत होतें, कालक्रमविषयक म्हणजे "फिलॉसफी आफ हिस्टरी" या सदरांत घालतां येतील असे सिद्धांत त्यांजपाशीं होते किंवा नव्हते याविषयीं माहिती कालानुक्रमानें देण्यास अवकाश नाहीं. तथापि, हें सांगता येतें कीं, प्रत्येक काळांत असे ग्रंथ निर्माण झाले आहेत कीं, जे ग्रंथकारामध्यें पूर्वकथांचें सिंहावलोकन करावयाची बुद्धि, आणि त्या कथांपासून निघणारे जगत्क्रमविषयक सिद्धांत आणि त्या सिद्धांतांवरून जगाचा हेतु याविषयीं विचार नेहेमीं चालू असे असें दाखवितात. व्यक्ति ज्या क्रिया करते त्या क्रिया कांहीं विशिष्ट सृष्टिक्रमनियमांनीं बद्ध असतात आणि मोक्ष म्हणजे अवतारी मनुष्याकडून होणाऱ्या प्रत्येक क्रियेला अंतिम हेतु असतो. या तऱ्हेचा विचार ज्या लोकांत फार दृढपणें आहे त्या लोकांस इतिहासभावना नाहीं असें कसें म्हणतां येईल?

खराखुरा इतिहास लिहिण्याचा प्रयत्न करणें ही क्रिया फार दूरची आहे. असा कोणताहि काळ नाहीं कीं ज्या काळांतील "इतिहासकारांनीं," ज्याची माहिती नाहीं त्याची माहिती वस्तुस्थिति कशी असावी यासंबंधानें कल्पना करून घातली नाहीं. संशोधन करताना तरी अगोदर काय असावें यासंबंधानें कल्पना करून साहित्य जुळवावें लागतें आणि साहित्यानुसार ती कल्पना तपासावी

लागतें. प्राचीनांना इतिहास कसा असावा यासंबंधानें आपली कल्पना लिहिली त्या क्रियेंत आणि आजच्या संशोधकाच्या क्रियेंत मुख्य फरक हाच कीं, त्यांची कल्पना साहित्याभावानें अनियंत्रित होती यामुळें आपणास प्राचीन लोकांस इतिहासभावना नव्हती असें वाटतें. अधिकाधिक साहित्यानें पूर्वींच्या कल्पना दुरुस्त करण्याचा प्रयत्न नेहमींच होत असतो व झाला पाहिजे. हीच वृत्ति पुराणग्रंथ वापरतानाहि ठेवावी. प्राचीनांच्या ग्रंथांत देखील कांहीं ग्रंथांत ऐतिहासिक भावना कमी, कांहींत अधिक असा प्रकार आहेच. वेदांत आपणास ऐतिहासिक भावना फारच थोडी दिसते. वेदामध्यें जगाच्या निर्मितीविषयीं विचार सांपडतात. पण वंशविषयक ज्ञानाची व्यवस्थित मांडणी करण्याची भावना त्यांत दिसत नाहीं. आणि कोणत्या तरी ऐतिहासिक किंवा निर्मितिविषयक तत्त्वाची इतर गोष्टींशीं जुळणी करण्याचा सदृढ यत्न केली नसल्यामुळें आपल्या हातीं खराखुरा कच्चा माल आलेला आहे. तो माल आजच्या इतिहासकारास अधिक उपयुक्त आहे. सृष्टि उत्पन्न कशी झाली, निरनिराळे वंश किंवा मनुष्यप्राणी यांची उत्पत्ति कशी झाली याविषयीं थोडेसे विचार वेदांत दृष्टीस पडतात. पण युगें, मन्वंतरें यांच्या कल्पना वेदांत दिसत नाहीत. पुराणें आणि वेद यांतील विचारांमध्यें थोडीशी सरूपता आहे, पण पुराणांतील विचार अधिक व्यापक आहेत वेदामध्यें सृष्टीची, ताऱ्यांची, मानवजातीची, पशुपक्षांची उत्पत्ति कशी झाली याविषयींचें त्यांचें मत सांपडतें

येथें पुराणांतील कथा देण्यात तात्पर्य नाहीं, कारण कथा द्यावयाच्या म्हणजे एकमेकांशीं विरोध टाळलेलें कथानक पुढें मांडावयाचें. या कथानकामध्यें कांहीं अंश मात्र थोडासा लक्षात घेण्याजोगा आहे. तो अंश म्हटला म्हणजे संस्कृतीचा विकास झाला यासंबंधीं पुराणकारांनीं आपलीं व्यक्त केलेलीं मतें होत. आज अर्वाचीन समाजशास्त्रज्ञ ज्या प्रकारची संस्कृतिविकासविषयक विचारमालिका पुढें आणितात त्या प्रकारची विचारमालिका पुढें आणण्याची बुद्धि पुराणकाराच्या लेखकासहि येत होती असें विष्णुपुराणावरून दिसतें. मानवी मनोविकारहीन समाजस्थितींत शासनसंस्थेचा अभाव हें मत अठराव्या, एकोणिसाव्या शतकांतील मोठ्या यूरोपीय तत्त्ववेत्त्यांच्या ग्रंथांत सांपडतें. त्याअर्थीं पुराणकारांच्या कल्पना जर जंगली म्हणावयाच्या तर असल्या प्रकारच्या कल्पना अठराव्या, एकोणिसाव्या शतकांतहि यूरोपांत प्रचलित होत्या ही गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे. पुराणग्रंथकारांना भोंवतालचीं राष्ट्रें व मोठमोठीं घराणीं यांचा इतिहास आणि जगदुत्पत्तीचा काळ यांच्यामध्यें असलेलें अंतर भरून काढण्याची प्रबल इच्छा असावी असें दिसतें. आणि त्यांच्या काळीं जी दंतकथात्मक माहिती उपलब्ध असेल ती त्यांनीं कसेंबसें हें अंतर भरून काढण्याकरितां वापरली असावी. ज्या काळांत वरील प्रकारचा मजकूर लिहिला गेला त्या काळांत एखादा अर्वाचीन चिकित्सक बुद्धीचा लेखक असता तर तो एवढेंच करिता कीं, सध्यांचे प्रचलित वंश अमुक आहेत असें लिहिता, प्राचीन वंशविषयाचा माल अमुक अमुक आहे म्हणून मांडता व अर्वाचीन प्राचीन काळ आणि त्या मनुष्याचा काळ यांमधील विचार भरून काढता येत नाहीं म्हणून म्हणता आणि त्या मधल्या कालाविषयीं ज्या कांहीं दंतकथात्मक वंशावळ्या उपलब्ध असतील त्या पुढें मांडता आणि कदाचित् त्या जोडण्याचाहि प्रयत्न करिता. फरक एवढाच झाला असता कीं 'असें असेल ना,' 'अशी कल्पना होते,' 'आम्ही हें सुचवितो' आणि 'विरुद्ध पुरावा सांपडेपर्यंत आम्ही अमुक अमुक गृहीत धरतों' अशा वाक्यांची रेती वंशरूपी विटा जोडणाऱ्या कल्पनाच्या चुन्यात मिसळता, आणि आपण अत्यन्त सावध लेखक म्हणून म्हणवून घेता.

इतिहासविषयक लेखांत नेहमीं एक लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, चिकित्सक बुद्धि ही इतिहासकाराच्या कल्पनेस नियंत्रक आहे हें खरें, परंतु चिकित्सक बुद्धि इतिहासज्ञान देऊं शकत नाहीं. इतिहासकारास दुवे जोडावयाचे असतात आणि संबंध शोधावयाचे असतात. चिकित्सकाचें 'नेदं नेदं' करून चालतें आणि त्यास नेदं याचेंच उपबृंहण करणारा लेख सजवितां येतो; परंतु संगति लावणें, सांधे जोडणें, काय झालें असेल याच्याबद्दल कल्पना करणें आणि मांडणें हीं कामें इतिहासकारास करावीं लागतात. म्हणजे इतिहास लिहितांना कल्पनेसच पुढें ढकलावें लागतें, आणि त्याच्या कल्पनेनें तो जो सांधा जोडील तो सांधा चिकित्सकाच्या बुद्धीनें तपासावा लागतो. असो.

पुराणांतील सर्व वंशावळी निरुपयोगी आहेत काय ? नाहीत, असें अलीकडे थोडें मत होऊं लागलें आहे. त्या मताचें संयोजक फल आम्ही पुढें देऊं. पुराणाचें व प्राचीनांच्या इतिहासवाङ्मयाचें महत्त्व आम्ही फार मोठें समजतों. वेदाच्या पूर्वींच्या कालापासूनचा इतिहास पुराणवाङ्मयांत लपला आहे असें आमचें मत आहे. वेद हे सर्वांत प्राचीन भारतीय ग्रंथ आहेत हें खरें, परंतु सर्वस्वीं प्राचीन माहितीचे संग्राहक ते खास नाहींत. ऋग्वेदांतील बरींचशीं सूक्तें दाशराज्ञयुद्धाशीं समकालीन किंवा नंतरचीं आहेत. दाशराज्ञयुद्धामध्यें पुरु, यदु, तुर्वश, अनु, द्रुह्यु इत्यादि राष्ट्रें आपलें स्वतंत्र अस्तित्व दाखवितात. हें युद्ध ज्या वेळेस इकडे होत असेल त्या वेळेस बहुतेक हिंदुस्थान रिकामा नसून अगोदरच व्यापलेला असावा आणि तो बहुतकरून आर्यन् महावंशाच्या राष्ट्रांनीं व्यापला असावा असें दिसतें ऋग्वेदांत आर्यन् लोकांनीं हिंदुस्थान व्यापिल्याचा इतिहास खास नाहीं. आर्यन् महावंशाची भरतखंडांतील वसाहत ही ऋग्मंत्रपूर्वकालीन आहे. दिवोदास व सुदास यास परुष्णीतीरापर्यंत जो प्रदेश आक्रमावा लागला तो पूर्वी सपुरोहित बसलेल्या राष्ट्रांशीं निकराची मारपीट करीत आक्रमावा लागला. त्या काळांत हिंदुस्थानांत अनेक राष्ट्रें होतीं व तीं आपली पूर्वपीठिका बरीच जतन करून ठेवीत होतीं. आणि त्यांचें वाङ्मय जरी तयार नसलें तरी पूर्वकालच्या आठवणींचें रक्षण तीं करीत होतीं. म्हणजे हिंदुस्थानचा इतिहास लिहावयाचा म्हणजे ऋग्मंत्रपूर्व कालापासून प्रारंभ करावयाचा ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे. वेदपूर्वकालाचा इतिहास सृष्ट्युत्पत्तिपासून इतिहास सांगण्याचा बाणा बाळगणाऱ्या पुराणवाङ्मयांत लपला आहे काय हें आपणास पाहिलें पाहिजे.

एवंच भारतीय इतिहास आपणास फार प्राचीन कालापासून उपलब्ध आहे आणि भारतीयांनी त्यास फारशेरें माहित्यांत जपून ठेवलें आहे अशी आपली खात्री होते. आतां आपलें यापुढील कार्य हें आहे कीं, अत्यंत प्राचीन काळापासून सुरवात करून आजच्या कालापर्यंत इतिहाससूत्र ओढीत आणावयाचें. हें करण्यासाठीं आपणास कोणत्या गोष्टीचें साहाय्य मिळेल हें पाहिलें पाहिजे.

जगाच्या इतिहासाचे आपण प्रथमतः दोन भाग करूं. (१) बुद्धपूर्वकाल. (२) बुद्धोत्तरकाल.

या विभागांचें महत्त्व असें आहे कीं, सर्व जगाचा बुद्धापूर्वीचा इतिहास अंधुक स्थितींत आहे. बुद्धोत्तर इतिहास बराच निश्चित आहे. सर्व जगाशीं ज्या गोष्टीचा अत्यंत प्राचीन काळीं संबंध आला अशी संस्था म्हणजे बौद्धसंप्रदाय होय. बुद्धपूर्वकाल म्हणजे विस्कळित मनुष्यसमुच्चयाचा काल, बुद्धोत्तरकाल म्हणजे परस्परांशीं साद मनुष्यसमुच्चयाचा काल.

बुद्धपूर्वकालमध्यें देखील विशिष्ट संस्कृतीस प्रारंभ होण्यापूर्वीचा आणि विशिष्ट संस्कृति उच्च प्रकारें सुरू झाल्याचा असे दोन भाग पडतील. असुरराष्ट्रस्थापनेपूर्वीं कोणतीहि विशिष्ट संस्कृति संवर्धित झाली होती असं आजपर्यंतच्या माहितीवरून म्हणतां येत नाहीं. यासाठीं प्रथम विश्वोत्पत्तिकालापासून असुरराष्ट्रसंस्थापनेच्या काळाचा इतिहास किलपत सुळवितां येतो हें पाहू.

---

## प्रकरण २ रें.

## विश्वोत्पत्तीपासून असुरराष्ट्रसंस्थापनकालापर्यन्त.

### (अनादिकाल—खि. पू. ८०००.)

**मानवेतिहासाच्या मर्यादा व साधनें.**– इतिहासाचा विषय मनुष्यप्राण्याच्या जगावरील एकंदर हालचालींचें ज्ञान होय.

प्रत्येक देशांत इतिहासज्ञानाची सुरवात मनुष्यानें आपल्या कालांतील गोष्टी लिहून किंवा इतरास सांगून रक्षण करून ठेवल्यानें होते. पैतृक परंपरा लेखाच्या द्वारें नेहमीच उपलब्ध होतात असें नाहीं. जगांतील अनेक राष्ट्रांपैकीं फारच थोड्या राष्ट्रांनी स्वकालीन इतिहास लिहून ठेवण्याइतकी प्रगति झाली होती. प्रत्यक्ष इतिहासलेख लिहिले गेले नसले तरी इतिहासोपयोगी ग्रंथ प्रत्येक संस्कृतींत आढळतात. प्रत्येक लोकांचीं काव्यें व स्तोत्रें त्यांच्या इतिहासाचीं साधनें आहेत. काव्यांखेरीज इतर अवशेष देखील इतिहाससाधक असतात.

अर्वाचीन इतिहाससंशोधक, वाङ्मयरूपी व वस्तुरूपी अवशेष किंवा अव्याहत चालू असलेल्या परंपरा व रीतिभाती यांवरून इतिहास लिहिण्याचा प्रयत्न करतो.

या प्रकारचें साहित्य देखील फारच थोड्या काळाचा आणि फारच थोड्या राष्ट्रांचा इतिहास देऊं शकतें. ज्या राष्ट्रांचे लेख किंवा इतर प्राचीन काळचे वस्तुस्वरूपी अवशेष उरले आहेत अशीं राष्ट्रें फारच थोडीं. ज्यांचे कोणत्या तरी प्रकारचे अवशेष दहा हजार वर्षांइतके जुने शिल्लक आहेत अशीं राष्ट्रें अगर संस्कृति आज आपणास ठाऊक नाहात. चार हजार वर्षांइतके जुने ज्यांचे अवशेष शिल्लक आहेत अशीं राष्ट्रें अगर संस्कृति हातांच्या बोटांवर मोजतां येतील इतक्यांच आहेत.

अनेक राष्ट्रें व जाती यांविषयीं माहिती आपणास गेल्या शतकांतच प्राप्त झाली आहे.

इतिहासलेखनाची सामान्य पद्धति अशी आहे कीं, जितक्या प्राचीन काळाची आपणांस माहिती आहे तितक्या प्राचीन कालापासून सुरवात करून आजच्या कालापर्यंत कथासूत्र ओढीत आणावयाचें. ही पद्धति नेहमी शक्य असते असें नाहीं कारण जितका काळ जुना तितका तो अधिक अस्पष्ट असतो आणि तो अस्पष्ट असल्यामुळें उत्तरकालीं कथासूत्रास सुरवात करून जितकें पाठीमागें जातां येईल तितकें जावें या प्रकारची पद्धति अमलांत आणावी लागते. इसवी सनाच्या प्रारंभीचा काल घेतला तरी आपणास त्या वेळच्या फारच थोडक्या राष्ट्रांची माहिती आहे. सहारा वाळवंटाच्या दक्षिणेकडील आफ्रिकेच्या भागाची आणि अमेरिका व सैबिरिया या प्रदेशांतील राष्ट्रांची दोन हजार वर्षांपूर्वीची माहिती आपणास कांहींच नाहीं असें म्हटल्यास चालेल. मनुष्य प्राण्याचा जगभर विस्तार या कालाच्या पूर्वी कित्येक शतकें झाला होता याविषयीं आज कोणास शंका नाहीं.

मनुष्यप्राण्याची वसती किती वर्षें होती याविषयीं आज आपली कल्पना पुष्कळ विस्तृत झाली आहे. लाखों वर्षें मनुष्यप्राणी जगावर आहे असें शास्त्रज्ञांचें आज मत झालें आहे. या लाखों वर्षांचा इतिहास कसा लिहावयाचा हें मोठें कोडें आहे. भूस्तरशास्त्र, वनस्पतिशास्त्र, प्राणिशास्त्र, मापशास्त्र इत्यादि शास्त्रांच्या साहाय्यानें ही मधली पोकळी भरण्याचा प्रयत्न होत आहे. या प्रयत्नाचें फल येथे देण्यास अवकाश नाहीं, पण या शास्त्रांचा मनुष्येतिहासाशी संबंध कसा काय पोंचतो हें दाखविलें म्हणजे इतिहासशास्त्राची व त्या शास्त्राच्या संवर्धनार्थ असलेल्या साहित्याची आपणास कल्पना येईल.

**विश्वांतील मानवोत्पत्तिपूर्व क्रिया व त्यांचा कालक्रम.**– प्रथमतः शास्त्रज्ञांमध्यें जें इतिहासविषयक तत्त्वज्ञान प्रचलित आहे त्याचा उल्लेख केला पाहिजे.

**जड द्रव्य, सौरसमुच्चय आणि पृथ्वी.**–पृथ्वीवर मनुष्य प्राणी उत्पन्न होण्यापूर्वी देखील पृथ्वीचा इतिहास मोठा आहे. पृथ्वी उत्पन्न झाली कशी, ती आकाशांत परिभ्रमण करूं लागण्यापूर्वी ज्या साहित्याचें पर्यवसान पृथ्वी या पिंडांत झालें तें साहित्य उर्फ जड मात्र कोणत्या स्थितींत होतां, पृथ्वी आणि इतर ग्रह हे सौरसमुच्चयांतून बाहेर पडले काय, या तऱ्हेचे प्रश्न विचाराचा विषय झाले आहेत. पृथ्वी आणि इतर ग्रह हे जर सौरसमुच्चयांतून बाहेर पडले असले तर सौरसमुच्चय दुसऱ्या कोणत्या तरी ताऱ्यापासून उत्पन्न झाला नसेल काय? असला तर हे तारकापुंज तयार होण्यापूर्वी त्यांची

काय स्थिति होती ? यांविषयींचा अभ्यास ज्योति शास्त्र आणि तद्विषयक पदार्थविज्ञानशास्त्रादि शास्त्रे यांमध्ये समाविष्ट होतो. विश्वांतील सर्व जड वस्तूंची म्हणजे कोट्यवधि खस्थ ज्योतींची उत्पत्ति कशी झाली, त्यांचा लय कसा काय होईल इत्यादि गोष्टींचा शास्त्रीय विचार हा विश्वोत्पत्तिशास्त्रविषयक अगर ज्योति शास्त्रविषयक होईल.

कांहीं जड सृष्टींतून तारकायुक्त सृष्टि उत्पन्न झाली असो अगर नसो पण जे अनेक तारे अगर ग्रह आकाशात दिसतात त्यांचा एकमेकांशीं संबंध काय तो पहाणें, तारे किती आहेत त्यांची मोजदाद करणे हा तारकाविकासकालाच्या पुढच्या कालाचा अभ्यास होय. हा ज्योति शास्त्राचा भाग होय.

या अभ्यासापुढचा अभ्यास म्हटला म्हणजे एखाद्या खस्थ गोलाचा विशेष अभ्यास करणें. या अभ्यासामध्यें पृथ्वीच्या घटनेचा आणि इतिहासाचा अभ्यास येतो. यासच भूस्तरशास्त्र उर्फ जिऑलजी म्हणतात.

या अभ्यासामध्यें आपणास असें दिसून येते की, आज आपण पृथ्वीच्या जड वस्तूंचाच अभ्यास करताना आपणास प्राचीन चैतन्याचाहि अभ्यास याबरोबरच करावा लागतो. पृथ्वीच्या तळाच्या खालीं अनेक लुप्त चैतन्याचें अगर ह्यात चैतन्याच्या पूर्वरूपाचें अस्तित्व आढळून येतें त्याच्या योगानें आपणास प्राण्यांचा आणि वनस्पतींचा इतिहास लिहिता येतो. वनस्पतिशास्त्र व प्राणिशास्त्र खस्थ गोलावरील सचेतन सृष्टीचे अभ्यास होत.

मनुष्योद्भवापूर्वी ज्या क्रिया झाल्या आणि ज्या ज्योति-शास्त्र, भूस्तरशास्त्र, प्राणिशास्त्र व वनस्पतिशास्त्र यांचा विषय आहेत, त्या क्रिया आणि त्यांचा इतिहास एका नियमांत आणण्याचा प्रयत्न झाला आहे त्या नियमास विकासवाद म्हणतात.

**विकासवाद.**-विकासवाद उर्फ एव्होल्यूशन म्हणून जो सिद्धांत पुढें मांडण्यांत येतो त्यांतील मुख्य कल्पना येणेप्रमाणे आहे. अत्यंत प्राचीन काळीं द्रवरूप जडद्रव्य आकाशांत परिभ्रमण करीत होतें त्यावर गतीचा परिणाम होऊन तारकासमुच्चयरूपी विश्व उत्पन्न झालें त्या तारकांपैकीं प्रत्येक तारका अत्यंत उष्ण म्हणजे चैतन्याच्या संभवास अगर जीवनास अयोग्य अशा स्थितींत होती आणि ती अंशतः द्रवरूप आणि अंशतः जडरूप स्थितींत होती. पृथ्वी अशाच प्रकारची खस्थ ज्योति आहे. तींत कालांतरानें उष्णता कमी झाली आणि चैतन्य उत्पन्न झालें. तें चैतन्य प्रथम अत्यंत सूक्ष्म जीवरूपी होतें. पुढें त्याचाच विकास होऊन म्हणजे दोन सूक्ष्मांपासून जरासे मोठे पण सूक्ष्म जीव उत्पन्न झाले. त्याच क्रियेनें आणखी मोठाले जीव (वनस्पतिरूपी अगर प्राणिरूपी) उत्पन्न झाले

**जडापासून जीवोत्पत्ति.**-जडापासून जीवोत्पत्ति कशी झाली याविषयीं विकासवादावरून समाधानकारक विवेचन झालें आहे असें मानण्यात येत नाहीं. तथापि सजीव सृष्टि कांहीं अंशीं लागली आहे असेंहि कित्येक समजतात. या विषयावर प्रो. द. ल. सहस्रबुद्धे ( शेतकी कॉलेज पुणें ) लिहून पाठवितातः—

सजीव सृष्टि आणि निर्जीव सृष्टि यांचा परस्पर संबंध कोणत्या प्रकारचा आहे हा प्रश्न तत्त्ववेत्ते आणि भौतिकशास्त्रज्ञ यांच्या मनांत मनुष्यप्राणी रानटी स्थिति सोडून देऊन सुधारणेच्या मार्गास लागला तेव्हांपासून सारखा घोळत आहे. अलीकडील शास्त्रीय भाषेंत सांगावयाचें म्हणजे हा विषय रसायनशास्त्र आणि जीवशास्त्र यांच्यामधील सरहद्दीवरचा आहे. एक काळ असा होता कीं, त्या वेळीं वनस्पतिकोटि आणि प्राणिकोटि यांचाहि परस्पर कांहीं एक संबंध नाहीं असें मत प्रचलित होतें. परंतु अलीकडील पन्नास वर्षांत जीवशास्त्रज्ञांना असें सिद्ध करून दाखवितां आलें आहे कीं, या दोन कोटींमध्यें अनेक बाबतींत सादृश्य आहे. त्यामुळें आतां आपणास असें खात्रीपूर्वक म्हणतां येतें कीं, प्राण्यामध्यें इंद्रियद्वारा ज्या ज्या प्रतिक्रिया होत असतात त्या सर्व वनस्पतींमध्यें होऊं शकतात. उदाहरणार्थ, घडीच्या योगानें वनस्पती गारठून जाऊन बधिर होतात, आल्कोहोल वगैरे मादक पदार्थांनीं त्यांना कैफ चढतो, दूषित हवेमुळें त्या गुदमरून जातात, अतिश्रमानें त्यांना थकवा येतो, ज्ञानशक्तिहारक औषधींनी त्यांना गुंगी येते आणि विषाची बाधा झाल्यास प्राण जातो. थोडक्यांत डॉ. सर जगदीशचन्द्र बोस या हिंदी शास्त्रज्ञाच्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे "क्षोभशीलतेचे ( Irritability ) जे जे प्रकार प्राणिकोटीमध्यें दिसून येतात त्यांपैकीं वनस्पतीमध्यें आढळून येत नाहीं असा बहुधा एकहि नाहीं."

जसाहि एक काळ होता कीं, त्या वेळीं सेंद्रिय संयुक्त पदार्थ व निरिंद्रिय संयुक्त पदार्थ ( *Organic and inorganic compounds* ) हेहि परस्पर अत्यंत भिन्न असतात असें मानीत असत. त्या वेळीं अशी समजूत असे कीं, वरील पदार्थांपैकीं निरिंद्रिय संयुक्त पदार्थच फक्त रासायनिक प्रयोगशाळेमध्यें तयार करतां येतात, आणि सेंद्रिय संयुक्त पदार्थ हे वनस्पतींच्या किंवा प्राण्यांच्या शरीरामध्येंच कांहीं विशेष प्रकारच्या चैतन्यशक्तीमुळें ( Vital force ) उत्पन्न होऊं शकतात, परंतु हा भासत असलेला फरकहि आतां पूर्णपणें दूर झालेला आहे हेंहि आपणांस माहीत झालेलें आहे.

सजीव सृष्टि व निर्जीव सृष्टि यांमधील फरकाची जाणीव आज हजारों वर्षें मानवजातीला आहे. परंतु अलीकडे ज्या वेळीं प्राणिकोटि व वनस्पतिकोटि यांचा बराच निकट संबंध आहे असें, आणि सेंद्रिय संयुक्त पदार्थ तयार करण्यास कसल्याहि प्रकारच्या अदृश्य चैतन्यशक्तीची जरूरी लागत नाहीं असें सिद्ध करण्यांत आलें त्या वेळीं, जीवशास्त्रज्ञ आणि रसायनशास्त्रज्ञ यांचेवर संयुक्त प्रयत्नांनीं आणि सुधारत जात असलेल्या प्रयोगसाधनांच्या साहाय्यानें सजीव व निर्जीव सृष्टि यांमध्यें भासत असलेली भेदरूपी मोठी भिंत शिल्लकहि नाहींशी होईल, असें साहजिकच वाटूं लागलें; आणि चालू सालापर्यंतचे शोध लक्षांत घेतां ही भिंत सर्वस्वी नाहींशी झालेली नसली तरी बऱ्याच ठिकाणीं पाडण्यांत आलेली आहे असें दिसून येतें.

नागेली नामक सुप्रसिद्ध वनस्पतिशास्त्रज्ञ म्हणतो, "ज्या अर्थीं या भौतिक सृष्टीमध्यें सर्व वस्तूंचा परस्पर कार्यकारणसंबंध दिसून येतो, व ज्या अर्थीं सर्व भौतिक व्यापार टाळिक सृष्टिनियमानुसार चाललेले आहेत, त्या अर्थीं निरिंद्रिय द्रव्यांपासून उत्पन्न झालेले व शेवटीं त्याच निरिंद्रिय द्रव्यांमध्यें मिळून जाणारे सावयवी जीवहि निरिंद्रिय संयुक्त पदार्थांपासून मूळ उत्पन्न झालेले असले पाहिजेत असें मानल्याशिवाय विकासविषयक सिद्धान्त पूर्णपणानें सिद्ध झाला असें म्हणतां येणार नाहीं."

**सजीवांतील विशेष गुणधर्म निर्जीवांतहि आढळतात —** सजीव वस्तूमध्यें जे विशिष्ट भेदभावदर्शक गुणधर्म दिसून येतात ते येणेंप्रमाणे (१) बाह्य कारणांशिवाय अन्तर्गत कारणांनीं उत्पन्न होणारी गति,

( २ ) अन्तर्भागांतुन होणारी वाढ, ( ३ ) क्षोभशीलता किंवा संवेदनाशीलता, ( ४ ) श्वासोच्छ्वासक्रिया, आणि ( ५ ) अपत्योत्पादन.

अगदीं साधे सचेतन जीव हे एकपेशीमय असतात. अशा पेशी उर्फ गोलकामध्यें ( १ ) मूळघटक ( nucleus ) ( २ ) जीवनरस आणि ( ३ ) गोलकवेष्टन असे तीन निरनिराळे भाग असतात. परंतु ज्या एकपेशीमय जीवामध्यें इतके तीन निरनिराळे भाग असतात तो जीवकोटींतील अगदीं आद्यस्वरूपी जीव होय असें म्हणतां येत नाहीं. विकासतत्त्वानुसार पाहिलें तर, असा एकपेशीमय जीवहि त्याहून अधिक साध्या स्वरूपाच्या जीवापासून उत्पन्न झालेला असला पाहिजे, असें म्हणावें लागतें. आणि अशा प्रकारचे अवयवरहित व विशिष्ट रचनारहित जीव जिवंत स्थितींत हल्लींहि आढळतात, असें कित्येक जीवशास्त्रज्ञांचें म्हणणें आहे. उदाहरणार्थ, मोनेरा (Monera) किंवा क्रोमेसिया (Chromacea) हे जीव म्हणजे ओल्या खडकावर पसरलेली श्लेष्ममय पदार्थां-( golly ) प्रमाणें दिसणारीं आवरणें ( coatings ) होत; आणि उच्च प्रतीच्या सूक्ष्मदर्शकयंत्रांतून पाहिल्यास हे जीव जीवनरसाचे बनलेले लहान लहान निळ्या-हिरव्या रंगांचे सूक्ष्म गोलपिंड असतात असें आढळून येतें. मोनेरा आणि ज्याच्यामध्यें योगवाही क्रिया ( Catalysis ) दिसून येते अशा निरिंद्रिय वस्तु यांच्यामध्ये जो एकच फरक दिसून येतो तो फक्त कर्बग्रहण ( Carbon assimilation ) संबंधाचा होय. परंतु मोनेरा व उच्च दर्जाचा सेंद्रिय जीव यांच्यामध्यें प्रत्येक बाबतींत, मोनेरा व निरिंद्रिय स्फटिक यांच्यामधील फरकापेक्षां अधिक मोठा फरक असतो. गोलकांतील मुळाधारभूत द्रव्य म्हणजे जो जीवनरस त्याच्यामध्यें C कार्बन, H हायड्रोजन, O आक्सिजन, N नायट्रोजन, P फॉस्फरस, S सल्फर इत्यादि, इतरीं मूलद्रव्यें असतात, म्हणजे निरिंद्रिय सृष्टींमध्यें नाहीं असें एकहि अधिक मूलद्रव्य या जीवनरसामध्यें नसतें.

**सचेतन जीव व स्फटिक यांची तुलना** — आतां सचेतन एकपेशीमय जीव यांच्यामधील सजीवत्व म्हणून समजले जाणारे विशिष्ट गुणधर्म स्फटिकासारख्या निर्जीव वस्तुमध्ये असतात किंवा नाहीं हें दोघांची तुलना करून पाहूं. सेंद्रिय निरिंद्रियांची अशी तुलना सर्व बाबतींत करतां येण्यासारखी नसली तरी स्फटिक हा निरिंद्रिय पदार्थांपैकीं एक अत्यंत पूर्णत्वास पोंहोचलेला पदार्थ असल्यामुळे ही तुलना महत्त्वाची आहे. सजीव गोलकांतील महत्त्वाचे गुणधर्म येणेंप्रमाणें असतात ( १ ) त्यांचा आरंभ सजातीय जीवापासूनच होतो. ( २ ) त्यांना विशिष्ट आकार असून तो कमी अधिक वाटोळा असतो व सरळ सपाट पृष्ठभाग असा नसतो. ( ३ ) अनेक पदार्थांच्या मिश्रणांतुन स्वतःला योग्य असें अन्न निवडून घेण्याची त्यांच्या अंगीं शक्ति असते, ( ४ ) त्यांना वाढ असते, ( ५ ) त्यांचे नवें द्रव्य स्वतःमध्यें घेऊन जुनें टाकून देण्याचें कार्य चालू असतें, ( ६ ) त्यांना गति व संवेदनाशीलता असते, ( ७ ) अपत्योत्पादन म्हणजे स्वतःसारखे दुसरे जीव त्यांना निर्माण करतां येतात, ( ८ ) पुष्कळ उष्णता लावल्यानें शक्ति नष्ट होते असे बीजकण ते बनवितात, व हे सर्व गुणधर्म लहानमोठ्या प्रमाणांत स्फटिकामध्येंहि दिसून येतात.

| सजीव सृष्टि | स्फटिक |
|---|---|
| १ मूलारंभकारक बिंदु असतो. उदा०—गोलक, जीवनरस वगैरे. | १ एका लहान स्फटिक बिंदूपासून दुसरे तसेच अनेक तयार होतात. |
| २ आकारः वाटोळा. | २ आकार वाटोळा उ.-पाऱ्याच्या किंवा तेलाच्या बिंदूसारखा. |

स्फटिकाचा बाह्य भाग सरळ पृष्ठभागांचाच बनलेला असतो, परंतु तसलाच बाह्य आकार डायटम ( diatoms ) व रेडिओलेरिआ ( Radiolaria ) यांच्या गारगोटीसारख्या कवचांच्या सांगाड्यांनाहि असतो. जीवनरसापासून तयार झालेले सेंद्रिय सचेतन जीव आणि निरिंद्रिय स्फटिक यांच्यामध्यें सजीव स्फटिक ( biocrystals ) म्हणून जात आहे. ती जीवनरस आणि निर्जीव द्रव्य यांच्या संयुक्त क्रियेनें विशिष्ट आकार घेऊन बनलेली असते, उदा० स्पंज, पोंवळीं इत्यादि पदार्थ बनविणाऱ्या प्राण्यांनीं तयार केलेली गारेची व खडूची वेष्टनें, तसेंच बर्फाच्या स्फटिकांचाच परस्पर विशेष व्यवस्थितपणें संयोग होऊन त्यांना झाडासारखे व फुलासारखे आकार येतात.

| सजीव सृष्टि | स्फटिक |
|---|---|
| ३ पोषक पदार्थांची निवड करणें. | ३ एकाच जातीच्या द्रव्यापासून जेव्हां स्फटिक बनलेला असतो, तेव्हां एकाच जातीचे परमाणू एकत्र आकर्षण केले जाऊन तो स्फटिक तयार होतो. परंतु जेव्हां अ, व ब अशा दोन निरनिराळ्या जातींचे क्षार पाण्यामध्यें जितके विरघळणें शक्य आहे तितके टाकून ते विरघळल्यावर त्यांत अ द्रव्याचा स्फटिक टाकला तर मूळच्या मिश्रणापैकी अ द्रव्याचेच स्फटिक बनतात. यावरून अ क्षाराच्या स्फटिकाची सजातीय द्रव्य ओढून घेण्याची शक्ति दिसून येते. निरनिराळ्या प्रकारची द्रव्यें तटाशी बसून निरनिराळे स्फटिक बनतात यावरून हच सिद्ध होतें. याच क्रियेला स्फटिकाची निवड करण्याची शक्ति असें म्हणतां येईल. |
| ४ बाहेरील द्रव्य शरीराच्या आत घेऊन स्वतःची वाढ करण्याची शक्ति असते. | ४ मूळ पदार्थाला बाहेरून सजातीय द्रव्य जोडले जाऊन वाढ होते. |

हा जो फरक आहे त्याचें स्पष्टीकरण करणें सोपें आहे. तें असें की, या दोहोंची मूळ रचनाच निराळी असते. परंतु हा फरक अनुल्लंघनीय नसतो. या दोन जातींमध्यें मधल्या दर्जाचे पदार्थ असतात. कांहीं द्रव्यांचे कोलाइड ( Colloid ) स्थितींतले प्रतिस्फटिकाचे सूक्ष्म गोल पिंड क्षाराच्या द्रवामध्यें विरघळून न जातील अशा रीतीनें टांगून ठेवल्यास त्यांना बाहेरून कण जोडले जाऊन त्यांची वाढ होते,

| सजीव सृष्टि | स्फटिक |
|---|---|
| ५ नवें द्रव्य शरीरांत घेऊन जुनें बाहेर टाकून देणें. | ५ एका क्षाराचे स्फटिक त्याच क्षाराच्या द्रवामध्यें टाकल्यास ही क्रिया होते. उदा०—मोरचुदाचा एखादा स्फटिक वजन करून मोरचुदाच्या संयुक्त द्रावामध्ये टाकल्यास त्याचें वजन कमजास्त न होतां आकार मात्र बदलतो. याचें कारण त्याच्यामधील कण द्रवांत मिसळून असतात व द्रवांतील स्फटिकाला येऊन मिळत असतात. |

| | |
|---|---|
| ६ गति व संवेदना असते. | ६ योग्य साधन मिळाल्यास स्फटिकाच्या अणूना गति येते. परमाणू टराविक नियमांनुसार टराविक दिशेने हालचाल करतात व एकत्र होतात असें ठरतें. यावरून त्यांना संवेदना होतात असें ठरते; नाहीतर सजातीय परमाणू एकत्र ओढले जाणार नाहीत. स्फटिक बनण्याची क्रिया चालू असतां इतर सर्व रासायनिक क्रियाप्रमाणें, काही हालचाल झालेली दिसून येते; आणि त्या हालचालींना संवेदनाशीलतेशिवाय दुसर काहीच कारण सागतां येत नाही. या संवेदनाशीलतेच्या प्रश्नाबद्दल पुढें स्वतंत्र विवेचन करूं. |
| ७ अपत्योत्पादन; गोलकाचें पृथक्करण होऊन, किंवा शरीराचे विभाग होऊन व्यक्तींची संख्यावृद्धि होते. अत्यंत साध्या स्थितीत एका व्यक्तीची प्रमाणाबाहेर वाढ होऊन दुसरी व्यक्ति निर्माण होते. | ७ अत्यंत क्षारयुक्त (Super-Satatured) द्रवामध्यें प्रत्येक स्फटिकाच्या अणूची टराविक मर्यादेपर्यंत वाढ होते, व ही मर्यादा त्या अणूच्या रासायनिक घटनेवर अवलंबून असते. या मर्यादेपर्यंत वाढ पोहोंचली म्हणजे मूळ स्फटिकावर दुसरे अनेक बारीक बारीक स्फटिककण दिसू लागतात. ग्लोबरसॉल्टच्या (Sodium Sulphate) क्षारयुक्त द्रवामध्ये अशी क्रिया होते असें आम्टवॉल्डनें सप्रयोग दाखविलें आहे. |
| ८ बीजकण तयार होणें व ते उष्णता लागल्यानें जीवनशक्तिहीन होणें. | ८ याचप्रमाणें ग्लोबरसॉल्टच्या स्फटिककणातील पाण्याची वाफ झाल्यावर त्याची कोरडी पूड होते, पण स्फटिक बनविण्याची त्याची शक्ति नष्ट होत नाही. अशी कोरडी पूड पाण्यामध्यें टाकल्यास नवे पाणीदार स्फटिक तयार होतात; परंतु याच पुडीच्या कणांना पुष्कळ उष्णता दिली तर मात्र ही त्याची शक्ति नाहीशी होते. |

**अनुस्फटिक व प्रतिस्फटिक स्थिति** — सचेतन पदार्थातील मुख्य आधारभूत द्रव्य प्रतिस्फटिक जातीचें (Colloidal) म्हणजे स्फटिकाकारविहीन किंवा तन्तुसमुच्चयविहीन असते. आणि म्हणून सचेतन आणि अचेतन पदार्थांमधील मुख्य फरक हाच होय असें कोणी म्हणेल. त्याला उत्तर असें की, हें वर्गीकरणाहि आतां उरत नाही, कारण सामान्यतः अनुस्फटिक जातीचे समजले गेलेले अनेक पदार्थ प्रतिस्फटिक जातीचे बनविता आलेले आहेत, उदाहरणार्थ, (१) Ba So4, (२) BaCo3, (३) CaSo4, (४) NaCl वगैरे. अडरामधील पांढरा भागाहि जो प्रतिस्फटिक जातीचा असतो तो अनुस्फटिक जातीचा बनवून दाखविलेला आहे.

इतकेंच नव्हे तर एकच पदार्थ या दोन्हीहि स्थितीत असलेला सापडू शकतो. आल्बुमेन हा पदार्थ प्रतिस्फटिक स्थितीत बहुधा असतो, पण त्याचेच पुष्कळशा वनस्पतिगोलकांमध्यें (aleuron-grains) षट्कोणाकृति स्फटिक बनलेले आढळतात. उलट पक्षी, सिलिका हा पदार्थ अनुस्फटिक जातीचा बहुधा असतो, पण त्याचाच सरसासारखा प्रतिस्फटिक जातीचा पदार्थ बनतो. म्हणून प्रतिस्फटिकजातित्व हें सचेतन सृष्टीचें भेददर्शक लक्षण आहे असें म्हणतां येत नाही.

पृथ्वीची रचना प्रथमपासून कशी होत गेली याचा इतिहास पाहतां असें वाटतें की, ती वायुमय स्थितीतून पुढें गेल्यावर पृथ्वीवरील पदार्थांना प्रतिस्फटिक जातीचें स्वरूप प्राप्त होऊं लागलें. अशा जातीच्या पदार्थांचे उत्तम कण अनिश्चित स्थितीत राहिले आणि त्याच्यावर स्फटिककण तयार झाले. असाच प्रकार हल्लीहि चालू असतो, आणि प्रथम प्रतिस्फटिक जातीचे पदार्थ भराभर बनत असतात व नंतर त्यापासून अनुस्फटिक जातीचें द्रव्य तयार होत असतें. मागील अनंत काळामध्यें पृथ्वीवरील पदार्थांमध्यें अत्यंत सावकाशपणे कसा विकास होत गेला, त्याचें थोडक्यात स्वरूप वरील क्रियेत पाहावयास मिळतें. उदा०–विकाससिद्धान्ताप्रमाणें कोणतीहि जीवजाति ज्या निरनिराळ्या अवस्थामधून जाऊन निर्माण झालेली असते (Phylogeny) त्याच सर्व अवस्थांमधून तज्जातीय प्राणी गर्भावस्थेच्या थोडक्या काळात जात असतो (Ontogeny). यावरून अनुस्फटिक जातीच्या व प्रतिस्फटिक जातीच्या पदार्थांची उत्पत्ति मूळ एकाच प्रकारच्या द्रव्यापासून झालेली आहे असें सिद्ध होतें. निरिंद्रिय पदार्थांमध्यें सिलिकॉन हें मुख्य द्रव्य असतें आणि सेंद्रिय पदार्थांमध्यें कार्बन हें मुख्य द्रव्य असतें. हीं दोन्हीं द्रव्य चतुर्धाशक्तिक असतात आणि तीं पुष्कळ निरनिराळ्या प्रकारच्या स्वरूपात आढळतात.

**सवेदनशीलता.**— आतां या संवेदनशीलतेसंबंधाचा विचार करूं. ही देखील सेंद्रियात व निरिंद्रियात आहे. व दोहोंमधीलहि त्रिविध अस्तित्व सदृश उपायानी प्रमाणित करतां येतें. सचेतन जीवांना कोणतेहि उत्तेजक (Stimulus) दिल्यास त्यांच्यामध्यें एक प्रकारचें चलन उत्पन्न होतें आणि हें चलन विद्युद्यंत्रांच्या साहाय्यानें दाखविता येतें. प्रत्येक शरीरभागाची चलनशीलता इंद्रियविषयक व्यापारावर अवलंबून असते. शरीरभागा-(Tissue) मध्यें संवादिनी क्रिया करण्याचें (Responsive action) जें सामर्थ्य असतें तें ज्ञानशक्तिहारक द्रव्यांच्या परिणामामुळें तात्पुरतें आणि विषारी द्रव्यामुळें कायमचें नष्ट करतां येतें. येणेंप्रमाणें एखादा शरीरभाग असंवादी बनला म्हणजे तो मृत झाला असें म्हणतात. निरिंद्रिय सृष्टीमधील जस्ताच्या तारेवर सोडियम कार्बोनेट (Sodium Carbonate) याचा उत्तेजक परिणाम होत असतो; पोटॅशिअम ब्रोमाईड (Potassium Bromide) याचा ज्ञानशक्तिहारक असा परिणाम होतो आणि ऑक्सॅलिक ॲसिडचा बऱ्याच वेळानंतर विषासारखा परिणाम होतो.

यावरून असें दिसून येईल की वनस्पती व प्राणी यांच्या शरीरभागावर होतो तशाच प्रकारचा विद्युन्मय संवादी परिणाम उत्तेजक द्रव्यांच्या साहाय्यानें, शिथिलतात्मक परिणाम ज्ञानशक्तिहारक-द्रव्यांनीं आणि पूर्ण नाशकारक परिणाम दुसऱ्या कांही विषसम द्रव्यांनीं सर्व प्रकारच्या धातूंवर घडून येत असतो. यावरून सचेतन-

१ बेरिअम सल्फेट (Barium Sulphate)
२ बेरिअम कार्बोनेट (Barium Carbonate)
३ कॅल्शिअम सल्फेट (Calcium Sulphate)
४ सोडिअम क्लोराइड (Sodium Chloride)

सृष्टि व जड सृष्टि यांच्यामध्यें संवेदनाशीलतेच्या बाबतीत पूर्ण साम्य आहे असें दिसून येईल.

सर जगदीशचंद्र बोस हे म्हणतात—" धातु, वनस्पती आणि प्राणी यांच्यावर ज्या सर्व प्रकारच्या संवादिनी क्रिया होत असतात त्यांमध्यें कोठेंहि फरक दिसून येत नाहीं. म्हणून सवादिनी क्रिया होतात त्या अदृश्य शक्तीच्या साहाय्यामुळें होतात असें मानण्याची मुळीच आवश्यकता नाहीं किंवा दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे सजीव सृष्टि असो किंवा निर्जीव असो, सर्वांतील मूलद्रव्य एकच प्रकारचें आहे."

दुसरा लोएब ( Loeb ) नांवाचा शास्त्रज्ञ म्हणतो—" आपण सर्व मनुष्यप्राणी हेंहि रासायनिक द्रव्यांचीं बनलेलीं यंत्रें आहोंत. आपण हालचाल करतों याचें कारण असें की, आपल्या शरीरांतल्या मध्यवर्ती मज्जातंतुरचनेमध्यें चालू असलेल्या क्रिया आपणास हालचाल करण्यास भागच पाडतात. इतकेंच काय पण मनुष्यप्राणी आत्मयज्ञ करण्यास तयार होतो तो सुद्धां कित्येक रासायनिक फेरबदल शरीरांत घडून आल्यामुळें होतो असें सिद्ध करून दाखविता येईल असें वाटतें. कित्येक उत्तेजकांमुळें अन्तरोत्सर्ग इतक्या मोठ्या प्रमाणावर होऊं लागतो की, आपण त्याचे गुलाम बनून जातो. या सर्वांवरून असें दिसून येतें की, ज्याला आपण अदृश्य चैतन्यशक्ति म्हणून म्हणतो ती, वीज, उष्णता किंवा प्रकाश यांच्यासारखीच एक शक्ति आहे."

**निःशुक्रजोत्पत्ति.**—*कृत्रिम उपायांनी निःशुक्रजोत्पत्ति (Parthenogenesis )* करण्याचे प्रयोग मोठे मनोरंजक व महत्त्वाचे असतात; व त्यांवरून ज्या गोष्टी केवळ अदृश्य शक्तीमुळें घडून येतात असें वाटण्याचा संभव असतो त्या साध्या रासायनिक क्रियांनीच होत असतात असें सहज सिद्ध करून दाखविता येतें. सीअर्चिन किंवा स्टारफिश किंवा आनेलिड ( एक प्रकारचा जलचर प्राणी ) यांच्या अंड्यामध्यें शुक्रबिंदूचा प्रवेश झाला की, तात्काल परिणाम असा होतो की, अंड्याभोंवतालचें वेष्टन म्हणून ज्याला म्हणतात तें तयार होण्यास सुरवात होते. लोएबनें असें शोधून काढलें की, हें गर्भावेष्टन गर्भवियुक्त अंड्यामध्यें कित्येक आसिडांच्या विशेषतः सेंद्रिय मोनोबेसिक ॲसिडांच्या साहाय्यानें उत्पन्न करता येतें. कर्बवायूनेंहि ही क्रिया घडवून आणतां येते. शिवाय असें आढळून आलें आहे की, उच्च प्रकारचें आम्ल ( ज्याच्या अणूचें वजन जास्त असतें तें ) जास्त परिणामकारक असतें. खुद्द शुक्रजंतु तरी अंड्यामध्यें उच्च प्रतीचें आम्ल घालण्याचेंच काम करून त्या योगानें गर्भावेष्टन निर्माण होऊं लागण्यास कारण होत असावा. शारीरिक रसायनांमध्यें कांहीं क्रिया होऊन त्यामुळें गर्भावेष्टन तयार होऊं लागतें व त्यामुळें अंड्यांतील प्राण्याची वाढ होऊं लागते. इतर प्राण्यांच्या अंड्यांमध्यें अशाच प्रकारचा फरक होऊं लागण्यास वरील आम्लादि साधनांमध्यें थोडाफार फेरबदल करावा लागतो. परंतु जरूर तेवढी काळजी घेतल्यास सर्व जातींच्या प्राण्यांच्या अंड्यांमध्यें शुक्राच्या साहाय्यावांचूनहि गर्भाची वाढ करून दाखवितां येणें शक्य आहे. आणि अशा कृत्रिम उपायांनी जन्मास आलेल्या प्राण्यांपैकीं निम्याहून अधिक अंड्यामध्यें शुक्राच्या योगानें उत्पन्न होणाऱ्या प्राण्यांप्रमाणेंच सर्व बाबतींत असतात. व हे कृत्रिम प्राणी नैसर्गिक प्राण्याइतका काल जगूंहि शकतात.

हे कृत्रिम उपायांनी उत्पन्न केलेले प्राणी नैसर्गिक प्राण्यांप्रमाणें शारीरिक वाढ पावून प्रौढावस्थेस पोहोंचतात काय? असा प्रश्नहि कोणी करतील. त्याला उत्तर असें की, डीलेज नामक शास्त्रज्ञास सीअर्चिन जातीचे प्राणी कृत्रिम उपायांनी निर्माण करून त्यांची प्रौढ वयोपर्यंत वाढ झालेली दाखविण्याच्या प्रयोगांत यश आलेलें आहे. प्रो. लोएब यांना अशाच कृत्रिम साधनांनी सात पूर्ण वाढ झालेले व चांगले निरोगी बेडूक तयार करतां आलेले आहेत. हे निपितृक तथापि पूर्ण वाढ पावलेले बेडूक "अंड्यांना फक्त एका टांचणीनें भोंक पाडून उत्पन्न करता आले होते." अशा तऱ्हेची कृत्रिम उत्पत्ति पुढें शरीरांतील उष्णता हवेंतील उष्णतेवर अवलंबून नसणाऱ्या प्राण्यांमध्येंहि करणें शक्य होईल असें वाटतें.

शिवाय केवळ अशाच कृत्रिम रासायनिक उपायांनी एका अंड्यापासून जुळे प्राणीहि उत्पन्न करतां येणें शक्य आहे.

***बाल्यावस्था व प्रौढावस्थाः—*** *मनुष्यप्राण्यामध्यें* 'बाल्यावस्था व प्रौढावस्था' यामध्यें ठळक फरकच नसतो; परंतु कित्येक जातीच्या कीटकांमध्यें व जलस्थलचर प्राण्यांमध्यें हा फरक त्यांच्या शरीराच्या आकारामध्यें एकदम फेरबदल होऊन' लक्षांत येतो. अंडें फुटून जें बेडकाचें पिलूं बाहेर येतें त्याला पाय नसतात, पण एक लांब शेपूटच त्याऐवजीं असतें. परंतु पुढें कांहीं काळानें त्याला पाय फुटूं लागतात आणि शेपूट नाहींशी होत जाते; तोंडाचा व डोक्याचा आकारहि बदलतो आणि असे फरक होऊन प्रौढ बेडूक तयार होतो. गुडर्नॅशनें असा शोध लावला की, बेडूक प्रौढदशेप्रत पोहोंचतांना हा जो फरक होतो तशा प्रकारची वाढ कंठग्रंथी ( Thyroid gland ) वर अवलंबून असते; तसेंच बेडकाच्या पिल्लामध्यें शरीराची प्रौढावस्थादर्शक वाढ होण्यास त्या पिल्लांना कोणत्या तरी प्राण्याची कंठग्रंथी खाऊं घातली म्हणजे त्यांना आपल्या इच्छेनुसार प्रौढावस्था प्राप्त करून देतां येते. उलटपक्षीं त्यांच्या शरीरांतील ही कंठग्रंथी लहानपणींच काढून टाकल्यास हीं पिलें आकार मोठा झाला तरी कायमचीं बाल्यावस्थेंतच रहतात. कंठग्रंथीमार्फत होणारी क्रिया आयोडाईन नामक निरिंद्रिय पदार्थानें घडवून आणतां येते. यावरून असें दिसतें की, बहुतेक शारीरिक फरक आयोडाईन या पदार्थाचा कांहीं संचय शरीरांत झाल्यानें होत असावा.

**आयुर्मर्यादा**—प्राण्याची जिवंत राहण्याची क्रियाहि शरीरांतील रासायनिक प्रतिक्रियांच्या परंपरेवर अवलंबून असते. कित्येक वेळां असा प्रश्न विचारण्यांत येतो की, रोग व अपघात हे पूर्णपणें टाळून कोणा प्राण्याला अमर्याद आयुष्याचा उपभोग घेतां येणें शक्य आहे काय? अशा प्रकारचा प्रयोग मनुष्यप्राण्यावर करणें अशक्य आहे. परंतु बॉगडॅनो या रशियन शास्त्रज्ञानें कीटकावर प्रयोग करून हा प्रश्न सोडविला आहे. त्यानें असें सिद्ध केलें आहे की 'मरणं प्रकृतिः शरीरिणाम्,' म्हणजे कोणालाहि मृत्यु टाळतां येणें शक्य नाहीं; फक्त *आयुर्मर्यादा वाढविणें किंवा कमी करणें ही गोष्ट स्वतःच्या आधीन* असते. कोणतीहि रासायनिक क्रिया होण्यास सामान्यतः लागणारा काळ उष्णतामान १०° नीं कमी केल्यास दुप्पट किंवा तिप्पटहि *अधिक लागतो. आणि जगण्याची क्रिया हीहि एक रासायनिक* क्रियाच असल्यामुळें तिलाहि वरील नियम लागला पाहिजे. जंतुविरहित केलेल्या (Asceptic) माशांवर अशा प्रकारचे अनेक प्रयोग करण्यांत आले, त्यांत असें आढळून आलें की, उष्णतामान तेंच होतें तेव्हां सर्व माशा साधारणपणे सारख्याच वयोमर्यादेनंतर मरण पावल्या; परंतु उष्णतामानांत फरक करतांच वयोमानांत पुढीलप्रमाणें फरक पडलाः—

| उष्णतामान सेंटिग्रेड | | | | माशांचें अण्डोत्पत्तीपासून मृत्यूपर्यंतचें सरासरी वयोमान दिवस |
|---|---|---|---|---|
| ३०° | ... | ... | .. | २१.५ |
| २५° | ... | ... | .. | ३८.७ |
| २०° | ... | ... | ... | ५४.३ |
| १५° | ... | ... | ... | १२३.९ |
| १०° | ... | ... | ... | १७७.५ |

या आंकड्यावरून असें दिसतें की, रासायनिक प्रतिक्रियांच्या शरीरावर उष्णतामानाचा ज्या प्रकारचा परिणाम होतो तशा प्रकारचाच उष्णतामानाचा परिणाम माशांच्या वयोमर्यादेवरहि होतो. दुर्दैवानें, आपली मानवशरीरें थोडेंच कमी उष्णतामान झाल्यास जगूंच शकत नाहींत, हें खरें तथापि अशा कमी उष्णतामानांतहि जगणें मनुष्यास शक्य झालें तरी तें आपलें जीवित आपणास फार कंटाळवाणें व नीरस होईल; कारण बऱ्याच तशा स्थितींत सुख आणि दुःख, आनंद आणि विषाद इत्यादिविषयक संवेदना फारच कमी अशानें होऊं लागतील. जंतुविरहित माशांवर केलेल्या प्रयोगांनीं ही कल्पना साधार असल्याचें ठरलें की, जीविताची वयोमर्यादा शरीरांत चालू असलेल्या रासायनिक प्रतिक्रिया पूर्ण होण्यास लागणाऱ्या काळाइतकी असते. या रासायनिक क्रिया म्हणजेच शरीरामध्यें अपायकारक द्रव्यांचा सांठा होणें, किंवा शरीराची वाढ्ण्यासाठीं असण्यास लागणाऱ्या शरीरधातूंचाच हळूहळू नाश होणें, अशा अर्थ असेल तर जिवंत राहण्याची जी क्रिया चालू असते तिचेंच वार्धक्यनिदर्शक दौर्बल्य व अखेरचा मृत्यु हे नैसर्गिक परिणाम होत, हें आपणास सहज समजण्यासारखें आहे. तात्पर्य, जीवित म्हणजे दुसरें कांहींएक नसून रासायनिक प्रतिक्रियांची एक परंपरा होय, आणि सजीव सृष्टि ज्या भौतिक व रासायनिक शक्तींनीं नियंत्रित केलेली आहे, त्याच शक्तींनीं निर्जीव सृष्टिहि बद्ध आहे.

**केवल सांनिध्यविकारी बाह्य व अन्तस्थ पदार्थ ( Catalytic Agents व Enzomes )** — पेशीसारख्या लहान गोलकामध्यें अनेक अत्यंत गुंतागुंतीच्या व दीर्घकाल टिकणाऱ्या रासायनिक क्रिया चालू असतात हें पाहिलें म्हणजे खरोखर मोठें आश्चर्य वाटतें. गोलकांतील जीवनरस व त्याचीं कार्यें यांचें अत्यंत काळजीपूर्वक परीक्षण चालू आहे व त्यावरून आतांपर्यंत आपणांस येवढें समजून आलें आहे की, ज्या पुष्कळशा क्रिया अदृश्य शक्तीच्या योगानें होतात अशी पूर्वी समजूत होती त्या बहुतेक अगदीं सामान्य सृष्टिनियमानुसार वास्तविक घडत असतात असें सिद्ध करतां येतें. कित्येक द्रव्यें अशीं आहेत कीं, त्यांच्यांतील रासायनिक आकर्षणानें होणाऱ्या परिणामाशिवाय त्यांच्यांत अशी एक शक्ति असते कीं, त्यांच्या केवळ सांनिध्यामुळें दुसऱ्या इतर पदार्थांमध्ये परस्पर संयोगीकरण किंवा पृथक्करणाची क्रिया होते, आणि तीं द्रव्यें स्वतः अबाधित राहतात. उदाहरणार्थ, सल्फ्युरिक ॲसिड ज्या मध्यें थोडाफार फरक न होई तेंच त्याचेंची साखर बनवूं शकते. अशा प्रकारचीं कार्यें करणारीं दुसरीं अनेक द्रव्यें आहेत. त्यांना सांनिध्यविकारी पदार्थ (*Catalytic Agents*) म्हणतात. अशा द्रव्यांचा अत्यंत अल्प अंशसुद्धां दुसऱ्या पदार्थांच्या मोठ्या सांठ्यामध्यें फरक घडवून आणूं शकतो. आणि हेंच गोलकांमधील सांनिध्यविकारी पदार्थ (Catalytic Agents or Enzomes), जे पुष्कळसे फरक अदृश्य धनत्व शक्ति घडवून आणते अशी समजूत होती, ते फरक घडवून आणीत असतात.

**सहजोत्पत्ति (Spontaneous generation)** – नाईल नदीच्या गाळापासून उंदिरांची स्वाभाविक उत्पत्ति किंवा गाईच्या शेणापासून टिचक्यांची किंवा कुजत शरीरापासून कृमींची उत्पत्ति यासंबंधाच्या जुन्या कल्पना सर्व चुकीच्या असल्याचें पाश्चर वगैरे शास्त्रीय क्षेत्रांतील संशोधकांनीं दाखवून दिलें आहे. परंतु या प्रयोगांवरून, अगदीं सुरुवातीस निर्जीव सृष्टीपासून सजीव सृष्टि कधींच उत्पन्न झाली नसावी, या प्रश्नाशीं कांहीं संबंध नाहीं. डॉ. एच्. सी. बॅस्टियन् यानें स्वतः केलेल्या अनेक प्रयोगांचें वर्णन प्रसिद्ध केलें असून त्यांत तो असें म्हणतो कीं, निर्जीव पदार्थांपासून प्रत्येक सजीव सहजच उत्पन्न होत असतो, आणि प्रकाश उत्पन्न करतां येतो.

हे प्रयोग अगदीं बिनचूक-निर्दोष होते किंवा नाहीं याबद्दल खात्री नसली तरी इतर तद्‌ज्ञमिक पुराव्यावरून हेकेल व वाईगेली यांच्यासारखे मोठाले विद्वान् जें सांगतात तें आपण मान्य करणें जरूर आहे. या *विद्वानांचें म्हणणें असें कीं, आद्यजीवोत्पत्ति* ( Archebiosis ) ही क्रिया पुष्कळ वेळां पुनःपुनः होत राहिली असली *पाहिजे.*

( Protein व Plasura gramiles ) — परंतु या आद्यजीवोत्पत्तीची पूर्व तयारी म्हणून एक पायरी अशी असली पाहिजे कीं, *त्यावेळीं नायट्रोजनस* कार्बनाचे संयुक्त पदार्थ केव्हांसे उत्पन्न झाले असावे. त्यांच्यापासून प्रथम प्रोटीन नामक द्रव्य उत्पन्न झालें. नंतर या प्रोटीनचे *अणू त्याच्यांतील अनिश्चित* स्वरूपाच्या रासायनिक आकर्षणामुळें विशिष्ट प्रकारें एकत्र होऊन त्यापासून एका प्रकारच्या जीवनरसाच्या सूक्ष्म कणाची *उत्पत्ति झाली असावी; आणि या* कणांपासून अगदीं साध्या स्वरूपाचे आद्य जीव निर्माण झाले असतील. *हीच मोनेरा जातीची सजीव सृष्टि होय.*

**एक महत्त्वाचा प्रश्न.**—सजीव व निर्जीव सृष्टीमध्यें एक मोठा फरक असून तो शिरो टॅशिरो या शास्त्रज्ञानें आपल्या ' जीवाचें रासायनिक लक्षण ' या नांवाच्या पुस्तकांत पुढें मांडला आहे. त्या पुस्तकांत ग्रंथकार म्हणतो, ' जिवंत राहण्याची जी प्रतिक्रिया चालू असते तिच्याबरोबर सर्वत्र काळीं व प्रत्येक ठिकाणीं एक रासायनिक स्थित्यन्तर घडून येत असतें. प्राणी, वनस्पति, वाढलेलीं बीजें, मज्जातंतु वगैरे सजीव सृष्टीला कोणत्याहि रीतीनें उत्तेजित केल्यास या सजीव पदार्थांमधून कर्ब वायु एकदम बाहेर पडतो व हेंच सजीवतेचें रासायनिक लक्षण होय.

या प्रकारचें रासायनिक स्थित्यन्तर निर्जीव सृष्टीमध्यें कोठें चालू असल्याचें दाखविण्यांत आलें नाहीं. परंतु यासंबंधानें सुद्धां लवकरच ग्राह्य असें स्पष्टीकरण पुढें आल्यावांचून राहणार नाहीं, अशी आशा वाटते. जोंपर्यंत भौतिक व रासायनिक शास्त्राच्या नियमांनीं या गोष्टीचा उलगडा झाला नाहीं तोंपर्यंत हें कोडें सुटलें नाहीं असेंच वाटत राहील, तथापि एखादे वेळेस यासंबंधानें अज्ञानपटल दूर केलें गेलें, म्हणजे मग मात्र इतकें साधें कोडें आपणांस सोडवितां आलें नाहीं, याबद्दल आपणांला आश्चर्य वाटेल.

असो, याप्रमाणें सजीव व निर्जीव सृष्टींमधील भेदरूपी भिंत नाहींशी करण्याचे प्रयत्न चालू असून त्यांना आतांपर्यंत बरेंचसें यशहि आलेलें आहे. तथापि अद्याप हा प्रश्न पूर्णपणें सुटण्यास वाटेंत पुष्कळ अडचणी आहेत. शिवाय निर्जीवांतूनच सजीव सृष्टि उत्पन्न झाली व ती सर्व एकजातीय म्हणजे समान गुणधर्मांनींच युक्त आहे, असें सिद्ध झालें तरी पुढें ' आत्मा ' म्हणजे काय आहे, हा अत्यंत अवघड प्रश्न शिल्लक राहतोच. सजीव व निर्जीव यामध्यें फार मोठा फरक आहे असें साहजिकच आपणास वाटतें, पण वास्तविक अत्यंत साध्या रूपाचा जीव व मनुष्यप्राणी यामध्येंच अत्यन्त मोठें अंतर आहे. म्हणून जीवशास्त्रांतील विकासतत्त्वानुसार साध्या एकपेशीमय कीटकापासून पुढें अनंत प्राणिजाती निर्माण होत होत अखेर मनुष्यजातींतील न्यूटन, नेपोलियन, किंवा व्यास, विश्वामित्र झाले म्हणजे अत्यंत शुद्ध स्फटिक व न्यूटननेपोलियनसारखे महापुरुष हे एकाच जातीचे जीव होत, असें कबूल करणें ज्यांना जड वाटत नाहीं, त्यांना मग स्फटिकापासून साधा सेंद्रिय जीव उत्पन्न झाला आहे असें समजण्यास अवघड जाण्याचें कारण नाहीं. *निर्जीव व सजीव यामध्यें* किमान असलेला फरक दूर होण्याच्या मार्गाला लागलेला आहे आणि तो यथावकाश नाहींसा होणार; *आणि आजपर्यंत* ज्यांना आपण अद्‌भुत किंवा दैविक गोष्टी म्हणत आलों त्या सृष्टिनियमानु-

सारच घटक आहेत, व सजीव आणि निर्जीव अशा एकदर सर्व मृष्टींतील मूलभूत द्रव्य एकच आहे. आणि सर्वत्र विविधता दिसत असली तरी विश्वांतील सर्व पदार्थ मूळ एकजातीयच आहेत, असें सिद्ध होणार अशी चिन्हें स्पष्ट दिसत आहेत

प्रोफेसर महाशुदे याच्या वरील लेखाचा मथितार्थ असा की ज्या अर्थी सजीवाचे जीवत्व दाखविणारे गुणधर्म निर्जीवांतहि आढळतात, आणि ज्या अर्थी जे जीव शुक्रक्षेपामुळे उत्पन्न होतात त्यांची उत्पत्ति कृत्रिम उपायांनी करतां येते आणि ज्या अर्थी बाल्य, तारुण्य आणि वार्धक्य या अवस्था म्हणजे केवळ रासायनिक क्रियांची परपरा आहेत, आणि ज्या अर्थी प्रस्तुत रासायनिक क्रिया कृत्रिम उपायांनी लौकर घडवून आणतां येतात किंवा त्या थांबविता येतात त्या अर्थी जड आणि सचेतन यामध्ये अनुल्लंघनीय विरोध नाहीं.

**जीवोत्पत्तीपासून मानवविकासापर्यंत** – चैतन्याचा अभ्यास म्हणजे जीवशास्त्र उर्फ बायालजी होय या शास्त्राचे प्राणिशास्त्र, वनस्पतिशास्त्र इ प्रकारचे विभाग करण्यात येतात

प्राणिशास्त्री अशा तऱ्हेनें प्राण्यांची मांडणी करू शकतात की, एका प्राण्यापासून दुसरा प्राणी अगदीं थोडा फरकलेला, दुसऱ्यापेक्षां तिसरा थोडा फरकलेला, याप्रमाणें प्राणिकोटींत एकतऱ्हेची सोपानपरंपरा आहे, हें सिद्ध होईल म्हणजे आजचे अनेक अतिविकसित प्राणी–उदाहरणार्थ मनुष्य, हत्ती, साप, देवमासा या सर्वांचें मूळ एकच होतें आणि त्या मूळापासून पावलेले हे निरनिराळे विकास आहेत

प्राणिशास्त्रामध्यें सूक्ष्मापासून जे अनेक निरनिराळे सावयव विकास दिसतात त्याच्या व सूक्ष्माच्या मधल्या पायऱ्या कांहीं प्रचलित दृष्टांत आहेत आणि कांहीं गत दृष्टांत सांपडतात. भूस्तरशास्त्रांतर्गत प्राणिशास्त्र आणि वनस्पतिशास्त्र येथें कामास येतें.

विकासवादामध्ये जी कृति नेहमी होत असते म्हणून गृहित धरलें आहे ती कृति म्हटली म्हणजे सदृशापासून विसदृश जगाची उत्पत्ति आणि निरवयव स्थितीपासून सावयव स्थितीची उत्पत्ति. याप्रकारची क्रिया जीवद्रव्यावर होऊन एकमेकापासून भिन्न आणि सावयव असे अधिकाधिक प्राणी निर्माण होत गेले याच क्रियेनें मनुष्यप्राणी विकास पावला असावा, असें समजतात. विकासवादाला जे मुख्य आधार समजले जातात ते येणेंप्रमाणे –

( १ ) भूस्तरशास्त्रांतील आधार– पृथ्वीच्या निरनिराळ्या काळच्या दर्शक अशा थरांमध्ये निरनिराळ्या विकासाचे प्राणी सांपडतात अगदीं प्राचीन थरांमध्ये अगदीं कमी विकसित प्राणी व वनस्पती सांपडतात अधिक अर्वाचीन थरामध्यें अधिक विकसित प्राणी सांपडतात वगैरे

( २ ) प्राणिशास्त्रांतील आधार– अस्तित्वांत असलेल्या प्राण्यामध्ये कमी विकसितापासून अधिक विकासांत अशी प्राण्यांची परम्परा लावतां येते.

( ३ ) गर्भशास्त्रांतील आधार– मनुष्याच्या गर्भामध्यें जो विकास दृष्टीस पडतो तो त्याच्या पूर्वींच्या पायऱ्या दर्शवितो. शास्त्रज्ञांची अशी समजूत आहे की, अधिक विकसित अशा प्राण्यांच्या भ्रूणोत्तर वनावटीमध्ये तो प्राणी ज्या पूर्वरूपातून विकसित होत गेला त्या पूर्वरूपाच्या पायऱ्या दृष्टीस पडतात. म्हणजे मनुष्य आणि कुत्रा याच गर्भ अतिशय पूर्वावस्थेत सारखेच असतात, आणि एकाला क्रमानें कुत्रेपणा येतो आणि दुसऱ्यास क्रमानें मनुष्यपणा येतो.

येथे हेंहि सांगितलें पाहिजे की, विकासवादाच्या सिद्ध्यर्थ गर्भशास्त्रांतील पुरावा म्हणून जो मांडण्यात येतो तो ज्या समजुतीच्या आधारावर मांडण्यांत येतो त्या समजुतीवर शास्त्रज्ञांचा पूर्वीइतका विश्वास राहिला नाहीं.

**मनुष्यप्राण्याचा इतिहास.**– हा यावयाचा म्हणजे ज्या पूर्वींच्या परपरांतून मनुष्योत्पत्ति झाली त्या परपरा यावयाच्या आणि त्याच परपरेचे इतर विकास यावयाचे हे देणे म्हणजे प्राणिशास्त्र देणे होय, आणि हा विकास फार पूर्वींपासून यावयाचा म्हणजे वनस्पतिशास्त्रहि देणे होय.

मनुष्यप्राणी हा एका वानरकल्प पशूपासून निर्माण झाला की, त्याच्या भिन्न जाती वानरकल्प अनेक पशूपासून निर्माण झाल्या याविषयीं आज एकमत नाहीं. या एकमताभावाचीं कारणें केवळ बौद्धिक नाहींत तर राजकीय व सामाजिकहि आहेत ज्या देशामध्यें वर्णद्वेष अधिक आहे त्या देशामध्ये अनेकवंशसंभवाची कल्पना अधिक जोरानें दिसते *अनेकवंशसंभवाची शक्यता म्हणून जी* उपस्थिली आहे ती येणेंप्रमाणे – कुत्रा हा श्वानकल्प एकच प्राण्यापासून झाला नसून दोन निरनिराळ्या प्राण्यांचे गृहीकरण होऊन आज कुत्र्यांच्या जाती बनल्या आहेत असे कित्येक समजतात, कांहीं कुत्रे लांडग्यांच्या गृहीकरणानें झाले तर कांहीं खोकडाच्या गृहीकरणानें झाले *मनुष्याचें तसेंच झालें नसेल कशावरून ? सफेद आदमी जरा* अधिक विकसलेल्या वानरापासून झाला असेल आणि काला आदमी त्याहूनहि कनिष्ठ अशा मर्कटापासून झाला असेल असें कित्येकाचें मत आहे *मनुष्यप्राण्याचा विकास कोठें तरी एके ठिकाणीं ( एकवंशसंभवमत खरें धरून चालल्यास )* होऊन त्याचा प्रसार चोहोंकडे झाला आणि त्यानें अनेक संस्कृती निर्माण केल्या या दीर्घ काळाचा इतिहास कसा जमवावयाचा ? आज आम्हांस तो सर्व *इतिहास देणें शक्य नाहीं* तो जमविण्यास शरीरलक्षणें, भाषा, भौगोलिक स्थान, चालीरीती इत्यादि प्रकारचीं साधनें आहेत तीं फार काळजीपूर्वक वापरलीं मात्र पाहिजेत त्या साधनांनीं इतिहास कसा जमविला जात आहे हें मात्र येथे दाखविलें जाईल

**इतिहाससाधनांचें महत्त्वमापन.**– वर सांगितलेल्या *कालाचा इतिहास जमविण्यास जीं आतांपर्यंत साधनें उपलब्ध आहेत* त्या साधनामध्यें भाषाशास्त्र अधिक महत्त्वाच्या अधिक पायऱ्या सांगेल अशी आमची समजूत आहे *शरीरलक्षण कांहीं पुरावा देईल आणि* अत्यंत प्राचीन काळापर्यंत देखील संशोधकास नेईल तथापि मनु

ष्याचीं परिभ्रमणें आणि निरनिराळ्या कालचे त्याचे समुच्चय यावर प्रकाश पाडण्यास शरीरलक्षणशास्त्र असमर्थ आहे पण या शास्त्राचाहि उपयोग आहे आजच्या पुराव्यावरून इतिहास लिहावयास कोणत्या गोष्टी अधिक कालपर्यंत टिकतात आणि कोणत्या गोष्टी कमी कालपर्यंत टिकतात हें पाहिलें पाहिजे, आणि त्यावरून कोणत्या पुराव्यास महत्त्व द्यावयाचें हे ठरविले पाहिजे. आम्ही भाषाशास्त्रास फार महत्त्व देतों. तें देण्याचीं कारणें येणेंप्रमाणे –

( १ ) *निरनिराळ्या भाषांच्या रूपात साहित्य फार विपुल आहे.* आज सुमारें पांचशेंपेक्षा अधिक भाषा बोलल्या जात आहेत.

( २ ) लोकांची भाषा अजीबात बदलणे ही गोष्ट फार कठिण जाते. पोषाख बदलतील, खाण्याचे पदार्थ आणि वेळा बदलतील, शासनसंस्था बदलतील, निवासस्थान बदलेल पण भाषा बदलणे म्हणजे अन्यभाषास्वीकार होणे त्याहून कठिण जाईल. कांहीं लहान *सहान भाषा बोलणाऱ्या* लोकांचा सदृश भाषा बोलणाऱ्या व अधिक महत्त्वाच्या लोकाशीं संबंध आला म्हणजे दुर्बलाच्या भाषेचा सहज लोप होतो. परंतु विसदृशाशीं संबंध आला म्हणजे भाषेचा लोप एकाएकीं होत नाहीं हें अनेक राष्ट्रांच्या इतिहासावरून दिसते. राजकीय वर्चस्वामुळे केवळ भाषा बदलल्या असे दिसून येत *नाहीं. भाषेची वाढ खुटली असेल पण भाषा नष्ट होत नाही* कदाचित् एखादी भाषा बोलणारे लोक ज्या स्थानावर असतील त्या स्थानावर अन्य भाषा बोलणारे लोक येऊन त्यांचें संख्याधिक्य झाले तर स्थानिकांची भाषा नष्ट होईल, परंतु आपणांस वांशिक इतिहास लिहितांना अधिक-संख्याक लोकांकडे लक्ष द्यावें लागतें आणि त्या स्थानीं असलेल्या लोकांचे पितृत्व शोधावयाचें असेल तर भाषेच्या साहाय्यानें संख्याधिक्य असलेल्या लोकांचेच पितृत्व आपणास शोधून मिळणार, व एखाद्या स्थानावरून ओळखल्या जाणाऱ्या लोकांच्या इतिहासार्थ तेंच आपणांस इष्ट आहे. निग्रोंची भाषा अमेरिकेंत बदलली म्हणून भाषा लवकर बदलते असे म्हणतां येणार नाही. निग्रोंची भाषा ज्या परिस्थितींत बदलली ती परिस्थितीच विलक्षण होती. निग्रो अगोदर निरनिराळ्या ठिकाणापासून विकत घेतले होते त्यामुळें त्यांच्या भाषा मुळांतच एक नव्हत्या, आणि त्यांच्यामध्ये विवाहसंस्था गोऱ्यांनीं टिकूं दिली नाहीं. मग गृहसंस्था कशी टिकेल ? वाटेल तो निग्रो वाटेल त्यास विकावयाचा आणि गुलामांची पैदास मालकास हवी असेल त्याप्रमाणें करण्यासाठीं वाटेल तो पुरुष व वाटेल ती स्त्री यांचा संयोग घडवावयाचा या प्रकारच्या परिस्थितींत कोणतीहि भाषा टिकणें अशक्य आहे जेथे लोकांचे समुच्चयरूपानें अस्तित्व आहे तेथे ते अल्पसंख्याक असूनहि त्यांची भाषा टिकते हें यूरोपांतील जिप्सी, पेनसिल्व्हेनियांतील डच आणि लुइझियानांतील फ्रेंच आणि विस्कान्सिनच्या पूर्वभागांतील जर्मन लोकांच्या उदाहरणावरून दिसून येईल तामिळ देशांत शेंकडों वर्षे राहिलेल्या आणि कोणत्याहि बाह्य चाचणीत तामिळ लोकांपासून अभिन्न दिसणाऱ्या सौराष्ट्रांची स्थिति पाहिली तर आपणास असे दिसून येईल कीं, त्यांची भाषा जर नसती तर त्यास आपण भिन्न आहों याची आठवण राहिली नसती. यहुदी लोक व पारशी लोक यांची भाषा गेली हें प्रमाण पुष्कळदा पुढें आणण्यात येतें, पण त्यांची कथा निराळी आहे एक तर आज ज्यू म्हणून जे लोक म्हणवून घेतात त्या सर्वांची एक हिब्रू भाषा कधींच नव्हती, त्यांच्या भाषा भिन्न भिन्न होत्या, आणि त्यामुळे धार्मिक भाषा तेवढी शिल्लक राहिली. पारशाची गोष्ट अशी झाली कीं, ते जेव्हां हिंदुस्थानात आले तेव्हा त्यांची भाषा आणि त्यांच्या पैतृक ग्रंथांची भाषा एक नव्हती, एवढेंच नव्हे तर पैतृक ग्रंथांच्याच भाषा अनेक होत्या, आणि त्यांनी इराण ज्या कालीं सोडला त्यानंतर इराणचीच भाषा रूपांतर पावली आणि ते इकडे आले त्यावेळेस त्यांची संख्या फारच थोडी होती. त्यामुळे त्यास स्थानिक भाषेचा स्वीकार करावा लागला. शिवाय त्यांच्या आगमनाला आज बारासें वर्षे झालीं हेंहि लक्षात ठेविलें पाहिजे. शिवाय हेंहि लक्षात बाळगिले पाहिजे कीं, ते शुद्ध गुजराथी बोलत नसून गुजराथीचा एक अपभ्रंश बोलतात. त्यांना अजून ‘ळ’ उच्चारतां येत नाही. जेव्हा एखादे लोक आपली भाषा रक्षण करण्यास समर्थ असत नाहींत तथापि ते जुदीनें राहिलेले असतात, तेव्हा त्यांची भाषा स्थानिक न होता पैतृक व स्थानिक यांच्यामधील कोणतातरी अपभ्रंश असतो. जिप्सींनी आपली भाषा जिवत ठेविली आणि पारशांनी मरू दिली या वरवर दिसणाऱ्या स्थितीचें अधिक खोल अवलोकन केलें असतां असे दिसून येईल कीं पारशास जिप्सींपेक्षा परदेशनास जास्त भडला पारशाचा संबंध शहरात जास्त आला आणि त्यामुळे त्याचें सामाजिक पृथक्त्व कमी राहिलें आणि जिप्सींच्या भाषेचा जिप्सीपणा रक्षण होणें आणि पारशाच्या भाषेचा पारशीपणा जाणें यांमध्यें फार मोठें अंतर नाही, म्हणजे स्वभाषारक्षणाच्या कामामध्यें जिप्सी पारशापेक्षां फारसे अधिक यशस्वी झाले नाहींत. जिप्सींनीं आपल्या भाषेची वाक्यरचना अगदीं बदलून टाकून इंग्रजी भाषारचना घेतली आहे हें पहिल्या भागात (पृ. २४९) दिलेल्या त्यांच्या भाषेतील उताऱ्यावरून लक्षात येईल जेव्हां आपण आपल्याच भाषेंत अनेक परके शब्द घुसडूं लागतो तेव्हा आपल्या भाषेचा आपलेपणा वाक्यरचनेवरूनच सिद्ध होतो आज आपण जेव्हां प्रचलित मराठी ऊर्फ घाणेरडें मराठी बोलतों तेव्हा आपण आपली वाक्यरचना व इंग्रजी शब्द यांचे मिश्रण वापरतों उदाहरणार्थ, ‘डिफेंडंटनें अफिडाविट फाइल केलें नाहीं’ अशा तऱ्हेची भाषा आपणास कोर्टांत नेहमीं ऐकूं येते तिला आपण मराठीच म्हणू ‘पटेल हॅज नॉट मेड पक्का बंदोबस्त’ हें इंग्रजी वाक्य आहे. या दृष्टीनें पाहतां जिप्सींची भाषा स्थानिकच आहे म्हणजे जिप्सांना स्थानिक भाषा घेऊन आपले शब्द पुष्कळ वापरले असे होईल. पारशांनीं यापेक्षा अधिक कांहीं निराळें केलें नाही. नवागतांची भाषा स्थानिक भाषेचें अपभ्रष्ट स्वरूप होते, पण जातिभिन्नत्वाने भिन्न राहते, याला आणखी उदाहरण म्हटलें म्हणजे जर्मनीमधील व रशियांतील ज्यूचें होय यांची भाषा यिडिश आहे. ही भाषा जर्मन असून हिब्रू लिपींत लिहिली जाते आणि तींत हिब्रू शब्द पुष्कळ असतात हिंदीचें हिंदुस्थानी हें जसें अपभ्रष्ट स्वरूप त्याप्रमाणें जर्मन भाषेचे यिडिश हें अपभ्रष्ट स्वरूप होय. माळव्यात भिल्ली

आणि कोल्ड् म्हणून ज्या भाषा आहेत आणि यवतमाळकडे जी गोंडी सापडते त्या माळवी व मराठी भाषांचीं अपभ्रष्ट स्वरूपें होत. जेव्हां दोन भिन्न भाषांचा सन्निकर्ष होतो तेव्हां बलवान भाषेची रचना कायम राहते आणि दुर्बल राष्ट्र ती रचना घेतें व शब्द तेवढे आपले ठेवतें असें दिसतें.

(३) भाषाशास्त्राच्या अभ्यासानें मनुष्यसमुच्चयांचे साहचर्य, वियोग आणि भ्रमणें यांचा पत्ता लागतो. एखादी भाषा त्या भाषेशीं विसदृश अशा भाषांनीं व्यापिलेल्या प्रदेशांत दिसली तर ती तेथें नवीन आली असावी आणि त्या भाषेच्या नात्यागोत्याच्या भाषा जेथें असतील तेथून ती किंवा तिचें पूर्वरूप गेलें असावें अशी कल्पना होते. भाषेच्या शब्दसंग्रहाच्या अभ्यासानें ती भाषा बोलणाऱ्याच्या संस्कृतीची व्यापकता समजते.

**मनुष्यभ्रमणाचा इतिहास.**— मानवरूप प्राप्त्यापासून मानवविकास झाल्यानंतर मनुष्याचा जो इतिहास आपणांस दृष्टीस पडतो तो रचतांना ज्या गोष्टी आपणास पहावयाच्या त्यामध्यें मनुष्यभ्रमणाचा इतिहास ही एक होय. हा इतिहास पहातांना आपणास एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे, आजची पृथ्वीवरील जमीन आणि पाणी यांची विभागणी आजच्यासारखीच कित्येक हजार किंवा लाख वर्षांपूर्वी नव्हती. भ्रमणाचा इतिहास शोधतांना जीं प्रमाणें मदतीस घेतात त्यांमध्यें वनस्पति व पशु यांच्या गृहीकरणाचा इतिहास, भाषा, निवासस्थान यांसारख्या अनेक गोष्टींचा अन्तर्भाव होतो.

भाषेचा इतिहास आणि मानववंशाचा इतिहास हे सारखेच काय? एक भाषा जेव्हां अनेक लोकांमध्यें पसरते तेव्हा ते लोक त्या भाषेचेच होते असें धरावयाचें काय? वंश आणि भाषा यांचा संबंध जर ऐक्याचा नसेल तर भाषांच्या तत्त्वावर इतिहासाचे भाग पाडावयाचे यांत अर्थ काय? असे प्रश्न उत्पन्न होतात. यासाठीं भाषा आणि लोकसमुच्चय यांतील संबंध स्पष्ट केला पाहिजे.

एक भाषा जगांतील दुसऱ्या लोकांवर लादली जाते आणि या क्रियेनें भाषांचा प्रसार होतो याला उदाहरणें पुष्कळ आहेत. आज अमेरिकेंतील निरनिराळ्या भाषा बोलणाऱ्यांचे वंशज इंग्रजीच बोलतात. आज ज्यांच्या पूर्वजांची भाषा इंग्रजी भाषेहून निराळी होती अशा लोकांचेंच अमेरिकेंत संख्याधिक्य सापडेल. तथापि अमेरिकेंत सध्यां जशी परिस्थिति आहे तशी जगांत पूर्वी कधीं होती किंवा नाहीं याची शंका आहे. (१) आज पोट भरण्याचें साधन जमिनीशिवाय अन्य प्रकारचें पुष्कळ असतें, नवीन येणाऱ्या मनुष्यांनीं जुटीनें प्रदेश जिंकून जुटीनें राहणें अवश्य होत नाहीं. नवीन येणारीं माणसें मजूर म्हणून इकडेतिकडे पसरतात. (२) आजच्या शासनसंस्था मजबूत असल्यामुळें मनीनाम स्वारी करणें आणि जमीन काबीज करणें शक्य नाहीं (३) सार्वत्रिक शिक्षणपद्धतीमुळें नवागतास स्थानिक जनतेमध्यें विलीन होणें व महत्त्वास पोंचणें शक्य होतें. या प्रकारच्या परिस्थितीमुळें पैतृकभाषात्याग जितका आज सुलभ व सुखावह होतो तितका पूर्वी होत नसे. पूर्वींच्या काळांत एका जातीनें दुसरीची भाषा घेणें ही क्रिया आज अमेरिकेंत जितकी जलद होते तितकी जलद होत नसावी हें उघड आहे.

**(१) प्राणी व वनस्पती यांच्या गृहीकरणाच्या इतिहासाचें महत्त्व**—गृहीकरण झालेल्या वनस्पतींचा व पशूंच्या प्रसाराचा इतिहास मानवेतिहासार्थ महत्त्वाचा आहे. पुष्कळदा आपणास असें दिसून येतें कीं एखादी वनस्पति ज्या ठिकाणीं पिकविली जाते त्या ठिकाणची ती मूळची नसून कोठून तरी वाहून आलेली असावी. ती जर स्थानिक असेल तर आपणांस तीच वनस्पति वन्य स्वरूपांत त्या ठिकाणावरच दिसेल एवढेंच नव्हे तर तें वन्य स्वरूप ज्या इतर वन्य वनस्पतींशीं संबद्ध असेल त्या वन्य वनस्पतींची समृद्धि आपणांस आसपास सांपडेल म्हणजे आंबा हें जर फळ हिंदुस्थानांतीलच असेल तर आंब्याच्या रानवट जातीहि आपणांस येथेंच सांपडतील आणि आंबा ज्या वनस्पतिवर्गांत मोडतो त्या वर्गांतील इतर वनस्पती देखील वन्य अगर गृह्य स्थितींत आपणांस या देशांतच सांपडल्या पाहिजेत. तसेंच गाय हिंदुस्थानांतील जर स्थानिक असेल तर गोसदृश दुसरे प्राणी आपणास येथें सांपडले पाहिजेत किंवा गाईचें वन्य स्वरूप आपणांस येथें दृष्टीस पडलें पाहिजे. तसें स्वरूप दिसलें नाहीं तर तेवढ्यानेच गाय येथील स्थानिक नाहीं असें मात्र सिद्ध होत नाहीं. का का, ज्या पशूचें गृहीकरण अशक्य होईल तो पशु सहारून टाकावयाचा हाहि मानवस्वभाव आहे. तथापि गोसदृश वन्य स्वरूप जर दुसरीकडे कोठें सापडत असेल तर त्याचें तेथे अस्तित्व गाईच्या स्थानिकत्वास विरोध करील. गृहीकरणाचा इतिहास हा मनुष्याच्या भ्रमणावर थोडा बहुत प्रकाश पाडील.

**(२) भाषेच्या भौगोलिक स्थानाचें इतिहासमहत्त्व.**—मनुष्यभ्रमण अजमावण्याची दुसरी पद्धति येणेंप्रमाणें. उदाहरणार्थ आफ्रिका घ्या. आफ्रिका खंडामध्यें केप् टाउनपासून सहाराच्या वाळवंटापर्यंत गेलें असतां आपणांस निरनिराळ्या भाषांचे पट्टे आढळतात. आफ्रिकेच्या दक्षिणभागाकडून मनुष्यभ्रमण झालें अशी कल्पना करतां येत नाहीं. कारण दक्षिणेकडे विस्तीर्ण समुद्र आहे. मानवी प्राण्याचा संचार उत्तरेकडून दक्षिणेकडेच झाला असावा असें दिसतें. असें असता स्वाभाविक कल्पना अशी होते कीं जे लोक अगदीं दक्षिणेकडे आहेत त्यांचें आगमन अगोदर झालें व जे उत्तरेकडे आहेत त्यांचें आगमन नंतर झालें. तसेंच एखादे विशिष्ट लोक भोंवतालच्या लोकांच्या संस्कृतीहून निराळे आणि भाषेनेंहि भिन्न व दुर्गम स्थळीं असले तर अशी स्वाभाविक कल्पना होते कीं दुर्गम जागा असलेले लोक आसपासच्या सपाट प्रदेशांतील लोकांपेक्षा त्या प्रदेशांत अगोदर आले असावेत, आणि त्या प्रदेशांत आलेल्या नवीन लोकांनीं त्यांस सखल प्रदेशांतून हांकून दिल्यामुळें त्यांस दुर्गम जागीं जावें लागलें असावें.

**जातींचें सामाजिक स्थान व त्याचें ऐतिहासिक महत्त्व.**— जेव्हां एखादा मोठा प्रदेश दोन निरनिराळ्या जातींना

व्यापिला असेल आणि त्या दोन जातींपैकीं एक जात सामाजिक उच्चपदारूढ असेल तेव्हां अशी कल्पना करतां येईल कीं जेतृवर्ग उत्तरकालीन होय.

या प्रकारच्या विचारपद्धतीनें मानवी प्राण्याच्या संचाराचा इतिहास लिहितां येण्याजोगा आहे. परंतु या प्रकारचा इतिहास लिहिण्याचा अचाट परिश्रम अद्यापि कोणीं केला नाहीं. भूस्तरशास्त्रामध्यें देखील पृथ्वीचा साकल्यानें इतिहास अजून लिहिला गेला नाहीं. पुष्कळ ठिकाणचे भूस्तर अभ्यासिले गेले आहेत पण सर्व जगाच्या भूपृष्ठाचें साकल्यानें ऐतिहासिक वर्णन देणारा शास्त्रज्ञ अजून निघाला नाहीं. त्या प्रकारचा प्रयत्न मनुष्यप्राण्याच्या इतिहासास अत्यन्त अवश्य आहे. त्याशिवाय मनुष्यप्राण्याचे निरनिराळ्या थरांत सापडणारे अवशेष आणि सध्यांचें विस्तरण यांची संगति लागणार नाहीं व यासाठीं मनुष्याच्या या मागल्या लाखों वर्षांच्या इतिहासाचा अभ्यास करण्यास आज आरंभ झाला आहे असें देखील म्हणतां येत नाहीं. प्राचीन मनुष्येतिहासाचें साहित्य येणेंप्रमाणें:

(१) पृथ्वीच्या अनेक थरांत सापडणाऱ्या मनुष्याचे अवशेष, आणि त्यांची निरनिराळ्या काळच्या मनुष्यकल्प प्राण्यांशीं तुलना.

(२) भाषासाहित्य आणि त्यावरून निघणारे मनुष्यभ्रमणविषयक सिद्धांत.

(३) मनुष्याच्या प्रयत्नामुळें भोंवतालच्या पाशवी आणि वानस्पत्य सृष्टीवर झालेले परिणाम.

(४) मनुष्याचें आनुवंशिक स्वरूप.

यांपैकीं पहिलें साहित्य म्हणजे मनुष्यप्राण्याचे अवशेष हें वस्तुविरहित क्वचित् सापडतें. त्याच्याभोंवतां कांहीं हत्यारें, ग्राम्य पशूंचे अवशेष वगैरे सापडतात आणि त्यावरून कांहीं माहिती उपलब्ध होते.

भाषेचें साहित्य दोन तऱ्हांनीं उपयोगी पडतें. एक तर अनेक भाषांच्या सादृश्यविसादृश्यावरून व विकासावरून मनुष्यांचीं नातीगोतीं समजतात, आणि त्या भाषेतील शब्दसंग्रहावरून संस्कृतीविषयीं अजमास करतां येतो.

मनुष्याचें आनुवंशिक स्वरूप त्याचा इतिहास ठरविण्यासाठीं कितीसें उपयोगांत आणावयाचें हा एक प्रश्न आहे.

शरीरलक्षणावरून मनुष्याचें वर्गीकरण पुष्कळदां करण्यांत येतें. हें वर्गीकरण तपासतांना नेहमीं हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं वर्गीकरण हें ध्येय नसून मनुष्याच्या वांशिक इतिहासाचें तें केवळ साधन आहे. शरीरलक्षणाचा जे लोक अभ्यास करतात त्यांची आपल्या साहित्याचा गौरव करून भाषाशास्त्रास कमी महत्त्व द्यावें अशी बुद्धि होते. भाषाशास्त्रज्ञाची शरीरलक्षणांस महत्त्व कमी देण्याची बुद्धि होते. परंतु मानवेतिहासशास्त्रास दोहोंचीहि जरूर आहे.

मानवशास्त्रज्ञांमध्यें शरीरलक्षणशास्त्रज्ञांचें आणि भाषाशास्त्रज्ञांचें एकमेकांशीं तढा करण्याचें काम नाहीं. इतिहास लिहितांना शरीराच्या ठेवणीपेक्षां भाषांनीं केलेली लोकव्याप्ति हीच जास्त उपयोगी होईल. भाषेनें विशेष लोकसमुच्चय व्यापावा याला कारणें दोन असणार. एक तर वांशिक कारण आणि दुसरें राजकीय कारण. भाषा दोन क्रियांचा बोध करील. ती विशिष्ट प्रदेशांतील लोक एका वंशातील होते असें म्हणेल किंवा एका राज्यछत्राखालीं होते असें दाखवील. म्हणजे ती वांशिक समुच्चय किंवा राजकीय समुच्चय पण कोणता तरी निश्चित समुच्चय दाखवील. तो समुच्चय कोणत्या कालाचा हें ठरविणें हें पुढील काम आहे. शरीरलक्षणें वांशिक समुच्चय फार तर दाखवितील, किंवा एकस्थानमूलकता म्हणजे एकपरिस्थितिपरिणाम दाखवितील.

इतिहासाचा मुख्य प्रश्न हा आहे कीं, कोणत्या कालांत आणि कोणत्या स्थळांत शरीरलक्षणदृष्टसमुच्चय बनविता येतो हें पहाणें. भाषेच्या दृष्टीनें जे समुच्चय दिसतात त्यांचें देखील कालस्थलनियमन करणें अवश्य आहे. शरीरलक्षणें राजकीय समुच्चयाचीं द्योतक नाहींत या इतक्या गोष्टी पक्क्या लक्षांत ठेवल्या म्हणजे वंशविषयक इतिहासामधील गोंधळ बराचसा कमी होईल.

**विविध शरीरलक्षणें व भाषा यांची संगति.**— वंशनिर्णयार्थ आपणांस असें पाहिलें पाहिजे कीं, विशिष्ट भाषांचा आणि विशिष्ट शरीरलक्षणाचा संबंध जुळविता येतो काय? हा संबंध जुळविण्यासाठीं मनुष्याचें शरीरलक्षणांवरून वर्गीकरण अवश्य होतें, व शरीरलक्षणांनीं वर्गीकरण करतांना विशिष्ट लक्षणांची चिराचिरता पहावी लागते. ती पाहून शरीरलक्षणशास्त्राची रचना करावी आणि भाषा आणि शरीरलक्षणें यांचें ऐक्य कोठें कोठें दिसतें तें पहावें. शरीरलक्षणांचा इतिहास लिहितांना अर्थात् प्रारंभ मनुष्याच्या मानवकल्प पूर्वजापासून केला पाहिजे. शरीरलक्षणांच्या साहाय्यानें कांहीं इतिहास मिळविता येईल आणि कांहीं भाषासाहित्याच्या साहाय्यानें मिळेल, आणि कांहीं ठिकाणीं या दोहोंची संगतिहि दिसून येईल.

मानवेतिहासार्थ प्रयत्न करणारे जे अनेक ग्रंथकार आहेत त्यामध्यें बरेच मतभेद आहेत. आम्ही येथें प्राचीन मानवेतिहासविषयक कीनचीं+ मतें देतों. कीनचें भारतीय रक्ताच्या घटनेसंबंधानें मत मागें (विभाग १ पृष्ठ ८१ पहा) दिलेंच आहे. भौतिक शोधावरून शास्त्रज्ञांनीं बनविलेल्या प्राणिवर्गांच्या आणि त्यातल्यात्यात सस्तन प्राण्यांच्या सोपानपरंपरेंत मनुष्यप्राण्याचें स्थान कोणतें आहे व विशिष्ट रीतीनं मर्कटादि मानवकल्प प्राण्यांशीं मनुष्याचें नातें काय आहे हें ठरविणें हें भौतिक मानवशास्त्राचें अभ्यासक्षेत्र गणलें जातें. मानवशास्त्रांत मनुष्याचें प्राचीनत्व, मूलवंश, निरनिराळे मानववंश ओळखण्याचीं चिन्हें, त्यांचें मिश्रण, भाषेची उत्पत्ति, भिन्न भाषांचा विकास, भाषांवरून मानववंश ओळखणें, बाह्य परिस्थितीचा मानववंशावर व त्याच्या विकासावर होणारा परिणाम, कुटुंब, गोत्र, जमात, राष्ट्र इत्यादिकांच्या घटनेचा इतिहास इत्यादि विषय येतात.

+ Ethnology by A H Keane

**मानववंश** –मानववंश हा शब्द डार्विनच्या§ मताप्रमाणे मानव-सदृश प्राण्यांची एक पोटजात ( Variety ) यास अनुलक्षून वापरला आहे.

मानवाचे प्राणिपरपरेंत स्थान.– प्राणिशास्त्रातील वर्गीकरणाप्रमाणें मनुष्य हा स्तन्य प्राण्याच्या वर्गात असून व्यक्त अशा शब्दोच्चारणामुळे तो इतर प्राण्याहून भिन्न झाला आहे. मनुष्य हा विचार-शक्ति व स्पष्ट शब्दोच्चारणाची शक्ति यांहा युक्त असा प्राणी आहे.

मानवाचा विकास.– मनुष्य हा मानवसदृश मर्कटापासून विकास होऊन उत्पन्न झालेला नाहीं तर एका पूर्वजापासून मनुष्य व मानवसदृश मर्कट हे दोन्हीहि उत्पन्न झाले असावे

मानवाच्या मेंदूची वाढ.– मर्कटाशी तुलना करिता मनुष्याचा मेंदू १:३ या प्रमाणांत असतो पूर्वी कवटीच्या आकारावर मेंदूची व त्यामुळे मानसिक शक्तीची इयत्ता ठरवीत असत, परंतु कवटी मोठी असणे हें शरीराच्या दृष्टीचे अंग असल्यामुळे त्यामध्यें व मानसिक उन्नतीमध्यें कोणत्याहि रीतीचा संबंध नाहीं. कवटीच्या ऐवजीं मेंदूचें व विशेषतः मेंदूतील पांढऱ्या पदार्थाच्या आवर्तांचे परीक्षण करणे जास्त आवश्यक आहे. अलीकडे तर कित्येक शास्त्रज्ञ असे म्हणूं लागले आहेत कीं, मेंदूचा मनाशीं संबंध नसून मनाचे स्थान कुंडलिनी आहे.

**मानवाचें प्राचीनत्व व भूस्तरशास्त्रविषयक सिद्धांत.**– भूस्तरशास्त्रवेत्ते पृथ्वी थंड झाल्यापासून आतापर्यंतचा काल १० कोटी वर्षे मानतात, पदार्थविज्ञानशास्त्रानुयायी ज्योतिःशास्त्रज्ञ ३ कोटी वर्षे मानतात. दोहोंतील मध्यम मान धरल्यास ५ कोटी येतील. यातील चार युगाचा परस्पर सापेक्षकाल, प्रथमयुग शे. ७९, द्वितीय युग शे. १४; तृतीय युग शे. ६ व चतुर्थ युग शे. १ असा येतो.

तृतीय युगात मगर, कांगेव व हत्तींचे बहुतेक स्तन्य प्राणी होते. प्रथम गिबनसारखे मर्कट होते, नंतर ड्रायोपिथिकस मर्कट होते व त्यानंतर मानवसदृश मर्कट विकास पावले व त्यांपासून आद्य मनुष्य पुढील युगांत विकास पावला. या युगात आयर्लंड व अमेरिका जोडलेलीं होतीं. या युगाचा कालावधि ३० लक्ष वर्षांचा आहे.

चतुर्थ युगात जमीन व पाणी हीं हल्लींच्या ठिकाणीच होतीं उत्तरगोलार्धांत दोन तीन हिमयुगें अनुभूत होऊन त्या हिमयुगांच्या दरम्यान उष्ण असे हिमयुगांतरकाल (मध्यकाल) होते. या हिमयुगाच्या अनुषंगानें अनेक ठिकाणीं जमीन उन्नत होऊन नवीन प्रदेश उत्पन्न झाले.

या कालात पुरातन अश्मयुगांतील मनुष्य सर्व प्रदेशावर पसरलेला होता. त्याची कलांमध्ये थोडीशी प्रगति झाली होती.

नंतर हिम नाहीसे होऊन नूतन अश्मयुगांतील मनुष्य दृग्गोचर होतो व तो बराच सुधारलेला दिसतो. पूर्व गोलार्धात त्याची प्रगति विशेष होऊन तो कास्य, लोह, ताम्र या धातूंची कामें करूं लागला या युगाचा कालावधि ६ लक्ष वर्षांचा आहे.

यानंतरचा आधुनिक काल असून याचा अवधि शास्त्रज्ञ १० हजार वर्षांचा धरतात.

हिमयुग.– हिमयुगापूर्वी मनुष्यसदृश प्राणी ड्रायोपिथिकस वगैरे तृतीय युगाच्या मध्यास दृष्टीस पडतात त्याच वेळीं मनुष्याचा पूर्वज अधिष्ठित केला पाहिजे. हिमकाल हा डॉ. क्रोलच्या मतानें गणिताधारानें २½ लक्ष किंवा १० लक्ष वर्षांपूर्वी सुरू झाला असला पाहिजे. पैकीं २½ लक्ष हा काल ग्राह्य दिसत नाहीं, व हिमकालापूर्वी मनुष्याचे अस्तित्व दृष्टीस पडते. यावरून दोन हिमयुगें व मध्यंतरीं हिमयुगांतर उष्णकाल मानावा लागतो. याखेरीज इंग्लंडमधील शीत व उष्णकटिबंधातील प्राण्यांचे समकालीन अस्तित्व अतर्क्य होतें. उष्ण प्रदेशातील प्राणी स्थलांतर करितात अशीहि कल्पना मांडली गेली आहे तथापि या कल्पनेपेक्षा दोन हिमकालामध्यें एक उष्ण हिमांतरकाल होता ही कल्पना जास्त सयुक्तिक आहे. तसेच नदीकांठचे पुरलेले अवशेष कोणत्या कालचे हें ठरविताना वरील मातीच्या थराप्रमाणेच खालील नदीच्या खोलीचाहि विचार केला पाहिजे.

आद्यमानव.– बहुतेक शास्त्रज्ञ दोन हिमयुगांतील उष्णकालांत कमींत कमी ५ लक्ष वर्षांपूर्वी मानव होता असें धरतात, व तृतीय युगांत मानवसदृशमर्कटापेक्षा जास्त विकास झाला नव्हता असें म्हणतात.

मानव व मर्कट – मनुष्याचे मानवसदृश मर्कटाशीं पुढील बाबतींत साम्य आहे. ( १ ) शरीराची सामान्य रचना ( २ ) पुच्छाचा अभाव ( ३ ) हात व पाय यांचीं स्पष्ट दिसणारी अवयवांचीं चिन्हें ( ४ ) दाताची रचना ( ५ ) कानाची पाळे ( ६ ) मेंदूची रचना ( ७ ) हायॉइड नावाचे हाड ( ८ ) सदृश यकृत व बीजस. पुढील बाबतीत भेद दिसतो. ( १ ) मानवसदृश मर्कटाचा मेंदू लहान असतो व मेंदूची पेटी लहान असते ( २ ) मनुष्याच्या पाठीचा कणा डोकें वर राहण्याकरितां विशिष्ट तऱ्हेचा केलेला असतो ( ३ ) मनुष्याचे पाय हाताच्या मानानें लांब असतात ( ४ ) पायाचा अंगठा मनुष्यामध्यें लांब असतो. ( ५ ) मनुष्याचे नाक स्पष्ट वर आलेले व उन्नत असतें. ( ६ ) मनुष्याचे दांत सारखे जुळलेले असतात व सुळे स्पष्ट व निराळे असतात. ( ७ ) मनुष्याची हनवटी स्पष्ट दिसते ( ८ ) मनुष्याच्या सर्व अंगावर केस नसतात ( ९ ) मनुष्याचा आवाज स्पष्ट असून शब्दोच्चारण भाषा उत्पन्न होईल असें असते.

मानवाचे मूलस्थान व प्रसार – मागें मनुष्य एक प्राण्यापासून झाला अगर दोन प्राण्यांपासून झाला यावर मतभेद आहे असें सांगितलें. जीन एकच मानवरूप प्राण्यापासून मनुष्य विकासला असें समजतो त्याच्या मतानें तृतीय युगांतील मानवाचा पूर्वज एकच होता तेव्हां त्याचे मूलस्थानहि एकच असले पाहिजे त्या वेळीं आफ्रिका व न्यूझीलंड हा एकमेकांस जोडलेला होता, यूरोप व आफ्रिका हीं भूमध्यसमुद्रामध्यें जमीन असल्यामुळे जोडलेलीं होतीं अमेरिका व आशिया यांमध्येंहि संबंध होता यामुळें तत्कालीन मानवानें परिभ्रमण सर्व खंडामध्यें होणें शक्य होतें. याप्रमाणें हा

§ Descent of Man. by Charles Darwin.

वरील इंडो-आफ्रिकन खंड मानीत नाहीं व मानवाचें मूलस्थान मध्य-आशियांतील पठार मानतो, पण त्या ठिकाणाहून मानवाचा सर्व खंडांत प्रवास होणें हीं. कीनला असंभवनीय दिसतें.

*मानव, लिमर व मर्कट*— मानवसदृश मर्कट व मानव यांमधील दुवा अद्यापि सांपडला नाहीं. हा कदाचित् लुप्त झालेल्या खंडांत असेल. मादागास्करमध्यें कांहीं लिमर अद्यापि सांपडतात व त्यासभोंवतालच्या देशांत त्यांचे पूर्वज आढळतात. मानवसदृश मर्कटहि येथेंच सापडतात व शिद्दिवंशाचे दोन पोटविभागहि येथेच सापडतात. तेव्हां मानवाचें मूलस्थान याच खंडात मानलें पाहिजे, असें कीनचें म्हणणें आहे, परंतु याविषयीं सर्व शास्त्रज्ञांचें एकमत नाहीं (पृ. ४३ विभाग पहिला पहा) मानवाचा पूर्वज उष्णकटिबंधांत राहणारा, झाडामध्यें वसति करणारा व केंस अंगावर असलेला असा होता व हेंच वर्णन लिमर यास लागू पडतें. शिद्द्याचा कृष्णवर्ण नैसर्गिक नसून हवामानामुळें प्राप्त झालेला अतएव कृत्रिम असावा; कारण कांहीं शिदी काळे नसून पिंगळे असतात, आस्ट्रेलियनांचा मुलें जन्मतः पिंगट व पिंगट वर्णाचा असतात, तिबेटी लोकांचे केंस प्रथम पिंगट व नंतर काळे होतात.

**मानववंशाचा विस्तार आणि विशिष्टीकरण.**— मानवाचें मूलस्थान कोणत्या तरी मध्यें दिसणाऱ्या भूभागावर किंवा लुप्त खंडात असून तेथून तो सर्व खंडांत गेला व तेथील हवामानाप्रमाणें त्यांत फरक पडून चतुर्थ युगांत भिन्न वर्णांचे पूर्वज तयार होऊन हल्लींचे मूलवंश निर्माण झाले, म्हणजे मानव-सदृश मर्कटापासून विकास पावलेल्या तृतीय युगांतील एकाच नमुन्यापासून विकास पावून चतुर्थ युगांतील अनेक भिन्न वंशाचे पूर्वज तयार झाले हा विचार सर्वमान्य आहे. फ्लावर व लिडेकर यांच्या मतानेंहि प्राथमिक मनुष्य सर्व एक असून सारखेच होते व भिन्न प्रदेशांत गेल्यामुळें त्यांत फरक पडत गेले. मात हे शास्त्रज्ञ तीन मानववंश मानून अमेरिकन लोकांस मांगोलियन वंशांत घालतात. पण मांगोलियन व अमेरिकन यांत बरेंच भिन्नत्व आहे एकंदरीत किने यानें कॉकेशियन, मोंगोलियन, इथिओपियन अथवा शिदी, व अमेरिकन असे चार वर्ग एका मूलवंशापासून उत्पन्न झाले हें मत बहुतेक मान्य दिसतें वर्णिअर्नें प्रथम मूलवंशाचे चार वर्ग केले (१) श्वेत युरोपीय (२) कृष्णवर्ण शिद्दी (३) पीतवर्ण आशियांतील मनुष्य व (४) लॅप. ब्लूमेनबाक यानें पांच वर्ग केले (१) कॉकेशिअन (२) मोंगोलियन (३) इथिओपिअन (४) अमेरिकन व (५) मॅले. क्युव्हिअरनें तीनच वंश मानिले देन्हायर्स यानें दोनच वर्ग केले व दे मूले यानें सोळा वंश कल्पिले. यानंतरहि निरनिराळ्या शास्त्रज्ञांनीं निरनिराळीं अनुमानें काढलीं व भाषाशास्त्रज्ञांनीं भौतिक अभ्यासानें हा प्रश्न सोडविण्याचा प्रयत्न केला. पुढें प्रिचर्ड व वर्कन यांनीं शरीरमापनशास्त्राच्या आधारानें भौतिक अभ्यास करून मानव-वंशशास्त्राचा पाया घातला. या शास्त्रांतील शोध लावण्यांत मोरा, क्वाट्रफाज, टॉपिनार्ड, ह्यक्स्ले वगैरे अनेक शास्त्रज्ञ पुढें आले. यांनीं केलेलीं निरनिराळीं वर्गीकरणें प्रसिद्ध आहेत. तीं करण्यांत त्यांनीं कातडीचा वर्ण, केंसांची रचना व कवटीचा आकार या गुणांस विशेष प्राधान्य दिलें आहे. या तत्त्वानें वर्गीकरण करून (१) शिद्दी (२) मांगोलियन (३) अमेरिकन (४) कॉकेशियन असे चार मानववंश मानले आहेत त्यांचें वर्णन पुढें दिलें आहे.

**१. शिद्दी अथवा इथिओपियन.**—हा वंश मूलस्थानापासून जवळच आफ्रिकेंत व ऑस्ट्रेलियामॅलेशियाकडे गेला. याचे प्रथम आफ्रिकेंतील व इंडो-ओशियानियांतील असे दोन वर्ग झाले. यापैकीं दुसरा नेग्रिटो नावाचा असून तो प्राथमिक नमुन्याशीं जास्त लगत व ठेंगणा आहे. हे नूतन अश्मयुगाच्या किंचित् पूर्वी यूरोपमध्यें गेले यांच्या पोटजाती म्हटल्या म्हणजे कांगो नदीच्या दक्षिणेस बटवा, बुशमन, हॉटेंटाट, बंटू, डॅमेरा, कोराना, ग्रिका, गोनाक्वा इत्यादि होत यामध्यें थोडाफार फरक असतो. क्वाट्रफाज यानें नेग्रिटोव्याप्त प्रदेशांत हिंदुस्थानाचा समावेश केला आहे; पण द्राविड लोक हे नेग्रिटोंची पोटजात होऊं शकत नाहींत. याविषयीं प्रो. बोल म्हणतात "माझ्या कित्येक वर्षांच्या प्रवासांत मद्रासचा उत्तरभाग, बंगाल व मध्यप्रांत यामध्यें नेग्रिटो जातीच्या नमुन्याचा मनुष्य मीं कोठेंहि पाहिला नाहीं. कुरळ्या केंसांच्या व्यक्ती क्वचित् आढळतात. परंतु यावरून सर जार्ज कॅंबेलप्रमाणे हा नमुना नेग्रिटोंचा अवशेष आहे असें म्हणण्यास मी तयार नाहीं" इंग्लंडचा वायव्य भाग, स्कॉटलंडचा पश्चिमभाग व आयर्लंडचा पूर्वभाग यांत नेग्रिटोंची वस्ती होती असें कांहीं इंग्रज मानववंशशास्त्रज्ञ म्हणतात.

यावरून इंडो ओशियानिक नेग्रिटो हीं शब्दयोजना गाळून टाकून ओशियानिक नेग्रिटो असें म्हटलें पाहिजे. यांचा मूळचा पिंवळा रंग जाऊन काळा किंवा गहिरा तपकिरी रंग आलेला आहे. हल्लीं हे अंदमान, मलय द्वीपकल्प, फिलिपाइन बेटें व न्यू गिनी या प्रदेशांत सापडतात मलय द्वीपकल्पांतील नेग्रिटोंमध्यें मर्कटसदृशत्व सर्वांत अधिक दिसतें.

आफ्रिकेंतील शिद्द्यांपेक्षां ओशियानियांतील शिद्दी जास्त ठेंगणे असतात, त्यांचें नाक मोठें असतें व मुद्रा सौम्य असते. या दोन शाखांत पूर्वेकडील शाखा जास्त बुद्धिमान् आहे, व स्वतःच सुधारणा करून घेण्यास पात्र आहे; पण शिद्दी हे जात परकीय मिश्रणाशिवाय सुधारणें अशक्य आहे असें कीनचें मत आहे पण त्यास श्वेतवर्ण कॉकेशन व कृष्णवर्ण शिद्दी यांचें मिश्रण होऊन उत्तम प्रजा उत्पन्न होईल किंवा नाहीं याविषयीं शंका आहे.

यांची आजपर्यंत सुधारणेमध्यें फारच अल्प प्रगति झाली आहे. अमेरिकेंतील उपाहारगृहांतील नोकरांच्या वरच्या पायरीवर हे फारसे गेलेले नाहींत.

शिद्द्यांचे भाषेच्या तत्त्वावर सुदानी व बांटू असे दोन विभाग करितात. सुदान हें शिद्दी वंशाचें मूलस्थान मानतात व येथें पूर्व

# मानववंश.



अरब (सेमेटिक)



चिनी ( मांगोलियन )



माओरी ( पॉलिनेशियन )



निग्रिटो ( आफ्रिकन )



अमेरिकन इंडियन



उत्तर ऑस्ट्रेलियन

१० व्या पृष्ठासमोर




वेदकालीन आर्यावर्त



उत्तर हिंदुस्थानातील द्रविडागमनपूर्व लोकांच्या स्मारकशिला





हिमालयातील प्राकालीन अनार्य लोकांच्या घराचे नमुने

शिद्दीवंशाचा नमुना आढळतो. परंतु सुदानमध्ये मिश्र जातीहि आढळतात त्या: तुकूलअर, सोनरे, सुदानी, हौसा, बोर्नू, बघिरमी, माबा, बामे, वारिआ, शांगाल्ला इत्यादि होत.

सुदानच्या दक्षिणेस चंद्रांचा प्रदेश आहे येथेंहि कांहीं शुद्ध शिद्दी जमाती आहेत. मिश्रवंशमध्ये झुळू-काफीर ही जात विशेष प्रागतिक दिसते. परकीयांच्या स्वाऱ्यामुळे यात बरेंच मिश्रण झालें आहे.

ओशियानियांतील शिद्दी लोकांतहि प्राचीन काळीं दळणवळण-सौकर्यामुळे आफ्रिकेपेक्षाहि जास्त समिश्रण झाले आहे

नेग्रिटोशिवाय इतर ओशियानियांतील शिद्दींचे दोन वर्ग करतां येतील. एक ओशियानियांतील लहान बेटांत राहणारे व दुसरे टॅस-मानियात राहणारे मिश्र शिद्दी. पहिल्या वर्गास पाप्युअन म्हणतात. हा नमुना बऱ्याच बाबतींत आफ्रिकन शिद्द्यांशीं जुळतो पण कांहीं बाबतींत भिन्न आहे. याची मूळ भाषा मलायी-पॉलिनेशिअन ही असून याच्या पोटजातींत इच्या शाखा प्रचलित आहेत. याशिवाय मादागास्करमधील मलायी-मलागासी, पूर्वद्वीपसमूहांतील मलायी, मॅलेनेशियांतील शिद्दी याच्या भाषाहि हिच्याच शाखा आहेत. ही भाषा कॉकेशिअन वंशापैकी पॉलिनेशिअन लोकांनीं या लोकांवर नूतन अश्मयुगात हक्टे येऊन लादली असे मत आहे.

ऑस्ट्रेलियात दोन नमुने मानावे लागतात. याचा मूळवंश शिद्दी असावा. येथील शिद्दी सामान्यत इतर शिद्द्यांप्रमाणेच आहेत आस्ट्रेलियात न्यूगिनी व मॅलेशिया यामधून पाप्युअन आले असे रे. गॅथ्यु यानें सिद्ध केले आहे नंतर येथून ते टॅसमानियांत गेले. यांत कांहीं हिंदुस्थानातून आलेल्या द्राविडांचेहि मिश्रण झालें आहे. तसेच मॅले लोकांचेहि मिश्रण झाले असले पाहिजे. द्राविड हे काकेशिअन वंशाचे मानले पाहिजेत. टॅसमानिअन लोकांची संस्कृति यूरोपीय पुरावन अश्मयुगीन संस्कृतीच्या बरोबरीची आहे. हे 'अश्मयुगाचे जिवंत नमुने आहेत' असे प्रो. टायलर म्हणतो.

**मांगोलियन मानववंश.**– या वंशाचे मूलस्थान मध्य आशिया हें होय. इंडोआफ्रिकन खंड अस्तित्वात होते त्या काळीं हिमालयाची अधिकतम उंची २०००० फूट होती निबिड जलमय होते त्यामुळे मध्य आशियांत तृतीय युगांत मनुष्यास येणें सुलभ होते. कानफजच्या मते मांगोलियन मनुष्य शिद्द्यांपेक्षांहि मूलपूर्वजाच्या जास्त जवळ आहे. मर्कटसदृशत्वाचा चिन्हें शिद्द्यांमध्ये कवटीचा आकार, पुढें आलेला जबडा, आजानुबाहू व पायाची अतिशय पातळ पोटरी ही आहेत यावरून तो वंश प्रथम निर्माण पावला असे निश्चितपणें मानता येईल किंवा नाहीं यावद्दल संशय आहे. म्हणूनच भिन्नवंशाची स्वतंत्र रीतीनें समकालीन उत्पत्ति मानणे सयुक्तिक आहे, कारण प्रत्येक वर्गांत मूळ पूर्वजाचे कांहीं विशिष्ट गुण असतातच. मांगोलियन वंशाचें पृथक्त्व, कातडीचा पिंवळा वर्ण, रुंद व चपटे चेहऱ्याचे अवयव, पुढच्या बाजूस वर आलेले गालांचे व लहान गालांचे हाड, लहान व मध्यम लांबीचे नाक, मध्यमप्रक्षेपण असलेला जबडा, रुंद डोकें, भूतोरणिश व भ्रूमध्यकूर्च अपूर्ण वाटलेला, खोल गेलेले व बदामाच्या आकृतीचे डोळे, डोळ्याच्या आतील कोपऱ्यावरील घडी व बाहेरची बाजू उठावून दिसणारी या गोष्टींत आहे

अमेरिकन शाखा विभक्त झाल्यानतर मूळ मांगोलियन वंश सर्व आशियाभर पसरून नंतर मॅलेशियांत गेला व नूतन अश्मयुगात त्याने यूरोपात प्रवेश केला. कॉकेशन वंशहि याच वंशाप्रमाणें दूरवर पसरल्यामुळे त्याचें अनेक ठिकाणी मिश्रण झालें आहे. या मिश्रणाची उदाहरणें मलेशियांतील इंडोनेशियन, मेसापोटेमियांतील अक्कड, हिंदुस्थानांतील कांहीं द्राविड, फिन व तुर्क हीं आहेत अशा मिश्र जातींचें वर्गीकरण जो अंश जास्त प्रमाणात असेल त्यावरून अगर भाषेच्या साहाय्यानें करावें लागते

या वंशाचे दोन मुख्य विभाग मांगोलेतार्तर व इंडोचायनीज असे आहेत या वंशाविषयीं ऐतिहासिक माहिती अक्कड लोकांच्या बाबिलोनियन साम्राज्यापासून मिळू लागते

मंगोलो-तार्तर या शब्दापेक्षां मंगोलेतुर्क हा शब्द अधिक सार्थ आहे याच अर्थी उरल अलताइक हा शब्द कांहीं शास्त्रज्ञ वापरतात चेंगिझखान यानें तार्तार व मोंगल लोकास एकत्र करून त्याचें एक राष्ट्र बनविलें व पुढें त्यांनीं १४५३ मध्ये कान्स्टॅटिनोपल घेऊन तुर्की साम्राज्य स्थापन केले.

फिनिश.– हे लोक मांगोलियन आहेत की कॉकेशियन आहेत यावद्दल वाद आहे यूरोपातील फिन लोकांचे कॉकेशियन लोकांशी बरेंच मिश्रण झाले आहे पण त्यांची भाषा उरल अलताइक भाषेची शाखा असल्यामुळे ते मंगोलवंशाचेच असले पाहिजेत सायबेरीयातील लोक व सामोयिड यांत सर्व चिन्हें मांगोलियन वंशाची आहेत. उग्रियन, व्होगल व ओस्तिॲक यांचे कांहीं गुणधर्म भिन्न आहेत. लॅप व बाल्टिक फिनिश जातींत इतर जातींच्या मिश्रणानें कांहीं फरक झाले आहेत.

ॲव्हर, मग्यार व बुल्गार.– ॲव्हर, मग्यार व बुल्गार या तीन फिनोतार्तार जाती असून त्यांत फार फेरबदल झाले आहेत. ॲव्हर हे कॉकेशनशी तादात्म्य पावले मग्यार लोकांना आपली फिनो तुर्की भाषा कायम राखली पण त्यांची चेहेरपट्टी बदलली बुल्गार लोकांनी स्लाव्ह भाषा स्वीकारली पण त्यांत कांहीं फिनो-तुर्की गुणधर्म शिल्लक आहेत.

ओस्मानली तुर्क या जातींतहि मंगोलियन गुणधर्म मिश्रणामुळें बरेच नष्ट झाले आहेत, परंतु त्यांची भाषा उरल-अलताइक भाषेची शाखा आहे ते सायबेरियांतील अमूर नदीपासून बॉसफरसपर्यंत पसरले आहेत

कोरिओ-जपानी ही शाखा फार प्राचीन काळीं मूलवंशापासून निराळी झाली. भाषेच्या दृष्टीनें हे मंगोलियन वंशांतेच आहेत कोरियन लोकांत चेन व यान वर्णांचे मिश्रण आहे आणि जपानी

लोकात श्वेत, पीत व कपिश वर्णांचे मिश्रण आहे. त्यांच्या भाषा उरल-अलताइक भाषेच्याच शाखा असून फिनोउग्रियनशीं सदृश आहेत.

**अमेरिकन महावंश.**– हा मांगोलियन वंशाचाच एक भाग आहे असे कित्येक धरतात आणि कित्येक संशोधक यास स्वतंत्र अस्तित्व देतात. त्याच्या विस्ताराशीं आपणास सध्या कर्तव्य नाहीं.

**कॉकेशियन महावंश.**– शरीराच्या ठेवणीतील सादृश्यावरूनच कॉकेशिअन महावंश म्हणून एक वंश गृहीत धरला आहे. यामध्यें सेमेटिक, आर्यन व हॅमेटिक असे तीन भाषासमुच्चय धरले आहेत. द्राविडास शरीरलक्षणांवरून कीन कॉकेशियनमध्यें घालतो आणि भाषाशास्त्रज्ञ त्यास दूरचे समजतात. शरीरलक्षणांवरून वर्गीकरण करून नातीं जोडणे आणि भाषावरून नातीं जोडणें या दोन्ही क्रिया अर्वाचीन संशोधन करताना दिसतात.

कीनचे असे मत आहे कीं कॉकेशियन मनुष्य प्रथम भूमध्यसमुद्रात जमीन होती तेथें विकास पावला व तेथून तो नील नदीचे खोरें व पश्चिम आशियात गेला. तसाच तो स्पेन व पश्चिम यूरोपकडे गेला. या स्थानांतरास अनेक सहस्रकें लागलीं; तोंपर्यंत त्याची सुधारणा चालूच होती. बास्क, केल्ट, गॉल, पिक्ट हे आयबेरियन लोकांपैकीच असून हे सर्व कॉकेशियन आहेत असें प्रो. ऱ्हाइस व ब्रे या शास्त्रज्ञांचें मत आहे.

यात गोरा व काळासावळा हे दोन मुख्य वर्ण असून कपिश अथवा तपकिरी रंगाचेहि कांहीं लोक आहेत. हॅमिटिक, सेमिटिक व द्राविड हे याच वंशात मोडतात. याचे मुख्य गुणधर्म कातडीचा रंग बहुतेक श्वेतवर्णावर, क्वचित् कृष्णवर्ण, केंस सफेत, पिंगट, भुरे व काळे, मऊ, सरळ किंवा थोडेसे कुरळे, दाढी विपुल, कवटीची लांबी मध्यम, लहान व अरुंद चेहरा व मध्यभागीं उन्नतत्व, नेत्रपुट मध्यम आकाराचे; नाक लांब व तरतरीत, जबडा पुढें न आलेला, दांत लहान.

हॅमिटिक.— या लोकांतील बेजा, अफार, अगोस, सोमाली, गाला, मसाई हे सर्व लोक कॉकेशियन वंशाचे आहेत. यांत शिद्दीवंशाचें मिश्रण दिसून येतें पण मुख्यत्वें हा नमुना कॉकेशियन पद्धतीचा आहे. अबिसिनिआत सेमिटिक, हॅमिटिक व शिद्दी या सर्वांचें अतिशय मिश्रण झालें आहे. हॅमिटिक लोक व अरब, यहुदी इ० सेमिटिक लोक यामध्यें वंशसाम्य आहे असें आधुनिक शोधाअंतीं सिद्ध झालें आहे. हॅमिटिक लोक आशियातून आफ्रिकेंत गेले का सेमिटिक आफ्रिकेतून आशियात आले याविषयी मतभेद आहे पण सेमिटिक आफ्रिकेमधून आले असावे व त्यांपैकी कांहीं विशेषत अरब पुन्हा आफ्रिकेत गेले व कांहीं इराण, हिंदुस्थान, मॅलेशिया, मध्य आशिया येथपर्यंत गेले.

सेमिटिक.— याचे पाच मुख्य भाग आहेत. (१) मेसापोटेमियांतील असुर राष्ट्रें. (२) सीरिया पॅलेस्टाइन येथील अरमीयन. (३) हिब्रू, फिनिशियन व कार्थेजियन. याम फॅनेनाइट म्हणत. (४) अरब. (५) अरबस्तान व अबिसिनिया यामधील हिमराइट, यापैकीं बहुतेक लुप्त झाले आहेत. याची चेहेरेपट्टी सुबक असून, तोंड गोल, नाक सरळ, लहान व टोंक असलेली हनुवटी, सरळ कपाळ, काळे बदामाच्या आकाराचे डोळे, नरम व काळेभोर केंस, पूर्ण वाढ होणारी दाढी वगैरे कॉकेशियन मानववंशाचे सर्व गुण यांच्यांत स्पष्ट दिसतात. यातील सुंदर व्यक्तींचे सौंदर्य यूरोपीयांशीं तुल्य असते. या जातींच्या लोकांतूनच यहुदी, ख्रिस्ती व महंमदी हे संप्रदाय निघाले. याच्या भाषा स्थैर्य व चिरकालिकता यांत प्रसिद्ध आहेत.

आर्यन्.—ही युरेशिया नावाच्या खंडात कोठेंतरी रहात होती हें निःसंशय आहे. पण आर्यन् भाषा बोलणारे सर्व आजचे लोक एकच मानववंशांतले होते असें मानणें अशास्त्र आहे. आर्यन् लोक सर्वत्र पसरल्यामुळे त्यात अनेक वंशांचें मिश्रण झालें. आर्यनूपासून भिन्न रक्ता अनेक कॉकेशियन जाती आर्यन् भाषा बोलतात. ट्यूटन, केल्ट, आर्मेनियन, अफगाण हे सर्व आर्यन् भाषा बोलतात पण ते आर्यन् नाहींत असें कीनचें मत आहे. व त्याच्या मते ' मॅक्सम्युलर ' इत्यादि ग्रंथकाराच्यामुळें प्रसिद्धीस आलेली 'आर्यन् उत्पत्ति' आधुनिक शोधाच्या दृष्टीनें त्याज्य ठरते.

मूलस्थान.— यात्वप्रमाणे आर्यन् लोकाचें मूलस्थान शोधण्याचाहि प्रयत्न विफल आहे असें ठरतें. आज जरी आर्यन् लोकांनीं अनेक संस्कृतींवर आपली छाप बसविलेली दिसते तरी एका काळीं तेहि संस्कृतीच्या प्राथमिक अवस्थेंत होते, व पशुपालन हें त्यांचें उदरनिर्वाहाचें साधन असून त्यास शेतकीची विशेष माहिती नव्हती, तांबें एवढीच धातु ज्ञात होती व कांहीं अडाणी चालीहि त्यांच्यात होत्या. फ्रेंच मानवशास्त्रज्ञ, व रोद, व्हॉन उजफील इत्यादि लोकाच्या मतें त्यांचें मूलस्थान आशियांत असले पाहिजे. लो टिळकाच्या मते ते एका वेळीं उत्तरध्रुव प्रदेशावर असावे.

परिभ्रमण.— याच्या पशुपालवृत्तीस विस्तृत क्षेत्राची जरूर असल्यामुळें कांहीं जमाती डॅन्यूब नदीकडे, कांहीं स्वित्सर्लंडमध्यें, कांहीं इराण, युफ्रेटिस नदी वगैरेकडे गेल्या. आर्यन् लोकाचीं परिभ्रमणें सुरू होण्यापूर्वी उत्तरआफ्रिकेंतील लोक स्कॅंडिनेव्हियापर्यंत पोंचले होते, यूरोपांतहि आर्यन् जाण्यापूर्वी भिन्न लोक होते. फ्रान्समधील ऑव्हर्न व सॅव्हॉय प्रांतातील लोक व हिंदुकुश पर्वताजवळील गालचा हे आर्यविभिन्न वंशाचे आहेत.

वर्ण.— मूळ आर्य श्वेतवर्ण असावेत. श्वेतवर्ण व लांब डोक्याच्या सर्व लोकांमध्ये आर्यन् भाषा व आर्यन् संस्था प्रचलित आहेत, व या गोष्टी इतर लोकात आढळत नाहींत हें प्रो. ला पूज यानीं सिद्ध केले आहे. प्राचीन इराणी, हिंदू, ग्रीक, जर्मन, रोमन लोकांचे लॅटिन, एट्रुस्कन इत्यादि घटक हे सर्व लांब डोक्याचे व उजळ रंगाचे आहेत. इस्थोनिअन, लिव्होनियन, फिन, बास्क, आयबेरियन हे दुसऱ्या वर्गात येतात.

आर्यन् लोकांचे इतर लोकांशी मिश्रण नूतन अश्मयुगाच्याहि पूर्वी सुरु झालें. आजहि असें मिश्रण चालू आहे.

आर्यन् भाषांत विभक्तिप्रत्ययांनीं रूपें बदलण्याची क्रिया पूर्णतेस पोचली आहे. कॉकेशस पर्वताजवळ अद्यापि कांहीं मूलभूत भाषा आढळतात व तेथील कांहीं लोक कृष्णवर्णी पण सुंदर दिसतात, व कांहीं कुरूप आहेत. यावरून येथील मूळचे श्वेतवर्णी आर्यन् इतरांशीं मिश्रणानें भ्रष्ट झाले असावे.

द्राविड.—दक्षिण हिंदुस्थानांत द्राविड लोक आहेत. त्यांत तेलगू, तामिळ, कानडी, मल्याळी, कोडगू, राजमहाली, 'ओरा-ओन व गोंड हे येतात. हे लोक आर्यन् लोकांच्या पूर्वी हिंदुस्थानांत होते व त्यांच्याहि पूर्वी हिंदुस्थानांत निग्रिटो होते. युरोपांतील मग्यार ज्याप्रमाणें आर्यन् लोकांशीं संघटनानें सामिल झाले आहेत, त्याप्रमाणें द्राविडांनीं हिंदुस्थानांतील आर्यन् लोकांशीं तादात्म्य झालें आहे. कांहींच्या मतें द्राविड हे मांगोलियन वंशाचे असून वायव्येकडून हिंदुस्थानांत आले व ब्राहुइ ही त्यांच्यापैकीं एक दूर राहिलेली जात आहे. परंतु द्राविड व मांगोलियन यांत साम्य दिसत नाहीं.

निलगिरीमधील तोड व जपानांतील ऐनु हे विपुलकेशत्वामुळें कॉकेशियन वंशांतीलच मानतात.

मनुष्याच्या विकासानंतरच्या काळाचे विभाग पाडण्याचें साहस अजून कोणी केलें नाहींसें दिसतें. भाषाविकासावरून विभाग पाडावयाचे झाल्यास सर्व भाषांचा अगोदर इतिहास जुळवावा लागेल आणि त्यांतहि कालक्रम शोधावा लागेल.

आर्यन् महावंशाच्या भाषांचा जितका सूक्ष्म अभ्यास झाला आहे तितका दुसऱ्या कोणत्याहि भाषांचा झाला नाहीं.

आज भाषांच्या दृष्टीनें जर भेद पाडावयाचे झाले तर

( १ ) मूळ आर्यन्भाषेचा काल—उद्भवकालापासून इंडोयुरोपीय पोटभाषा व पर्शुभारतीय पोटभाषा यांच्या उद्भवकालपर्यंत.

( २ ) पर्शुभारतीय काल.

( ३ ) संस्कृत व अवेस्ता यांचा काल.

असे काल पाडल्याशिवाय गत्यंतर नाहीं. आर्यन् भाषा व दुसरी कोणती तरी भाषा यांच्या पूर्वीच्या काळाकडे जाण्यास अजून कोणी धजले नाहीं.

आर्यन् भाषेचा काल तरी कोणता असावा ? कांहींनीं दहा हजार वर्षांपूर्वींचा असें स्थूल अनुमान केलें आहे. हेंच अनुमान लो. टिळकांनीं आपल्या आर्यांचें मूलस्थान ( Arctic Home in the Vedas ) या पुस्तकांत स्वीकारलें आहे.

असुरसंस्कृतीच्या प्रारंभाचा काळ ९।१० हजार वर्षांपूर्वी असा धरतात.

भाषाशास्त्राच्या साहाय्यानें जर कोणी पूर्वीच्या काळाकडे जाण्याचा प्रयत्न केला तर तो त्या साहित्यानें इ. स. ८००० च्या पूर्वीच्या कालांत जाईल. या वेळीं असुरसंस्कृतीच्या वेळीं भिन्न भाषा बऱ्याच विकसित होत्या. असुर भाषेचें आणि संस्कृत भाषेचें रूप त्या काळीं कसें असावें याची आपणांस कल्पना होते आणि असुर भाषा आणि वेदभाषा यांचें पृथक्त्व आपणांस दिसतेंच.

भाषारूपी साहित्याचा ऐतिहासिक अभ्यास कसा करावयाचा यासंबंधानें बरीच भिन्न मतें आहेत आणि निरनिराळ्या तऱ्हेनें खटपटी झालेल्या आहेत. पहिल्या प्रथम जी खटपट झाली ती केवळ निरनिराळ्या भाषेंतील शब्द घेऊन त्यांनीं एकमेकांशीं सादृश्य अगर विसादृश्य पहावयाचें या पद्धतीनें झाली. पुढें लवकरच या पद्धतींतील दोष अभ्यासकाच्या लक्षांत आले. दोन निरनिराळ्या भाषांतील शब्द बरेच सारखे दिसतील, परंतु प्रत्येक शब्दाचें पृथक्करण करून पृथक्कृत झालेल्या अंगाचा अर्थ पाहिला व त्या दोन्ही भाषांतील मूळ घटकाची तुलना करून पाहिली म्हणजे कांहींच सादृश्य दिसून येणार नाहीं असे प्रकार पुष्कळ दृष्टीस पडतील, व त्यामुळें आणि एका भाषेमध्यें दुसऱ्या भाषेंतील शब्द राष्ट्रांच्या आलेल्या संबंधामुळें जाणें शक्य असल्यामुळें शब्दसादृश्याचें महत्त्व दोन भाषांच्या मधील एकवंशसंबंध या दृष्टीनें कमी झालें. हॉवेलॅकनें+ या तौलनिक व्युत्पत्तिशास्त्राची सपाटून थट्टा उडविली आहे आणि या शब्दसादृश्याचें महत्त्व फारच कमी धरलें आहे. त्याचें म्हणणें असें आहे कीं, शब्दापेक्षां भाषेची अन्तर्घटना अधिक महत्त्वाची आहे. परके शब्द एखाद्या भाषेंत येतील आणि जातील परंतु भाषेची अन्तर्रचना बरीचशी कायम राहते.

ज्या अभ्यासकांनीं भाषांच्या अन्तर्रचनेकडे लक्ष दिलें आहे त्यांनीं एक तत्त्व पाहून भाषांची जुळणी केली आहे, तें तत्त्व म्हटलें म्हणजे सर्व भाषा एका काळीं समासयुक्त होत्या म्हणजे जे संबंध आणि अर्थ आज आपण प्रत्ययांनीं अगर शब्दयोगी अव्ययांनीं दाखवितों ते सर्व पूर्वी निरनिराळ्या शब्दांच्या समासानें व्यक्त होत असत, परंतु त्यांपैकीं कांहीं शब्द पुढें प्रत्ययरूप झाले. हा जो फरक पडला त्या फरकाला महत्त्व देऊन त्या फरकाच्या कमीजास्त प्रमाणानें भाषांची परंपरा आणि भाषामधील भगिनीसंबंध त्यांनीं व्यक्त केला आहे. त्यांचें म्हणणें असें कीं, एखाद्या भाषेंत नवीन शब्द येणें ही क्रिया लवकर होते, परंतु शब्दाचे प्रत्यय होण्याची क्रिया अधिक उशीरां होते, यामुळें भाषाप्रकृतेच्या पायऱ्या शब्दांचे प्रत्यय होणें या क्रियेनें मोजल्या पाहिजेत. या तऱ्हेचें मत व्यक्त करणाऱ्या लोकांनीं भाषांच्या अभ्यासाचें आणि त्यांत होणाऱ्या फेरफारांचें महत्त्वाचें तत्त्व पुढें मांडलें यांत शंका नाहीं. तथापि तौलनिक व्युत्पत्तिशास्त्रास ऐतिहासिक दृष्टीनें त्यांनीं जें इतकें कमी महत्त्व दिलें तितकें कमी महत्त्व देणें चुकीचें होईल. त्यांनीं आपली स्वतःची पद्धति वापरतांना अगदीं कमी महत्त्व दिलें असें मात्र नाहीं. कारण सामासिक भाषा, शब्दयोगी भाषा आणि प्रत्ययी भाषा उर्फ आदेशी भाषा एवढेंच

---

\+ Science of Language by Hovelacque London 1877.

वर्गीकरण करून ते भाषाशास्त्रज्ञ थांबले नाहीत त्यांनीं पुन्हा आर्यन् भाषावंश, सेमिटिक भाषावंश असे निरनिराळे भाषावंश प्रत्ययी भाषामध्यें पाडलेच आहेत. हे भाषावंश त्यांनीं कसे पाडले? शब्दसमुच्चयावरूनच पाडले आहेत असे दिसतें. सर्वच भाषा ज्या एका काळीं सामासिक स्वरूपाच्या होत्या त्या काळीं जर आजचें भाषाशास्त्र जन्मलें असतें तर त्यास भाषाचें वर्गीकरण करतांच आलें नसतें काय? सर्व भाषा एकच आहेत असें त्यांनीं म्हटलें असतें काय? शब्दादेशासमुख जो अपभ्रंश होतो त्या अपभ्रंशाच्या प्रमाणावरून भाषाचें वर्गीकरण करणें ही एकच किंवा मुख्य भाषा-वर्गीकरणाची म्हणजे त्यांचे वांशिक संबंध दर्शविण्याची कसोटी होती असे म्हणणे चुकीचे होईल ज्या वेळेस सर्व भाषा सामासिक स्थितींत असतील अशा वेळेस भाषांतील शब्दसंग्रहावरूनच त्यांचें वर्गीकरण करावें लागेल. असो.

कोणत्या फरकाचें महत्त्व किती व अमुक भाषा कोणत्या वर्गांत घालावी याविषयीं जो विचार करावयाचा तो विचार करतांना शब्दसमुच्चय व अपभ्रंशप्रमाण हीं दोन्हीं तत्त्वें लाविलीं पाहिजेत आणि त्यावरून वांशिक संबंध शोधिले पाहिजेत. सिंहली भाषे-संबंधानें जो मशोधकांचा घोंटाळा झालेला आहे त्यानें कारण, आपणास काय पहावयाचें आहे इकडे दृष्टि न ठेवता अपभ्रंशप्रमा-णास महत्त्व देऊन भाषेचें वर्गीकरण करण्याचा मोह पडल्यामुळें सिंहली भाषेचें आर्यन् भाषापासून पृथक्त्व स्थापन करण्याचा मोह पुष्कळास पडला होता त्या मोहामुळें जी गडबड उडाली ती गडबड आम्ही मागें ( विभाग पहिला पृ. १३९ ) दिली आहे. हॅवेलॅकनें सिंहली भाषेस शब्दयोगी भाषात टाकून आर्यन् भाषापासून तीस वियुक्त केलें आहे.

शब्दसमुच्चय व अपभ्रंशाचें प्रमाण हीं दोन्हीं प्रमाणें धरून भाषाचे वांशिक संबंध शोधले पाहिजेत. कधीं कधीं असें दिसून येईल कीं एका वंशातील एक भाषा शब्दयोगी भाषात मोडेल व दुसरी भाषा प्रत्ययी अगर सामासिक भाषांत मोडेल. असो.

आता आपणास जे अनेक भाषासमुच्चय दृष्टीस पडतात त्यांच्याकडे लक्ष देऊ आणि त्याच्या साहाय्यानें मनुष्यजातीचा इतिहास कोठपर्यंत मिळतो तें पाहूं. आपणास जे मोठाले भाषा-वंश दृष्टीस पडतात ते येणेंप्रमाणें.

( १ ) आर्यन् भाषासंघ यांमध्ये भारतीय, इराणी, यवनी, इटालिक, केल्टिक, स्लॅव्होनिक, लेटिक इत्यादि उपसंघ पडतात. आणि याशिवाय एट्रुस्कन, डेसियन, अल्बेनियन इत्यादि भाषा कोणत्या वर्गांत घालावयाच्या तें अजून अस्पष्ट आहेच.

( २ ) द्राविडी भाषासंघ यामध्ये हिंदुस्थानांतील तामिळ तेलगु इत्यादि दाक्षिणात्य भाषा, ब्राहुइ भाषा यांचा समावेश होतो.

( ३ ) सेमिटिक भाषासंघ यांत तीन उपसंघ दृष्टीस पडतात. ते अरमिओ-असुरियन, कनानी आणि अरबी होत.

( ४ ) हॅमिटिक भाषासंघ यांत इजिप्शिअन, लिबियन आणि इथिओपियन भाषा येतात.

( ५ ) अमेरिकन भाषासंघ अमेरिकेंतील इंडियन लोकांमध्यें शेंदीडशे भाषा दृष्टीस पडतात परंतु त्या सर्वांचें मूळ एकच आहे असे मानण्यांत येतें.

( ६ ) आफ्रिकन भाषासंघ. आफ्रिकेंतील निग्रोमध्ये अनेक भाषा दृष्टीस पडतात. त्याच्या भाषांचे पद्धतशीर भाषाशास्त्र अजून चांगलेंसे तयार झाले नाहीं. त्यांचे भाषासंघ येणे प्रमाणे ( १ ) हॉटेंटॉट ( २ ) बुशमन ( ३ ) वोलोफ ( ४ ) मन्डे ( ५ ) फेलुप ( ६ ) सोनराइ ( ७ ) हौसा ( ८ ) बोर्नु ( ९ ) मुइ ( १० ) एवे किंवा इवे ( ११ ) बन्टु ( १२ ) फुलु ( १३ ) न्युबियन.

( ७ ) नेग्रिटो
( ८ ) आस्ट्रेलियन
( ९ ) पाप्युअन
( १० ) मलायो पॉलिनेशियन
( ११ ) जपानी
( १२ ) कोरियन
( १२ ) बास्क
( १३ ) फिनोतार्तारि उर्फ उरल अल्ताइक
( १४ ) उत्तरध्रुव भाषासंघ
( १५ ) कॉकेशस भाषासंघ
( १६ ) सामासिक भाषासंघ. चिनी, अनामी, सयामी, ब्रह्मी, तिबेटी.

हे निरनिराळे भाषासंघ मनुष्यप्राणी चोहोंकडे पसरल्यानंतरच विकसित झालेले असणार तथापि कालानुक्रमानें पहातां यांपैकीं कांहीं संघ बरेच उत्तर कालीं पृथक् झाले असतील आणि कांहीं बऱ्याच जुन्या काळीं पृथक् झाले असतील.

काल व भाषासंघ यास जोडणारें एक तत्त्व सर्वसंमत आहे तें हें कीं, जेव्हां दोन भाषा दिसतात आणि त्या एका विशिष्ट वंशांत त्यांच्या सादृश्यावरून घालतां येतात तेव्हां एक काल्पनिक संघ आपण तयार करतों व तो समाविष्ट भाषांपेक्षा एका प्राचीन भाषेचा द्योतक समजतों. असे अनेक संघ एकांत एक घालतां आले तर त्याचें अस्तित्व कालाचे भाग पाडण्यास योग्य मर्यादा आहेत.

या तऱ्हेच्या विधानास एका दृष्टीनें थोडेंसे मर्यादित केलें पाहिजे.

भाषा प्रथमतः मोठा प्रदेश व्यापीत नाहीं. ती थोडका प्रदेश व्यापिते. एखादी भाषा त्या भाषेच्या आसपास जो प्रदेश असेल त्या प्रदेशातील भाषा सदृश असल्यास आपले वर्चस्व स्थापन करते. कालांतरानें त्या सर्व प्रदेशातील भाषा एकवटते.

या क्रियेमुळें आपणांस भाषाविस्ताराचें खरे साहित्य उपलब्ध होत नाहीं. आपणास एखादी भाषा शिरजोर पावून इतरावर ताबा गाजवीत आहे अशा स्थितींत सापडते आणि तिच्या आसमंतातील

भाषा पोटभाषांच्या स्वरूपांत दृष्टीस पडतात. ही क्रिया लक्षांत घेऊन भाषांकडून प्रदेशव्याप्ति कितपत झाली याविषयींची आपली कल्पना नियमित केली पाहिजे.

शरीरलक्षणाशिवाय व भाषांशिवाय तिसरें इतिहाससाहित्य म्हटले म्हणजे संस्कृति होय. संस्कृति म्हणजे जातिराष्ट्रादि संघाच्या सामुच्चयिक जीवितकर्मांचें साकल्य. संस्कृतीचा दर्जा आर्थिक, वैज्ञानिक आणि वाङ्मयविषयक विकासानें मोजला जातो. भूपृष्ठाच्या प्रत्येक भागामध्यें जेथें जेथें मनुष्याच्या अत्यन्त प्राचीन वस्तीचा पत्ता लागला आहे तेथें मनुष्य दगडाचीं हत्यारें वापरतांना दिसत आहे. म्हणजे मनुष्याचा प्रसार चोहोंकडे झाला तो मनुष्य प्राणी अश्मायुध संस्कृतींत किंवा तिच्या पूर्वीच्या संस्कृतींत असतां झाला हें उघड आहे. याच्यापुढील जो सांस्कृतिक इतिहास आहे तो प्रत्येक स्थानाचा स्वतंत्र आहे. म्हणजे ज्या काळीं मनुष्य चोहोंकडे पसरला त्या काळाच्या पुढें जे आपणांस सातत्य पहावयाचें तें भाषाविकासाचें, संस्कृतिविकासाचें आणि कदाचित् शरीरलक्षणविकासाचें होय. आपणांस जो संबंध जोडावयाचा तो शरीरलक्षणविकास व इतर संस्कृति या दोहोंचा. अश्मायुधकालोत्तर संस्कृतीचा इतिहास लिहितांना म्हणजे महावंशाच्या उपवंशांचा इतिहास लिहितांना जे भाग पडतील त्या वेळेस प्रत्येक काळची संस्कृति नोंदली पाहिजे. ती नोंदतांना प्रत्येक राष्ट्र कितपत प्रगत झालें होतें याचा हिशोब घेण्यासाठीं त्या त्या ठिकाणची भौतिक स्थिति पहावी लागेल आणि संस्कृतीच्या वैशिष्ट्याचें स्पष्टीकरण करावें लागेल. जेव्हां आपण विशिष्ट समुच्चयाकडे लक्ष देऊं तेव्हां त्या समुच्चयाच्या संस्कृतिवैशिष्ट्याविषयीं व विशिष्ट संस्कृतींतील विकासाच्या अनुक्रमाविषयीं लिहितां येईल. सामान्य क्रिया जी चोहोंकडे दिसते ती ही कीं, प्रथम ओबडधोबड दगडी हत्यारांचा काळ येतो. मग अधिक घडणीच्या हत्याराचा काल येतो व शेवटीं धातूंच्या उपयोगाचा काल येतो. धातुपूर्व संस्कृति म्हणजे प्रागैतिहासिक संस्कृति नव्हे. इजिप्तच्या ऐतिहासिक संस्कृतींत देखील धातु अगदीं पहिल्या प्रथम येत नाहींत. अश्मायुध स्थितींत असतां देखील राजांची कारकीर्द व तींत घडलेल्या गोष्टी यांची आठवण ठेवण्याचा प्रयत्न करण्याइतकी भावना तत्कालीन मनुष्यामध्यें वाढली होती. इजिप्तची संस्कृति आणि असुरांची संस्कृति या दोन प्राचीन संस्कृती होत. यांचा प्रारंभ कांहीं अंशीं अश्मायुध स्थितींत व कांहीं अंशीं तदुत्तर संस्कृतींच्या कालांत असा दिसतो.

मानवशास्त्रज्ञांनीं इतिहासपूर्वकालाचे संस्कृतिदृष्ट्या विभाग पाडले आहेत ते येणेंप्रमाणें:—

**अश्मायुध युग प्रथम काल.**— ओबडधोबड दगडी हत्यारें किंवा आउत मनुष्य प्राणी वापरीत होता तो काल.

**अश्मायुध युग द्वितीय काल.**— या कालांत दगडाचींच पण जरा नीटनेटकीं व कांहीं सूक्ष्म हत्यारें मनुष्य वापरीत होता.



**आयस युग.**— लोखंडी हत्याराचा काल. पुष्कळ राष्ट्रांमध्यें अश्मायुध युगाच्या द्वितीय कालानंतर आणि आयस युगाच्या आरंभापूर्वी कांस्यकाल किंवा ताम्रकाल येतो.

सर्वच संस्कृतींचा विकास एकसारखा होत नाहीं. शिवाय सर्व संस्कृतींत हीं युगें एककालीन नाहींत. म्हणजे एका राष्ट्रांत ज्या काळीं अश्मायुधयुग असेल तेव्हां दुसऱ्या राष्ट्रांत आयसयुग असेल.

संस्कृतीच्या इतिहासकालाचे हे विभाग पुष्कळसे सोयीसाठीं पाडलेले आहेत. जगद्विकासाच्या आणि मनुष्यप्रसाराच्या कौणत्याहि क्रिया किंवा पायऱ्या यांचे निदर्शक हे भाग मुळींच नाहींत. शास्त्रज्ञ स्थानिक साहित्य घेऊन कसाबसा अभ्यासास सुरवात करतो, त्या ज्ञानस्थितींतील हे विभाग आहेत. या अभ्यासानें बराचसा मनुष्येतिहास अवगत झाल्यानंतर पाडलेले हे कालविभाग नाहींत.

असुरांची संस्कृति व इजिप्तची संस्कृति या दोन संस्कृती हिंदुस्थानी संस्कृतीच्या अगोदरच्या आहेत कीं नंतरच्या आहेत हें निश्चयानें सांगतां येत नाहीं. आपण भारतीय संस्कृतीकडेच प्रथम वळूं. आणि भारतीय संस्कृतीचा आणि इजिप्त इत्यादि जुन्या संस्कृतींचा आपल्या संस्कृतीशीं संबंध कसा काय येतो तें नंतर पाहूं.

---

## प्रकरण ३ रें
## असुरराष्ट्रसंस्थापनेच्या नंतरच्या इतिहासार्थ वेदावलोकन.

अत्यंत प्राचीन काळचीं राष्ट्रें दोन आहेत; एक असुरांचें व दुसरें इजिप्तचें, असें संशोधकांचें आजचें मत आहे. ख्रिस्तपूर्व ८००० वर्षांपर्यंत या दोन्ही राष्ट्रांचें प्राचीनत्व नेलें आहे. या राष्ट्रांच्या कालांच्या आणि यानंतरच्या बुद्धपूर्व कालाच्या इतिहासासाठीं जीं महत्त्वाचीं साधनें आहेत त्यांत भारतीयांचे वेद हें एक महत्त्वाचें साधन आहे असे म्हटल्यास त्यास कोणीहि आक्षेप घेणार नाहीं. या कालाचा इतिहास वेदांच्या साहाय्यानें लिहिण्यासाठीं अनेक पंडितांनीं परिश्रम केले आहेत. संस्कृत भाषेचा पूर्वेतिहास पहावयाचा आणि त्या भाषेची इतर सदृश भाषांशीं तुलना करून सामान्य संस्था शोधावयाच्या ही पद्धति वापरून बराचसा अत्यंत प्राचीन इतिहास संशोधकांनीं उपलब्ध करून दिला आहे. त्या इतिहासाचें संयोजक फल आम्हीं पुढें देऊं. प्रथमतः ज्या साहित्याच्या परीक्षणानें इतिहास शोधावयाचा त्या साहित्याचें परीक्षण झालें पाहिजे. वैदिक वाङ्मय तयार झालें तें बराच उत्तरकालीन इतिहास दाखवितें तथापि त्या वाङ्मयांत व्यक्त झालेली भाषा आणि विकास पावलेल्या कल्पना यांचीं पूर्वरूपें हीं मंत्रकालाचे पूर्वरूप दाखवितात.

*सिंहावलोकन.*– वेदविद्या या विभागांत वेदांवर विवेचन पुष्कळ केलेलें आहे. त्यांत वेदकालाचा इतिहास लिहावयाचा म्हणजे समाजाच्या अनेक अंगांच्या स्थित्यंतरांचा आणि विकासाचा इतिहास लिहावयास पाहिजे आणि त्या अंगांच्या अनेक विकासांचा अन्योन्याश्रय दाखविला पाहिजे म्हणून सांगितलें. इतिहासविषयापैकीं ज्या कांहीं गोष्टींचा बराच इतिहास त्यांत येऊन गेला आहे अशा गोष्टी म्हटल्या म्हणजे ( १ ) यज्ञसंस्था ( २ ) वैदिक वाङ्मय ( ३ ) ब्राह्मणजाति ( ४ ) देवता ह्या होत. या सर्वांचा अन्योन्याश्रयहि दाखविला आहे. या अंगांचा इतिहास तरी संपूर्ण दिला आहे असे नाहीं तर त्या अंगांचा अन्योन्याश्रय समजून वेद स्पष्ट होण्यास मदत व्हावी इतकाच दिला आहे. पद्धतवार इतिहास देण्यास पूर्व तयारी म्हणून त्या भागाचें महत्त्व आहे. *ज्या अंगांचा इतिहास वेदविद्या या भागांत फारसा आला नाहीं* अशीं अंगें म्हटलीं म्हणजे ( १ ) राजकीय खळवळी ( २ ) कुलें, जाति, गोत्रें, संप्रदाय ( ३ ) गृहस्थधर्म ( ४ ) आर्यन् लोकांचा व वैदिक संस्कृतीचा प्रसार ( ५ ) भाषा ( ६ ) व्यापक विचार आणि तत्त्वज्ञान हीं होत.

मागें जें ऐतिहासिक विवेचन आलें आहे त्याचें स्थूल स्वरूप म्हटलें म्हणजे मंत्ररचनेच्या नंतरच्या कालांत यज्ञसंस्था कशी वाढत गेली आणि त्याबरोबर ब्राह्मणजाति आणि वेदांचीं संहितीकरणें हीं कशीं बनलीं यांचें स्पष्टीकरण हें होय. या विवेचनाचें फलद्रूप सिंहावलोकन केलें असतां पुढील विवेचन समजण्यास सोपें जाईल म्हणून तें येथें करीत आहों.

आज आपणांस वेद ज्या स्थितीत दिसतात ती स्थिति ( म्हणजे वेदांचें तृतीय संहितीकरण ) कुरुयुद्धाच्या सुमारास उत्पन्न झाली असावी.

ऋचांचें संहितीकरण करून ऋग्वेद तयार करण्याची क्रिया सोमयागविकासाशीं संबद्ध आहे. जेव्हां लहानसहान याग नाहींसे होऊन मोठे याग करण्याची वेळ आली तेव्हां मोठे याग करण्यासाठीं होत्रमंत्र गोळा करण्याची क्रिया जोरानें सुरू झाली. तेव्हां ऋग्वेद तयार होऊं लागला.

यज्ञामध्यें आजचें यज्ञस्वरूप उत्पन्न होण्यापूर्वी अध्वर्यु, होता व ब्रह्मा यांच्या क्रियांचें वैशिष्ट्य स्थापन झालें नव्हतें. ऋग्मंत्र तयार होऊं लागले त्याच वेळेस कांहीं अंशीं यज्ञक्रिया, सामुच्चयिक झाली होती पण ऋत्विजांचें विशिष्टीकरण फारसें झालें नव्हतें. हें विशिष्टीकरण फार हळू हळू झालें. मंत्रांनीं परीक्षण केलें असतां असें दिसून येईल कीं अध्वर्यू होत्रमंत्र म्हणत आहेत व होते हवनाची क्रिया करीत आहेत.

ऋग्वेदामध्यें जो सोमयाग दिसत आहे तो आजच्याप्रमाणें किंवा ब्राह्मी वेदांच्या अन्योन्याश्रयानें होणारा आणि ब्राह्मणग्रंथांवरून स्पष्ट होणाऱ्या सोमयागाप्रमाणें पशुयुक्त दिसत नाहीं, तर [illegible] सोमयाग अंगिरसाच्या स्वरूपाचा दिसतो.

या वाढलेल्या सोमसंस्थाचें विकासस्थान सतलज नदीच्या पूर्वेकडील भाग दिसतो.

ब्राह्मण जाति ही भिन्न कर्मांचे ऋत्विज या रूपानें प्रथम अस्तित्वात आलेली दिसते आणि हे ऋत्विजांचे संघ पुढें भिन्न जातिस्वरूप पावलेले दिसतात. म्हणजे एक ब्राह्मणजाति विभागली गेली असें झालें नाहीं. प्रथम ऋत्विजांचे वर्ग विभागले गेले आणि त्या विभागांपैकीं बरेच विभाग जातिरूप पावले.

दैवतेतिहासामध्यें देवतांचें जें स्वरूप ऋग्मंत्रांच्या साहाय्यानें वर्णन केलें आहे तें यज्ञविकासकालाचें नाहीं. तर ज्या कालांत ऋत्विजांचें विशिष्टीकरण पूर्ण झालें नव्हतें व यज्ञसंस्था ही देखील फारशी गुंतागुंतीची नव्हती अशा कालांतील आहे.

ऋत्विजांचे संघ बनत चालले ते *बनतांना अनेक संप्रदाय* अगोदर बनत होते. त्या संप्रदायांपैकीं कांहीं संप्रदाय मृत झाले आणि कांहीं टिकले. जे टिकले त्यांनीं यज्ञसंस्थेस आपल्या इच्छेप्रमाणें स्वरूप दिलें.

कृष्ण यजुर्वेद आणि अथर्व वेद यांची तुलना करून या दोहोंस सामान्य वाङ्मय कोणतें यांचें कोष्टक दिलें आहे. तथापि त्या कोष्टकावरून कोणतेहि निर्णय काढले नाहींत. तें काम भावी संशोधकांवर सोंपविलें आहे.

यज्ञ करण्याचा धंदा करणारे लोक म्हणजे ऋत्विज यांमधील अनेक स्पर्धा दुसऱ्या विभागांत दाखविल्या आहेत. भरतांनीं ज्या काळांत कुरुक्षेत्रापर्यंतचा प्रदेश काबीज केला त्या वेळच्या वसिष्ठ-विश्वामित्रांच्या भांडणाची कथा त्यांत आली नाहीं तर भरतांची स्थापना कुरुक्षेत्रांत झाल्यानंतर प्राचीन अल्प यज्ञाचे मोठे यज्ञ कसे बनत गेले आणि ते बनल्यानंतर त्यांत कसे पक्ष उत्पन्न झाले यांचेंच विवेचन त्यांत आहे. प्रथम तत्कालीन स्थिति स्पष्टीकरणासाठीं घेतली आहे. म्हणजे शाखांप्रमाणें भिन्न झालेला ऋग्वेद, शाखांप्रमाणें भिन्न झालेले यजुर्वेद व सामवेद आणि या त्रयीवाल्यांमध्यें आपलें बस्तान कायमचें बसविण्यांत यश पावल्यानंतर आवृत्ति पावलेला अथर्व वेद अशा तऱ्हेची परिस्थिति आणि तिचीं कारणें आणि ती परिस्थिति यज्ञसंस्थेच्या ज्या स्थितींत उत्पन्न झाली ती यज्ञसंस्थेची स्थिति वर्णन करून पूर्वीच्या कालाकडे अवलोकन केलें आहे. ऋत्विजांचा व यज्ञसंस्थेचा मंत्रपूर्व इतिहास दिला गेला नाहीं. प्राचीन संप्रदायांचा इतिहास आला नाहीं. जे विवेचन केलें तें फार त्रोटक झालें आहे. सबंध धर्मेतिहास यांत आला नाहीं, ब्राह्मणजातीचा इतिहास संगतवार आला नाहीं. धर्मेतिहास, वाङ्मयेतिहास आणि सामाजिक इतिहास संगतवार लिहिण्यासाठीं स्थूल कल्पना देऊन ठेवल्या आहेत आणि इतिहास लिहिणांना ज्या गोष्टी सिद्ध कराव्या लागतील किंवा ज्या गोष्टींची माहिती देण्यासाठीं विषयांतर करावें लागेल अशाहि गोष्टी त्यांत वर्णिल्या आहेत. वैदिक वाङ्मयाचा ऐतिहासिक उपयोग करण्यापूर्वी वैदिक धर्मानें आणि वैदिक

वाङ्मयाचें जें स्थूल ज्ञान लागतें तें देऊन मंत्रपूर्व आणि मंत्ररचनेच्या कालाचें ऐतिहासिक विवेचन समजण्यासाठीं जी मनोभूमिका तयार करावयाची ती वेदविद्या या भागांत उत्पन्न करण्याचा प्रयत्न केला आहे. प्रस्तुत विभागांत वैदिक ग्रंथांच्या साहाय्यानें जो इतिहास दिला आहे त्यास परिशिष्ट म्हणून तो ग्रंथ वारंवार पहावा लागेल.

ऋषींची गीतें आणि त्यांचे विषय जे देवस्तोत्रें त्यांकडून आतां अधिक ऐहिक विषयाकडे वळूं. आणि मनुष्य वर्गाच्या दुसऱ्या हालचाली काय दिसतात त्या पाहूं.

ऋग्वेदाचें थोडेसें निरीक्षण झालें तरी त्यांतील मानवी घडामोडी कोणासहि दिसल्यावांचून रहाणार नाहींत. या हालचालींचें स्थान एकंदर जगद्विकासांत देणें हें ऋग्मूलक इतिहासार्थ प्रयत्नाचें पहिलें कार्य होय.

जगद्विकासांतर्गत मानवेतिहास म्हणजे पृथ्वीवरील मनुष्यरूप प्राण्यापासून मनुष्याच्या हालचालीचा एकंदर इतिहास होय. मागच्या प्रकरणांत सांगितलें आहे कीं मनुष्यप्राणी मानवरूप प्राण्यापासून विकसित होऊन त्याचा चोहोंकडे विस्तार झाला असें भौतिकशास्त्रज्ञांचें मत आहे. त्याचा विकास कोठें झाला याविषयीं अद्याप एकमत नाहीं. मनुष्यप्राण्याच्या मानवपूर्वस्थितीपासून एकंदर मनुष्येतिहासांतील बऱ्याच अर्वाचीन काळापर्यंत म्हणजे ज्या काळांत अत्यंत प्राचीन राष्ट्रें दृष्टीस पडतात, त्या काळापर्यंतचा इतिहास अजून तयार व्हावयाचाच आहे. या दीर्घ कालांत कोणत्या परंपरेनें इतिहासविकास झाला असावा या संबंधाची कल्पना मागें ( १ ला विभाग पृ० ७८ ) दिली आहे.

भारतेतिहासांत प्रस्तरकालीन व आयस पूर्वयुगांतील मनुष्याच्या अस्तित्वाबद्दल पुरावे सांपडले आहेत ते पुढें योग्य स्थलीं दिले आहेत. हिंदुस्थानांत एकंदर किती मानववंशांचें अस्तित्व आहे, याबद्दल विवेचन पहिल्या विभागांत ( पृष्ठ ८१ पहा ) केलेंच आहे.

**भारतेतिहास व भारतीयेतिहास.**—भारताचा इतिहास आणि भारतीयांचा इतिहास या दोन गोष्टी भिन्न आहेत. भारतांत जे लोक आले असतील त्यांची भारतांतील चळवळ लेखी द्यावयाची हा भारतेतिहास होय. भारतीयांचा इतिहास द्यावयाचा म्हटला म्हणजे कोणत्या विशिष्ट लोकांस 'भारतीय' हें नाव द्यावयाचें हें प्रथम ठरवावें लागेल आणि त्यांचा इतिहास —मग ते भारतांत असतांना असोत किंवा भारताबाहेर असोत— द्यावा लागेल. भारतांत जे अनेक मानववंश दृष्टीस पडतात त्यांपैकीं एकास भारतीय म्हणावयाचें व दुसऱ्यास म्हणावयाचें नाहीं हा इत्यादि होईल. तथापि केवळ सोय म्हणून भारतीय हा शब्द मुसलमानांच्या आगमनापूर्वीच्या लोकांस लावून भारतीयेतिहास मुसलमानी इतिहासापासून निराळा करतां येईल ज्यांस भारतीय म्हणतां येईल त्यांतहि आर्यन् आणि द्राविड असे दोन महावंश अनेक भाषाशास्त्रज्ञ महत्त्वाचे मानतात आणि "आर्यन्" लोकांच्या आगमनापासून भारतीयांचा इतिहास ज्ञात आहे असें समजतात. वेदांत ज्या लोकांचें कार्य दिसून येतें आणि वेदभाषा ही ज्या लोकांची भाषा होती त्या लोकांचा हिंदुस्थानांत येण्यापूर्वींचा इतिहास द्यावयाचा हा 'आर्यन्' इतिहासाचा भाग होय हा इतिहास निरनिराळ्या राष्ट्रांतील उत्तरकालीन अवशेषांच्या तौलनिक अभ्यासानें तयार करण्यांत आला आहे. त्या अभ्यासाकडे वेदभाषी अथवा मात्र ( वेदभाषा व मंत्रवाङ्मय ही ज्या लोकांची होती ते ) लोकांच्या हिंदुस्थानांतील कार्याकडे सगोदर लक्ष देऊन मग गेलें पाहिजे.

**आर्यन् व त्यांचा काल्पनिक इतिहास.**—वेदभाषी हा शब्द आर्य या शब्दाचा उपयोग न करण्यासाठीं वापरला आहे. कारण कीं, आर्य शब्दाचा उपयोग करण्यांत लेखकांनीं फार घोटाळे केले आहेत प्रथमतः प्रश्न उत्पन्न होतो कीं, आपण इतिहास लिहितों हा कोणाचा ? आर्यांचा ? आर्य म्हणजे कोण ? आज वाटेल त्या जातीनें हें नाव स्वतःस लावून घ्यावें ही स्थिति आहे. लेखकानें किंवा वक्त्यानें स्वतःस अप्रिय अशा वर्गास हें भूषणास्पद नाव लावावयाचें नाकारावें ही जातिविषयक स्वच्छंदी लेखकाची वृत्ति आहे तर निर्विकल्प मनानें वेदांत उल्लेखिलेले आर्य म्हणजे कोण हें ठरविलें पाहिजे. पाश्चात्य शास्त्रज्ञ "आर्य" शब्द "आर्यन्" या रूपानें वापरतात आणि "आर्यन्" या शब्दाचा उपयोग ज्या लोकांच्या भाषेचें संस्कृत भाषेशीं मुलीचें, नातीचें किंवा बहिणीच्या नातीचें नातें असतें त्या लोकास लावतात. आर्य शब्दावर फिदा होऊन यूरोपीयांना तो शब्द स्वतःस लावून घेतला आणि यामुळें त्या शब्दास अनेक अर्थांतरें उत्पन्न झालीं. ती लक्षांत न घेतल्यामुळें गैरमाहित पाश्चात्य व भारतीय लेखकांची आर्य या संस्कृत शब्दाचें आर्यन् हें केवळ रूपांतर आहे अशी समजूत झाली. व वैदिक 'आर्य' शब्दाचें ते 'आर्यन्' किंवा इंग्रजी 'आर्यन्' शब्दाचें ते 'आर्य' असें भाषांतर करूं लागले. ती समजूत चुकीची आहे 'आर्यन्' असें भाषांतर करणें हें आर्य या शब्दाच्या भारतीय उपयोगापासून दूर जाणें आहे. तथापि वेदांतील आर्य या शब्दांत यूरोपीय यांच्या "आर्यन्" या शब्दाचा अर्थ घुसविण्याचा प्रयत्न होत आहे.

यूरोपीय लेखकांनीं कल्पनापरंपरा उत्पन्न करून दिली आहे ती अशी. अत्यंत प्राचीन म्हणजे मनूच्या कालीं कांहीं लोक हिंदुस्थानांत आले ते गोरे होते, आपणांस ते आर्य म्हणवीत, ज्यांशीं ते लढले ते लोक काळे होते, त्यांस ते दस्यु म्हणत. त्या दस्यूंपासून आर्यांनीं देश जिंकला. या तऱ्हेची इतिहास कसा असावा या संबंधाची मनोरम कल्पना तयार करून पाश्चात्य संशोधकांनीं इतिहास बराच सोपा केला आहे. आणि 'आर्यांनीं' "पराभूत केलेल्या" "मूळच्या" म्हणजे "द्राविडी" लोकांस दस्यु इत्यादि विशेषणें लावली जात असावीं अशी कल्पना काढली गेली आहे. कातडीच्या रंगामुळें द्वेषबुद्धि अत्यंत स्वाभाविक आहे, इत्यादि सिद्धांत काढणाऱ्या आणि वर्णद्वेषाचें समर्थन करूं पाहणाऱ्या लोकांना वेदाचा अर्थ करतांना अर्थ

करणारांनी जी पदरची कल्पनाशक्ति खर्च केली तिचा बराच उपयोग झाला आहे. आणि काळ्या वर्णामुळे हिंदुस्थानातील लोकांची गोऱ्या लोकांपुढें जी मानखंडना होते, त्या खंडनेमुळें आपल्या जेतृत्वाला आधार जर कोठें सांपडेल तर पहावा आणि आपण जेत्यांतच नव्हे तर गोऱ्यातहि मोडू असा आधार सांपडला तर बरा या भावनेनें हिंदुस्थानातील सुशिक्षितांनीं आपले पूर्वज "आर्य" (म्हणजे आर्यन्) होते, यूरोपियन लोकांशीं संबद्ध जे लोक ते आर्य, आणि त्यांनीं देश्य काळ्या लोकांना जिंकलें आणि दस्यू, म्हणजे तेच काळे लोक, इत्यादि कल्पनांचें मोठ्या आनंदानें स्वागत केलें.

यूरोपीय कल्पना अशी की, (१) वैदिक वाङ्मय ज्यांनीं उत्पन्न केलें ते सर्व लोक एका विशिष्ट मानववंशाचे होते. (२) त्यांना "आर्य" हें नाव सामुच्चयिक होतें तें जातिवाचक नाव होते आणि (३) दस्यु म्हणून जे लोक होते ते निराळ्या जातीचे होते (४) ते काळे होते. (५) त्या काळ्याच्या आणि गोऱ्या "आर्य" लोकांच्या सन्निकर्षानें "जातिभेद" उत्पन्न झाला (६) वर्ण आणि जाति म्हणजे एकच. (७) वर्ण याचा मूळचा अर्थ रंग. (८) रंगांत फरक हेंच जातिभेदाचें म्हणजे (प्रचलित कल्पनाप्रमाणें) चातुर्वर्ण्याचें मूळ. या कल्पना फार पसरल्या आहेत. या कल्पना कितपत खरोखर आहेत याचा तपास करण्याची बुद्धि पाश्चात्य किंवा भारतीय संशोधकवर्गास मुळींच नाहीं. यूरोपीय आणि भारतीय ब्राह्मणांचा वर्ग या दोघांचीहि वरील कल्पना खुशामत करतात. मग त्यावर हल्ला तरी कोण आणि कशाला करतो. अशा तऱ्हेची मनोरचना सत्यशोधनाच्या मार्गांत बरेंच विघ्न करीत आहे. आर्य हें नांव भारतीय लोकांतील श्रेष्ठांनीं पूर्वीपासून वापरलेलें. पण तें "संशोधकां"च्या तावडींत वंशनाम झालें. संस्कृत भाषेशीं संबद्ध अशा भाषा बोलणारांचें हें सामान्य वंशनाम होते अशीहि कल्पना करून तें वंशनाम निरनिराळ्या यूरोपीय राष्ट्रांच्या कोणत्या कोणत्या नांवांत, अगर शब्दांत अद्याप टिकलें आहे, याचाहि पत्ता यूरोपीयांनीं लावला आहे. आर्य हें वंशनाम होतें हें आमच्या मतें अजून सिद्ध होत नाहीं. आर्य आणि दस्यु म्हटलेले लोक भिन्न मानव वंशांतले होते आणि ज्यांशीं आर्य लढले ते सर्व "दस्यू" म्हटले जात होते, या दोन कल्पनाच आम्ही ग्रहण करावयास तयार नाहीं. ऋग्वेदांत फार लढाया दिसत नाहींत. ज्या कांहीं दिसतात त्यांपैकीं कांहीं देवांच्या व उरलेल्यांपैकीं बहुतेक दाशराज्ञ युद्धाशीं संबद्ध दिसतात. दाशराज्ञ युद्धांतील स्वारी करणाऱ्यांस प्रतिकार करणारा पक्ष केवळ दस्यू होता असें दिसत नाहीं. ऋग्वेदांत ज्या लोकांची चळवळ व्यक्त होते ते लोक "आर्य" या वंशबोधक सामान्य नामानें आपणांस स्वतः संबोधीत असत हेंच आम्ही नाकबूल करतों. आर्य, दस्यु, वर्ण या तीन गोष्टींसंबंधानें आणि वेदांतील लढायांचा या तीन कल्पनांशीं संबंध काय होता या संबंधानें सत्य काय होतें हें वैदिक पुराव्यावरून काढणें ही वेदमूलक इतिहासाची ५६ ? पायरी होय. आर्य हें नांव यजनशील वर्गांचें व तसेंच

"शिष्ट" या अर्थाचें म्हणजे वर्गवाचकच होतें असें आमचें मत झालें आहे. आर्य हें वेदकालीन निरनिराळ्या राष्ट्रांचें सामान्य नाम कितपत होतें याचा विचार पुढें केलाच आहे.

एक विचार प्रथम स्थिर केला पाहिजे तो हा कीं, समाजांतील विशिष्ट वर्गवाचक जें नांव असेल तें राष्ट्रवाचक नांव नव्हे. आपणांस आतां हें पाहिलें पाहिजे कीं, "आर्य" किंवा "अर्य" हा शब्द जातिवाचक आहे कीं वर्गवाचक आहे. याच्या विषयीं कांहीं एक संशय राहूं नये म्हणून हे शब्द ऋग्वेद संहितेमध्यें जेथे जेथे आले आहेत, त्या सर्व ऋचा त्यांच्या अर्थासह पुढें दिल्या आहेत. आर्यस्वरूपनिश्चयाचा प्रश्न अत्यंत महत्त्वाचा आहे. कारण कीं, प्राचीन इतिहासाचा पाया हाच आहे. आणि यासाठीं आर्य शब्दाचा आणि तशाच अर्थानें येणाऱ्या अर्य शब्दाचा प्रत्येक उपयोग वाचकांनीं तपासावा अशी आमची शिफारस आहे.

वेदांत अर्य व आर्य असे दोन शब्द आहेत. कांहीं ठिकाणीं अर्य व आर्य हे दोन्ही शब्द एकाच अर्थानें आहेत तथापि बऱ्याच ठिकाणीं नाहींत लोकनिश्चयार्थ आर्य शब्दाचें सूक्ष्म निरीक्षण करतेवेळीं प्रसंगी अर्य शब्दाचेंहि निरीक्षण केलें पाहिजे. आपणास लोकनिश्चय करावयाचा तो हा कीं वेदांत अर्य व आर्य या शब्दांचे अर्थ काय होते. आर्य हा शब्द किंवा अर्य हा शब्द शिष्टजनवाचक होता काय ? अथवा यजनशील वर्गांचा द्योतक होता काय? कीं तो वंशवाचक होता. या शब्दाच्या स्पष्टीकरणासाठीं जे उतारे पुढें दिले आहेत त्या उताऱ्यांवरून असें दिसून येईल कीं, पुष्कळ ठिकाणीं ऋचांचा अर्थ स्पष्ट होत नाहीं, तथापि त्या ऋचांचा अर्थ जितका स्पष्ट होतो तितका अर्य किंवा आर्य हा शब्द गुणवाचक आहे अगर वंशवाचक आहे याचा निश्चय करण्यास अपुरा नाहीं.

मांत्र अथवा वेदभाषी, आर्यन् व आर्य या तीन शब्दांचा संबंध आम्ही येणेंप्रमाणें दर्शवितों. आर्यन् हा मानववंशविषयक आणि आजचा शब्द होय. कांहीं इराणी व यूरोपीय व कांहीं भारतीय ज्या वंशांत भाषासंबंधामुळें मोडतात तो समुच्चय आर्यन् या नांवानें संबोधिला जातो. शक, मग वगैरे देखील आर्यन्मध्यें मोडतील. आर्य म्हणजे शिष्ट अगर यजनशील या अर्थानें वेदांत वापरला आहे. दास, दस्यु हे याचे विरोधवाचक शब्द होत. हा जातिबोधक शब्द नव्हे. वेदभाषी हा शब्द आर्यन्वंशांतील एका विभागाचा द्योतक आहे. हिंदुस्थानामध्यें वेद आणणाऱ्या लोकांच्यापूर्वी जे लोक होते, ते आर्यन् असतील पण ते मांत्र अथवा वेदभाषी नाहींत.

आर्य आणि दस्यु यांचा सामुदायिक कलह वेदांत वर्णिला आहे अशी जी जुन्या लोकांनीं प्रचलित केलेली समजूत आहे तिचा विचार प्रथम झाला पाहिजे. आपणास वरील आर्यविषयक प्रश्न सोडविण्यासाठीं तीन प्रश्न विचारले पाहिजेत.

(१) आर्य किंवा अर्य शब्द महावंशवाचक किंवा राष्ट्रवाचक किंवा राष्ट्रसमुच्चयवाचक आहेत काय ?

(२) त्यांचा आणि दस्यूंचा सामुच्चयिक उल्लेख वेदांत आहे काय?

(३) आर्यविषयक उतारे एकत्र केले तर त्यांची इतिहास-सूचक संगति लागते काय?

हे तीन प्रश्न मनात धरून आपण मंत्रराशींचें अवलोकन केलें तर वरील तीनहि प्रश्नांस नकारार्थी उत्तरांखेरीज दुसरें उत्तर देतां येत नाहीं.

**दस्यु नांवानें ओळखल्या जाणाऱ्या लोकांनीं हिंदुस्थान वसला होता त्यांस आर्यन् लोकांनीं जिंकल्याची कथा वेदांत आहे म्हणून पूर्वीच्या लेखकांनीं दिलेली माहिती चुकीची आहे.**

आर्यन् म्हणून ज्या महावंशास आज लोक संबोधितात तो शब्द आर्य शब्दाचें रूपांतर आहे दुसरें कांहीं नाहीं, आणि संशोधकांनीं संस्कृत ग्रंथांतून वापरलेला आर्य शब्द वापरतांना त्याचें आर्यन् हें रूप केलें एवढेंच, तसें करण्यानें अर्थांतर झाले नाहीं, अशी वरीचशी प्रचलित समजूत आहे, पण ती चुकीची आहे. *यूरोपीय संशोधकांनीं आर्य हा शब्द वैदिक ग्रंथांत पाहिला तो दास आणि दस्यु यांच्याशीं विरोधवाचक दिसला आणि मंत्रवाङ्मयाचें क्षेत्र पंजाब पाहिले,* तेव्हां आर्य ही कोणती तरी एक नवीन जात होती व *ज्या अर्थी ती पंजाबांत आहे त्या अर्थी ती देशप्रवेश करीत होती* अशी त्यांची कल्पना झाली. संस्कृत भाषेशीं व वेदभाषेशीं इतर राष्ट्रांचा संबंध दिसला तेव्हां त्या सर्व राष्ट्रांसहि आर्य म्हणजे आर्यन् हें नाव लावण्यांत आलें. हेंच सामुच्चयिक नाव पसंत होण्याचें कारण हें कीं, वेदांतील आर्य हें त्यास जातिवाचक नांव वाटलें आणि वेद ज्याअर्थी सर्वांत जुना ग्रंथ त्याअर्थी त्यांत उल्लेखिलेल्या लोकांचें आर्य हें नाव सामुच्चयिक जुनें नांव असावें अशी समजूत झाली. पुढें भाषाशास्त्र जसें वाढूं लागलें तेव्हां संस्कृत भाषेशीं संबंध दृष्टीस पडणाऱ्या सर्व भाषांस हें नाव मिळालें आणि आर्यन् हें एक महावंशवाचक नांव तयार झालें. त्याचा परिणाम असा झाला कीं, वेदांतील किंवा इतर संस्कृत ग्रंथांतील आर्य या शब्दासहि वंशवाचक म्हणजे जातिवाचक अर्थ गैरसावध लेखकांनीं चिकटविला. यासाठीं आर्यन् नांवाची एक जाति देशप्रवेश करीत आहे असा पुरावा मत्रांत आहे या कल्पनेचेंच आपण परीक्षण करूं.

**"आर्य" शब्दाचा अर्थनिश्चय.**— पुढील ऋग्वेदांतील अर्य, आर्य व तत्साधित शब्दाविषयींच्या उताऱ्यावरून स्पष्ट होईल, कीं अर्य किंवा आर्य या दोन्हीं शब्दांनीं महावंशवाचक (म्हणजे रेस Race हा अर्थ देणारा) एकहि उतारा वेदांत नाहीं. अर्थ सायणानुसार दिला आहे व इतर पंडितांचा अर्थाविषयीं मतभेद असल्यास तोहि दिला आहे.

प्रथमतः अर्य शब्द घेतला आहे आणि त्याचा वाक्यांत अर्थ जाड्या अक्षरांनीं दिला आहे.

अर्य हा शब्द आर्यवाचक अनेक ठिकाणीं नसून केवळ अरि शब्दाचें अनेकवचन म्हणून आला आहे. तथापि वाचकांच्या प्रत्यक्ष अवलोकनासाठीं म्हणून तेहि उतारे दिले आहेत.

**निसर्वसेन इषुधीरसक्त समर्यो गा अजति यस्य वष्टि**
[ऋ. १. ३३, ३]

सकल सेनायुक्त **श्रेष्ठ** (इंद्र) भाता पाठीवर चढवितो. ज्याला गाई देण्याची इच्छा करतो त्याच्या घरीं चांगल्या रीतीनें गाई आणतो.

[अर्य = पालयिता (पंडित)].

**वनेम पूर्वीरर्यो मनीषा अग्निः सुशोको विश्वान्यश्याः**
(ऋ. १. ७०, १)

(आम्ही) स्तोत्रानें पुष्कल **शत्रूंना** सहाय्य करूं. सुप्रकाश अग्नि सर्व कर्मे व्यापो.

**दधन्नृतं धनयन्नस्य धीतिमादिदर्यो दिधिष्वो विभृत्राः।**
(ऋ. १. ७१. ३)

आङ्गिरस सत्या (अग्नी) ला स्थापिते झाले. आणि अग्नीसंबंधीं पूजाअर्चा धन समजू लागले. **श्रेष्ठ** अग्निहोत्र धारण करणारे अग्नीला भजू लागले.

**सनेम वाजं समिथेष्वर्यो भागं देवेषु श्रवसे दधानाः।**
(ऋ. १. ७३, ५).

आम्हाला संग्रामात **शत्रूंचें** धन मिळो; मग यश मिळावें म्हणून आम्ही देवाना हविर्भाग देत जाऊं.

[अर्य = अरि म्हणजे शत्रु याचें अनेकवचन (ग्रिफिथ, सायण व पंडित)]

**यो अर्यो मर्तभोजनं परादाति दाशुषे।**
**इन्द्रो अस्मभ्यं शिक्षतु· ··· ···॥**
(ऋ. १. ८१, ६)

जो **प्रभु** (इंद्र) हविर्दात्या उपासकाला उपर्युक्त अन्नादि पदार्थ देतो, ते पदार्थ तो इंद्र आम्हाला देवो.

[अर्य = प्रभु (इंद्र) पंडित].

**अन्तर्हिख्यो जनानामर्यो वेदो अदाशुषाम्।**
(ऋ १. ८१, ९).

हवि न अर्पण करणाऱ्या लोकांच्या घरीं असलेलें धन तुज **प्रभूला** माहीत आहे.

[अर्य = सर्वेषां स्वामि (प्रभु=इंद्र) पंडित]

**पैद्वो वाजी सदमिद्धव्यो अर्यः।**
(ऋ. १. ११६, ६).

पेद्व नामक उपासकाच्या अश्वाची नेहमीं धावा करण्यासाठी (बोलावण्यासारखी) **योग्यता** आहे.—(पंडित)

[अर्य = शत्रूणां प्रेरयिता (सायण)]

**युवं श्वेतं पेदव इन्द्रजूतमहिहनमश्विना दत्तमश्वम्।**
**जोहूत्रमर्यो अभिभूतिमुग्रं सहस्रसां वृषणं वीड्वङ्गम्।**
(ऋ. १ ११८, ९).

हे अश्वी हो, तुम्ही पेदूला शुभ्रवर्णाचा, इंद्रानें पाठविलेला शत्रूंना मारणारा, मोठ्यानें खिंकाळणारा, सामर्थ्यवान सहस्रावधि धन देणारा तरुण बळकट घोडा देते झालेत.

[ अर्य. = अरेः शत्रोः अभिभूतिम् ( ग्रिफिथ, सायण व पंडित ) ]

आनो भज मघवन् गोष्वर्यो ( ऋ. १. १२१, १५ ).
हे स्वामी ( धनपती इंद्रा ), तूं आम्हांला गाई मिळवून दे.
[ अर्यः = स्वामी ( सायण ): अर्यः = धनपतिः ( पंडित )
अर्यः = शत्रु foo ( ग्रिफिथ ) ]

अर्यो गिरः सद्य आजग्मुषी रोसाश्चाकन्तुभयेष्वस्मे
( ऋ. १. १२२, १४ ).

हे देदीप्यमान ( देव ) आम्ही भाविकपणानें केलेल्या स्तुती आम्हा उभयतांवर कृपा करून मान्य करोत.
[ अर्य. = अरेः देवान्प्रति गन्त्रीः = भाविका ( पंडित )
अर्यः = अरणीयी विशेषा देवाना सद्यः जग्मुषी. । सायण ]

अध यदेषां पृथुबुध्नास एतास्तीर्थे नार्यः पौंस्यानि तस्थुः ।
( ऋ. १. १६९, ६ ).

ज्याप्रमाणें युद्धभूमीवर शत्रूंचीं सैन्यें उभीं असतात त्याप्रमाणें हे स्थूलजघन हरीण उभे आहेत.
[ अर्य = अरेः शत्रोः ( सायण ) अर्यः = रणोद्युक्तस्य स्वामिनः
( पंडित, ग्रिफिथ ) ]

तावामद्यतावपरं हुवेमोच्छन्त्यामुषसि वह्निरुक्थैः ।
नासत्या कुहचित् सन्तावर्यो दिवो नपाता सुदास्तराय॥
( ऋ. १. १८४, १ ).

हे नासत्य हो ( अश्वीहो ), तुम्ही युयुत्नानां, तुम्ही कोठेंहि असला तरी, उषःकाळ होताच हवींनीं व स्तोत्रांनीं भक्तिपूर्वक यजमानासाठीं आवाहन करूं. आज आह्वान करूं व उद्या करूं.
[ अर्यः = खोनदील ( पंडित ). अर्यः = ईरयिता ( सायण ) ]

भूरिचिदर्यः सुदास्तरायेषा मदन्त इषयेम देवाः ।
( ऋ. १. १८५, ९ ).

देव हो स्तोते आम्ही अनयुक्त असें यजमानाला पुष्कळ धन इच्छितों.

विश्वा इदर्यो अभिदिप्स्वो मृधो बृहस्पतिर्विववर्हा रथाँइव
( ऋ. २. २३, १३ ).

स्वामी बृहस्पति, आमचा पराभव करणाऱ्या; उपद्रव करणाऱ्या व हिंसक अशा शत्रूंना रथाप्रमाणें तोडतो. ( अनुपासक पंडित ).

बृहस्पते अतियदर्यो अर्हाद्द्युमद्विभाति । तद् ... धेहि ...
( ऋ. २. २३, १५ )

हे बृहस्पते, श्रेष्ठ मनुष्य जे योग्य मानील जें तेजोयुक्त असेल, तें दे.

अधो नपादर्यस्य मह्ना विश्वान्यर्यो भुवना जजान
( ऋ. २. ३५, २ ).

स्वामी अग्नि स्वसामर्थ्यानें सर्व जग उत्पन्न करता झाला.

आ याहि पूर्वीरति चर्षणीरां अर्य आशिष उप नो हरिभ्याम् ।
( ऋ. ३. ४३, २ ).

( हे इंद्र ) पुरातन लोकांना सोडून ये. ( आणि आमचा ) स्वामी तूं आमच्या प्रार्थना घोड्यासह येऊन स्वीकार.
[ अर्यः गमन करणाऱ्या ( पंडित ). ]

अनन्ते अन्तः परिवीत आगाच्छुचिः शुक्रो अर्यो रोरुचानः ।
( ऋ. ४. १, ७ ).

शुद्ध, तेजस्वी, देदीप्यमान ( आणि ) अनन्त अन्तरिक्षांत ( स्वतेजानें ) वेष्टिलेला प्रभु ( अग्नि ) येवो.

अतस्त्वं दृश्याँ अग्न एतान्पड्भिः पश्येरद्भुताँ अर्य एवैः।
( ऋ. ४. २,१२ ).

म्हणून हे अग्ने ( यज्ञाचा ) स्वामी तूं अद्भुत व रम्य अशा देवांना पायांनीं ( ज्वाळांनीं ) पाहतोस.

आ सूर्येव क्षुमति पश्वो अख्यद्देवानां यज्जनिमान्त्युग्र।
मर्तानां चिदुर्वशीरकृप्रन्वृधे चिदर्य उपरस्यायोः ॥
( ऋ. ४. २,१८ ).

हे प्रबल अग्ने शब्द करणाऱ्या पशूंच्या कळपांत पशु पाहिल्याप्रमाणें मेघ पाहिले म्हणजे मनुष्याच्या कामना पूर्ण होतात, आणि अर्य (स्वामी) पेरलेल्या धान्याच्या आणि मृत्यांच्या संरक्षणाविषयीं समर्थ होतो.
[ अर्य = गमनशील ( पंडित ). ]

स ते जानाति सुमतिं यविष्ठ य ईवते ब्रह्मणे गातुमैरत् ।
विश्वान्यस्मै सुदिनानि रायो द्युम्नान्यर्यो विदुरो अभि द्यौत् ॥
( ऋ. ४. ४, ६ ).

हे सदा तरुण अग्ने, जो गमन करणाऱ्या स्तोत्याप्रीत्यर्थ स्तोत्रे म्हणतो. त्यावर तुझा अनुग्रह होतो. ईश्वर असणारा तूं स्तोत्र करणाऱ्या यजमानाला सर्व उत्तम संपत्ति, वैभव व चांगले दिवस दे
, यास्कानें अर्य शब्दाचा ईश्वर असा अर्थ केला आहे. निघण्टु मध्यें तसेच आहे. सायणाचार्य बहुतेक ठिकाणीं स्वामि व क्वचित् स्थलीं शत्रु असा अर्थ करितात. रा. पंडित बहुतेक शत्रु व कांहीं ठिकाणीं स्वामी असा अर्थ करितात. गमन करणारे चालत जाणारे किंवा येणारे असाहि अर्थ आहे.

एभिर्नृभिरिन्द्र त्वायुभिष्ट्वा मघवद्भिर्मघवन् विश्व आजौ।
द्यावो न द्युम्नैरभि सन्तो अर्यः क्षपो मदेम शरदश्च पूर्वीः ॥
( ऋ. ४. १६, १९ ).

हे इंद्र, सर्व संग्रामांत, धनवान् अशा तुझ्या भक्तांबरोबर शुभ्र देशाप्रमाणें प्रकाशणारे आम्ही शत्रूंचा पराभव करण्याकरित पुष्कळ रात्रीं व पुष्कळ वर्षे तुला स्तवूं.

इमं यज्ञं त्वमस्माकमिन्द्र पुरो दधत्सनिष्यसि क्रतुं नः ।
श्वघ्नीव वज्रिन्त्सनये धनानां त्वया वयमर्य आजिं जयेम ॥
( ऋ. ४. २०, ३ ).

हे अर्य (स्वामी) इन्द्रा, तूं आमचा पुरस्कर्ता होऊन आमचा यज्ञ सेवन कर. हे वज्रधरा, धनलाभाकरितां पारध्याप्रमाणें युद्ध जिंकूं असें क .

यदा समर्यं व्यचेदृघावा दीर्घं यदाजिमभ्यख्यदर्यः ।
अचिक्रदद्वृषणं पत्न्यच्छा दुरोण आ निशितं सोमसुद्भिः ।
( ऋ. ४. २४, ८ ).

ज्या वेळी शत्रूंना मारणारा इन्द्र रणांत जातो, ज्या वेळी स्वामी इन्द्र पुष्कळ युद्ध करितो, त्या वेळी सोम पिऊन तर्र झालेल्या इन्द्रास त्याची पत्नी हांका मारते.

आ नः स्तुत उप वाजेभिरूती इन्द्र याहि हरिभिर्मन्दसानः।
तिरश्चिदर्यः सवना पुरूण्याङ्गूषेभिर्गृणानः सत्यराधाः।
(ऋ. ४. २९, १).

हे इन्द्रा, आनंदी, स्वामी, गायलेला, व सत्यधन असा तूं, अन्नासह पूर्ण अशा आमच्या यज्ञांत संरक्षणाकरितां घोड्यांसह ये.

उत वाजिनं पुरुनिष्षिध्वानं दधिक्राम दधुर्विश्वकृष्टिम्।
ऋजिप्यं श्येनं प्रुषितप्सुमाशुं चर्कृत्यमर्यो नृपतिं न शूरम्॥
(ऋ. ४. ३८, २).

आणि बलवान्, पुष्कळ शत्रूंना पराभव करणाऱ्या दधिक्रा वाला सकल लोक ज्याची आज्ञा मानतात, सरळ व सुन्द्र गमन करणारा दीप्तरूपी शत्रूंचा नाश करणाऱ्या शूर राजाप्रमाणें असणाऱ्या देवाला द्यावापृथिवी धारण करितात.

विहि होत्रा अवीता विपो न रायो अर्यः।
वायवा चन्द्रेण रथेन याहि सुतस्य पीतये॥
(ऋ. ४. ४८, १).

जसा एखादा शत्रूंना कांपविणारा अर्य संपत्ति (उपभोगितो) त्याप्रमाणें तूं अभक्षित आहुति भक्षण कर. तूं आल्हादकारक रथानें सोमरस पिण्यासाठीं ये.

इस्पत इन्द्र वर्धतं नः स चा सा वां सुमतिर्भूत्वस्मे।
विष्टं धियो जिगृतं पुरंधीर्जजस्तमर्यो वनुषामरातीः।
(ऋ. ४. ५०, ११).

हे बृहस्पते, हे इन्द्रा, तुम्ही आमची अभिवृद्धि करा. तुमची सुमह बुद्धि आमचेवर होवो. कर्मे रक्षा, आमची स्तुति ग्रहण करा, आमचे शत्रू (अर्य) नष्ट करा.

[ अर्य = देवर्हीन (विशेषण) पंडित ]

विग्रीवो वृषभो वाहधानो शत्र्वर्यः समजाति वेदः।
(ऋ. ५. २, १२).

धनुज्वालायुक्त, (इच्छा) पूर्ण करणारा व वाढणारा अग्नि शत्रूंचें (अर्यः) धन सहज प्राप्त करून देतो.

इत्था मघवन्ननु जोषं वक्षो अभिप्रार्यः सक्षि जनान्।
(ऋ. ५. ३१, २).

हे इन्द्रा, जीं स्तोत्रें तूं प्रेमपूर्वक म्हणतोस तीं म्हणून आमच्या शत्रूला पराभूत कर.

प्रार्य स्तुषे तुविमघस्य दानम्
(ऋ. ५. ३३, ६).

मी श्रेष्ठ व धनवानाच्या दानाची स्तुति करितो.

इमा मे च्यवतानो ददान आवृकमर्यो वपुषेनार्चत्।
(ऋ. ५. ३३. ९).

मला अपरिमित धन देणाऱ्या च्यवतानानें शरीरावर घालण्याचे अंगरखे दिले.

सहस्रसामाग्निवेशिं गृणीषे शत्रिमग्न उपमां केतुमर्यः।
(ऋ. ५. ३४. ९).

हे अग्ने अर्य असा मी अपरिमित धन देणारा अग्निवेशसुत शत्रीला स्तवितों.

तं नाकमर्यो अगृभीतशोचिषं रुशत्पिप्पलं मरुतो वि धूनुथ।
(ऋ. ५. ५४, १२).

हे मरुतांनों गमन करणारे तुम्ही या आदित्याला (आणि) शुभ्रवर्ण तेजस्वी उदफाला हलवा (म्हणजे तें खालीं पडेल).

नाना ह्य१ग्नेवसे स्पर्धन्ते रायो अर्यः।
तूर्वन्तो दस्युमायवो व्रतैः सीक्षन्तो अव्रतम्।
(ऋ. ६. १४, ३).

अग्ने, शत्रूंची संपत्ति तुझ्या स्तोत्यांच्या रक्षणाकरितां अनेक प्रकारें स्पर्धा करिते. दस्यूंचा क्षय करणारे व मतांनीं मतविरोधी लोक पराभूत करण्याची इच्छा करणारे स्तोते लोक आहेत.

स त्वं दक्षस्यावृको वृधो भूरर्यः परस्यान्तरस्य तरुषः।
(ऋ. ६. १५, ३).

अग्ने, त्रास न देणारा, तूं अनुष्ठानसमर्थ लोकांस उत्कर्षयुक्त करतोस आणि दूरच्या आणि जवळच्या शत्रूंपासून रक्षण करणारा होतोस.

तरन्तो अर्यो अरातीर्वन्वन्तो अर्यो अरातीः।
(ऋ. ६. १६, २७).

गमन करणाऱ्या शत्रुसेना उल्लंघून जाणारे व गमन करणाऱ्या शत्रुसेनांचे हिंसा करणारे होतात.

द्यौ र्न य इन्द्राभि भूमार्यस्तस्थौ।
(ऋ. ६. २०, १).

द्यौ ज्याप्रमाणें भूतमात्राचें आक्रमण करितो, त्याप्रमाणें इंद्र संग्रामांत शत्रूंचें अतिक्रमण करील.

मित्रो नो अत्र वरुणश्च पूषार्यो वशस्य पर्येतास्ति।
(ऋ. ६. २४, ५),

मित्र, वरुण, पूषा आणि प्रेरक सूर्य हे देव, हे इन्द्रा आमच्या इच्छित फलाला पूर्ण करणारे होवोत.

अधस्मा ते चर्षणयो यदेजानिन्द्र त्रातोत भवा वरूता।
अस्माकासो ये नृतमासो अर्य इन्द्र सूरयो दधिरे पुरो नः॥
(ऋ. ६. २५, ७).

आणि हे श्रेष्ठ (अर्य) इन्द्रा, तुझे लोक ज्यावेळीं (भीतीनें) कंपित होतात त्यावेळीं तूं त्यांचा त्राता हो, आणि परामर्श घेणारा हो. तुझ्याकडे येणाऱ्या आमच्या लोकांचा व स्तोत्र करणाराचा संरक्षण करणारा हो.

स तु श्रुधि श्रुत्या यो दुवोयुर्द्यौर्न भूमाभि रायो अर्यः।
(ऋ. ६. ३६, ५).

हे इन्द्रा मजेदार स्तोत्रें ऐक आमची सेवा इच्छिणारा शत्रूंचें धन अभिभूत करतोस, तो तूं आमचीं स्तोत्रें ऐक.

तद्वो नो विश्वे अर्य आ सदा गृणन्ति कारवः।
(ऋ. ६. ४५, ३३).

(त्या बृबुला) आमचे सर्व स्तुति (प्रेरित) करणारे अर्य गातात.

मानस्तारीन्मघवन्नायो अर्यः ।
( ऋ. ६. ४७, १ ).

हे इन्द्र, दुसरा कोणीहि धनाचा **स्वामी** आमचीं धनें नाहींशीं न करो.

आमाप्वन्नुपव्रवशंसेव न्नुते अवि कर्ण आघृणे
अधा अर्यो अरातयः ।
( ऋ. ६. ४८, १६ ).

हे पूषन्, माझ्या रक्षणाकरितां धांव. हे प्रकाश देणाऱ्या, हिंसक आणि **चालून येणाऱ्या शत्रूंना** पीडा दे. मी तुझ्या कानाजवळ प्रशंसा करितों.

अभिचष्टे सूरो अर्य एवान् ।
( ऋ. ६. ५१, २ ).

**स्वामी** ( होऊन ) सर्व इच्छा प्रकाशित करतो.

इन्द्राग्नी तपन्ति माघा अर्यो अरातयः ।
अपद्वेषांस्याकृतं युयुतं सूर्यादधि ॥
( ऋ. ६. ५९, ८ ).

हे इन्द्राग्नी हो, हिंसक आणि **चालून येणाऱ्या** शत्रु ( सेना ) पीडा देतात. त्यांना नाहींसे करा. शत्रूंना ( मारून टाक ) सूर्यापासून वेगळे कर.

इन्धे राजा समर्यो नमोभिः ।
( ऋ. ७. ८, १ )

तेजस्वी, ( आमचा ) **स्वामी** अग्नि स्तुति करून प्रज्वलित केला जातो.

स शर्धदर्यो विषुणस्य जन्तोः ।
( ऋ. ७. २१, ५ ).

स्वामी इन्द्र भयंकर प्राण्यांच्या ( हिंसेविषयीं ) उत्सुक होवो.

यन्वन्तु स्माते वसासमीके भीतिमर्यो वनुषां शवांसि ।
( ऋ. ७. २१, ९ ).

हे इन्द्र, तुझ्या कृपेनें युद्धांत **शत्रूंची** स्वारी आणि हिंसकांचीं बलें यांचा स्तोते नाश करितात.

मानो निदे च वक्तवेऽर्यो रन्धी रराव्णे
( ऋ. ७. ३१, ५. )

हे **स्वामी (अर्यः)** ! आम्हाला निंदकाच्या, मर्मभेदी भाषण करणाऱ्याच्या व अनुदाराच्या स्वाधीन करूं नकोस.

उत न एषु नृषु श्रवो धुः प्रवायें यन्तु शर्धन्तो अर्यः ।
( ऋ. ७. ३४, १८ )

( आमच्या ) ह्या लोकांत देवांना अन्न दिलें जावो. धनाकरितां हल्ला चढवलेले आमचे **शत्रू** नष्ट होवोत.

ते चिद्धि पूर्वीरभिसन्ति शासा विश्वाँ अर्य उपरताति वन्वन् ।
इन्द्रो विभ्वाँ ऋभुक्षावाजो अर्यः शत्रोर्मिथत्या कृणवन्वि नृम्णम् ।
( ऋ. ७. ४८ ३ ).

ते देव पुष्कळ ( आमच्या शत्रुसेना ) आयुधानें पराभूत करितात. आणि त्यांनीं आयुधानें युद्धांत **शत्रूला** पराभूत केलें. शत्रूंवर गमन करणारे विभ्वन्, ऋभुक्षा, वाज हे देव शत्रूचें बल हिंमेनें कमी करोत.

अधस्मानो मरुतो रुद्रियासस्त्रातारो भूत पृतनास्वर्यः ।
( ऋ ७. ५६, २२ ).

आतां हे रुद्रपुत्र मरुतहो, युद्धांत **शत्रुसेनेपासून** आमचें रक्षण करा.

सीक्षन्त मन्युं मघवानो अर्य उरु क्षयाय चक्रिरे सुधातु ।
( ऋ. ७. ६०, ११ ).

**स्तोत्यार्चा** स्तोत्रें उदार देव ऐकतात. व त्याला राहण्याकरितां स्थान करितात.

मित्रस्तन्नो वरुणो देवो अर्यः प्रसाधिष्ठेभिः पथिभिर्नयन्तु
( ऋ. ७. ६४, ३ ).

मित्र, वरुण आणि **अर्यमा** हे तीन देव ( योग्यासाठीं ) साधक मार्गानें प्राप्त होवोत.

तिरो अर्यो हवनानि श्रुतं नः ।
( ऋ. ७. ६८, २. )

( आमच्या ) **शत्रूंची** बोलावणीं टाकून आमचीं बोलावणीं ऐका.

इन्द्रावरुणावभ्यातपन्ति माघान्यर्यो वनुषामरातयः
( ऋ. ७. ८३, ५ )

हे इन्द्रावरुणहो, **शत्रूंचीं** शस्त्रें मला त्रास देतात. आणि हिंसकापैकीं ( जे ) शत्रु ( ते ) त्रास देतात.

अचेतयदचितो देवो अर्यः ।
( ऋ. ७. ८६, ७ )

**स्वामी** आम्हां अज्ञानांस ज्ञान देवो.

आदेवासो नितोशनासो अर्यः ।
घ्नन्तो वृत्राणि सूरिभिः स्याम ।
( ऋ. ७. ९२, ४ ).

जे देवयुक्त ( म्हणूनच ) **शत्रूला** मारणारे त्या स्तोत्याकडून शत्रूला मारणारे आम्ही होऊं या.

प्रतत्ते अद्य शिपिविष्ट नामार्यः शंसामि वयुनानि विद्वान् ।
( ऋ. ७. १००, ५ ),

हे प्रकाशण्यास, **श्रेष्ठ** व ज्ञातव्य जाणणारा मीं आज तुझी अत्यन्त स्तुति करितों.

वितर्तूर्यन्ते मघवन् विपश्चितोऽर्यो विपो जनानां
( ऋ. ८. १, ४. )

हे मघवन्, तुझे स्तोते **चाल करून जाणारे ( अर्यः )** व शत्रूंना कांपवणारे होतसाते त्यांच्यावर अनेक संकटें आणतात.

अदान्मे पौरुकुत्स्यः पञ्चाशतं त्रसदस्युर्वधूनाम् ।
मंहिष्ठो अर्यः सत्पतिः ।
( ऋ. ८. १९, ३६ ).

मोठा उदार, **स्वामी** किंवा **अभिगम्य,** स्तोत्यांचा चहाता असा पुरुकुत्सपुत्र त्रसदस्यूनें मला पन्नास दासी दिल्या.

दृळ्हाचिदर्यः प्रमृशाभ्याभर न ते दामान आदभे
( ऋ. ८. २१, १६ ).

हे इन्द्र, आमचा **स्वामी** असणारा तूं आम्हाला स्थिर संपत्ति दे. आम्हाला थोर कर. ( कारण ) तुझीं दानें कोणीहि काढून घेऊं शकत नाहींत.

अर्यो गिरं मंहमानं विदाशुषे
(ऋ. ८. २४, २०).

**श्रेष्ठ** इन्द्र हविर्भाग देणारांना मोठे गृह ( देतो )

आयाहर्य आवरिमाहा सोमस्य पीतये ।
(ऋ. ८. ३४, १०).

**ईश्वर** असणारा तू सर्व यार्जुली ये. तुला पिण्याकरिता सोम अर्पण करितो.

न्यरातीरराव्णां विश्वा अर्यो अरातीरितो युच्छन्तु
(ऋ. ८. ३९, २).

हे अग्ने, हविर्भाग देणाऱ्याच्या शत्रूस नाहींसे कर. सर्व (अर्य) **शत्रू** नाहींसे होवोत.

अलर्ति दक्ष उत मन्युरिन्दो मा नो अर्यो अनुकामं परादा
(ऋ. ८, ४८, ८).

हे इन्दो, ( आमचा ) बलाढ्य शत्रु जावो. क्रोध नाहींसा होवो आणि अशा **शत्रूस** आमच्या इच्छेप्रमाणे नाहींसे कर

येन वसाम पृतनासु शर्धतस्तरन्तो अर्य आदिश ।
(ऋ ८. ४३, १०)

ज्याच्या योगानें संग्रामामध्यें शस्त्रे फेकणाऱ्या **शत्रूंना** आम्ही जिंकतों.

विपोयीं मानस्य स क्षय ।
(ऋ. ८ ५२, ७)

तो श्रेष्ठ इन्द्र **स्तोत्याच्या** मानाचें स्थान आहे.

विश्वाँ अर्यो विपश्चितो तिायस्तूयमागहि ।
अस्मे ,धेहि श्रवो बृहत्
(ऋ. ८. ६५, ९)

( हे इन्द्र ) **स्वामी** तूं सर्व स्तोत्याकडे पहा त्यासंगती तूं जलदीने ये व आम्हाला यश दे.

तिरश्चिदर्य सवना वसो गहि शविष्ठ श्रुधिमे हवम् ।
(ऋ. ८. ६६, १२)

शत्रूंच्या यज्ञाचा तिरस्कार करून हे **अर्य** इन्द्र ये. आणि हे बलवन् मी केलेली स्तुति ऐक.

आपवमान नो भरार्यो अदाशुषो गयम् । कृधि प्रजावतीरिष ॥
(ऋ ९ २३, ३).

हे पवमान, सोम न देणाऱ्यांचें **शत्रूंचें** धन आम्हाला दे व आम्हांस प्रजा व अन्नयुक्त कर

एता विश्वान्यर्य आभुमानि मानुषाणाम् ।
सिषासन्तो वनामहे ।
(ऋ. ९. ६१, ११).

हीं सोमानें मनुष्यांची सर्व अन्नें, **चालून जाणारे** आणि उपभोगणारे आम्ही उपभोगू

अर्यो नशन्त सनिषन्त नो धियः ।
(ऋ ९. ७९, १).

**शत्रू** नष्ट होवो [illegible] आमच्या [illegible] उपभोगो.

[ अर्य =नास्तिक-विपरीत. ]

अर्यो विशां गातुरेति प्रयदानड् दिवो अन्तान्
यविरभं दीयान ।
(ऋ. १०. २०, ४).

यजमानांचा **गमनशील** तेजस्वी व मेधावी अग्नि ज्या वेळीं वर जातो त्यावेळीं तो आकाश व्यापितो

गावो यवं प्रयुता अर्यो अक्षन्ता अपश्यं सह गोपाश्चरन्तीः ।
हवा इदर्यो अभित समायन कियदासु स्वपतिश्छन्दयाते॥
(ऋ. १०. २७, ८).

**धार्मिक** लोकांना दिलेले यव हा गाई खात आहेत आणि त्या गोपालाच्या भोंवतालीं जमल्या आहेत हें मी पहात आहे. ते **धार्मिक लोक** त्या गाईंना आपल्याकडे हांक मारितात पण ते त्यांच्यापासून कसली अपेक्षा करीत आहेत ?

[ १ अर्य=स्वामी ( सायणाचार्य ) २ वरील अर्थ विरोध ]

सिषक्त्यर्य प्र युगा जनानां सद्यः शिश्ना प्रमिनानो नवीयान्
(ऋ. १०. २७, ११).

तात्काल राक्षसवृन्दाला मारणारा, व तरुण असा **स्वामी** इन्द्र लोकांचे यज्ञांत येतो.

अक्षैर्मादीव्य कृषिमित्कृषस्व वित्ते रमस्व बहु मन्यमान ।
तत्र गावः कितव तत्र जाया तन्मे विचष्टे सवितायमर्य ॥
(ऋ. १०. ३४, १३).

हे कितवा, तूं जुगार खेळू नकोस. शेतकीच कर. पैशाला जप. शेतकी केल्यानें पत्नी, गाई, बैल सर्व कांहीं मिळतें. असें सर्व **प्रेरक** ईश्वरानें मला सांगितले आहे

अस्तेव सु प्रतरं लायमस्यन् भूषन्निव प्रभरा स्तोममस्मै ।
वाचा विप्रास्तरत वाचमर्यो नि रामय जरितः सोम इन्द्रं ॥
(ऋ १०. ४२, १)

ज्याप्रमाणे धनुर्धारी आपला बाण दूर सोडतो त्याप्रमाणें याला स्तोम भूषवून अर्पण कर, अहो विप्र ! तुम्ही आपल्या स्तुतीनें **शत्रूंचें** ( अर्य ) तोंड बंद करा, हे जरित ! माझ्या सोमयागांत तूं इन्द्राला रमव

अभीष्व अर्य पौंस्यैर्भवेम ।
(ऋ १०. ५९, ३).

आम्ही **शत्रूला** सामर्थ्यानें पराभूत करूं, असें कर.

विदद्वस्वर्यो अभिभूति पौंस्यं ।
(ऋ. १०. ७४, २).

शत्रूंना पराभूत करणारें बल **यजमान** मिळवितो.

विहि सोतोरसृक्षत नेन्द्रं देवममंसत ।
यत्रा मदद्वृषाकपिरर्यः पुष्टेषु मत्सखा विश्वस्मा-
दिन्द्र उत्तर ॥
(ऋ १०. ८६, १)

सोमयागाकरिता पाठविलेले होते जेथें इन्द्राला देव मानीनासे झाले, [illegible] **स्वामी** ( अर्य ) [illegible] माझा [illegible] सोमपानानें तुष्ट झाला, तरी [illegible] इन्द्र सर्व जगांत श्रेष्ठ आहे

किमयं त्वां वृषाकपिश्चकार हरितो मृगः ।
यस्मा इरस्यसीदु न्वर्यो वा पुष्टिमद्वसु विश्वस्मा-
दिन्द्र उत्तर ॥
(ऋ १०. ८६, ३.)

हरित वर्णाचा मृग जो वृषाकपि त्यानें तुझें काय केलें आहे ? की तू त्याला उदार ( अर्य ) होऊन पोषयुक्त धन देतोस इन्द्र सर्व जगात श्रेष्ठ आहे

वियं पृष्ठेव जनिमान्यर्य इन्द्रश्चिकाय न सखायमीषे ।
(ऋ १०.८९ ३ )

यज्ञात उत्पन्न झालेली पृष्ठस्तोत्रे म्हटलीं म्हणजे इन्द्र शत्रूचा नाश करितो त्याला मित्राची जरूर लागत नाहीं

[ अय =श्रेष्ठ ग्रिफिथ. ]
त्वर्य इन्द्र तनुहि श्रवांसि
(ऋ १०.११६ ६ )

हे इन्द्र स्वामी तू आम्हाला अन्न दे

विश्वविश्वा अरातयोर्यो नशन्त नो धिय ।
(ऋ १०.१३३ ३ )

सर्व चाल करून येणाऱ्या (अर्य) आमच्या शत्रूंना मारून टाक व आमचीं कर्मे प्रवृत्त कर.

अर्यो वा गिरो अभ्यर्च विद्वान् ऋषीणा विप्र. सुमतिं चकानः॥
(ऋ १० १४८, ३).

मन्त्रद्रष्टया ऋषींचा अनुग्रह इच्छिणारा ज्ञाता व स्वामी अशा इन्द्रा स्तोत्याची स्तुति ऐकून सत्कार कर

संसमिद्युवसे वृषन्नग्ने विश्वान्यर्य आ।
(ऋ १० १९१, १ )

हे शूर अग्ने ! स्वामी ( अर्य ) ! तू सर्व भूतजात वस्तू एकत्र जमवितोस

वरील ८८ उताऱ्याचें थोडेसें पृथक्करण करू अर्य याचे आपणास जे अनेक अर्थ दिसतात, ते येणेंप्रमाणें —अर्य याचा एक अर्थ शिष्ट, स्वामी किंवा श्रेष्ठ असा उच्च भावदर्शक आहे. अर्य हा शब्द जेथें इन्द्र किंवा अग्नि याचें विशेषण असेल तेथें तो शब्द अर्थात् गुणवाचक श्रेष्ठ, शिष्ट, प्रभु, स्वामी अशा अर्थीच होय. या अर्थीचे व्यजक उतारे येणेंप्रमाणे —

१ ३३, ३, १ ८१,६, १ ८१,९, १.१२१, १५ (सा. प) १ १२२,१४, १ १८४,१, २ २३,१३, २ २३,१५, ? ३५?, ३ ४३,२, ४ १,७, ४ ?,१२, ४ ४,६, ४ २०,३, ४.२४ ८, ४ २९,१, ४ ३८,२, ४ ४८,१, ५.३३,६; ५ ३३,९; ५ ३४, ९, ६ २४,५ ६ २५,५, ६ ४५,९, ७ ८,१, ७ २१,५, ७.३१,५, ७ ८६,७, ७ १००,५ ८ १९,३६, ८ २१,१६, ८ २४,२?, ८ ३४,१०, ८.५५,१२, १० २०,४, १० २७,८, १० २७,१९, १० ३४,१३, १०.८६ १९ व ३, १०.१९१,१ १० ११६,६, १० १४८,३,

अर्य हें अरि शब्दानें अनेकवचन जेव्हां असेल तेव्हां तो उतारा विचारास अग्राह्य होय तथापि आम्हीं ते सर्व उतारे अशाकरितां घेतले आहेत कीं, कांहीं ठिकाणीं दुसरा अर्थ निघणे शक्य आहे शत्रुवाचक अर्य शब्द वापरणारे उतारे येणेंप्रमाणें

१ ७०,१, १ ७३,५ १ ११८ ९ १ १२१, १५ ( ग्रि ), १ १६९,६ ४ १६,१५, ५.३३ ?, ६ १५,३, ६ १७,२, ६ २०,१, ६ २६,७, ७ २१,९, ७ ३४,१८, ७४८,३; ७ ५६,२२, ७ ६४,२, ७ ९२,४, ८ ४८,८, ८ ४९,१२, ९ २३,३, ९ ७९,१, १०.४२,१, १० ५९,३, १० ७६,२, १० ८९,३,

मालक, वैश्य, नागरिक अशा अर्थीं शब्दाचा उपयोग अनेक ठिकाणीं आला आहे जेथें वक्ता स्वत च्या वर्गासंबंधानें बोलत आहे, तथापि जेथें कोणत्याहि विशिष्ट विधानानें त्याचें वर्गस्वरूप निश्चित होत नाहीं व जेथे टीकाकारानीं स्तोता असा त्याचा अर्थ लावून काम भागविलें आहे असेहि उतारे आहेत ते ४ २,१८, ४ २०,३

जेथें शत्रुवाचक अर्य शब्दाचा उपयोग झाला आहे तथापि शत्रुवाचक दुसरा शब्द आहे असेहि उतारे आहेत ४. ५०, ११; ६ १६, २७, ६ ४८, १६, ७ ८३, ५, ८ ३९, ?.[१]

गमन करणारे, चालून येणारे हाहि एक अर्थ आहे कांहीं ठिकाणीं (उ ९ ६१, ११) एकाच शब्दसमुच्चयाचे भिन्न अर्थ व्यक्त झाले आहेत राय अर्य ( अर्यो राय ) या ठिकाणीं दोन अर्थ केलेले आहेत धनाचा स्वामी किंवा शत्रूचें धन उ ६ ४७, ९,

अर्य हें पुष्कळदां इद्र वगैरेंचें विशेषण केले आहे. जेथें शत्रूचा असाहि अर्थ केला आहे त्या ऋचांत देखील तो शब्द शत्रूचा अशा अर्थी न लावतां इन्द्राचें विशेषण या अर्थी लावण्यासारखा असतो. अर्यमा असाहि एक ( ७ ६४, ३ ) अर्थ आहे.

वरील उताऱ्यावरून असें दिसून येईल कीं, अर्य या शब्दाचे वेदकालीन लोकांच्या वर्णनिश्चयास अगर राष्ट्रनिश्चयास पोषक असे उतारे नाहींतच.

आतां अर्य या शब्दाचा दुसरीं रूपे घेऊ

येदिद्दो ३ अनमयद्वपत्नीर्यो अर्यपत्नीरुषसश्चकार ।
सनिरुध्यानहुषो यह्वो अग्निर्विशश्चक्रेबलिहृत सहोभि ॥
(ऋग्वेद ७. ६, ५).

ज्या अग्नीनें आयुधानीं आसुरी विद्येचा मोड केला व उषास सूर्यपत्नी केलें त्यानें बलानें प्रजाचा निरोध करून नहुषाच्या हस्तगत केल्या.

स्पांन क्रुद्ध पतयद्रजस्स्वा यो अर्यपत्नीं रकृणोदिमा अप ।
( ऋग्वेद १० ४३ ८, अथर्व २० १७, ८)

तो क्रुद्ध वृषभाप्रमाण लोकात जोरानें गेला आणि हें पावसाचें पाणी त्यानें (जगाचा) स्वामी (इंद्र) त्याच्या ताब्यात आणलं

वहन्तु त्वा रथेष्ठामाहर यो रथयुज ।
तिरश्चिदर्य सवनानि वृत्रहन्नन्येषा या शतक्रतो॥
(ऋ ८ ३३, १४)

हे शतक्रतो ! वृत्रहत्या ! रथात बसलेल्या तुला ईश्वराला ( अर्य ), रथाला जोडलेले घोडे इतराच्या सवनांना बाजूस सारून, आमच्या सवनाकडे आणोत

तिरश्चिदर्यया परि वर्तिर्यातमदाभ्यामार्ध्वी मम श्रुतंहवम् ॥
(ऋ. ५. ७५, ७)

आश्विनांनो ! अहो स्वामीहो ( अर्यया ), दूर देशाहून आमच्या यज्ञगृहाला या; मधुविद्या जाणणारांनो ! माझें आह्वान ऐका !

कृष्णादुदस्थादर्या वि विहायाभिश्चिकित्सन्ती मानुषाय क्षयाय ॥
(ऋ. १. १२३, १).

ही पूजनीय ( अर्या ) व महान् उषा मनुष्यांच्या वसतीला प्रकाश द्यावा म्हणून अंधारातून उगवत आहे.

ताहि देवानामसुरा तावर्यातान क्षितीः करत मूर्जयन्ती ॥
(ऋ. ७. ६५, २).

ते ( दोघे ) देवांमध्यें बलिष्ठ आहेत; ते ईश्वर ( अर्या ) आमची जर्मीन प्रजा वगैरे ऊर्जितावस्थेस आणोत.

अस्य स्तोमे मघोनः सख्ये वृद्धशोचिषः ।
विश्वा यस्मिन्तुविष्वणि समर्ये शुष्ममादधुः ॥
(ऋ. ५ १६, ३ ).

सर्व कांहीं या धनवान् व ज्याचें तेज वाढत आहे अशा ( अग्नी ) च्या स्तोमावर व सख्यावर अवलंबून आहे; सर्व ऋत्विज या बहुभावी स्वामी ( अर्ये ) च्या ठिकाणीं बल घालतात.

यस्यायं विश्व आर्यो दासः शेवधिपा अरिः ।
तिरश्चिदर्ये रुशमे पवीरवि तुभ्येत्सो अज्यते रयिः ॥
(ऋ. ८. ५१, ९ )

हे सर्व आर्य व दास ज्याचे आहेत तो उत्तम धनेश्वर होय. हे धार्मिष्ठ (अर्ये) रुशम पवीरवा! तुला तें धन प्राप्त झालेलें आहे.

सन्ति ह्यर्य आशिष इन्द्र आयुर्जनानाम्
(ऋग्वेद ८. ५४. ७)

श्रेष्ठ व्यक्तींवर ( अर्ये ) आमच्या आशा अवलंबून आहेत लोकांचें जीवित इंद्राच्या ठिकाणीं आहे. ( ग्रिफिथप्रमाणें अर्येचा अर्थ घेतला आहे. )

अर्यपत्नी या शब्दाचा सूर्यपत्नी असा अर्थ (७. ६. ५) होतो. पण दुसऱ्या १०. ४३, ८-मध्यें अर्य याचा अर्थ स्वामी असा व पत्नी याचा अर्थ स्वाधीन असा केला गेला आहे. ८. ३३, १४ मध्यें ईश्वर आणि ५ ७५, ७; ५. १६, ३; मध्ये स्वामी असा अर्थ आहे. १. १२३, १ मध्यें अर्या हें विशेषण पूजनीय किंवा मानार्ह ८० अर्थानें उषेस लावलें आहे. ७. ६५, २; ८. ५१, ९; ८. ५४, ७. मध्यें श्रेष्ठ असाच अर्थ आहे.

आतां आर्य शब्दाकडे वळूं. येथें ऐतिहासिक महत्त्वाचे कांहीं उतारे दृष्टीस पडतात.

इन्द्रो विश्वस्य दमिता विभीषणो यथावशं नयति दासमार्यः
(ऋ. ५. ३४, ६ ).

विश्वाचें दमन करणारा भयजनक स्वामी ( आर्यः ) जो इंद्र तो इच्छेस येईल त्याप्रमाणें दासांना वश करतो. ( सायणाचार्य ). ( ज्याप्रमाणें आर्य दास लोकांना इच्छेप्रमाणें वागवितो त्याप्रमाणें इंद्र—असा ग्रिफिथ अर्थ करतो. )

योनो दास आर्यो वा पुरुष्टुतादेव इंद्र युधये चिकेतति ।
अस्माभिष्टे सुषहाः सन्तु शत्रवस्त्वया वयं तान्वनुयाम संगमे ।
(ऋग्वेद. १०. ३८. ३. ).

हे बहुस्तुत इंद्रा ! जे दास किंवा आर्य अधार्मिक लोक आमच्याशीं युद्ध करतील, ते आमचे शत्रू तुझ्या प्रसादानें जिंकण्यास सुलभ होवोत. तुझ्या साहाय्यानें युद्धांत त्यांना आम्ही मार.

विसूर्यो मध्ये अमुचद्रथं दिवो विदद्दासाय प्रतिमानमार्यः ।
(ऋ. १०. १३८, ३. )

द्युलोकाच्या मध्यें सूर्यानें रथ सोडला; वृत्रादि दासाला प्रतिकृति–तोड आर्याला ( इंद्राला ) लाभली. ( सायण ). ( ग्रिफिथच्या मतें इंद्र हा प्रतिकृति दासाशीं झगडण्याकरितां आर्याला लाभली )

स जातूभर्मा श्रद्दधान ओजः पुरो विभिन्दन्नचरद्वि दासीः ।
विद्वान् वज्रिन् दस्यवे हेतिम् अस्यार्यम् सहो वर्धया द्युम्नम् इंद्र ॥
(ऋ १० १०३. ३ )

इंद्र आपलें वज्र घेऊन व स्वपराक्रमावर भिस्त ठेवून दासाचीं पुरें ( दस्यूंचीं ) नाश करीत चालला. "हे इंद्रा दस्यूवर आपलें आयुध सोड; व आर्यांचे ( विद्वान् स्तोत्यांचे ) बल व कीर्ति वाढव."

इंद्रः समत्सु यजमानमार्यं प्रावद्विश्वेषु शतमूतिराजिषु स्वर्मीह्ळेष्वाजिषु ।
मनवे शासदव्रतान्त्वचं कृष्णामरन्धयत् ।
दक्षन्न विश्वं ततृषाणमोषति न्यर्शसानमोषति ॥
(ऋ १. १३०. ८)

इंद्र युद्धामध्यें यजमान आर्याचें ( आर्य उपासकांचें ) रक्षण करतो; समरांगणांत तो शेंकडों प्रकारांनीं त्याचें रक्षण करतो व अत्यंत उत्तम सुख ( लूट ) त्या समरांगणावर मिळत असते. कर्महीन लोकांचें शासन करून काळ्या कातडीच्या लोकांना तो आर्यांच्या अधिकाराखालीं इंद्र आणता झाला. सर्व हिंसक शत्रूंना जाळून खाक करता झाला.

आ यो विवाय सचथाय दैव्य इंद्राय विष्णुः सुकृते सुकृत्तरः ।
वेधा अजिन्वत् त्रिषधस्थ आर्यमृतस्य भागे यजमानमाभजत् ॥
(ऋ १. १५६. ५ )

दैव्य व महासुकृती जो विष्णु तो सुकृती इंद्राला सहाय करण्यासाठीं येतो. तो त्रैलोक्यस्थ प्रभु विष्णु आर्य यजमानाला सुखी करो, व यज्ञाच्या भाग्याला उपभोक्ता करो.

ससानात्यां उत सूर्यं ससानेंद्रः ससान पुरुभोजसं गाम् ।
हिरण्ययमुत भोगं ससान हत्वी दस्यून्प्रार्यं वर्णमावत् ॥
(ऋ ३. ३४. ९ अथर्व० २०. ११. ९)

इंद्रानें ( आर्यांना ) अश्व, सूर्य व गाई दिल्या; व सुवर्णमय संपत्ति दिली. त्यानें दस्यूंना मारून आर्य वर्णाच्या लोकांचें रक्षण केलें.

इंद्र वर्धन्तो अप्तुर कृण्वन्तो विश्वमार्यम्।
अपघ्नन्तो अराव्ण ॥
(ऋ. ९. ६३, ५).

इंद्राचें बल वाढविणारा, उदकाचा वर्षाव करणारा व सर्व **शुभ** गोष्टी करणारा, नास्तिकांना (अराव्णो दातृन) नाश करणारा सोम पवमान इ०

वयो न वृक्षं सुपलाशमासदन्त्सोमास इंद्रं मन्दिन चमूषद ।
प्रैषामनीकं शवसा दविद्युतत् विदत्स्वर्मनवे ज्योति आर्यम्॥
(ऋ १० ४३, ४ अथर्व २० १७, ४)

ज्याप्रमाणें सुंदर पालवी असलेल्या वृक्षावर पक्षी बसतात त्याप्रमाणें इंद्राकडे भांड्यातला सोमरस जात असतो. सोमरसाचा पृष्ठभाग चकाकत आहे हा इंद्र आपल्यामधील **प्रेरक** तेज मानवाना देवो.

आर्य = प्रेर्य ( Aryas ) light ).
अहमत्कं कवये शिश्नथं हथैरहं कुत्समावमाभिरूतिभिः ।
अहं शुष्णस्य श्नथिता वधर्यमं न यो रर आर्यं नाम दस्यवे ॥
(ऋ. १०. ४९, ३).

मी कवी (ऋषी) करिता अत्काला घातक प्रहारानीं मारिलें. तसेंच मी मदत करून कुत्साचें चांगलें संरक्षण केलें. शुष्णाचा वध करणारा मी त्याच्या वधाकरता माझे वज्राचा उपयोग करतो. मी **आर्यांचें** नाव दस्यूंना (शत्रूंना) दिलें नाहीं.

यस्ते मन्यो विधद् वज्रसायक सह ओज पुष्यति विश्वमानुषक्
साह्याम दासमार्यं त्वया युजा (वयं) सहस्कृतेन सहसा
सहस्वता॥
(ऋ. १०. ८३, १. अथर्व. ४. ३२, १.)

जो कोणी हे मन्यू, तुझी आराधाना करतो, त्यास तूं सर्वजेती शक्ति देतोस, तुझ्या साह्याय्यानें आम्ही **आर्य** व दस्यु या दोघांहि आमच्या शत्रूंना जिंकू. (हा मन्यु१ सूक्तकार आर्यांना आपले शत्रु म्हणतो.)

अयमेमि विचाकशद् विचिन्वन् दासमार्यम् ॥
(ऋ १०. ८६, १९; अथर्व २०. १२६. १९).

मी (इंद्र) यजमानाना पाहून आर्य माझे मित्र व दास शत्रु असा फरक लक्षात घेऊन **मित्रांकडे** (आर्य लोकाकडे) (साहाय्यार्थ) जातो.

आयोनयतसधमा आर्यस्य गव्या तृत्सुभ्यो अजगन्युधानृन् ।
(ऋ ७, १८, ७,)

मघवानें (इंद्रानें) **कर्मशील लोकांच्या** (आर्यस्य) गाई तृत्सूपासून परत आणल्या व युद्धात शत्रूंना ठार मारलें (सायण).

उपोदुजातमार्यस्य वर्धनमग्निं नक्षन्त नो गिर ।
(ऋ, ८. १०३, १,)

**उत्तम वर्णाचा**(आर्यस्य) वर्धयिता जो सुजात अग्नि त्या प्रत आमच्या स्तुती पोंचतात (सायण), (ग्रिफिथ 'आर्यस्य' म्हणजे 'आर्यांचा' असा अर्थ घेतो)

दासस्यवा मघवन्नार्यस्यवा सनुतर्यवयावधम्।
(ऋ १०, १०२, ३.

हे मघवन्! दासाचे किंवा आर्यांचें (**चाल करून येणाराचें**) वज्र नाहींसे करून टाक.

उतत्या सद्य आर्या सरयोरिन्द्र पारत ।
अर्णाचित्ररथावधीः ॥
(ऋ. ४, ३०, १८.)

हे इंद्रा! **आर्य** (आर्यत्वाभिमानी) असे जे अर्ण आणि चित्ररथ त्यांना तूं सरयूच्या पैलतीरीं मारलेस.

त्वं ताँ इन्द्रोभयाँ अमित्रान्दासा वृत्राण्यार्या च शूर ।
वधीर्वनेव सुधितेभिरत्कैरा पृत्सुदर्षि नृणांनृतम ॥
(ऋ ६. ३३, ३.)

हे इंद्र! तूं **आर्य** आणि दास या दोघां अवरोध करणाऱ्या शत्रूंना मारून टाकलेस, हे शूर नेत्या! संग्रामांत आपल्या आयुधानीं तूं वनाप्रमाणे शत्रूंना छाटून टाकतोस.

हतो वृत्राण्यार्या हतो दासानि सत्पती ।
हतो विश्वा अपद्विषः ॥
(ऋ ६. ६०, ६.)

हे सत्पालक इंद्राग्नी आम्हाला उपरोध करणाऱ्या **आर्यांना** व तसेंच दासांना मारतात, ते आमच्या सर्व शत्रूंचा नाश करतात.

१ आर्याणि वृत्राणि आर्य शत्रु (ग्रिफिथ)
२ आर्या वृत्राणि आर्यैः कर्मानुष्ठातृभिः कृतानि उपद्रव जातानि (सायण)

एते धामान्यार्या शुक्रा ऋतस्य धारया ।
वाजं गोमन्तमक्षरन् ॥
(ऋ. ९. ६३, १४.)

सोमयज्ञ केला म्हणजे **आर्ययजमानांच्या** घरी गाईबैल इत्यादि धन पाण्याच्या धारेप्रमाणे वाहूं लागते.

आर्य = श्रेष्ठ यजमान (सायण).

सूर्यं दिवि रोहयन्त सुदानव आर्या व्रता विसृजन्तो
अधिक्षमि ।
(ऋ. १०. ६५, ११)

आकाशात सूर्याला स्थापन करणारे व पृथ्वीवर सर्व **श्रेष्ठ** व्रतांचा प्रसार करणारे च उदार देवाना आम्ही धन मागतों.

समज्या पर्वत्यावसूनि दासा वृत्राण्यार्या जिगेथ ।
(ऋ १०. ६९. ६).

हे अग्ने गमनशील अजय्य लोकाकडून पर्वतीय धने जिकलींस आणि बलवान् दासानी केलेले उपद्रव नाहींसे केलेस.

आर्संयतामिन्द्रण स्वस्ति शत्रुतूर्याय बृहतीममृध्राम् ।
यया दासान्यार्याणि वृत्रा करो वज्रिन्सुतुका नाहुषाणि ॥
(ऋ ६ २२, १० अथर्व. २०. ३६, १०.)

हे इंद्र! तूं आम्हांला शत्रुनाशाकरिता पुष्कळ व न संपणारी अशी शाश्वत संपत्ति दे, कीं ज्या योगानें दास **आर्य** होतील व मनुष्य सर्वधीं शत्रु चांगले मारले जातील.

दासा च वृत्रा हतमार्याणि च सुदासमिन्द्रावरुणावसावतम्।
(ऋ ७. ८३, १).

त्याच्या दास आणि आर्य शत्रूंना मारून इंद्रावरुणांनीं सुदासाचें रक्षण केलें.

य ऋक्षादंहसो मुचयो यार्यात्सप्तसिन्धुषु।
वधर्दासस्य तुविनृम्ण नीनमः॥
(ऋ. ८. २४, २७.)

जो नष्ट राक्षसापासून व सप्तसिंधूच्याकांठीं राहणाऱ्या आर्यांपासून सोडवितो अशा शूर संपत्तिमान इंद्रा! दासाचीं आयुधें नमीव.

विजानीह्यार्यान्ये च दस्यवो बर्हिष्मते रन्धया शासदव्रतान्।
(ऋ. १. ५१, ८.)

हे इंद्रा! तूं अनुयाते (आर्य) यांना नीट ओळख; जे दस्यू (शत्रू) आहेत त्यांनाहि ओळख. जे कर्मविरोधी आहेत त्यांना यज्ञयुक्त यजमानांच्या स्वाधीन कर.

मूर्धा दिवो नाभिरग्निः पृथिव्या अथाभवदरती रोदस्योः।
तं त्वा देवासोऽजनयन्त देवं वैश्वानर ज्योतिरिदार्याय॥
(ऋ. १. ५९. २.)

अग्नि हा द्युलोकाचें मूर्ध (डोकें) व पृथ्वीची नाभि आहे. तो द्यावा पृथ्वीचा स्वामी आहे. अशा त्या अग्निदेवतेला आर्यलोकांसाठीं देव निर्माण करिते झाले.

यवं वृकेणाश्विना वपन्तेषं दुहंता मनुषाय दस्रा।
अभि दस्युं बकुरेणा धमन्तोरु ज्योतिश्चक्रथुः आर्याय॥
(ऋ. १. ११७. २१)

नांगरांच्या योगानें धान्य पेरणारे, अद्भुत चमत्कार करणारे, मनुष्याकरतां अन्न उत्पन्न करणारे व (अनार्य) दस्यूवर बकुर नांवाच्या शस्त्रानें प्रहार करणारे अश्वी आर्यलोकांकरतां विस्तीर्ण प्रकाश निर्माण करिते झाले.

आर्य=आर्य लोक

धिष्वा शवः शूर येन वृत्रमवाभिनद्दानुमौर्णवाभम्।
आपावृणो ज्योतिरार्याय नि सव्यतः सादि दस्युरिंद्रः॥
(ऋ. २. ११. १८)

हे शूर इंद्रा, ज्या बळानें तूं वृत्राला व और्णवाभाला मारून टाकलेस तें बळ धारण कर. तूं आर्य लोकांसाठीं प्रकाश पाडलास, आणि डाव्या बाजूला दस्यू मरून पडला.

अहं भूमिमददामार्यायाहं वृष्टिं दाशुषे मर्त्याय।
अहमपो अनयं वावशाना मम देवासो अनु केतमायन्॥
(ऋ. ४. २६. २)

मी आर्याला भूमी दिली, हवी अर्पण करणाऱ्या मर्त्याला (पर्जन्य) वृष्टी दिली, तसेंच (खळखळ) शब्द करणारें उदक आणता झालों, व माझ्याप्रमाणेंच देवांनीं (आर्यांवर) अनुग्रह करावा.

त्वं ह नु त्यददमायो दस्यूँरेकः कृष्टीरवनोः आर्याय।
(ऋ. ६. १८. ३).

हे इंद्रा, तूंच कर्महीन दस्यूंना वळणीस आणलेस; व आर्यांना पुत्रदारादि (कृष्टीः) दिलेस.

आभिः स्पृधो मिथतीररिषण्यन्नमित्रस्य व्यथया मन्युमिंद्र।
आभिर्विश्वा अभियुजो विषूचीरार्याय विशोऽवतारीर्दासीः॥
(ऋ. ६. २५. २).

आम्हीं केलेल्या स्तुतीमुळें तूं आमच्यावरोबर लढणाऱ्यांना मारून टाक; आमच्या शत्रूंचा कोप नाहींसा करून टाक; आणि आर्यलोकांकरतां सर्वभर पसरलेल्या दास नांवाच्या सर्व टोळ्यांचा नाश कर.

त्वे असुर्यं १ वसवो न्यृण्वन्क्रतुं हि ते मित्रमहो जुषन्त।
त्वं दस्यूँरोकसो अग्न आज उरु ज्योतिर्जनयन्नार्याय॥
(ऋ. ७. ५. ६).

मित्राप्रमाणें तेजस्वी असलेल्या हे अग्ने, वसूंनीं तुझ्या ठिकाणीं असुरांचें बळ ठेविलें आहे; कारण तुझ्या कृत्यांबद्दल त्यांना प्रेम वाटतें. तूं दस्यूंना त्यांच्या घरांतून हांकून दिलेंस, व आर्यलोकांकरतां चांगला प्रकार उत्पन्न केलास.

सनेम ये त ऊतिभिस्तरन्तो विश्वाः स्पृध आर्येण दस्यून्।
(ऋ. २. ११. १९).

जे तुझ्या साहाय्येंकरून आर्यभावानें सर्व शत्रूंना व दस्यूंना जिंकतील असे पुत्र आम्हाला दे—(सायण).

आतां अथर्ववेदांतील उतारे परीक्षणाकरितां घेऊं. कांहीं अथर्ववेदांतील उतारे ऋग्वेदांतीलच पुनरुक्त आहेत ते वर येऊन गेले आहेत त्यांचीं केवळ स्थानें येथें निर्दिष्ट करितों. अर्थ पूर्वी दिले आहेत.

ऋ. ७. ३१, ५. अथर्व २०. १८, ५.
ऋ. ८. १, ४. अथर्व २०. ८५, ४.
ऋ. १०. ४२, १.अथर्व २०. ८९, १
ऋ. १०. ८६, १. अथर्व. २०. १२६, १.
ऋ. १०. ८६, ३. अथर्व २०. १२६, ३.
ऋ. १०. १३३, ३. अथर्व २०. ९५, ४.
ऋ. १०. १९१. १. अथर्व ६. ६३, ४.

तां मे सहस्राक्षो देवो दक्षिणे हस्त आ दधत्।
तयाहं सर्वं पश्यामि यश्च शूद्र उतार्यः॥
(अथर्व. ४. २०. ४.).

हे सहस्राक्षानें (इंद्रानें) माझ्या दक्षिण हस्तामध्यें दिलेल्या मणिरूप लते तुला मी धारण केल्यामुळें द्रष्टव्य अशा ज्या शूद्रादिहीन जाति त्यांना व विद्वान् ब्राह्मणाला (आर्यः) पहात आहे. तात्पर्यः ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व तद्व्यतिरिक्त शूद्रादि जाति हा सर्वांना वश करून त्यांनी केलेले जादूटोणे त्यांचा मी तुझ्या सामर्थ्यानें नाश करूं शकतों.

सत्यमहं गभीरः काव्येन सत्यं जातेनास्मि जातवेदाः।
न मे दासो नार्यो महित्वा व्रतं मीमाय यदहं धरिष्ये॥
(अथर्व. ५. ११, ३.)

मी खरोखर शहाणपणानें भरलेलों आहें. मी स्वभावतः सर्व सृष्ट वस्तु जाणतों. मी घालून दिलेलीं व्रतें कोणीहि दासानें किंवा आर्यानें स्वतःच्या मोठेपणानें मोडतां कामा नये (ग्रिफिथ).

चतुर्धारं यद्यत आञ्जनं ते सर्वा दिशो अभयास्ते भवन्तु।
ध्रुवस्तिष्ठासि सवितेव चार्य इमा विशो अभि हरन्तु ते बलिम्॥

हे रक्षःफलकमपुरुषा, चारीहि दिशांमध्यें आपला प्रभाव दाखविणारी ही अंजनमणिरूप औषधी तुझ्या हातामध्ये बांधतों. तिच्या सामर्थ्यामुळे चारीहि दिशा तुला निर्भय होतील. आणि असारीतीनें स्वामी ( आर्यः ) झालेल्या व सूर्याप्रमाणें तेजस्वी भासणाऱ्या तुला सर्व प्रजा उपायनें ( खंडणी, देणगी, कर वगैरे ) आणून देतील.

उदग्रभं परिपाणाद् यातुधानं किमींदिनम् ।
तेनाहं सर्वं पश्यामुत शूद्रमुतार्यम् ॥
( अथर्व. ४. २०, ८. ).

हे ओषधे, तुझ्या सामर्थ्यानें मी संचार करणाऱ्या राक्षसांनाहि वशीकृत करूं शकतो व राक्षसोंच्या सहाय्यानें शूद्रादि जाति व **ब्राह्मणादि** (आर्य) जाति ह्या सर्वांना वश करितो.

अयमेमि विचाकशद् विचिन्वन् दासमार्यम् ।
( अथर्व. २०. १२६, १९ )

**यजमानाकडे** पहाणारा, व यजमानाचा नाश करणारा शत्रु, शंना नाहींसें करणारा मी यज्ञाप्रत येतों.

यदी विशो वृणते दस्ममार्या अग्निं होतार मध धीर जायत ॥
( अथर्व. १८ १, २१ )

ज्यावेळीं **चालून जाणारे लोक** हवनीय व तेजस्वी अग्नीला प्रार्थितात त्यावेळी याग करितात.

प्रियं मा दर्भ कृणु ब्रह्मराजन्याभ्यां शूद्राय चार्याय च ।
यस्मै च कामयामहे सर्वस्मै च विपश्यते ॥
( अथर्व. १९. ३२, ८ ).

हे दर्भा मी तुला धारण केलें असल्यामुळें ब्राह्मण, क्षत्रिय, शूद्रजात, **आर्यलोक** व अनुलोमप्रतिलोम जाति ह्या मजवर प्रेम करतील असें तूं कर.

प्रियं मा कुरुदेवेषु प्रियं राजसु मा कृणु ।
प्रियं सर्वस्य पश्यत उत शूद्र उतार्ये ॥
( अथर्व १९. ६२, १ ).

देवांमध्यें मला प्रिय असा कर, राजामध्यें प्रिय कर; जो मला पाहील त्याला, शूद्राला आणि आर्याला मी प्रिय होईन असें कर ( ग्रिफिथ ).

को अर्य बहुलिमा इषूनि ।
( अथर्व २०. १३०, १ ).

दुधाचे साठे कोणीं हरण केले ? ( ग्रिफिथ ),

वरील उताऱ्यांत कांहीं महत्त्वाचीं विधानें दिसून येतात.

( १ ) आर्य या शब्दाचा विरुद्ध न्यास दस्यु, दास आणि शूद्र या तीन शब्दांशीं केला आहे.

( २ ) आर्य व दस्यु या दोघाचा प्रसंगीं विरुद्धन्यास जरी असला तरी अनेक प्रसंगीं आर्य व दस्यु अगर दास यांचें एकत्व वस्त्याचे शत्रू म्हणून दिलेले आहे. म्हणजे वक्ता आर्यी विरुद्धहि जय मिळवूं पहातो.

( ३ ) इन्द्राचा कांहीं प्रसंगीं आर्योशीं स्नेह दाखविला आहे. इन्द्रानें आर्यांसाठीं प्रकाश पाडला. आर्यांना भूमि दिली. त्यानें दासांचीं आयुधें नमवावीं म्हणून त्याची याचना केली आहे.

( ४ ) अर्ण आणि चित्ररथ या दोन राजांचा उल्लेख आर्य या शब्दानें केलेला आहे.

( ५ ) दस्यु हें विशेषण राक्षस किंवा असुर ( वृत्रादि ) म्हणजे जे केवळ कल्पनेचे विषय होते अशांनाहि लाविलेलें आहे.

( ६ ) दासांना आर्य होणें शक्य होतें. जें आर्यत्वकारक धन होतें तें पारमार्थिक असावें किंवा भौतिकहि असेल.

याप्रकारच्या विधानांवरून आर्य हा राष्ट्रसमुच्चय या स्वरूपाचा समुच्चय होता काय हा प्रश्न आपणांस सोडवावयाचा आहे. हा सोडविण्यासाठीं हें लक्षांत ठेवावें कीं,

( १ ) आर्य आणि दस्यु या शब्दांचा पारमार्थिक अर्थ असलेले उतारे उपयोगी नाहींत.

( २ ) आर्य या शब्दाचा समाजांतील शिष्टवर्ग हा अर्थ देणारे उतारेहि उपयोगी नाहींत.

( ३ ) जेथें आर्यांस वर्ण म्हटलें असेल व जेथें वर्ण या शब्दाचा वर्णवाचक अर्थ असण्याची शक्यता असेल अशा प्रकारचे उल्लेख उपयोगी नाहींत.

( ४ ) दस्यु शत्रूंचा संहार या प्रकारच्या विधानामध्यें रूपकाची भाषा असतां कामा नये.

या वरील कसोट्या लावल्या म्हणजे एकहि उतारा आर्य हा शब्द निःसंशय वंशवाचक होता असें दाखवीत नाहीं. तथापि दस्यू यांचें वर्णन आणि आर्य आणि दस्यू यांची प्रसंगीं तुलना व प्रसंगीं दोघांसहि एका माळेंत घालून शत्रू लेखणें ही गोष्ट आर्य आणि दस्यु हे वर्ग वंशसे आनुवंशिक कारणानें भिन्नप्रजनी असावेत असें दिसतें.

दस्यूंचें भौतिक विशेष वर्णन केले आहे, आणि तें वर्णन "आर्यन्" म्हणून समजल्या जाणाऱ्या स्वरूपाहून भिन्न आहे, त्यावरून दोन भिन्न स्वरूपाच्या लोकांचें अस्तित्व वेदवाक्यांत दिसतें. आर्य आणि दस्यू हा भेद मात्र यजनविषयक होय. दस्यूंमध्यें देश्य काळ्या जातींचें प्रामुख्य असावें. पण दस्यु आणि देश्य जाति यांचें एकत्व नाहीं. मंत्र म्हणणाऱ्या लोकांचे शत्रु आर्य म्हणजे यजनशील आणि यजनहीन असे दोघेहि होते. दस्यु हा शब्द भारतीय नसून पर्शुभारतीय आहे, म्हणजे काळ्या लोकांशीं संबंध येण्यापूर्वीचा आहे, आणि म्हणून दस्यू या शब्दाचा जातिविषयक किंवा वंशविषयक अर्थ रूढ नसून पारमार्थिक अर्थ रूढ असतां वेदवक्त्या जनतेचा प्रवेश भारतांत झाला असावा.

दासांना आर्य होतां येणे ज्या अर्थी शक्य होते (ऋ.६.२२,१०) आणि ज्या अर्थी रक्त बदलत नाहीं त्या अर्थी आर्य आणि दास हे शब्द रक्तवाचक नसून यजनवाचक किंवा समाजस्थानवाचक असले पाहिजेत.

आर्य हा राष्ट्रसमुच्चय असणे शक्य आहे अशी शंका उत्पन्न करून देणारा एकच उतारा आहे, आणि तो म्हटला म्हणजे अर्ण

आणि विनय या दोन समुच्चयांस जेथें आर्य म्हटलें आहे तो होय तथापि या उताऱ्याचें महत्त्व कमी करणाऱ्या दोन गोष्टी आहेत एक तर त्या उताऱ्याची भाषा अस्पष्ट आहे आणि दुसरी ते समुच्चय राष्ट्र होते अगर दुसऱ्या प्रकारचे समुच्चय होते हें स्पष्ट नाहीं

आर्यनिश्चय म्हणजे प्राचीन इतिहासातील लोकनिश्चय नव्हे आर्य म्हणजे विशिष्ट प्रकाराने यजन करणारे लोक एवढेंच आर्यन् म्हणजे ते लोक नव्हत घरेचसे आर्यन् लोक देशात असूनहि ते आर्य म्हणजे समयजनधर्मी किंवा यजत्याच्या दृष्टीनें शिष्ट नसतील आर्यन्पैकीं कांहीं आर्य म्हणजे विशिष्ट यजनाचे लोक असताल, व आर्यांत आर्यन् नसलेलेहि लोक असतील देशात ज्या हालचाली दिसून येतात त्या हालचालींमध्यें आर्यहि आहेत व दासहि आहेत काळेहि आहेत व गोरेहि आहेत हे दोन्ही प्रकारचे लोक इतिहासाचे विषय आहेत

वेदामध्ये ज्या हालचाली दिसून येतात त्या हालचालींमध्यें जी मुख्य गोष्ट माडली जाते ती गोष्ट म्हटली म्हणजे आर्यन् लोकांचे देशात झालेले आगमन होय हें आगमन माडणारांनी आर्यन् व आर्य या शब्दांचें समीकरण केलें आहे त्यामुळे विशिष्ट आगमन विषयक विधान मूलत च अग्राह्य आहे ज्या लोकांनीं वेद आणिले ते लोक किंवा त्या लोकांपैकीं कांहीं लोक आपणांस अर्य किंवा आर्य म्हणवीत असत. तथापि जे लोक मन्त्रात दिसणाऱ्या प्रवासाच्या कालीं येथें होते ते आर्यन् नव्हते हें कशावरून? असे समजण्यास नाहीं काय की आर्यन् लोकांचा प्रसार देशात बराच झाला असून त्यांचीं राज्येहि चोहोंकडे स्थापिलीं गेलीं आहेत अशा कालीं सवाङ्मय आर्यन् व इतर मिळून होणारा विशिष्ट यजनी "आर्य" वर्ग आला, आणि त्याचें वाङ्मय क्रमन होत आर्य आणि दस्यू यांचा संबंध खालील आकृतींत स्पष्ट केला आहे.



अ आ इ ई = वेदकालीन लोक
अ क ख ई = आर्य
क आ इ ख = दस्यु
च छ ख ई + ज झ इ ख = आर्यन्
अ क छ च + क आ झ ज = आर्यन् नव्हन

बाहेरच्या आर्य लोकांनीं देशातले लोक घेऊन जिंकले ते लोक काळे होते आणि ऋग्वेदात आर्यांनीं हिंदुस्थान प्रथम जिंकला त्या कालाचे अवशेष आहेत इत्यादि कल्पना ज्या पुराव्यावरून उत्पन्न झाल्या त्या पुराव्यामध्यें वर्ण शब्दाचा पुरावा आणतात त्या मताचे स्थापक म्हणतात कीं वर्ण या शब्दाचा अर्थ ज्याअर्थी रंग असा आहे आणि ज्या अर्थी चार समाजवर्गांना वर्ण असें म्हणतात त्या अर्थी हे समाजवर्ग कातडीच्या रंगावरून पडले आणि हे पडण्याचें कारण जेते गोरे होते आणि जिंकलेले काळे होत

हें सोपे स्पष्टीकरण ग्राह्य करण्यास ज्या अडचणी उत्पन्न होतात त्या येणेप्रमाणे —

(१) गोरे आणि काळे हेच जर वर्ग असते तर हें म्हणणें प्राप्त ठरतें पण वर्ग चार आहेत चार वर्गांचे चार रंग होते असे दिसत नाहीं

(२) हे चार वर्ग केवळ भारतीय नसून पर्शुभारतीय कालातील असावेत असे दिसते का कीं या प्रकारच्या चार वर्गांचें अस्तित्व अवेस्त्यात दिसते

या सन्देहाच्या अडचणी उत्पन्न होत असल्यामुळे वर्ण शब्दाच्या अर्थाविषयीं तसेंच चार वर्गांच्या इतिहासाविषयीं सत्य जाणण्यासाठीं अधिक सूक्ष्म अवलोकनाची जरूरी आहे तरी आपण वर्ण शब्दाचा उल्लेख असणारीं ऋग्वेदातील स्थलें तपासून पाहूं

त्व अग्ने सुमतिं भिक्षमाणादिविश्रवो दधिरे यज्ञियास ।
नक्ताच चक्रुरुषसा विरूपे कृष्ण च वर्णमरुण च सधु ॥
(हा उल्लेख सामाजिक नाही म्हणून निरुपयोगी) १ ७३,७

हे अग्नि पूजार्ह देवअनुग्रहाची प्रार्थना करून द्युलोकीं तुझी उपासना करिते झाले आणि **असमान वर्ण रात्र** आणि उषा यास उत्पन्न करून कृष्णवर्ण आणि श्वेतवर्ण यांस एकत्र स्थापिते झाले

पुन पुनर्जायमाना पुराणीसमानं वर्णमभिशुम्भमाना ।
श्वघ्नीव कृत्नुर्विजआमिनानामर्तस्य देवी जरयन्त्यायु ॥
(वरील कारणामुळ निरुपयोगी) १ ९२ १०

पुन पुन जन्मास येणारी, पुरातन असूनहि **एकाच रूपानें शोभणारी देवी** धूर्त नागविणाऱ्या द्यूतकाराप्रमाणे मर्त्यांचे आयुष्य हळूहळू हरण करणारी होय.

नक्तोषासा वर्णमामेम्याने धापयेते शिशुमेकं समीची ।
द्यावाक्षामारुक्मो अन्तर्विभाति देवा अग्निं धारयन्द्रविणोदाम् ॥
(निरुपयोगी) १ ९६ ५

**रूपें बदलणाऱ्या उषा** आणि रात्र एकत्र होऊन एकुलत्या बाळास स्तनपान देतात देदीप्यमान् अग्नि द्युलोक आणि भूलोक यांमध्ये सर्वत्र प्रकाशतो अग्नीला देव द्रव्यदाता करिते झाले

ओ त्येनर इन्द्रमूतयेगुर्नू चित्तान् त्सद्यो अध्वनो जगम्यात् ।
देवासो मन्युं दासस्य श्चम्नन्ते न आवक्षन्त्सुविताय वर्णम् ॥
(उपयोगी पण वाचक असल्यामुळे) १ १०४

जे जे उपासक लोक रक्षणासाठी इन्द्राकडेस येतात, त्यास तो त्यावर्णाच मार्गी लावो. देव दासाच्या क्रोध नाहीसा करीत. आणि ते धन्याणासर्तां आमच्या वर्णाच्या लोकांस घेऊन येवोत.

कशद्वात्सारुशतो द्वेत्पागादरिदु कृष्णासदनान्यस्याः।
समान यंध अमृते अमूची वावावर्ण चरत आमिनाने ॥
(निरुपयोगी) १. ११३, २

जिचे वासरू देदीप्यमान आहे अशी सुंदर श्वेतवर्णाची ही आली पहा. हिनीं स्थानें कृष्णवर्णाची मोकळी करीत आहे पहा.

*अगस्त्य खनमान खनित्रै प्रजामपत्यंबलमिच्छमानः।
उभौवर्णावृषिरुग्र पुपोष सत्यादेवेष्वाशिषोजगाम ॥*
(उपयोगी) १. १७९, ६

*महाबलि अगस्त्य ऋषि, प्रजा, अपत्य आणि बळ यांची इच्छा* करून खनित्रानें खणता झाला व दोन्ही वर्णांचा उत्कर्ष करता झाला. तो देवापासून यथार्थ आशिर्वादप्रत पावला.

त्वमग्नेसुभृत उत्तमं वयस्तवस्पार्हेवर्ण आसंदृशि श्रियः ।
त्वं वाज प्रतरणोबृहन्नसि त्वं रयिर्बहुलो विश्वतस्पृथु ।
(निरुपयोगी) २. १. १२

हे अग्नि, तू सुपुष्ट होत्साता उत्तम अन्न आहेस. तुझ्या रमणीय मनोरम रुपाच्या ठिकाणीं ऐश्वर्ये आहेत. तूं उत्तम रक्षण करणारा महाअन्न आहेस. तूं मोठी आणि चोहींकडून विशाळ संपत्ति आहेस.

विश्रयन्तामुर्विया हूयमानाद्वारोदेवी सुप्रायणानमोभिः।
व्यचस्वतीर्विश्रयन्तामजुर्या वर्ण पुनाना यशसं सुवीरम् ॥
(निरुपयोगी) २. ३. ५

ज्याच्या मधून जावयाला चांगला मार्ग आहे अशा ज्या द्वारोदेवी त्या स्तोत्रांना बोलाविल्या असता रुंद उघडोत. ज्या लांबरुंद, ज्या अक्षय, ज्या यशोयुक्त चांगल्या वीरांनी युक्त असे वैभव देणाऱ्या त्या द्वारोदेवी उघडोत.

आयन्त अभ्यवनद पनन्तोशिक्तोनाभिमीत वर्णम् ।
सचित्रेणचिकितेरंसु भासाजुजुर्वांयोमुहुरायुवाभूत ॥
(निरुपयोगी) २ ४, ५

जेव्हां माझे स्तोते याचें महत्त्व वर्णन करतात तेव्हां तो आपल्या प्रभेचा त्या उत्सुक जनांप्रत आविर्भाव करतो. तो सुंदर दीप्तीनें रमणीय रीतीनें प्रकाशतो. जो म्हातारा होऊन पुन: पुन: तरुण होतो.

ता अस्यवर्णमायुवोनेष्टु सचन्तधेनव ।
कुवित्तिसृभ्य आवरंस्वसारोया इदंययु ।
(निरुपयोगी) २. ५, ५

ज्या चपळ आणि नेतृसारख्या धेनूंनीं पुष्कळ वेळ तिघींपेक्षा चांगल्या रीतीनें ...... नेत्याच्या कांतीला .... होतात.

येनमाविश्वाच्यवनाकृतानियोदासंवर्णमधरंगुहाकः।
श्वघ्नीवयोजिगीवांल्लक्षमाददर्यः पुष्टानिसजनास इन्द्रः॥
(उपयोगी) २. १२ ४.

ज्याने ही अस्थिर भुवनें निर्माण केली जो दास वर्णाला निर्दाळून दाबता झाला जो विजयी द्यूतमराप्रमाणें शत्रुचें लक्ष धनें घेता झाला. तो हे जन हो, इन्द्र असें समजा.

तेक्षोणीभिररुणेभिर्नाञ्जिभीरुद्राऋतस्य सदनेषुवावृधुः।
निमेघमाना अत्येनपाजसासुश्चन्द्रंवर्णदधिरेसुपेशसम् ॥
(निरुपयोगी) २ ३४, १३.

ते रुद्राचे पुत्र वायाच्या योगानें आणि आरक्त अलंकाराच्या योगानें सत्याच्या स्थानी वाढत असतात. सततगामी सामर्थ्यानें व्याप्त असे जे मरुत् ते आल्हाददायक आणि सुंदर कांति धारण करितात.

इन्द्रस्तुजोबर्हणा आविवेशनृवद्दधानोनर्यापुरुणि ।
अचेतयद्धियइमाजरित्रे प्रेमं वर्णमतिरच्छुक्रमासाम् ॥
(सशयास्पद) ३. ३४, ५

इन्द्र प्रबळ शत्रुसेनांमध्ये शिरला आणि मनुष्याप्रमाणे पुष्कळ धनें घेता झाला तो स्तोत्याकारणें ह्या उषा प्रकाशविता झाला, यांचा शुक्र वर्ण वाढविला झाला.

कदा नोदेवीरमृतस्य पत्नीः सूरोवर्णेनततनन्नुषासः ॥
(निरुपयोगी) ४. ५, १३.

*संग्रामावर ज्या प्रमाणे घोडे येतात त्याप्रमाणें प्रकाशयुक्त व सूर्य-* संबंधी, अमृतसूर्याच्या पत्नी अशा उषा केव्हां आपला प्रकाश पसरतील?

यस्य वर्णमधुश्वतं हरिंहिन्वन्त्यद्रिभिः ।
इन्दुमिन्द्राय पीतये ॥
(निरुपयोगी) ९. ६५, ८.

*हा मधुर हरितवर्ण आणि* रंगयुक्त (शत्रुनिवारणसमर्थकरणारा–सायण) सोमवल्लीपासून दगडांनीं इन्द्रास पिण्याकरितां काढितात.

मर्का इहेवशृणएतिरोरुवदसुर्यं वर्ण निरिणीते अस्यतम् ।
(संशयित) ९. ७१, २

जोरानें, शब्द करीत, तो हिंसकाप्रमाणे जातो; तो स्वत:पासून असुर वर्णाचा त्याग करतो

त्वेषं रूपं कृणुतेवर्णो अस्य स यत्राशयत्समृतासेधतिस्रिधः ।
(निरुपयोगी) ९ ७१, ८

त्याचें रूप वर्ण करितें (कांति धारण करते) जेव्हां तो संग्रामांत येतो तेव्हां शत्रूंचा नाश करतो.

परिद्युक्षःसहसः पर्वतावृधं ... गव्युर्नो अर्षपरिसोमसिच्यः।
(निरुपयोगी) ९ ९७, १५.

प्रभायुक्त असा आमच्याकडे ये. गाळलेला तू गाईची इच्छा करणाराकडे (ये).

गोभिष्टे वर्णमभिवासयामसि ॥
(निरुपयोगी) ९ १०४, ४

तू जो वर्ण धारण करतोस तो आम्ही दुग्धादिकानीं आछत करतो.

शुचि ते वर्णमधिगोषुदीधरम् ॥
(निरुपयोगी) ९ १०५, ४.

अग्नी तुझा शुचि वर्ण दुग्धानें मिश्रित करतो.

रुशद्वत्सा रुशती श्वेत्यागादारैगु कृष्णा सदनान्यस्याः ।

रुशमकेतैर्द्युभिरग्निर्वितिष्ठन्रुशद्भिर्वर्णैरभिराममस्थात् ॥
( निरुपयोगी ) १० ३, ३.

अग्नीनें आपलें स्वच्छ तेज पसरून रात्रीला श्वेत वस्त्रांनीं झाकली आहे.

क्षेमं कृण्वाना जनयो न सिन्धवस्ता अस्य वर्णं शुचयो भरिभ्रति ॥
( निरुपयोगी ) १० १२४, ७

स्त्रियांप्रमाणें क्षेम करणाऱ्या जलांनीं त्याचा ( अग्नीचा ) शुभ्रवर्ण धारण केला आहे.

वरील २२ उल्लेखांपैकीं फक्त पांच उल्लेख विचार करण्याजोगे आहेत, बाकीचे सतरा उल्लेख केवळ दैवतें किंवा निर्जीव वस्तु यांच्या वर्णनाचे आहेत, ते उल्लेख रूपवाचक किंवा प्रभावाचक किंवा कांतिवाचक आहेत ते सामाजिक इतिहासास उपयोगी किंवा तमच्या शब्दाचीं विशेषणें आहेत हे खरें, पण त्यापासून ऐतिहासिक मत्य काहीं निघत नाहीं वर्ण म्हणजे कांति, अगर रूप अगर रंग हा अर्थ उषा, अग्नि, सोम इत्यादि देवतांचे रूप दाखविणारा असल्यामुळें त्यापासून सामाजिक बोध कांहीं एक होत नाहीं. या विधानास आक्षेपक असा प्रश्न उत्पन्न करतील कीं इतर ठिकाणीं जर शब्द रंगवाचक आहे तर दस्यु किंवा दास यास लावला असता तो रंगवाचक कां समजू नये ? आणि दास किंवा दस्यु यांचे वर्णविशिष्टत्व रंगामुळे उत्पन्न झालें असे का धरू नये. पूर्वीच्या संशोधकांना या तऱ्हेचाच विचार उत्पन्न होऊन त्यांनीं वर्ण ही वर्गकल्पना रंगाच्या भेदामुळेंच उत्पन्न झाली असा सिद्धांत काढला. याधाठीं जे चार पाच उतारे मनुष्यविषयक आहेत त्यांचा म्हणजे उतारा अंक ४, ६, ११, १३, १६ यांचा विचार केला पाहिजे. या उताऱ्यांपैकीं उतारा अं. १३ ( ऋ. ३. ३४, ५ ) हा संशयित आहे. उताऱ्यांत तो शुक्रवर्ण वाढविता झाला असें विधान आहे या विधानाचे दोन अर्थ उत्पन्न होऊं शकतील. एक तर उषा प्रकाशविता झाला, त्यामुळें शुक्र वर्ण वाढला किंवा दुसरा स्तोता गोरा असल्यामुळें त्या गोऱ्याच्या सदृश रंगाचे लोक वाढले. दुसरा अर्थ ओढून ताणून आणावा लागेल असे कोणासहि वाटेल, कारण, शुक्र वर्णाची वृद्धि हा परिणाम आहे आणि उषाप्रकाश हें कारण आहे. उषाप्रकाशाचा परिणाम रात्र जाऊन दिवस उत्पन्न होणें हा जितका स्वाभाविक आहे तितका स्तोत्याचे स्नेही गोरे लोक वाढणें हा नाहीं. येणेंप्रमाणें उतारा अंक १३ याची वाट लागते आतां उतारा अंक १६ ( ऋ. ९. ७१, २ ) घेऊं येथें असुर्यवर्णाचा त्याग करतो असें लिहिले आहे. याचा अर्थ लावण्यासाठीं तो उतारा सूक्तांतील इतर विधानांसह लक्षिला पाहिजे हें सूक्त सोमपवमानांतील आहे. आणि असुर्यवर्णास झुगारून देतो हें सदाशी मानवकल्पनेनें सायुज्य पावलेल्या सोमाचें वर्णन आहे. वर्ण हा शब्द तेथें रूपवाचक आहे तथापि तो मनुष्यवर्णवाचक नसून अन्य कारवाचक आहे हें ऋचेच्या उत्तरार्धावरून व्यक्त होईल. त्या काळ्या वर्णाला असुर्यवर्ण म्हणजे सूर्यविहीन रंग असें म्हटले आहे, तो आपलें जुनें आवरण टाकून देऊन तेजोयुक्त आवरण धारण करितो असें उत्तरार्धांत विधान आहे हें राज्यक्रान्तिविषयक किंवा आर्यन् लोकांच्या जयाविषयींचें विधान नाहीं. तें केवळ आकाशांत सूर्याच्या आक्रमणाचे रूपक आहे हें दिसेल. या सोळाव्या अवतरणावरून चामडीच्या रंगावरून चार वर्ण म्हणजे वर्ग उत्पन्न झाले इत्यादि कल्पना काढतां येणार नाहीं.

उतारा अंक ६ हा अगस्त्यलोपामुद्रा यांच्या आख्यानांतील आहे. हें सूक्त आख्यान असो, अगर नाटकाचा अंश असो, त्याशीं आपणास कर्तव्य नाहीं. हा उतारा जेव्हां होत्रमंत्र म्हणून वापरला जातो, तेव्हां या आख्यानास गूढार्थ दिला जातो. अगस्त्य म्हणजे सोम आणि लोपामुद्रा म्हणजे प्रार्थनामंत्र त्या प्रार्थनामंत्रांच्या योगानें सोमाचें सवन होतें. जसें अगस्त्याचें लोपामुद्रेनें प्रार्थनामंत्रांनीं वशीकरण केलें. प्रस्तुत ऋचेंत लोपामुद्रासंभोगाचें वर्णन आहे. अगस्त्यानें संभोग कां केला तर प्रजा, अपत्य, बल यांची प्राप्ति व्हावी म्हणून आणि त्यामुळे परिणाम असा झाला कीं दोन वर्णांचा उत्कर्ष झाला यांत वर्ण हा शब्द वर्गवाचक उघड दिसत आहे, परंतु यावरून एखादा वर्ण काळा होता व एखादा पांढरा होता असें मुळींच दिसत नाहीं जर कोणत्या तरी वर्णांचा उत्कर्ष यानें साध्य झाला असेल तर तो ब्राह्मणक्षत्रियांचा होय असें वृत्तिकार समजतात वर्ण याचा अर्थ येथें वर्ग म्हणून निश्चित झाला आहे, त्यामुळें ज्या कालांत वर्ण याचें रंगापासून वर्गापर्यंत संक्रमण झालें आहे, अशा कालाचा हा उतारा नव्हे. आणि हा शब्द काळ्या गोऱ्याच्या भेदास लावलेला नसून ब्राह्मणक्षत्रियभेदास लावलेला आहे, त्यावरून हा काळ्यागोऱ्यांच्या शत्रुत्वाचा वाचक उतारा नव्हेच.

आतां ४ व ११ हे उतारे राहिले, त्यांच्याकडे वळूं दोन्ही उतारे इन्द्राच्या स्तुतीचे आहेत म्हणजे इन्द्र विरुद्ध दास यांचे द्योतक आहेत. दास व इन्द्र यांच्या युद्धाची कथा ही आर्यन् जातीच्या या देशांतील प्रवेशाची कथा नव्हे इन्द्रानें काळोख नष्ट केला, पाणी मोकळें केले अशा कथा ज्या आहेत त्या आर्यन् लोकांच्या या देशांतील प्रवेशाच्या काळाच्या नसून बऱ्याच पूर्वकालीन आहेत हें सिद्ध करणारा पुरावा म्हणजे या प्रकारच्या कथेसारख्या कथांचें अनेक इन्डोयुरोपीय राष्ट्रांत अस्तित्व पुष्कळ असल्यामुळें या उताऱ्याची मदत देशांतील मूळचे लोक नंतर येणाऱ्या गोऱ्या लोकांनीं जिंकले इत्यादि कल्पना काढण्यास मुळींच उपयोगी पडणार नाहीं. दास किंवा दस्यु हा एक वर्ग आहे, तो अधार्मिक आहे, त्यांचा नाश झाला पाहिजे इत्यादि कल्पना घेऊन मांत्र संस्कृतीचे लोक देशांत आले, आणि त्याच वेळेस वर्ण हा शब्द वर्गवाचक कसा झाला होता या गोष्टी वरील उताऱ्यावरून सिद्ध होतात. वर्ण हा शब्द वर्गवाचक कसा झाला हें पहावयाचे असल्यास आपणांस वेदपूर्व भाषाकडे जावयास लागेल वेदपूर्व भाषा तर आपणांस कोणतीहि ठाऊक नाहीं. यासाठीं आपणांस तौलनिक भाषाशास्त्राची मदत घ्यावी लागते तसेच तौलनिक समाजशास्त्रहि कामास येईल चातुर्वर्ण्य ज्या अर्थी अस्तित्वांत आहे त्याअर्थी चातुर्वर्ण्याचें मूळ

हिंदुस्थानात शोधूं पहाणें आणि त्याकरितां वेदांतील पुरावा शब्दांची मदत घेणें हीच चूक होते चातुर्वर्ण्य या वस्तूचें मूळ रूप पर्शुभारतीयच केवळ नाहीं तर चातुर्वर्ण्याचें प्राचीन ग्रीकांत अस्तित्व असल्यामुळें मूलगृहकालीन म्हणावें लागतें *

ही संस्था पारशांचे, भारतीयांचे, आणि युरोपीयांचे पूर्वज यांत सामान्य असावी असें म्हणण्याचें कारण ती प्राचीन ग्रीकांत होती

ग्रीनिज म्हणतो —

"अटिका देशांत 'चार ट्राइब्जन्' होत्या असें वारंवार वर्णन आढळतें क्लेस्थेनीच्या काळात या चार वर्गांची नावें गेलऑंटिस, होपलेटिस, एजिकोरिस आणि आर्गेडिस अशीं चालत आलीं होतीं हे चार वर्ग राष्ट्राच्या राजकीय व धार्मिक गटांच्या मुळाशीं होते परंतु अटिकामध्ये हाच नावें प्रथमपासून चालत आलीं नव्हता या नावाच्या पूर्वी असलेल्या नावाच्या निदान तीन निरनिराळ्या यादी सापडतात. परंतु या याद्या निरुपयोगी आहेत कारण त्या बखरकारांनीं बनविलेल्या आहेत त्या पुरुषमूलक किंवा स्थानमूलक नावाच्या संकीर्णस्वरूपाच्या आहेत शेवटची यादी ग्रीक नागरिकांच्या आयुष्यक्रमावरून पडलेल्या नावाची दिसते होपलेटिस हे योद्धे होते, एजिकारिस हे पशुपाल होते, आणि आर्गडिस हे कारागीर होते परंतु गेलेऑंटीस हे कोण होते याविषयीं विद्वान् लेखकांत मतभेद आहे स्ट्राबो म्हणतो ते पुरोहित होते प्लुटार्कच्या मतें ते शेतावरील मजूर होते यापैकीं पहिलें ( स्ट्राबोचें मत ) खरें असणे शक्य नाहीं कारण अटिकामध्यें पुरोहितांची जात ( Caste ) केव्हांच नव्हती हीं दोन्हीं मतें म्हणजे केवळ तर्कच आहेत

शिवाय हीं नावें लोकांच्या वर्गांचीं वाचक घेणें कठीणच आहे. कारण सोलनच्या वेळीं त्या सर्वांस सारख्याच दर्जाचे लेखीत व प्रत्येक समुच्चयातून सारखेच सभासद मंत्रिसभेत घेत. दुसरें एक थीसस यानें केलेलें वर्गीकरण उपलब्ध आहे त्यानें यूपेट्रिडि, गिओमोरि आणि डेमीउर्गी अशीं त्या वर्गांचीं नावें दिलीं आहेत. परंतु हे वर्ग वरील वर्गांशीं समक्षेत्री नव्हते कारण युपिट्रिडि वर्गांत वरील चारहि समुच्चयाचे लोक आढळून येत "

ग्रीनिज पुढें म्हणतो कीं, आयोनियन लोकांचें धर्मशास्त्र या चार वर्गांच्या कल्पनांनीं निगडित झालें आहे

एवंच हे चार वर्ग आपणांस ग्रीकांत फार जुनी व धर्मशास्त्राच्या मुळाशीं असलेली पण हे चार वर्ग म्हणजे काय, कोठून आले इत्यादि संशय उत्पन्न करणारी संस्था म्हणून सांपडतात

या पुराव्यावरून चार वर्ग फार जुने आहेत त्यांचें मूळ ऋग्वेदांत सापडणार नाहीं आणि पांढरा आणि काळा असे दोन वर्ग हिंदुस्थानात पडून हिंदुस्थानांतच उत्तरकालीं दोहोंचे चार झाले ही कल्पना ग्राह्य करतां येणार नाहीं हें सिद्ध होतें

हे चार वर्ग जर फार जुने आहेत, तर आतां प्रश्न एवढाच उत्पन्न होतो कीं, या चार वर्गांस "वर्ण" हा शब्द केव्हां लावू लागले व का लावू लागले

वर्ण या शब्दाचा नेहमींचा ऋग्वेदांतील अर्थ म्हणजे रंग हाच आहे वर्ण म्हणजे वर्ग या अर्थानें हा शब्द ऋग्वेदांत फारच थोड्या ठिकाणीं येतो

ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र या चार वर्गांचा उल्लेख (१०९०) ऋग्वेदांत झाला आहे तथापि गायेरीं कोणत्याहि वर्गाचा उल्लेख वर्ण म्हणून आला नाहीं. ब्राह्मणादि चार वर्गांच्या क्रियांचा आणखी एक प्रच्छन्न उल्लेख आहे. त्यांत प्रत्येक वर्गाचें नांव दिलेलें नाहीं वर्ण शब्द वापरला नाहीं फक्त क्रिया दर्शविली आहे तो उल्लेख देतों

**क्षत्राय त्वं श्रवसे त्वं महीया इष्टये त्वमर्थमिव त्वामित्यै।**
**विसदृशा जीविताभिप्रचक्ष उषा अजीगर्भुवनानि विश्वा ॥**
**( १ ११३, ६ )**

कोणी अधिकारार्थ ( क्षत्राय ) कोणी कीर्तीसाठीं ( श्रवसे ) कोणी मोठ्या द्रव्यासाठीं ( महीया इष्टये ) आणि कोणी कामी करतें जावें ( अर्थं इत्यै ) म्हणून यथाप्रमाण विसदृश जीवनोपाय पहाण्यासाठीं उषेनें सकल भुवनास जागृत केलें आहे

"दोन वर्णांच्या वृद्धीसाठीं अगस्त्यानें लोपामुद्राग्रहण केलें" असा एकच उल्लेख कदाचित् ब्राह्मणादि वर्णांस अनुलक्षून असावा असें म्हणतां येईल, पण तेंहि स्थान अनिश्चित आहे, कां कीं आर्य आणि दास या दोन्हीं समुच्चयांस तो लावतां येईल एवढ्यावरून असें म्हणतां येईल कीं ब्राह्मणादि वर्गांस वर्ण हें नाव मन्त्रकालीं मिळालेंच नव्हतें वर्ण हा शब्द वर्गविषयक होता पण तो ब्राह्मणादि वर्णांना लागत नव्हता.

दास व आर्य हे दोन वर्ण म्हणून उल्लेखिलेले आहेत. म्हणजे त्या वेळेस समाजात दोन तऱ्हेचीं वर्गीकरणें होतीं एक ब्राह्मणादि वर्गीकरण आणि दुसरें वर्णवर्गीकरण ब्राह्मणादि वर्गीकरण कर्मविशिष्ट आहे पण आर्य आणि दास हें वर्गीकरण कर्मविशिष्ट नसावें हें वर्गीकरण ज्या तत्त्वावर झालें असेल त्या तत्त्वावर वर्ण नावाचा वर्ग रचला गेला असावा आपणापुढें जो प्रश्न आहे तो हा कीं, आर्य आणि दास यामध्ये जो भेद दिसतो तो रंगावरून उत्पन्न झाला कीं टमच्या वंशावरून उत्पन्न झाला ? रंगावरून उत्पन्न झाला ही कल्पना मोहक दिसते पण ती जितकी मोहक आहे आणि सहज उत्पन्न होते तितकी ती अधिक भ्रामक आहे

गौर्यांचा काळ्यांशीं संनिकर्ष झाल्यानें जर वर्णकल्पना उत्पन्न झाली असेल तर त्या वर्ण शब्दाचा अभाव आपणांस पर्शुभारतीय कालांत दिसला पाहिजे व पर्शुभारतीय कालांत जर अभाव असेल

* पर्शुभारतीय म्हणा म्हणण्यास कारण त्यांचा उल्लेख पारशांच्या पवित्र ग्रंथांत आहे — थ्राइश् पिश्त्राइश् आथ्रव रथएश्ताओ, वास्त्र्यफ्शुयस् हु इति ( पिश्त्राइश् म्हणजे चार, म्हणजे उपाध्याय, रथिष्ट, शेतकरी आणि कारागीर ( यस्न १९. १७ )

तर तो अवेस्त्यांतहि असणें स्वाभाविक आहे. पण प्रत्यय याच्या उलट आहे.

आपणास एवढेंच पहावयाचें कीं वर्गास वर्ण शब्द कसा लागला यासाठीं आपणांस वर्णसदृश शब्द अवेस्त्यांत पाहिले पाहिजेत व वर्ण शब्दाच्या इतिहासाविषयीं विचार केला पाहिजे. अवेस्त्यांत वर्ण शब्दाचा सदृश शब्द 'वरेन' हा आहे व तो निरनिराळ्या चार अर्थांनी उपयोगांत आणलेला दिसतो. ते अर्थ असे (१) धार्मिक मत, पंथ, संप्रदाय (२) इच्छा, निवड (३) आवरण, उदाहरणार्थ पृथ्वीचें आवरण म्हणजे हिरवळ वगैरे (४) कास्पियन समुद्राच्या नैऋत्येस मासंदरान व दमावंद पर्वताच्या जवळचा डोंगराळ प्रदेश. परंपरेप्रमाणें हा प्रदेश म्हणजेच पतश्खवार्गर अथवा दैलम होय व याचेंच अर्वाचीन नांव गिलान असून येथे फरिदुन बादशहाचा जन्म झाला.

या अनेक अर्थांपैकीं एक अर्थ धार्मिक मत, पंथ अगर संप्रदाय हा आहे हें लक्षांत घेतलें पाहिजे. या अर्थावरून दोन कल्पना उत्पन्न होतात. उपाध्ये, राजन्यवर्ग, सामान्यजन इत्यादि वर्ग निरनिराळ्या संप्रदायांचे म्हणजे निरनिराळीं कार्ये करणारे असा होऊन नंतर वर्ण असा होणें शक्य आहे. वरेन शब्दाचे रीतभात किंवा संप्रदाय या अर्थांचे वाचक कांहीं उतारे घेऊं.

अथा जओषम (जंआयॅक्) उशातिश् वरेनेंग् (वेरनेंग्) हच इते ध्वहमी खताओ अपेमेम् नना अघत् (यस्न ४८. ४)

त्याची समृद्धि, त्यांची **रीतभात** प्रजाधर्मास अनुसरून असते व नाना रीतीनें, (हे अहुर मज्द) त्यात तुझें शहाणपण दिसून येते.

अत्‌सा अह्माइ वरेनाइ मज्दा निदातेम् अषेम् सुइद्याइ तकएषाइ राषयेंन्हे द्रुज् यस्न ४९. ३

जगातील लोकांचें कल्याण होण्यासाठीं हे अहुरमज्द् तूं **मार्ग** घालून दिला आहेस व नुकसान करण्यासाठीं व वाईट मार्ग दाखविण्यासाठीं द्रुजाची योजना केली आहेस.

अका मना द्रेग्वाओ हिज्वा अनिरेतो

यस्न ४५. १.

दुष्ट मनुष्य स्वतःच्या गैर **वर्तणुकीनें** व आपल्या वाईट वाचेमुळें आड मार्गाला जातो.

नोइत् ना मनाओ, नोइत् सेंघा, नोइत् खतवो,

नएदा वरना, नोइत् उख्धा, नएदा श्यओथ्ना, नोइत् दएनाओ, नोइत् उर्वानो हचइंते.

यस्न ४५. २

ना आपले विचार, ना आपलें शिक्षण, ना आपलें शहाणपण, ना आपली **रीतभात**, ना आपली वाचा, ना आपल्या इच्छा, न आपलें अन्तःकरण, ना आपले जीव, एकमेकांशीं मिळते असतात.

तर वर्ण या शब्दाचा वेदकालांत जेव्हां तो समुच्चयास लावीत तेव्हां काय अर्थ समजावा, याला उत्तर एवढेंच कीं दास या वर्गाचें जें स्वरूप वेदांत असेल त्या स्वरूपाचा बोधक असावा. दास या वर्गाचें जर स्थित्यंतर झालें असेल तर वर्ण या शब्दाचेंहि त्यावरोबर अर्थांतर होईल. लोक दासाला वर्ण शब्द लावीत असतील, दासांची स्थिति जशी पालटत चालली असेल तसा हळूहळू क्रमानें वर्ण शब्दाचा अर्थहि बदलत चालला असेल. दासांच्या स्थितींतील अंतर किंवा दोन अर्थांनी दास शब्दाचा उपयोग आपणांस ऋग्मंत्रांतच दिसत आहे. पण वर्ण शब्दाचें मात्र अर्थांतर ऋग्मंत्रांत स्पष्ट होत नाहीं. तें ऋग्मंत्रोत्तरकालीं झालें असावें.

एवढ्या विवेचनावरून हें स्पष्ट होईल कीं काळ्या लोकांस गोऱ्यांनीं जिंकलें आणि त्यामुळें वर्ण शब्दास रंग अर्थ जाऊन वर्ग अर्थ उत्पन्न झाला ही कल्पना ग्राह्य होत नाहीं. दास वर्गाचीं स्थित्यंतरें आपणांस तपासलीं पाहिजेत. तीं तपासलीं असतां वर्ण या शब्दाचा इराणी लोकांत रीतभात किंवा संप्रदाय असा जो अर्थ होता तसाच वैदिक आर्यांत होता काय, तसा असल्यास कोणत्या क्रमानें रीतभात हा अर्थ जाऊन विशिष्ट कर्म करणारा वर्ग असा अर्थ उत्पन्न झाला, हें स्पष्ट होईल.

वर्ण शब्दानें तर्सेच चार वर्गांच्या कल्पनेचें इराणी लोकांत अस्तित्व असल्यामुळें म्हणजे पशुंभारतीय काळांत अस्तित्व असण्याची जबर शक्यता असल्यामुळें गोऱ्यांनीं काळ्यांस जिंकून रंगभेदावर वर्णभेद निर्माण झाला ही कल्पना ग्राह्य होत नाहीं. आणि ही कल्पनाच जर ग्राह्य होत नाहीं तर वर्ण शब्दाचा पुरावा देशांत वंशमहत्त्वक्रांति झाली असें सिद्ध करण्यास कसा उपयोगी पडणार?

आता दासकल्पनेकडे वळूं. दास शब्दाच्या इतिहासांत हिंदुस्थानांतील काळ्याचा येणाऱ्या गोऱ्यांनीं केलेला पराजय सांपडतो काय तें पाहूं

ऋग्वेदांत समानार्थी व सदृश उच्चाराचे दास आणि दस्यु असे दोन शब्द आढळतात.

या दोन शब्दांपैकीं दस्यु हा शब्द उत्तरकालीन वाङ्मयांत येत नाहीं.

दास हा शब्द उत्तरकालीन वाङ्मयांत गुलाम अगर नोकर या निश्चित अर्थानें येतो. हा अर्थ ऋग्वेदांतहि दिसतो, तथापि या अर्थाच्या ऋचा फार थोड्या आहेत. दास याचा शत्रु असाहि अर्थ ऋग्वेदांत आहेच. हे दोन अर्थ ज्याअर्थीं ऋग्वेदांत दिसतात त्याअर्थीं दोन कल्पनांची शक्यता आहे. एक कल्पना म्हटली म्हणजे वेदभाषी आर्य पार संस्कृतानंतर लोक देशांत येण्यापूर्वी हे दोन अर्थ तयार झाले असावेत. दुसरी कल्पना अशी कां एका काळच्या शत्रूंचें गुलामांत स्थित्यंतर मानकालातच होऊन शब्दांचें अर्थद्वैत झालें असावें.

या विषयावर प्रत्यक्ष ऋचांच्या अवलोकनानें काय प्रकाश पडतो तें पाहूं. दस्यु आणि दास हे दोन शब्द एकत्र दिसत आहेत व ते कांहीं अंशीं एकाच अर्थाचे आहेत. प्रथम दस्यु शब्द घेऊं आणि दस्युकल्पना काय होती तिची ग्रंथाधारें मांडणी करूं आणि त्या कल्पनेची आणि 'दास'कल्पनेशीं तुलना करूं.

वधीर्हि दस्युं धनिनं घनेन एकश्चरन्नुपशाकेभिरिन्द्र ।
( १. ३३, ४ ).

कारण की हे इन्द्रा, तूं आपल्या शक्तिमान साहाय्यकर्त्यांसह ( मरुतांसह ) चाल करून जाऊन धनसंपन्न दस्यूला ( वृत्राला-सायण ) एकटाच मारिता झालास.

त्वमेता रुदतो जक्षतश्चायोधयोरजस इन्द्रपारे ।
अवादहोदिव आदस्युमुच्चा प्रसुन्वत स्तुवत शंसमाव ॥
( १. ३३, ७ )

हे इन्द्रा, हे ( वृत्राचे अनुचर ) रडत असताना आणि हासत असताना तूं त्यांजबरोबर लढून त्यास अंतरिक्षाच्या पलीकडेस हाकून देता झालास. ( असुर वृत्राला ) दस्यूला चाळून स्वर्गा-पासून खालीं ढकलून देता झालास. तुला सोम अर्पण करणारा स्तव-णारा त्याचें स्तोत्र राखून उंच ठिकाणीं ठेवलेंस.

परिर्यादिन्द्ररोदसी उभे अबुभोजीर्महिना विश्वतः सीम् ।
अमन्यमानाँअभिमन्यमानैर्निर्ब्रह्मभिरधमोदस्युमिन्द्र ॥
( १ ३३, ९ )

हे इन्द्रा जेव्हां तू आपल्या महिम्याने द्यावापृथिवी सर्व बाजूंनी वेष्टिता झालास, हे इन्द्रा भजणाऱ्या स्तोत्याच्या योगाने न भजणाऱ्यांस तूं मारून टाकलेस आणि दस्यूस ( वृत्रास-सायण ) फुकून टाकलेस.

अग्निनातुर्वशंयदुं परावतउग्रादेवं हवामहे ।
अग्निर्नयं नववास्त्वंबृहद्रथं तुर्वीतिं दस्यवेसहः ॥
( १. ३६, १८ ).

अग्नीच्या द्वारें आम्ही तुर्वशाला, यदूला, उग्रदेवाला दूर प्रदेशा-हून बोलावितो. दस्युहननाकरिता ( राक्षसास मारण्याकरितां-पंडित ) अग्नि नववास्त्व, बृहद्रथ, तुर्वीति यांजला येथें आणो.

त्वं मायाभिरपमायिनो धमः स्वधाभिर्ये अधिशुप्तावजुह्वत ।
त्वं पिप्रोर्नृमणः प्रारुजः पुरः प्रऋजिश्वानंदस्युहत्येष्वाविथ ॥
( १ ५१, ५ ).

तूं कपटी जनांस कपटांच्या योगानें फुंकून फेंकून दिलेस. कारण ते हविर्द्रव्यांनीं आपल्याच तोंडांत हवन करीत. हे नराहितचिंतका, तूंच पिप्रूचीं नगरें भग्निलीस आणि दस्यु-( अनार्य-पंडित ) मार-णाच्या प्रसंगी ऋजिश्व्याला सरक्षिलेस.

त्वं कुत्सं शुष्णहत्येष्वाविथारन्धयोऽतिथिग्वायशंबरम् ।
महान्तंचिदर्बुदंनिक्रमीः पदासनादेवदस्युहत्यायजज्ञिषे ॥
( १ ५१, ६ )

तूंच शुष्णमारणाच्या प्रसंगीं कुत्साला रक्षिलेस, शंबराला अति-थिग्वाच्या हस्तगत केलेस, अर्बुद मोठा असूनही त्याला पाया-खाली तुडविलेस, दस्यूंना ( शत्रूंना ) नाश करण्याकरता तूं प्राचीन काळापासून जन्मला आहेस.

विजानीह्यार्यान्येचदस्यवोबर्हिष्मतेरन्धयाशासदव्रतान् ।
शाकीभवयजमानस्य चोदिताविश्वेत्तातेसधमादेषुचाकन ॥
( १. ५१, ८ )

आर्य कोण आणि दस्यु कोण हे तूं ओळख, कर्महीनांना ( दस्यूंना ) यज्ञकर्त्यांच्या स्वाधीन कर, यज्ञकर्त्यांचा नायक हो. तुझे हे पराक्रम मला यज्ञांत गाण्यास आवडतात

एभिर्द्युभिः सुमना एभिरिन्दुभिर्निरुन्धानो अमतिं गोभिरश्विना
इन्द्रेणदस्युंदरयन्त इन्दुभिर्युतद्वेषसः समिषारभेमहि ॥
( १. ५३, ४ ).

या दैदीप्यमान सोमरसांनीं तूं प्रसन्न होऊन गुराच्या व घोड्याच्या योगाने दारिद्र्य नष्ट कर. इन्द्रानें सोमरसाचे साहाय्य मिळवून दस्यूंस मारून आम्हाला निःशत्रु केलें.

प्रनूमहित्वंवृषभस्यवोचं यं पूरवो वृत्रहणं सचन्ते ।
वैश्वानरोदस्युमग्निर्जघन्वाँ अधूनोत्काष्ठा अवशंबरंभेत् ॥
१. ५९ ६

ज्या वृत्रहंत्याला मनुष्ये सेवितात त्या महाशूराचें महाभाग्य मला त्वरित गाऊ दे. वैश्वानर अग्नि दस्यूला मारून उदकें कंपविता झाला. शंबर उच्छेदून खाली टाकता झाला

त्वं इत्यदिन्द्रचोदीः सखावृत्रंयद्वज्रिन्वृषकर्मन्नुभ्नाः ।
यद्धशूरवृषमणः पराचैर्विदस्यूँर्योनावकृतोवृथाषाट् ॥
( १. ६३ ५ )

हे इन्द्रा, वज्रधरा, शूरकर्मा, शूरमनस्का तूं सखा होऊन वृत्राचा नाश करिता झालास. तूं जो युद्धांत सहज यश मिळ-विणारा युद्धात दस्यूंस तोडून हाकून लाविता झालास, तें सर्व तूंच म्हणून करता झालास.

तद्युत्वावृत्रहन्तमंयोदस्यूँरवधूनुषे ।
द्युम्नैरभिप्रणोनुमः ॥
( १. ७८, ४ ).

तूं जो दस्यूंना विध्वंसून टाकतोस त्या तुला अतिपराक्रमी अग्नीला पुनः पुनः स्तवितो.

सवज्रभृद्दस्युहाभीमउग्रः सहस्रचेताः शतनीथऋभ्वा ।
चम्रीषोनशवसा पाञ्चजन्योमरुत्वान्नोभवत्विन्द्रऊती ॥
( १. १००, १२ ).

तो वज्रधारी, दस्युहंता, भयंकर, महाप्रतापी, सहस्रप्रज्ञ, शतो-पाय महान् होय, सोमाप्रमाणें बळाच्या योगेंकरून पंचजनांचा धनी होय. तो मरुतांसहित इन्द्र आमचा सरक्षिता होवो.

दस्यूञ्छिम्यूँश्चपुरुहूतएवैर्हत्वापृथिव्यांशर्वानिबर्हीत् ।
सनत्क्षेत्रंसखिभिः श्वित्न्येभिः सनत्सूर्यंसनदपः सुवज्रः ॥
( १. १००, १८ ).

पुरुहूत इन्द्रानें दस्यूंना व शिम्यूंना यांच्या ( मरुतांच्या ) साहाय्यानें पृथ्वीवर मारून वज्रानें भेदून टाकले. त्यानें आपल्या तेजःपुंज मित्राच्या साहाय्यानें क्षेत्र घेतले, सूर्य हरण केला. सुंदर वज्र धारण करणाऱ्या इन्द्रानें उदकें हरण केलीं.

सजातूभर्माश्रद्दधान ओजः पुरोविभिन्दन्नचरद्विदासीः ।
विद्वान्वज्रिन्दस्यवेहेतिमस्यार्यं सहोवर्धयाद्युम्नमिन्द्र ॥
( १ १०३, ३ )

प्रजांचें पालन करणारा तो ( इन्द्र ) पराक्रम करण्याच्या इच्छेनें दस्यूंचीं नगरें फोडून टाकिता झाला व त्यांजवरून चालला. हे वज्रधरा मर्मस्थल जाणणारा असा तूं दस्यूंच्या अंगावर शस्त्र टाक. हे इन्द्रा आर्य लोकांचें बळ व यश वाढीव.

तदूचुषेमानुषेमायुगानिकीर्तेन्यं मघवानामबिभ्रत् ।
उपप्रयन्दस्युहत्यायवज्रीयद्धसूनुः श्रवसेनामदधे ॥
( १ १०३, ४ )

अति प्रबळ इन्द्र हातांत वज्र घेऊन दस्यूंना मारण्यासाठीं चाल करून जाऊन जें नाव धारण करिता झाला तेंच अद्यात नाव मघवा या मानवी काळात दीन उपासकांसाठीं धारण करीत असतो.

यो विश्वस्य जगतः प्राणतस्पतिर्यो ब्रह्मणे प्रथमो गा अविन्दत्।
इन्द्रो यो दस्यूँरधराँ अवातिरन्मरुत्वन्तं सख्याय हवामहे ॥
(१.१०१,५).

जो सर्व जगम प्राण्यांचा स्वामी, जो स्तोत्यांकरितां प्रथम गाई शोधून राखता झाला, जो इन्द्र दस्यूंना रसातळास पिळून संहारिता झाला त्या मरुद्युक्त इन्द्राला आम्ही मैत्रीसाठीं बोलाविलें.

आपि नरावहसः पाञ्चजन्यमृबीसादत्रिमुञ्चथो गणेन।
मिनन्ता दस्योरशिवस्य माया अनुपूर्वं वृषणा चोदयन्ता ॥
(१.११७,३).

हे शूर अश्वी देवहो, पांच प्रकारच्या जनांना प्रिय अशा अत्रीला तुम्ही तुषाग्नीपासून पुत्रपौत्रासह मुक्त केले आणि एकामागून एक असा येणाऱ्या दस्यूच्या अशिव मायेचें निवारण केलें.

यवं वृकेणाश्विना वपन्तेषं दुहन्ता मनुषाय दस्रा ।
अभि दस्युं बकुरेणा धमन्तोरु ज्योतिश्चक्रथुरार्याय ।
(१.११७,२१).

हे अश्वीहो, मनुष्यांच्या करितां तुम्ही नांगराच्या योगानें जमीनीत धान्य पेरिलें आणि अन्न उत्पन्न केलें तसेंच दस्यूच्या वर वज्रप्रहार करून आर्यांच्या साठीं उत्तम प्रकाश उत्पन्न केला.

धिष्वा शवः शूर येन वृत्रमवाभिनद्दानुमौर्णवाभम्।
अपावृणोर्ज्योतिरार्याय नि सव्यतः सादि दस्युरिन्द्र ॥
(२.११,१८).

हे इंद्रा ज्या बलाच्या योगानें वृत्राला मारलेंस आणि और्णवाभ असुराचा वध केलास तें बल धारण कर. आर्यांच्यासाठीं तूं उजेड पाडिलास तेव्हां दस्यु डाव्या बाजूस पडली.

सनेम ये त ऊतिभिस्तरन्तो विश्वाः स्पृध आर्येण दस्यून्।
अस्मभ्यं तत्त्वाष्ट्रं विश्वरूपमरन्धयः साख्यस्य त्रिताय ॥
(२.११,१९.)

इंद्रा, तुझ्या कृपेनें शत्रूंचा आणि दस्यूंचा नाश करणाऱ्या लोकांचा आम्हांला लाभ होवो. विश्वरूप त्वाष्ट्रचें त्रिताशीं सख्य होण्यासाठीं जसें त्याला तूं आपल्या शासनाखालीं आणलेंस तसेंच त्या विश्वरूपाला आमच्या शासनाखालीं आण.

यः शश्वतो मह्येनो दधानानमन्यमानाञ्छर्वा जघान ।
यः शर्धते नानुददाति शृध्यां यो दस्योर्हन्ता स जनास इन्द्रः ॥
(२.१२,१०).

हे जन हो, मोठमोठाला पाप करणाऱ्यांना आणि इंद्राची उपासना न करणाऱ्यांना वज्रानें मारणारा, बलवान् असल्यामुळें गर्व वाहणाऱ्यांना बल न देणारा आणि दस्यूचा वध करणारा असा जो असेल त्यालाच तुम्ही इंद्र समजा.

शतैरपद्रन्पणय इन्द्रात्र दशोणये कवयेऽर्कसातौ।
वधैः शुष्णस्याशुषस्य मायाः पित्वो नारिरेचीत्किं चन प्र ॥
(२ १३,९)

तुला कोणी हांक मारिली असता आपल्या त्यास हजार घोडे जुंपून नेलास, तसेच कारागृहात दस्यूपासून दभीतीचें रक्षण केलेस असा तूं अत्यंत स्तुत्य आहेस.

स्वप्नेनाभ्युप्या चुमुरिं धुनिं च जघन्थ दस्युं प्र दभीतिमावः ।
रम्भी चिदत्र विविदे हिरण्यं सोमस्य ता मद इन्द्रश्चकार ॥
(२.१५,९)

इंद्रा, तूं चुमुरि आणि धुनि या दस्यूंना निद्रावश असतां मारिलेस आणि दभीतीचें रक्षण केलेस आणि त्यामुळे दस्यूचें धन दभीतीला मिळालें. सोमपानानें मदयुक्त झाल्यामुळें हीं सर्व कामें तूं केलीस.

तस्मै तवस्यमनु दायि सत्रेन्द्राय देवेभिरर्णसातौ।
प्रति यदस्य वज्रं बाह्वोर्धुर्हत्वी दस्यून्पुर आयसीर्नि तारीत्॥
(२.२०,८)

नेहमीं इंद्रानें बल देवांच्या बलाहून अधिक असतें. (स्तोत्यांनी) जेव्हा इंद्राच्या बाहूवर वज्र व्यायाम लाविले तेव्हा त्यानें दस्यूंना मारिलें आणि त्यांच्या लोखंडी नगरांचा विध्वंस केला.

कृणोत धूमं वृषणं सखायोऽस्रेधन्त इतन वाजमच्छ ।
अयमग्निः पृतनाषाट् सुवीरो येन देवासो असहन्त दस्यून्॥
(३.२९,९)

मित्रहो, धूमवान् असा अग्नि उत्पन्न करा. बलवान् असतांत तेंच मंथनरूप युद्धाला चला. हा अग्नि शत्रूंच्या सैन्याला जिंकणारा आहे. याच्याच योगानें देवांनीं दस्यूंना जिंकिलें.

महो महानि पनयन्त्यस्येन्द्रस्य कर्म सुकृता पुरूणि ।
वृजनेन वृजिनान्त्सं पिपेष मायाभिर्दस्यूँरभिभूत्योजाः ॥
(३.३४,६)

या इंद्राचीं मोठमोठी पराक्रमरूप चरित्रें उपासक नेहमीं स्तवीत असतात. त्या इंद्रानें पापाचरण करणाऱ्यांचा बलानें नाश केला, आणि मायेच्या योगानें दस्यूंचा संहार केला.

ससानात्याँ उत सूर्यं ससानेन्द्रः ससान पुरुभोजसं गाम्।
हिरण्ययमुत भोगं ससान हत्वी दस्यून्प्रार्यं वर्णमावत् ॥
(३.३४,९)

त्या इंद्रानें उपासकांना घोडे दिले, प्रकाश दिला, पुष्कळांचें पोषण करणारी गाय दिली, तसेंच धन आणि भोग्य वस्तु दिल्या. त्या इंद्रानें दस्यूंना मारून आर्यांचें रक्षण केलें.

यं नु नकिः पृतनासु स्वराजं द्विता तरति नृतमं हरिष्ठाम्।
इनतमः सत्वभिर्यो ह शूषैः पृथुज्रया अमिनादायुर्दस्योः ॥
(३.४९,२)

जगांत सौभाग्यवान्, शूर व मोठ्यांत मोठा असलेला अशा इंद्राला संग्रामांत पराभव करणारा दुसरा कोणी नाहीं. मरुतांच्या योगानें शक्तिमान् होणाऱ्या वेगवान् इंद्रानें दस्यूचें प्राण हरण केले.

अच्छा कविं नृमणो गा अभिष्टौ स्वर्षाता मघवन्नाधमानम्।
ऊतिभिस्तमिषणो द्युम्नहूतौ नि मायावानब्रह्मा दस्युरर्त ॥
(४.१६,९)

हे मघवा सूर्यप्रकाशार्थ होणाऱ्या युद्धांत मदतीची याचना करणाऱ्या गायकांच्या मदतीसाठीं ये. आणि आमंत्रणांत त्याला साहाय्य कर. प्रार्थनाहीन जादूगार दस्यु त्यास दुःख

आ दस्युघ्ना मनसा याह्यस्तं भुवत्ते कुत्सः सख्ये निकामः।
स्वे योनौ नि षदतं सरूपा वि वां चिकित्सदृतचिद्ध नारी॥
(४ १६, १०).

दस्यूंचा घात करणाऱ्या इंद्रा, तुझ्या स्नेहाची इच्छा करणाऱ्या कुत्साच्या घरीं जाऊन तू आणि कुत्स एका ठिकाणीं बसला. त्या वेळीं दोघे सारखेच दिसल्यामुळें तुझ्या स्त्रीला तुला ओळखतां आलें नाहीं.

कुत्साय शुष्णमशुषं नि बर्हीः प्रपित्वे अह्नः कुयवं सहस्रा।
सद्यो दस्यून्प्र मृण कुत्स्येन प्र सूरश्चक्रं वृहतादभीके॥
(४ १६, १२).

हे इंद्रा, तूं कुत्सासाठीं शुष्णाला मारिलेंस आणि हजारों लोकांच्यासह कुयव राक्षसास प्रातःकालीं मारिलेस व त्याच वेळीं वज्रानें दस्यूंचा वध केलास तसेंच तूं सूर्याचें रथचक्र मोडिलेंस

अहञ्जिन्द्रा अदहदग्निरिन्दो पुरा दस्यून्मध्यंदिनादभीके।
दुर्गे दुरोणे क्रत्वा न यातां पुरू सहस्रा शर्वा नि बर्हीत्॥
(४ २८, ३).

हे सोम, इंद्र आणि अग्नि यांनीं वाटसरू लोकांना ज्याप्रमाणे वाटेंत गांठून लुटारू लोक लुटतात त्याप्रमाणे प्रातःकालीं दस्यूंचा सर्व सैन्यासह संहार केला.

विश्वस्मात्सीमधमाँ इन्द्र दस्यून्विशो दासीरकृणोरप्रशस्ताः।
अबाधेथाममृणतं नि शत्रूनविन्देथामपचितिं वधत्रैः॥
(४ २८, ४)

हे इन्द्रा, तूं दस्यूंना अत्यंत हलके (गुणहीन) ठरविलेस आणि दासी लोकांना (दासी विशास) गर्ह्य ठरविलेस. हे इंद्र आणि सोम हो तुम्ही शत्रूंचा नाश केलात आणि शत्रूंच्या प्रहारापासून भक्तांचा बचाव केलात.

उतो हि वां दात्रा सन्ति पूर्वा या पूरुभ्यस्त्रसदस्युर्नितोशे।
क्षेत्रासां ददथुरुर्वरासां घनं दस्युभ्यो अभिभूतिमुग्रम्॥
(४ ३८, १).

हे द्यावापृथिवी हो, घोडे, भूमि आणि पुत्रपौत्रादि संतति असा प्रकारची संपत्ति याचकांना दान देणाऱ्या त्रसदस्यूला तुम्हांजवळून मिळाली आहे. तसेंच दस्यूंचा वध करण्यासाठी मजहि तुम्हीच त्याला दिलें.

वधेन दस्युं प्र हि चातयस्व वयः कृण्वानस्तन्वे३ स्वायै।
पिपर्षि यत्सहसस्पुत्र देवान्त्सो अग्ने पाहि नृतम वाजे अस्मान्॥
(५ ४, ६)

हे अग्ने, आयुधानें दस्यूंचा वध कर. पुत्ररूप अशा हविर्द्रव्यासाठीं अन्न उत्पन्न करून देवांना तृप्त करणाऱ्या अग्ने संग्रामामध्यें आमचें रक्षण कर.

आ वो अपृणतोऽत्रिः सासह्याद्दस्यूनिषः सासह्यान्नॄन्।
(५ ७, १०).

हे अग्ने जे दस्यू दानें देत नाहींत त्यांचा अत्रि पराभव करो आणि जे अन्नदान देत नाहींत त्यांना जिंको.

अग्निर्जातो अरोचत घ्नन्दस्यूञ्ज्योतिषा तमः।
अविन्दद्गा अपः स्वः॥
(५ १४, ४)

अग्नि उत्पन्न होतांच दस्यूंचा नाश करिता झाला व आपल्या तेजानें अंधकार नाहींसा करिता झाला. तसेंच उदकें आणि सूर्य यांना जाणिता झाला.

प्रान्यच्चक्रमवृहः सूर्यस्य कुत्सायान्यद्वरिवो यातवेऽकः।
अनासो दस्यूँरमृणो वधेन नि दुर्योण आवृणङ्मृध्रवाचः॥
(५.२९,१०).

इन्द्रा तू सूर्याच्या रथाचें दुसरें चाक (रथापासून) वेगळें केलेंस आणि कुत्साला धन मिळवून दिलेंस. तसेंच नाक नसलेल्या दस्यूंचा शस्त्रानें वध केलास आणि युद्धांत मृध्रवाचांचा नाश केलास

स्त्रियो हि दास आयुधानि चक्रे किं मा करन्नबला अस्य सेनाः।
अन्तर्ह्यख्यदुभे अस्य धेने अथोप प्रैद्युधये दस्युमिन्द्रः॥
(५ ३०, ९)

दासानें (युद्धामध्यें) स्त्रिया पुढें केल्या असता 'हें अबला रूप सैन्य मला काय करणार?' असें इंद्र म्हणाला. नंतर त्यानें त्यापैकीं दोन स्त्रिया अंतर्गृहांत ठेवल्या आणि तो दस्यूबरोबर युद्ध करावयास गेला.

वृष्णे यत्ते वृषणो अर्कमर्चानिन्द्र ग्रावाणो अदितिः सजोषाः।
अनश्वासो ये पवयोऽरथा इन्द्रेषिता अभ्यवर्तन्त दस्यून्॥
(५.३१, ५)

हे इंन्द्र, ज्या वेळीं रथरहित, अश्वरहित व तुझ्या प्रेरणेनें गमन करणारे वीर्यवान् मरुत् दस्यूंचा वध करितात, आणि तुजसाठीं स्तोत्र करितात त्या वेळीं (सोम कुटण्याचे) दगड गुळगुळे जातात.

तदिन्नु ते करणं दस्म विप्राहिं यद्घ्नन्नोजो अत्रामिमीथाः।
शुष्णस्य चित्परि माया अगृभ्णाः प्रपित्वं यन्नप दस्यूँरसेधः॥
(५ ३१, ७)

हे दर्शनीय आणि सुबुद्ध इंद्रा, वृत्रासुराला मारून तूं आपला जो पराक्रम या जगांत प्रकट केलास तो केवळ अपूर्व होय. वृत्रासुराचा वध करणें हा असाधारण पराक्रम तुझाच आहे. तूं शुष्णाच्या परिमाया हिसकावून घेतल्यास आणि रणांगणावर जाऊन दस्यूंना चोप दिलास.

पातं नो रुद्रा पायुभिरुत त्रायेथां सुत्रात्रा।
तुर्याम दस्यून्तनूभिः॥
(५.७०, ३)

हे रुद्रो, रक्षणाला उपयुक्त अशा आयुधांनीं तुम्ही आमचें संरक्षण करा आणि शुभकारक अशा पालन साधनांनीं तुम्ही आमचें पालन करा. तुमच्या कृपेनें दस्यूंना डोळा चुकवून आम्ही आपल्या मुलाबाळांसह पार निघून जाऊं.

नाना ह्यग्नेऽवसे स्पर्धन्ते रायो अर्यः।
तूर्वन्तो दस्युमायवो व्रतैः सीक्षन्तो अव्रतम्॥
(६ १४, ३)

हे अग्ने, शत्रूंचें लुटून आणलेलें सर्व धन जतन करण्याचें कामीं तुझ्या स्तवन करणाऱ्यांमध्यें मोठी चढाओढ लागते तुझें स्तवन करणारे ऋषी आपल्यावर हल्ला करणाऱ्या दस्यूंना मारतात आणि तुझ्या यागरूप व्रताशीं विरोध करणाऱ्या अव्रत अशा लोकांचा तुझ्यासाठीं केलेल्या यागरूपी व्रताच्या योगानें नाश करण्याची ते इच्छा धारण करतात

तमुत्वा पाथ्यो वृषा समीधे दस्युहन्तम ।
धनंजयं रणेरणे ॥

(६. १६. १५).

प्रत्येक रणसंग्रामामध्यें शत्रुभूत अशा दस्यूंचा नाश करून त्यांचें सर्व धन जिंकणाऱ्या तुज अग्नीला पाथ्योवृषा नामक कोणा एका ऋषीनें इंद्रानें पाहून प्रदीप्त केला.

त्वं ह त्यदृदमायो दस्यूँरेकः कृष्टीरवनोरार्याय ।
अस्ति स्विन्नु वीर्यं तत्त इन्द्र न स्विदस्ति तदृतुथा वि वोचः ॥

(६. १८, ३).

हे इंद्रा दस्यूंना तूं तेव्हांच दमवून टाकलेस आणि आर्यांना पुष्कळ लाभ करून दिलास, पण हें तुझें त्या वेळचें सामर्थ्य हल्लीं तुझ्या अंगीं आहे किंवा नाहीं हें स्पष्ट करून सांग.

यदा दिवि पार्ये सुष्विमिन्द्र वृत्रहत्येऽवसि शूर यातो ।
यदा दक्षस्य बिभ्युषो अबिभ्यदरन्धयः शर्धत इन्द्र दस्यून् ॥

(६. २३, २)

हे इंद्रा, शूर अशा योद्ध्यांसह जेव्हां तूं द्युलोकाच्या ठिकाणीं शत्रूंशीं लढण्यासाठीं जातोस तेव्हां तूं उत्कृष्ट रीतीनें सोमकुटणाऱ्याचें रक्षण करितोस यज्ञकुशल, परंतु शत्रूंना भ्यालेला जो असेल त्याला तूं निर्भय होण्याला अभय देतोस आणि रणांगणावर तुझ्याशीं भिडणाऱ्या दस्यूंचा नाश करून टाकतोस

नकीरेवन्त सख्याय विन्दसे पीयन्ति ते सुराश्वः ।
यदा कृणोषि नदनुं समूहस्यादित्पितेव हूयसे ॥

(६ २१, ८)

हा इंद्र आमच्याकडून एकदा का स्तविला गेला म्हणजे तो धिप्पाड शरीराच्या मनुष्याला नमला जात नाहीं, युद्धामध्ये धैर्य धरून स्थिरपणें लढणाराला तो जिंकला जात नाहीं, कर्मरहित अशा दस्यूंनीं भुरळ घातलेल्या पुरुषाला तो जुमानीत नाहीं, फार तर काय पण दुर्गम असे मोठमोठाले पर्वत ह्या इंद्राला सहज मिर फाऊन देतां येतात. प्रत्युत अशा ठिकाणींहि गंभीरपणा हा इंद्राचा विषय होऊन वसतो.

एवेदिन्द्रः सुहव ऋष्वो अस्तूती अनूती हिरिशिप्रः सत्वा ।
एवा हि जातो असमात्योजाः पुरू च वृत्रा हनति नि दस्यून् ॥

(६ २९, ६).

महान्, अशा प्रकारचा तो इंद्र आम्हाला सुखानें बोलावतां येईल असा होवो. वारी पिवळसर हनुवटीचा तो इंद्र आला किंवा न आला तरीसुद्धां त्याचें स्तोत्र करणाराला तो धनप्राप्ति करून देण्याला कारणीभूत होतो. आतां हा प्रादुर्भूत झालेला इंद्र, असामान्य अशा प्रकारच्या बलानें संपन्न होवो आणि अनेक शत्रूंना मारून दुष्ट अशा दस्यूंचाहि तो नाश करो

त्वं शतान्यव शम्बरस्य पुरो जघन्थाप्रतीनि दस्योः ।
अशिक्षो यत्र शच्या शचीवो दिवोदासाय सुन्वते सुतक्रे
भरद्वाजाय गृणते वसूनि ॥

(६ ३१, ४)

हे इंद्रा, तुझ्यावर चाल करून येणारा जो शंबर नामक दस्यु, त्याचीं तूं शंभर नगरें फोडून जमीनदोस्त केलीस. हे प्रज्ञावन्त इंद्रा, कुटलेल्या सोमाला विकला जाणारा तूं सोमाभिषव करणाऱ्या दिवोदासाला जेव्हां मोठ्या हिमतीनें धन मिळवून दिलेंस त्याच वेळीं स्तवनकर्त्यां मज भरद्वाजालाहि तूं पुष्कळ धन दिलेंस

कुवित्सस्य प्र हि व्रजं गोमन्तं दस्युहा गमत् ।
शचीभिरप नो वरत् ॥

(६ ४५, २४).

शत्रूंचा नाश करणारा तो इंद्र कुविन्नामक एका माणसाच्या पुष्कळ गाईंनीं भरलेल्या गोठ्यांत जर शिरतो तर तो आमच्या कर्मांनीं संतुष्ट होऊन आम्हाला त्या कुविन्नाच्या गोठ्यातल्या गाई दाखवो

ते अस्मयं वसवो न्यण्वन्क्रतुंहिते मित्रमहो जुषन्त ।
त्वं दस्यूँरोकसो अग्न आज उरु ज्योतिर्जनयन्नार्याय ॥

(७ ५, ६).

हे मित्रपूजक असे, वस्ती करून राहणाऱ्या देवांनीं आपले सारें बळ तुझ्या ठिकाणीं ठेवलें आणि तुला शानदत्या अशा यज्ञकर्मांनें त्यांनीं सेवन केले कां का आर्यांला तू अधिक तेजस्वी करतोस आणि दस्यूंना त्यांच्या ठिकाणांतून हांकून लावतोस

न्यक्रतून्ग्रथिनो मृध्रवाचः पणीँरश्रद्धाँ अवृधाँ अयज्ञान् ।
प्रप्र तान्दस्यूँरग्निर्विवाय पूर्वश्चकारापराँ अयज्यून् ॥

(७ ६, ३)

अयाजक हिंसाप्रचुर अशा वाणीनें बडबड करणारे पणी, यज्ञकर्मांविषयीं श्रद्धा नसलेले, स्तोत्रें गाऊन अग्नीची कीर्ति न वाढविणारे, यज्ञकर्म न करितां वृथाच कालक्षेप करणारे असे जे पणि नामक दस्यु, त्यांना अग्निदेव पूर्णपणें हांकून लावतो. इतकेंच नाहीं तर सर्व देवांत अग्नि हा प्रमुख होण्याला अयाजक अशा दुसऱ्या कित्येक लोकांनाहि रसातळीं दडपून टाकतो

त्वं नृभिर्नृमणो देववीतौ भूरीणि वृत्रा हर्यश्व हंसि ।
त्वं नि दस्युं चुमुरिं धुनिं चास्वापयो दभीतये सुहन्तु ॥

(७ १९, ४)

हे इंद्रा यज्ञलेल्या ऋत्विजांनीं तूं स्तवनीय आहेस. जय मिळविण्याची इच्छा करणारे देव ज्या ठिकाणीं जातात अशा रणसंग्रामामध्यें मरुतांच्या सहवर्तमान जाऊन तू पुष्कळ शत्रूंना ठार मारलेस, पीतवर्ण अशा अश्वांनीं सज्ज केलेल्या रथांत बसून हे इंद्रा, तूं दभीति नामक राजर्षीसाठीं चुमुरी व धुनि या दोन दस्यूंना आपल्या वज्राच्या प्रहारानें मारून टाकलेंस.

निशुष्ण इन्द्र धर्णसिं वज्रं जघन्थ दस्यवि ।
वृषा ह्युग्र शृण्विषे ॥

(८. ६ १७)

हे इंद्रा, आपणावर चाल करून येणाऱ्या शुष्ण नामक दस्यूला तूं आपल्या हातांत धारण केलेल्या वज्राचा प्रहार करून मारून टाकलेस हे बलिष्ठ, तूं भक्तांचा मनोरथ पूर्ण करणारा आहेस असें ऐकतों तर आम्हांला अपेक्षित असें धन तू आम्हांला दे

मायाभिरुत्सिसृप्सत इन्द्र द्यामारुरुक्षतः ।
अव दस्यूँरधूनुथाः ॥

(८ १४ १४).

हे ईश, तूं आपल्या मातिरूप नमस्कारांच्या योगानें गर्जना करीत पावून घुलोकावर आरोहण केलेंस आणि आपल्यावर चालून येणाऱ्या दस्यूंना खाली तोंड करून भिरकावून दिलेंस.

**यो अग्निः सप्तमानुषः श्रितो विश्वेषु सिंधुषु।**
**तमागन्म त्रिपस्त्यं मन्धातुर्दस्युहन्तममग्निं यज्ञेषु पूर्व्यं नभंतामन्यके समे॥**
(८. ३९, ८)

सात ऋत्विजांनीं संपन्न असा जो अग्नि सर्व नद्यांच्या ठिकाणीं आश्रय करून रहात असतो व ज्यानें मंधात्याच्या शत्रूंना मारून टाकिलें, त्या यज्ञमुख्य अशा अग्नीला स्तविण्यासाठीं आम्ही येथें आलों आहों. तर तो अग्नि दुसऱ्याहि सर्व शत्रूंना निर्दळून टाको.

**रथिरासो हरयो येते अस्त्रिध ओजो वातस्य पिप्रति।**
**येभिर्नि दस्युं मनुषो निघोषयो येभिःस्वः परीयसे॥**
(८. ५०, ८.)

जे घोडे तुझा रथ ओढतात, जे कोणास त्रास देत नाहींत, ते वाऱ्याच्या वेगासहि मागें टाकतात. त्यांच्यासह तूं मानवशत्रूस (मनुषदस्युं) नष्ट करतोस, व त्यांच्यामुळें तूं सर्वत्र फिरतोस.

**पार्षद्वाणः प्रस्कण्वं समसादयच्छयानं जिव्रिमुद्धितं।**
**सहस्राण्यसिषासद्गवामृषिस्त्वोतो दस्यवे वृकः॥**
(८. ५१, २).

पृषद्वाणाचा पुत्र प्रस्कण्वाचा यजमान होता. प्रस्कण्व हा असहाय व दुर्बल होता. तुझ्या साहाय्यानें दस्यवेवृक ऋषीनें एक हजार गायी मिळविल्या.

**दश मह्यं पौतक्रतः सहस्रा दस्यवेवृकः।**
**नित्याद्रायो अमंहत॥**
(८. ५६, २).

पुतक्रताचा पुत्र दस्यवेवृक यानें मला स्वतःच्या धनांतून दहा हजार गायी दिल्या.

**अन्यव्रतममानुषमयज्वानमदेवयुं।**
**अव स्वः सखा दुधुवीत पर्वतः सुघ्नाय दस्युं पर्वतः॥**
(८. ७०, ११).

अव्रत, अमानुष (इन्द्रयाजिनाम् अप्रियम्), अयज्वा, देव न मानणारा अशा मनुष्यास पर्वत, तुझा सखा, स्वर्गातून खाली टाकून देतो. अशा दस्यूला पर्वत मृत्यूकडे ढकलतो.

**त्वं हि शश्वतीनामिन्द्र दर्ता पुरामसि।**
**हन्ता दस्योर्मनोर्वृधः पतिर्दिवः॥**
(८. ९८, ६).

म्हणून तूं शत्रूंच्या अनेक पुरांचा नाश करणारा आहेस. तूं दस्यूंचा मारक, मनुष्याचा संवर्धक व स्वर्गाचा पति आहेस.

**सुषितस्य मनामहेऽति सेतुं दुराव्यं।**
**साह्वांसो दस्युमव्रतं॥**
(९. ४१, २).

अव्रत दस्यूचा नाश करून दुष्टाचा सेतू मोडून आनंदाच्या मार्गाचा विचार करूं.

**प्रतानीदस्य कर्त्वा चेतन्ते दस्युतर्हणा।**
**ऋणा च धृष्णुश्चयते॥**
(९. ४७, २)

त्याचे कार्य आलें. दस्युनाशरूप झालें आहे आणि तो आपलें ऋण धैर्यानें अवलक्षितो.

**इन्द्रो यद्वो महा कर्माणि चक्रिर्हन्ता वृत्राणामसि सोमपूर्भिद्**
**पैद्वो न हि त्वमहिनाम्नां हन्ता विश्वस्यासि सोम दस्योः**
(९. ८८, ४).

हे सोमा तूं पुरांचा भेद करणारा आहेस. ज्या इंद्रानें मोठीं कामें केलीं त्या इंद्राप्रमाणें तूं वृत्राचा हंता आहेस. ज्याप्रमाणें पैद्वानें सर्व नाश केला त्याप्रमाणें तूं सर्व दस्यूंचा नाशक आहेस.

**तत्तु सत्यं पवमानस्यास्तु यत्र विश्वे कारवः सनसंत।**
**ज्योतिर्यदह्ने अकृणोदुलोकं प्रावन्मनुं दस्यवेकरभीकम्॥**
(९. ९२, ५).

तर पवमानासंबंधीं हें सत्य असो कीं जेथें सर्व कवि जमतात त्यानें दिवसाचा उजेड व जागा आम्हांस दिली, मनूला मदत केली, व दस्यूला पराभविलें.

**अकर्मा दस्युरभि नो अमन्तुरन्यव्रतो अमानुषः।**
**त्वं तस्यामित्रहन्वधर्दासस्य दम्भय॥**
(१०. २२, ८).

अकर्मा, अव्रत, आणि अमानुष दस्यु आमच्या भोंवतीं आहे. हे अमित्रघ्ना त्या दासाचें शस्त्र फसव.

**दस्युहनं पूर्भिदमिन्द्र सत्यमस्मभ्यं चित्रं वृषणं रयिं दाः॥**
(१०. ४७, ४).

इंद्रा दस्युहननाचें आणि पुरनाशाचें सत्य आम्हांस चित्र आहे, आम्हांस संपत्ति दे.

**अहं दस्युभ्यः परि नृम्णमाददे गोत्रा शिक्षन्दधीचे मातरिश्वने॥**
(१०. ४८, २),

मी (इंद्र) दस्यूंचें सैन्य पराभविलें आणि दधीचीस आणि मातरिश्वास गोठे दिले.

**अहमत्कं कवये शिश्नथं हथैरहं कुत्समावमाभिरूतिभिः।**
**अहं शुष्णस्य श्नथिता वधर्यमं न यो रर आर्यं नाम दस्यवे॥**
(१०. ४९, ३),

मीं अत्कास कवीसाठीं ठोसऱ्यांनीं मारलें. मी आपल्या मदतीनें कुत्सानें रक्षण केलें. मी शुष्णाचा मारला. मी मृत्यूचा बाण धरणारा मी दस्यु शत्रूस आर्याचें नांव लाऊं दिलें नाहीं.

**पीत्वी सोमस्य दिव आ वृधानः शूरो निर्युधाधमद्दस्यून्॥**
(१०. ५५, ८).

तो शूर सोम पिऊन आकाशांतून दस्यूस आपल्या आयुधांनीं घालवून देतो.

**आभिर्हि माया उप दस्युमागान्मिहः प्र तम्रा अवपत्तमांसि॥**
(१०. ७३, ५).

आपल्या सर्व कपटाचारासह इंद्र दस्यूजवळ (मारण्याच्या इच्छेनें) आला. अर्यमानें नाहींशी झालेली दृष्टि त्यानें दिली. आणि अंधार नाहींसा केला.

**अर्भादि मन्यो तवस स्तवीयान्तपसा युजा वि जहि शत्रून्।**
**अमित्रहा वृत्रहा दस्युहा च विश्वा वसून्या भरा त्वं नः॥**
(१०. ८३, ३).

बलवानाहून बलवान् अशा मन्युदेवा आमच्याकडे ये तयाच्या साहाय्यानें शत्रूंना जिंक. अमित्र, वृत्र व दस्यु यांचा घात करणाऱ्या इंद्रा आम्हांला सर्व प्रकारची संपत्ति प्राप्त करून दे.

अयन्ते अस्म्युपमेह्यर्वाङ् प्रतीचीनः सहुरे विश्वधायः ।
मन्योवज्रिन्नभिमामावहत्स्वहनाय दस्यूँरुत बोध्यापेः ॥
(१० ८३, ६).

अत्यंत सहनशील व विश्वाला धारण करणाऱ्या इंद्रा हे सर्व लोक तुझेच आहेत तर त्यांच्यासाठीं माघारा फीर. वज्रधारी इंद्रा दस्यूंना मारण्यासाठीं व बंधुजनांना जागे करण्यासाठीं परत ये.

समस्मिञ्जायमान आसतग्नाउतेमवर्धन्नद्यः १ स्वगूर्ताः ।
महेयत्त्वापुरूरवो रणायावर्धयन्दस्युहत्यायदेवाः ॥
(१०. ९५, ७)

( हे पुरूरवन् ), तुझा जन्म झाल्याबरोबर देवांनीं मोठ्या संग्रामाकरितां व दस्यूंना मारण्याकरिता तुझ्या सामर्थ्याची वाढ केली.

सनृतमो नहुषोस्मत्सुजातः पुरो भिनदर्हन्दस्युहत्ये ॥
(१०. ९९, ७).

तो सुजात नरश्रेष्ठ नहुषाची पुरें दस्युहत्याप्रसंगीं आमच्यासाठीं भिन्न करता झाला.

उपपत्सीदिन्दुं शरीरैः श्येनो यो पाष्टिर्हन्ति दस्यून् ॥
(१०. ९९, ८).

श्येनसदृश इंद्र जेव्हां सोमबिंदूंत आपल्या लोहमय अंगानीं गमन करतो तेव्हां तो दस्यूंना मारतो.

वज्रं यश्चक्रे सुहनाय दस्यवे ॥
(१०. १०५, ७)

दस्यूला मारण्याकरितां जो वज्र तयार करतो.

आवोयदस्युहत्ये कुत्सपुत्रं प्रावो यद्दस्युहत्ये कुत्सवत्सम् ॥
(१०. १०५, ११)

तूं कुत्सपुत्रास दस्युहत्येसाठीं मदत केलीस. तूं कुत्सपुत्रास दस्युहत्येसाठीं मदत केलीस.

आमित्रहा वृत्रहा दस्युहंतमं ज्योतिर्जज्ञे असुरहा सपत्नहा ॥
(१०. १७०, २).

वृत्रास, असुरास, शत्रुस ठार मारणारा दस्यूंचें हनन करणाऱ्या ज्योतीस जाणता झाला.

पूर्वगत विवेचनावरून काय निघतें तें पाहूं.

( १ ) दस्यूला धनिन् म्हटलें आहे.

( २ ) दस्यूला इंद्र मारतो.

( ३ ) दस्यूंना जाळून इंद्रानें स्वर्गातून खालीं टाकले.

( ४ ) दस्युहननासाठीं, यदु, तुर्वश, उग्रदेव, नववास्त्व बृहद्रथ आणि तुर्वीति यांस अग्नि आणो म्हणून कवि प्रार्थना करतो.

( ५ ) दस्यूला मारून ऋजिश्वाचें रक्षण केलें. ऋजिश्वाचें ज्या दस्यूपासून रक्षण केलें त्याचें नांव पिप्रु होतें.

( ६ ) शुष्ण, शंबर आणि अर्बुद यास मारण्याचे मागून कवि हे दस्यु मारण्याकरतां जन्मला असेंच अस निर्णय करतो.

( ७ ) आर्य आणि दस्यु यातील फरक ओळखण्यासाठीं स्तोता इंद्रास सांगतो आणि हा फरक ओळखून यजन न करणारास करणाऱ्याच्या हवालीं करावयास सांगतो.

( ८ ) दस्युनाश इंद्रानें सोमरसाच्या साहाय्यानें केला.

( ९ ) दस्यूला व शंबराला मारून उदकें वर्षविण्याची क्रिया अग्नीनें केली.

( १० ) दस्यु व शिम्यु यांचा एकत्र उल्लेख करून त्यांस पुरुहूत इंद्रानें मारलें असें म्हटलें आहे.

( ११ ) दस्यूंचीं नगरें भेदून इंद्र त्यांवरून चालला.

( १२ ) दस्यूंच्या अंगावर शस्त्रें टाकून आर्यांचें बल वाढविण्यासाठीं इंद्रप्रार्थना.

( १३ ) दस्युहननाचा परिणाम मघवा हें नांव इंद्रास देण्यांत झाला आहे

( १४ ) गाई शोधून काढणें व दस्यूंस मारणें या दोन क्रियांचा एकत्र उल्लेख.

( १५ ) दस्यू मायावी आहे त्याच्या अशिव मायेचा प्रतिकार अश्वीनीं केला.

( १६ ) दस्यूला मारण्याचा परिणाम आर्यांकरितां प्रकाशोत्पत्ति हा दाखविला आहे.

( १७ ) शत्रूंना आणि दस्यूंचा नाश करणारी प्रजा स्तोता इंद्रास मागतो.

( १८ ) दस्यूपासून दभीतीचें रक्षण केलेंस.

( १९ ) चुमुरि आणि धुनि यांस दस्यु म्हटलें आहे. ते निद्रिस्त असतां त्यांस इंद्रानें मारलें.

( २० ) दस्यूंचीं नगरें आयस म्हणजे लोखंडी होतीं.

( २१ ) दस्यूंना देवांनीं जिंकलें.

( २२ ) देवांनीं दस्यूंस जिंकलें तें यज्ञ करून जिंकलें.

( २३ ) इंद्रानें दस्यूंस जिंकलें तें मायेनें जिंकले

( २४ ) दस्यु ससैन्य होते.

( २५ ) दस्यूंस दासीविंश असे म्हटलें आहे.

( २६ ) दस्यू दान देत नाहींत.

( २७ ) दस्यूचा पराभव अग्नि करो असे स्तोता म्हणतो.

( २८ ) दस्यूंना अनास आणि मृध्रवाच म्हटलें आहे. त्या दस्यूंना मारण्याचें श्रेय इंद्रास दिलें आहे. कौत्स्यादि मानवाला दिलें नाहीं.

( २९ ) मरुत् दस्यूचा वध करतात.

( ३० ) ज्याच्या कृपेनें दस्यूचा दोळा चुकवून आम्ही मुलाबाळांसह निघून जाऊं म्हणून स्तोता म्हणतो.

( ३१ ) मनानी अवतांना पराभविण्याची क्रिया व दस्यूंना मारण्याची क्रिया गाता एकत्र उल्लेखितो.

( ३२ ) दस्यु मनुष्यांस भुरळ पाडतो परंतु इंद्रस्तवनामुळें दस्यूंनें भुरळ घातलेल्या मनुष्यास जुमानीत नाहीं.

(३३) शंबर दस्यु आहे त्याची शंभर नगरें इंद्र जमीनदोस्त करतो

(३४) पर्णीस दस्यु म्हटलें आहे आणि त्यास, अक्रतु, मृध्रवाच, अश्रद्ध, अवृध (अग्नि न वाढविणारे) असेंहि म्हटलें आहे

(३५) इंद्रयाच्या गतीचा परिणाम मनुष्य दस्यूस नष्ट करण्याकडे होतो.

(३६) दस्यवेवृक नांवाचा एक यजक होता

(३७) दस्यूला पात मृत्यूकडे टाकतो

(३८) दस्यु अव्रत होता

(३९) पैद्वानें ज्याप्रमाणें सर्वनाश केला त्याप्रमाणें इंद्रानें दस्युनाश केला

(४०) सोमानें दस्यूला पराभविलें

(४१) दस्युघ्न याचा व दिवसाचा प्रकाश व गायी गोसावा देणें व मनूचें मरणरक्षण याचा सहोल्लेख आहे.

(४२) दस्यु अकर्मा, अमंत, आणि अमानुष आहे तो दास आहे

(४३) इंद्राच दस्यूचा अभिगमन अवर्षणनाशाशीं आणि अंधकारनाशाशीं संबद्ध आहे

(४४) इंद्रास अमित्रहा, दस्युहा व वृत्रहा असें म्हटलें आहे

(४५) दस्यूंना मारणें व वसुधन नाश होणें या क्रियांचा अन्योन्याश्रय स्तोता सांगतो

(४६) दस्यूला मारण्यासाठीं देवांनीं पुरूरव्याचें सामर्थ्य वाढविलें असें उर्वशीच्या तोंडीं वाक्य सूक्तकार घालतो

(४७) नहुषाचीं पुरें दस्युहत्याप्रसंगीं इंद्रानें भिन्न केलीं

(४८) कुत्सपुत्रास इंद्रानें दस्युहत्येसाठीं मदत केली

या उल्लेखांत दस्युस्वरूप येणेंप्रमाणें दिसतें

पिप्रु, शुष्ण, शंबर, अर्बुद, चुमुरि, धुनि यांस दस्यु म्हटलें आहे पर्णीसहि दस्यु म्हटलें आहे शिम्यु, नहुष, आणि वन हे देखाल दस्यूंमध्यें मोडत असावेत.

दस्यूंस मायावी, धनिन्, अनास, मृध्रवाच, अक्रतु, अश्रद्ध अयज्ञ, अव्रत, अकर्मा, अमानुष, दास अशीं विशेषणें लावलीं आहेत ते दान देत नाहीत मनुष्यांस मुळें घालतात

दस्यूंचीं नगरें होतीं तीं शंभर होतीं तीं आयस म्हणजे लोखंडाचीं किंवा काशाचीं होतीं ते गमेस्य होते

दस्यु मारल्याचें श्रेय इंद्रास मुख्यत्वेंकरून दिलें आहे प्रसंगी अग्नीस, देवास, अर्थात, सोमास, मरुतांस व पर्जन्यास दिलें आहे मानवांपैकीं दि अनेकांचा दस्यून्यंशों संबंध आलेला आहे असा मनु पुरूरवा, यदु, तुर्वश ऋजिश्वा, त्रसदस्यु, पुरुकुत्स, दभीति, ऋजिश्वा, दर्भीति, कुत्सपुत्र, अत्रि, हे मोडतात या उल्लेखांपैकीं कांहीं उल्लेख देतो दासु दस्यु यांच्या नाशाचे वाचक आहेत आणि कांहीं सामान्य शत्रुवाचक आहेत कांहांना दस्यूचा नाश यश करून केलेला आहे

दस्युहननाचा परिणाम, उदकें मोकळीं होणें, गाई शोधून काढणें, प्रकाशोत्पत्ति, पृथ्वी मोकळी होणें म्हणजे जागा मिळणें, लोक जागे होणें इत्यादि वर्णिले आहेत.

दस्यूस दासीविश असें म्हटलें आहे

दस्यूच सामुदायिक शत्रुत्व दोघांशीं दाखविलें आहे एक देवांशीं आणि दुसरें आर्यांशीं

आता दासविषयक उल्लेखांत काय सांपडतें तें पाहूं

हे उषे, यशानें भरलेली सुवीरांनी युक्त व अनेक दासांनी परिपूर्ण (दासप्रवर्ग रयिं) अशी संपत्ति मला लाभो

(१ ९२, ८)

प्रत्यक्ष पाऊन करणारा तो इंद्र पराक्रम करण्याच्या इच्छेनें दस्यूंचीं नगरें (दासी पुर) फोडून टाकिता झाला, वज्रधरा इंद्रा सामर्थ्य जाणणारा असा तू दस्यूंच्या नगरावर अस्त्र टाक आणि हे इंद्रा आर्य लोकांचें बळ आणि यश वाढीव

(१ १०३ ३)

जे जे उपासक लोक रक्षणासाठीं इंद्राकडे येतात त्यांस तो तत्क्षणीं चांगल्या मार्गी लावो देव दस्यूचा क्रोध नाहींसा करोत आणि आमचें कल्याण व्हावें म्हणून आमच्या वर्णांच्या (दासांचा) लोकांना घेऊन येवोत

(१ १०४, २)

मला जरी दासांना बांधून नद्यामध्ये टाकिलें आहे तरी त्या नद्या मला बुडू न देवोत त्रैतनानें जरी माझ्या शिरावर आघात केला आहे तरी तो दास आपलेच उर आणि बाहू कापून घेवो

(१ १५८ ५)

हे इंद्रा युद्धात कवीनें तुझा स्तव केला तू असुराला (दासाय) भूमीचें दान देता झालास मघवा तिन्ही लोकांना दानानें मनोरम करिता झाला व समरांगणामध्यें कुयवाचाला जमीनदोस्त करिता झाला

(१ १७४, ७)

हे शूर इंद्रा, ज्याला अहीनें वेढून टाकिलें होतें त्या महान् विपुल उदकाला तू खालीं वर्षिता झालास स्तोत्रांनीं बलवान् झालेला असा तू आपणास अमर मानणाऱ्या (अमर्त्यं मन्यमान दास) दासाला मुद्दाम मारून खालीं पाडिता झालास

(२ ११, २)

आम्हां हीं सुदर बळ आतां वाणीत आहों सुदर वज्र तुझ्या हातांत देतात आहों आम्हांकडून बळ धारण केलें गेलें सुदर असा तू तेजःपुंज अशा सभाच्या योगानें आम्हांसाठीं दास लोकांचा (दासाविश) पराभव कर.

(२ ११ ४)

ज्यानें हीं सर्व अस्थिर भुवनें निर्माण केलीं, जो दास वर्णांना

निर्दाळिता झाला, जो विजयी द्यूतकाराप्रमाणें शत्रूंची एकलक्ष धनें घेता झाला तो, हे जनहो इंद्र समजा.

(२. १२, ४).

तो देदीप्यमान, प्रख्यात आणि अत्यंत पराक्रमी इंद्र मनुष्याला साहाय्य करण्यासाठीं सिद्ध असो. विजयी आणि बलवान् इंद्र, नाशक दासाचें शिर (अर्शसानस्य दासस्य शिरः) भूमीवर पाडो.

(२. २०, ६).

तो वृत्रघ्न आणि पुरभंजक इंद्र काळ्या जातीच्या लोकांची (कृष्णयोनीर्दासीः) दाणादाण करिता झाला. तो आर्य-जनाकरितां पृथिवी आणि उदकें निर्माण करिता झाला. तो यजन करणाऱ्या जनांचें स्तोत्र सदैव वाढवो.

(२. २०, ७).

शत्रूंचीं नगरें फोडणारा, संपत्ति प्राप्त करून देणारा आणि शत्रूंचा नाश करणारा इंद्र आपल्या तेजाच्या योगानें दासाला (दासं अतिरत्) जिंकितो. स्तोत्रांच्या योगानें ज्याला प्रेरणा होते, जो विशाल विग्रह, महा दानशाली असा इंद्र द्यु आणि पृथिवी या उभय लोकांना भरून टाकिता झाला.

(३. ३४, १).

हे मघवन्, ज्या तुला व्यंसानें हनवटीवर मारिलें परंतु खालीं पडल्यानंतर देखील तूं उठून उभा राहिलास आणि दासाचें शिर तूं वध करून कुटलेंस तो तूं माझा आहेस.

(४. १८, ९).

दस्यूविषयींच्या उल्लेखांत ही ऋचा आलीच आहे.

(४. २८, ४).

कुलितर पुत्र जो शंबर दास, त्यास तूं मोठ्या पर्वतावरून खालीं टाकून दिलेस.

(४. ३० १४.).

वर्चि नामक दासाचे पंचाधिक शतसहस्र अनुयायी तूं नाकाच्या धावेप्रमाणें चिरडून मारिलेस.

(४. ३०, १५).

दभीतिसाठीं इंद्रानें तीस हजार दास आपल्या मायेनें व हत्यानीं (हनन साधनानें) निजविले.

(४. ३०, २१).

हे इंद्रा, सोमानें मोदमान झालेल्या तूं दासीपुराजवळ जाऊन त्यास विध्वंसिलें त्या तुझें शौर्य आम्ही गातों.

(४. ३२, १०).

येथें मनुष्यहितासाठीं तूं दास नमुचि याचें डोकें तोडतोस.

(५. ३०, ७).

नमुचि दासाचें डोकें, सुरू तूं मला सहकारी सखा केलेंस.

(५. ३०, ८).

दस्युविषयक उताऱ्यांत उल्लेख दिलाच आहे.

(५. ३०, ९).

(हे इंद्रा,) सूर्यासाठीं त्याच्याच स्थानीं (आकाशांत) तूं वर्षाव करून संग्रामांत दासाचा नाश केलास

(५. ३३, ४).

इंद्र विश्वाचा दमिता आहे, तो कसा तर ज्याप्रमाणें भयजनक आर्य आपल्या ताब्यांतील दासाला नेतो तसा.

(५. ३४, ६).

ज्याप्रमाणें श्येन मदकारक देठ (सोमाचा) तोडतो., त्याप्रमाणें नमुचि दासाचें शिर तोडणारा इंद्र.

(६. २०, ६).

सात शारदी पुरें तूं फोडिलीस, पुरुकुत्साला मदत केलीस आणि दासांचा नाश केलास.

(६. २०, १०).

जिनें (ज्या संपन्नतेनें) दासांना आर्य केलेंस, दुष्ट मनुष्यांना चांगले मनुष्य केलेंस ती स्वस्ति (संपन्नता) हे वज्री, तूं आम्हाला शत्रुनाशाला दे.

(६. २२, १०).

आर्यांसाठीं हे इंद्रा आमच्या स्तुतीच्या योगानें आमच्या विरुद्ध लढतात त्यांचा पराभव कर, आमच्या अमित्रांचा क्रोध कमी कर आणि आमच्या शत्रूंची चोहोंकडे दाणादाण कर आणि दासांच्या विशांना खालीं पाड.

(६. २५, २).

हे शूरा, ज्या वेळेस तूं शतसहस्र शत्रूंस अवदारिलेंस. त्या वेळेस तूं आमची स्तुति खरी केलीस. तूं दास शंबराला मारिलेंस.

(६. २६, ५).

हे शूरा, नरांत नरश्रेष्ठा, दोघां शत्रूंस वृत्रां दासांस व आर्यांस तूं आपल्या आयुधांनीं युद्धांत वधिलेंस.

(६. ३३, ३).

दररोज आपल्या सद्मापासून त्या काळ्यास त्यानें हाकलून दिले. त्या वर्षित्यानें वर्ची शंबर इत्यादि दासांस जलसंचयापाशीं मारून टाकलें.

(६. ४७, २१).

हे सत्पतींनों, आर्यांनीं (जले) झांकणाऱ्यांस मारलें, दासांनां मारलें, सर्व द्वेष्ट्यांस मारलें.

(६. ६०, ६).

तूं इंद्रा शरीरानें तुझी सेवा करणाऱ्या कुत्सास मदत केलीस. आर्जुनेयास मदत करतांना तूं कुयवास आणि दास शुष्णास ताब्यांत आणलेंस.

(७. १९, २).

सुदासाच्या दास आणि आर्य शत्रूंस इंद्रा तूं मारलेंस.

(७. ८३, १).

इच्छा पुरविणाऱ्या वरुणा तुला मी दासाप्रमाणें सेवीन.

(७. ८६, ७).

सूर्य, उषा, आणि अग्नि, प्रदेश व लोक यांस उत्पन्न करून यज्ञासाठीं तुम्ही ऐसपैस स्थली निर्माणिली आहे. तुम्हीं आपल्या युद्धांत शीघ्र दासाच्या मायेला मारलें आहे.

(७. ९९, ४).

दासांचीं पुरें भक्षण करीत असर्ये अश्वीनों दुरून या.
(८.५,२१).

सप्तसिंधूंवरील आर्यांस दुःखापासून कोण मुक्त करील (हे इंद्रा) दासाचें वधकारक (हत्यार) नमर
(८.२८,२७).

त्या बलवान् इंद्रानें, मृबिंद, अर्नशनि, पिप्रु व अहीशुव या दासांनां मारलें.
(८.३२,२).

लतांचीं जाळीं कापून टाक, दासाचें ओज नष्टकर, (त्यांचीं) संभृत वसु वाटून टाक. आम्हीं इंद्रास भजतों.
(८.४०,६).

सर्व आर्य आणि दास त्याचे अंकित आहेत. रुशमपवीरु जवळ हें धन आणलें आहे.
(८.५१,९).

मला शंभर गर्दभ, शंभर मेंढरें आणि शंभर दास आणि शिवाय माळा (दिलेस).
(८.५६,३).

इंद्रा जे तुझी निंदा करतात त्यांचें धन तू हरतोस. जे तुझें यजन करतात त्यास खुष करतोस. तू आमचें रक्षण कर आणि दासाला आपल्या घातक शस्त्रांनीं मारतोस.
(८.७०,१०).

दस्युविषयक विवेचनात ही ऋचा आली आहे.
(१०.२२,८).

घोड्याला यज्ञानीं जें धन प्राप्त झाले त्याच्या योगानें इंद्र मघवा आणि वृत्रघ्न झाला. ऋभु, ऋभुक्षा, वाज या धनाचा तो पति आहे. दासाचें मी नांव देखील मारून टाकतों.
(१०.२३,२).

हे बहुस्तुता (इंद्रा) दास असो अगर आर्य असो ते अदेव असल्यास ते आम्हांस दुःसह (पराभवास शक्य) व्हावेत. आम्ही त्यांस संग्रामांत मारलीं.
(१०.३८,३).

त्वष्टा ज्याप्रमाणें पुत्र हासास मारतो त्याप्रमाणे मी मोठ्या त्याच्या मवनारूवाला मारलें.
(१०.४९,६).

जेव्हां मनुष्याचे यजन मला बोलावितें तेव्हां मी शस्त्रांनीं कापण्यास योग्य अशा दासाला मारतो
(१०.४९,७).

हे इंद्रा तूं देवांनीं मदत करून दासाचें ओज नाहींसे केलेस त्या वेळी तूं प्रजेचें रक्षण केलेस.
(१०.५४,१).

यदु आणि तुर्व यांनीं दोन सेवाक्षम असे दास गाईसह दिले.
(१०.६२,१०.)

तूं यज्ञविनाशक नमुचीला मारलेस ऋषीकरतां दासाची माया नाहींनी केलीस.
(१०.७३,७).

तुझ्या बलवान साहाय्यानें आम्हीं आर्य आणि दास यांस जिंकूं.
(१०.८३,१).

मी सर्वांना पहात व दास व आर्य यांना पृथक्करीत जातों
(१०.८६,१९)

त्यानें अनेक शब्द करणाऱ्या सहा डोळ्यांच्या आणि तीन शिरांच्या दासाला नमविलें.
(१० ९९,६)

जे आम्हास मारणारे आमचा द्रोह करतात (अभिदासतः) त्यामध्यें आपलें वज्र टाक. दास व आर्य शत्रूंचीं शस्त्रें नाहींशीं कर.
(१०.१०२,३)

आपल्या बलानें वाढणारा असा तो ओजोयुक्त दासाच्या ठिकाणीं शत्रूप्रमाणें भय उत्पन्न करतो.
(१०.१२०,२)

सूर्यानें आकाशाच्या मध्यभागीं आपला रथ सोडला. जेव्हां आर्यानें इंद्रानें दासाशीं युद्ध केलें. ऋजिश्वासह इंद्रानें पिप्रूचे किल्ले नष्ट केले व असुराला जिंकलें.
(१०.१३८,३)

वरील उताऱ्यांत दासविषयक विधानें येणेंप्रमाणे दिसतात.

(१) दास हा शब्द गुलाम अथवा सेवक या अर्थानें ५ वेळ आला आहे

(२) दासाचीं पुरें इंद्रानें फोडलीं.

(३) दासाचा क्रोध देवानीं नाहीसा करावा अशी प्रार्थना करण्याइतकें दासाचें महत्त्व होतें.

(४) दीर्घतमा, त्रैतनास व त्यास नदींत टाकणाऱ्यास दास म्हणतो.

(५) कुयवाचा पराभव आणि दासपराभव यांचें एका ऋचेंत वर्णन.

(६) दास आपणास अमर्त्य समजत होता.

(७) अहिवध, उदकमुक्तता यांची दासनाशाशीं सहोक्ति

(८) दासास वर्ण म्हटलें आहे

(९) दासास अर्शसान म्हणजे नाशक म्हटलें आहे.

(१०) दासानां कृष्णयोनी म्हटलें आहे.

(११) काळ्या दासानां मारणाऱ्या इंद्राला वृत्रघ्न आणि पुरंभजक आणि आर्यांना पृथ्वी आणि उदकें देणारा म्हटलें आहे.

(१२) कुलितर पुत्र शंबर यास दास म्हटलें आहे.

(१३) वर्चि नामक दासाचे १ लक्ष ६ हजार अनुयायी होते.

(१४) ते अनुयायी इंद्रानें मारले.

(१५) दभीतीसाठीं इंद्रानें तीस हजार दास मारले.

(१६) नमुचीस दास म्हटलें आहे त्यास इंद्रानें मारलें.

(१७) दासानीं स्त्रियांचें सैन्य इंद्रापुढें केलें. तें सैन्य मला काय करणार असे इंद्र म्हणाला आणि त्यांतील दोन स्त्रियांस त्यानें आपल्या अन्तर्गृहांत ठेवलें.

(१८) इंद्रानें सूर्याकरितां दासाला नाश केला

(१९) दासांचा नाश करणें पुरुकुत्सास मदत करणें आणि सात शारदी पुरें फोडणें याची सहोक्ति.

(२०) स्तोता ज्या संपत्तीनें दास आर्य होतो ती संपत्ति मागतो.

(२१) आर्य व दास या दोघास इंद्रानें युद्धात मारलें.

(२२) वर्ची व शबर या दासास मारणाऱ्या इंद्रास वर्णिता म्हटलें आहे त्यांचा वध जलगंधयाजनक केला असें म्हटले आहे व काव्यांस दूर हाकललें या क्रियेचा उल्लेख केला आहे.

(२३) दास, जले झाकणारे व इतर द्वेष्टे यांचा एकत्र उल्लेख करून त्यास आर्यांनीं मारले असा उल्लेख केला आहे.

(२४) शुष्ण, सृबिंद, अनर्शनि, पिप्रु आणि अहीशु यांस दास म्हटलें आहे.

(२५) दासांविरुद्ध इंद्राने कुत्स व आर्जुनेय यांस मदत केली.

(२६) दास व आर्य यांचें सहशनुत्व (१) सुदासाशीं (२) इतर वक्तयाशीं आहे.

(२७) वृषशिप्रास दास म्हटले आहे.

(२८) वृषशिप्र दासाची माया वर्णिली आहे.

(२९) दासपुरांचा नाश अश्वी करतात.

(३०) दासापाशीं भरलेली वस्तु होती.

(३१) दास व आर्य हे दोघेहि एकाचे अंकित असा उल्लेख.

(३२) दासाविरुद्ध देवानां इंद्र मदत करतो.

(३३) दास व आर्य यांतील भेद इंद्र ओळखतो म्हणून विधान.

(३४) अनेक शब्द करणारा, सहा डोळ्यांचा व तीन शिरांचा असें इंद्रशत्रु दासाचें वर्णन.

दास या शब्दाचा सेवक या अर्थानें ५ वेळ उपयोग झाला आहे. अधिक वेळ नाहीं.

दास आणि दस्यु यांचें एकमेकांशीं ऐक्य पुढील विधानावरून दिसतें (१) ज्यास दास म्हटलें आहे व दस्युहि म्हटलें आहे अशा व्यक्ति १ शंबर २ शुष्ण ३ वृत्र ४ पिप्रु. (२) दोघांनीहि पुरें इंद्रानें अगर इतर देवांनीं फोडली. (३) दोघानाहि मारण्याचा परिणाम उदकमोचन व प्रकाशोत्पत्ति असा दाखविला आहे. (४) दोहोंचाहि कांहीं प्रसंगीं विशिष्ट व्यक्ति व कांहीं प्रसंगीं समुदाय अशा अर्थानें उपयोग केला आहे. (५) दोहोंचेहि शत्रु मुख्यतः इंद्र व अमुख्यतः इतर देव, विशेषें करून अश्वि. (६) दोघेहि मायावी होते. (७) दभीतीचें रक्षण त्यांपासून केलें असे दोघांविषयीं उल्लेख आहेत.

**दासविषयक स्वतंत्र मजकूर.**—दीर्घतम्यानें आपल्या शत्रूंस दास म्हटलें आहे. सुदासाच्या व इतर कांहींच्या शत्रूंस केवळ दास म्हटलें नाहीं, तर आर्य आणि दास असे दोन्ही प्रकारचे शत्रू वर्णिले आहेत.

म्हणजे अर्थात तेथे दास शब्द शत्रुवाचक नाहीं. दासांना कृष्णयोनि म्हटलें आहे.

दासाला वर्ण म्हटले आहे, दस्यूस तसें म्हणणारा उल्लेख नाहीं.

दासविषयक उल्लेखात अश्विनाचे उल्लेख आहेत तसे दस्युविषयक उल्लेखांत नाहींत. दासाच्या अनतत्वाविषयीं थोभाटा फारसा आढळत नाहीं. दासाचें विशिष्ट स्वरूप वर्णिलें आहे, तें तीन डोकीं व सहा डोळे असे आहे, व तो मोठ्यानें शब्द करणारा आहे.

दस्यु म्हणून ज्यांचा उल्लेख नाहीं पण दास म्हणून ज्यांचा उल्लेख आहे असे वर्चि, नमुचि, वृषशिप्र, सृबिंद, अनर्शनि, अहीशुव हे होत.

दासाचे शत्रु पुरुकुत्स, कुत्स, व आर्जुनेय म्हणून वर्णिले आहेत. दासाशीं संबद्ध क्रियापद "दास्" असेंच आहे व तें नाशार्थक आहे.

दासांचें सैन्य स्त्रिया म्हणून उल्लेखिलें आहे. कांहीं विशिष्ट संपत्तीच्या अस्तित्वामुळें दास आर्य होऊं शकें असें वर्णन आहे.

या तुलनेपासून काय निर्णय निघतात ते पाहूं. हे निर्णय काढण्यापूर्वीं कांहीं सहायक गोष्टींचा निर्देश केला पाहिजे.

**दासविषयक ऐतिहासिक सत्य.**—दासविषयक ऐतिहासिक सत्य काढावयाचें म्हणजे वेदपूर्वकालीन दास व दस्यु शब्दांची व त्या शब्दांनीं ज्ञेय होणाऱ्या कल्पनांची स्थिति अवगमिली पाहिजे. तशीच या शब्दाची उत्तरकालीन स्थिति लक्षांत घेतली पाहिजे. वैदिक साहित्य पूर्वकालीन आणि उत्तरकालीन स्थितींशीं तुलिलें पाहिजे.

उत्तरकालीन स्थिति थोडक्यात वर्णिता येते. पूर्वकालीन स्थिति शोधण्यासाठीं तौलनिक पद्धतींत शिरावें लागतें.

दास हा शब्द उत्तरकालीन वाङ्मयांत शत्रुवाचक नाहीं. दस्यु हा शब्द तर लुप्त झाला आहे.

अवेस्तामध्यें दास शब्दाशीं सदृश शब्द पहावयाचे म्हणजे अवेस्ताभाषेंत सचा ह होतो हें लक्षांत घेतलें पाहिजे.

तेथें दास शब्दाशीं सदृश शब्द येणेंप्रमाणें आहेत —

(१) दहू, क्रियापद याचे अर्थ नाश करणें किंवा दंश करणें असे आहेत.

(२) दहक, म्हणजे दंश करणारा.

(३) दहके म्हणजे (सर्पाचा) नाश करणारा.

(४) दहाक—दंश करणारा साप. याशिवाय पार्शी लोकांच्या पौराणिक परंपरेंत अहि दहकाची गोष्ट आली आहे ती अशी अहिदहक हा एक अनार्य शत्रु होता. त्यानें जमशीद राजाचे सिंहासन बळकावलें व आपल्या संपत्तीच्या मदतीनें तो आपणांस देव मानूं लागला. त्याचें स्वरूपवर्णन तीन तोंडाचा, तीन डोक्यांचा, सहा डोळ्यांचा, असत्यभाषी मायावी बलाढ्य राक्षस असें आहे त्यास झुज म्हटलें आहे. शहानाम्यांत त्याचें वर्णन त्याच्या खांद्यावर सैतानानें (अहरिमन) चुंबन घेऊन तेथें दोन सर्प उत्पन्न केले असें आहे.

या गोष्टीवरून आपणास ज्या कांहीं गोष्टी स्पष्ट होतात त्या येणें प्रमाणे

( १ ) दासाचें अस्तित्व पर्शुभारतीय कालीं देखील असलें पाहिजे, त्याशिवाय दोन्ही राष्ट्रांच्या प्राचीन ग्रंथांत थोड्या फरकानें दासकल्पना नसती.

( २ ) दास हा सर्पस्वरूपी आहे ही कथा फार प्राचीन असावी. हिंदूंच्या ग्रंथांत देखील दैतान सर्पस्वरूपी आहे त्या अर्थीहि ही कल्पना हिंदूंच्या प्राचीन इतिहासकल्पना ज्या काळांत तयार झाल्या त्याच्याहि पूर्वीची असावी.

( ३ ) हा दास तीन डोक्यांचा, सहा डोळ्यांचा मायावी आहे हें वर्णन वैदिक वाङ्मयांत तसेंच अवेस्त्यांत सामान्य आहे. वैदिक वाङ्मयांत हा उल्लेख दाससंबंधीं एकदाच आला आहे. त्या अर्थी वैदिक ग्रंथ तयार होत गेले त्यावेळेस ही कल्पना मरत चाललेली असावी. पण या कल्पनेचें अस्तित्व इराणांत अधिक काळपर्यंत जिवंत राहिलें.

( ४ ) दंश करणें आणि दाह करणें याच्या मुळाशीं एकच क्रियापद पर्शुभारतीय काळांत असावें.

दास शब्दाच्या इतिहासाविषयीं पूर्वगत पुराव्यावरून जे आपणांस निर्णय काढतां येतात ते येणें प्रमाणें—आर्य आणि दास हे परस्पराचे विरोधी आहेत ही कल्पना वेदांत तशीच अवेस्त्यांतहि असल्यामुळें यांचा संग्राम झाल्याचें वर्णन ऋग्वेदांत आहे व हा संग्राम भारतभूमीवर झाला ही कल्पना ग्राह्य होत नाहीं, तर वाईट आचरण करणारे दुष्ट शत्रु ते दास, चांगलें आचरण करणारे ते आर्य ही कल्पना घेऊनच मंत्रवक्ते हिंदुस्थानांत आले. आर्य व दास यांच्या युद्धाचे जे उतारे आहेत त्यांपैकीं बरेचसे उतारे इंद्राच्या पराक्रमाच्या वर्णनपर असल्यामुळें त्या उताऱ्यांचें स्पष्टीकरण करण्यासाठीं भारतीय इतिहासाकडे धाव न घेतां लो० टिळकांनीं ज्याप्रमाणें मृगशीर्षकालाकडे धांव घेतली तिकडे घेतली पाहिजे.

आर्य आणि दास यांचा विरोध म्हणजे काळ्यांनीं गोऱ्यांनीं केलेलें हनन असा अर्थ सर्वत्र लावतां येणार नाहीं हें लो० टिळकांनीं 'आर्क्टिक होम इन दि वेदाज' या ग्रंथांत दाखविलेंच आहे. आर्य आणि दस्यु यांचा विरोध यजनविषयक आहे. जे यजन करतात ते आर्य आणि जे यजन करीत नाहींत ते दस्यु, अशी कल्पना ऋग्वेदांत सर्वत्र आढळते. तथापि दास म्हणजे शत्रु असा अर्थ दासाविषयीं मात्र आढळतो. भारतीय मंत्रकर्त्यांत दास व दस्यु यांच्याविषयीं कांहीं कल्पना सामान्य आहेत आणि कांहीं भिन्न आहेत यांचें कारण मंत्रकर्त्यांच्या पूर्वजांच्या काळांत पाहिलें पाहिजे. इराणी ग्रंथांत दस्यु हा शब्द फार स्पष्ट रीतीनें आला नाहीं, किंवा आर्य आणि दस्यु यांचा विरोधहि दाखविला नाहीं. दस्यु किंवा दहु असे शब्द आले आहेत. पण ते भिन्नदेशीय अशा अर्थानें आले आहेत.

ज्या आर्यांचा दासांशीं विरोध झाला ते लोक देशांत येत होते हें वर्णन उपलब्ध असलेल्या उल्लेखांवरून मुळींच सिद्ध होत नाहीं. तें वर्णन होतें असें दिसते

मंत्रकर्ते लोक देशांत होते त्या वेळेस त्यास लोक विरोध करीत, तेव्हां त्यांनीं जर त्यास दास म्हटलें तर तेथें तो शब्द शत्रुवाचक होईल. परंतु जेव्हां कोणी आर्य आणि दास यांचा दोघांचाहि शत्रूंमध्यें उल्लेख करितो तेव्हां दास हा शब्द केवळ शत्रुवाचक आहे असें होत नाहीं. शत्रूंतील दोन वर्गांमध्यें कांहीं तरी फरक वक्ता करीत आहे असें स्पष्ट होतें. हा फरक आचारवाचक आहे कीं, वर्णवाचक आहे कीं, वंशवाचक आहे हें उपलब्ध पुराव्यावरून स्पष्ट होत नाहीं. असें शक्य आहे कीं, निराळ्या राष्ट्राचे लोक ज्याअर्थी निराळ्या आचाराचे असतात त्याअर्थी दास हे निराळ्या राष्ट्राचे व निराळ्या आचारानीं युक्त असे असतील. दास काळे आहेत असा उल्लेख एकच आहे. पण तो उल्लेख इंद्राच्या शौर्यासंबंधानें असल्यामुळे म्हणजे काळोखाच्या नाशाविषयींच्या उल्लेखांना असल्यामुळें काळी जात व पांढरी जात यांच्या लढाईचा इतिहास त्यांतून निघत नाहीं. जेथें दास आर्य होण्याची शक्यता आहे ( ६. २२, १० ) तेथें वंशविषयक अर्थ दास शब्दांतून काढण्यापेक्षां यजनविषयक काढणें अधिक योग्य होईल.

थोडक्यांत सारांशाचें म्हटल्यास दास, आर्य, दस्युवर्ण इत्यादि विषयीं उल्लेख आर्यन् राष्ट्रांनी नान आर्यन् लोकांपासून हिंदुस्थान जिंकलें अशा इतिहासाचे सूचक मुळींच नाहींत.

**" आर्यां "पासून प्रारंभ करून इतिहासाची आशा असतां इतिहासार्थ अन्यत्र दृष्टि**—आर्य शब्द किंवा आर्य नावाशीं संबद्ध असलेले उल्लेख यांवरून कोणत्याहि राजकीय हालचालीवर प्रकाश पडत नाहीं तेव्हां राजकीय हालचालींसाठीं अन्यत्र पाहिलें पाहिजे. देशांत ज्या हालचाली ऋग्वेदांत दिसतात त्यांचा आपण आढावा घेऊं.

( १ ) सुदास व त्याविरुद्ध दहा राजे.

( २ ) पुरूरवस आणि त्याविरुद्ध असलेले लोक.

( ३ ) सरमा व पणी इत्यादिसंबंधानें कथा.

( ४ ) देव व त्याविरुद्ध असलेले लोक.

या चार कथानकांखेरीज दुसरीं कथानकें ऋग्वेदांत नाहींत म्हटलें तरी चालेल

देव म्हणजे इंद्रादि आदित्य असोत किंवा दुसरे कोणी असोत त्यांच्या संबंधाच्या ज्या कथा आहेत त्या वैदिक वाङ्मयांतील प्राचीन कथा होत. आज आपण जशी प्राचीन कथांस पौराणिक कथा समजतों आणि त्यांचें बीज आपण गूढ समजतों तसेंच वृत्रादि असुर आणि इंद्रादि देव यांचे बीज वेदकालीन लोक गूढ समजत असावेत. त्यासंबंधानें असलेल्या कथा भारतीय इतिहासाचा भाग नाहींत. त्या लौकिक पुराणकाराच्या साहाय्यानें कथाकारांच्या ज्ञातव्य इतिहासाचा भाग होत.

उरलेले दोन कथाभाग म्हटले म्हणजे सरमा पणी यांचा संबंध आणि पौरूरवसेतिहास हे होत. यांविषयीं विवेचन आपणांस आढळतें पुरूरवस् ही व्यक्ति कृतयुगाखालीन इतरी जुनी

मानली जात होती की, स्वर्गातल्या अप्सरा व देव यांच्याशी त्याचा संबंध सूक्तकारानें वर्णिला आहे. त्या वेळेस तें प्राचीन इतिहासगूढ आख्यान म्हणून समजलें जात होते. सरमा व पणी यासंबंधानें तें आख्यान म्हणून आपणास म्हणतां येईल. त्या आख्यानाचा विषय कोणत्या काळाचा असावा याविषयीं प्रश्न आहे. या दोन आख्यानासंबंधानें विचार करणारा महत्त्वाचा संशोधक म्हणजे रा. राजाराम रामकृष्ण भागवत हा होय. या संशोधकाचें विविधज्ञानविस्तारातील "वेदार्थयत्नकाराचे स्मारक" (पुस्तक २६-२८ वें) म्हणून पांडित्यपूर्ण लेख आपणास उपलब्ध आहेत.

सरमासूक्त व पुरूरव्याचें सूक्त यांत दिसणारा कथाभाग याचा व दिवोदासमुदासाच्या दाशराज्ञयुद्धाचा पौर्वापर्य संबंध निश्चित नाहीं.

दाशराज्ञयुद्धाचा मात्र इतिहासाशीं संबंध विशेष तन्हेनें यावयास पाहिजे. त्यापूर्वी सरमासूक्ताविषयीं झालेले संशोधन लक्षात घेऊं. त्या सूक्तात ऐतिहासिक सत्य काय असावें याविषयी राजारामशास्त्र्यांचें मत देतों. त्यांच्या मताप्रमाणे देव नावाचें एक राष्ट्र होते, त्यांच्या पणीशीं लढाया होत होत्या वगैरे. राजारामशास्त्री याची कल्पना जितकी काटेतोल पद्धतीनें पुढे तपासली जावयास पाहिजे तितकी गेली नाहीं. त्यांच्या मतानें सरमासूक्तात जो इतिहास आला आहे तो मात्र लोकांची हिंदुस्थानात वसाहत होण्यापूर्वी जी परिस्थिति होती त्या परिस्थितीचा द्योतक असून तो कथारूपानें समाजात राहिला असावा. राजारामशास्त्री यांच्या कल्पनेविषयी आम्ही आपले मत सध्यां कांहींच देत नाहीं. त्यांच्या म्हणण्याचा भावार्थ देऊन मोकळे होतों.*

पणीच्या राष्ट्राविषयीं आणि वैदिकांच्या इतर राष्ट्रांशीं आलेल्या संबंधाविषयीं विधानें आणि इंद्राचें त्या बाबतींत कार्य याविषयीं भागवती विधानें आम्ही मांडलेल्या इतिहासाशीं संगति जुळविण्याचा प्रयत्न न करितां येथें मांडतों.

सरमासूक्त. (१०. १०८, ११) देव व त्याचे शत्रू यांमधील भांडणाचें कारण.

देवाचा स्त्रीरक्षक सरमा व त्याचे शत्रू पणी यामधील झालेलें हें भाषण आहे. आठव्या ऋचेतील शेवटच्या ओळींत पणींचा उद्देश करते वेळीं तृतीय पुरुषाचा उपयोग केला आहे, म्हणून या सूक्तस्थांचें नाव माहीत नाहीं.

पणींचे राष्ट्र—इन्द्रानें पणींच्या राज्यांत सरमेला पाठविली, परंतु तेथे जाण्यासाठी तिला रसा या नावाची एक मोठी नदी ओलांडावी लागली. पणी हे व्यापारी लोक असून, त्यांच्या बाजाराच्या ठिकाणीं मोठमोठ्या देवघेवी होत असत. देवांच्या गाई पणींनी चोरल्यामुळें देवांना त्यांच्यावर स्वाऱ्या कराव्या लागल्या स्वारांत प्रामुख्य, अयास्य व अंगीरस जातींपैकीं नवग्व हे लोक होते. हे सर्व ऋषी होते. नवग्व व सरमा याना दहा दिवसपर्यंत (महिनेपर्यंत) डोंगराळ प्रदेशातून जावें लागलें (५. ४५, ७). हे सर्व विप्र असून सोम (बृहस्पति) हा त्यांचा सेनापति होता. या सूक्तातून पणींच्या राष्ट्रीयत्वाची कांहींच कल्पना येत नाहीं, असें भागवत कबूल करतात पण विस्तारात पणीस तेच भागवत फिनिशिअन म्हणतात !! बृबु हें नांव आर्यन् नाहीं परंतु एका वणिकाचें वंकु हें नाव आर्यन् आहे. एका ऋचेत सूक्तकर्ता आपल्याला पणि असें म्हणतो (५. ६१, ८).

"इंद्रानें ऐतिहासिक असितल" प्राचीन काळी इन्द्र व राजन् (राजा) हे शब्द एकाच अर्थाचे होते. म्हणून महेन्द्र याचा अर्थ मोठा राजा असा होता यावरून अनेक इन्द्र असले पाहिजेत असे दिसतें. इद्—इन्द्* राज्य करणें हा धात्वर्थ आहे. चुमुरि नावाच्या इन्द्रानें चुमुरि, धुनि, पिप्रु, शंबर व शुष्ण यांना ठार मारिलें (६ १८, ८). द्वारपाल रंभिन् यास लांच देऊन, चुमुरि व धुनि याना मारण्यांत आलें (२ १५, ९) ऋजिश्वन् याच्या मदतीनें, पिप्रु या नांवाच्या असुराचा पाडाव झाला (५. २९, ११) व इन्द्र अयास्यानें असुराचा बराच नाश केला (१० १३८, ३४). उशिज जातींतील ऋजिश्वा यानें वृषभाच्या मदतानें पिप्रूच्या छावणीची नाजाडी केली (१० ९९, ११), डोंगरात लपून बसलेल्या शबराय इंद्रानें पकडलें (२ १२, ११), व त्याचीं नव्याण्णव शहरें धुळीस मिळविलीं (२ १९, ६). या स्वारींत विष्णु हि प्रमुख होता (७. ९९, ५). मनुष् जातीच्या कल्याणासाठीं, पृथ्वीवरील दातनैस् नावाच्या देशांत विष्णु तीन वेळां गेला (७. १००, ४). आपण शिपिविष्ट आहों असे एकदां त्यानें सांगितलें, तो व इन्द्र यानीं वृशिप्राच्या (दासाच्या) सर्व युक्ती निष्फळ करून टाकिल्या (७. ९९, ४) चुमुरि व धुनि यांप्रमाणें शुष्ण हाहि एक दस्यु होता (८. ६, १४), दास व दस्यु निरनिराळे होते. दास हें एका जातीचें नांव असून, इन्द्राचा शत्रु नमुचि हा याच जातीपैकीं होता कुत्साच्या हितासाठीं इन्द्रानें यास मारिलें (४ १६, १२). संस्कृतातील दस्यूलाच अवेस्तामध्ये दह्यु म्हणतात. याचा अर्थ जिल्हा असा होतो. दह्युपैति, दह्युपत याचा अर्थ जिल्ह्याचा अधिकारी असा होतो पुराणातील छयारु हा शब्द दह्युपैतिस, दस्युपतिस यातील छयाछट किंवा नासधूस याला जो शब्द आहे त्याच्याशी जोडतां येईल. अवेस्तिक दह्यु याला संस्कृतांत देश म्हणतात. मराठींतील देसाई (देश—स्वामी) व देशमुख (देशमुख्य) यांना अवेस्तामध्यें दह्युपैति, दह्युपत असें म्हणतात, जिल्ह्याच्या विभागानां झन्तु व जिल्हापतीस झन्तुपैति असें म्हणतात. संस्कृतांतील जनपद यासच पुढें देश असें म्हणूं लागले. अवेस्तिक वीस् (खेडेगांव) यास संस्कृतात विश असें म्हणतात, व वीस्पैति (खेड्याचा मुख्य) याला वदान विश्पति असें नाव आहे (१. ३१, ११) विश् याचा अर्थ खेड्यातील शेतकरी लोक असाहि होतो. जुन्या संस्कृतांत विश् याचा अर्थ 'अत

*Key to interprete the Veda by R. R. Bhagwat Bombay 1907.

देणें ' असा असून परिविश याचा अर्थ अन्न पुरविणारा असा होता. अवेस्तांतील न्मान ( घर ) याला संस्कृतात, कुल व गृह असें म्हणतात; न्मानपति याला कुलपति व गृहपति अशीं नावें आहेत; हल्लीं कुल याचा अर्थ कुटुंब असा होतो. वीस्, विश् ( खेडेगांव, खेडवळ ) व वीसूपैति, विश्पति हे शब्द घनविल्यावर व घ होम, सोम म्हणजे वीर या शब्दाचा ज्याचा रस मादक आहे अशा एका लहान झाडास जो शब्द होता त्याच्याशीं गोंधळ उडून गेल्यावर, संस्कृतापासून आर्यांनी अवेस्तिक शाखा निराळी झाली लॅटिन भाषा याच्या अगोदर वेगळी झाली व ग्रीक भाषा तर याहिपेक्षां अगोदर निराळी झाली. लॅटिन ' विकु ' व ग्रीक 'फोइकों' यांचा अर्थ पूर्वी वीस्, विश् असाच होता. अनेक वीसांचा ( खेडेगाव ) एक झंतु ( जिल्ह्याचा भाग ) व पुष्कळ झंतूचा दह्यु बनतो. राजकीय प्रगतीसाठीं देशविस्ताराची फार आवश्यकता वाटल्यामुळें, दह्यु, दस्यु हे देव व त्याचे इन्द्र याजबरोबर लढले, परंतु दस्यु व असुर हे फार प्रबल असल्यामुळें, देवाचें कांहींएक चाललें नाहीं; म्हणून आपल्यापेक्षां कमी दर्जाच्या लोकाचीहि देवास मदत घ्यावी लागली. अवेस्तिक आर्यांची राजकीय प्रगति झाल्यावर दस्यूसंबधीं ऋचा रचिल्या असल्या पाहिजेत हें यावरून सिद्ध होतें. " सर्व बाजूंनी मला पर्शूंचा त्रास होत आहे" ( १. १५, ८ ) "याद्वांपासून, तिरिंदिरात मीं शभर जनावरें व पर्शू प्रांतांत ग्च हजार जनावरें घेतलीं " ( ८. ६, ४६ ), पृथु व पर्शु पुढें चालले " ( ७ ८३, १ ). दुसऱ्या एका इन्द्रानें "योनींचा मुलगा गिरी किंवा योन ( पृथु ) याचा नाश केला " ( ८. ४५, ३० ). या सूक्तांतील पर्शियन व पार्थियन यांचा उल्लेख महत्त्वाचा आहे. वैदिक सूक्तांचे कर्ते दास व आर्य यांना इन्द्राचे शत्रु समजत असत ( ६. २२, १० ). अवेस्तिक 'अइर्य' व वैदिक 'आर्य, अर्य' हे शब्द 'अयरा' देणें यापासून निघालेले आहेत. या शब्दाचा अर्थ 'ज्याला दान मिळालें आहे असा मनुष्य' असा होता. अरि किंवा अराति ( ८. ११, ३ ) म्हणजे दान करणारा याचे रुपांतर अरि-अ राति, दान न करणारा असे होऊन, नंतर त्याचा अर्थ शत्रु ( दान करण्याकडे ज्याची प्रवृत्ति नाहीं असा ) असा झाला. इन्द्राने लोखंडी वज्र ( १. ८०, ८ ) आपल्या उजव्या हातात घेतलें, "ज्यानें शंभर यज्ञ केले होते असा एका इंद्राची आई ( शची ) अहेतुत्वाबद्दलची हकीगत सांगत आहे" ( ८. ७७, ? ). या इन्द्रानें नोव कर्चापम अंग होते; यानें हिवाळ्यात अर्बुदाम जेरीस आणिलें ( ८. ३२, २६ ). जनुर याचा अर्थ 'सामर्थ्य' असा आहे, म्हणून 'जहान' याचा अर्थ 'सामर्थ्यवान् होऊन' असा होईल. अभि मनु याचा अर्थ अभिमुख युध्यमान ( -कडे तोंड करून लढणारा ) असा करतात ( ३ ३४, १० ). मृनु ( लढ-णारा ) याचा अर्थ मराक असा होतो (५. ३५, १). हा शब्द व ग्रीक 'मनो' ( नाश ) हे एकच आहेत. हे शब्द 'मृ' ठार मारणें या शब्दापासून निघालेले आहेत. 'मृ' ठार मारणें हा शब्द मृध-पूर्वीन आलेला आहे; व [illegible] मनुष्यनिर्धन आलेला आहे. [illegible] हा शब्द 'मृ' लढणें किंवा नाश करणें यापासून निघाला आहे. क्र्यादि धातु, 'शॄ' ऱ्हस्व केला म्हणजे ही गोष्ट कळून येईल. एका इन्द्राला हिन्वाचा पुत्र असें म्हटलें आहे ( ८. ४०, ९ ). "जेव्हा धनिष्ठा आईनें शूर इन्द्राला आश्रय दिला, तेव्हा मरुतांनीं त्याला भरभराटीस आणिलें ( १०. ७३, १ ). ऋग्वेदातील प्रथम मंडलांतील, एकोणतिसाव्या सूक्तात शिश्रिन् नावाच्या एका इन्द्राचा उल्लेख केला आहे. तो श्रीमंत असल्यामुळें त्यानें आपल्या नोकरीस कांहीं प्रसिद्ध लढारू ठेवून, एका गर्दभावर रात्रीं हल्ला केला. त्याच्या कांहीं लोकास लांच देऊन वश करून घेऊन बाकीच्या लोकांची इन्द्रानें कत्तल केली. गर्दभ व त्याची एक बायको हीं दोघें त्या कत्तलींत सापडलीं, परंतु त्याची दुसरी एक बायको पळून गेली. अरे इन्द्रा, तुझ्या आईला कोणीं वैधव्य आणिलें? गुप्तपणें हिंडत असताना, तुला मारण्याचा कोणीं प्रयत्न केला? पाय धरून जेव्हा तूं आपल्या बापास ठार मारिलेंस, तेव्हा कोणत्या देवाने तुझें सान्त्वन केलें " ( ४. १८, १२ )? "मजपाशीं अन्न नसल्यामुळें, मी कुत्र्याचीं आतडीं शिजविलीं; देवापैकीं कोणीहि माझें सांत्वन केलें नाहीं. माझ्या बायकोनें माझी काळजी घेतली नाहीं; नंतर श्येनानें माझ्यासाठीं मधु आणिला (४. १८, १३).

अनेक इंद्र.—पाकस्थामा या नांवाचा दुसरा एक इन्द्र होता, त्याच्या पित्याचें कुरुयाण असें होतें ( ८. ३, २१ ). हा इन्द्र व त्याचे विश्वासु मरुत् हे फार उदार होते. " तूं सोमरस प्याला आहेस; तेव्हा हे इन्द्रा, तू आतां आपल्या घराकडे जा, तुझ्या घरात तुझी आवडती भार्या असून मधुर गीत चालले आहे " ( ३. ५३, ६ ). ' इन्द्र ' याचा अर्थ प्राचीन काळी " देवांचा राजा " असा होता. देवाच्या प्रत्येक जातीस एक एक इन्द्र होता. हे इन्द्र आपापसात लढत असत. पणि, असुर, रक्षस् ( १. १३३, ५ ). यातु किंवा यातुधान. ( ७. १०४, २१ ). याशिवाय सनक ( १. ३३, ४ ), शिम्यु ( १. १००, १८ ), कीकट ( ३. ५३, १४ ), बिन नाकाचे दस्यु ( ५. २९, १० ), चपट्या नाकाचे मोंगोलियन, दास, आर्य, नहुष ( ६. २२, १० ), शरद् ( ६. २०, १० ), वृचीवत् ( ६. २१, ६ ), अनु, द्रुह्यु, तुर्वसु, ( ७, १८, १४-१५ ), शिमीदिन ( ७, १०४, २३ ); वन्दन ( ७. २१, ५ ), मक्षिप ( ८. १२. ८ ), वेकनाट, व कामकृति वगैरे लोक इन्द्राचे द्वेष्टे होते. अद्मसद् म्हणजे लढले, वृत्र हा येथें धातु समजला आहे ( ४. २४, ४ ) कदाचित असेंहि असेल कीं, इन्द्र हे देवांचे शत्रु असून, मरुताच्या मदतीनें त्यांनी पूर्वेकडे देवांवर आपलें वर्चस्व ठेविलें असेल. परंतु ऐतिहासिक कालपूर्वीच्या ग्रीस देशांत, इंद्रांनें कांहीं एक चालले नसेल. त्यावेळीं तेथें थिओई लोकानीं अंद्रे लोकावर अशा प्रकारें राज्य केलें कीं अन्द्रे लोकांचा फार ऱ्हास झाला; व अन्द्रे म्हणजे थिओ लोकांपेक्षां कमी दर्जाचे सामान्य लोक असा समज झाला. इकडे, पूर्वेकडे 'इन्द्र' हा शब्द ऱ्हास न पावतां त्याचा संबंध उच्च दर्जा किंवा पद याच्याशीं कायम आहे. वैदिक वाङ्मयांत मरुत् हे इंद्राचे फार विश्वसनीय मित्र असें म्हटलें आहे. परंतु ग्रीसच्या पौराणिक कथेंत मरुतांच्या जोडीच्या दुसऱ्या व्यक्ती नाहींत.

**"देव", पूर्वदेव, मूरदेव, शिश्नदेव, पंचजन, शूरदेव, यातुधान, विश्वदेव, समुद्र, कोटि**—दिव्, देव्, देव ( यव–याव, यु, यो, यौ, या–य ) हीं रूपें वैदिक असून दय् हें वैदिक कालापूर्वीचें आहे. थिओ, सेउ ही ग्रीक, देउ हें लॅटिन व दएव हें अवेस्तिक रूप आहे. सरमासूक्तांत देव्य किंवा देव असा शब्द आलेला आहे, त्याचा अर्थ साधारणपणे देव किंवा देवांसंबंधी असा आहे. दय् याचा मूळचा अर्थ देणगीचा मालक म्हणजे धनी व दास याचा अर्थ देणारा म्हणजे गुलाम असा असूं शकेल काय ? "असुरांचा आम्हा देवांकडून पराभव होवो" ( १०. १२, ४ ). या वाक्यावरून असें वाटतें कीं, वरील वाक्य उच्चारणारा देवपैकींच होता. यावरून असुर या शब्दाप्रमाणें, देव हा शब्द मनुष्यजातीच्या विभागाचा दर्शक आहे. अग्नीच्या मदतीमुळें दस्यूंचे देवापुढें कांहींएक चाललें नाहीं ( ३. २९, ९ ). दस्यु हे मनुष्य प्राणी होते असें त्यांचें वर्णन आहे, देवांनी त्यांचा पराभव केला, यावरून देवाहि मनुष्य असावे असे वाटतें. हे देव अग्निपूजक होते. दस्यूंशीं लढण्यासाठीं मनुमनु जातीचा पुरूरवस् याची देवांनीं मदत मागितली ( १०. ९५,८). ज्या अर्थी देवांनीं पुरूरवस् याची मदत घेतली त्याअर्थी तेहि मनुष्यच असले पाहिजेत. पंचजनाः हें नांव मनुष्यजातीला दिलेलें आहे. व्रात ( टोळी ), संद ( रूप, रंग ), मानुष् ( मनुष्य ) वगैरे शब्द वेदामध्यें आढळतात. मनुष्यप्राण्याच्या देशाला दिव् असे म्हणत; व पंचजना' याबद्दल पंचदेवा असेंहि म्हणत असत ( १०. ५५, ३ ). पंचजनाः याचा अर्थ एके काळीं 'सर्व मनुष्यजात' असा समजला जाई. मनुष्यजातीचे एकंदर पांच विभाग होते. देवांच्या तीन जाती संहितेमध्यें येतात. खरे देव या तीन जातींबरोबर एकसारखे लढत असत. अशा एकंदर देवाच्या चार जाती झाल्या; शूरदेव या नांवाची एक पाचवी जात होती, त्यांचा एक स्वतंत्र इन्द्र होता ( ८ ७०, १५ ) हे पन्या देवांशीं मिसळून गेले. देवाच्या पहिल्या जातीस मूरदेव असे म्हणत. "हे इन्द्रा, यातुधान लोकाचे गळे कापून तूं त्यांना मारून टाक, मूर-देव मरून जावोत" ( ७. १०४, २४ ). मूरदेव व यातुधान हे मनुष्यप्राणी होते असें या वर्णनावरून समजतें. यातुधान हे मनुष्याचें व घोड्याचें मांस खात असत ( १०. ८७, १६ ). मूर-देवांनां जाळून टाकण्यास अग्नीस सांगितलेलें आहे ( १० ८७, १४ ). उर्वशीनें पुरूरवस् याला मूर असें म्हटलें आहे ( १०. ९५, १३ ). मूरदेवांपैकींच मनु-मनु जात असावी असे समजून या जातीचा आपल्याशीं कांहीं संबंध नाहीं असें देवास वाटलें असेल. अथवा या वेळीं मूर-देव हा शब्द बराच प्रचारांत आला असावा. देवांच्या दुसऱ्या जातीस शिश्नदेव असें म्हणत. "शततुर दाहर लुटून त्यानें शिश्नदेवाचा पराभव केला" ( १०. ९९, ३ ). तिसऱ्या जातीस पूर्व-देव असें नांव होतें. पूर्व-देवा म्हणजे असुरा' ( ७. २१, ७ ) असें प्रसिद्ध टीकाकारांचेंहि मत आहे. अमरकोशामध्येंहि पूर्वदेव व असुर हे शब्द एकाच अर्थाचे आहेत असें म्हटलें आहे पूर्वदेव म्हणजे श्रेष्ठ देव किंवा पूर्वेकडील देव. पहिला अर्थ घेतला तर, असुरांपासून देव वेगळे निघाले असें म्हणावें लागतें. दुसरा अर्थ घेतला तर असुराच्या देशाच्या पश्चिमेकडे देवाचा देश असावा असें मानणें भाग आहे. ज्या ऋचेंत पश्चिमेकडील शत्रू जाळून टाकण्याबद्दल ( ३. १८, १ ) अग्नीची प्रार्थना केली आहे, ती ऋचा एका पूर्वेकडील देवानें लिहिली आहे. पूर्वदेव व प्रत्यक् देव हे एकच भाषा बोलत होते किंवा काय हा एक प्रश्न उपस्थित होतो. एका ब्राह्मण ग्रंथावरून पतंजलीचें असें मत झालें आहे कीं असुरांची भाषा देवाच्या भाषेपासून निघालेली असावी. अवेस्तिक लोकांत प्रसिद्ध असलेले वेरेनियन् देव हें नांव कदाचित् पाश्चात्य देवाचें असेल, किंवा त्यांचा पोटभाग असेल, अगर वेरेनियन् देव हे देवाच्या इतर तीन जातींपैकीं असतील. वरेण्य होतृ ( १. २६, २ ) हे वरेण्य देवाचे होतृ असावेत. दुसऱ्या होतृचें नांव पूर्व्य म्हणजे पूर्वेकडील किंवा जुना ( १. २६, ५ ) असें होतें. वैदिक वाङ्मयांत देवाच्या दोन होतृना 'आप्री' सूक्तांत जागा दिलेली आहे. विश्वदेव म्हणजे सर्व देव अगर फक्त पश्चिमेकडील देव ? वैदिक वाङ्मयांत वसु, रुद्र व आदित्य असे देवांचे तीन विभाग केलेले आहेत ( ७. १०, ४ ), व प्रत्येक भागांत अनुक्रमें, ८, १० व १२ अशा पोटजाती ( कोटी ) आहेत. मराठी 'कुळी' हा शब्द व संस्कृतांतील 'कोटी' हा शब्द हे दोन्ही एकच आहेत. बृहस्पति हा वत्तीसाव्या जातीतला असून, इन्द्र व त्याचे मरुत् हे तेतीसाव्या जातीतील होते ( ८ ९६, ७ ), या भागांत व पोटभागांत फक्त अस्सल देवांचा समावेश होई पूर्वदेव किंवा असुर याचा समावेश यात होत नसे देवाच्या देशास दिव् असें नाव होते "हे इन्द्र, कोणत्या तरी मिषानें देवांच्या देशांत जाऊं इच्छिणाऱ्या दस्यूंचा तूं पाडाव केलास" ( ८ १४, १४ ) दस्यू हे मानव असून दिव् प्रांतांत जाण्याची त्याची इच्छा होती, यावरून तो देश देव व त्यांचे इन्द्र याचा होता असें म्हणण्यास हरकत नाहीं. दिव्चे तीन प्रांत केलेले होते, दिव् जवळच 'भूमि' देश होता त्याचेहि तीन भाग होते पृथ्वीच्या तीन विभागांपैकीं, एकाचें प्राचीन नांव भूमि असें होतें. हे पृथ्वीचे तीन विभाग व तीन दिव् मिळून सहा प्रदेश होतात. या सहा प्रदेशांच्या सहा उर्वी होतात. उर्वी हें नाव ऋग्वेद संहितेतहि आढळतें ( ६. ४७, ३ ). उर्वीबद्दल कधीं कधीं निष्टिर् हेंहि नाव आढळतें ( २ १३, १० ). अथर्व संहितेंत देवी म्हणजे देवांच्या असा अर्थ दिसतो. परंतु अलिकडच्या वाङ्मयांत पृथ्वी, भूमि व उवा हे शब्द एकाच अर्थाचे समजले जाऊन त्याचा अर्थ पृथ्वी असा आहे. दिव्च्या तीन विभागांना दीर्घप्रसद्मन्, रोचन, व समुद्र अशीं नांवें आहेत ( ८. १०, १ ). दुसऱ्या एका ठिकाणीं दीर्घप्रसद्मन् यास प्रस्रवण, व रोचन यास स्वर्णर ( ८. ६५, २ ) अशीं नांवें आहेत समुद्र हा देश सुंदर स्त्रियांविषयीं प्रसिद्ध होता ( ९ ७८, ३ ). एक अभिरण (अधिगु) स्वर्णरास कंपायमान करीत असता, इन्द्रानें त्यास ठार मारिलें ( ८ १२, २ ) व मनुष्यानेंहि मरुत्वत् हेंहें, स्वर्णर, स्त्याम, इशावक

आणि कृप (८. ३, १२) या सर्वांचें इन्द्रानें रक्षण केलें. रुशमाचा ऋणंचय या नांवाच्या राजाचाहि उल्लेख केला आहे (५. ३०, १४). कार्पण व कृप हे एकच असावेत. अरब व तुर्क लोकांपासून आशिया मायनरला रोम हें नांव मिळालें. रोम हें शहर वरील ठिकाणापासून फारच दूर आहे. म्हणून आठव्या मंडलांतील चौथ्या सूक्तांत असलेलें रुम हें अगदीं निराळें आहे. या रुमदेशांतील कांहीं लोक आन्या लोगा येथें जाऊन राहिले असावे; व त्यांच्या वंशजांनीं तैग्रस जवळ वसाहत केली असावी व या नवीन वसाहतीस रुम-रोम हें नांव मिळालें असेल. चेन जातींतील नाक (९. ८५, १०-११) हें दिव् मधील एका पर्वताचें नांव असावें (८. १०३, २). प्रस्रवण, रोचन, समुद्र व नाक हीं नांवें संहितेंत कोठें कोठें आढळतात; व तीं दिव्चे विभाग दर्शवितात, 'त्रिदश' म्हणजे देव व 'त्रिदिव' म्हणजे त्यांचा देश हीं नांवें या अर्थानें आढळतात. त्रिदश म्हणजे तीस हा ठोकळ आंकडा एकतीस देवांचा वाचक आहे. एक प्रांत आठ वसूंनीं, दुसरा अकरा रुद्रांनीं व बाकीचा बारा आदित्यांनीं व्यापून टाकिला असावा. कदाचित् प्रत्येक प्रांतांत अकरा जाती रहात असाव्या. कारण 'त्रिभिः एकादशैः' (८. ३५, ३) असें म्हटलें आहे.

रसा या नदीस पायउतार होत नसे; व म्हणूनच पणींना आश्चर्य वाटत असे. रसा हें नांव नद्यांच्या सूक्तांत आलें आहे (१०. ७५, ६). रसेच्या एका बाजूला विष्टप (९. ४१, ६) किंवा विष्टप् (८. ३४, १३). या नांवाचा देश होता. त्रिविष्टप व त्रिदिव हीं नांवें एकाच अर्थाचीं असून, विष्टप हें दिव् याचें दुसरें नांव असावें. अर्बुदाचा एक (८. ३२, ३) विष्टप व ऋभ्वाचा दुसरा विष्टप असल्यामुळें, विष्टप व दिव् यांचा गोंधळ उडून गेला. हे देश जवळ जवळ असावेत. रसा, अंशुमती व सरस्वति या निरनिराळ्या नद्या असाव्या. देव व पणी यांच्या देशांच्या मध्यें रसा ही नदी आहे. अंशुमतीच्या एका बाजूला (८. ९६, १३-१६) काळे लोक रहात असत. व सरस्वतीच्या दोन्ही बाजूला पूरु लोक रहात असत (७. ९६, २). एलाम किंवा इराणांतील नैर्ऋत्य भाग अंशन असें होतें जिच्या कांठीं सुस हें राजधानीचें शहर होतें त्याच नदीचें नांव अंशुमती होतें, किंवा एलामची पूर्व सीमा असलेली तेग्रिस नदी हिचें नांव अंशुमती होतें, हें अनिश्चित आहे. रसा व सिंधु या निरनिराळ्या नद्या होत्या (४. ४३, ६).

या सूक्तावरून असें सिद्ध होतें कीं, पणि हे देवांशीं लढत असत. फोनी किंवा पुनी या शब्दापासून पणि हा शब्द निघाला असावा. फोनी किंवा पुनी हे गलबतें व व्यापारी असून दूरच्या प्रदेशांनाहि ते व्यापार करीत असत. संस्कृतांत पण् या धातूचा अर्थ व्यापार करणें असा आहे. तोन्साच्या एका नाण्यावें नांव 'पण' असें होतें. कपिश्-वणिक् हे पणिश्-वणिश्नें रूपांतर म्हणून 'पणि' नें रूपांतर ... वृ (५. ६०, ६) नावाच्या वणिकाच्या गुणाव प्रांत (४. २१, ३) मिळाला. सर्व पणींशीं इन्द्राचें वैमनस्य होतें असें नाहीं. कांहीं पणि त्याच्यासाठीं सोम तयार करित असत, व कांहीं त्याला खंडणी देत असत; अशा लोकांशीं तो सलोख्यानें वागे; परंतु बाकीच्यांशीं त्याचें फार वांकडें होतें (४.२५, ७). बृबु या नांवाच्या एका पणीची औदार्याबद्दल स्तुती केलेली आहे (६. ४५, ३१-३३). दुसरा एक पणि ऋषि होता (५. ६१, ८) आपापल्या गर्भाशयांत समान ओझें (३. १, ६) वहाणाऱ्या अशा सात सुंदर स्त्रियांशीं साम्य असणाऱ्या अशा सात वाणी आहेत. वाणी हा शब्द, प्रार्थना, सूक्त (१. ७,१) या अर्थानेंहि वापरला आहे. उत्तरकालीन वैदिक वाङ्मयांत पणि हा शब्द कृपण यां अर्थानें आलेला आहे (६. ५३, ३).

सोम, ग्रावाण व ऋषी हे विप्र होते. ग्रावाण हें योद्ध्यांचें नांव होतें. त्यांच्या टोळ्या फोडणें हें दगडासारखें कठीण असेल, किंवा शत्रूंवर दगडाचा मारा करण्यासाठीं हे लोक आपल्यावरोबर येथें नेत असतील, म्हणून ग्रावण हें नांव त्यांस पडलें असावें. हे कण्व्या जातीचे लोक असावे असें ग्रावणसूक्तांत (१०. ९४) सांगितले आहे. *यव, दिव प्रांतातील आखर लोकांपैकीं हे लोक असून* हे इन्द्राचे संरक्षक होते व यांच्या पराक्रमामुळें इन्द्राची भरभराट झाली. "ग्रावण व अदिति यांना इंद्रानें (५.३१, ५) दस्यूंशीं सामना करण्यासाठीं पाठविलें होतें; हे अश्व रथ वगैरे कांहीं एक न घेतां पायींच गेले."

अंगिरस हे दिवस्पुत्राः (४. २, १५) म्हणजे दिव् चीं मुलें किंवा देवपुत्रा ऋषयः म्हणजे ऋषिदेवांचीं मुलें म्हणून प्रसिद्ध आहेत (१०. ६२, ४). मानवांनीं 'नाभा' च्या मध्यस्थीनें अंगिरसांशीं मैत्री करण्याचा प्रयत्न केला. विरूप हा अंगिरसांचा एक पोटभाग होता व या पोटभागांतील नवग्व व दशग्व हे फार प्रसिद्ध होते.",

**भागवतशोधित इतिहासाचें पौर्वापर्य**:-देवविषयक असुरविषयक कथा ऐतिहासिक असल्यास त्या गोष्टी दाशराज्ञ युद्धापूर्वी घडल्या असाव्यात.

देवांचीं युद्धें आम्हीं सध्यां इतिहासाचा विषय धरीत नाहीं. ज्या ज्या युद्धांत दुसरे कोणी देव गुंतले असतील आणि माणसें अस्पष्ट असतील तोहि आम्हीं इतिहासविषय धरीत नाहीं.

दाशराज्ञ युद्ध असें आहे कीं त्यांतील मानवी क्रिया अस्पष्ट नाहींत. जे मानव लढत त्यांना लढतांना जरी देवांनीं मदत केल्याचा उल्लेख असेल तरी तेवढ्या उल्लेखानें त्या क्रियेचें ऐतिहासिकत्व नष्ट होतें असें नाहीं. इंद्राच्या लढाया व देवांनीं ज्यांत भाग घेतला आहे अशा सरमासूक्तांत दृष्ट होणाऱ्या लढाया यांचेंहि आम्हीं ऐतिहासिकत्व अस्पष्ट समजतो. दाशराज्ञ युद्ध मात्र पूर्ण ऐतिहासिक विषय धरतों.

दाशराज्ञ युद्ध हा मंत्रकालांतील जर अत्यंत अर्वाचीन विषय असेल, तर दाशराज्ञ युद्धापूर्वी भरतांच येथें मात्र संस्कृतीच्या लोकांनीं आगमन झालें असें होईल, पण वस्तुतः तशी गोष्ट

नाहीं. मन्त्राश्रयाच्या अगोदर दाशराज्ञ युद्ध झालें असलें पाहिजे असें आम्ही समजतों.

मंत्रदृष्ट कालाचे आम्ही भाग येणें प्रमाणें पाडतो.

मंत्रपूर्व युग — **पहिला विभाग** ज्या कालांत मंत्रांत उल्लेखिलेल्या इन्द्रवृत्रादि पौराणिक कथा तयार झाल्या असतील तो काल **दुसरा विभाग.** ज्याकालांत अर्ध्यामुर्ध्या ऐतिहासिक व अर्ध्यामुर्ध्या पौराणिक उदाहरणार्थ पुरूरवस् उर्वशी याच्या कथा उत्पन्न झाल्या असतील असा काल **तिसरा विभाग** दाशराज्ञ युद्धाचा काल

या तीन युगविभागांपैकीं पहिला विभाग मूलगृहकालीन होता असे शक्य आहे. लोकमान्यांचा *'उत्तर ध्रुव प्रदेशी आर्यन् लोकांचें मूलस्थान'* हा ग्रंथ मंत्रपूर्वयुगाच्या पहिल्या विभागाविषयीं विवेचन करतो.

आर्यदासविरोध कल्पना ही याच युगांतील होय

*हे तीन काल मात्र लोकांच्या पूर्वजांचे होत* मात्र लोकांचे देशांत आगमन झालें त्याचा, मन्त्राश्रयाचा आणि दाशराज्ञ युद्धाचा परस्परसंबंध लक्षांत घेतला पाहिजे पुढें आम्ही असें दाखवितो कीं, दाशराज्ञ युद्ध हें मंत्ररचनापूर्व आहे तसेंच ऋग्मंत्र कोणत्याहि तऱ्हेनें देशांत आर्य म्हणवून घेणाऱ्या लोकाचें आगमन दाखवीत नाहींत, एवढेंच नव्हे तर मानवी राजकीय घडामोडी *दाखविण्यांत आर्य शब्दाचे उल्लेख मुळींच उपयोगी नाहींत* हें आम्हीं मागें दाखविलेंच आहे. आर्यन् नावाच्या लोकांचे, किंवा ज्यांस आर्यन् म्हणता येईल अशा लोकांचे आगमन ऋग्मंत्र दाखवितात *असें आम्ही मुळींच कबूल करीत नाहीं आणि हें* मत प्रतिपादन करणाऱ्या विद्वद्वर्गास तें तुम्ही सिद्ध करा असें आव्हान करतों.

*भरत नांवाच्या एका टोळीचें किंवा दिवोदास सुदास याच्या* अनुचराचें मात्र आगमन आम्ही मानतों.

*आर्यन् लोकांची हिंदुस्थानात पहिली वसाहत ज्याकाळीं झाली त्या काळाचे लेख आपणापाशीं नाहींत तर आर्यन् वसाहती*च्या हजारों वर्षांचा एकच काल धरला तर त्या दीर्घ कालाच्या अंतिम भागांत दाशराज्ञयुद्धानें व्यक्त होणारी भरतांची हिंदुस्थानांत स्वारी झालेली असावी. भरतांच्या स्वारीचा काल तोच मंत्रकाल होय एवढेंच नव्हे तर त्या स्वारीच्या नंतर कांहीं वर्षांनी आजपर्यंत टिकलेले मंत्र तयार झाले भरतांनीं ज्या वेळेस स्वारी केली तेव्हां देश चांगला वसलेला होता. अर्थात आर्यन् राष्ट्रांच्या वसाहतीचा इतिहास हा वेदपूर्वकालीन आहे मंत्रकालापूर्वी १००० वर्षें तरी देशांत एक विशिष्ट संस्कृति स्थिर झाली असावी. वेद म्हणजे आर्यन् मानवानें हिंदुस्थान वसविला त्या काळचें वाङ्मय मुळींच नाहीं.

*आम्ही येथें जे मत व्यक्त करीत आलों तें आज संशोधक* वर्गांत रूढ नाहीं इतिहासविषयक प्रचलित कल्पना आमच्या मतांपासून भिन्न आहेत

*प्रचलित कल्पनांचें खंडण अनेक ठिकाणीं करणें प्राप्त होतें* व तें केलेंहि आहे उदाहरणार्थ, आर्यन् महावंशाचा इतिहास म्हणजे वेदांत आर्य या शब्दानें बोधित होणाऱ्या वर्गाचा इतिहास नव्हे, ही गोष्ट मागें दाखविली आहेच तसेंच आर्यन् राष्ट्रांच्या भारतांतील इतिहासास वेदांतर्गत इतिहासापासून प्रारंभ झाला अशी जी प्रचलित समजूत आहे ती चुकीची आहे असेंहि दाखविण्यात आलें आहे. आर्यन् राष्ट्रांचें देशांत आगमन वेद दर्शवितात अशी प्रचलित समजूत आहे, त्या समजुतीचें अयथार्थत्वहि पुढें वर्णिलें जाईल.

**ऋग्मंत्रांत दिसणारा समाज** — हा सविस्तरपणें विवेचिण्याचें येथें प्रयोजन नाहीं येथें एवढेंच सांगितलें पाहिजे कीं ऋग्मंत्रांत स्पष्टपणें इतिहास असा दिला नसून स्तोत्रांत जीं विधानें उपलब्ध होत आहेत त्यांतून इतिहास गोळा करावयाचा आहे या विधानांत देशप्रवेशाचा बिलकुल उल्लेख नाहीं आर्यन् लोकांच्या देशप्रवेशाविषयीं ऋग्वेदावरून जी कल्पना करण्यांत आली ती एवढ्याच वरून कीं बहुतेक उल्लेख पंजाबकडचे सांपडतात आणि गंगेच्या पूर्वेकडील उल्लेख थोडे सांपडतात.

यात उल्लेखिलेल्या दस्यूंच्या आर्यांशीं असलेल्या विरोधोक्तीवरून आणि अनास, असें एके ठिकाणीं दस्यूंचें वर्णन आहे त्यावरून आर्य व दस्यू या निरनिराळ्या जाती आहेत आणि ऋग्वेदांत आर्यप्रवेश वर्णिला आहे अशी कल्पना प्रचलित झाली तथापि वस्तुस्थिति निराळी आहे आर्य आणि दस्यू ही दोन निरनिराळीं राष्ट्रें अगर जाती आहेत असें खात्रीनें म्हणतां येत नाहीं, आणि आर्य आणि दस्यू यांचें सामुदायिक शत्रुत्व मुळींच वर्णिलें नाहीं, वगैरे विवेचन मागें सविस्तर केलेंच आहे.

ऋग्वेदांत जे युध्यमान पक्ष दिसतात त्यात,

( १ ) इंद्र व तद्विरुद्ध वर्ग,

( २ ) दाशराज्ञ युद्धांतील परस्परविरुद्ध वर्ग,

*यापैकीं पहिल्या वर्गांत मोडणाऱ्या विरुद्धता वगळल्या पाहिजेत.* त्याचें स्पष्टीकरण हा सामान्य इतिहासाचा विषय नसून पौराणिक कथा तयार कशा होतात या संशोधनक्षेत्राचा विषय आहे त्याचें विवेचन दुसऱ्या विभागांतील दैवतेतिहासांत केलेंच आहे ऋग्वेदांत अनेक युध्यमान पक्ष दृष्टीस पडतात त्याचा दाशराज्ञ युद्धांतील व्यक्तांशीं म्हणजे दाशराज्ञ युद्धाशीं म्हणजे पैजवनांच्या गांधारापासून यमुनेपर्यंत झालेल्या चालीशीं संबंध दिसून येतो.

ऋग्वेदांतील आगमन कोणाचें? "आर्यांचें" म्हणजे सभ्य लोकांचें कीं धनसंपन्नांचें? आर्यांचें आगमन झालें असें म्हणणारा वर्ग आर्य या शब्दाचा तो अर्थ घेतच नाहीं तो वर्ग "आर्य" या शब्दाला भाषाशास्त्रज्ञांनीं लावलेला अर्थ म्हणजे ग्रीक, लॅटिन या भाषांशीं नातें असलेली भाषा बोलणाराची जात असा घेतो आणि त्याचें आगमन म्हणजे संस्कृत भाषेचें कोणतें तरी प्रकृतिस्वरूप बोलणाराचें आगमन असें समजतो आणि तें ऋग्वेदांत वर्णिलें आहे अशी कल्पना करतो विशेषसा पुरावा न देतां लोक अशी कल्पना करतात कीं, मंत्रांत

जे स्थानातर दिसतें तोच "आर्यन्" लोकांचा हिंदुस्थानात प्रथम प्रवेश होय. या तऱ्हेचें स्पष्ट विधान कोणीं केलेलें नाहीं पण गृहीत धरलेलें आहे. वरील प्रकारच्या गृहीत मतास पुरावा नाहीं एवढ्यावरच तें मत टाकून देतां येईल, तथापि हें मत धरून बसणाराचा वाव मोठा आहे म्हणून त्या मतास अधिक सन्मानानें वागविलें पाहिजे म्हणजे तें उलट प्रमाणें देऊन खोडलें पाहिजे.

"वेद" हे आर्यांच्या आगमनाचे ग्रंथ लोकास वाटतात याचें कारण त्या ग्रंथात वर्णन केलेल्या क्रियांची रंगभूमि पंजाब ही आहे. आमचें मत असें आहे कीं, वेदोक्त क्रियास्थान पंजाब आहे तरी ऋग्वेद हे आर्यन् भाषा बोलणाऱ्याच्या प्रथम देशप्रवेशाचे ग्रंथ नाहीत. त्यात उल्लेखिलेलीं राष्ट्रें पंजाबात वसलेलीं दिसतात एवढ्यावरूनच ऋग्वेद हे आर्यन् महावंशाच्या आगमनाचें दर्शक वाङ्मय आहे असें म्हणावें काय? तेवढीच कसोटी लावावयाची असेल तर आज पंजाबातील गाणीं गोळा करावीत म्हणजे त्यातील जाती देखील पंजाबात दिसतील, म्हणून त्यावरून तें विशिष्ट जातीचें देशप्रवेशवाङ्मय कसें म्हणता येईल?

संस्कृत भाषा किंवा ती ज्या भाषेपासून झाली तिच्या प्रकृतिरूपी भाषा यातील वाङ्मयाचें अत्यंत जुन्या काळचे अवशेष ऋग्वेद होत. यावरून अशी कल्पना झाली कीं आर्यन् भाषा बोलणारांचें हें प्रवेशवाङ्मय होय आणि यजुर्वेदादि वाङ्मय त्याच लोकांच्या तत्कालीन क्रियेचें द्योतक होय.

म्हणजे वाङ्मयाची वाढ व आर्यन् भाषा बोलणाराकडून देश व्यापला जाणें या गोष्टी अन्योन्याश्रयी धरल्या जातात. भूमि व्यापण्याची क्रिया अगोदर होणें आणि वाङ्मयवाला वर्ग तेथें मागाहून जाणें या क्रियेची शक्यता लोक विसरतात.

वाङ्मयविस्तार लोकविस्ताराच्या आश्रयानें झाला असेल ही कल्पना स्वाभाविक आहे; पण अधिक विचार केला असतां या कल्पनेंत काहीं चुका असण्याचा संभव आहे असे दिसून येतें. आर्यन् महावंशाचें प्रथम आगमन ऋग्वेदांत वर्णिलें आहे असें समजणाऱ्यांना नवीन वसाहतीच्या क्रियेचें स्वरूप लक्षांत घेतलें होते कीं नव्हतें असा संशय उत्पन्न होतो.

प्राचीन काळीं झालेलें व मंत्रांत उल्लेखिलेलें आर्य लोकांचें आगमन हें पहिलेंच काय हा प्रश्न प्रथम विचारणीय आहे. तें पहिलें नाम नाहीं असे वाटतें. वेदामध्ये ज्याचा उल्लेख येतो ते सर्व लोक एकच होते काय? पुढें सर्व पडणाऱ्यास प्रतिकार करणारे नॉन् आर्यन् होते काय? ते तसे असावे असें दिसत नाहीं. पुढें सरकू पाहणाऱ्या लोकांच्या शत्रूंमध्ये काहीं स्वजन जातीचे आणि काहीं भिन्न जातीचे असे दोन्ही प्रकारचे लोक असणे शक्य आहे, एवढेंच नव्हे तर युद्ध कशांशीं झालें असावें असे मनुष्यस्वभावाच्या अत्यंत सामान्य पद्धतीवरून म्हणावें लागेल. अमेरिकेंतील वसाहतीच्या इतिहासांत गोऱ्यांचीं आणि तांबड्यांचीं युद्धें आहेत एवढेंच नव्हे तर निरनिराळ्या गोऱ्या राष्ट्रांचीं परस्परांतील युद्धें देखील आहेत तेव्हां कितपत गृहीतें धरावीत भाषाशास्त्रज्ञांनी

वापरलेल्या "आर्यन्" नांवानें संबोधिलेलीं राष्ट्रें कोणतीं याविषयीं विचार पाहिजे.

आर्यन् म्हणून म्हटलेल्या एकाच लोकसमूहाचें एकच वेळेस आगमन होऊन त्यांनीं देश जिंकला किंवा वसविला ही गोष्ट शक्य च नाहीं. बोलन घाटातून किंवा खैबर घाटांतून एकदम कितीसे लोक येणार? जे येतील त्यांना भक्ष्य मिळविण्यास तात्पुरती तरी वसाहत करावी लागणार. जीं माणसें येणार तीं प्रथम जवळचाच प्रदेश व्यापणार आणि एकदां एखादा प्रदेश व्यापिला म्हणजे त्या प्रदेशापासून स्वच्छेनें लोक इतरत्र भ्रमण कशाकरिता करतील. नवीन येणार त्यास व्यापिलेल्या प्रदेशांतून रस्ता काढून दूर गेले पाहिजे किंवा जुनीच वसाहत हिसकावून घेऊन जुन्या वसाहतवाल्यांस दूर ढकलले पाहिजे. म्हणजे नवीनांचें भांडण युद्ध किंवा मारामारी व्हावयाची ती प्रथम जुन्या स्वजनाशींच होणार. दस्यु, राक्षस, दास, इत्यादि शब्द शत्रुवाचक असले तर ते द्राविडी किंवा दुसरी भिन्नवंशीय भाषा बोलणाऱ्या विशिष्ट लोकांसच लावले कशावरून? देशातील काळ्या लोकांना जिंकून त्यास शूद्र बनविलें या विधानाच्या मुळाशीं समजूत दिसते ती अशी का मंत्रकाली उत्तर हिंदुस्थान काळ्या लोकांनीं वसलें होतें आणि लक्षावधि किंवा कोट्यावधि गोरे आर्य आले आणि त्या सर्वांनीं शिस्तवार इतक्या लोकांशीं युद्ध करून अर्धा लक्ष चौरस मैल जमीन व्यापून टाकली. ही कल्पना हिंदुस्थानचा लहानसा दोनचार फुटाचा नकाशा हातात असला म्हणजे सोपी दिसते पण त्या क्रियेचे यथार्थ स्वरूप लक्षांत आणूं लागले म्हणजे त्या विधानाची असत्यता भासूं लागते. यासाठीं आर्यन् लोकांनीं द्राविड लोकांस हांकून हिंदुस्थान काबीज केलें त्याचा इतिहास वेदांत वर्णिला आहे असल्या तऱ्हेचीं इतिहास सोपा करणारीं विधानें जितकीं दूर टाकता येतील तितकीं दूर झुगारून दिलीं पाहिजेत, आणि संशोधनामध्यें प्रत्यक्ष युद्धें काय झालीं, प्रत्यक्ष सघ कोणकोणते दिसतात, याविषयीं शांतपणें संशोधन केलें पाहिजे. ज्या आर्यन् लोकांनीं वेदमंत्र आणले त्या आर्यन् लोकांनीं काळ्या द्राविड लोकांना जिंकून हिंदुस्थान काबीज केलें हें विधान आपण प्रथमच शिशुमशोधकाच्या मनोहर कल्पनाक्षेत्रांतलें आणि केवळ अजिबात खोटें असें धरून चालू, आणि इतिहासाचे सूत्र सांपडण्यास काय काय गोष्टी उपलब्ध होतात हें पाहूं.

पूर्वीच्या ग्रंथकारांचें आर्यदस्युयुद्धविषयक मत आणि आमचें मत यांतील भेद आम्ही येणेंप्रमाणें दर्शवितों.

| पूर्वींचें मत. | आमचें आजचें मत. |
| --- | --- |
| ( १ ) आर्य हें जातिवाचक किंवा महावंश वाचक नांव होतें. | ( १ ) आर्य हें शिष्टवर्गवाचक व यजनशीलजनवाचक नांव होतें. |
| ( २ ) हिंदुस्थानात वेदभाषी ( आर्यन् ) लोक आले | ( २ ) हिंदुस्थानात भरतांचें आगमन किंवा स्थानांतर |

| | |
|---|---|
| त्यांचें आगमन वेद दाखवितात. | तेवढें ऋग्मनातील उल्लेखांवरून स्पष्ट होतें आर्यन् लोकांचें आगमन वेदांवरून स्पष्ट होत नाहीं भरत लोक तेवढेच आर्यन् होत असें मुळींच दिसत नाहीं |
| (३) आर्यन् आले त्यावेळीं देशांतील काळ्या लोकांबरोबर त्यांचे युद्ध झाले. | (३) भरत हिंदुस्थानांत आले तेव्हां त्यांना देशांत प्रवेश सर्व प्रकारच्या लोकांशीं लढाया करीत करावा लागला |
| (४) आर्यन् राष्ट्राचे सामान्य शत्रु देशांतील मूळचे लोक होते ते काळे होते म्हणने आर्यन् लोकांचें हें आगमन पहिलेंच होय | (४) आर्यन् राष्ट्रांचे काळ्यांशीं सामुच्चयिक वैर दिसत नाहीं. आर्यन् लोकांचें सामान्य शत्रुमूलक ऐक्य असल्याचें कोठें दिसत नाहीं देशांत आर्यन् लोक प्रथमच येत होते व त्यांच्या अगोदर काळे लोक देशांत होते असा बद्दल पुरावा नाहीं |
| (५) दस्यु याचा अर्थ देशांतील मूळचे लोक. | (५) दस्यु म्हणने जे यजनशील नव्हत ते दस्यु हा शब्द फार तर शत्रुत्व वाचक असावा तो शब्द पर्शुभारतीय असल्यामुळे त्यानें भारतीय विशिष्ट जात दर्शविली जात नाहीं एके ठिकाणीं कांहीं चपट्या नाकाच्या लोकांस दस्यु म्हटलें आहे, ते आर्यांचे शत्रु होते असें नाहीं |
| | (६) दस्यूंशीं युद्धप्रसंग वर्णिला नाहीं. दिवोदास व सुदास यांचे अनेक राष्ट्रांशीं युद्धप्रसंग ऋग्वेदांत वर्णिले आहेत जीं राष्ट्रें सुदास व दिवोदास यांच्या विरुद्ध लढलीं (उ० यदु, तुर्वश, पुरु इ०) तीं दिवोदासापेक्षां भिन्न वंशाचीं किंवा भिन्न धर्माचीं होतीं असें समजण्यास मुळींच पुरावा नाहीं |

आमच्या पूर्वीच्या लेखकांशीं असलेला दुसरा मतभेद असा आहे कीं भरतांचें झालेलें आगमन आर्यन् लोकांच्या भारतीय इतिहासांत प्राचीन नसून अर्वाचीन आहे

ऋत्विक्कर्मवैशिष्टयुक्त अगर ब्राह्मणयुक्त समाज ही समाजाची उत्तरकालीन स्थिति होय यज्ञविकासाबरोबर ऋत्विक्कर्म भिन्न झालें ऋत्विक्कर्माचें भिन्नत्व म्हणजे विशिष्टीकरण स्थापन झाल्यानंतर ब्राह्मणांची वेदशाखाभिन्नतात्मक जात तयार झाली. मंत्रभागांतच ऋत्विक्कर्माचें बरेंच विशिष्टीकरण व यज्ञविकास हीं दिसत आहेत यज्ञसंस्था तयार होण्याच्या पूर्वीं ब्राह्मणांची जात तयार झाली नव्हती आणि त्यामुळे ब्राह्मणजातीविरहित तथापि आर्यन् भाषेनें व्यापलेला, असा जर कांहीं प्रदेश असेल तर, तो यज्ञसंस्था संवर्धनापूर्वींचा आर्यन् लोकांचा प्रसार दर्शवितो. उत्तरेकडील ब्राह्मणांत अत्यंत पौर्व ब्राह्मण म्हणजे सारस्वत होत तथापि संस्कृत भाषेचा सन्निध असा आर्यन् भाषेनें व्यापिलेला देश सरस्वतीच्या पूर्वेकडे पुष्कळ आहे सिंहलद्वीपाची कथा पंजाबप्रमाणेंच आहे हा प्रदेश भाषेनें आर्यन् आहे पण येथे ब्राह्मणाची वसति नाहीं आणि या परिस्थितीचें कारण आर्यन् राष्ट्राकडून ब्राह्मणजातिविकासापूर्वीं द्वीपाची वसाहत होणे असावें असे मागें सांगितलेंच आहे (विभाग १ पृ १४३) मंत्रकाल आणि ब्राह्मणजातिविकासकाल हा एकमेकांपासून फारसा दूर नसावा मंत्रसंस्कृतीची ब्राह्मणसमाजयुक्त संस्कृति ही अत्यंत निकटची पायरी असल्यामुळें ब्राह्मणहीन समाज हा मंत्र संस्कृतीचा भाग नसला पाहिजे

या प्रकारच्या विवेचनांत प्रवेश करतांना प्रथम ग्रथांत उल्लेखिलेल्या राष्ट्रांपैकीं प्राचीन राष्ट्र कोणतें आणि अर्वाचीन राष्ट्र कोणतें हें ठरविण्याच्या पद्धतीविषयीं विचार व्यक्त केले पाहिजेत

**ग्रंथोल्लेखप्राचीनत्व व लोकप्राचीनत्व** — येथे एक गोष्ट अशी मांडली पाहिजे कीं ज्या लोकांचा उत्तरकालीन वाङ्मयांत उल्लेख येतो ते लोक उत्तरकालीन होत, हा जो समज आहे तो चुकीचा आहे नवीन गटांनीं हिंदुस्थानांतील पूर्व भागांत वसाहत करणें शक्य दिसत नाहीं आमच्या मतें जे लोक अधिक पूर्वेकडे दिसतात ते अधिक प्राचीन वसाहत करणारे होत ऋग्वेदांत उल्लेखिलेले राष्ट्रें नंतर आलेलीं असावीत व आलीं तीं सवाङ्मय असावीत त्या सवाङ्मय आर्यन् लोकांबरोबर आलेल्या लोकांतून निघालेल्या वाङ्मयोत्पादक ब्राह्मणांचा फैलाव जसजसा अधिकाधिक होत चालला तसतसा पूर्वेकडील व दक्षिणेकडील राष्ट्रांचा वाङ्मयांत उल्लेख येऊं लागला असावा, म्हणने ऋग्मंत्रदृष्ट राष्ट्रें प्राचीन राष्ट्रांतील प्राचीन नसून अर्वाचीन आहेत ज्यास भाषेनें आर्यन् म्हणतां येईल अशा लोकांचा फैलाव चोहोंकडे झाल्यानंतर पश्चात्कालीं उत्तरकालीं ब्राह्मण म्हणणारांचे पूर्वज आर्यन् आले असावेत आणि त्यांच्यांतील सवाङ्मयवर्गांचाच प्रसारक्रम ऋग्वेदांतील व यजुर्वेदांतील स्थानोल्लेख दाखवितात, अशी एक शक्यता आम्ही येथे मांडीत आहों शेंकडों राष्ट्रांनीं एकदम येण्याची अशक्यता, त्या अशक्यतेमुळें देश्य लोक आणि आगंतुक गोरे यांच्या युद्धाची अशक्यता यांवरून ऋग्मंत्रदृष्ट राष्ट्रांचें अर्वाचीनत्व अवलंबून नाहीं ऋग्मंत्रपूर्व राष्ट्रें अस्तित्वांत होतीं श्रौतकर्माच्या इतिहासाच्या दुसऱ्या अनेक

सांस्कृतिक प्रमाणांनीं सिद्ध होतें. ज्यास आपण श्रौतधर्म म्हणतों त्याच्या उद्भवापूर्वी बहुतेक हिंदुस्थान व्यापलें गेलें होतें असें दिसतें.

संस्कृतीच्या प्रसाराच्या इतिहासामध्यें ज्या एका महत्त्वाच्या गोष्टीचा निर्णय केला पाहिजे ती ही कीं, श्रौत व स्मार्त धर्मांचा विकास ज्या काळात झाला त्या काळानंतर म्हणजे श्रौतस्मार्तधर्म बरोबर घेऊनच आर्यन् लोक चोहोंकडे पसरले कीं तो विकास होण्यापूर्वीच पसरले. विकास झाल्यानंतर चोहोंकडे पसरले तर चोहोंकडे श्रौतधर्म असून त्याचीं उत्तर स्वरूपेंच प्राचीन ग्रंथांतून दिसलीं पाहिजेत तीं तशीं दिसत नाहींत. ज्या वेळेस श्रौतस्मार्त धर्म विकसित झाले नव्हते, आणि ज्या वेळेस ब्राह्मण ही जात (किंवा धन्यान आनुवंशिक परंपरेनें चालू रहाणारा वर्ग) तयार झाली नव्हती, परंतु आर्यांच्या म्हणजे वेदभाषेशीं सादृश्य असणाऱ्या भाषा बोलणाऱ्यांच्या वसाहती मात्र चोहोंकडे झाल्या होत्या असा एखादा काल आपल्या देशांतील निरनिराळ्या प्रांताच्या इतिहासात होता काय? असल्यास तो काल किती विस्तृत होता, त्यावेळची लौकिक परिस्थिति काय होती आणि किती प्रदेशभर श्रौतस्मार्तधर्म व ब्राह्मण यांच्याशिवाय असलेल्या आर्यांचा प्रसार झाला होता? हें आपणांस पहावें लागेल.

असा काल होता असें आम्ही आमचें विधान देऊन होईपर्यंत पूर्वपक्ष करितों आणि विधानाच्या साहाय्यार्थ खालील प्रमाणें देतों.

पहिलें प्रमाण.— पंजाब, बंगाल आणि सिंहलद्वीप येथें वैश्य ब्राह्मणांचें अस्तित्व नाहीं. तथापि तेथील भाषा मात्र आर्यन् आहे.

दुसरें प्रमाण.—वेद बरोबर आणणारे आर्य इतर लोक आपणांपेक्षां भिन्न भाषेचे आहेत असा त्यांच्यावर आरोप न करितां ते अस्पष्ट उच्चार करणारे आहेत असा आरोप त्यांजवर करीत, आणि म्लेच्छ याचा अर्थ अस्पष्ट उच्चार करणारा असाच ते मनांत आणीत.

शूद्रवर्गाच्या समोर वेदाक्षराचा उच्चार करण्याची ज्या दिवसांत मनाई उत्पन्न झाली त्या दिवसांत शूद्रांची भाषा द्राविडी भाषांसारखी फारशी भिन्न नसावी.

तिसरें प्रमाण— श्रौतस्मार्तधर्मांचा विकास संहितीकरणापूर्वी म्हणजे भारतीय युद्धाच्या पूर्वी पूर्णत्वानें झालेला दिसत नाहीं आणि लोकविस्तार मात्र बराच झालेला दिसतो आणि श्रौतधर्मांच्या विकासाचा मध्य दाखविणारें वाङ्मय जे मंत्र आणि ब्राह्मणें त्यामध्येंच अनेक लोक चोहोंकडे पसरल्याची स्थिति स्पष्ट पडते. शिवाय भारतीयुद्धामध्ये ज्या ज्या ठिकाणच्या राजांचें अंग दाखविलें आहे ते ते राजे सर्व देशभर पसरले होते असेंहि त्यांत दाखविलें आहे. ज्या राष्ट्रांचा संबंध भारतीयुद्धांत आणला आहे अशांची संख्या साठेचाळिसांपासून चाळीसपर्यंत महाभारतांत आहे. रामायण व महाभारत यांतील कथांच्या द्वारा श्रौतस्मार्तधर्मांच्या पूर्वीच्या भिन्न भिन्न परंपरेच्या धर्मांचा आरोप केला आहे. उदाहरणार्थ गौतम अध्यात्मार्थ बसविलें आहे गुरु मर्त्त्यप्या शाश्वतें पाहिले तर स्त्रियांचे यज्ञोपवीत दिसण्याचा घेऊन सोबत गेल्या त्यांच्या समोरा यज्ञोपवीतासुद्धां योक्त्र नावाचा मोळाचा दोर बांधून इथें सपत्नीबरोबर तो पुन्हा विसकावून घेण्यात आला आहे. आणि श्रौतगृह्यकर्मांत यजमानाच्या यज्ञास सहाय्य करण्याखेरीज कोणताहि धर्माधिकार उर्फ कुलंगडीं स्त्रियांच्या गळ्यात बांधलेलीं दिसत नाहींत.

श्रौतधर्माच्या विकासापूर्वी जर चोहोंकडे आर्यन् राष्ट्रांच्या वसाहती दिसतात तर प्रश्न असा उपस्थित होतो कीं श्रौतधर्मपूर्व ऋग्वेदीय मंत्रधर्म असतां प्रसार चोहोंकडे झाला कीं त्या पूर्वीच झाला. आमचें मत हा प्रसार मंत्रधर्मोद्भवापूर्वी झाला असें आहे. ऋग्वेदांतील क्रियांशीं यजुर्वेदोक्त श्रौतधर्माचें निकट नातें मागल्या विभागात ऋग्वेदाचें पृथक्करण करून दाखविलेंच आहे. यजुर्वेदधर्म तयार होण्यापूर्वी म्हणजे ऋग्मंत्रधर्माचा प्रचार असतां जर लोकांचा प्रसार चोहोंकडे झाला असता तर पूर्वकालीन धर्माचें स्वरूप सर्वत्र दृष्टीस पडतें, पण दिसतें काय तर ब्राह्मणांच्या बाबतींत अध्वर्युप्रधान धर्म आणि इतरांच्या बाबतींत पुराण धर्म. या तऱ्हेची परिस्थिति प्रसारकाळ मंत्रपूर्व होता असें दर्शविते.

भाषाशास्त्राचा अभ्यास अधिक झाल्यास वरील विधानास साधक असा पुरावा आणखीहि सापडणें शक्य आहे असें वाटतें. ग्रिअर्सननें भाषांच्या अभ्यासावरून तीन निरनिराळे मनुष्यांचे प्रवाह आर्यन् भाषांच्याच वसतिक्षेत्रांत दाखविले आहेत. बंगाली, मराठी, सिंधी व पंजाबी या बाह्य परिसरांतील भाषांस हिंदी, राजस्थानी, इत्यादि भाषांनीं कोंपऱ्यात ढकललेले दाखविलें आहे. रा. राजवाडे यांचें असें मत आहे कीं महाराष्ट्री ही भाषा वैदिक भाषेपासून निर्माण झाली नसून वैदिक व महाराष्ट्री या दोन्ही एकाच इन्डोयूरोपीय भाषेचीं अपत्यें आहेत. या तऱ्हेचें मत अधिक ग्राह्य होऊं लागलें आहे. निदान एवढें म्हणता येईल कीं मंत्रकर्त्या लोकांपूर्वी आर्यन् लोक येथें नव्हते या समजास वरील मत ग्राह्य झाल्यास बराच धक्का पोंचणार आहे.

मंत्रकर्त्या लोकांपूर्वी भिन्न लोक आपल्या देशांत होते हें सिद्ध करण्यास थोडासा पुरावा येथेंच देतां येईल. शक व मग या जाती वेदकर्त्या लोकांपूर्वी आल्या असाव्यात असें दिसतें. शक नांवाचें राष्ट्र किंवा जाति ही बरीच उत्तरकालीं हिंदुस्तानांत आली असा व्हिन्सेंट स्मिथनें आधारास घेतलेल्या ग्रंथकाराचा समज आहे. शकांचें आगमन ज्या उत्तरकालां झालें असें संशोधक लिहितात त्या कालीं कांहीं शक हिंदुस्थानात आले असतील तथापि तें आगमन पहिलेंच नव्हे. इसवी शकापूर्वी सात आठशें वर्षें शकांचें आगमन झालें होतें ही गोष्ट गौतम आपणास शाक्य म्हणवितो येवढ्यावरूनच सिद्ध होईल. शाक्य म्हणजे ज्याचा शक हा अभिजन म्हणजे मूळदेश आहे असे लोक. गौतमबुद्ध आपले अनेक पिढ्यांचे पूर्वज हिंदुस्थानांत होते अशी आपली समजूत व्यक्त करतो त्यास आपले पूर्वज परक्या देशांतून आले अशी कल्पना देखील असल्याचें दिसत नाहीं (वंशपरंपरा पहा).

गौतम बुद्धाचा वंश शक होता ही गोष्ट लक्षांत घेतां शकांचें भारतांत प्राचीनत्व सहज स्पष्ट पडतें. शकांच्या बरोबर त्यांचे उपा-

ध्याय 'मग' आले असावेत, 'मग' हे देखील शकस्थानांतून आले ही समजूत भविष्योत्तरपुराणामध्ये रेखाटलेली दिसते. मगध देशाचें नांव पूर्वी 'कीकट' होतें परंतु पुढें मगध हें पडलें. मगास धारण करणारा देश तो 'मगध' या तन्हेची व्युत्पत्ति पतंजलीनें दिली आहे तथापि, मग याचा अर्थ मल अथवा पाप असा लाविला आहे. शकांचे उपाध्ये मग, त्यांचा देश तो मगध अशी व्युत्पत्ति राजवाडे आपल्या लोकशिक्षणांतील 'मगध' लेखांत व्यक्त करितात. 'मगध' हे नांव जितकें जुनें तितकें शकमगाचें अस्तित्व जुनें असें धरलें तर मगांचें अस्तित्व तैत्तिरीय संहितेंत वापरलेला मंत्र ज्या कालांत रचला गेला असेल त्याच्या पूर्वी कित्येक शतकें जाऊन पडतें. तेथें पुरुषमेधांत मागधाचा बळी वर्णिला आहे. 'मागध' हें लोकवाचक नांव उत्पन्न व्हावयास 'मगध' देशाचें नांव बरेंच अधिक जुनें धरिलें पाहिजे. आणि मगध हें नांव पडण्याच्या अगोदर शेंकडों वर्षे मगांची वस्ती तेथें पाहिजे. कुरुयुद्धकालीन वैशंपायन व याज्ञवल्क्य यांनीं जुनाट म्हणून घेतलेला मंत्र ज्या कालांत रचला गेला असेल त्या कालीं 'मग' हे देशांत पूर्णपणें मुरले जाऊन देशास 'मगध' हें नांव पडून त्यावरून इतर तत्रस्थांस 'मागध' म्हणण्याचा काळ येऊन ठेपला होता. याशिवाय, आणखी एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे ती ही कीं पुरुषमेध ही संस्था केवळ प्राचीन आणि जवळ जवळ विस्मृत अशी त्याच वेळेस झाली होती आणि, ती देखील इतकी कीं तैत्तिरीयांस किंवा शुक्लांस तद्विषयक इतिकर्तव्यता ठाऊक नव्हत्या, यावरून मगांचें प्राचीनत्व यजुःप्राधान्य काळापूर्वी किती शतकें असावें बरें?

ऋग्वेदांत मगांचा उल्लेख एका मंत्रांत आला आहे आणि तो कीकट देशाशीं संबद्ध असाच आला आहे. तेथें या "मगंदाचें धन आम्हाला दे" अशी प्रार्थना इंद्रास केली आहे 'मगंद' याचा पुष्कळ द्राविडी प्राणायाम करून, 'व्याजखोर' असा अर्थ सायणाचार्य करतात आणि, तोच अर्थ गतानुगतिक पद्धतीनें शंकर पांडुरंगांनीं घेतला आहे. येथें मगंद याचा अर्थ स्पष्ट आहे. मगास पैसे देणारे म्हणजे त्यांचे अनुयायी ते 'मगंद' हा 'मगध' शब्द कीकट देशास लागण्याची पूर्वपीठिका समजावी.

मगांचें अस्तित्व त्या प्राचीन कालीं जर सिद्ध होत आहे, तर प्रश्न उपस्थित होतो तो हा कीं इंद्रानुयायी लोक कीकटांत अगोदर आले कीं मगंद अगोदर आले? सूक्तकार मगंदांचें त्या स्थानीं अस्तित्व गृहीत धरतो यावरून मंत्रसमुच्चयकर्त्यांचे पूर्वज देशांत अगोदर येऊन शकमगादि लोक नंतर आले असा सिद्धांत कसा बांधणार?

ज्या ऋग्वेदमंत्रांत भरतांचा केवळ प्रवेश दृष्टीस पडतो त्याच मंत्रांत मगंदांनें पूर्वीच अस्तित्व गृहीत धरलें गेलें आहे. त्यावरून असें दिसतें कीं श्रौतधर्माच्या मस्थापकाचे पूर्वज देशांत येण्यापूर्वीच 'मगंद' येथें येऊन बसले होते.

अत्यंत प्राचीन इतिहास तयार करावयाचा झाला तर तो निरनिराळ्या राष्ट्रजातांच्या संबंधाचे उल्लेख गोळा करून तयार केला पाहिजे, आणि त्यांच्या हालचाली नोंदल्या पाहिजेत. दाशराज्ञयुद्धाचें वर्णन करितांना या गोष्टींकडे लक्ष दिलें जाईल. प्रस्तुतचें विवेचन एवढेंच दाखवील कीं आर्य लोक तेच आर्यन् हें म्हणणें बरोबर नाहीं. आर्यन् महावंशाचा प्रथम प्रवेश ऋग्वेदांत वर्णिला आहे, आणि त्यांनीं काळ्या लोकांना जिंकलें हें म्हणण्यास आधार नाहीं.

**ऋग्मंत्रवाङ्मय हें सर्व भारतीय आर्यन् लोकांचें नसून कांहींशा उत्तर कालीं आलेल्या भारतीयांचें वाङ्मय आहे. आणि ब्राह्मणें हें वाङ्मय जुनें सूतवाङ्मय व नवें मांत्रवाङ्मय यांस जोडणारें आहे.**-हें विधान चांगलें लक्षांत ठेवून त्याचें स्पष्टीकरण ऐकावें.

श्रौतवाङ्मयांतर्गत मंत्र आणि ब्राह्मण यांचा किंवा मंत्र आणि इतिहासपुराणें यांचा परस्परसंबंध आम्हीं येणेंप्रमाणें व्यक्त करितों:
[illegible]

कालांतील होय जें मंत्रवाङ्मय तयार झालें त्यांतील बहुतेक दाशराज्ञ युद्धकालीं किंवा तदुत्तरकालीं आहे. दाशराज्ञ युद्धाच्या वेळेस उत्तर हिंदुस्थान बहुतेक आर्यन् महावंशातील परंतु मंत्रकालापूर्वी अनेक शतकें आलेल्या लोकांनीं वसला होता. हे वेदपूर्व आर्यन् कोणच्या काळांत आले, त्यांच्या वसाहती कशा झाल्या यांचा पत्ता प्राकृत भाषाशास्त्र अतिशय वाढल्यास कदाचित् लागल्यास लागेल पण आज तें अज्ञातच आहे, आणि त्याची माहिती देणारें वाङ्मय अस्तित्वांतच नाहीं. त्या लोकांची भाषा वेदभाषेहून फारशी भिन्न नसावी पण त्यांची संस्कृति मंत्रांत दिसणाऱ्या संस्कृतीपासून बरीचशी भिन्न झालेली असावी. त्यांच्या संस्कृतींत यज्ञसंस्था बरीचशी बुडालेलीच असावी. म्हणजे जी यज्ञसंस्था यजूंच्या पूर्वी ऋग्मंत्रांत केवळ प्राथमिक स्वरूपांत दृष्टीस पडते तिच्याहि पेक्षा अगोदरचें एखादें स्वरूप घेऊन ते लोक हिंदुस्थानांत आले असावे, आणि ती विकसित न होतां मृत झाली असावी. मंत्र आणणारे आर्यन् त्यांच्या संस्कृतीस आपण मंत्रसंस्कृति म्हणूं, आणि त्या वेळेस जे लोक देश्य होते परंतु आर्यन् होते त्यांच्या संस्कृतीस देश्य आर्यन् संस्कृति म्हणूं. या देश्य आर्यन् संस्कृतीचें वाङ्मय तत्कालीन स्वरूपांत आज जरी उपलब्ध नाहीं तरी तें कसें असावें याविषयींची थोडीशी कल्पना आपणास करतां येईल. त्यांच्यामध्यें इतिहासपुराणें उर्फ सूतवाङ्मय बरेंचसें वाढलेलें

* सूर्योपासना मगांनीं बऱ्याच उत्तर कालीं आणली या तऱ्हेची विधानें पाश्चात्यांनीं केली आहेत आणि तींच डॉ० भांडारकरांनीं गृहीत धरली आहेत. वेदांची ज्यास माहिती आहे आणि, अनेक दैवतांच्या सूक्तांशीं सूर्य आहे हे हजारों वर्षें वेदांचा अर्थ लावणारे आपल्या देशांत कंठरवानें सांगत असतांना तें विधान खोडण्याचा यत्किंचित् प्रयत्न न करितां सूर्योपासनेच्या प्रचारांचें श्रेय उत्तरकालीन कोणातरी आलेल्या लोकांस डॉ० भाण्डारकरांनीं कसें दिलें याचें आश्चर्य वाटतें. सूर्योपासना एकदम नवीन आली नसावी किंवा 'मग' हे देशांत इतके अगोदर उत्पन्न झाले असतांना कीं, वैदिक सम्हनांच्या घटनेंतच त्यांना अंश द्यावा असा निर्णय त्याभागीकरणेंच उत्पन्न होत नाहीं काय?

असावें. त्यांच्यामध्यें व्यापक विचारांचा म्हणजे जे विचार उत्तरकालीन ब्राह्मणांत किंवा आरण्यक व उपनिषदांतून दृष्टीस पडतात त्या प्रकारचे विचार त्यांत वाढले असावे आणि बौद्ध व जैन ग्रंथांतून ज्यांचा प्रारंभ वेदांत सांपडत नाहीं अशा ज्या अनेक गोष्टी दिसतात त्या देखील देश्य आर्यन् संस्कृतींत असाव्या. देश्य आर्यन् संस्कृतींत ब्राह्मणांची जात नसावी आणि जो अथर्वणांचा वर्ग त्यांच्यामध्येंच पूर्वकाळींच आला असेल तो वर्ग मंत्रसंस्कृतींतील अथर्वणांप्रमाणें फारसा विकसित न होतां निदान पूर्वेकडील लोकांत भाट, मागधारी यांसारख्या कनिष्ठ वर्गाच्या स्वरूपाचा झाला असावा किंवा सर्वसामान्य लोकांत मिसळून गेला असावा. देश्य आर्यन् समाज कदाचित् क्षत्रियप्रधान असलील.

देश्य आर्यन् संस्कृति म्हणून जी वर्णन केली ती मंत्रसंस्कृतीपासून अगदींच भिन्न झाली नसावी. भाषासादृश्याशिवाय देश्यसंस्कृति व मंत्रसंस्कृति यांत सारखेच शोभणारे कांहीं लोकसमुदायहि असतील. एकामागून एक अशीं अनेक आर्यन् लोकांचीं आगमनें आपण कल्पिलीं तर हें अत्यन्त स्वाभाविक आहे कीं अधिक उत्तरकालीन लोकांमध्यें मंत्रसंस्कृतीच्या सदृश अशी संस्कृति असावी.

या तार्किकपद्धतीप्रमाणें दोन भिन्न संस्कृति कल्पिण्यास प्रमाणें काय ?

(१) असें मानण्याचें पहिलें कारण हें की कथापुराणादि वाङ्मयांतून जो आपणांस इतिहास सांपडतो त्यांत पुष्कळ जुनी माहिती जतन करण्याचा यत्न उघड दिसत आहे, आणि हा सर्व इतिहास दाशराज्ञ युद्धाच्या बराच पूर्वींचा असला पाहिजे

(२) ऋग्वेदामध्येंच पुढें सरकणारीं राष्ट्रें अगोदरचा देश गुमारें यीग राष्ट्रांनी व्यापलेलाच असून त्यांतून कष्टानें मार्ग काढीत आहेत असें दाखविलें आहे.

(३) ब्राह्मणकालाच्या उद्गमापूर्वी देशभर जो आर्यन् लोकांचा विस्तार झाला तो त्या विस्तार पावलेल्या लोकांच्या संस्कृतीचें उत्तरकालीन म्हणजे ब्राह्मणसंस्कृतीपासून भिन्नत्व दर्शवितो

(४) वेदांमध्यें गार्हस्थ्य पूर्णपणें प्रथित झालेलें दिसतें आणि अर्वाचीन काळच्या गार्हस्थ्यापासून भिन्न प्रकारचें गार्हस्थ्य किंवा कौटुंबिकस्वरूप इतिहासपुराणांतून दृष्टीस पडतें.

(५) जैनामध्यें रामकथा आहे पण ती निराळी आहे. बौद्धांची रामकथा निराळी आहे. म्हणजे ही सर्व अर्वाचीन जुन्या कथेचीं पर्यवसानें होत.

(६) जैनांच्या संप्रदायाची एकंदर कल्पना अशी आहे की वर्धमान महावीरानें नवीन विचारसंप्रदाय स्थापन केला नसून पूर्वीच्याच विचारास वळण दिलें. त्याच्या अगोदरचा त्यांचा तीर्थंकर पार्श्वनाथ याचा भगवद्गीतेनें गौरवपर उल्लेख केला असल्यामुळें कदाचित् जैनमत हा एक जुना पण विशिष्ट पक्षांतर्गत नसून सर्वांनाच मान्य असा पुरा असावे यात आहे म्हणजे सर्वसामान्य वैदिकांनीहि एक्याने असाव्या अशा प्रकारचे वैदिकांची परंपरा आपण धरीत आहों आणि वास्तविक आहों असा जो जैनांची भावना आहे ती केवळ कल्पित नसावी. वैदिक लोकांच्या यज्ञसंस्थापूर्वी आणि त्यांचा यज्ञधर्म तयार होण्यापूर्वी भारतांत जी संस्कृति होती तिचे यज्ञधर्मानें अलिप्त असे जे लोक असतील ते जैन होत असें म्हणतां येणार नाहीं, पण त्यांची परंपरा वैदिक परंपरेइतकी किंबहुना तीहूनहि जुनी ठरण्याचा संभव आहे.

जैनांच्या ग्रंथांतील एकंदर अंगें पहातां असें दिसतें कीं कांहीं विचार औपनिषद विचारांशीं जुळतात. त्यांच्या दृष्टीनें रामकथा कृष्णकथा हा इतिहासच आहे. त्यांच्या संप्रदायांतील कांहीं भाग नकलेच्या स्वरूपाचा आहे. म्हणजे तुमच्याकडे एक नारायण तर आमच्याकडे सात नारायण, तुमच्याकडे एक सूर्य तर आमच्याकडे इतके जास्त सूर्य त्याच्या प्राधिक प्रयत्नांत कांहीं लोकांस जैन ठरविण्यासाठीं (उदाहरणार्थ कालिदासादि कवींस) झालेल्या खटपटींचा परिणाम दिसून येतो. परंतु विद्याधरांचा भाग असा दिसतो कीं जो जैनांत राहिला आणि ब्राह्मणी संस्कृतीच्या ग्रंथांत महत्त्व पावला नाहीं. या तऱ्हेचा भाग कांहीं तरी पूर्वकालीन परंपरा ब्राह्मणी ग्रंथांत घेतली व कांहीं घ्यावयाची राहिली असा तरी एक सिद्धांत काढावयास लावील किंवा ब्राह्मणीधर्मयुक्त समाजांतून फुटून बाहेर पडलेल्यांनीं विद्याधर वर्ग आपल्या डोक्यांतून निर्माण केला असें होईल. या तऱ्हेची कल्पना करण्यास विद्याधर वर्गांचा ब्राह्मणी ग्रंथांत पूर्ण अनुल्लेख पाहिजे पण तो तसा दिसत नाहीं.

**नव्याचें जुन्यावर आवरण घालण्याची पद्धति.**— मंत्र संस्कृतीचा देश्य आर्यन् संस्कृतीशीं जेव्हां प्रसंग आला त्या वेळीं अनेक क्रिया झालेल्या दिसतात.

मंत्रसंस्कृतींतील यज्ञसंस्था जेव्हां कमी कमी होऊं लागली तेव्हां सार्वजनिक वर्गण्यावर किंवा राजाश्रयावर मोठाले यज्ञ करणारा वर्ग तयार झाला आणि त्यामुळें त्रयी हें वाङ्मय तयार झालें आणि ऋत्विजांमध्यें विशिष्टीकरण होऊन अनेक वेदांचे ब्राह्मण ग्रंथ तयार झाले. हे बरेच पांडित्ययुक्त होते असें दिसतें. अगोदरच्या आर्यन् राष्ट्रांमधील क्रिया नाहींशा झाल्या तशी यांची स्थिति झाली नाहीं. यांनीं लोकांतील क्रिया नाहींशा होत आहेत असें पाहून आपल्या क्रिया पुष्कळ वाढविल्या. नवीन आलेले लोक क्रिया मोडीत होते आणि स्थानिक राष्ट्रांच्या क्रिया मुक्त्याव होत्या. स्थानिक राष्ट्रांना यज्ञसंस्थेंत सामील व्हावयाचें म्हणजे केवळ प्रेक्षकाचें काम करावयाचें, तथापि त्यांना आपल्याकडे ओढण्यासाठीं ऋत्विजांनीं आणखी एक क्रिया केली. स्थानिक लोकांचा इतिहास क्रियांच्या प्रर्शंसांत घुसडून दिला. पुष्कळ जुन्या यज्ञाचे उल्लेख म्हणून जे ब्राह्मण ग्रंथांत दिले आहेत ते पूर्वेकडील राजे लोकांच्या पूर्वजांसंबंधीं आहेत. उदाहरणार्थ हरिश्चंद्राचा संबंध शुनःशेपाच्या आख्यानाशीं जोडून दिला.

कांहीं तरी यज्ञक्रिया आपले पूर्वज करीत होते ही भावना देश्य आर्यन् राष्ट्रांत असावीच आणि अथर्वणानें देश्य वंशास क्रियाहीन झाले ही गोष्टहि त्यांस अवगत असावी आणि त्यामुळें आपल्याच वाडवडिलांचा धर्म सांगणारे हे अध्वर्युप्रधान ऋत्विज होत असा जाणीवहि देश्य आर्यन् लोकांस उत्पन्न करून

देण्यास मानसस्कृतीच्या ब्राह्मणांस अडचण पडली नसावी असे दिसतें.

धर्म या शब्दाचा अर्थ ऋग्वेदांत भिन्न आहे आणि महाभारतांत भिन्न आहे. धर्म याचा ऋग्वेदांत अर्थ क्रिया अगर कर्म असा आहे, तर महाभारतांत संरक्षणविषयक ज्ञान असा आहे. अशा अर्थभिन्नतेचें कारण एक तर मंत्रकालीनच अर्थभिन्नता असावी अगर मानसस्कृतीच्या अगोदरच्या संस्कृतींत धर्म शब्दाचा अर्थ भिन्न असावा.

सूतवाङ्मय ब्राह्मणांनी यज्ञसंस्थेचें महत्त्व कमी होऊन इतिहासपुराणें यांचें महत्त्व स्थापन झाल्यानंतर हातीं घेतलें असावें. ब्राह्मणांच्या हातांत तें आलें तेव्हां त्यावर परिणाम हा झाला कीं कर्माची महती या वाङ्मयांत शिरली.

पुराणोक्त देवते वैदिक दैवतांचें उत्तरकालीन पर्यवसान म्हणतां येत नाहींत. शिव आणि विष्णु यास जें अग्रस्थान दिसतें, तें दुसरी एखादी उपसंस्कृति अगर राष्ट्र प्रधान झालें असें दर्शवितें. वैदिक वाङ्मयाचें पौराणिक वाङ्मय जर पर्यवसान असतें तर इंद्र पौराणिक वाङ्मयांत खालच्या प्रतीचा एक देव म्हणून शिल्लक न रहातां त्याचें विष्णुस्वरूपांत अगर शिवस्वरूपांत पर्यवसान होतें तसें झालें मात्र नाहीं. यजुःकालीन प्रजापतीस देखील हलक्या प्रकारचें स्थान मिळालें. यज्ञसंस्थेचें आवरण ज्याप्रमाणें स्थानिक धर्मांवर टाकलें गेलें त्याप्रमाणें स्थानिक धर्म, इतिहास व पुराणें हीं यज्ञसंस्थेंत शिरलीं हें दाखविणारे उतारे अनेक आहेत. त्यांतील कांहीं येथें देतों.

अश्वमेध यज्ञांत होत्यानें यजमानास दहा दिवस प्रत्यहीं निरनिराळें आख्यान सांगावयाचें असतें. आणि ते दहा दिवस झाले म्हणजे तेंच पूर्वीचें प्रतिदिवशीं सांगितलेलें आख्यान पूर्ववत् पुन्हा दहा दिवस सांगावयाचें याप्रमाणें वर्षभर कार्यक्रम चालू ठेवावयाचा. याला 'पारिप्लवाख्यान' असें नांव आहे.

(१) प्रथम दिवशीं मनुर्वैवस्वत राजा व मनुष्य ही त्याची प्रजा, ती ही मानुषप्रजा येथें आहे, असे म्हणून होत्यानें मनुष्यांच्याकडे बोट दाखवावयाचें या दिवशीं ऋग्वेद हा वेद आहे तो हा, असें म्हणून ऋग्वेदांतील एक सूक्त पठण करावें

(२) दुसऱ्या दिवशीं यम वैवस्वत हा राजा व पितर ही त्याची प्रजा. ते हे पितर येथें आहेत, असे म्हणून वृद्धांचा निर्देश करावयाचा. आजचा वेद यजुर्वेद असून तो हा, असें म्हणून यजुर्वेदांतील अनुवाक पठण करणें.

(३) तिसऱ्या दिवशीं वरुण आदित्य हा राजा व गंधर्व ही त्याची प्रजा. ती ही प्रजा येथें आहे, असें म्हणून तरुणांच्याकडे बोट दाखविणें. आजचा वेद आथर्वण आहे व तो हा असें म्हणून अथर्व वेदांतील औषधिप्रतिपादक मंत्र पठण करावा

(४) चवथ्या दिवशीं सोमवैष्णव राजा व अप्सरस् ही त्याची प्रजा, व ती येथें आहे म्हणून सुंदर स्त्रियांचा निर्देश करणें. आजचा वेद आंगिरस वेद आहे व तो हा, असे म्हणून अभिचारप्रतिपादक मंत्र पठण करावे.

(५) पांचव्या दिवशीं अर्बुदकाद्रवेय राजा व सर्प ही त्याची प्रजा; आणि ती ही येथे आहे, म्हणून सर्पविद्या जाणणाऱ्यांचा निर्देश करणें. आजचा विषविद्या वेद आहे, असें म्हणून विषविद्येतील मंत्र पठण करावे.

(६) सहाव्या दिवशीं कुबेर वैश्रवण राजा व राक्षस ही त्याची प्रजा; आणि ती ही येथे आहे म्हणून पापाचरण करणाऱ्यांचा निर्देश करावा. आजचा पिशाचवेद आहे व तो हा, असे म्हणून पिशाचसंबंधीं मंत्र पठण करावे.

(७) सातव्या दिवशीं असुरधान्वन् राजा व असुर ही त्याची प्रजा, आणि ती ही येथें आहे म्हणून वार्धुषिक अथवा व्याजखोर लोकांचा निर्देश करावा. आजचा असुरविद्या वेद व तो हा असें म्हणून असुरमाया प्रकार करून दाखविणें.

(८) आठव्या दिवशीं मत्स्य सामद राजा व जलचर त्याची प्रजा व ती ही आहे, असें म्हणून कोळ्यांचा (जातींचा) निर्देश करावा. आजचा पुराणविद्या हा वेद व तो हा, असें म्हणून पुराण पठण करावें.

(९) नवव्या दिवशीं तार्क्ष्य वैपश्यित् राजा व पक्षी ही त्याची प्रजा, आणि ती ही येथे आहे म्हणून पक्षी आणि नैष्ठिक ब्रह्मचारी यांचा निर्देश करावा. आजचा वेद इतिहास व तो हा, असें म्हणून इतिहासपठण करावें.

(१०) दहाव्या दिवशीं धर्म इंद्र राजा व देव ही त्याची प्रजा आणि ती येथें आहे म्हणून प्रतिग्रह न करणाऱ्या विद्वान् व तरुण ब्राह्मणाचा निर्देश करावा. आजचा सामवेद व तो हा असें म्हणून सामगायन करावें.

वरीलप्रमाणेच आणखी शांखायन श्रौतसूत्र अध्याय १६ खंड २ व शतपथ ब्राह्मण १३. ३. १, १ येथें हि उल्लेख आढळतो.

मैत्रायणीय संहितेंत उत्तरकालीन महादेव, गणपति इत्यादि देवतांचा उल्लेख पुढें दिलेल्याप्रमाणें आढळतो.

(१) देवानांच ऋषीणांचासुराणांच पूर्वजं ।
महादेवं सहस्राक्षं शिवमावाहयाम्यहं ॥

(२) तत्पुरुषाय विद्महे महादेवायधीमहि ।
तन्नो रुद्रःप्रचोदयात्

(३) तद् गांगौच्याय विद्महे गिरिसुतायधीमहि ।
तन्नो गौरी प्रचोदयात् ।

(४) तद् कुमाराय विद्महे कार्तिकेयाय धीमहि ।
तन्नः स्कंदः प्रचोदयात् ।

(५) तद् कराटाय विद्महे हस्तिमुखाय धीमहि ।
तन्नो दंतीप्रचोदयात् ।

(६) तद् चतुर्मुखाय विद्महे पद्मासनाय धीमहि ।
तन्नो ब्रह्मा प्रचोदयात् ।

(७) तद् केशवाय विद्महे नारायणाय धीमहि ।
तन्नो विष्णुः प्रचोदयात् ।
(८) तद् भास्कराय विद्महे प्रभाकराय धीमहि ।
तन्नो भानुः प्रचोदयात् ।
(९) तत् सोमराजाय विद्महे महाराजाय धीमहि ।
तन्नश्चंद्रः प्रचोदयात् ।
(१०) तद् ज्वलनाय विद्महे वैश्वानराय धीमहि ।
तन्नो वन्हिः प्रचोदयात् ।
(११) तत्पजपाय विद्महे महाजपाय धीमहि ।
तन्नो ध्यानः प्रचोदयात् ।
(१२) तद् परमात्माय विद्महे वैनतेयाय धीमहि ।
तन्नः सृष्टीः प्रचोदयात् ।
(मै स. २.९, १)

अशाच प्रकारचे आणखी उल्लेख तैत्तिरीय आरण्यक प्रपाठक १० अनुवाक १ व परिशिष्ट अनुवाक १ मध्यें आहेत.

मागें झालेल्या विवेचनाचें आता सिंहावलोकन करूं.

आर्यन् आणि आर्य या कल्पना भिन्न आहेत. आर्य हा शब्द वंशवाचक नाहीं. हा दोन अर्थांनीं वापरला आहे; एक अर्थ सद्गुणी आणि दुसरा अर्थ यजनशील.

'दस्यु' ही शिवी जुनी आहे. कां कीं, अवेस्तांत ती रूपांतरानें सांपडते. कांहीं दस्यू चपट्या नाकाचे असतील* पण चपट्या नाकाच्या लोकांस दस्यू म्हणत असत असें मात्र नाहीं. 'चपट्या नाकाचा' हें वर्णन द्राविडांनां तर लागू पडतच नाहीं. कारण द्राविडांमध्यें चपट्या नाकाचे लोक कमी. ते बंगालकडे म्हणजे मंगोलियन वंशांतले असणार. तेव्हां, ज्या काळ्या द्राविडी लोकांनां गोऱ्या आर्यन् लोकांनीं जिंकलें त्यांस ते प्रथम दस्यू व मग पुढें दास म्हणत ही कल्पना निराधार आहे.

आर्य आणि दास असें शत्रुसमुदायाचें वर्णन स्तोता पुष्कळदां करतांना आढळतो, म्हणजे दोन लढणाऱ्या पक्षांपैकीं एक आपल्या विरुद्ध असलेल्या पक्षांत स्वर्गीय आणि स्वाचे अंकित असलेले असे दोन प्रकारचे लोक आहेत ही जाणीव दाखवितो.

आर्यन् लोकांची व्याप्ति फार व चोहोंकडे होती. ती होतांना एका मोठ्या आर्यन् सम्राटानें येऊन सर्व हिंदुस्थान काबीज केला, आणि जमीन जिंकून ती आर्यन् लोकांस दिली आणि त्या लोकांची हिस्सेवार वसाहत चोहोंकडे पसरविली अशी धारणा व खोटी कल्पना केल्यानेंच एका बाजूनें आर्यन् आणि दुसऱ्या बाजूनें देशांतील काळे लोक लढत होते आणि देश्यांस गोऱ्यांनीं जिंकलें असें इतिहासाचें स्पष्टीकरण प्राप्त होणार नाहीं. जर क्रमाक्रमानें आर्यन् लोकांचीं आगमनें होत असतील तर नवीन येणारांनी प्रथम जुन्या आर्यन् लोकांशीच गांठ पडणार. या तऱ्हेनेंच क्रिया झाली असून त्या क्रियेचा एक उत्तरकालीन अंश वेदोल्लिखित दाशराज्ञ युद्ध होय. आणि बहुतेक मंत्ररचना त्यानंतरची होय.

**ऋग्वेदमंत्र व दाशराज्ञ युद्ध यांचा संबंध. आर्यन् आणि नॉनआर्यन् यांमध्यें हें युद्ध नव्हतें.**—ऋग्वेदांत ज्या लढाया दिसत आहेत त्यांपैकीं बहुतेक दाशराज्ञ युद्ध या युद्धांतर्गत किंवा त्यांशीं संबद्ध दिसतात. हें युद्ध आर्य आणि अनार्य यांत खास नव्हतें.

यदुतुर्वश यांचे व पैजवनाचे आचारधर्म सारखे दिसतात. खुद्द ऋग्मंत्रांत आलेलीं राष्ट्रें पाहिलीं असतां आपणांस बहुतेक पंजाबांतीलच राष्ट्रें दिसतात. आणि धर्मभिन्नत्वाचे प्रकार फारच थोडे दिसतात. जे कांहीं दिसतात ते येणेंप्रमाणें:

(१) यजनशील व अयजनशील.

(२) वचनानें निंदा केलेले उपासनासंप्रदाय (शिश्नदेवांसारखे).

(३) मगंद.

(४) अग्न्युपासकांचेच आचारभिन्नत्वामुळे नवग्व दशग्वा सारखे किंवा निरनिराळ्या गोत्रासारखे संप्रदाय.

यापलीकडे आपणास धर्मभिन्नत्वाचा प्रकार दिसत नाहीं; आणि दाशराज्ञयुद्ध हें तर केवळ यजनशील व अयजनशील यांच्या मधलें मुळींच नाहीं.

*ऋग्वेदसंहितेमध्यें जीं सूक्तें घातलीं आहेत त्या सूक्तांच्या* पौर्वापर्यकालासंबंधानें आतां थोडासा विचार करूं. आणि दाशराज्ञ युद्धाशीं ऋग्वेद वाङ्मयाचा संबंध कितपत पोंचतो हें पाहूं.

यांत आपणांस जी एक गोष्ट पहावयाची ती ही कीं, ऋग्वेदांतील बहुतेक भाग एका विशिष्ट कालाचें वाङ्मय आहे, कीं अनेक कालांचें वाङ्मय आहे.

असें दिसतें कीं, ऋग्वेद संहितेंतील बहुतेक व्यक्तिविषयक ऐतिहासिक उल्लेख एकच काल दर्शवितात, तथापि सर्वच सूक्तें ऐतिहासिक उल्लेखांनीं भरलीं नाहींत. कित्येक सूक्तें केवळ स्तावक आणि याचक आहेत. कित्येक देववर्णनात्मक असून त्यांचे पराक्रम गात आहेत. जे मनुष्यांचे उल्लेख मंत्रांत सांपडतात ते दाशराज्ञ युद्धाशीं बहुतेक जोडून घेतां येतात.

*मंत्रांतर्गत पूर्वापरता.*—*ऋग्वेदांत संहितेचे* घटक येणेंप्रमाणें:

(१) दाशराज्ञ युद्धाशीं संबंध असलेल्या व्यक्तींचा व त्या व्यक्तींशीं संबंध असलेल्या इतर व्यक्तींचा उल्लेख करणारीं सूक्तें.

---

* असास याचा अर्थ चपट्या नाकाचा असा न करतां अनुनासिकयुक्त उच्चार न करणारा असाहि करितात. हिंदुस्थानांत बऱ्याच शब्दांचा उच्चार कांहीं जाती सानुनासिक करतात, तर कांहीं निरनुनासिक करतात. या दृष्टीनें भारतीय भाषाशास्त्राचें व मानववंशशास्त्राचें संयुक्त अध्ययन व्हावयास पाहिजे.

ही सूक्तें सर्व गोत्रमंडळांत आहेत, आणि पहिल्या व दहाव्या मंडळांत देखील आहेत. ही गोत्रमंडळें दाशराज्ञ युद्धानंतर प्रवेश झालेल्या लोकांचे व त्या काळच्या पुरोहितांचें जुनें वाङ्मय होय. ते पुरोहित भारतीयांचे किंवा पंजाबांतील जुन्या राष्ट्रांचे असावेत.

(२) आठवें आणि नववें या मंडळांत सामवेदात येणाऱ्या बहुतेक ऋचा आहेत. ज्या वेळेस औद्गात्राचा समावेश यज्ञांत झाला त्या वेळेस होत्यांनीं आपल्यावरोबर सामगांस घेतलें त्यामुळें हें वाङ्मय दोन वेदांत शिरलें.

म्हणजे गोत्रवाङ्मय सोमयागप्रयोजनप्रसंगीं गोत्रावाहेरील सर्व सामान्य ऋचांशीं संयुक्त होऊन संहितास्वरूप पावलें. तें संयुक्त होण्याचे कारण तें सर्वसामान्य वाङ्मय असून उद्गात्यांनीं त्यास महत्त्व दिलें हें असावें.

पहिल्या व दहाव्या मंडळांतील बहुतेक ऋचा अर्वाचीन आहेत पण त्यांत प्राचीन कथाभाग कांहीं असीं आला आहे. पहिल्या भागांतहि कांहीं सूक्तें दाशराज्ञ युद्धाची आठवण देणारीं आहेत. आणि दहावें मंडळ अथर्व्यांशीं समेट ज्या काळात झाला आणि अथर्वण विद्येचा समावेश ज्या काळांत ऋग्वेद्यांनीं करून घेतला त्या काळाचें आहे.

म्हणने ऋग्वेदांतील गोत्रमंडळांचा प्रतिपाद्य विषय दाशराज्ञ युद्ध होय, असें म्हणण्यास हरकत नाहीं. ऋग्वेदांत दाशराज्ञ युद्धाचे धागे कसे काय पसरले आहेत हें समजण्यासाठीं ऋग्वेदोक्त व्यक्तींचा दाशराज्ञ युद्धाशीं संबंध देतो.

**दाशराज्ञ युद्धांतील उल्लेखांचा अन्योन्याश्रय —** ऋग्वेदांत अनेक व्यक्तींचीं व कुलांचीं नावें येत आहेत, त्यांपैकीं सुदास, त्याचे मित्र व शत्रू यांशीं दुसऱ्या अनेक नावांचा संबंध येतो. अशा संबद्ध व्यक्तींचा आतां हिशेब घेऊ.

युद्धांत पडलेल्या व्यक्ती अगर राष्ट्रें म्हटलीं म्हणजे (१) शिम्यु, (२) तुर्वश, (३) द्रुह्यु, (४) पुरु, (५) अनु, (६) यदु, (७) मत्स्य, (८) पक्थ, (९) भलानस, (१०) अलिन, (११) विषाणिन्, (१२) अज, (१३) शिव, (१४) शिग्रु, (१५) यक्षु, (१६) भरत-तृत्सु, (१७) पृथु, (१८) पर्शु, (१९) दोन वैकर्ण, (२०) गुंगु (२१) भेद इत्यादि होत. या राष्ट्रांचा संबंध त्यांच्या पुरोहितांशीं येतो, पुरोहितांचा संबंध त्यांच्या कुलाशीं येतो, आणि पुरोहितकुलाचा संबंध त्यांच्या इतर यजमानांशीं येतो. निरनिराळ्या व्यक्तींचे आणि राष्ट्रांचे संबंध कसे काय पसरले आहेत तें पुढें दाखविलें आहे.†

**(१) शिम्यु** — नहुष (शिम्यूशीं संबंध), नहुषसंबंध-नाहुष, मशेशार (नहुषांचा राजा) व नहुष्य ययाति. कांहीं ऋचांवरून 'मनो' पुत्री 'इळा' आणि 'नहुष' यांचा संबंध व्यक्त होतो.

**(२) तुर्वश** —वृचीवत-वराशिख-पार्थव (तुर्वशांचा आणि या तिघांचा अतिनिकट संबंध आहे. कदाचित् तुर्वश आणि हे एकच असतील), यांचा जेता अभ्यावर्तिन् चायमान वचिन् (वृचीवताशीं संबंध), दभिति, वृद्धरथ, नर्य, एतश (तुर्वशसहोल्लिखित) दभितिसंबंध —चुमुरि-धुनि (दभितीकरितां इंद्रानें मारलेले दोन राक्षस) अर्ण, चित्ररथ (याचा तुर्वशानें वध केला असें कांहींचें म्हणणें आहे) निचि (ही जात तुर्वशांच्या मिश्रणानें झाली) व उग्रदेव (तुर्वशासम बलवान्).

**(३) द्रुह्यु** — भृगु (द्रुह्यूंचे उपाध्याय), इट (भृगुपुत्र), गृत्समद, भृगवाण (भृगुवंशज) गृत्समदसंबंध -शुनहोत्र (गृत्समदवंशज), नार्मर (गृत्समदोल्लिखित), च्यवन (भृगु आङ्गिरस), च्यवतान मारुताश्व (च्यवनाशीं संबंध), जुजुराप (च्यवनसंबंधी— शंतनूच्या कथेशीं साम्य), शर्यात (भृगु आङ्गिरस), शार्यात (शर्यातवंशज), पुरुहन्मन्, वृहद्गिरि व नाभाक (आङ्गिरस).

**(४) कवष**-कुरुङ्ग (कवषाशीं संबंध)

**(५) पुरु**—पुरुकुत्स (पुरूंचा राजा), पुरुकुत्सानी (पुरुकुत्साची बायको), दुर्गह (पुरुकुत्साचा बाप), इक्ष्वाकु (पुरुकुत्साचें कुल), त्रसदस्यु (पुरुकुत्सपुत्र), हिरणिन् किंवा हिरणि (पुरुकुत्सपुत्र), पौरुकुत्स पौरुकुत्स्य-पौरुकुत्सी (त्रसदस्यूचीं पैतृक नावें), गैरिक्षित (त्रसदस्यूचें पैतृक नाव), कुरुश्रवण त्रासदस्यव (त्रसदस्युपुत्र), मित्रातिथि (कुरुश्रवणपितृवर्गीतील), तृक्षि त्रासदस्यव (त्रसदस्युवंशज), उपमश्रवस् (कुरुश्रवणत्रासदस्यवपुत्र), त्र्यरुण-त्रैवृष्ण त्रसदस्यु (पर्यायनामें), वृश (त्र्यरुणाचा उपाध्याय) अश्वमेध (त्र्यरुण-त्रैवृष्ण-त्रसदस्यूशीं अनिश्चित संबंध), आश्वमेध, पूतक्रतु (अश्वमेधाशीं अनिश्चितसंबंध), रथवीति दार्भ्य, पुरूरवस्, पुरुमीळ्ह (पुरुवंशज), वैददश्वि (पुरुमीळ्हाचें पैतृक नांव), तरंत (पुरुमीळ्हबंधु), दार्भ्य (पुरुमीळ्हाशीं संबंध असलेल्या अत्रीच्या नातवाला मुलगी देणारा).

कुरु-(कुरुश्रवण हा नांवावरून कुरुवंशातील असावा), कौरव, देवापि आर्ष्टिषेण, शंतनु, कुरुंगन्, ऋष्टिषेण, औलान, कैव्य (कुरुवंशज), ओगण (देवापि शन्तनु सहोच्चारित), आर्ष्टिषेण, शाड (पुरुवंशज), पुरुमित्र (पुरुवंशज किंवा पुरूंचा मित्र), कमद्यु (बहुतेक पुरुमित्राची मुलगी), शुन्ध्यु (कमद्यूचें दुसरें नांव), विमद (कमद्यूचा नवरा) धन्य (त्रसदस्युसहोच्चारित), पृश्निगु शुचंति (पुरुकुत्ससहोच्चारित).

**(६) अनु**—आनव (अनुवंशज), पारस्थामन् कौरयायण (अनुवंशज), कौरयाण (अनुवंशज).

**(७) भेद**—सुदासशत्रु. याच्याशीं संबंध असलेल्या दुसऱ्या कोणी व्यक्ती आढळून येत नाहींत.

**(८) शबर**—कौलितर (शबराचें पैतृक नांव), वङ्गृद (शबरसहोच्चारित)

† जेथें संबंध किंवा अनिश्चित संबंध असें म्हटलें आहे तेथें सहोच्चारित किंवा सहनिर्देश असा अर्थ समजावा.

**( ९ ) वैकर्ण ( १० ) विकर्ण**—याच्या संबंधानें फारशी माहिती मिळत नाहीं.

**( ११ ) यदु.**—प्रथिन्, तिरिंदर, आसमान्स्यायोगी, पर्शव्या ( यदुवंशज ), तिरिंदरसंबंध – पर्शु (तिरिंदर आणि पर्शु एकच, मनूशींहि कदाचित् संबंध असेल )

**( १२ ) मत्स्य.**—इतर फारशी माहिती मिळत नाहीं

**( १३ ) पक्थ.**—बभ्रु ( सहोच्चारित ), नमुचि (सहोच्चारित), बभ्रुसंबंध–ऋणंचय ( बभ्रूचा यजमान )

**(१४) भलानस्, (१५) आलिन, ( १६ ) विषाणिन्, ( १७ ) अज, ( १८ ) शिव, ( १९ ) शिग्रु, ( २० ) यक्षु.**—हे सर्व सुदासशत्रू याचा संबंध दाशराज्ञ युद्धांतील व्यक्तींशिवाय इतर कोणाशीं फारसा दिसून येत नाहीं

**सुदास.**– वसिष्ठ, विश्वामित्र (सुदासाचे उपाध्याय), वसिष्ठसंबंध –अगस्ति, अगस्त्य (वसिष्ठ बंधु), शतयातु (कदाचित् वसिष्ठ पुत्र) न्रुत्थ, शिश्नदेव, पराशर, वामदेव (वसिष्ठाशीं संबंध), अगस्त्य संबंध — मान ( अगस्त्याचा पिता ), मान्य ( मानपुत्र ), मान्दार्य मान्य ( कदाचित् मानवंशज ), खेल ( अगस्त्याचा यजमान ), विश्पला ( खेलाची बायको ), तृणस्कंद ( अगस्त्याशीं अनिश्चित संबंधी ), वामदेवसंबंध–बृहदुक्थ, आजमीळ्ह (वामदेव पुत्र ).

विश्वामित्रसंबंध — जान्हव ( विश्वामित्राचें पैतृकनाव ), गाथिन् ( विश्वामित्राचा बाप ), कुशिक ( विश्वामित्राचा कुलपुरुष ), मधुच्छंदस्, शुनःशेप, गाथिन (विश्वामित्रपुत्र), शुनःशेपसंबंध –– अयास्य आंगिरस् ( शुनःशेपाच्या वधविषयक यज्ञांत उद्गात्याचें काम करणारा ), जमदग्नि ( विश्वामित्राचा मित्र ), गयःप्लात ( जमदग्नीशीं अनिश्चित संबंध ), प्रमगंद ( विश्वामित्रोल्लिखित ).

कण्व–यदुतुर्वशांचे पुरोहित. अंगिरस् ( कण्वाचा आजा ). कण्वसंबंध –– काण्व, प्रस्कण्व, प्रगाथ, पर्वत, नृषद्संबंध– नार्षद ( नृषत्पुत्र ), दशशिप्र, उपस्तुत, वृष्टिहव्य (उपस्तुतचा पिता ), कृष्ण ( उपस्तुत सहोच्चारित ), मेधातिथि, विभिंदु, सोभरि, सुदेव, सवर्त, श्रुतकक्ष, दिनार, शरभ, प्रियमेध, नीपातिथि, वैयश्व, पृषध्र, श्रुष्टिगु, तिरश्ची, कौरयाण, दस्यवे वृक, नार्य, पार्षद्वाण, मातरिश्वन्, शर शौरदेव्य, श्रुतर्वन् आर्क्ष, नृमेधस् शकपूत (नृमेधपुत्र), शीस्त, गोशर्य, तुग्र, दशव्रज, अंशु, स्यूमरश्मि, गृर्विद, एतशु, विश्वमनस्, पृदाकुसानु, पाक्स्थामन्, नकार, त्रिशोक ( हे सर्व कण्वकुलोत्पन्न असावेत ), तिरिंदिर ( कण्वांचा आश्रयदाता )

आंगिरस्संबंध –गोतम, द्युम्निक्, अवत्सार, स्वर, विरूप, कृश, हिरण्यस्तूप, अर्चन् ( हिरण्यस्तूपपुत्र ), सप्तगु ( हे आंगिरस असावेत ), श्यावाश्वसंबंध–पुरुमील्ह, वैददश्वि, तरन्त, ध्वन्य ( श्यावाश्वाला दान देणारे ), अर्चनानस् ( श्यावाश्वपिता ), सुमित्र, पृषध्र, श्रुतरथ, श्यावक, कृप ( श्यावकसहोच्चारित ), अध्रिगु, कलि, ( हे सर्व कण्वोल्लिखित आहेत )

पाकस्थामन्वायस, वीतहव्य वैरात, चेदि (सुदाससमकालीन), चेदीसंबंध –कशु, युध्यामधि, यादु, देवक, मान्यमान, चायमान (सुदासचे शत्रू ), चायमानसंबंध–वरशिख ( कदाचित् चायमानाचा शत्रु ), तृत्सु ( सुदासाशीं प्रजा नात्यानें असणाऱ्या लोकांचें घराणें ), प्रतृद ( तृत्सूचें दुसरें नाव), पृथु ( सुदास सहायक ),

सुदासवंशज–इंद्रोत ( सुदासपुत्र ), आतिथिग्व ( इंद्रोताचें पैतृक नाव ), पुरुमाय्य ( कदाचित् सुदासपुत्र ), ऋक्ष ( इन्द्रोतसहोच्चारित ).

भरत (सुदास, तृत्सु, विश्वामित्र वगैरेंचें कुल) दीर्घतमस्, मामतेय ( भरतांचा उपाध्याय ), कक्षीवान् ( दीर्घतमस्पुत्र ), पज्र ( कक्षीवानाचें घराणें ), ममता ( दीर्घतमसूची आई ), मामतेय ( दीर्घतमसूचें मातृक नाव ), त्रैतन ( दीर्घतमसूचा शत्रु ).

कक्षीवानसंबंध —औशिज (कक्षीवानाचें मातृक नाव), वृचया ( कक्षीवानाची बायको ), घोषा ( कक्षीवानाची मुलगी ), स्वनय, भावयव्य, भाव्य ( कक्षीवानाचे पुरस्कर्ते ), प्रियरथ, श्रुतरथ ( कक्षीवानाचे आश्रयदाते ), भावयव्यसंबंध — रोमशा ( भावयव्याची बायको ), औशिजसंबंध — ऋजिश्वन् ( औशिज ), वैदथिन् ( ऋजिश्वन्‌चें पैतृक नाव ), पिप्रु ( ऋजिश्वन्‌करिता पराभव केलेला ), आयवस ( याच्या तीन मुलांनीं कक्षीवानास पीडा केली ), मशर्शार ( याच्या तीन मुलांनीं कक्षीवानास पीडा केली ), ऋणंचय ( कक्षीवानसहोल्लिखित ), ऋणंचयसंबंध – मेना ( वृषणश्वदुहिता ), बाध्य, शार, आर्चत्क, दीर्घश्रवस्, मुज्यु, तौग्र्य, रथप्रोष्ठ, पृथुश्रवस्, कानीत, वश, तरुक्ष, विष्णापु, (कक्षीवानोल्लिखित) विष्णापुसंबंध –विश्वक ( विष्णापूचा मुलगा), वध्रिमती, पुरंधि, हिरण्यहस्त श्याव, द्योतन, शयु, पेदु, ( कक्षीवानोल्लिखित ), गन्धारि ( कक्षीवानाशीं अनिश्चितसंबंध ), तन्वान, ( कक्षीवानवंशज ), अत्रि ( कक्षीवान्, कण्व, आणि गोतम यांच्याशीं अनिश्चितसंबंध), ( पुरूचे पुरोहित ) अत्रिसंबंध–अर्चनानस ( अत्रिपुत्र ), पुरुवसु, पुरुरु, गोपवन, सप्त्रि, मायिन्, विश्ववार, सुनीथ, सत्यश्रवस्, शौचद्रथ, आत्रेयीश्यावाश्व, सदापृण, सत्यश्रवस् वाय्य, गविष्टिर आत्रेय, यजत, अवत्सार, मनस्, क्षत्र ( अत्रिवंशज )

भरतसंबंध.–देवश्रवस्, देववात, जन्हु ( भरतकुलोत्पन्न )

दिवोदास अतिथिग्व ( सुदासपिता, काहीं लोकांच्या मताने ( सुदासपूर्वज ) भरद्वाज ( दिवोदासपुरोहित ), पायु राजि, सुमिळ्ह, साप्य, पेरु, पुरणीयशातवनेय ( भरद्वाजकुलोत्पन्न ) पारावत, बृबु, बृसय, प्रस्तोक ( भरद्वाजाशीं अनिश्चितसंबंध ), तुजि, तर्य, पुरय, श्रुतवित्, राम, दशद्यु, वेन, मायव ( भरद्वाजोल्लिखित ), बृसयसंबंध– पार्थ्य, आस्रवस्व ( वेनाशीं अनिश्चितसंबंध ), भरद्वाजसंबंध–बृबु तक्ष्ण ( भरद्वाजाचा आश्रयदाता )

दिवोदाससंबंध.–प्रस्तोक, सार्जय ( दिवोदासाचीं दुसरीं नांवें ); सृंजय ( दिवोदासाशीं निकट संबंध ); श्वैत्र ( सृंजयाशीं संबंध ), ऋंगु ( अतिथिग्वमित्र ) तूर्वयाण ( अतिथिग्वशत्रु ). आयु, कुत्स, श्वैत्रेय ( कुत्सपुत्र ), उशनस् काव्य, आर्जुनेय, श्रुतर्य ( अतिथिग्व-सहोच्चारित ).

वध्र्यश्व, देववत्, पिजवन ( सुदासाचे पूर्वज ), पैजवन, देववात, दैवोदासि ( सुदासाचीं पैतृकनांवें ), सहदेव ( सुदासाचा साहाय्यक ).

सहदेवसंबंध.– भयमान, ऋज्राश्व, अम्बरीष ( सहदेव बंधु ), अम्बरीषसंबंध.– सुराधस्, ( अम्बरीषसहोच्चारित ), सोमक साहदेव्य ( सहदेवपुत्र ); नारद ( सहदेवगुरु ), वध्र्यश्वसंबंध.– सुमित्र, वाध्र्यश्व.

वर उल्लेख केलेल्या व्यक्तींपैकीं सुदासाशीं समकालीन व्यक्ती कोणत्या आणि सुदासानंतरच्या व्यक्ती कोणत्या हें समजणे शक्य आहे.

दाशराज्ञ युद्धांत कोणत्या व्यक्तींचा संबंध आला याचें ज्ञान उपयोगाचें आहे. त्या व्यक्तींशीं आणखी कोणाचा संबंध आला हें कळलें म्हणजे दाशराज्ञ युद्धाशीं समकालीन अशा व्यक्तींची यादी मिळेल.

जीं सूक्तें या व्यक्तींचा निर्देश करीत असतील तीं युद्धाशीं फार तर समकालीन, पण बहुतकरून युद्धोत्तरकालीन होत. या दृष्टीनें युद्धोत्तर वाङ्मय आपणास काढतां येतें.

पुढील कोष्टकावरून असें करून येईल कीं, बहुतेक ऋग्वेद दाशराज्ञ युद्धानंतरचा होय असें सिद्ध करता येते.

पुराणांतील राजांच्या पिढ्यांची यादी तपासली असतां, आपणास असें दिसेल कीं, सुदास हा भारतीं युद्धाच्या कित्येक पिढ्या अगोदर आणि दाशरथी रामाच्या नंतर झाला होता. म्हणजे वैदिक वाङ्मय अधिकच श्रीरामचंद्रानंतरचें होय.

**सूक्तांची युद्धोत्तरता आणि ती जाणण्यासाठीं उपयोगीं पडणाऱ्या व्यक्ती.**—ऋग्वेदमंत्रांचा दाशराज्ञ युद्धाशीं संबंध जाणण्यासाठीं ज्या ज्या व्यक्तींच्या उल्लेखाच्या साहाय्यानें तो संबंध आपण तपासणार त्या व्यक्तींकडे लक्ष दिलें पाहिजे. व्यक्तींचा दाशराज्ञ युद्धाशीं संबंध दिसून आला म्हणजे त्या व्यक्तीचा, ज्या सूक्तांत त्यांचा उल्लेख आला आहे त्या सूक्तांचें दाशराज्ञ युद्धाशीं पूर्वापरत्व काढण्याच्या कामीं उपयोग होईल. हा व्यक्ती, त्यांची दाशराज्ञ युद्धाशीं पूर्वोत्तरता, आणि त्यावरून सूक्तांच्या पूर्वोत्तरतेवर पडणारा प्रकाश येणेंप्रमाणे आहे.

अंशु—( ८. ५, २६ ) तुग्र, प्रियमेध, उपस्तुत, शिंजार यांच्यासह उल्लेख. काल अनिश्चित तथापि अंशुचा उल्लेख सूक्तकाल निश्चयास अनवश्य तुग्राच्या उल्लेखामुळें सूक्त उत्तरकालीन. तुग्र पहा.

अक्षः—( ८.४६, २७ ). सायणमताप्रमाणें व्यक्ती. नहुषसमकालीन. पृथुश्रवस् याच्या दानस्तुतींत उल्लेख. नहुषसमकालीन असल्यामुळें सुदासोत्तर. अक्षाबरोबर अश्वाचा उल्लेख आहे.

अगस्त्यः—( ७. ३३, १० ). वसिष्ठ आणि अगस्त्य मित्रावरुणाचे मुलगे. वसिष्ठाचा सुदासाशीं पौरोहित्यसंबंध. तेव्हां अगस्त्याचा उल्लेख असलेलीं ( १. ११७, १७०; १७९; १८०; १८४; ७. ३३; ८. ५; १०. ६० ). सूक्तें उत्तरकालीनच.

अग्रु—( ४. ३०, १६ ). कुमारीपुत्र. सूक्तांत यदुतुर्वशाचा उल्लेख असल्यामुळें सूक्त उत्तरकालीन. व्यक्तींचा प्रत्यक्ष संबंध नाहीं.

अघाश्व—( १. ११६, ६ ) हा पेद्व होता. पेदुसंबंध पहा. दिवोदासाच्या उल्लेखामुळें सूक्त उत्तरकालीन.

अजास—( ७ १८, १९ ). सुदासशत्रु. दाशराज्ञ युद्धांत शरण आल्यावर यांनीं इंद्राला अश्वशिराचा बलि अर्पण केला. सूक्त उत्तरकालीन.

अतिथिग्व—दिवोदासाचे नांव. याचा उल्लेख असलेलीं ( १. ५१; ५३; ११२; १३०; २. १४; ४. २६; ६. १८; २६;४७; ७. १९, ८. ५३; १०. ४८ ) सूक्तें उत्तर.

अत्क—( १०. ४९, ५ ). अत्क व कुत्स यांचें इंद्रानें रक्षण केलें, अत्क कुत्ससमकालीन असावा. सायण अत्क ही व्यक्ति मानीत नाहीं. कुत्सोल्लेखामुळे सूक्त उत्तर.

अत्रि—( ५. ८६, १ ). प्रियमेध, कण्व, गोतम, कक्षीवान यांच्यासह उल्लेख. पाचवें मंडल आत्रेय असून त्यांतील सूक्तद्रष्टे अत्रिकुलोत्पन्न आहेत. प्रत्यक्ष अत्रीच्या नावावर असलेल्या सूक्तात ( ५. ८६ ) तो त्रिताचा उल्लेख करतो. त्रित पहा. अत्रीचा उल्लेख असणारीं सूक्तें ( १. ४५; ११८; १३९; १८३; ५. ४१; ८. ५; १० १४३, १५० ) उत्तरकालीन.

अध्रिगु—( १. ११२, २ ) भुज्युसह उल्लेख अश्वींनीं भुज्यूचें व अध्रिगूचें रक्षण केलें अध्रिगु भुज्युसमकालीन असावा. भुज्यु पहा. अध्रिगूचा आणखी उल्लेख दशग्वासह ( ८. १२, २ ) या सूक्तात आहे.

अनु—( ७. १८, १४ ). सुदासशत्रु. इंद्रानें सुदासाकरितां अनु, द्रुह्यु यांचा वध केला. अनूचा आणखी उल्लेख असलेलें सूक्त ( ८. १० ) उत्तर.

अपाला–( ८. ९१, ७ ) अनुक्रमणीप्रमाणें अत्रिकन्या. अत्रि पहा.

अप्नवान–( ८. १०२, ४ ), और्व भृगूसह उल्लेख. सूक्तद्रष्टा प्रयोग ह्मणतो, ' और्वभृगु, अप्नवान यांप्रमाणे मीं अग्नीला बोलावतो. ' अप्नवान भृगुसमकालीन असावा. भृगु पहा. अप्नवान याचा आणखी उल्लेख ( ४. ७, १ ) या ठिकाणीं आहे.

अभ्यावर्ती चायमान—( ६ २७, ८ ) पृथूचा राजा. याला पार्थव म्हटलें आहे. पृथु हे सुदासशत्रू होते. अभ्यावर्ती चायमान दाशराज्ञ युद्धांत मारला गेला ( ७, १८, ८ ).

अंबरीष --(१ १००, १७) वृषागिरपुत्र ऋज्राश्व, सहदेव, भयमान व सुराधस् हे वृषागिरपुत्र होते ऋज्राश्व व वार्षागिर पहा

अयास्य —(१० १३८, ४) कुत्स, ऋजिश्वन् याचा उल्लेख असलेल्या सूक्तात उल्लेख अयास्याचा आणखी उल्लेख (१ ६२, ८ ६२, ९. ४४, १० ६७, १० ८) या सूक्तांत आहे परंतु तो व्यक्तिवाचक नाहीं याचा उल्लेख जुन्या मडळातून येत नसल्यामुळे हा फारच उत्तरकालीन असावा

अरट्व --(८ ४५, २७) अक्षावरोवर उल्लेख अक्ष पहा

अर्चनानस् --(५ ६४, ७) अनुक्रमणीप्रमाण अत्रि पुत्र; व रथवीति दार्भ्य याचा पुरोहित दार्भ्य पहा.

अर्जुनः—(१ १२२, ५) कुत्स पिता कुत्साला आर्जुनेय म्हटले आहे अर्जुनाचा उल्लेख कुत्सामार्फतच आला आहे सूक्त उत्तरकालीन

अर्ण —(४ १९, ६) इंद्राने तुर्वशाकरितां सरयू नदीवर अर्णाचा पराभव केला सूक्त उत्तरकालीन.

अलिनास --(७. १८, ७) सुदासशत्रु सूक्त सुदासी लेरामुळें उत्तरकालीन

अवत्सार --(५ ४४, १०) क्षत्र, मनस्, एवावद, यजत राधि, अवत्सार यांचा एकत्र उल्लेख कदाचित् समकालीन असावे सूक्ताचा द्रष्टा अवत्सारच असून तो ऋचा १२ मध्यें सदापृण, बाहुवृक्त, श्रुतवित्, तर्य यांचा उल्लेख करतो, व ऋचा १३ मध्यें सुतंभराला आपला यागनिर्वाहक समजतो यावरून सुतंभरहि याचा समकालीन असावा. सुतंभरसबंध पहा सूक्त उत्तरकालीन

अवस्यु -(५. ३१, १०) 'सव स्तोत्यांनीं इंद्राचा स्तुति करावी' असें अवस्यु इच्छितो या सूक्ताचा द्रष्टा अवस्यु आहे ८ व्या ऋचेंत 'इंद्रानें यदुतुर्वशांना तारून नेले व कुत्साला रक्षिलें' असा उल्लेख करतो अवस्यूचा आणखी उल्लेख (५.७५) या सूक्तांत आहे दोन्ही सूक्तें उत्तरकालीन

अश्वथ-(६ ४७, २४) पायूचा आश्रयदाता अश्वथ प्रस्तोकाचेंच नांव प्रस्तोक पहा सूक्त उत्तरकालीन

अश्वमेध-(५. २७, ४५६) त्र्यरुण दानस्तुतीत उल्लेख अनुक्रमणीप्रमाणें भरतपुत्र अश्वमेध, त्रसदस्यु, त्र्यरुण, त्रैवृष्ण, ही एकाच व्यक्तीचा नांवें असावी सूक्त उत्तरकालीन

अश्व्य -(८ २४, २५) कुत्सांचें रक्षण करण्याविषयीं अश्व्य इंद्राला प्रार्थितो अनुक्रमणीप्रमाणें अश्व्य, वैयश्व, विश्वमनस् हीं एकाच व्यक्तीचीं नांवें आहेत अश्व्याचा आणखी उल्लेख (१ ११२) या सूक्तांत आहे दोन्ही सूक्तें उत्तरकालीन

असमाति -(१० ६०, २) हा इक्ष्वाकु कुलांतील असावा याच सूक्तांत इक्ष्वाकूचा उल्लेख आहे सूक्तांत त्याचा पाठ्यांत कुत्सानी ल बधु, सुबधु, विप्रबधु व श्रुतबधु हे असून अनुक्रमणीप्रमाणें ते अगस्त्याचे भाचे होत याच सूक्ताच्या ६ व्या ऋचेंत सूक्तद्रष्टा '*आम्हांस धन देण्यासाठीं तू रथाला घोडे जोडून ये*' अशी राजाची प्रार्थना करतो अगस्त्यसबधामुळें सूक्त उत्तरकालीन

अहवाय्य -(८ ४५, २७) यदुतुर्वशशत्रु इंद्रानें यदुतुर्वशाकरिता अहवाय्यास मारिलें

आजमीळ्हास -(४ ४४, ६) येथें उल्लेख असून अजमीळ्ह व पुरुमीळ्ह हे या सूक्ताचे द्रष्टे आहेत पुरुमीळ्ह पुरुराज असावा पुरुमीळ्ह पहा सूक्तद्रष्टा पुरुमीळ्ह असल्यामुळे सूक्त उत्तरकालीन

आतिथिग्व -अतिथिग्ववशज याचा उल्लेख असलेलें सूक्त (८ ६८) उत्तर

आयवस -(१ १२२, १५). नहुषाचा राजा मशर्शार याच्यासह उल्लेख सूक्तद्रष्टा कक्षीवान म्हणतो, 'मशर्शार आणि आयवस यांचे मुलगे मला त्रास देतात' सूक्तद्रष्टा कक्षीवान असल्यामुळें सूक्त उत्तरकालीन

आयु -(१ ५३, १०). इंद्रानें सुश्रवस नामक राजाकरितां कुत्स, अतिथिग्व, आयु याचा पराभव केला आयूचा आणखी उल्लेख असलेलीं सूक्तें (६ १८ ८ ५३) उत्तरकालीन

आर्चत्क -(१ ११६, २२) याचे नाव शर. अश्वी देवांनीं याला पाण्यातून वर काढिलें प्रत्यक्ष सबंध नाहीं सूक्तद्रष्टा कक्षीवान सूक्त उत्तरकालीन

आर्ष्टिषेण -(१० ९८, ६) ऋष्टिषेणपुत्र देवापि व शंतनु याचे पैतृक नाव देवापि व शंतनु हे भरत कुलांतील असावे देवापि पहा

आश्वघ्न —(१० ६१ २१) सायणमताप्रमाणें नाभानेदिष्ठाचेंच नांव या सूक्ताचा द्रष्टा नाभानेदिष्ठ असून सूक्ताच्या १५ व्या ऋचेंत तो कक्षीवानाचा उल्लेख करतो तेव्हां आश्वघ्न, नाभानेदिष्ठ कक्षीवानसमकालीन असावा

आश्वमेध —(८ ६८, १६) आतिथिग्व, इंद्रोत यांच्या सह एकाच दानस्तुतीत उल्लेख प्रियमेधाचा आश्रयदाता सूक्त उत्तरकालीन

आसंगप्लायोगि —(८ १, ३१) मेधातिथीचा आश्रयदाता याच सूक्ताच्या ३१ व्या ऋचेंत याला 'याद्व पशुः म्ह॰ यदूंतील श्रेष्ठ असें म्हटले आहे *यावरून हा यदूचा राजा असावा* सूक्त उत्तरकालीन

आस्त्रबुध्न —(१०. १७१, ३) इंद्रानें आस्त्रबुध्नाकरितां वेन्याला (वेनाला) मोरडें केलें पृथु हा वेनाचा मुलगा पृथुसबंध पहा वेन्याच्या उल्लेखामुळे सूक्त उत्तर

इक्ष्वाकु —(१० ६० ४) इक्ष्वाकु भरतकुलांतील होता असमाति पहा सूक्त उत्तर

इलिबिशः—( १. ३३, १२ ). एक असुर. प्रत्यक्ष संबंध नाहीं. कुत्सोल्लेखामुळें सूक्त उत्तर.

इटः—( १०. १७१, १ ). अनुक्रमणीप्रमाणें भृगुपुत्र या सूक्ताचा हाच द्रष्टा असून ३ऱ्या ऋचेंत आत्रबुध्न, वेन्य, यांचा उल्लेख करतो. यावरून वेन्यसमकालीन असावा. वेन्योल्लेखामुळें सूक्त उत्तर.

इंद्रोतः—( ८. ६८, १७ ). अतिथिग्ववंशज. सूक्त उत्तर.

उक्षण्यायनः—(८. २५, २२). विश्वमनस्चा आश्रयदाता. विश्वमनस् पहा. सूक्त उत्तर.

उग्रदेवः—( १. ३६, १८ ). दूर असलेल्या यदु, तुर्वश व उग्रदेव यांना अग्नीसह बोलावतों असें सूक्तद्रष्टा कण्व म्हणतो. यदुतुर्वशोल्लेखामुळें सूक्त उत्तर.

उपमश्रवसः—( १०. ३३, ७ ). कुरुश्रवणपुत्र. याच सूक्तांत याला त्रासदस्यव असेंहि म्हटलें आहे. यावरून हा त्रसदस्युवंशज असावा. सूक्तांत पर्शूचा उल्लेख असल्यामुळें सूक्त उत्तर.

उरणः—( २. १४, ४ ). इंद्रशत्रु. एक असुर. अतिथिग्वाच्या उल्लेखामुळें सूक्त उत्तर.

उरुःकक्षः—( ६. ४५, ३१ ). गांग्य लोकांचा राजा. ( 'गांग्यांचा जसा उरुःकक्ष मुख्य होता तसा बृबु पणींचा मुख्य झाला ). यदूंच्या उल्लेखामुळें सूक्त उत्तर.

उशना-काव्यः—( ५. २९, ९ ). उशनस्काव्य याच्या स्तुतीनें इंद्र कुत्साच्या घरीं आला. उशनस् कुत्साचा पुरोहित असावा. उशनस्चा आणखी उल्लेख असलेलीं सूक्तें ( १. ५१; ८३; १२१; १३०; ४. १६; २६; ५. २९; ३१; ३४; ६. २०; ८. ७; २३; ९. ८७; ९७; १०. २२; ४० ). उत्तरकालीन.

उशिजः—( १. १२१, ५ ). सायणांनीं या ठिकाणीं उशिज हें नाम मानिलें नाहीं. परंतु कक्षीवानाला व ऋजिश्वन्‌ला औशिज म्हटलें आहे. कदाचित् हा उशिज, कक्षीवान व ऋजिश्वा यांचा पिता असावा.

उशीनराणीः–( १०. ५९, १० ). उशीनराची स्त्री. प्रत्यक्ष संबंध नाहीं. अगस्त्य, इक्ष्वाकु यांच्या उल्लेखामुळें सूक्त उत्तर.

ऊर्जव्यः–( ५. ४१, २० ). प्रत्यक्ष संबंध नाहीं. कण्वोल्लेखामुळें सूक्त उत्तर.

ऋक्षसूनु-आर्क्षः–( ८. ६८, १५ ). प्रियमेधाचा आश्रयदाता. आतिथिग्व-इंद्रोत व आर्क्ष-ऋक्षसूनु यांजकडून दान मिळाल्याचें प्रियमेध उल्लेखितो. आर्क्षाचा आणखी उल्लेख ( ८. ७४ ) या सूक्तांत आहे. सूक्त उत्तर.

ऋजिश्वनः–( ६. २०, ७ ). विदथिनपुत्र. ऋजिश्वन् याला वैदथिन् असें म्हटलें आहे. ऋजिश्व्याला 'औशिज ऋजिश्वा' असें म्हटलें आहे. व कक्षीवानालाहि औशिज म्हटले आहे. तेव्हां औशिज ऋजिश्वा व वैदथिन-ऋजिश्वन् हे एकच असावे असें वाटतें; व त्याप्रमाणें ऋजिश्वन् व कक्षीवान हे भाऊ होतात. इंद्रानें ऋजिश्व्याकरितां पिप्रूस मारिलें. ऋजिश्वन्‌चा आणखी उल्लेख असलेलीं सूक्तें ( १.५३;१०१;४. १६; ५.२९; ८. ४९; १०. ९९; १३८. ) उत्तर.

ऋजूनसः–( ८. ५२, २ ). प्रत्यक्ष संबंध नाहीं. आयूच्या उल्लेखामुळें सूक्त उत्तर.

ऋज्राश्वः–( १. १००, १७ ). वृषागिरपुत्र. अंबरीष, सहदेव, भयमान, सुराधस् यांच्या सह उल्लेख. ऋज्राश्व 'नहुषांच्या प्रजेसह युद्धास येणारा' असें इंद्राला म्हणतो. ऋज्राश्व नहुषसंबंधी असावा. नहुष व मशर्शार पहा. सूक्त उत्तर. आणखी उल्लेख ( १. ११६; ११७ ).

ऋणंचयः–( ५. ३०, १२ ). रुम, रुशम यांचा राजा. कण्व रुमरुशमांचे पुरोहित होते. कण्वांनीं रुमरुशमांकडून इंद्राला बोलाविलें ( ८. ४, २ ). कण्व पहा. सूक्त उत्तर. आणखी उल्लेख ( १. ११६; ११७ ).

ऋतस्तुभः–( १. ११२, २० ). भुज्यु व ऋतस्तुभ यांचें इंद्रानें रक्षण केलें. भुज्यु व ऋतस्तुभ समकालीन असावे. भुज्यूच्या उल्लेखामुळें सूक्त उत्तर.

एकद्यूः–( ८. ८०, १० ). अनुक्रमणीप्रमाणें नोधसपुत्र. नोधससंबंध पहा. नोधससंबंधामुळें एकद्यूचा उल्लेख असलेलें सूक्त उत्तर.

एतशः–( ८. १, ११ ). इंद्रानें कुत्सासह एतशाचें रक्षण केलें. कुत्ससंबंध पहा. एतशाचा आणखी उल्लेख असलेलीं सूक्तें ( १. ५४; ६१; १२१; १६८; २. १९; ४. १७; ३१; ५. २९; ३१; ६. १५; ८. १; ५० ). उत्तरकालीन.

एवावदः–( ५. ४४, १० ). अवत्सारसहोल्लिखित. अवत्सार पहा. पञ्चांच्या उल्लेखामुळें सूक्त उत्तर.

ओगणासः–( १०. ८९, १५ ). अनुक्रमणीप्रमाणें विश्वामित्रपुत्र रेणु यांच्या सूक्तांत उल्लेख. रेणु म्हणतो, 'मला त्रास दणारे ओगण अंधारांत जावोत.' ओगण विश्वामित्रपुत्रसमकालीन असावे. सूक्त उत्तर.

औचथ्यः—( १. १५८, १; ४ ). उचथ्यपुत्र; दीर्घतमस्चें दुसरें नांव. त्याच सूक्तांत ( १५८, ६ ) मामतेयाचा उल्लेख आहे. मामतेयाबरोबर ( ८.९, १० ) मध्यें कक्षीवान्, व्यश्व पृथी, वैन्य यांचा उल्लेख येतो. कक्षीवान्, व्यश्व दीर्घतमस् व वैन्य-पृथी यांनीं अश्वींची स्तुति केली, यावरून ते समकालीन असावे.

औणवाभः—( २. ११, १८ ). याशिवाय याचा उल्लेख ( ८. ३२; ७७ ) या स्थळीं असून शेवटच्या स्थळीं कण्वकुलोत्पन्न कुरुसुति याच्या सूक्तांत उल्लेख आहे. प्रत्यक्ष संबंध नाहीं.

और्वः—( ८. १०२, ४ ). उरूंचा वंशज. याचा भृगु, अप्नवान, त्यांच्या सह आणि सुदासशत्रू द्रुह्यु व भृगु ( ७. १८, ६ ) यांच्या सह उल्लेख येतो. और्वभृगु हें भृगूचें नांव असावें. भृगुसंबंध पहा. और्वभृगु तुर्वशसंबंधी असावे.

औलानः—( १०. ९८, ११ ). हें शंतनूचें नांव होतें असें मॅकडोनलचें मत आहे. शंतनु भरत होता व त्याचा आर्ष्टिषेण-देवापीबरोबर ( १०. ९८, १; ३; ७ ) उल्लेख आहे.

औशिजः—( १. १८, १ ). ऋजिश्वन्चें दुसरें नांव असून कक्षीवान् यालाहि उपर्युक्त स्थलीं तेंच नांव दिलें आहे. कक्षीवानाचा आश्रयदाता भाव्य हा असून त्याचा कक्षीवानासह ( १. १२६ ) उल्लेख आहे. भाव्य ( भावयव्य ) हा भरत होता; व कक्षीवानाच्या ( १. ११९ ) सूक्तांत दिवोदासाचा उल्लेख आहे. औशिजाचा उल्लेख असलेलीं सूक्तें ( १. १८; ११९; १२२; ४. २१; ५. ४१; ६. ४; १०. ९९ ) उत्तरकालीन.

ककुहः—( ८. ६, ४८ ). याचा यादवांबरोबर उल्लेख आहे. सूक्त उत्तरकालीन. ककुहानें जिंकिलेले यादव ( लोक ) स्तोत्यास दिले, हा यादवांचा शत्रु असावा.

कक्षीवान्ः—( १. १८, १ ). याच्या सूक्तांत दिवोदासाचा उल्लेख येतो यावरून हा दिवोदासोत्तरकालीन ठरतो. याचा उल्लेख असलेलीं सूक्तें ( १. ५१; ११२; ११६; ११७; १२६; ४. २६; ८. ९; ९. ७४; १०. २५; ६१; १४३ ). कक्षीवान् यास दुसरें नांव ऋजिश्वन् असें होतें. याला औशिज असेंहि म्हटलें आहे. औशिज पहा. कक्षीवान् १. ११६ ते १२६ या सूक्तांचा द्रष्टा आहे.

कण्वः—कण्वाचा व्यक्तिवाचक नांवापेक्षां कुलवाचक नांव म्हणून अधिक उल्लेख येतो. यदुतुर्वश व कण्व यांचा एकत्र उल्लेख अनेक स्थळीं येतो. कण्व यदुतुर्वशांचे पुरोहित असावे. कारण 'यदु व तुर्वश हे तुझ्या प्रसादानें सुखी असलेले मीं पहावे' असी कण्वकुलोत्पन्न देवातिथि इंद्राची प्रार्थना करतो. यावरून कण्वाचा उल्लेख असलेलीं सूक्तें ( १. १४; ३६; ३७; ३९; ४४; ४५; ४६; ४७; ४८; ४९; ११२; ११७; १३९; ८. २; ३; ४; ५; ६; ७; ८; ९; ३२; ३३; ३४; ४९; १०. ३१; १५० ) व ज्या सूक्तांचे कण्व द्रष्टे आहेत अशीं ( १. ३६ ते ४३ ) सूक्तें उत्तरकालीन.

कद्रुवाः—( ८. ४५, २६ ). यदुतुर्वशांचा उल्लेख असलेल्या सूक्तांत उल्लेख आहे. प्रत्यक्ष संबंध नाहीं. यदुतुर्वशोल्लेखामुळें सूक्त उत्तर.

कमद्यूः—( १०. ६५, १२ ). भुज्यूबरोबर एकाच ऋचेंत उल्लेख. कमद्यू ही विमदाची बायको होती. अश्विदेवांनीं भुज्यूचें रक्षण केलें व विमदास कमद्यू दिली. भुज्यूचा उल्लेख असल्यामुळें सूक्त उत्तरकालीन, प्रत्यक्ष संबंध नाहीं.

करंजः—( १. ५३, ८ ). असुरः इंद्रशत्रु; यदु, तुर्वश, कुत्स, आयु, यांच्या उल्लेख असलेल्या सूक्तांत उल्लेख असल्यामुळें सूक्त उत्तर. प्रत्यक्ष संबंध नाहीं.'

कर्कंधुः—( १. ११२, ६ ) या उत्तरकालीन सूक्तांत उल्लेख येतो. प्रत्यक्ष कोणाशीं संबंध नाहीं. सूक्त उत्तर.

कलिः—( १. ११२, १५ ). उत्तरकालीन सूक्तांत अश्विदेवांनी रक्षण केल्याचा उल्लेख प्रत्यक्ष संबंध नाहीं.

कवषः—अनु द्रुह्यु यांचा सहचर. श्रुत, कवष, वृद्ध, अनु, द्रुह्यु यांनां इंद्रानें पाण्यांत बुडविलें. ( ७. १८, १२ ) या उत्तरकालीन सूक्तांत उल्लेख.

कविः—उशनस् याच्या बापाचें नांव, उशनस् पहा.

कशुः—( ८. ५, ३७ ). अगस्त्य याचा उल्लेख असलेल्या सूक्तांत उल्लेख. चेदीचा पुत्र. कण्वकुलातील ब्रह्मातिथि ( सूक्तद्रष्टा ) कशूनें दान दिल्याचें वर्णितो. कण्व पहा.

कशोजुः—( १. ११२, १४ ). दिवोदासाचें विशेषण. सदरहू सूक्त उत्तरकालीन आहे.

कश्यपः—( ९. ११३, ११४ ). या सूक्तांचा द्रष्टा व ( ९. ११४, २ ) यांत उल्लेख. प्रत्यक्ष संबंध नाहीं.

कानीतः—( ८. ४६, २४ ). याचेंच नांव पृथुश्रवस्. याचा उल्लेख, नहुषाचा उल्लेख असलेल्या उत्तरकालीन सूक्तांत आहे. कानीत हा अश्व्य याचा आश्रयदाता. अश्व्य पहा.

काव्यः— उशनस्चें नांव. उशना पहा.

कीकटः—( ३. ५३, १४ ). सुदासानें विश्वामित्रासह कीकट देशावर स्वारी केली. सुदासाचा उल्लेख असल्यामुळें सूक्त उत्तरकालीन.

कुणारुः—( ३. ३०, ८ ). विश्वामित्राच्या सूक्तांत उल्लेख आहे. प्रत्यक्ष उल्लेख नाहीं. सूक्तद्रष्टा विश्वामित्र असल्यामुळें सूक्त उत्तर.

कुत्सः—अतिथिग्व, कुत्स व आयु यांचा तूर्वयाणान पराभव केला म्हणून कुत्साचा उल्लेख असलेलीं ( १. ३३; ५१; ५३; ६३; १०६; ११२; १२१; १७४; १७५; २. १४; १९; ४. १६; २६; ३०; ५. २९; ३१; ६. १८; २०; २६; ३१; ७. १९; २५; ८. १; २४; ५३; १०. २९; ३८; ४०; ४९; ९९; १३८ ) सूक्तें व ज्या सूक्तांचा कुत्स द्रष्टा आहे तीं ( १. ९४ ते ९८; १०१ ते १०४; १०६ ते ११५ ) व ९. ९७ या सूक्तांतील ऋचा उत्तरकालीन.

कुयवः—( २. १९, ६ ). कुत्साकरितां इंद्रानें कुयवाला मारिलें. कुत्साबरोबर उल्लेख असल्यामुळें कुयवाचा उल्लेख करणारीं सूक्तें ( १. १०३; १०४; २. १९; ४. १६; ६. ३१; ७. १९ ) उत्तर.

कुरुंगः—( ८. ४, १९ ). तुर्वशावरोबर उल्लेख झाला आहे. सूक्तद्रष्टा देवातिथि म्हणतो, ' सर्व तुर्वशांमध्यें श्रेष्ठ असें दान कुरुंगानें मला दिलें. यावरून कुरुंग हा तुर्वशांचा राजा असावा. सूक्त उत्तर.

कुरुश्रवणः—( १०. ३३, ४ ). त्र      चा मुलगा. याच्याच पौरुत्सि ( ५. ३३, ८ ), पौरुत्सि ( ७. १९, ३ ), पौरु-

कुत्स ( ८. १९, ३६ ) असें म्हटलें आहे. सुदास ( १. ६३, ७ ) व दिवोदास ( १. १३०, ७ ) हे पुरुकुलांतील होते. व पुरुकुत्स ह्याहि पुरुकुलांतील होता. कुरुश्रवणाचा आणखी उल्लेख ( १०. ३२, ९ ) मध्यें आहे. पुरुकुत्स व त्रसदस्यु पहा.

कुशिकः—सुदासपुरोहित विश्वामित्र याच्या पित्याचें व कुलाचें नांव. कुशिकाचा उल्लेख असलेलीं सूक्तें ( ३. २६; २९; ३०; ३३; ४२; ५३ ) उत्तरकालीन.

कृपः—( ८. ४, २ ). सायणमतानें एक राजा. इंद्रानें रुम रुशम, श्यावक व कृप यांचें रक्षण केलें. रुम रुशम पहा. सूक्त उत्तर.

कृशियः—( १. ११६, २३; ११७, ७ ) या कक्षीवानाच्या सूक्तांत उल्लेख. प्रत्यक्ष संबंध नाहीं.

कौरयाणः—( ८. ३, २१ ). कुरयाणपुत्र. याचेंच नाव पाकस्थामन्. मेधातिथि ( काण्व ) याचा आश्रयदाता. रुम रुशा-मांच्या उल्लेखामुळें सूक्त उत्तर.

कौलितरः—( ४. ३०, १४ ). शंबराचें दुसरें नाव. शंबर सुदासशत्रु होता. शंबरोल्लेखामुळें सूक्त उत्तर.

क्रिविः—( ८. २२, १२ ). प्रत्यक्ष संबंध नाहीं. क्रिवीचा आणखी उल्लेख ( ८. २०; ५१; ८७; ९. ९ ) येथे आहे. पक्थोल्लेखामुळे सूक्त उत्तर.

क्षत्रश्रीः—( ६. २६, ८ ). प्रातर्दनीचें दुसरें नांव. भरद्वाजाचा आश्रयदाता. या सूक्ताचा द्रष्टा भरद्वाज क्षत्रश्रीपासून धन मिळाल्याचें उल्लेखितो. प्रातर्दनि प्रतृदवंशज असावा. प्रतृद तृत्सु होते. सुदासोल्लेखामुळें सूक्त उत्तर.

खेलः—( १. ११६, १५ ). वसिष्ठबंधु अगस्त्य याचा आश्रयदाता. दिवोदासोल्लेखामुळें सूक्त उत्तरकालीन.

गयप्लातः—( १०. ६३, १७ ). प्लतिपुत्र. या सूक्ताचा हा द्रष्टा असून 'नहुषपुत्र ययाति याच्या यज्ञाला जाणारे देव मला धन देवोत' असा सूक्तांत उल्लेख करतो. यावरून गयप्लात हा नहुषसमकालीन असावा. नहुषांचा पराभव करून इंद्रानें यदुतुर्वशांना मदत केली ( १०. ४९, ८ ). गयाचा आणखी उल्लेख ( १०. ६४ ) या सूक्तांत आहे.

गविष्ठिरः—( १०. १५०, ५ ) या सूक्ताचा द्रष्टा मृळीक म्हणतो, 'भरद्वाज, अत्रि, त्रसदस्यु, गविष्ठिर यांसह अग्नि माझें रक्षण करो.' यावरून गविष्ठिर त्रसदस्युसमकालीन असावा. गविष्ठिराचा आणखी उल्लेख असलेलें ( ५. १ ) सूक्त उत्तरकालीन.

गांग्यः—( ६. ४५, ३१ ). उरुकक्ष याचेंच नांव. उरुकक्ष पहा.

गुंगु—( १०. ४८, ८ ). एका जातीच्या लोकांचें नांव. अतिथिग्वशत्रु. इंद्रानें या लोकांपासून अतिथिग्वाचें रक्षण केले व पर्णय आणि करंज यांना मारिलें. पर्णय व करंज हे गुंगूंचे राजे असावे. सूक्त उत्तरकालीन.

गृत्समदः—( २. १९, ८ ). याने केलेल्या इंद्रस्तुतींत दिवोदासाचा उल्लेख आहे. दुसऱ्या मंडलास गार्त्समदमंडल असें म्हणतात. त्या मंडलांतील सूक्तांचे द्रष्टे गृत्समदकुलांतील होते. प्रत्यक्ष गृत्समदाचा उल्लेख ( २. ४; १९; ३९; ४१ ) या सूक्तांत आहे.

गैरिक्षितः—( ५. ३३; ८ ). त्रसदस्यूचे पैतृकनाम. सूक्त उत्तरकालीन.

गोतमः—( ४. ४, ११ ). गोतम द्रष्टा असलेल्या सूक्तांत तो उशनस् याचा उल्लेख करतो ( १. ८३ ). उशनस् कुत्सपुरोहित होता. गोतमाचा उल्लेख असलेलीं ( १. ६०–६३; ७७–७९; ८५;८८; ९२; ११६; १८३;४. ४;३२; ८. ८८ ) सूक्तें व तो द्रष्टा असलेलीं सूक्तें ( १. ७४–९३ ) उत्तरकालीन.

गोपवनः—( ८. ७४, ११ ). आर्क्ष–श्रुतर्वन् यापासून दान घेणारा. आर्क्ष–ऋक्षपुत्र व आतिथिग्व इंद्रोत हे आपल्याला दान देत असल्याचें प्रियमेध उल्लेखितो ( ८. ६८, १५ ). सूक्त उत्तर.

गोशर्यः—( ८. ४९, १० ). 'पक्थ, कण्व, त्रसदस्यु व गोशर्य यांचे रक्षण केलें त्याप्रमाणेंच माझें रक्षण कर' असें सूक्तद्रष्टा प्रियमेध म्हणतो. यावरून गोशर्य हा कण्व, पक्थ, त्रसदस्यु यांचा समकालीन असावा. गोशर्याचा आणखी उल्लेख असलेलीं सूक्तें ( ८. ८; ५० ) उत्तरकालीन.

गौरिवीतिः—( ५. २९, ११ ). अनुक्रमणीप्रमाणें वसिष्ठ किंवा शाक्ति याचा मुलगा. या सूक्ताचा द्रष्टा हाच असून तो 'वैदथिन् याचें रक्षण करून त्याचा सोम प्राशन केलास' असें इंद्राला म्हणतो. वैदथिन्समकालीन असावा. सूक्त उत्तरकालीन.

घोषः—( १. १२०, ५ ) सर्वानुक्रमणीप्रमाणें कक्षीवानपुत्री घोषा हिचा मुलगा. याचा पत्रिय कक्षीवानाचा उल्लेख असलेल्या सूक्तांत उल्लेख येतो. कक्षीवान् पहा.

घोषा—( १. ११७ ). कक्षीवान्कन्या ( सर्वानुक्रमणीप्रमाणें ). कक्षीवान्, पेदु, वगैरेंचा उल्लेख असणाऱ्या सूक्तांत उल्लेख आहे. कक्षीवान् पहा.

चायमानः—( ६. २७, ८ ). याचेंच नांव अभ्यावर्तिन्. अभ्यावर्तिन् पहा. आणखी उल्लेख ( ७. १८ ).

चित्रः—( ८. २१, १८ ). सर्वानुक्रमणीप्रमाणें ( ८. १९; २२ ) या सूक्ताचा द्रष्टा असलेल्या सोभरीच्या ऋचेंत उल्लेख. सोभरीचा आश्रयदाता. सोभरीच्या सूक्तांत पक्थ, त्रसदस्यु, कुत्स इत्यादि अनेक व्यक्तींचा उल्लेख असल्यामुळें उत्तरकालीन. सोभरि पहा.

चित्ररथः—( ४. ३०, १८ ). तुर्वशशत्रु. तुर्वशाकरितां इंद्रानें याचा सरयूनदीवर पराभव केला. सूक्त उत्तरकालीन.

चुमुरिः-( ७. १९, १४ ). इंद्रानें दभीतीकरितां धुनि आणि चुमुरि यांना मारल्याचा उल्लेख आहे व दभीतीबरोबर तुर्वीतीचें रक्षण केल्याचा उल्लेख ( १. ११२, २३ ) आहे. तुर्वीति हा लुडविगमतानें यदुतुर्वशांचा राजा होता. यावरून चुमुरीचा उल्लेख असणारीं सूक्तें ( २. १५; ६. १८; २०; २६; ७. १९; १०. ११३ ) उत्तरकालीन.

चैद्यः-( ८. ५, ३७ ). कशूचें पैतृक नांव. कशु पहा.

च्यवन-च्यवानः-( १०. ६१, १ ). अश्वींचा उपासक व पक्थांचा राजा तूर्वयाण याचा विरोधी. याचा आणखी ( १. ११६; ११७; ११८; ५. ७५; ७. ६८; ७१; १०. ५९; ६१ ) या ठिकाणीं उल्लेख असल्यामुळें सूक्तें उत्तरकालीन.

च्यवतानः-( ५. ३३, ९ ). च्यवतान, धन्य, मारुताश्व, पुरुकुत्स हे संवरणाचे आश्रयदाते होते. एकाच व्यक्तीचे आश्रयदाते असल्यामुळें ते पुरुकुत्ससमकालीन असावे. सूक्त उत्तरकालीन.

जमदग्निः—( ३. ५३, १५). याने विश्वामित्राला 'ससर्परी' नामक वाणी दिली. जमदग्नीचा उल्लेख असलेलीं सूक्तें ( ३. ६२; ७. ९६; ८. १०१; ९. ६२; ६५; ९७; १०. १६७ ) उत्तरकालीन. शिवाय ( ९. ६५; ६७; १०. ११० ) हीं जमदग्निदृष्ट असलेलीं सूक्तें उत्तरकालीन.

जरूथः—( ७. ९, ६ ). वसिष्ठानें अग्नि प्रदीप्त केला आणि अग्नीनें जरूथ यास मारिलें. जरूथ वसिष्ठसमकालीन असावा. जरूथाचा उल्लेख करणारीं सूक्तें ( ७. १; ९; १०. ८० ) उत्तरकालीन.

जन्हावीः—( १. ११६, १९; ३. ५८ ). जन्हुसंबंधी प्रजा. उल्लेख उत्तरकालीन सूक्तांत आहे. ग्रिफिथ मताप्रमाणें कुशिकाच्या वंशास 'जन्हावी' म्हटलें आहे. जन्हु कुशिकांचा पूर्वज असावा.

जाहुष्ठिरः—( २. १३, ११ ). सुदास-दिवोदासकालीन पुरुकुत्सा भार्येचा उल्लेख आला असल्यामुळें उत्तरकालीन ठरलेल्या सूक्तांत उल्लेख. प्रत्यक्ष संबंध नाहीं.

जाहुषः—( ७. ७१, ५ ). पक्थांचा राजा तूर्वयाण याच्या विरुद्ध असलेल्या च्यवनाबरोबर याचा उल्लेख आहे. शिवाय उत्तरकालीन ठरलेल्या ( १. ११६ ) या सूक्तांत उल्लेख आहे. प्रत्यक्ष संबंध नाहीं.

तक्ववानः—( १. १२०, ६ ). कक्षीवानपुत्र तक्व याचा पुत्र ( मॅक्डोनेल् ). उत्तरकालीन सूक्तांत उल्लेख. कक्षीवानसंबंध पहा.

तरंतः—( ५. ६१, १० ). तरंत व पुरुमीळ्ह हे विददश्विपुत्र होते. हे पुरुवंशज असावेत. तरंत हा श्यावाश्वाचा आश्रयदाता होता. व श्यावाश्वानें त्रसदस्यूकरितां इंद्राची स्तुति केल्याचा ( ८. ३६, ७ ) उल्लेख आहे. तरंताचा उल्लेख असलेलें सूक्त ( ५. ६१ ) उत्तर.

तरुक्षः—( ८. ४६, ३२ ). वश-अश्व्य याचा आश्रयदाता. वश-अश्व्य हा तरुक्षापासून धन मिळाल्याचें वर्णितो. अश्व्य पहा.

तर्यः-कित्वीसह उल्लेख. कित्वि पहा. प्रत्यक्ष संबंध नाहीं.

तान्वः-( १०. ९३, १५ ). पृथूच्या राजाबरोबर तान्वाचा उल्लेख. अनुक्रमणींत याला पृथुपुत्र म्हटलें आहे. पृथुपर्शवांचा दाशराज्ञ युद्धाशीं संबंध असल्यामुळें तान्वाचा उल्लेख असणारीं सूक्तें ( ३. ३१; १०. ९३ ) उत्तरकालीन.

तिरिंदिरः-( ८. ६, ४६ ). याद्व व पर्शु यांच्यासह उल्लेख. सूक्तद्रष्टा वत्स म्हणतो, ' पर्शु पुत्र ( अथवा कुलोत्पन्न ) तिरिंदिर यानें याद्वाचें धन मला दिलें. सूक्त उत्तर.

तुग्रः-( १०. ४९, ४ ). इंद्रानें कुत्साकरितां तुग्राला मारिलें. कुत्सासह उल्लेख असल्यामुळें तुग्राचा उल्लेख असणारीं सूक्तें ( १. ११६; ११७; ६. २०; २६; १०. ४९ ) उत्तरकालीन. कुत्ससंबंध पहा.

तुर्वशः-यदूसह उल्लेख. सुदासशत्रु. तुर्वशाचा उल्लेख असणारीं सूक्तें ( १. ३६; ४७; ५४; १०८; १७४; ४. ३०; ६. २० २७; ४५; ७. १८; १९; ८. ४; ७; ९. १०; ९. ६१; १०. ४९ ) उत्तरकालीन.

तुर्वीतिः-( १. ५४, ६ ). यदुतुर्वशांबरोबर उल्लेख असल्यामुळें उत्तरकालीन. याचा आणखी उल्लेख असणारीं सूक्तें ( १. ३६; ६१; ११२; २. १३; ४. १९ ) उत्तरकालीन. हा तुर्वशांचा राजा असावा ( लुड्विग ).

तूतुजिः-( ६. २०, ८ ) इंद्रानें द्योतननामक राजाकरितां तुग्र, तूतुजि, वेतसु, दशोणि यांचा पराभव केला. तुग्रसहोल्लिखित असल्यामुळें तूतुजि याचा उल्लेख असणारें सूक्त उत्तरकालीन. मॅक्डोनलच्या मतानें तुजि आणि तूतुजि ही एकच व्यक्ति. तेव्हां तुजींचा उल्लेख असलेलीं सूक्तें ( ६. २६; १०. ४९ ) उत्तरकालीन.

तूर्वयाणः-(१. ५३, १०). अतिथिग्व, आयु व कुत्स यांचा शत्रु. तूर्वयाण हा पक्थांचा राजा होता. याचा उल्लेख असलेलें सूक्त उत्तरकालीन.

तृक्षिः-( ८. २२,७ ). त्रसदस्युपुत्र. याचा उल्लेख असणारीं सूक्तें ( ८. २२; ६. ४६ ) उत्तरकालीन.

तृणस्कंदः-( १. १७२, ३ ). सर्वानुक्रमणीप्रमाणे अगस्त्याच्या सूक्तांत उल्लेख. सायणमताप्रमाणें अगस्तीचेंच विशेषण. प्रत्यक्ष संबंध नाहीं.

तृत्सुः-सुदासाचे माहाय्यकर्ते व वसिष्ठाचे अनुयायी. तृत्सूंचा उल्लेख करणारीं सूक्तें ( ७. १८; ३३; ८३ ) उत्तरकालीन.

त्रसदस्युः-( ७. १९, ३ ). पुरुकुत्सपुत्र व पुरूंचा राजा असावा. याला पूरु म्हटलें आहे. याचा उल्लेख असणारीं सूक्तें ( १. ११२; ४. ३८; ४२; ५. २७; ३३; ७. १९; ८. ८;

१९; ३६; ४९; १०. १५० ). उत्तरकालीन. शिवाय त्रसदस्यु द्रष्टा असलेलें ( ९. ११० ) हें सूक्त उत्तरकालीन.

त्रासदस्यवः-त्रसदस्युवंशज. तृक्षि व कुरुश्रवण यानें हें नाव आहे. याचा उल्लेख ( ८.१९;२२; १०. ३३ ) या ठिकाणीं येतो. हीं सूक्तें उत्तरकालीन.

त्रित-आप्त्यः-याचा उल्लेख अनेक स्थळीं आहे. अनुक्रमणी-प्रमाणें त्रित हा ( १०. ४ ) या सूक्ताचा द्रष्टा असून 'मरुदेशांतील पाणपोईप्रमाणें तूं पुरुंना धनानें तोषविणारा आहेस' असें अग्नीला म्हणतो.

त्रिशोकः-हा द्रष्टा असलेल्या सूक्तांत ( ८. ४५, ३० ) यदुतुर्वशांचा उल्लेख करतो. त्रिशोक काण्व होता, व काण्व यदूंचे पुरोहित होते. याचा उल्लेख ( १. ११२; १०. २९ ).

त्रैतनः-( १. १५८, ५ ). तौग्र्य, दीर्घतमस् यांचा उल्लेख असलेल्या सूक्तांत उल्लेख. हा दीर्घतमस्चा दास व कदाचित त्रितांचा संबंधी असावा.

त्रैवृष्णः-( ५. २७, १ ). त्रसदस्यूचें नांव.

त्र्यरुणः-( ५. २७, १ ). त्रसदस्यूचें नांव.

दध्यङ्:-( १. ११६, १२ ). अथवा दध्यञ्च्. हा आथर्वण होता. वरील उत्तरकालीन सूक्तांत उल्लेख. याचा आणखी उल्लेख ( १. ८०; १३९; ४. १६; ९. १०८ ) या सूक्तांत आहे. प्रत्यक्ष संबंध नाहीं.

दभीतिः- याचा तुर्वीतीसह अनेक स्थळीं उल्लेख येतो. दभीति व तुर्वीति संबंध. चुमुरि पहा. याचा उल्लेख करणारीं पुढील सूक्तें ( १. ११२; २. १३; १५; ४. ३०; ४१; ६. २०; २६; ७. १९; १०. ११३ ) उत्तरकालीन.

दशग्वः-( ५. २९, १२ ). हे आंगिरस होते. यांचा कुत्स, एतश, उशना या व्यक्तींचा उल्लेख असलेल्या सूक्तांत उल्लेख आहे. दशग्वांचा आणखी उल्लेख असलेलीं सूक्तें ( १. ६२; २. ३४; ३. ३९; ४. ५१; ५. २९; ८. १; १२ ). प्रत्यक्ष संबंध नाहीं.

दशद्युः-( १. ३३,१४ ). याचा या ठिकाणीं ' तुग्रासह युद्ध करणाऱ्या दशद्यूचें व तुग्राचें इंद्रानें रक्षण केलें' असा उल्लेख आहे. आणखी उल्लेख (६.२६) या सूक्तांत आहे. तुग्रसमकालीन असावा.

दशव्रजः-( ८. ४९, १० ). पक्थ, त्रसदस्यू यांच्यासह कण्व, त्रसदस्यु, पक्थ, यांचें अश्वींनीं रक्षण केलें असा उल्लेख. याचा उल्लेख करणारें सूक्त ( ८. ५० ) उत्तर.

दशोणिः-( ६. २०, ८ ). तुजि, तुग्रसहोल्लिखित. तुग्र अथवा तूतुजि पहा. दशोणीचा आणखी उल्लेख असलेलीं सूक्तें ( ८. ५२; १०. ९६ ) उत्तरकालीन.

दस्यवेवृकः-( ८. ५६, २ ). दस्यूंचा पराभव करणारा एक राजा, व पृषध्राचा आश्रयदाता. मॅक्डोनलमतानें पूतक्रतूचा मुलगा. याच्या बायकोचें नांव पूतक्रता. याचा आणखी उल्लेख असलेलीं सूक्तें ( ८. ५१; ५५ ) उत्तर.

दार्भ्यः-दर्भाचा मुलगा. दर्भाचा उल्लेख ऋग्वेदांत नाहीं. याचेंच दुसरें नांव रथवीति. अनुक्रमणी व बृहद्देवतेप्रमाणें रथवीति यानें अर्चनानस् पुत्र श्यावाश्वाला आपली मुलगी दिली होती (५. ६१. १७ ). श्यावाश्वसंबंधाकरितां तरंत पहा.

दिवोदासः-सुदासपिता, अतिथिग्वपुत्र अथवा अतिथिग्वाचेंच नांव. याचा उल्लेख असलेलीं सर्व सूक्तें ( १. ११२; ११६; ११९; १३०; २. १९; ४. २६; ३०; ६. १६; २६; ३१; ४३; ४७; ६१; ७. १८; ९. ६१ ) उत्तरकालीन.

दीर्घतमसः-कक्षीवान्पिता, कक्षीवान् पहा. दीर्घतमस्चा आणखी उल्लेख असलेलीं सूक्तें ( १. १५८; ८. ९ ) हीं उत्तरकालीन.

दीर्घश्रवसः-( १. ११२, ११ ). कक्षीवानासह उत्तरकालीन सूक्तांत उल्लेख. प्रत्यक्ष संबंध नाहीं.

दुर्गहः-( ४. ४२, ८ ), पुरुकुत्सपूर्वज. सायणमताप्रमाणें पुरुकुत्साचा पिता. दुर्गहाचा ( ८. ६५ ) मध्यें आणखी उल्लेख आहे. सदर सूक्त उत्तरकालीन.

दुर्मित्रः-( १०. १०५, ११ ). याला कुत्सपुत्र म्हटलें आहे. दुर्मित्राचा उल्लेख असलेलें सूक्त उत्तरकालीन. कुत्स पहा.

दुःशासुः-( १०.३३, १ ). कुरुश्रवणाचा शत्रु. लुडविगमतानें पर्शु असावा. कुरुश्रवणाचा पुरोहित कवष याचा उल्लेख करतो. सूक्त उत्तर.

दुःशीमः-याचा पृथवान, वेन, यांच्या सह व तान्वाचा उल्लेख असलेल्या ( १०. ९३, १४ ) सूक्तांत उल्लेख आहे. 'दुःशीम, राम, पृथवान, वेन, यांच्या पुढें मीं स्तोत्र पठण केलें' असें सूक्तद्रष्टा तान्व म्हणतो. तान्व पहा. सूक्त उत्तरकालीन.

दृभीकः-( २. १४, ३ ). कुत्स, अतिथिग्व, आयु वगैरेंचा उल्लेख असलेल्या उत्तरकालीन सूक्तांत उल्लेख. प्रत्यक्ष संबंध नाहीं.

देवक-मान्यमानः-( ७. १८, २० ). तृत्सूंचा शत्रु व शंबर मित्र. लुडविगमतानें कदाचित् शंबराचेंच नांव असावें.

देववतः-सुदासपितामह. याचा उल्लेख ( ७. १८, २२; ८. ३१, १५ ) असलेलीं सूक्तें उत्तरकालीन.

देववातः-( ३.२३, २ ). हा भारत (भरतकुलांतील) होता. विश्वामित्र व सुदास यांच्या कुलास भरत म्हटलें आहे. देववात कदाचित् विश्वामित्रसमकालीन असावा.

देवश्रवसः-हाहि भरतकुलांतील होता. देववाताबरोबर ( ३. २३ ) उल्लेख. देववात पहा.

देवापिः-( १०. ९८, ६ ). ऋष्टिषेणाचा पुत्र व शंतनूचा पुरोहित. शंतनु भरतकुलांतील होता. शंतनूचा उल्लेख या सूक्तामध्यें असल्यामुळें सूक्त उत्तरकालीन. शंतनु व देवापि हे सुदासोत्तर-कालीन असावे.

दिवोदासः-देववाताचा मुलगा. अथवा सृंजयाचें दुसरें नांव. देववाताचा वंशज. दैववाताकरितां इंद्रानें वृचीवंताचा राजा तुर्वश याचा पराभव केला ( ६. २७, ७ ). दैववाताचा उल्लेख असणारीं सूक्तें ( ३. २३; ४. १५; ६. २७ ) उत्तरकालीन. सायण व झिमर यांच्या मताप्रमाणें दैववात हें अभ्यावर्तीचेंच नांव असावें.

दिवोदासः-( ८. १०३, २ ). दिवोदासवंशज अथवा सुदासाचें नांव. सूक्त उत्तरकालीन.

द्योतनः-( ६. २०, ८ ). तुग्र, तूतुजि, यांचा विरोधी. तूतुजि पहा.

द्रुह्युः-दाशराज्ञ युद्धांतील सुदासशत्रु. द्रुह्यूचा उल्लेख असलेलीं सूक्तें ( १. १०८; ६. ४६; ७. १८; ८. १० ) उत्तर.

धुनिः-चुमुरीबरोबर उल्लेख. चुमुरि पहा.

धन्यः-त्रसदस्यु, धन्य व मारुताश्व हे संवरणाचे आश्रयदाते होते ( ५. ३३, ).

ध्वसंतिः-इंद्रशत्रु. ( १. ११२ ) या उत्तरकालीन सूक्तांत उल्लेख. याच्या बरोबर पुरुषंतीचा उल्लेख असून ते दोघे ( सर्वानुक्रमणीप्रमाणें ) कश्यप कुलांतील अवत्सार याचे आश्रयदाते होते. सूक्तद्रष्टा अवत्सार हा ध्वसंति व पुरुषंति यांच्यापासून धन मिळाल्याचा उल्लेख करितो ( ९. ५८, ३ ).

ध्वस्रः-( ९, ५८, ३ ). याचा ( १. ११२ ) या उत्तरकालीन सूक्तांत उल्लिखित असलेल्या पुरुषंतीबरोबर उल्लेख असल्यामुळें हें सूक्त उत्तरकालीन. मॅकडोनलमतानें ध्वसंति व ध्वस्र हीं एकच व्यक्ति असावी. ध्वसंति पहा.

नभाकः-( ८. ४०, ४ ). या नाभाकाच्या सूक्तांत उल्लेख. हा कण्वकुलांतील होता. याच्या वंशांतील अथवा याचाच मुलगा असलेला नाभाक ज्या सूक्ताचा द्रष्टा आहे अशा सूक्तांत आयूचा उल्लेख (८. ३१, १०) आहे. 'तूं आयूला धन देतोस, असें नाभाक अग्नीला म्हणतो. नाभाक आयूचा समकालीन असावा. आयूचा संबंध पूर्वी दृष्ट आहेच.

नाभाकः-नभाक पहा. ( ८. ४१ ) या सूक्ताचा द्रष्टा.

नमी-साप्यः-( ६. २०, ६ ). कुत्स, तूतुजि, तुग्र यांचा उल्लेख असलेल्या सूक्तांत उल्लेख. नमीचा आणखी उल्लेख ( १०. ४८ ) या सूक्तांत आहे. प्रत्यक्ष संबंध नाहीं.

नमुचिः-( १. ५३, ७ ). इंद्रशत्रु. अतिथिग्व, यदु, तुर्वश, यांचा उल्लेख असणाऱ्या सूक्तांत उल्लेख. नमुचीचा उल्लेख असलेलीं सूक्तें ( २. १४; ६. २०; ७. १९; ८. १४; १०. ७३ ) उत्तरकालीन. प्रत्यक्ष संबंध नाहीं. मॅकडोनल म्हणतो 'नमीसाठीं इंद्रानें नमुचीस मारिलें' ( १. ५३, ७ ).

नर्यः-( १. ५४, ६ ). तुर्वासह्योग्यिन. इंद्रानें नर्य, यदु, तुर्वश यांचें रक्षण केलें. याचा आणखी उल्लेख ( १. ११२ ) या उत्तरकालीन सूक्तांत आहे.

नवग्वाः-हे आंगिरस होते. यांचा दशग्वांशीं संबंध फार येतो. दशग्व पहा. नवग्वांचा उल्लेख ( १. ३३; ६२; ३. ३९; ४. ५१; ५. २९; ४५; ६. ६; २२; ९. १०८; १०. १४; ६१; ६२; ८५; १०८ ) या सूक्तांतून आहे. प्रत्यक्ष संबंध नाहीं.

नववास्त्वः-( १. ३६, १८ ) यदु, तुर्वश यांच्याबरोबर उल्लेख. तुर्वीति, नववास्त्व व बृहद्रथ यांनां अग्नि मजकडे आणो, असें सूक्तद्रष्टा कण्व म्हणतो. याचा आणखी उल्लेख असलेलें सूक्तें ( ६. २०; १०. ४९ ) उत्तर.

नहुषः-( १०. ६३, १ ). याला ययातीचा पिता असें म्हटलें आहे. लुडविगमतानें नहुष म्हणजे लोक असून ते यदु-तुर्वशांचे विरोधी असावे ( १०. ४९, ८ ). मशर्शार हा नहुषांचा राजा होता. ( १. १२२; ५. १२; ६. २२; २६; ४६; ७. ६; ९५; ८. ६; ८; ४६; १०. ४९; ८०; ९९ ) हीं सूक्तें नहुषोल्लेखामुळें उत्तरकालीन.

नाभानेदिष्ठः-( १०. ६१, १८ ). पक्थ, मृर्ययाण यांच्या उल्लेखामुळें हें सूक्त उत्तरकालीन ठरलें आहे. वरील सूक्तांचा हा द्रष्टा असल्यामुळें वरील व्यक्तींच्या उत्तरकालीन ठरतो.

नार्मरः-( २. १३, ८ ). तुर्वीति, वय्य, दभीति यांच्या उल्लेखामुळें हें सूक्त उत्तरकालीन ठरलें आहे. प्रत्यक्ष संबंध नाहीं.

नार्यः-कुत्साचा उल्लेख असलेल्या ( ८. २४, २९ ) या सूक्तांत उल्लेख. सूक्तद्रष्टा वैयश्व याचा आश्रयदाता. अश्व्य पहा.

नार्षदः-कण्वाचें नांव. कण्वाला नृपदपुत्र असें म्हटलें आहे ( १०. ३१, ११ ). नार्षद-कण्व याचा उल्लेख ( १. ११७ ) या उत्तरकालीन सूक्तांत आहे. कण्वसंबंध पहा.

निंदिताश्वः-कुत्स, एतश, याद्व परमज्या इत्यादिकांच्या उल्लेखामुळें उत्तरकालीन ठरलेल्या ( ८. १, ३० ) या सूक्तांत उल्लेख. मेध्यातिथीचा आश्रयदाता. या मेध्यातिथीचा आसंग हाहि आश्रयदाता होता. ( आसंग पहा. ) प्रपथिन्, परमज्या हे यदुवंशज असावेत. यांच्याबरोबर याद्वांचा उल्लेख येतो.

नीपातिथिः-पक्थ व त्रसदस्यु यांचा उल्लेख असलेल्या ( ८. ४९, ९) या उत्तरकालीन सूक्तांत उल्लेख. सूक्तद्रष्टा प्रस्कण्व म्हणतो 'इंद्रा, तूं त्रसदस्यु, पक्थ व नीपातिथि यांनां धन देता झालास तसा मला धन दे.' ( ८. ५१ ) याहि सूक्तांत याच्या बरोबर पुष्टिगु, श्रुष्टिगु, प्रस्कण्व इत्यादिकांचा उल्लेख येतो. यावरून पुष्टिगु श्रुष्टिगु नीपातिथि, त्रसदस्यु व पक्थ हे समकालीन असावे.

नृमेधः-( १०. ८०, ३ ). जरूथासह उल्लेख. अग्नीनें जरूथास मारिलें व नृमेधास संतति प्राप्त करून दिली. कदाचित जरूथ व नृमेध समकालीन असावे. जरूथ पहा.

नृपदः-(१०.३१.११). नार्षद-कण्व याचा पिता. नार्षद पहा.

नोधस्-नोधाः-(१.१२४,४). कक्षीवानाबरोबर उल्लेख आहे. याचा गोतमाशीं निकट संबंध येतो. याला सर्वानुक्रमणी गोतमाचा

पुत्र अथवा वंशज म्हणते. हा द्रष्टा असलेलीं सूक्तें ( १. ५८; ६४ ) हीं उत्तरकालीन. हा द्रष्टा असलेल्या एका सूक्तांत तो सुदासाचा 'इंद्रानें अंहू नामक असुराचें धन सुदासाला दिलें' असा उल्लेख करतो ( १. ६३, ७ ). यावरून हा सुदासोत्तरकालीन असल्याचें ठरतें.

पक्थः–तुर्वयाणाची प्रजा व सुदासाचे शत्रू. यांचा उल्लेख असलेली ( ७. १८; ८. २२ ) सूक्तें उत्तरकालीन. यांच्या बरोबर भलानस, विषाणिन्, शिवासः, यांचा उल्लेख येतो. हेहि सुदासशत्रू असावे.

पज्रः–हें आंगिरसाचें कुलनाम आहे. कक्षीवानाला ( १. ११६; ११७; १२०; १२२ ) या सूक्तांत 'पज्रिय' म्हटलें आहे. पज्रांचा बहुवचनी उल्लेख ( १. ११७ ) या सूक्तांत आहे. कक्षीवान् पहा.

पठर्वाः–याचा ( १. ११२ ) या उत्तरकालीन सूक्तांत उल्लेख आहे. प्रत्यक्ष संबंध नाहीं.

पड्गृभिः–( १०. ४९, ५ ). इंद्रानें श्रुतर्वनकरितां पड्गृभी-चा पराभव केला असा या सूक्तांत उल्लेख आहे. या सूक्तांत आयु व कुत्स यांचा उल्लेख असल्यामुळें सूक्त उत्तरकालीन.

पणिः–( ४. ५१, ३ ). सूक्तद्रष्टा वामदेव म्हणतो, 'अत्यंत गूढ अशा अंधारांत पणि जाऊन पडोत' पणि हे इंद्रशत्रू असून त्यांनीं लपवून ठेविलेल्या गाई अथवा उदकें सोडविण्यासाठीं आंगिर-सांनीं इंद्राची प्रार्थना केली आहे. सायण यास्काला अनुसरून कोठें कोठें पणीचा वणिक् (वाणिज्य करणारे) असा अर्थ करतात. पणी-चा ऋग्वेदांत अनेक स्थळीं उल्लेख आहे.

परमज्याः–आयु, कुत्स, यादु इत्यादिकांचा उल्लेख असलेल्या ( ८. १ ) या सूक्तांत उल्लेख. लुडविगमतानें हा कदाचित् यदु-वंशापैकीं मोठा मनुष्य असावा. निंदिताश्व पहा.

परावृजः–( २. १३, १२ ). सायणमतानें एक ऋषि. हा पाण्यांत बुडाला असतां अश्वींनीं याला वर काढिलें. प्रत्यक्ष संबंध नाहीं.

पराशरः–सुदासपुरोहित वसिष्ठ याचा मुलगा. ( ७. १८ ) या उत्तरकालीन सूक्तांत उल्लेख. ( ७. १०४ ) याहि सूक्तांत अत्रीबरोबर उल्लेख.

पर्णयः–( १०. ४८, ८ ). इंद्रानें अतिथिग्वाकरितां पर्णयाचा वध केला. पर्णयाचा आणखी उल्लेख ( १. ५३ ) येथें आहे. अतिथिग्वोल्लेखामुळें सूक्त उत्तरकालीन.

पर्शुः–पृथु, पर्शु, हे भरतांचे साहाय्यकारी. ( ७. ८३ १), या सूक्तांत सुदासासह उल्लेख.

पाकस्थामन्–कौरयाण पहा.

पायुः–( ६. ४०–२४ ). हा भद्वाजकुलांतील होता. याचा आश्रयदाता अभ्य (दिवोदास) हा होता. अभ्य पहा. सर्वानुक्रमणी-प्रमाणें पायु द्रष्टा असलेलें ( ६. ७५ ) सूक्त उत्तरकालीन. अनुक्रमणींत याला भरद्वाजपुत्र म्हटलें आहे.

पारावताः–सायणमतानें पलीकडील ( दूरचे ) लोक. सरस्वती नदीला 'पारावतघ्नी' असें म्हटलें आहे ( ६. ६१ ). कदाचित् हे लोक सरस्वती नदीच्या कांठचे असावे. यांचा उल्लेख ( ५, ५२; ८. ३४; १०० ) या सूक्तांत आहे, प्रत्यक्ष संबंध नाहीं,

पार्थवः–अभ्यावर्तिन् पहा,.

पार्थ्यः–तान्व पहा.

पार्षद्वाणः–प्रस्कण्वाचा आश्रयदाता. पुष्टिगूच्या ( ८. ५१) या सूक्तांत उल्लेख. प्रस्कण्व, पुष्टिगु पहा.

पाशद्युम्न-वायतः–( ७. ३३, २ ). याच्या यज्ञास इंद्र गेला असतां वसिष्ठानें त्याला सुदासाच्या यज्ञामध्यें आणिलें. सूक्त उत्तरकालीन.

पिठीनसः–दभीति, चुमुरि यांचा उल्लेख असलेल्या सूक्तांत ( ६. २६, ६ ) उल्लेख. इंद्रानें पिठीनस नामक राजाला रजि नामक स्त्री दिली. प्रत्यक्ष संबंध नाहीं.

पिप्रुः–वैदथिन्–ऋजिश्व्याकरितां इंद्रानें पिप्रूला मारिलें. ऋजिश्वन् पहा. पिप्रूचा उल्लेख असलेलीं सूक्तें ( १. ५१; १०१; १०३; २. १४; ४. १६; ५. २९; ६. १८; २०; ८. ३२; १०. ९९; १३८ ) उत्तरकालीन. पिप्रूचा शंबरासह उल्लेख येतो. शुष्ण, पिप्रु व कुयव यांचा वध करतेवेळीं इंद्रानें शंबराचीं नगरें विध्वंसिलीं.

पुरयः– (६. ६३; ९). भरद्वाजाचा आश्रयदाता. या सूक्ताचा द्रष्टा भरद्वाज याला पुरय घोडे देतो. भरद्वाजाबरोबर दिवो-दासाचा उल्लेख ( ६. १६, ५ ) आहे. दिवोदासाचा भरद्वाज पुरो-हित होता.

पुरुकुत्सः–हा पुरुवंशांतील असावा. याचा सुदासासह उल्लेख आहे ( १. ६३, ७ ). हा त्रसदस्यूचा मुलगा होता. त्रसदस्यु पहा. पुरुकुत्साचा आणखी उल्लेख असलेलीं सूक्तें ( १. ११२; १७४; ६. २० ) उत्तर.

पुरुकुत्सानीः–पुरुकुत्सस्त्री. पुरुकुत्स पहा. पुरुकुत्सानीचा उल्लेख असलेलें सूक्त ( ४. ४२, ९ ) उत्तर.

पुरुणीथः–( १. ५९,७ ) शतवनीपुत्र व भरद्वाजांचा आश्रय-दाता. ( १. ५९, ७ ) भरद्वाज सुदासपुरोहित होता.

पुरुपंथाः–( ६. ६३, १० ). भरद्वाजाचा आश्रयदाता पुरुपंथा भरद्वाजाला धन देत होता. भरद्वाज सुदासपुरोहित होते.

पुरुमायः–( ८. ६३, १० ). इंद्रोत, अतिथिग्व इत्यादिकांचा उल्लेख असलेल्या ( ८. ६८, १० ) सूक्तांत उल्लेख आहे. कदाचित् हा त्यांचा संबंधी व पुरुवंशज असावा.

पुरुमित्रः–( १. ११७). याचा या उत्तरकालीन सूक्तांत उल्लेख आहे. हा विमदपत्नी 'कमद्यू' हिचा पिता. याचा आणखी उल्लेख ( १०. ३९ ) या सूक्तांत आहे. हा कदाचित पुरुवंशज असावा.

पुरुमीळ्हः–तरंत, दार्भ्य यांचा उल्लेख असलेल्या सूक्तांत ( ५. ६१, ९ ) उल्लेख. दार्भ्य पहा. पुरुमीळ्हाचा आणखी उल्लेख

असलेलीं सूक्तें ( १. १५१; १८३; ८. ७१ ) उत्तरकालीन. हा पुरुकुलांतील असावा.

पुरुपंतिः–ध्वसंतीसह उल्लेख. ध्वसंति पहा.

पुरुरवस्ः–हा पुरुवंशांतील असावा. याचा उल्लेख ( १. ३१; १०. ९५ ) या सूक्तांत आहे. 'अग्नीनें पुरुरव्यावर अनुग्रह केला' असें सूक्तद्रष्टा हिरण्यस्तूप म्हणतो. उर्वशीपुरूरवासंवाद प्रसिद्ध आहे.

पुष्टिगुः–याचा (८. ५१) नीपातिथि, मेध्यातिथि, यांच्यासह उल्लेख. नीपातिथि पहा.

पूतक्रताः–( ८. ६८; १७ ) अतिथिग्व, इंद्रोत, आश्वमेध, पूतक्रता हीं सर्व एकाच व्यक्तीचीं नांवें असावीं. किंवा ते सर्व समकालीन असावे.

पूरुः–हें कुलनाम असून दिवोदास व सुदाम हे याच कुलांतील होत. सुदासास (१.६३,७) व दिवोदासास (१.१३०,७) 'पूरवे' म्हटलें आहे. यांचा उल्लेख असलेलीं सूक्तें ( १. ५९;१३१; १७४; ४. २१; ३८; ६. २०; ७. ५; १९; ९६; ८. ६४ ) उत्तर.

पृक्षयामनूः–( १. १२२, ७ ). हा पज्र कुलांतील असावा अथवा सायणमताप्रमाणें कक्षीवानाचेंच नांव. श्रुतरथ व प्रियरथ हे कक्षीवानाचे आश्रयदाते होते. कक्षीवानसंबंध पहा. सूक्त उत्तरकालीन.

पृथवानः–( १०. ९३,१४ ).दुःशीम याच्या बरोबर उल्लेख. तान्व व दुःशीम पहा.

पृथुः–( ७. ८३, १ ). एका जातीचे लोक. पर्शूंशीं संबंध. पर्शु पहा.

पृथुश्रवसः–कानीतानें दुसरें नांव. कानीत पहा. दिवोदासाच्या उल्लेखामुळें उत्तरकालीन ठरलेल्या ( १. ११६ ) या व ( ८. ४६ ) या सूक्तांत उल्लेख.

पृदाकुसानुः–( ८. १७, १५ ). अग्निकुलांतील इरिंबिठ नामक सूक्तकाराच्या सूक्तांत उल्लेख. लुडविगच्या मतें हा एका यज्ञसंप्रदायाचा प्रवर्तक होता. याचा दाशराज्ञयुद्धांतील व्यक्तींशीं प्रत्यक्ष संबंध येत नाहीं.

पृश्निगुः–पुरुकुत्स याच्यासह ( १. ११२ ) या उत्तरकालीन सूक्तांत उल्लेख. प्रत्यक्ष संबंध नाहीं.

पृषध्रः–( ८. ५२, २ ). आयु, दशोणि यांच्यासह उल्लेख. सूक्तद्रष्टा आयु म्हणतो 'इंद्रा तूं दशोणीसह सोमपानानें मदयुक्त झालास तसा पृषध्रासह हो.' पृषध्र दशोणीसमकालीन असावा. दशोणि पहा.

पेदुः–याचा ( १. ११६; ११७ ) या उत्तरकालीन सूक्तांत उल्लेख असून ( १. ११८; ११९; १०. ३९ ) या सूक्तांत उल्लेख आहे. अश्विदेवांनीं पेदूला घोडा दिल्याबद्दल कक्षीवान् उल्लेख करतो. कदाचित् पेदु कक्षीवानुसमकालीन असावा.

पेरुकः–( ६. ६३, ९ ). पुरय व पुरंध्या यांच्यासह उल्लेख. भरद्वाजाचा आश्रयदाता. भरद्वाज पेरुकापासून धन मिळाल्याचे उल्लेखितो.

पैजवनः–सुदासाचें पैतृक नांव. याचा ( ७. १८ ) या सूक्तांत उल्लेख आहे.

पौतक्रतः–पूतक्रतपुत्र. पृषध्र द्रष्टा असलेल्या ( ८. ५६ ) सूक्तांत उल्लेख. पृषध्राचा आश्रयदाता. पृषध्रसंबंध पहा.

पौरः–( ८. ३, १२ ). पुरुवंशज. आयु व रुशम, यांच्यासह उल्लेख. मेध्यातिथि म्हणतो, 'ज्या रक्षणसामर्थ्यानें रुम, रुशम व पौर यांचें रक्षण केलेंस त्या सामर्थ्यानें माझें रक्षण कर.'

पौरुकुत्स्यः–पुरुकुत्साचा वंशज अथवा पुत्र. पुरुकुत्स पहा. पौरुकुत्सि हें याचेंच नांव. याचा ( ५. ३३; ७. १९; ८. १९ ) या ठिकाणीं उल्लेख आहे. सूक्तें उत्तरकालीन.

प्रतृदः–हें तृत्सूंचेंच दुसरें नांव आहे. यांचा वसिष्ठ पुरोहित होता ( ७. ३३ ). सूक्त उत्तर.

प्रपथिन्ः–निंदिताश्व पहा.

प्रमगंदः–( ३. ५३, १४ ). कीकटांचा राजा. सुदासशत्रु. सूक्त उत्तर.

प्रस्कण्वः–कण्वकुलांतील होते. प्रस्कण्व व कण्व यांचा यदुतुर्वशांशीं बराच संबंध येतो. प्रस्कण्व व कण्व हे यदुतुर्वशांचे पुरोहित असावे. प्रस्कण्वाचा उल्लेख असलेलीं ( १. ४४; ४५; ८. ३; ५१;५४ ). सूक्तें व प्रस्कण्व ज्या सूक्तांचा द्रष्टा आहे अशीं सूक्तें ( १. ४४; ५०; व ९. ९५ ) उत्तरकालीन. सर्वानुक्रमणी याला 'कण्वपुत्र' म्हणते.

प्रस्तोकः–सृंजय व प्रस्तोक हीं दिवोदासाचींच नांवें आहेत. याला सृंजयपुत्र असें हि म्हटलें आहे ( ६. ४७, २२ ).

प्रातर्दनिः–प्रतर्दनपुत्र. क्षत्रश्रीचें दुसरें नांव. क्षत्रश्री पहा.

प्रियमेधः–हा कण्व कुलांतील होता. याचा अत्रीबरोबर उल्लेख येतो. अत्रीचा संबंध पहा. प्रियमेध हें कुलनाम असावें. कारण बऱ्याच ठिकाणीं 'प्रियमेधासः' असें रूप आढळतें. प्रियमेध द्रष्टा असलेल्या सूक्तांत ( ८. ६८; ६९ ) अतिथिग्व व इंद्रोत यांचा उल्लेख येतो. हे प्रियमेधाचे आश्रयदाते होते. प्रियमेधाचा उल्लेख असलेलीं सूक्तें ( १. ४५; १३९; ८. २; ३; ४; ५; ६; ८; ६९; १०. ७३ ) व प्रियमेध द्रष्टा असलेलीं सूक्तें (८. ६८; ८७; ९. २८ ) उत्तर.

प्रियरथः–प्रिंसिप्मनानें कक्षीवानाचा आश्रयदाता. कक्षीवान पज्रकुलांतील होता. कक्षीवान् पहा. प्रियरथाचा उल्लेख असलेलें सूक्त ( १. १२२ ) उत्तरकालीन आहे. सायण प्रियरथ व श्रुतरथ हीं कक्षीवानाचीं विशेषणें समजतात.

बभ्रुः–रुम रुशम यांचा राजा ऋणंचय हा बभ्रूचा आश्रयदाता होता. ऋणंचय पहा. बभ्रूचा उल्लेख असलेलीं सूक्तें ( २. ३३; ५. ३०; ७. ४४; ८. २२; २९; ९. ९८ ) उत्तरकालीन.

बल्बूथः-( ८. ४६, ३२ ). अश्वपुत्र वश याचा आश्रयदाता. या वशाचा कानीत नामक आश्रयदाता असून त्याचा ( १. ११६ ) या उत्तरकालीन सूक्तांत उल्लेख येतो. बल्बूथाचा उल्लेख असलेलें सूक्त उत्तरकालीन. अश्व्य पहा.

बाहुवृक्तः-क्रिवि, तर्य यांसह उल्लेख. तर्य पहा. प्रत्यक्ष संबंध नाहीं.

बृबुः-पर्णांचा राजा अथवा पर्णांचा सुतार, व भरद्वाजाचा आश्रयदाता. ( ६. ४५. ) या सूक्तांत बृबूचा उल्लेख आहे. भरद्वाज भरतांचा पुरोहित होता.

बृसयः-याला सरस्वती नदीच्या कांठीं इंद्रानें मारिलें. याच नदीवर वध्र्यश्वाला दिवोदास मिळाला. याचा दिवोदासाचा उल्लेख असलेल्या सूक्तांत उल्लेख ( ६. ६१, ३ ) असून दुसऱ्या एका सूक्तांत बृसयाला त्वष्टा-वृत्रपिता म्हटले आहे ( १. ९३, ४ ). प्रत्यक्ष संबंध नाहीं.

बृहदुक्थः-( १०. ५४; ६ ) या सूक्तांत याचा उल्लेख आहे. याला सर्वानुक्रमणींत वामदेवाचा पुत्र अथवा गोत्रज म्हटले आहे. वामदेव हा मंडल ४ चा द्रष्टा असून त्याचा कुत्स, पिप्रु, ऋजिश्वन् यांचा उल्लेख ( ४. १६, १८ ) असलेल्या सूक्तांत उल्लेख येतो. वामदेवाच्या ४ थ्या मंडलांत अतिथिग्व, दिवोदास, त्रसदस्यु, यदु, तुर्वश, इत्यादिकांचा उल्लेख असल्यामुळें वामदेव वरील व्यक्तींच्या नंतरचा अथवा समकालीन तरी असावा. बृहदुक्थाचा उल्लेख असलेलीं सूक्तें उत्तर.

बृहद्रथः- ( १. ३६, १८ ). यदु, तुर्वश यांच्यासह उल्लेख. नव्वास्त्व पहा. बृहद्रथाचा आणखी उल्लेख ( १०. ४९ ).

भजेरथः-( १०. ६०, २ ) मध्यें अगस्त्य, असमाति, इक्ष्वाकु यांच्यासह उल्लेख. सायणमताप्रमाणें असमातीचा शत्रु अथवा पूर्वज ( १०. ६०, ५ ). सूक्तद्रष्टा बंधु आपणास अगस्त्य याचा दौहित्र म्हणवितो. व धनप्राप्तीसाठीं असमातीला बोलावितो. असमाति हा अगस्त्याचा व बंधु वगैरेंचा आश्रयदाता होता. अगस्त्य पहा.

भयमानः-कक्षीवानाच्या (१. १००) सूक्तांत अंबरीष, सहदेव सुराधस् यांच्यासह उल्लेख. ऋज्राश्व, वार्षागिर पहा.

भरतः-हें सुदास, दिवोदास, तृत्सु, व विश्वामित्राचे वंशज त्याचे कुलनाम होतें. भरत नांवाची कोणी व्यक्ति होती, व त्या व्यक्तीच्या वंशजांना 'भारत' म्हणत असत. सायणांनीं कांहीं ठिकाणीं 'भरत' याचा 'हवि अर्पण करणारा' असा अर्थ केलेला आढळतो. भरतांचा उल्लेख असलेलीं सूक्तें ( २. ३६; ३. ३३; ५३; ५.५४; ६. १६; ७. ८; ३३ ) उत्तरकालीन असावीं.

भरद्वाजः-( १. ११६, १८ ). दिवोदासाचा पुरोहित. भरद्वाजाचा आणखी उल्लेख असलेलीं सूक्तें ( १. ५९; ११२; ६. १०; १५; १६; १७; २३; ३१; ३५; ४८ ) उत्तरकालीन होत. सहाव्या मंडलाचा द्रष्टा भरद्वाज असून त्या मंडलांतील सुद्ध त्याच्याच नांवावर असलेलीं ( १५; ३१-३६; ४४; ५२ ) यांशिवाय सर्व सूक्तें उत्तरकालीन. भारद्वाज हें कुलनामहि असावें. कारण त्याचा बहुवचनीं उल्लेख ( ६. २५, ४७; ५० ) या सूक्तांतून येतो.

भलानसः-सुदासशत्रु. पक्थ पहा.

भारद्वाजः-( ६. ५१, १२ ) भरद्वाजाचे वंशज.

भार्वरः-सायणमताप्रमाणें इंद्रविशेषण. परंतु लुडविग म्हणतो कीं हें औशिजाचे नाव असावे (४. २१, ७). औशिजसंबंध पहा.

भाव्य-भावयव्यः-कक्षीवानाचा आश्रयदाता. ( १. १२६ ) या उत्तरकालीन सूक्तांत उल्लेख. कक्षीवान् पहा.

भुज्युः-तुग्रपुत्र. तुग्राचा संबंध स्पष्ट आहे. तुग्र पहा. भुज्यूचा उल्लेख असलेलीं सूक्तें ( १. ११२; ११६; ११७; ११९; ४. २७; ६. ६२; ७. ६८; ६९; ८. २२; ४६; १०. ४०; ६५; ९५; १४३ ) उत्तरकालीन.

भूतांशः-( १०. १०६, ११ ). सर्वानुक्रमणी याला कश्यपपुत्र म्हणते. प्रत्यक्ष संबंध नाहीं.

भृगवाणः-कक्षीवान् द्रष्टा असलेल्या ( १.१२० ) व ( ४. ७ ) या सूक्तांत उल्लेख असल्यामुळें तीं उत्तरकालीन. कदाचित् कक्षीवानाचेंच हें नांव असावें. कारण तो आपणास ( याच ठिकाणीं ) पज्रिय म्हणवितो. कक्षीवानाला कांहीं स्थलीं पज्रिय म्हटलें आहे. कक्षीवान् पहा.

भृगुः-( ८. ३, ९ ). भृगूचा या सूक्तांत प्रस्कण्वाबरोबर उल्लेख आहे. प्रस्कण्व पहा. भृगूचा आणखी उल्लेख ( १. ६० ) या सूक्तांत आहे. कदाचित् भृगु प्रस्कण्वकालीन असावे. भृगु हें कुलनाम हि होतें. भृगूंचा बहुवचनीं उल्लेख ( ३. २; ५; ८. ३५ ) या ठिकाणीं येतो.

भेदः-इंद्रानें सुदासाकरितां भेदास मारिलें (७. १८, १९ ). भेदाचा आणखी उल्लेख असलेलीं सूक्तें ( ७. ३३; ८३ ) उत्तर.

भोजाः-( ३. ५३, ७ ). 'भोज' नामक लोक. सुदासाचे अनुचर. सुदासानुचर भोज हे मला अश्वमेधामध्यें मदत करोत असें विश्वामित्र म्हणतो.

मत्स्यासः-( ७. १८, ६ ). 'मत्स्य' नामक लोक. हे तुर्वशाचे शत्रु होते. तुर्वशानें मत्स्य लोकांना आपल्या अनुशासनाखालीं आणिले.

मनसः-( ५. ४४, ६ ). एवावद, अवत्सार क्रिवि यांच्यासह उल्लेख. प्रत्यक्ष संबंध नाहीं.

मन्धातृः-( ८. ४०, १२ ). अनुक्रमणीप्रमाणें युवनाश्व पुत्र. सूक्तद्रष्टा नाभाक म्हणतो, मंधाता, अंगिरस् व माझा पिता नभाक यांच्याप्रमाणें स्तुति करणाऱ्या माझें इंद्राग्नींनीं रक्षण केलें. नभाकसंबंध संशयित आहे. कक्षीवानाच्या ( १. ११२, १३ ) सूक्तांत 'क्षेत्रामध्यें मंधात्याचें अश्वीदेवांनीं रक्षण केल्याचा' उल्लेख आहे. यावरून मंधाता कक्षीवानाचा पूर्वकालीन परंतु फार दूरचा नसावा.

मशर्शार -( १. १२२, १५ ). लुडविगमताप्रमाणें नहुषाचा राजा व सुदासशत्रु. कक्षीवानाच्या सूक्तात उल्लेख. कक्षीवान् म्हणतो 'आयूचे तीन मुलगे व मशर्शाराचे चार मुलगे मला त्रास देतात.' कक्षीवान् पहा

मान -अगस्त्याचे दुसरें नांव ( ७ ३३, १३ ) अगस्त्य पहा

मान्दार्य -मान्यार्चे दुसरें नांव मान्दार्य-मान्य याचा उल्लेख ( १. १६५ ) या ठिकाणीं असून शिवाय ( १. १६६, १६७; १६८ ) या सूक्तातून आहे. मान व अगस्त्य पहा

मामतेय -दीर्घतमस्चें दुसरें नाव. दीर्घतमस् याच्या आईचे नांव ममता असें होनें व सर्वानुक्रमणीप्रमाणें दीर्घतमस्च्या पित्याचे नांव 'उचथ्य' असें होतें. मामतेयाचा उल्लेख ( १. १४७, १५२, १५८ ) या सूक्तामध्यें आहे.

मायुमायव -( १०. ९३, १५ ). तान्व, पार्थ्य यांच्यासह उल्लेख तान्व पहा.

मारुताश्व -( ५ ३३, १० ). सत्वरणाचा आश्रयदाता. ध्वन्य पहा.

मित्रातिथि -( १०.३३, ७ ) उपमश्रवस्चा पिता उपमश्रवस् पहा.

मुद्गल -( १०. १०२, ६ ) याच्या गाई शत्रूंनीं नेल्या असतां यानें शत्रूंना जिंकून त्या परत आणिल्या. प्रत्यक्ष सबंध नाहीं.

मुद्गलानी -( १०. १०२, ५ ) मुद्गलाची बायको हिनें लढाईंत मुद्गलाचें सारथ्य केलें प्रत्यक्ष सबंध नाहीं

मृगय -( १०. ४९,५ ) इद्रानें आर्श-श्रुतर्वणाकरिता मृगयाला मारिलें. श्रुतर्वण-आर्श पहा.

मृळीक -याला सर्वानुक्रमणी वसिष्ठपुत्र म्हणते ( १० १५० ) या सूक्ताचा द्रष्टा. या सूक्तांतील सर्व ऋचामध्यें याचा उल्लेख आहे ५व्या ऋचेमध्ये तो ' अत्रि, भरद्वाज, गविष्ठिर, कण्व, त्रसदस्यु, यांच्यासह संग्रामांत आमचें रक्षण कर ' अशी अग्नीची प्रार्थना करतो. तो वरील व्यक्तींचा समकालीन असावा.

मेधा-( ८. ५०, १० ) याचा कण्व, दीर्घनीथ, गोशर्य, यांच्यासह उल्लेख. कण्वसमकालीन असावा.

मेध्य-पृषध्र, दशोणि, दशशिप्र, यांच्यासह उल्लेख ( ८ ५२, २ ). अनुक्रमणीप्रमाणें हा ( ८. ५३; ५४; ५७, ५८ ) या सूक्तांचा द्रष्टा असून, ( ८. ५२, २ ) मध्यें कुत्स, आयु अतिथिग्व यांचा उल्लेख करतो. यावरून तो वरील व्यक्तींच्या उत्तरकालीन असावा.

मेधातिथि -मेध्यातिथिः-अनुक्रमणींमध्यें याला काण्व-कण्वपुत्र अथवा कण्वकुलोत्पन्न म्हटलें आहे ( ८. २, ४० ) मध्यें तो आपणास 'काण्वमेध्यातिथि' म्हणवितो. तो आसंगाचा पुरोहित असावा. ( ८. १, ३० ) मध्यें आसंगाजवळून धन मिळाल्याबद्दल तो आसंगाची स्तुति करतो. मेधातिथीचा ( १. १२; १७, ८. १, २, ८, ३३, ४१, ५१, ९. ४३ ) या सूक्तांत उल्लेख आहे

मेना.-( १. ५१, १३ ). 'इंद्र वृषणश्व्याची मेना झाला' असा उल्लेख आहे, याशिवाय प्रत्यक्ष संबंध नाहीं.

यक्षु-यक्षव -सुदासशत्रु अजस् पहा.

यजत -अवत्सार एवावद यांच्यासह ( ८ २२ ) या सूक्तात उल्लेख. प्रत्यक्ष संबंध नाहीं. अवत्सार, श्रिंवि पहा.

यदुः-सुदासशत्रु. यदुतुर्वशाना अतिथिग्वाच्या ताब्यात देण्याबद्दल वसिष्ठ इद्राची प्रार्थना करतो ( ७. १९, ८ ). इंद्रानें यदुतुर्वश व शबर यानां सुदासाच्या ताब्यात दिले ( ९ ६१, २ ). यदुतुर्वश हे प्रथम सुदासाचे शत्रू असून नंतर मित्र झाले असावे. कारण शत्रूंनीं दूर यांकिलेल्या यदुतुर्वशाना जवळ आणिलें ( ६. ४५, १ ), यदु तुर्वशानां अभिषेकार्ह केलें ( ४. ३०, १७ ), तरून नेलें ( ६. २०, १२ ), अशा तऱ्हेचे उल्लेख आढळतात यदूच्या वंशजाना यादु असें म्हटल्याचें आढळतें. यदूचा उल्लेख ( १. ३६, ५४, १०८, १७२, १७४, ४. ३०; ५ ३१, ६. ४५, ८ ४, ७, ९, १०, ४५, ९. ६१, १०. ४९, ६२ ) असलेलीं सूक्तें उत्तरकालीन.

यादु -यदूचें कुलनाम. यादूचा उल्लेख ( ७. १९, ८. १, ६ या सूक्तातून येतो.

युध्यामधिः-( ७. १८, २४ ) सुदासशत्रु. इंद्रानें सुदासाकरितां युध्यामधीचा वध केला.

रजि -( ६ २६, ६ ). पिठीनसाची स्त्री. दभीति, चुमुरि यांच्यासह उल्लेख. इंद्रानें दभीतीकरिता चुमुरीला मारिलें आणि पिठीनस याला रजि नामक स्त्री दिली याशिवाय प्रत्यक्ष संबंध नाहीं

रथप्रोष्ठ -( १०. ६०, ५ ) असमाति व रथप्रोष्ठ यांचा एकत्र उल्लेख आहे. अनुक्रमणीप्रमाणें असमाति हा अगस्त्याचा दौहित्र जो बंधु त्याचा आश्रयदाता. भजेरथ व असमाति पहा. रथप्रोष्ठ व असमाति हीं एकाच व्यक्तीचीं नांवें असावा.

रथवीतिदार्भ्य -श्यावाश्वाचा आश्रयदाता व बृहद्देवतेप्रमाणे श्यावाश्वाचा श्वशुर. श्यावाश्वाला रथवीति दार्भ्य यानें आपली मुलगी दिली. पुरुमीळ्ह व तरंत हे विदथिन्चे मुलगे असून ते श्यावाश्वाचे आश्रयदाते होते यानीं श्यावाश्वाला दान दिल्याचा उल्लेख ( ५. ६१ ) मध्यें आहे यावरून तरंत, पुरुमीळ्ह, दार्भ्य-रथवीति व श्यावाश्व हे समकालीन असावे पुरुमीळ्ह, तरंत हे पुरुवंशांतील असावे

रहूगण -हें गोतमाचें कुलनाम आहे. ( १. ७८, ५ ) या ठिकाणीं सूक्त-द्रष्टा गोतम ' आम्हीं रहूगण अग्नीसाठीं मधुर स्तोत्रें पठण करतों ' असा उल्लेख करतो गोतमोल्लेखामुळें सूक्त उत्तर.

राम -( १०. ९३, १४ ) पृथवान, दुःशीम व वेन यांच्यासह उल्लेख सूक्तद्रष्टा तान्व आपणास मिळालेल्या दानाचें पृथवान, दुःशीम, वेन व राम यांच्या पुढें वर्णन करतो. तान्व व दुःशीम पहा

रुधिक्रा -( २. १४, ५ ) पिप्रुसमकालीन एक असुर. इल्वल व पिप्रु पहा

रुमः-या लोकांचा ऋणंचय राजा होता. ऋणंचय पहा.

रुशतीः-( १. ११७, ८ ). अश्वी देवांनीं श्याव नामक ऋषीला रुशती नामक भार्या दिली. श्याव आणि रुशती यांचा याशिवाय अन्यत्र उल्लेख नाहीं व प्रत्यक्ष संबंध नाहीं. सायणमतानें श्याव व श्यावाश्व ही एकच व्यक्ति असावी.

रुशमः-रुम पहा.

रेभः-शत्रूंनी याला दहा दिवस कूपांत टाकिलें होतें. अश्वींनीं त्याला वर काढिलें. (१. ११२; ११६; ११७; ११८; ११९; १०. ३९ ) या सूक्तांतून रेभाचा उल्लेख असून सर्वत्र याच अर्थानें आहे. रेभाचा कण्वासह उल्लेख ' रेभाला कूपांतून वर काढिलें व कण्वाचें बधिरत्व नाहींसें केलें ' असा आला आहे. कदाचित् रेभ कण्वसमकालीन असावा. सूक्तें उत्तर.

रोमशाः-कक्षीवानाचा आश्रयदाता भाव्य-भावयव्य याची स्त्री. ( १. १२६ ) या ठिकाणी उल्लेख. कक्षीवान् व भाव्य पहा.

लक्ष्मण्यः-( ५. ३३, १० ). यांचेंच दुसरें नांव ध्वन्य. पुरुकुत्सपुत्र त्रसदस्यु, लक्ष्मण्य, मारुताश्व हे संवरणाचे आश्रयदाते होते. त्रसदस्यु पुरुकुत्सपुत्र होता व पुरुकुत्स पुरुराज होता.

लोपामुद्राः-( १. १७९, ४ ). वसिष्ठबंधु अगस्त्य याची स्त्री.

वंगृदः-( १. ५३, ८ ). अतिथिग्वशत्रु. इंद्रानें अतिथिग्वासाठीं वंगृदाचा शिरच्छेद केला.

वत्सः-अनुक्रमणींत याला कण्वपुत्र म्हटलें आहे व ( ८. ८, ८ ) येथें तो कण्वपुत्र असल्याचा स्पष्ट उल्लेख आहे. ( ८. ६ ) या सूक्ताचा हा द्रष्टा असून यांत वत्साचा उल्लेख आहे व त्यामध्यें तो तिरिंदिराजाकडून धन मिळाल्याचें वर्णितो. तिरिंदिर पहा. वत्साचा उल्लेख या शिवाय ( ८. ९ ) या सूक्तांत आहे.

वध्रिमतीः-अश्वीदेवांनीं हिरण्यहस्त नामक पुत्र वध्रिमतीला दिल्याबद्दल सूक्तद्रष्टा कक्षीवान् उल्लेख करतो ( १. ११६; ११७; ६. ६२; १०. ३९; ६५ ). याशिवाय प्रत्यक्ष संबंध नाहीं.

वध्र्यश्वः-( ६. ६१, १ ). दिवोदास पिता. सरस्वती नदीनें वध्र्यश्वाला दिवोदास पुत्र दिला. वध्र्यश्वाचा आणखी उल्लेख ( १०.६९ ) या सूक्तांत आहे.

वन्दनः-( १०. ३९, ८ ) कलि, विश्पला, यांच्या बरोबर उल्लेख. अश्वी देवांनी कूपांत पडलेल्या वंदनास वर काढिलें व अगस्त्याचा आश्रयदाता खेल याच्या पत्नीचा युद्धांत पाय तुटला असतां लोखंडी पाय बसवून दिला. कदाचित् वंदन खेल-विश्पला यांचा समकालीन असावा. याशिवाय प्रत्यक्ष संबंध नाहीं. वन्दनाचा वरीलप्रमाणेंच आणखी उल्लेख ( १. ११२; ११६; ११७; ११८; ११९ ) या सूक्तांतून आहे.

वम्रः-( १. ११२, १५ ). अश्वी देवांनीं याचें रक्षण केल्याबद्दल उल्लेख. वम्र हा ( १०. ९९ ) या सूक्ताचा द्रष्टा असून ५ व्या ऋचेंत याचा उल्लेख आहे; व ऋचा ९ मध्यें तो इंद्रानें कुत्साकरितां शुष्णाचा वध केल्याबद्दल उल्लेख करतो. कदाचित् कुत्ससमकालीन असावा.

वय्यः-तुर्वीतिसह उल्लेख. इंद्रानें तुर्वीति व वय्य यांना तारून नेलें ( २. १३, १२; ४. १९, ६ ). तुर्वीति पहा.

वरशिखः-इंद्रानें अभ्यावर्तिन्-चायमानाकरितां वरशिखाच्या मुलांना मारिलें ( ६. २७, ५ ). अभ्यावर्तिन्-चायमान हा दाशराज्ञयुद्धांत मारला गेला. अभ्यावर्तिन् पहा.

वरोसुषामनः-विश्वमनसूचा आश्रयदाता. विश्वमनस् हा ( ८. २३-२६ ) या सूक्तांचा द्रष्टा असून यांपैकीं एका सूक्तांत तो वरोसुषामन् याला धन प्राप्त होण्यासाठीं अश्वींची प्रार्थना करतो ( २३, २८ ). विश्वमनस् व वैय्यश्व हे एकच. अश्व्य पहा. वरोसुषामन्‌चा (८. २३; २४; २६ ) या सूक्तांतून उल्लेख आहे.

वर्चिनः-( ७. ९९, ५ ). दिवोदास शत्रु शंबर याचा महकारी. इंद्रानें शंबराचीं नगरें विध्वंसिलीं व वर्चिनास मारिलें असा उपर्युक्त ऋचेंत उल्लेख आहे व तसाच उल्लेख आणखी ( २. १४; ४.३०; ६. ४७ ) या ठिकाणींहि आहे. शंबर पहा.

वव्रिः-अनुक्रमणीप्रमाणें ( ५. १९,१ ) या सूक्ताचा द्रष्टा व अत्रिपुत्र. प्रत्यक्षसंबंध नाहीं. अत्रि पहा.

वशः-अश्व्याचें नाव. अश्व्य पहा.

वसिष्ठः-मित्रावरुणपुत्र, अगस्त्यबंधु व भरतकुलोत्पन्न सुदासादिकांचा पुरोहित. सातव्या मंडलास वासिष्ठमंडल म्हणतात. यांतील सर्व सूक्तांचा द्रष्टा वसिष्ठच आहे. वसिष्ठांचा एकवचनी व बहुवचनी उल्लेख सातव्या मंडलांत ( ७. १; ७; ९; १२; १८; २२; २३; २६; ३३; ३७; ३९; ४२; ५९; ७०; ७३; ७६; ७७, ८०; ८६; ८८; ९०; ९५; ९६ ) इतक्या सूक्तांतून आहे. याशिवाय वासिष्ठाचा उल्लेख (१. ११२; २. ९; १०. ६५; ६६; ९५; १२२; १५०; १८१ ) या सूक्तांमध्यें आहे.

वसुरुचः-( ९. ११०, ६ ). सायणमतानें एक व्यक्ति. सूक्तद्रष्टे त्र्यरुण व त्रसदस्यु, हे आहेत. सूक्तांत दुसऱ्या कोणाचा उल्लेख नाहीं. प्रत्यक्ष कोणाशीं संबंध नाहीं.

वसुरोचिषः-( ८. ३४, १६ ).ग्रिफिथच्या मतानें गायकांचा आश्रयदाता. याचा उल्लेख फक्त एकदांच आला आहे. सायण याचा व्यक्तिवाचक अर्थ घेत नाहींत. याचा कोणाशीं प्रत्यक्ष संबंध नाहीं.

वसूयुः-(५. २५, २६) या सूक्तांचा द्रष्टा. उपर्युक्त सूक्त २५ यांतील ९ व्या ऋचेंत ' वसूयवः ' असा बहुवचनी उल्लेख. कदाचित् विशेषनाम असावें. वरील दोन्ही सूक्तांत आणखी कोणाचा उल्लेख अथवा संबंध दृष्ट नाहीं.

वातरशनाः-( १०. १३६, २ ) या ठिकाणीं वातरशन नामक मुनींचा उल्लेख आहे. अनुक्रमणीप्रमाणें जूति, वातजूति, विप्रजूति व वृषाणक हे या सूक्ताचे द्रष्टे असून अनुक्रमणी त्यांनाच

वासरहातश्री म्हणते. ऋग्वेदांत जुति इत्यादिकांचा उल्लेख नाहीं. वरील सूक्तांत आणखी कोणाचा उल्लेख नाहीं.

**वामदेवः**–चवथ्या मंडलास वामदेव मंडल असें म्हणतात व त्यांतील ४२–४४ सूक्तांशिवाय बाकीच्या सर्व सूक्तांचा द्रष्टा वामदेव आहे. वामदेवाचा उल्लेख फक्त (४. १६, १८) याठिकाणीं आहे. परंतु तो कोणा व्यक्तीशीं संबंध दाखविणारा नाहीं. अनुक्रमणीप्रमाणे वामदेव हा मंडल ४ चा द्रष्टा मानिल्यास या मंडलांतील बहुतेक सर्व सूक्तांत सुदास, दिवोदास, सृंजय, अतिथिग्व, कुत्स इत्यादि उत्तरकालीन व्यक्तींचा उल्लेख आहे व ४२–४४ या सूक्ताचे द्रष्टे हि त्र्यरुण व त्रसदस्यु हे आहेत. तेव्हां वामदेव हा व्यक्ति सुदास-समकालीन असून चवथें मंडल दाशराज्ञयुद्धोत्तर मानण्यास हरकत नाहीं.

**वायतः**–त्र्यत पुत्र. पाशद्युम्न याचें दुसरें नांव. पाशद्युम्न पहा.

**वाय्यः**–(५. ७९, १). वय्यपुत्र. याचेंच नाव सत्यश्रवस. वय्य पहा.

**वार्षागिरः**–(१. १००, १७). ऋज्राश्व, अंबरीष, सहदेव, भयमान, व सुराधस् यांना वार्षागिर–वृषागिरपुत्र म्हटलें आहे. उपर्युल्लिखित सूक्ताचे हे द्रष्टे आहेत. यांपैकीं ऋज्राश्वाचा नहुष लोकांशीं संबंध होता. नहुष व ऋज्राश्व पहा. वरील मंडळींपैकी सहदेवाचा पुत्र साहदेव्यसोमक हा वामदेवाचा आश्रयदाता होता. वामदेव (४. १५) या सूक्तांत सोमकसाहदेव्याजवळून धन मिळाल्याचें उल्लेखितो. यावरून ऋज्राश्व अंबरीषादि वृषागिरपुत्र वामदेवाच्या बऱ्याच जवळच्या काळांतील असावे.

**विमदः**–याला आश्विनांनीं पुरुमित्राची कन्या बायको करून दिली असा उल्लेख (१. ११७, २०; व १०. ३९, ७) या ठिकाणीं आहे. ऋग्वेदांत 'पुरुमित्रस्य योषा' असा उल्लेख असतांना सायणांनीं त्याचा 'कन्या' असा अर्थ दिला आहे. पुरुमित्र हा पुरुवंशांतील असावा असें एक मत आहे. त्याप्रमाणे विमद हा पुरुमित्र जामात म्हणजे पुरुंचा संबंधी ठरतो. विमदाचा आणखी उल्लेख (१. ५१; ११२; ११६; ८. ९, १५; १०. २०; २३; ६५) या सूक्तांतून आहे.

**विशिशिप्रः**–(५. ४५, ६). सूक्तद्रष्टा सदापृण हा मनूनें विशिशिप्र यास जिंकल्याचा उल्लेख करतो. याशिवाय कोणाशीं संबंध नाहीं. याच ऋचेमध्यें वाणिज्य करणाऱ्या फर्लानाताठीं पाऊस पाडल्याचा उल्लेख आहे. परंतु त्याचा विशिशिप्राशीं संबंध नाहीं.

**विश्पलाः**–(१. ११६, १५). अगस्त्याचा (अनुक्रमणीप्रमाणें) आश्रयदाता खेल याची पत्नी. युद्धामध्यें हिचा पाय तुटला असतां अश्वींनीं लोखंडी पाय बसवून दिला. विश्पलेचा आणखी उल्लेख (१. ११२; ११७; ११८; १०. ३९) या सूक्तांत आहे.

**विश्वकः**–कृष्णाचा मुलगा. याला कृष्णिय म्हटलें आहे. अश्वींनीं याला विष्णापु नांवाचा मुलगा दिल्याचा उल्लेख आहे. प्रत्यक्ष संबंध नाहीं. विश्वकाचा उल्लेख (१. ११६; ११७; १०. ६५) या सूक्तांतून आहे.

**विश्वमनसः**–हा अश्व्य–वश याचा पुत्र. सायणमतानें यांचेंच नांव वैयश्व. याचा उल्लेख (८. २३; २४) या सूक्तांतून असून (८. २३-२५) या सूक्तांचा तो द्रष्टा आहे. अश्व्य-संबंध पहा.

**विश्ववारः**–यजत, सदापृण, मायिन् यांच्यासह उल्लेख (८. २२). प्रत्यक्ष संबंध नाहीं.

**विश्वसामनः**–(५. २२, १). अनुक्रमणीप्रमाणें अत्रिपुत्र अथवा अत्रिकुलोत्पन्न. तो आपणास स्वतःस अग्नीची पूजा करण्यास आज्ञा करतो. हा वरील सूक्ताचा द्रष्टा आहे. अत्रिसंबंध पहा.

**विश्वामित्रः**–सुदासपुरोहित व वसिष्ठाचा शत्रु. तिसऱ्या मंडळाचे द्रष्टे विश्वमित्र व त्याच्या कुलांतील ऋषी आहेत. प्रत्यक्ष विश्वामित्र याच्या नांवावर बरींच सूक्तें आहेत. विश्वामित्रानें सुदासाकडून यज्ञ करविल्याचा (३. ५३, ९) व त्याच्या यज्ञाकरितां (अश्वमेधाकरितां) घोडा सोडल्याचा (३. ५३, ११) उल्लेख आहे. विश्वामित्राच्या कुलास 'कुशिक' असें नांव होतें. (३. ३३, ५) येथें तो आपणास 'कुशिकस्य सूनुः' म्हणवितो. विश्वामित्र कुलाचा 'विश्वामित्राः' या बहुवचनी पदानेंहि उल्लेख केला आहे (३. ५३, १३; १०. ८९, १७). विश्वामित्राचा प्रत्यक्ष उल्लेख (३. ५३) या सूक्तांत आहे.

**विषाणिनः**–(७. १८, ७). एकाजातीच्या लोकांचें नांव. सुदासाचे शत्रू असावे.

**त्रिष्णापुः**–विश्वकाचा मुलगा. विश्वक पहा. प्रत्यक्ष संबंध नाहीं.

**वीतहव्यः**–(६. १५, २-३). भरद्वाजकुलज. अथवा भरद्वाजाचेंच नांव असावें. वीतहव्य (६. १५) या सूक्ताचा द्रष्टा आहे. भरद्वाज पहा.

**वृकद्वरसः**–(२. ३०, ४). इंद्रशत्रु. लुडविगमतानें शंडीकांचा राजा.

**वृचयाः**–(१. ५१, १३). कक्षीवानाची स्त्री. अश्वी देवांनीं कक्षीवानाला वृचया नामक स्त्री दिली. कक्षीवानसंबंध पहा.

**वृचीवंतः**–(६. २७, ४-५). इंद्रानें वृचीवंताचा पराभव करून त्याला दैववात–अभ्यावर्ति याच्या ताब्यांत दिलें. वारशिख पहा. वृचीवंत हा तुर्वशांचा राजा असावा.

**वृषगणाः**–(९. ९७, ८). या नांवाचे ऋषी. पूर्वोक्त ऋचेचे द्रष्टे. प्रत्यक्ष संबंध नाहीं.

**वृषणश्वः**–(१. ५१, १३). इंद्र, वृषणश्वाची मेना नामक कन्या झाला. प्रत्यक्ष संबंध नाहीं.

**वृष्टिहव्यः**–(१०. ११५, ९). वृष्टिहव्य नामक ऋषीचे पुत्र उपस्तुत हे अग्नीची स्तुति करितात, असा उल्लेख. उपर्युक्त सूक्ताचा द्रष्टा उपस्तुत आहे. प्रत्यक्ष संबंध नाहीं.

वेतसुः–द्योतन व तुग्र यांचा विरोधी. द्योतन, तुग्र पहा. इंद्रानें तुग्र, स्मदिभ व वेतसु यांचा कुत्साकरितां पराभव केला (१०. ४९, ४). वेतसूंचा उल्लेख (४. ५८; ६. २०; २६; १०. ४९) या ठिकाणीं आहे.

वेनः–पृथी अथवा पृथु याचा पिता. पृथु याला वैन्य–वेनपुत्र म्हटलें आहे. दुःशीम, पृथवान, राम पहा.

वेशः–(१०. ४९, ५). आयूचा विरोधी. इंद्रानें आयूकरितां वेश नामक असुरास बांधिलें. आयुसंबंध पहा.

वैकर्णः–(७. १८, ११). एका जातीचे लोक. सुदामदान्, सुदासानें वैकर्ण नामक एकवीस राजांचा पराभव केला.

वैदथिनः–विदथिन्‌चा मुलगा. ऋजिश्वन्‌चें दुसरें नांव. लुडविग मतानें औसिज–ऋजिश्वा व वैदथिन्–ऋजिश्वन् हे एकच होत. कक्षीवानासहि 'औसिज कक्षीवान्' म्हटलें आहे (१. १८. १). यावरून कक्षीवान् व ऋजिश्वन् हे भाऊभाऊ असून उशिजेचे पुत्र असावे. ऋजिश्वन्, पिप्रु व शंबर यांचे संबंध पहा. वैदथिन्‌चा उल्लेख (४. १६; ५. २९) येथें आहे.

वैददश्विः–(५. ६१, १०). अनुक्रमणीप्रमाणें तरंत व पुरुमीळ्ह हे विददश्वीचे मुलगे. या दोघांना वैददश्वि म्हटलें आहे. हे श्यावाश्वाचे आश्रयदाते होते. तरंत व पुरुमीळ्ह पहा.

वैन्यः–(८. ९, १०) वेनपुत्र. वेन पहा. पृथी अथवा पृथु हा वेनपुत्र होता. या पृथूचेंच नांव वैन्य.

वैयश्वः–(८. २३, २४). व्यश्वपुत्र विश्वमनस् याचेंच दुसरें नांव. याचा (८. २४, २३) या ठिकाणीं आणखी उल्लेख आहे. *विश्वमनस् पहा.*

वैशंतः–(७. ३३, २). सायण याचा मनुष्यवाचक अर्थ करीत नाहींत. लुडविगमतानें वेशान्त हेंहि याचेंच नांव असावें व हा पृथुपर्शूचा पुरोहित असावा. मॅक्डोनल मतानें हा राजा असून याच्या यज्ञास गेलेल्या इंद्राला वसिष्ठानें सुदासाकडे आणिलें. ग्रिफिथ म्हणतो 'वैशंत नामक नदी असून त्या नदीवरून पाशद्युम्नाच्या यज्ञास गेलेल्या इंद्राला वसिष्ठानें सुदासाकडे आणिलें.'

व्यश्वः–वैयश्व अथवा विश्वमनस् याचा पिता. व्यश्वाचा उल्लेख (८. २३, २३; २४ ९. ६९, ७) या ठिकाणीं आहे. *विश्वमनस् पहा.*

व्यंसः–(२. ११, ५). सायण याचा 'अंसरहित' असा अर्थ करतो. ग्रिफिथमतानें हा इंद्रशत्रु असून इंद्रानें पिप्रु व शुष्ण *यांच्या बरोबर व्यंसाचा वध केला. पिप्रु, शंबर पहा.*

शकपूतः–(१०. १३२, ५) *या सूक्ताचा हा द्रष्टा असून* अनुक्रमणीप्रमाणें नृमेधपुत्र आहे. या सूक्ताच्या शेवटच्या ऋचेंत तो 'नृमेधाप्रमाणें माझें रक्षण करा' असी मित्रावरुणांची प्रार्थना करतो. नृमेध व जरूथ पहा.

शंडीकः–(२. ३०, ८). सरस्वती नदीतीरावर राहणारे लोक. लुडविग मतानें या शंडीक लोकांचा ग्रुह्यदस् हा राजा होता. सूक्तद्रष्टा गृत्समद म्हणतो 'इंद्रानें सरस्वती नदीतीरावरील शंडीकांच्या मुख्याला मारिलें. *कदाचित् शंडीक गृत्समदाच्या जवळच्या कालांतील* असावे.

शतयातुः–(७. १८, २१). वसिष्ठाचा मुलगा शक्ति याचें हें नांव असें कांहींचें मत आहे. व कांहींच्या मतानें पराशर व शतयातु ही वसिष्ठाचींच नांवें असावीं. उपर्युक्त ऋचेंत पराशर शतयातु व वसिष्ठ याचा एकत्र उल्लेख आहे. सायणमतानें पराशर *व शतयातु हीं वसिष्ठाचीं विशेषणें आहेत.*

शंतनुः–(१०. ९८, १). देवापीचा भाऊ. यानें आपला भाऊ देवापि याला यज्ञार्थ (पर्जन्य पडण्यासाठीं) आर्त्विज्य दिलें होतें. देवापि पहा.

शंबरः–(४. २६, ३.). दिवोदास शत्रु. दिवोदासाकरितां इंद्रानें शंबरास मारिलें. शंबराचा उल्लेख असलेलीं सूक्तें (१. ५१; ५४; ५९; १०१; १०३; १३०; २. १२; १४; १९; ४. २६; ३०; ६. १८; २६; ३१; ४३; ४७; ७. १८; ९९; ९. ६१) इत्यादि.

शयुः–याला अश्वींनी दुभती गाय दिल्याचा उल्लेख (१. ११२; ११६; ११७; ११८; ११९; ६. ६२; ७. ६८; १०. ३९) असा अनेक स्थळीं आहे. प्रत्यक्ष संबंध नाहीं.

शरआर्चत्कः–आर्चत्काचें नांव. आर्चत्क पहा. प्रत्यक्ष संबंध नाहीं.

शरभः–(८. १००, ६). इंद्रानें शरभाला धन दिल्याबद्दल सूक्तद्रष्टा भृगुपुत्र नेम उल्लेख करतो. प्रत्यक्ष संबंध नाहीं.

शविष्ठः–सायणमतानें श्रुतर्वन् आर्क्ष याचें विशेषण. लुडविग मतानें एक मनुष्य. सूक्तद्रष्टा गोपवन म्हणतो 'अश्वी देव ज्याप्रमाणें तुम्हाला वाहून नेतात त्याप्रमाणें शविष्ठाचे चार घोडे मला वाहून नेतात (८. ७४, १४). *या गोपवनाचा आर्क्ष-श्रुतर्वण हाहि आश्रयदाता होता (८. ७४, १३) आणि आर्क्ष व इंद्रोत* हे प्रियमेधाचे आश्रयदाते होते. ऋक्षसूनु, गोपवन व प्रियमेध पहा. *शविष्ठ ही व्यक्ति मानिल्यास ती तुग्रानंतरची ठरते.*

शशीयसी–(५. ६१, ६). अनुक्रमणीप्रमाणें तरंताची स्त्री. तरंत व पुरुमीळ्ह पहा.

शश्वती–(८. १, ३४). आसंगाची स्त्री. आसंग पहा.

शंडः–(६. ६३, ९). भरद्वाजाचा आश्रयदाता. भरद्वाज शंडाजवळून रथ व घोडे दान मिळाल्यानें वर्णितो. भरद्वाजसंबंध पहा.

शातवनेयः–(१. ५९, ७). पुरुणीथ व भरद्वाज यांच्यासह उल्लेख. 'भरद्वाजानें ज्या अग्नीला हवि अर्पिला त्या अग्नीची शातवनेय व पुरुणीथ स्तुति करतात.' कदाचित् शातवनेय व पुरुणीथ ही

एकच व्यक्ति असून त्या व्यक्तीचा भरद्वाज आश्रयदाता असावा. पुरुमीळ्ह पहा.

शार्यातः-( १. ५१, १२ ) मध्यें सूक्तद्रष्टा आंगिरसपुत्र सव्य म्हणतो ' इंद्रा तूं आमच्या येथें सोमपान करतोस त्याचप्रमाणें शार्याताच्या येथेंहि कर. यावरून शार्यात व सूक्तद्रष्टा हे समकालीन असावे. हा सूक्तकार याच सूक्तांतील ६ व्या ऋचेंत इंद्रानें अतिथिग्वाकरितां शंबरास मारल्याचा उल्लेख करीत असल्यामुळें सूक्तकार अतिथिग्वानंतरचा ठरतो. ( ३. ५१, ७ ) येथें सूक्तद्रष्टा विश्वामित्र ' शार्याताच्या येथें सोम प्यालास तसा आमच्या येथें सोम पी ' असें म्हणतो. शार्यात विश्वामित्र समकालीन.

शिग्रुः-सुदासशत्रु. अज, यक्षु, आणि शिग्रु यांनीं( युद्धांत शरण आल्यानंतर ) इंद्रास अश्वशिरांचा बलिअर्पण केला ( ७. १८, १९ ).

शिंजारः-( ८. ५, २५ ). सूक्तद्रष्टा कण्वकुलोत्पन्न ब्रह्मातिथि म्हणतो ' अश्वीहो कण्व, प्रियमेध, उपस्तुत, अत्रि आणि शिंजार यांचें रक्षण केलें त्याप्रमाणें माझें रक्षण करा. ' सूक्तद्रष्ट्याचा चेदि कशु हा आश्रयदाता होता. कण्व व अत्रिसंबंध पहा.

शिम्युः-( ७. १८, ५ ). सुदासशत्रु. सुदासाकरितां इंद्रानें शिम्यूस मारिलें.

शिरिंबिठः-(१०. १५५, १). हा या सूक्ताचा द्रष्टा आहे. तो अलक्ष्मीस दूर घालवूं इच्छितो. अनुक्रमणी याला भरद्वाजपुत्र म्हणते. याशिवाय अधिक संबंध नाहीं.

शिवासः-( ७. १८, ७ ). सुदासशत्रु. पक्थ, भलानस्, विषाणिन्, अलिनास् व शिवास् हे सुदासशत्रु होते असा पूर्वोक्त ऋचेंत उल्लेख आहे.

शीष्टः-( ८. ५३, ४ ). ग्रिफिथमतानें एका जातीचे लोक. प्रत्यक्ष संबंध नाहीं.

शुनःशेपः-अनुक्रमणीप्रमाणें विश्वामित्रपुत्र व ( १. २४-३० ) या सूक्तांचा द्रष्टा. वरील सूक्तांपैकीं सूक्त २४ यांतील १२ व १३ या ऋचांमध्यें शुनःशेपाचा उल्लेख आहे. यूपाला बांधलेला शुनःशेप मुक्त होण्यासाठीं वरुणाची प्रार्थना करतो. असाच अर्थाचा आणखी उल्लेख( ५. २, ७ ) याठिकाणीं आहे. अनुक्रमणीप्रमाणें तो विश्वामित्रपुत्र आहे. याशिवाय दुसरा संबंध नाहीं.

शुष्णः-( २. १९, ६ ). इंद्रानें आपलें सारथ्य करणाऱ्या कुत्साकरितां शुष्णाचा वध केला आणि दिवोदासाकरितां शंबराचीं नगरें फोडिलीं. शुष्णाचा आणखी उल्लेख ( १. ११; ३३; ५१; ५६; ६३; १०१; १०३; १२१; १७५; २. १४; १९; ३. ३१; ४. १६; ३०; ५. २९; ३१; ३२; ६. १८; २०; २६; ३१; ७. १९; ८. १; ६; ४०; ५१; ९६; १०. २२; ४९; ९९; १११ ) या सूक्तांमधून आहे.

शंगाश्वः-( ८. १७, १३ ). सायणमतानें एका ऋषीचें नांव. प्रत्यक्ष संबंध नाहीं.

शौचद्रथः-( ५. ७९, २ ). वाय्य-सत्यश्रवस याच्या बरोबर उल्लेख. सूक्तद्रष्टा वाय्य म्हणतो. 'उषे, ज्याप्रमाणें सुनीथ-शौचद्रथास प्रकाश दिलास त्याप्रमाणें मला प्रकाश दे' शौचद्रथ वाय्य याचा समकालीन असावा. वाय्य व वय्य पहा.

शौरदेव्यः-( ८. ७०, १५ ). ग्रिफिथमतानें एक व्यक्ति. प्रत्यक्ष संबंध नाहीं.

श्यावः-( १. ११७, २४ ). असुरांनीं छिन्नविच्छिन्न केलेल्या श्यावाला अश्वींनीं पूर्ववत् केलें. श्यावाला अश्वींनीं रुशती नामक स्त्री दिल्याचा उल्लेख ( १. ११७, ८ ) येथें आहे. सायणमतानें श्याव व श्यावाश्व हे एकच आहेत. सायणांनीं ( ५. ६१, ९ ) येथें श्याव याचा श्यावाश्व असा अर्थ केला आहे. या सूक्ताचा द्रष्टा श्यावाश्व असून तो तरंत, पुरुमीळ्ह यांच्यापासून दान मिळाल्याचें या सूक्तांत वर्णितो. सूक्त ( १०. ६५, १२ ) मध्ये वध्रिमती नामक स्त्रीला अश्वीदेवांनीं श्याव नामक पुत्र दिला असा उल्लेख असून सायणांनीं तेथें श्याव हें हिरण्यहस्त याचें विशेषण केलें आहे, आणि अश्वींनीं वध्रिमतीला हिरण्यहस्त नामक पुत्र दिला असाहि स्पष्ट उल्लेख आहे. यावरून सायणमतानें श्याव, श्यावाश्व आणि हिरण्यहस्त हे एकच होत. श्यावाश्व हा तरंत व पुरुमीळ्ह यांचा पुरोहित होता. ( ८. १९, ३७ ) येथें श्यावाचा उल्लेख असून त्याचा सायणांनीं 'श्यामवर्ण' असा अर्थ केला आहे. मॅक्डोनलमतानें हा कोणी सुवास्तु नदीकांठीं राहणारा मनुष्य असावा.

श्यावकः—( ८. ४, २ ). रुम, रुशम यांच्याबरोबर उल्लेख. सूक्तद्रष्टा कण्वकुलोत्पन्न देवातिथि म्हणतो; 'इंद्रा, रुशम, श्याव आणि कृप यांच्या येथे सोमपानानें हर्षित होतोस त्याप्रमाणें ( हर्षयुक्त होण्यास ) आमची स्तोत्रें तुला आणोत.' रुम, रुशम, पहा. श्यावकाचा आणखी उल्लेख ( ८. ३ ) या सूक्तांत आहे.

श्यावाश्वः—तरंत, पुरुमीळ्ह, यांचा पुरोहित. अथवा यांच्यापासून दान घेणारा. याला तरंतानें आपली कन्या दिली. अनुक्रमणीप्रमाणें तो अर्चनानस्चा मुलगा होता. श्यावाश्वाचा उल्लेख ( ५. ५२; ८१; ८. ३५; ३६ ३७; ३८ ). या सूक्तांतून असून ( ५. ५२-६१ व ८. ३५-३८ ) या सूक्तांचा तो द्रष्टा आहे. तरंत पुरुमीळ्ह पहा.

श्रुतकक्षः—( ८. ९२, २५ ). हा अश्व व गाई यांच्या प्राप्तीसाठीं इंद्राची स्तुति करतो. या सूक्ताचा हा द्रष्टा आहे. अनुक्रमणी याला 'आंगिरसकुलोत्पन्न' म्हणते. प्रत्यक्ष संबंध नाहीं.

श्रुतरथः-( १. १२२, ७ ). पज्रीयानाचा आश्रयदाता. कक्षीवान व प्रियरथ पहा.

श्रुतर्यः-( १. ११२, ९ ). नर्य, कुत्स यांच्यासह उल्लेख. अश्वींनीं श्रुतर्य, नर्य, कुत्स यांचें रक्षण केलें. नर्य संबंध पहा. प्रत्यक्ष संबंध अनिश्चित.

श्रुतर्वणः–आर्क्ष. याचेंच नांव ऋक्षसूनु (८. ७४, ४, १३). ऋक्षसूनु पहा. श्रुतर्वनाचा आणखी उल्लेख ( १०. ४९, ५ ) या ठिकाणीं आहे.

श्रुतवित्‌ः–(५. ४४; १२). सदापृण, बाहुवृक्त, तर्थ, यजत, इत्यादिकांबरोबर उल्लेख आहे. याच सूक्ताच्या १० व्या ऋचेंत यजताबरोबर अवत्साराचा उल्लेख आहे. सूक्तद्रष्टा अवत्सारच आहे. प्रत्यक्ष संबंध कोणाचाच नाहीं. अवत्सार पहा.

श्रुष्टिगुः–(८. ५१, १). पुष्टिगु यासह उल्लेख. या सूक्ताचा द्रष्टा श्रुष्टिगु म्हणतो, "इंद्रा तूं संवरण मनु, नीपातिथि, मेध्यातिथि, पुष्टिगु, श्रुष्टिगु यांच्यासह सोम प्यालास." नीपातिथिसंबंध पहा.

श्वैत्रेयः–( १. ३३, १४). इंद्रानें युद्धांत कुत्साचें आणि दशद्युचें रक्षण केलें व श्वैत्रेयास उद्धरिलें. लुडविग याला ' कुत्साचा मुलगा' असें म्हणतो, व कांहींच्या मतानें श्वैत्रेय हे भुज्यूचेंच नांव असावें. श्वैत्रेयाचा आणखी उल्लेख ( ५. १९, ३ ) येथें आहे.

संवरणः–लक्ष्मण्याचा पुरोहित. लक्ष्मण्य पहा.

सत्यश्रवसः–वाय्य याचें दुसरें नांव. वाय्य पहा.

सदापृणः–श्रुतवित्‌ पहा. प्रत्यक्ष संबंध नाहीं.

सप्तिः–एवावद व यजत पहा. प्रत्यक्ष संबंध नाहीं.

सप्तगुः–आंगिरसकुलज. (१०. ४७) या सूक्ताचा द्रष्टा. या सूक्ताच्या शेवटच्या ऋचेंत याचा उल्लेख असून तो आपणास आंगिरस म्हणवितो. प्रत्यक्ष संबंध नाहीं.

सप्तवध्रिः–(५. ७८, ६ ). याला याच्या भावानें पेटींत कोंडून ठेवलें असतां तेथून सुटण्याबद्दल तो अश्वींची स्तुति करतो. 'अत्रीला जसें सोडविलें तसें मला सोडवा' असे तो म्हणतो. यावरून तो अत्रीच्या नंतरचा असावा. हा ( ५. ७८; ८. ७३; १०. ३९; ) या सूक्तांचा द्रष्टा असून या सूक्तांत याचा वरील अर्थानेंच उल्लेख आहे.

ससः–(५. २१, ४ ) या सूक्ताचा हा द्रष्टा आहे. अनुक्रमणीप्रमाणें हा अग्निकुलोत्पन्न आहे. याशिवाय प्रत्यक्ष संबंध नाहीं. विश्वसामन्च्या उल्लेखामुळें सूक्त उत्तर.

सहदेवः–ऋज्राश्व, भयमान, सुराधस् व अंबरीष यांच्यासह उल्लेख. वृषागिरपुत्र. वार्षागिर पहा.

सांवरणः– अथवा सावर्णि (८. ५१, १ ). याला अनुक्रमणी मनुपुत्र म्हणते. सावर्णीचा उल्लेख (१०. ६२ ) या सूक्तांत आहे. दाशराज्ञ युद्धांतील व्यक्तींशीं संबंध नाहीं.

साप्यः–नमीचें दुसरें नांव. नमी पहा. प्रत्यक्ष संबंध नाहीं.

सार्ञ्जयः–(६. ४७, २५). संजयपुत्र. सायणमतानें प्रस्तोकाचें नांव. प्रस्तोक हें दिवोदासाचें नांव. प्रस्तोक पहा.

सुतंभरः–हा (५. ११-१४) या सूक्तांचा द्रष्टा आहे. या सूक्तांत याचा उल्लेख नाहीं. ( ५. १३, ६ ) या ठिकाणीं हा परिचर्या करणारे नहुषपुत्र सेवोत' असा उल्लेख करतो. (५. ४४) येथें सुतंभराचा उल्लेख आहे. या सूक्ताचा द्रष्टा अवत्सार हा सुतंभराला यागनिर्वाहक व दाता म्हणतो. यावरून सुतंभर, नहुष व अवत्सार हे समकालीन असावे.

सुदक्षः–(८. ९२, ४), श्रुतकक्ष नामक सूक्तद्रष्टयाच्या सूक्तांत उल्लेख. श्रुतकक्ष म्हणतो, 'सुदक्षाच्या येथें इंद्र सोम प्याला' प्रत्यक्ष संबंध नाहीं.

सुदासः–दाशराज्ञ युद्धांतील मुख्य. सुदासाचा उल्लेख ( १. ४७ ६३; ११२; ३. ५३; ५. ५३; ७. १८; १९; २०; २५; ३२; ३३; ५३; ६०; ६४; ८३; ) या सूक्तांत आहे.

सुदीतिः–(८. ७१, १४; ). पुरुमीळ्ह समकालीन. सुदीति आपणास उत्तम गृह मिळण्याबद्दल याचना करण्यास पुरुमीळ्हास सांगतो. पुरुमीळ्ह पहा.

सुदेवः–( ८. ५, ६ ). 'सुदेवाकरितां गाईच्या गोठयांत उदकसेचन करा' अशी सूक्तद्रष्टा अश्वींची प्रार्थना करतो. सूक्तद्रष्टा ब्रह्मातिथि असून तो याच सूक्तांत चैद्य–कशु याच्या जवळून धन मिळाल्याचें वर्णितो. सायणानीं सुदेव शब्द हविर्दात्याचें विशेषण म्हणून घेतला आहे. परंतु लुडविग तें विशेषनाम मानितो. कशु व कण्व पहा.

सुपित्र्यः–लुडविगमताप्रमाणें एक मनुष्य व सायणमताप्रमाणें अग्नीचें विशेषण. वृहद्दिव नामक सूक्तद्रष्टयाच्या सूक्तांत उल्लेख ( १०. ११५, ६ ) आहे. प्रत्यक्ष संबंध नाहीं.

सुमित्रः–( १०. १०५, ११ ). या सूक्ताचा द्रष्टाहि सुमित्रच आहे. तो आपणास कुत्सपुत्र म्हणवितो. कुत्स पहा.

सुमीळ्हः–( ६. ६३, ९ ). भरद्वाजाचा आश्रयदाता. सुमीळ्हापासून शंभर गाई मिळाल्याचें भरद्वाज वर्णितो. भरद्वाज संबंध पहा.

सुराधसः–( १.१००,१७). ऋज्राश्वासह उल्लेख. ऋज्राश्व पहा.

सुश्रवसः–( १. ५३, ९ ). ज्याच्या विरुद्ध युद्धास वीस राजे उभे होते अशा साहाय्यरहित सुश्रवसूचें इंद्रानें रक्षण केल्याचें सूक्तद्रष्टा सव्य उल्लेखितो. कदाचित्‌ हा दाशराज्ञांपैकीं असावा.

सुषामनः–वरोसुषामन्‌ पहा.

सृंजयः–तुर्वशासु इंद्रानें तुर्वशाला संजयाच्या ताब्यांत दिलें ( ६. २७, ७ ). याचेंच दैववात हें नांव आहे ( ४. १५, ४ ). संजय हें नांव एका जातीच्या लोकांचें होतें असें मॅकडोनलचें मत आहे.

सृबिंदः–( ८. ३२, २ ). सूक्तद्रष्टा मेधातिथि इंद्रानें सृबिंद व पिप्रु यांचा वध केल्याचें उल्लेखितो. कदाचित्‌ पिप्रु आणि सृबिंद समकालीन असावे. पिप्रुसंबंध पहा.

सोभरिः–सर्वानुक्रमणीप्रमाणें ( ८. १९-२२व८. १०३ ) या सूक्तांचा द्रष्टा आहे. वरील सूक्तांपैकीं सूक्त २१ शिवाय सर्व सूक्तांत याचा उल्लेख आहे. अनुक्रमणी याला काण्व ( कण्वकुलोत्पन्न ) म्हणते. ( ८. १९, ३६ ) येथें तो आपणास त्रसदस्यूपासून पन्नास वधू मिळाल्याचें उल्लेखितो. शिवाय ऋचा ( ३२; ) मध्यें तो पस्त्याचा व ( १०३, २ ) मध्यें दिवोदासाचा उल्लेख करितो. त्रसदस्यु व दिवोदास पहा. सोभरि हें कुलनाम असावें. ( ८. १९, ३२; २०; ) या ठिकाणीं सोभरींचा बहुवचनीं उल्लेख आलेला आहे. सोभरींचा आणखी उल्लेख ( ८. ५ ) या सूक्तांत आहे.

नृमद, पठर्वा, पड्गृभि, पणि, परमज्या, पराधृज, पाकस्थामन्, पारावत, पिठीनस, पिप्रु, पुरुमाय, पुरुमित्र, पुरुमीळ्ह, पुरुवाति, पुष्टिगु, पृथवान, पृदाकुसानु, पृश्निगु, पेदु, प्रथिन्, बाहुवृक्त, बृसय, भयमान, भृगु, मनस्, मन्धातृ, मुद्गल, मुद्गलानी, मेध, मेना, यजत, रथवीति, रुधिक्रा, रेभ, वत्स, वध्रिमति, वन्दन, वरोसुषामन्, वनि, वसुरुच्, वसुरोचिष्, वस्रु, वातरशना, वार्षागिर, विमद, विशिशिप्र, विश्वक, विश्ववार, विश्वसामन्, विष्णापु, वृक्द्वरस्, वृचगण, वृषणश्व, वृष्टिहव्य, वैददश्वि, व्यश्व, शयु, शर, शरभ, शशीयसी, शिंजार, शिरिंबिठ, शीष्ट, शृगवृष, शौरदेव्य, श्याव, श्यावाक, श्रुतकक्ष, श्रुतर्य, श्रुतवित्, सदापृण, सध्रि, सप्तगु, सप्तवध्रि, सस, सहदेव, सावरण, साप्य, सुदक्ष, सुदीति, सुदेव, सुपित्र्य, सुराधस्, सुश्रवस्, सुषामन्, सृबिंद, स्यूमरश्मि, स्वनय, स्वश्व, हरयाण.

वरील विवेचनात एक गोष्ट गृहीत धरली आहे आणि ती ही कीं सर्वानुक्रमणी हा ग्रंथ प्रामाणिक होय सर्वानुक्रमणीच्या विश्वसनीयतेची तपासणी झाली पाहिजे ती तपासणी व्हावयाची म्हणजे ज्या सूक्तकाराच्या नावावर विशिष्ट सूक्त पडलें असेल तें त्यानेंच केलें आहे किंवा काय हें ठरविणें

शातापर्यंत दिलेल्या विवेचनावरून दाशराज्ञ युद्ध हें ऋग्वेदमंत्रातील अत्यंत जुन्या मंत्राच्या अगोदर अनेक दशकें किंवा शतकें होऊन गेलें असावें अशी आमची खात्री झाली आहे जे सूक्त आम्हास दाशराज्ञ युद्धानंतरचें ठरविता आलें नाहीं तें युद्धापूर्वीचे आहे असेंहि सिद्ध होत नाहीं आम्ही आमच्या स्वतःची खात्री पटवून घेण्याकरितां जो शोध केला तो येथें मांडला आहे, आणि दाशराज्ञ युद्धापूर्वीची एक ओळ तरी ऋग्वेदांत आहे किंवा नाहीं असा संशय आम्ही व्यक्त करतों

दाशराज्ञ युद्ध हें हिंदुस्थानच्या इतिहासातील बरेंच उत्तरकालीन वृत्त होय म्हणजे वेद हें हिंदुस्थानच्या इतिहासातील बऱ्याच उत्तरकालचें वाङ्मय आहे

**ऋग्वेदमंत्रांतील इतिहास.**- ऋग्वेदाच्या मंत्रात जो इतिहास आहे तो अगदीं पहिल्या आर्यन् वसाहतीचा नाहीं, हें मागें सांगितलेंच आहे याविषयींचीं प्रमाणें थोडक्यात पुढें दिल्याप्रमाणे आहेत

१ भरतांचें हिंदुस्थानांत आगमन —दाशराज्ञ युद्ध असें राजकीय स्वरूप दाखवितें कीं, सुदास व दिवोदास हे पूर्वी वसलेल्या मुलखांत प्रवेश करीत आहेत आणि यदुतुर्वशांसारख्या जुन्या बलवान् राजांशीं युद्ध करीत आहेत दिवोदास, सुदास येतात ते पृथुपर्शूंसारख्या परक्या लोकांचें साहाय्य घेऊन येत आहेत अर्थात् ज्या राज्यांशीं ते युद्ध करीत आहेत तीं राज्यें पूर्वी अनेक वर्षे स्थापित झालीं असलीं पाहिजेत.

२ मंत्रपूर्वकालीन पुरोहितांचें वर्चस्व —जुन्या राज्यामध्यें पुरोहित संस्था इतक्या उत्तम तऱ्हेनें प्रस्थापित झाली होती कीं, त्यांची सत्ता राज्यकारभार उपयोगी पडे पुरोहितासारख्या राज्यातील बऱ्या मनुष्याचें साहाय्य घेऊन राज्य काबीज करण्याची शक्यता अशा काळांत संभवते कीं, जेव्हा राज्य प्रस्थापित होऊन बराच काळ लोटला असतो व राजाच्या सैनिकधुरीणत्वामुळें उत्पन्न होणारें सर्वाधिकारीत्व थोडेसें तरी दुर्बल झालेलें असतें जेथें प्रदेश बराच वसला आहे व थोडी बहुत तरी शांतता नांदू लागली आहे, तेथेंच पुरोहितास प्रजेवर वजन वाढवून आपलें बस्तान चांगलें बसविता येतें अशीच परिस्थिति मंत्रपूर्व दाशराज्ञयुद्ध दाखविते.

३ वेद दाशराज्ञ युद्धपूर्वस्थितीचे द्योतक नाहींत —संपूर्ण वेद दाशराज्ञयुद्धोत्तर असल्यामुळें ते दाशराज्ञयुद्धकालीन स्थितीचेहि द्योतक नाहींत अर्थात् ते तत्पूर्व यदुतुर्वशांच्या स्थापनेच्या कालाचे द्योतक कोठून असणार ? यदुतुर्वशांनीं देखील पूर्वेकडील राजास पंजाबातून हाकलून आपली सत्ता प्रस्थापित केली असली पाहिजे.

यदुतुर्वश हे बोलून चालून पश्चिमेकडील राजे होते अधिक पूर्वेकडील राजे हिंदुस्थानात याच्याहि पूर्वी आले असले पाहिजेत

ते ज्या काळांत हिंदुस्थानात आले तो इतिहास ऋग्मंत्रात येणें मुळींच शक्य नाहीं

४ आर्यांचें हिंदुस्थानातील वास्तव्य भरतपूर्वकालीन आहे -मंत्रात भरताच्या देखील प्रवेशाचें चित्र स्पष्ट नाहीं तें उत्तरकालीन आठवणी गोळा करून रचावयाचें आहे भरताच्या प्रवेशाच्या अगोदर देश किती वसला होता आणि तो कोणत्या प्रकारच्या लोकांनीं वसला होता म्हणजे ते लोक आर्यन् होते किंवा नव्हते हा पुढचा प्रश्न आहे याला उत्तर असें आहे कीं, भरत येण्याच्या पूर्वी आर्यन् महावंशात मोडतील अशा जातींचें वास्तव्य देशात झालेलें होतें कदाचित् पूर्व बंगाल व महाराष्ट्र वगळून आज आर्यन् भाषा बोलणारा जेवढा प्रदेश आहे तेवढा बहुतेक आर्यन् जातींनींच व्यापला होता केवळ हिंदुस्थानांतील प्रदेशच नव्हे तर लंकेसारखा प्रदेश देखील त्या काळीं आर्यन् लोकांच्या वंशानीं वसला असावा, या कल्पनेच्या शक्यतेस साधक पुरावा पुढील परिच्छेदात दिला आहे.

५ दाशराज्ञयुध्दपूर्व इतिहास लिहिण्यास साहित्य -वेद जर आपणास दाशराज्ञयुद्धपूर्व कालापर्यंत पोंचवीत नाहीत, तर आपणापुढें असा प्रश्न उपस्थित होतो की या दाशराज्ञयुद्धपूर्वकालाचा इतिहास लिहिण्यास आपणापाशीं कांहीं साहित्य आहे किंवा नाहीं आमच्या मते साहित्य आहे, आणि तें साहित्य म्हटलें म्हणजे पुराणातील व भारतांतील कुरुयुद्धपूर्व राजांचे इतिहास होत सुदासाचा संबंध पुराणातील वंशावळ्याप्रमाणें बऱ्याच उत्तरकाळाशीं पोंचतो पुराणांच्या मताप्रमाणें दाशरथी राम व नल राजा, हे सुदासाच्या बरेच अगोदरचे राजे होत त्या वेळची राजमालिका व कथा घेतल्या तर बहुतेक हिंदुस्थान शासनसंस्थांनीं युक्त व बरेंच सुधारलेलें असें दिसतें भीमक हा विदर्भांचा राजा होता, म्हणजे सध्याचा महाराष्ट्र उर्फ प्राचीन काळचें दंडकारण्य हीं वगळली तर उरलेला भाग वसलेला होता असें दिसून येईल रामानें लंका जिंकली ती चांगला

वसलेली व संपन्न होती असें दिसतें. जैन रामायण किंवा कन्नड रामायण हीं रामकथेच्या मुख्य भागांना विरोध करीत नाहींत.

६ शकमगांची वसति मंत्रकर्त्या लोकांपूर्वीची असावी — भरत येण्यापूर्वी देशांतील वसती अगदीं एकाच स्वरूपाची असेल असें नाहीं तर शक आणि मग या जातीहि भारतात मंत्रकर्त्या लोकांच्या, म्हणजे ज्यांना आर्यन् म्हणण्याचा प्रचार आहे त्या लोकांच्या अगोदर येऊन राहिल्या असाव्यात. ही गोष्ट कीकटांत प्रवेश करू पाहणाऱ्या आणि इंद्राचा द्वेष करणाऱ्या मगंदास लुटण्याची मसलत करणाऱ्या विश्वामित्राच्या सूक्तावरून लक्षात येईल.कीकटास पुढें मगध म्हणूं लागले. मगध शब्दाची व्युत्पत्ति पतंजलि ' मगांस धारण करतो तो मगध ' अशी करितो. ' मग ' याचा अर्थ पतंजलि बरेंच पांडित्य करून पाप असा जो काढतो तो अनवश्यक ठरवून मागी रूपें मग लोक असा केला पाहिजे असें राजवाडे सांगतात. 'मग ' इंद्रास देवांत पाळतात हें स्पष्ट आहे, आणि त्यामुळें मगंद म्हणजे मगानुयायी इंद्रास पायस देत नाहींत म्हणून विश्वामित्राची तक्रारहि बरोबरच आहे. तैत्तिरीय संहितेच्या कालीं मागध म्हणजे मगधांतील लोक हें नांव निश्चित झालें होतें मगधांतील लोकास जर मागध हें नांव निश्चित झालें होतें तर मगध शब्द त्याहून जुना असला पाहिजे, आणि देशाला मगध नांव पडण्यापूर्वी मगांची वसती तेथें बरींच वर्षे अगोदर झाली असली पाहिजे

७ प्राचीन मगाचे वसतिस्थान —आम्हांला असें मात्र वाटतें कीं, आज जेथें मगधकर्फ कीकट आहे तेथेंच प्राचीन कीकटांची किंवा मगांची वसती नसावी, तर ती बरीच पश्चिमेकडे असावी. का कीं, ऋग्वेदांत सरस्वतीच्या पूर्वेकडील प्रदेशाचे किंवा नद्यांचे उल्लेख फारसे आढळत नाहींत. कीकट आणि त्यांच्या देशांतील मगंद या दोघांनाहि पुढें पूर्वेकडे कोणीतरी ढकललें असावें.

मगंद हे कोण असावेत ? हे शाक्य असावेत असें वाटतें. शाक्यांचे उपाध्ये मग असत ही गोष्ट सर्वप्रसिद्ध आहे गौतम हा आपणास शाक्य म्हणवी, कीकटांत जन्मलेला म्हणून म्हणवी, त्याला आपल्या अनेक पिढ्यांचा इतिहास ठाऊक होता असें तो दाखवी, तथापि आपण परक्या देशांतून आलों असूं अशी त्यास कल्पनाहि दिसत नाहीं. यावरून आणि नवीन आलेल्या टोळीस एकदम देशाच्या पूर्वेकडील कोपऱ्यांत शिरकाव करून राज्य स्थापण्याच्या अशक्यतेमुळे शकमगांचें आगमन मंत्रपूर्वकालात घातल्याशिवाय गत्यंतर नाहीं.

८ मंत्रपूर्व संस्कृति – मंत्रपूर्व संस्कृति आर्यन् असावी पण ब्राह्मणी नसावी याला प्रत्यक्ष प्रमाण म्हणजे भारतें आर्यन् परंतु ब्राह्मणजातिविहीन अशा समाजाचें अस्तित्व होय मंत्रकालीन आर्यन् लोकांनीच जर पुढें हिंदुस्थान वसविला असता तर त्या लोकांचा जेथें जेथें प्रसार झाला तेथें तेथें तो सब्राह्मण झाला असता, एवढेंच नव्हे तर त्यांचे ब्राह्मण कोणत्या तरी विशिष्ट वेदाचे आहेत अशा स्थितींत झाला असता. ब्राह्मणांच्या जातीची अशी स्थिति आहे कीं, अग्निहोत्रादि क्रियानुरूप विशिष्टीकरण झाल्यानंतर ऋत्विक्सवाच्या ज्या त्या जाती बनल्या म्हणजे अगोदर ब्राह्मणजात पृथक् बनली आणि तिचे पुढें वेदाप्रमाणें तुकडे पडले असे नसून, अगोदर समुच्चयांचें शिक्षणामुळें विशिष्टीकरण झालें आणि ते विशिष्टीभूत झालेले संघ जातित्वास पावले अशी परिस्थिति असल्यामुळें जेथें जेथें मात्र संस्कृतीचे लोक गेले असते तेथें तेथें ते सब्राह्मण गेले असते एवढेंच नव्हे, तर ते ज्या ब्राह्मणाबरोबर गेले असते ते ब्राह्मण विशिष्ट वेदाचे किंवा शाखेचे असते.

९ भारतीय संस्कृतीचा ब्राह्मणहीन भाग —आर्यन् भाषेचा परंतु ब्राह्मणहीन असा भाग थोडा थोडका नाहीं. संबंध सिंहलद्वीपांतील सिंहलीसमाज असा तऱ्हेचा आहे. सिंहलद्वीपामध्ये भारतीयांचें गमन अर्वाचीन शोधक समजतात त्याप्रमाणें खिस्तपूर्व सातव्या शतकात झालें असतें, तर तें परदेशगमन खास सब्राह्मण झालें असतें. एवढेंच नव्हे तर तेथे एखादें विशिष्ट श्रौतसूत्रहि उत्पन्न झालें असतें. बौद्धांनीं सिंहलांतील ब्राह्मणसंप्रदाय नष्ट केला असेल हें संभवत नाहीं. का कीं, एक तर बौद्ध तेथे बरेच उशिरां म्हणजे खिस्तपूर्व तिसऱ्या शतकांत गेले बौद्धांचा कटाक्ष ब्राह्मणजात नष्ट करण्याकडे नसून ब्राह्मणापेक्षां आम्ही क्षत्रिय उच्च असें मत ते प्रस्थापित करीत असत व क्षत्रियब्राह्मणवैश्यशूद्र अशी चातुर्वर्ण्याची ते मांडणी करीत. नीतीनिगंडुवामध्यें गोवीय आपणामध्यें ब्राह्मणरक्त असल्यामुळें आपण इतरापेक्षां उच्च असे दाखविण्याचा प्रयत्न करीत आहेत परंतु हा प्रयत्न धर्मशास्त्राचे तेथें गमन झाल्यानंतरचा आहे हें उघड आहे. जर तो अर्वाचीन नसता व केवळ बौद्धगमनकालीन असता, तर त्यांनीं ब्राह्मणांशीं हातजमाई करण्याऐवजीं आपलें क्षत्रियवंशसंभवत्व स्थापन करण्याचा प्रयत्न केला असता, आणि गोवीय ज्याअर्थी जमिनीचे मालक आहेत त्याअर्थी तो पत्करहि जाता.

यावरून असा काळ उघड दिसतो कीं जेव्हां आर्यन् टोळ्या सिंधुपूर्वेकडील प्रदेश व द्वीपें व्यापीत होत्या परंतु तेव्हां त्यामध्यें ब्राह्मणजातीचें अस्तित्व नव्हतें.

१० प्राचीनतर आर्यन संस्कृतीचे पुरातनत्व –मगसंस्कृति अथवा ज्या लोकांचा भारतप्रवेश ऋग्वेदांत चित्रित झाला आहे त्या लोकांची संस्कृति अगोदर अस्तित्वात असलेल्या आर्यन् संस्कृतीहून थोडीशी तरी निराळी होती हें वरील विवेचनावरून सिद्ध होईल या अगोदरच्या संस्कृतीला प्राचीनतर आर्यन् संस्कृति हें नांव देणें युक्त होईल प्रश्न असा उपस्थित होतो कीं, या संस्कृतीचें अस्तित्व किती जुनें असावें ? सर्व देश व्यापला जाण्यास कमींत कमी एक हजार वर्षांचा काळ लोटला पाहिजे. आणि वैदिक आर्यन् म्हणजे भरत म्हणजे मात्र संस्कृतीचे लोक जेव्हां आले तेव्हा जर देश पूर्णपणें प्राचीनतर आर्यन् संस्कृतीच्या लोकांनीं व्यापला गेला असता तर ती प्राचीनतर आर्यन् संस्कृति कमींत कमी हजार वर्षांची जुनी असावी.

११ जुनी संस्कृति आर्यन् कशावरून:– ही जुनी संस्कृति आर्यन् असावी असें म्हणण्यास आधार हा कीं यदुतुर्वशासारख्या जुन्या पश्चिम राष्ट्रांचा जो उल्लेख आपणांस आढळतो तो उल्लेख अभियुक्त आढळतो. वसिष्ठविश्वामित्र हे जुन्याचेच पुरोहित काहीं

काल होते. शिवाय नवीनाच्या सस्था जुन्यांशीं ज्या मिसळून गेल्या त्या त्यात सादृश्य असल्याखेरीज मिसळून गेल्या नाहीत. भरतांच्या टोळीबरोबर फारच थोडक्या लोकांचे आगमन झाले असावें त्यानीं जुन्याच्या भाषा मारून टाकणें अर्थात् शक्य नव्हतें. त्या भाषा देखील सदृश असल्या पाहिजेत.

१२ प्राचीनतर आर्यन् संस्कृतींतील लोकांचा आयुष्यक्रमः—प्राचीनेतर आर्यन् संस्कृति जर ब्राह्मणविहीन पण आर्यन् असेल तर त्या जनतेचा आयुष्यक्रम कसा काय होता हा पुढें प्रश्न स्वाभाविकच उत्पन्न होतो. ते लोक संस्कृतिविहीन असणे शक्य नाहीं कां कीं, ज्या लोकांची सर्व देश व्यापण्याइतकी व्यापकता वाढली त्याच्यामध्यें काहींतरी नीतिनियम उत्पन्न झाले असलेच पाहिजेत ज्या देशामध्यें त्यानीं हजारएक वर्षें वसती केली व जमीन नागरली, जेथें त्यांचीं राजकुळें स्थापित झालीं व पौरोहित्यहि स्थापन झालें त्या देशामध्यें वाङ्मयविषयक किंवा विज्ञानविषयक किंवा मनोरंजनात्मक संस्कृति तयार झाली नसेल असें नाहीं ती तशी संस्कृति तयार झाली असावी असे धरल्यास त्या संस्कृतीचे अवशेष कोठें आहेत? आमच्या मतें दोन अवशेष दिसतात, एक अवशेष म्हणजे प्रत्यक्ष मंत्रातीलच उल्लेख, आणि दुसरा अवशेष म्हटला म्हणजे इतिहासपुराणांतील प्राचीन कथा. ऋग्वेदात मानसंस्कृतीच्या लोकांचे धर्म जसे दिसतात तसे दस्यूंचेहि दिसतात. दोन्ही लोक यजन करणारे दिसतात. परंतु प्राचीनांचे यजन फारच अल्प स्वरूपाचें होतें यज्ञाचा विकास होण्यापूर्वीची अग्न्युपासनेची पद्धति दोहोंस सामान्य असावी, आणि ती अथर्व्यांच्या क्रियासारखी, म्हणजे गृह्यासारखी परंतु मंत्रहीन असावी. त्या समाजात म्हणजे जेथे ऋत्विग्विद्येचा विकास झाला नव्हता तेथें अत्यंत स्वाभाविक ईश्वराची किंवा देवतांची किंवा भुतांची किंवा रोगाची किंवा सृष्टींतील अस्पष्ट शक्तींची उपासना असावी उपासना करणारा धंदेवाईक वर्ग असावा किंवा नसावा याविषयीं खात्रीपूर्वक सागता येत नाहीं ऋत्विज, पुरोहितत्व, गायकत्व किंवा मांत्रिकत्व हीं सामान्यांपासून पृथक् झालीं असतीलच असें सागता येत नाहीं. सामान्यांपासून पौरोहित्याचें पृथक्त्व दोन तऱ्हांनीं संभवतें. एक तर पुरोहितवर्गाची जात बनणे किंवा दुसऱ्याच कोणीतरी परकीय जातीनें येऊन लोकांचें पौरोहित्य मिळविणे. मगानीं ज्याप्रमाणें पारशांचें पौरोहित्य मिळविलें त्याप्रमाणे शकांचेंहि मिळविले व तो शकमगयुक्त समाज हिंदुस्थानात आल्यामुळे काहीं समाज पृथक्पौरोहित्यमय असेल, परंतु सर्व समाज तसा असेल असें वाटत नाहीं मगदांबाहेरील इतर लोकांच्या पारमार्थिक गरजा पुरविणारा वर्ग त्या लोकांतलाच असेल, आणि तो वर्ग पुढें एक तर नव्या येणाऱ्या लोकांच्या पुरोहितवर्गांशीं तादात्म्य पावला असावा किंवा सामान्य जनतेंत मिसळून गेला असावा.

१३ प्राचीन दस्यु पुरोहितांचे प्रतिनिधी – श्रौतस्मार्त धर्माखेरीज पारमार्थिक गरजा पुरविणारे लोक देशात सध्यां आहेत ते प्राचीन दस्यु पुरोहितांचे प्रतिनिधी म्हणून धरण्यास काहीं हरकत नाहीं असले वर्ग पुष्कळ आहेत गारुडी, भुतें काढणारे, मंत्रानीं साप विंचू यांचे विष उतरविणारे, मोहिनीमंत्र वापरणारे, मूठ मारणें वगैरे सारखे जादूटोणे करणारे, गारपगारी म्हणजे गारांपासून रक्षण करणारे हे सर्व लोक आजच्या समाजात दिसतात, आणि हे सर्व मंत्रहीन अथर्वणाचे प्रतिनिधी होत अथर्वणाच्या क्रिया प्राचीन दिसतात पण अथर्ववेदांतील मंत्र अर्वाचीन दिसतात. काहीं क्रिया या दोन्ही दस्यु व मान लोकांचें एकीकरण जेव्हा होऊं लागले तेव्हां झालेल्या दिसतात. एकतर दोघांचा मिलाफ होऊन एकाने दुसऱ्याची विद्या काहीं काळ स्वीकारावी, किंवा एकानें दुसऱ्याची विद्या मारून टाकण्याचा प्रयत्न करावा. आजची अथर्ववेदांतील विद्या ही दस्यूंची असावीच असें नाहीं. कदाचित् त्यांची असेल, कदाचित् दोन्ही लोकांचें एकीकरण होऊन बनलेली असेल. केवळ जादूटोण्याला वेदस्वरूप मिळालें हें दस्यूंच्या व परकीयांच्या स्पर्धेमुळें नव्हे, तर त्रैविद्य व अथर्व याच्या स्पर्धेमुळें होय. तथापि राक्षसवेद, सर्पवेद, इतिहासवेद, पुराणवेद इत्यादिकास जे यज्ञसंस्थेत स्थान मिळालें तें दस्यूंशीं हातजमाई करण्याच्या प्रयत्नामुळे मिळालें असावें असें दिसतें. का कीं, त्यापैकीं कोणत्याहि गोष्टीस मान संस्कृतींत मुळींच आधार नाहीं. थोडक्यांत असें म्हणता येईल कीं, अथर्वणस्वरूप पौरोहित्याच्या दस्यु संस्कृतींतील भागापैकीं मानांच्या आगमनानंतरचा भाग अस्पष्ट आहे, पण इतिहासपुराणांचा मात्र नाहीं. म्हणजे दस्यूंचा पुरोहितवर्ग मेला किंवा मानांच्या पुरोहितात लोपला, परंतु दस्यूंचा सूतांचा वर्ग टिकला, आणि त्यांनीं आपली संस्कृति इतकी कायम ठेवली कीं तिच्यावर मात्र संस्कृतींतील लोकांची थोडीबहुत पुढें चढली तरी मानसंस्कृतीच्या लोकांना ती विद्या घेऊन संवर्धनच करावी लागली.

---

## प्रकरण ४ थें.

### दाशराज्ञ युद्ध अथवा भरतदिग्विजय.

**ऋग्वेदांत सर्वव्यापक प्रसंग दाशराज्ञयुद्धच होय.**– ऋग्वेदातील अनेक सूक्तात अनेक कथाचे व प्राचीन इतिहासाचे अंश आले आहेत त्या सूक्तोक्त उल्लेखानी परिचित होणाऱ्या व्यक्तींचा परस्पराशीं संबंध व्यक्त करून दाखविण्यास आपणास विवेचनासाठीं असा एक प्रसंग घेतला पाहिजे कीं, त्याशीं सर्व व्यक्तींचा संबंध कसा तरी लावता येईल व त्या व्यक्तींचा अन्योन्याश्रय स्पष्ट करतां येईल व्यक्तींच्या अगर राष्ट्राच्या विशेष कृत्याची एखाद्या प्रसंगाच्या अनुरोधानें आपणास ओळख होईल तर पाहिजे. ऋग्वेदातील अनेक व्यक्तींचा संबंध प्रासंगिक रीत्या जुळविणें झाल्यास तो हेतु साधण्यासाठीं जो एकच प्रसंग सापडतो तो "दाशराज्ञ युद्ध" हा होय, हें मागील प्रकरणांत सविस्तर दाखविलेंच आहे हा प्रसंगाशिवाय अनेक व्यक्तींचा समावेश करणारा व सर्व मंडळांशीं संबंधित असलेला असा दुसरा महत्त्वाचा व व्यापक असा प्रसंग ऋग्वेदात नाहीं. वेदोल्लिखित घडामोडींत दाशराज्ञ युद्धाचें स्थान सर्वांत श्रेष्ठ दर्जाचें आहे तें ह्याच दृष्टीने होय

**या युद्धाचें वाङ्मयीन आणि ऐतिहासिक महत्त्व:-** या युद्धावर इतकें वाङ्मय निर्माण झालें व तें ऋग्वेदांत अंतर्भूत झालें यास त्या युद्धाचें ऐतिहासिक महत्त्व हेंच कारण होय. या युद्धांत गाजलेले क्षत्रिय पुराणांनीं वर्णिले नाहींत. पण या युद्धाशीं प्रसिद्ध ऋषींचा संबंध आला आहे. राजे म्हणून युद्धाशीं संबंध असलेल्या व्यक्तीहि अनेक असून त्यांचा उल्लेख बहुतेक मंडळांत येतो.

कोणत्या तरी व्यक्तीच्या संबंधानें दाशराज्ञ युद्धाचा उल्लेख सर्वच मंडळांत आला आहे. तथापि सातवें मंडळ व त्यांतहि कांहीं सूक्तें हीं युद्धाचें विशेष वर्णन करणारीं आहेत. ऋग्वेदसूक्तांतील इतिहास धादून घेण्यासाठीं प्रस्तुत युद्धांत भाग घेणाऱ्या व्यक्ती ज्या स्थळीं निर्दिष्ट असतील तीं स्थळें जमविलीं पाहिजेत, आणि त्यांत उल्लेखिलेल्या व्यक्तींशीं संबंध दाखविणारे इतर उल्लेखहि एकत्रित केले पाहिजेत. दाशराज्ञ युद्धाच्या सन्निकर्षानें अनेक कथा, पुरुष व स्थित्यंतरें यांवर कालस्थलसंबंधात्मक प्रकाश पडणार आहे.

पार्गिटर असें दाखविण्याचा प्रयत्न करीत आहे कीं, पुरोहितांनीं किंवा ऋषींनीं वेदासारख्या ब्राह्मणी वाङ्मयांत ज्यांचें स्तोम गायिलें ते राजे क्षत्रिय वाङ्मयांत उल्लेखिलेले नाहींत किंवा महत्त्वानें वर्णिलेले नाहींत; आणि रामायण महाभारतासारख्या क्षत्रिय वाङ्मयांतून महत्त्व पावलेल्या राजांचा गौरव वेदांत नाहीं. हें विधान कदाचित् सत्य असेल; तथापि यांतून पार्गिटर असा जो ध्वनि काढतो कीं, ब्राह्मणी वाङ्मयांतून ज्यांचें वर्णन झालें त्यांचें राजकीय महत्त्व नाहीं, तो मात्र बरोबर नाहीं. दाशराज्ञ युद्धासंबंधानें पुढें जें विवेचन येईल त्यावरून असें दिसून येईल कीं, वरील पार्गिटरच्या समजुतीला आधार नाहीं. फिलिपशिकंदराप्रमाणें दिवोदास व सुदास यांची जोडी दिग्विजयी होती. धृतराष्ट्र व धर्मराज ज्यांस प्राचीन म्हणत असतील, अशा कालीं तिनें अनेक राष्ट्रें पराभूत करीत गांधारापासून कुरुक्षेत्रापर्यंत ज्या स्वाऱ्या मारल्या व जे शत्रू पादाक्रांत केले त्यांचा उल्लेख ऋग्वेदांत अक्षर शब्दांनीं आला आहे. हिंदुस्थानास "भारतवर्ष" हें नांव ज्या परिस्थितींत प्राप्त झालें त्या परिस्थितीचा प्रारंभ जर कोठें सांपडेल, तर तो या ब्राह्मणी वाङ्मयांतच सांपडेल. प्राचीन इतिहासाच्या दृष्टीनें, ज्या लोकांनीं इतर लोकांस जिंकून सर्व देशास आपलें नांव दिलें त्या लोकांच्या वर्णनापेक्षां भारतीय राष्ट्राच्या इतिहासकथनास दुसरा महत्त्वाचा प्रसंग कोणता? देशनामस्पष्टीकरणाचें महत्त्व जाणण्याइतकी इतिहासबुद्धि प्राचीनांत होती. पौराणिकांनीं 'भारतवर्ष' या नांवाचा ऐतिहासिक उलगडा करण्याचा प्रयत्न करून या विषयाच्या महत्त्वाची ओळख दाखविली आहे.

**हिंदुस्थान हा भारत कोणामुळें.**—हिंदुस्थानास 'भारतवर्ष' कां म्हणतात? आपण कोणत्या भरतावरून आपणांस भारतीय म्हणवितों, याची जिज्ञासा आपणांस स्वाभाविक आहे. पुराणग्रंथमूलक असा समज आहे कीं, दुष्यंत व शकुंतला यांचा पुत्र जो भरत तो या देशाचा सार्वभौम राजा झाला आणि त्यावरून देशास 'भारतवर्ष' नांव पडलें. या भरताचा संबंध महाभारतानें कुरुकुलाशीं घातला आहे, आणि कुरूंच्या घराण्यांतील यादवीच्या काव्यास महाभारत व यादवीस भारतीयुद्ध असें नांव आज प्रचलित आहे. ऋग्वेदांत भरत नांवाचे लोक वर्णिलेले दिसतात. त्यांचें तृत्सूंशीं नातें किंवा कदाचित् ऐक्य दिसून येतें. त्यांच्या विजयांचें वर्णनहि वेदांत आहे. मंत्रोत्पन्न माहिती दुष्यन्तपुत्र भरताच्या नांवानें देशास नांव मिळालें या पुराणग्रंथांच्या विधानाविषयीं संशय उत्पन्न करते. इतिहास कोणाचा हा प्रश्न आपण उत्पन्न केला त्या वेळेस असें लिहिले आहे कीं, ज्या जातींचें किंवा राष्ट्रांचें हिंदुस्थानांत अस्तित्व किंवा प्रामुख्य असेल त्याचा इतिहास आपणांस लिहिला पाहिजे. आर्य हा शब्द यजनविषयक असल्यामुळें, केवळ आर्यांचा म्हणजे *विशिष्ट तऱ्हेनें यजन करणाऱ्यांचा इतिहास आपणांस द्यावयाचा* नाहीं. आपणांस देशांत जीं राष्ट्रें ज्ञात होतात त्यांची मोजदाद घेतली पाहिजे आणि त्या क्रियेपासून इतिहासास सुरवात केली पाहिजे. ही मोजदाद घ्यावयाची ती दाशराज्ञ युद्धाच्या अनुषंगानें घेऊन जीं राष्ट्रें वगळलीं जातील त्यांचा मागाहून इतिहास घेतला पाहिजे. *प्राचीन कालीं चळवळ करणारीं बरीच राष्ट्रें दाशराज्ञ युद्धामध्यें सामील* झालीं आहेत. पुरु, कुरु, भरत यांचें पौराणिकांनीं वंशैक्य धरलें आहे, तें तसें आहे म्हणून वेद साक्ष देतात काय याचाहि इतिहासार्थ वेदांकडे लक्ष देणाऱ्यानें विचार केला पाहिजे.

भरत हें ऋग्मंत्र व तदनंतरच्या वैदिक वाङ्मयांत फार महत्त्वाचें असें एका लोकांचें नांव आहे. ऋग्वेदसंहितेंत सुदास आणि तृत्सु लोकांबरोबर यांच्या नांवाचा उल्लेख तिसऱ्या आणि सातव्या मंडळांत वारंवार येतो; आणि सहाव्या मंडळांत त्यांचा संबंध दिवोदासाबरोबर दिसून येतो ( ऋ. ६. १६, ४–५ ). एका ठिकाणीं ( ऋ. ७. ८, ४ ) भरत लोक तृत्सूंप्रमाणें पुरूंचे शत्रू आहेत असें म्हटलें आहे.

**भरतस्वरूपस्पष्टीकरणार्थ प्रयत्न.**–भरतांचें स्वरूप जाणण्यासाठीं लुडविग, गेल्डनेर, मॅकडोनेल, झिमर, हिलेब्रांट इत्यादि पाश्चात्य संशोधकांनीं या विषयावर जें थोडेंसें संशोधन केलें त्याचा मथितार्थ खोल पाण्यांत प्रवेश करण्यापूर्वीं देतों. लुडविग् भरत आणि तृत्सू हे एकच असे म्हणतो. ओल्डेनबर्ग म्हणतो कीं, तृत्सू हे भरताचे वंशस्तुतिपाठक जे वसिष्ठ त्यापैकीं होत. गेल्डनर म्हणतो कीं, तृत्सु हें भरतांचें राजघराणें असावें. तृत्सू आणि भरत हे शत्रू आहेत असें जें झिमरचें मत आहे तें मत भूगोलदृष्ट्यासुद्धां बरोबर नाहीं, असें मॅकडोनेल म्हणतो. याला तो असा आधार देतो कीं, झिमरच्या मताप्रमाणें तृत्सू लोक परुष्णी नदीच्या ( रावीच्या ) पूर्वेला रहात असत व त्यावरून भरत हे तृत्सू लोकांवर पश्चिमेकडून हल्ला करीत असले पाहिजेत; परंतु ऋग्वेदांत तर 'देवश्रवस्' व 'देववात' हे भरत राजे सरस्वती, आपया व दृषद्वती यांच्या लगत म्हणजे हिंदुस्थानांतील पवित्र प्रदेश जो मध्यदेश तेथें रहात असत असें दाखविलें आहे. हिलेब्रँटचें असें मत आहे कीं तृत्सू हे या प्रदेशांतील अगोदरचे लोक असावेत आणि सुदास व भरत हे मागाहून आले असावेत, आणि तृत्सू व भरत यांचा संबंध जडून

दोहोंची मिळून पुढें एकच जात झाली असावी. हें लोकमिश्रण दुसऱ्या एका गोष्टीच्या स्पष्टीकरणार्थ गृहीत धरलें पाहिजे असे तो म्हणतो त्याच्या मतें अशा प्रकारचा संबंध असणें अगदीं अवश्य आहे. कारण, दिवोदासाचा संबंध भरद्वाज वंशाशीं येत असता त्याचा मुलगा अगर नातू सुदास (पैजवन) याचा संबंध वसिष्ठ आणि विश्वामित्र यांच्याशीं येतो, यानें स्पष्टीकरण या तऱ्हेचा फरक झाला होता असे गृहीत धरल्याशिवाय होणार नाहीं. अर्थात्, पैजवनाचे पहिले पुरोहित भारद्वाज असावे आणि नंतरचे पुरोहित दोन राष्ट्रांचा संयोग झाल्यामुळें विश्वामित्र व वसिष्ठ हे झाले असावेत हिलेब्रँटचें मत आम्हास बरेंचसें ग्राह्य दिसतें कदाचित् असेहि असेल कीं, राजकारणास ज्याचें पौरोहित्य अनुकूल होईल त्यास पुरोहित करावयाचें आणि गरज पडल्यास किंवा सपल्यास काढून टाकावयाचें ही तर पैजवनाची नीति असावी असो.

तृत्सूचे पुरोहित वसिष्ठ होते, आणि तृत्सूंचें भरताशीं ऐक्य होतें आणि भरताचें पौरोहित्य वसिष्ठाकडे होतें या दोन्ही गोष्टी अन्योन्याश्रयी दिसतात. वसिष्ठ तृत्सूचे व भरताचे पुरोहित झाले पण कालांतराने मागें पडलेल्या विश्वामित्र घराण्यानें आपली भिक्षुकी परत मिळविली असें ब्राह्मणग्रंथावरून दिसतें. भरताचें आणि वसिष्ठांचें शत्रुत्व स्थापन झाले. रामायणात व भारतांत वसिष्ठांस भिक्षुकीसाठीं कुरूंतून कोसलाकडे घालविलें आहे

**मंत्रोक्त इतिहासाचें पुराणें आणि ब्राह्मणें यांनीं केलेले विस्तरण.**—वैदिक वाङ्मय आणि आर्ष काव्यग्रंथ यांच्यामध्यें एक राजकुलविषयक किंवा मानववंशविषयक स्थिरपतर दृष्टीस पडतें. ऋग्वेदामध्यें दाशराज्ञ युद्धामुळें सरस्वती नदीच्या आसमंतात पुरुयदुतुर्वशादि द्रुह्य शत्रूंचा अगर राजाचा पराभव होऊन भरताची तेथे स्थापना झालीसें दिसतें, तर महाभारतात कुरूचें राज्य प्राचीन कालीं प्रस्थापित झालेली गोष्ट याच स्वरूपात तेथें दिसत असून त्या कुरूंनाच भरत आणी त्याच्या कुलालाच पुरुकुल हें नाव दिलेलें दिसतें. ऋग्वेदामध्ये किवी, कुरु, पुरु, भरत व तृत्सू हे स्वतंत्र लोक दिसत असून या लोकाचा एकमेकाशीं संबध फारच थोडा दिसतो नाहीं तर एकमेकाचे शत्रू दिसतात. दाशराज्ञ युद्धामध्यें यदु, तुर्वश, द्रुह्यु, अनु आणि पुरु याचें सख्य असून तृत्सुभरताबरोबर ते लढत आहेत. दाशराज्ञ युद्धामध्ये कुरुपुरुभरतानें ऐक्य नाहीं एवढेच नाही, तर कुरूंचा पत्ताच नाहीं. जे पुरु भरताचे शत्रू होते त्या पुरूना भरताच्या पितृत्वाचा मान काहीं वैदिक आधारावर भारतात दिला गेला आहे, आणि पुढील सरस्वतीतीरीं राज्य करणाऱ्यास कुरु हें नाव प्राप्त झाले आहे ज्याप्रमाणें भरताचें व तृत्सूचें ऐक्य झाले आणि तें वसिष्ठामुळें झालें, त्याप्रमाणें कुरूंचें व क्रिविपांचालाचें ऐक्य कवषामुळें झालें नसेलना अशी इतिहाससूचक कल्पना उत्पन्न होते. कवष हा पश्चिमेकडील सप्तर्षी पैकीं एक म्हणून त्याचें प्राचीनत्व व महत्त्व महाभारतातील मोक्षधर्मपर्वात सागितलें आहे. कुरूंचें, भरताचें व पुरूचें ऐक्य महाभारतात दाखविलें आहे आणि भरताचें व तृत्सूंचें ऐक्य ऋग्वेदात चागिलें आहे. तृत्सू आणि भरत यांचें पुढेंही ऐक्य झालें व भरताचें यदु, तुर्वश, द्रुह्यु आणि अनु याच्याशीं वैर किंवा भिन्नत्व कायम राहिले, हें ऋग्वेद व महाभारत याची तुलना स्पष्ट करिते. भरताना आपलें च आपल्याशीं मिळून गेलेल्या लोकाचे श्रेष्ठत्व स्थापून आपल्याशीं न मिळालेल्या लोकानां हलकेपणा द्यावयाचा होता. यामुळेंच ययातिपुत्र-कथा उत्पन्न झाली नसेलना असा संशय येतो. पुरूशीं संबंध जुळल्याने नवीन आलेल्या भरतास प्राचीनत्व मिळालें. भरताचा व पुरूचा संबंध असणेहि शक्य आहे का कीं, दिवोदास व सुदास या दोघांसहि पुरु म्हटलें आहे सायणानीं अर्थ करताना मान पूरूचा कामना पुरविणारा इत्यादि प्रकारचा अर्थ केला आहे उत्तरकालीन वैदिक वाङ्मयांतहि भरताचें नाव विशेष गाजलेलें आढळतें शतपथ ब्राह्मणात भरत दौष्यन्ति नांवाच्या एका राजाचा उल्लेख येतो. यानें अश्वमेध केला. त्याचप्रमाणें शतानीक सात्राजित या नावाच्या दुसऱ्या एका भरत राजानेंहि तोच यज्ञ केला. ऐतरेय ब्राह्मणांत भरत दौष्यन्तीला दीर्घतमस् मामतेय हा राजमुकुट घालीत आहे असें वर्णन येतें. हेंच उत्तरकालीन विधान पौराणिक कथाप्रसारास कारण झाले असावें, किंवा पौराणिक कथाशीं श्रौतसंस्थाचा आगतुक संबध जोडण्याचा हा प्रयत्न असावा शतानीक यास सोमशुष्मन् वाजरत्नायन (हें उपाध्यायाचे नाव फार अलीकडचें आहे) यानें अभिषेक केला. हे भरत राजे कोठें रहात असतील याविषयीं उत्तरकालीन लोकाची समजूत, त्यानीं काशी लोकावर जय मिळविले व यमुनातटीं आणि गगातटीं यज्ञ केले म्हणून जे उल्लेख आहेत त्यांवरून अगदी उघड होते असे मॅकडोनेल म्हणतो. पण यातहि आम्हास हेतुपूर्वक फिरवाफिरवीचा संशय येतो. त्याचप्रमाणें राजे लोकाच्या नामावलींत निरनिराळ्या ठिकाणीं आलेल्या पांचालाः, कुरुपाचालाः, भरताः इत्यादि भिन्न शब्दावरून त्याचा रहावयाचा देश स्पष्ट होतो. भारतांत तर सर्वत्र कुरुदेशाचा राजवंश हा भरतवंशच होय असे आढळतें. यावरून ओल्डेनबर्ग याचें म्हणणें असें आहे कीं, ब्राह्मणकालीं भरत लोक कुरुपाचाल लोकात मिसळत होते. हें खरें असेल असें वाटतें. का कीं ब्राह्मणेंच श्रौतधर्म आणि इतिहासज्ञान या परंपराचें एकीकरण करण्याचा प्रयत्न करीत आहेत. किंवा ब्राह्मणाच्या पौरोहित्यास उपयोगीं पडेल असा "इतिहास" तयार करीत आहेत असे दिसतें.

भरताचे यज्ञसमारंभ पंचविंश ब्राह्मण, ऐतरेय ब्राह्मण, शतपथ ब्राह्मण आणि तैत्तिरीय आरण्यक यातून सारखे उल्लेखिले गेले आहेत ऋग्वेदातहि अग्निभरताच्या नावाचा उल्लेख आला आहे. आप्री सूक्तांत भारती देवीचा उल्लेख येतो. ही भरताच्या कुलाचें सरक्षण करणारी 'कुलदेवता' आहे. हिचा सरस्वती नदीशीं जो ऋग्वेद ऋचेंत संबंध दाखविला आहे, त्यावरून भरत लोकांचा सरस्वतीशीं संबंध असावा अशा विचारास जागा मिळते पुन्हा शतपथ ब्राह्मणात अग्नीला 'ब्राह्मण भारत' म्हणजे 'भरताचा उपाध्याय' म्हणून म्हटलें आहे, व त्याला मनुष्वत्, भरतवत् (म्ह० भरताप्रमाणें, मनूप्रमाणें) बलिग्रहण करण्यास बोलाविलें आहे

एखाददुसऱ्या ऋचेंत सुदास अथवा दिवोदास आणि पुरुकुत्स अथवा त्रसदस्यु हे मित्र होते असें दाखविलें आहे

ओल्डेनबर्गच्या सूचनेप्रमाणे दाखवून पुरुंशीं पुरु व भरत यांची एकी असावीसें दिसतें.

एका भरताचा उल्लेख ऋग्वेदाच्या पाचव्या मंडलांत (५४,१४) येतो. परंतु तो कोण हें मात्र निश्चित सांगतां येत नाहीं.

**भरतदौष्यंतविरुद्ध राष्ट्रनामाची अदाम्यता:—** दाशराज्ञ युद्धामध्यें जे भरत स्थीस पडतात त्यांचा भरत दौष्यन्तीशीं संबंध होता अगर नव्हता हा प्रश्न आहे. होता असें धरल्यास राष्ट्रसंस्थापक भरत हा राष्ट्राचें नाव उत्पन्न व्हावयाच्या पूर्वीच झाला असला पाहिजे. तसें धरल्यास दौष्यन्ति भरताची यज्ञभूमि कुरुक्षेत्र ही न राहतां तो कोठें तरी हिंदुस्थानापलीकडे आहे असें म्हणावें लागेल. कारण भरत राजा दिवोदास हा गांधारापासून दिग्विजय करीत आला होता. अर्थात् भरत कुलास नांव देणारा भरत दिवोदासापूर्वीचा असला पाहिजे व तो गांधार अथवा त्या पलीकडील प्रदेशांत रहात असला पाहिजे. कदाचित् असेंहि शक्य असेल कीं, ज्याप्रमाणें राष्ट्राची उत्पत्ति एका पुरुषापासून करण्याचा मोह फेरिस्तासारख्यांसहि पडतो त्याप्रमाणेंच मंत्रकालीन "इतिहासकारा"स पडला असावा. तसा तो पडला असल्यास त्यांनीं भरत राष्ट्राची उत्पत्ति करण्याकरितां भरत राजा निर्माण करावा यांत नवल नाहीं. किंवा असेंहि असेल कीं, या प्रदेशास भारतवर्ष असें नांव अगोदरच पडत चाललें असून कुरूमध्यें उत्पन्न झालेल्या दिग्विजयी राजपुत्राशीं उत्तरकालीनांनीं राष्ट्रनामाचा संबंध जोडला असावा या प्रकारच्या कृतीनें देश व भरत यांचे एकीकरण होण्यास मदत झाली असावी.

राष्ट्रसंस्थापक भरताचें मूलस्वरूप व पराक्रम आपणांस ऋग्मंत्रांतच शोधिले पाहिजेत. ऋग्मंत्रांत भरत लोक आहेत पण दुष्यंत शकुंतला नाहीं किंवा दौष्यंति भरतहि नाहीं. यावरून ऋग्मंत्ररचनाकारांस भरत, दुष्यंत, शकुंतला हीं ठाऊक नसावीं असा संशय येतो. ठाऊक नसण्याचें कारण या व्यक्तींची मंत्ररचनोत्तरता किंवा काल्पनिक अस्तित्व किंवा अन्यप्रदेशता असावी, या तिहींपैकीं कोणतें तरी एखादें कारण असलें पाहिजे. मंत्ररचनोत्तरता असणें शक्य नाहीं. कां कीं, मंत्ररचना पारिक्षित जनमेजयाच्या कालापर्यंत होत होती आणि संहितांत तें वाङ्मय शिरलें होतें. अन्यप्रदेशता किंवा काल्पनिक अस्तित्व या दोहोंपैकीं कोणतीहि गोष्ट खरी असली तरी त्यांत पुरोहिती करामत दिसून येते. असो.

दाशराज्ञ युद्धाचा संबंध ज्याप्रमाणें अत्यन्त प्राचीन राजवंश पडामोडाशीं येतो त्याप्रमाणे तो भरद्वाज, वसिष्ठ व विश्वामित्र या तीन मंत्रद्रष्टा कुलांशीं येतो.

भरतांचा पूर्वेकडे जो प्रसार दाखविला आहे तो प्रसार अडथळ्याशिवाय झालेला नाहीं एवढेंच नव्हे तर कांहीं प्रसंगीं भरतांस मारहि मिळाला आहे. पक्थांचा म्हणजे अफगाणांचा राजा तूर्वयाण यानें दिवोदास, आयु व कुत्स यांच्या संयुक्त सैन्याला पराभव केल्याचे उल्लेख आहेत आयु हा पुरूरवसाचा पुत्र असेल तर दाशराज्ञ युद्धापासून ऋग्वेदमंत्राचा विषय झालेले पुरूरवपुरुवंशीचे जोडपें फार दूरचें नसावें. दाशराज्ञ युद्धापासून ऋग्वेदांत उल्लेखिलेले अनेक राजे फार दूर असलेले दिसत नाहींत. ऋग्वेदांतील सूक्तें हीं आपणास त्यांच्या व्याकरणरूपाच्या बाहुल्यानें जितकीं जुनीं वाटतात तितकीं नसावीत. दाशराज्ञ युद्धानंतरच मधुच्छंदादि ऋषींचीं सूक्तें येणार ऋग्वेदांतील बहुतेक वाङ्मय दाशराज्ञ युद्धापासून कुरुयुद्धापर्यंतचें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. दाशराज्ञ युद्धांत प्रवेश करण्यासाठीं एक सूक्त विषयपरिचयासाठीं प्रथम देतों. तें अत्यन्त महत्त्वाचें आहे व तें सातव्या मंडलांतील अठरावें आहे.

## सातवें मंडल १८ वें सूक्त

त्वे ह यत्पितरश्चिन्न इंद्र विश्वा वामा जरितारो असन्वन्।
त्वे गावः सुदुघास्त्वे ह्यश्वा त्वं वसु देवयते वनिष्ठः ॥ १ ॥

हे इंद्रा, आमच्या वाडवडिलांनीं देखील तुझीं स्तोत्रें गाऊन ज्याअर्थी सर्व प्रकारची उत्तम संपत्ति मिळविली, (त्या अर्थी आम्हीं देखील धनप्राप्तीच्या इच्छेनें तुझें स्तवन करतों. कारण) तुजजवळ उत्तम दुधाच्या गाई व चांगले घोडे (आहेत). तू यज्ञ करणाऱ्या लोकांना धन देणारा (आहेस)

राजेव हि जनिभिः क्षेष्येवाव द्युभिरभि विदुष्कविः सन्।
पिशा गिरो मघवन्गोभिरश्वैस्त्वायतः शिशीहि राये अस्मान् ॥ २ ॥

हे इंद्रा राजा ज्याप्रमाणें आपल्या स्त्रियासह (सुखानें) रहातो (त्याप्रमाणें) तूं देखील द्युतींनीं युक्त असतोस. हे धनसंपन्ना, तूं ज्ञानसंपन्न असल्यामुळें तुझी स्तुति करणाऱ्या आम्हांस सुवर्ण, गाई, घोडे, वाहनें दे व तुझ्या ठिकाणीं दृढप्रेम असलेल्या आम्हांस संपत्ती वरतो सुसंस्कृत कर.

इमा उत्वा पस्पृधानासो अत्र मन्द्रा गिरो देवयंतीरुपस्थुः ।
अर्वाची ते पथ्या राय एतु स्याम ते सुमताविंद्र शर्मन् ॥ ३ ॥

हे इंद्रा ह्या यज्ञांत (एकमेकींमध्यें) अहमहमिका करणाऱ्या अशा (ह्या आमच्या) आनंदित करणाऱ्या स्तुती तुजप्रत येवोत. तुझ्या संपत्तीचा मार्ग आम्हांकडे (मोकळा) असो, तसेंच तुझ्या स्तोत्रांत गढलेल्या आम्हांस सुख प्राप्त होवो.

धेनुं न त्वा सूयवसे दुदुक्षन्नुप ब्रह्माणि ससृजे वसिष्ठः ।
त्वामिन्मे गोपतिं विश्व आहा न इन्द्रः सुमतिं गन्त्वच्छ ॥ ४

हे इंद्रा तृणानें परिपूर्ण (असलेल्या) गोठ्यांत असणाऱ्या गाई प्रमाणे उत्तम हवींनीं युक्त असलेल्या यज्ञगृहांत (राहणारा जो तू त्या तुझ्यापासून आपल्या) मनोरथाची पूर्णता करून घेऊ इच्छिणारा मी वसिष्ठ स्तोत्रें म्हणतो (कीं उपायोगानें) माझा परिवार तुलाच गोपति म्हणतो, इंद्रानें आमच्या स्तोत्रानें आगमन करावें.

अर्णांसि चित्पप्रथाना सुदास इंद्रो गाधान्यकृणोत्सुपारा।
शर्धन्तं शिम्युमुचथस्य नव्यः शापं सिंधूनामकृणोदशस्तीः ॥ ५ ॥

---

* "पुश्तु" (अफगाणांची भाषा) हा शब्द पक्थ शब्दाचा अपभ्रंश आहे

स्तवलेला इंद्र यानें पाणी खोल असतांना देखील तरून जाण्यास योग्य असें सुदास राजाकरितां केलें, व त्यानें शिम्यूला नद्यांच्या पुरांनां शाप द्यावयास लावलें.

पुरोळा इत्तुर्वशो यक्षुरासीद्राये मत्स्यासो निशिता अपीव ।
श्रुष्टिं चक्रुर्भृगवो द्रुह्यवश्च सखा सखायमतरद्विषूचोः ॥ ६ ॥

१ यज्ञकुशल असा व दानें देणारा असा तुर्वश नांवाचा राजा होता, त्यानें मत्स्य देशावर स्वाऱ्या केल्या व त्यामुळें भृगूंनीं व द्रुह्यूंनीं तुर्वशाचें प्रिय केलें व त्या वेळीं तुर्वशाच्या मित्रभूत इंद्रानें मित्रास ( तुर्वश ) संकटांतून तारलें.:—सायण

२ चालून जाणारा आणि यज्ञकुशल असा तुर्वश राजा होता त्यानें धनेच्छेनें सुदासावर स्वारी केली. मत्स्यासारखे परतंत्र असूनहि भृगु व द्रुह्यु तात्काळ मदत करते झाले. सुदास आणि तुर्वश यांमध्यें मित्र इंद्र सुदासाला दुर्ग्रह तारिता झाला.:—सायण

३ तुर्वश यज्ञकुशल व दानशील होता. त्यानें मत्स्यांना ( लोकांना ) त्रास दिला. भृगु आणि द्रुह्यूंनीं तुर्वशाला मदत केली. दोघांमध्यें तुर्वशसखा इंद्र यानें तुर्वशाचें रक्षण केलें.:—सायण

आ पक्थासो भलानसो भनंतालिनासो विषाणिनः शिवासः ।
आ योऽनयत्सधमा आर्यस्य गव्या तृत्सुभ्यो अजगन्युधा नॄन् ॥ ७ ॥

पक्थ, भलानस, अलिनास, शिवास, विषाणिन् हे बरोबर आले. ( सायणानें प्रत्येक राष्ट्रनामाचा गुणवाचक अर्थ केला आहे, तो येणेंप्रमाणेः–हवि शिजविणारे, गोड बोलणारे, तप करून हि पोरकट असणारे, राजविद्याकरितां ( कृष्ण ) विषाण हातांत घेतलेले, ( व ) लोककल्याण करणारे इंद्राला स्तविते झाले. ) जो सोमसदयुक्त ( इन्द्र ) आर्यांच्या गाई तृत्सूंकरितां ( हरण करून ) आणता झाला व युद्धानें शत्रूंना ठार करिता झाला.

दुराध्यो ३ अदितिं स्रेवयन्तोऽचेतसो वि जगृभ्रे परुष्णीम् ।
मह्नाविव्यक्पृथिवीं पत्यमानः पशुष्कविरशयच्चायमानः ॥ ८ ॥

दुष्ट, मूर्ख, ( सुदासाचे शत्रु ) परुष्णीच्या काठावर राहणारे ( परुष्णी ) नदीचें तीर फोडते झाले. ( इन्द्रप्रसादलब्ध ) सामर्थ्यानें तें जल पृथिवीभर पसरलें. ( परंतु सुदासाचा शत्रु ) चायमान कवि ( यज्ञांतल्या ) पशूप्रमाणें मेला.

ईयुरर्थं न न्यर्थं परुष्णीमाशुश्चनेदभिपित्वं जगाम ।
सुदास इन्द्रः सुतुकाँ अमित्रानरन्धयन्मानुषे वध्रिवाचः ॥ ९ ॥

परुष्णी नदी पूर्वस्थलीं वाहूं लागली. भलत्या ठिकाणीं तिचें पाणी वाहीनासें झालें. ( राजा सुदासचा ) घोडा हि प्राप्तव्य स्थलीं गेला. इन्द्रानें सुदासाकरितां व्यर्थ बडबडे व पुत्रयुक्त अशा शत्रूंना ताब्यांत आणलें.

ईयुर्गावो न यवसादगोपा यथाकृतमभि मित्रं चितासः ।
पृश्निगावः पृश्निनिप्रेषितासः श्रुष्टिं चक्रुर्नियुतो रन्तयश्च ॥ १० ॥

कुरण सोडून, फळ्यांतून न चालणाऱ्या गाईप्रमाणें प्रसंगानुसार एखाद्या मित्राच्या गड्याला मिठी मारून ते ( न बुडलेले पक्थुटे ) गेले. पृश्नीनें खालीं धाडून दिलेले व चित्रविचित्र घोडे हांकणारे ( मरुत ) यांनीं श्रवण करून योद्धे आणि सरंजाम चढविलेले घोडे दिले.

एकं च यो विंशतिं च श्रवस्या वैकर्णयोर्जनान्राजा न्यस्तः ।
दस्मो न सद्मन्नि शिशाति बर्हिः शूरः सर्गमकृणोदिन्द्र एषाम् ॥ ११ ॥

जो अन्नेच्छेनें ( परुष्णीच्या तीरावरील ) दोन वैकर्ण देशामधील एक आणि वीस लोकांना मारतो तो सुंदर सुदास यज्ञगृहांत दर्भ ज्याप्रमाणें तोडतात त्याप्रमाणें शत्रूंना तोडतो. शूर इन्द्र मरुतांची उत्पत्ति ( त्या युद्धाकरितां ) करिता झाला.

अध श्रुतं कवषं वृद्धमप्स्वनु द्रुह्युं नि वृणग्वज्रबाहुः ।
वृणाना अत्र सख्याय सख्यं त्वायन्तो ये अमदन्ननु त्वा ॥ १२ ॥

नंतर वज्रबाहु इन्द्रानें श्रुत, कवष, वृद्ध आणि द्रुह्यु यांनां क्रमानें पाण्यांत बुडविलें. या वेळीं तुझ्या सख्याची इच्छा करणारे जे तुला स्तविते झाले त्यांच्याशीं तूं सख्य केलेंस.

वि सद्यो विश्वा दृंहितान्येषामिन्द्रः पुरः सहसा सप्त दर्दः ।
व्यानवस्य तृत्सवे गयं भाग्जेष्म पूरुं विदथे मृध्रवाचम् ॥ १३ ॥

इंद्रानें आपल्या विजयी बलानें, त्यांचीं सर्व बळकट स्थानें आणि सात किल्ले एकदम नाश करून टाकले. अनूच्या मुलाची संपत्ति त्यानें तृत्सूला दिली. यज्ञांत आम्ही तिरस्कृत पूरूला जिंकूं.

नि गव्यवो नवो द्रुह्यवश्च षष्टिः शता सुषुपुः षट् सहस्रा ।
षष्टिर्वीरासो अधि षड् दुवोयु विश्वेदिन्द्रस्य वीर्या कृतानि ॥ १४ ॥

लुटीच्या शोधांत असणारे, साठ शंभर, सहा हजार आणि सहासष्ट जास्त, असे अनव आणि द्रुह्यु वीर निजले आहेत ( मारले गेले ). इंद्राचे हे सर्व अचाट पराक्रम धार्मिकांकरितां होते.

इन्द्रेणैते तृत्सवो वेविषाणा आपो न सृष्टा अधवन्त नीचीः ।
दुर्मित्रासः प्रकलविन्मिमाना जहुर्विश्वानि भोजना सुदासे ॥ १५ ॥

इन्द्राशीं युद्ध करूं लागलेले हे मूर्ख व दुष्ट तृत्सु लोक सखल प्रदेशीं वाहणाऱ्या पाण्याप्रमाणें धावूं लागले. नंतर त्रस्त झालेल्या तृत्सूंनीं सर्व धन सुदासाला दिलें.:—सायण

मोकळें असणारें पाणी खालीं वेगानें येत, त्याप्रमाणें हे तृत्सु इंद्राच्या काळजीच्या देखरेखीखालीं जोरानें चाल करून गेले. अगदीं बारकाईनें संपत्ति मोजणारे असून देखील शत्रूंनीं आपली सर्व संपत्ति सुदासाला देऊन टाकली.:—ग्रिफिथ

अर्धं वीरस्य शृतपामनिन्द्रं परा शर्धन्तं नुनुदे अभि क्षाम् ।
इन्द्रो मन्युं मन्युम्यो मिमाय भेजे पथो वर्तनिं पत्यमानः ॥ १६ ॥

इन्द्रानें जगांत वीरांना मारणारे, पक्व पदार्थ पिणारे व इन्द्राचा द्वेष करणारे अशांचा फडशा पाडला. आणि क्रुद्ध शत्रूंचा क्रोध नाहीसा केला. व सुदासाच्या शत्रूंना पळवाट काढावयास लावलें.

आध्रेण चित्तद्वेकं चकार सिंह्यं चित्पेत्वेना जघान ।
अव स्रक्तीर्वेश्याऽवृश्चदिन्द्रः प्रायच्छद्विश्वा भोजना सुदासे ॥ १७ ॥

अशाप्रकारें देवीनें हा अतुलनीय पराक्रम त्यानें करविला व त्र्यांकडून देखील त्यानें सिंहाला मारविलें त्यानें यूपाचे कोन सुईने मोडले. याप्रमाणें इंद्रानें सुदासाला सर्व संपत्ति दिली.

शश्वन्तो हि शत्रवो रारधुष्टे भेदस्य चिच्छर्धतो विन्द रन्धिम्।
मर्तांएनः स्तुवतो य- कृणोति तिग्मं तस्मिन्नि जहि वज्र-
मिन्द्र ॥ १८ ॥

तुझे सर्व शत्रु तुला शरण आले आहेत उग्र अशा भेदाला सुदासाच्या अधीन केलें आहेस हे इंद्रा, तुझी स्तुति गाणाऱ्यांना जे पीडा करतात त्यांच्यावर ( भेदावर ) तुझें तीक्ष्ण वज्र फेंक
भेद = ( १ ) सुदासाचा शत्रु ( २ ) नास्तिक-सायण

आवदिन्द्रं यमुना तृत्सवश्च प्रात्र भेदं सर्वताता मुषायत्।
अजासश्च शिग्रवो यक्षवश्च बलिं शीर्षाणि जभ्रु-
रश्व्यानि ॥ १९ ॥

या युद्धांत भेदाला (सुदासानें) नागविलें म्हणून यमुना नदी आणि तृत्सुलोक यांनीं त्याला संतुष्ट केलें, आणि अजास् शिग्रु यक्षु यांनीं घोड्यांची डोकीं नजर केलीं

न त इन्द्र सुमतयो न रायः सचक्षे पूर्वा उषसो न नूत्ना।
देवकं चिन्मान्यमानं जघन्थाव त्मना बृहतः शम्बरं
भेत् ॥ २० ॥

हे इंद्रा, तुझी संपत्ति आणि कृपा अतिरस्करणीय व प्राचीन आणि नूतन उषांप्रमाणें आहे मन्यमानाचा मुलगा देवक याला तूं मारलेंस आणि उंच पर्वतावरून शंबराला उडवून दिलेंस

प्र ये गृहादममदुस्त्वाया पराशरः शतयातुर्वसिष्ठः।
न ते भोजस्य सख्यं मृषन्ताधा सूरिभ्यः सुदिना व्युच्छान्
॥ २१ ॥

जे पराशर, शतयातु, वसिष्ठ ( हे ) ऋषी तुझ्या इच्छेनें घरोघर तुझी स्तुति करितात ते पालक अशा तुझ्या स्तोत्राला किंवा मित्रभावाला कधींहि विसरत नाहींत म्हणून त्या स्तोत्यांना चांगले दिवस प्राप्त होतात

द्वे नप्तुर्देववतः शते गोर्द्वा रथा वधूमन्ता सुदासः।
अर्हन्नग्ने पैजवनस्य दानं होतेव सद्म पर्येमि रेभन् ॥ २२ ॥

हे अग्ने, देववताच्या वंशांतून दोनशें गाई, सुदासाकडून घोड्यांसहित दोन रथ अशा तऱ्हेची पैजवनाची देणगी मिळवून पुरोहिताप्रमाणें स्तुति गात मी वेदीभोंवती प्रदक्षिणा करतो

चत्वारो मा पैजवनस्य दानाः स्मद्दिष्टयः कृशनिनो निरेके।
ऋज्रासो मा पृथिविष्ठाः सुदासस्तोकं तोकाय श्रवसे वहन्ति
॥ २३ ॥

पिजवनपुत्र सुदासानें मुलगणी, सुवर्णालंकारयुक्त, ऋजु रीतीनें अमतानादि सरळगामी, पृथिवीवर उभे असलेले ( दान दिलेले ) चार घोडे मला मुलाला ( वसिष्ठाला ) मुलासाठीं अन्नाकरितां किंवा पोराबाळांच्या यशाकरितां वाहून नेतात

यस्य श्रवो रोदसी अन्तरुर्वी शीर्ष्णेशीर्ष्णे विबभाजा विभक्ता।
सप्तेदिन्द्रं न स्रवतो गृणन्ति नि युध्यामधिमशिशादभीके
॥ २४ ॥

ज्याचे यश विस्तीर्ण द्यावापृथिवींत ( पसरलेलें ) आहे जो दाना सर्व श्रेष्ठश्रेष्ठ माणसांना धन देता झाला त्या ( सुदासा ) ला सर्व लोक इंद्राप्रमाणें स्तवितात आणि नद्यांच्या तीरीं युध्यामधि नांवाच्या त्याच्या शत्रूला ठार मारते झाले

इमं नरो मरुतः सश्चतानु दिवोदासं न पितरं सुदासः।
अविष्टना पैजवनस्य केतं दूणाशं क्षत्रमजरं दुवोयु ॥ २५ ॥

हे मार्गदर्शक मरुत् हो, या सुदासाला त्याचा बाप दिवोदास त्याप्रमाणें सेवा आणि परिचर्येच्छु पैजवन-सुदास यांचें घर रक्षा. आणखी सुदासाचें सामर्थ्य अविनाशी आणि अशिथिल असो.

**यासूक्तापासून तेथील इतिहासविषय निघतात—**

प्रस्तुत सूक्तांतील वक्ता वसिष्ठ आहे व इन्द्रस्तुतीचा फलभोक्ता सुदास राजा आहे तृत्सूचा आणि सुदासाचा संबंध या सूक्तांत स्पष्ट होत नाहीं, या सूक्तामध्यें बऱ्याच राष्ट्रांचे व लोकांचे उल्लेख आले आहेत आणि यामुळे हें सूक्त इतिहासविषयक प्रश्नांचें सूचक म्हणून प्रथम मांडण्यांत येत आहे. यांत परिचित होणारीं नांवें व त्यासंबंधी विधानें येणेंप्रमाणें.

( १ ) सुदास राजा याच्याठीं इन्द्रानें नदीचें पाणी तरून जाण्यास योग्य असें केलें इन्द्रानें सुदासा करितां व्यर्थ वडबडे व पुनरुक्त ( मुतुका व वध्रिवाच ) अशा शत्रूंना ताब्यांत आणलें. सुदासाला शत्रूंनीं आपली संपत्ति दिली सुदास हा पैजवन होता त्यानें सूक्तगायकास घोडे दिले. सुदासाचा बाप दिवोदास होता सुदासाचे प्रतिस्पर्धी बलवान् होते असें वसिष्ठाचें मत होतें असें बकऱ्यांकडून सिंहाला मारविलें या रूपकावरून दिसतें

( २ ) शिम्यु-नद्यांच्या पुरांना हा शाप देतो

( ३ ) तुर्वश-हा यज्ञकुशल व दानें देणारा होता मत्स्य देशावर यानें स्वाऱ्या केल्या भृगू आणि द्रुह्यु यांनीं तुर्वशाचें प्रिय केलें मित्रभूत इन्द्रानें तुर्वशास संकटांतून तारलें.

( ४ ) भृगू-तुर्वश पहा.

( ५ ) द्रुह्यु-तुर्वश पहा यांना इन्द्रानें पाण्यांत बुडविलें. धार्मिकाकरितां द्रुह्यूस व अनूंस ससैन्य इन्द्रानें मारिलें.

( ६ ) तृत्सु-यांच्या करितां इन्द्रानें आर्यांच्या गाई हरण केल्या अनूच्या मुलाची संपत्ति इन्द्रानें तृत्सूंना दिली हे इन्द्राच्या कारकीर्दीच्या देखरेखीखालीं जोरानें चाल करून गेले

( ७ ) वैकर्ण ( दोन ) येथील लोकांचा अभिभव ( कदाचित् सुदासाकडून ) उल्लेखिला गेला आहे

( ८, ९, १० ) श्रुत, कवष, वृद्ध यास द्रुह्यूसह इन्द्रानें पाण्यांत बुडविलें

( ११ ) चायमान-कवि पशूप्रमाणें मेला

( १२ ) पुरु-यज्ञांत आम्ही पुरूला जिंकूं असें वसिष्ठ म्हणतो

( १३ ) देवक-मन्यमानाचा मुलगा देवक याला इन्द्रानें मारिलें

( १४ ) शम्बर-यास इन्द्रानें मारिलें.

( १५ ). युध्यामधि–ऋग्वेदांतील मारलेल्या राजाचा शत्रु.

( १६, १७ ) पराशर शतयातु–हे ऋषी व वसिष्ठ इंद्राची स्तुति बरोबर करितात.

( १८ ). वसिष्ठ–देववाताच्या वंशाजाकडून २०० गाई व सुदासाकडून घोड्यासहित दोन रथ अशी देणगी मिळवितो.

( १९ ). देववात–वसिष्ठ पहा.

( २० ). भेद–भेदाला ( सुदासानें ) मारविलें म्हणून यमुना नदी आणि तृत्सू यांनीं इन्द्रास संतुष्ट केलें.

( २१ ) अजास )यानीं घोड्यांचीं डोकीं नजर केलीं ( सुदासाला
( २२ ). शिग्रु )भेटणी म्हणून किंवा इन्द्राला बलि म्हणून ).
( २३ ). यक्षु )

येणें प्रमाणें येथें तेवीस व्यक्ति व समूह मिळून इतिहास-विषय उत्पन्न होतात. या सूक्तांवर दुसऱ्या कांहीं सूक्तांनीं प्रकाश पडल्यास पाहूं. यांत उल्लेखिलेल्या अनेक लोकांचा ऐतिह्य न संबंध काय होता तो आपणांस ज्ञातव्य आहे. अनेक ठिकाणच्या उल्लेखांवरून ज्या व्यक्तींचीं नांवें आपणांस कळतात त्यांचा प्रथम हिशोब घेऊं व नंतर विवेचनाकडे वळूं. प्रथमतः सुदास राजावरोबर ज्यांचा प्रत्यक्ष उल्लेख येतो असे लोक घेऊं आणि नंतर त्या लोकांबरोबर आणखी कोणाचा उल्लेख येतो तिकडे वळूं. सुदासाचे सहायक म्हणून आपणांस चार समुच्चय दिसतात ते ( १ ) तृत्सु ( २ ) भरत (३) पृथु (४) पर्शु हे होत. सुदास विरुद्ध जे राजे होते त्यांचीं नांवें कांहीं लोकांच्या मतें खालीलप्रमाणें आहेत.

या विषयीं विवेचन मॅक्डोनेलनें केलें आहे.

( १ ) शिम्यु ( २ ) तुर्वश ( ३ ) द्रुह्यु ( ४ ) कवष ( ५ ) पुरु ( ६ ) अनु–आनव ( ७ ) भेद ( ८ ) शंबर ( ९ ) वैकर्ण ( १० ) दुसरा वैकर्ण ( ११ ) यदु ( १२ ) मत्स्य ( १३ ) पक्थ ( १४ ) भलानस् ( १५ ) अलिन ( १६ ) विषाणिन् ( १७ ) अज ( १८ ) शिग्र ( १९ ) शिग्रु ( २० ) यक्षु.

पहिल्या दहा नांवांपेक्षां दुसऱ्या दहा नांवांबद्दल विशेष मतभेद आहे. त्यांत विशेषतः खालील पांच व्यक्तींबद्दल विशेषच मतभेद आहे. ( १ ) मत्स्य (२) पक्थ ( ३ ) भलानस् ( ४ ) अलिन ( ५ ) विषाणिन्.

हीं नांवें राजांचीं किंवा लोकांचीं नाहींत तर मत्स्य सोडून चार हि नांवें ऋत्विजांचीं आहेत असें सायणाचार्यांचें म्हणणें आहे.

यांशिवाय सुदासाचे कांहीं शत्रू निरनिराळे आढळतात. त्यांचीं नांवें:–

( १ ) युध्यामधि. ( २ ) चाद्र. ( ३ ) देवक–मान्यमान. ( ४ ) चायमान कवि. ( ५ ) सुतुक. ( ६ ) उचथ. ( ७ ) श्रुत. ( ८ ) वृद्ध. ( ९ ) मन्यु. ( १० ) पृथु.

या एकंदर शत्रूंच्या यादीवरून सुदासाचे दहा शत्रु कोण होते व त्यांचे अनुयायी कोण होते हे ठरविणें कठीण आहे. व ते दहाच होते असें निश्चयानें म्हणवत नाहीं. वरील यादींतील श्रुत, वृद्ध व मन्यु* हे खरोखरच कोणी विद्यमान शत्रु होते कीं ते विशेषणभूत शब्द आहेत याबद्दल मतभेद आहे.

शत्रु व मित्र यांशिवाय महत्त्वाच्या दुसऱ्या व्यक्ती म्हटल्या म्हणजे पुरोहित व त्यांचीं कुलें होत. पुरोहित हे केवळ यजन करणारे नसून जयापजयाबद्दल जबाबदार असे लोक होते आणि त्यामुळें त्यांचें स्वरूप जितकें पारमार्थिक होतें त्याहून राजकीय अधिक होतें यासाठीं त्या पुरोहित कुलाकडे हि लक्ष देऊं. ऋग्वेदामध्यें कांहींच्या उपाध्यायांची माहिती आपणांस मिळते. ते उपाध्याय व त्यांचीं कुलें हीं वेदकालीन, प्रसिद्ध घराणीं असून जवळजवळ ऋग्वेदांत उल्लेखिलेल्या सर्व व्यक्तींचा व कुलांचा त्यांच्याशीं परंपरेनें संबंध पोंचतो. तो खालीलप्रमाणें

| राजा किंवा कुल | उपाध्याय |
|---|---|
| ( १ ) द्रुह्यु | ( १ ) भृगु ( दुसऱ्या मंडळाचा कर्ता गृत्समद हा भृगुवंशांतील होता. ) ( और्व, अप्नवाण, भृगवाण हीं नांवें भृगूंचींच असावींत. ) ( अङ्गिरसाचा निकट संबंध ) |
| ( २ ) पुरु | ( २ ) अत्रि ( पांचव्या मंडळाचा कर्ता ) |
| ( अ ) कुरुश्रवण | कवष |
| ( ३ ) सुदास् | ( १ ) वसिष्ठ ( सातवें मंडळ ) ( २ ) विश्वामित्र ( तिसरें मंडळ ) जमदग्नि व कण्व यांच्याशीं निकट संबंध ( ३ ) भरद्वाज ( सहावें मंडळ ) |
| ( ४ ) भरत ( तृत्सु ) | दीर्घतमस् मामतेय |
| ( ५ ) तुर्वश<br>( ६ ) यदु | कण्व |

आतां प्रत्येक उल्लेखिताचा परामर्श घेऊं. हा घेतांना आपलें लक्ष स्वाभाविकपणें दिग्विजयी सुदासाकडे प्रथम जातें.

## सुदास—सुदासाविषयीं संहिता काय म्हणते तें पाहूं.

सुदासे दस्रा वसु बिभ्रता रथे पृक्षो वहतमश्विना ।
रयिं समुद्रादुत वा दिवस्पर्यस्मे धत्तं पुरुस्पृहं ॥
( १. ४७, ६ ).

हे अश्वी देव हो, तुम्हीं सुदासाकरितां धनधान्यादि संपत्ति रथ भरून आणली. आमच्यासाठीं सुरलोकांतून अथवा समुद्रावरून स्पृहणीय असें धन घेऊन या.

* गंगाभाष्य पान ५३०. येथें अग्निहोत्री शंकरराव राम यांनीं मन्युस् व्याप्ति केलें आहे असें दिसतें.

त्वं हत्यदिन्द्र सप्त युध्यन् पुरो वज्रिन् पुरुकुत्साय दर्दः ।
बर्हिर्न यत्सुदासे वृथा वर्गंहो राजन् वरिवः पूरवे कः ॥
(१, ६३, ७).

हे इंद्रा, युद्ध करणाऱ्या पुरुकुत्साकरितां शत्रूंच्या सात नगरांचें तूं विदारण केलेंस, सुदासाच्या शत्रूला बर्हीप्रमाणें कापून टाकलेंस आणि पुरूचें दारिद्र्य नाहींसें केलेंस.

याभिः पत्नीर्विमदाय न्यूहथुरा घ वा याभिररुणीरशिक्षतं ।
याभिः सुदास ऊहथुः सुदेव्यं ताभिरू षु ऊतिभिरश्विना गतम् ॥
(१. ११२, १९).

हे अश्वी देव हो, ज्या स्तोत्रांच्या योगानें तुम्ही विमदाला भार्येची आणून दिली अथवा अरुणवर्ण गाई दिल्या, तसेंच ज्यांच्या योगानें तुम्ही सुदासाला सुदेवी आणून दिली त्या स्तुतीस्तव येथें या. ( सुदेव्यं ह्याचा अर्थ सायण उत्तम धन असा करितात. )

महाँ ऋषिर्देवजा देवजूतोऽस्तभ्नात्सिन्धुमर्णवं नृचक्षाः ।
विश्वामित्रो यदवहत्सुदासमप्रियायत कुशिकेभिरिन्द्रः ॥
(३. ५३, ९)

देवजात, देवप्रेरित मनुष्यनायक महान् ऋषि ( विश्वामित्र ) जलगाध नदीला थांबविता झाला, जेव्हां सुदासाकडून विश्वामित्र यज्ञ करविता झाला तेव्हां इन्द्र कुशिकाला प्रिय झाला.

उपप्रेत कुशिकाश्चेतयध्वमश्वं राये प्र मुञ्चता सुदासः ।
राजा वृत्रं जङ्घनत्प्रागपागुदगथा यजाते वर आ पृथिव्याः ॥
(३. ५३, ११).

कुशिकांनों, तुम्ही चला, सावधान व्हा. सुदासाचा अश्व धनासाठीं सोडा. राजा ( इंद्र ) पूर्वेस, पश्चिमेस आणि उत्तरेस शत्रूला मारून टाकील, नंतर सुदास पृथिवीच्या श्रेष्ठ स्थलीं यज्ञ करो.

एतान् रथेषु तस्थुषः कः शुश्राव कथा ययुः ।
कस्मै सस्रुः सुदासे अन्वापय इळाभिर्वृष्टयः सह ॥
(५. ५३, २)

या रथावर बसलेल्यांचें कोण ऐकेल, कसे जातील कोणत्या सुदासाला ( चांगले दान देणाराला ) अन्नयुक्त व आप्तभूत वृष्टी प्राप्त होतील.

शतं ते शिप्रिन्नूतयः सुदासे सहस्रं शंसा उत रातिरस्तु ।
जहि वधर्वनुषो मर्त्यस्यास्मे द्युम्नमधि रत्नं च धेहि ॥
(७. २५, ३).

शिप्र धारण करणाऱ्या इंद्रा, तुजकडून शंभर प्रकारांनीं माझें संरक्षण होवो. माझ्या सुदासाच्या हजारों कामना पूर्ण होवोत तसेंच हिंसा करणाऱ्या माणसाचें हिंसक शस्त्र तूं नाहींसें कर आम्हांला उत्तम प्रकारचें अन्न व रत्नें दे.

उतो हि वां रत्नधेयानि सन्ति पुरूणि द्यावापृथिवी सुदासे ।
अस्मे धत्तं यदसदस्कृधोयु यूयं पात स्वस्तिभिः सदा नः ॥
(७ ५३, ३)

आणखी हे द्यावापृथिवी हो, तुमच्याजवळ सुदासाकरितां ( सुदासास देण्यास योग्य ) असें पुष्कळ धन आहे. त्यांत जे पुष्कळ धन असेल ते आम्हांस द्या. तुम्ही आमचें नेहमीं पालन

यद्गोपा यददितिः शर्म भद्रं मित्रा यच्छन्ति वरुणः सुदासे ।
तस्मिन्ना तोकं तनयं दधाना मा कर्म देवहेळनं तुरासः ॥
(७ ६०, ८).

अदिति, मित्र व वरुण हे देव सुरक्षित व कल्याणकारक असें घर सुदासाला ( दानशील अशा मला ) देतात. आणि वल्युक्त पुत्र धारण करणारे आम्ही हे त्वरा करणारे हो (आम्ही) देवांची अवकृपा करून घेणार नाहीं.

अव वेदिं होत्राभिर्यजेत रिपः काश्चिद्वरुणध्रुतः सः ।
परि द्वेषोभिरर्यमा वृणक्तूरु सुदासे वृषणा उ लोकम् ॥
(७ ६०, ९).

हे देवहो, स्तुति करीत शत्रु यज्ञ करो. म्हणजे वरुणहिंसित तो पापी होईल. अर्यमा देव आम्हाला शत्रुरहित करो. हे कामपूरक हो, शोभनदानाला ( सुदासें ) आम्हांला मोठा लोक द्या.

मित्रस्तन्नो वरुणो देवो अर्यः प्र साधिष्ठेभिः पथिभिर्नयन्तु ।
ब्रवद्यथा न आदरिः सुदास इषा मदेम सह देवगोपाः ॥
(७. ६४, ३).

मित्र, वरुण, व अर्यमा हे देव आम्हांस इष्ट तें साधक मार्गांनी प्राप्त करोत. आणि आम्हांला आणि सुदासाला अर्यमा ज्याप्रमाणें बोलला त्याप्रमाणे करो आणि देवसरक्षित आम्ही पुत्रादिकांसहित आनन्दित होऊं या.

वसिष्ठ इंद्राची स्तुति करीत आहे

युवां नरा पश्यमानास आप्यं प्राचा गव्यन्तः पृथुपर्शवो ययुः ।
दासा च वृत्रा हतमार्याणि च सुदासमिन्द्रावरुणावसावतम् ॥
(७. ८३, १).

सायणी अर्थ–हे मित्रावरुण हो, तुमच्याशीं ' बंधुभावनेनें वागणारे ' ( आप्यं ) गाईंची इच्छा करणारे ( यजनकर्ते यजमान ) हातांत मोठाले परशु ( अश्वाच्या बरगड्या ) घेऊन प्राची दिशेकडे जातात. ( इंद्रावरुण हो, ) तुम्ही दास, वृत्र तसेंच आर्यांचा नाश करून सुदासाचें रक्षण केलेत.

टीप –सुदासाच्या शत्रूंमध्यें दास, वृत्र, आणि आर्य यांचा उल्लेख केला आहे. पृथुपर्शव पृथु ( पार्थियन ) व पर्शु ( पर्शियन ) ही राष्ट्रें युद्धांत होतीं असाहि अर्थ होईल. तीं कोणच्या बाजूनें लढलीं हें स्पष्ट होत नाहीं

इंद्रावरुणा वधनाभिरप्रति भेदं वन्वन्ता प्र सुदासमावतम् ।
ब्रह्माण्येषां शृणुतं हवीमनि सत्या तृत्सूनामभवत्पुरोहितिः ॥
(७, ८३, ४)

ज्याचा शस्त्रानें वध होणें कठीण अशा भेदाला मारणारे इंद्रावरुण हो, तुम्ही सुदासाचें रक्षण केलें. लढाईच्या प्रसंगीं तृत्सूनीं तुमची स्तुति केलेली तुम्ही ऐकलीत त्यामुळें तृत्सूंच्या येथील मार्गे पौरोहित्य खरें ठरलें.

टीप –( १ ). वसिष्ठ तृत्सूंचा पुरोहित आहे.

( २ ). पुरोहितत्व कायम राखण्यासाठीं त्याच्यामार्फत ईश्वरी साहाय्य मिळतें किंवा नाहीं याची परिक्षा. ( ३ ) सुदास व तृत्सु एक किंवा परस्पर सहायक होते.

युवां हवन्त उभयास आजिष्विन्द्रं च वस्वो वरुणं च सातये ।
यत्र राजभिर्दशभिर्निबाधितं प्र सुदासमावतं तृत्सुभिः सह ॥
(७. ८३, ६).

हे इंद्र आणि वरुणहो, युद्धांत दोनहि पक्षाच्या लोकांनी धन मिळविण्याच्या इच्छेनें तुम्हांला हांक मारली. त्यावेळीं जेव्हां दाशराज्ञांनी त्यावर हल्ला करून त्याला खालीं चेपले होतें तेव्हां तृत्सूलोकांसमवेत असलेल्या सुदासाला तुम्ही मदत केलीत.

ज्या युद्धांत दहा राजांनी चेपलेल्या तृत्सूसह सुदासाला तुम्ही रक्षिलेंत (त्याच युद्धांत) धन मिळविण्याकरितां ते दोघेहि इन्द्र, आणि वरुण यांना बोलाविते झाले.—सायण

दश राजानः समिता अयज्यवः सुदासमिन्द्रावरुणा न युयुधुः ।
सत्या नृणामद्मसदामुपस्तुतिर्देवा एषामभवन्देवहूतिषु ॥
(७. ८३, ७).

हे इंद्रावरुण हो, यजन न करणारे व युद्धास एकत्र जुळून आलेले दहा राजे (तुमच्या अनुग्रहामुळें एकट्या असलेल्या) सुदासाचा पराभव करूं शकले नाहींत. हवि अर्पण करणाऱ्या व यज्ञ करणाऱ्या ऋत्विजांनीं केलेली स्तुति सफल झाली आणि त्याच्या यज्ञाला सर्व देव आले.

*टीपः—दहा राजे हवि अर्पण करणारे नव्हते काय असा संशय उत्पन्न होतो.*

दाशराज्ञे परियत्ताय विश्वतः सुदास इन्द्रावरुणावशिक्षतम् ।
श्वित्यञ्चो यत्र नमसा कपर्दिनो धिया धीवन्तो असपन्त तृत्सवः ॥
(७. ८३, ८).

हे इंद्रावरुण हो, जेव्हां दाशराज्ञांनी त्याला सभोंवार वेढलें तेव्हां तुम्ही सुदासाला मदत केलीत. त्या ठिकाणीं शुभ्रवस्त्रधारी, जटाधारी (वेण्या घातलेले), ज्ञानाढ्य असे जे तृत्सु, त्यांनीं नमन आणि स्तवन या योगें तुमची पूजा केली.

टीप— श्वित्यंचः, कपर्दिनः, धीवन्तः अशीं तीन विशेषणें तृत्सूंना दिलीं आहेत.

एवेन्नु कं सिन्धुमेभिस्ततारेवेन्नु कं भेदमेभिर्जघान ।
एवेन्नु कं दाशराज्ञे सुदासं प्रावदिन्द्रो ब्रह्मणा वो वसिष्ठाः ॥
(७. ३३, ३)

हे वसिष्ठहो, तुमच्या स्तोत्रानें जसा इन्द्र यांच्या (सह) सिन्धु तरून गेला, जसा यांच्याकडून भेदाचा वध केला तसेंच दाशराज्ञांच्या युद्धांत सुदासाला संरक्षिलें नाहीं का?

दण्डा इवेद्गोअजनास आसन्परिच्छिन्ना भरता अर्भकासः ।
अभवच्च पुरएता वसिष्ठ आदित्तृत्सूनां विशो अप्रथन्त ॥
(७. ३३, ६).

गोप्रेरक दंड ज्याप्रमाणें (पर्णविरहित) असतात त्याप्रमाणें भरत अल्पसे असे होते. नंतर वसिष्ठ त्यांचा नायक झाला; तेव्हां तृत्सूंची कुळें जिकडे तिकडे पसरलीं.

**वरील ऋचांतील सुदासाविषयीं व इतर माहिती.**—या ऋचांच्या अनुवादावरून आतां थोडेसें भाष्य करूं. प्रथम त्यांच्या सूक्तांत आलेल्या विशेष व्यक्तींविषयीं आणि लोकांविषयीं जी माहिती मिळाली त्या माहितींत या वरील ऋचांनीं काय फरक पडतो तें पाहूं. यांपैकीं कांहीं ऋचांमध्यें उदाहरणार्थ ७. २५, ३; ७. ५३, ३; ७. ६०, ८-९; यांमध्यें *सुदासाचा अर्थ चांगलें दान देणारा असा आहे. याशिवाय या ऋचांत कांहीं विधानें अधिक नजरेस येतात.*

(१) *पुरुकुत्स आणि सुदास यांच्या सामान्य शत्रूंचा नाश* इंद्रानें केला आणि त्यामुळें पुरु श्रीमंत झाले.

(२) *अश्वींनीं सुदासाला सुदेवी नांवाची बायको* मिळवून दिली.

(३) *सुदासाकडून विश्वामित्रानें अश्वमेध करविला.*

(४) सुदासाला पूर्वेस पश्चिमेस व उत्तरेस जय मिळवावयाचा होता, आणि नंतर यज्ञ करावयाचा होता.

(५) ६. ६१ या सूक्ताच्या गात्यानें दिवोदासाच्या जन्माचें श्रेय सरस्वतीस दिलें आहे.

(६) गाता पणींच्या नाशाचें श्रेय सरस्वतीस देतो.

(७) दास, वृत्र तसेंच आर्य यांचा नाश करून सुदासाचें रक्षण इंद्रावरुणांनी केलें.

(८) पृथु आणि पर्शु हे प्राचीकडे जातात.

(९) लढाईच्या प्रसंगीं तृत्सूंची स्तुति इंद्रावरुणांनीं ऐकली त्यामुळें वसिष्ठाचें तृत्सूंच्या घरचें पौरोहित्य खरें ठरलें.

(१०) इंद्रावरुणांना दोन्ही पक्षांनीं (दशराजे व सुदास) *यांनीं हांक मारली पण देवांनीं तृत्सूसमवेत असलेल्या सुदासालाच* मदत केली.

(११) *तृत्सु यांचें वर्णन श्वित्यंचः (शुभ्रवेषधारी किंवा* निर्मळ) कपर्दिनः (जटाधारी) धीवंतः (बुद्धिवान, स्तोत्रपटु) अशीं तीन विशेषणें देऊन केलें आहे.

(१२) भरत पूर्वी थोडे होते. वसिष्ठ त्यांचा नायक झाल्यामुळें तृत्सूंचीं कुळें जिकडे तिकडे पसरलीं. या अधिक माहितीमुळें कांहीं प्रश्न उपस्थित होतात. एक प्रश्न असा कीं मागच्या सूक्तांत जर पुरु हे सुदासाच्या शत्रूंमध्यें घातले आहेत तर पुरुकुत्स आणि सुदास यांच्या सामान्य शत्रूचा नाश केल्यामुळें पुरु श्रीमंत *कसे होतील? सुदास हाहि पुरुच होता काय?* याचें उत्तर असें देतां येईल कीं एवढा पुरु व दिवोदास हे मित्र होते आणि त्या कार्यांत दिवोदास पुरुकुत्स आणि आयु यांचा पराभव तूर्वयाण (पक्थ) यानें केला असें दाखविणाऱ्या कांहीं ऋचा आहेत. त्या पराभवाच्यानंतर म्हणजे सुदासाच्या कारकीर्दीत या प्रकारें आपल्या सामान्य शत्रूचा मोड केला असा तर्क हा दिसतो.

मागच्या सूक्तांत सुदासाचा पुरोहित वसिष्ठ म्हणून दिला आहे. येथें विश्वामित्र सुदासाकडून अश्वमेध करवीत आहे व सुदासाला विजयाची प्रेरणा करीत आहे. वसिष्ठ आणि विश्वामित्र हे दोघेहि कांहीं वेळपर्यंत पौरोहित्याकरितां स्पर्धा करतांना आपणांस येथें दृष्टीस पडतात.

येथें आपणांस एक प्रश्न उत्पन्न करणारें एक सूक्त दृष्टीस पडतें सरस्वतीच्या प्रसादानें वध्र्यश्वाला दिवोदास हा पुत्र झाला असे विधान आहे. या विधानावरून दिवोदास गांधाराकडून पूर्वेकडे दिग्विजय करीत येत होता या कल्पनेस बाध उत्पन्न होतो काय हा प्रश्न आहे आमच्या मते बाध येत नाहीं. कां कीं दिवोदास हा मुलगा सरस्वतीने दिला म्हणजे सरस्वती नदीच्या काठीं दिवोदासाचा जन्म झाला असे नाहीं तर उत्तरकालीन कवींना दिवोदासाच्या जन्माचें श्रेय त्यांच्या तत्कालीन देवतेस सरस्वती नदीस दिलें आहे एवढेंच यावरून निघते.

पृथु आणि पर्शु हीं दोन राष्ट्रें सुदासाच्या मदतीस होतीं आणि तीं पूर्वेकडे जात आहेत असा उल्लेख आहे, तो सुदासाच्या स्वारीची दिशा स्पष्ट करतो.

भरतांचें नाव यत्र आलें आहे. ते पूर्वी थोडे होते आणि त्यांचा नायक वसिष्ठ झाल्यानंतर त्यांचीं कुलें चोहोंकडे पसरलीं असा उल्लेख आहे. एवढ्या उल्लेखावरून भरत, तृत्सु, वसिष्ठ आणि सुदास यांचा संबंध स्पष्ट होत नाहीं. तो होण्यासाठीं आणखी संशोधन केलें पाहिजे

भरत व तृत्सु –विवेचनसौकर्यासाठीं भरत व तृत्सुविषयींचे उतारे येथें घेऊं. तृत्सूंचा ऋग्वेदांत उल्लेख फक्त सातव्या मंडळात आठ वेळा आलेला आहे. (७. १८, ७, १३, १५; १९; ३३, ५; ६; ८३, ४, ६; ८.) त्यांपैकीं पहिल्या चार ऋचा पूर्वी येऊन गेल्याच आहेत व पुढील चार विवेचन करतांना पुढें घेतल्या आहेत. येथें भरतांविषयीं उल्लेख देतों. त्यांत प्रथम भरतांनीं विपाट्-शुतुद्रि या नद्यांच्या संगमामधून मार्ग आक्रमण केल्याची कथा गाणारें तिसऱ्या मंडळांतील तेहेतिसावें सूक्त प्रथम घेऊं.

*विश्वामित्र आणि नद्या –*

**प्र पर्वतानामुशती उपस्थादश्वेइव विषिते हासमाने ।**
**गावेव शुभ्रे मातरा रिहाणे विपाट्छुतुद्री पयसा जवेते ॥ १ ॥**

दोन घोड्या तबेल्यांतून सुटून एकमेकींशीं चढाओढ करून चालाव्या त्याप्रमाणें चालणाऱ्या दोन गाईंप्रमाणे शोभणाऱ्या, दोन गाई माता असाव्या आणि त्या जिव्हेनें वत्सांना चाटण्यासाठीं त्वरेनें धांवत असाव्या त्याप्रमाणें धावणाऱ्या, विपाश व शुतुद्री या नद्या पर्वताच्या मांडीवरून निघून समुद्राला जाण्याच्या इच्छेनें आपल्या जलासह त्वरेनें जात आहेत.

**इन्द्रेषिते प्रसवं भिक्षमाणे अच्छा समुद्रं रथ्येव याथः ।**
**समाराणे ऊर्मिभिः पिन्वमाने अन्या वामन्यामप्येति शुभ्रे ॥ २ ॥**

हे नद्यांनों! इन्द्राच्या अनुज्ञेची भिक्षा मागणाऱ्या व त्यानें अनुज्ञा देऊन पाठविलेल्या तुम्ही सरळ समुद्राकडे जात आहां, दोन गाड्यांचे आपल्या ठरीव ठिकाणीं जावें त्याप्रमाणें तुम्हीं जात आहां. तुमच्यापैकीं प्रत्येक दुसरीशीं मिळून जात आहे. तुम्ही शोभायुक्त आहां

**अच्छा सिन्धुं मातृतमामयासं विपाशमुर्वीं सुभगामगन्म ।**
**वत्समिव मातरा संरिहाणे समानं योनिमनु संचरन्ती ॥३॥**

(वत्साला) चाटणाऱ्या दोन आया धन्याप्रत ज्याप्रमाणें जातात त्याप्रमाणे एकच मूल ठिकाण–समुद्र–याकडे वाहत जाणाऱ्या, मातृतम वाहणारी शुतुद्रि आणि मोठी भाग्यशाली अशी विपाश् या दोन नद्या याप्रत मी आलो आहे.

**एना वयं पयसा पिन्वमाना अनु योनिं देवकृतं चरन्तीः ।**
**न वर्तवे प्रसवः सर्गतक्तः किंयुर्विप्रो नद्यो जोहवीति ॥ ४ ॥**

पाण्यानें भरलेल्या आम्हीं देवानें निर्माण केलेल्या समुद्राकडे जात आहोंत. उत्पत्तिस्थानाकडे जाण्याकरितां आरंभलेला हा उद्योग परत फिरण्याकरितां नाहीं (मग) काय इच्छा करणारा हा ब्राह्मण आम्हा नद्यांना बोलावितो आहे.

**रमध्वं मे वचसे सोम्याय ऋतावरीरुप मुहूर्तमेवैः ।**
**प्र सिन्धुमच्छा बृहती मनीषावस्युरह्वे कुशिकस्य सूनुः ॥ ५ ॥**

हे नद्यांनों, माझ्या शांत भाषणानें तुम्ही मुहूर्तभर गमन थांबवावें. अर्थपूर्ण स्तुतीनें स्वतःचें संरक्षण करण्याची इच्छा करणारा कुशिक पुत्र विश्वामित्र (हे शुतुद्रि) बोलावतो आहे.

**इन्द्रो अस्माँ अरदद्वज्रबाहुरपाहन्वृत्रं परिधिं नदीनाम् ।**
**देवोऽनयत्सविता सुपाणिस्तस्य वयं प्रसवे याम उर्वीः ॥ ६ ॥**

वज्रधारी इन्द्रानें आमच्या (प्रवाह जाण्याच्या) वाटा खणल्या. आमचे प्रवाह अडवणाऱ्या वृत्राला त्यानें मारिलें. सुंदर हस्ताच्या सवितृ देवानें आम्हांला नेलें (म्हणजे वाट दाखविली), आणि त्यानें पाठविल्यामुळें विस्तृत होऊन आम्ही वाहतो.

**प्रवाच्यं शश्वधा वीर्यं तदिन्द्रस्य कर्म यदहिं विवृश्चत् ।**
**वि वज्रेण परिषदो जघानायन्नापोऽयनमिच्छमानाः ॥ ७ ॥**

अहीचे तुकडे तुकडे करून टाकण्याचें जें शूर कृत्य इन्द्रानें केलें त्या कृत्याची स्तुति नेहमीं केली पाहिजे अडवणूक करणाऱ्यांचा त्यानें चुराडा केला आणि (नंतर) पुढील मार्ग आक्रमण करण्यास उत्सुक झालेल्या नद्या पुढें वाहिल्या.

**एतद्वचो जरितर्मापि मृष्ठा आ यत्ते घोषानुत्तरा युगानि ।**
**उक्थेषु कारो प्रति नो जुषस्व मा नो नि कः पुरुषत्रा नमस्ते ॥ ८ ॥**

हे गायका! पुढील पिढ्या ज्याचा पुनरुच्चार करितील असा हा तुझा शब्द कधींहि विसरूं नकोस. हे कवे! तुझ्या मनांत आमचे विषयीं असलेला प्रेमयुक्त प्रेमळपणा सूक्तें गाऊन दाखीव. मनुष्यामध्यें आम्हांस कमीपणा आणूं नकोस. तुला जयजयकार असो!

**ओ षु स्वसारः कारवे शृणोत ययौ वो दूरादनसा रथेन ।**
**नि षू नमध्वं भवता सुपारा अधोअक्षाः सिन्धवः स्रोत्याभिः ॥ ९ ॥**

हे भगिनी हो, माझें स्तोत्र लक्षपूर्वक ऐका. मी गाडी आणि रथ यांनीं तुम्हांकडे फार दूरून आलों आहें प्रवाहानें कण्याच्या खालपर्यंत जा व सहज तरून जातां येईल असा ज्या

आ ते कारो शृणवामा वचांसि ययाथ दूरादनसा रथेन ।
नि ते नंसै पीप्यानेव योषा मर्यायेव कन्या शश्वचै ते ॥ १० ॥

हे स्तोतृर्‍या ( विश्वामित्रा ) ज्या अर्थी तूं गाडी आणि रथ यानें दूरवर आला आहेस त्याअर्थी तुझा बोलणीं आम्हीं ऐकतों. आणि बाळाला पाजणाऱ्या आईप्रमाणें किंवा कन्या बापापुढें किंवा भावापुढें नमते त्याप्रमाणें आम्हां नम्र ( उथळ ) होतों.

यदङ्ग त्वा भरताः सन्तरेयुर्गव्यन्ग्राम इषित इन्द्रजूतः ।
अर्षादह प्रसवः सर्गतक्त आ वो वृणे सुमतिं यज्ञियानाम् ॥ ११ ॥

ज्याअर्थी तुम्हीं तुमच्या मधून पार जाण्याची अनुज्ञा दिली त्याअर्थी भरत तुमच्या एकीभूत समूहामधून पार निघून जातील. तुमचीं उदरें ओलांडून जाऊं इच्छिणारा भरतांचा संघ तुमच्याकडून अनुज्ञा मिळाल्यानें आणि इंद्राकडून प्रेरित झाल्यामुळें तुमच्या मधून पार निघून जाईल. त्यांचा गमन प्रवृत्तीचा उद्योग पूर्वींच तुमच्याकडून अनुज्ञात झालेला आहे. मी मात्र तुम्हां यज्ञार्ह नद्यांची सुंदर स्तोत्रें गात रहाण्याचेंच पत्करितों.

अतारिषुर्भरता गव्यवः समभक्त विप्रः सुमतिं नदीनाम् ।
प्र पिन्वध्वमिषयन्तीः सुराधा आ वक्षणाः पृणध्वं यात शीभम् ॥ १२ ॥

गाईंची इच्छा करणारे ते भरत त्या नद्यांच्या पार निघून गेले विप्र विश्वामित्र त्या नद्यांची सुंदर स्तुति करीत राहिला. अन्न उत्पन्न करणाऱ्या व उत्तम धनानें युक्त अशा तुम्हीं कालव्यांना आनंदित करा, त्यांनां चोहोंकडून भरून टाका व आपली वाट त्वरेनें चालत रहा.

उद्व ऊर्मिः शम्या हन्त्वापो योक्त्राणि मुञ्चत ।
माडुष्कृतौ व्येनसाघ्न्यौ शूनमारताम् ॥ १३ ॥

हे नद्यांनो ! तुमची लाट शिवळीवर ( जोखडावर ) आपटूं दे, तुम्हीं दोरखंडांना स्पर्श करूं नका. निरुपद्रवी व पापरहित अशी बैलांची जोडी कधींही नाश न पावो. सुदासविषयक उतारे पूर्वी दिलेच आहेत. त्यांतीलच कांहीं महत्त्वाचे उतारे आणखी येथे देतों.

हंसा इव कृणुथ श्लोकमद्रिभिर्मदन्तो गीर्भिरध्वरे सुते सचा ।
देवेभिर्विप्रा ऋषयो नृचक्षसो वि पिबध्वं कुशिकाः सोम्यं मधु ॥
( ३. ५३, १० )

हे बुद्धिमान् मनरष्टे हो, हे कर्मकुशल कुशिक श्रेष्ठ हो, यज्ञांत दगडांनीं सोम काढला असतां हंसाप्रमाणें मोहक वाणीनें स्तोत्रें करा. आणि देवांसह मधुर सोममय रस प्या —सायण

( सोमलता ज्या दगडांमध्यें दाबून पिळतात ) त्या दाबण्याच्या दगडांनीं पिळलेला सोमरस यज्ञामध्यें पिळणारांना म्हटलेल्या सूक्तांनीं आनंदित होणारे तुम्हीं, हंसाप्रमाणें एक स्तुतीचें गाणें तयार करा. हे ऋषींनो, मनुष्यावर दृष्टि ठेवणारे कुशिक ऋषी हो ! देवांसह स्वादिष्ट सोमरस प्या.'—ग्रिफिथ

य इमे रोदसी उभे अहमिन्द्रमतुष्टवम् ।
विश्वामित्रस्य रक्षति ब्रह्मेदं भारतं जनम् ॥
( ३. ५३, १२ )

ज्या मीं द्यावापृथिवीमध्ये राहणाऱ्या इंद्राला संतुष्ट केलें आहे त्या या विश्वामित्राचें स्तोत्र भरत कुळांतील जनांचें रक्षण करील.'—सायण

हीं पृथ्वी व स्वर्ग ह्यांचे संरक्षण करण्यास जो इंद्र त्याची मीं स्तुति केली आहे. विश्वामित्राचें हें सूक्त किंवा ही प्रार्थना भरताची जात (कुल) रक्षिते—(म्हणजे रक्षण करील).'—ग्रिफिथ

इम इन्द्र भरतस्य पुत्रा अपपित्वं चिकितुर्न प्रपित्वम् ।
हिन्वन्त्यश्वमरणं न नित्यं ज्यावाजं परि णयन्त्याजौ ॥
( ३. ५३, २४ )

हे इंद्रा ! हे भरताचे पुत्र ताटातुटीची किंवा निकट संबंधाची पर्वा करीत नाहींत ( जाणत नाहींत ). आपला स्वतःचा घोडा जणू काय दुसऱ्याचा आहे असें समजून धनुष्याच्या दोरीप्रमाणें चपळ असणाऱ्या त्याला लढाईस नेतात.

त्वामीळे अध द्विता भरतो वाजिभिः शुनम् ।
ईजे यज्ञेषु यज्ञियम् ॥ ( ६. १६. ४ )

हे अग्ने भरतानें सुखाच्या इच्छेनें यज्ञामध्यें यज्ञार्ह अशा तुला हवी अर्पण करून स्तुति केली असतां तूं त्याला दोन प्रकारचें ( इष्ट प्राप्ति आणि अनिष्ट नाश ) सुख प्राप्त करून दिलेंस.

प्र प्रायमग्निर्भरतस्य शृण्वे वि यत्सूर्यो न रोचते बृहद्भाः ।
अभि यः पूरुं पृतनासु तस्थौ द्युतानो दैव्यो अतिथिः शुशोच ॥
( ७. ८, ४ )

या भरताचा अग्नि फार कीर्तिमान् आहे. हा सूर्याप्रमाणें मोठ्या दीप्तीनें प्रकाशतो. ज्यानें युद्धांत पूरूचा पराभव केला तो स्वर्गीय अतिथि परिपूर्ण तेजानें प्रकाशला आहे.

तिसऱ्या मंडळांतील तेतिसावें सूक्त वर दिलें आहे. तें त्याच मंडळांतील त्रेपनाव्या सूक्तावरोबर वाचलें पाहिजे व यासाठीं त्रेपनाव्या सूक्तांतील महत्त्वाचे उतारे वर दिलेच आहेत. तेहेतिसाव्या सूक्तांत भरतांस विपाश् आणि शुतुद्री उल्लंघिण्यासाठीं विश्वामित्रानें केलेली नद्यांची स्तुति आहे. त्रेपनाव्या सूक्तांत विश्वामित्राच्या स्तोत्रानें स्तंभन झाल्याचें वर्णन नवव्या ऋचेंत आहे याच सूक्ताच्या अकराव्या ऋचेंत अश्वमेधांतील घोडा सोडण्याबद्दल ऋत्विजांना सूचना आहे. हे दोन्ही उल्लेख सुदाससंबंधीं उल्लेखांत आले आहेत. यावरून विपाश् आणि शुतुद्री यांचें आक्रमण भरतांकडून अश्वमेधापूर्वी झालें असें दिसून येतें.

**सुदास तृत्सु होता काय:**—सुदासाविषयींचा एक मोठा प्रश्न म्हटला म्हणजे सुदास हा तृत्सु होता काय ! हा होय. या प्रश्नाच्या स्पष्टीकरणास आतां आपण वळूं.

तृत्सूंविषयीं आपणांस अनेक विधानें दृष्टीस पडतात. तीं येणें प्रमाणें

( १ ) इंद्रानें अनवांचें धन तृत्सूंला दिलें.
( ७. १८, १३ ).

( २ ) यमुना नदी व तृत्सु यांनीं इंद्राचें रक्षण केलें.
( ७. १८, १९ ).

( ३ ) इन्द्राशीं युद्ध करीत असतां तृत्सु पळाले व पळतांना धन सुदासाला दिलें. किंवा इंद्रासह ते चाल करून गेले.
( ७. १८, ११ )

( ४ ) आर्यांचे गोधन तृत्सूंपासून हरण केले आणि युद्धांत त्यांना ठार मारलें.

( ७. १८, ७ ).

( ५ ) स्तुति करणाऱ्या वसिष्ठाचें स्तोत्र इंद्रानें ऐकलें आणि तृत्सूंचा देश विस्तीर्ण केला. ( पाऊस पाडला ).

( ७. ३३, ५ ).

( ६ ) बैलांना मारण्याची काठी ज्याप्रमाणें अल्प पर्णयुक्त असते त्याप्रमाणें हे भरत अल्प होते. नंतर जेव्हां तृत्सूंचा पुरोहित वसिष्ठ झाला तेव्हां तृत्सूंचे लोक खूपच वाढले.

( ७. ३३, ६ ).

( ७ ) हे इन्द्रावरुणानों, घातुक शस्त्रानें समोर न येणाऱ्या भेदाला मारणारे तुम्ही सुदासाचें काळजीपूर्वक रक्षण करा. माझे यजमान तृत्सु यांची युद्धांतील ( बोलावणीं ) स्तोत्रें ऐकलींत यावरून माझें तृत्सूंचें पौरोहित्य सफल झालें.

( ७. ८३, ४ ).

( ८ ) दाशराज्ञ युद्धांत तृत्सूंसह सुदासाला रक्षिलें.

( ७. ८३, ६ )

( ९ ) श्वैत्यन्तो असपन्त तृत्सवः

( ७. ८३, ८ )

तृत्सूंनीं स्तुति केली ( तेथें सुदासाला रक्षिलें ). सुदास तृत्सु होता कीं नाहीं ?—सुदास व तृत्सु भिन्न या म्हणण्यास ७. १८, १५ हें स्थल आधार म्हणून देतां येईल. या ठिकाणीं 'इन्द्रानें युद्ध रोखतांना तृत्सु पळाले व त्याचें धन सुदासाला मिळालें असें म्हटलें आहे. यावरून सुदास व तृत्सु भिन्न तर होतातच परंतु त्यांचें शत्रुत्वहि व्यक्त होतें. यावरून असा प्रश्न उपस्थित होतो कीं असा एखादा काळ नसेलना कीं ज्या काळांत तृत्सु व सुदास हे एकमेकांविरुद्ध होते व पुढें ते एक झाले असावेत. दुसरें एक स्थळ संशयास्पद आहे. ७. ८३, ६ येथें 'तृत्सुभिः सह प्रसुदासमावतं' तृत्सूंसह सुदासाला रक्षिलें असें स्पष्ट म्हटलें आहे. यावरूनहि तृत्सु व सुदास हे एक होते असें जसें निघतें तसेंच ते एक नव्हते असेंहि निघूं शकतें. याच मंत्रांतील 'उभयासः' हें पद सुदास व तृत्सु त्यांच्या भिन्नतेचें प्रतिपादक म्हणून महत्त्वाचें आहे. वरील विधानाप्रमाणेंच दुसरें विधान ७. ८३, ८ या ऋचेत आहे.

हे इंद्रावरुणानों ! दहा राजांच्या युद्धांत चहूंकडून वेढिलेल्या सुदासाला ज्या ठिकाणीं निर्मलवृत्ति, जटाधारी बुद्धिमान असा तृत्सूंनीं तुमचीं हविरन्नानें व स्तोत्रांनीं स्तुति केली त्या ठिकाणीं रक्षण केलें.

हें वसिष्ठमंडल आहे. त्यामुळे व वसिष्ठाचा ज्या ज्या लोकांशी संबंध त्यांचा त्यांचा उल्लेख एखाद्या माहितगार माणसाप्रमाणें यांत येणें स्वाभाविक आहे. या मंडळांतील विधानावरून सुदास आणि तृत्सु यांचें भिन्नत्व जरी दिसून येतें तथापि सुदास आणि तृत्सु यांचा निकट संबंध होता, हें नाकबूल करितां येणार नाहीं. त्यांचा अत्यंत निकट संबंध होता याची चिकित्सा करतांना त्या दोहोंत भिन्नभाव होता अगर शास्यशासक भावहि होता हें ठरविलें पाहिजे, आणि भरत व तृत्सु यांचा संबंध शोधिला पाहिजे.

या विवेचनामध्यें शिरतांना विवेचनास पोषक पण प्रथम अप्रस्तुत दिसणाऱ्या एका प्रश्नाकडे वळलें पाहिजे. तो प्रश्न म्हटला म्हणजे आर्य या शब्दाचा कांहीं ऋचांतील उपयोग होय. तृत्सु आणि आर्य यांच्या संबंधाविषयीं प्रश्न उत्पन्न करणारी एक ऋचा आहे. 'आर्यस्य गव्या तृत्सुभ्यो अजगन्युधानृन्' ( ७. १८, ७ ). अन्वयः—सधमाः आर्यस्य गव्या तृत्सुभ्यः अनयत् युधा नॄन् अजगन् ' आर्यांच्या गाई तृत्सूंपासून सोडविल्या आणि त्यांना ठार मारलें. ' यावरून आर्य आणि तृत्सु परस्पर विरुद्ध होते असें दिसतें.

आर्य हा मानववंश समजून त्या मानववंशामध्यें वसिष्ठशिष्य तृत्सूंचा अंतर्भाव होत नाहीं म्हणून घाबरा झालेला ग्रिफिथ तृत्सूंना आर्य समजतो व वरील स्थलीं गव्या शब्दाचा भिन्न असा अर्थ करितो. विल्सनला हें ग्रिफिथचें म्हणणें मान्य नाहीं. तथापि तृत्सु आर्येन या सोंवळ्या शब्दांतून बाहेर पडण्याचें भय मुळींच नाहीं. सदर उल्लेखाचा अर्थ एवढाच कीं ज्यांच्या गाई होत्या तो वर्ग यजन करणारा होता. वरील वाक्यांत आर्यन् नान्–आर्यन् यांचें सामुच्चयिक युद्ध नसून "भक्तांची पाठ राखलीस देवा" अशा अर्थाचें विधान आहे.

पूर्वी भरत थोडे होते पण वसिष्ठास पौरोहित्य मिळाल्यामुळें तृत्सु चोहोंकडे पसरले असें विधान करणारी एक ऋचा मागें दिली आहे. आतांपर्यंत घेतलेल्या उताऱ्यांत आपणास खालील गोष्टी स्पष्ट दिसतात.

भरतांचे एका काळीं उपाध्ये विश्वामित्र.
भरतांचे दुसऱ्या काळीं उपाध्ये वसिष्ठ.
तृत्सूंचे एका काळीं उपाध्ये वसिष्ठ.
तृत्सूंचे एका काळीं शत्रु सुदास.
तृत्सूंचे दुसऱ्या काळीं मित्र सुदास.
सुदासाचे एका काळीं पुरोहित वसिष्ठ.
सुदासाचे दुसऱ्या काळीं ( अश्वमेध काळीं ) पुरोहित विश्वामित्र.
सुदासाच्या पूर्वजांचे पुरोहित भारद्वाज.
सुदासाचे मित्र पृथु आणि पर्शु.
सुदासाचे तृत्सु एका काळीं शत्रु.
सुदासाचे तृत्सु दुसऱ्या काळीं मित्र.
तृत्सूंचे मित्र भरत; एकाकाळीं शत्रु.
सुदास हा भरत होता.

तृत्सूंचा व विश्वामित्राचा संबंध कोठेंच वर्णिला नाहीं. त्यावरून भरत व तृत्सु हे एक नसावेत. दिवोदास किंवा सुदास हा भरत राजा असावा. त्याच्या कुळाचा एका काळीं भारद्वाजाशीं संबंध असेल परंतु दाशराज्ञयुद्धाच्या थोडथा पूर्वीच्या काळांत सुदास पुरोहित विश्वामित्र होते यांत शंका नाहीं. वसिष्ठप्रमुख तृत्सु आणि विश्वामित्रसुदासप्रमुख भरत यांचें वैर झालें असावें. पुढील युद्धामध्यें केव्हां तरी तृत्सूंचा पराजय झाला असावा ( ७. १८, १५ ) आणि केव्हां तरी जय झाला असावा ( ७, ३३, ६ ).

(७. १८, १९ व ७. ३३, ६) या दोन ऋचा परस्पर विरुद्ध अर्थ देणाऱ्या आहेत समजा, या दोन्ही ऋचा नसत्याच तर काय झालें असतें? या ऋचांच्या अभावीं फार तर तृत्सु व भरत यांचे कांहीं काल शत्रुत्व होतें ही गोष्ट सिद्ध व्हावयास कठिण जाईल पण ते तेवढयाने भरत व तृत्सु यांचे परस्पर भिन्नत्व खोटें ठरत नाहीं. तृत्सु व भरत यांमध्ये सख्य वसिष्ठामुळें किंवा वसिष्ठाच्या देववशीकरणशक्तीवर विश्वास भरतामध्येंहि उत्पन्न झाल्यामुळें झालें असावें व वसिष्ठामुळें तृत्सूंचें व भरतांचें एकीकरण झालें असावें.]

तृत्सु आणि तृत्सूंचा देश किंवा प्रान्त कोठें असावा त्या स्थलासंबंधीं विचार आतां करूं. त्याच्या देशाचा नक्की निर्देश करण्यास मुख्य दोनच साधनें उपलब्ध आहेत. एक 'आवदिंद्रं यमुना तृत्सवश्च' या उल्लेखावरून आणि दाशराज्ञ युद्धाचें वसिष्ठ सूक्त ७. १८ मध्यें वर्णिलेलें स्थल परुष्णी असल्यामुळें याच्यामधील प्रदेश तृत्सूंचा असावा अशी कल्पना होते. तृत्सूंना 'प्रतृद' असेंहि म्हटलें आहे. 'आवो गच्छाति प्रतृदो वसिष्ठ' ७. ३३, १४ या स्थळीं 'प्रतृद' शब्दाचा 'तृत्सु' अशा अर्थी उपयोग केला असून वसिष्ठाच्या सूक्तामध्यें आणखीहि अनुमानिक माहिती मिळेल.

सुदासाची ऐतिहासिक कामगिरी समजून घेण्यासाठीं त्याच्या पूर्वजांची कामगिरी समजून घेतली पाहिजे. जें काम बाप सुरू करतो तेंच मुलास पुढें चालवावें लागतें. राजास जे शत्रु किंवा मित्र बाप उत्पन्न करून ठेवील तेच मुलास पत्करावे लागतात. यासाठीं प्रथम दिवोदास (हा सुदासाचा बाप अगर आजा असावा) याचें कार्य लक्षांत घेऊं. दिवोदास, अतिथिग्व यासंबंधीं संहितेंत पुढील उल्लेख आढळतात.

**त्वं कुत्सं शुष्णहत्येष्वाविथारंधयोतिथिग्वाय शम्बरम्।**
**महान्तं चिदर्बुदं नि क्रमीः पदा सनादेव दस्युहत्याय जज्ञिषे ॥**
(१. ५१, ६).

शुष्णाचा जेव्हां वध करण्यांत आला त्या वेळेस कुत्साचें तूं रक्षण केलेंस, अतिथिग्वाला भक्षणार्थ शंबर दिलास. शक्तिमान् अर्बुदालाहि तूं पायाखालीं तुडविलेस. दस्यूंचा वध करण्याकरितां तूं पुरातन कालीं जन्मास आलास.

**त्वं करञ्जमुत पर्णयं वधीस्तेजिष्ठयातिथिग्वस्य वर्तनी।**
**त्वं शता वङ्गृदस्याभिनत्पुरोनानुदः परिषूता ऋजिश्वना ॥**
(१. ५३, ८)

करंज व पर्णय यांचा तूं अतिथिग्वाच्या अत्यंत वैभवशाली फेऱ्यांत वध केला आहेस. ऋजिश्वानें वेढा घातला त्या वेळेस शरण न जाणाऱ्या वंगृदाच्या शंभर किल्ल्यांचा नाश केला आहेस.

**त्वमाविथ सुश्रवसं तवोतिभिस्तव त्रामभिरिन्द्र तूर्वयाणम्।**
**त्वमस्मै कुत्समतिथिग्वमायुं महे राज्ञे यूने अरन्धयः ॥**
(१, ५३, १०.)

हे इन्द्रा! तूं मदत करून सुश्रवसाचें रक्षण केलें आहेस, आणि तुझ्या मदतीनें तूर्वयाणाचें (रक्षण केलें आहेस.) कुत्स, अतिथिग्व, आयु ह्यांना या तरुण व बलवान् राजाचे अंकित केलेंस.

**याभिर्महामतिथिग्वं कशोजुवं दिवोदासं शंबरहत्य आवतम्।**
**याभिः पूर्भिद्ये त्रसदस्युमावतं ताभिरू षु ऊतिभिरश्विना गतम्॥**
(१ ११२, १४)

हे अश्वीहो! तुम्ही मोठा अतिथिग्व दिवोदास व कशोजु ह्यांचें शंबराचा वध करून त्रसदस्यूचे किल्ल्याचा चुराडा करून ज्या साधनांनीं पालन केलेत, तीं साधनें घेऊन तुम्ही येथें आमचेकडे या.

**यदयातं दिवोदासाय वर्तिर्भरद्वाजायाश्विना हयन्ता।**
**रेवदुवाह सचनो रथो वां वृषभश्च शिंशुमारश्च युक्ता ॥**
(१. ११६, १८)

हे अश्वीहो! तुम्ही दिवोदासाच्या घरीं आलांत, भरद्वाजाप्रत त्वरेनें आलात–ते वेळीं तुमचे बरोबर आलेला रथ उत्तम धन घेऊन आला, त्याला एक शिंशुमार व एक बैल एकत्र जोडले होते.

**युवं भुज्युं भुरमाणं विभिर्गतं स्वयुक्तिभिर्निवहन्ता पितृभ्य आ।**
**यासिष्टं वर्तिर्वृषणा विजेन्यं दिवोदासाय महि चेति वामवः ॥**
(१. ११९, ४).

भुज्यु पाण्याच्या पुरांत धडपड करीत असतां तुम्ही त्याजकडे आलांत, उडणाऱ्या व स्वतःच जोडलेल्या पक्ष्यांकडून तुम्हीं त्याला त्याचे वडिलांजवळ नेलें. हे बलवान् हो! तुम्हीं दूर असलेल्या घराप्रत गेलांत, आणि दिवोदासाला तुम्हीं दिलेली मोठी मदत प्रसिद्ध आहे—ग्रिफिथ.

**भिनत्पुरो नवतिमिन्द्र पूरवे दिवोदासाय महि दाशुषे नृतो वज्रेण दाशुषे नृतो।**
**अतिथिग्वाय शम्बरं गिरेरुग्रो अवाभरत्।**
**महो धनानि दयमान ओजसा विश्वा धनान्योजसा ॥**
(१, १३०, ७)

तुझ्या कृपेंतला दास कामना पुरविणारा (पुरु) जो दिवोदास त्याकरितां–तुझ्या भक्ताकरितां–हे इन्द्रा! हे नृत्यकर्त्या! तूं आपल्या वज्रानें नव्वद किल्ल्यांचा चुराडा केलास. त्या बलवानानें अतिथिग्वाकरितां शंबराला पर्वतावरून खालीं आणलें व आपल्या बलानें महाधन वाटलें, आणि आपल्या बलानें सर्व धन देऊन टाकलें.

**स नो नव्येभिर्वृषकर्मन्नुक्थैः पुरां दर्तः पायुभिः पाहि शग्मैः।**
**दिवोदासेभिरिन्द्र स्तवानो वावृधीथा अहोभिरिव द्यौः ॥**
(१. १३०, १०)

हे पराक्रमी (इन्द्रा)! हे किल्ले फोडणाऱ्या आमच्या नूतन सूक्तांनीं गाइलेला तूं बळकट करणाऱ्या मदतीनें आमचें रक्षण कर. हे इन्द्रा! दिवोदासाच्या वंशजांनीं स्तविलेला तूं, द्यु जसा दिवसांनीं मोठा होत जातो तसा तूं वैभवांत वृद्धिंगत हो.

**अध्वर्यवो यः शतमा सहस्रं भूम्या उपस्थेऽवपज्जघन्वान्।**
**कुत्सस्यायोरतिथिग्वस्य वीरान्न्यावृणग्भरता सोममस्मै ॥**
(२. १४, ७)

ज्यानें एक लक्ष (लोकांचा) वध केला व त्यांना खालीं पृथ्वीच्या वक्षस्थलावर फेंकून दिलें, ज्यानें अतिथिग्व, कुत्स व आयु यांच्या वीरांनां† मारलें त्याला हे अध्वर्यो! सोम आणा.

**सरन्धयस्सदिव सारथये शुष्णमशुषं कुयवं कुत्साय।**
**दिवोदासाय नवतिं च नवेन्द्र पुरो व्यैरच्छम्बरस्य ॥**
(२. १९, ६)

† वीर याचा अर्थ सायणांनीं अभिगन्तृ=शत्रु असा केला आहे.

एकदां त्यानें आपल्या कुत्स सारथ्याला अधाशी व पिकें भक्षण करणारा शुष्ण देऊन टाकला; आणि इन्द्राने दिवोदासासाठी शंबराचे नव्याण्णव किल्ले पाडून टाकले.

अहं पुरो मन्दसानो व्यैरं नव साकं नवतीः शम्बरस्य।
शततमं वेश्यं सर्वताता दिवोदासमतिथिग्वं यदावम्॥
(४. २६, ३).

सोमाच्या उन्मत्त आनंदांत मी शंबराचे नव्याण्णव किल्ले एकत्र पाडून टाकले; आणि दिवोदास अतिथिग्वाला सहाय्य करतांना शंबराचें वसतिस्थान पूर्णपणें ( मोडून टाकलें. ).

शतमश्मन्मयीनां पुरामिन्द्रो व्यास्यत्।
दिवोदासाय दाशुषे॥
(४. ३०, २०).

हवि देणाऱ्या दिवोदासाकरिता इन्द्रानें दगडांचे शंभर किल्ले उलथून टाकले.

त्वमिमा वार्या पुरु दिवोदासाय सुन्वते।
भरद्वाजाय दाशुषे॥
(६. १६, ५).

पुढें ओतणाऱ्या दिवोदासाला-पारितोषिकें ( किंवा देणग्या ) देणाऱ्या भरद्वाजाला-तूं हे पुष्कळ वर दिलेस.

प्र तत्ते अद्या करणं कृतं भूत्कुत्सं यदायुमतिथिग्वमस्मै।
पुरू सहस्रा नि शिशा अभि क्षामुत्तूर्वयाणं धृषता निनेथ॥
(६. १८, १३).

तूं आज केलेलें कृत्य प्रसिद्ध आहे. ( आज ) तूं त्याच्याकरितां इतर पुष्कळ हजारोंसह कुत्स, आयु व अतिथिग्व यांना नमविलेंस; आणि तूर्वयाणाला धैर्यानें मुक्त केलेंस.

त्वं कविं चोदयोऽर्कसातौ त्वं कुत्साय शुष्णं दाशुषे वर्क्।
त्वं शिरो अमर्मणः पराहन्नतिथिग्वाय शंस्यं करिष्यन्॥
(६. २६, ३).

सूर्यप्रकाश जिंकण्यास तूं त्या ऋषीला भाग पाडलेंस; सुशील कुत्सासाठीं शुष्णाचा नाश केलास, अभेद्य राक्षसाचें डोकें तूं कापलेंस त्या वेळेस अतिथिग्वाची स्तुति तूं जिंकलीस.- प्रिथिव

त्वं तदुक्थमिन्द्र बर्हणा कः प्र यच्छता सहस्रा शूर दर्षि।
अव गिरेर्दासं शम्बरं हन्प्रावो दिवोदासं चित्राभिरूती॥
(६. २६, ५).

हे वीरा! तूं ज्या वेळेस लढणाऱ्या एक लक्ष शत्रूंचा वध केलास त्या वेळेस तूं स्तुतीचें फल दिलेंस. पर्वतावरच्या दासशंबराचा तूं वध केलास आणि चमत्कारिक साधनांनीं दिवोदासाला मदत केलीस.

त्वं शतान्यव शम्बरस्य पुरो जघन्थाप्रतीनि दस्योः।
अशिक्षो यत्र शच्या शचीवो दिवोदासाय सुन्वते सुतक्रे
भरद्वाजाय गृणते वसूनि॥
(६. ३१, ४).

दस्युशंबराचे शंभर अभेद्य किल्ले तूं त्या वेळेस जमीनदोस्त केलेस. ज्या वेळेस हे बलवान्! हवि देणाऱ्या दिवोदासाला तूं बलानें मदत केलीस आणि हे सोम विकत घेणाऱ्या! तुझी स्तुति करणाऱ्या भरद्वाजाला श्रीमान् केलेंस.

यस्य त्यच्छम्बरं मदे दिवोदासाय रन्धयः।
अयं स सोम इन्द्र ते सुतः पिब॥
(६. ४३, १).

ज्याच्या उन्मत्त आनंदांत तूं एकदा शंबराला दिवोदासाचें भक्ष्य केलेंस तो हा सोम तुझ्यासाठीं दाबून काढला आहे. हे इन्द्रा, पी.

प्रस्तोक इन्नु राधसस्त इन्द्र दश कोशयीर्दश वाजिनोऽदात्।
दिवोदासादतिथिग्वस्य राधः शाम्बरं वसु प्रत्यग्रभीष्म॥
(६. ४७, २२).

इन्द्रानें त्या धनांतून प्रस्तोकाला दहा कोश ( म्हणजे द्रव्यनिधि ) व दहा जोमदार घोडे दिले आहेत. दिवोदासापासून आम्हांला शंबराचें धन-अतिथिग्वानें दिलेली देणगी-मिळाली आहे.

दशाश्वान्दश कोशान्दश वस्त्राधिभोजना।
दशो हिरण्यपिण्डान्दिवोदासादसानिषम्॥
(६. ४७, २३).

दहा घोडे, दहा द्रव्यनिधीच्या पेट्या आणि त्यांच्या भरीला दहा वस्त्रांची आणखी एक देणगी हीं व सोन्याच्या दहा लगडी दिवोदासाच्या हातांतून मला मिळाल्या आहेत.

इयमददाद्रभसमृणच्युतं दिवोदासं वध्र्यश्वाय दाशुषे।
या शश्वन्तमाचखादावसं पणिं ता ते दात्राणि तविषा
सरस्वति॥
(६. ६१, १).

केवळ आत्महित पाहणारे, दान न देणारे अशा पणींना जिनें खाऊन टाकलें आणि यज्ञ करणाऱ्या वध्र्यश्वाला ऋणमोचक दिवोदास नावाचा पुत्र दिला ती ( ही सरस्वती होय ). हे सरस्वती, तुझें हें दान फार मोठें आहे.

इमं नरो मरुतः सश्चतानु दिवोदासं न पितरं सुदासः।
अविष्टना पैजवनस्य केतं दूणाशं क्षत्रमजरं दुवोयु॥
(७. १८, २५).

सुदासाचा पिता दिवोदास याची ज्याप्रमाणें तुम्हीं सेवा केली तशी हे शूर मरुत हो! तुम्ही त्याची-सुदासाची सेवा करा. अनुग्रह करून पैजवनाच्या इच्छेला पाठिंबा द्या. त्याच्या टिकणाऱ्या व बळकट प्रदेशाचें निष्ठानें रक्षण करा.

प्रियास इत्ते मघवन्नभिष्टौ नरो मदेम शरणे सखायः।
नि तुर्वशं नि याद्वं शिशीह्यतिथिग्वाय शंस्यं करिष्यन्॥
(७. १९, ८).

हे मघवन्! ज्या मित्रांवर तूं प्रेम करतोस ते आम्ही अतिथिग्वाची इच्छा पूर्ण करण्यास व तुर्वश व यदु यांचा गर्व हरण्यास तुझी अभे-तुझ्या संरक्षणासाठीं तुझ्या सन्निध आनंदांत असो.

य आयुं कुत्समतिथिग्वमर्दयो वावृधानो दिवे दिवे।
तं त्वा वयं हर्यश्वं शतक्रतुं वाजयन्तो हवामहे॥
(८. ५३, २).

उत्कर्ष पावणाऱ्या ज्यानें आयु, कुत्स आणि अतिथिग्व यांचा फडशा पाडला त्या गौराश्व इन्द्राला हविर्युक्त आम्ही दररोज बोलावितो.

पुर सद्य इत्थाधिये दिवोदासाय शम्बरम् ।
अध त्य तुर्वशं यदुम् ॥
( ९ ६१, २ )

सत्वशील दिवोदासाकरिता जलदीने किल्ले व शबर यांचा चुराडा केला, नंतर यदु आणि तो तुर्वश ( याचा चुराडा केला )

अहं गुङ्गुभ्यो अतिथिग्वमिष्करमिषं न वृत्रतुरं विक्षु धारयम्।
य पर्णयघ्न उत वा करञ्जहे प्राहं महे वृत्रहत्ये अशुश्रवि ॥
( १० ४८, ८ )

ज्या वेळेस शत्रूला ठार मारणाऱ्या मोठ्या लढाईत-जीत करज पडला व पर्णय पडला तीत-मी वैभव संपादन केलें, त्या वेळेस गुङ्गुच्या विरुद्ध मी अतिथिग्वाला शक्तिमान् केलें आणि सामर्थ्य जिंकणाऱ्या वृत्राप्रमाणें त्याला मी लोकांच्या मध्यें ठेविलें

वरील उताऱ्यात खालील ऐतिहासिक महत्त्वाचीं स्थलें येतात.

( १ ) कुत्सानें शुष्णास मारिलें

( २ ) अतिथिग्वानें शबरास मारिलें

( ३ ) करज आणि पर्णय यांचा अतिथिग्वाच्या फेऱ्यात नाश झाला

( ४ ) ऋजिश्वानें वेढा देऊन वङ्गृदाचीं शंभर पुरें विध्वंसिलीं

( ५ ) जी ऋचा तूर्वयाणाच्या रक्षणाबद्दल इंद्रास गाते तीच सुश्रव्याच्या रक्षणाबद्दल कुत्स, अतिथिग्व आणि आयु हे एरा तरुण राजाचे अंकित झाल्याबद्दल इंद्राची स्तुति करते

( ६ ) शबरास मारण्यानें दिवोदासाप्रमाणें कशोजूचेंहि पालन झालें व किल्ल्याच्या नाशानें त्रसदस्यूचें रक्षण झालें

( ७ ) भरद्वाजाप्रत अश्वींच्या आगमनाचा परिणाम दिवोदासाच्या घरीं अश्वी येण्यात होतो

( ८ ) जो गायाचा पक्ष दिवोदासाच्या तर्फेचा होता तो गुङ्गूच्या सोडवणुकीबद्दल अश्वींची स्तुति करतो

( ९ ) दिवोदासांनीं भरद्वाजाला धन दिलें.

( १० ) तूर्वयाणाकडून अतिथिग्वादि नयींच्या पराभवाबद्दल इंद्राची स्तुति भरद्वाजाकडून होत आहे.

( ११ ) दिवोदासानें शबराची संपत्ति भारद्वाजांस दिली.

( १२ ) सरस्वतीनें वध्र्यश्वाला दिवोदास दिला व पणींना खालें अशी भरद्वाज स्तुति करतात

( १३ ) तुर्वश व यदु यांचा गर्व हरण झाल्यानें अतिथिग्वाची इच्छा पूर्ण होते

( १४ ) अतिथिग्वाला गुङ्गूच्या विरुद्ध इंद्रानें शक्तिमान् केलें ही गोष्ट करंज व पर्णय यांच्या दिवोदासाकडून पराभवाच्या प्रसंगीं झाली

आतां या विधानाची परस्परसंगति कितपत लागते तें पाहू.

दिवोदास, आयु व कुत्स हा मित्रसंघ दिसतो यांचा तूर्वयाणानें पराभव केला उलट एकदा या मित्रसंघानें तूर्वयाणाचा पराजय केला असावा दिवोदास यानें शबर पर्णय, करज व गुङ्गु लोक यांचा पराजय केला दिवोदासानें शबरास मारून कशोजूचें रक्षण केलें दिवोदासानें तुर्वश व यदु यांचा गर्व हरण केला कुत्सानें शुष्णाचा पराजय केला.

त्रसदस्यु व दिवोदास यांचा एका ऋचेत उल्लेख आहे पण त्यावरून त्यांचें समकालीनत्व सिद्ध होत नाहीं. दोन भिन्नकालीन क्रियांचें श्रेय उत्तरकालीन गायकांनीं देवतेस दिले आहे तसेच पणी व वध्र्यश्व यांचाहि विरोध सिद्ध होत नाहीं. शुष्णु व दिवोदास यांचेंहि समकालीनत्व सिद्ध होत नाहीं.

ऋजिश्वाने वेढा देऊन वङ्गृदाचीं शंभर पुरें विध्वंसिलीं, यावरून कल्पनेचे बरेच बळजे दिल्याशिवाय वङ्गृदाचें व शबराचें ऐक्य व ऋजिश्वाचें व अतिथिग्वाचें ऐक्य सिद्ध होत नाहीं.

भारद्वाजांनीं दिवोदासाच्या घरची दक्षिणा खाऊन तूर्वयाणाकडून अतिथिग्वादि नयींचा पराभव झाला याबद्दल इन्द्राची स्तुति करावी हें जरा चमत्कारिक दिसतें असेंहि शक्य आहे कीं, ज्याप्रमाणें विश्वामित्र आणि वसिष्ठ हे कामापुरते सुदासाचे पैजवनानें निर्माण केले त्याप्रमाणेंच भारद्वाजहि तात्पुरते पुरोहित असावेत यां कीं, पैजवन जर पुरूपैकीं असतील तर त्यांचे उपाध्याय अनि ठरतात. असें शक्य आहे कीं, राजे व उपाध्याय हे बरोबर हिंडत नसावेत आणि स्थानिक उपाध्यायांचा स्वीकार हा तत्कालीन राजनीतीचा एक भाग असावा.

एवंच दिवोदासाविषयीं आपणास माहिती येणेंप्रमाणें देता येईल

दिवोदासअतिथिग्व यांसबंधीं अनेक उल्लेखांवरून अगदीं प्राचीन वैदिक युगांत दिवोदासअतिथिग्व याचें प्रामुख्य दिसून येतें. तो वध्र्यश्वाचा ( ऋ ६ ६१, १ ) मुलगा व भरत लोकांमधील प्रसिद्ध राजा सुदास याचा बाप किंवा आजा होता दिवोदास हा भरत ( ऋ ६ १६, ४, ५, १९ ) होता व तुर्वश व यदु ( ऋ. ७ १९, ८, ९ ६१, २ ) हा लोकांचा वैरी होता हेंच धन त्यानें आपला मुलगा सुदास यास पैतृक धन म्हणून देऊन ठेविलें असो त्याचा मुख्य शत्रु शबर दास हा होय हा डोंगरात राहणाऱ्या लोकांचा मुख्य असून त्याचा पराभव अनेकदां दिवोदासानें केलेला आहे दिवोदास हा आपल्या बापाप्रमाणें अग्नीचा मोठा उपासक होता कारण ऋग्वेदामध्ये अग्नीला दिवोदासाच्या नांवानें संबोधिलें आहे उलटपक्षीं त्याचा आयु व कुत्स यांच्या बरोबर इंद्राच्या मदतीनें तूर्वयाणानें पराजय केला असें वर्णन आलेलें आहे ( ६ १८, १३ वगैरे )

एकदा ( ६ ६१, १ व पुढील ) असा उल्लेख आला आहे कीं दिवोदासाचें पणी, पारावत व बृसय यांच्याशीं युद्ध झालें त्यावरून हिलेब्रँडनें असें अनुमान काढलें आहे कीं, तो अरकोशियामधल्या ज्या जाती होत्या त्यांच्याशीं लढण्यात गुंतला होता, व ज्या अर्थी दिवोदास याचा अर्थ स्वर्गीतला दास असा होतो त्या अर्थी तो स्वतः च दास असावा हें अनुमान असंभवनीय दिसतें कारण ज्या सरस्वती नदीवर दिवोदास व अरकोशियामधील जाती यांमध्ये युद्ध झालें ती व अरकोशियामधल्या हरक्विटी ही नदी एक असणें

शक्य नाहीं, अर्थात् ही सरस्वती नदी मागाहून प्रसिद्ध झालेली सरस्वती नदीच असली पाहिजे. ही गोष्ट एकदां कबूल केली म्हणजे पंचविंश (९. ४, ११) ब्राह्मणांत यमुना नदीजवळ पूर्वेकडे पारावत होते असा जो उल्लेख आलेला आहे त्याला बाध येतो. वर्गेनचें असें मत आहे कीं, दिवोदास व अतिथिग्व हा दोन निराळ्या व्यक्ती होत्या पण ज्या अर्थी हा दोन निरनिराळ्या माणसांचीं कृत्यें अगदीं तंतोतंत सारखींच आहेत त्या अर्थी हा दोन व्यक्ती निरनिराळ्या मानणें युक्त दिसत नाहीं.

दिवोदासानें ज्या लढाया मारल्या त्या अर्थात् दाशराज्ञयुद्धापूर्वीच्या होत्या. सिंहावलोकनासाठीं त्या लढाया पुन्हां देतों.

(१) तुर्वयाणाबरोबर मित्रसंघाची पहिली लढाई.
(२) शंबराबरोबर लढाया.
(३) तुर्वश व यदु यांबरोबर लढाई.
(४) पर्णय व करंज यांबरोबर लढाई.
(५) गुंगूलोकांबरोबर लढाई.

वजिश्वाची वंगृदाबरोबर लढाई केव्हां झाली व तिचा दिवोदासाशीं संबंध काय होता हे स्पष्ट होत नाहीं. मृग्य कोणत्या लढाईत होते हें कळत नाहीं.

दाशराज्ञयुद्धापूर्वी मित्रसंघानें आणखी एक युद्ध करून तुर्वयाणाचा पराभव केलेला दिसतो. हा पराभव सुदासाच्या कारकीर्दीत झाला. या पराभवामुळें तुर्वयाणानें दडपलेलीं राष्ट्रें स्वतंत्र होऊन पुढें भांडूं लागलीं असावींत; आणि त्यांत सुदास इतरांवर वर्चस्व स्थापण्यास जेव्हां उद्युक्त झाला तेव्हां त्याच्या विरुद्ध असलेल्या यदुतुर्वशांस पुरुहि मिळाले असावेत असें दिसतें.

सुदास, दिवोदास व पिजवनः—सुदासाला" चत्वारो मा पैजवनस्य दाना...............सुदासे" (७. १८, २३). येथें "पैजवनस्य सुदासः" असें म्हटलें आहे. त्याचप्रमाणें त्याच सूक्तांत ('दिवोदासं न पितरं सुदासः') सुदासाचा पिता दिवोदास त्याला ज्याप्रमाणें सेवीत होता त्याप्रमाणें या सुदासाला सेवा असें म्हटलें असून पैजवन सुदासाचें घर राखा असें 'अविघ्ना पैजवनस्य केतम्' (७. १८, २५) या त्या पुढील वाक्यानें दर्शित केलें आहे.

याशिवाय आणखी एका स्थळीं 'द्वे नप्तु र्देववतः शते गोः...... सुदासः। अर्हन्नग्ने पैजवनस्य' येथें 'देववतो नप्तुः पैजवनस्य सुदासः' असा स्पष्ट उल्लेख आहे.

सुदासाचा बाप, आजा व पत्नी.— वरील विवेचनावरून सुदास हा दिवोदासाचा पुत्र होता व पैजवन होता इतकें स्पष्ट होतें. पिजवन हा शब्द ऋग्वेदांत येत नाहीं. निरुक्तकारांनीं पिजवन हा सुदासाचा बाप म्हणजे दिवोदास असें म्हटलें आहे. पण त्यास खात्रीलायक पुरावा नाहीं. पैजवन हें कुलनाम असणें शक्य आहे.

सुदासाच्या बायकोचें नांव उल्लेखिलें गेलें आहे असा संशय येतो. तें नाव सुदेवी होय. ती त्याला अश्वींनीं दिली. 'याभिः सुदासः ऊहथुः सुदेव्यम्' या ठिकाणीं सायणांनीं 'सुदेव्यं' याचा अर्थ 'प्रशस्तं धनं' असा केला आहे. परंतु 'सुदेव्यं' हें 'सुदेवी' असें पाणिनीच्या व्याकरणाप्रमाणें करतां येतें (पा. सू. ६. १, १०६;१०७).

'इयमददाद्रभसमृणच्युतं दिवोदासं वध्र्यश्वाय'—' इयं (सरस्वती) दिवोदासं वध्र्यश्वाय अददात्'—ही वध्र्यश्वाला दिवोदास देती झाली, या भरद्वाजाच्या म्हणण्यावरून दिवोदास हा वध्र्यश्वाचा मुलगा ठरतो.

याच्या उलट एके स्थलीं 'नप्तुः देववतः—.........सुदासः। अर्हन्नग्ने पैजवनस्य'। या ठिकाणीं देववताचा नातू सुदास (पैजवन) असें म्हटलें आहे.

यावरून सुदास याचा पिता दिवोदास पिजवन असें ठरतें. परंतु दिवोदास पिजवनाचा बाप देववत् कीं वध्र्यश्व यावें उत्तर स्पष्टपणें देतां येणार नाहीं. या ठिकाणीं वध्र्यश्व आणि देववत् भिन्न दिसतात. या दोघांस सुदासामार्फत न जोडतां स्वतंत्रपणें जोडणारा उल्लेख नाहीं. देवात् हें वध्र्यश्वाचें विशेषणहि असणें शक्य आहे, किंवा सुदास हा देववताचा दौहित्र असणें शक्य आहे. भरद्वाजमंडलांत-म्हणजे सहाव्या मंडलांत—भरद्वाज दिवोदासाची वाखाणणी करितो. त्याच मंडलांत 'वध्र्यश्वा'ला दिवोदास सरस्वतीनें दिल्याचा उल्लेख आहे व 'देववताचा नातू' अशा प्रकारचा सुदासाविषयीं उल्लेख वसिष्ठ मंडलांत—म्हणजे सातव्या मंडलांत—आहे. 'देववताचा नातू' असें म्हणण्यांत वसिष्ठांचा कांहीं हेतु तर नसेलना?

सुदासाचा अश्वमेधः—सुदासानें एक घोडा सोडल्याचा उल्लेख आहे. 'उप प्रेत कुशिकाश्चेतयध्वमश्वंराये प्रमुञ्चता सुदासः'— 'हे कुशिकांनों! चला, सावध व्हा, पैसे मिळविण्याकरितां सुदासाचा अश्व सोडा असें विश्वामित्राच्या तिसऱ्या मंडलांत म्हटलें आहे (३. ५३, ११). त्याच सूक्तांत विश्वामित्रानें सुदासाकडून यज्ञ करविला ["विश्वामित्रो यदवहत्सुदासम्" (३. ५३, ९)] असाहि उल्लेख आला आहे. 'आशुश्च नेदभिपित्वे जगाम' (७. १८, ९) या स्थलावरून, सुदासानें अश्वमेधाचा घोडा सोडला होता आणि अश्वाला कोणीं तरी अटकाव केला, परंतु इन्द्राच्या मदतीनें तो त्याला मिळाला असें निघतें. ऐतरेय ब्राह्मणांत 'वसिष्ठाच्या पौरोहित्याखालीं सुदासानें अश्वमेध यज्ञ केला' असा उल्लेख आहे, अशी शंका घेण्यास जागा आहे. तथापि त्या उल्लेखाचें स्वरूप लक्षांत घेतल्यास शंका दुर्बल ठरते. ऐतरेय ब्राह्मणांत 'वसिष्ठःसुदासं पैजवनमभिषिषेच ...... पृथिवीं जयन्.........अश्वेन मेध्येनेजे' असा उल्लेख आला आहे. असें असावें कीं, अश्वमेध वसिष्ठाच्या हातून न होतां केवळ साम्राज्याभिषेक वसिष्ठाच्या हातून झाला असावा.

सुदास आणि हिंसक लोकः—सुदास हा विशेष प्रकारें सुधारलेला, थोर व अहिंसक आणि सुदासाचे शत्रू हिंसक असा भेद स्तोत्रकर्त्या वसिष्ठांनीं कांहीं ठिकाणीं दर्शित केला आहे.

'जहि वधर्वनुषो मर्त्यस्य' म्हणजे हिंसा करणाऱ्या मर्त्याला नाहींसें कर असें एके ठिकाणीं म्हटलें आहे.

असल्याचा निरुक्तात व सायणाचार्यांच्या भाष्यात अनेक ठिकाणी उदाहरणें आलीं आहेत. यावरून 'वसुप् म्हणजे 'हिंसक' म्हणून कोणी प्रसिद्ध लोक असावेत व तदितर लोक आपणास अहिंसक असे म्हणवीत असावेत

सुदासाचे शत्रु— आता सुदासाच्या शत्रूंकडे वळू.

शिम्यु—सुदासाच्या विरुद्ध लढणाऱ्या दहा राजात शिम्यु हा एक होता. शिम्यु हें एक प्रकारच्या लोकांचें किंवा राजाचे नांव असून दाशराज्ञ युद्धांत सुदासानें याचा पराभव केला (७.१८, ५). दस्यूबरोबर याचा उल्लेख ऋग्वेदात आला आहे त्यावरून हा दस्यु असावा असें विधान झिमरने केलें असावें शिम्यूस त्याचे विरोधी दस्यू म्हणत यावरून दस्य म्हणून एक जात होती आणि शिम्यु तिचा एक पोटभेद होता असे म्हणणे हा मात्र कल्पनेचा बाजार आहे. हें आर्य आणि दस्यु याविषयींच्या विवेचनावरून स्पष्ट होईल

कांहीं ऋचांवरून असें स्पष्ट दिसते की शिम्यु आणि नहुष यांचा कांहीं तरी संबंध असावा. याशिवाय भरत, वार्षागिर, कक्षीवत याच्याशीहि त्याचा कांहीं तरी संबंध असावा हें खालील ऋचा दाखवितात

(शिम्युमहोक्त अगरसंबंधी व्यक्तीः— नहुष, आयु, मनु, इला, आश्वघ्न ऋज्राश्व, अंबरीष, सहदेव, भयमान व सुराधस्)

न यस्य देवा देवता न मर्ता आपश्चन शवसो अन्तमापुः ।
स प्ररिक्वा त्वक्षसा क्ष्मो दिवश्च मरुत्वान्नो भवत्विन्द्र ऊती ॥
(ऋ. १.१००, १५).

ज्याच्या बलाचा अंत द्युलोकामध्यें देवांस (लागलेला) नाहीं, मर्त्य मनुष्यास (लागलेला) नाहीं व उदकालाहि लागलेला नाहीं, तो (इंद्र आपल्या) तेजानें पृथिवी व द्युलोक यांस व्यापून टाकणारा (होय). (तो) मरुतांसहित इंद्र आमचा संरक्षिता होवो.

रोहिच्छ्यावा सुमदंशुर्ललामीर्द्युक्षा राय ऋज्राश्वस्य ।
वृषण्वन्तं बिभ्रती धूर्षु रथं मन्द्रा चिकेत नाहुषीषु विक्षु ॥
(ऋ. १०, १००, १६).

आरक्त वर्णाची (आणि) श्याम वर्णाची, अगानें भरलेली, वपाळ्या... अलंकार धारण केलेली (आणि) स्वर्गी वास करणारी इंद्राची आनंददायक (अश्वमालिका) इंद्राला रथांत घालून तो रथ धुरेस आपल्या माना देऊन ऋज्राश्वाला संपत्ति (देण्यासाठी) ओढून आणीत असतांना नाहुषांस (लोकांस) दृष्टी पडत असते

एतत्त्यत्त इन्द्र वृष्ण उक्थं वार्षागिरा अभि गृणन्ति राधः ।
ऋज्राश्वः प्रष्टिभिरम्बरीषः सहदेवो भयमानः सुराधाः ॥
(ऋ. १.१००, १७).

तर हे इंद्रा, हें तुझें स्तोत्र, वृषागिराचे पुत्र ऋज्राश्व, अंबरीष, सहदेव, भयमान (आणि) सुराध आणि त्यांचे सखे तुज समर्थाप्रत गाऊन तुला हवि अर्पण करीत आहेत.

दस्यूञ्छिम्यूँश्च पुरुहूत एवैर्हत्वा पृथिव्यां शर्वा नि बर्हीत् ।
सनत्क्षेत्रं सखिभिः श्वित्न्येभिः सनत्सूर्यं सनदपः सुवज्रः ॥
(ऋ. १.१००, १८)

बहुभक्त (इंद्रानें) दस्यू शिम्यूंना चपलगामी मरुताच्या साहाय्यानें पृथिवीवर मारून वज्रानें भेदून टाकिलें. त्या आपल्या तेजःपुंज मित्राच्या साहाय्यानें क्षेत्र घेतलें, सूर्य हरण करून घेतला सुंदर वज्र धारण करणाऱ्या (इंद्रा) नें उदकें हरण केली.

शिम्यूंना वरील ऋचात दस्यू म्हटलें आहे, व इंद्रविरुद्ध केलें आहे. तेव्हा शिम्यूंस जो कवि अनुकूल नाहीं अशाचे हें सूक्त आहे. या सूक्तांत १८ व्या ऋचेंत, नहुषांशीं, शिम्यूंशीं व भरतांशीं लुडविग म्हणतो त्याप्रमाणें दोस्ती दिसत नाहीं. येथेंच काय पण सर्वच वेदात शिम्यूंविषयीं फारच थोडी माहिती आपणास मिळते.

या सूक्तात ऋज्राश्वाला संपत्ति देण्यासाठी इंद्रस्थ ओढिला जात आहे ही गोष्ट नहुषाच्या दृष्टीस पडत असते म्हणून विधान आहे. याचा अर्थ काय तें कळत नाहीं वरील विधानावरून जर नहुषांस ती संपत्ति पाहून दुःख होते असा ध्वनि निघत असेल तर ती कल्पनाच आहे तेवढ्यावरून नाहुषास ऋज्राश्वाचे शत्रू करावे, व सूक्तात शिम्यूंना दस्यू म्हटलें आहे म्हणून शिम्यूसहि ऋज्राश्वाचे शत्रू बनवावे ही कल्पनेची फार मोठी उडी होय. शिम्यु व नहुष यांची दोस्ती जडविणें ही तर त्याहूनहि उद्दाम उडी आहे. यांच्या दोस्तीत शिम्यूचे शत्रू भरत कसे आणले हें कळत नाहीं.

वार्षागिराचा इतरांशीं संबंध काहीं कळत नाहीं.

नहुषः— आतां आपण नहुषासंबंधीं उतारे घेऊं आणि काय माहिती मिळते तें पाहूं.

त्वामग्ने प्रथममायुमायवे देवा अकृण्वन्नहुषस्य विश्पतिम् ।
इळामकृण्वन्मनुषस्य शासनीं पितुर्यत्पुत्रो ममकस्य जायते ॥
(१.३१, ११)

हे अग्ने, देव तुला प्रथम आयूकरितां नहुषाचा मनुष्यरूपधारी सेनापति करते झाले. नंतर मनुष्यांनी (धर्म) शिक्षण देणारी मनूची इडा नावाची कन्या निर्माण केली नंतर आमच्या पित्याचा पुत्र झालाम.— सायण

हे अग्ने देवांनीं तुला सचेतन मानवांत पहिलाच असा जो नहुष त्याच्या घराण्याचा मुख्य केलें. इळेला मानवी प्रजेची उपदेशिका केली व त्या वेळींच आमच्या वंशाच्या जनकास एक पुत्र झाला — ग्रिफिथ

चत्वारो मा मशर्शारस्य शिश्वस्त्रयो राज्ञ आयवसस्य जिष्णोः ।
रथो वां मित्रावरुणा दीर्घाप्साः स्यूमगभस्तिः सूरो नाद्यौत् ॥
(१.१२२, १५).

मशर्शाराचे चार व जयशाली आयवस राजाचे तीन पुत्र मला छळतात. हे मित्रावरुण हो तुमचा अति विस्तृत व सुवर्णदीप्ति असा रथ सूर्याप्रमाणें प्रकाशो (आमच्या शत्रूंना भयजनक होवो)

यस्ते अग्ने नमसा यज्ञमीट्ट ऋतं स पात्यरुषस्य वृष्णः ।
तस्य क्षयः पृथुरा साधुरेतु प्रसर्स्राणस्य नहुषस्य शेषः ॥
(५.१२,६).

हे इंद्र पाण्याच्या (नदीच्या) तीरावर तूं यदु आणि तुर्वश यांनां रमविलेस. नंतर तूं आणि कुत्स उग्र अशा शुष्णाकडे जाऊन त्याला मारलेंस, आणि नंतर तूं कुत्साला आपल्या घरीं पोंचविलेंस. त्या वेळीं तुझी आणि उशना व देव यांची भेट झाली.

इंद्रा, तूं लोंवच्या तीरावर यदु आणि तुर्वश यांच्या करितां जोरानें धावणारें पाणी थांबविलेंस. तुम्हीं दोघानीं ( इंद्र आणि कुत्स यानीं ) उग्र अशा ( राक्षसा-शुष्णा ) वर चाल केली. कुत्साला ( घरीं ) नेलेत; त्या वेळीं देव आणि उशना तुझ्याकडे एकाच वेळीं आले.-ग्रिफिथ.

त्वं धुनिरिन्द्र धुनिमतीर्ऋणोरपः सीरा न स्रवन्तीः ।
प्रयत्समुद्रमति शूर पर्षि पारया तुर्वशं यदुं स्वस्ति ॥
(६.२०, १२)

शत्रूंनां कंपित करणाऱ्या इंद्रा, धुनिनामक असुरानें अडवून ठेविलेलीं उदकें तूं नद्याप्रमाणें वहावयास लावलीस, आणि ज्या वेळीं तूं समुद्रातून ( पाण्यातून ) पलीकडे गेलास तेव्हां तूं आपल्या बरोबर यदु व तुर्वश यानाहि नेलेस.

त्वामीळे अधद्विता भरतो वाजिभिः शुनम् ।
ईजे यज्ञेषु यज्ञियम् ॥
(६.१६, ४).

हे अग्ने भरत नामक राजानें सुखाच्या इच्छेनें यज्ञामध्यें यज्ञार्ह अशा तुला हवी अर्पण करून स्तुति केली असतां तू त्याला दोन प्रकारचें ( इष्टप्राप्त्यनिष्टपरिहाररूप ) सुख प्राप्त करून दिलेंस.

त्वमिमा वार्या पुरु दिवोदासाय सुन्वते ।
भरद्वाजाय दाशुषे ॥
(६.१६, ५)

हे अग्ने दिवोदासाला, हवी अर्पण करणाऱ्या भरद्वाजाला तूं पुष्कळ वर देतोस.

वधीदिन्द्रो वरशिखस्य शेषोऽभ्यावर्तिने चायमानाय शिक्षन् ।
वृचीवतो यद्धरियूपीयायां हन्पूर्वे अर्धे भियसापरो दर्त् ॥
(६.२७, ५).

अभ्यावर्ती चायमानाकरिता इन्द्रानें वरशिखाचें बीज नष्ट केलें. "हरियूपीया" येथें त्यानें वृचीवताच्या अघाडीच्या सैन्याचा नाश केला व मागच्या रांगेंतील सैन्य भीतियुक्त होत्साते पळून गेले.

यस्य गावावरुषा सूयवस्यू अंतरूषु चरतो रेरिहाणा ॥
स सृंजयाय तुर्वशं परादाद्वृचीवतो दैववाताय शिक्षन् ॥
(६.२७, ७)

ज्या इंद्राचे घोडे उत्तम प्रकारच्या गवताची इच्छा करणारे, अत्यंत शोभिवंत व आपलें तोंड आपल्या अंगावर घासणारे आहेत अशा इंद्रानें तुर्वशाला संजयाच्या ताब्यांत दिलें व वृचीवंतासाठीं दैववाताला शिक्षा केली.

य आनयत् परावतः सुनीती तुर्वशं यदुं
इंद्रः स नो युवा सखा ॥
(४.४५, १)

ज्या इंद्रानें आमच्या पासून दूर असलेले यदु आणि तुर्वश यांनां परत आणलें तो इंद्र आमचा सखा होवो.



प्रियास इत्ते मघवन्नभिष्टौ नरो मदेम शरणे सखायः ।
नि तुर्वशं नि याद्वं शिशीह्यतिथिग्वाय शंस्यं करिष्यन् ॥
(७.१९, ८).

हे इंद्रा तुला प्रिय असणारे आणि तुझी स्तुति करणारे आणि मित्रभूत आम्ही घरींच आनंदित आहों, तथापि आमचा राजा अतिथिग्व याचें कल्याण करणारा तूं तुर्वश आणि याद्व यांनां नाहींसे कर.

यदिन्द्र प्रागपागुदङ्न्यग्वा हूयसे नृभिः
सिमा पुरू नृषूतो अस्या न वेसि प्रशर्ध तुर्वशे ॥
(८.४, १).

हे इंद्रा, पूर्व, पश्चिम, उत्तर, खालीं, वर इत्यादि कोणत्याहि दिशाकडे असलेल्या राजांनीं स्तोत्रानीं तुझें आव्हान केलें असले तरी तूं आनु नामक राजाकडे येतोस, हे पराभिमर्दी, तुर्वशाकडेहि तूं प्रेरित केला जातोस.-सायण

इंद्रा जरी तुला लोक पूर्वेकडे आणि पश्चिमेकडे, दक्षिणेकडे आणि उत्तरेकडे बोलावतात, तरी तूं, लोक येण्याविषयीं ज्याला आग्रह करतात अशा शूर वीरा, मुख्यत्वेकरून आनव आणि तुर्वश यांच्याकडे असतोस. -ग्रिफिथ

मा भेम मा श्रमिष्मोग्रस्य सख्ये तव ॥
महत्ते वृष्णो अभिचक्ष्यं कृतं पश्येम तुर्वशं यदुम् ॥
(८.४, ७).

हे इंद्रा, बलवान् अशा तुझ्या मैत्रीची प्राप्ति झाल्यावर आम्हांला भीति राहणार नाहीं, श्रम होणार नाहींत, सर्व काम पूर्ण करणाऱ्या तुझीं मोठमोठीं कृत्यें स्तवनीय आहेत. कारण, तुर्वश नामक व यदुनामक राजांनीं तुझ्या प्रसादानें अत्यंत सुखी झालेले आम्ही पहातच आहोंत.-सायण.

हे बलवन्ता, तूं आमचा मित्र असल्यावर आम्हीं भिणार नाहीं. किंवा आम्हांला श्रम वाटणार नाहींत. आम्ही तुर्वश आणि यदु यांनां पाहूं. हे शूरा, तुझीं मोठालीं कृत्यें प्रशंसलींच पाहिजेत.-ग्रिफिथ

स्थूरं राधः शताश्वं कुरुङ्गस्य दिविष्टिषु ।
राज्ञस्त्वेषस्य सुभगस्य रातिषु तुर्वशेष्वमन्महि ॥
(८.४, १९).

कुरुङ्ग राजाच्या यज्ञांत दानें देत असतां तुर्वश लोकांत थोर श्रेष्ठ (असें) शताश्व दान मीं मिळविलें.

येनाव तुर्वशं यदुं येन कण्वं धनस्पृतम् ।
राये सु तस्य धीमहि ॥
(८.७, १८)

ज्या तुम्हीं आपल्या सामर्थ्यानें तुर्वश व यदु नामक राजाचें संरक्षण केलेत, किंवा धनेच्छु अशा कण्व ऋषींचें संरक्षण केलेंत, त्या तुम्हीं आमच्या संपत्तीचें रक्षण करावें म्हणून, हे मरुत हो, आम्ही तुमचें सुंदर ध्यान करतों.-सायण

ज्या योगानें तुम्हीं यदु, तुर्वश आणि ज्याला लूट मिळाली आहे असा कण्व यांनां मदत केलीत त्या तुमच्या ( शक्तीचें ) आम्ही धनाकरितां ध्यान करतो."-ग्रिफिथ

त्यांनीं आणिलें व यज्ञानें मी बलिष्ठ नभ्याणांची सत्ता वाढ दिली.-ग्रिफिथ

> मद्वृत्तणे मनुष ऊर्ध्वसान आसाविपद्गीमानाय शरुद् ।
> सवृतमो नहुषोस्मसुजातः पुरोभिनदर्हन्दस्युहत्ये ॥
>
> (१०.९९,७).

तो इंद्र शत्रूकडून मारला जाणारा जो आपला मानवी स्वभक्त त्याला शौर्यादि साधनसम्पत्ति देऊन व शत्रुहिंसक आयुधें देऊन शत्रूंना फडशा पाडतो. त्याचप्रमाणें मनुष्यांचा नेता व पूज्य असणारा तो इंद्र आमच्या करितां प्रादुर्भूत होऊन संग्रामामध्यें शत्रूंच्या शरीराचा भेद करतो ( शत्रूंचा संहार करतो ).

तो स्तनः उचलून पावला आणि त्यानें कपटी व बलात्कार करणाऱ्या शत्रूवर बाण सोडला. बलिष्ठ दीप्तिमान् व वीर्यवान् असा त्यानें जेव्हां दस्यूंना मारलें तेव्हां आमच्या करितां नहुषानें किल्ले फोडले.-ग्रिफिथ

वर उद्धृत केलेल्या उताऱ्यांवरून जे मुद्दे सुचतात ते येणेंप्रमाणें:- (१) आयूकरितां नहुषांचा सेनापति अग्नीला केलें-म्हणजे नहुषाच्या पराक्रमानें अग्नीचा कांहीं फायदा व्हावयाचा होता असा ध्वनि काढावा की आयूला ठोक देण्याकरितां नहुषाचा सेनापति अग्नि धर्मला असें समजावें, हा प्रश्न १. १३१, ११ मध्यें उत्पन्न होतो.

(२) दास व नहुष यांना चांगल्या मार्गाला लावूं, या उल्लेखाचाहि अर्थ समजत नाहीं.

(३) नहुष जातीचें सर्व शौर्य आणि धन तसेंच पंचजनाचें शौर्य कर्तीनें आपल्या लोकांकरितां मागितलें आहे.

(४) नहुष राजाचें सामर्थ्य अश्वसंघातक होतें असें दिसतें.

(५) अश्वींनां नहुषांकडून घोलावून घेतलें आहे. म्हणजे ८. ८,३ चाहि फर्मा नहुषांच्या विरुद्ध आहे.

(६) ८. ४६, २७ चे दोन अर्थ सायणांनीं इतके भिन्न दिले आहेत कीं त्यांवरून कांहीं एक निर्णय काढतां येत नाहीं.

(७) ९. ८८, २ या ऋचेवरून कांहीं एक बोध होत नाहीं.

(८) १०. ४९, ८ मध्यें इंद्र 'मी नहुषापेक्षां बलिष्ठ आहें' असें म्हणतो त्यावरून आणि पूर्वीच्या नहुषांचे बल वाचणाऱ्या उल्लेखावरून नहुषांचें बल स्पष्ट होत आहे.

(९) १०. ९९, ७ मध्यें दस्यूंना मारणें व नहुषांचे किल्ले फोडणें या दोन्हीं इन्द्राच्या क्रिया दाखविल्या आहेत. त्यावरून गाना नहुषांस दस्यूंप्रमाणें लेखीत होता असें दिसतें.

(१०) १०. ६३, १ मध्यें 'ययातेर्येनहुष्यस्य बर्हिषि देवा आसते ते अधिब्रुवन्तु नः' । येथें ययातीला नहुष्य म्हटलें आहे.

नहुष.-वरील उल्लेखावरून असें दिसतें कीं नहुष हें राष्ट्र बलवान् असावें. त्या लोकांशीं थोडें भांडण, पण त्यांचा व त्रित्सूंचा कांहीं एक संबंध नव्हता. दाशराज्ञयुद्धामध्यें त्यांचा कांहीं एक संबंध स्पष्टपणें देत नाहीं. पुढें महाभारतांत नहुषास इन्द्रपद देतेलें आहे, आणि ऋग्वेदांत नहुष हा यज्ञकर्ता आहे असें हि दाखविलें आहे. या कथेला उगम उत्पन्न होईल असा कांहीं कथेचें अस्तित्व ऋचा दाखवितात. नहुषांना दस्यू म्हटलें आहे.

महाभारतांत नहुषास आयूचा पुत्र म्हटलें आहे, परंतु त्याला वेदांत आधार सांपडत नाहीं. मशर्शाराचे चार व आयवसाचे तीन पुत्र मला पीडा देतात, असा उल्लेख १. १२२, १५ मध्यें आहे. पण त्यावरून तो नहुषाचा उल्लेख आहे असें वाटत नाहीं. आयवस व मशर्शार हे वार्षागिराचे राजे होते असा संबंध लुडविग् लावू पहात आहे, तो आम्हांस मान्य करतां येत नाहीं.

तुर्वश.-आतां तुर्वशांकडे वळूं. हे यदु जाडे प्रतिस्पर्धी दिसतात. आपल्या पद्धतीप्रमाणें परिचयार्थ तुर्वशा संबंधाच्या कांहीं ऋचा अगोदर घेऊं.

> अग्निना तुर्वशं यदुं परावत उग्रादेवं हवामहे ।
> अग्निर्नयन्नववास्त्वं बृहद्रथं तुर्वीतिं दस्यवे सहः ॥
>
> (१. ३६, १८).

अग्नीच्या द्वारें तुर्वशाला, यदूला व उग्रादेवाला दूर प्रदेशांतून बोलावितो. राक्षसविरुद्ध सारथे अग्नी नववास्त्व, बृहद्रथ ( व ) तुर्वीति यांजला येथें आणो.

> त्वमाविथ नर्यं तुर्वशं यदुं त्वं तुर्वीतिं वय्यं शतक्रतो ।
> त्वं रथमेतशं कृत्व्ये धने त्वं पुरो नवतिं दम्भयो नव ॥
>
> (१. ५४, ६),

हे शतप्रज्ञ इन्द्रा तूं नर्याला, तुर्वशाला, यदूला, तुर्वीतीला व वय्याला रक्षिलेंस. नवयाण्णव नगरें विध्वंसिलीस.

> त्वं धुनिरिन्द्र धुनिमतीर्ऋणोरपः सीरा न स्रवन्तीः ।
> प्र यत्समुद्रमति शूरपर्षि पारया तुर्वशं यदुं स्वस्ति ॥
>
> (१. १७४, ९).

हे इंद्रा ! तूं ( शत्रूंना ) कांपविणारा आहेस; धुनि नामक असुरानें अडविलेलें पाणी तूं जोरानें वाहणाऱ्या नद्यांप्रमाणें खालीं सोडून दिलेंस. जेव्हां तूं हे शूरा ! समुद्राचें अतिक्रमण करशील तेव्हां यदु आणि तुर्वश यांना सुखरूपपणें पार पाड.

> अयं यः सृंजये पुरो दैववाते समिध्यते ।
> द्युमाँ अमित्रदम्भनः ॥
>
> (४. १५, ४).

जो हा प्रसिद्ध अग्नि देववातपुत्र सृंजय सोमयाजीच्या यागागाडीं पूर्वदिशेस असणाऱ्या उत्तरवेदीवर पेटविला आहे, तो शत्रुहिंसक आणि दीप्तिमान् झालेला आहे.

> उत त्या तुर्वशा यदू अस्नातारा शचीपतिः ।
> इन्द्रो विद्वाँ अपारयत् ॥

शचीपति इंद्रानें स्नानरहित अशा यदुतुर्वशांना पार करून नेलें.

> (४. ३०, १७).

> त्वमर्षो यदवे तुर्वशायारमयः सुदुघाः पार इन्द्र ।
> उग्रमयातमवहो ह कुत्सं सं ह यद्वामुशनारन्त देवाः ।
>
> (५. ३१, ८).

हे इंद्र पाण्याच्या (नदीच्या) तीरावर तूं यदु आणि तुर्वश यांना रमविलेस. नंतर तूं आणि कुत्स उग्र अशा शुष्णाकडे जाऊन त्याला मारलेस, आणि नंतर तूं कुत्साला आपल्या घरीं पोंचविलेस. त्या वेळीं तुझी आणि उशना व देव यांची भेट झाली.

इंद्रा, तूं लावच्या तीरावर यदु आणि तुर्वश यांच्या करितां जोरानें वाहणारें पाणी थांबविलेंस. तुम्हीं दोघांनीं ( इंद्र आणि कुत्स यांनीं ) उग्र अशा ( राक्षसा–शुष्णा ) वर चाल केली. कुत्साला ( घरीं ) नेलेत; त्या वेळीं देव आणि उशना तुझ्याकडे एकाच वेळीं आले –ग्रिफिथ.

त्वं धुनिरिन्द्र धुनिमतीॠणोरपः सीरा न स्रवन्तीः ।
प्र यत्समुद्रमति शूर पर्षि पारया तुर्वशं यदुं स्वस्ति ॥
( ६. २०, १२ )

शत्रूंना कंपित करणाऱ्या इंद्रा, धुनिनामक असुरानें अडवून ठेविलेलीं उदकें तूं नद्याप्रमाणें वहावयास लावलीस, आणि ज्या वेळीं तूं समुद्रांतून ( पाण्यांतून ) पलीकडे गेलास तेव्हां तूं आपल्या बरोबर यदु व तुर्वश यानांहि नेलेस.

त्वामीळे अध द्विता भरतो वाजिभिः शुनम् ।
ईजे यज्ञेषु यज्ञियम् ॥
( ६. १६, ४ ).

हे अग्ने भरत नामक राजानें सुखाच्या इच्छेनें यज्ञामध्यें यज्ञार्ह अशा तुला हवी अर्पण करून स्तुति केली असतां तूं त्याला दोन प्रकारचें ( इष्टप्राप्त्यनिष्टपरिहाररूप ) सुख प्राप्त करून दिलेंस.

त्वमिमा वार्या पुरु दिवोदासाय सुन्वते ।
भरद्वाजाय दाशुषे ॥
( ६. १६, ५ )

हे अग्ने दिवोदासाला, हवी अर्पण करणाऱ्या भरद्वाजाला तूं ...ष्कळ धन देतोस.

...भीदिन्द्रो वरशिखस्य शेषोऽभ्यावर्तिने चायमानाय शिक्षन् ।
...वृचीवतो यद्धरियूपीयायां हन्पूर्वे अर्धे भियसापरो दर्त् ॥
( ६. २७, ५ ).

अभ्यावर्ती चायमानाकरितां इन्द्रानें वरशिखाचें बीज नष्ट केलें. "हरियूपीया" येथें त्यानें वृचीवतांच्या अघाडीच्या सैन्याचा ...श केला व मागच्या रांगेंतील सैन्य भीतियुक्त होत्सातें ...टून गेलें.

यस्य गावावरुषा सूयवस्यू अंतरूषु चरतो रेरिहाणा ॥
स सृंजयाय तुर्वशं परादाद्वृचीवतो दैववाताय शिक्षन् ॥
( ६ २७, ७ ).

ज्या इंद्राचे घोडे उत्तम प्रकारच्या गवताची इच्छा करणारे, ...त्यंत शोभिवंत व आपलें तोंड आपल्या अंगावर घासणारे आहेत ...त्या इंद्रानें तुर्वशाला संजयाच्या ताब्यांत दिलें व वृचीवतांसाठीं ...वताला शिक्षा केली.

य आनयत् परावतः सुनीती तुर्वशं यदुं ।
इंद्रः स नो युवा सखा ॥
( ४. ४५, १ )

ज्या इंद्रानें आमच्या पासून दूर असलेले यदु आणि तुर्वश ...ांना परत आणलें तो इंद्र आमचा सखा होवो.

प्रियास इत्ते मघवन्नभिष्टौ नरो मदेम शरणे सखायः ।
नि तुर्वशं नि याद्वं शिशीह्यतिथिग्वाय शंस्यं करिष्यन् ॥
( ७ १९, ८ )

हे इंद्रा तुला प्रिय असणारे आणि तुझी स्तुति करणारे आणि मित्रभूत आम्ही घरांत आनंदित आहों, तथापि आमचा राजा अतिथिग्व याचे कल्याण करणारा तूं तुर्वश आणि याद्व यांना नाहींसें कर.

यदिन्द्र प्रागपागुदङ्न्यग्वा हूयसे नृभिः ।
सिमा पुरू नृषूतो अस्यानवेऽसि प्रशर्ध तुर्वशे ॥
( ८. ४, १ ).

हे इंद्रा, पूर्व, पश्चिम, उत्तर, खाली, वर इत्यादि कोणत्याहि दिशाकडे असलेल्या राजांनीं स्तोत्रांनीं तुझें आव्हान केलें असलें तरी तूं आनु नामक राजाकडे येतोस, हे पराभिभवी, तुर्वशाकडेहि तूं प्रेरित केला जातोस.–सायण

इंद्रा जरी तुला लोक पूर्वेकडे आणि पश्चिमेकडे, दक्षिणेकडे आणि उत्तरेकडे बोलावतात, तरी तूं, लोक येण्याविषयीं ज्याला आग्रह करतात अशा शूर वीरा, मुख्यत्वेकरून आनव आणि तुर्वश यांच्याकडे असतोस. –ग्रिफिथ

मा भेम मा श्रमिष्मोग्रस्य सख्ये तव ॥
महत्ते वृष्णो अभिचक्ष्यं कृतं पश्येम तुर्वशं यदुम् ॥
( ८. ४, ७ )

हे इंद्रा, बलवान् अशा तुझ्या मैत्रीची प्राप्ति झाल्यावर आम्हांला भीति राहणार नाहीं, श्रम होणार नाहींत, सर्व काम पूर्ण करणाऱ्या तुझीं मोठमोठीं कृत्यें स्तवनीय आहेत. कारण, तुर्वश नामक व यदुनामक राजांना तुझ्या प्रसादानें अत्यंत सुखी झालेले आम्ही पहातच आहोंत.–सायण.

हे बलवन्ता, तूं आमचा मित्र असल्यावर आम्हीं भिणार नाहीं, किंवा आम्हांला श्रम वाटणार नाहींत. आम्ही तुर्वश आणि यदु यांना पाहूं हे वीरा, तुझीं मोठालीं कृत्यें प्रशंसलींच पाहिजेत.–ग्रिफिथ

स्थूरं राधः शताश्वं कुरुङ्गस्य दिविष्टिषु ।
राज्ञस्त्वेषस्य सुभगस्य रातिषु तुर्वशेष्वमन्महि ॥
( ८ ४, १९ )

कुरुङ्ग राजाच्या यज्ञांत दानें देत असतां तुर्वश लोकांत एक श्रेष्ठ (असें ) शताश्व दान मीं मिळविलें.

येनाव तुर्वशं यदुं येन कण्वं धनस्पृतम् ।
राये सु तस्य धीमहि ॥
( ८. ७, १८ )

ज्या तुम्हीं आपल्या सामर्थ्यानें तुर्वश व यदु नामक राजांचें संरक्षण केलेत, किंवा धनेच्छु अशा कण्व ऋषीचे संरक्षण केलेंत, त्या तुम्हीं आमच्या संपत्तीचें रक्षण करावें म्हणून, हे मरुत हो, आम्ही तुमचे सुंदर ध्यान करतों.–सायण

ज्या योगानें तुम्हीं यदु, तुर्वश आणि ज्याला द्रव्य मिळाली आहे असा कण्व यांना मदत केलीत त्या तुमच्या ( शक्तीचें ) आम्ही धनाकरितां ध्यान करतों.–ग्रिफिथ

आ नूनं यातमश्विनेमा हव्यानि वां हिता ।
इमे सोमासो अधि तुर्वशे यदाविमे कण्वेषु वामथ ॥
(८.९,४१)

हे अश्विनीदेव हो इकडे या कारण, हीं पुढें असलेलीं हविर्द्रव्यें तुमच्या करिताच तयार आहेत. त्याचप्रमाणे तुर्वश व यदु यांच्या जवळ असलेले सोम हे तुमचेच असून तुम्हीच ते आम्हां कण्वाप्रत दिले आहेत – सायण

हे अश्विनानो, आतां इकडे या. येथें तुमच्या करितां हवी तयार ठेविले आहेत. हीं सोमपेयें कण्वाच्या पुत्रामध्यें तुम्हांला अर्पण केलीं आहेत –ग्रिफिथ

यदद्याश्विना वपागयत्प्राकस्थो वाजिनीवसू ।
यद्द्रुह्यव्यनवि तुर्वशे यदौ हुवेवामथ मागतम् ॥
(८.१०,५)

हे अश्विनी हो, जर तुम्ही पश्चिमेस असाल, हे अन्नधनयुक्त हो जर तुम्ही पूर्वदिशेस असाल, द्रुह्यु, अनु, तुर्वश आणि यदु यामध्यें जर तुम्ही असाल, तर मी तुम्हास बोलावितों.

सत्यं तत्तुर्वशे यदौ विदानो अह्नवाय्यम् ।
व्यानट् तुर्वणे शमि ।
(८.४५,२७)

तुर्वश आणि यदु यांचीं सत्यकर्में जाणणाऱ्या त्वा संग्रामात अन्हवाय्याला नाहीसें केलेस.

पुरः सद्य इत्थाधिये दिवोदासाय शम्बरम् ।
अध त्यं तुर्वशं यदुम् ।
(९.६१,२)

(सोमरसपानानें मत्त झालेल्या इंद्रानें) त्याच दिवशीं शत्रूंचे किल्ले मोडले. सत्कर्माचरण करणाऱ्या दिवोदासासाठीं शम्बराला व नंतर तुर्वश राजाला व यदु राजाला (वश केलें) – सायण

(इंद्राने) त्वरेनें किल्ले व शंबर यांचा चुराडा केला, तदनंतर धर्मशील दिवोदासासाठीं यदूचा व तुर्वशाचा चुराडा केला.–ग्रिफिथ

अहं सप्तहा नहुषो नहुष्टरः प्राश्रावयं शवसा तुर्वशं यदुम् ।
अहं न्यन्यं सहसा सहस्करं नव व्राधतो नवतिं च वक्षयम् ॥
(१०.४९,८).

या ऋचेच्या अर्थासाठीं (हाच विभाग पृष्ठ १३५) नहुषविषयक विवेचन पहा.

आतांपर्यंत जे उतारे दिले आहेत त्यांवरून काय दृष्टीस पडतें तें पाहूं.

(१) कवि, कण्व, तुर्वश, यदु व उग्रादेव यांस अश्विमार्फत बोलावीत आहे व नववास्त्व, बृहद्रथ, तुर्वीति यांस दर्यूसह नेण्याम अग्नीस सांगतो.

(२) कवि, नर्य, तुर्वश, यदु, तुर्वीति व वय्य यांचें रक्षण केल्याबद्दल, रथ आणि एतश यांचें रक्षण केल्याबद्दल व नव्याण्णव नगरें पाडल्याबद्दल इन्द्राची स्तुति करीत आहे.

(३) कवि इन्द्रानें धुनीस मारून पाणी नद्यांप्रमाणें वाहतीं सोडल्याबद्दल त्याची स्तुति करतो, तुर्वश व यदु यांस समुद्रपार नेण्याम विनंति करतो.

(४) तुर्वश व यदु यानां शचीपति इन्द्रानें पुराच्या पार नेले

(५) इन्द्राने तुर्वश व यदु याच्या करिता पाणी थांबविलें. इन्द्र व कुत्स यांनीं उग्र (राक्षस) याजवर चाल केली. त्या वेळीं उशना व देव बरोबर इन्द्राकडे आले.

(६) इन्द्राने तुर्वशास सृंजयाच्या ताब्यात दिले व दैववाताकरिता वृचीवानास शिक्षा केली.

(७) तुर्वश पुरोडाश यानें भृगु व द्रुह्यु यावर स्वारी करून धन मिळविलें. (७.१८,६)

(८) कवि आतिथिग्वाकरिता तुर्वश व याद्व याचा नाश करण्यासाठीं इन्द्राची प्रार्थना करतो.

(९) इन्द्र पूर्व, पश्चिम व उत्तर, या दिशांतील राजाकडे न जातां अनु व तुर्वश याच्याकडे येतो असे स्तोता म्हणतो.

(१०) कण्वांस तुर्वशाकडून सोम मिळतो.

(११) अन्हवाय्यास इंद्रानें तुर्वश व यदु याच्यासाठीं नाहींसे केले.

(१२) तुर्वश, यदु याना इंद्रानें दिवोदासाच्या स्वाधीन केले

(१३) कुरुंगाच्या यज्ञात कवीनें तुर्वशात (श्रेष्ठ असें) शताश्व हें मोठें दान मिळविले.

(१४) अभ्यावर्तिन् चायमानाकरिता इन्द्रानें वरशिखाचें बीज नष्ट केलें. हरियूपिया येथें वृचीवानाच्या सैन्याचा नाश केला.

वरील विधानांवरून येणेप्रमाणे अनुमानें निघतातः–

(१) यदुतुर्वशाची मोठी गट्टी दिसते.

(२) उग्रादेव, तुर्वीति व नर्य हे यदुतुर्वशाचे कांहीं वेळ मित्र होते.

(३) तुर्वीति हा एकदां मित्र व एकदां शत्रू दिसतो.

(४) तुर्वशाचे निरनिराळ्या काळात. (१) नववास्त्व, (२) बृहद्रथ, (३) तुर्वीति, (४) दस्यु, (५) धुनि व (६) सृंजय असे निरनिराळे शत्रू दिसतात.

(५) याचे पुरोहित कण्व हे होत. सोम तुर्वशाकडून कण्वास मिळाला.

(६) कुरुंग हा कोणी तुर्वश असावा.

परंतु हापकिन्स हा कोणताही पुरावा न देता तुर्वश हे यदुलोकाच्या राजाचें नाव आहे असें म्हणतो. अनेक प्रमाणांनीं तुर्वश आणि यदु हे लोक भिन्न होते असे सिद्ध होतें. 'तुर्वशा यदू' (४.३०,१७) व 'यदुस्तुर्वश्च' (१०.६२,१०) असा किंवा यदु, पुरु, अनु, द्रुह्यु व तुर्वश या पाच जातींचा ऋग्वेदात जो उल्लेख आहे त्यावरून यदु आणि तुर्वश हे भिन्न होते हें उघड होतें. त्याचप्रमाणे, 'तुर्वश' हें नांव पडण्याचें कारण म्हणून 'लढाईंत त्वरित पढून जाणारे ते तुर्वश' अशी व्युत्पत्ति हापकिन्सनें दिला आहे तीहि हास्यास्पद आहे.

**तुर्वशांचा मुख्य पराक्रम.**– तुर्वशांचा विशेष पराक्रम ह्मणजे दाशराज्ञ युद्धांत सामील होणे हा आहे. त्या युद्धात जे अनेक लोक सामील झाले होते त्यात तुर्वश व यदु हे बरेच प्रमुख होते व त्याच्यावर इंद्राची कृपाहि होती. तथापि त्या युद्धात तुर्वशांचा पराभवच झाला ते 'अनु आणि द्रुह्यु' यांच्या प्रमाणे पाण्यांत बुडून न मरतां इन्द्रकृपेनें सुटले. इंद्रानें हि 'सुदास' याची दश राजांच्या तडाख्यातून विजयपूर्वक सुटका केली, तर 'तुर्वश' आणि 'यदु' यांची पराजयपूर्वक सुटका केली. इन्द्राने दोघांवरहि कृपाच केली असें सूक्तकारांनीं दाखविलें आहे. काहीं स्थलांवरून असेंहि ह्मणता येईल कीं, 'तुर्वश' आणि 'यदु' यांच्यावर इन्द्राची अवकृपा असे. इन्द्राचें स्तवन करणें झाल्यास त्या स्तुतींत 'हे इंद्रा तू 'तुर्वश' व 'यदु' यांचें संरक्षण केलेंस' असे अनेक कवींनीं म्हटलें आहे. तुर्वश इन्द्रपूजक होते असे ऋग्वेदांत उल्लेख आहेत. तुर्वश आणि यदु राजांनीं सरयू नदीच्या तीरीं अर्ण आणि चित्ररथ राजांना मारिलें असें ग्रिफिथचें म्हणणें आहे. परंतु तें बरेंच संशयग्रस्त असून त्याला चांगलासा आधार नाहीं. अर्ण आणि चित्ररथ यांचीहि माहिती अन्यत्र नाहीं. चित्ररथ राजा व सरयू नदी यांच्या संबंधावरून तुर्वश, पंचाल वगैरेंचा स्थलनिर्णय करण्यास फारच उत्तम साधन आहे.

तुर्वश आणि यदु यांचें सुदासचा पिता दिवोदास याच्याशींहि वैर होतें असें एका स्थलावरून दिसतें. तेथे खालील प्रमाणे उल्लेख आहे.

इन्द्र सद्य इत्याविथ दिवोदासाय शम्बरम्।
अध त्यं तुर्वशं यदुम्।

(९.६१,२).

अर्थ –इन्द्रानें त्याच दिवशीं शत्रूंचे किल्ले मोडले. सत्कर्माचरण करणाऱ्या दिवोदासासाठीं शम्बराला, तुर्वश राजाला व यदु राजाला वश केलें.

**वृचीवान् आणि तुर्वश एक नव्हते.**–वृचीवान् आणि तुर्वश हे एक होते असें म्हणण्यासहि पुरेसा निश्चयात्मक पुरावा नाहीं व ते एक नव्हते असे म्हणण्यासहि सबळ पुरावा नाहीं, दोघेहि वेगळे होते, परंतु एकाच मित्रसंघात दाखल होते, असें मानल्यास कोणताच विवादप्रश्न उपस्थित होत नाहीं, असें मॅकडोनेलचें म्हणणें आहे व दोघे एकच होते असें झिमरचें म्हणणें आहे.

परंतु ते दोघेहि भिन्न होते असें निश्चित म्हणतां येतें. एकाच ऋचेंतील उल्लेखानें ही गोष्ट सिद्ध होते. ती ऋचा खालील प्रमाणें आहे –

स सृञ्जयाय तुर्वशं परादाद्वृचीवतो दैववाताय शिक्षन्।
(६.२७,७)

अर्थ –इन्द्रानें सृञ्जयाला तुर्वश दिले आणि दैववातांकरितां वृचीवानाचें हित केलें.

यावरून दैववात व सृञ्जय यांच्या विरुद्ध युद्ध करण्याकरितां तुर्वश उभा राहिला होता आणि वृचीवान् त्याच्या मदतीकरितां आला होता.

यव्यावती व हरियूपीया या नद्यांच्या तीरीं वरशिखाच्या मुलाला मारलें, अभ्यावर्तिन्–चायमानाचें हित केलें आणि वृचीवानाला नष्ट केलें असा उल्लेख आला आहे. (६.२७,५)

या एकंदर हकीकतीवरून तुर्वश आणि वृचीवान, हे एक नव्हते हें प्रामुख्यानें सिद्ध होतें.

उत्तरकालीन कथांतहि यांचा उल्लेख आहे. हे पांचालांत मिळून गेले असें पांचाल व तुर्वश यांचा जो निकट संबंध दाखविण्यात येतो त्यावरून दिसतें.

तुर्वशांचें राहण्याचें ठिकाण व त्यांनी सुदास राजावर कोणच्या बाजूने चाल केली हें बरेंच अनिश्चित आहे. तथापि त्यांनीं परुष्णी नदी ओलांडिली होती यांत संशय नाहीं. बहुतेक ते पश्चिमेकडून पूर्वेकडे गेले असावेत हें संभवनीय दिसतें.

तुर्वशांचा आणि वृचीवानांचा संबंध असा दाखविला गेला आहे कीं, वृचीवान आणि तुर्वश यांचा सृञ्जय राजा दैववात यानें पराभव केला. येथेच चायमानाच्या विजयाचाहि उल्लेख आहे.

वधीदिन्द्रो वरशिखस्य शेषोऽभ्यावर्तिने चायमानाय शिक्षन्।
वृचीवतो यद्धरियूपीयायां हन् पूर्वे अर्धे भियसापरो दर्त्॥
(६.२७,५)

अर्थ –अभ्यावर्तिन् चायमानाकरितां इन्द्राने वरशिखाचें बीज नष्ट केलें. "हरियूपिया" येथें वृचीवानाच्या आघाडीच्या सैन्याचा नाश केला, व मागच्या रांगांतलें सैन्य भीतियुक्त होत्सातें पळून गेलें. काहीं लोकांचें म्हणणें वरशिख हा वृचीवानाच्या कुलांतील होता. ही गोष्ट कांहीं लोकांना संमत नाहीं तथापि ते दोघे मित्र असून त्या दोघांचा मित्रसंबंध किंवा शास्यशासक संबंध असावा, यांतील बहुतेक दुसराच संबंध असणें निश्चित दिसतें.

**पार्थव अभ्यावर्तिन् चायमान हा पार्थियन होता काय**- वरशिख आणि वृचीवान् यांचा अभ्यावर्तिन् चायमानाकरितां इन्द्राने पराभव केला. अभ्यावर्तिन् चायमान हा पार्थव होता. पार्थव आणि पार्थियन हे एकच होत असें शब्दसाम्यावरून कांहींचें म्हणणें आहे. पार्थियन (पर्शियन) या शब्दावरून इराणशीं या शब्दांचा व शब्दावरून व्यक्तींचा संबंध जोडतां येतो. त्याला यव्यावती व हरियूपीया या नद्यांच्या उल्लेखाचा आधार देता येण्यासारखा आहे. यावरून अभ्यावर्तिन् चायमान हा हिंदुस्थानच्या पश्चिमेस इराणांत रहात होता. तो अरकोशिया (Arachosia) मध्ये रहात होता असें हिलेब्रँटचें म्हणणें आहे, पण हें हिलेब्रँटचें स्थलनिर्णायक विधान स्वीकारतां येत नाहीं.

पार्थवांच्या औदार्याची भरद्वाजानीं फारच सुंदर स्तुति केली आहे. ती येणें प्रमाणें –

अभ्यावर्ती चायमानो ददाति दूणाशेयं दक्षिणा पार्थवानाम्।
(६.२७,८)

अर्थ –अभ्यावर्तिन् चायमान वीस गाईबैलांच्या जोड्या मला देतो. ही त्या पार्थवाची दक्षिणा कोणालाहि नाहींशी करता येणार नाहीं (ही कीर्ति पृथ्वीच्या अन्तापर्यंत टिकेल).

संजय, देववात आणि अभ्यावर्तिन् चायमान हे एक होते असें सायणाचें म्हणणें बरोबर दिसतें. हे वेगळे असावेत असें झिमरचें म्हणणें आहे. पार्थव आणि पार्थियन यांचा संबंध नसावा असें म्हणणारे लोक आहेत.

तुर्वश आणि तुर्वीति:–तुर्वश आणि तुर्वीति यांचा कांहीं संबंध होता की काय हें सांगतां येत नाहीं. एके ठिकाणीं तुर्वश, यदु, उग्रादेव, बृहद्रथ, व तुर्वीति यांचा उल्लेख आला आहे तो असा:–

अग्नीमुळे यदु, तुर्वश व उग्रादेव यांना मी बोलाविलें. नायक अग्नि, नववास्त्व, बृहद्रथ व तुर्वीति यांना शत्रुहननाला मदत म्हणून आणो (१. ३६, १८).

'तुर्वीति हा इन्द्रकृपेंतला होता. त्याकरितां एकदां इन्द्रानें पाणी उघड केलें' असें दुसऱ्या एका ठिकाणीं वर्णन आलें आहे

(१. ६१, ११).

अश्वीदेवांची त्याच्यावर कृपा असे

(१. ११२, २३).

तुर्वीति बरोबर दभीति हेंहि नांव अश्वीदेवांच्या कृपेंतल्या व्यक्तीचें म्हणून आलें आहे. दभीतिनें इन्द्राकरितां सोमवल्लीचा रस काढून दिला, त्याचें कारण दभीतीचे शत्रू धुनि आणि चुमुरि यांना इन्द्रानें मारलें (६. २६, ६).

यांचा उल्लेख शंबर, पिप्रु व शुष्ण यांच्या बरोबर येतो. चुमुरि हें नांव नॉन आर्यन् लोकांचें द्योतक आहे असें एक लेखक म्हणतो. यांचे किल्ले इन्द्रानें फोडले. दभीतीकरितां ३०००० दास ठार मारले होते (४. ३०, २१) व दस्यूंना दोऱ्यांनीं बांधून टाकलें होतें

(२. १३, ९).

**क्रिवि**—'क्रिवि' ही वेदकालीन एक जात असावी असें पुष्कळांचें म्हणणें आहे. त्याला शतपथ ब्राह्मणांत (१३. ५, ४, ७) आधार आहे. क्रैव्य पांचाल राजानें परिवक्रा नदीवर अश्वमेध केला अशी कथा तेथें आहे. हा शब्द ऋग्वेदांत अनेक वेळां आला असून सायणाचार्यांनीं पुष्कळ वेळां त्या शब्दाचा अर्थ विहीर असा घेतला आहे (८. २०, २४ आणि ८. २२, १२). हे क्रिविसंबंधाचे उल्लेख पाश्चात्य संशोधकांनीं लोकांविषयीं आहेत असें धरलें आहे. क्रिवि हा शब्द जेथें विशिष्ट लोक या अर्थानें लागू पडत नाहीं ते उल्लेख येणें प्रमाणें.

आ व इन्द्रं क्रिविं यथा वाजयन्तः शतक्रतुम् ।
मंहिष्ठं सिञ्च इन्दुभिः ॥

(१. ३०, १).

धनवासीच्या इच्छेनें आम्ही अत्यंत उदार व हजारों दानांचा स्वामी जो इंद्र त्यास विहीर जशी पाण्यानें भरतात तसें सोमरसाच्या बिंदूंनीं भरून तृप्त करून टाकतों.

यदं म उग्रा मरुतः घृतेवृनाविद्यामा उमतिं विपतंन ।
यत्रा वो दिद्युद्रदति क्रिविर्दती रिणाति पश्वः सुधितेव बर्हणा॥

(१. १६६, ६).

ज्याच्या संघाला कोणी उपद्रव करूं शकत नाहीं अशा उग्र मरुतांनों, संतुष्ट चित्तानें आमची चांगली इच्छा पुरी करा. (ती अशा वेळीं कीं,) ज्या वेळीं तुमचया क्रिवी (= विकाळ किंवा क्षेपणशील) दांताचें अस्त्र (मेघांना) कांपतें व चांगल्या नेम धरलेल्या शस्त्राप्रमाणें पशूंना मारतें.

सास्मा अरं बाहुभ्यां यं पिताकृणोद्विश्वस्मादा जनुषो वेदसस्परि।
येना पृथिव्यां नि क्रिविं शयध्यै वज्रेण हत्व्यवृणक्तुविष्वणिः ॥

(२. १७, ६).

सर्व प्रकारच्या मौल्यवान् धनापासून पित्यानें निर्माण केलेलें व त्याच्या बाहूंना आवरण्याजोगें हें वज्र आहे. या मोठ्यानें ओरडणाऱ्या वज्रानें त्यानें क्रिवीला खालीं पाडलें आणि मरेपावेतों मारून जमिनीवर टाकून दिलें.

अध त्विषीमाँ अभ्योजसा क्रिविं युधा भवदारोदसी
अपृणदस्य मज्मना प्रवावृधे ।
अधत्तान्यं जठरे प्रेमरिच्यत सैनं सश्चद्देवो देवं सत्यमिन्द्रं
सत्य इन्दुः ॥

(२. २२, २).

यानंतर दीप्तिमान् इंद्रानें बलाच्या योगें क्रिवीला युद्धांत जिंकलें. (आपल्या तेजानें) द्यावापृथिवी व्यापून टाकिली. याच्या (सोमाच्या) बलानें वाढला. (सोमाचे दोन विभाग करून) एक आपल्या पोटांत घातला व दुसरा देवांना दिला. तो देदीप्यमान् आणि सत्य इंदु (सोम) या देदीप्यमान् आणि सत्य इंद्राला व्यापून टाको.

प्र व एते सुयुजो यामन्निष्टये नीचीरमुष्मै यम्य ऋतावृधः ।
सुयन्तुभिः सर्वशासैरभीशुभिः क्रिविर्नामानि प्रवणे मुषायति॥

(५. ४४, ४).

हीं एकमेकांत मिसळून असणारीं किरणें खालीं येतात. भक्तांच्याकरितां आदित्य त्या किरणांच्या योगानें स्वतःच्या उदकाचे प्रवाह वाहविलो. (या मंत्रांत सायणांनीं 'क्रिवि' शब्दाचा 'कर्ता' असा अर्थ केला आहे.)

चांगल्या रीतीनें जुंपलेले असे हे यज्ञविधींत मदत करण्याकरितां तुजकडे येतात. आवळेजावळे असे ते (भाऊ) त्याच्याकरितां (आणी करितां) यज्ञास मदत करण्यासाठीं येतात. लगामांनीं ते सहज वाट दाखविले जातात; ते सर्वांवर अम्मल चालवितात. (वंच अंतरातून) खोल पडल्यावर समुद्र यांचीं नांवें लपविती (म्हणजे तें पाणी समुद्रांत गडप होतें):–
त्रिशिष

याभिः सिन्धुमवथ याभिस्तूर्वथ याभिर्दशस्यथा क्रिविम् ।
मयो नो भूतोतिभिर्मयोभुवः शिवाभिरसचद्विषः ॥

(८. २०, २४).

मरुद्हो ! तुमची सेवा न करणाऱ्यांचा द्वेष करणारे व सुखदायक असे तुम्ही ज्या साधनांनीं विजयी होतां, सिंधूचें उत्तम रक्षण करतां व जसें त्या देवेश क्रिवीला मदत करितां त्या साधनांनीं आम्हांला तुम्ही सुखी करा.:–त्रिशिष

ताभिरायातं वृषणोप मे हवं विश्वप्सुं विश्ववार्यं ।
इषा मंहिष्ठा पुरुभूतमा नरा याभिः क्रिविं वावृधुस्ताभिराग-
तम् ॥
(८. २२, १२).

हे अश्वींनों, सर्व सुखें देणारें व निरनिराळ्या स्वरूपांत असणारें असें मी तुम्हांस बोलवणें केलें म्हणजे या (सूक्तां) तून तुम्ही या. क्रिवीला अतिशय धान्य देणारे तुम्ही ( मीं म्हटलेल्या सूक्तांतून ) या.

प्र यो ननक्षे अभ्योजसा क्रिविं वधैः शुष्णं निघोषयन् ।
यदेदस्तंभीत्प्रथयन्नमूं दिवमादिज्जनिष्ट पार्थिवः ॥
(८. ५१, ८).

ज्यानें आपल्या बलानें क्रिवीचा पाडाव केला व आपल्या आयुधानें शुष्णाला ठार मारिलें त्यानें द्योरयाच अंतरावर असलेल्या आकाशाला आधार दिला त्या वेळेस प्रथम प्रार्थिव जन्मास आला.

शुभ्री वां स्तोमो अश्विना क्रिविर्न सेक आगतम् ।
मध्वः सुतस्य स दिवि प्रियो नरा पातं गौराविवेरिणे ॥
(८. ८७, १).

हे अश्विनौं तुमची स्तुति सुंदर आहे. प्रवाह भरण्याकरितां झऱ्याप्रमाणें या. हे स्वर्गाच्या स्वामींनों, दोन रानटी बैल ज्याप्रमाणे एखाद्या तळ्याचें पाणी पितात त्याप्रमाणें ( पिळला जाणारा ) गोड ( सोम ) रस तुम्ही प्या. तो तुम्हांला आवडतो.

अभि वह्निरमर्त्यः सप्त पश्यति वावहिः ।
क्रिविर्देवीरतर्पयत् ॥
(९. ९, ६).

जो यज्ञ पार पाडणारा व अत्यन्त तृप्तिजनक सोम सात नद्यांना जाऊन मिळतो तो कूपरूपानें ( क्रिविः ) असणारा नद्यांना तृप्त करतो.

क्रिवि आणि कुरु.—वर दिलेल्या पुराव्यावरून क्रिवि नांवाचें एक राष्ट्र होतें अशी आमची खात्री होत नाहीं. क्रिवीचा संबंध कुरूंशीं जोडण्यांत येतो पण कुरुसंबंधानें फारच थोडी माहिती आपणांस वैदिक वाङ्मयांत उपलब्ध होते. कुरु, कौरव, आणि कौरम असे तीन प्रकारचे शब्द वैदिक वाङ्मयांत आढळतात. कुरूंची प्रसिद्धि मंत्रभागापेक्षां ब्राम्हणभागांत अधिक आहे.

द्रु ह्यु.—आतां द्रुह्यूकडे वळूं. द्रुह्यु हा शब्द एकवचनीं व अनेक वचनीं मिळून सहा वेळ (१. १०८ ८; ६. ४६, ८; ७. १८, ६; १२; १४; ८. १०, ५; या ठिकाणीं ) आला आहे. यांपैकी ७. १८ मधील तीन उल्लेख असणाऱ्या ऋचा मागें दिल्याच आहेत. त्याशिवाय ज्या तीन ऋचा आहेत त्या येणेंप्रमाणें.

यदिन्द्राग्नी यदुषु तुर्वशेषु यद्द्रुह्युष्वनुषु पूरुषु स्थः ।
(१. १०८, ८).

हे इंद्राग्नीहो, जरी तुम्हीं यदु किंवा तुर्वश, द्रुह्यु, अनु ( किंवा ) पुरु यांच्या येथें असाल ( तरी या ).

यद्वा रुमे मघवन् द्रुह्यावा जने यत्पूरौ कच्च वृष्ण्यं ।
अस्मभ्यं तद्रिरीहि सं नृषाह्येऽमित्रान् पृत्सु तुर्वणे ॥
(६. ४६, ८).

हे धनवान, ( इंद्रा ) तृक्षि, द्रुह्यु आणि पूरु यांच्याजवळ असलेलें सर्व बल युद्धांत शत्रूंचा नाश करण्यासाठीं आम्हाला दे.

यदद्याश्विनावपाक् यत् प्राक्स्थो वाजिनीवसू ।
यद्द्रुह्यव्यनवि तुर्वशे यदौ हुवे वामथ मागतं ॥
(८. १०, ५).

हे अन्नवान् अश्वीहो, तुम्ही पश्चिमेकडे, पूर्वेकडे अथवा द्रुह्यु, अनु, तुर्वश, यदु यांच्या येथें असला तरी मी तुम्हाला बोलावीत आहे. माझ्याकडे या.

यांमध्यें द्रुह्यूविषयीं खालील माहिती मिळते:—

( १ ) यदुतुर्वशांबरोबर उल्लेख.

( २ ) इन्द्राग्नीचें त्यांच्याकडे अस्तित्व.

( ३ ) सुदासाच्या विरुद्ध लढाईंत त्यांच्यांतील लोक मारले गेले.

( ४ ) श्रुत, कवष व वृद्ध यांबरोबर ते मारले गेले.

( ५ ) ते सामर्थ्यवान् असून त्यांचें शौर्य गायकानें देवापाशीं याचिलें आहे.

( ६ ) अश्वींचें द्रुह्यू व त्यांचे सहकारी यांच्या घरीं अस्तित्व.

यदु, तुर्वश, द्रुह्यु, अनु व पुरु या सर्व प्रसिद्ध वैदिक जाती होत्या. हे पाच ययातीचे पुत्र असून त्याला ते त्याची वृद्धावस्था घेऊन आपलें तारुण्य देण्यास तयार न झाल्यामुळे ययातीनें त्यांना राज्य न देता तुम्हीं हलक्या जातीचे व्हाल वगैरे शाप दिला, ही कथा जातींच्या उत्पत्तीच्या स्पष्टीकरणार्थ पौराणिक प्रयत्न या दृष्टीनें लावतां येईल.

पुरु.— आतां पुरुविषयीं काय माहिती मिळते ती पाहूं.

प्र नू महित्वं वृषभस्य वोचं यं पूरवो वृत्रहणं सचन्ते ।
वैश्वानरो दस्युमग्निर्जघन्वाँ अधूनोत्काष्ठा अव शंबरं भेत् ॥
(१. ५९, ६).

मेघहन्त्या ज्या वैश्वानराला पुरुलोक सेवितात त्याचें माहात्म्य मी तुम्हांला सांगतो. त्या वैश्वानर अग्नीनें दस्यूंना मारलें. सर्व दिशा हलविल्या ( पाऊस पाडला ) आणि मेघ फोडीला.

त्वं ह त्यदिन्द्र सप्त युध्यन् पुरो वज्रिन् पुरुकुत्साय दर्दः ।
बर्हिर्न यत् सुदासे वृथा वर्गंहो राजन् वरिवः पूरवे कः ॥
(१. ६३, ७).

हे वज्रयुक्त इंद्रा तूं पुरुकुत्साकरितां युद्ध करून सात किल्ल्याचा नाश करतोस. तृणाप्रमाणें सहज तूं सुदासाकरिता त्याच्या ( शत्रूंना ) तोडलेस, हे राजा, पुरुंस लूट मिळवून दिलीस.

भिनत्पुरो नवतिमिन्द्र पूरवे दिवोदासाय महि दाशुषे नृतो
वज्रेण दाशुषे नृतो ।
अतिथिग्वाय शम्बरं गिरेरुग्रो अवाभरत् ।
महो धनानि दयमान ओजसा विश्वा धनान्योजसा ॥
(१. १३०, ७).

हे इंद्रा ! हे नृत्य करणाऱ्या ! आपला भक्त व कृपेंतला चाकर जो पुरु-दिवोदास-त्याच्यासाठीं तूं आपल्या वज्रानें नव्वद किल्ल्यांचा चुराडा केलास. अतिथिग्वासाठीं त्या बलाढ्य ( इंद्रानें )

असुराला पर्वतावरून खालीं लोटून दिलें, त्यानें आपल्या बलानें मोठ्या धनराशीची वाटणी केली.

विदुद्वे अस्य वीर्यस्य पूरवः पुरो यदिन्द्र शारदीरवातिरः सासहानो अवातिरः ।
शासस्तमिन्द्र मर्त्यमयज्युं शवसस्पते ।
महीममुष्णाः पृथिवीमिमा अपो मन्दसान इमा अपः ॥
(१. १३१, ४)

हे इंद्रा, तूं शरदाचीं नगरें (मेघमंडलें) मोठा जय मिळवून भंगिलीस. हा जो तुझा पराक्रम, तो पुरु जाणून आहेत. हे बलोपेता इंद्रा, तूं यज्ञ न करणाऱ्या मनुष्याला शासन करून ही विस्तीर्ण पृथ्वी व हीं उदकें हर्षयुक्त होऊन काढून घेता झालास. (म्ह० वृत्राला मारून त्यापासून विस्तीर्ण पृथ्वी व मेघोदकें हिरावून घेतलीस.)

दर्नो विश इन्द्र मृध्रवाचः सप्त यत्पुरः शर्म शारदीर्दर्त ।
ऋणोरपो अनवद्यार्णा यूने वृत्रं पुरुकुत्साय रन्धीः ॥
(१. १७४, २).

ज्या टोळ्या (जाती) उद्धामपणानें बोलत्या त्यांचें आश्रयस्थान जे सात शरद किल्ले त्या किल्ल्यांचा चुराडा करून तूं त्या टोळ्यांना दाबून टाकलेंस. हे निर्दोषी (इन्द्रा), लाटांच्या पाण्याला तूं पूर आणलास व त्याच्या शत्रूला तरुण पुरुकुत्साच्या ताब्यात (नाशार्थ) दिलेस.

एवा यस्य इन्द्रः सत्यः सम्राड्ढन्ता वृत्रं वरिवः पूरवे कः ।
पुरुष्टुत क्रत्वा नः शग्धि रायो भक्षीय तेऽवसो दैव्यस्य ॥
(४. २१, १०).

या प्रकारें स्तविलेला सत्यशाली धनाचा पति व वृत्राचा हन्ता इन्द्र पुरूला धन देतो. अनेक यजमानांकडून स्तवनकर्मांनें स्तविल्या जाणाऱ्या हे इन्द्रा! तूं आम्हांला धन दे. तुझ्याकडून मिळणारें दैवी अन्न मीं सेवन करावें.

महश्चर्कर्म्यर्वतः क्रतुप्रा दधिक्राव्णः पुरुवारस्य वृष्णः ।
यं पूरुभ्यो दीदिवांसं नाग्निं ददथुर्मित्रावरुणा ततुरिम् ॥ २ ॥
(४. ३९, २)

कर्मांचा पूरक मी त्या महान्, वेगवान्, दानशील व बहुतांनां वरणीय अशा दधिक्रावा देवाचें स्तवन करतों. हे मित्रावरुण हो! या तारक दधिक्राव्याला तुम्ही दीप्तिमान् अग्नीप्रमाणें पुरूंच्या कल्याणासाठीं धारण करतां.—सायण

आ यज्ञैर्देव मर्त्य इत्था तव्यांसमूतये ।
अग्निं कृते स्वध्वरे पूरुरीळीतावसे ॥
(५. १७, १).

स्वतःच्या तेजानें दीप्तिमान् असणाऱ्या ज्या अग्नीला मनुष्यें हविर्भाग अर्पण करतात त्या अग्नीची पुरु स्तव. करीत असलेल्या यज्ञांत स्वसंरक्षणासाठीं स्तुति करतो.

सनेम तेऽवसा नव्य इन्द्र प्र पूरवः स्तवन्त एना यज्ञैः ।
सप्त यत्पुरः शर्म शारदीर्दर्द्धन्दासीः पुरुकुत्साय शिक्षन् ॥
(६. २०, १०)

हे इंद्रा, तुझ्या नूतन अनुग्रहानें आमचा फायदा होवो, अशी तुझी स्तुति पुरु यज्ञ करून करतात. 'दासांचें' धर्मनिस्थान जे सात किल्ले ते तूं मोडून टाकलेस, व त्याच्या (म्हणजे) दासांच्या जाती तूं ठार मारून टाकण्यास व पुरुकुत्साला तूं मदत केली आहेस.

त्वद् भिया विश आयन्नसिक्नीरसमना जहतीर्भोजनानि ।
वैश्वानर पूरवे शोशुचानः पुरो यदग्ने दरयन्नदीदेः ॥
(७. ५. ३).

जेव्हां हे वैश्वानर अग्ने, पुरू करितां प्रकाशून तूं त्यांचे किल्ले पेटवलेस आणि भग्न केलेस, तेव्हां तुझ्या भीतीनें दूरवर पसरलेल्या कृष्णवर्ण जाती आपली संपत्ति टाकून देऊन पुढें धावल्या.

प्रप्रायमग्निर्भरतस्य शृण्वे वि यत्सूर्यो न रोचते बृहद्भाः ।
अभि यः पूरुं पृतनासु तस्थौ द्युतानो दैव्यो अतिथिः शुशोच ॥
(७. ८, ४).

हा भरताच्या मालकीचा अग्नि फार कीर्तिमान् आहे; हा सूर्याप्रमाणें मोठ्या दीप्तीनें प्रकाशतो. ज्यानें युद्धांत पुरूचा पराभव केला तो स्वर्गीय अतिथि परिपूर्ण तेजानें प्रकाशला आहे.

त्वं धृष्णो धृषता वीतहव्यं प्रावो विश्वाभिरूतिभिः सुदासम् ।
प्र पौरुकुत्सिं त्रसदस्युमावः क्षेत्रसाता वृत्रहत्येषु पूरुम् ॥
(७. १९, ३.).

हे धीरा, तूं आपली सर्व मदत देऊन, ज्याचा हवि स्वीकारलास त्या सुदासाला, देश जिंकण्याच्या आणि शत्रूंना मारण्याच्या कामीं पुरूला आणि पुरुकुत्साचा मुलगा जो त्रसदस्यु त्याला मोठ्या धिटाईनें रक्षिलें आहेस.

उभे यत्ते महिना शुभ्रे अन्धसी अधिक्षियन्ति पूरवः ।
सा नो बोध्यवित्री मरुत्सखा चोद राधो मघोनाम् ॥
(७. ९६, २).

हे रूपवती, जर पुरु आपल्या सामर्थ्याच्या समृद्धींत तुझ्या दोनहि गवताळ किनाऱ्यावर वास करतात, तर हे मरुत्सखे, आमच्यावर कृपादृष्टि ठेव. आमच्या वरिष्ठाच्या धनाला चालना दे.

प्र ते यक्षि प्र त इयर्मि मन्म भुवो यथा वन्द्यो नो हवेषु ।
धन्वन्निव प्रपा असि त्वमग्न इयक्षवे पूरवे प्रत्न राजन् ॥
(१०. ४, १).

हे अग्ने! मी तुला हवि देतों, माझ्या मनांत आलेली स्तुति मी उच्चारितों. कारण, हे वन्द्य! देवांनां आव्हान करतांना तूं नेहमीं सान्निध असतोस. हे पुराण राजन्! निरुदक प्रदेशामध्यें ज्याप्रमाणें पाणपोई त्याप्रमाणें तूं पुरूस (किंवा हवींच्या योगानें देवांनां संतुष्ट करणाऱ्या मनुष्यांना) पाणपोई सारखा (म्हणजे सुख देणारा) आहेस.—सायण

कुरुश्रवणमावृणि राजानं त्रासदस्यवम् ।
मंहिष्ठं वाघतामृषिः ॥
(१०. ३३, ४).

विपुल धन देणारा त्रसदस्यूचा मुलगा जो कुरुश्रवण (ऋत्विजांनीं केलेली स्तुति ऐकणारा) नामक राजा त्याच्याजवळ मी ऋषि, ऋत्विजांनां देण्याच्या धनाविषयीं प्रार्थना करतों.—सायण.

अहमिन्द्रो न पराजिग्य इद्धनं न मृत्यवेवतस्थे कदाचन।
सोममिन्मा सुन्वतो याचतावसु नमे पूरवः सख्ये रिषाथन॥
(१०.४८,५).

इंद्र म्हणतोः—मी सर्व धनाचा स्वामी आहे. माझ्या द्रव्याचें हरण कोणीहि करूं शकत नाहीं. तसेंच माझ्या भक्तांवर मृत्यूचा घाला घालूं शकत नाहीं. (अर्थात् माझ्यावर चालत नाहीं, हें सांगावयास नकोच) हे सोम कुटणारे यजमानानों तुम्हांला अपेक्षित असणाऱ्या द्रव्याची तुम्ही मजजवळच मागणी करा. हे लोक हो (पूरवः) माझें सख्य सोडूं नका.—सायण.

मी इंद्र आहे; कोणी कधींहि माझें द्रव्य घेऊं शकत नाही. मी कधींहि मृत्यूच्या अंकित होत नाहीं. सोम पिळून माझ्या जवळच संपत्ति मागा, हे पुरूंनो, माझे स्नेही असतांना तुम्हाला कोणतीहि पीडा सहन करावी लागणार नाहीं.—ग्रिफिथ.

१. ६३, ७ मधील सुदासास मदत करणाऱ्या पुरुकुत्साचा उल्लेख दाशराज्ञयुद्धविषयक नसून, सूर्वयाणाविरुद्ध असलेल्या मित्रसंघाच्या विजयाबद्दलचा असावा. १. १७४, २; ५. २०, १० व ७. ५, ३ मधील पुरुकुत्साविषयींचा उल्लेख वरील लढाई-विषयींच असावा असें वाटतें. ७. ८, ४ मध्यें भरत व पुरु यांचे वैमनस्य दृष्टीस पडतें. ७. १९, ३ वरून त्रसदस्यु हा पुरुकुत्साचा मुलगा अगर वंशज होता असें दिसतें. १०. ३३, ४ मध्यें कुरुश्रवण हा त्रसदस्यूचा वंशज असल्याविषयीं उल्लेख आहे.

पुरूंचे शत्रुमित्र व त्यांच्या लढाया:— सायणाचार्यांच्या भाष्यांत पुरु शब्दाचा मनुष्य असा अर्थ पुष्कळ वेळां आला आहे. यास्कानें जातिवाचक सर्व शब्द मनुष्यवाचक म्हणून स्वीकारले आहेत, त्याचा हा परिणाम असावा. यास्कानें हे शब्द जातिवाचक न लिहितां मनुष्यवाचक का लिहिले हा एक विचारणीय प्रश्न आहे.

हे अनुद्रुधु वगैरे बरोबर एकदां आले असून तृत्सूंचे शत्रु म्हणून त्यांचा उल्लेख येतो आणि तेथें त्यांना वडवडे—मृध्रवाचः—असें म्हटलें आहे. पुरु आणि सुदास यांच्यामध्ये पुरुकुत्साच्या कालांत स्नेहसंबंध व ऐक्य उत्पन्न झालें असावें, कां कीं, सुदासाकरितां शत्रूस मारिलें आणि पुरूंस धन प्राप्त करून दिलेंस असा उल्लेख, १. ६३, ७ मध्यें आहे.

दुसऱ्या ठिकाणीं (७. ८, ४) भरतांच्या अग्नीनें त्याचा पराभव केला असें म्हटलें आहे. सुदास हा भरत होता, याबद्दल मतैक्य आहे. आणि पुरूंवर मिळालेल्या विजयाप्रीत्यर्थच मोठा उत्सव चालू होता असें सदर ऋचेंत केलेल्या अग्नीच्या स्तुतीवरून दिसतें.

उलट पुरूंना जय झाला, असें वर्णन करणाऱ्या अनेक ऋचा आपणांस उपलब्ध होतात (१. १३१, ४; १. १७४, २; ४. २१, १०; ६. २०, १०). कांहीं स्थळीं पुरूंच्या सामर्थ्याचा इतका महिमा गाइला आहे कीं इतर भक्तांनीं पुरूंच्या सामर्थ्यासारखें सामर्थ्य देवतांपाशीं मागितलें आहे.

(यत्पूरौ कच वृण्यम्। अस्मभ्यं तद्रिरिहि
६. ४६, ८.).

हे पुरूंचे जय ज्या लोकांवर होत असत ते काळ्या रंगाचे होते एतद्विषयक उल्लेख खालील प्रमाणें आहेः—

त्वद् भिया विश आयन्नसिक्नी रसमनाजहतीर्भोजनानि।
वैश्वानर पूरवे शोशुचानः पुरो यदग्ने दरयन्नदीदेः॥
(७. ५, ३).

जेव्हां हे वैश्वानर अग्ने, पुरुकरितां प्रकाशून तूं त्यांचे किल्ले पेटविलेस आणि भग्न केलेस तेव्हां तुझ्या भीतीनें दूर पळालेले काळे लोक संपत्ति टाकून पुढें धांवले.

यावरून काळ्या लोकांविरुद्ध लढणारा पुरु हा गौरवर्ण असावा. हे काळे लोक बहुधा हिंदुस्थानांतील मूळ रहिवाशी असावेत असें कांहींचें मत आहे! हे दाशराज्ञ युद्धांतील सुदासाचे प्रतिस्पर्धी होते असें दिसतें.

पुरूंपैकीं मोठमोठे राजे पुरुकुत्स, त्रसदस्यु वगैरे होत. यांचाच पुरु ह्या नांवानें उल्लेख येणें संभवनीय आहे. पुरु हें व्यक्तीचें नांव नसावें. तें एका जातीचें किंवा समाजाचें नांव असून संस्कृत वाङ्मयांतील नेहमींच्या पद्धतीप्रमाणें त्या जातींतील किंवा समाजांतील मुख्याचें किंवा मुख्य व्यक्तीचें तें नांव बनलें असावें. त्याप्रमाणें दोनहि प्रकारानें या शब्दाचा उल्लेख आला आहे. यांचें राहण्याचें ठिकाण सरस्वतीच्या कांठीं होतें असे स्पष्ट उल्लेख आहेत. (७. ९६, २).

दाशराज्ञ युद्धांत सुदासाविरुद्ध लढणाऱ्या राजमालिकेंत 'पुरु' हें नांव झळकतें. परंतु त्या व्यक्तीचे विशेष नांव कळणें आवश्यक आहे. याकरितां त्या वंशांतील ऋग्वेदांत उपलब्ध होणाऱ्या राजांचा इतिहास क्रमानें पहाणें आपणांस अवश्य आहे.

पुरुकुत्स—तो सुदाससमकालिन होता काय? पुरु वंशांपैकीं पुरुकुत्स याचा उल्लेख ऋग्वेदांत अनेक वेळां आला आहे. तो दासाचा जेता आणि इन्द्राची कृपा संपादन केलेला राजा होता.
(६. २०, १०).

याभिः शुचन्तिं धनसां सुषंसदं तप्तं घर्ममोम्यावन्तमत्रये।
याभिः पृश्निगुं पुरुकुत्समावतं ताभिरूषुऊतिभिरश्विनागतम्॥
(१. ११२, ७).

हे अश्वी हो, ज्या प्रसादांनीं धनाढ्य शुचंतीला तुम्ही चांगले घर दिलेत; आणि अत्रीचा प्रखर अग्नि शांत केलात, त्याचप्रमाणें ज्या प्रसादांनीं पृश्निगूचें व पुरुकुत्साचें रक्षण केलेंत त्या प्रसादांनीं युक्त हे अश्वी हो, तुम्ही येथें अवश्य या.—सायण.

त्वं ह त्यदिन्द्र सप्त युध्यन्पुरो वज्रिन्पुरुकुत्साय दर्दः।
बर्हिर्नयत्सुदासे वृथा वर्गंहो राजन्वरिवः पूरवे कः। (१.६३,७)

हे वज्रधारी इंद्रा, तूं पुरुकुत्सनामक ऋषीकरितां शत्रूंच्या सात नगरींचा पुरा नाश केलास. तसेंच, सुदास राजाकरितां तूं अंहुसंतक दैत्याचा नाश करून अनायासानें त्याच्यापासून द्रव्य हरण केलेंस. हे स्वामिन् इंद्रा, तुझ्यावांचून त्या याजक सुदासाला समृद्ध कोण बरें करणार? (अर्थात् तूंच).—सायण.

त्वं त्या इन्द्र मृध्रवाच सप्त यत्पुरः शर्म शारदीर्दर्त ।
ऋणोरपो अनवद्यार्णा यूने वृत्रं पुरुकुत्साय रन्धीः ॥
(१ १७४, २)

हे इन्द्रा, ज्या वेळी तूं शत्रूंचीं सात नगरें विध्वंसिलीस त्या वेळी (शत्रुसैन्यांतील) बडबडया लोकांची बडबड बंद केलीस, आणि हे दोषरहित इन्द्रा, तूं चपल अशा उदकांना खाली सोडिलेंस व वृत्राला पुरुकुत्साच्या ताब्यांत दिलेस.

पुरुकुत्स सुदासशीं समकालीन होता असें लुडविग व हिलेब्रँट म्हणतात परंतु या म्हणण्यास आधार नाहीं. ते आधार म्हणून जी ऋचा स्वीकारतात त्या ऋचेंत फक्त पुरुकुत्स आणि सुदास यांचा उल्लेख आला आहे; परंतु त्या उल्लेखावरून पुरुकुत्स आणि सुदास हे समकालीन होते असें म्हणता येणार नाहीं. कारण, एखाद्या स्तुतिपर मन्त्रात अनेक भक्तांचे उल्लेख आले म्हणून ते समकालीन ठरविणें अयोग्य आहे असें कांहींचें मत आहे.

एका ऋचेंत तो अश्विनाच्या कृपेनें यशस्वी झाला असें म्हटलें आहे (१. ११२, ७). त्याच ऋचेंत 'शुचंतीला घर दिलेंत, अत्रीचा प्रखर अग्नि शांत केलात व पृश्निगूचें संरक्षण केलें हे उल्लेख आले आहेत.

पुरुकुत्साची पत्नी, पुत्र, पिता व कुल,–पुरुकुत्साच्या मुलाचें त्रसदस्यु असें नांव होतें. पुरुकुत्साची पुरुकुत्सानी बायको होती. याबद्दल फारच स्पष्ट उल्लेख आहे. तो असा –

अस्माकमत्र पितरस्त आसन्त्सप्त ऋषयो दौर्गहे बध्यमाने ॥
त आयजन्त त्रसदस्युमस्या इन्द्रं न वृत्रतुरमर्धदेवम् ॥
(४. ४२, ८)

दुर्गहाचा पुत्र बद्ध झाल्यावर ते सप्तर्षी आमचे पितर झाले. ते तिला इन्द्रासारखा शत्रुजेता आणि अर्धदेव त्रसदस्यु देते झाले.

पुरुकुत्सानी हि वामदाशद्धव्येभिरिन्द्रावरुणा नमोभिः ।
अथा राजानं त्रसदस्युमस्या वृत्रहणं ददथुरर्धदेवम् ॥
(४. ४२, ९)

कारण, हे इन्द्रावरुणहो, पुरुकुत्साची बायको तुम्हांला हविर्द्रव्य आणि नमस्कार यांनीं प्रसन्न करती झाली. नंतर शत्रुघ्न आणि अर्धदेव असा त्रसदस्यु राजा तिला दिला.

या दोनहि ऋचा अत्यन्त महत्त्वाच्या आहेत या ऋचांतील पुरुकुत्सानी व दौर्गह या शब्दांवरून आपणांस त्रसदस्यूची आई, बाप व आजा यांसंबंधीं माहिती मिळते.

पुरुकुत्साचा सुदासाकडून दाशराज्ञयुद्धांत पराभव व त्याचा दुर्दशा-पुरुकुत्स तुरुंगांत असतां राजा पाहिजे म्हणून सप्तर्षींच्या कृपेनें इन्द्रावरुणांना प्रसन्न करून घेऊन 'त्रसदस्यु' हा पुत्र पुरुकुत्सपत्नीनें जन्मास आणला. ही हकीकत सायणाचार्यांनी पूर्वसंप्रदायपूर्वक भाष्यांत दिली आहे. ती हकीकत अशीः–

पुरुकुत्सस्य महिषी दौर्गहे बन्धनस्थिते ।
पत्यौ राजन्यं दृष्ट्वा राष्ट्रं पुत्राय लिप्सया ॥
महर्षीन् समागतान् सप्तर्षीन् पर्यपूजयत् ।
तेभ्यः प्रीता पुनः प्रोचुर्यजेन्द्रावरुणौ भृशम् ॥
सा चेन्द्रावरुणाविष्ट्वा त्रसदस्युमजीजनत् ॥

(ऋ ४. ४२, ८ वरील भाष्यांत सायणांनीं दिलेला बृहद्देवतेंतील उतारा)

उत्तरकालीन वाङ्मयांत पुत्रप्राप्तीकरितां अश्वमेध केल्याचीं वर्णनें आहेत. त्याप्रमाणें पुरुकुत्सानें बायको मिळविण्याकरितां अश्वमेध केल्याचें उदाहरण आहे असें शतपथ ब्राह्मणांतील दुर्बोध्यावरून म्हणावयास जागा आहे 'दौर्गह' शब्दाचा 'दुर्गहपुत्र' असा अर्थ न घेता त्याचा घोडा असा घ्यावा. याला शतपथ ब्राह्मणांतील 'दौर्गह' या शब्दाच्या हकीगतीनें (१३. ५, ४, ५) जोड मिळते. परंतु हें निश्चित नाहीं.

असो, पुरुकुत्सानीवर पुरुकुत्स तुरुंगात पडल्यामुळें संकट आलें असें निश्चित धरलें तरी पुरुकुत्साला कोणीं तुरुंगांत टाकलें हा प्रश्न राहतोच.

सुदासानें दाशराज्ञयुद्धांत पुरूचा पराभव केला त्यामुळें पुरुकुत्स तुरुंगांत पडून तेथेंच त्याचा अंत होण्याचा संभव आहे त्या प्रसंगामुळेंच पुरुकुत्सानीनें त्रसदस्यूला मिळवून तें संकट निवारण केलेलें दिसतें.

पुरु व इक्ष्वाकु एकच काय:–शतपथ ब्राह्मणांत पुरुकुत्साला ऐक्ष्वाक असें म्हटलें आहे. इक्ष्वाकु हें नांव फक्त एकदांच ऋग्वेदांत आलें आहे. तथापि त्या शब्दावरून राजा असा अर्थबोध होतो. ज्याचें नांव असमाति-सूक्तांत आहे त्याला इक्ष्वाकुवंशीय असें समजतात. अथर्ववेदांत हि इक्ष्वाकूचा फक्त एकदाच उल्लेख आला आहे. परंतु तेथेंहि मूळपुरुष कीं वंशज ही शंका पुन कायम राहतेच. पुरुकुत्स हा ऐक्ष्वाक होता असें शतपथ ब्राह्मणांत म्हटलें आहे. यावरून त्रसदस्यु हा इक्ष्वाकु होता ही गोष्ट प्रचारांत आली आहे. यावरून पुरूंनाच पुढें इक्ष्वाकु म्हणूं लागले असें होतें. झिमर म्हणतो कीं, त्यांची वस्ति उत्तर सिन्धूकडे असावी परंतु याबद्दल निश्चित सांगतां येत नाहीं. त्यांची पूर्वेकडे वस्ति असण्याचा विशेष संभव आहे. इक्ष्वाकु यांचा अयोध्येशीं संबंध पुढें आला.

पुरुकुत्साला 'दौर्गह' असें म्हटलें आहे. तसेंच त्रसदस्यूला 'गौरिक्षित' असें म्हटलें आहे. दुर्गह आणि गिरिक्षित् यांबद्दल कांहीं विशेष माहिती नाहीं.

पौरुकुत्स्य त्रसदस्यु–त्रसदस्यूचा पौरुकुत्सि (७.१९.३) व पौरुकुत्स्य (५. ३३, ८, ८. १९, ३६) हा नांवांनीं उल्लेख आला आहे दिवोदासाचें आणि पुरूंचें वैर होतें सुदासाचें पुरूंशींचें वैर होतें हें दाशराज्ञयुद्धावरून आपणांस दिसतें. तथापि ती लढाई पुरुकुत्साच्या वेळींच समाप्त झाली होती. त्रसदस्यूशीं त्या लढाईचा कांहीं एक संबंध नाहीं.

त्रसदस्युला 'हिरणिन्' नांवाचा एक मुलगा होता असें लुडविगचें म्हणणें आहे. परंतु ती ऋचा लुडविगला समजलेली नाहीं. कारण, 'हिरणिन्' हें धनवान् अशा अर्थाचें विशेषण आहे. (६. ६३, ९; ५. ५३, ८).

कालान्तरानें कुरु आणि पुरु हे दोनहि लोक एक झाले, याचें उदाहरण त्रसदस्युपुत्र कुरुश्रवण हें मानितां येईल. कुरु-

श्रवण आणि तृक्षि ( ८. २२, ७ ) या दोघांनाहि 'त्रासदस्यव' असें म्हटलेले आहे. द्रुह्यु व पुरु लोकांबरोबरहि एके ठिकाणीं ( ६. ४६, ८ ) तृक्षीचा उल्लेख आला आहे. 'तार्क्ष्य,' हा घोडा तृक्षीचा होता कीं नाहीं हें सांगतां येत नाहीं. विरुद्ध पुरावा दिसे तोंपर्यंत हे दोघे भाऊ होते असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं.

कुरु लोकांचे राहण्याचें ठिकाण मध्यदेश होय. पुरुलोक सरस्वतीच्या काठीं राहात होते असा उल्लेख येतो, ती सरस्वतीहि मध्यदेशांतलीच होय हेंहि ह्या कुरुपुरूंच्या संबंधावरून ध्यानांत येते.

' त्र्यरुण त्रैवृष्ण ' यालाहि ' त्रसदस्यु ' असें म्हणत असत असें ब्राह्मणग्रंथांवरून म्हणता येते. सायणाचार्य ही गोष्ट स्वीकारीत नाहींत. ( ५. २७, १–३ ).

ऋग्वेदांत त्रसदस्यु, त्र्यरुण, त्रैवृष्ण, व अश्वमेध ( ५. २७, ४–६ ) हीं सर्व एकाच व्यक्तीचीं नांवें दिसतात. 'त्रैवृष्णत्रसदस्युश्च अश्वमेध इति त्रय ' असें बृहद्देवतेच्या पांचव्या अध्यायांतील १२ व्या श्लोकांत म्हटलें आहे या ठिकाणी उल्लेखिलेला अश्वमेध आणि ऋग्वेदाच्या आठव्या मंडळांत येणारा अश्वमेध यांचा पैतृक संबंध होता कीं काय हें सांगण्यास आश्वमेध शब्दाच्या व्युत्पत्तीशिवाय दुसरा आधार नाहीं. आश्वमेधाचें नांव पूतक्रतु असावें असें स्पष्ट दिसतें ( ८. ६८, १७ ).

ऋग्वेदेतर अनेक ग्रंथांत प्राचीन कालांतला प्रसिद्ध यज्ञ करणारा म्हणून त्रसदस्यु पौरुकुत्स्य* याचा पर आटणार, वीतहव्य श्रायस व *कक्षीवंत औशिज यांबरोबर उल्लेख आलेला आहे* ( तै. सं. ५. ६, ५, ३ काठ. स. २२. ३ ).

उपमश्रवस् ( १०. ३३, ४. ६–७ ).— सायणाचार्य उपमश्रवस् यास मित्रातिथीचा व कुरुश्रवण यास त्रसदस्यूचा पुत्र मानतात. मूळ ऋग्वेदांतील ऋचांत ' कुरुश्रवण त्रासदस्यवम् ' व ' उपमश्रव. नपात् मित्रातिथे· ' असे उल्लेख आले आहेत. ग्रिफिथ हा नपात् शब्दाचा अर्थ सायणाचार्यांप्रमाणेंच पुत्र असा करतो; परंतु त्रासदस्यव कुरुश्रवण म्हणजे त्रसदस्यूचा नातू कुरुश्रवण असें देतो. मॅकडोनेल हा नपात् याचा नातू असा अर्थ करून मित्रातिथीचा पुत्र कुरुश्रवण व कुरुश्रवणाचा पुत्र उपमश्रवस् असें नातें जोडतो. बृहद्देवतेप्रमाणें ( ७. ३५, ३६ ) कवष-*ऐलूष हा आजोबा मित्रातिथीच्या मृत्यूबद्दल उपमश्रवस् याचें* सान्त्वन करीत आहे. या कथेला कांहीं आधार आहे, पण गेल्डनर म्हणतो कीं कवष ऐलूष हा उपमश्रवस् याजकडून वाईट रीतीनें वागविला गेला व त्याला विहिरींत फेंकण्यांत आलें. तेथें त्यानें दयेकरितां पदर पसरला आहे. परंतु या कथेस काहींच आधार नाहीं.

**कवषस्याचा कुरुश्रवणाशीं संबंध.**— पुरुराजा कुरुश्रवण याचा कवषाशीं कांहीं संबंध होता काय हें पाहिलें पाहिजे. दाशराज्ञ युद्धांत इन्द्रानें द्रुह्युंबरोबर ज्यांनां जिंकलें त्यांपैकीं एक कवष आहे. त्याचेंच ' श्रुत ' हें विशेषण असावें असे ग्रिफिथ वगैरेंनें म्हणणें आहे. सायणहि ऋग्वेदांतल्या एका ऋचेवरील भाष्यांत ' श्रुत ' हें स्वतंत्र व्यक्तीचें नांव आहे असें मानितात.

' अध श्रुतं कवष ' ( ७. १८, १५ ). ही ती ऋचा होय. सदरील फक्त एकाच ठिकाणीं कवषाचा प्रत्यक्ष निर्देश आला आहे.

*' कवष ' यानें केलीं म्हणून ऋग्वेदांत प्रसिद्ध असलेलीं दहाव्या* मंडळांतील ३१, ३२ व ३३ हीं तीन सूक्तें आहेत. ३१ व्या सूक्ताच्या शेवटची ऋचा अशी आहेः—

उत कण्वं नृषदः पुत्रमाहुरुत श्यावो धनमादत्तवाजी।
प्रकृष्णाय रुशदपिन्वतोधर्ऋतमत्र नकिरस्मा अपीपेद्।

आणि कण्वाला नृषदाचा पुत्र असें म्हणतात. अन्नयुक्त काळ्या कण्वास ( हि ) धन मिळालें. या नार्षद कण्वालाहि ( अग्नीकडून ) तेजस्वी रूप मिळालें. कण्वाच्या यज्ञाची वृद्धि अग्निशिवाय कोणींहि केली नाहीं

बत्तिसाव्या सूक्तांतल्या शेवटच्या ऋचेवरून सूक्तकर्ता ( कवष ) हा कुरुश्रवणाचा उपाध्याय होता असें दिसतें. ती ऋचा अशी –

एतानि भद्रा कलश क्रियाम
कुरु श्रवण ददतो मघानि ॥
दान इद्वो मघवानः सो अस्त्व-
यं च सोमो हृदि यं बिभर्मि ॥
( १०. ३२, ९ ).

हे सघना कुरुश्रवणा, धन देणाऱ्या तुम्हाकरितां आम्हीं हीं कल्याणकारक कर्मे करीत आहोंत. हे स्तोतेहो, तो इन्द्र तुम्हांला दाता होवो. हा सोम ज्याला मी हृदयांत धारण करतों तो तुम्हाला दाता होवो.

---

* हा राजा आपला पुरोहित वृशजान ह्याला बरोबर घेऊन रथांत बसला असतां पुरोहित त्याचा रथ फार जोरानें चालवूं लागला, व त्यामुळें त्याजकडून एका ब्राह्मणाच्या मुलाची हत्या घडली. राजा पुरोहिताला म्हणाला, ' तू रथ हाकीत असतां मुलगा मेला त्यापक्षीं तूं हत्या केलीस' परंतु पुरोहित राजाला म्हणाला, 'रथ तुझा आहे त्यापक्षीं त्वां हत्या केलीस' याप्रमाणें दोघेजण आपसांत भांडत भांडत इक्ष्वाकु राजाला निवाडयास गेले. इक्ष्वाकु राजानें सांगितलें कीं, वृशजान रथ हांकीत होता त्यापक्षीं हत्या करणारा तोच होय. नंतर वृशजानानें वार्शसाम या नांवाचें स्तोत्र म्हणून मुलाला पुन्हा जिवंत केलें, तरी इक्ष्वाकु राजानें पक्षपात करून वृशजानालाच दोषी ठरविलें. या कारणास्तव इक्ष्वाकु राजाच्या घरांतून अग्नि नाहींसा झाला व घरांत स्वयंपाक वगैरे होणें बंद झालें, तेव्हां विचाराअन्तीं राजाला समजलें कीं वृशजानाला आपण दोषी ठरविल्यामुळें अग्नि निघून गेला आहे. नंतर राजा वृशजानाजवळ गेला व वृशजानानें पूर्ववत् वार्शसाम सूक्त म्हणून अग्नीचें तेज परत आणल्यामुळें राजाच्या येथील स्वयंपाक वगैरे सर्व व्यवहार पूर्ववत् सुरू झाले [ ऋ. ५ २, १. वरील भाष्यांत सायणांनीं उद्धृत केलेला शाट्यायन ब्राह्मणोक्त इतिहास ].

बृहद्देवता (५. १४) व ताण्ड्य ब्राह्मण यांमध्यें ही कथा थोड्याफार फरकानें दिली आहे. सायणाचार्यांनीं शाट्यायन ब्राह्मणांतील उतारा घेतला आहे परंतु या कथेचा ऋग्वेदांत संबंध जोडणें अशक्य आहे.

विरुद्ध पुराव्याच्या अभावीं वरील मतावरून ' कवष ' हा कुरुश्रवणाचा प्रतिनिधिभूत उपाध्याय होता असें दिसतें.

तेहेतिसाव्या सूक्तावरूनहि आपणास कुरुश्रवण आणि कवष यांचा संबंध दृढ करता येतो. तेथें खालीलप्रमाणे उल्लेख झाला आहे.

> कुरुश्रवणमावृणि राजानं त्रासदस्यवम्।
> मंहिष्ठं वाघतामृषिः ॥
> (१०. ३३, ४).

त्रसदस्यु पुत्र, राजा कुरुश्रवण याजजवळ ऋत्विजाकरितां मी येथें मागतों.

कुरुश्रवणावरील आपत्ति.— १ कुरुश्रवण याला मोठी दुःस्थिति प्राप्त झाली होती असें तेहेतिसाव्या सूक्ताच्या प्रारंभीच्या ऋचांवरून दिसतें. त्या ऋचा अशा —

> सं मा तपन्त्यभितः सपत्नीरिव पर्शवः।
> नि बाधते अमतिर्नग्नता जसुर्वेर्न वेवीयते मतिः ॥
> मूषो न शिश्ना व्यदन्ति माध्यः स्तोतारं ते शतक्रतो।
> सकृत्सु नो मघवन्निन्द्र मृळयाधा पितेव नो भव ॥
> (१० ३३, २ ३;).

'माझ्या बरगड्या सवतीप्रमाणे ( शत्रूंप्रमाणे ) मला चहूंकडून त्रास देत आहेत. दारिद्र्यामुळें येणारी दुर्बुद्धि, वस्त्राभाव आणि क्षणिता मला त्रास देते पश्वाप्रमाणें शत्रूंच्या भयानें माझें चित्त कंपायमान झालें आहे. हे इंद्रा, उंदीर ज्याप्रमाणें दोरे तोडतात त्याप्रमाणे मानसिक व्यथा मला सारख्या तोडतात. हे इंद्र आम्हांला सुख दे. पित्याप्रमाणें आमचे रक्षण करणारा हो.'

वरील सायणी अर्थांत पर्शवः याचा अर्थ बरगड्या असा केला आहे. परंतु पर्शु लोक मला चोहोंबाजूंनी त्रास देत आहेत असा अर्थ आम्ही जास्त सयुक्तिक समजतों.

यावरून कवषाचा यजमान कुरुश्रवण याला निकृष्टावस्था प्राप्त झाली होती असें दिसतें. दाशराज्ञयुद्धांतील कवष आणि सूक्तकार कवष हे एकच होते की काय, हें ठरविणें कठिण आहे क्षिमरचें म्हणणें पुढें दिलें आहे त्यावरून कुरु-क्रिवींशीं कवषाचा संबंध जोडतां येत असल्यास पहावा.

कुरुश्रवण व कुरु यांचा संबंध.–कुरुश्रवण या नांवांतील कुरु शब्दावरून कुरुश्रवणाचा व कुरूंचा कांहीं संबंध असावा असें म्हणण्यास जागा आहे ऋग्वेदांत कुरु वंशाचा उल्लेख नाहीं, एवढेच नव्हे, तर ' कुरु ' हें आज्ञार्थी क्रियापदहि फक्त दोनदांच आलें आहे व तेंहि दहाव्याच मंडळांत होय ( १०. ११, २; १० १४५, २ ).

कुरु वंशाचें स्मरण करून देणारे किंवा कुरूंशीं संबंध दाखविणारे असे शब्द ऋग्वेदांत फक्त दोनच आहेत. एक कुरुङ्ग आणि दुसरा कुरुश्रवण.

कुरुङ्ग शब्दाचा उल्लेख खालील प्रमाणे आला आहेः—

> स्थूरं राधः शताश्वं कुरुङ्गस्य दिविष्टिषु।
> राज्ञस्त्वेषस्य सुभगस्य रातिषु तुर्वशेष्वमन्महि ॥
> (८. ४, १९)

' त्या तेजस्वी आणि श्रेष्ठ अशा कुरुङ्ग राजाच्या यज्ञात लोकांत ( तुर्वशेषु ) जें श्रेष्ठ धन शंभर घोडे तें आम्हां मानले.

या मंत्राच्या व्याख्याप्रसंगीं यास्काचार्यांनें कुरुङ्ग शब्दाबद्दल, 'कुरुङ्गो राजा बभूव कुरुगमनाद्वा कुलगमनाद्वा कुरुः कृन्ततेः।' असा उल्लेख केला आहे कुरुङ्ग नावाचा राजा होता कुरूंचा वंशज होता म्हणून किंवा शत्रुकुलांना जिंकण्याकरिता जात असे म्हणून त्यास कुरुङ्ग असें म्हणत असावें. (कुरून् गच्छति) किंवा ' शत्रूंना छेदितो तो कुरु ' अशीहि कुरु शब्दाची व्युत्पत्ति देतां येते. यावरून कुरु वंशाची माहिती किती अपुरी आहे हें वाचकांस कळून येईल.

सूक्तकार कवष व दाशराज्ञयुद्धांत पडलेला कवष एकच काय.—निरुक्तकार यास्कानांहि त्याबद्दल निश्चय नाहीं हें त्याच्या दुहेरी लिहिण्यावरून दिसते. तथापि कुरुश्रवण येथील " कुरु ", शब्द पुरुकुत्स येथील " पुरु " शब्दाप्रमाणे कुरु वंशाचा बोधक होण्याचा संभव आहे. असो. ' कवष ' हा ' वैकर्ण ' नावाच्या संयुक्तजातींचा पुरोहित होता. त्या जातींत कुरु व क्रिवि लोकांचा समावेश होत असून कवष हा त्यांचा वकील होता असें कांहींचें म्हणणें आहे.

कवष हा पांच जातींचा उपाध्याय होता व कुरुश्रवणाच्या मुलानें त्याला वाईट रीतीनें वागविलें म्हणून त्यानें दहाव्या मंडळातील तेहेतिसावें सूक्त आपल्या राजाच्या क्रोधशमनार्थ केलें. ह्या सर्व मतांची अनुमानावर विशेष भिस्त असल्यामुळें पुरावा या नात्यानें त्याचा उपयोग बेताचाच आहे. कांहीं गोष्टी तर विचारार्हहि नाहींत.

कवष हा राजा होता व तो सुप्रसिद्ध होता असें, तो दाशराज्ञ युद्धांत होता व त्याला ' श्रुत ' हें विशेषण लावतां येण्यासारखें आहे यावरून म्हणतां येईल.

कवष ऐलूषाची कथा कौषीतकी व ऐतरेय ब्राह्मणांत दिली आहे. तो कवष आणि हा कवष एकच असणें शक्य आहे ( ज्ञानकोश विभाग २, पृष्ठ २२७ पहा ).

कवष सूक्तकार आणि दाशराज्ञ युद्धांत पडलेला कवष यांचें ऐक्य धरण्यास अडचण अशी आहे कीं, सुदासाशीं समकालीन राजा, पुरुकुत्स होता. त्या पुरुकुत्साचा मुलगा त्रसदस्यु. कुरुश्रवण हा त्रसदस्यूचा वंशज, तर कवष कुरुश्रवणाचा स्तुतिकर्ता कसा धरूं शकेल ? असो.

द्रुह्यु, अनु, पुरु, यदु व तुर्वश यांसंबंधीं विशेष जिज्ञासा वाटण्याचें कारण –दाशराज्ञयुद्धांत गुंतलेले द्रुह्यु, अनु, पुरु, यदु आणि तुर्वश, यांविषयीं दोन निरनिराळ्या कारणांनीं जिज्ञासा उत्पन्न होते एक कारण म्हटलें म्हणजे कुरूंचें भरताशीं दृढतर प्राचीन

वर्णिलेलें ऐक्य आणि दुसरें कारण या पाचांचा महाभारतांत एकत्र झालेला उल्लेख होय. या उल्लेखामध्यें या पांचांच्या संघांतून पुरूंस इतर चारांहून निराळे केलें आहे व दुसऱ्या अनेकांबरोबर त्याचें ऐक्य दाखविलें आहे.

पुरु, तृत्सु, भरत व कुरु, हे एकच लोक असावेत --पुरु, तृत्सु, भरत व कुरु हे सर्व वंश एक झाले असा ध्वनि ऋग्वेदांतून व इतर ग्रंथांतून निघतो. पण असेंहि झालें असेल कीं, हे सर्व वंश एकाच महावंशाच्या शाखा असतील. तृत्सु व पुरु एक असावेत. कां कीं, दिवोदासाला पुरु म्हटलें आहे, आणि दिवोदासाचा मुलगा सुदास याला भरत म्हटलें आहे. तेव्हा भरत आणि पुरु हे मूळचे एकच असावेत. दिवोदास हा जर तृत्सु असला तर पुरु आणि तृत्सु त्यामुळें एक ठरतील. दिवोदास हा तृत्सु असावा यास प्रमाण हें कीं, एक तर त्याचा मुलगा हा तृत्सु होता अगर भरत होता, आणि तृत्सु आणि भरत भिन्न होते कीं, एक होते हें सांगण्याम कठिण पडतें वसिष्ठ तृत्सूंचा पुरोहित म्हणविनो व भरताचाहि पुरोहित म्हणवितो. याशिवाय दिवोदासाच्या एका वंशजास प्रतर्दन म्हटलें आहे. आणि तृत्सूंस प्रतृद् असें वारंवार म्हटलें आहे. पण तेवढ्यावरूनच सिद्धि होईल असें नाहीं. जेता जिंकलेल्या प्रदेशाचें नाव किंवा पदव्या आपल्या मुलाबाळास देतो हें प्रिन्स ऑफ वेल्स यासारख्या अत्यंत परिचित उदाहरणावरून लक्षांत येईल.

कुरु आणि पुरु हे एक होते असें म्हणण्यास आधार कुरुश्रवण हा होय. याला त्रासदस्यव असें म्हटलें आहे. त्रसदस्यु हा पुरुकुलांतील असून पुरुकुत्साचा वंशज होता.

वरील विवेचनावरून पुरु, कुरु, भरत, आणि तृत्सु हे एकच लोक असावेत असें वाटतें. उत्तरकालीं नांवाची पालट झाली नसावी असें म्हणण्यास कारण दिवोदास अतिथिग्वास पुरु म्हटलें आहे. सुदासाच्या वंशजास जर पुरु म्हटलें असतें तर उत्तरकालीं भरत आपणांस पुरु म्हणवून घेऊं लागले असावे असें दिसेल

दाशराज्ञ युद्धविषयक ऋग्वेदांतील कथासूत्र --शिवाय हेंहि लक्षात ठेविलें पाहिजे कीं जेव्हां तुर्वयाणावरावर लढाई झाली तेव्हा आयु (पुरुरवस् याचा मुलगा) कुत्स (पुरु), दिवोदास (पुरु) हे एक होते म्हणजे ही पुरु व तुर्वयाण यांची लढाई होय. तुर्वयाण हे कदाचित् तुर्वश असणेंहि शक्य आहे. असें असल्यास स्पर्धा करणारीं दोन राष्ट्रें तुर्वश व पुरु हीं ठरतात.

पुरूस तुर्वयाणांनी अगोदर जिंकलें. कालांतरानें पुरु राष्ट्रसंघांतील एक राष्ट्र सुदासाच्या नेतृत्वाखालीं पुढें येऊन स्वातन्त्र्य स्थापितें झालें, आणि तुर्वशादि राष्ट्रांस जिंकितें झाले

या भांडणांत इतर पुरूंपैकी कांहींनी कांहीं प्रसंगीं सुदासास साहाय्य केले तर कांहींनीं कांहीं प्रसंगीं विरोध केला, असें कथासून आपणांस दिसून येते.

अन्वादि राष्ट्रपंचकासंबंधीं महाभारतांतील उल्लेख.--आतां भारतीय कथेकडे वळून महाभारतांत अनु, द्रुह्यु, यदु, तुर्वश, व पुरु या राष्ट्रपंचकाबद्दल काय उल्लेख आले आहेत तें पाहूं. महाभारतांत अदिति आणि कश्यप यांचीं उत्पत्ति सांगून पुढें असें लिहिलें आहे:--

> अदित्यां कश्यपाद्विवस्वान् ।
> विवस्वतो मनुः ।
> मनोरिला इलाया पुरूरवा ।
> पुरूरवस आयुः ।
> आयुषो नहुषः ।
> नहुषस्य ययातिः ।
> ययातेर्द्वे भार्ये बभूवतुः ।
> उशनसो दुहिता देवयानी वृषपर्वणश्च दुहिता शर्मिष्ठा नाम ॥
> आदिपर्व, (९३ ४, ७).

> तत्र अनुवंशो यथा ।
> यदुं च तुर्वसुं चैव देवयानी व्यजायत ।
> द्रुह्युं चानुं च पूरुं च शर्मिष्ठा वार्षपर्वणी ॥

यदुतुर्वशांचा वंश -- महाभारतांत एवढाच उल्लेख आहे. यापेक्षा तेथे जास्त माहिती नाहीं यदु, द्रुह्यु वगैरे जे लोक ऋग्वेदांत सर्वपरिचित आहेत, त्यांचा हा उल्लेख असावा असें दिसतें. याचा संबंध दाखविणारी वंशावळ पुढें दिल्याप्रमाणें मांडतां येईल.

अदिति--कश्यप
|
विवस्वान्
|
मनु
|
इला
|
पुरूरवा
|
आयु
|
नहुष्
|
ययाति (दोन बायका)

(१ देवयानी): यदु, तुर्वश

(२ शर्मिष्ठा): द्रुह्यु, अनु, पुरु

या वंशावळींत पांडवांपर्यंत सर्व वंश क्रमानें दिला आहे. महाभारतांतील ह्या वंशावळीवरून यदुतुर्वशादि पंचजनांच्या पूर्वजांचें आपणांस ज्ञान होतें. प्रश्न एवढाच आहे कीं, भारतान्तर्गत यदुतुर्वश वगैरेंचा व वैदिक यदुतुर्वश वगैरेंचा संबंध काय? ते एक कीं भिन्न? हे एकच असें आपण समजलों तर काय हरकत आहे? या प्रश्नांचा आपण विचार करूं. प्रथम आपणास आपत्ति दिसते ती ही कीं महाभारतांत

ययातीचा वृत्तान्त सविस्तर आला आहे व पुरूरवस्, मनु वगैरेंची हकी गतीहि आली आहे, परंतु त्यांचेच जे अत्यंत पुढचे वंशधारक ' यदु-तुर्वश' वगैरे त्यांचा महाभारतांत पत्ताहि नाहीं सध्या आपण या प्राचीन वाङ्मयाचा कालानुक्रम जो स्वीकारतों त्याशीं हें अत्यंत विसदृश असे दिसतें आपल्या विचाराची अशी दिशा असते कीं वेद हे सर्व ब्राह्मण, पुराणें वगैरेपेक्षां प्राचीन वेदांत ज्या गोष्टींचा समावेश होईल त्या गोष्टी वेदपूर्वकालीन आणि भारतांतील भारतपूर्वकालीन व वेदोत्तरकालीन या कल्पनेस वरील वंशावळी वरून स्पष्ट बाध येतो कारण, वरील वंशावळींतील बहुतेक व्यक्तींचा ऋग्वेदांत स्पष्ट उल्लेख आहे देवयानी आणि शर्मिष्ठा यांचा मात्र तेथें उल्लेख नाहीं असे म्हणावें लागतें

वैदिक व्यक्तींत आणि त्याच नांवांच्या भारतकालीन व्यक्तींत कांहीं भेद असेल असें म्हणण्यास पुरावा नाहीं

वैदिक इतिहास लावण्याच्या कामीं भारतोक्त इतिहासाची मदत —' यावरून आपणांस थोडक्यांत असे म्हणतां येईल कीं भारतांत तत्कालीन हकीकतीपेक्षां अतिप्राचीन अशाहि कांहीं गोष्टींचा प्रसंगानें समावेश झाला आहे वैदिक इतिहासाचें पर्यालोचन करते प्रसंगीं आपणास त्या भारतोल्लिखित वेदपूर्वकालीन गोष्टी सविस्तर ध्यानांत घेऊन वैदिक व्यक्तींवर भारतोक्त इतिहासानें जास्त काय प्रकाश पडतो हें ध्यानांत घेतलें पाहिजे त्या दृष्टीनें या ठिकाणीं आपणांस यदुतुर्वशांची व त्यांच्या द्रुह्यु, अनु व पुरु ह्या बंधूंचा वरीच स्पष्ट माहिती मिळते व त्यांचा उल्लेख साहचर्यानें का येतो याचाहि निर्णय करतां येतो

पुरुवंश —आतां आपण ह्या पुरुवंशाच्या प्राचीन वंशावळींत वेद आणि भारत यांचा दुवा आपणांस कोठें जोडतां येतो तें पाहूं

त्याकरितां महाभारतांत आलेली ह्या कुलाची समग्र वंशावळ आपण डोळ्यांपुढें ठेवली पाहिजे यदुतुर्वशापर्यंत वंशावलि पूर्वीं दिली आहेच ययातिपुत्र तुर्वश, द्रुह्यु व अनु यांचा उल्लेख महाभारतांत केवळ नाममात्रानेंच आला आहे व यदूपासून यादव वंशाची उत्पत्ति झाली असल्या मोघम माहितीपेक्षां यदुविषयींहि आपणास फारच थोडें ठाऊक आहे पुरूचा वंश मात्र महाभारतांत विस्तारें करून वर्णिलेला आहे त्याची वंशावलि येणेंप्रमाणें:-







शन्तनु व ऋग्वेद —सदर वंशावली पाहतां असें दिसून येतें कीं भीष्माचा बाप जो शन्तनु त्याचाच उल्लेख ऋग्वेदांत असावा असें म्हणण्यास कथासाम्याचा आधार आहे भारतान्तर्गत शन्तनु आणि वैदिक शन्तनु यांत काय साम्य आहे तें आपण पाहूं पहिलें स्पष्ट साम्य म्हणजे देवापि आणि शन्तनु या दोन व्यक्ति महाभारतांत वंशबंधू म्हणून आल्या आहेत त्याचप्रमाणें त्यांची ऋग्वेदांतही एकत्र नावें आलीं आहेत ते भाऊ होते असें मानण्यास खुद्द ऋग्वेदांत सामीप्योच्चारणाशिवाय कांहीं अधिक पुरावा नाहीं

अर्थात् यासंबंधांत यास्क व सायण हे प्रमाण आहेत तथापि प्रथम ऋचांमधून काय काढतां येतें तें पाहिलें पाहिजे पहिलें नामसाम्य वर आलेंच आहे. आतां थोडें चरित्रसाम्य दाख

---

*ही खूण ज्यांवर आहे त्यांचा ऋग्वेदांत उल्लेख आहे § मुंबई प्रतींत परिश्रव्याच्याजागीं प्रतिश्रवा असून परिश्रव्यास प्रतीप व प्रतीपास देवापि आदिकरून तीन पुत्र झाले असें म्हटलें आहे (आदिपर्व, अध्याय ९५, श्लोक ३७१७ पहा )

विता येईल, महाभारतात देवापीनें बालपणींच, विरक्ति स्वीकारली आहे व ऋग्वेदातहि तो पुरोहितत्वानें आला आहे. त्याला पोषक असा दुसरा पुरावा म्हणजे तपश्चर्येनें देवापि ब्राह्मण झाला असें शल्यपर्वात ( अ. ४० मध्यें ) आलें आहे व आर्ष्टिषेणाचाहि तेथेंच उल्लेख आला आहे हेंहि महत्त्वाचे साम्य म्हणून स्वीकारण्यास हरकत नाहीं.

*शन्तनुवयास्क.*—आतां यास्कांनीं ( २. ११ ) दिलेली हकीगत हीहि देवापि व शन्तनु यांस जोडणारा पुरावा म्हणून, किंवा वैदिक स्वरूपापासून पौराणिक कथेपर्यंत जें कथारूपांतर झालें त्याच्या पायऱ्या म्हणून आपणांस घेतां येईल. यास्काचार्यांनी दिलेली माहिती पुढें दिल्याप्रमाणे आहे.

**देवापिश्चार्ष्टिषेण शन्तनुश्च कौरव्यौ भ्रातरौ बभूवतु । स शन्तनु कनीयानभिषेचयांचक्रे देवापिस्तप प्रतिपेदे । तत शन्तनो राज्ये द्वादश वर्षाणि देवो न ववर्ष । तमूचुर्ब्राह्मणा स्त्वया चरितो ज्येष्ठं भ्रातरमन्तरित्याभिषेचितं तस्मात्ते देवो न वर्षति । स शन्तनुर्देवापि शिशिक्ष राज्येन । तमुवाच देवापि पुरोहितस्ते ऽसानि याजयानि च त्वेति ।**

*अर्थ*:—आर्ष्टिषेणदेवापि आणि शन्तनु हे कुरुवंशातील दोघे भाऊ होते. धाकट्या शन्तनूला राज्याभिषेक झाला. देवापि तपाला गेला. त्यामुळें शन्तनूच्या राज्यावर बारा वर्षे अवर्षण पडलें. ब्राह्मण म्हणू लागले कीं थोरल्या भावास सोडून तुला राज्याभिषेक झाला म्हणून असें झालें. देवापीला शन्तनूनें राज्य दिलें. देवापि म्हणाला मी पुरोहित होतो आणि तुझ्याकडून यज्ञ करवितो.

*ऋग्वेदान्तर्गत व भारतान्तर्गत इतिहासाची सांखळी.*—निरुक्तातील ह्या वृत्तान्तांतून पुढें दिल्याप्रमाणें चार मुद्दे निघतात.

( १ ) देवापि व शन्तनु हे दोघे भाऊ होते.

( २ ) देवापि निरक्त होता.

( ३ ) म्हणून धाकटा शन्तनु गादीवर बसला;

( ४ ) व त्यामुळें पातक घडून अवर्षण पडलें. ह्यावरून यास्कांनाहि महाभारतातील प्रसिद्ध देवापि व शन्तनु आणि ऋग्वेदातील देवापि व शन्तनु हे एकच आहेत ही गोष्ट अभिमत होतीसें दिसतें. यास्कांचें म्हणणें बरोबर आहे असें गृहीत धरल्यास —व तसें गृहीत धरावें लागतें—या कथेच्या योगानें आपणांस ऋग्वेदान्तर्गत व महाभारतान्तर्गत इतिहासाची सांखळी जोडतां येते.

*विरुद्ध पुरावा.*—उपर्युक्त सांखळी जोडण्यास विरुद्ध पुरावा काय आहे त्याचा आतां आपण विचार करूं. सदरहु सांखळीवर घेता येण्यासारखे आक्षेप म्हटले म्हणजे

( १ ) ऋग्वेदांत भाऊ असा स्पष्ट उल्लेख नाहीं.

( २ ) वेदांत आर्ष्टिषेण हें पैतृक नाव आहे, त्याचा भारताशीं मेळ बसत नाहीं.

( ३ ) भाऊ उपाध्याय कसा.

यांचीं उत्तरें थोडक्यांत खालील प्रमाणे देतां येतील.

( १ ) भाऊ म्हणून उल्लेख नाहीं; तथापि, निरुक्तावरून आपणांस तसें घेतां येईल.

( २ ) वेदांत व निरुक्तात देवापि व शन्तनु यांस 'आर्ष्टिषेण' असें म्हटलें आहे व भारतांत परिश्रवस् प्रतीप हें शन्तनूच्या पित्याचें नाव आहे. वंशावळींत पूर्वी कोणाचेंहि ऋष्टिषेण हें नांव नाहीं. यावरून हें नाव कांहीं तरी विशेष कारणानें पडलें असावें, पैतृक नांव नसावें. निरुक्तकारांसहि या बाबतींत संशय असावा. त्यांनी 'ऋष्टिषेणस्य पुत्र इषितसेनस्येति वा ' असें म्हटलें आहे व सेना शब्दाचें विवरण 'सेश्वरा समान गति वा ' असे केलें आहे त्यावरून असें दिसतें कीं परिश्रव्यास जसें ' प्रतीप ' हें एक नाव होतें त्याप्रमाणेंच ऋष्टिषेण असें हि दुसरें टोपणनाव असावें. ' परिश्रव्याच्या पित्याचें भीमसेन असें नांव आहे, त्यावरून या गोष्टीस कांहीं विरोध येत नाहीं. येथें एक महत्त्वाची गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे कीं, आर्ष्टिषेण हें फक्त देवापीलाच विशेषण लावलें आहे, शन्तनूस लावलें नाहीं.

( ३ ) स्वत:च्या घरच्या गोष्टी स्वत: च कराव्यात व त्याहि स्वगृहातील ऋत्विज करण्याची सदासर्व चाल आहे. अर्थात् भाऊ पुरोहित म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं.

महाभारतातील वंशावळी वगैरे वस्तुस्थितीशीं धरून पूर्वापर विरोधरहित आहेत कीं नाहींत यावद्दल विचार तूर्त एका बाजूस ठेवून ' सिद्धस्य गतिश्चिन्तनीया ' या न्यायानें व्यवहार करण्याचें ठरवावें असें वाटतें, व त्या तन्हेनेंच आतापर्यंत विचार केला आहे.

यावरून राष्ट्रपंचकाचा इतिहास आपणास भारताशीं जोडतां येतो असें कांहीं अंशीं म्हणावयास हरकत नाहीं. आणखीहि कांहीं हकीगत महाभारतांत ( १ ७७ ) पहावयास सापडते. परंतु ती सध्यां आपणास महत्त्वाची नसल्यामुळें तिच्यावद्दल उहापोह करण्याचें कारण नाहीं.

*ऋग्वेद व ययाति शाप.*— तुर्वश हा ययातिपुत्र होता व त्याच्या अभिषेकाविषयीं ययातीचा कांहीं शाप ( १. ८४ ) होता. हा सर्व गोष्टी सायणाचार्यांना कबूल होत्या असें सायणभाष्यावरून दिसतें.

उत त्या तुर्वशायदू अस्नातारा शचीपति । इन्द्रो विद्वाँ अपारयत् । ( ४. ३०, १७ )

*अर्थ.*—सायणाप्रमाणें—तसेंच ययातिशापानें अनभिषिक्त राहिलेल्या त्या प्रसिद्ध तुर्वश व यदु राजांना कर्मांचा पालक जो इन्द्र त्यानें सर्व गोष्टी जाणून अभिषेकार्ह केलें.

यावरून ऋग्वेद व महाभारत यांची सांगड कशी घातली गेली होती हें समजतें.

*वैदिक साहित्याच्या द्वारें महाभारतोक्त इतिहासाची तपासणी.*— महाभारतांतील उल्लेखांची तपासणी वैदिक साहित्याच्या द्वारें करावयाची झाल्यास खालीलप्रमाणें शेरे मारता येतील.

भारतकारांनीं सर्वांत प्राचीन असा राजा पुरूरवा केला आहे. हा देखील मनु व इला यांचा वंशज म्हणून दिला आहे. याला शतपथ ब्राह्मणात ( ११.५,१ ) ऐल हें विशेषण लावलें आहे एवढाच आधार आहे. आयु हा त्याचा मुलगा होता याला वेदांत आधार नाहीं. आयूचा मुलगा नहुष या विधानालाहि वेदांत आधार नाहीं. नहुषाचा मुलगा ययाति यास वेदात आधार आहे. ययातीचे पांच राष्ट्रसंस्थापक मुलगे ही कल्पनाच आहे. यदुतुर्वशाचें अस्तित्व वैदिक आधारावरून ययातीच्या पूर्वींहि घालतां येईल.

*ययातीच्या नंतर भरतदौष्यन्तीपर्यंत जे राजे झाले म्हणून* महाभारत म्हणतें त्यापैकीं वेदांत कोणाचाच उल्लेख नाहीं. दौष्यन्ती भरतांचा उल्लेख ब्राह्मणात येतो. अजमीढ, संवरण देवापि, शंतनु व धार्तराष्ट्र हे पुढचे राजे म्हणून वर्णिलेले व राजपुत्र म्हणून वेदांत उल्लेखिले आहेत, पण त्यांचा असा संबंध जोडलेला नाहीं. *त्यांच्या दोन निराळ्या कथांमध्यें घोटाळा असावा.*

ऋग्वेदांतील सूक्तावरून देवापि हा, ज्याला औलान हें नांव होतें त्या शंतनूकरितां यज्ञ करीत होता असें निश्चित दिसतें; पण हे दोघे भाऊ होते असें त्यावरून दिसत नाहीं व देवापि हा ब्राह्मण नव्हता तर क्षत्रिय होता ही गोष्ट ऋग्वेदावरून सिद्ध होत नाहीं. *सायण जो अर्थ करतो त्याला आधार त्यानें निरुक्ताचा घेतलेला* आहे. त्याचें असें मत आहे कीं, देवापि हा क्षत्रिय होता पण बृहस्पतीच्या कृपेनें त्याला पुरोहिताचें काम करतां आलें. ऋग्वेदांतील सूक्तावरून, क्षत्रियानें पुरोहिताचें काम करणें हें नेहमींच्या प्रचाराविरुद्ध होतें ही गोष्ट स्पष्ट दिसते.

कौरवांचा उल्लेख अगदींच नाहीं असें नाहीं. वैदिक वाङ्मयांत शांखायन सूत्राच्या कांहीं हस्तलिखितांत ( १२. १४, १ ) व अथर्ववेदांत ( २०. १२७, १ ) ज्याला कौरम म्हटलें आहे त्याचेंच कौरव हें दुसरें रूप आहे. आणि हा रुशम यांच्या मध्यें मोठा दाता होता असें दानस्तुतींत लिहिलें आहे. कुरूंचा क्रिवींशीं जसा संबंध जोडण्यांत येतो त्याप्रमाणें कृत्वन् नांवाचें एक राष्ट्र होतें असें समजून त्याशींहि जोडण्यांत आला आहे. ऋग्वेदांत एका ठिकाणीं कृत्वन् हा शब्द अनेक वचनांत आर्जीक आणि पांच लोक यांच्या बरोबर लिहिला आहे. पिशेल म्हणतो कीं त्याचा अर्थ लोक असा आहे; आणि सायण म्हणतो कीं कृत्वन् हें एका देशाचें नांव आहे, या दृष्टीनें हें नांव कुरु अथवा क्रिवि यांच्याशीं संबंध दाखवील. तथापि हिलेब्रँट म्हणतो कीं, हें आर्जीक हाचें विशेषण आहे आणि त्यांच्या प्रतिपक्षानें त्यांना तें जादूगार अशा अर्थानें लाविलें आहे. या त्याच्या मताला दुजोरा म्हणून, तो असा पुरावा देतो कीं, काश्मिरी लोकांना आसपासचे राजे इतक्या तिरस्कारानें लेखीत असत कीं त्यांच्याशीं कोणत्याहि तऱ्हेचा मित्रसंबंध ते ठेवीत नसत आणि त्यांचें नांव त्यांनीं किलितो ( Ki. li. to ) अथवा कृत्यः असें ठेविलें होतें*.

( तो म्हणतो कीं, जुन्या काळीं काश्मिरांत ज्या आर्जीकांनीं वस्ती केली त्याची आणि नंतरचे वास करणारे त्याचे वंशज ह्यांचीहि हीच अपकीर्ति होती. )

उपर्युक्त कृत्वन्संबंधीं ऋग्वेदांत पुढें दिल्याप्रमाणें उल्लेख आला आहेः—

य आर्जिकेषु कृत्वसु ये मध्येपस्त्यानाम्। ये वा जनेषु पञ्चसु
( ९, ६२, २२ )

आर्जीक देशांतील लोक, कृत्वन् देशांतील लोक, सरस्वत्यादि नद्यांच्या समीप असणाऱ्या देशांतील लोक आणि निषाद व चातुर्वर्ण्यांतील म्हणजे या पांच जातींतील लोक जे सोमरस पितात ( ते सोमरस आमच्यावर आकाशातून पर्जन्यवृष्टि करवोत )—सायण.

आर्जीक लोकांत, उद्योगी माणसांत, मनुष्यांच्या घरांत किंवा पांच जातींच्या लोकांत ( पिळले जाणारे सोमबिन्दु आमच्यावर आकाशातून पर्जन्यवृष्टि करोत )—ग्रिफिथ.

अनुः—आतां आपण दाशराज्ञ युद्धांतील सुदासाच्या इतर मुख्य शत्रूंकडे वळूं. मागें दिलेल्या ७. १८ या सूक्तांतील उल्लेखांशिवाय ऋग्वेदांत अनूंविषयीं जे उल्लेख सांपडतात ते येणेंप्रमाणेः

अनयस्ते रथमश्वाय तक्षन् त्वष्टा वज्रं पुरुहूत द्युमंतं।
ब्रह्माण इन्द्रं महयन्तो अर्कैरवर्धयन्नहये हन्तवा उ॥
( ५. ३१, ४ )

हे इन्द्रा तुझा रथ अनूंनीं तासून तयार केला. त्वष्टा तुझें वज्र दीप्तिमान् करता झाला. आणि इन्द्राला स्तवणारे थोर ऋषी ( अङ्गिरस ) किंवा मरुत अहीला मारण्याकरितां स्तोत्रांनीं तुला उत्साहयुक्त करते झाले—सायण.

यदिन्द्र प्रागपागुदङ् न्यग्वा हूयसे नृभिः।
सिमा पुरू नृषूतो अस्यानवेसि प्रशर्ध तुर्वशे।
( ८.४.१ ).

हे इन्द्रा, सर्व दिशांनीं स्तोत्यांकडून तूं बोलावला जातोस. तथापि हे श्रेष्ठा, हे पराभव करणाऱ्या, स्तोत्यांकडून अनूविषयीं विशेष प्रेरणा केला जातोस—सायण.

यई राजानावृतुथा विदधद्रजसो मित्रो वरुणश्चिकेतत्।
गम्भीराय रक्षसे हेतिमस्य द्रोघाय चिद्वचस आनवाय॥
( ६. ६२. ९ )

जो मनुष्य सर्व लोकांचे राजे असणारे जे ( दोन ) अश्विनीकुमार त्यांची प्रत्येक ऋतूंत सेवा करतो, त्याला मित्रावरुण देव जाणतात. त्यामुळे हा सेवा करणारा महाबलवान् असणाऱ्या राक्षसावर शस्त्र फेंकतो, द्वेषमूलक अनूच्या भाषणाचा नाश करतो—सायण.

या उल्लेखांत जी काय माहिती मिळत असेल ती वाचकांनीं घ्यावी. ऋग्वेदांतील एका सूक्तांत ( ८. ३ ) उदार धनिक म्हणून ह्याचें वर्णन आलेलें आहे. लुडविग, ( ऋग्वेदाचें भाषांतर ३. १६० ) म्हणतो कीं 'अनु' हा त्याच नांवाच्या लोकांचा राजा असावा; पण त्याबद्दलचें कारण तो सांगत नाहीं.

---

* Cunningham, Ancient Geography of India, 93, cf Roth, St. Petersburg Dictionary S. V.

**भेद.**–भेदाविषयीं जी माहिती मागें येऊन गेली तीत भरणा म्हणून एक टीप देतों. याचा ऋग्वेदांत क्वचित् उल्लेख आहे, पण अथर्ववेदांत त्याचें नांव येतें. त्याचा शेवट फार वाईट झाला. कारण, इन्द्रानें त्याजजवळ गाय (वशा) मागितली असतां त्यानें ती दिली नाहीं. रोठ म्हणतोः§ कीं आर्यांचा भेद व यांत कांहीं संबंध नाहीं. परंतु ही गोष्ट शंकास्पद आहे. वस्तुतः हीच गोष्ट जास्त समजनीय दिसते कीं, याचा पराभव झाल्यामुळे दुष्ट मनुष्याच्या दुर्गतीचें हा उदाहरण मात्र झाला. शिवाय, ह्याचें धर्मलंडपणाचें वर्नन जे एवढें गाजलें आहे त्याचें कारण म्हटलें म्हणजे अनार्य अज व शिग्रु यांची कट घेऊन त्यांचें नेतृत्व यानें पत्करिलें हें होय.

आतां अज व शिग्रु हे अनार्य वन्यदैवतपूजक होते किंवा नाहीं याबद्दल निश्चित कांहींच माहिती नाहीं परंतु भेदाचा व त्यांचा संबंध आला होता.

**शंबरः**–ऋग्वेदामध्यें इंद्राच्या शत्रूचें हें नांव आलेले आहे ( १. ५१, ६; ५४, ४; ५९, ६; १०१, २; १०३, ८; ११२, १४; १३०, ७; २. १२, ११; १४, ६; १९, ६; ४. २६, ३; ३०, १४; ६. १८, ८; २६, ५; ३१, ४; ४३, १; ४७, २; २१. ७. १८, २०, ९९, ५, ). त्याचें नांव शुष्ण, पिप्रु व वर्चिन् ह्यांच्या बरोबर आलेले असून एके ठिकाणीं त्याला कुलितराचा मुलगा दास असें म्हटलेलें आहे ( ६. २६, ५. ). दुसऱ्या एका ठिकाणीं आपण देवरु ( जवळ जवळ देवाप्रमाणे ) झालों असें त्याला वाटल्याचा उल्लेख आलेला आहे (ऋ. ७ १८, २०;). त्याची ९० (ऋ. १. १३०, ७), ९९ (ऋ. २. १९, ६, ), किंवा १०० ( ऋ. २. १४, ६ ) नगरें होतीं असें वर्णन आहे. हा शंबर शब्दच नपुंसकलिंगी अनेक वचनी शंबराचे किल्ले अशा अर्थानें वापरला आहे ( ऋ. २. २४, २ ). त्याचा मुख्य शत्रु दिवोदास अतिथिग्व होय. कारण, ह्यानेंच इंद्राच्या मदतीनें त्याचा पराभव केला ( ऋ. १. ५१, ६; १३०, ७; २. १९, ६; ४. २६, ३ इत्यादि ). शंबर हा कोणी खरा पुरुष होऊन गेला कीं नाहीं ह्याबद्दल शंकाच आहे. हिलेब्रँटचें असें ठाम मत आहे की शंबर हा दिवोदासाच्या शत्रुवर्गांतील एक राजा होता. शंबराचा कोणत्या मंडळांत किती वेळ उल्लेख आला आहे याचा विचार करून त्यावरून तो असा निर्णय काढतो कीं, दिवोदासाच्या वेळच्या ऋग्वेदीय सूक्तांमध्यें तो खराखुरा शत्रु म्हणून समजलेला आहे; पण मागाहून झालेल्या ऋग्वाङ्मयांत उदाहरणार्थ, सातव्या मंडळांत त्याला राक्षस बनविले आहे * कारण, त्या वेळीं वैदिक काळचे आर्यन् लोक अॅरेकोशिया देश सोडून हिंदुस्थानांत आले होते. ही विचारसरणी जरी सोडून दिली, तरी हिंदुस्थानांतल्या डोंगरांत राहणाऱ्या लोकांचा हा नायक असून सुदासाचा शत्रु असावा हें शक्य आहे.

**वैकर्ण.**–हा शब्द ऋग्वेदामध्ये एकदां ( ७. १८, ११ ) दाशराज्ञाच्या वर्णनांत आलेला आहे व ह्या ठिकाणीं असें वर्णन आहे कीं, सुदासानें राजाच्या एकवीस जनांचा किंवा दोन वैकर्णांच्या लोकांचा पराभव केला. झिमरची अशी कल्पना आहे कीं हे लोक कुरु व क्रिवी मिळून झालेले संयुक्त लोक असावे.* ही कल्पना मॅक्डोनेलच्या मतें बरीच संभाव्य दिसते. महाभारतामध्यें ( ६. २१०५ ) विकर्ण हें एक प्रकारच्या लोकांचें नांव म्हणून आलेलें आहे व एका कोशकाराच्या मतें हे विकर्ण लोक काश्मिरांत रहात असत.‡ महाभारतांतील सदरहू उल्लेख बहुधा, काश्मिरांत पूर्वी कुरु लोकांची वसाहत असेल तिच्या आठवणीचा दर्शक दिसतो.

**दाशराज्ञ युद्धांतील सुदासाचे आणखी शत्रू.**–दाशराज्ञ युद्धांत ज्याचा समावेश झाला असावा असें कांहींचें म्हणणें आहे असे सुदासाचे आणखी शत्रू म्हटले म्हणजे ( १ ) यदु, ( २ ) मत्स्य, ( ३ ) पक्थ, ( ४ ) भलानस, ( ५ ) अलिन, ( ६ ) विषाणिन्, ( ७ ) अज, ( ८ ) शिव, ( ९ ) शिग्रु, व ( १० ) यक्षु हे होत.

यांपैकीं यदु हे महत्त्वाचे आहेत. त्याचें बरेंचसें वर्णन तुर्वशाबरोबर पूर्वी येऊन गेलेंच आहे. दाशराज्ञ युद्धाला जें नांव मिळालें आहे तें सुदासानें दहा राजाविरुद्ध लढून जय मिळविला या गोष्टीवरून मिळालें असावें असा समज आहे. परंतु दाशराज्ञ यांतील दश हा शब्द केवळ दहा हीच संख्या दर्शविण्याकरितां योजिलेला असेल असें दिसत नाहीं. कारण, सुदासाबरोबर ज्याचें युद्ध झाल्याचें वर्णन आपणांस ऋग्वेदांतील ऋचांत आढळतें त्यांची संख्या दहापेक्षां अधिक दिसते व त्या सर्वांचा पराभव एकाच ठिकाणीं व एकाच वेळीं झालेला दिसत नाहीं. यदुतुर्वशांचा देश व भेदाचें राज्य यांत बरेंच अंतर दिसतें व एक प्रदेश या स्वारीचा आरंभ दाखविते तर दुसरा त्या स्वारीचा शेवट दाखवितो. यावरून दहा ही संख्या केवळ एक ठोकळ आंकडा म्हणून दिलेला असावा. तसेंच, यदु, तुर्वश, अनु व द्रुह्यु हीं ज्याप्रमाणें बलिष्ठ व सुधारलेलीं राष्ट्रें दिसतात व इन्द्र, अश्विनौ इत्यादि देवतांची उपासना करतांना आढळतात, त्याप्रमाणें पक्थ, भलानस, विषाणिन्, अलीनस् व

§ St. Petersburg Dictionary सामवेद 13.

* शंबरासंबंधीं उल्लेख पहिल्या मंडळांत तीन वेळां, दुसऱ्यांत चार वेळां, चौथ्यांत दोनदां, सहाव्यांत सहादां व सातव्यांत दोनदां आले आहेत ह्या उल्लेखांवरुन पाहिले असतां इतर ठिकाणांपेक्षां सहाव्या मंडळांत खरेपणा अधिक दिसतो दुसऱ्या व सातव्या मंडळांतील उल्लेख काल्पनिक आहेत.

§ ऋ १. १३०, ७; ४. ३०, १४; ६. २६, ५; तुलनार्थ लुडविग, ऋग्वेदाचें भाषांतर ३, १७७, मॅक्डोनेल 'वेदिक मायथॉलॉजि' पृ. १६१; ओल्डेनबर्ग. Zeitschrift der Deutschen Morgenlandischen Gesellschaft, 42, 210; गेल्डनर, Rigweda, Glossar, 178 पहा.

* Zimmer, Altindisches Leben, 103.

‡ St. Petersburg Dictionary, S. V. Hopkins ( Jounal of the American Oriental Society, 13, 261 et seq. ) यास 'वैकर्णौ' शब्दानें दोन वैकर्ण राजे उल्लेखिलेले वाटतात

शिव यांच्या उपासनाविषयासंबंधानें भिन्नभिन्न माहिती मिळत नाही त्यांचा एक कूर असाही एवढें मात्र दिसतें कदाचित् त्यांना एकत्र होऊन सुदासास विरोध केला असावा त्याप्रमाणेंच भेद व त्याचे अनुचर, यक्षु शिग्रु व अज यांच्या संस्कृतीसंबंधानें निश्चित माहिती सापडत नाही

निरनिराळ्या काळीं सुदासाविरुद्ध असलेल्या ह्या लोकांसंबंधानें उतारे येथें प्रमाणें –

**आ पक्थासो भलानसो भनन्तालिनासो विषाणिनः शिवासः ।**
**आ योऽनयत्सधमा आर्यस्य गव्या तृत्सुभ्यो अजगन्युधा नॄन् ॥**
(७ १८, ७)

हवि शिजविणारे, भद्रमुख, तप करून देखील न श्रमलेले, हातात खानविण्याकरिता विषाण घेतलेले, ( जगताचें ) कल्याण करणारे व सोम पिऊन झिंगलेले असे जे लोक होते त्यांनीं आर्यांच्या गाईचे कपळ तृत्सूपासून युद्धात सोडविले व त्यांना ठार केलें–सायण

पक्थ, भलानस, अलिन, शिव, विषाणिन् हे बरोबर आले तथापि लूट आणि वीर यांच्या आवडीनें आर्यांचा सखा तृत्सूंचा नायक होण्याकरिता आला–ग्रिफिथ

**याभिः पक्थमवथो याभिरध्रिगुं याभिर्बभ्रुं विजोषसम् ।**
**ताभिर्नो मक्षू तूयमश्विना गतं भिषज्यतं यदातुरम् ॥**
(८ २२, १०)

हे अश्विदेव हो, राजा पक्थ, अध्रिगु आणि विशेष रीतीनें प्रसन्न करणारा बभ्रु यांचे ज्या स्तोत्रामुळें संरक्षण केलेंत त्याच स्तुतीनें रक्षणार्थ या ( व ) रोगयुक्तांना औषध द्या–सायण

( हे अश्विनानों ! ) तुम्हीं पक्थ, अध्रिगू आणि सोबत्यापासून अलग झालेल्या बभ्रूला ज्या साधनांनीं मदत केली तीं साधनें घेऊन तुम्ही येथें वेगानें व लवकर या व जें काहीं रोगग्रस्त झालें असेल तें बरें करा–ग्रिफिथ

**इदमित्था रौद्रं गूर्तवचा ब्रह्म क्रत्वा शच्यामन्तराजौ ।**
**क्राणा यदस्य पितरा मंहनेष्ठाः पर्षत्पक्थे अहन्ना सप्त होतॄन् ॥**
(१० ६१, १)

स्तोत्रकर्ता नाभानेदिष्ठ रुद्रस्तुत्यात्मक स्तोत्र अंगिरसांच्या सत्रामध्ये ( पित्याच्या सांगण्यावरून ) द्रव्यलालसा धरून पठन करता झाला ज्यारीतीनें द्रव्यप्राप्त्यर्थ आईबापांना व बाधवांनीं करून दिलेल्या ह्या स्तोत्रानें ( स्तोत्रसाधनानें ) सहाव्या दिवशीं ( यज्ञ समाप्तीच्या दिवशीं ) अंगिरसांच्या सत्रामध्ये येऊन होता, प्रशास्ता, ब्राह्मणाच्छंसी इत्यादि सप्त होत्यांना संतुष्ट करून यज्ञ पार पाडला–सायण

जेव्हां अतिशय उदार अशा देवानें ( इंद्रानें ) पक्थाकरिता त्याचे आईबाप संरक्षिले आणि सात होत्यांवर हल्ला केला तेव्हां स्वागतकर्त्यानें ( तुर्वयाणानें ) लढाईच्या धुमश्चक्रींत, अश्विनांना बळविण्याकरितां हें स्तोत्र मोठ्यानें गाइलें–ग्रिफिथ

**आवदिन्द्रं यमुना तृत्सवश्च प्रात्र भेदं सर्वताता मुषायत् ।**
**अजासश्च शिग्रवो यक्षवश्च बलिं शीर्षाणि जभ्रुरश्व्यानि ॥**
(७ १८ १९)

ह्या युद्धांत भेदाला ( सुदासानें ) नागविलें म्हणून यमुना नदी आणि तृत्सु लोक यांनीं त्याला संतुष्ट केले आणि अज, शिग्रु व यक्षु यांनीं घोड्यांचीं डोकीं नजर केलीं–सायण

यमुना आणि तृत्सु यांनीं इंद्राला मदत केली. तेथें त्यानें भेदाची सर्व संपत्ति घेऊन त्यास नागविलें अज, शिग्रु व यक्षु यांनी खंडणी म्हणून त्यास घोड्यांचा मुडका नजर केला—ग्रिफिथ.

दाशराज्ञ युद्धाचा कालनिश्चय –आतां आपण दाशराज्ञ युद्धाचा कालनिश्चय आपणांस करतां येतो काय हें पाहू

पहिला प्रश्न हें युद्ध किती कालपर्यंत चाललें असावें ? दिवोदासापासून सुदासापर्यंत चार पांच राजे मध्यें येऊन गेले असावेत असें पुराणांतील वंशावळीवरून पार्गिटेर म्हणतो या विधानास वेदांत आधार नाही दिवोदास हा सुदासाचा बापच असावा असा पुरावा पुष्कळ सापडतो हें युद्ध म्हणजे फार तर पन्नास वर्षे चाललें असावें.

या युद्धाशीं संबंध ज्यांचा येतो त्या पुरुषांच्या उल्लेखांच्या ऋचा वेदांत पुष्कळ आहेत युद्धाचा काल ठरविता आला तर वेदांतल्या पुष्कळशा ऋचांचा काल ठरवितां येईल

सुदासाचा महाभारतांत पत्ता नाहीं दिवोदास तीन दिसतात एक वध्र्यश्वाचा मुलगा त्याच्याशीं वेदांतील दिवोदासाची तुलना करतां येईल, पण हरिवंशपुराणकारांनीं ज्या राजमालिकेंत व ज्या स्थळीं दिवोदासास बसविलें आहे तेथें तो असणें शक्य नाही शिवाय यांच्या विजयाचा अगर लढायांचा पौराणिक प्रकारें पत्ताच नाही.

धार्तराष्ट्राचा उल्लेख कठसंहितेत येतो, व पारिक्षित जनमेजयाचा उल्लेख अथर्ववेदांत येतो पण हे दोन्ही काळ भाषादृष्टीनें व यजनधर्मविकासाच्या दृष्टीनें दूरचे आहे सुदासाला पौराणिकांनीं आणि त्यांचा अनुयायी पार्गिटेर यानें भारती युद्धाच्या अगोदर १३।१४ पिढ्या एवढेंच दूर ठेविलें आहे म्हणजे दाशराज्ञयुद्धाचा काल त्या मताप्रमाणें कुरुयुद्धापूर्वी ३५० वर्षें असावा

पौराणिकांची कल्पनासृष्टि –पूर्वगत विवेचनावरून प्राचीन कथा साहित्य घेऊन पौराणिकांनीं त्यावरून कल्पना कशा काय लढविली हें मात्र आपल्या चांगलें ध्यानात येतें

मनु हा पुराणपुरुष मनातच वागला आहे, पण त्यास पौराणिकांनी एकाद्या किंवा अनेक राजघराण्यांचा पूर्वज करून टाकलें आहे

पुरूरवस् ( = पौराणिक पुरूरवस् ) आपणास ऐल म्हणवीत असे याज्ञिकांच्या संप्रदायात इडा, उर्फ इळा, उर्फ इला ही देवता झाली तिला मनूची मुलगीच म्हटलें आहे पौराणिकांनीं इळेस खरोखरीची राजकन्याच बनविली आणि पुरूरव्यास तिचा मुलगा करून टाकलें

पुरूरवा हा खराखुरा राजा असावा का हा व्यक्ति कल्पना समुच्चयानें तयार झाली अगावी हें सांगता येत नाहीं जो राजा

स्वर्गातील एका अप्सरेचा नवरा झाला तो प्राचीनच असला पाहिजे. ऋग्वेदाविरुद्ध पुरुकुत्स आणि दिवोदास यांच्या काळीं लढणारा आयु याचा आणि पुरूरव्याचा पौराणिकांनी संबंध जोडून दिला, अर्थात् यामुळे या आयूस भरीच प्राचीनता आली. पांच राष्ट्रें ययातीपासून निर्माण करण्याच्या खटपटींत पौराणिकांनीं, वृषपर्वा आणि त्याचा गुरु शुक्र यांच्या मुलींचे भांडण, त्याचा पुढें ययातीशीं विवाह, इत्यादि कथा मूळ गोष्टीस जोडल्या. दौष्यंति भरत याच्या जन्माला दुष्यंतशकुंतलेची कथा जोडण्यांत आली. वगैरे अनेक कल्पनेचे प्रकार आपणास पुराणांत दिसून येतात.

दौष्यंति भरत हा वेदाप्रमाणें बराच उत्तरकालीन पुरुष दिसतो पण पुराणकालात तो प्राचीन पुरुष आहे. त्याच्या पूर्वी अनेक वर्षे दिवोदास-सुदास झाले असावेत असें धरल्यास, म्हणजे आयूशीं समकालीन दिवोदास सुदास धरल्यास-आपणांस कुरुयुद्धापूर्वी दीड एक हजार वर्षे मागे जावें लागेल. दाशराज्ञयुद्धाच्या कालनिश्चयाचा प्रश्न इतका असमाधानकारक स्थितींत आहे.

वेदकालीन सांस्कृतिक स्थिती बद्दल पुरावा.—वेदकालाची एकंदर सांस्कृतिक स्थिति कशी होती यावर पुरावा दोन प्रकारचा आहे. एक पुरावा म्हटला म्हणजे वेदांतील शब्द व वेदांतील उल्लेख आणि दुसरा पुरावा म्हटला म्हणजे महाभारतादि ग्रंथांतील प्राचीन इतिहास. याशिवाय तिसरा पुरावा आजच्या स्थितींत उपलब्ध नाहीं. पुराणवस्तुसंशोधनशास्त्राची मजल त्या कालापर्यंत पोंचली नाहीं.

मानववंशशास्त्र इतकें मुग्धावस्थेंत आहे कीं, भाषांचा संबंध शरीरस्वरूपाशीं निश्चितपणें लावतां येण्याइतकें तें वाढलें नाहीं. म्हणजे आजच्या लोकांच्या स्वरूपावरून प्राचीन काळाच्या इतिहासाशीं नातें जोडण्याची आज शक्यता नाहीं.

दाशराज्ञ युद्धासंबंधीं जमलेली माहिती.—दाशराज्ञयुद्धाचा येथपर्यंत जो ऊहापोह झाला त्यावरून एकंदर निष्पत्ति काय झाली हें आतां पाहूं.

जमलेल्या माहितीचे दोन विभाग करतां येतील. एक विभाग म्हटला म्हणजे दाशराज्ञयुद्धाचें ऐतिहासिक वृत्त-म्हणजे जे झालें असेल तें शोधून काढणें, आणि दुसरा विभाग म्हटला म्हणजे त्याचा ऋग्वाङ्मयाशीं संबंध.

दाशराज्ञ युद्धाचें ऐतिहासिक वृत्त.—वृत्त आपणांस येणेप्रमाणें दिसतें दिवोदास व सुदास हा एक पक्ष ज्यांत आहे असें युद्ध झालें होतें. तें युद्ध पुष्कळ वर्षे टिकलें असावें तें युद्ध ज्या पक्षांबरोबर झालें ते पक्ष निरनिराळ्या काळांत निरनिराळे असतील. एका वेळेस तुर्वश तर दुसऱ्या वेळेस यदुतुर्वश. हें युद्ध करतांना दिवोदाससुदासांनीं स्थानिक उपाध्याय किंवा पुरोहित आपल्याकडचे करून स्थानिक राजांचें उन्मूलन करावें अशी नीति आचरली असावी. ज्या वेळेस सुदास व दिवोदास आले त्या वेळेस ते आपणांस भरत म्हणवून घेत असतील किंवा नाहीं याविषयीं जरी खात्रीलायक विधान करतां येत नाहीं, तरी विश्वामित्र वसिष्ठाचा जेव्हां संबंध आला तेव्हां ते आपणांस भरत म्हणवून घेत होते हें खास.



ज्या वेळेस या पितापुत्रांची स्वारी हिंदुस्थानांत झाली त्या वेळेस पंजाबांत अग्न्युपासना असावी; पण ती गंगेच्या पूर्वेकडे होती किंवा नव्हती याविषयीं खात्रीलायक विधान करतां येत नाहीं.

सुदासाच्या शत्रूंचें म्हणजे स्थानिक राष्ट्रांचें व त्यांच्या चरित्राचें पृथक्करण करतां आपणास अनेक कुलें प्रस्थापित झालेलीं दिसतात पुरु, यदु, तुर्वश व अनु यांचें बस्तान चांगलेंच बसलेलें दिसतें. महाभारतांत वर्णन केलेलीं कुलें गंगेच्या पूर्वेकडे होतीं. त्यांची माहिती आर्चिक कवींस किंवा ग्रंथकारास पुढें झाली असावी यास अपवाद फक्त कीकटांचा होय. कीकट इन्द्राकरितां पायस देत नाहींत म्हणून विश्वामित्राची टीका केवळ कीकटांपुरतीच असावी, किंवा अनेक लोकांसंबंधानें सुद्धां तें विधान करतां आलें असतें, यासंबंधानें स्पष्ट आर्चिक उल्लेख नाहींत.

दाशराज्ञ युद्धाचा ऋग्वाङ्मयाशीं संबंध.—दाशराज्ञ युद्धाचा एकंदर ऋग्वाङ्मयाशीं संबंध येणेंप्रमाणें व्यक्त करतां येईल.

ऋग्वेदांत असें कोणतेंहि सूक्त नाहीं किंवा वृत्त नाहीं, कीं जें दाशराज्ञयुद्धापूर्वी निश्चयानें ठरवतां येईल.

ऋग्वेदांतील अनेक सूक्तें अशीं दिसतात कीं, ज्या सूक्तांच्या काळांत दाशराज्ञयुद्धकथा ही फार प्राचीन समजली गेली होती, आणि दिवोदास व सुदास या व्यक्ती ऐतिहासिक व्यक्तींच्या कोटींतून निघून पुराणपुरुषांच्या कोटींत जाऊन पडल्या होत्या. जेव्हां दिवोदासाकरितां किंवा सुदासाकरितां वृत्रादिकांचा संहार वर्णिला जातो, तेव्हां दिवोदास ही ऐतिहासिक व्यक्ति न राहतां पौराणिक व्यक्ति झाली होती असें म्हणण्यास हरकत नाहीं.

सुदास व दिवोदास यांशीं समकालीन असें वाङ्मय फारच थोडें आहे ऋग्वेदाचा बराचसा भाग ते होऊन गेल्यावर दोनचारशे वर्षांनंतर झाला असावा.

पुरूरवस्‌उर्वशीकथा व सरमापणीकथा.—दाशराज्ञयुद्धाबरोबर जोडावयाच्या दुसऱ्या कथा म्हटल्या म्हणजे, पुरूरवस्‌उर्वशी कथा व सरमापणीकथा या होत.

याविषयीं आपणास एवढेंच म्हणतां येईल कीं, या कथा देखील फार जुन्या आहेत, आणि यांच्या दाशराज्ञयुद्धविषयक पौर्वापर्यावर ऋग्वेद स्वतंत्र रीतीनें प्रकाश पाडूं शकत नाहीं जर गंधर्वांच्या चळवळीचें स्थान अफगाणिस्थान असेल, आयु हा पुरूरवस् व उर्वशी यांचा मुलगा हें पौराणिक विधान खरें असेल आणि दिवोदासाचा मित्र आणि तूर्वयाणाचा शत्रु आयु तोच पुरूरव्याचा मुलगा असेल, तर असें म्हणतां येईल कीं दाशराज्ञयुद्धाच्या आरंभापूर्वीच्या पांचपन्नास वर्षांपूर्वी पुरूरवा होऊन गेला असावा.

देवराष्ट्र आणि असुरराष्ट्र यांचा इतिहास देऊं पाहणारे संशोधक राजारामशास्त्री यांनीं असुर म्हणजे बाबिलोनियांतील लोक

आणि पणी म्हणजे फिनीशियन लोक अशी २० वर्षांपूर्वी कल्पना प्रगट केली. आजचें इतिहासज्ञान त्या कल्पनेच्या फारसें पुढें गेलें नाहीं

आर्य, दस्यु, दास व दाश राज्ञ युद्धविषयक उल्लेख — ऋग्वेदांतील आर्य, दस्यु, दास या सर्वांचा व दाशराज्ञयुद्धविषयक उल्लेखाचा परामर्श घेता, असें दिसतें कीं,

( १ ) दासकल्पना ही पर्शुभारतीयकालीन असावी दास हा अहि आहे, दस्यु हा अहि आहे, तो पाणी अडवितो, वगैरे उल्लेख ज्या काळांत उत्पन्न तयार झाली त्या काळचे सूचक आहेत त्याचा हिंदुस्थानांतील आर्यांच्या काल्पनिक स्वारीशीं संबंध नाहीं

( २ ) दाशराज्ञयुद्ध ऋग्वेदांतील बहुतेक भागाच्या पूर्वी कित्येक शतकें झालें असावें त्या युद्धाचा आर्यदासविरोधाशीं संबंध कांहीं नाहीं दाशराज्ञयुद्धाच्या अगोदर कित्येक शतकें किंवा सहस्रकें हिंदुस्थान आर्यन् भाषा बोलणाऱ्याकडून व्यापला गेला असावा म्हणजे हिंदुस्थानांतील आर्यन् लोकांच्या इतिहासांतील ऋग्वेद हा बराच उत्तरकालीन भाग होय

( ३ ) देशांत मंत्रकालांत चार वर्ण होतेच. परंतु त्यांना वर्ण हें नांव प्राप्त झालें नव्हते. वर्ण हा शब्द आर्य आणि दास यांतील भेद, म्हणजे संप्रदाय या अर्थानें वापरीत असत

---

## प्रकरण ५ वें.

### वेदकालांतील शब्दसृष्टि

ब्राह्मणवर्गाचा इतिहास देण्याची रीती — दाशराज्ञ युद्ध ही मनपाल सुरू होण्यापूर्वीची एक महत्त्वाची गोष्ट झाली हें पूर्वीच्या प्रकरणांत सविस्तरपणें स्पष्ट केलेंच आहे. ऋग्वेदांत ज्या व्यक्ती आणि जे उल्लेख सांपडतात त्यांचा दाशराज्ञ युद्धाशीं संबंध जोडतांना बराच परामर्श घेण्यांत आला आहे इतकीं पुष्कळ नांवें आपणास उपलब्ध झालीं त्यावरून युद्ध कोणांत झालें, युद्धस्वरूप कसें होतें, त्या काळचीं निरनिराळीं राष्ट्रें कोणतीं होतीं आणि त्या राष्ट्रांच्या चळवळीसंबंधानें आपणास काय माहिती मिळते इत्यादि हकीकत देण्यांत आली आहे हा साधारणतः क्षत्रिय वर्गाचा इतिहास झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं ब्राह्मण वर्गाचा इतिहास द्यावयाचा म्हणजे दोन तऱ्हांनीं देता येईल प्राचीन धर्माचा इतिहास देणें म्हणजे ब्राह्मण्याचा इतिहास देणें होय तो बहुतेक दुसऱ्या विभागांत येऊन गेलाच आहे यज्ञसंस्थेवाहेरच्या पारमार्थिक सरणी आणि विचार सामान्य हवनापासून सूत्रांत दृढ होणाऱ्या श्रौतस्मार्त धर्माचा म्हणजे यज्ञसंस्थेचा विकास हादि दुसऱ्या विभागांत सविस्तर वर्णन केलेला आहे हा ब्राह्मण्याचा इतिहास झाला तथापि ब्राह्मण म्हणून कांहीं माणसें धरून त्यांचा इतिहास देणें म्हणजे कुलें, गोत्रें यांचा इतिहास देणें हाय त्यापुढें आपणांस हें दाखविता येईल कीं बराचसा इतिहास मंत्रकालीन नसून, फार तर ब्राह्मणकालीन पण बहुतेकरून सूत्रकालीन आहे तिकडे वळण्यापूर्वी संहितावाङ्मयाचा निरोप घेतला पाहिजे संहिता वाङ्मयाकडे मधूनमधून बरें अवलोकन करावें लागणारच तथापि त्याचा इतिहासार्थ जितका उपयोग करतां येईल तितका स्थूलपणें करून घ्यावा आणि विशिष्ट संस्थेचा अगर ज्ञानाचा इतिहास देतांना मधूनमधून संहितेकडे दृष्टि वळवावी या प्रकारची मांडणीची पद्धति सोइस्कर पडते म्हणून ती अमलांत आणीत आहों.

शब्दसंग्रहाचें महत्त्व — प्राचीन काळच्या परिस्थितीचा इतिहास जितका सारस्यानें लिहितां येईल तितका लिहावा असें आपण मनांत आणलें आणि साहित्य शोधूं लागलो म्हणजे एक मोठें साहित्य पुढें दृष्टीस पडतें. तें साहित्य म्हटलें म्हणजे संहितांतर्गत शब्दसृष्टि होय या साहित्याचा परामर्शाचा उपयोग करून घेतल्याशिवाय पुढच्या कालाकडे वळणें म्हणजे प्रामाणिक पांडित्य नव्हे तसें करणें म्हणजे कठिण अभ्यास टाळून देऊन सहजोप लब्ध आणि अपर्याप्त अशा साहित्याच्या साहाय्यानें गप्पा मारणें झालें तसल्या प्रकारच्या मोहांत न पडता जे शक्य झालें ते परिश्रम करून त्याचें फल वाचकांपुढें ठेवलें आहे प्रत्येक वेदांतील शब्दांचें विषयानुसार वर्गीकरण केलें आहे. हे शब्द तत्कालीन किंवा तत्पूर्व संस्कृतीवर बराच प्रकाश पाडतात. निरनिराळ्या संहिता निरनिराळ्या काळीं झाल्या असल्या कारणानें प्रत्येक संहितेंतील शब्द निरनिराळे मांडले आहेत या शब्दांनीं जागा पुष्कळ अडविली आहे ही गोष्ट खरी, पण हे शब्द सर्व भावी भारतीय ऐतिहासिक संशोधनाचा पाया असल्यामुळें त्यास लागणारी जागा आम्ही निर्भय पणानें देत आहों

शब्दसंग्रहाची यादी देण्यापूर्वी वर्गीकरण पद्धतीचें स्वरूप थोडक्यांत सांगितलें पाहिजे प्रथम अनिश्चितार्थी व अनेकार्थी शब्दांची विल्हेवाट लावून उरलेल्या शब्दांचें वर्गीकरण केलें आहे प्रत्येक वेदांतले शब्द निरनिराळे मांडले आहेत प्रथम देवतासृष्टि घेतली आहे, मग अजीवसृष्टि, नंतर जीवसृष्टि आणि मग मानवी सृष्टि घेतली आहे

दैवतसृष्टीमध्यें देवतानामें, देवताविशेषणें, देवयोनि, असुर व स्वर्गविषयक शब्दांचा अंतर्भाव केला आहे

अजीवसृष्टीमध्यें पृथ्वी, ध्वनि, धातु, जमीन, उदक, उष्णता, गति, ग्रहनक्षत्रादि, संख्या, काल आणि स्थान इत्यादिवाचक शब्द घेतले आहेत

जीवसृष्टींत ( मानवेतर ) त वनस्पति, प्राणी, यांचा समावेश केला आहे.

मानवसृष्टीमध्यें मनुष्य, शरीरावयव, वैद्यक, अन्न, नातेंगोतें अवस्था, मनोविकार, उपासना, युद्ध, सार्वजनिक कामें, खेळ, गृह जाति कुळें व वंश, दास, सामाजिक, भाषा, पुण्य, पाप व प्रशस्य गुण, वस्त्रे भूषणें, वस्तु, व्यापार व कृषि, दळणवळण, वाद्यें कृषि, राजकीय, अभिचार, इतरकर्में इत्यादि विषयांतील शब्दांचा समावेश केला आहे।

निरनिराळ्या शब्दांवर अर्थबोधप्रद आणि इतिहाससूचक टीकाहि दिल्या आहेत. त्यांत भिन्नमतें पाहली आहेत.

### अनिश्चितार्थी शब्द [ ऋ ]

| | | |
|---|---|---|
| आकीम् | नकि: | माकि |
| आकृतम् | नकीम् | सुरम् |
| आहिक्म् | नुरम् | हिक्म् |

या शब्दाविषयीं निरुक्तकार 'नवोत्तराणि पदानि सर्वपद समाम्नानाय' असें भाष्य करून स्वस्थ बसतात. भाष्यकारांच्या स्पष्टीकरणाचा अर्थहि निश्चितपणें सांगणें कठिण आहे उपर्युक्त वचनाचा अर्थ असा करतां येईल कीं, उत्तर पद निरर्थक आहे. नुकंचा 'नु' हाच अर्थ करावा. त्याचप्रमाणे पादपूरणार्थ वापरलेल्या शब्दाप्रमाणें ( चवैतुहि प्रमाणें ) माकिः याचाहि मा एवढाच अर्थ घ्यावा. ( १. १४७, ५; ८. ५६, ११ ) यांत येणाऱ्या 'माकि:' शब्दाचा सायणांनीं 'मा' असाच अर्थ केला आहे. कदाचित् पदपाठकारांच्या दोषामुळें या शब्दांचें अस्तित्व उत्पन्न झालें असावें

### अनेकार्थी. [ ऋ. ]

यांतील अनेक शब्द अर्थानुसार अन्य सदराखालीं वर्णिले आहेत. त्यामुळें या शब्दावरील आवश्यक टीपा अन्यत्र सापडतील.

| | | |
|---|---|---|
| अक्षर (उदक, महत्, प्रणव, वर्ण, क्षयरहित, ब्रह्म) | आह ( कवि, लज्जारहित ) | क्षामन्, (पृथ्वी, तम्, पाप ) |
| अग्रु ( अंगुली, नदी, काचित स्त्री ) | इभ | गो ( गाय, किरण, उदक, पशु ) |
| अज | इळा | घोष ( ग्राम, गाय, स्तुति, ध्वनि ) |
| अजिर | उपमाति ( दान, उपमान) | द्वित् |
| अज्य | उशनक् ( दहन, क्रियापद ) | धरुण ( उदक, यज्ञ ) |
| अथरी ( भाल्याचें टोंक, हत्ती, स्त्री) | उशिज् | धुनि (पळणारी नदी, असुर, कप ) |
| अथर्वन् | ऊधस् ( कास, घोडा, मेघ, बैल ) | धेना ( धेनु, स्तुति) |
| अद्रि ( पर्वत, मेघ, वज्र ) | ऊर्ज ( उदक, बल, अन्न) | नद ( स्तोता, उत्पादक, हस्तपादादिछिन्न वृषभ) |
| अना ( प्राणरूप बल, अनेकवृक्ष, शकटयुक्त ) | ऋत ( सत, उदक, स्तोत्र, अन्न ) | नेवेद ( ज्ञाता ) |
| अभ्र | ऋभु ( सूर्यरश्मि, ऋषि, होतृविशेष) | नहुष (राजा, मनुष्य, बधक) |
| अमत्र ( पात्र ) | ओकस् ( गृह, स्थान, सैन्य ) | नामन् (नाम, उदक, अन्न ) |
| अमृत (अमरत्व, अन्न, उदक, सोम ) | कृश ( क्षीण, अल्प, दुर्ब ) | नाहुषी ( नहुष प्रजा) |
| अय ( लोह, सुवर्ण) | कृशानु ( अग्नि, सोमपाल ) | निर्ऋति ( देवता, भूमि, दुरा ) |
| अर्क | कोश ( कोशवद्वेष्टित-रथ, मध्यदेश, मेघ ) | निर्णिज् (पुरुषशरीर, रूप, पवित्र ) |
| आत ( देवता, आप, उदक ) | | पर्वत ( गिरि, मेघ, दगड, यजमान ) |
| आत्मन् ( आनंदस्वरूप, प्राण ) | | |
| आपन | | |

| | | |
|---|---|---|
| पुरु ( बहुप्रदेश, अव्यय, बहुधा ) | मना ( स्तोत्र, बुद्धि, मननीया ) | शिति ( तेज ) |
| पृक्ष ( अन्न, शक्तिज ) | मंतु ( मननीय, मन्यमान, सर्ववेत्ता ) | वृजन ( चोर, शत्रु, प्राणी, बल ) |
| प्रतीक ( रूप, अवयव, प्रमुख ) | याम ( गति, गमनसाधन, रथ ) | सप्तर्षि |
| प्रधि (चाकांतील अरे, भाव, बुद्धि ) | यामन् ( सग्राम, रथ, गति ) | सानुक |
| प्रपित्व ( प्राप्त, पूर्वाह्न, युद्ध, सन्निहित ) | योषणा ( स्तुति, देवता ) | सुपर्ण ( तेजस्वी, उर्वशी, सखी ) |
| प्रयस ( अन्न, प्रवाह, सुख ) | रस ( षड्रस, सोम, व्यय ) | स्वसर ( मार्ग, गृह, सूर्य, गोठा, धान्य, दिवस, निवासस्थान ) |
| प्रवण ( अंतरिक्ष, निम्न, भूतल ) | वर्ष्मन् ( उन्नतरूप-स्थल ) | स्वाहा ( स्वाहाकारेण युक्त, स्वाहाकृत, अभिविशेष ) |
| प्रसिति ( बंधन, जाळें, सेना ) | वार (वार, वाल, सर्वैवरणीय ) | हरित ( दिशा, नदी, सूर्याश्व ) |

### दुर्बोध शब्द [ अ. वे. ]

| | | |
|---|---|---|
| आदिलखी | जरितरोधाम | परिशास ( हरणाच्या पोळ्या कातड्यावर पाडलेले भोक ) |
| अपाष्ठ | तरस | मणदसर |
| इनु | तृष्टामा | ललामगु |
| कुभि | तौता | वन्नायनसाप्य |
| कुरुटिनी | त्सारि | सस्गृध |
| कुस | दग्धामि | सनाधतन्ध |
| कुसिन्ध | धाणिरा | |
| कृष्माद | नसुर | |
| कौशबिल | पद्य | |

या शब्दांचा अर्थ बरोबर लागत नाहीं याचें कारण पदपाठ चुकीचा असणें हें हि असेल बरेचसे शब्द खिलाच्या भागांतील आहेत, त्या भागांतील कांहीं सूक्तांचा पदपाठ नाहीं.

## दैवतसृष्टि.

### देवतानामें.

#### आदित्यनामें [ ऋ० ]

| | | |
|---|---|---|
| गो | नाक | स्वर |
| तुम्र | पृश्नि | |
| नभस् | विष्टप | |

#### उषानामें [ ऋ० ].

| | | |
|---|---|---|
| अपिजुवा ( प्रेरणा करणाऱ्या उषा ) किंवा रात्री | द्योतना | शुभ्रयामा |
| | पूर्वाह्न ( प्रातःकाळ ) | श्वेत्या |
| | प्रबुध् ( " ) | सुमात्री |
| अघ्नी | बहुला | सूनरी |
| अर्जुनी | भास्वती | सुहना |
| अह्ना | वाजिनी | सूनृतावरी |
| ओदती | वाजिनीवती | सूनृतावरी |
| चित्रामघा | त्रिगेर | |
| दक्षिणा | विभावरी | |

## वत्सराभिमानी प्रजापति [ वा. सं. ]

| | | |
|---|---|---|
| अधिपति | आपि | मुग्ध |
| अन्त्य | क्रतु | वसु |
| अहन् | निवेशिन् | स्वापि |
| अहर्पति | भुवनस्यपति | स्वाहापिज |
| आन्त्यायन | भौवन | |

## पुरुषमेधांतील देवता [ वा. सं. ]

| | | |
|---|---|---|
| अक्षराज | क्रोश | पृथिवी |
| अग्नि | क्षत्र | प्रमोद |
| अतिकुष्ट | क्षुद् | प्रकाम |
| अपर्न (दक्षिणाग्नि) | क्षेम | प्रजापति |
| अथर्वन् | गन्धर्वाप्सरस् | प्रज्ञान |
| अधर्म | गीत | प्रतिश्रुत्का |
| अनन्त | गुहा | प्रभा |
| अन्त | गेह | प्रमद |
| अन्तक | घोष | प्रमुद् |
| अन्तरिक्ष | चन्द्रमस् | प्रयुत् |
| अन्यतोरण्य | जव | प्रिय |
| अभूति | तपस् | बल |
| अय | तमस् | बीभत्सा |
| अराध्धि | तीर्थ | ब्रह्मविद्या |
| अरिष्टि | तुला | ब्रह्मन् |
| अम | तेज | भद्र |
| अवकृतिवध | त्रेत | भा |
| अवरस्पर | दिष्ट | भूति |
| अवार | दुष्कृत | भूमन् |
| अहन् | देवलोक | मनुष्यलोक |
| आक्रन्य | द्यु | मन्यु |
| आध्यक्ष | द्वापर | मरुत् |
| आनन्द | द्वार | मर्यादा |
| आर्ती | धर्म | महस् |
| आशिक्षा | धैर्य | माया |
| आस्कंद | नक्षत्र | मृत्यु |
| इदावत्सर | नड्वल | मेध |
| इद्वत्सर | नदी | मेधा |
| इयर्ता | नरिष्टा | यम |
| इर | नर्म | यातुधान |
| उत्कूल निकूल | नारक | यादस् |
| उत्साद | निर्ऋति | योग |
| उपशिक्षा | निष्कृति | रात्रि |
| उपस्थावर | नृत्त | वत्सर |
| ऋक्षीका | परिवत्सर | वन |
| ऋति | पर्वत | वपुस् |
| ऋभु | पवित्र | वर्ण |
| औपद्रष्ट्र | पश्चाद्दोष | वर्षिष्टनाक |
| कर्मन् | पाप्मन् | वर्षिष्ठायनक |
| काम | पार | वायु |
| कीलाल | पिशाच | विविक्ति |
| कृत | पुण्यपाप | विराम |
| क्रोध | पुष्टि | विभवभूत |
| वीर्य | श्रेयस् | साध्य |
| वैरहत्य | सज्ञान | सानु |
| वैशन्त | संवत्सर | सूर्य |
| व्यृद्धि | संशर | स्वन |
| शब्द | सगर ( अग्नि ) | स्वप्न |
| शरव्या | सान्धि | स्वर्गलोक |
| शालि | सरस् | हस |
| शुभ | सर्पदेवजन | हसकारिमानन्द |
| शोक | सर्वलोक | हेति |

## देवता विशेष [ ऋ० ]

| | | |
|---|---|---|
| अंश | इन्द्राकुत्स | ग्राहि |
| अकूपार | इन्द्राग्नी | गुंगू |
| अक्ष | इन्द्राणी | चंद्रमस् |
| अमायी | इन्द्रापर्वत | चमू |
| अग्नि | इन्द्रापूषन् | चरिष्णु |
| अग्निपर्जन्य | इन्द्राबृहस्पती | जातवेद |
| अग्नीषोम | इन्द्राब्रह्मणस्पती | ज्या |
| अघ्न्या | इन्द्रामरुत् | तनूनपात् |
| अङ्गिरस | इन्द्रावरुण | तार्क्ष्य |
| अजएकपात् | इन्द्राविष्णु | त्रातृ |
| अर्थय | इन्द्रासोम | त्र्यंबक |
| अथर्वाण | इषु | त्वष्टृ |
| अदिति | इषुधि | त्वाष्ट्र |
| अनुमति | इळा | दक्ष |
| अपान्नपात् | उर्वशी | दक्षिणा |
| अप्वन् | उलूखल | दधिक्रावन् |
| अप्सरस् | उलूखलमुसल | दध्यङ् |
| अभीषु | उषस् | दान |
| अरण्यानी | उषासानक्ता | दानु |
| अरपति | ऊर्जानी | दुन्दुभि |
| अरुस् | ऊर्जाहुती | देव |
| अर्धदेव | ऋत | देवजन |
| अर्यमा | ऋतक्ष | देवपत्नी |
| अश्वाजनी | ऋतु | देवीद्वार |
| अश्विन् | ऋभु | दैव्यहोतृ |
| अश्विनी | ऋभुक्ष | द्यावा |
| असु | ओषधि | द्यावाक्षामा |
| असुनीति | क | द्यावापृथिवी |
| अहन | कृत्या | द्यावाभूमी |
| अहि | कृशानु | द्रविणोद |
| अहिर्बुध्न्य | केशिन् | द्रुघण |
| आदितेयम् | क्रंदनु | धनु |
| आदित्य | क्रन्दसी | धेनु |
| आदित्या | क्षेत्रस्यपति | नक्तोषस् |
| आप | गन्धर्व | नराशंस |
| आर्त्नी | गान्धर्वी | नासत्य |
| इन्दु | गौ | निर्ऋत्य |
| इन्द्र | गौरी | निष्षिधी |
| इन्द्रनाराज्य | ग्ना | पथ्य |
| इन्द्रपत्नी | ग्रावन् | पतङ्ग |
| इन्द्रवायू | ग्रास्पति | पणि |

| | | |
|---|---|---|
| पथ्य | रश्मिणी | शयुं |
| पर्जन्य | राका | शकुनि |
| पर्वत | रात् | शक |
| पितु | रात्री | शची |
| पितृ | रुद्र | शचीपति |
| पिशाचि | रुद्रिय | शमीनहुषी |
| पुरंधी | रोदसी | शुनासीर |
| पुरुष | वनस्पति | श्येन |
| पुरूरवस् | वरुण | श्रद्धा |
| पूषन् | वरुणानी | सपत्नी |
| पृथिवी | वर्मन् | समिध् |
| पृथिवीद्यावा | वराही | समुद्र |
| पृश्नि | वसु | सरण्यू |
| प्रजापति | वसुपति | सरमा |
| बर्हिस् | वाचस् | सरस्वती |
| बृहद्दिवा | वाज | सरस्वान् |
| बृहस्पति | वाजिन् | सलिल |
| ब्रह्मणस्पति | वात | सविता |
| ब्राह्मण | वातापर्जन्य | सप्तर्षी |
| भग | वायु | साध्या |
| भानु | वास्तोष्पति | सिचि |
| भारती | विधातृ | सिनीवालि |
| भृगु | विपाट्छुतुद्री | सुपर्ण |
| मण्डूक | विभावरी | सुमेआपि |
| मनस् | विभ्वन् | सुषारथि |
| मनु | विवस्वान् | सूर |
| मन्यु | विश्वकर्मन् | सूर्य |
| मरुत् | विश्वानर | सूर्या |
| मर्क | विश्वेदेव | सूर्याचन्द्रमस् |
| मातरिश्वन् | विष्णु | सूर्यामारुत् |
| मार्तण्ड | वृषभ | सूर्यावसू |
| मित्र | वृषाकपायि | साम |
| मित्रावरुण | वृषाकपि | सोमापूषण |
| मृत्यु | वेधस् | सोमारुद्र |
| यम | वेन | सौम्य |
| यमी | वैवस्वत | स्वस्ति |
| यातुधान | वैश्वानर | स्वाहाकृति |
| यूप | श्री | हिरण्यगर्भ |
| रक्षस् | | |

' यः तेनोच्यते सा देवता ' या न्यायानें वरील संग्रह आहे. ही व्याख्या प्राचीन व सर्वसंमत आहे.

[ तै० सं० ]

यज्ञामध्ये लागणारे अनेक यज्ञसंभार, यज्ञीयपशु, यूपादि उपकरणें करावयासाठीं तोडावयाचे वृक्ष वगैरे वस्तूंची त्या त्या प्रसंगीं देवता समजून पूजा करावयाची असते. स्वाहा शब्द ज्यांच्या पुढें लावला जातो त्यांचाहि देवता म्हणून संग्रह करावयास पाहिजे ( तै. सं. का. ७ पहा ). परंतु विशेष देवतासंग्रहांत अशा देवतांचा संग्रह येथें केला नाही. मरुत्, गंधर्व, अप्सरा, पितर, रुद्र, रक्षस्, अवयवाभिमानी देवता, अग्नि दिशादिकांचे दूत, यांचीं सदरें स्वतंत्र केलीं आहेत. ज्यांच्या शेवटीं ' स्वाहा, नमः ' आहे अशांचा संग्रह करावयाचें म्हटल्यास स्थिरचर सर्व वस्तूंचा संग्रह करावयास पाहिजे या साठीं तसें केले नाहीं.

| | | |
|---|---|---|
| अहस्पति | तनूनपात् | मित्र |
| अकूपार | तिष्ये | मित्रावरुण |
| अग्नाविष्णू | त्र्य | मृत्यु |
| अग्नि | त्वष्टृ | मेध्य |
| अग्नीषोम | दक्ष | मेनका |
| अग्नीवरुण | दक्षक्रतु | मैत्राबार्हस्पत्य |
| अंगिरस् | दधिक्रा | यम |
| अथर्वन् | दधिक्रावन् | यमी |
| अदिति | दस्र | राका |
| अनुमति | दुर्गा | रुद्र |
| अनुराधा | देवीद्वार | रेवति |
| अप्सरा | द्यावापृथिवी | रोहिणी |
| अवा | द्युतान ( मरुत् ) | लक्ष्मी |
| अश्वालिक | द्रविणोदस् | लेक |
| अंबिका | धातृ | वरुण |
| अरमति | धुर् | वसतीवरी |
| अर्यमन् | धेना ( बृहस्पतीची स्त्री ) | वसु |
| अश्विन | | वाच् |
| आद्का ( प्राणाभिमानी देवता ) | नक्तोषासः | वायु |
| | नर | वास्तोष्पति |
| आदित्य | निमिष | विद्युत् |
| इडा | निर्ऋति | विधातृ |
| इन्द्रघोष | परमेष्ठिन् | विवस्वत् |
| इन्द्रापर्ण | पर्जन्य | विश्वकर्मन् |
| इन्द्राबृहस्पती | पवमान | विष्णु |
| इन्द्रावरुण | पुरुहूत | वृषाकपि |
| ईश | पुरूरवस् | शुक्र |
| उर्वशी | पूतभृत् | शुनासीर |
| उषा | पूषन् | सगर ( वायु ) |
| उषासानक्ता | पृथिवी | सद |
| क्रतु | प्रचेतस् | समुद्र ( वायु ) |
| ऋभु | प्रजापति | सरस्वती |
| ऐन्द्रवायव | प्राची | सलिल |
| औदुंबरी | प्रोष्ठपदा | सलेक ( आदित्यलोक ) |
| कद्रु | बृहस्पति | |
| कश्यप ( सूर्य ) | ब्रह्मणस्पति | सवितृ |
| कुहू | ब्रह्मन् | सिनीवालि |
| कृत्तिका | भग | सूर्य |
| क्षय | भर्ग | सूर्यपत्नी |
| क्षेत्रपति | भानु | सूर्याग्नी |
| ग्ना | भारती | सूर्याचन्द्रमस् |
| घर्म | भृगु | सोम |
| घृणि | माधिन् | सोमापूषन् |
| घोर | मरीचि | सोमारुद्र |
| चन्द्रमस् | मरुत् | सोमेन्द्र |
| चात्वाल | मरुत्वतीय | स्कभ |
| निष्ट्या | महानाम्नी | स्वस्ति |
| जातवेद | मार्त्ता | हविर्धान |

[ अथर्व सं.

अंश
अंशु
अकूपार
अक्ष
अग्नायी
अग्नाविष्णु
अग्नीषोम
अंगिरस्
अचल ( यमदूत )
अज
अजएकपात्
अथर्वन्
अदिति
अनडुह्
अन्वद्राण
अनुमति
अन्तक
अप
अपांनपात्
अप्य
अप्व
अप्सरस्
अरणी
अराति
अरायी ( पापदेवता )
अरुन्धती
अर्क
अर्काश्वमेध
अर्जुनि
अर्बुद
अर्बुदि
अर्यमन्
अश्विन्
अश्विनी
असमृक्गिल ( रुद्रगण )
असुनीति ( प्राणहर्तादेवता )
अस्तृत
अहि
अहिर्बुध्न्य
आञ्जन
आदित्य
आप्
आयु
आर्तव
आर्द्रा
आलिगी
आशा
आशापाल
आश्लेषा
आसा ( शा )( रोहिन् )
आस्तवनीय
इतरजन
इन्दु
इन्द्र
इन्द्रपत्नी
इन्द्रपुत्र
इन्द्रवायु
इन्द्राग्नी
इन्द्राणी
इन्द्रापूषन्
इन्द्रावरुण
इन्द्रासोम
इरावति
इला
ईशान
ईश्वर
उक्षाम
उच्छोचन ( यमदूत )
उदुंबल ( यमदूत )
उपद्वा
उपोह
उर्वशी
उलूखल
उलूखलमुसल
उषा
उषासानक्ता
ऊर्जा
ऋतावरी
ऋतु
ऋतुमति
ऋभु
एकवाद्या
एकाष्टका
ऐरावत
ऐलबकार ( मरुद्गण )
ऐलवकार ( मरुद्गण )
ओषधि
औक्षगन्धि
क
कल्याणी
कुक्षिल
कुबेर
कुम्भमुष्क
कुहू
कृत्तिका
कृत्या
केशवा
केशिन्
क्रव्याद्
खाल्स्य
गायत्री
गार्हपत्य
गुल्गुलु
गो
गोपायत्
ग्रह
ग्रा
ग्रावन्
ग्राहि
ग्रीष्म
ग्लौ
घर्म
घृताची
चण्ड
चन्द्र
चन्द्रमस्
चित्रा
जंगिड
जरा
जागृवि
जातवेद
जिघत्स्व
जूर्णि
तक्मन्
तक्षक
तनूनपात्
तरणि
तर्दपति ( उंदरांचा स्वामि )
ताबुव
तिरश्चिराजि
तुण्डिक
तैमात
तौविलिक
त्रायमाण
त्रितआप्त्य
त्रिसन्धि ( वज्राभिमानी देव )
त्वष्टृ
दाक्षिणा
दधिक्रावन्
दशाक्ष
दस्र
दिति
दिव्
देवया
देवपत्नी
देवमणि
देवासुर
देष्ट्री
द्यावापृथिवी
द्यावाभूमि
द्यु
द्रविणोदस्
द्विमूर्धन्
धरुण
धातृ
धिषण
धृतपति
धृतराष्ट्र
धृष्णु
नक्षत्र
नदी
नराशंस
नलदी
नवगत् ( उषा )
निर्ऋति
निर्जरायन
निलिंप
निष्टिग्र
निःसाल
न्यर्बुद
पतग
पथ्या
पर्जन्य ( वृष्टयभिमानीदेव )
पर्जन्यपत्नी
पर्णमणि
पर्वत
पवमान
पशुपति ( रुद्र )
पाप्मन्
पालित्य
पितृ
पिशाच
पीला
पुनर्वसु
पुरुष
पुष्टपति
पूरक
पूषन्
पृथिवी
पृदाकु
पृश्नि
पृश्निपर्णी
प्रचेतस्
प्रजापति
प्रतिबोध
प्रतिविष्यत्
प्रमोचन ( यमदूत )
प्रस्व
प्राची
फल्गुनि
बलास
बार्हत्साम
बृहस्पति
बोध
ब्रह्म
ब्रह्मचारी
ब्रह्मणस्पति
ब्रह्मन्
भग
भरणि
भव
भवारुद्र
भवाशर्व
भारती
भूत
भूतपति
भूम
भेषज
मघान्दि
मंगलिक
मणि
मण्डूक
मधुला
मन्यु
मरुत्
महादेव
महायम
महास्य ( रुद्रगण )
मही
मातरिश्वन्
माया
मास
मिति
मित्र
मित्रावरुण
मृगशिरस्
मृत्यु
मेखला
मोक
यज्ञ
यजमान
यजुष्
यक्ष
यम ( पितृणामधिपति )
यमी
यातुधान
यामिनी
रवि
राका
रात्रि
राहु
रुद्र
रेवती
रोहिणी
रोहित
लक्ष्मी
वघापति ( पतंगांचा स्वामी )
वनस्पति
वन्हि
वराह
वरुण
वरुणानी
वशाम
वसु
वाचस्पति
वाज
वाणी
वात
वातापर्जन्य
वायु
वास्तोष्पति
विधातृ
विभावरि
विलिगी
विवस्वत्
विश्वदेव
विश्वजित्
विश्वकर्मन्
विश्ववसु
विश्वानर
विष्णु
विस्कंध
वृश्चिक
वृषभ
वृषाकपायि
वृषाकपि
वेधस्
वेन ( सूर्य )
वैयाघ्र
वैराज
वैवस्वत
वैश्रवण
वैश्वानर
शक्र
शाल
शची
शचीपति

बृहदारण्यकोपनिषदांत ( ६. ३, १३ ) दहा प्रकारचीं धान्यें गांवांत असतात म्हणून म्हटलें आहे. तांदूळ, यव, तीळ, उडीद, मसूर, गहूं, कुळीथ इ० दिलेल्या सर्व ठिकाणीं ग्राम म्हणजे लोकसंघ असाच अर्थ आहे. ग्रामकाम म्हणजे गावाचा अधिकार असा अर्थी ते. संहितेंत व मैत्रायणी संहितेंत हा शब्द आलेला आहे ग्रामणी याचा अर्थ गावांतील पुढारी, किंवा अधिकारी ( पाटील ); पुढें श्रेष्ठ असा अर्थ आला ( श. ब्रा. ३. ४, १, ७ ) सूताच्या खालचा अधिकारी याला ग्रामणी असें म्हणत असत.

नार्मिणी.–ऋग्वेदांत 'पुर' म्हणजे किल्ला याचें हें विशेषण म्हणून आलेलें आहे. या शब्दावरून हें एका किल्ल्याचें विशेषनाम तरी असलें पाहिजे किंवा 'नर्मिन् अथवा नर्मिण् नांवाच्या एका राजाचा' असा अर्थानें तरी असावें.

पुर.—हा शब्द ऋग्वेद व तदुत्तर ग्रंथ यांमध्यें वारंवार आलेला असून त्याचा अर्थ तट, बळकट किल्ला किंवा मायेचें ठिकाण असा आहे. हे तट कांहीं प्रसंगीं बऱ्याच मोठ्या आकाराचे असले पाहिजेत. कारण एका तटाला पृथ्वी व उर्वी ( रुंद ) असें विशेषणें दिलेलीं आहेत. इतर ठिकाणीं 'अश्मन्मयी' म्हणजे दगडाचा बांधलेला किल्ला असें म्हटलेलें आहे. कधीं कधीं हीं माऱ्याचीं ठिकाणें आयसी म्हणजे लोखंडाचीं केलेलीं असत ( ऋ. १, ५८, ८ ). पण हे शब्द लाक्षणिक दिसतात. गोमती ( गाईंनीं युक्त ) किल्ल्याचा उल्लेख अथर्व. ८. ६, २३ मध्यें आलेला आहे व त्यावरून हा किल्ल्याचा उपयोग गाई ठेवण्याकडे होत असावा हें उघड दिसतें. शारदी ( पावसाळ्यांतले ) किल्ले दास लोकांच्या ताब्यांत असलेले म्हणून उल्लेख आलेला आहे. शंभर भिंती ( शतभुजी ) असलेल्या किल्ल्यांचाहि उल्लेख ( ऋ. १ १६६, ८, ७. १५, १४ ) आलेला आहे. यूरोपमधील मध्ययुगातील सरदार लोक जसे आपल्या तटबंदीच्या किल्ल्यांत कायमचे राहत असत तसे वैदिक काळीं लोक हा किल्ल्यांत राहत असत असें मानणें चुकीचें होईल. हे किल्ले म्हणजे हल्ला आला असतां बचावाच्या जागा होत. हा किल्ल्यांना दगडाचे मातीचे तट, मेढेकोट व खंदक असत. पिशेल व गेल्डनर हांचें उलट असें म्हणणें आहे कीं पूर्वी मिग्यस्थिनीझनें व पाली ग्रंथकारांनीं वर्णन केल्याप्रमाणें पाटलिपुत्र शहरासारखीं मेढेकोट व पुढें खंदक ह्यांनीं युक्त शहरें असत. हें शक्य आहे. पण याला स्पष्ट पुरावा नाहीं. शिवाय नगर हा शब्द बराच नंतर प्रचारांत आला ही गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे. वैदिक काळीं शहरांतील राहणी विशेष प्रचारांत येऊन प्रगत झाली होती असें दिसत नाहीं. महाभारतांत नगर, ग्राम, घोष हे शब्द आलेले आहेत. वैदिक वाङ्मयांत ग्राम ह्याच्या पलीकडे लोकांची फारशी मजल गेली नव्हती. हा ग्रामाचीं निरनिराळीं रूपें पुढें प्रचारांत आलीं असतील एवढेंच. संहिता व ब्राह्मण ग्रंथ ह्यांत किल्ल्याच्या वेढ्यांचा उल्लेख आलेला आहे. ऋग्वेदांत म्हटल्याप्रमाणें या वेढ्यांत अग्नीचा उपयोग होत असे.

वृजन.– रॉथच्या मतानें ऋग्वेदामध्यें कित्येक ठिकाणीं ह्याचा अर्थ नगर, वेरगेन ( जर्मन लोकांचें मार्क ) व त्याचे रहिवासी असा होतो. झिमरला हें मत ग्राह्य असून त्याच्या मतानें वृजनामध्यें सुरक्षित जागा ( क्षितिधुवा ) असा अर्थ अन्तर्भूत होतो. ही क्षितिधुवा म्हणजे एखादें ग्रामवासी अगर युद्धाकरितां एकीकृत झालेलें कुल ज्या जागेत सुरक्षिततेकरितां रहात असे ती जागा होय. गेल्डनर उलटपक्षीं वृजन ह्याचा जाळें असा शब्दशः अर्थ घेतो; व ह्या मूलार्थापासून पुढील अर्थ तो बसवितो. पण परंपरागत आलेलें मतच जास्त स्वाभाविक आहे.

कीकट.–प्रमगन्द ह्याच्या नेतृत्वाखालीं आणि इन्द्रभक्ताविरुद्ध असलेले असे हे लोक ऋग्वेदांत एके ठिकाणीं उल्लेखिलेले आहेत. यास्क म्हणतो कीं, हें एका देशाचें नांव होतें, आणि नंतर कीकट देशाला मगध म्हणूं लागले. म्हणून झिमर म्हणतो कीं, कीकट हे अनार्य लोक असून मगध देशांत रहात असत. वेबर म्हणतो कीं, हे लोक मगध देशांत वस्ती करून होते, परंतु ते आर्यच होते. परंतु इतर आर्यन् जाती आणि हे ह्यांच्यांत फरक होता. कारण ते नास्तिक मताचे असून बौद्ध धर्माचें मगध हें धर्मपीठ होतें. परंतु ही साम्यता संशयास्पद आहे; आणि ओल्डेनबर्ग आणि हिलेब्रँट ह्यांनाहि खात्री नाहीं. राजवाडे कीकटांस केकाडी समजतात आणि चांदोरकर तें म्हणणें ग्राह्य समजतात. आमच्या मतें आर्य आणि अनार्य याविषयींच्या उल्लेखांवरून आजकालच्या संशोधकांनीं त्यांस आर्यन् किंवा नॉनआर्यन् ठरविण्याच्या केलेल्या प्रयत्नास कवडीचीहि किंमत नाहीं.

गन्धारि.–ऋग्वेद आणि अथर्ववेद यांत गन्धारि नांवानें उल्लेखिलेल्या लोकांचें गन्धार हें मागाहूनचें नांव आहे. छांदोग्य उपनिषदांत गन्धार हे दूरचे म्हणून उल्लेखिलेले आहेत.

मगध.– ह्या लोकांचा वैदिक वाङ्मयांत वारंवार उल्लेख येतो. परंतु त्यांच्याबद्दल सर्वत्र तिरस्कार दाखविलेला आढळतो. हा शब्द जरी ऋग्वेदांत प्रत्यक्ष आढळत नाहीं, तरी तो अथर्ववेदांत सांपडतो. त्या ठिकाणीं गन्धारि व मूजवंत या उत्तरेकडील व अंग व मगध या पूर्वेकडील लोकांत ताप जावो अशी इच्छा प्रकट केली आहे. शिवाय यजुर्वेद संहितेंत पुरुषमेधप्रसंगीं दिलेल्या बळींच्या यादींत मागध किंवा मगधदेशीय मनुष्य याचा समावेश केला असून, अतिक्रुष्ट 'मोठा आवाज' (?) याला तो अर्पण केला आहे. शिवाय अथर्ववेदांतील व्रात्यस्तोमांत मागध हा व्रात्याचा मित्र मंत्र, हास्य, व चारी दिशांस दुमदुमविणारी गर्जना होता असें म्हटलें आहे. श्रौतसूत्रांत असा उल्लेख आहे कीं एखाद्या व्रात्याला जेव्हां आर्यमंडळांत घेत तेव्हां एखाद्या वाईट मागध ब्राह्मणास ( ब्रह्मबन्धु मगधदेशीय ) त्या व्रात्याचा विशिष्ट पोषाख देत असत. परंतु ही गोष्ट पंचविंशब्राह्मणांत आढळत नाहीं. उलट कधीं कधीं तेथें चांगले नांवलौकिक झालेले ब्राह्मण रहात असत असें दिसतें. कारण कौषीतकि आरण्यकांत मध्यम, ... 'मगधवासी' 'मगधदेशांत राहणारे' म्हणून दिलें ... र्ग माझ्या मतें हें अपवादात्मक दिसतें.

बौधायन व इतर सूत्रें, आणि तसेंच बहुधा ऐतरेय आरण्यक यात मगधाचा एक राष्ट्र म्हणून उल्लेख आला आहे. तेव्हां यावरून झिमरचें, यजुर्वेद व अथर्ववेद यातील मागध हें मगधदेशीय मनुष्य नसून वैश्य पुरुष व क्षत्रिय स्त्री यापासून झालेल्या मिश्र संततीचें वाचक असावें हें म्हणणें अप्रयोजक दिसतें. ही जातीची कल्पना एकदरीत शंकास्पद तर आहेच, पण निदान मागधासारख्या जातिवाचक नावाविषयीं स्पष्टीकरण देताना तरी मुळीच विचारात घेण्यालायक नाहीं. मागध हा पुढील काळात भाट म्हणून समजला जात असे, यात कांहीं विशेष नाहीं. कारण हा देश गाणाऱ्या लोकांचें मूलस्थान होता हें उघड होतें, व या देशांतील भाट दूर दूरच्या पश्चिम देशां जातहि असत. याच वर्गाला नंतरच्या प्रथात जात म्हणून संबोधू लागले, व नंतर याच्या मिश्र उत्पत्तीची कल्पना निघाली.

कीकट आणि मगध मूळचे एकच असल्यामुळें, ऋग्वेदात दिसून येणाऱ्या मगध लोकांविषयींच्या तिरस्काराचें कारण बहुधा मगधानीं ब्राह्मणी संस्कृतीचा लवकर स्वीकार केला नसावा या गोष्टींत असावें, असे ओल्डेनबर्गचें म्हणणें आहे व तें अगदीं शतपथ ब्राह्मणाला धरून आहे. कारण कोसल व विदेह हे सुद्धां बरेच दिवसपर्यंत पूर्णपणे ब्राह्मणी संस्कृतींत आले नव्हते, मग मगधाची तर गोष्ट राहोच. या स्थितीस वेबरच्या मतें आणखी दोन गोष्टी कारण झाल्या असल्या पाहिजेत एक मूळ रहिवाशांचें रक्त व दुसरी बौद्ध संप्रदायाचा उदय. हें दुसरें कारण यजुर्वेद किंवा अथर्ववेद याना लागू पडत नाहीं, परंतु त्या ऐवजीं जर ओल्डेनबर्गच्या मताप्रमाणें अर्धवट ब्राह्मणी संस्कृति हें कारण घातलें तर या म्हणण्याला कांहीं तरी महत्त्व देतां येईल. यापैकीं पहिलें कारणच जरी ओल्डेनबर्गला संशयास्पद वाटतें तरी तें मॅकडोनेल यास पूर्णपणें सयुक्तिक दिसतें पार्गिटेर तर असेंहि म्हणण्यास धजतो कीं, मगधात आर्यन् लोकावर पूर्वेकडील समुद्रांतून कांहीं लोकांनीं स्वारी केली, व त्याच लोकात हे मिसळून गेले. या म्हणण्याला जरी वेदांत आधार नाहीं तरी तें मॅकडोनेलच्या मतें कांहींसें युक्तिसिद्ध आहे कारण तो म्हणतो कीं, जसजसे पूर्वेकडे आर्यन् लोक जास्त जास्त शिरत चालले, तसतसें त्यांचें वर्चस्व मूळच्या रानटी जातींवर कमी कमी पडल्याचें आढळून येतें. आधुनिक मानववंशशास्त्राच्या दृष्टीनें पाहिलें असतां असे स्पष्ट सिद्ध होतें कीं, जसजसें पूर्वेकडे जावें तसतसें आर्यन् जातीशीं सादृश्य फार कमी कमी होत जातें, व त्यामुळें याबद्दल पार्गिटेरचें म्हणणें बरोबर असावेंसें वाटूं लागतें. परंतु असल्या प्रकारचा पुरावा हिंदुस्थानांतील मिश्र जातींविषयीं बोलतांना विशेष महत्त्वाचा नाहीं.

राजवाडे मगांना धारण करणारे ते मगध असा पतंजलीच्या आधारें मगध शब्द व्युत्पादितात. पण 'मग' म्हणजे पाप असें पतंजलीचें मत न स्वीकारतां 'मग' म्हणजे इराणी लोकांचे उपाध्याय-मगी नांवानें प्रसिद्ध असलेले लोक, असा घेऊन राजवाडे यांची मगध शब्दाची व्युत्पत्ति आम्हांस मान्य आहे. आम्ही मगांचें अस्तित्व हिंदुस्थानांत ऋग्वेदकालीं होतें आणि तें वैदिक लोक येण्यापूर्वीपासून असावें असें म्हणतों. असें म्हणण्याचें कारण आम्ही सविस्तर पूर्वी दिलेच आहे.

[८]उशीनर— ऐतरेय ब्राह्मणांत ( ८, १४ ) कुरुपंचाल, वश आणि उशीनर असे मध्यदेशात एके ठिकाणीं रहात असत असें म्हटलें आहे, कौषीतकि उपनिषदात देखील ( ४, १ ) उशीनर, कुरुपंचाल आणि वश हे एके ठिकाणीं रहात असत असा उल्लेख आहे. परंतु गोपथ ब्राह्मणात ( २, ९ ) उशीनर व वश हे उत्तरेकडचे होते असा उल्लेख आहे ऋग्वेदांत एके ठिकाणीं ( १०.५९,१०. ) राणी उशीनराणी हिच्या मंत्रांत उशीनर ह्याचा उल्लेख आहे. सायणानीं उशीनराणी याचा अर्थ एक औषधि असा केला आहे. कदाचित् ती त्या देशांत होणारी औषधि असेल झिमर म्हणतो कीं हे लोक पहिल्याने वायव्येकडच्या बाजूला रहात असत. त्याच्या मताला आधार म्हणजे ऋग्वेदांतील अनुक्रमणींत शिबि औशीनर याला एका ऋचेचा द्रष्टा मानला आहे. आणि हे शिबी सिंधु आणि चिनाब ह्या नद्यामध्यें राहात असत असें अलेक्झांडर याचे अनुयायी म्हणत हा होय पण हा पुरावा निर्णायक आहे असें म्हणतां येत नाहीं. कारण, महाभारतकालीं शिबी हे कुरुक्षेत्राच्या उत्तर दिशेला रहात असत, आणि वैदिक कालीं उशीनर हे मध्यदेशाहूनहि आणखी पश्चिमेकडे रहात असत असें गृहीत धरण्यास कांहींच पुरावा नाहीं.

[९]कुरुक्षेत्र–( कुरु ह्यांचा जमीन ) हें एक अति पवित्र स्थान मानिलें आहे यातून दृषद्वती, सरस्वती व आपया ह्या नद्या वहात असत तेथेंच शर्यणावत नावाचें सरोवर–शतपथ ब्राह्मणांतील अन्यत प्लक्ष –होते. पिशेलच्या मताप्रमाणें ऋग्वेदात कांहीं ठिकाणीं आलेला पस्त्या नावाचा ओढाहि कुरुक्षेत्रातच होता. तैत्तिरीय आरण्यकातील कुरुक्षेत्राची मर्यादा दक्षिणेस खाण्डव, उत्तरेस तूर्घ्न आणि पश्चिमेस परीणह अशी आहे. साधारणपणें सध्यांच्या सरहिन्द प्रान्ताचीहि तीच मर्यादा आहे

[१०]कोसल— प्राचीन वैदिक वाङ्मयात हें लोकांचें नांव म्हणून आललें नाहीं. आर्यसंस्कृतीच्या प्रसाराची शतपथ ब्राह्मणांत ( १. ४, १, १. ) जी कथा आहे तींत विदेघ माथव ह्याची प्रजा कोसल विदेह, हे कुरु–पंचाल ह्याच्या मागाहून ब्राह्मण संस्कृतीखालीं आले असा उल्लेख आहे आणि ह्याच ठिकाणीं सदानीरा ही दोन देशांची—कोसल व विदेह यांची—मर्यादा आहे असें वर्णिलें आहे शतपथ ब्राह्मणातच दुसऱ्या एका ठिकाणीं ( १३. ५, ४, ४ ) कौसल्य अथवा कोसल राजा पर आटणार हैरण्यनाभ ह्यानें एक अश्वमेध केला असें लिहिलें आहे शांखायन श्रौतसूत्रावरून ( १६ २९, ५. ) काशी आणि विदेह यांचा संबंध असावा असें दिसतें. वेबर म्हणतो कीं, विदेहाचा होता ( पुरोहित ) अश्वल याचा वंशज बहुतकरून आश्वलायन हा असावा व त्याला प्रश्नोपनिषदांत कोसल असें म्हटले आहे उत्तर आणि दक्षिण कोसल असा भेद वैदिक आणि बौद्ध वाङ्मयांत आढळत नाहीं.

कोसल हा देश गंगेच्या ईशान्येला असावा आणि तो सध्याचा अयोध्या प्रांतच असावा असें वाटतें. कोसल देश हा

क्रमंनरचनेपूर्वीच घडला गेला असून वेदोत्पादकांच्या परिचयाचा तो नंतर झाला असावा आणि दाशरथीराम हा ब्राह्मण जातीच्या विकासापूर्वीच—कदाचित् दाशराज्ञ युद्धा पूर्वीच—होऊन गेला असावा असें आमचें मत आहे.

खांडव.— तैत्तिरीय आरण्यकांत ( ५. १, १. ) कुरुक्षेत्राची ही एक मर्यादा आहे. महाभारतांतील खाण्डव वन आणि हें एकच आहे हें निर्विवाद आहे. पंचविंश ब्राह्मण आणि शाट्यायनक यांतहि हें नाव आहे.

जनपद.— हा शब्द ब्राह्मण ग्रंथात आलेला असून तेथें त्याचा अर्थ राजाच्या उलट लोक, व भूमि किंवा राज्य हे दोन्ही आहेत. जानपद या विशेषणानें राजाची प्रजा हा अर्थ सुद्धां ध्वनित होतो. ऐ. ब्रा. ८. १४. येथें सायणाचार्य जनपद म्हणजे ग्राम असा अर्थ करितात. हॉगच्या भाषांतरांत 'लोक' ( राजे नव्हत, ) असा अर्थ दिला आहे. तैत्तिरीय ब्राह्मणात ( २. ३, ९, ९. ) जनपद म्हणजे जनपदवासी असा अर्थ भाष्यात घेतला आहे. छांदोग्य ( ५. ११, ५. ) व बृहदारण्यक ( २. १, १८. ) या उपनिषदांत जनपद याचा देश असा अर्थ आहे.

[13] तुर्घ्न.— तैत्तिरीय आरण्यकात ( ५. १. ) कुरुक्षेत्राच्या उत्तरेकडील भाग म्हणून त्याचा उद्देश आलेला आहे. पण हा नक्की कोणत्या ठिकाणीं होता हें निश्चित नाहीं. हा देश होता की नाहीं याबद्दलच मुळीं शंका आहे.

[14] दक्षिणापथ.—( दक्षिणेकडील मार्ग ). याचा अर्थ दक्षिण देश असा असून हा शब्द मराठींत ज्याला आपण सध्या 'दक्खन' असें म्हणतों त्या महाराष्ट्रास लागू आहे. हा शब्द सुराष्ट्र शब्दाबरोबर बौधायन धर्मसूत्रकालापासून महाराष्ट्रास लावलेला सांपडतो. अशा तऱ्हेचा दुसरा शब्दसमूह म्हटला म्हणजे 'दक्षिणापदा' हा होय. हा शब्द ऋग्वेदामध्यें आलेला असून ज्या ठिकाणीं हद्दपार केलेला मनुष्य ( परावृज् ) हद्दपार केला असतां जातो त्या जागेला लावलेला आढळतो. तेव्हां, याचा अर्थ इतकाच कीं, आर्यावर्तापलीकडचा दक्षिणेकडील मुलुख. हा आर्यावर्ताची दक्षिणेकडील सीमा कौषीतकि उपनिषद्कालापर्यंत सुद्धां विंध्यादि पर्वत हीच गणली जात असे. दक्षिणापदा अशीं पदें पदपाठकार स्वीकारीत नाहींत; व सायणाचार्य यांचा अर्थहि निराळा करतात. परंतु ही हद्दपार केलेल्या लोकांनी पाठविण्याची जागा होती ही गोष्ट स्पष्ट आहे यांत शंका नाहीं. रामायणांतील रामाचें उदाहरणहि या दृष्टीनें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

[15] देश— हा शब्द उपनिषदांच्या व सूत्रग्रंथांच्या कालापर्यंत प्रचारांत आलेला नव्हता, तो फक्त एकदांच ऐतरेय ब्राह्मणाच्या शेवटच्या भागांत व वाजसनेयि संहितेच्या ( ३५.११ ) एका विशेष वाक्यविषयभूत मंत्रांत आलेला आहे. या मंत्रांत सरस्वतीला मिळणाऱ्या पांच नद्या आहेत असा उल्लेख आलेला आहे. या मंत्रावरून सरस्वती ही नदी म्हणजे सिंधूच होय असें जें मत कांहीं लोक प्रतिपादन करतात तें पूर्णपणें चुकीचें ठरतें. कारण या मंत्रांत 'देश' हा जो शब्द आलेला आहे त्यावरून असें दिसतें कीं, या मंत्राच्या द्रष्ट्याच्या मतानें सरस्वती नदी मध्यदेशांतच होती व यजुर्वेदांतील भूगोलविषयक पुरावाहि हेंच सिद्ध करतो.

भूभागाचा एक लहान भाग आणि मोठा भाग अशा दोन अर्थीं हा शब्द असून त्या दोनहि तऱ्हांनीं त्याचा उपयोग आहे. 'देशीय' या ठिकाणीं प्रान्त अशा अर्थाचा हा शब्द आहे. परंतु हें सर्व 'देश' शब्दावर रचलेले पाडिव आहे. पाच नद्या कोणत्या हें निश्चित होत नाहीं. उवटानें आपल्या भाष्यात पाच नद्यांचीं नावें दिलीं आहेत. पण तीं नावें निश्चित ठरवायाचीं आहेत. सिंधु आणि सरस्वती या भिन्न आहेत असें ठरणें योग्य होय आणि ऋग्वेदांतील नदीसूक्तावरूनहि सिंधु आणि सरस्वती भिन्न आहेत असें सिद्ध होतें.

[16] नीच्य:— (खालीं राहणारे.) हें पश्चिमेकडील कांहीं राष्ट्रांचें नाव आहे. ऐतरेय ब्राह्मणांतील ( ८. १४. ) या नीच्यांच्या उल्लेखावरून ते मध्यदेशांतील लोकांहून निराळे होते असें दिसतें. हे नीच्य लोक म्हणजे सिंधु नदी व पंजाब या प्रांतांतले लोक होत.

[17] पंचनद.—पाच नद्या असलेला, हें पंजाबचें नाव महाभारतकालापर्यंत कोठें आलेलें नाहीं. अलीकडील शोध पंजाब हें ऋग्वेदाचें घर ( म्हणजे ऋग्वेदाचा जन्म पंजाबांत झाला ) म्हणून त्याचें महत्त्व फार ही गोष्ट खोटी ठरवूं पहात आहेत. हॉपकिन्स, पिशेल, व गेल्डनर या विद्वान् लोकांनीं निरनिराळे मुद्दे मांडून असें सिद्ध केलें आहे कीं, ऋग्वेद निदान त्याचा बराचसा भाग—पूर्वेकडे म्हणजे मध्यदेशांत लिहिला गेला. हिलेब्रँटच्या मतानें ऋग्वेदाचा कांहीं भाग पंजाब किंवा ॲराकोशिया यांत, व बाकीचा भाग मध्यदेशांत लिहिला गेला. आम्हांस ऋग्वेद पंजाबांत रचला गेला हें म्हणणें चुकलें आहे असें वाटत नाहीं.

[18] परीणह.—अथर्ववेदामध्यें ( १९,४८,१ ) या शब्दाचा पेटी किंवा अशा तऱ्हेची एखादी वस्तु असा अर्थ आहे. पंचविंश ब्राह्मण, तैत्तिरीय आरण्यक व सूत्रग्रंथ यामध्यें आलेल्या व कुरुक्षेत्रांत असलेल्या एका स्थलाचें हें नांव आहे. अथर्व वेदाच्या पदपाठकारानें 'परिणहि' असें पद स्वीकारलें असून त्याचा गृह असा अर्थ घेतला आहे व त्याला आधार म्हणून तै. ब्रा. २, २,४,७ हें स्थल दिलें आहे. 'परिण' हें पद पहूं शकत नाहीं. तैत्तिरीय आरण्यकांत हा देशवाचक शब्द आहे असें उघड दिसतें. तो स्थलवाचक मानला तरी हरकत नाहीं; परंतु तें संशयास्पद आहे. लाट्यायन सूत्रांत 'परीणं नाम स्थली' असें स्पष्ट म्हटलें आहे. शांखायन सूत्रांत 'परिणहि' असेंच आहे.

[19] परिसारक --हें ऐतरेय ब्राह्मण (२,१९) यांत आलेल्या एका गोष्टीवरून सरस्वतीमुळे बनलेल्या एका बेटाचें नाव आहे असें निश्चित होतें.

[20] मद्र --या लोकांचा उल्लेख बृहदारण्यक या उपनिषदांत केला गेला आहे. काप्य पतंचल हा त्या वेळ त्यांच्यात रहात होता. त्याच्या 'औदीच्य मद्र' या शाखेचें नाव दुसरीकडे वैदिक वाङ्मयातहि आले आहे ऐतरेय ब्राह्मणात (८.१४,३) हे हिमालयाच्या पलीकडे (परेण हिमवन्तम्) व उत्तर कुरूंच्या जवळपास (म्हणजे झिमरच्या मताप्रमाणे बहुधा काश्मीरांत) राहणारे म्हणून उल्लेखिले आहेत. उपनिषदात आलेले मद्र लोक कुरूंच्या प्रमाणे बहुधा मध्यदेशात–कुरुक्षेत्रात रहात असावेत, असें मॅकडोनेल्ला वाटतें.

[21] मध्यदेश--(मधला देश) मानवधर्मशास्त्राप्रमाणे उत्तरेस हिमालय, दक्षिणेस विन्ध्य, पश्चिमेस विनशन आणि पूर्वेस प्रयाग (अलाहाबाद) असलेला हा प्रदेश (म्हणजे जेथें सरस्वती अरण्यांत गुप्त होते आणि गंगायमुनांचा संगम होतो तेथपर्यंत पूर्वसीमा असलेला प्रदेश) होय. त्याच ग्रंथात ब्रह्मर्षि देशात कुरुक्षेत्र, मत्स्यदेश, पंचाल देश व शूरसेनक देश यांचा व ब्रह्मावर्तांत सरस्वती व दृषद्वती यामधील अत्यंत पवित्र भूमीचा समावेश होतो म्हणून दिले आहे. बौधायन धर्मसूत्रांत आर्यावर्त हा प्रदेश विनशनाच्या पूर्वेस, कालक वनाच्या पश्चिमेस (कालक वन = काळें जंगल अथवा हरिद्वारजवळचें कनखल), हिमालयाच्या दक्षिणेस व पारियात्र अथवा पारिपात्र पर्वताच्या उत्तरेस आहे असें दिले आहे. शिवाय त्याच ग्रंथांत आणखी असेंहि म्हटले आहे कीं काहींच्या मताप्रमाणे हा प्रदेश यमुना व गंगा या नद्यांमधील होय, परंतु भाल्लवींच्या मताप्रमाणें ती सीमा नदी (बहुधा सरस्वती) व सूर्य जेथें उगवतो तो प्रदेश याच्यामधील आहे. मानवधर्मसूत्र व वसिष्ठ धर्मसूत्र याच्या अन्वयें आर्यावर्त हा देश विंध्य आणि हिमालय याच्यामधील होय असे दिसते. या दोन मर्यादा कौषीतकि उपनिषदात आलेल्या आहेत. मध्यदेश हा शब्द वैदिक नाहीं, परंतु ऐतरेय ब्राह्मणात (८,१४,३) या करितां 'ध्रुवमा प्रतिष्ठा दिश्' (मधला स्थापित देश–मधला पक्का कायमचा देश) असा प्रयोग केला आहे. या प्रदेशात कुरु, पंचाल, वश व उशीनर हे लोक राहतात म्हणून दिलें आहे. यापैकीं वश व उशीनर मागाहून अगदीं बेपत्ता झाले. मध्यदेश हा कुरु पंचालांचा देश होता व याच देशांत ब्राह्मणें व उत्तरकालीन संहितानत रचिले गेले. संहितीकरणेंहि येथेच झालीं असावीत. ह्याच्या पूर्वेस कोसल–विदेह असून पश्चिमेस ओसाड प्रदेश होता. शतपथ ब्राह्मण आणि ऐतरेय ब्राह्मण यांत पश्चिमेकडील जातींचा निंदेपूर्वक उल्लेख आला आहे. शिवाय कोसल व विदेह याचे ब्राह्मणत्वश्रेष्ठत्व येथें या.हलची कथाहि शतपथ ब्राह्मणांत दिलेली आहे.

बुल्हर असे म्हणतो कीं, पारियात्र पर्वत हा विंध्याद्रीचा एक भाग आहे व मध्यदेशाची पश्चिम मर्यादा प्रथम आदर्श पर्यंत ही असावी. कारण शतपथ ब्राह्मणाच्या एका पाठात व कुमारिल पंडिताच्या टीकेत 'प्रागादर्शनात्' असा पाठ असून 'अदर्शनात्' असा नाही. पाणिनीवरील महाभाष्यांत 'प्रागादर्शनात्' असें आहे. ह्रीस डेव्हिड्स व मॅक्समुल्लर वगैरेंनीं आर्य द्राविडयुद्धाच्या कल्पनेवर फिदा होऊन अशी एक विचित्र कल्पना पुढें मांडली आहे कीं, आर्यन् लोकांची एक टोळी चित्राळ व गिलजितच्या बाजूनें मध्यदेशात आली त्याच्या बरोबर स्त्रिया नसल्यामुळे त्यांनीं द्रविडस्त्रियांशीं लग्नें केलीं, व त्यापासून आर्यद्राविड जात उत्पन्न झाली. या कल्पनेस वैदिक वाङ्मयात आधार सापडणें अशक्य आहे वैदिक वाङ्मयात वैदिक लोक कोणत्या मार्गानें आले याचा उल्लेख नाहीं असें म्हणणे वेडगळपणाचें आहे. वरील कल्पना पुढें निघालेल्या पोटभाषांवरून बसविलेली आहे. ही कल्पना कोणत्याहि काळाला जुळेल अशी नाहीं.

[22] मरु.—(अनेकवचनीं) तैत्तिरीय आरण्यकांत हा कुरुक्षेत्राचा उत्कर म्हणून आला आहे. उत्कर म्हणजे वेदी खणल्यावर ती माती टाकण्याची जागा किंवा उकिरडा. कुरुक्षेत्र हा प्रदेश जर यज्ञातील वेदी कल्पिली तर मरुदेश हा त्या वेदीचा उत्कर होईल मारवाडास मरुदेश हें नाव उत्तरकालीन संस्कृत ग्रंथात स्पष्ट दिलेलें आहे.

[23] मष्णार.—हें एका जागेचें नाव आहे. ऐतरेय ब्राह्मणाप्रमाणे कुरु राजाला येथें जय मिळाला.

[24] वंग.—हें वंगालप्रांताचें नाव आहे, पण पूर्वकालीन वैदिक ग्रंथांत तें सापडत नाहीं. ऐतरेय आरण्यकात 'वंगावगधा' असा शब्द आला आहे. तो बहुधा वंग–मगधा या शब्दाचा अपपाठ असावा. वंग–मगधा. म्हणजे शेजारशेजारचे वंग व मागध लोक. बौधायन धर्मसूत्रामध्यें हा शब्द आलेला आहे. ऐ. आ. वरील भाष्यात सायणाचार्य वंग व अवगध हीं वृक्षांचीं नावें आहेत असें म्हणतात.

[25] विदर्भ --पूर्वकालीन वैदिक वाङ्मयात फक्त जैमिनीय उपनिषद् ब्राह्मणातच हें एका जागेचें नांव म्हणून आलेलें आहे. हा ठिकाणीं येथील माचलजातीचे कुत्रे वाघास ठार मारीत असा उल्लेख आलेला आहे. विदर्भ हाच वऱ्हाड प्रांत असावा असें पुष्कळ विद्वानांचें मत आहे.

[26] विदेह --हें एका लोकांचे नाव असून ब्राह्मण कालाच्या अगोदर तें कोठें आलेलें नाहीं शतपथ ब्राह्मणात विदेघ माथवाची जी कथा दिलेली आहे तिजवरून विदेहांत संस्कृति आली ती पश्चिमेकडील ब्राह्मण लोकांनीं आणली व विदेहाच्या पूर्वीच कोसल देश ब्राह्मण संस्कृतिमय झालेला होता असा जो जनप्रवाद आहे तो खरा असल्याचें दिसतें. विदेहांतल्या लोकांना पुढें जी प्रसिद्धि मिळाली तिचें कारण त्यांचा राजा जनक ह्याची संस्कृति होय. बृहदारण्यक उपनिषदात हा जनक राजा ब्रह्मविद्येचा प्रमुख पुरस्कर्ता होता असें म्हटलेलें आहे. कौषीतकि उपनिषदामध्यें विदेहाचा संबंध काशीच्या लोकांशी आलेला आहे. ऐतरेय ब्राह्मणात

निरनिराळ्या लोकांची जी यादी आलेली आहे तीमध्यें विदेह लोकांचें नांव वगळलेले आहे कारण कोसल व काशी लोकांबरोबर त्यांचा प्राच्य ( पूर्वेकडील ) लोकांमध्येंच अंतर्भाव होत असे. शांखायन श्रौतसूत्रामध्यें असे म्हटलें आहे कीं, काशि, कोसल व विदेह ह्या तीन राष्ट्रांपैकीं प्रत्येक राष्ट्राला एक 'जल जातुकर्ण्य' नांवाचा पुरोहित होता, व त्याच ग्रंथात दुसऱ्या एका ठिकाणीं विदेह लोकांचा राजा 'पर-आट्णार' व कोसल लोकांचा राजा हिरण्यनाभ ह्याच्या निकट संबंधाचे स्पष्टीकरण केलेले आहे शतपथ ब्राह्मणाप्रमाणें परआट्णार हा हिरण्यनाभाचा वंशज असून कोसल देशाचा राजा होता. पंचविंश ब्राह्मणात उल्लेखिलेला नमीसाप्य नांवाचा दुसरा एक विदेहाचा राजा होऊन गेला. यजुर्वेद संहितेमध्यें 'विदेहाच्या गायी' असा उल्लेख आलेला आहे. पण तैत्तिरीय संहितेवरील टीकाकार असें म्हणतो कीं, वैदेही हें गुणदर्शक विशेषण आहे व त्याचा अर्थ सुंदर शरीर असलेली ( विशिष्ट देहसंबंधिनी ) असा आहे. बौधायन श्रौतसूत्रामध्यें ब्राह्मणी संस्कृतीच्या लोकांत विदेह लोकांचें नांव आलेले आहे. कोसल व विदेह या देशाची मर्यादा सदानीरा म्हणजे अर्वाचीन गंडकी ( ग्रीक भूगोल वेत्ते हिला कोंडोचेटीज असें म्हणत असत ) ही नदी होती. ही नदी नेपाळमधून निघून पाटण्याच्या समोर गंगा नदीस मिळते. विदेह देश म्हणजे हल्लींचा जवळ जवळ तिरहुत देश होय

[a] नदी.— ऋग्वेदामध्यें व मागाहून झालेल्या ग्रंथात याचा अर्थ पाण्याचा प्रवाह असा आहे. नदीच्या पात्रात ज्या उथळ जागा (गाध) असतात त्यांचा, त्याचप्रमाणें नदीच्या पलीकडील तीराचा ( पाराचा ) व नदींतील घोड्याच्या स्नानाचा असे उल्लेख आलेले आहेत नद्यांचा पर्वताशी निकट संबंध दाखविलेला आढळून येतो. नदीपति ही पदवी समुद्राला किंवा त्याच्या पाण्याला एकदां दिलेली आहे. 'यथा सिन्धुर्नदीना' हें अथर्ववेदा ( १४, १, ४३ ) मधील वाक्य समुद्राच्या 'सरित्पति' या नांवाच्या ज्ञानाची साक्षी देत आहे.

+नाव्या.— ऋग्वेदामध्यें अनेक वेळां व मागाहून झालेल्या वाङ्मयांत होडीनें ओलांडण्यास योग्य अशी नदी या अर्थी हा शब्द आलेला आहे ( पा. सू. ४ ४, ९१ पहा ) तार्य असा अर्थाच फक्त हें नाव्य असे रूप होतें.

§रक्षणा.— हा शब्द स्त्रीलिंगी व अनेकवचनी असून ऋग्वेदाच्या एका ऋचेंत 'नदीचें पात्र' असा ह्याचा अर्थ आहे 'वक्षणा म्ह० कुशी' ( वालरा ) असा अर्थ सायणाचार्य वगैरे करितात. निघंटुकारानें मात्र नदी नामांत याचा पाठ केला आहे

[21] असिक्नी.—'काळी' हें ऋग्वेदांत एका नदीचें नाव आहे हिला नंतर चंद्रभागा म्हणूं लागले आणि ग्रीक लोक हिला अकेसिनीज म्हणत असत. आतां पंजाबांत जी चिनाब म्हणून नदी आहे ती हीच होय.

[22] आपया.—दृषद्वती आणि सरस्वती ह्यांच्यामध्यें या नदीच्या नांवाचा ऋग्वेदांत फक्त एकदांच उल्लेख आहे लुडविगच्या मताचा कल ही नदी आणि आपगा म्हणजे गंगा हा एकच होत असें म्हणण्याकडे आहे, परंतु झिमर म्हणतो कीं ती सरस्वती नदीची ठाणेश्वरावरून वाहणारी शाखा अथवा पश्चिमेकडील आधुनिक इंदमती असावी, व पिशेल म्हणतो कीं कुरुक्षेत्रावरून वाहणारी महाभारतांतील आपया नदी ती हीच असावी. येथें पुढें दिल्याप्रमाणें एक विशेष कल्पना करणें शक्य व युक्त आहे. कीं सध्यां सरस्वती गुप्त म्हणजे जलरहित आहे असें म्हणतात त्याचप्रमाणें ऋग्वेदकालींहि मानण्याची पद्धति असावी असें अनुमान काढण्यास या पदाचा विशेष आधार आहे. ह्या ठिकाणीं तीन नद्या घेण्यास समुच्चयार्थक असे कांहीहि नाहीं, हेंहि लक्षांत ठेवण्यासारखें आहे. 'आपया' या ऐवजीं 'अपया' असा पाठ असल्यास बरा, व तोच मूळ असावा असें धरून वरील अनुमान आहे. महाभारत वगैरेमध्यें सुद्धा असा चुकीनेंच उल्लेख असावा.

[25] आर्जीक, आर्जीकीय (पु), आर्जीकीया (स्त्री.) - बहुतकरून दोन्ही पुल्लिंगी शब्द राष्ट्र किंवा लोक दर्शवितात आणि स्त्रीलिंगी शब्द त्या देशांतील नदी दर्शवितो. हिलेब्रँट म्हणतो कीं, हा देश काश्मीर प्रांतात किंवा काश्मीरजवळ असावा कारण अभिसारीस याचा भाऊ आर्सेसीस, हानें आपलें नांव आपल्या लोकाच्या नांवावरून धारण केलें आणि अभिसार काश्मीरच्या जवळ आहे असें ॲरियन म्हणतो. पिशेल आर्जीक हा देश आहे हें कबूल करतो, परंतु तो देश कोणता हें सांगतां येत नाहीं असे तो म्हणतो. परंतु रॉथ अथवा झिमर ह्यांपैकीं कोणीच तें विशेषनाम आहे असे कबूल करीत नाहीं. उलटपक्षीं सर्व ग्रंथकार आर्जीकीया हे नदीचें नांव आहे असें कबूल करतात. रॉथ हा फक्त एकाच उताऱ्यात वरील म्हणणें कबूल करतो, परंतु इतर ठिकाणीं तो शब्द सोमरसाच्या भांड्यांनां लागू पडतो असें म्हणतो, परंतु तो शब्द सर्व उताऱ्यामध्यें एकाच अर्थी आलेला आहे असें गृहीत धरणें जरूर आहे झिमरच्या मतें या नांवाची नदीच नाहीं, आणि पिशेलच्या मतें या नांवाची नदी आहे पण ती ठरवितां येत नाहीं हिलेब्रँट म्हणतो कीं ती उत्तरसिंधु अथवा वितस्ता ( झेलम ) अथवा दुसरी एखादी नदी असावी. ब्रासमन हा यास्कावरून ती नदी विपाश् ( बिआस ) हीच होय असें प्रतिपादन करतो. परंतु नदीस्तुतिपरसूक्तांतील ह्या नदीच्या नांवाच्या स्थानावरून हें अशक्य वाटतें हुन्होफर म्हणतो कीं ही नदी म्हणजे अर्जिकान नदीला येऊन मिळणारी अर्गेसन नदी आहे.

[26] ऊर्णावती.— ऋग्वेदांत ज्या सूक्तांत नद्यांची स्तुति आहे त्यांत लुडविगच्या सिन्धुला येऊन मिळणाऱ्या ऊर्णावती नामक नदीचा उल्लेख आलेला आढळतो, परंतु ही गोष्ट मॅकडोनेल यास चुकीची वाटते. रॉथ म्हणतो कीं या शब्दाचा अर्थ 'लोंकरीचा' असा आहे उलटपक्षीं झिमर हा लुडविगचा अर्थ कबूल करतो. कारण तो म्हणतो कीं, त्यामुळें सर्व सूक्ताच्या अन्वयांत

घोड्या होतो. पिशेल म्हणतो कीं तें सिंधुनदीचें विशेषण असून *त्याचा अर्थ ' जेथे घोड्या पुष्कळ आहेत '* असा असावा.

[31] कुभा — ह्या नदीचें नाव दोन वेळ ऋग्वेदात आलें असून अर्वाचीन काबुलनदी आणि ही ह्या एकच आहेत. सायणाचार्यांनी प्रथमस्थळीं ( ५. ५३, ९ ) हा शब्द विशेषणात्मक धरला असून *दुसऱ्या स्थळीं ( १०. ७५, ६ ) मात्र त्याचा नदी* असा अर्थ स्वीकारला आहे

[32] क्रुमु — हें एका ओढ्याचे नाव ऋग्वेदातील पाचव्या मंडलात एकदां आणि शेवटल्या मंडलांत एकदा नदीस्तुतींत आले आहे. सिन्धु नदीला पश्चिमेकडून मिळणारी अर्वाचीन कुरम नदी आणि ही नदी एकच ह्यात मुळींच संशय नाहीं. सायणाचार्यांनीं ऋ० ५. ५३, ९ येथें 'क्रुमु' हें समुद्र या पदाचे विशेषण घेतलें आहे परंतु तेथे तें नदीचे नाव घेतले असता जुळतें. ऋ० १० ७५, ६ येथेहि सायणाचार्यांनीं क्रुमु हें गोमतीचें विशेषणच केलें आहे 'क्रुमु गोमतीम्'.

[33] गंगा.— ऋग्वेदातील नदीस्तुतींत हें आधुनिक गंगा नदीचें नांव एकदाच आलें आहे. उरु कक्ष ह्याचें विशेषण गाग्य ह्यातहि या नदीचा उल्लेख आहे दुसऱ्या संहितामध्यें ह्या नदीचें नांव कोठेंहि आढळत नाहीं. परंतु शतपथ ब्राह्मणांत ( १३. ५, ४, ११ ) हें नांव आलें आहे तेथे गंगा आणि यमुना या नद्यांच्या कांठीं भरत दौःषन्ति ह्यानें मिळविलेले विजय उल्लेखिलेले आहेत, आणि तैत्तिरीय आरण्यकांतील मंत्रात ( २. २० ) गंगा यमुना ह्या नद्यांमध्यें ( येथेंच उपर्युक्त मंत्र रचला गेला असला पाहिजे ) *राहाणाऱ्या लोकांचा मोठा सन्मानपूर्वक उल्लेख केलेला* आहे गंगा आणि आपया या नद्यांचें जें लुडविग यानें अभिन्नत्व दर्शविलें आहे तें बरोबर नाहीं. कक्षाचें विशेषण जें 'गाग्य' असें आलें आहे तेथें त्याचा 'गंगायां जात ' असा सरळ अर्थ दिसतो व 'गंगा नदी' प्राचीन आर्यांना माहीत होती हें स्पष्ट होतें

[34] गोमती –( गाई असणारी. ) ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलांत नदीस्तुत ( १०. ७५, ६. ) ही एक नदी आहे त्या वरून ही सिंधुनदीस मिळणारी नदी असली पाहिजे, आणि सिंधूला पश्चिमेकडून मिळणारी नदी जी गोमल तीच ही असावी ह्यांत अंतर रहात नाहीं ऋग्वेदांत दुसऱ्या एका ठिकाणीं ( ८. २४, ३०. ) गोमती शब्दांतील उल्लेखावरून ही नदीच असली पाहिजे असें वाटतें. गेल्डनर म्हणतो कीं वरील दोन उताऱ्यांत गोमती अथवा अधिक बरोबर बोलावयाचें म्हणजे तिच्या चार शाखा ( व म्हणून अनेक वचनी उपयोग )च उल्लेखित आहेत ह्यावरून ती नदी कुरुक्षेत्रांत– म्ह० वैदिक सुधारणेच्या मध्यबिंदू पाशीं–होती असें दिसतें सिन्धु आणि तिला मिळणाऱ्या या नद्या हा सिद्धान्त स्वीकारला म्हणजे सायणभाष्यांत हिमवान् पर्वताचा संबंध या नद्यांकडे–विशेषत गोमती नदीकडे–जोडल्यांत आला आहे तो बरोबर नाहीं असें म्हणावे लागतें

[35] तृष्टामा — ऋग्वेदामध्ये नदीस्तुतींत ही एक नदी म्हणून हिचा उल्लेख आलेला आहे पण ही नदी कोणती हें ओळखण्यास साधन नाहीं. ही सिंधूला मिळणारी नदी होती ही गोष्ट तेथें उघड होत आहे, परंतु हिचें स्थान निश्चित होत नाहीं.

[36] दृषद्वती.— 'दगडांनीं भरलेली ' अशा अर्थाचें हें एका नदीचें नाव असून ही नदी कांहीं वेळ सरस्वती नदीला समांतर *वहात जाऊन शेवटीं तिला मिळते. हिचें नाव* ऋग्वेदामध्यें सरस्वती व आपया ह्यांच्या बरोबर भरत राजांचें कार्यक्षेत्र म्हणून आलेलें आहे. पंचविंश ब्राह्मण व मागाहून झालेले ग्रंथ ह्यामध्यें दृषद्वती व सरस्वती ह्या नद्यांजवळ मोठे यज्ञ झाले असा उल्लेख आलेला आहे या दोन नद्या ही मध्यदेशाची पश्चिम मर्यादा होती असें मनुस्मृति २ १७ येथें उल्लेखिलें आहे असे मॅकडोनेल म्हणतो. परंतु सदरहु ठिकाणीं वस्तुतः या दोन नद्यांमधील प्रदेशास ब्रह्मावर्त म्हणत एवढें म्हटलेलें आहे. ब्रह्मावर्त हा मध्यदेशाचा केवळ एक भाग होता.

[37] परुष्णी – हें एका नदीचे नाव असून तें नदीस्तुतींत व दहा राजांवर सुदासनें जो जय संपादिला त्याबद्दलच्या सूक्तात आले आहे. ह्या नदीचें पाणी चढून पळणारे राजे बुडून मेले आणि त्यामुळे सुदासला कायमचा जय मिळाला, म्हणून ह्या नदीचें नांव त्या सूक्तांत आलेलें आहे ह्या ठिकाणी व ऋग्वेदातील आठव्या मंडलात एका ठिकाणीं (येथें या नदीला 'महेनदि' असे म्हटलेले आहे ) आलेलें हें नाव, मागाहून जिला रावी 'इरावती (रावी) ' असे नांव मिळालें असे यास्क म्हणतो तिचेंच असावें पिशेलच्या मतानें ऋग्वेदामध्यें आणखी दोन ठिकाणीं (४ २२, २, ५. ५२, ९ ) या नदीचा उल्लेख आलेला आहे त्या ठिकाणीं लोंकरी (ऊर्णा)चा संबंध परुष्णी शब्दाशीं जोडलेला आहे मॅक्समुल्लर व ओल्डेनबर्ग यांनांहि पिशेलचे म्हणणें मान्य आहे पण ज्या ठिकाणीं हा संबंध निर्दिष्ट केलेला आहे त्या वचनांचा निश्चित अर्थ काय आहे याबद्दल त्यांच्यांत मतभेद आहे. पिशेल म्हणतो कीं, परुष्णी हें नांव बारीक बारीक केलेल्या लोंकरीच्या भुग्या ( परुस् ) पासून बनलेलें आहे, निरुक्तांत म्हटलें आहे त्याप्रमाणें नदीच्या वळणापासून किंवा रॉथ म्हणतो त्याप्रमाणें नदीतल्या बेटांपासून तें बनलेलें नाहीं सुदासविजयविषयक सूक्तांत परुष्णी व यमुना ह्यांचा एकत्र उल्लेख आला आहे त्यावरून हॉपकिन्सने असा तर्क केला आहे कीं, त्या सूक्तांतील आलेलें यमुना हें परुष्णीचेंच दुसरें नांव आहे व गेल्डनर असें म्हणतो कीं, परुष्णी ही यमुनेस येऊन मिळणारी एक नदी असावी. पण हे दोन्ही तर्क अनावश्यक व असंभाव्य आहेत हें सूक्त संक्षिप्त आहे व यांत सुदासच्या दोन विजयांचें वर्णन आलें असावें असें मानण्यास हरकत नाहीं. अथर्ववेदामध्यें परुष्णीबद्दल संशयास्पद उल्लेख आलेला आहे ( ६ १२, ३ )

[38] पुरीषिणी.— ऋग्वेदांत एका सूक्तात हें नांव आलें असून, तें एखाद्या *नदीचें नांव असावें, किंवा बहुधा त्याचा* जलमय किंवा पूर आलेली किंवा पाण्यानें भिजलेले दगड

घेऊन जाणारी नदी असा अर्थ असून ते सरयूचें विशेषण असावें सायणाचार्य त्याचा उदकवती असाच अर्थ करतात. यास्कानेंहि उदक नामांमध्यें ' पुरीष ' शब्दाचा पाठ केला असून ( यास्क २, २२. ) पुरीष हें उदकवाचक ' नूक ' पदाचें विशेषणहि घेतलें आहे. अर्वाचीन संस्कृतमध्यें ' पुरीष ' व ' पुरीषिणी ' या शब्दांचे अर्थ अगदींच भिन्न झाले आहेत.

[३]मरुद्‌वृधा.— हें एक नदीचें नांव ऋग्वेदांत नदीस्तुतीमध्यें आलें आहे. त्याच ठिकाणीं असिक्नी व वितस्ता यांचा उल्लेख आला आहे. रॉथच्या मतें या दोन नद्या मिळून एक झालेल्या प्रवाहाला पुढें पश्चिमेस मिळेपर्यंत मरुद्‌वृधा हें नांव आहे. झिमर याच मताचा आहे. पण लुडविगच्या मते असिक्नी व वितस्ता यांचा एक झालेला प्रवाह परुष्णीला मिळाल्यानंतर परुष्णीचेंच पुढें मरुद्‌वृधा हें नांव पडतें. परंतु हें मत बरोबर वाटत नाहीं. ' असिक्नी ' ही मरुद्‌वृधेची अवयवभूत व वितस्ता आणि सोमा या आर्जीकीया नदीच्या शाखाभूत होत असें सायणाचार्यांचें मत आहे.

[४]मेहत्नू.— ऋग्वेदांतील नदीस्तुतींतल्या एका नदीचें नांव. क्रुमु आणि गोमती या नद्यांच्या अगोदर सिंधु नदीला मिळणारी नदी. कदाचित् ती क्रुमु नदीला मिळणारी नदी असण्याचाहि संभव आहे.

[५]यमुना.—हें जुळी मुलगी या अर्थाचें नांव त्या नदीस ती गंगा-नदीच्या बाजूनें बरोबर वहात जात होती म्हणून पडलें. हिचा ऋग्वेदांत तीनदां उल्लेख आलेला आहे. आणि उत्तर-कालीन वाङ्मयांतहि पुष्कळ वेळा आलेला आहे. ऋग्वेदाप्रमाणें तृत्सु आणि सुदास यांनीं यमुनेवर त्यांच्या शत्रूंविरुद्ध एक लढाई जिंकली होती. येथें यमुना हें परुष्णी (रावी) नदीचेंच एक नांव आहे हें हॉपकिन्सचें मत खरें मानण्यास कांहीं आधार नाहीं असें मॅकडोनेल म्हणतो. अथर्ववेदांत यामुन आञ्जनाचा त्रैककुद आञ्जनाबरोबर उपयुक्त म्हणून उल्लेख केलेला आहे. ऐतरेय आणि शतपथ ब्राह्मणांत भरत यमुनेवर यशस्वी झाल्याबद्दल उल्लेख आहे. इतर ब्राह्मणांतहि या नदीचा उल्लेख आहे. मंत्र पाठात साल्व लोक तिच्या कांठीं रहात होते म्हणून म्हटलें आहे. सायणमतानें ' अजास ' ' शिग्रु ' आणि ' यक्षु हे देश यमुनेच्या कांठीं असावयास पाहिजेत. तिला ' त्रिककुद पर्वतासंबंधी ' आणि ' यामुन ' असेंहि म्हणतात.

[६]यव्यावती.—या शब्दाचा ऋग्वेदांत आणि पंचविंश ब्राह्मणांत नदीचें नांव म्हणून उल्लेख आहे. हिलेब्रँटच्या मतें ती नदी इराणांत आहे; पण त्याच्या मतास आधार नाहीं. यव्यावती व हरियूपीया या एकच असाव्यात असें सायणाचार्यांचें मत आहे. ती इराणापेक्षां हिंदुस्थानांतच असणें जास्त संभवतें.

[७]रसा.— वैदिक प्रदेशाच्या वायव्येस असलेल्या नदीचें नांव म्हणून या शब्दाचा ऋग्वेदाच्या तीन मंत्रांत उल्लेख आलेला आहे. इतरत्र त्याचा पृथ्वीच्या सेवटास असणारी काल्पनिक नदी या अर्थानें उल्लेख येतो. ही पृथ्वीला व त्याचप्रमाणें अन्तराळाला आवेष्टून आहे असी समजूत आहे. सरस्वतीप्रमाणेंच हिच्या संबंधांतहि ही मूळची खरोखरीची नदी असावी असें मानणें सयुक्तिक होईल. कदाचित् ही मूळची ऑक्सीस किंवा जक्सार्टीस असावी. कारण रसाचें अवेस्ती रूप ' रङ्हा ' वेंदिदादमध्यें आढळतें. हा शब्द मूळ ' रस ' म्हणजे ' पाण्याची चव ' यावरूनच आलेला असावा आणि म्हणून सरस्वतीप्रमाणें तो कोणत्याहि नदीला लावता येईल. ही कुभा, क्रुमु, सिंधु आणि सरयु या नद्यांबरोबर अवर्षणामुळें कोरडी पडली असा उल्लेख आहे ( ५. ५३, ९ ). ऋ० १. ११२, १२ येथेंहि ( कोरडी पडलेली ) नदी पाण्यानें भरून टाकली असाच उल्लेख आहे. ऋ० १०. ७५,६ येथें ' हे सिंधु, गतियुक्त तूं कुभेसहित गोमती आणि मेहत्नूसहित क्रुमू यांच्याप्रत जाण्याकरितां प्रथम तृष्टामा, सुसर्तु, रसा व श्वेती यांच्यासह जातेस,' असें म्हटलें आहे. सायणाचार्य क्रुमु ही नदीच मानीत नाहींत. वेदार्थयत्नकार या नदीस तृष्टामा, प्रथम मिळाल्यानंतर ही सुसर्तु, रसा आणि श्वेती या नद्यांस मिळते आणि मग कुभा, गोमती, क्रुमु व मेहत्नू या नद्यांस बरोबर घेऊन चालते असें म्हणतात. यांपैकीं कुभा ( काबुल ) व क्रुमु ( कुरम ) या नद्या सध्यांच्या नकाशांत उपलब्ध होतात. गोमती ( सिन्धूला मिळणारी ) उपलब्ध नाहीं बाकीच्या कोणत्याहि सध्यां निश्चित किंवा नामसादृश्य प्राप्त नाहींत. ऋ. ५. ५३, ९. येथें रसा, अनितभा, कुभा, क्रुमु, सरयु व पुरीषिणी या नद्यांचा उल्लेख आहे. सायणाचार्य अनितभा, क्रुमु व पुरीषिणी या नद्या आहेत असें मानीत नाहींत, परंतु महाभारतांत या नद्या मानल्या आहेत. ५. ६१, १५. येथे ' रसा ' म्हणजे ' पृथ्वी ' असा अर्थ आहे तो अर्वाचीन संस्कृतशीं जुळता आहे. ऋ. ९. ४१, ६ येथें रसा ही नदी किंवा रस असा अर्थ सायण घेतो. ऋ. ४. ४३, ६ व ८. ७२, १३ येथें रसा याचा पाणी असा अर्थ आहे; परंतु हें पद प्रत्येक नदीला लावतां येत नसून ही एक विशेष नदी असावी यांत बिलकुल संशय नाहीं. तथापि पुढल्या ग्रंथांत ( भारत वगैरेंत ) हें नांव आलेलें नसावें.

[८]वितस्ता:—पंजाबांतल्या पांच नद्यांपैकीं सर्वांत पश्चिमेकडील ही नदी असून हिचा उल्लेख ऋग्वेदांत नदीस्तुतींत आलेला आहे. अलेक्झांडरच्या इतिहासकारांनीं जिला हायडॅस्पीस असें नांव दिलें होतें तीच ही नदी होय, व हिलाच टॉलेमी हा बिडॅस्पीस असें अधिक शुद्ध नांव देतो. मुसुलमानी इतिहासकार हिला बिहत् किंवा विरत् असें म्हणत असत. या नांवची स्मृति हल्लीं काश्मिरी वेथ् ह्या नांवात अजूनहि हयात आहे. ज्या पांच नद्यांमुळें पंजाबला पंजाब हें नांव मिळालें त्या पांच नद्याः १ सिंधु, २ वितस्ता ( झेलम ), ३ इरावती, ४ चन्द्रभागा ( चिनाब ) व ५ विपाशा ( बियास ) या असाव्यात शुतुद्रि ( सतलज ) हेंहि प्रसिद्ध नद्यांपैकींच एक नांव आहे. या पांच किंवा सहाहि नद्या सध्यां पंजाबमध्यें आहेत. सध्यां झेलम व चिनाब यांचा संगम झाल्याचें दिसतें. व वितस्ता ही नदी अगदींच वेगळी दाख-

विली जाते. आधुनिक सिंधूइतका प्राचीन मोठा नसावा. आरंभींचें नाव कांहीं तरी वेगळें असून पुढें त्याच प्रवाहास सिंधु असें नांव पडलें असावें.

[45]विपाश्.—म्ह. पाशरहित. ऋग्वेदामध्यें दोन वेळां उल्लेखिलेल्या एका नदीचें हें नांव आहे. याच नदीला ग्रीक लोक हिफासिस, हिपानिस किंवा बिपासिस म्हणत व हल्लींच्या काळीं पंजाबांत हिला बिआसनदी असें म्हणतात. ऋग्वेदेतर वैदिक वाङ्मयांत तर हिचा कोठेंहि उल्लेख नाहीं. यावरून वैदिक काळच्या आर्य लोकांना या नदीचें फारसें महत्त्व वाटत नव्हतें ही गोष्ट सिद्ध होते असें मॅकडोनेल म्हणतो. या नदीला पूर्वी उरुंजिरा असें म्हणत असत. ह्या गोष्टीची नोंद निरुक्तांत आहे. गोपथ ब्राह्मणांत असें म्हटलेलें आहे कीं, या नदीच्या मध्यभागीं वसिष्ठशिला होती. पाणिनीनें या नदीचा उल्लेख केलेला आहे, व याच नदीला वैदिक वाङ्मयानंतरच्या वाङ्मयांत विपाशा असें नांव मिळालें आहे. प्राचीन कालापेक्षां या नदीचा ओघ आतां बराच बदललेला आहे. ऋ. ३. ३३, १ या ठिकाणीं या नदीचा उल्लेख आहे. तेथें शुतुद्रि आणि विपाश् यांच्या संगमावर विश्वामित्र आला असून तो नदीशीं संवाद करतो आहे व त्या नद्यांचा पुढें सिंधु नदीशीं संगम झाला आहे असें वर्णन आहे. निरुक्त आणि पदपाठकार (ऋग्वेद) यांचा मतभेद येथें लक्षांत ठेवण्यासारखा आहे. विश्वामित्र विपाश् व शुतुद्रीच्या संगमावर आला व वाट देण्यास त्यांची प्रार्थना करूं लागला (नि. २०, २४). विपाश् आणि आर्जीकिया या नद्या एकच आहेत असें यास्क म्हणतो.

[46]वियाली.—ऋग्वेदामध्यें एकदांच हा शब्द आलेला आहे व त्याचा तेथें एका अप्रसिद्ध ओढ्याचें नांव असा अर्थ असावा असें मॅकडोनेल म्हणतो. परंतु हें मत सायणाचार्य व वेदार्थयत्नकार वगैरेंच्या मतास जुळत नाहीं.

[47]शिफा.—ऋग्वेदामध्यें एके ठिकाणीं हा शब्द आलेला आहे. सायण ह्याचा अर्थ एका नदीचें नांव असा करितात व तो पूर्णपणें संभवनीय आहे.

[48]शुतुद्रि.—ऋग्वेदांत हा शब्द दोनदां आलेला असून या शब्दावरून पंजाबमधल्या अगदीं पूर्वेकडील भागांत असलेल्या नदीचा बोध होतो. या नदीला हल्लींच्या काळांत सतलज म्हणतात, व टॉलेमी व ॲरियन यांच्या काळांत झरॅड्रॉस असें म्हणत असत. वैदिक काळाच्या नंतरच्या काळांत या नदीचें नांव बदलून तिला शतद्रु (शंभर मार्गांनी वाहणारी) असें नांव मिळालें. ऐतिहासिक कालांतहि या सतलज नदीचा मार्ग अनेकदां बदललेला आहे. विपाश् व शुतुद्रि यांचा संगम झाला तेथें विश्वामित्र आला होता व तेथें त्यानें नदीसूक्त केलें असें निरुक्तांत सांगितलें आहे (९. २६.). शुतुद्रि आणि सरस्वती यांचा कांहीं तरी संबंध असला पाहिजे. शुतुद्रि (सतलज) ही पूर्वी कच्छच्या आखातास मिळत असे पण पुढें ती सिन्धूस मिळूं लागली असें दिसतें. कदाचित् कच्छच्या अखातास मिळणाऱ्या भागास 'सरस्वति' व सिन्धूस मिळणाऱ्या भागास 'शुतुद्रि' (सतलज) असें म्हणूं लागले असावेत.

[49]सप्तसिंधवः—म्ह० सात नद्या. हा शब्द एकदांच ऋग्वेदामध्यें एका विशिष्ट देशाचें नांव म्हणून आलेला आहे. इतरत्र मात्र तो सात नद्या अशाच अर्थानें आलेला आहे. मॅक्सम्युलरच्या मतानें त्या, पंजाबमधल्या पांच नद्या, सिंधु व सरस्वती अशा या सात नद्या असाव्यात. इतर लोकांच्या मतानें सरस्वतीच्या ऐवजीं कुभा घ्यावी किंवा कदाचित् आक्सस नदी ही या सात नद्यांत असावी. झिमरच्या मतानें या नद्या आमक्याच होत हें ठरविणें निष्फळ आहे, व हेंच मत मॅकडोनेल यास ग्राह्य दिसतें. सात हा शब्द ऋग्वेद व तदुत्तर ग्रंथ यांमध्यें लेखकांचा फार आवडता आहे. सायणाचार्यांच्या मताप्रमाणें गंगा, यमुना, सरस्वती, शुतुद्री, परुष्णी, असिक्नी आणि वितस्ता या त्या सात नद्या होत. ह्या सात नद्या 'इमं मे गंगे यमुने (१०. ७५, ५.) या ऋचेप्रमाणें घेतल्या आहेत, परंतु सिंधूला मिळणाऱ्याहि सात नद्या असूं शकतील. कांहीं सरस्वतीऐवजीं कुभा घेतात. ' सप्तसिंधु शब्दाचा विचार करतांना एक गोष्ट केव्हांहि विसरून चालणार नाहीं व ती ही कीं सध्या जो पंजाब शब्दानें ओळखला जाणारा प्रान्त आहे. त्यांत सातच मोठमोठाल्या नद्या आहेत. म्हणूनच पंजाबला पूर्वी सप्तसिंधु म्हणत असावेत.

[50]सरयु:—ऋग्वेदामध्यें तिनदां हा शब्द नदीचें नांव म्हणून आलेला आहे. सरयु नदी ओलांडून तुर्वश व यदुलोक यांनीं चित्ररथ व अर्ण यांचा पराजय केला असें वर्णन आलेलें आहे. एके ठिकाणीं सरयु हा शब्द सिंधु व सरस्वती या शब्दांबरोबर आलेला आहे, व दुसऱ्या एका ठिकाणीं रसा, अनितभा व कुभा या नांवांबरोबर तो आलेला आहे. वैदिक कालानंतरच्या वाङ्मयांत सरयू व क्वचित् प्रसंगीं सरयु हें नाव अयोध्या प्रांतांतील जिला हल्लीं सर्जु म्हणतात तिचेबद्दल आलें आहे. झिमर म्हणतो कीं हीच सर्जु नदी सर्व वैदिक वाङ्मयांत आलेली सरयु समजली पाहिजे. ऋग्वेदांतील ज्या एका ऋचेवरून (५.५३,९) सरयु ही पंजाबांतील नदी होती असें प्रतिपादण्यांत येतें तींत नैर्ऋत्य व ईशान्य हे पावसाळी वारे अभिप्रेत आहेत असें तो म्हणतो. हॉपकिन्सचें असें मत आहे कीं, ही नदी पश्चिमेकडे असावी व लुडविग म्हणतो कीं, ती व क्रुमु (क्रुमु) या दोन्ही एकच आहेत. व्हिव्हिएन डी सेंट मार्टिनच्या मतें ही नदी व शुतुद्री व विपाश् (सतलज व बिआस) ह्या नद्या मिळून झालेली नदी या बहुधा एक असाव्यात. सरयु किंवा सर्जु म्हणजे सुप्रसिद्ध शरयु नदी होय. ही अयोध्येवरून पुढें गंगेस मिळते. परंतु सरयु ही नदी पंजाबच्या बाजूस असावी हेंच जास्त संभवनीय आहे. कारण ऋग्वेदांत पंजाबाशिवाय इतर भागांतील नद्यांचा उल्लेख नाहीं म्हटलें तरी चालेल. शिवाय त्या नदीचा उल्लेख ज्या स्थळीं आला आहे त्यावरूनहि सामान्यानें उचारलेला

नद्यांच्या आसपासच ती कोठें तरी असली पाहिजे. शेर ग्रंथांतहि एक हरयू नदी आलेली आहे, व ती आणि ही एकच असावी. 'स'चा ह होणें ही गोष्ट प्रसिद्धच असून पूर्वीपासून नावें टेवण्याची पद्धति मनुष्यस्वभावसिद्ध आहे.

[३१] सरस्वती.— ऋग्वेद व उत्तरकालीन ग्रंथ यामध्यें हें एका नदीचें नाव म्हणून आलेलें आहे. उत्तरकालीन संहिताग्रंथांत पुष्कळ ठिकाणीं ही नदी म्हणजे सध्यां पतियाळा संस्थानच्या वाळवंटामध्यें जी अदृश्य होते ती सरस्वती नदीच होय हें निश्चित आहे. रॉथचें सुद्धां असें मत आहे की ऋग्वेदामध्यें कांहीं ठिकाणीं (३. २३, ४) हीच नदी अभिप्रेत असावी. दृषद्वती व ही नदी या मध्य देशाची पश्चिममर्यादा झाल्या होत्या. ही नदी वैदिक काळीं फार पवित्र मानली जात होती. या नदीतीरावर केलेले यज्ञ फार महत्त्वाचे व पावित्र्ययुक्त असत असें सूत्रांतहि म्हटलेलें आहे. परंतु ऋग्वेदांतील दुसऱ्या अनेक सूक्तांत (उ. १, ८९, ३.) व उत्तरकालीन ग्रंथांतहि (उ० अथर्व ६. ४, ६; तै. ब्रा. १. ८, १३, ३ बृहदारण्यकोपनिषद् ६. ३, ८) ही नदी म्हणजे सिंधूच होय असें रॉथचें म्हणणें आहे. असा अर्थ सरस्वतीचा घेतला तरच या सरस्वतीला नदीतमा (सर्व नद्यांत श्रेष्ठ) असें नांव कां दिलें गेलें, ती समुद्राला मिळते असें कां म्हटलें आहे व ही नदी मोठी असून हिच्या तीरावर अनेक राजे व पांच प्रकारचे लोक कसे वसाहत करून राहिले होते याचा खुलासा होतो असें त्याचें म्हणणें आहे. हें मत झिमर व इतर लोक यांनां संमत आहे. उलटपक्षीं लॅसेन व मॅक्सम्युलर यांचें असें मत आहे कीं, वैदिककाळची सरस्वती नदी व मागाहून प्रसिद्धीस आलेली सरस्वती नदी या एकच होत. मॅक्सम्युलरच्या मतें वैदिककाळीं सरस्वती ही सतलज नदीप्रमाणें मोठी नदी होती; व ती सिंधुनदीला मिळाल्यानंतर किंवा एकाकीच समुद्राला मिळाली असेल. मॅक्सम्युलरच्या मतें ही नदी एके काळीं ब्राह्मणांची पश्चिमेकडील अंतिम मर्यादा असून तिचा एखाद्या भक्कम किल्ल्याप्रमाणें संरक्षणाच्या कामीं उपयोग होऊं शकला असता. कारण, तो म्हणतो कीं वैदिक काळीं हिचा प्रवाह सतलज इतकाच मोठा असून ती स्वतंत्रपणें किंवा सतलजशीं संयोग पावून समुद्राला मिळत होती, व अशा रीतीनें ती पंजाब प्रांत व बाकीचा हिंदुस्थान यांमधील सरहद्द झाली होती. सरस्वती नदीच्या आकारांत किंवा मार्गांत पुढें कांहीं विशेष फरक पडला असल्याचा खात्रीलायक पुरावा उपलब्ध नाहीं; पण या नदीच्या आकारांत फरक पडला नसेल असें म्हणणें धाडसाचें आहे. तथापि वैदिक काळची सरस्वती व तदुत्तरकालीन सरस्वती या एकच आहेत असें मानण्यास सबळ पुरावा आहे. या नदीचें स्वरूप देवी आहे असें वर्णन जेथें ती पांच प्रकारच्या लोकांनां आधारभूत आहे असें म्हटलें आहे त्याच सूक्तांत आहे; व हें वर्णन पुढें जो तिला पवित्रपणा आला त्या वर्णनाशीं संतोलन शुद्धें. शिवाय त्याच सूक्तांत पारावतांचा उल्लेख आलेला आहे. पंचविंश ब्राह्मणांत आलेल्या उत्तरकालीन पुराव्यावरून हे पारावत लोक पूर्वेकडे रहात असत असें सिद्ध होतें; व सरस्वती जर सिंधु नदी मानली तर हा पूर्वेकडील देश या पारावतांच्या मूळच्या रहाण्याच्या ठिकाणापासून फार दूर होतो शिवाय सरस्वती नदीवर रहात असलेले पुरु (पूरु) लोक हे फार दूर अशा पश्चिमेकडील मुलुखांत रहात होते असें मानणें जरा कठिणच आहे. त्याचप्रमाणें ज्या अर्थीं पश्चिमेकडील पाच जाती या कुरुक्षेत्रांतील भरतांच्या शेजारी होत्या त्या अर्थीं त्या सरस्वतीवर रहात होत्या असें मानावयास कांहीं हरकत येत नाहीं, व मग सरस्वती नदी या उपर्युक्त अर्थानें पंजाबची मर्यादा होती हें उघडच होतें. पुन्हां एके ठिकाणीं 'सप्तसिंधु' असा जो उल्लेख आलेला आहे त्यावरून एका निराळ्याच बोध होतो. या सप्तसिंधू म्हणजे पंजाबांतल्या पांच नद्या, सिंधु व कुभा (काबूल-नदी) अशा सात नद्या नव्हेत, तर पंजाबांतल्या पांच नद्या, सिंधु व सरस्वती अशा सात नद्या होत. सरस्वती नदी समुद्राला मिळते असें कां म्हटलें आहे हें सांगणें अवघड नाहीं. एकतर वैदिक ऋषींनीं या नदीच्या समुद्राजवळील मुखापाशीं कधीं गमन केलें नसेल, किंवा ही नदी सिंध प्रांतांतल्या वालुकामय प्रदेशांत पूर्णपणें किंवा हिचा बराचसा भाग शिरला असेल, आणि ती वालुकामय प्रदेशांत लुप्त झाली आहे हा शोध ब्राह्मणकालांतच लागला असेल. आतां वाजसनेयि संहितेंत असें म्हटलें आहे कीं, पांच नद्या सरस्वती नदीला मिळतात. पण हा लेख एकतर मागाहून लिहिलेला असून (देश शब्दावरून ही गोष्ट सिद्ध होते) या नद्या पंजाबमधल्या आहेत कीं काय हें समजत नाहीं; व दुसरें असें कीं, या लेखाला दुसऱ्या कोणत्याहि संहिताग्रंथांतल्या तत्सदृश लेखाचा आधार नाहीं किंवा तो प्राचीन काळांतला लेख आहे असेंहि मानतां येत नाहीं. तो जर उत्तरकालीन असेल तर तो मागाहून प्रसिद्धीस आलेल्या सरस्वती नदीसंबंधानें असावा. हिलेब्रँटला एकंदरीनें सरस्वतीबद्दलची ही विचारसरणी पसंत आहे. पण त्याचें असेंहि मत आहे कीं, या नदीवरून जिला पुढें वैतरणी नदी असें लोक म्हणूं लागले त्या पौराणिक नदीचा व त्याचप्रमाणें ॲराकोशियामधील अर्घंदब नदीचा बोध होतो. हें मत कबूल करावयाचें म्हणजे ऋग्वेदाच्या सातव्या मंडळाच्या उलट, ऋग्वेदांतल्या सहाव्या मंडलांतील गोष्टी इराणी देशांत घडल्या ही हिलेब्रँटची उपपत्ति स्वीकारावी लागेल. पण हें उपर्युक्त मत व हिलेब्रँटची उपपत्ति ही दोन्हीहि अग्राह्यच आहेत. ब्रून-होफर एके काळीं हिलेब्रँटच्या मताचा होता. पण पुढें सहाव्या मंडलांतील गोष्टी ॲरक्सस नदीवर घडल्या असाव्या असें त्याचें मत झालें. पण हें तर अगदींच चुकीचें आहे. सरस्वती व सात नद्या यांचा संबंध जरा संदिग्ध आहे. ऋग्वेद ८. ५४, ४ मध्यें सरस्वती आणि सात नद्या यांची वेगवेगळी प्रार्थना केलेली आहे. व ऋ. ६. ६१, १०, १२ मध्यें हिला सात बहिणी असलेली (सप्तस्वसा) असें म्हटलें आहे. ऋ. ७. ३६, ६ मध्यें तिला सातवी असें म्हटलें असल्या-मुळें तेथें ती सातांपैकीं एक होते. पूर्वीचे लेख जर अगदीं बरोबर मानले तर सप्तस्वसा शब्दावरून ती सरस्वती सात नद्यांहून निराळी होती असें सिद्ध होतें व मग सिंधु, कुभा

व पंजाबांतल्या पांच नद्या अशा सात नद्या मानाव्या लागतात. पण या 'सप्तस्वसा' चा अर्थ सात बहिणींपैकीं एक असाहि चुकीनें करतां येईल.

वरील बहुतेक ऋग्वेदांतील स्थळें यात सरस्वती शब्दाचा देवता असा अर्थ आहे. व इतर वेदातील उतारे यांतहि निश्चित 'सरस्वती देवता' असाच अर्थ आहे. ऋग्वेद ८. ५४, ४ येथे सरस्वती व सप्तसिंधु असे वेगवेगळे उल्लेख आले आहेत. यावरून सप्तसिंधु हें विशेषनाम आहे असें सिद्ध होतें.

[५१]सिंधु.—ऋग्वेद व अथर्ववेद यांमध्यें याचा अर्थ नुसता ओढा किंवा नदी असा असून सर्वांत श्रेष्ठ नदी सिंधु असाहि अर्थ या शब्दाचा आहे. हा शब्द सिंधुनदी अशा अर्थानें संहिताग्रंथानंतर क्वचितच येतो. व जेव्हां येतो तेव्हा त्याचा अर्थ अंतर असा आहे. सिंधुनदीकाठचे घोडे (सैंधव) प्रसिद्ध होते.

[५३]सीलमावती.—ऋग्वेदामध्यें (१०. ७५, ८) लुडविगचे मतानें एका नदीचें हें नांव आहे. पण हें अगदीं अशक्य दिसतें. सायणाचे मतानें याचा अर्थ 'अंबाडीयुक्त' असा आहे. ज्या दोरीसारख्या वल्लीनें नांगर बांधला जातो, ती वनस्पति पुष्कळ जमीमध्यें आहे, असें सिंधूचें वर्णन आहे असें सायणाचें मत आहे. सीलमावती (सीलमा = वल्ली) हें सिंधूचे विशेषण असावें. सायणानीं निश्चित अर्थ केला नाहीं. सायणाच्या मतानें ज्या दोरीनें नांगर बांधला जातो ती दोरी किंवा वनस्पति असा अर्थ होईल.

[५४]सुवास्तु.—ऋग्वेदामध्ये हें एका नदीचे नाव आलेले आहे. ही नदी म्हणजे ॲरियनची सोएस्टॉस होय हें स्पष्ट आहे व हिलाच स्वात् हें नांव असून ती कुभा (काबूल नदी) नदीला मिळणारी नदी आहे. ही कुभा नदी सुद्धां सिन्धु नदीला मिळणारी उपनदी आहे.

[५५]सुषोमा.—ऋग्वेदामध्यें (१०. ७५, ५) नदीस्तुतींत एका नदीचें हें नाव आहे. इतर दोन ठिकाणीं हें विशेषनाम आहेसें दिसतें. एकदां पुल्लिंगी रूप असलेले सोमाचें नाव व एकदां स्त्रिलिंगी नदीचें नांव आहे. रॉथच्या मतें हें एका सोमपात्राचें विशेषण आहे. ही नदी कोणती हें निश्चित नाहीं, पण मेगॅस्थिनीसच्या वेळची सोॲनोस किंवा अर्वाचीन सुवान् नदी ही असावी असे कांहींचे मत आहे. सायणाचार्यांचे मतानें हें विशेषण आहे. ऋ. ८. ६४, ११ येथें ही नदी आर्जीकीय नांवाच्या देशांत आहे असें म्हटलें आहे. सुषोम आणि आर्जीक यांचा संबंध स्पष्ट आहेच परंतु सुषोम शब्द पुल्लिंगी आहे (ऋ. ८. ७, २९).

[५६]सुसर्तु.—ऋग्वेदामध्यें नदीस्तुतींमध्यें एका नदीचें हें नाव आलेलें आहे. ही सिंधुनदीला मिळणारी उपनदी होती याबद्दल संशय नाहीं, पण ही कोणती उपनदी हें समजत नाहीं.

[५७]हरियूपीया.—ऋग्वेदामध्यें एका सूक्तामध्यें वृचीवंतांचा अभ्यावर्तिन् चायमानाकडून झालेल्या पराभवाचा प्रसंग म्हणून वर्णिलेला आहे. याचा अर्थ एकादें ठिकाण किंवा नदी असाहि होईल. कारण, पुष्कळ लढाया नद्यांच्या तीरांवर झालेल्या दिसतात. लुड्विगच्या मतानें यव्यावती नदीवरील शहराचें हें नांव असावें व सायण आपल्या भाष्यातहि असेंच म्हणतात. हिलेब्रँट म्हणतो कीं, ही इर्याब नदी कुरुम् (कुमु नदी) नदीला मिळणारी आहे; पण हें शक्य दिसत नाहीं. सायणाचार्य '*हरियूपीया*' — '*नगरी किंवा नदी*' असें म्हणतात.

[५८]वरणावती.—अथर्ववेदामध्यें एके ठिकाणीं हा शब्द आला आहे. रॉथ म्हणतो त्याप्रमाणें हें नाव एका नदीचें असावें व लुड्विगच्या मतें ही नदी गंगा असावी. सायणाचार्याप्रमाणें ब्लमफील्डला ही वल्ली असावी असे जरी वाटतें तरी नदीचें हें नांव असणें संभवनीय आहे हेंहि त्याला वाटतें. सायणाचार्याप्रमाणे नदी हा अर्थच विशेष संभवतो. वाराणशी शब्द वरणावतीपासून झाला असावा असें अनुमान करण्यास जागा आहे.

[५९]शीपाला.—हा शब्द अथर्ववेदामध्ये एकदा आलेला आहे व त्याचा अर्थ शीपालयुक्त तळें किंवा शीपाल नावाची नदी किंवा सरोवर असा आहे. '*शेवाळयुक्त*' असें सायणाचार्य विशेषण मानितात.

[६०]कारोती.—शतपथ ब्राह्मणात (९. ५, २, १५,) तुर कावषेय यानें ज्या ठिकाणीं, किंवा नदीच्या काठीं, अग्निकुंड- म्हणजे अग्निहोत्राचे परम पवित्र स्थान-तयार केलें तो जागा किंवा ती नदी.

[६१]कौसित.—मैत्रायणी संहितेंत (२. १, ११) कुसिताथि निशाचराच्या संबंधात हें एका सरोवराचे नांव आलें आहे. काठक संहितेंत (१०. ५) याबद्दल कौसिद असा उल्लेख आहे. 'कुसितायी, कौसित, कुसितायिन्' हे हि शब्द तेथें आले आहेत. पाणिनी सूत्र (४.१. ३७.) येथेंहि 'कुसित' 'कुसती' हे शब्द आले आहेत.

[६२]महार्णव.—मोठा समुद्र हा समासघटित शब्द—मागाहूनच्या मैत्रायणी उपनिषदा (१.४) पूर्वी आलेला आढळत नाहीं. मैत्रायणी उपनिषदांत मात्र "महार्णवाचे कोरडें होणें" हा एक मोठा चमत्कार म्हणून गणिला आहे.

[६३]सदानीरा.—'सदाजलयुक्त असलेली' हें एका नदीचें नाव असून शतपथ ब्राह्मणाचे मतानें कोसल व विदेह या दोन देशांमधील ही मर्यादा होती. एतद्देशीय हिंदू कोशकाराचे मतानें ही नदी म्हणजे करतोया होय; पण ही नदी बरीच पूर्वेकडे आहे. वेबरच्या मतानें ही नदी म्हणजे गडकी होय; व हें मत बहुतकरून बरोबर असावें. कारण जरी महाभारतांत (२. ७९४) या नद्या निरनिराळ्या आहेत असें म्हटलें आहे तरी याला कांहीं परंपरेचा किंवा दंतकथेचा आधार आहे असें दिसत नाहीं. शतपथ ब्राह्मणाप्रमाणें उत्तरगिरीपासून (हिमालय) वहात येणारी व तिला तरून पूर्वी लोक गेले नव्हते, पण पुढें जाऊं लागले असा उल्लेख आहे. हीच जर 'करतोया' असेल तर तिला उल्लंघिलें असता पुराणांत प्रायश्चित्त वर्णिलें आहे. शतपथ ब्राह्मणांत तें स्थल शुद्ध मानूं लागले. असें असतां पुराणांतील प्रायश्चित्त कायमच आहे हें लक्षांत ठेवण्यासारखें

[३६] सोम.– ही एक प्रसिद्ध वल्ली असून तिच्यापासून वैदिक काली सोमरस काढीत असत. या सोमरसाचें इतकें महत्त्व आहे कीं, ऋग्वेदाचें एक सबंध मंडळ व इतर मंडलातील सहा सूक्तें या सोमवल्लीवर लिहिलीं आहेत. तथापि या सोमवल्लीबद्दल प्रत्यक्ष माहिती फारच थोडी उपलब्ध आहे. या वल्लीच्या फांद्या पिंगट ( बभ्रु ), तांबड्या वर्णाच्या ( अरुण ) किंवा पिवळट ( हरित ) अशा आहेत हिलेब्रँट म्हणतो त्याप्रमाणें नैचाशाख हें विशेषण जर सोमवल्लीला लावलें तर त्या वल्लीच्या फांद्या खालीं लोंबतात असें म्हटलें पाहिजे या वल्लीच्या अंकुराला 'अंशु' असें नाव आहे व सर्व वल्लीला 'अंधस्' हें नाव असून त्याचा अर्थ रस असाहि होतो. पर्वन् म्हणजे त्या वल्लीचें पेर होय. 'क्षिप्' ( बोट ) हें अंकुरांना नांव आहे, यावरून हे अंकुर बोटाप्रमाणें असावेत असें दिसतें. क्षणा व बाण हे शब्दहि अंकुरालाच लावीत असत याचे देंठ वाटोळे नसून त्यास शिरा असत याबद्दल थोडासा पुरावा आहे. ही वल्ली डोंगरावर होत असे मूजवत् पर्वताची या सोमवल्लीबद्दल विशेष ख्याति होती. या सर्व उल्लेखावरून ही वल्ली कोणती हें निश्चयानें सांगता येत नाहीं. काहीं लोकांच्या मतानें हिला लॅटिनमध्यें सारकोस्तेमा व्हिमिनेल किंवा अस्क्लेपिअस ॲसिडा असे म्हणता येईल. हिला पहिलें नावच अधिक शोभेल असें रॉथचें मत आहे वॅट्च्या मताने अफगाणिस्तानातील द्राक्षाची वेल म्हणजेच सोमवल्ली होय. राईसच्या मतानें ऊस हीच सोमवल्ली असावी. मॅक्समुल्लर व राजेंद्रलाल मित्र यांच्या मताने बीअर नांवाच्या दारूमध्यें हा रस टाकला जाई असें आहे म्हणजे, ज्याला इंग्रजींत हॉप् म्हणता येईल त्याचाच सोमवल्ली हा एक प्रकार असावा. द्राक्षाची वेली किंवा इंग्रजी हॉपू या दोन्हीहि सोम वल्ली नव्हत असे हिलेब्रँट म्हणतो. तेव्हां ही वल्ली आता नक्की ओळखणें एकंदरींत दुरापास्तच आहे. ही वल्ली कुटण्यापूर्वी ती विकत घेत असत असें यजुर्वेद संहितेंत म्हटलें आहे. हिलेब्रँटचे मतानें ही वल्ली ऋग्वेदकालीं मुद्दा लोकांकडून विकत घेतली जात असे असें आहे ही डोंगरावर वाढत असे व ती सामान्य माणसांनां दुष्प्राप्य असे. कदाचित् एखाद्या विशिष्ट जातीच्या लोकांच्या किंवा राजाच्या ताब्यात ही वल्ली असावी व हे लोक म्हणजे कीकट असावेत वस्तुस्थिति अशी आहे कीं, हा ( सोमवल्ली विकत घेण्याचा ) विधि करणें म्हणजे गंधर्वांपासून सोमवल्ली मिळवणें होय व ही जी वल्ली मिळावयाची क्रिया, तिचें यज्ञरूपानें अनुकरण करणें होय, आणि हेंच अनुकरण नाटकाच्या अनेक मूळांपैकीं एक आहे (?) खरी वल्ली मिळण्याची अडचण असल्यामुळे ( कारण ती फार दूर डोंगरांवर असे ) त्या वल्लीच्या बदलीं इतर वल्लींचा उपयोग करावा असे ब्राह्मण ग्रंथांत म्हटलेलें आहे. ही वल्ली प्रथम दगडानीं किंवा उखळांत कुटून ( उखळाचा उल्लेख फक्त ऋग्वेदांतच आढळतो ) मग तिचा रस काढीत असत. दगडांनीं कुटण्याची चाल ऋग्वेदकालीं नेहमींची म्हणून वर्णिलेली आहे या दगडांनां ग्रावन् किंवा अद्रि अशीं नावें होतीं व ते दगड हातात धरीत. ही वल्ली जवळ जवळ ठेवलेल्या दोन अधिषवण फलकांवर ठेवीत, व मागाहून प्रचारांत आलेल्या विधीप्रमाणें खालीं एक खळगा खणीत व त्यावर फळ्या ठेवून त्यावर कुटीत. त्यामुळें ती कुटतांना कुटावयाचे वेळीं मोठा आवाज निघे व त्याचा हेतु आसपासच्या राक्षसांची पीडा होऊं नये हा असे. ही वल्ली चर्मावर व वेदीवर ठेवीत. सध्याच्या प्रयोगात ही वल्ली वेदीवर ठेवीत नाहीत. या वेदीला काहीं ठिकाणीं धिषणा असें नांव दिलें आहे कधीं कधीं दगडाच्या ऐवजीं उखळ व मुसळ यांचा उपयोग करीत. ही चाल इराणी लोकांकडून घेतली असून ऋग्वेदोत्तर काळात प्रचारांत नव्हती. देवाला ज्या भांड्यातून सोम अर्पण करीत त्याला चमू हें नांव असे. ज्या भांड्यातून पुरोहित सोमरस पीत त्यांनां कलश व चमस अशीं नांवें होतीं. कधीं कधीं चमू म्हणजे उखळ व मुसळ असाहि अर्थ होई सोमपात्राला चमू म्हणण्याचें कारण कदाचित् त्याचा उखळाप्रमाणें आकार होता हें असावें. ज्या चर्मावर सोमवल्लीच्या कांड्या ठेवीत त्याला त्वच् किंवा गोचर्म असें नांव आहे. कोश, दृघस्य, द्रु, वन व द्रोण हीं सर्व सोमपात्रांचीं नावें आहेत व स्रुचा याचा अर्थ लाकडी पळी असा आहे या वल्लींतून जास्ती रस बाहेर यावा म्हणून तिजवर पाणी शिंपीत असत. ऋग्वेदकालीं ही सोमवल्ली कोणत्या प्रकारानें दाबून तिचा रस कसा काढीत याविषयीं सविस्तर माहिती उपलब्ध नाहीं. गाळण्यातून ( पवित्र ) गाळून तो रस शुद्ध करीत असत या सर्व रसात इतर रसांची भेसळ न करता तो इंद्राला व वायूला अर्पण करीत. पण कण्व लोकांनीं हा प्रघात टाकून दिला होता. या रसाची बभ्रु, हरित्, अरुण, सुगंधि अशीं सामान्यपणें वर्णनें आलेलीं आहेत. सोमरसामध्यें दूध ( गवाशिर ), दहि (दध्याशिर) व धान्य (यवाशिर) यांचे मिश्रण करीत. या मिश्रणाचें वर्णन लक्षणेनें अत्क ( चिलखत ), वस्त्र किंवा वासस्, अभिश्री, रूप, श्री, रस, प्रेयस् ( विपुल ) व कदाचित् नभस्, सुगंध या शब्दांनीं उल्लेखिलेलें आहे. तीव्र या विशेषणावरून हें मिश्रण झाल्यावर जो तिखट वास येई त्याचा बोध होतो. रस काढून घेतलेल्या सोमवल्लीच्या काटक्यांना ऋजीष असें म्हणत. ऋग्वेदांतील काहीं स्थलांवरून असा भास होतो, कीं, सोमरसात मद्य मिसळीत असत कदाचित् "कोशं मधुश्चुत" (ज्यापासून मद्य गळतो आहे असें भांडें) याचा दोहोंचें मिश्रण करण्याकरितां उपयोग होत असे. या सोमरसांत सुरा मिसळीत कीं नाहीं याबद्दल निश्चित सांगता येत नाहीं. दिवसांतून तीन वेळ सोमाचा रस काढीत. अवेस्तामध्यें दोन वेळ रस काढण्याची चाल होती असें दिसतें सायंकाळीं ऋभूंकरिता, मध्यान्हीं इन्द्राकरिता व सकाळीं अग्नीकरितां सोमसवन करीत. पण इतर देवतांनाहि या प्रसंगीं सोमाच्या आहुती देत. सोमरस पिणारे व तो न पिणारे यांच्यातील सूक्ष्म भेद संहिता ग्रंथांत दाखविले आहेत. ज्या ठिकाणीं सोमवल्लीचा खप होत असे तीं ठिकाणें म्हणजे आर्जीक, पस्त्यावत्, शर्यणावत्, सुषोमा, पंचजनांचा देश वगैरे होत सोमरसपान केल्यावर अंगात जी तरतरी येई तिचे उल्लेख अनेक वेळां आलेले आहेत. दुसऱ्या एखाद्या उन्मादक पेयाप्रमाणें सोमरस लोकप्रिय होता कीं नाहीं हें सांगणें कठिण आहे याच्या

लोकप्रियतेबद्दल जो पुरावा आहे तो थोडा असून ग्राह्यलायक नाहीं. मै स ४ ७, ८ मध्यें निव्वळ सोमरसाबद्दल नापसंती व्यक्त केली आहे त्या सोमवल्लीच्या अभावी इतर वल्लींचा उपयोग केल्यामुळें इतर रसाचें मिश्रण करावें असे कण्व आम्हास सांगतात असे जें हिलेब्रँट म्हणतो तें त्याचें म्हणणें यथार्थ असावें श ब्रा ४. १, ३, ६ येथील वर्णनावरून वैद्यक पुस्तकांत या वल्लीला वाईट वास येतो असें जें म्हटलें आहे तें खरें ठरतें पण वैदिक काळची सोमवल्ली व या वैद्यक ग्रंथांत उल्लेखिलेली वल्ली या निरनिराळ्या असू शकतील हा वाईट वास येण्याचें कारण सोमवल्लीच्या ऐवजीं दुसरी वल्ली उपयोगांत आणली गेली असेल अगर खरी सोमवल्ली लांबून आणल्यामुळें जुनी होऊन कुजली जात असेल, हें असावें ऋ ८ १९, ३०, ३३, १४, ६६, १२, व विशेषत ७ ३३, २ या ठिकाणीं असें वर्णन आलें आहे कीं, वसिष्ठ लोकांनीं पाशद्युम्न वायताच्या सोमयज्ञांतून इंद्राला सुदासाकडे नेलें अंतिम कालांत तिचें तसेंच महत्त्व वर्णिलें आहे पण या सोमपानानें उपाध्यायानाहि तसेंच सुख मिळतें असेंहि म्हटलें आहे (ऋ. १ ९१ १३, ८ २, १२, १०. १६७ ३) या पानामुळें रोग उत्पन्न होतो यासंबंधी अनेक उल्लेख आहेत (मै स २. २ १३ इत्यादि) ह्याप्रमाणें सोमरस ओकून टाकल्यानें जें पाप उत्पन्न होई त्याची निष्कृति करण्याकरितां सौत्रामणी नामक एका यागाची योजना होती (तै स २ ३, २, ५, ६ श ब्रा ५. १, ४, ९, १२ ७, १, ११) या यागाचें नाव अथर्व ७ ३, ९ मध्यें अगोदरच आलें आहे, व हा यागहि निःसंशय जुना आहे या वनस्पतीचें सध्याचें परंपरागत रूप ठरलें आहे त्याला ही गोष्ट अनुकूल आहे कारण मॅक्समुल्लरनें उद्धृत केलेल्या वैद्यकी गुणासंबंधीं उल्लेखांत ओकारी येण्याचा धर्म उल्लेखित आहे

[३७]स्पदन – ऋग्वेदामध्यें एके ठिकाणीं एक प्रकारचा वृक्ष असा याचा अर्थ आहे रॉथचे मतानें हा शब्द स्पंदन असा असून तो रथ या अर्थानें असावा.

[३८]स्वधिति – स पी कोशाप्रमाणे या शब्दाचा अर्थ ऋग्वेदामध्यें काहीं ठिकाणीं 'कठिण लांकडाचें मोठें झाड' असा आहे हा अर्थ शक्य दिसतो

[३९]ह्वरस् – रॉथचे मताप्रमाणे ऋग्वेदामध्ये तीन ठिकाणीं सोमाच्या गाळणीचा भाग असा या शब्दाचा अर्थ आहे व तो सभवनीय आहे पण गेल्डनेरच्या मताप्रमाणे याचा अर्थ अडथळा असा आहे

[४०]इक्षु – पहिल्या प्रथम तैत्तिरीय संहितेंत आणि अथर्ववेद व उत्तर संहिता यांत हा शब्द ऊस या अर्थी योजिला आहे तो आपोआप अथवा मशागत करून उगवत होता हें तेथील संदर्भावरून कळत नाहीं

[४१]करीर – पर्णहीन झुडुपाचें किंवा त्याच्या फळाचें हें नाव पहिल्यानेंच तैत्तिरीय संहितेंत आलें आहे

[४२]गार्मुत – तैत्तिरीय संहिता, मैत्रायणी संहिता, आणि शतपथ ब्राह्मण यांत नेहमीं एका धान्याचें हें नांव आलेलें आहे

[४३]कूर्च – तैत्तिरीय संहिता आणि नंतरच्या ग्रंथांत आसना करितां एक गवताची मुष्टि (जुडी) या अर्थी हा शब्द उपयोगांत आला आहे शतपथ ब्राह्मणांत एका ठिकाणीं सुवर्णकूर्चहि आला आहे यावरूनच मराठींत कुंचली असा शब्द आला असावा

[४४]कुल – कुवल अथवा बदरीफळ, आणि कुल हें एकच असून दूध विरजण्याकडे याचा उपयोग करीत असे तैत्तिरीय संहितेंत म्हटलें आहे

[४५]गवीधुका, गवेधुका – गवताच्या जातीचें नाव गावीधुक आणि गवेधुक ही विशेषणरूपेंहि आहेत तें तांदुळाबरोबर (गवीधुका-यवागू) अथवा जवाबरोबर (गवधुकासक्तव) काजी करण्याकरितां शिजवीत असत

[४६]निर्यास –याचा झाडाचा चीक असा अर्थ आहे तैत्तिरीय संहितेंत (२ १, ५, ४) याच्या रक्तवर्णावरून हें निषिद्ध अन्न मानलेलें आहे

[४७]पिंजूल –तृणांकुर किंवा विशेषत दर्भ याच्या जुड्या असा याचा अर्थ आहे हा शब्द तैत्तिरीय संहिता व ब्राह्मण या ग्रंथांत सापडतो

[४८]पुंजील –तैत्तिरीय संहिता व तैत्तिरीय ब्राह्मण यामध्यें गवताची लहान पेंडी या अर्थानें व पिंजूलाचा पर्याय म्हणून हा शब्द आलेला आहे

[४९]बल्वज –हें एक प्रकारच्या गवताचें नाव आहे याचा अथर्ववेदांत उल्लेख येतो हें सुराढोराच्या मलमूत्रापासून उत्पन्न होतें असें यजुर्वेदसंहितेंत म्हटलें आहे याचा बहिर् सारखा किंवा जळण म्हणून उपयोग करीत असें आढळतें ऋग्वेदांत दानस्तुतींत याच्या टोपल्या किंवा इतर वस्तू तयार होत असा उल्लेख आढळतो

[५०]बिल्व –हें एका प्रकारच्या कठाण फळाच्या झाडाचें (बेल) नांव आहे याचा निर्देश ब्राह्मणांत आणि अथर्ववेदांत केला आहे तेथें अत्यंत महत्त्वाच्या फळाचा उल्लेख येतो तैत्तिरीय संहितेंत व ब्राह्मण ग्रंथांत यज्ञांत दिल्या जाणाऱ्या बलीस बांधण्याकरितां कधीं कधीं बिल्व वृक्षाचा स्तंभ (यूप) करीत असत असें म्हटलें आहे शांखायन आरण्यकांत बिल्व वृक्षाच्या ताडताच्या स्तुतीपर मंत्र आहे

[५१]विकंकत —उत्तरकालीन संहिता ग्रंथांत व ब्राह्मण ग्रंथांत हा शब्द एका झाडाचें नांव म्हणून आलेला आहे काहीं विशिष्ट यागांत अग्नि प्रदीप्त करण्याकडे या लाकडाचा उपयोग करीत असत

[५२]सुगंधितेजन —उत्तरकालीन संहिता व ब्राह्मण ग्रंथांत एक प्रकारचें सुगंधि गवत असा याचा अर्थ आहे अरणींतून

उत्पन्न केलेला अग्नि वेदीवर ठेवताना तो पेटण्यासाठीं याचा उपयोग करीत असत.

[53] स्तंब.—अथर्ववेद व मागाहून झालेले ग्रंथ यामध्ये गवताचा किंवा कोठल्याहि तऱ्हेचा झुपका अशा अर्थानें हा शब्द आलेला आहे.

[54] अजशृंगी.—(बकऱ्याचे शिंग) याची भाष्यकारांनीं विपाणिन् याबरोबर तुलना केली आहे. याची अथर्ववेदात राक्षसघ्न अशी ख्याति आहे. याचें दुसरें नाव अराटकी हें आहे. वेबर असें सुचवितो कीं हा शब्द ' प्रोसोपिस् स्पिसि जिरा ' किंवा ' मिमोसा अॅक्रोमा ' या अर्थी असावा.

[55] अपामार्ग.– अभिचारामध्यें औषधाकडे मुख्यत्वेंकरून क्षेत्रिय रोगाला या झाडाचा वारंवार उपयोग करितात. अथर्ववेदात त्याचें " परत येणारें " असें वर्णन आहे असें रॉथ आणि झिमर यांचें मत आहे कारण त्याचे काटे उलटे असतात (व्हिट्नेचेंहि हेंच मत आहे.) अथवा योजकाच्या अंगावरच परत तो मंत्र या औषधीच्या योगानें फिरतो म्हणून हा अर्थ असावा असें ब्लूमफील्डचें मत आहे. या वनस्पतीचे काटे उलटे असतात म्हणूनच ती मंत्र उलटविण्याकरितां उपयोगात आणीत असत असें दिसतें.

[56] अमूला.–(मूल रहित.) बाणानां विषारी करण्याकरितां या झाडाचा उपयोग करीत असत असें अथर्ववेद म्हणतो. तथापि ' जंगम मालमत्ता ' असा अर्थ ब्लूमफील्ड करतो.

[57] अराटकी.—अथर्ववेदांत या झाडाचें एकदांच वर्णन आलें आहे. आणि बहुतकरून अजशृंगी आणि हें झाड एकच असावें, असें वाटतें.

[58] अरुन्धती.– अथर्ववेदात पुष्कळशा मंत्रात घाव किंवा आघात बरें करणारें, ताप घालविणारें आणि गाईंना दूध उत्पन्न करणारें असे या झाडाचें वर्णन आहे ही वनस्पति बहुधा प्लक्ष, अश्वत्थ, न्यग्रोध, आणि पर्ण अशा झाडांच्या आश्रयानें राहात असते. हिचा रंग सोनेरी आणि देंठ केंसाळ (हिरण्यवर्णालोमश वक्षणाच) असे. हिला सिलाची देखील म्हणत आणि लाक्षा बहुतकरून हीपासून तयार होत असली पाहिजे.

[59] अर्क.– अथर्ववेदांतील एका मंत्रांत अर्क हें एका झाडाचें नांव आहे असें आढळतें. आधुनिक संस्कृतात हा शब्द मराठींतील ' रुइ या अर्थानें येतो.

[60] अलसाला.– अथर्ववेदांतील एका मंत्रात हा शब्द धान्यलता अशा अर्थी योजिला आहे

[61] अलाबु.– दुधभोपळा. अथर्ववेदात त्याचा भांड्यासारखा उपयोग करीत असत असा उल्लेख आहे.

[62] अवका.– अथर्ववेद आणि तदुत्तर संहिता आणि ब्राह्मणें यांत हें एक पाण्यांतले झाड आहे असा उल्लेख आहे. गन्धर्व याचा उपयोग खाण्याकडे करीत. त्याचें नंतरचें नाव शैवल असून तें आणि शीपाल हीं एकच होत.

[63] अश्वत्थ:—भरतखंडांतील झाडांपैकीं मोठें झाड. याला पिंपळ म्हणतात. ऋग्वेदात (१. १३५, ८; १०. ९७, ५) या झाडापासून जहाजें करितात असा उल्लेख आहे, (हीं नुसती कल्पना आहे. मूळात तसा स्पष्ट उल्लेख नाहीं.) आणि तदनंतरच्या ग्रंथात त्या झाडाचा वारवार उल्लेख आलेला आहे. हीं लाकडें एकमेकावर घासून विस्तव काढीत असत, त्यात वरचें लांकूड पिंपळाचें आणि खालचें शमीचें असे. क्वचित् स्थलीं हीं झाडें दुसऱ्या झाडाच्या—मुख्यत्वेंकरून खदिराच्या—फांद्यांवर वाढतात. आणि त्या झाडाचा नाश करितात; म्हणून त्याना ' नाश करणारा ' (वैबाध) असें म्हणतात. याचीं फळें गोड असून पक्षी त्यांचें भक्षण करितात. या झाडाखालीं ईश्वर वास करितो अशी समजूत आहे. हा वृक्ष आणि न्यग्रोध याना ' शिखण्डिन् ' असें म्हणतात.

[64] आण्डीक.—अथर्ववेदात हा शब्द भक्षणीय वनस्पति म्हणून आलेला आहे. फलें अथवा पानें अंडाकृति किंवा कमळाच्या आकारासारखीं असतात.

[65] आल.—अथर्ववेदात या शब्दाचा अर्थ 'गवत' असावा. सायणांच्या मताप्रमाणें सस्यवल्ली असा अर्थ असणाऱ्या अलसाला, सिलाजाला व नीलागलसाला या तीन शब्दांचा हा अवयव आहे. व्हिटने म्हणतो कीं या शब्दांना एकादा विवक्षित अर्थ देतां येत नाहीं.

[66] इट.—अथर्ववेदांत हा शब्द दोन वेळा आलेला आहे. पहिल्या उताऱ्यांत याचा अर्थ वर्षामध्यें नाश पावणारा लव्हाळा आणि दुसऱ्यात घराचें गवताचें काम, असा केला आहे.

[67] इषीका.—' गवताचें किंवा बोरुचें काण्ड. ' अथर्ववेद आणि त्यानंतरचे ग्रंथ यात ' अशक्तपणा, नाशिवंतपणा, ठिसूळपणा ' या अर्थी हा शब्द वारंवार योजिला आहे. शाखायन आरण्यकात गाईच्या गोठयाच्या अर्गलेला जी खीळ असते त्या अर्थी हा योजिला आहे (अगलेषीके). शतपथ ब्राह्मणांत ' इषीकांनीं भरलेलें शूर्प ' असा उल्लेख आहे.

[68] उदुम्बर.– ऋग्वेदात जरी हें नांव नाहीं तथापि अथर्ववेद आणि त्यानंतर हें नाव आढळतें. कोणच्याहि धर्मविधींत याच्या समिधाचा उपयोग करीत असत. यूप आणि दर्वी याचीच करीत असत आणि उदुंबराच्या ताईताचा देखील उल्लेख आहे. त्याचें लाकूड – दुसऱ्या अश्वत्थ, न्यग्रोध, आणि प्लक्ष वगैरेप्रमाणें – यज्ञामध्यें उपयोग करण्याला योग्य आहे असें मानीत असत ऐतरेय ब्राह्मणांत त्याचीं फळें गोड असल्याकारणानें त्या फळांनां 'मधु' म्हटलें आहे. यास वर्षांतून तीन वेळां पाड लागतो असाहि उल्लेख आहे. पंचविंश ब्राह्मणात उदुम्बराच्या जंगलांचाहि निर्देश आहे.

[६९]कुमुद – अथर्ववेदात एका ठिकाणीं दुसऱ्या कित्येक पाण रोपामध्ये या रोपाचेहि नांव आहे हें रोप म्हणजे पांढरें कमळच असलें पाहिजे आणि हें नांव वेदोत्तर संस्कृतात विशेष आढळते

[७०]कूदीं – कांहीं प्रतींत कूटी असा पाठ आढळतो अथर्ववेद आणि कौशिक सूत्रांत याची डाहाळी, (जीवानें पुन्हा शरीरांत प्रवेश करू नये म्हणून) शवाला बांधीत, असें विधान आहे भाष्य कार, बदरी आणि हें झाड एकच आहे असें म्हणतो

[७१]जीवन्त –अथर्ववेदामध्यें एका मन्त्रात याचा अर्थ एखादी वनस्पति असा असावा असें वाटतें जीवन्त याच्याबद्दल जीवल अथा शोध जो व्हिटने व रॉथ यांनीं घातलेला आहे, तो अस मर्थनीय वाटतो

[७२]तान्द्भग –(सहज मोडलेले) हा शब्द अथर्ववेदामध्यें एखाद्या वृक्षाचें किंवा वनस्पतीचे नांव म्हणून आलेला आहे कौशिक सूत्रामध्यें हा समास असा गणला आहे व त्या सूत्रा वरील भाष्यकाराचे मतें हा एरंड वृक्ष असावा व्हिटनेच्या मतें हे शब्द निराळे आहेत व त्यांचा अर्थ 'भागप्रमाणे ते चढून (तानत्) मोडीत' असा तो आपल्या पुस्तकातील उताऱ्यात देतो

[७३]त्रायमाण –अथर्ववेदामध्ये एका अपरिचित झाडाचे हें नांव आहे हा शब्द बहुतकरून नुसतें विशेषण असावें व रक्षण करणारा हा त्याचा अर्थ आहे पण हा अर्थ स्वरामुळें स्वीकारतां येत नाहीं

[७४]धव –अथर्ववेदामध्ये प्लक्ष, अश्वत्थ व खादिर या झाडाच्या नांवाबरोबर उल्लेखिलेलें हें एका वृक्षाचें नाव आहे धव म्हणजे मनुष्य हें नाव निरुक्ताचे अगोदर आलेले नाहीं विधवा या शब्दा मुळेंच धव या शब्दाला अस्तित्व आहे विधवा या शब्दाचा व्युत्पत्ति नवऱ्याविरहित अशी चुकीची (?) केलेली आहे

[७५]नलद –'जटामांसी नावाची सुगंधी वनस्पति' असा याचा अर्थ असून हा शब्द अथर्ववेद, ऐतरेय, व शांखायन आरण्यकात आलेला आहे (या आरण्यकात असेंहि म्हटलें आहे कीं, हिचा उपयोग माळेकरिता होतो) सूत्रग्रथांतहि हा शब्द आलेला आहे अथर्ववेदामध्यें नलदी हा स्त्रीलिंगी शब्द आलेला आहे व तो अप्सराबद्दल आलेला आहे

[७६]नीलागलसाला – अथर्ववेदाच्या पैप्पलाद संहितेमध्ये नीलाकलसाला हा पाठ असून भाष्यकाराचे मताप्रमाणें अथर्व वेदामध्यें धान्यलता अशा अर्थानें हा शब्द आलेला असावा

[७७]न्यग्रोध – 'खालीं खाली वाढणारें झाड' हें आपल्या फांद्या जमीनींत रोवून नवीन बुंधे बनविण्याबद्दल प्रसिद्ध आहे ऋग्वेदामध्यें जरी या वृक्षाचें नांव आलेलें नाहीं तरी पिशेलनें एका सूक्तावरून (त्यांत न्यग्रोधाचीं सर्व लक्षणे आलीं आहेत) सिद्ध केल्याप्रमाणे हा वृक्ष त्या काळीं लोकांस ठाऊक असला पाहिजे या वृक्षाचा उल्लेख अथर्ववेद व मागाहूनचें वाङ्मय यात आलेला आहे यज्ञातील पात्रें याच्याच लाकडाची बनविलेलीं असत, ह्यांच्याप्रमाणे पूर्वी सुद्धा या झाडाचें महत्व फार असावें याच्याच जातींतील अश्वत्थ वृक्षाचा उल्लेख अथर्ववेदांत अगोदरच आलेला आहे.

[७८]न्यस्तिका – अथर्ववेदामध्ये एक प्रकारची वनस्पति असा याचा अर्थ आहे भाष्यकार या वनस्पतीला शंखपुष्पिका असेंहि म्हणतात.

[७९]परुषु – अथर्ववेदामध्ये (८. ८, ४) याचा अर्थ वेत व शांखायन श्रौतसूत्रा (१९ २२, २०) मध्यें बाण असा आहे

[८०]पाटा – अथर्ववेदामध्ये व कौशिक सूत्रांत हें नांव आलेले आहे भाष्यकाराचे मतानें ही वनस्पति व मागाहून प्रसिद्धीस आलेली पाठा वनस्पति दोन्ही एकच होत या वनस्पतीचा पूर्वी औषधि म्हणून बराच उपयोग होत असे व रॉथचे मतान हल्लीहि तसा उपयोग होतो हा शब्द पाठा असाच समजणें इष्ट आहे

[८१]पीलु – बहुतेक ज्या झाडाच्या फळावर उपजीविका करतात त्या झाडाचे हें नांव अथर्ववेदामध्ये आलेले आहे (कदाचित् हें अक्रोडाचें झाड असावें)

[८२]पूतिरज्जू – रॉथच्या मताप्रमाणे हें अथर्ववेदात एका अप्रसिद्ध वल्लीच्या जातीचे नाव आले आहे कौशिक सूत्रात याचा "सडकी, कुजकी दोरी" या अर्थानें उपयोग केला आहे परंतु याचा अर्थ साप असा असावा असें लुडविग् सुचवितो

[८३]पूतुद्रु – अथर्ववेदात व यजुर्वेद संहितेत हें देवदाराचें दुसरें नाव आहे कौशिकसूत्रांत याचें पूर्णरूप पूतुदारु असें आहे

[८४]पृश्निपर्णी –(ठिपके असलेलें चित्रविचित्र पान) हें एका वल्लीचें नाव अथर्ववेदाच्या एका ऋचेत आलें आहे. कण्व नांवाच्या गर्भपात करणाऱ्या दुष्ट लोकापासून संरक्षण करण्याच्या कामीं ही वल्ली उपयोगी पडे ही शतपथब्राह्मणात सुद्धा आली आहे सेंटपीटर्सबर्गच्या कोशांत 'हर्मिओनिटिस कार्डिफोलिआ' म्हणून तिला म्हटले आहे परंतु रॉथ आपल्या पुढील लेखांत असें म्हणतो कीं जिला लक्ष्मणा म्हणतात तीच ही वल्ली होय, आणि इचा उपयोग वांझपणा दूर करण्याकडे होत असे एका भाष्यकाराच्या मतानें, (त्याने कात्यायन श्रौतसूत्रात म्हटल्या-प्रमाणें) 'ग्लिसाइन डेबिलिस' असें म्हणण्याचाच येथे उद्देश असावा

[८५]प्लक्ष – हें वीचिपर्णयुक्त उंबराच्या जातीच्या एका झाडाचे नाव आहे हें सुंदर आणि उंच झाड असून यास पांढरी लहान फळें येतात याचा उल्लेख अथर्ववेद आणि तैत्तिरीय संहिता यातून न्यग्रोध आणि पर्ण यांच्याबरोबर आलेला आहे व्युत्पत्तिदृष्ट्या

याचे प्रक्ष असे रूपातर तैत्तिरीय सहितेंत आले आहे याचा ब्राह्मग ग्रंथांतहि उल्लेख येतो

[८] भग – 'भाग' याचा उल्लेख अथर्ववेदात येतो ऋग्वेदांत (९ ६१, १३) हें सोमाचे विशेषण म्हणून आले आहे व त्याठिकाणीं त्याचा बहुधा अर्थ 'मादक' असा आहे व तोच अर्थ आता भागेचा विशेष म्हणून समजतात

[८७] मदुघ – मधुवेल हें एक मधुर-गोड – अशा एका वेलीचें नाव अथर्ववेदात आले आहे याच्या रूपाबद्दल बराच संशय आहे कारण पुष्कळ दुसऱ्या हस्तलिखितातून मधुघ हा शब्द आला आहे

[८८] रजनी – हा शब्द अथर्ववेदाच्या एका उताऱ्यांत सांपडतो, तेथे त्याचा अर्थ एक प्रकारचें रोपडें असा आहे बहुधा हा अर्थ त्याच्या धात्वर्थापासून निघाला आहे (रञ् = रंगविणे) हें रोपडें कोणतें हें नक्की ठरविता येत नाही।

[८९] वानस्पत्य – अथर्ववेदात एक दोन ठिकाणा हा शब्द पुल्लिंगी, लहान वृक्ष अशा अर्थी आलेला आहे इतर ठिकाणा नपुसकलिंगी याचा अर्थ वृक्ष (वनस्पतीचे) फळ असा होतो

[९०] विपाणका – अथर्ववेदामध्यें एका वनस्पतीचे हें नांव आहे ब्लूमफील्डचे मतें या शब्दाचा अर्थ नुसतें शिंग असा आहे वातीकार नावाच्या रोगावर इलाज म्हणून याचा उपयोग होतो या रोगाच निश्चित स्वरूप समजत नाहीं झिमरचे मत असें आहे कीं, क्षतामुळें हा रोग उत्पन्न होतो व झिमर या शब्दाशीं अ-वात (इजा न झालेला) या ऋग्वेदातील विशेषणाची तुलना करतो पण ब्लूमफील्डचे असे मत आहे की, शरीरांतल्या वाता मुळें हा रोग उत्पन्न होतो

[९१] विहल्ह – अथर्ववेदामध्ये एका वनस्पतीचें हें नाव आहे विहल्म व विहल्ल असे याच शब्दाचे दुसरे पर्याय आहेत

[९२] शफक – अथर्ववेदामध्ये एका वनस्पतीचं हें नांव आलेलें आहे हें नाव आपस्तंब श्रौतसूत्रांतहि आलेले आहे व त्या ठिकाणीं त्याचा अर्थ खाण्यालायक फळ किंवा पाण्यांत वाढणारी वनस्पति असा आहे कदाचित हें पाण्यांत वाढणारें एखादें फळ असेल याला शफक नाव पडण्याचें कारण त्याच्या पानाचा आकार खुरा (शफा) प्रमाणें असतो

[९३] शमी – अथर्ववेद व मागाहून झालेले ग्रंथ यामध्यें एका वृक्षाचें हें नाव आलेलें आहे अथर्ववेदामध्यें केंसाला अपायकारक मद उत्पन्न करणारे व रुंद पानाचें असें याचें वर्णन आलेले आहे हे गुण ज्याला इग्रजींत 'प्रोसोपिस् स्पिसिजिरा' किंवा 'मिमोसा सुमा' म्हणतात त्यांत दिसून येत नाहींत शमीच्या लाकडा पासून यज्ञातला अग्नि उत्पन्न करण्याकरितां ज्या अरणीचा उपयोग होत असे त्या अरणीच्या खालचा भाग शमीचा बनवीत व वरचा भाग अश्वत्थाच्या लांकडापासून तयार करीत या शमीच्या फळाला शमा नांव असें नांव आहे.

[९४] सह – अथर्ववेदामध्ये रॉथचे मतानें हें एका वनस्पतीचे नांव आहे पण ब्लूमफील्डच्या मताने हा शब्द नुसते विशेषण असून त्याचा अर्थ प्रबल असा आहे

[९५] सिलाजाला – भाष्यकाराच्या मतानें हा शब्द शलाजाला असा असून अथर्ववेदांत त्याचा एक वनस्पति (कदाचित् 'ग्रेन कीपर') असा आहे कौशिकसूत्रात हा शब्द शिलाजाला असा आहे

[९६] कर्कन्धु – वाजसनेयि सहितेंत हा शब्द बोरीचें झाड आणि फळे याना लाविलेला आहे बोराचा रग लाल (रोहित) असतो कुवल आणि बदर म्हणजे फळें असादि अर्थ मानला जातो

[९७] शष्प – वाजसनेयि सहिता व ब्राह्मण ग्रंथ यामध्यें नवें किंवा अंकुर फुटलेले गवत असा याचा अर्थ आहे

[९८] अश्ववार, अश्ववाल – पहिला शब्द मैत्रायणीसहितेंत आणि दुसरा शब्द काठक व कपिष्ठल सहितेंत आणि शतपथ ब्राह्मणात, एक जातीचा बोरू या अर्थी योजिला आहे

[९९] आदार – सोमाच्याबद्दल या झाडाचा उपयोग करीत असत असा कठसहितेत (२४ ३) उल्लेख आहे पूतिका आणि हें झाड एकच असें शतपथ ब्राह्मण (४ ५, १०, ४) म्हणतें

[१००] कुवल.– यजुर्वेदसहिता आणि ब्राह्मण यामध्यें हें बोराचें नाव आहे हें कर्कन्धु आणि बदर याबरोबर वारवार येते

[१०१] क्रमुक – काठकसहिता आणि शतपथ ब्राह्मण यांत याचा अर्थ जळाऊ लांकडाच्या एका जातीचें नाव असा आहे

[१०२] पीतुदारु – काठकसहितेमध्यें व मागाहूनच्या ग्रंथात हा शब्द आलेला असून त्याचा अर्थ काहींच्या मतें देवदारु व इत रांचे मतें खदिर किंवा उदुंबर वृक्ष असा आहे

[१०३] रोहितक – मैत्रायणीसहितेत एका वृक्षाचें नाव म्हणून रोहीतक या बदललेल्या पाठानें हा शब्द आला आहे

[१०४] वृप – कठसहितेमध्यें एक प्रकारची वनस्पति असा या शब्दाचा अर्थ दिलेला आहे. पुढें 'जेडारस्सा व्हॅलॉरिस' याला हेंच नांव दिले असेल मैत्रायणीसहितेमध्यें वृश असा शब्द आला आहे व बोथलिंग त्याचा अर्थ एक लहान जनावर असा करतो हा अर्थ अगदी शक्य आहे

[१०५] अन्यतःप्लक्षा – (एकाच बाजूला फडफडणाऱ्या पानांची उबराची झाडें) शतपथ ब्राह्मणांत हें कुरुक्षेत्रातील एका सरोवराचें नांव आहे त्याचा उल्लेख पुरूरवा आणि उर्वशी याच्या गोष्टींत केलेला आहे. सिरमोरमध्ये कोठेंतरी तें असावें असें पिशेल म्हणतो.

[१०६] अमला – हें बहुतकरून आवळ्याचे झाड असावें याला आमलक अथवा आमिलका असेंहि म्हणतात जैमिनीय उपनिषद् ब्राह्मणांत (१ ३८, ६) याचा उल्लेख आहे.

[१०७]अश्मगंधा.– शतपथ ब्राह्मणांत या झाडाचा उल्लेख आहे. अश्वगंधा व हें झाड बहुधा एकच आहे.

[१०८]अश्ववाल.– शतपथ ब्राह्मणात ( ३. ४, १, १७, ६, ३, १० ) हें विशेषण ( अश्वपुच्छतृणकृत ) प्रस्तर याच्याकडे लाविलें आहे, यावरून अश्ववाल तृणाचें अस्तित्व सिद्ध होतें.

[१०९]उशना.– ज्या झाडापासून सोमरस काढीत असत त्या झाडाचें हें नाव आहे असें शतपथ ब्राह्मणांत ( ३. ४, ३, १३, ४. २, ५, १५ ) लिहिलें आहे.

[११०]कुश – 'पवित्र गवत.' दर्भ या अर्थानें हा शब्द शतपथ ब्राह्मणात येतो. सें. पी. कोशांत याचा अर्थ फक्त गवत असा केला आहे

[१११]ताष्टोघ.– हा वृक्षविशेष आहे म्हणून कौशिक सूत्रांत याचा उल्लेख केलेला आहे. या शब्दापासून बनलेले ताष्टोघी हें विशेषण अथर्ववेदामध्यें आलेलें आहे वेबरच्या मतें सर्षप, मराठींत मोहरीचे झाड, असा याचा अर्थ होतो.

[११२]तिल्वक.– हा शब्द शतपथ ब्राह्मणामध्यें एका झाडाचें नांव म्हणून आलेला आहे. या झाडाजवळ समाधि बांधणे हें अशुभ मानलेलें आहे. या शब्दापासून बनलेलें तैल्वक हें विशेषण मैत्रायणी संहितेंत आहे, व षड्विंश ब्राह्मणांत यूपाचें वर्णन करण्याकडे याचा उपयोग केलेला आहे

[११३]त्रिप्लक्ष.– पुल्लिंगी अनेकवचनी. या शब्दाचा अर्थ 'तीन उंबराचीं झाडें' असा आहे पंचविंश ब्राह्मणाप्रमाणें हा शब्द ज्या ठिकाणीं यमुनेजवळ दृषद्वती अदृश्य झाली त्या जागेचें नाव आहे.

[११४]नैचुदार.– 'निचुदार लाकडाचें बनविलेलें' अशा अर्थानें पंचविंश ब्राह्मणात हा शब्द आलेला आहे हा निचुदार वृक्ष कसा होता हें समजत नाहीं.

[११५]पलाश – पर्ण शब्दाप्रमाणे याचा अर्थ ब्राह्मणग्रंथांत पान असा आहे. या नावाचा एक वृक्ष सुद्धां असून याचें पहिलें नाव पर्ण असे आहे.

[११६]प्रप्रोथ – पंचविंश ब्राह्मणांत ( ८. ४, १, ) हें सोमाच्या ऐवजीं उपयोगात आणावयाच्या एका वल्लीचें नाव आहे.

[११७]फलवती – षड्विंश ब्राह्मणांत हा शब्द आला आहे. फलयुक्त, फलांनीं लादलेली असा याचा अर्थ आहे. हें एका वेलीचें नाव आहे. भाष्यकारांच्या मतें ही प्रियंगूच होय.

[११८]शिंब.– हा शब्द जैमिनीय उपनिषद्‌ ब्राह्मणांत आढळतो ( ३. ५, ६ ). हें एका झाडाचें नांव आहे

## प्राणी.

खालील प्राणिवाचक शब्दांकडे पाहिले असता अश्व व गो यास असलेली अनेक नांवें व अश्वसंबद्ध अनेक पारिभाषिक व इतर शब्द यावरून त्या कालीं या दोन पशूंचें महत्त्व किती होतें याची कल्पना होते. पक्षांच्या नावांमध्यें आज आपणास परिचित अशींहि कांहीं नांवें आढळतात. पक्ष्यांना नावें त्यांचे रंग, शब्द व गीतें वगैरे गुणांवरून पडत असत असें दिसतें. सर्पांना तैत्तिरीय संहितेंत जीं अनेक नांवें आढळतात त्यावरून त्या कालींहि या मानवशत्रूचें महत्त्व तत्कालीन लोकास पटलें होतें असें दिसतें. चतुरक्ष हें यमाच्या कुत्र्याचें नाव पश्चिमभारतीय काळाची आठवण करून देतें. महाहस्तिन् या शब्दावरून एखाद्याला गजेन्द्राची किंवा दुसऱ्या एखाद्या मॅमथची आठवण होण्यास जागा आहे! आज सामान्यतः परिचित असणारे प्राणी त्या कालींहि ज्ञात होते असे दिसतें. मुष्कावर्ह या शब्दावरून अथर्ववेदकाळीं बैल बडवीत असत हें स्पष्ट होतें. व्याघ्र हा शब्द ऋग्वेदांत आढळत नसून अथर्ववेदांत आढळतो यावरून भरतखंडातील वसाहतीच्या काळासंबंधीचे व वेदांच्या पौर्वापर्यासंबंधीं अनुमान काढण्यास एक जागा मिळते. तसेंच प्राण्यासंबंधीं जीं विशेषणें आढळतात त्यावरून प्राण्यांच्या गुणाविषयींचें तत्कालीन ज्ञान नजरेस येतें.

### अश्वनामें [ ऋग्वेद ]

| | | |
|---|---|---|
| अक्र | दधिक्र | रोहित् |
| अत्य | दधिक्रावन् | वह्नि |
| अश्य | दिवक्षस् | [१०]वाजिन् |
| अर्वन् | देवयुक्त | वाहस् |
| अव्यथि | दौर्गह | वाहिष्ठ |
| अश्व | धीतरि ( वडवा ) | वृषण्वती ( वडवा ) |
| अश्वा | नर | श्यावन् |
| आश्विया | पतंग | श्यावी |
| [२]आजि ( शर्यतीची घोडी ) | पतंगर | श्येन |
| | [५]परस्वत | सदश्व |
| आशु | पैद्व | [११]सप्ति |
| आश्वश्वतम | [६]प्रष्टि ( रथास जुंपलेला तिसरा घोडा ) | सुपर्ण |
| [३]एत | | सुराश्वस् |
| एतग्व | | सूर्यश्वित् |
| एतश | बभ्र | [१२]स्यूमगृभ् |
| औच्चैःश्रवस् | मंश्चतु | स्वभीशु |
| जन्य | माश्वत्व | स्वश्व |
| जीराश्व | [७]मर्य | हंस |
| | [८]मेना | |
| तक्र | योग | हय |
| तक्वन् | रेणुकक्काट | हरि |
| तपुप | [९]रोहित ( तांबडा घोडा ) | हिरण्यपर्ण |
| [४]तार्क्ष्य | | ह्वार्य |

### [ तै. सं. ]

| | | |
|---|---|---|
| अर्वत् | देववंध | द्रुमनस् |
| अश्व | देववात | वृषादस् |
| उद्द्राव | निरष्ट | पतंग |
| उपरत | निराधान ( स्यामरहित ) | पोष्य |
| देवजात | | प्रगर्धिन् |

| | | |
|---|---|---|
| प्रानापय ( प्रनाप तीर्नें उत्पन्न केलेला ) | यशा | वाहस् |
| | रथवाहन | वीतपृष्ठ |
| | लाजी | शाची |
| प्राणवृक् | वडवा ( घोडी ) | स्वस्ति |
| मम | वाजजित् | स्वर्क |
| मितद्रव | वाजिन् | स्वास्तिगव्यूति |

[ अथर्ववेद ]

| | | |
|---|---|---|
| अर्वती | नियुत्वत् ( वायुवाहक अश्व ) | वाजिन् |
| अर्वन् | | विपथवाहन |
| अश्व | पृष्टि | वियुन् ( घोडी ) |
| अश्वतर | पैद्व | सप्ति |
| अश्वतरी | मयूररोम | |
| अश्व्य | रथवाहन | सुराशु |
| आशु | रेणुककाट | हरि |

## अश्वसंबंधीं [ ऋग्वेद ]

| | | |
|---|---|---|
| अगिरौकस् | नेपत्तम ( सुखनेता ) | वाजसृत् ( संग्रामयायी ) |
| अग्रमातशोचिष् | | |
| अनवब्ययन् | [15]पड्वीश ( पायवंद ) | वारवत् (पुच्छयुक्त) |
| अपस्य | | विपक्षस् |
| [13]अभीशु | पावोश्व | वीतपृष्ठ |
| अर्वश | पृथदश्व | वीरवाह |
| अश्वचद | प्रोथत् | वीळुपत्मन् |
| अश्वपेशस् | प्रसक्षिण ( प्रसहनशील ) | शुनपृष्ठ ( सुखपृष्ठ ) |
| अश्वयत् | | शूकृत ( शब्दकरणारी घोडी ) |
| अश्ववत् | ब्रह्मयुज् | |
| अश्वसातम | भृम | शूरण |
| अश्वाजनि | मक्षुयु ( वेगवान् ) | सपर्यु ( हरिद्वर्णअश्व ) |
| अष्ट्रन् ( चाबूक ) | मश्व | |
| इपुकृत | [16]मधुकशा | राहवाह |
| ऋतयुक् | मुपितासु | सुष्टुवाह |
| ऋधद्रय | युयुजानसप्ती | स्यन |
| कशा | रघु | स्वभीशु ( चांगला लगाम ) |
| किरण ( लगाम ) | रघुज | |
| क्षिपाणि ( चाबूक ) | रघुद्रु | स्वयुक्ति ( आपोआप जोडले जाणारे घोडे ) |
| खेदा ( लगाम ) | रघुपत्वन् | |
| [14]गभस्ति | रथवाहन | |
| गो ( लगाम ) | रथस्पृश् | स्वश्व्य |
| दुर्धर | रश्मि ( लगाम ) | स्तौल (स्थूल घोडी) |
| द्रवचक्र | वचोयुज् ( वचनमात्रेणैव युज्यमान ) | स्मदभीशु |
| द्रवत्पाणि | | हिरिश्मश्रु |
| द्रवदश्व | | हिरीमश |
| दाण्यश्व | | |
| धनुतर | वभ्री | हेम्यावत् |

[ तै स ]

| | | |
|---|---|---|
| अतराधान ( तोंडांत दिलेला लगाम ) | आधान ( लगाम ) | वाजिनीवत् ( चाबूकविशेषण ) |
| | नासिकनत् | |
| अवमार्जन (खरारा ) | निक्रमण | सन्दान ( लगाम ) |
| अश्वतृणप | निधान | हिरण्यशृंग |

[ अथर्ववेद ]

| | | |
|---|---|---|
| अश्वाभिधानी | पड्वीश ( पायवंद ) | रशना |
| अष्ट ( प्रतोद किंवा लगाम ) | | रश्मि |
| | प्रष्टि ( दोन घोड्याच्या पुढें जोडलेला घोडा ) | राजाश्व |
| आजनि ( चाबूक ) | | वर्तेक ( प्रणयी अश्व ) |
| आशु | | |
| कशा | वल्वत् | विभत्र |
| नियुत् | मधुकशा | हिरण्यत्वच् |

[ संहितेतर ]

[17]प्रतोद

[1] अश्व –ऋग्वेदापासून वैदिक वाङ्मयात हा शब्द 'घोडा' या अर्थी नेहमीं योजिलेला आढळतो घोड्याला आणखी दुसरीं पुष्कळ नावें आहेत —अत्य-धावणारा, अर्वंत्–जलद वाजिन्–ओढण्यामध्यें मजबूत सप्ति–पळणारा, आणि हय–वेगवान्, घोडीला अश्वा, अत्या, अर्वती, वडवा, इत्यादि वरींच नावें आहेत निरनिराळ्या रगाचे घोडे निरनिराळ्या नावानीं संबोधितात –करडा (हरित, हरि), तांबूस ( अरुण, अरुष, पिशग, रोहित ), तपकिरी ( श्याव ), पाढरा ( श्वेत ) इत्यादि पाढऱ्या घोड्याला काळे कान असले म्हणजे तो फार किंमतवान असतो असें अथर्ववेदात वर्णन आहे घोड्याची किंमत फार असूनहि ते कमी होते असें नाहीं कारण दानस्तुतींत ४०० घोडे दिल्याचें वर्णन आहे कारणप्रसगीं त्याच्यावर सोन्यामोत्याचे दागिने चढवीत असत रथ ओढण्याकडे घोड्याच उपयोगात आणीत असत कारण त्या चपल व खात्रीच्या असत त्याचा गाड्या आढण्याकडेहि उपयोग करीत असत पण तो क्वचितच युद्धात घोड्यावर बसत असत किंवा नाहीं याचा जरी उल्लेख नाहीं तरी दुसऱ्या कारणाकरितां घोड्याचा उपयोग होत असे घोड्याना पागेत बाधून चारा पाणी देत असत, त्याना बाहेरहि चरावयाला सोडीत असत परतु त्यावेळेला त्यांचे पायांना खोडा घालीत असत शर्यतीनतर त्याना पाणी पाजीत असत त्याच्या मोतद्दारांना अश्वपाल, अश्वप, अश्वपति, म्हणत असत घोडे केव्हा केव्हां खच्ची करीत ( वध्रि ) या शिवाय लगाम ( रश्मय ), फाढणी ( अश्वाभिदानी ), चाबूक (अश्वाजनि), याचा उल्लेख आहे सिंधुनदीकांठचे आणि सरस्वतीच्या काठचे घोडे फार मौल्यवान् असत

[2]आजि –शर्यतींतील चपळ घोड्याना (वाजिन्, अत्य) धुवून भूषणें चढवीत असत पिशेल म्हणतो कीं एका शर्यतींतील घोडीचें नांव विश्पला असें होतें तिचा मोडका पाय शर्यतींत आश्विन् यांनीं पुन्हां जोडला होता परतु विश्पला हें स्त्रीचें नांव असावें ऋग्वेदात जें मुद्गल सूक्त आहे त्यात अश्वरथ शर्यतीचा एक गमतीचा गोष्ट आहे. परतु गेल्डनेरनें दिलेली ही कथा चुकीची आहे असें ब्लूमफील्ड म्हणतो पिशेल यानें या शर्यती यज्ञादिस्थात होत असत असें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे परतु त्याचा पुरावा अपूर्ण आहे असें मॅक्डोनेल्ड म्हणतो तथापि राजसूय यज्ञाचे वेळीं व वाजपेय कर्मांत शर्यती होत असत

[7]एत.–अनेक वचनीं ( एताः ). मरुत् यांचे घोडे असा या शब्दाचा अर्थ होतो. ते शीघ्रगामी हरिणांच्या जातीचे असावे. त्यांचा उल्लेख ऋग्वेदांत पुष्कळ वेळां आला असून त्यांची कातडी मरुत् आपल्या खांद्यावर घेत असत असेंहि म्हटलें आहे. त्यांना एकदां पृषुप्रुम हें विशेषण ऋग्वेदांत लाविलेलें आहे, आणि त्या शब्दाचे निरनिराळे अर्थ केले आहेत. उदा० 'रुंद–खुराचे,' 'रुंद–छातीचे,' 'रुंद–पृष्ठभाग असलेले.' यावरून ते हरिण असतील हें संभवत नाहीं.

[8]तार्क्ष्य.–दैवी अश्व–कदाचित् अश्वरूपी सूर्य या अर्थानें–हा शब्द ऋग्वेदांत आलेला आहे. पण फॉय म्हणतो कीं, त्रसदस्यूचा वंशज तृक्षी हा ऋग्वेदांत व पुढेंहि प्रसिद्ध आहे व तृक्षीपासूनच 'तस्य इदं' अशा प्रकारें हा तद्धित शब्द झालेला आहे. तेव्हां तार्क्ष्य म्हणजे तृक्षीचा घोडा असा अर्थ असावा. परंतु हा अर्थ बरोबर आहे असें निश्चितपणें मानतां येत नाहीं.

[9]परस्वत्.–याचा अर्थ मोठें रानटी जनावर असा असून रॉथच्या मतें रानांतलें गाढव असा याचा अर्थ आहे. ऋग्वेदामध्यें वृषाकपि सूक्तांत, अथर्ववेदांत दोनदां व यजुर्वेद संहितेमध्यें अश्वमेधाचे वेळीं बली दिले जाणाऱ्यांचे यादींत याचें नांव आलें आहे. या सर्व ठिकाणीं रानांतलें गाढव हा अर्थ चांगला जुळतो. कौषीतकि उपनिषदांत परश्वा ( न् ) याचा अर्थ ( भाष्यकाराचे मतानें याचा अर्थ साप असा आहे ) काय असावा याविषयीं बराच संशय आहे. हा परश्वा व परस्वत् यांचा परस्पर संबंध कदाचित् कांहीं नसेल. बुल्हरच्या मतें यांचा संबंध पाली भाषेंतल्या पलासाद ( गेंडा ) या शब्दाशीं असूं शकेल.

[8]प्रष्टि.–याचा प्रष्ठाप्रमाणेंच 'पार्श्वाश्व' असा अर्थ आहे. जुंपलेल्या घोड्यांच्या बाजूनें धांवणारा घोडा एवढाच नुसता याचा अर्थ नसून, घोड्यांच्या पुढें, घोड्यांचा नायक म्हणून जुंपलेला घोडा असाहि त्याचा अर्थ आहे. कारण ऋग्वेदांत पृष्टीला उद्देशून हा शब्द आला असतां त्याचा अर्थ वर दिल्याप्रमाणें असावा असें वाटतें. या ठिकाणीं प्रष्टि हा शब्द मरुतांच्या अश्वांना वाहणारे ( वहति रोहितः ) अशा अर्थानें लागू पडतो. एका अथर्ववेदाच्या संदिग्ध वचनांत प्रष्टीचा 'पंचवाही' पाचांनीं ओढलें जाणारें, अशा अर्थानें उल्लेख आला आहे. परंतु याचा नीट अर्थ काय हें समजणें फार कठिण आहे. प्रष्टि हा इतरत्रहि बरेच वेळा येतो. एका वचनांत 'धुर्यौ' आणि 'प्रष्टयौ' हे शब्द एकत्र आलेले आहेत. धुरीला जोडलेल्या घोड्यांच्या दोन्ही बाजूस हे दोन घोडे बांधीत असत असें दिसतें. प्रष्टिमंत, प्रष्टिवाहन्, प्रष्टिवाहिन् हीं सर्व विशेषणें 'रथाचीं' आहेत; व त्यांचा अर्थ जुंपलेल्या अश्वांच्या पुढें किंवा बाजूला जुंपलेल्या घोड्यांनीं ओढला जाणारा रथ असा आहे.

[9]मर्य.—ऋग्वेदांत पुष्कळ ठिकाणीं हा शब्द आला असून त्याचा अर्थ खची न केलेला घोडा, वळू असा आहे. याचें एके ठिकाणीं 'पस्त्यावत्' 'तबेल्यांत ठेवलेला घोडा' असें वर्णन आलें आहे–म्हणजे फार काळजीपूर्वक पोसलेला, बाहेर चरावयास न सोडलेला, असा घोडा.

[8]मेना.—ऋग्वेदांतील कांहीं मंत्रांत या शब्दाचा स्त्री हा अर्थ आहे. घोडी किंवा गाय या अर्थीं कांहीं ठिकाणीं या शब्दाचा उपयोग केला आहे.

[9]रोहित.—ऋग्वेदाच्या कांहीं ऋचांत तांबडी घोडी व पुढील ग्रंथांत तांबडी हरिणी असा सेंटपीटर्सबर्ग कोशाप्रमाणें या शब्दाचा अर्थ आहे.

[10]वाजिन्.—ऋग्वेदामध्यें अनेक ठिकाणीं याचा अर्थ घोडा असा आहे. कारण त्याचे अंगीं चापल्य व बल हीं दोन्हीं असतात. लुडविग म्हणतो त्याप्रमाणें एके ठिकाणीं बृहदुक्थाच्या मुलाचें हें विशेषनाम आहे. पण हा अर्थ ओढाताणीचा दिसतो.

[11]सप्ति.—ऋग्वेद व उत्तरकालीन ग्रंथ यांमध्यें याचा अर्थ चपळ घोडा असा आहे.

[12]स्यूमगृभ्.—ऋग्वेदामध्यें ( ६. ३६, २ ) हा शब्द घोड्याला लाविलेला असून लगाम तोडून पळून जाण्यास उत्सुक झाल्यामुळें आपल्या दातांनीं लगाम चावणारा घोडा असा याचा अर्थ आहे.

[13]अभीशु.–रथाच्या घोड्याचा लगाम दर्शविण्याकरितां हा शब्द वैदिक काळांत ( ऋग्वेदांत ) प्रचारांत असे. बहुधा दोन, चार किंवा पांच घोडे रथाला लावीत असत म्हणून अनेकवचनी शब्द वापरला असावा ( दशाभीशु ).

[14]गभस्ति.–ऋग्वेदांतील देवांच्या वाहनाचें स्यूम–गभस्ति ( दांड्यासारखे लगाम ) या विशेषणांत रथाच्या धुरांड्या असा या शब्दाचा अर्थ आहे असें रॉथ म्हणतो. तैत्तिरीय ब्राह्मणांत हा अनेकवचनात स्वतंत्र शब्द आहे, तथापि अर्थबोध बरोबर होत नाहीं. रॉथ म्हणतो कीं, स्यूमगभस्ति म्हणजे एक प्रकारचा दुहेरी लगाम. ऋ. ७. ७१, ३ या ठिकाणीं गभस्ति याचा अर्थ लगाम असा सायणभाष्यांत दिला आहे. 'स्यूमगभस्तिम् = सुखरश्मिं स्यूतरश्मिं वा' सायण. ऋ. १. १२२, १५ येथें गभस्ति याचा अर्थ सायण दीप्ति म्हणजे तेज असा देतो. तैत्तिरीय ब्राह्मणात 'गभस्ति' हा शब्द गभस्तयः असा अनेक वचनांत आला आहे व त्याचा तेथें तेजवान् ( दीप्तिमत् ) असा अर्थ आहे.

[15]पड्बीश.—घोड्याच्या पायांतला पायबंद असा या शब्दाचा अर्थ पांच ठिकाणीं—ऋग्वेदामध्यें दोन ठिकाणीं व बृहदारण्यक, छांदोग्य उपनिषद् व शांखायन आरण्यक यांत—आलेला आहे. इतर ठिकाणीं त्याचा उपयोग लक्षणेनें आलेला आहे. रॉथचे मतानें याचा शब्दशः अर्थ पाय बांधणें असा आहे. पद् = पाय व बीश हें पद वाजसनेयि संहितेंत वीश् असें लिहिलें असून लॅटिन् भाषेंतल्या व्हिन्सिरे–बांधणें या शब्दाशीं सदृश आहे, पाय बांधून ठेवणें असा अर्थ करणें चुकीचें होईल असें

म्हणतो. कारण, ज्या खुंटीला सिंधू नदीवरील उमद्या घोड्याचा पाय बांधला होता ती खुंटीच तो उपटीत होता असा विलक्षण अर्थ उपनिषदामध्यें करावा लागेल तेव्हां पायाला खोडा घालणें हा या शब्दाचा अर्थ असावा असें तो सुचवितो.

[१६] मधुकशा, मधोःकशा.--ज्या योगानें आश्विन् यज्ञाला मधुरपणा, गोडी आणी। अशा अश्विनाच्या ' मधाच्या चाबकाचें, हें एक नाव आहे. रॉथ मोठवा कल्पनेनें म्हणतो कीं, माध्याच्या कल्पनेवरुन ही कल्पना सुचली असावी.

[१७] प्रतोद.--पंचविंशब्राह्मण आणि अथर्ववेद यात याचा अर्थ व्रात्याचा ' अंकुश ' असा केला आहे व्रात्य म्हणजे मूळचा राहिवाशी, ब्राह्मणविरहितआर्य-ब्राह्मणाखेरीज इतर आर्य. लाट्यायन श्रौतसूत्र ८ ६, ७ या ठिकाणीं प्रतोद शब्द आहे व 'प्रतुदतेऽनेनेति प्रतोद.' म्हणजे चाबूक असा अर्थ त्या ठिकाणीं आहे. शां श्रौतसूत्र १६. ७२, ३ या ठिकाणीं सप्रतोद असा शब्द आहे सप्रतोद म्हणजे सह प्रतोदेन. या ठिकाणीं प्रतोद याचा अर्थ चाबूक असाच आहे अथर्ववेद १५. २, ७ या ठिकाणींहि प्रतोद शब्दाचा अर्थ चाबूक असा आहे. व्रात्य म्हणजे कोण याविषयीं सायणाचार्य अथर्ववेदाच्या १५ व्या कांडाच्या भाष्यारंभाचे वेळीं 'व्रात्यो नाम उपनयनादिसंस्कारहीनः पुरुष । सोऽर्थाद् यज्ञादिवेदविहिताः क्रिया कर्तुं नाधिकारी । न स व्यवहारयोग्यश्च ।' असें म्हणतात.

## गोनामें [ ऋग्वेद ]

अघ्न्या ( गोऱ्हा )
अदिति
अदुग्धा ( धार न काटलेली )
अनड्वाह
अमा ( अपक्वा )
अरिधायस्
[१] अष्टकर्णी
अष्टापदी ( गर्भिणी )
अही
इळा
उक्षन्
उरुधारा
उष्टार
[२] उस्रा
उक्षिक ( दुर्बल वृषभ )
उस्रिय
ऋषभ
कीनाश
क्षामन्
गार्ष्टेय ( सकृत् प्रसूताधेन्वोरपत्यं )
[३] गृष्टि ( सकृत्-प्रसूता धेनु )
[४] गो
[५] गौर
जगती
त्र्यवि ( वत्स )
दंसुपत्नी
[७] दुघा
[८] धेना
[९] धेनु
निर्मज ( विशेष शुद्ध अशी गाय )
पुष्टिगु
[१०] पृषती
प्रस्नाती ( पान्हा आलेली )
प्रायोग ( बैल )
बष्कय ( एक संवत्सराचा गोऱ्हा )
[११] मर्यक
मही
मा
रुप्शदूध
रोहिणी
[१२] वत्स
वन
[१३] वशा ( वंध्या )
वहि
[१४] वहि
[१५] वाहृ ( वाहनशील वृषभ )
वासरी ( बहुक्षीरा )
विश्वदोहस्
वृजनी
वृष
वृषप्रयावन्
[१६] वृषभ
शक्करी
श्रुष्टिगु
श्वित्न ( श्वेतवर्ण-गोयूथ )
श्वैतरी ( श्वततरो-धेनु )
सबर्धुक् (पयोदोग्ध्री)
संमातृ
संशिश्वरी ( बद्ध-पयस्का )
सुदुह
सुहुताद
[१७] सूददोहस्
सूभव
स्तनभुज् ( वत्सान् पाययन्ती )
स्तरी
स्मद्दिष्टी
हिङ्कृण्वती

[ तै. सं. ]

अघ्निया
आमा
उक्षन्
उभयत शीर्ष्णी (प्रसूतिस्थितींतील गाय )
उस्रा
कूटा ( शिंगे मोडलेली )
गर्गर(डुरकणारे बैल)
गो
जरती
[१८] तुर्यवाट्
तुर्यौही
[१९] त्रिवत्स
त्रिवत्सा
लक्ष्मीमती ( सोमविक्रयिणी गाय)
[२०] दित्यवाट्
दित्यौही
धेनु
[२१] निरष्ट
पंचावि
पर्यारिणी ( प्रसावकालापूर्वी प्रसूत होणारी)
[२३] पष्ठवाट्
पीवस्वती
बभ्रुकर्णी
भौमी
[२४] महानिरष्ट
मूर्खा
लक्ष्मणा
वत्स
वत्सतर
वत्सतरी
वहिनी ( ओझें वाहणारी )
विश्रुति
वेहत् ( गर्भपात झालेली )
श्वेतवत्सा
श्वेता
सवात्य ( जुळीं वासरें )
सुदुघा
सुरेना ( सोमक्रय करते वेळीं यावयाची गाय )
सूतवशा ( एक वेळ प्रसूत होऊन वांझ झालेली )
सोमक्रयणी
सौरी

[ अथर्ववेद ]

अघ्नी
अधेनु ( धेनुविरहित वत्स )
अनडुह्
अनुपूर्ववत्सा
अपतुं
अभिशाच्
उक्षन्
उच्चैर्घोषा
उरुघ्नी
उरुधारा
उस्रा
एकवृष
करीषिणी
कर्की
कामदुघा
क्षीरिणी
गविष्ट
गृष्टि
गो
गोघ्ना
घृताची
चतुश्रोना
चतुर्हनु
जीवा
तीक्ष्णशृंग ( बैल )
दशवृष ( दहाबैल )
दुरदभ्ना
दुराधर्षा
द्विजिह्वा
नववृष
नित्यवत्सा
पुरोडाशवत्सा
पृष्टी
पोषयिष्णु
बष्कय
ब्रह्मगवी
भ्रातृव्यघ्नी
महर्षभ
महानघ्नी
महावृष
महीलुका
मूलवर्हणी
मृतवत्सा
यामिनी
रमति
वशा
वशाभोग
वापि
वाश्यमाना
वासिता
विलिप्ती
वेहत् ( गर्भघातिनी )
व्यद्वरी ( दुष्टमार्गवती )
शतापाष्ठा ( केसाळ गाय )
शतौदना ( वन्ध्या गाय )
षड्वृष
समोषधी
सशिश्वरी
साध्वर्या ( अतिथि तर्पका गौ )
सुदुघा
सूतवशा
स्वव्दी
स्वाशु ( जलद चालणारे बैल )
हिङ्कृण्वती

[१] अष्टकर्णी.—ऋग्वेदातील एका उताऱ्यात हा शब्द आहे आणि हें विशेषनाम असावें असें रॉथ म्हणतो. ग्रासमन म्हणतो कीं, याचा अर्थ मनुष्य असा न करितां गाय असा करावा आणि हा

अर्थ सयुक्तिक दिसतो. गायीचेंच असें वर्णन कां असावें याचें कारण कांहीं चांगलें कळत नाहीं. परंतु रॉथ म्हणतो कीं, याचा अर्थ 'छिद्रित कानाची गाय' असा असावा आणि अशीं विशेषणें पाणिनीच्या सूत्रांतहि ( ५ ३,१५ ) आढळतात ( भिन्नकर्णी, छिन्नकर्णी ). मैत्रायणी संहितेंत ( ४. २, ९ ) विष्टकर्ण्यः, कर्करिकर्ण्यः, दात्रकर्ण्यः, स्थूणाकर्ण्यः, छिद्रकर्ण्यः ही जीं विशेषणें आलीं आहेत त्यावरून 'आठाच्या आंकड्यासारख्या चिन्हांकित कानाची' असा जो अर्थ भासमान करतो तो बऱ्याच अंशीं विशद असा आहे. 'चिन्हांकित कानाची' हा जो साधा अर्थ आहे त्याला देखील मैत्रायणी संहितेंतील त्याच उताऱ्यांत अक्ष हें जें क्रियापद आहे त्याचा आधार आहे. अथर्ववेदांत ही खूण मिथुनाची आहे, पुष्कळ उत्पत्ति व्हावी म्हणून ही बहुधा मांत्रिक खूण असावी. कानाला खुणा करणें ही सर्वसाधारण चाल होती. दोन वेळां अथर्ववेदांत त्याचा उल्लेख आहे. त्या खुणेला 'लक्ष्मन्' असें म्हणत आणि ती तांब्याच्या सुरीनें ( लोहित ) केलेली असे. बाणाचें टोंक अथवा लोखंड याचा उपयोग करूं नये पण इक्षुकाण्ड अथवा तांबें याचा उपयोग करावा असें मैत्रायणी संहितेंत वर्णन आहे.

उक्ष, उक्षा, उक्षिक, उक्षिय.- ऋग्वेद आणि तदुत्तर ग्रंथ यांमध्यें हे शब्द पुष्कळ वेळां आलेले आहेत व त्यांचा अर्थ 'बैल' किंवा 'गाय' असा होतो. परंतु नेहमीं त्यांचा संबंध प्रभाताबरोबर जोडलेला असतो. कांहीं उताऱ्यावरून अर्थबोधहि बरोबर होत नाहीं.

गृष्टि.—याचा अर्थ 'एकदांच व्यालेली गाय' असा आहे. ऋग्वेद, अथर्ववेद व मागाहूनचें सूत्रवाङ्मय यांमध्यें हा शब्द आला आहे.

गो.—'बैल' अथवा 'गाय'. हे वैदिक आर्यांच्या संपत्तीचे घटक असून ऋग्वेदानंतर याचा उल्लेख बराच वेळ आला आहे. दूध ( क्षीर ) ताजें पीत असत, किंवा तूप, दहिं अथवा सोम यामध्यें मिसळीन असत, अथवा त्यांत तांदूळ शिजवीत असत ( क्षीरौदन ). सकाळीं ( प्रातर्-दोह ), दुपारीं ( संगव ) आणि संध्याकाळीं ( सायं-दोह ) अशा तीन वेळां गायींचें दूध काढीत असत. त्याच वेळेला म्हणजे दिवसांतून तीन वेळां (प्रातः, संगव, सायम् ) गायी चरावयास सोडीत असत असें तैत्तिरीय ब्राह्मणांत म्हटलें आहे. पहिल्या दोहनाच्या वेळीं पुष्कळ दूध मिळे आणि दुसऱ्या दोन वेळेला थोडें मिळे. ऐतरेय ब्राह्मणाप्रमाणें भरताच्या गायींचे कळप संध्याकाळीं गोठ्यांत आणि दुपारीं 'संगविनी'मध्यें असत असें दिसतें. सायणाचार्यांचें स्पष्टीकरण असें आहे कीं, दूध देणाऱ्या गायी रात्रीं गोठ्यांत असत आणि बाकीच्या उघड्या मैदानांत असत, परंतु दुपारीं उन्हाचे वेळीं दोन्ही एकाच ठिकाणीं गोठाणावर असत. गायी जेव्हां कुरणांत चरत असतात त्या वेळेला स्वसर असें म्हणतात. त्या जेव्हां बाहेर जात तेव्हां त्यांचीं वासरें त्यांच्या बरोबर सोडीत नसत; त्यांना सकाळीं आणि कधीं कधीं संध्याकाळीं त्यांच्या जवळ सोडीत असत. गायी चरावयास गेल्या म्हणजे त्यांची काळजी घेण्याकरितां एक गोप, ( गोपाल ) हातांत पराणी घेऊन त्यांच्याबरोबर हिंडत असे; परंतु त्यांचें हरवणें, खड्ड्यांत पडणें, हातपाय मोडणें, चोरीला जाणें यासारखे सर्व त्रास त्यांच्या मागें असत ( ऋ. १. १२. ) मालकी दर्शविण्याकरितां गायींच्या कानावर खुणा करीत असत ( ऋ. ६ २८, ३ ). दानस्तुतींतील अतिशयोक्तीचा भाग जरी वगळला तरी त्यावरून गुरांचे मोठमोठे कळप असत असें दिसतें. गायींची भरभराट व्हावी म्हणून ( ऋ. १.८, ३ ) ईश्वरापाशीं जें वारंवार मागणें केलें आहे आणि गोरूप संपत्ति वाढावी म्हणून ज्या प्रार्थना केलेल्या आहेत त्यावरून गायींचें महत्त्व किती होतें हें दिसून येईल. म्हणूनच गायी करितां स्वाऱ्या ( गविष्टि ) झालेल्या प्रसिद्धच आहेत. ऋग्वेदांत भरताच्या मुख्याला 'गव्यन् ग्राम' असें म्हटलें आहे, आणि गो-पाय ( गायी राखणें ) यापासूनच ऋग्वेदकाळांत गुप् – राखणें हा धातु निघाला आहे. वैदिक काळांतील कवी गायींच्या हंबरण्याशीं आपल्या कवनांची तुलना करीत व अप्सरांचें गायींशीं साम्य कल्पीत. वैदिक काळांतील गुरें निरनिराळ्या रंगांचीं (रोहित, शुक्र, पृश्नि, कृष्ण.) असत. झिमर म्हणतो कीं, ऋग्वेदांत एका ठिकाणीं ( १. ८७, १ ) गायींच्या तोंडावर एकप्रकारचा झगझगीतपणा असतो असें लिहिलें आहे परंतु तें अनिश्चित आहे. गाड्या ओढणें आणि नांगराला जुंपणें हीं साधारण दोन कामें बैलाचीं असत. हे बैल बहुधा बडवलेले असत. गायींना गाडी ओढण्याचें काम नेहमीं करावें लागत नसे पण कधीं कधीं त्यांना गाडीला जुंपीतहि असत. गायींचें आणि बैलाचें मांस कधीं कधीं खात्रें जाई. गुरें हीं प्रत्येकाच्या मालकीची वस्तु असे, आणि तें एक चलनी नाण्याचें प्रमाण मानून सर्व वस्तूंची किंमत त्याच्यावरून ठरविली जात असे. साधारणपणें गो हा शब्द गायीपासून मिळणारे पदार्थ दर्शविण्याकरितांहि उपयोगांत आणीत. हा शब्द नेहमीं दूध व क्वचित्प्रसंगीं गोमांस असाहि अर्थ दर्शवितो. पुष्कळ ठिकाणीं या शब्दाचा उपयोग 'निरनिराळ्या कारणाकरितां उपयोगांत आणलेलें कमावलेलें कातडें' अशा अर्थानें करितात. उदाहरणार्थ धनुर्ज्या, गोफण, रथाचा भाग बांधण्याकरितां वादी, लगाम, चाबकाची पट्टी या ठिकाणीं साधारणपणें गो शब्दाचा अर्थहि तोच आहे.

गौर.-ऋग्वेद व नंतर गवय या शब्दाबरोबर एक बैलाच्या जातीचें नांव म्हणून हा शब्द आला आहे. वाजसनेयि संहितेंत जंगली ( आरण्यक ) गौर आहेत त्याअर्थीं माणसाळलेले देखील गौर असले पाहिजेत. स्त्रीवाचक गौरी शब्द देखील आहे व गौरमृग हा सामासिक शब्दहि आढळतो.

त्र्यवि.-ऋग्वेद व मागाहून झालेल्या संहिता यांमध्यें या शब्दाचा अर्थ अठरा महिन्यांचें वासरूं असा आहे.

दुघा.—या शब्दाचा अर्थ दूध देणारी असा असून संहितामधील कांहीं मंत्रांत त्याचा अर्थ गाय असा आहे.

धेना.—या शब्दाचा अर्थ दुभती गाय असा आहे. अनेकवचनीं या शब्दाचा अर्थ दुधाचे घोट असा होईल, दो~

रॉथ याचा अर्थ ' घोडी ' असा करतो; व दुसरें एके ठिकाणीं ' वायूच्या रथाचे घोडे' असा करतो. उलटपक्षीं, बेनफे एके ठिकाणीं सायण व निरुक्तावरील दुर्गाचार्यांची टीका यांना अनुसरून याचा अर्थ ओढ असा करतो. गेल्डनेरचे मतें या शब्दाचे अर्थ ' ओढ, ' ' वाणी, ' ' गाय,' 'आडवता,' व 'ओढा' किंवा ' प्रवाह ' असे होतात.

[9]धेनु.--दुभती गाय या अर्थानें हा शब्द ऋग्वेद व मागाहून झालेले ग्रंथ यामध्यें आलेला आहे. हा शब्द अनेक वेळा आलेला असून तिच्या दूध देण्यासंबंधानें तो विशेष येतो. तिची बैलाशींहि (वृषभ, पुमास्, अनड्वह्) तुलना केलेली आहे. या शब्दाचा अनेकवचनीं अर्थ दुधाचे घोट असा आहे. या शब्दापासून बनलेला शब्द म्हणजे धेनुका हा होय व त्याचा अर्थ नुसता ' स्त्री,' असा आहे.

[10]पृषती -काहीं ठिकाणीं याचा अर्थ 'ठिपके असलेली गाय' असा आढळतो. परंतु हा शब्द सामान्यत. मरुताच्या समूहाला लावलेला आढळतो व अशा वेळीं त्याचा अर्थ रूपकात्मक असतो भाष्यकाराच्या मताप्रमाणें त्याचा नेहमींचा अर्थ ठिपके असलेले हरिण असा आहे परंतु महीधराचा अनुवाद करून रॉथ म्हणतो कीं, या शब्दाचा अर्थ 'ठिपके असलेली घोडी ' असा करणें जास्त श्रेयस्कर आहे. आतां ही गोष्ट खरी कीं, मरुतांना नेहमीं पृषदश्व असें म्हणतात व त्याचा अर्थ ' ठिपके असलेले घोडे ' असा करणें जास्त सरळ दिसतें पुढील वाङ्मयांत आलेला अर्थ म्हटला म्हणजे ' ठिपके असलेली मृगी ' हा होय. हाच अर्थ ग्रासमनलाहि पसंत पडला आहे.

[11]मर्यक.—हा शब्द ऋग्वेदांत येतो. याचा अर्थ गायींपासून दूर केलेला साड असा असावा.

[12]वत्स.--ऋग्वेदांत व पुढील ग्रंथांत वासरूं अशा अर्थानें हा शब्द वारंवार आलेला आहे. गायींनो पान्हा फुटावा म्हणून वासराचा उपयोग करण्याबद्दल व गायांना काहीं ठराविक वेळीं वासरापासून वेगळे करण्याबद्दलचा उल्लेख वैदिक वाङ्मयांत आलेला आहे.

[13]वशा.—ऋग्वेदांत व मागाहून झालेल्या ग्रंथांत या शब्दाचा अर्थ गाय असा आहे. भाष्यकाराच्या मतें याचा अर्थ वांझ गाय असा आहे. पण हा अर्थ काहीं ठिकाणींच आढळतो.

[14]वन्हि.—याचा अर्थ ओझीं वाहणारा प्राणी असा आहे. उदाहरणार्थ, घोडा, बस्रा किंवा बैल.

[15]वाह.--ऋग्वेदामध्यें ( ४. ५७, ४-८ ) व अथर्ववेदामध्यें ( ६. १०२, १ ) याचा अर्थ नांगर ओढणारा असा आहे.

[16]वृषभ.—ऋग्वेदामध्यें याचा अर्थ बैल असा आहे पण पुष्कळदा आलंकारिक अर्थानें हा शब्द आलेला आहे.

[17]सूददोहस्.—सूद देणारें म्हणजे पिशेलच्या मतें सोमरस पिण्यास योग्य करणारें जें दूध तें देणारी व रॉथच्या मतें विहिरीप्रमाणें दूध देणारी, अशा अर्थानें हा शब्द ऋग्वेदांत आलेला आहे

[18]तुर्यवाह् (पु.) तुर्यवाही (स्त्री.).—ऋग्वेदोत्तर संहितांमध्यें ' चार वर्षांचा बैल ' किंवा ' गाय ' अशा अर्थानें हा शब्द आलेला आहे.

[19]त्रिवत्स व त्रिवत्सा—' तीन वर्षांचा. ' हा शब्दसमूह ऋग्वेदोत्तर संहिता व ब्राह्मण ग्रंथ यांत गुरांना लावलेला आहे. तीन वर्षांचा बैल तो ' त्रिवत्स ' व तितक्याच वयाची गाय ती ' त्रिवत्सा,' असें वर्णन तैत्तिरीय संहितेंत ( ४. ७, २०. ) आलें आहे.

[20]दित्यवाह् (पु) दित्यौहि (स्त्री)--या शब्दाचा अर्थ ' दोन वर्षांचा बैल किंवा गाय ' असा असून ऋग्वेदोत्तर संहिता ग्रंथांत व ब्राह्मण ग्रंथांत हा शब्द आलेला आहे.

[21]निरष्ट.—' खच्ची केलेला ' असा या शब्दाचा अर्थ असून ऋग्वेदोत्तर संहिता ग्रंथांत हा शब्द बैलांना व शतपथ ब्राह्मणांत घोड्यांना लावलेला आहे.

[22]पंचावि.--वाजसनेयि व तैत्तिरीय संहितेमध्यें हा शब्द अनेकदा आला असून त्याचा अर्थ पाच कोकराच्या आयुष्यकालाइतका, म्हणजे ३० महिन्यांच्या वयाचा असा आहे अडीच वर्षांचा बैल तो ' पंचावि ' आणि तितक्याच वयाची गाय ती ' पंचावी ' होय.

[23]पष्ठवाह्.— यजुर्वेद संहितांमध्यें हा शब्द आलेला असून याचा अर्थ ( भाष्यकारांच्या मतें चार वर्षांचा ) बैल असा आहे चार वर्षांचा हा अर्थ संशयास्पद दिसतो; कारण पष्ठौहि (म्हणजे गाय) हा वारंवार येणारा शब्द आहे, व या ठिकाणीं या शब्दावरोवर प्रथमगर्भा असाहि शब्द आलेला आहे. यावरून चार वर्षांचा हा अर्थ अगदीं चुकीचा ठरतो असें मॅकडोनेल म्हणतो.

[24]महानिरष्ट.—' खच्ची केलेला मोठा बैल. ' सूताच्या घरीं झालेल्या राजसूय यज्ञामध्यें दक्षिणा म्हणून याचा उल्लेख यजुर्वेद संहिता ( १. ८, ९, १ ) व काठक संहिता १५. ४. ६, मै. स. २. ६. ५ यांत आला आहे.

## पक्षिनामें [ ऋग्वेद ]

| | | |
|---|---|---|
| [1]अग्रसद् | गर्भदि ( मादी ) | मक्षिका |
| आरगर ( मधमाशी ) | [5]गृध्र | [10]मयूरी |
| ईर्मा ( श्येन ) | [6]चक्रवाक | [11]रोपणाका ( हरिद्रपक्षिणी ) |
| [2]उलूक | [7]चाष | वयस् |
| ऋजिप्य ( श्येन ) | [8]चिचिक | वर्ति |
| [3]कपोत | [9]तक्वन् | [12]वर्तिका ( लावीपक्षीण ) |
| किकिदीवि ( गण्या ) | तक्वी | [13]वायस् |
| [4]कोक | पक्षिन् | वि |
| क्षुद्र | पतग | विजु |
| क्विंका | पतत्रिन् | विष्फुलिंगका ( पाकोळी ) |
| खर्गला ( उलूकी ) | पर्णवी | |
| गरुत्मन् | मक्ष ( माशी ) | |
| | मक्षा ( ,, ) | |

[१४]शकुन ( कपिंजल )
[१५]शकुनि
शकुन्त
शकुंति
शकुंतिक
शकुंतिका

[१६]शुक
× शुशुलूक ( लहान घुबड )
[१७]श्येन
सरट्
सारघा

सिलीकमध्यम
[१८]सुपर्ण
[१९]हंस
[२०]हारिद्रव ( पिवळा पक्षी )
हिरण्यवि

[ तै. सं ]

अन्यवाप
अलज
आती ( चापपक्षी )
उलूक
ऋल
कंक
कपिंजल ( कवडा )
कपोत ( होलगड )
कलविंक ( चिमणी )
किकिदीवि ( तित्तिर )
कीर्शा ( कुंभारीण माशी )
कुलंग ( कोंबडा )
कुपीतक ( समुद्रकाक )
कुलीपक
कृकवाकु ( रानकोंबडा )
[२१]क्रौंच ( करकोचा )
गरुत्मद्
गृध्र
गोलत्तिका (ताजवा-नामक पक्षी )
चक्रवाक

[२२]तित्तिरि
दर्विदा ( सुतार पक्षी )
दात्यौह ( पाणकोंबडा )
दार्वाघाट ( सुतार पक्षी )
धूंक्षणा ( पांढरी कावळी)
पक्षिन्
पात्र
पिक ( कोकिल )
पिप्पका
पुष्करसाद (भ्रमर)
पैंगराज ( लाल डोळ्याचा भारद्वाज पक्षी )
प्लव
बलाका ( बगळी )
मद्गु ( पाणकावळा )
मधुकृत् (मधमाशी)
मयु ( रानमोर )
मयूर
मान्धीलव ( पाणकोंबडा )
लोपा ( स्मशानात राहणारा पक्षी )

वयस्
वर्तिका ( चिमणी )
[२३]विदीगय
शका
शकुन
शकुनि ( कावळा )
शकुंतिका
शारि ( तांबडी साळुंकी )
शार्ग (रानचिमणी )
[२४]शितिकक्षि ( पांढऱ्या पोटाचें गिधाड )
शुक
श्येन
[२५]सघन
सुपर्ण
सृजया ( नीलवर्ण माशी )
सृमर ( चमर )
हंस
हंससाचि ( पांढरा हंस )
हलीक्ष्ण ( हिरवी किंवा काळी चिमणी )

[ अथर्व वेद ]

अयोमुख
आलिक्लव ( डोमकावळा )
कपोत
कृकदाश्व ( सरडा )
कृष्णशकुनि(कावळा)
क्रव्याद
गृध्र
घरट
छिन्नपक्ष ( कपोत )
जाल्मद
ताद्र्य
ध्वांक्ष ( कावळा )

पक्षिणी
पक्षिन्
पतंग
पतत्रिन्
पथिष्ठ
परिपद
भृंग
मक्ष
मक्षिका
[२६]मशक
यही
[२७]रघट
रोपणाक (काष्ठशुक)

[२८]वयस्
वनिवासस् ( चक्रवाक )
वि
विकंकतीमुख
शकुनि
शकुंत
[२९]शरभ ( टोळ )
श्येन
सुपर्ण
सूचीमुख
हारिद्रव ( हरिद्वर्णपक्षी )



[ संहितेतर ]

[३०] कोकिल
[३१] मद्ची
सरघ
सरघा

[१] अघसद.–हा शब्द (शब्दशः अर्थ "भोजनाला बसणारे.") ऋग्वेदांत "मेजवानीचा पाहुणा" अशा अर्थी वारंवार उपयोगांत आणिलेला दिसतो. परंतु गेल्डनेर या शब्दाचा अर्थ "माशी" असा करतो, कारण ती अन्नावर बसते.

[२] उलूक.–ऋग्वेद आणि तदुत्तर ग्रंथांत हा शब्द दिवाभीताकडे योजितात. हा पक्षी त्याच्या ओरडण्याविषयीं प्रसिद्ध आहे. आणि त्याचें ओरडणें म्हणजे कांहीं अशुभाचें द्योतक असावें असे समजतात. अश्वमेधसमयीं दिवाभीतें जंगली झाडांना अर्पण करीत असत. कारण त्यांची वस्ती तेथेंच असे.

[३] कपोत.–बहुतकरून हें 'पारवा' या पक्ष्याचें नांव ऋग्वेद आणि नंतर आलेले आहे. कांहीं कांहीं उताऱ्यांत निर्ऋति ( अपघात, अशुभ ) याचा दूत उलूक याचेंहि हेंच नांव असावें असे वाटतें. 'अशुभसूचक पक्षि' असा जो पारव्यावर आरोप आहे तो बहुतकरून प्राचीन समजुतीच्या आधारानें असावा. आणि भरतभूमी पलीकडेहि अशीच समजूत आहे.

[४] कोक.–ऋग्वेद आणि अथर्ववेद या ग्रंथावरून याचा अर्थ कोकिळ असा आहे तीन ठिकाणीं हा शब्द आला असून त्याचा अर्थ सायणमताप्रमाणें चक्रवाक असा आहे. अथर्ववेदांतील शब्दाचें भाषांतर *विनाशक अन्योपजिवी प्राणी* असें रॉथ करितो.

[५] गृध्र.–'गिधाड,' 'गिधार' ऋग्वेद व नंतर हा शब्द आला आहे. *त्याची शीघ्र गति आणि खराब मांस खाण्याची प्रीति हीं प्रामुख्यानें* वर्णिलीं आहेत. साधारणपणें हा शब्द कोणच्याहि हिंस्र पक्ष्याला लावतात आणि गृध्रामध्यें श्येन (गरुड) हा वरिष्ठ समजला जातो.

[६] चक्रवाक.–बहुतकरून आवाजावरून पडलेलें हें बदकाचें नांव असावें. हिंदींत त्याला चकवा आणि इंग्रजींत ब्राह्मणी डक् असे म्हणतात. हें नांव ऋग्वेदांत आणि यजुर्वेदांतील अश्वमेधीय बळींच्या यादींत आलें आहे. हें नांव अथर्ववेदांत वैवाहिक प्रेमाचें व विश्वासाचें द्योतक आहे. तसेंच रोमन व ग्रीक वाङ्मयांत त्याचें हेंच स्वरूप दाखविलें आहे.

[७] चाष.–याचा अर्थ निळ्या रंगाचा काष्ठकूट पक्षी असा आहे. याचा उल्लेख ऋग्वेदामध्यें व त्याच प्रमाणें यजुर्वेदामध्यें अश्वमेध यज्ञाचे वेळीं जे प्राणी बलिदानास विहित म्हणून सांगितले आहेत त्यांमध्यें आहे.

[८] चिचिका.–चिचिका हा शब्द ऋग्वेदांतल्या एका ऋचेमध्यें आलेला आहे व त्याचा उल्लेख वृषारव या तितक्याच अप्रसिद्ध शब्दाबरोबर केलेला आहे. हे शब्द पक्षि शब्दाचे बोधक आहेत. या चिचिका शब्दाची डार्लिंग यानें कौशिक सूत्रावर केलेल्या टीकेत उल्लेख केलेल्या 'चिंटक' शब्दाशीं तुलना करतां येईल.

[९]तक्वन्.–'तक्ववी' या दोनशब्दांचा अर्थ ऋग्वेदामध्यें 'जलद उडणारा पक्षी' असा आहे. सायणमतानें तक्वन्चा अर्थ जोरानें व जलद चालणारा तरतरीत घोडा असा आहे.

[१०]मयूर.–'मोर' हा शब्द सामासिक शब्दात ऋग्वेदात येतो. येथे त्याचा अर्थ इंद्राचे घोडे (मयूररोमन् म्हणजे मोराच्या पिसाप्रमाणे केस असलेले) किंवा मयूर शेप्य = मोराच्या शेपटीसारख्या असलेले) असा आहे. यजुर्वेद संहितेतील अश्वमेध प्रसंगीच्या दिलेल्या बळीच्या यादींत मोराचाहि समावेश झाला आहे. लांडोरी ('मयूरी') चा अथर्ववेद व ऋग्वेद यांतून उल्लेख केला आहे व तोहि तिचा विषावर काहीं उतार म्हणून केला आहे. मोरांच्या पिसांबद्दल सांप्रतकाळींहि काहीं लोकांत एक प्रकारचा तिटकारा दिसतो.

[११]रोपणाका.–ऋग्वेदामध्यें व अथर्ववेदामध्यें एका पक्ष्याचें हें नांव आहे. तेथें याचा सारिका असा अर्थ असावा. पण कौशिक सूत्रावरील टीकाकार केशव यांचें असे मत आहे कीं या शब्दाचा अर्थ एका प्रकारचें लांकूड असा असावा.

[१२]वर्तिका.–ऋग्वेदामध्ये लांडग्याच्या पंजांतून हिला आश्विनांनीं सोडविली असा उल्लेख आलेला आहे. यजुर्वेदामध्यें अश्वमेधाचे वेळीं बलि दिले जाणाऱ्या प्राण्याचे यादींत हिचे नाव आलेलें आहे.

[१३]वायस.–ऋग्वेद व उत्तरकालीन ग्रंथ यांमध्यें मोठा पक्षी अशा अर्थानें हा शब्द आलेला आहे. 'कावळा' असा या शब्दाचा अर्थ फक्त षड्विंश ब्राह्मणांत आलेला आहे.

[१४]शकुन.—'पक्षी.' हा शब्द ऋग्वेदामध्यें व तदुत्तर ग्रंथांत वारंवार आलेला आहे. याचा नेहमींचा अर्थ मोठा पक्षी किंवा शुभाशुभ सूचक पक्षी असा आहे. झिमर, या शब्दाची ग्रीसमधल्या शुभाशुभ दर्शविणाऱ्या पक्ष्यांशीं तुलना करतो.

[१५]शकुनि.—हा शब्द शकुन पक्ष्याप्रमाणेंच आलेला आहे. पण या शब्दावरून भविष्यज्ञानाचा विशेष स्पष्ट बोध होतो. हा पक्षी श्येन किंवा सुपर्ण यांच्याहून लहान होता. तो खुणा सांगत असे व अशुभाची वार्ता अगोदर सांगे. ज्या ठिकाणीं याचा उल्लेख अश्वमेध यज्ञाचे वेळीं बलि दिले जाणाऱ्या प्राण्याच्या यादींत येतो त्या वेळीं या शब्दानें निराळ्या जातीच्या पक्ष्याचा उल्लेख केला असला पाहिजे. पुढें पुढें त्याला बहिरीससाणा म्हणूं लागले. पण दग्धकाक (डोमकावळा) असाहि याचा अर्थ असूं शकेल. तैत्तिरीय संहितेवरील भाष्यकाराच्या मतें कावळा असा याचा अर्थ आहे. इतरत्र हा शब्द अनेकदा आलेला आहे.

[१६]शुक.—'राघु.' हा शब्द ऋग्वेदामध्यें आलेला आहे व त्यांत अशी इच्छा प्रकट केलेली आहे कीं, काविळीचा पिवळेपणा हा शुक व रोपणाका यांच्याकडे जावा. यजुर्वेद संहितेमध्यें अश्वमेधाचे वेळीं बलि दिले जाणाऱ्यांच्या यादींत या पक्ष्याचे नाव आलेलें आहे. हा पीतवर्ण असतो व त्याला मनुष्यासारखी वाणी असते असे वर्णन तैत्तिरीय व मैत्रायणी संहितेंत आलेलें आहे असें काहीं पाश्चात्य पंडितांचें मत आहे. ब्लूमफील्डचे मतानें अथर्ववेदांतल्या शारिशाका या अस्पष्टार्थी शब्दाच्या शाका या शब्दाबद्दल शुक हाच शुद्ध पाठ बरा दिसतो.

× शुशुलूक.—ऋग्वेदात शुशुलूकयातु या समासात हा शब्द आलेला आहे व तो एका राक्षसाच्या नावाचा दर्शक आहे. सायणाच्या मतानें या शब्दाचा अर्थ लहान घुबड असा आहे मैत्रायणी संहितेंत अश्वमेधाचे वेळीं बलि दिले जाणाऱ्याच्या यादींत 'शुशुलूका' या स्त्रिलिंगी रूपांत हें नांव आलेलें आहे.

[१७]श्येन.—ऋग्वेदामध्यें हें एका प्रबळ हिंस्र पक्ष्याचें नाव आलेलें आहे. बहुतकरून हा पक्षी म्हणजे गरुडपक्षी असावा. वैदिक कालानंतरच्या वाङ्मयांत याचा अर्थ बहिरीससाणा किंवा त्याच्या सारखा एखादा पक्षी असा असावा हा सर्व पक्ष्यात अतिशय जलद चालतो व त्यामुळे लहान पक्ष्यास भीतिदायक असतो, याच्या अंगात शक्ति अतिशय असते. त्यामुळे तो पक्ष्यांच्या समुदायालासुद्धा भारी होतो; त्याचा पहारा मनुष्यावरहि असतो (नृचक्षस्); अशा प्रकारचे उल्लेख ऋग्वेदात आहेत. यावरून तो आकाशांत उंचावरून जातो हें अनुमान निघतें. तो स्वर्गातून सोम आणतो असाहि उल्लेख आहे.

[१८]सुपर्ण.—'चांगले पंख असलेला'. हें एका हिंस्रपक्ष्याचें नांव आहे व तें नांव गरुडपक्षी किंवा गिधाड याचें असून ऋग्वेदामध्यें व उत्तरकालीन ग्रंथांत आलेलें आहे. ज्या ठिकाणीं 'मृताचें मांस खाणारा' असा अर्थ अभिप्रेत आहे त्या ठिकाणीं या शब्दाचा गिधाड असा अर्थ घेतला पाहिजे. जैमिनीय ब्राह्मणामध्यें क्रौंचपक्ष्याप्रमाणें नीरक्षीरविवेक करणाऱ्या गरुडपक्ष्याचा उल्लेख आला आहे. ऋग्वेदामध्यें सुपर्णाला श्येनाचा पुत्र म्हटलें असून दुसऱ्या एका ठिकाणीं हे निराळे आहेत असें म्हटलें आहे. यावरून झिमरला असें वाटलें कीं, बहिरीससाणा असा याचा अर्थ असावा. अथर्ववेदामध्यें या सुपर्णाच्या खोरड्याचा उल्लेख आलेला आहे व तो डोंगरात रहातो असेहि याचे वर्णन आले आहे

[१९]हंस.—ऋग्वेद व तदुत्तर ग्रंथ यामध्यें हा शब्द आलेला आहे. हे पक्षी नीलपृष्ठ आहेत, ते जमावानें राहतात, पाण्यात पोहोंतात, मोठा आवाज काढतात व रात्रीं जागृत असतात असें त्यांचें वर्णन आलेलें आहे. हंस पक्ष्याला सोम नीर विवेक (पुढें नीर क्षीर विवेक अशी त्याची ख्याती झाली) आहे असें यजुर्वेदांत म्हटलें आहे अश्वमेधाचे वेळीं तो बली दिले जाणाऱ्यापैकीं एक आहे असेहि त्याच्याबद्दल म्हटले आहे.

[२०]हारिद्रव.—ऋग्वेदामध्यें पिवळ्या रंगाचा अशा अर्थी एका पक्षाचें हें नांव आलें असून हा पक्षी म्हणजे पिवळा जलखंजन पक्षी असावा. गेल्डनेर या पक्ष्याची ग्रीक लोकांतल्या xapadpios या पक्षाशीं तुलना करतो.

[२१]कुच, क्रौंच—'चोंच व पाय लाल असलेला व आखूड शेपटीचा पक्षी', अथवा 'पाणलावा' याच्या दर्शक हीं निर

निराळीं रूपें आहेत. दूध आणि पाणी एकत्र केलें असतां पाण्यापासून दूध निराळें काढावयाचें हा जो मागाहून हंसाचा म्हणून प्रसिद्ध गुण, तो गुण पूर्वी वरील पक्ष्याचे अंगीं असे, असें म्हणत.

[२२]तितिर किंवा तित्तिरी.—ज्याला मराठींत कवडा म्हणतात त्याचें हें नांव असून तें मागाहून झालेल्या संहिता व ब्राह्मण ग्रंथ यांमध्यें आलेलें आहे. या पक्ष्याचें तित्तिर नांव त्याच्या ध्वनीवरून पडलेलें आहे, या पक्ष्याचें बहुतरूप (निरनिराळ्या रंगाचे पंख असलेला) असें वर्णन आलेलें आहे. या पक्ष्यालाच दुसरें नांव कपिंजल व कलविंक असें आहे.

[२३]विदीगय.—तैत्तिरीय संहिता व तैत्तिरीय ब्राह्मण यांमध्यें हा शब्द एका प्राण्याचें नांव म्हणून आलेला आहे. तै. सं. वरील भाष्यांत याचा अर्थ कुक्कुटविशेष म्हणजे एक प्रकारचा कोंबडा असा केलेला आहे, व तै. ब्राह्मणावरील टीकेंत त्याचा अर्थ पांढरा बक (श्वेत बकः) असा दिलेला आहे.

[२४]शितिकक्ष.—तैत्तिरीय संहितेमध्यें सायण याचा अर्थ शुभ्र पोटाचा (पांढरोदर) गृध्र असा करितात. हा शब्द नुसतें विशेषणहि असूं शकेल.

[२५]सघन.—हें एका पक्ष्याचें नांव आहे. कदाचित् गरुडपक्षी किंवा गृध्र असावा. हा शब्द तैत्तिरीय संहिता व तै. ब्राह्मण यांमध्यें आलेला आहे.

[२६]मशक.–'चावणारी माशी' अथवा 'चिलट.' अथर्ववेदांत याला तृष्टदंशिन् (म्हणजे फार कडकडून चावणारी) असें म्हटलें आहे. या माशीला एक जहरी नांगी असते व ती या नांगीचा उपयोग बहुधा हत्तीवर करते. या प्राण्याचा उल्लेख इतरत्रहि आढळतो.

[२७]रघट.–अथर्ववेदांत पैप्पलाद शाखीय संहितेंत रघटः हा पाठ आहे. रॉथच्या मताप्रमाणें रघट हा पाठ बरोबर आहे. ब्लूमफील्डनें या शब्दाचा अर्थ श्येन असा केला असून त्याला रॉथचा तर्क मान्य आहे. लुड्विग मधमाशी हा अर्थ सुचवितो. परंतु पक्षी हा अर्थ बरोबर असावा असें वाटतें.

[२८]वयस्.–अथर्ववेद व मागाहून झालेले ग्रंथ यांत पक्षी या अर्थी सामान्य नाम म्हणून हा शब्द आला आहे. वरील ग्रंथांत जनावरें व माणसें यांचें वय अशा अर्थानेंहि या शब्दाचा उपयोग केला आहे.

[२९]शरभ.–या शब्दाचा अर्थ टोळ असा असून अथर्ववेदाच्या पैप्पलाद शाखीय संहितेंत शरभ हा पाठ आहे. हा पाठ घेतला म्हणजे अर्थहि चांगला होतो असें व्हिटनेचें मत आहे.

[३०]कोकिल.—हा शब्द आर्षकाव्यें व तदनंतरचे ग्रंथ यांमध्यें बरेच वेळां आलेला आहे. वैदिक काळांत काठक अनुक्रमणींतील एका राजपुत्राच्या नांवावरून तो निघाला असावा.

[३१]मटची.—हा शब्द छांदोग्योपनिषदांत आला आहे व तेथें कुरुंवर मटचींनीं गर्दी उडविली असा उल्लेख केला आहे. शंकराचार्य याचा अर्थ 'वज्र' (अशनयः) असा करतात. आनंदतीर्थ आपल्या टीकेंत याच ठिकाणीं पाषाणवृष्टयः (म्हणजे गारांचा वर्षाव) असा दुसरा पाठ देतात; शब्दकल्पद्रुम याचें मत सुद्धां आनंदतीर्थाप्रमाणेंच आहे; व त्यांत मटची म्हणजे एक लाल पक्षी (रक्त वर्ण, क्षुद्र पक्षि विशेषः—पाठ—पक्षी असा) अर्थ दिला आहे. या शब्दाचा 'टोळ' असा अर्थ असावा असें जेकब म्हणतो.

सर्पनामें [तै. सं.]

| | | |
|---|---|---|
| अजगर | कसर्णीर | लोहिताहि |
| अदंकशूक | कुंभीनस | श्वित्र |
| असित | तिरश्चराजी | सर्प |
| अहि | दंदशूक | स्वज |
| कल्माषग्रीव | पृदाकु | |

[अथर्ववेद.]

| | | |
|---|---|---|
| आभिज | कल्माषग्रीव | पृदाकु |
| अघाश्व | [२]कसर्णील | पृश्नि |
| अजगर | कुंभमुष्क | बभ्रु |
| अधिचंक्रम | कैरात (किरात | ब्राह्मण |
| अनवरंतिका | देशीयसर्प) | भूमल |
| अपोदक | सर्विका | रज्जु |
| अप्रचंकशा | चतुर्दंष्ट्र | रथर्वी |
| अरंधुष | जूर्णि | रदित (सर्पदंशन) |
| अर्बुदि | तस्तुव | विलिगी |
| अलीक | तावुव | वृक्षसर्पी |
| अशीर्षन् | [३]तिरश्चिराजिन् | वैशालेय (सर्पपुत्र) |
| असिक्नी | तृष्टदंश्मन् | |
| असित | तृष्टधूम | शर्कोट |
| अश्वद्गुर | तैमात | |
| अहि | दंत्वातिन् | स्यावदत् |
| आलिगि | दद्रुविन् | श्वित्र |
| आशीविष | दशशीर्षन् | सर्प |
| उद्राग | दशास्य | सत्रासाह |
| उपतृण्य | दशोनसि (सर्पिणी) | स्तामान |
| उरुगला | नष्टविष | [४]स्वज |
| [१]कैकपर्वन् | पर्यस्ताक्ष | |
| करिक्रत | पण्डग | स्वभ्यस् |

[१]कैकपर्वन्.–अथर्ववेदांत हा शब्द सर्पाला लावलेला आहे. कदाचित् याचा 'विंचू' असाहि अर्थ असेल. पैप्पलाद संहितेंत याचा निराळाच पाठ आहे. कदाचित् तो पाठ अशुद्ध असावा.

[२]कसर्णील.–अथर्ववेदांत हें एका सर्पाचें नांव आहे. त्याचें दुसरें रूप कसर्णीर हें असून, तैत्तिरीय संहितेंत मंत्रद्रष्टा कसर्णीर काद्रवेय असा त्यावर मनुष्यधर्माचा आरोप केला आहे.

[३]तिरश्चराजि, तिरश्चिराजि, तिरश्चीनराजि.–हे सर्व शब्द सापाच्या नांवाचें (अक्षरशः अर्थ =आडवे पाय असलेले)

वाचक आहेत, व हे तिन्ही शब्द ऋग्वेदोत्तर संहिता ग्रंथांत आलेले आहेत.

[४] स्वज.–अथर्ववेद व ऋग्वेदोत्तर संहिता ग्रंथ यांमध्यें याचा अर्थ साप असा आहे. टीकाकाराच्या मतानें स्व–ज, स्वत पासून जन्मलेला, असा याचा विग्रह आहे. रॉथ, वेबर व झिमर यांचें मत हा शब्द स्वज् 'वेष्टणें' या धातूपासून झाला असावा असें आहे. मैत्रायणी संहितेमध्यें ( ३. ९, ३ ) हरिण सर्पाला मारतो असें म्हटलें आहे.

प्राणिविशेष [ ऋग्वेद ]

अजकाव
[१]अजा
[२]अथरी
[३]अदष्ट
[४]अनलुत्
[५]अवि
आविका
अश्वतर
अश्विय ( अश्वस-मूह )
[६]अहि
[७]आखु
आण्ड
आरोक ( पशु )
[८]इभ
इयत्तिक ( नकुल )
उक्षा
[९]उपजिह्विका ( मुंगी )
[१०]उरा ( मेंढी )
[११]उष्ट्र
उष्टार
[१२]ऋक्ष
[१३]ऋश्य
ऋषभ
ककत ( विषारी प्राणी )
कपना
[१४]कपि
[१५]कशीका ( सूत-वत्सा नकुली )
किलासी ( हरिणी )
कीनाश
[१६]कुषुंभक ( नकुल )
[१७]क्रोष्टु
क्षुर ( दीर्घनखयुक्त प्राणी )
[१८]खिंका
खर्गला
[१९]गर्दभ
गर्भधि
[२०]गवय
गृध्र
गौर
गौरी
चतुरक्ष ( यमाचे कुत्रे )
छाग
तरसती ( तरसत् नामक मृगाची स्त्री )
[२१]तसरु ( सर्प )
दिवक्षस् ( धेनु )
धेष्टा
धौतरी ( वडवा )
निकाहा ( घोरपड )
[२२]पदि
[२३]पिपील
पिश
[२४]पुन.सर
पूर्पर्या ( वृषभ )
पृदाकुसानु ( सर्प )
[२५]पेत्व
प्रकंकत
प्रवर्तमानक (नकुल)
[२६]प्लुशी
बप्की
बस्त
बिसख ( हंस )
[२७]भुज्यु,
भोग
[२८]मण्डूक
मण्डूकी
मत्स्य
महाहस्तिन्
[२९]महिष
मूष
[३०]मृग
[३१]मृगहस्तिन्
[३१]मेष
रपशद्वस् ( धेनु )
रासभ
[३२]लोध
[३३]लोपाश
वृसग ( वृषभ )
[३४]वम्रक
[३५]वम्री ( मुंगी, वाळवी )
[३६]वराह
वराहयु
[३७]वारण
[३८]वृक
[३९]वृश्चिक
[४०]वृषारव
[४१]शश
[४२]शिशुमार ( सुसर )
श्वन्
श्वापद
[४३]श्वान
सतीनकंकत ( विरोळा )
सरट्
सरीसृप
सर्प
सारघा
[४४]सारमेय
[४५]सालावृक ( लांडगा )
[४६] सिंह
सिंहा ( सिंह )
[४७] सूकर
सूचीक
स्वभीशु
हरि
[४८] हरिण
हरिणी
हस्तिन्

[ तै. सं. ]

अज
अजा
अवारंग
अवि
इभ
उद्वार ( लाव शेपटीचा पशु )
उभयादत्
उलूक
उष्ट्र
[५०] कलटक
[५१] कश्यप
[५२] कुलीकय
[५३] कूर्म
[५४]कृमि ( शेपकिडा )
गवाश्व
गो
[५५] गोधा
गोमृग
चराचर
छगल (छागार्भक)
छाग ( बोकड )
जंतु
[५६] जष
दंदशूक
दित्यवाह् ( एडका )
निष्पद ( उंवा )
नीलशीर्ष्णी
पशु
पाटूर
पान्त्र
पिप्पका( पक्षीविशेष)
पृषदी
फल्गु ( लवणवर्ण-पशु )
बलाका
बस्त
मत्स्य
[५७]मुष्कर
मृग
मेघ
मेषी
रासभ
लक्ष
वम्र ( वाळवी )
[५८] वृषादंश (माजर)
[५९] शयाद्क
शरभ
शवर्त
शार्ग
शार्दूल
शितिवार ( पाढऱ्या शेपटीचा पशु )
शिपि
शुंट
सरीसृप(सरपटणारा)
सालावृक (लाडगा)
सालावृकी
सृमर
सौपर्णेय
स्थूरगुड्
हय
हरिणि
हलीक्ष्ण(हरितचटक)

[अथर्ववेद ]

अघायु
अज
अजवभ्रु
अजा
अर्जुन ( कृमि )
अईजात
अलाडु
अल्गण्डु
अल्पशयु
अवस्कन
अवान्त्य
[६०]अश्वतर
आखु
आवि
[६१]आशुंग ( मृगविशेष )
[६२]उपक्वश
उपजीका ( वाळवी )
उल( हिंस्रप्राणिवि. )
उलूक
उष्ट्र
ऋक्षग्रीव
ऋक्षीका
ऋश
एकशफ
एजदेजत्
एजलक
कपि
कबु
कर्वर ( मासा )
कर्शफ
कश्यप
कष्कष ( कीटक )
कावव ( कर्बुरवर्ण प्राणी )
कीट
कीलालोध्नी
कुथ ( अश्व )
कुय
कुरीरिन्
कुरूरु ( सरपटणारे प्राणी )
कुर्कुर
कुषुंभ ( विषधारक प्राण्यवयव )
कूर्म
कृकवाक ( डोंबकावळा )
केविका ( शेळी )
कोकयातु
क्रिमि
क्रोष्ट्र
क्षुल्लक
खण्वखा ( मंडूक्की )
खर्गला ( उलूकी )
खैमखा ( मंडूकी )
गरुत्मन्
गर्दभ
गर्दभी
गृध्रयातु
गो
गोधा
गौर
चक्रवाक
चतुष्पाद
[६४]जगत्
जतु ( वट्वाघूळ )
जंभ्य ( धान्य नाशक कीटक )
जरायुज
जष ( जलचर-प्राणी )
तदुरि ( मंडूकी )
तर्द
तर्दपति
तादुरि ( मंडूकी )
तायादर
तायेदर
तार्क्ष्य
तूपर ( शृंगरहित प्राणी )

द्विपद्
धेनु
धेनुरा
नकुल
परस्वत
पशु
पारावत
पार्ष्टेय ( कृमि )
पिपील ( विषारी मुंगी )
[65]पिपीलिका
[66]पुरीकय ( जलचर प्राणी )
पुलघ
पृष्ठिवाह् ( अश्व )
पेत्व ( मेष )
पैद्व
प्रवाहण
बस्ताभिवासित
भराजि
भृग
मृगा
मण्डूकि
मत्स्य
महर्षभ
महास्य ( सारमेय विशेषण )
मुष्कावर्ह ( बडवलेला बैल )
मृग
मेवाय
रजस ( मासा )
रथर्वी
रिश्य
रोहित
वपा
वत्स
वराह
वारण
वारणी
वाह
विपक्षस्
विशफ
वृक
वृष
वृषभ
[67]व्यद्वर ( कुरतडणारा प्राणी )
[68]व्याघ्र
शकुल
[69]शरभ
शराठ ( खोडकर प्राणी )
[70]शर्कोट
शलून
शवर्त ( कृमि )
शश
[71]शरारु ( हिंस्र प्राणी )
[72]शारिशाक (क्षणात हजारों उत्पन्न होणारे प्राणी )
शिंशुमार ( सुसर )
शितिकक्ष
शितिपाद
शितिबाहु ( कृमि )
शिपवित्नुक ( कृमि )
[73]शिशुक
शीर्षण्य ( कृमि )
शुनी
शुशुक
श्योणा (लंगडी गाय)
श्वन्
श्वपद्
श्ववर्त
श्वापद
सप्तशीर्ष्णी
[74]समव
सालावृक
सिंह
सिंह प्रतीक
सुमृग
सुवय ( बलीवर्द )
सूकर
सैंधव
स्तेग ( बेडूक )
हंस
हरि
हरिक्निका
हरिण
हरिणी
हरित
[75]ह्रुडु
हस्तिन्
हस्तिनी

[ वा. स. ]

धरुण
[76]शल्यक

[ कठ व मैत्रायणी स. ]

[77]करुठ
कुभ्र
क्षिप्रश्येन
[78]खड्ग
[79]धेनुष्टरी

[ संहितेतर ]

[80]आशीविष
[81]इंद्रगोप
[82]एडक
[83]खर
[84]गज
[85]गोमायु
[86]चिल्वटी
[87]जाप
[88]दक्षिणापृष्ठि
[89]दुर्वराह
[90]नाग
[91]निरान्यवत्सा
[92]पूर्ती
[93]प्रयोग्य
[94]मंथावल
[95]वाहन
[96]शफ
[97]शार्ल
[98]स्नावन्य

## प्राणिसंबंधी व विशेषणे [ ऋग्वेद ]

अजमायु
अजिर
अतसतनु
अदत्
अदामान
अनवद्यरूप
अनाशु
अपिप्राणिन्
अबधिर
आमाद ( विशेषण )
ईर्मान्त
[99]उभयादत
ऋदूप ( बाहु )
गो
गोदुह
गोमय
गोवपुस्
गोसाति
गोसत्तम
चतुष्पद
चतुर्युज
चर्मन्
जरायु
तिर्यच्
तुरीप
निष्कुद्
[100]त्वच्
दन्त
दोहस्
द्विपाद
निशुंभ ( छागविशेषण )
नृवाहस् ( अश्वविशे. )
पक्षिणी
पद्वत्
पशव्य
[101]पशु
पशुतृप
पशुमती ( प्रजा )
पुराणायु
प्रकृत
प्रजा
प्रतिर
मेष्य
यूथ
रिहती
रेरिहाण
रोमण्वत्
वावशती
वाहिष्ठ
वृजन
वृषारव
[102]शकृत्
शफ
शरारु
शाचिगु
शृंगिन्
श्वयातु
श्वापद
सधेनव
सबर्दुघ
सिलीकमध्यम
सुगव्य
सुधेनु
सुनेदना
सुस्थामन्
सृक
स्वादि
हिरण्यवी
हिरण्यशृंग
हिंस्र
हेषम्(शब्द करणारा)

[ तै स ]

अग्निन्
अदन्तक
अधिलोधकर्ण
अन्यत शितिबाहु
अन्यत शितिरन्ध्र
अन्यतोदत्
अन्यवाप
अपक्वासुर
अप्सुयोनि
अशीर्षक
अर्धृंग
अघाशफ
अष्टीवत्
असमशफा
आत्तरेतस्
उपध्री
उभयतएनी
उभयादत्
एकदेवत्य
गर्भिणी
ग्रीवबद्ध
गौरललाम
तिग्मशृंग
निष्कुद्
द्विरूपा
द्विरेतस्
धूम्र
धूम्रललाम
नानामनस्
निपक्षति
निर्मांगुर
निरक्षस्
पशव्यतम
पाजस्य
पुरस्तात्प्रवण
पुष्पकर्ण
पृश्निसक्थ
पृषोदर
बभ्रुललाम
बभ्राविश्वयस्
बिलधावन
मणिनाल
मज्जा
मेदोरूप
मेध्य
मैत्र
रोहितललाम
रोहिताजि
ललाम
लप्सुदिन
वध्य
वायुदेवत्य
विकर्णी
वीङ्खग
वैण्णवर्णी
शितिककुद्
शितिरन्ध्री
शितिपद्
शितिपाद्
शितिपृष्ठ
शितिबाहु
शितिभसत्
शितिभ्रु
शितिरंध्र
शित्पुट
शित्यंस
शित्योष्ठ
शिल्प
शुण्ठ
शुद्धवाल
श्वेतग्रीव
श्वेताक्ष
सक्थ्यमान
समन्तशितिबाहु
समन्तशितिरन्ध्र
सर्वहुत
सुखदृश
स्थूलपृषती

[ अथर्ववेद ]

अघदास
अदुग्धा
अधिगव

| | | |
|---|---|---|
| अध्रु | जन्तु | वधूमत् |
| आष्टिनव | जन्म | वराहयु |
| एकमूर्धा | निस्कुद् | वर्मन् |
| कबंध | निशीर्वन | विरेष्टि |
| कुल्मल | देहिन् | व्यध्वर |
| कृष्णकर्ण | दोह | व्याघ्रजंभन |
| क्षुरपवि | पशव्य | शतदन् |
| गव्य | पुच्छरी | शाप |
| गोपोष | भूत | शीर्षभिद |
| गोशपथक | मूर्ण | स्थिरधामन् |
| गोशफ | यूथ | हिंस |
| जगत् | रेतोधस् | |

[1]अज, अजा.--ऋग्वेद आणि तदुत्तर ग्रंथ यात या शब्दाचा उपयोग बकऱ्याचें व्यावहारिक नाव या अर्थी केलेला सांपडतो. बकऱ्या आणि मेंढ्या ( अजावयः ) हे शब्द नेहमीं एकदमच सांपडतात. बकरी एका वेळेला दोन किंवा तीन कोंकरें प्रसवते असा तैत्तिरीय संहितेंत ( ६ ५, १०, १ ) उल्लेख आहे. आणि तिच्या दुधाचाहि त्याच संहितेंत वारंवार उल्लेख आलेला आहे. अंत्येष्टीचे जे विधी दिले आहेत त्यांत बकरा हा पूषन् याचा बदली किंवा निदर्शक म्हणून त्याला प्राधान्य दिले आहे. गुराखी आणि मेंढपाळ यांच्या धंद्याप्रमाणें केवळ बकरी पाळणें हा एक स्वतंत्र धंदा असे असा वाजसनेयि संहितेंत ( ३ ११ ) उल्लेख आहे. ऋग्वेदांतील अंत्येष्टीसंबंधीं मंत्रांत बकरा हा पूषनचा प्रतिनिधि म्हणून प्रेताबरोबर जाळीत असल्याचा उल्लेख नाहीं. )

[2]अथरी.--हा शब्द फक्त ऋग्वेदात आढळतो. त्याचा अर्थ अनिश्चित आहे. रॉथ व इतर कांहीं पंडित 'भाल्याचें टोंक' असा त्याचा अर्थ करतात. परंतु पिशेलच्या मतें त्याचा अर्थ 'हत्ती' असा आहे.

[3]अदृष्ट.--ऋग्वेद आणि अथर्ववेद यांत हा शब्द एक प्रकारचे कीटक किंवा कीटकाची एक जात दाखविण्याकडे योजिला आहे. सूर्याला देखील अदृष्टहन् असें म्हटलें आहे, आणि तो अर्थ स्पष्ट करण्याकरितां 'दृष्ट' हा शब्द दिला आहे. एका उताऱ्यांत दृष्ट आणि अदृष्ट हे शब्द कृमी यांना लाविले आहेत. आणि याचें कारण असें कीं प्रत्येक रोगाला कृमी असत अशी समजूत होती व जे कृमी सूक्ष्म दृष्टीनें दिसणारे त्यांना दृष्ट व न दिसणारे त्यांना अदृष्ट म्हणत.

[4]अनड्वाह्.--(शब्दशः-गाडी ओढणारा) गाड्या ओढण्याला जे बैल जुंपतात त्याचें हें व्यावहारिक नाव आहे. हे बैल बहुतकरून वडवलेले असतात. तरी पण ते नेहमीं तसे असतातच असें नाहीं. गाडी ओढण्याकडे क्वचित् गायींचाहि उपयोग होत असे.

[5]अवि.-( मेंढी ) ऋग्वेद आणि तदुत्तर ग्रंथ यात अज यांच्याबरोबर मेंढ्यांचाहि वारंवार उल्लेख आहे त्यांचा मोठा शत्रु लांडगा हा होय; म्हणून मेंडपाळ त्यांची फार काळजी घेत असत. शत्रूकडून मेंढ्या आणि गायी जिंकून आणीत असत. सोमरस गाळण्याकरितां जीं गाळणीं करीत असत तीं मेंढ्यांच्या लोंकरीचीं असत असा उल्लेख पुष्कळ वेळां केलेला आढळतो ( अविमेषी, अव्य, अव्यय ). ज्या अर्थी ऋज्राश्व यानें शंभर मेंढे मारले, आणि दानस्तुतींत शंभर मेंढ्या देणगी दाखल दिल्या असें वर्णन आढळतें त्या अर्थी त्याकाळीं मेंढ्यांचे मोठमोठे कळप असले पाहिजेत असें वाटतें ( मेष, वृष्णि ). मेंढा कधीं कधीं खच्ची करीत असत ( पेत्व ). मेंढ्यांचा मुख्य उपयोग म्हटला म्हणजे त्यांची लोंकर; म्हणूनच ' ऊर्णावती ' ( लोंकरयुक्त ) हा शब्द मेंढ्यांचा द्योतक आहे. वाजसनेयि संहितेंत ( १३,५० ) मेंढ्याला ( तो आपल्या लोंकरीनें मनुष्यांचे शीत निवारण करतो म्हणून ) मनुष्यें व इतर प्राणी यांचें संरक्षक प्रावरण आहे असें म्हटलें आहे. मेंढ्यांच्या लोंकरीचें कपडे पूषन् तयार करतो असें एक ऋग्वेदांत ( १०.२६,६ ) वचन आहे. मेंढ्या बहुधा कुरणांतच असत; परंतु त्यांना मेंढवाड्यांत ठेवीत असल्याबद्दलचें एक संदिग्ध वचन ऋग्वेदांत ( १.१२६,७ ) आलें आहे. गन्धार मेंढ्या लोंकरीकरितां प्रसिद्ध आहेत. पुष्कळसे मेंढ्यांचे कळप ( परुस् ) तीरावर असल्यामुळे त्या नदीस परुष्णी हें नाव मिळालें असें पिशेल म्हणतो.

[6]अहि.-ऋग्वेद आणि तदुत्तर ग्रंथ यात सर्प या अर्थी हा शब्द योजिला आहे. सर्पाचा कात टाकण्याबद्दलचाहि उल्लेख आला आहे ( ऋ ९ ८६,४४ ). सर्पाच्या चमत्कारिक चालीवरून त्याला दत्वतीरज्जु' असे नामाभिधान मिळालें आहे. सर्पांचा विषारी दंश आणि जमिनीवर सरपटत जात असतांना हिंवाळ्यांतील त्याची सुस्ति यांचाहि उल्लेख केला आहे. चोर-प्रतिबंधक तोडगा म्हणून सर्पाच्या कातीचा उपयोग करीत असत (अथर्व १. २७) सर्पापासून रक्षण करण्याकरितां आणि त्याचा नाश करण्याकरितां अश्विन् यानी पेदूला पैद्व नांवाचा घोडा दिला होता असा ऋग्वेदांत उल्लेख आहे. नकुल हा त्याचा कट्टा शत्रु असून विषघ्न झाडाच्या उपयोगामुळें त्याला विषाची मुळींच भीति नाहीं. मनुष्य त्याला काठीनें किंवा त्याचें डोकें ठेंचून मारतो. सर्पांच्या पुष्कळ जाति दिल्या आहेतः-अघाश्व, अजगर, असित, कंकपर्वन्, कीकस्त, कल्माषग्रीव, कसर्णील, कुम्भीनस, तिरश्चराजि, तैमात, दर्वि, दशोनसि, पुष्करसाद, पृदाकु, लोहिताहि, शर्कोट, श्वित्र, सर्प इत्यादि.

[7]आखु-या शब्दाचा बरोबर अर्थ सांगतां येत नाहीं. त्याचा अर्थ 'चिचुंद्रि' असा असावा असें झिमर म्हणतो, तर त्याचा अर्थ 'उंदीर' आहे असें रॉथचें मत आहे. ऋग्वेद व उत्तरकालीन संहिता यांतहि या शब्दाचा उल्लेख आहे. पिशेल म्हणतो कीं, या शब्दाचा चोर हा लाक्षणिक अर्थ आहे; परंतु हिलेब्रँटला हें मत पसंत नाहीं.

[8]इभ.--हा शब्द संदिग्ध अर्थाचा आहे. तो फक्त संहिता आणि मुख्यत्वेंकरून ऋग्वेद यांतच आढळतो. रॉथ आणि लुडविग् याच्या मतें या शब्दाचा अर्थ 'आश्रित' असा होतो; आणि

सिमर म्हणतो की, या शब्दांत फक्त आश्रित आणि सेवक यांचाच नव्हे, तर राजवंश आणि मोठमोठ्या घराण्यांतील कनिष्ठ शाखेचे तरुण मनुष्य यांचाहि समावेश होतो. पिशेल आणि गेल्डनर याच्या मतानें त्याचा अर्थ 'हत्ती' असा आहे या मताला भाष्यकार सायण आणि महीधर यांचाहि पाठिंबा आहे. निरुक्त देखील या शब्दाचा अर्थ 'हत्ती' असाच आहे असें प्रतिपादन करतें. मेग-स्थेनीस आणि नीआर्कस हे असें सांगत कीं, हत्ती बाळगण्याचा अधिकार फक्त राजासच असे, आणि म्हणूनच तत्साधित इभ्य या शब्दाचा अर्थ 'श्रीमंत' असा असावा.

[9]उपजिह्विका, उपजीका, उपदीका.—हे सर्व शब्द एकाच अर्थाचे असून ते एका जातीच्या मुंगीचें द्योतक आहेत. अथर्ववेदाप्रमाणें व्याधिप्रतिबंधक गुण ज्या पाण्यांत असतात त्या पाण्यापर्यंत जमिनींत शिरण्याची शक्ति या मुंग्यांना असते, आणि म्हणूनच कोणत्याहि विषाला उतारा म्हणून या मुंग्याचा उपयोग करीत असत त्या रोगप्रतिबंधक असतात ही जी समजूत आहे ती बहुधां त्यांच्या वारुळाच्या मातीच्या गुणावरून, व त्यांत जें पाणी असतें त्यावरून निघाली असावी.

[10]उरा.—मेंढया या अर्थी हा शब्द ऋग्वेदांत योजिला आहे. याचा दोन ठिकाणीं उल्लेख आलेला असून त्यांच्यापैकीं एका उल्लेखांत लांडग्यापासून मेंढयांना भीति असते असें म्हटलें आहे ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. उरामथि 'अज मारणे' हें लांडग्याचें विशेषण ऋग्वेदांत एकदांच आलेलें आहे; आणि हे दोनहि उल्लेख संहितेच्या एकाच मंडलांत (आठव्या) आलेले आहेत. ही गोष्ट, उरा या शब्दाची उत्पत्ति एखाद्या स्थानिक पोट भाषेमध्यें झालेली असावी असें दर्शवितें,

[11]उक्षि, उष्ट्र—हे दोन्ही शब्द एकाच अर्थाचे असावेत. यांपैकीं पहिला क्वचितच उपयोगांत येतो. रॉ आणि आफ्रेक्ट म्हणतात कीं, ऋग्वेद आणि ब्राह्मणें यांत त्याचा अर्थ 'वशिंड असलेला बैल' किंवा 'म्हैस' असा असावा, परंतु रॉथ म्हणतो कीं, वाजसनेयि संहितेंत हा अर्थ थोडा संशयास्पद दिसतो, तेथें या शब्दाचा उंट हा अर्थ असावा; व हापकिन्सनें हाच अर्थ ग्राह्य धरला आहे. हा प्राणी ओझें ओढण्याचे कामीं (चार चार मिळून) उपयोगांत आणीत असत. ऐतरेय ब्राह्मणांत उष्ट्र व गो यांचा एकाच ठिकाणीं उल्लेख असल्यामुळें उंट व बैल हे निरनिराळे प्राणी होते असें ठरतें.

[12]ऋक्ष.—या शब्दाचा अर्थ 'अस्वल' असा आहे. ऋग्वेदांत फक्त एकच वेळ आणि तदनंतर हा शब्द क्वचितच आढळतो. कारण, वेदकालीन आर्य लोक ज्या देशांत रहात असत तेथें अस्वलें दुर्मिळ असत. सप्त ऋषि या नावाचा जो तारकापुंज आहे त्याला 'सात अस्वल' हें नांव दिलें आहे. अस्वल हा शब्द अनेक वचनांत फारसा आलेला नाहीं.

[13]ऋश्य.—या रूपांत हा शब्द ऋग्वेद आणि तदनंतरचें वाङ्मय यांत येतो. अथर्ववेदांत ऋश व मैत्रायणी संहितेंत ऋष्य असा हा शब्द आढळतो, पण ऋश्य हेंच रूप बरोबर दिसतें. या शब्दाचा अर्थ काळवीट असा आहे आणि त्याचें स्त्रीलिंग रोहित असें आहे. हरिण सामान्यतः खाड्यांत (ऋश्यद) पकडीत असत. काळवीटाची प्रजोत्पादनक्षमता प्रसिद्ध आहे (आर्श्यशृंग).

[14]कपि—वृषाकपि याच्यासमोर इंद्र आणि इंद्राणी यांच्या संवादांत वृषाकपि 'नर-वानर' अशा संबंधांत हा शब्द एकदां आलेला आहे. वानराचा रंग पिंगट असतो असें तेथे लिहिलें आहे. वानर केंसाळ असून, तो कुत्र्याचा शत्रु आहे असें अथर्ववेदांत म्हटलें आहे. मार्कंडे माणसाळवीत असत असें 'वृषाकपि' सूक्तांतील स्थलावरून आणि तैत्तिरीय संहितेंतील वनवासी मयु याच्या उल्लेखावरून दिसतें

[15]कशीका.—या प्राण्याचें नांव ऋग्वेदांत एकदा आलें असून भाष्यकार सायण त्याचा अर्थ 'वीजल' असा करितो. फिकच्या मतें केसाळ मांजर व गेल्डनेरच्या मतें नकुली असा याचा अर्थ आहे.

[16]कुषुम्भक.—ऋग्वेदांतील एका उताऱ्यांत हा विषारी प्राणी होता असें लिहिलें असून, अथर्ववेदांत कुषुम्भक म्हणजे विषाची पिशवी असें म्हटलें आहे. हा प्राणी 'मुंगुस' (नकुल) होय असें सायणाचार्य म्हणतात.

[17]क्रोष्टृ.—(कोल्हा) शब्दशः याचा अर्थ 'हेल' 'गळा काढून रडणारा' असा आहे. कोल्हा किंवा खोंकड हे रानडुकराप्रमाणें स्वभावतःच भित्रे असतात असें ऋग्वेदांत म्हटलें आहे. हा प्राणी शवभक्षक आहे असें अथर्ववेदांत म्हटलें आहे. वाजसनेयि संहितेंत देखील हा शब्द आला असून भाष्यकार शृगाल असें दुसरें नांव देतो.

[18]किका.—हिंस्र पक्षी या अर्थानें हा शब्द ऋग्वेदांत एकदां आला आहे. तैत्तिरीय संहितेंतील अश्वमेधीय बळींच्या यादींतहि हा शब्द उल्लेखिला आहे, व तेथें त्याचा अर्थ भाष्यकारांनीं एकमुखी वानरी' असा केला आहे.

[19]गर्दभ.—गाढव. हा घोड्यापेक्षां कमी दर्जाचा असतो असें ऋग्वेदांत म्हटलें आहे. तैत्तिरीय संहितेंत देखील तो घोड्याच्या खालच्या दर्जाचा प्राणी आहे, परंतु तो सर्व प्राण्यांत भार वाहण्यांत (भार-भारितम) श्रेष्ठ आहे असें म्हटलें आहे. त्याच ग्रंथांत गर्दभाचा घोडीबरोबर व तसेंच गाढवीबरोबर संयोग होतो म्हणून, त्याला द्विरेतस् 'दुप्पट बीज असणारा' असें म्हटलें आहे. गाढवीच्या पिलाचा ठेंगणेपणा, आणि त्याची बहुभक्षण शक्ति, या दोहींचाहि (तै. सं. ५. १, ५, ५) उल्लेख केला आहे. त्याच्या अप्रिय ओरडण्याचा उल्लेख अथर्ववेदांत (८. ६, १०.) केला आहे; आणि गाढवाच्या याच गुणामुळे ऋग्वेदांत हें नांव निंदापूर्वक एका गवयाला लाविलें आहे एका गवयाला शंभर गर्दभ देणगी दिल्याबद्दल वालखिल्य सूक्तांत उल्लेख आहे. खेचर (अश्वतर) हें गाढव आणि घोडी यांच्यापासून उत्पन्न होतें आणि म्हणून घोडीला द्विरेतस् 'दोन बीजें धारण करणारी' असें म्हटलें

आहे. गाढवाला रासभ असें एक दुसरेंहि नांव आहे. बृहदारण्यक उपनिषद् आणि अथर्ववेद यात गर्दभी हें नांव आलें आहे.

[२०]गवय.—एका जातीच्या बैलाचें नांव म्हणून हा शब्द ऋग्वेदापासून आला आहे. वाजसनेयि संहितेंत गौर आणि महिष यांच्याबरोबर याचाहि उल्लेख आहे; आणि तेथें जंगली गवयाचा देखील उल्लेख केला आहे.

[२१]रासभ.—एखाद्या सरपटणाऱ्या प्राण्याचें नांव या अर्थी हा शब्द ऋग्वेदात आला आहे. उत्तरकालीन ग्रंथात चमसाची मूठ या अर्थानें हा शब्द आला आहे. अथर्ववेदांत व मागाहून झालेल्या संहिता ग्रंथांत याच अर्थानें हा शब्द नांगराचें (लांगलाचें) वर्णन करताना आलेला आहे.

[२२]पदि.—ऋग्वेदामध्यें एकदा हा शब्द आला असून से. पी. कोशात म्हटल्याप्रमाणें याचा अर्थ एक प्रकारचा प्राणी असा आहे. यास्काचे मतें याचा अर्थ हलणारा प्राणी असा आहे. पण दुर्गाचार्य याचा अर्थ पक्षी असा घेतो. या लेखाचा संबंध जाळ्यामध्यें (? मुक्षिजा पदि) पकडण्याकडे असूं शकेल.

[२३]पिपील.—या शब्दाचा अर्थ मुंगी असा असून मृताच्या शरीराचें मांस खाणाऱ्या त्या असतात असें ऋग्वेदात (१०. १६,६) म्हटलें आहे.

[२४]पुनःसर.—एका भुंकणाऱ्या कुत्र्याचें नांव म्हणून हा शब्द ऋग्वेदात आला आहे. हा कुत्रा चोराला पाहून भुंकतो असें म्हटलें आहे. या शब्दावरून कुत्रा भुंकतांना इकडे तिकडे धावत असतो ही जी त्याची रीवय तिचा बोध होतो. अथर्ववेदामध्यें हा शब्द अपामार्ग या वनस्पतीला लाविला आहे, व तेथें त्याचा अर्थ उलट बीज (उलट काटे ?) असणारी वनस्पति असा आहे.

[२५]पेत्व.—हा शब्द अथर्ववेदात दोनदा आला आहे. पहिल्या उताऱ्यात याच्या वाजाचा (बलाचा) उल्लेख आलेला आहे, व त्याचा अर्थ 'सामर्थ्य', 'चपलता' असा आहे. परंतु सरळ अर्थ पाहतां पुरुष हाच अर्थ जास्त योग्य दिसतो. कारण, जननसामर्थ्याचा अभाव नाहींसा करण्यासाठीं असलेल्या मंत्रांत हाच अर्थ योग्य दिसतो. दुसऱ्या ठिकाणीं पेत्वाचा उल्लेख तो रेडयाला जिंकीत असतांना आला आहे. असल्याच प्रकारचा चमत्कारिक उल्लेख ऋग्वेदात आला असून तेथे तो सिंहिणीला वश करीत आहे असे लिहिलें आहे. या प्राण्याचा उल्लेख यजुर्वेद संहितेंत अश्वमेध प्रसंगीं बळींच्या यादींतहि आला असून, इतरत्रहि मधून मधून आला आहे. याचा अर्थ एडका असा असावा; या शब्दाचा तैत्तिरीय संहितेंच्या टीकाकारांनीं दुसरा अर्थ दिलेला आहे. परंतु या अर्थासंबंधीं निर्णयात्मक असा काहीं पुरावा नाहीं. शिवाय, अथर्ववेदांतील 'वाज' शब्द असलेल्या उताऱ्यातील अर्थाशीं एडका हाच अर्थ नीट जुळता आहे. हॉपकिन्स याचा अर्थ बकरा असा करतो; परंतु असा अर्थ करण्याचें काय कारण असावें तें नीट समजत नाहीं. याचा पित्व किंवा पिङ्‌ याशीं काय संबंध आहे, हें अगदीं अनिश्चयात्मक आहे.

[२६]प्रुषि.—हें एका उपद्रवदायक कीटकाचें नाव ऋग्वेदांत आलें आहे. याचा उल्लेख बृहदारण्यक उपनिषदातहि आला असून यजुर्वेद संहितेंतील अश्वमेधप्रसंगीं द्यावयाच्या बळींच्या यादींत याचा समावेश केला आहे. कदाचित् मुंग्यांचा हा एक प्रकार असावा.

[२७]भुज्यु.—सेंट पीटर्सबर्गच्या कोशांत याचा अर्थ 'साप' असा दिला आहे. हा शब्द ऋग्वेदांत दोन ठिकाणीं येतो. वाजसनेयि संहितेंतहि हा शब्द आढळतो. परंतु त्या ठिकाणीं या शब्दाचा अर्थ काय असावा हें सांगतां येत नाहीं.

[२८]मंडूक.—हें एक बेडकाचें नांव ऋग्वेद व तदनंतरचे ग्रंथ यांत आलें आहे. याचें मंडूकी हें स्त्रीलिंगी रूप सुद्धां ऋग्वेदांत आलें आहे. ऋग्वेदाच्या या प्रसिद्ध ऋचेंत बेडकांची ब्राह्मणाशीं तुलना केली आहे. कारण, पर्जन्यकालाच्या सुरवातीस बेडूक जागत होऊन डुंव डुंव करावयास सुरवात करतात. ही ब्राह्मणाची चेष्टा केली आहे असें मॅक्समुल्लर म्हणतो. मॅक्समुल्लर प्रमाणेंच गेल्डनर म्हणतो कीं, ही चेष्टा वसिष्ठ ऋषींनीं आपले प्रतिस्पर्धी जे विश्वामित्र ऋषि त्यांची केली आहे. परंतु सर्व बाजूंनीं विचार करिता पर्जन्यचारता—पर्जन्यरमणीयता—हा अर्थ करणाराचें मत जास्त सयुक्तिक दिसतें. बेडूक पाण्यांत रहात असल्यामुळें त्याच्या अंगात थंडपणाचा गुण जास्त आहे अशी समजूत आहे मृत मनुष्याचें दहन झाल्यावर तेथें बेडकास बोलाविण्यात येतें (ऋ. १०.१६, १४), हेतु हा कीं, तो बेडूक त्या प्रेतास शांति देईल. त्याचप्रमाणे अथर्ववेदांत बेडकाला तापाचा दाह शांत करण्याकरितां बोलाविलें आहे.

[२९]महिष.—मजबूत. हा शब्द मृग शब्दाबरोबर अगर त्या शब्दाशिवायहि येतो. मृग म्हणजे रानटी पशु; आणि ऋग्वेद व तदुत्तर ग्रंथ यांत याचा रेडा असा अर्थ होतो. 'महिषी' हा शब्द मागाहूनच्या संहिता ग्रंथात येतो.

[३०]मृग.—ऋग्वेदांत आणि तदनंतरच्या ग्रंथांत रानटी पशु या अर्थी हा शब्द येतो, याला कधीं कधीं भीम (भयंकर) हेंहि विशेषण लावितात. इतरत्र म्हशीला महिष (बलवान्) हें विशेषण लाविलेलें आढळतें; व तेच पुढें म्हैस वाचक नाव झालें. हरिण जातीच्या जनावराचा बोधक म्हणून बहुधा हा शब्द योजितात. इतरत्र उताऱ्यात रॉथच्या मतें पक्षी असाहि अर्थ होतो.

[३१]मृगहस्तिन.—हात असलेलें जनावर. हा शब्द ऋग्वेदांत हत्ती या अर्थी दोन वेळ समासात योजिला आहे. यावरून वैदिक काळातील लोकांना हत्ती प्रथमच माहित झाला होता याचा तो पुरावा होय असें रॉथ म्हणतो. वैदिक काळच्या लोकांना हत्ती हा नवीन परिचित प्राणी होता. या मताला पिशेलनें विरोध केलेला

आहे. कारण मृगमहिष आणि मृगसूकर ( अथर्व १२. १, ४८ ) हे शब्द अनुक्रमें म्हैस आणि डुकर या अर्थी योजिलेले आढळतात. परंतु महिष या शब्दानें रॉथच्या मताला दुजोरा येतो. आणि ऋग्वेदांत सूकर असा नुसताच शब्द आढळतो, व मृगसूकर हा अथर्ववेदांत एकाच मंत्रांत वराह शब्दाशीं विरोध दाखविण्याकरितां योजिलेला आढळतो. पुढें हस्ती हें विशेषण हस्ती या जनावराचें नांव बनलें. ऋग्वेदांत हस्तीला मृगवारण ( भयंकर प्राणी ) असेंहि म्हटलें आहे वारण हें विशेषण पुढें हस्तीचेंच नांव बनलें. पाळ-लेल्या हत्तिणींच्या साहाय्यानें हत्तींना पकडीत असत असें ऋग्वेदांत वर्णन आलेलें आहे हें पिशेलचें मत चुकीचें आहे.

³¹ मेष.— हा शब्द ऋग्वेद आणि तदुत्तर ग्रंथ यांत मेंढा, मेंढी, बकरी या अर्थी योजिलेला आढळतो. तसेंच दोन्हींहि शब्द लोकर या अर्थी योजिलेले आढळतात. विशेषतः त्याचा उपयोग सोमशुद्धीसाठीं केलेला आढळतो. वाजसनेयि संहितेंत जनटी मेंढ्याचा उल्लेख आलेला आहे.

³² लोध.— ऋग्वेदांतील एका दुर्बोध ऋचेमध्यें हा शब्द आलेला आहे. त्याचा अर्थ रॉथच्या मतें एखादा रक्तवर्ण प्राणी असा आहे, तर ओल्डेनबर्गच्या मतें तांबड्या रंगाचा बकरा असा आहे.

³³ लोपाश.—कोल्हा या प्राण्याचें नांव म्हणून हा शब्द दुर्धा ऋग्वेदांत आलेला आहे. यजुर्वेद संहितेमध्यें अश्वमेधाचे वेळीं बळी दिले जाणाऱ्या पशूंच्या यादींत या लोपाशाचा उल्लेख आहे.

³⁴ वम्र व वम्री.–ऋग्वेदांत व तदुत्तरकालीन ग्रंथांत मुंगळा मुंगी यांचीं नांवें म्हणून हे दोन्ही शब्द आले आहेत. यांचा वाळवी असाहि अर्थ क्वचित् असतो.

³⁵ वम्रक.–ऋग्वेदामध्यें एके ठिकाणीं हा शब्द आलेला असून त्या ठिकाणीं त्याचा अर्थ मुंगी असा असावा असें रॉथचें मत आहे. पण पिशेलचें मत भिन्न आहे तो म्हणतो कीं, हा शब्द विशेष-नाम असावा व कदाचित तो वम्र या अर्थी असावा, आणि त्याचा अर्थ मुंग्यांनीं खाण्याच्या यातनेपासून ज्याची सुटका झाली, असा एका कुमारिकेचा मुलगा असा असावा. सायणाचें हें मत आहे.

³⁶ वराह.–हा शब्द ऋग्वेद व मागाहून झालेले ग्रंथ यांमध्यें आलेला आहे. 'स्वर्गातला वराह' असें रुद्राचें वर्णन आलें आहे. वराहाची शिकार करतांना कुत्र्यांचा उपयोग करण्याच्या चालीचा उल्लेख एकदां ( ऋ. १०. २८, ४ ) आलेला आहे. त्याच शब्दाचा पर्याय 'वराहु' हा शब्द देवादिकांविषयीं अलंकारिक रीतीनें बोलण्याशिवाय कोठेंहि आलेला नाहीं.

³⁷ वारण.–ऋग्वेदांत दोन ठिकाणीं, रॉथ यानें हा शब्द मृगाचें विशेषण आहे असें गृहीत धरून त्यानें जंगली जनावर असा त्याचा अर्थ केला आहे. परंतु ग्रंथांतरीं स्वीकारलेला हत्ती हा अर्थहीचा अर्थच येथेंहि घेतला पाहिजे असें दिसतें. अथर्व-वेदामध्यें वारणी हा स्त्रीलिंगी शब्द 'हत्तीण' या अर्थानेंच आलेला आहे.

³⁸ वृक.— ऋग्वेदांत व तदुत्तर ग्रंथांत देखील हा शब्द वारंवार येतो. मेंढ्या, बकरी, वासरें व मनुष्यें यांचाहि हा शत्रु होता. याचा रंग तांबडा ( अरुण ) आहे असें म्हटलेलें आहे. ऋग्वेदामध्यें वृकी या शब्दाचाहि वारंवार उल्लेख आलेला आहे.

³⁹ वृश्चिक.—ऋग्वेद आणि अथर्ववेद यांमध्यें याचा अर्थ विंचू असा आहे. याच्या विषाबद्दल सर्पाच्या विषाप्रमाणें लोकांना भय वाटत असे. हा हिंवाळ्यांत पृथ्वीवर निचेतन पडतो असें वर्णन ( अ. वेद १२. १, ४६ ) आहे.

⁴⁰ वृषारव.—'बैलाप्रमाणें ओरडणारा' असा या शब्दाचा अर्थ आहे. ऋग्वेदामध्यें हें एका प्राण्याचें नांव आहे. शतपथ ब्राह्मणांत हा शब्द द्विवचनीं आहे व त्याचा अर्थ ठोकणी किंवा टिपरी असा आहे.

⁴¹ शश.—' ससा ' हा शब्द ऋग्वेदामध्यें एकदां आलेला आहे, व त्यांतच या शशानें एक दांत किंवा वस्तरा गिळल्याचा उल्लेख आलेला आहे. मागाहून झालेल्या ग्रंथांतहि या प्राण्याचा प्रसंगानें उल्लेख आलेला आहे.

⁴² शिंशुमार, शिशुमार.—जलचर प्राण्याचें नांव म्हणून हा शब्द ऋग्वेद व तदुत्तरकालीन ग्रंथ यांमध्यें आला आहे. हा प्राणी म्हणजे एक तर मकर असावा किंवा गाधा मासा असावा.

⁴³ श्वन.–ऋग्वेद व तदुत्तर ग्रंथ यांमध्यें याचा अर्थ कुत्रा असा आहे व याचें स्त्रीलिंगी रूप शुनी असें आहे. कुत्रा हा माणसाळलेला प्राणी असे व तो चोर किंवा इतर बाहेरचे लोक यांपासून घराचें संरक्षण करी. वराहाची शिकार करतांना त्याचा उपयोग होत असे; पण सिंहापुढें त्याचा टिकाव लागत नसे. वालखिल्य सूक्तामध्यें दानस्तुतींत शंभर कुत्र्यांच्या देणगीचा उल्लेख आला आहे. इतर ठिकाणीं या कुत्र्याविषयीं असा उल्लेख आलेला आहे कीं, तो गलिच्छ असल्यामुळें यज्ञांतल्या बळीला अयोग्य आहे, व यज्ञमंडपांतून त्याला हांकून देण्यांत येत असे. कुत्र्याचें मांस अगदीं निर्वाणीचे वेळीं खावयाचे असे. मेजवानीचे वेळीं जनावर कापून त्याचें मांस खाल्ल्यावर जीं हाडें उरत तीं कुत्र्यास चघळण्यास दिलीं जात असत. ( अथर्व ६. ३७,३ ). ऋग्वेदांत एका दंतकथेमध्यें गायींचा शोध करणाऱ्या इन्द्राची कुत्री म्हणजे सरमेचा उल्लेख आलेला आहे. ह्याला यजुर्वेदामध्यें श्वपति असें म्हटलेलें असून त्याच संहितेंत पुरुषमेधाचे वेळीं बलिदानास योग्य अशा प्राण्यांच्या यादींत श्वानाचा ( कुत्र्याचा रक्षक ) उल्लेख आलेला आहे. कांहीं ग्रंथांत चतुरक्ष ( चार डोळ्यांच्या ) कुत्र्यांचा उल्लेख आलेला आहे तो काल्पनिक आहे हें उघड आहे.

⁴⁴ सारमेय.–' सरमेचा वंशज.' एका पौराणिक वर्णनांतल्या इंद्राच्या कुत्र्याचें हें नांव असून ऋग्वेदामध्यें पृथ्वीवरील कुत्र्याला व यमाच्या कुत्र्यालाहि हें नांव दिलेलें आहे.

[33]सालावृक — ऋग्वेदामध्यें हा शब्द दोन्दा आला असून याचा अर्थ तरस किंवा रानकुत्रा असा आहे इंद्रानें यतीचा नाश केल्याविषयींची कथा तैत्तिरीय संहितेंत आली असून त्या कथेंत हाच अर्थ बरोबर जुळतो त्या कथेंत असें म्हटलें आहे कीं, इंद्रानें या यतींना सालावृकांच्या तोंडांत दिलें याच सालावृक शब्दाचा सालावृकेय हा दुसरा पाठ आहे, व त्याचा अर्थ सालावृकाचा वंशज असा आहे या शब्दाचें स्त्रीलिंगी रूप सालावृकी असें असून त्याचा उल्लेख तै. सं तेंत आला आहे

[34]सिंह — ऋग्वेदांत व तदुत्तरग्रंथांत याचा अर्थ सिंह असा आहे सिंहाच्या गर्जनेचा ( नद् ) नेहमीं उल्लेख आलेला आहे, व या गर्जनेला स्तनाथ असें नांव आहे हा नेहमीं भटकत असतो ( कुचर ), डोंगरांत राहतो ( गिरिस्थ ) व हा ठार मारणारा भयंकर वनपशु आहे ( मृगो भीम उपहत्नु ) याची व रेड्याची तुलना केली आहे पाण्यांत शिरणाऱ्या अग्नीची जेव्हां सिंहाशीं तुलना केलेली असते तेव्हां पाणी पिण्याच्या जागेमध्यें जनावरांवर उडी घालण्याच्या सिंहाच्या सवयीचा उल्लेख केला असावा कोल्ह्यानें सिंहाचा पराभव करावा हें चमत्कारिक आहे असेंहि वर्णन आलेलें आहे मनुष्यांनां सुद्धां त्याची भयकर भीति वाटल्यामुळें ते त्याला पिंजऱ्यांत ठेवात त्याला पकडण्याकरितां लोक दबा धरून बसत व शिकारी लोक त्याची शिकार करीत अशींहि वर्णनें आलेलीं आहेत कुत्र्यांना सिंहाचें भय वाटे सिंहीण ही सुद्धां तिच्या शौर्याबद्दल प्रसिद्ध आहे सुदासाच्या शत्रूविरुद्ध त्याला जी इंद्रानें मदत केली तिची तुलना मेंढ्यानें ( पेत्व ) सिंहिणीच्या केलेल्या पराभवाशीं केली आहे मनुष्यावर हल्ला करतांना सिंहीण आपले जबडे उघडते याचा उल्लेख ऐतरेय ब्राह्मणांत आलेला आहे यजुर्वेद संहिता व ब्राह्मण ग्रंथ यांत सिंहिणीचा उल्लेख आलेला आहे

[35]सूकर — हा शब्द ध्वन्यनुकारी असावा असे दिसतें पण हा शब्द फार प्राचीन असून तो इंडो-यूरोपीय कालांतील असावा लॅटिन भाषेतल्या[सुक्युलस]लहान डुकर या शब्दाशीं सदृश असून व्युत्पत्तिशास्त्रदृष्ट्याहि याचा अर्थ बदलला आहे हा शब्द ऋग्वेदांत व तदुत्तरग्रंथांत आलेला आहे. मृग या शब्दाबरोबर हा शब्द अथर्ववेदांतहि आलेला आहे आणि हे दोन्ही शब्द मिळून त्याचा अर्थ रानडुकर असा होतो

[36]हरिण — ऋग्वेद व तदुत्तर ग्रंथ यांमध्यें याचा अर्थ एक प्रकारचा काळवीट असा आहे हा फार जलद चालणारा व भय उत्पन्न करणारा म्हणून प्रसिद्ध आहे याच्या शिंगाचा मंतरलेल्या तोडग्याप्रमाणें उपयोग होतो याला यव खाण्याचा फार नाद आहे मैत्रायणी संहितेमध्यें तो स्वज म्हणजे सर्पांना ठार मारतो असें याचें वर्णन आलेलें आहे या शब्दाचें स्त्रीलिंगी रूप हरिणी असें आहे

[37]हस्तिन् — हात असलेला असा याचा मूळचा अर्थ असून मृग म्हणजे जनावर या शब्दानें युक्त हस्ति असा अर्थानें हा शब्द ऋग्वेद अथर्ववेद आणि यजुर्वेद यांमध्यें आलेला आहे पुढें पुढें नुसत्या हस्तिन् या विशेषणाचाच हत्ती असा अर्थ होऊं लागला या प्राण्याची त्याच्या सामर्थ्याबद्दल व जननशक्तीबद्दल प्रसिद्धि होती या जनावराचा उल्लेख मुखानें जिन्नस उचलणाऱ्या प्राण्याच्या उलट माणूस व माकड या हातानें उचलणाऱ्या प्राण्याबरोबर आलेला आहे हस्तिप या शब्दावरून तो माणसाळलेला प्राणी होता हें स्पष्ट आहे.असे माणसाळलेले हत्ती दुसरे हत्ती पकडण्याच्या कामीं उप योगी पडत पण या हत्तींचा लढाईचे कामीं उपयोग होत असल्या बद्दलचा उल्लेख नाहीं तरी पण क्तेसियस व मेगॅस्थिनीझ यांनीं हे हत्ती त्यांच्या वेळीं उपयोगांत आणले जात असें म्हटलें आहे हत्तींना डांसांपासून उपद्रव होई असें अथर्ववेदांत म्हटलें आहे

[38]कर्कट — हा शब्द यजुर्वेद संहितेंत 'खेकडा' याचा दर्शक असून कर्कट याचें हें प्राकृत रूप आहे, व उत्तर वाङ्मयांत कर्कट हा सर्वसाधारण शब्द आहे तथापि रॉथ म्हणतो की, त्याचा अर्थ पक्षी असा आहे आणि ककर याच्याशीं त्याचें साम्य आहे

[39]कश्यप — अथर्ववेद आणि तदुत्तर ग्रंथ यामध्यें हा शब्द वारंवार येतो व त्याचा अर्थ 'कूर्म, कच्छप' असा आहे

[40]कुलीकय — हें रूप तैत्तिरीय संहितेंत एका प्राण्याच्या नांवाचें आहे आणि महीधर यानें आपल्या टीकेंत स्पष्टीकरण दिलें आहे त्यावरून हें एका माशाचें नाव असावें असें दिसतें याचें वाजसनेयि संहितेंतील नांव कुलीपय आणि अथर्ववेदांतील कुलीकय असें असून, या नांवाचा परिचय नसल्यामुळें बोलतां बोलतां कदाचित् अपभ्रंश झाले असावे

[41]कूर्म — याचा अर्थ कांसव उत्तरकालीन संहिता आणि ब्राह्मण यांत हा शब्द पुष्कळ वेळां आला असून त्याच्या स्वाभाविक धर्माबद्दल कांहींच लिहिलेले नाहीं

[42]कृमि — 'कीटक' ऋग्वेदोत्तर संहिता आणि अथर्व वेद यांत कीटकांचा बराच उल्लेख आला आहे ते विषारी असतात, पर्वत, वनें, पाणी, झाडें व मनुष्यदेहांत देखील ते असतात मनुष्य आणि प्राणी यांच्या रोगाचीं कारणें हे कृमी होत अशी सार्वत्रिक समजूत असे अथर्ववेदांत या कृमींना प्रतिबंधक उपाय म्हणून तीन सूक्तें आहेत पहिलें सूक्त सर्वसाधारण आहे दुसरें गुरामधील कृमींचा नाश करण्याचे उपाय शिकवितें, आणि तिसरें मुलांना कीटकापासून कसें बरें करावें हें सांगतें मनुष्यामध्यें कीटकांची राहण्याची जागा म्हणजे डोकें आणि बरगड्या आणि नंतर तेथून डोळे, नाक आणि दांत त्यांचा रंग काळसर पिंगट असून शरीराचा पुढचा भाग पांढरा, काळे कान आणि तीन डोकीं असतात त्यांचीं विशिष्ट नावें वरीच आहेत —अलाण्डु, एजत्क, कपृकण, कीट, कुरूरु, नीलागु, येवाष, वघा, वृक्षसर्पी शलुन, शवर्त, शिपविलुक व स्तेग

[43]गोधा — या शब्दाचा अर्थ लुडविग आणि वेबर यांच्या मताप्रमाणें 'मगर' असा असावा, कदाचित् रॉथ आणि झिमर म्हणतो त्याप्रमाणें मोठा सरडा किंवा पाल असाहि असावा अथर्ववेदांतहि बहुतकरून याचा अर्थ प्राणीच असावा

"जप.—जप हें नांव एका जलचराचें किंवा माशाचें म्हणून अथर्ववेद व तैत्तिरीय संहिता यांमध्यें आलेलें आहे. तै. संहितेवरील भाष्यांत जप म्हणजे मकर हा प्राणी असावा असें म्हटलें आहे. हा शब्द गोपथ ब्राह्मणांतहि आलेला आहे.

"गुङ्कर.—रॉथच्या मताप्रमाणें लहान जनावर किंवा कीटक या अर्थी हा शब्द अथर्ववेदांतल्या एका उताऱ्यांत आला आहे; परंतु हा उतारा अशुद्ध आहे असें त्याचें मत आहे. पैप्पलाद संहितेंत पुष्करम् हा पाठ बरोबर आहे असें ब्लूमफील्ड म्हणतो. तै. संहितेंत गुङ्कर याचा अर्थ अश्वमेधांतील पशु असा आहे.

"वृषदंश.—या शब्दाचा अर्थ बळकट दांताचा असा आहे. यजुर्वेद संहितेमध्यें एका मांजराचें नांव म्हणून हा शब्द आला असून याचा उल्लेख अश्वमेध यज्ञाच्या वेळीं बळी दिल्या जाणारांच्या यादींत आहे. पंचविंश ब्राह्मणांतहि याचें नांव आहे. या ब्राह्मणांत याच्या शिकेचा उल्लेख आहे. यावरून हें मांजर माणसाळलेलें होतें असें सिद्ध होतें. गेल्डनेर म्हणतो कीं, अथर्ववेदांतील एका सूक्तांत विचित्र विशेषणांनीं ज्याला संबोधिलें आहे तो प्राणी बहुतेक घरातील मांजर असावा. त्या विशेषणापैकीं एक विशेषण म्हणजे वृषदती हें आहे. पण व्हिटने गेल्डनरच्या या मताविरुद्ध आहे.

"शयण्डक.—तैत्तिरीय संहितेमध्यें हें एका प्राण्याचें नांव आहे; पण मैत्रायणी व वाजसनेयि संहिता यात हें नांव शयंदक असें लिहिलेलें आहे. रॉथचे मतानें याचा अर्थ एक प्रकारचा पक्षी असा असावा; पण तैत्तिरीय संहितेवरील टीकाकार याचा अर्थ कृकलास म्हणजे सरडा असा करतो.

"अश्वतर, अश्वतरी.—हीं खेचराचीं पुल्लिंगी आणि स्त्रीलिंगी अनुक्रमें नांवें आहेत. अथर्ववेद आणि तदुत्तर ग्रंथ यांत या प्राण्यांचा बराच वेळ उल्लेख केलेला आहे. यांची उत्पत्ति कमी असे म्हणून यांना घोड्यापेक्षा कमी दर्जाचे मानीत असत. परंतु खेचराच्या गाड्या सर्वसाधारण प्रचारांत होत्या.

"आशुंग.—अथर्ववेदाप्रमाणें कोणतातरी प्राणी असावा. याचीं विशेषणें 'तरुण,' 'बालक' (शिशुक) हीं आहेत. यावरून रॉथ म्हणतो कीं त्याचा अर्थ एक पक्षी (जलद उडणारा), अथवा 'आपल्या आईकडे जाणारें शिंगरूं' असाहि असावा. सायण त्या विशेषणाचा अर्थ शुशुक म्हणजे प्राणी असा करितो. ब्लूमफील्ड या दोन शब्दांचें भाषांतर 'जलद शिंगरूं' 'आशुंग' 'शिशुक' असें करितो.

"उपक्वस.—अथर्ववेदात याचा धान्याला उपद्रव देणारा प्राणी असा उल्लेख आहे. तथापि सायण तो शब्द अनेकवचनी विशेषण (उपक्वसः = धान्यघाः) असा घेतो, परंतु पैप्पलादशाखीय संहितेंत उपक्वसः असेंच आहे.

"कुरीरिन्.—('कुरीर असलेला'). हा अथर्ववेदांतील एका संदिग्ध अथवा धर्मा उताऱ्यांत असून त्याचा एक तर 'शेंडी असलेला प्राणी,'—कदाचित् झिमरच्याप्रमाणें 'मोर'—असें नाम अथवा अज 'बकरा' याचें विशेषण, अशा अर्थी त्या शब्दाचा 'शृंगी' असा अर्थ होईल. परंतु दुसऱ्या अर्थात शब्दाचा अलंकारिकरीत्या उपयोग असावा असें मानणें सयुक्तिक दिसतें. पंचविंश ब्राह्मणात औपश हा शब्द गुरांचीं शिंगें या अर्थी उपयोगांत आणिला आहे, यावरून कुरीर म्हणजे 'शिंग' हें जें गेल्डनेरचें मत आहे, त्याचा स्वीकार करणें जरूर दिसत नाहीं.

"जगत्.—(हालणारा, चल) हा शब्द कधीं कधीं अथर्ववेदामध्यें व पुढील ग्रंथात पाळलेल्या जनावरांत (जीं श्वापदें रानटीं नव्हेत त्यांना) लावलेला आहे. कधीं कधीं जगत् या शब्दानें गाईसेरीज इतर सर्व पाळलेल्या जनावराचा बोध होत असे.

"पिपीलिका.—अथर्ववेद व मागाहूनच्या ग्रंथांत याचा मुंगी असा अर्थ आहे. या शब्दावरून मुंगीची लहान जात असा जो मागाहूनच्या कोशात अर्थ दिला आहे तो खरा नाहीं. मात्र यावरून मुंगीच्या लहान आकाराचा बोध होतो व तो अल्पार्थवाचक पिपीलिका या शब्दावरून व्यक्त होतो. हें रूप छांदोग्य उपनिषदांत आले आहे.

"पुलीकय.—अथर्ववेदामध्यें एका जलचर प्राण्याचें हें नांव आलें आहे. व हें नाव म्हणजे मैत्रायणी संहितेमध्यें आलेल्या पुलीकयाचें, वाजसनेयि संहितेमध्यें आलेल्या कुलीपयाचें व तैत्तिरीय ब्राह्मणामध्यें आलेल्या कुलीकयाचें अन्यरूप आहे. हा कोणता प्राणी होता हें समजत नाहीं.

"व्यद्वर.—'भोंक पाडणारा.' अथर्ववेदामध्यें एका ठिकाणीं हें एका किड्याचें नाव आलेलें आहे. या ठिकाणीं व्यध्वर असा पाठ असावा असें काहीं पंडितांचें मत आहे. व्हिटनेचें असें मत आहे कीं या शब्दाचा संबंध वि-अध्वन याच्याशीं असून व्यध् 'भोंक पाडणें' याच्याशीं नसावा. हिरण्यकेशी गृह्यसूत्रामध्यें हा शब्द मशकाबरोबर आलेला आहे. त्याचप्रमाणें तो अथर्ववेदाच्या दुसऱ्या एका स्थलींहि आला असावा व येथें शंकर पंडित व व्हिटने यांच्या मतें हा शब्द व्यद्वर असाच असावा.

"व्याघ्र.—हा शब्द ऋग्वेदांत कधीं आलेला नाहीं पण अथर्ववेदात वारंवार आलेला आहे, त्याचप्रमाणें सिंह हा शब्दहि आलेला आहे. यावरून रास्त असें अनुमान काढता येईल कीं, ज्या वेळीं वैदिककालचे आर्य लोक बंगाल प्रांताजवळ येऊन आत शिरले त्या वेळीं अथर्ववेद लिहिला गेला असावा. मागाहून झालेल्या ग्रंथांत व्याघ्र हा शब्द अगदीं प्रचारांतला झाला. तैत्तिरीय संहितेंत निजलेल्या वाघाला डवचून जागें केल्यावर उत्पन्न होणाऱ्या भयाचा उल्लेख आलेला आहे. या जनावराच्या जीवनाशक स्वभावाचाहि वारंवार उल्लेख आलेला आहे. त्याचप्रमाणें तो पुरुषाद म्हणजे मनुष्यभक्षक असल्याचेंहि वर्णन आलेलें आहे.

सिंहाप्रमाणें वाघहि शक्तिमान् गणला गेलेला आहे. कारण राजसूय यज्ञाचे वेळीं राजाला वाघाचें सामर्थ्य यावें म्हणून त्याच्या चर्मावर पाय ठेवावा लागतो.

⁶⁵शरभ.—अथर्ववेद व मागाहून झालेले ग्रंथ यांत एका रानटी जनावराचें हें नांव आलेलें आहे. उत्तरकालीन काव्यग्रंथांत हा एक काल्पनिक आठ पायांचा, हिमाच्छादित डोंगरांत रहाणारा आणि सिंह व हत्ती यांचा शत्रु असलेला पशु आहे. महीधर टीकाकार याच्या मतानें वाजसनेयि संहितेमध्यें या शब्दाचा हाच अर्थ आहे; पण तो असा अर्थ करण्याचें कारण देत नाहीं. हा प्राणी बकऱ्याप्रमाणें असतो असेंहि एके ठिकाणीं म्हटलें आहे. कदाचित्, हा प्राणी एक प्रकारचा हरिण असावा असें वाटतें.

⁶⁶शर्कोट.—अथर्ववेदामध्यें एका प्राण्याचें हें नांव आलेलें आहे. हें नाव रॉथ व झिमरचे मतानें सापाचें आहे व ग्रिल, हेनरी व ब्लूमफील्ड यांच्या मतानें विंचवाचें असावें.

⁶⁷शशयु.—' ससाचा पाठलाग करणारा. ' अथर्व वेदामध्यें एका प्राण्याचें ( मृगाचें ) हें विशेषण आहे. झिमर म्हणतो कीं, या शब्दाचा अर्थ वाघ असा असावा पण हें शक्य दिसत नाहीं. रॉथचे मतानें एखादा हिंस्र पशु असा याचा अर्थ असावा. व्हिटने, भाष्यकाराच्या मतास अनुसरून या शब्दाचा अर्थ ' लपून बसणारा ' असा करितो.

⁶⁸शारिशाका.—अथर्ववेदामध्यें एके ठिकाणीं हा संदिग्ध अर्थाचा शब्द आलेला आहे. वेबरच्या मतें याचा अर्थ शारि पक्ष्याची विष्ठा असा आहे. ग्रिलच्या मतें याचा अर्थ ' छपविलेला कावळा ' हा आहे. रॉथ 'सारिः = शालिः शक इव ' अशी दुरुस्ती सुचवून त्याचा अर्थ ' खत घातलेल्या साळीप्रमाणे ' असा करितो. ब्लूमफील्ड ' शारिःशुकेव ' हा पाठ स्वीकारून त्याचा अर्थ सारिका व शुकासारिखा असा करतो.

⁶⁹शिशुक.—अथर्ववेदामध्यें हें विशेषण आलेलें असून त्याचा अर्थ 'तरुण' असा आहे. पण ब्लूमफील्ड असें म्हणतो कीं, याचा अर्थ घोड्याचें शिंगरूं असा आहे. सायण म्हणतो कीं, हा शब्द शुशुक असा आहे व त्याचा अर्थ शुशुक नांवाचें रानटी जनावर असा आहे.

⁷⁰सर्घक.—अथर्ववेदामध्यें दोन ठिकाणीं संदिग्ध अर्थाचा हा शब्द आलेला आहे. ब्लूमफील्ड, याचा अर्थ एके ठिकाणीं आंकडा असा करितो व दुसरे ठिकाणीं धान्याचा नाश करणारा किडा असा करितो.

⁷¹हूडु.—अथर्ववेदामध्यें तक्मन् (ज्वर) याला हा शब्द लावलेला असून याचा अर्थ अस्पष्ट आहे. हा शब्द ऱ्हुडु, ऱ्हूडु, रूडु वगैरे तऱ्हेनीं लिहिलेला आढळतो. पैप्पलाद संहितेंत हुडु असा शब्द आला असून त्याचा अर्थ एडका किंवा मेंढा असा आहे. हेनरीचे असें अनुमान आहे कीं, हा शब्द हरुडु ( प्रोटोसेमिटिक ) सोनें, ( असुरियन हुरकू व हिब्रू हरूक ) या शब्दांशीं सदृश आहे. याच्या उलट हेल म्हणतो कीं ग्रीक भाषेंतल्या हिरवट पिंवळा या अर्थाच्या शब्दाशीं याचें साम्य आहे. पण या दोन्हीं कल्पना असंभाव्य आहेत. वेबरच्या मतानें याचा अर्थ 'पायांत येणारा गोळा' असा असावा.

⁷²शल्यक.—वाजसनेयि संहिता व उत्तरकालीन ग्रंथ यामध्यें या शब्दाचा अर्थ साळ असा आहे. ऐतरेय ब्राह्मण ३. ३६,३ या ठिकाणीं जो शल्यक शब्द आहे त्याच अर्थ तेथें साळ किंवा सायाळ असाच आहे. हा विशिष्ट प्राणी कशा प्रकारचा असतो याचें वर्णन सायणानें आपल्या भाष्यात पुढीलप्रमाणें दिलें आहे. ' यस्य मृगस्य पुच्छ समीपे बहवो रोम विशेषाः प्रादेशपरिमितास्तीक्ष्णाग्रा लोह मया उत्पद्यन्ते स शल्यकः '

⁷³कुकुठ.—मैत्रायणी संहितेंत हा शब्द आला असून त्याचा अर्थ एक प्रकारचा प्राणी असा असावा. बोथलिंग याच्या मताप्रमाणें तो प्राणी आणि कक्कट हे एकच आहेत.

⁷⁴खड्ग.—मैत्रायणी संहितेंत हें एका प्राण्याचें नाव आहे आणि वाजसनेयि संहितेंत खंग आणि खड्ग असे पाठ आहेत. बहुतकरून गेंडा असा याचा अर्थ असावा. शांखायन श्रौतसूत्रांत गेंड्याच्या कातड्याचा उपयोग रथाच्या आच्छादनाकडे करीत असत असा उल्लेख आहे.

⁷⁵धेनुष्टरी.—काठकसंहितेमध्यें व मैत्रायणी संहितेमध्यें [ ३. ५, ४ ] जी दूध देईनाशी झाली आहे अशी गाय असा याचा अर्थ आहे.

⁷⁶आशीविष.—ऐतरेय ब्राह्मणांत फक्त एकदांच याचा उल्लेख आलेला आहे आणि त्याचा अर्थ रॉथच्या मताप्रमाणें एका जातीचा सर्प असा आहे. बहुतकरून 'आशीमध्यें विष असणारा ' असा असावा.

⁷⁷इंद्रगोप.—[ इंद्र रक्षित ] ' पुंलिंगी. ' हें नांव बृहदारण्यक उपनिषदात [ २. ३, ६ ] किरमिजी रंग ज्याचा करितात तो कृमि या अर्थानें आलें आहे.

⁷⁸एडक.—शतपथ आणि जैमिनीय ब्राह्मणांत याचा नाठाळ एडका असा अर्थ आहे.

⁷⁹खर.—' गर्दभ. ' ऐतरेय आरण्यकांत एका गर्दभाच्या टोळीचा उल्लेख आहे. यज्ञपात्रें ज्या ओट्यावर ठेवीत असत त्याचा आकार लंबकर्णाच्या आकारासारखा असल्यामुळें शतपथ ब्राह्मणांत त्या ओट्याला हा शब्द आला असेल.

⁸⁰गअ.—आर्ष काव्यें आणि उत्तरकालीन संस्कृत काव्यग्रंथ यांत न आलेला हा हत्तीबद्दल शब्द उत्तरकालीन ब्राह्मणांत सांपडतो.

⁸¹गो-मायु.—'गायीसारखें ह्ंबरणें'. उत्तरकालीन अद्भुत ब्राह्मणापर्यंत हें ' सोंकट, कोल्हा ' याचें नांव आलेलें नाहीं.

⁸²चित्व टी.—हें एका अप्रसिद्ध जनावराचें नांव गोपथ ब्राह्मणांत आलेले आहे. हा कोणता प्राणी हें समजत नाहीं

"झ ष — शतपथ ब्राह्मणांत सांगितलेल्या मनूच्या कथेंत हा शब्द आलेला आहे, व त्या ठिकाणीं त्याचा अर्थ 'महामत्स्य' असा भाष्यकाराच्या मतानें आहे एगलिंगच्या मतानें सशृंग मत्स्य हा अर्थ असावा, कारण तैत्तिरीय संहितेंत त्याला गाईचें स्वरूप दिलेलें आहे. व याच कल्पनेवरून जुन्या दंतकथेच्या पुढें बनलेल्या रूपांत सशृंग मत्स्याची कल्पना आली असावी असें तो म्हणतो.

"द क्षि णा प्र ष्टि.—याचा अर्थ उजवे बाजूकडील घोडा असा आहे. शतपथ ब्राह्मणांत आलेल्या दोन उल्लेखावरून असें दिसतें कीं, एके काळीं रथाला चार घोडे जुंपीत असत. पैकीं उजव्या व डाव्या बाजूला एक एक घोडा असे मध्यें असत व एक एक बाजूला पण जूंला न जुंपलेले दोन मोकळे घोडे, असे ठेवण्याची चाल होती.

"दु र्व रा ह.—याचा अर्थ बहुतकरून रानटी डुकर असा आहे. शतपथ ब्राह्मण व जैमिनीय उपनिषद्ब्राह्मण यामध्यें या शब्दाचा उल्लेख आलेला आहे.

"ना ग.—शतपथ ब्राह्मणांत महानाग या रूपांत हा शब्द आला आहे व तेथें त्याचा अर्थ मोठा हत्ती किंवा मोठा सर्प असा आहे. बृहदारण्यकोपनिषदामध्यें व ऐतरेय ब्राह्मणांत आलेल्या उताऱ्यांत हत्ती असा अर्थ स्पष्ट दिसतो. सूत्र ग्रंथांत प्राचीन काल्पनिक नाग यांचा उल्लेख अगोदरच आलेला आहे.

"नि वा न्य व त्सा व नि वा न्या.—शतपथ ब्राह्मणांत हे शब्द आलेले असून त्याचा अर्थ जिचें पाईलें वासरूं मेलेलें आहे व या मृत वासराच्या बदली ठेवलेल्या दुसऱ्या वासरावर जिचें प्रेम बसावयाचें आहे अशी गाय, असा आहे. निवान्यवत्साप्रमाणेंच अभिवान्यवत्स, अभिवान्या, वान्या व अपिवान्यवत्सा असे इतर शब्द आहेत.

"पूर्वा —हा शब्द घोड्यांना (अश्वास) लावलेला आहे. त्याचा उपयोग तैत्तिरीय ब्राह्मण व नंतरचे ग्रंथ यांत केलेला आढळतो. त्याचा 'नेता' म्हणून पुढें जुंपलेला घोडा, किंवा नुसता पाईल्याच वेळेस रथ ओढणारा घोडा असा अर्थ तैत्तिरीय ब्राह्मणांत भाष्यकार घेतात.

"प्र यो ग्य.—छांदोग्य उपनिषदांत (८ १२,३) याचा अर्थ 'गाडीला जुंपलेला प्राणी' 'वाहतुकीचें जनावर' असा आहे

"मं था व ल.—ऐतरेय ब्राह्मणांत हें एका प्राण्याचें नाव आलें आहे सेंटपीटर्सबर्ग कोशाप्रमाणें हें एका सर्पाचें नाव आहे. सायणमतानें हें खालीं डोकें वर पाय करून झाडास लोंबणाऱ्या छद्रा एका प्राण्याचें बहुधा वटवाघुळाचें नाव आहे.

"वा ह नं.—(नपुंसकलिंगी). ब्राह्मण ग्रंथांत याचा अर्थ ओझें वाहणारें जनावर व कधीं कधीं गाडी असा आहे.

"श फ.—ब्राह्मण ग्रंथांत हें एका लांकडी हत्याराचें (द्विवचनी) नांव आलें आहे. हें चिमटयाप्रमाणें चुलीवर भांडें उतरण्यास सोयीचें असतें. याला शफ हें नांव पडण्याचें कारण तें गाईच्या पसरलेल्या खुराप्रमाणें दिसतें.

"शा क ल.—ऐतरेय ब्राह्मणांत हा शब्द आला असून याचा अर्थ सेंटपीटर्सबर्ग कोशांत शाकल्याची विद्या असा दिलेला आहे पण बोथलिंगचा अर्थ—एक प्रकारचा सर्प—हाच बरोबर दिसतो.

"स्ना व न्य.— हा शब्द अनेकवचनी आलेला असून तैत्तिरीय आरण्यकांत (७,२३,१) घोड्याच्या शरीराचे विशिष्ट भाग असा याचा अर्थ आहे.

"उ भ या द त्.—'दोन्ही जबड्यामध्यें छेदक दात असलेला.' हा शब्द घोडा, गाढव इत्यादि पाळीव जनावरांना, बकरे मेंढे आणि इतर जनावरें यामध्यें फरक दाखविण्याकरितां योजिला आहे. हा फरक ऋग्वेदांतील उत्तरकालीन सूक्तांत आणि बरेच वेळा उत्तरकालीन संहिता व ब्राह्मणें यांतहि केला आहे. तैत्तिरीय संहितेंत एका ठिकाणीं मनुष्य आणि घोडा यांची बरोबरी केली आहे. उभयादत् या शब्दाच्या विरुद्ध अन्यतोदत् 'एकाच बाजूस दात असलेला' हा शब्द गुरेंढोरें यांना लावितात यांना आठ दात असतात आणि ते फक्त खालच्या जबड्यातच असतात. अथर्ववेदांत गर्दभाला उभयाद असें म्हटलें आहे. तथापि अथर्ववेदांतील एका वचनांत हा शब्द एडका याचें विशेषण म्हणून योजिला आहे. परंतु ज्याप्रमाणें ऋग्वेदांत एडका एका सिंहिणीला मारतो या चमत्काराचा उल्लेख आहे त्याप्रमाणेंच हा शब्द येथें एका चमत्कारिक अर्थानें उपयोगांत आणिला आहे. ब्लूमफील्ड म्हणतो कीं, अथर्ववेदांत दुसऱ्या एका ठिकाणीं याचा घोडा असा अर्थ आहे. तैत्तिरीय आणि वाजसनेयि संहितेंत 'एकशफ' आणि 'क्षुद्र' अशा जनावराच्या जाती किंवा भाग केले आहेत. ग्रीक आणि लॅटिन शब्दावरून श्रिमर असें दर्शविण्याचा प्रयत्न करतो कीं, इंडोयूरोपीय यज्ञपशूंच्या पाच जातींचे दोन वर्ग असत. एक मनुष्य व घोडा आणि दुसरा बकरे, मेंढे आणि दुसरीं जनावरें. परंतु ही कल्पना अयोग्य आहे.

"त्व च्.—कातडें किंवा जनावराचें चामडें असा या शब्दाचा अर्थ आहे. विशेषतः ऋग्वेदामध्यें चामडें अशा अर्थानें या शब्दाचा उपयोग केलेला आहे व सोमरस काढतांना या चामड्याचा उपयोग होत असे असें म्हटलें आहे. सोमवल्ली दाबावयाच्या फलकावर (अधिषवण फलक) पसरलेल्या कातड्यावर दगडांनीं कुटीत असत (या फलकाचा उल्लेख ऋग्वेदांत केलेला नाहीं), अथवा जरी खलबत्त्याचा उपयोग होत असला तरी सोमरसाचे थेंब धरण्याकरितां त्या खलबत्त्याच्या खालीं—पिशेल म्हणतो त्याप्रमाणें वर नव्हे—कातडें ठेवण्याचा प्रघात होता सोमवल्लीचा रस काढून घेतल्यावर मागें जी साल किंवा सालपट राहतें त्यासहि त्वचा म्हणण्याचा परिपाठ आहे. अलंकारिक रीत्या 'कृष्णत्वच्' हा शब्दसमूह हिंदुस्थानावर चाल करून येणाऱ्या आर्य लोकांच्या शत्रूंनां म्हणजे मूळच्या अनार्य लोकांना लावीत असत.

| | | |
|---|---|---|
| पौचन्नवीर्य | ६४ मरुत्त आविक्षित | सात्राजित |
| ४८ ध्वसन् | कामप्रि | शफाल |
| ४९ नग्नजित | ६५ मान्धात, यौव- | शांतनु |
| ५० नडनैषध | नाश्व | ७५ शिबि |
| ५१ नाग्नजित् | ६६ मार्गवेय | ७६ शुन कर्ण |
| ५२ नैषाधि | ६७ मुंजसामश्रवस | शुष्मिन् |
| ५३ पांचाल | मुद्गल, मुद्गलानी | ७७ शैब्य |
| ५४ पारिक्षित | ६८ युधांश्रौष्टि औग्र | ७८ शोण साप्रासाह |
| ५५ प्रतादर्शश्रक | सैन्य | श्रुतसेन |
| ५६ बल्हिकप्रातिपीय | योगन्धरि | मनश्रुत, अरिं- |
| ५७ भगीरथ ऐक्ष्वाक | ६९ रथप्रोत दार्भ्य | दम |
| ५८ भगाश्विन् | ७० रोहित | ८० सुत्वन् कैरिशि |
| ५९ भयदआसमात्य | ७१ वाराकि | भार्गायण |
| ६० भाल्किह | ७२ विदेघ | ८१ सुप्लन् (सार्जय) |
| ६१ भीमसेन | ७३ वृद्धद्युम्न अभिप्र- | सौद्युम्नि |
| ६२ भीमवैदर्भ | तारिन् | सौपमन् |
| भैमसेन | वैदर्भ | स्वर्जित् नग्नजित् |
| भैमसेनि | वैदर्भि | ८२ हरिश्चंद्र वैधस- |
| ६३ भौवन | वैन्य | ऐक्ष्वाक |
| मनुष्यराज, मनुष्य | वैधस् | ८३ हिरण्यनाभ |
| राजन् | ७४ शतानीक, | ८४ रथता भ |

१ उदङ्कशौल्बायन.—प्राण आणि ब्रह्म एकच आहेत असे याचे विचार असल्याबद्दल बृहदारण्यक उपनिषदात (४. १, ३.] वर्णन आलें आहे. तो विदेह देशाच्या जनकराजाचा समकालीन असावा असे वाटतें. तैत्तिरीय संहितेंत [७. ५, ४, २] सत्रातील दशरात्रक्रतु हाच मुख्य भाग आहे असें त्याचें मत होतें असा उल्लेख आहे. उदंक हें नांव आहे व शौल्बायन हें पैतृक नाव आहे.

२ केशिन् दार्भ्य अथवा दाल्भ्य.—'दर्भाचा वंशज'. शतपथ ब्राह्मणाप्रमाणें तो राजा होता व जैमिनीय उपनिषद्ब्राह्मणाप्रमाणें तो उच्चैःश्रवस् याच्या बहिणीचा मुलगा होता. पांचाल हे त्याचे प्रजाजन होते. म्हणून केशिन् ही त्याचीच एकशाखा असावी.आणि त्याचे तीन वर्ग (त्र्यनीक) होते असे म्हणतात. धार्मिक विधाचे बाबतींत त्याचें षण्डीक याच्याशीं पटत नव्हतें अशी एक कथा मैत्रायणी संहितेंत आहे; हीच गोष्ट शतपथ ब्राह्मणात दुसऱ्या शब्दात दिली आहे व मैत्रायणी आणि तैत्तिरीय संहिता यावरून केशिन् हा सात्यकामि याचा समकालीन होता असे वाटतें. पंचविंश ब्राह्मणाप्रमाणें एक साम अथवा एक गीताचा हा द्रष्टा आहे असें दिसते, व हें गीत याला सुवर्ण पक्ष्यानें कसें शिकविलें याचा कौषीतकि ब्राह्मणात उल्लेख आहे. जुनें वाङ्मय दार्भ्य हा ऋषि आहे असें मानितें आणि म्हणून शतपथ ब्राह्मणावरील टीकेंत तो राजा असल्याबद्दलचा व त्याच्या प्रजेचा जो उल्लेख आला आहे तो कितपत खरा मानावा याबद्दल शंका उत्पन्न होते. कारण, तो ऋषि असावा हाच अर्थ चांगला लागू पडतो. शिवाय जैमिनीय उपनिषद्ब्राह्मणावरहि जास्त भरंवसा टेवता येत नाहीं काठक संहितेंत केशिन लोक असा जो उल्लेख आहे तो राज्यपद दर्शवितो असें उत्तरकालीन ग्रंथकार(जै. उ. ब्रा.) गृहीत धरून चालतात. परंतु तें अयोग्य आहे.

३ परआट्णार.—ऋग्वेदोत्तर संहिताग्रंथ व ब्राह्मण ग्रंथ यामध्यें एक विशिष्ट यज्ञ करून पुत्र मिळविणाऱ्या पूर्वींच्या महान् राजर्षींपैकीं हा एक होय असा उल्लेख आहे. शतपथ ब्राह्मणांत हैरण्यनाभ व शांखायन श्रौतसूत्रात 'परआट्णार वैदेह अशीं नावें दिलेलीं आहेत. त्यावरून कोसल व विदेह याचा निकट संबंध असल्याचें सिद्ध होतें. त्याच सूत्रात उल्लेखिलेल्या यज्ञगाथेंत हिरण्यनाभ कौसल्य याचा उल्लेख 'परा' संबंधानें आलेला आहे. 'पर' हें विशेष नाम असून 'आट्णार' हें पैतृक नाव आहे. हा ऋषि आहे असें सायणाचार्य म्हणतात.

४ भालंदन—भलंदनाचा वंशज पंचविंश ब्राह्मण आणि काठक व तैत्तिरीय संहिता यात आलेल्या वत्सप्रीचें हे पैतृक नाव आहे. हा ऋग्वेदातील एका सूक्ताचा द्रष्टा आहे.

५ परिक्षित—अथर्ववेदामध्यें एका राजाचें हें नाव आलेलें आहे. याच्या म्हणजे कुरूंच्या राज्यात सुबत्ता व शांतता यानें साम्राज्य होतें. ज्या ऋचांतून याचे गुणवर्णन आलेलें आहे, त्या ऋचांना मागाहून 'पारिक्षित्यः' असें नाव पडलें. अग्नि मनुष्यांत राहतो म्हणून ब्राह्मण ग्रंथात त्याला परिक्षित असें नाव दिलेलें आहे. याच कारणास्तव या नावाचा मानवी राजा झालाच नाहीं असें रॉथ व ब्लूमफील्ड याचें जें मत तें कदाचित बरोबर असूं शकेल पण निश्चित असें कांहींच सांगता येत नाहीं. झिमर व ओल्डेनबर्ग हे दोघेहि हा राजा होता हें कबूल करतात व या गोष्टीला आधार म्हणजे उत्तरकालीन वैदिक ग्रंथात जनमेजय राजा पारिक्षित हे पैतृक नाव धारण करतो ही गोष्ट होय हें जर खरें असेल तर परिक्षित मागाहून झाला असावा. कारण, ज्या अथर्ववेदाच्या लेखात त्याचें नाव आलेलें आहे तो खात्रीनें मागाहून लिहिला गेला असावा. इतर कोणत्याहि संहिता ग्रंथात हा शब्द आलेला नाहीं. महाभारतामध्यें या परिक्षिताला प्रतिश्रवस याचा आजा व प्रतीपाचा पणजा असें म्हटलें आहे व झिमर अथर्ववेदातल्या दुसऱ्या एका मागाहूनच्या लेखात आलेल्या प्रातिसुत्वन् व प्रतीप याच्याशीं याची तुलना करतो व हें त्याचें करणें बरोबर दिसतें. पण देवापि व शंतनु याचा प्रतीपाशीं संबंध जुळविणें शक्य नाहीं.

६ दिवोदास भैमसेनी—भीमसेनाचा वंशज. हा शब्द काठक संहितेमध्यें आरुणीचा समकालीन म्हणून आलेला आहे.

[७]अग्नवैरोचन— ऐतरेय ब्राह्मणांत अभिषिक्त राजाच्या यादींत याचा उल्लेख आहे याचा उदमय आत्रेय या नावाचा पुरोहित होता

[८]अजातशत्रु—हा काशीचा राजा काश्य असून बालाकी नामक एका अभिमानी ब्राह्मणाला आत्मविद्येचें मूलतत्त्व शिकवीत असे असें बृहदारण्यक व कौषीतकि उपनिषदांत वर्णन आहे बौद्धधर्मीय पुस्तकांतील अजातशत्रु आणि हा एकच असें मानता येत नाहीं

[९]अत्यराति जानंतपि—हा राजा नसतांना वासिष्ठ सात्यहव्यानें याजकडून राजसूय यज्ञ करविला व त्यामुळे तो सर्व पृथ्वी जिंकण्यास समर्थ झाला वासिष्ठ सात्यहव्यानें जेव्हां पौरोहित्याचा मोबदला म्हणून त्याबद्दल बक्षीस मागितलें तेव्हां उत्तरकुरूना जिंकल्यावर सर्व पृथ्वीच राज्य आपणास देऊन मी आपला सेनापति होईन असें त्यानें राजानें उत्तर दिलें यावर अत्यराति म्हणाला तूं मला फसविलेंस कारण उत्तरकुरूना जिंकणें मनुष्याच्या स्वाधीन नाहीं नंतर सात्यहव्यानें आपल्या तपसामर्थ्यानें अत्यरातीचें सामर्थ्य काढून घेऊन त्याला हतबल केलें आणि शिबि राजाचा मुलगा अमित्रतपन शुष्मिन याजकडून त्याचा वध केला (ऐ ब्रा ८ २३)

[१०]अपाच्य—नीच्य आणि अपाच्य हीं पश्चिम दिशेच्या लोकांचीं नावें आहेत असा ऐतरेय ब्राह्मणात उल्लेख आहे

[११]अभिप्रतारिन काक्षसेनि—जैमिनीय उपनिषद् ब्राह्मण छांदोग्य उपनिषद् व पंचविंश ब्राह्मण यांत हा तत्त्वज्ञान विवादात निमग्न असे असा उल्लेख आहे हा कुरुवंशातील एक राजपुत्र होता व तो जिवंत असतांच त्याच्या मुलांनीं त्याची मालमत्ता वाटून घतली असा जैमिनीय उपनिषद् ब्राह्मणात उल्लेख आहे

[१२]अमित्रतपन शुष्मिन शैब्य—शिबीचा मुलगा यानें अत्यराति जानंतपिचा वध केल्याचा ऐतरेय ब्राह्मणात उल्लेख आहे. अमित्रतपन हें शत्रुतापन या अर्थी विशेषण आहे

[१३]अश्वपति—हा केकय देशाचा राजा असून यानें प्राचीनशाल यास व दुसऱ्या काहीं ब्राह्मणांना शिक्षण दिल्याबद्दल छांदोग्य उपनिषद् व शतपथ ब्राह्मण या ग्रंथात उल्लेख आहे

[१४]असमाति राथप्रोष्ठ—जैमिनीय उपनिषद् ब्राह्मणात रथप्रोष्ठ कुलातील इक्ष्वाकु राजा असमाति आणि त्याचे उपाध्याय गौपायन यांच्या भांडणाची गोष्ट आढळते ही आख्यायिका ऋग्वेदांतील एका उल्लेखावरून आली असावी परंतु तेथें असमाति हें फक्त विशेषण आहे नंतरची गोष्ट अशी आहे कीं, किरात आणि आकुलि या दोन असुरांनीं कुलोपाध्यायास सोडून देण्याबद्दल राजाचें मन वळविलें आणि त्याच्यापैकीं सुबंधूचा वध करविला परंतु त्याच्या भावांनीं त्याला ऋग्वेदांतील १० ६० या सूक्ताच्या मदतीनें जिवंत केलें असा पंचविंश ब्राह्मण व बृहद्देवता या ग्रंथात उल्लेख आहे

[१५]आम्बष्ठ्य—ऐतरेय ब्राह्मणात या राजाच्या राजसूय यज्ञात नारद पुरोहित होता असा उल्लेख आहे सेंट पीटर्सबर्ग कोशाच्या भाषांतराप्रमाणें हे 'आंबष्ठ याचा राजा' असें स्थानिक नाव असावें नंतर 'आंबष्ठ' म्हणजे ब्राह्मण जातीचा पुरुष आणि वैश्य जातीची स्त्री यांच्या पासून होणारी संतति असा अर्थ रूढ झाला.

[१६]इंद्रद्युम्न भाल्लवेय वैयाघ्रपद्य—अग्निवैश्वानराचे धर्म काय आहेत या बाबतींत इतर पुरोहितांबरोबर याचें मतैक्य होत नसे याला अश्वपति कैकेय यानें विद्या शिकविली होती शतपथ ब्राह्मणात याचा भाल्लवेय या नावानें धार्मिक विवादांत बऱ्याच वेळा उल्लेख आला आहे

[१७]इंद्रोत दैवाप शौनक—यानें जनमेजयाच्या अश्वमेध यज्ञात पौरोहित्य केल्याबद्दल शतपथ ब्राह्मणात उल्लेख आहे ऐतरेय ब्राह्मणात जनमेजयाचा पुरोहित तुर कावषेय हा होता असा उल्लेख आहे जैमिनीय उपनिषद्ब्राह्मणात हा श्रुत याचा शिष्य होता असा उल्लेख असून वंश ब्राह्मणांतहि याचा उल्लेख आला आहे ऋग्वेदांतील देवापीचा व याचा काहीं संबंध नाहीं

[१८]उग्रसेन—शतपथ ब्राह्मण आणि गाथा यामध्यें हा भीमसेन, श्रुतसेन व जनमेजय यांचा भाऊ असल्याबद्दल उल्लेख आहे आणि अश्वमेध यज्ञ केल्यामुळें यांची पापापासून मुक्तता झाल्याचाहि उल्लेख आहे.

[१९]उच्चैःश्रवस कौपयेय—हा कुरूचा राजा आणि केशिन् याचा मामा असल्याबद्दल जैमिनीय उपनिषद् ब्राह्मणात उल्लेख आहे उपमश्रवस हा कुरुश्रवणाचा मुलगा होता आणि हीं नावे सारखीं दिसतात म्हणून याचा कुरूशीं संबंध असावा असें दिसतें

[२०]ऋतुपर्ण—बौधायन श्रौतसूत्रांतील ब्राह्मण प्रभासारख्या एका उताऱ्यावरून हा भंगाश्विन् याचा मुलगा आणि 'शफाल, या राजा असावा असें वाटतें आपस्तंब श्रौत सूत्रात 'ऋतुपर्णं कयोवधि भंग्याश्विनौ' असा उल्लेख आहे.

[२१]ऋषभ—हा याज्ञतुर याचा आनुवंशिक व श्विक्नसचा राजा असून अश्वमेध करणारांपैकीं एक होता असा शतपथ ब्राह्मणात उल्लेख आला आहे शतपथ ब्राह्मणात गौरवीति याच्या नावावर जी गाथा आहे तिचा हाच बहुतेक जनक असावा असा त्या ग्रंथात उल्लेख आहे

[२२]एकादशाक्ष मानुतंतव्य—सूर्योदयाबरोबर होम करणाऱ्या (उदित होमी) राजाचें हें नाव आहे असा ऐतरेय ब्राह्मणात उल्लेख आहे हा नगरिन जानश्रुतेय याच्या समकालीं होता

[२३]ऐक्ष्वाक—इक्ष्वाकूचा वंशज. शतपथ ब्राह्मणाप्रमाणें पुरुकुत्स यानें हें आनुवंशिक नाव धारण केलें होतें दुसरा ऐक्ष्वाक वार्ष्णि हा असून तो अध्यापक होता असा जैमिनीय उपनिषद्ब्राह्मणात उल्लेख आहे राजा हरिश्चंद्र हा वैधस

एक्ष्वाक असल्याचा ऐतरेय ब्राह्मणात व त्र्यरुण हा एक्ष्वाक असल्याचा पंचविंश ब्राह्मणात उल्लेख आहे

'' औग्रसैन्य —ऐतरेय ब्राह्मणात राजा युधांश्रौष्टि याचें हें पैतृक नाव आहे

'' औपतस्विनि —शतपथ ब्राह्मणामध्ये राम याचें हें पैतृक नाव आहे

'' कामप्रि –ऐतरेय ब्राह्मणात मरुत्त याचें हें पैतृक नाव आहे सेंट पाटर्सबर्ग कोशात असें सुचविलें आहे कीं तो पाठ 'कामप्रे' 'इच्छापूर्ण करणार,' असा पाहिजे सायणाचार्य कामप्रि हें मरुत्त याचें विशेषण आहे असें भाष्यात म्हणतात

''काशि, काश्य —काशी (अनेकवचनात) म्हणजे काशाचे लोक आणि काश्य म्हणजे काशाचा राजा धृतराष्ट्र हा शतानीक सात्राजिताकडून पराभूत झाला आणि त्याचा परिणाम असा झाला कीं, पुन्हा ब्राह्मणावें वर्चस्व होईपर्यंत काशी लोकांनीं यज्ञ करावयाचें बंद ठेविलें असें शतपथ ब्राह्मणात (१३.५,४,९) म्हटलें आहे सात्राजित हा भरत होता अजातशत्रु हा काशींचा राजा होता असाहि उल्लेख आढळतो आणि उद्दालक याचा समकालीन भद्रसेन अजातशत्रव हाहि काशाचा राजा होता काशि आणि विदेह हे जवळचे नातेवाईक होत कारण भूगोलदृष्ट्या त्याची जागा स्थिर स्थान याचा विचार केल्यास तसें होणें स्वाभाविक होतें. कौषीतकि उपनिषदात 'काशि—विदेह' हें सामासिक नाव आलें आहे. बृहदारण्यकोपनिषदात गार्गी म्हणते कीं अजातशत्रु हा काशि किंवा विदेहचा राजा असावा. शांखायन सूत्रात काशि कोसल आणि विदेह याचा एकच पुरोहित होता असा उल्लेख आहे बौधायन श्रौत सूत्रात काशि आणि विदेह हे अगदीं नजीक आहेत असें म्हटलें आहे वेबर म्हणतो कीं काशि आणि विदेह हे दोन्ही मिळून उशीनर होतात आणि हें नाव वैदिक वाङ्मयात फारच क्वचित आलें आहे ज्याप्रमाणें कोसल आणि विदेह याचा निकट संबंध होता त्याप्रमाणें गोपथ ब्राह्मणात काशि आणि कोसल हे काशि—कौसल्य या सामासिक नावात गोविले आहेत. काशि" नाव जरी जुनें नसलें तरी तें शहर मात्र जुनें आहे कारण अथर्ववेदातील वरणावती नदीचा वाराणशी (काशी) शीं संबंध असावा हें स्पष्टच आहे कीं, जर काशि–कोसल आणि विदेह हे एक होते तर त्यांचा कुरुपंचालांशीं काहींतरी वैरभाव संबंध असावा या दोन मोठ्या राष्ट्रात त्यावेळीं राजकीय वैरभाव व त्याचप्रमाणें संस्कृतीमध्यें थोड्याफार प्रमाणात भिन्नता होती हें अनुमान योग्य दिसतें कोसल आणि विदेह या राष्ट्रांतील आर्य-सुराष्ट्रेच्या प्रगतीच्या स्थितीबद्दल शतपथ ब्राह्मणात या बद्दल स्पष्ट दंतकथा सापडते आणि तें ब्राह्मण सरस्वत च रौद्र केंद्रस्थान कुरुपंचाल देश होता याबद्दल एक आधार आहे भूगोलदृष्ट्या स्थलावरून विचार केला असता कोसल व विदेह हे कुरुपंचालाच्या अगोदरचे रहिवासी होते, तरी ब्राह्मण संस्कृति त्यांना कुरुपंचालाच्या कडूनच मिळाली पश्चिमेपेक्षा पूर्वभाग जरा कमी संस्कृत होता हे संभवत, आणि तो भाग ब्राह्मणाच्या धार्मिक वर्चस्वाच्या कमी आधीन होता कारण युद्धाचा चळवळ प्राचुर्य होती व युद्धप्रवृत्त क्षत्रिय वरच्या पायरीचे होते असा उल्लेख आहे मगधदेशातील लोक कमी धार्मिक होते म्हणून त्यांना वैरभावानें वागविलें जात असे ही गोष्ट वरील विधानास पुष्टि देते, आणि ती वाजसनेयि संहितेंत आहेहि कोसल, विदेह आणि काशि या खरोखर मागाहून माहित झालेल्या कुरुपंचालाच्याच शाखा असाव्या हे संभवतें, आणि त्याच्यातील अंतर व मूळच्या रहिवाश्यावर ढिला ताबा यामुळें त्यांनीं आपली ब्राह्मणसंस्कृति गमाविली शतपथ ब्राह्मणातील आर्यांच्या देशांतरासंबंधीं दंतकथेचा शब्दशः भाषांतरानें वरील प्रमेयास जरी दुजोरा मिळाला तरी तें प्रमेय तितकें जोरदार नाहीं.

''केशिन् —हा सत्रासह नामक पंचाल राजाचा पुत्र होता असें शतपथ ब्राह्मणात सांगितलें आहे

''कौसल्य —कोसल पुत्र शतपथ ब्राह्मणात पर आट्णार याचें आणि शांखायन श्रौतसूत्रात हिरण्यनाभ याचें हें नाव आहे प्रश्नोपनिषदात आश्वलायनाला (कोसलदेशचा म्हणून) कौसल्य आणि गोपथ ब्राह्मणात 'काशि' याला 'काशाचे लोक' (काशि–कौसल्या) असें म्हटलें आहे प्रश्नोपनिषद १ १ या ठिकाणीं याचें नाव आश्वलायन असावें असें दिसतें परंतु ६ १ या ठिकाणावरून हिरण्यनाभ कौसल्य हा राजपुत्रहि असावा असें दिसतें पहिला राजपुत्र असावा किंवा नाहीं, याबद्दल शंका आहे

[30] गान्धार.—नग्नजित् नावाचा एक गान्धार राजा ऐतरेय ब्राह्मणात आहे शतपथ ब्राह्मणात याचा किंवा दुसरा स्वर्जित्नाग्नजित याचा नग्नजित् असा उल्लेख आहे

[31] जनक —विदेहाचा राजा. याचा उल्लेख शतपथ ब्राह्मण, बृहदारण्यकोपनिषद, जैमिनीय उपनिषद्ब्राह्मण व कौषीतकि उपनिषद् या ग्रंथात प्रामुख्यानें आलेला आहे. हा जनक राजा याज्ञवल्क्य वाजसनेय व श्वेतकेतु आरुणेय याचा व इतर ऋषींचा समकालीन होता. अजातशत्रु याच्या अमदानींत या जनक राजाची त्याच्या औदार्याबद्दल व मोक्षाचा पाया जें ब्रह्मज्ञान तें काय आहे यासंबंधीं वादविवाद करण्याबद्दल फार प्रसिद्धि आहे या जनक राजाचें कुरुपंचाल देशातील ब्राह्मणाशी निकट दळणवळण होतें ही गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे कारण त्यावरून एक अशी गोष्ट सिद्ध होते कीं उपनिषदांतर्गत सात्त्विक ज्ञानाचें माहेरघर कुरुपंचाल देशच होता पूर्वेकडील देश नव्हता शतपथ ब्राह्मणात असा एक उतारा आलेला आहे कीं तो ब्रह्मपदास गेला. याचा अर्थ इतकाच कीं त्याची क्षत्रिय ही जात न बदलता तो ज्ञानानें ब्राह्मणत्व संपादिता झाला जनकाच्या नावाचा उल्लेख पुढील ग्रंथातहि आलेला आहे

तैत्तिरीय ब्राह्मणात याला पुराणकालीन महापुरुषाचें महत्त्व आलेलें आहे. शांखायन श्रौतसूत्रात त्याच्या नावावर सम्राज नावाच्या एका ऋतूचा उल्लेख आलेला आहे. ज्या अर्थी जनक राजा अजातशत्रूच्या समकाली होता आणि हा अजातशत्रु व पालीग्रंथांतील अजातशत्तु या दोन्ही एकच व्यक्ती होत असें मानिलें तर जनक राजा खिस्त शकापूर्वी ६०० वर्षे अगोदर होऊन गेला असें मानणे युक्तीचें होणार नाहीं. पण या विचारसरणींत एक चूक होते ती अशी कीं, अजातशत्रु हा काशीचा राजा होता व अजातशत्तु हा मगध देशाचा राजा होता व त्याचा संबंध काशीशी फक्त कोसलाधिपति पसेनादि याच्या मुलीशीं लग्न लाविल्यामुळें आला शिवाय दुसरी एक अशी अडचण उपस्थित होते कीं हे दोन्ही अजातशत्रू एकच मानले तर बुद्ध धर्माचा उदयकाल उपनिषदांतील तत्त्वज्ञानाशीं समकालीन होऊं लागेल पण वस्तुस्थिति अशी आहे कीं उपनिषदें अर्लीकडील असलीं तरी बुद्धजन्माच्या अगोदर खास लिहिलीं गेलीं. दुसरें असें कीं बिंबिसार किंवा प्रसेनजित (पसेनदि) हे जे राजे होऊन गेले व ज्यांची महति बौद्धग्रंथांत वर्णिली आहे त्यांचा वैदिक ग्रंथात मागमूसहि नाहीं. कांहीं लोकांच्या मतें विदेहाचा जनक राजा हाच सीतेचा बाप होता. परंतु हे मत सुद्धा सर्वस्वी खरें मानतां येत नाहीं सूत्रग्रंथामध्यें जनकाचें असें वर्णन आहे कीं तो एक प्राचीन राजा होऊन गेला व तो अशा वेळीं कीं लग्नाच्या स्त्रीला पुढें जो मान मिळूं लागला तो त्यावेळीं कमी मिळत असे.

[३२] जनमेजय.—'मनुष्यास प्रवृत्त करणारा' असा या शब्दाचा अर्थ आहे हें नाव एका राजाचें असून ब्राह्मण कालात तो राजा पारिक्षित या नावानें प्रसिद्ध होता. शतपथ ब्राह्मणात या राजाबद्दल अशी माहिती आली आहे कीं, या राजाजवळ पुष्कळ अश्व होते व ते श्रांत झाले म्हणजे त्यांना मधुर पेय देऊन तो ताजेतवाने करीत असे. शिवाय तो अश्वमेध यज्ञ करीत असे. याच्या राजधानीचें नाव शतपथ व ऐतरेय ब्राह्मण या ग्रंथात उद्धृत केलेल्या गाथेप्रमाणे आसंदीवत हें होतें. त्याचे बंधू उग्रसेन, भीमसेन व श्रुतसेन यांनीं अश्वमेध यज्ञ करून आपल्या पापाचें क्षालन करून घेतलें अशी कथा आली आहे. ज्या पुरोहितानें या जनमेजयाकरिता अश्वमेध यज्ञ केला त्याचें नांव इंद्रोत दैवापि शौनक असें होतें. परंतु ऐतरेयब्राह्मणाप्रमाणें तें नांव तुर-कावषेय असें होतें. या ब्राह्मणग्रंथात अशी एक कथा आली आहे कीं, या राजानें एका यज्ञाच्या वेळीं कश्यपाना न बोलावता भूतवीराकडून यज्ञ करविला परंतु नंतर असितमृगाच्या आग्रहावरून पुन्हा त्यानें कश्यपानांच बोलाविलें. जनमेजय हा कुरु राजा होता. गोपथब्राह्मणात त्याच्याबद्दल तो एक प्राचीन काळचा मोठा पुरुष होता अशा अर्थानें एक हास्यास्पद गोष्ट आली आहे.

[३३] जानक—( जनकाचा वंशज. ) हा शब्द वडिलाच्या नावावरून आलेला असून ऐतरेय ब्राह्मणात क्रतुविदाचें नाव म्हणून आलेला आहे. तैत्तिरीय संहितेत क्रतुवित् जानकि हें नाव आलें आहे जानक हे बृहदारण्यकोपनिषदाप्रमाणें अयस्थूण याचें पितृप्राप्त नाव म्हणून आलेलें आहे. पण या उपनिषदात जानक हा जानकि या शब्दाचा निःसंशय अपपाठ आहे.

[३४] जैत्रायण सहोजित—काठकसंहितेंत राजसूय यज्ञ करणाऱ्या राजाचें हें नाव आहे आडरच्या मतें हें विशेष नाम आहे व त्यानें स्वमतपुष्ट्यर्थ जैत्र याचा वंशज जैत्रायणि ( पाणिनीनें केलेल्या गणकादि ) या रूपात उल्लेख केला आहे. पण हें लक्षात ठेविलें पाहिजे कीं, कापिष्ठल संहितेच्या तत्सदृश लेखात हा पाठ निराळा आहे व तेथें हा शब्द विशेषनामार्थी वापरला आहे असें दिसत नाहीं. कारण तेथें वर्ण्यविषय इंद्र हा असावा. हाच पाठ एकंदरींत बरोबर असावा, कारण सर्व ऋचा सर्वसामान्य असून प्रत्येक अश्वमेध करणाऱ्या राजाला लागू पडणारी आहे.

[३५] जैवल किंवा जैवलि—हा शब्द बृहदारण्यक व छांदोग्य उपनिषदात प्रवाहणाचें पितृप्राप्त नाम म्हणून आला आहे. जैमिनीय उपनिषद्ब्राह्मणात जैवलि म्हणून जो राजा आला आहे तो हाच होय.

[३६] दक्ष पार्वति—( पर्वताचा वंशज ) शतपथब्राह्मणात दोणतेंसें एक व्रत केल्याबद्दल याच्या नांवाचा उल्लेख आला आहे. हें व्रत त्याचे वंशज दाक्षायण हे पुढें चालवीत असत. कारण त्यामुळें ब्राह्मण-कालापर्यंत त्याना राजाचा मान मिळत होता. या दक्षाचें नाव कौषीतकि ब्राह्मणातहि आलेलें आहे.

[३७] दुर्मुख.—' कुरूप चेहरा असलेला ' असा याचा अर्थ असून हें नाव ऐतरेयब्राह्मणात एका पांचालाचें (पंचाल देशच्या राजाचें ) आहे या पांचाल राजानें सर्व जग जिंकून टाकल्याबद्दल व त्याना पुरोहित बृहदुक्थ नावाचा असल्याबद्दल ऐ. ब्राह्मणात उल्लेख आहे.

[३८] दुष्टरीतु—'ज्याचा पराभव करणें अवघड आहे असा'. हें सृंजय नामक लोकांच्या राजाचें नाव आहे. याच्या घराण्यात दहा पिढ्यापर्यंत असलेल्या राज्यावरून तो च्युत झाला. पण शतपथ ब्राह्मणात सांगितल्याप्रमाणें बाल्हिक प्रातिपीय याच्या प्रतिकारास न जुमानता चाक्रस्थपतीनें पुन्हा त्याच्या गादीवर त्याची स्थापना केली.

[३९] देवकीपुत्र—देवकीचा मुलगा कृष्ण हें नाव छांदोग्योपनिषदांत आलें आहे महाभारतात असें म्हटलें आहे कीं, कृष्णाची आई देवकी इचा बाप देवक या नावाचा होता. रॉथचें असें मत आहे कीं, देवक हा गंधर्वांचा राजा असावा व अशाच अर्थी महाभारतात त्याचा उल्लेख आहे (?).

४० दे व रा ग न्.—याचा उघड अर्थ ब्राह्मणवंशातला राजा असा आहे. हा शब्द पंचविंशब्राह्मणांत 'देवराजाचें साम' या समुच्चयात आला आहे.

४१ दै वा प.—'देवापीचा वंशज' हें नाव जैमिनीय उपनिषद्ब्राह्मण व शतपथ ब्राह्मण यात इंद्रोताचें पैतृक नाव म्हणून आलें आहे. या देवापीचा व ऋग्वेदातील देवापीचा कांहीं संबंध नाहीं.

४२ दै वा वृ ध —'देवावृधाचा वंशज' ऐतरेयब्राह्मणात हें बभ्रूचें पैतृक नाव आलेलें आहे.

४३ दै वो दा सि —'दिवोदासाचा वंशज' हें कौषीतकि ब्राह्मण व उपनिषद् यामध्ये प्रतर्दनाचें नाव म्हणून आलें आहे. हा दिवोदास म्हणजे ऋग्वेदातील प्रसिद्ध दिवोदासच कीं काय समजत नाहीं

दौः पं ति.—'दु पताचा वंशज' हें ऐतरेय व शतपथ-ब्राह्मणात भरताचें पैतृक नाव म्हणून आलें आहे.

४५ द्वै त व न —'द्वितवनाचा वंश' शतपथ ब्राह्मणात उल्लेखिलेल्या अश्वमेधाचा कर्ता व मत्स्य देशाचा राजा जो ध्वसन् त्याचें हें पैतृक नाव आहे.

४६ धा नं ज य —धनंजयाचा वंशज. वंशब्राह्मणाप्रमाणें अंशु याचें पैतृक नाव आहे

४७ धृ त रा ष्ट्र वै चि त्र वी र्य.—'विचित्रवीर्याचा वंशज' काठकसंहितेंत हें नांव एका ठिकाणीं आलें आहे. पण हा लेख अत्यंत दुर्बोध आहे. हा कुरुपचाल देशाचा राजा नसून त्या देशापासून कांहीं अंतरावर रहात असावा. हा धृतराष्ट्र आणि त्याचा पराभव अश्वमेध यज्ञाच्या प्रसंगीं शतानीक साम्राजितानें केला तो काशीचा राजा व शतपथ-ब्राह्मणात उल्लेखिलेला धृतराष्ट्र हे सर्व एकच होत असें न मानण्यास कांहीं सबळ कारणें नाहींत असें मॅक्डोनेल म्हणतो. सत्राजित हा भरत होता यावरून कुरुपांचाल हा धृतराष्ट्र नसावा असा त्यास संशय येतो काठकसंहितेंत धृतराष्ट्राचा बकदाल्भ्य याशीं वादविवाद झाल्याचा उल्लेख आहे ही गोष्ट खरी, पण शतपथब्राह्मणात उल्लेखिलेला धृतराष्ट्र राजा हा पंचाल होता असें जरी गृहीत धरलें तरी प्रथम उल्लेखिलेला धृतराष्ट्र कुरु होता, किंवा या तत्त्वावरून कुरु व पंचाल यामध्यें पूर्वीपासून वैर होतें अशा प्रकारची अनुमानें करणें चुकीचें होइल अशी त्याची विचारसरणी आहे आता महाभारतात शंतनु विचित्रवीर्य व धृतराष्ट्र याचे संबंध दाखविले आहेत. पण हे संबंध पूर्वकालीन मोठ्या विभूतींसंबधानें जो घोटाळा केलेला असतो त्यामुळें येतात असें त्याचें म्हणणें आहे. परंतु महाभारतातील परंपराहि अधिक जुनी असण्याचा संभव आहे.

४८ ध्व स न्‌ द्वै त व न —'द्वितवनाचा वंशज' शतपथब्राह्मणात सरस्वती नदीचे कांठीं यज्ञ करणाऱ्या मत्स्य लोकांच्या राजाचें हें नाव आहे.

४९ न ग्न जि त् —हा गान्धार देशचा राजा असून ऐतरेय ब्राह्मणात पर्वत, व नारद यानीं याला राज्याभिषेक केला अशी कथा आली आहे. शतपथ ब्राह्मणात या राजाचें नांव स्वर्जित् याच्या पुत्राबरोबर आलें आहे व त्याच ग्रंथात या दोघांपैकीं एकानें दिलेल्या एका धार्मिक विधीची बरीच थट्टा केली आहे.

५० न ड नै ष ध —शतपथब्राह्मणात याचा उल्लेख आला आहे. हा मानवी राजा असावा व त्यानें जे विजय संपादिले त्यामुळें त्याची यमाशीं तुलना केली असावी. याच ब्राह्मणग्रंथात याला दक्षिणेकडील यज्ञातील अग्नि असें म्हटल्यावरून हा बहुतकरून दक्षिण दिशेचा राजा जसा यम हा मानिला आहे त्याप्रमाणें हाहि दक्षिणेकडील राजा असावा नड आणि दमयंतीपति नल हे एकच असावेत.

५१ ना ग्न जि त् —'नग्नजिताचा वंशज' शतपथ ब्राह्मणात स्वर्जिताचें हें पैतृक नाव आहे

५२ नै षि ध —शतपथब्राह्मणात हें नांव आलें आहे व तें दक्षिणेकडील राजाचें विशेषण म्हणून आलें आहे. याच नावाचें पुढें प्रचारात आलेलें नैषध हें रूप होय व तें सें. पी. केशलाहि मान्य आहे. नड आणि नल हे एकच होत. कारण 'डलयोरभेद' असा नियमहि आहे. कदाचित याला निषध देशाचा राजा म्हणून नैषिध म्हटलें असावें. कदाचित् नैषिध हेंच रूप बरोबर असावें.

५३ पा चा ल —या शब्दाचा अर्थ पंचाल लोकांचा राजा असा आहे. ऐतरेय ब्राह्मणात हा शब्द दुर्मुखाला लाविलेला आहे व शतपथ ब्राह्मणात शोणास लाविलेला आहे. जैमिनीय उपनिषद्ब्राह्मणातहि हा शब्द आलेला आहे.

५४ पा रि क्षि त —परिक्षिताचा वंशज. ऐतरेय व शतपथ ब्राह्मणात जनमेजयाचें पैतृक नाव म्हणून हा शब्द आलेला आहे. हे पारिक्षितीय, शतपथब्राह्मणात व शाखायन श्रौतसूत्रात अश्वमेधयज्ञकर्ते म्हणून आलेले आहेत. त्यात जी गाथा आहे तींत जनमेजयाचे उग्रसेन, श्रुतसेन व भीमसेन या नावाचे भाऊ होते व त्याना पारिक्षित हें नाव देत असल्याचा उल्लेख आहे. बृहदारण्यकोपनिषदात ते कोठें गेले याबद्दल बरीच तात्त्विक चर्चा केलेली आहे. या उपनिषद्कालाच्या अगोदरच हें घराणें नामशेष झालें होतें असें स्पष्ट दिसतें. हें घराणें जें उच्च पदवीला पोचलें होतें त्याबरोबरच कांहींतरी विशेष जनप्रवाद होता व त्याची निष्कृति ब्राह्मणाच्या मतानें त्यानीं अश्वमेध करून व उपाध्यायास मुबलक दक्षिणा देऊन केली असावी हेंहि स्पष्ट आहे. वेबर म्हणतो या कथेंतच महाभारतात वर्णिलेल्या कथेचें बीज असावें अथर्ववेदात आलेल्या परिक्षितासंबंधींच्या मंत्रानाच पुढें 'पारिक्षित्यः' हें नाव दिलें असावें.

५५ प्र सी द द्दै वै क्र —याचा उल्लेख शतपथ ब्राह्मणात आला आहे. याचा उल्लेख दाक्षायणाबरोबर यज्ञात हवन करतांना व सुद्धन् साञ्जय याला शिकवितानां आढळतो.

नंतर हाच सहदेव साञ्जय झाला असावा. दुसऱ्या एका उताऱ्यांत याला सुप्लन् साञ्जय याच्या संबंधात आणिलें आहे. एगलिंगच्या मताप्रमाणें याला श्रिंक्रींचा राजा ठरविलें पाहिजे. तो इभावताचा वंशज होता. एका प्रतीदर्शाचा उल्लेख जैमिनीय उपनिषद्ब्राह्मणांत आढळतो.

५६ बाल्हिक प्रातिपीय.—हें नांव शतपथ ब्राह्मणांत एका कुरु राजाचें म्हणून आलें आहे. सृंजयाचा दुष्टरीतु पौंस्यायन हा पुन्हा राजा होऊं नये म्हणून यानें यराच अटथळा आणला. परंतु त्यांत त्याला अपयश आलें. व पौम्धायन हा 'रेवोत्तरस् पाट व चाक्रस्थपति' याच्या मदतीनें आपल्या पूर्वजाच्या गादीवर वसला. प्रतिपीय हें विशेषण जरा चमत्कारिकच आहे. जर याचा संबंध प्रतीपाशी दाखवावयाचा असेल ( याचाच तो इतिहास ग्रंथात ( भारतात ) मुलगा आहे.) तर हें रूप चमत्कारिक (चूक या अर्थी) आहे. झिमर याचे 'प्रातीपीय' असें रूप करतो महाभारतात हा बाल्हिक या रूपांत आहे व त्याला देवापि आणि शंतनु याना भाऊ बनविलें आहे व प्रतीपाचा मुलगा असेंहि म्हटलें आहे. या कथेवरून याच्या कालाचा निर्णय करणें फार कठिण आहे कारण वास्तविक देवापि हा ऋष्टिषेणाचा मुलगा असून एक ऋषि होता व शंतनु हा कुरुंचा राजा असून त्याचेशी वंशाचा पत्ता लागत नाहीं. परंतु तो बहुधा प्रतीपाचा मुलगा असावा. प्रतीप हा वेदांत परिक्षिताच्याहि मागाहून आला आहे व तो परिक्षित तर त्याचा पणतू आहे. बहुधा बल्हीक हा प्रतीपाचा वंशज असावा. त्यानें बाल्हिक हें नाव का धारण केलें हें सांगणें कठिण आहे. कारण त्याबद्दल कांहीं पुरावा सापडत नाहीं. परंतु बाल्हिक हें देशाचें नांव असून त्यावरून 'तात्स्थ्यात्तत्वं' या न्यायानें हें नाव पडण्याचा संभव आहे.

५७ भगीरथ ऐक्ष्वाक—इक्ष्वाकुवंशज. हें नांव जैमिनीय उपनिषद्ब्राह्मणात एका राजाचें म्हणून आलें आहे. हा कुरुपांचालावरोबर मित्रत्वानें वागत होता ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. यावरून इक्ष्वाकू हे कुरुपांचाल लोकांबरोबर मित्रत्वानें संबद्ध होते असें ठरतें व ते बुद्ध ग्रंथात लिहिल्याप्रमाणें हिंदुस्थानच्या पूर्वेकडील नव्हते.

५८ भंगाश्विन.—बौधायन श्रौतसूत्रात ऋतुपर्णाच्या बापाचें हें नांव आलेलें आहे. महाभारतात याला भांगासुरि असें नांव दिलें आहे. ऋतुपर्णकयेवाधि हेच भंगयश्विनी होत असा उल्लेख आपस्तंब श्रौतसूत्रांत आला आहे.

५९ भयद आसमात्य.—असमातींचा वंशज. जैमिनीय उपनिषद् ब्राह्मणांत हें एका राजाचें नाव आहे. ओरटेल याच्या मतानें हें नांव 'अभयद' असें असावें. परंतु हें शक्य दिसत नाहीं. कारण 'भयद' हें नाव पुराणांत आलें आहे.

६० वाध्रिक ह.—वध्रिहाचा वंशज. पंचविंशब्राह्मणांत हें शुनःस्कर्णाचे पैतृक नाव म्हणून आलें आहे. बौधायन श्रौतसूत्रांत याला शिबींचा वंशज म्हटलें आहे.

६१ भीमसेन.—जनमेजय पारिक्षित याच्या भावाचें हें नांव शतपथ ब्राह्मणात आलें आहे. शौनकांनीं भीमसेनाकडून यज्ञ करविल्याचा शाखायन श्रौतसूत्रात उल्लेख आहे.

६२ भीम वैदर्भ.—विदर्भाचा राजा. सोमरसाच्या ऐवजी दुसरा पदार्थ घेण्याबद्दल याला पर्वत आणि नारद याच्यापासून गुरुपरंपरागत माहिती मिळाली होती. असा ऐतरेय ब्राह्मणांत उल्लेख आहे. सायणाचार्य या ठिकाणीं भीम आणि वैदर्भ हे भिन्न आहेत असें म्हणतात.

६३ भौवन.—भुवनाचा वंशज. हें निरुक्त,ऐतरेय व शतपथ ब्राह्मण यात ऐतिहासिक पैतृक नाव आले आहे.

६४ मरुत्त आविक्षित.—कामप्रीचा मुलगा हें एका राजाचें नांव आहे. ऐतरेय ब्राम्हणात याला संवर्ताकडून राज्याभिषेक झाल्याचा उल्लेख आहे. शतपथ ब्राम्हणातील या राजाच्या चरित्रावरून याला 'आयोगव' म्हणत असत असें दिसते.

६५ मान्धातृ यौवनाश्व.—युवनाश्वाचा वंशज.गोपथ ब्राह्मणात एक राजा म्हणून याचा उल्लेख आला आहे. कवन्ध आथर्वणाचा शिष्य विचारिन् याचा हा शिष्य होता.

६६ मार्गवेय.— हें राम याचें पैतृक नांव ऐतरेय ब्राह्मणांत आलें आहे व तेथें त्याला श्यापर्ण म्हटलें आहे. कदाचित हा मृगवु नामक स्त्रीचा मुलगा असून श्यापर्ण हें त्याचें कुलनाम असावें.

६७ मुंज सामश्रवस्.—हें एखा्या मनुष्याचें अथवा राजाचें नाव असावें. जैमिनीय उपनिषद् ब्राम्हणांत व षड्विंश ब्राह्मण यामध्यें याचा उल्लेख आहे

६८ युधांश्रौष्टि-औग्रसैन्य.—उग्रसेनाचा वंशज. पर्वत आणि नारद यानीं राज्याभिषेक केलेल्या ऐतरेय ब्राम्हणातील एका राजाचें हें नाव आहे.

६९ रथप्रोत-दार्भ्यः—दर्भाचा वंशज. मैत्रायणी संहितेंत राजा या अर्थानें आणि विशेषतः गुरु या नात्यानें याचा उल्लेख आला आहे.

७० रोहितः—ऐतरेय ब्राम्हण व शाखायन श्रौतसूत्र यात वर्णिलेल्या शुनःशेपाच्या प्रसिद्ध गोष्टींत हरिचंद्राच्या मुलाचें हें नाव आलें आहे.

७१ वारक्रि.—वारकाचा वंशज, जैमिनीय उपनिषद् ब्राम्हणांत कंसाचें पितृप्रास नाव म्हणून याचा उल्लेख आहे.

७२ विदेघ.—शतपथ ब्राम्हणात माथव नावाच्या एका मनुष्याचें हें नांव आहे. मागाहून ज्याना विदेह लोक म्हणूं लागले त्या विदेह देशाच्या राजाला हें नाव दिलें होतें. असें मानणें गैरशिस्त होणार नाहीं.

७३ वृद्धद्युम्न-अभिप्रतारिन्.—हें ऐतरेय ब्राम्हणांत एका राजाचें ( राजन्याचें ) नाव आलें आहे. व त्यात त्याचा उपाध्याय शुचिवृक्ष गौपलायन याची स्तुति आली आहे. शांखायन श्रौतसूत्रात असा उल्लेख आहे कीं वृद्धद्युम्न अभिप्रतारिन् यानें 'त्रिष्टोमक्षमक्षत्रधृति' नावाचा यज्ञ केला.

त्रिष्टोम म्हणजे स्तुतिरूप मन्त्राचा (सामाचा) तीन तीन वेळा आवृत्ति करणें अशा प्रकारचा राजानें केलला हा ' त्रिष्टोम-क्षत्रधृति ' यज्ञ एका पुरोहितास पसत पडला नाहीं त्याच्या मतानें राजानें फक्त क्षत्रधृति यज्ञच करावा, त्रिष्टोम करु नये असें होतें आणि या पातकामुळच या सम्राजात कुरूचें कुरुक्षेत्रातून उच्चाटण होईल असा शाप दिला, आणि त्याचप्रमाण पुढें घडून आलें ( वराल स्थलीं या ठिकाणीं शाप देणाऱ्या पुरोहिताच्या नावाचा उल्लेख नाहीं व भवि ष्याचाहि सबध नाहीं)

[७५]श ता नी क-सा त्रा जि त —ऐतरेय व शतपथ ब्राह्मणात काशीचा राजा धृतराष्ट्र याचा पराभव करून त्याच्या अश्वमेध यज्ञातील घोडा घेऊन जाणाऱ्या एका राजाचें हें नाव आहे. हा नि सशय भरत होता याचा अथर्ववेदातहि उल्लेख आलेला आहे व तेथें दाक्षायणासबधानें ' दाक्षायण ब्राह्मणानें ज्याप्रमाणें शतानीकाला बाधिलें त्याप्रमाणें आम्ही तुला सुवर्णानें बाधितों' असा उल्लेख आहे

[७६]शि बि —हा उशीनराचा मुलगा होता हा इंद्राचा आश्रित असल्याबद्दल बौधायन श्रौतसूत्रात उल्लेख आहे इंद्रानें ' वर्षिष्ठीय ' नामक भूप्रदेशावर यज्ञ करून परचक्रापासून याची सुटका केला

[७७]शु न क र्ण.—बौधायन श्रौतसूत्रात हें एका राजाच नाव आलें आहे हा शिवि किंवा बष्किह याचा मुलगा होय यानें सर्वस्वार नावाचें एक कर्म आचरून रोगाशिवाय मृत्यु सपादिला अशी कथा पचविंश ब्राह्मणात आला आहे

[७८]शै ब्य —शिबीचा वशज ऐतरेय ब्राह्मणात ' अमित्रतपन शुष्मिन ' नामक राजाचें ह नाव आहे प्रश्नोपनिषदात सत्यकाम जाबालाचें हें पैतृक नाव आहे

[७९]शो ण सा त्रा सा ह —हा पचाल देशाचा राजा असून याचें नाव शतपथ ब्राह्मणात आल आहे यानें अश्वमेध यज्ञ केला त्या वर्षी तुर्वश देखील आल होते, असें त्याच ब्राह्मणात म्हटलें आहे

[८०]स न श्रु त अ रिं द म —ऐतरेय ब्राह्मणात एका महाराजाच ह नाव आल आहे सनश्रुत व अरिंदम हे गुरुशिष्य अथवा कदाचित् एकच व्यक्ति असावी असें सायणाचार्य भाष्यात म्हणतात

[८१]सु त्व न्-कै रि शि भा र्गा य ण —ऐतरेय ब्राह्मणात हें एका राजाचें नाव असून याला मैत्रेय कौषारव यानें मत्र शिकविल्यामुळें यानें पाच राज ठार मारून महत्पद प्राप्त करून घतल

[८२]सु प्ल न सा र्ञ्ज य — प्रतीदर्शानें ज्याला दाक्षायण यज्ञ शिकविला त्या सृंजय लोकाच्या राजाचें हें नाव शतपथ ब्राह्मणात आल आहे या यज्ञात याला यश मिळालें म्हणून यानें महदेव हे नाव धारण केलें

[८३]ह रि श्च न्द्र वै ध स ऐ क्ष्वा क —एका कथेंतील राजाचें नाव यानें अविचारानें आपला रोहित नामक मुलगा वरुण राजास बलि देण्याचें कबूल केल, या संक्षिप्त गोष्टीवरून ऐतरेय ब्राह्मण व शाखायन श्रौतसूत्रात शुन शेपाची विस्तृत गोष्ट आली आहे

[८४]हि र ण्य ना भ —हा कोसल देशाच्या राजाचें नाव आहे यानें अश्वमेध केल्याचा शाखायन श्रौतसूत्रात उल्लेख आहे याचा प्रश्नोपनिषदात उल्लेख आला असून परशाट्णाराशींहि त्याचा सबध असावा

[८५]है र ण्य ना भ —हिरण्यनाभाचा वशज शतपथ ब्राह्मणातील एका गाथेंत कोसल राजा परआट्णार याचें पैतृक नाव म्हणून याचा उल्लेख आहे

## स्तोतृनामें [ ऋग्वेद ]

| | | |
|---|---|---|
| अग्नि | धियधस | रभ |
| आभु | धियायु | रुद्र |
| आसाव | धीरण | रेभ |
| उक्थशासिन | धीवत | वक्मराजसत्य |
| ऋक्वन् | नम | वनद |
| [१]कारु | नद | विनद |
| कीर | नाद | विनंगृस |
| कास्त | नामन | [२]विप्र |
| कुभन्यु | निवचन | विवक्वत् |
| कृपण्यु | पनित | वृषस्तुप |
| क्रवण | पृच | वघत् |
| गातु | ब्रह्मा | शशमान |
| गायत्रिन् | भदिष्ठ | [३]सूरि |
| गीर | मनान | स्तवान |
| गृणत | मनायु | स्तामु |
| गा | मद | स्तुप् |
| छदस् | मधिर | [४]स्तोतृ |
| छदस्तुभ | येमान | होत |
| [५]जरित | रण्यवाच् | |

अथर्ववेद

| | | |
|---|---|---|
| अर्क | जरितृ | रभ |
| कारि | दवयु | |

[१]का रु ( कवि ) —कारु हा शब्द बहुतेक ऋग्वेदातच आहे कारु हा वैद्यासारखा धंदेवाला (भिषज्) असे अशा बद्दल आधार आहे कवी हे श्रीमत व्यापाऱ्याची स्तुति करीत असत तरी ते राजे लोकाच्या आश्रितामध्येंच मुख्यत्वेंकरून रहात असत उपाध्याय आणि कारु यांच्यात विशेष सबध कांहींच नव्हता उपाध्याय हा जरी बहुधा कवि असे तरी कविता करणें उपाध्यायमडळाकडेच असे असें नाही अश्वमेधाच वर्णी स्तुतिपाठकापैकीं एक गाणारा राजन्य असला पाहिजे आणि दुसरा ब्राह्मण असून त्यानें ( स्वत ला विहित असलेलें )स्वकवन म्हटलें पाहिजे असें शतपथ ब्राह्मणात स्पष्ट लिहिलें आहे पुष्कळ ठिकाणीं ऋग्वेद अनुक्रमणी ऋग्वेदात ल

ऋत्वाचें कर्तृत्व राजाकडे देते; आणि ज्या पद्धतीनें किंवा रीतीनें शूद्रक मृच्छकटिकाचा कर्ता झाला आहे, अथवा हर्ष रत्नावलीचा झाला आहे, आणि कोठें कोठें ब्राह्मणाचे गुरु राजेहि आहेत तीच रीत अनुक्रमणींत चालू असली तरी हिंदी अब्राह्मण कवी होते यात काहींच आश्चर्य वाटत नाहीं.

[१]जरितृ.—सीगच्या मतानें ऋग्वेदाच्या एका सूक्तात जरितृचा उल्लेख शार्ङ्गापैकीं एक म्हणून आलेला आहे, व त्याची हें सूक्त व महाभारतातील कथा याची सांगड घालण्याची खटपट आहे.महाभारतात अशी कथा आहे कीं,मदपाल ऋषीनें शार्ङ्ग पक्षिणीशीं–कटकाशीं–लग्न लाविलें व इच्यापासून त्याला चार मुलें झालीं. हीं मुलें जेव्हा त्यानें टाकून दिलीं व अरण्यात अग्नीनें भस्म होऊन जाण्याचा जेव्हा त्या मुलाना प्रसंग आला तेव्हा त्यानीं ऋग्वेदात दिलेल्या (१०.१४२) स्तोत्रानें अग्नीची स्तुति केली. हा अर्थ बराच संशयास्पद आहे पण तो सायणाचार्यांस संमत आहे.

[२]विप्र.—ऋग्वेद व उत्तरकालीन ग्रंथ यामध्यें विप्=कापणें या धातूपासून हा शब्द निघालेला असून त्याचा अर्थ प्रेरणा झालेला गवई असा आहे. उत्तरकालीन ग्रंथात याचा अर्थ विशेषतः विद्वान् ब्राह्मण असा आहे. महाभारतात याचा अर्थ नुसता ब्राह्मण असा आहे.

[३]सूरि.—ऋग्वेदामध्यें हा शब्द यज्ञ करणारा मनुष्य या अर्थी नेहमींच उपयोगांत आणला आहे व यालाच पुढें यजमान म्हणजे यज्ञ करणाऱ्या उपाध्यायाला दक्षिणा देऊन त्या यज्ञाचें पुण्य संपादन करणारा असा गृहस्थ म्हणूं लागले. सूरि याचें नाव मघवन् बरोबर योद्धा या नात्यानें आलेलें आहे व त्याचा संबंध उपध्यायाचा आश्रयदाता किंवा मित्र म्हणून वर्णिलेला आहे.

[४]स्तोतृ.—ऋग्वेदामध्यें व उत्तरकालीन ग्रंथांत स्तुति करणारा असा याचा अर्थ आहे. मघवन् किंवा सूरि या आश्रयदात्याच्या नावासंबधानें हा शब्द वारंवार आलेला आहे. काहीं ठिकाणीं याचा अर्थ 'स्तोतृभ्य –ऋत्विग्भ्य.' 'स्तोता-यजमान' असाहि घेतलेला आहे.

## शरीरावयव

### अंगुलिनामें [ ऋग्वेद ]

| | | |
|---|---|---|
| अग्रिय | क्षिप् | धुर् |
| अग्रुव | क्षिपा | यंक्त्र |
| अर्ण्वा | गभस्ति | रशना |
| अधरी | जामि | विप |
| अथर्यु | दशयंत्र | भिश |
| अभीशु | दशाग्गुल | शर्या |
| अवनि | दशोणि | शाखा |
| ओणि | दीधिति | सनाभि |
| कक्ष्या | धीति | सस्युत |
| सुगभस्ति | स्वंगुरि | हरित् |
| सुहस्त्य | स्वसृ | |

### प्राण्यवयव [ ऋग्वेद ]

| | | |
|---|---|---|
| अंस | कपृथ | नृबाहु |
| अंस्य | कबंध | पक्ष |
| अंक | कर | पद् (पाद) |
| अंकस | कर्ण | पतत्र (पंख) |
| अक्ष ( इंद्रिय ) | कशप्लव ( पोटा ) | पद (पाद) |
| अंग | काकुद ( जिव्हा ) | परुस |
| [१]आग्नि | काशि ( मुष्टि ) | पर्ण |
| अनस्थ | किकिर | पर्व |
| अनास ( आस्यरहित ) | कीकस (अस्थि ) | [१०]पर्शु |
| | कुक्षि (उदर) | पाद |
| अनूनस ( अस्थिसंधि ) | गात्र | पायु |
| | गुद | पार्श्व |
| अपिकक्ष | गुहा ( हृदय ) | पार्ष्णि |
| अर्धगर्भ | ग्रीवा | पुनक्रुथ (योनि) |
| अश्रु | चक्षुस् | पृथुजघन |
| अष्ठीवत् | चतुःशृंग | पृथुप्रगान |
| अस्यन्वत् | [२]चर्मन् | प्रपद |
| आत्मन् ( शरीर ) | चित्त | [११]प्राण |
| आधि (शरीर ) | छुबुक | प्लाशि [प्लीहा] |
| आन ( आनन ) | जघन | बाहु |
| आन्त्र | जंघा | बाहुच्युत |
| आमा(अपक्व कास) | जठर | बाहुजूत |
| आस्न | जठल | बाहुता |
| आस्य | जत्रु (ग्रीवा) | बाहुवृक्त |
| उदर | जंभ ( उदर, मुख) | बाहुशर्धिन् |
| उपस्थ | [३]जरायु | बृहच्छरीर |
| उभयाहस्त्य | जानु | भसद (कटिप्रदेश) |
| उरस् | जिव्हा | भूरिरेतस् |
| उरयुग | तनू | भूरिशृंग |
| उरूणस ( दीर्घ नासिकायुक्त) | तनूरुच् | भ्रू |
| | तनूशुभ्र | मतल ( वृक्क) |
| उल्व | त्रिक | मनस् |
| उष्णिह (स्नायु) | त्वच् | मन्द्रजिह्व |
| ऊधस् (कास) | [४]दंष्ट्रा | मर्य |
| ऊरु | [५]दन्त | मस्तिष्क |
| ऋजुमुष्क | दशगोभिन | महावट्टीरेन् (वेष्टन केलेला पाय) |
| ऋजुहस्त | [६]धमनि | |
| ऋदूदर | [७] नख | मुख |
| ओष्ठ | नस् (नासिका) | मुष्क [पुरुषेंद्रिय] |
| कनीनिका (डोळ्यांतील बाहुली) | नाभ (नाभि) | मुष्कभार |
| | नासिका | मूर्धन् |
| कपृत (शिश्न) | नीचावयस् | मूल (पाद) |

मेदस्
मेहन [पुरुषेंद्रिय]
यक्न
यश (इंद्रिय)
योनि
रोम
लोमन्
वक्षस
वक्षी (बरगड्या)
वपुस्
वयुन (योनिस्थान)
वर्ष्मन
वाङ्क्षग
वीरुशाक्षि
वालुपत्मन
वृकद्वरम्
वृष्ण (ष्मिसाधि)
वैतस (पुरुषेंद्रिय)
[12]शफ
शफच्युत
शरीर
[13]शिप्रा
[14]शिप्रिणिन
शिरस्
शीर्षण्य
शुप्र (मुख)
[15]शृग
शेप (पुरुषेंद्रिय)
[16]श्मश्रु
श्रोणि
श्रोत्र
सक्थि
सर्वांग
सव्य
सुप्यती (योनि विशेषण)
सृक्न् (ओष्ठ)
स्तन
स्फिग्य(कटिप्रदेश)
स्रप्र (ओष्ठ)
स्वद
हनु
हरिशिप्र
हस्त
हस्त्य
हृत्

[ तै स ]

अस
अक
अग
अगापर
अगुलि
अन्छला (शफस लग्न मासखंड)
अजि
अनुवर (बरगड्यातील मास)
अन्न पार्श्व
अपप्राण
अवान्तरशफ
अस्थि
अस्ना
आण्ड
आत्मन
आनत (ग्रीवा प्रदेश)
इक्षु (पापण्यावरील केश)
उदार्य (शिश्न)
उदर
उपपक्ष
उपस्थ
उरस
उल्ब
ऊरु
कक्ष(सलोम भाग)
ओष्ठ
क्रोड (कंठ)
क्लोम
खाद
गर्भ
गवीन्य [गोजननें न्द्रिय]
गात्र
गुद
गृद
गृध्र[कान]
ग्रीवा
चक्षुस
जघन
जंघ
जठर
जत्रु
जानु
तकरी
तनिम
तनू
दष्ट्र
दत
दन्त
दन्ह
दोस
नख
नस
नाडी
नाभि
नासिका
निर्जाल्मक (केश रहित मस्तक)
पक्षगध
पक्ष
पक्षति
पक्ष्म
पतत्र
पद
पराकोश
परापातुक (गर्भाचे विशेषण)
परु
पायु
पार्श्व
पार्ष्णि
पुच्छ
पुरितत्
प्रकाश
प्रतीक
प्रपद
प्रपातुक (गर्भ विशेषण)
प्रशाद (मास - विशेषण)
प्रशास
प्लीह्ना
बस्त्व (दंतमूलस्थ मास)
बाहु
भसद
भ्रू
मतस्न
मनस
मन्या (मानेचा कांटा)
मर्म
मस्तिष्क
मुख
मुष्क
मूर्धन
मृत (त्वचा)
यकृत
योनि
रेतस
लक्ष्म
ललाट
वक्षा
वाल
वालधान
शकुनिसाद (पृष्ठ दश)
शफ
शरार
शितड (अधस्तन-मास)
शिखा
शिंगीनीकोश्य
शिता
शिप्र
शिरस
शीर्षकपाल
शृग
शेप
श्मश्रु
श्रवस
श्रुतकर्ण
सक्थी
संदिग्धदि
सोद
स्कन्ध
स्तन
स्नावन्य (स्नायुमूल)
स्थूलहृदय
स्नावन्
स्नु
स्वगा
स्वग
स्वगु
हत
हस्त
हस्त्या
हृदय
हृत्

[ अथर्ववेद ]

अस
अक्षि
अग
अगुलि
अजिव (गर्भद्वार)
अण्वी
अन्न
अधरहनु
अनस्थ
अनूक (पृष्ठ वशस्थ मास)
अपाष्ट (विषयुक्त भाग)
अष्टाचक्र
अष्ठीवत
अस्थि
आण्डध
आन्त्र
आसन (मुख)
आशय (गर्भाशय)
इन्द्रिय
उत्तरहनु
उदर
उपजिव्हिका
उपस्थ
उरस्
उरु
उरुयुग
उरुणस
उष्णिह्
ऊधस
ऊरु
ऋच्छर
ओणि
ओष्ठ
कर्काटिका
ककुद (ग्रीवापर भाग)
कपाल
कपृत
कफोड
कमल (गर्भद्वार)
कर
कर्ण
कला
काकुद्
काय
काकस
कुक्षि
कुष्ठिका
कुसिन्ध
कृकाट (मान)
[17]केश
कशश्मश्रु
क्रोड
क्लोम
ख
गभस्ति
गवीनी (मूत्रसाधनी पार्श्वस्थनाडी)
गात्र
गार्दभ (शेप)
गुद
गुल्फ
गुहा (हृदय)
गुह्य
गोवपुप्
ग्रीवा
ग्रैव्या (ग्रीवासुभ वा नाडी)
ग्लहा
घास (शरीर)
[18]चमुस

चर्मन
चाक्षुस्
चेतस्
छुबुक
जघन
जंघा
जठर
जंभ (दत विशेषण)
जरायु
जानु
जिव्हा
जिव्हामूल
तनु
ताम्रधूम्र
त्रिशदग
त्रिसन्धि
त्वच
दंष्ट्र
दत्
दशोणि
दोष
दोषणी
दोषण्य
धनु (मूत्राशय)
धमनि
नख
नस्
नाडी
नाडीका
नाभि
नासिका
नीलनख
नेत्र
पक्ष
पक्षस
पंचाङ्गुरि
पतत्र
पद्
पर्शान [ पार्श्वास्थि-प्रदेश ]
[११]पर्शु [बरगडी]
पसस

पाणि
[१०]पाद
पायु
पार्ष्णि
पुच्छ
पुरितत
पुरोगवी [ जिव्हा-विशेषण]
पृथुजघन
पृथुशिरस
पृथुस्तु
पृथुस्तुका
पृष्टी (पार्श्वास्थि)
पेशनी
पौंदपेय
प्रपद
प्रजनन
प्लाशय
प्लीहन
बर्जह्य [बरगड्या]
बाहु
भसद्
भंसदलोममति
मज्जा
मतस्न [बरगड्या]
मन्या (गलस्योर्ध्व भागेस्थिता धमनी)
मर्म
मस्तिष्क
मुख
मुष्क
मुष्टि
मूर्धन्
मेढ्र
योनि
रजतनाभि
रामायणी [नाडी विशेषण]
रोमश
ललाट

लोमन्
वनिष्टु (आतडें)
विग्रामन् [ गुह्य-प्रदेश ]
विगोहित (शेप)
[११]विषाण
वृष्ण्यवत (शेप)
व्यस
शफ
शरणि (धमनी)
शरीर
शिरस
शिश्न
शीर्ष
शीर्षकपाल
शुष्कास्य
शृंग
शेप
श्मश्रु
श्रोणिप्रतोदिन् [कटिप्रदेश]
श्रोत्र
सक्थि
सन्ध
संहनु
सर्वांग
सहकण्ठिका
सहस्रपृष्ठ [सहस्रावयव]
सुहस्त
सृक्वन्
स्कंध
स्नाव (शिरा)
स्वगुरि
हरिशिप्र
हरिश्मशारु
हलीक्ष्ण
हस्त
हार्दि
हिरा
हृत्
हृदय

[वा स.]

| | | |
|---|---|---|
| [२०]उदान | [२१]आविल | ललामगु [ शिश्न ] |

[संहितेतर]

| | |
|---|---|
| [१३]पाद | [१४]हिता |

**प्राणवाचक [ ऋग्वेद ]**

| | | |
|---|---|---|
| असु | पंचहोतृ | व्यान |
| जीव | प्राण | |

[ तै. सं ]

| | | |
|---|---|---|
| अपान | उदानव्यान | वाल [प्राण] |
| असु | प्राण | व्यान |
| उदान | प्राणापान | शापण्य [प्राण-विशेषण] |
| उदानथ | प्राणापानोदान | |
| | प्राणिन | समानव्दान |

[अथर्ववेद]

| | | |
|---|---|---|
| अपान | निसरस् [गर्भ] | प्रमनस |
| असव | प्रजन्य [गर्भाशय] | प्राण |
| जीव | | व्यानोदान |
| जावित | | |

**बाहुनामें [ ऋग्वेद ]**

| | | |
|---|---|---|
| अप्नवान | दोस् | भुरिज |
| अभीशु | दोषण्य | मधुपाणि |
| आयति | पृथुपाणि | वक्षणेस्थ |
| करस्न | बाहु | विनगृम |
| क्षिपती | भद्रहस्त | वीळुपाणि |
| क्षिपस्ति | भरित्र | वृषपाणि |
| गभस्ति | भुज | शक्वरिन् |
| च्यवान | | |

**शरीरसंबंधीं [ अथर्ववेद ]**

| | | |
|---|---|---|
| अश्लील | गर्भ | मूत्र |
| असृज् | गर्भरस | रेतस् |
| उल्व | पूति | रेष्मन् |
| ऊवध्य [उदरगत शकृत्] | मल | वृष्णि |

[संहितेतर]

हिता [ रक्तवाहिनी ]

[१]अजिन.— मृग आणि अज ह्या दोन्ही प्राण्यांच्या कातड्याला हा शब्द लावितात कातड्याचा उपयोग कपड्याकडे होत असे हें शतपथ ब्राह्मणात जे "चर्माच्छादित" (अजिनवासिन्) असें विशेषण आहे. त्यावरून, आणि वाजसनेयि संहितेत चामडें सांधणें व कमाविणें हे धंदे करणाऱ्याचा जो उल्लेख आहे त्यावरून सिद्ध होतें. मरुत् हे देखील मृगचर्म वापरीत असत असें दिसतें, आणि ऋग्वेदकालीन मुनी देखील अजिनें उपयोगात आणीत असत.

[2]चर्मन् — चर्मन् याचा अर्थ चामडें असा असून ह्या अर्थानें याचा ऋग्वेद व तदुत्तर ग्रंथात उल्लेख आला आहे गोचर्मांचा उपयोग धनुष्याची दोरी गोफण व लगाम करण्याकडे होत असे विशेषत या चर्मांचा उपयोग दगडानीं ज्या फलकावर सोमवल्ली कुटली जात असे त्या फलकावर टाकण्याकरिता होत असे. कदाचित् पिशव्या करण्याकडेहि या चर्मांचा उपयोग होत असावा चर्मण्य हा शब्द ऐतरेयब्राह्मणात 'कमावलेल्या कातड्याचा जिन्नस' या अर्थानें आलेला आहे. या कलेची सविस्तर हकीकत उपलब्ध नाहीं पण शतपथब्राह्मणात खुंट्यानीं [ शङ्कुभिः ] चामडें ताणण्याचा उल्लेख केला आहे त्याचप्रमाणें ऋग्वेदामध्यें कातडें ओलें करण्याचा उल्लेख सापडतो. चामडें कमावण्याची कला ऋग्वेदकालात सुद्धा लोकाना ठाऊक होती कारण त्या ग्रंथात चर्माणि ( कमावललीं कातडीं ) हा शब्द आलेला आहे

[3]जरायु — सापाची कात ' या अर्थी हा शब्द अथर्ववेदात एकदा आला आहे ऋग्वेदात याचा अर्थ सामान्यत 'गर्भाच्या बाहेरील वेष्टण' असा आहे गर्भाच्या अंतर्वेष्टणास उल्व ( उल्व ) असें म्हणतात सजीव प्राण्यांचे वर्ग कधीं कधीं त्याच्या उत्पत्तीवरून करतात. छांदोग्योपनिषदामध्यें त्याचे अंडज, जीवज व उद्भिज्ज असे वर्ग केलेले आहेत ऐतरेय आरण्यकामध्यें हें वर्गीकरण चार प्रकारचें आहे तें असें अंडज, जारज किंवा जरायुज ( हा शब्द अथर्ववेदामध्यें आला आहे व बोथलिंकनें हा येथे मागीच घुसडला आहे ), उद्भिज्ज व स्वेदज [ म्हणजे कीटकवर्ग ] जरायु शब्दाचा वैदिक अर्थ वैद्यशास्त्रसंमत आहे प्राण्यांचे वर्गहि जरायुज, अंडज, स्वेदज व उद्भिज्ज असेच केले आहेत.

[4]दंष्ट्रा — याचा अर्थ दातापैकीं एक सुळका असा असून ऋग्वेदापासूनच्या सर्व ग्रंथात हा शब्द वारवार आला आहे.

[5]दन्त्, दत — ऋग्वेद व तदुत्तर ग्रंथात याचा दात या अर्थी वारंवार उपयोग आलेला आहे दतधावन हा विशेषतः यज्ञाचा दीक्षा घेण्याच्या वेळचा विधि होता याप्रमाणे दात घासल्यानंतर स्नान करणें, श्मश्रु करणे व नख काढणें ह्या गोष्टी होत अथर्वसंहितेंतील एका सूक्तात मुलाच्या पहिल्या दोन दाताच्या प्रगट होण्याबद्दल स्तुति आहे तथापि या सूक्ताचा निश्चित अर्थ काय हें सांगणेंहि कठिण आहे ऐतरेय ब्राम्हणात मुलाचे पहिले दात पडत असल्याबद्दलचा उल्लेख आहे. ऋग्वेदात ह्या दत शब्दाचा अर्थ हत्तीचा सुळा असा आलेला आहे पूर्वी दंतविद्या प्रचारात होती कीं नाहीं याबद्दल वानवाच आहे ऐतरेय आरण्यकात हिरण्यदन (सोन्याचे दात असलेला) असा एक शब्द एका माणसाचें नाव म्हणून आलेला आहे व तो सार्थ असावा कारण सोन्यानें दात मढावणें हा गोष्ट रोममध्ये 'बारा शिलालिखित' कायदे झाले तेव्हा ठाऊक होती हें निश्चित आहे

[6]धमनि.— 'वेत'. ऋग्वेदात एके ठिकाणीं व निरुक्तांतील एका उताऱ्यात याचा अर्थ नळी असा आलेला आहे अथर्ववेदामध्यें याचा अर्थ शुद्ध रक्तवाहिनी असा, किंवा पक्वाशयातला मार्ग असा आहे हा शब्द हिरा ह्या शब्दाबरोबर काहीं ठिकाणीं आलेला आहे.

[7]नख — ऋग्वेद व अथर्ववेद यात याचा अर्थ माणसाच्या हातापायाची नख किंवा वाघासारख्या क्रूर पशूचा जबडा असा आहे. वैदिक काळीं आर्यलोक आपलीं नखें नेहमीं काढीत असत विशेषत दन्तधावन व नखनिकृतन हीं कृत्यें पवित्र प्रसंगीं होत असत असें तैत्तिरीय संहिता वगैरे ग्रंथातून आढळतें

[8]परुस् — याचा पहिला ऋग्वेदातील अर्थ अवयव किंवा शरीराचा भाग असा असून पुढील ग्रंथात लक्षणेनें यज्ञाचे किंवा काळाचे भाग याना हा शब्द लावलेला आहे

[9]पर्ण.— ऋग्वेदामध्यें व उत्तरकालीन ग्रंथात पक्ष्याचे पर असा याचा अर्थ आहे. ऋग्वेदात दहाव्या मंडळात एका ठिकाणीं याचा अर्थ बाणाचीं पिसें असा आहे. व पुढें झाडाचीं पानें असा होऊं लागला

[10]पर्शु — ऋग्वेदामध्यें एके ठिकाणीं हा शब्द आलेला असून निरुक्तामध्यें याचा अर्थ हौदाच्या ( कूप ) बाजू असा दिलेला आहे. पण बरगडी हा ऋग्वेदातील अर्थ सुद्धा बरा जुळतो. या नावाचें एक राष्ट्रहि होतें

[11]प्राण — हा बराच व्यापक पण अनिश्चित अर्थाचा शब्द ऋग्वेदात व तदनंतरच्या ग्रंथातून वारवार उपयोगात आणलेला आहे. आरण्यकातून व उपनिषदातून जगाच्या ऐक्याचें सर्वसाधारण चिन्ह या अर्थानें हा शब्द उपयोगात आणला आहे. प्राण, अपान, व्यान, उदान आणि समान या पाच प्राणवायूंपैकीं एक या संकुचित अर्थानें प्राण उपयोगात आणलेला आहे परंतु पुष्कळ वेळा प्राण व व्यान प्राण व अपान किंवा प्राण व उदान ह्या दोन वायूंचा उल्लेख येतो काहीं ठिकाणीं तीन वायू-प्राण, व्यान, अपान,प्राण, व्यान,उदान किंवा प्राण,उदान, समान, याचा उल्लेख आहे. काहीं ठिकाणीं प्राण, अपान, व्यान व समान, अथवा प्राण, अपान, उदान व व्यान, असा वायुचतुष्टयाचा उल्लेख आहे शिवाय प्राण हा शब्द ज्ञानेंद्रियें या अर्थी योजिलेला आहे शतपथ ब्राह्मणात हीं ज्ञानेंद्रियें सहा आहेत असें म्हटलें आहे बहुधा डोळे, कान, नाकपुड्या, हीं तीं असावीत परंतु पुष्कळ ठिकाणीं शिराच्या भागात सात ज्ञानेंद्रियें आहेत असें म्हटलें असून तोंडाचा त्यात समावेश केला आहे केव्हा केव्हा तीं नऊ आहेत असें म्हटले असून खालच्या भागातील दोन इंद्रियांनीं हा हिशोब पुरा केला आहे शतपथ व जैमिनीय ब्राह्मणात हीं दहा आहेत असें म्हटलें आहे. काठक उपनिषदात हीं अकरा मानलीं असून काठक

संहितेंत ही संख्या बारा आहेत, व यात दोन स्तनांचा समावेश केला आहे. सातानंतर कोणत्या अवयवाचा समावेश करावयाचा याचा कांहीं नियम नाहीं. मैत्रायणी संहितेंत दहावा अवयव नाभी आहे जेव्हां अकराचा निर्देश करतात तेव्हां ब्रह्मरंध्राचा समावेश करतात. बृहदारण्यक उपनिषदाप्रमाणें सातवें रसेंद्रिय व आठवें वागिंद्रिय हीं होत परन्तु सामान्यतः हीं दोन्हीं मिळून एकच इंद्रिय धरतात; व मग आठ व नऊ हीं स्तनद्वय किंवा मलोत्सर्जक इंद्रियें म्हणून मानतात. प्राणाचा कधीं कधीं सामान्यपणें नुसता श्वासवायु असा अर्थ होतो, व कित्येक वेळा तो अपानाच्या विरुद्ध म्हणून उद्दिष्ट असतो. परंतु या शब्दाचा (अपान) स्पष्ट अर्थ उच्छ्वास म्हणजे बाहेर सोडलेला वायु हा आहे तो 'आंत घेतलेला वायु' असा अर्थ जो सेंटपीटर्सबर्गच्या कोशांत दिला आहे तसा मात्र नाहीं. हा अर्थ पीटर्सबर्गकोशांत घेण्याचें कारण अपान शब्दाचा अप म्हणजे दूर यावरून, उच्छ्वास असा अर्थ कोशकारास वाटला असेल. एतद्देशीय भाष्यकारांनीं पहिलाच अर्थ घेतला आहे, आणि दुसऱ्या पुराव्यावरून सुद्धां हाच अर्थ सिद्ध होत असल्यानें बोथलिंक यानें सुद्धां हा अर्थच कबूल केला आहे. प्राणवायूचें क्षेत्र डोक्यापासून हृदयापर्यंत आहे. तो बुद्धि, हृदय, इंद्रियें व मन यांना धारण करणारा म्हणजे त्यास प्रेरक असें वर्णन आहे. बाहेरील वायु आंत घेणें, अन्न आंत नेणें वगैरे कामें प्राणवायूचीं आहेत. वेदांत ज्ञानेंद्रियें असा जो प्राणाचा अर्थ केला आहे तो त्या ज्ञानेंद्रियास प्रेरक अशा साहचर्यानेंच असावा. पीटर्सबर्गकोशांत जो 'वायु आंत नेणें' असा अर्थ दिला आहे तोच वैद्यशास्त्रसंमत आहे, पण तो प्राण नसून तें एक प्राणवायूचें कार्य आहे. हें लक्षांत ठेवलें पाहिजे प्राणवायु व इंद्रियें यांचें साहचर्य किंवा प्रेर्यप्रेरकत्वसंबंध असल्यानें एकमेकांचे शब्द अभिन्न अर्थानें वापरलें असावे. प्राणादि पांच वायू कार्यभेदानें व शरीरांतील स्थानभेदानें निरनिराळे मानले आहेत.

[१] शफ—शफ म्हणजे खूर. याचा अर्थ एक अष्टमांश भाग असा होतो, कारण गाईचे खूर विभागलेले असतात. उदाहरणार्थ चतुष्पाद प्राण्याचा पाय (पद) म्हणजे एक चतुर्थांश भाग असा अर्थ आहे. त्याचप्रमाणें शफ याचा अर्थ आहे. हा अर्थ ऋग्वेदापासून प्रचारांत आहे, व ऋग्वेदांतहि तो वारंवार आला आहे.

[१] शरीर—हा शब्द वैदिक वाङ्मयांत वारंवार आलेला आहे वैदिक काळच्या आर्यांचें लक्ष्य प्रथमपासून शारीर शास्त्राकडे होतें असें दिसतें. उदाहरणार्थ अथर्ववेदांतील एका सूक्तांत शरीराच्या निरनिराळ्या भागांचीं नांवें बरींच शुद्ध व व्यवस्थित रीतीनें आलीं आहेत ह्या सूक्तांत टांचा (पार्ष्णी), मांस, छिद्रें, पायाचे चौडे (उच्छ्लंखौ), गुल्फ, अंगुलि, पादास्थि अस्थिवत् (गुडघ्याची वाटी) जंघा, जानूचे संधी, नंतर जानूच्या वर असलेला व ज्याला चार बाजू आहेत असा वाकणारा कबंध (श्रोणी व ऊरू हे ह्या कबंधाचे आधारस्तंभ आहेत), नंतर छातींतलें हाड (उरस्) ग्रीवा, स्तन, खवाट्याचीं हाडें, मानेचीं हाडें, स्कंधी, माकड हाड (पृष्टीः), अंस, बाहु, मस्तकांतील सात छिद्रें, (सप्त खानि शीर्षाणि) कान, नासिका, डोळे, मुख, हनु, जिव्हा, मस्तिष्क (मेंदू), ललाट, तोंडाचें हाड, (ककातिका) कपाल व हनूची चिल्या इत्यादि. ही जी अथर्ववेदामध्यें शरीराच्या भागाच्या नांवांची यादी आलेली आहे ती यादी व चरकसुश्रुतामध्यें आलेली यादी यामध्यें बरेंच साम्य आहे. ह्या दुसऱ्या यादीमुळें होर्नलनें शरीराच्या कांहीं भागांना जीं नांवें दिलेलीं आहेत तीं निश्चित होतात कफोदौ (ह्याचे निरनिराळ्या हस्तलिखित प्रतींत निरनिराळे पाठ आहेत) ह्याचा अर्थ व्हिटनेच्या मतें अक्षक असा आहे पण सेंटपीटर्सबर्गकोशांत कोपर असा दिलेला आहे स्कंध ह्याचा नेहमींचा अनेकवचनी अर्थ मानेचीं हाडें किंवा बरोबर शब्द हवा असेल तर ग्रैविक मणी असा आहे. हाच अर्थ उष्णिहा या अनेकवचनी शब्दानें सांगितला जातो पृष्टीचा अर्थ बरगडी असा नव्हे, (कारण त्याला पर्शु हा शब्द आहे) तर कशेरुका बाहु म्हणजे कशेरुका किंवा मणक्याचीं हाडें असा आहे. पृष्ठवंश नलिकेच्या भागांत सतरा मणक्याचीं हाडें व चौतीस कशेरुका बाहु आहेत. मणक्याच्या हाडांना कीकसा हें अनेकवचनी नांव आहे, व ह्या कीकसेमध्यें कधीं कधीं पाठीच्या कण्याचा वरचा भाग अंतर्भूत होतो तर कधीं कधीं पृष्ठवंशाचा उरोभाग ह्यानांहि समावेश होतो. अणूक ह्याचा अर्थ पृष्ठवंश किंवा अधिक बारकाईनें बोलावयाचें असेल तर कटिमणि किंवा पृष्ठवंशाचा उरोभाग असा होतो. शतपथ ब्राह्मणांत असें म्हटलें आहे कीं, कटिमणीमध्यें (उदरांत) वीस कशेरुका बाहू असतात व पृष्ठवंशाच्या उरोभागांत बत्तीस असतात, मिळून एकंदर मणक्याचीं सव्वीस हाडें आहेत. पण हल्लीं जी शारीरशास्त्राची माहिती उपलब्ध आहे तीवरून ही संख्या जरी एकच असली तरी हाडांची वाटणी निराळ्या प्रकारची आहे. पृष्ठवंशाला करूकर हें नांवहि दिलेलें आहे, व हें नांव नेहमीं अनेकवचनी असतें, व त्याचा अर्थ कशेरुका (बाहु) असा आहे, त्याला प्रतिशब्द कुंताप हा आहे. ग्रीवा हा शब्द अनेकवचनी असला म्हणजे मानेचीं हाडें असा त्याचा अर्थ होतो. हीं मानेचीं हाडें शतपथ ब्राह्मणांत सात दिलेलीं आहेत पण नेहमीं ह्याचा साधा अर्थ श्वासनलिका किंवा जास्त बिनचूक अर्थ म्हणजे कातड्याखालचीं मृदु अस्थींचीं वेष्टणें हा होय. जत्रु हा शब्द अनेकवचनी आला म्हणजे त्याचा अर्थ ग्रैविक मृदु अस्थि किंवा बरगडींतील मृदु अस्थि असा आहे. शतपथ ब्राह्मणांत याची संख्या आठ आहे. भंसस् याचा अर्थ जघनास्थि असा घेणें बरें. कुंत्रे किंवा गुदप्रदेश असा अर्थ जो व्हिटनें घेतो तो बरोबर नव्हे हा शब्द अथर्ववेदांत तीनदां आलेला आहे. शतपथ ब्राह्मणांत हाडांची संख्या ३६० दिलेली आहे.

मस्तक व कबंध ह्यातल्या हाडांची संख्या दुसऱ्या एका ठिकाणीं खाली दिल्याप्रमाणें आहे. मस्तक तीन प्रकारचें आहे. व ह्यात त्वच्, अस्थि व मस्तिष्क (मेंदू) हे आहेत. मानेंत पंधरा हाडें आहेत. चवदा करूकर व पंधरावें वीर्य हें मध्यवर्ती हाड आहे. वक्षस्थळांत सतरा हाडें आहेत, सोळा जत्रु व सतरावें उरस् म्हणजे छातींतलें हाड पृष्ठवंशाचीं कुक्षिसंबंधीं हाडें एकवीस आहेत, वीस कुंताप व एकवीसावें उदर हें होय. कदंबाच्या दोन बाजूंना सत्तावीस हाडें आहेत, सव्वीस पर्शू व दोन बाजूंना एक. अनूकामध्यें तेहतीस हाडें आहेत, बत्तीस कशेरुका बाहू व तेहेतिसावें पृष्ठवंशाचा उरोभाग. यजु संहितेमध्यें केवळ सांपळ्याचींच नव्हें तर शरीराच्या भागाचींहि अनेक नावें आलेलीं आहेत. ह्या भागांत लोमन्, त्वच, मांस, अस्थि, मज्जन् यकृत्, क्लोमन् (फुप्फुस), मतस्ने (मूत्राशय), पित्त, आंत्र (आतडीं) गुद, प्लीहा, नाभि, उदर, वनिष्ठु (मलाशय), योनि, हाशि, शेप (शिश्न), मुख, शिरस्, जिव्हा, आसन् (तोंड,) पायु, (पश्चाद्भाग), वाला, चक्षु, पक्ष्मउत (भ्रुकुटी), नस् (नाक), व्यान (श्वास), नस्य (नाकांतला केस), कान, भ्रू, आत्मन् (शरीर किंवा कबंध), उपस्थ (माज्या किंवा जननेंद्रिय), श्मश्रु (दाढीचे केस), डोक्याचे केस. दुसरी एक यादी आलेली आहे, तींत नावें अशीं आहेत.- शिरस्, मुख, केश श्मश्रु, प्राण, चक्षु, श्रोत्र, जिव्हा, वाच्, मनस्, अंगुलि, अंग् अवयव, बाहु, हस्त, कर्ण, आत्मन्, उरस्, पृष्ठी, उदर, अंस, ग्रीवा, श्रोणी, ऊरु, अरत्नि (कोपर), जानु, नाभि, पायु, भसत् (गुदद्वार), अंड, पसस्, जंघा, पद, लोमन्, त्वच, मांस, अस्थि, मज्जन. तिसरी एक यादी आली आहे तींत वनिष्ठु, पुरीतत्, हृत्कोश, लोमन्, त्वच, लोहित-रक्त, मेदस्, मांस, स्नाव-स्नायु, शिर, अस्थि, मज्जन्, रेतस्, पायु, पार्श्व, इ. शब्द आहेत. यजुर्वेद संहितामध्यें घोड्याच्या शरीरांतील हाडांचीं नावें आलेलीं आहेत. ऐतरेय आरण्यकामध्यें मनुष्याच्या शरीराचे १०१ भाग कल्पिले आहेत. एक एक भागांत २५ अवयव आहेत व कदंबांत १०१हा भाग आहेत वरच्या दोन भागांत पांच चार सांधे असलेलीं बोटें आहेत. दोन कक्षसी (अर्थ संदिग्ध), दोष् (बाहु), अक्ष व अंसफल आहेत. खालच्या दोन भागांत पांच चार सांधे असलेली पायाचीं बोटें, मांडी, तंगडी इ. भाग आहेत असें सायण भाष्यावरून दिसतें. शांखायन आरण्यकामध्यें डोक्यांतील तीन हाडें, मानेंतील तीन पर्व, अक्ष, बोटांतले तीन सांधे, व एकवीस अनूक अशीं नावें आलेलीं आहेत. मैत्रायणी संहितेंत शरीराचे मुख्य भाग चार (प्राण, चक्षु, श्रोत्र व वाच् असे) सांगितले आहेत. पण इतर बरेच फेरफार होऊन एकूण संख्या बारा झाली आहे. तैत्तिरीय उपनिषदामध्यें एक यादी आलेली आहे तींत चर्मन्, मांस, स्नावन्, अस्थि व मज्जन् अशीं नावें आहेत. ऐतरेय ब्राम्हणांत लोमन्, त्वच, अस्थि, मज्जन् व ऐतरेय आरण्यकांत मज्जन्, स्नाव, व अस्थि अशीं नांवें एकत्र आहेत शरीरासंबंधीं इतर नावें ककुप (कदाचित् कानाचा भाग), योनि, कक्ष (काख), दंत, नख, प्रपद व हलीक्ष्ण (पित्त) अशीं आहेत अथर्ववेदांत जीं प्रत्यंगें (लहान अवयव) वर्णिलीं आहेत त्यांत व चरकानें वर्णन केलेल्या प्रत्यंगांत थोडें अंतर आहे. चरकांत यांची संख्या छप्पन्न आहे. अथर्ववेदांत पायाच्या घोट्याचा वाचक उच्लक असा शब्द आहे व त्यास चरकांत प्रपद असें म्हटलें आहे तसेंच अस्थिवत् शब्दाच्या ऐवजीं जानु शब्दच वैद्यकांत वापरला आहे. गुडघ्याच्या वाटीस जान्वस्थि असेंच म्हटलें आहे कबंध नावाचा निराळा अवयव मानला नाहीं बाकी सर्व अवयव त्या त्या नावानेंच वैद्यशास्त्रकारांनीं वर्णिले आहेत कफोडा हें नाव वैद्यशास्त्रांत नाहीं यामुळें या शब्दाचा अर्थ काय हें सांगतां येत नाहीं. स्कंध शब्दाचा अर्थ ग्रैविक मणि असा जो आहे तो वैद्यशास्त्रसंमत नाहीं याचा अर्थ बाहु व मान या मधला भाग म्हणजे खांदा हा होय.

कशेरुका हा शब्दहि वैद्यकांत नाहीं. वैद्यकांत कशेरुकास पृष्ठास्थि असेंच म्हणतात व हीं चरकाच्या मतानें पस्तीस आहेत. पृष्ठ कोठपासून कोठपर्यंत धरावयाचें ह्याबद्दल या दोन ग्रंथांत मतभेद असल्यामुळें हाडें कमीजास्त होतात तें कांहीं असलें तरी मणक्यास कशेरुका हें निराळें नाव वेदांत आहे व वैद्यकांत नाहीं ह्याचें आश्चर्य वाटतें. प्रत्येक मणक्यास दोन बाजूंना जीं टोकें असतात त्यास कशेरुका बाहु असें म्हणतात; हेंहि मणक्याचें वर्णन वैद्यकापेक्षां जास्त सूक्ष्म व यथार्थ आहे. अनूक हा शब्द वैद्यकांत नाहीं, व कीकसा हाहि नाहीं. हाडांस उद्देशून वेदांत जे निरनिराळे शब्द आहेत, त्यापैकीं बरेच शब्द वैद्यकांत नाहींत. कुंताप, करूकर हे शब्दहि वैद्यकांत नाहींत ग्रीवेंत म्हणजे मानेंत नऊ हाडें आहेत असें सुश्रुतांत लिहिलें आहे व चरकांत तीं दोन मानलीं आहेत. वैद्यकांत ग्रीवा शब्दाचा अर्थ मान म्हणजे पाठीकडील भाग असा आहे, व पुढील भागास कंठनाडी असा शब्द आहे कंठनाडींत चार हाडें आहेत असें वर्णिलें आहे. या सर्व वर्णनावरून ग्रीवा या शब्दाचा अर्थ मान असाच युक्त दिसतो. श्वासनलिका किंवा कातड्याखालचीं मृदु हाडें असा अर्थ नसावा. कारण सुश्रुत व वेद यामध्यें या ठिकाणच्या हाडांत साम्य आहे. जत्रु हा शब्दहि निश्चयार्थ नाहीं सुश्रुतानें हा शब्द शरीरस्थानांत वापरलाच नाहीं चरकानें जत्रूचीं हाडें दोन आहेत असें सांगितलें आहे. हीं हाडें म्हणजे छातीच्या आरंभाला जीं दोन मोठीं हाडें वर आलेलीं दिसतात, व जीं बाहूपाशीं बांधलेलीं आहेत, तीं होत. सुश्रुतानें यासच अक्षक असें नाव दिलें आहे.

भसत् हा शब्द वैद्यकांत नाहीं चरकांत शतपथांतील संख्येइतकी म्हणजे तीनशें साठ हाडांची संख्या दिली आहे सुश्रुतांत ती तीनशेंच सांगितली आहेत चरक व

शतपथ ब्राह्मण याची संख्या जरी जुळती आहे, तरी दोहोंचा तपशील जुळत नाहीं. मानेंतील पंधरा हाडें व वक्षस्थलांत सतरा, ही संख्या दोहोंत एकच आहे.

यजुर्वेदसंहितेंत जीं शरीराच्या भागाचीं नावें आलीं आहेत तीं सर्व वैद्यकांत आहेत. वेदांतील हाडांसंबंधीं व शरीरावयवासंबंधीं आलेलीं कित्येक नांवें वैद्यकांत नाहींत; उदाहरणार्थ कंकुष, हलीक्ष्ण, अणूक, कबंध, पुरीतत, वनिष्ठु, भसत, श्रोणी, इत्यादि. मानेवर मन्या नावाच्या दोन शिरा आहेत. त्यामध्यें कफाचा संचय झाला असता मन्यास्तंभ नावाचा रोग होतो असें सुश्रुतांत लिहिलें आहे अथर्ववेदांत मन्या नावाचा जो रोग वर्णिला आहे तो हाच असावा. संस्कृतांत दोन सामासिक पदें विशेषनामवाचक आलीं असतां कोणतें तरी एक उच्चारून संबंध दोहोंशीं आण तात, जसें सत्यभामा याच्या ऐवजीं केवळ भामा म्हणतात. तसेंच मन्यास्तंभ या ऐवजीं नुसतें मन्या लिहिणें संभवतें. गंडमाळा हा रोग स्वतंत्र असल्यामुळें मन्या हें नाव त्या रोगास लावणें बरोबर दिसत नाहीं.

१४ शिप्रा —या शब्दाचा अर्थ संदिग्ध आहे. ह्याचा अर्थ अनेक ठिकाणीं 'गाल' असा आहे इतर ठिकाणीं ह्याचा अर्थ शिरस्त्राणाचे गालावर येणारे भाग किंवा लगाम असा आहे. अयःशिप्रा (हा शब्द अश्विनाना लावलेला आहे) मध्यें त्याचप्रमाणें हिरण्यशिप्र, हरिशिप्र व हिरिशिप्र ह्या शब्दसमूहांत ह्या शिप्र शब्दाचा अर्थ, लोखंडाचें, सोन्याचें किंवा पितळेचें शिरस्त्राण असा असावा. त्याचप्रमाणें शिप्रिन् ह्याचा अर्थ शिरस्त्राण वापरणारा असा होईल.

१५ शृंग.—ऋग्वेद व उत्तरकालीन ग्रंथ ह्यामध्यें कोणत्याहि जनावरानें शिंग असा याचा अर्थ आहे. अथर्ववेदांत बाणाच्या टोकालाहि शृंग असें म्हटलें आहे.

१६ श्मश्रु.—ऋग्वेद व उत्तरकालीन ग्रंथ ह्यामध्यें याचा अर्थ दाढी व मिशा म्हणजे केश ह्याच्या उलट असा आहे. पूर्वीच्या काळीं हजामत करणें ही गोष्ट माहीत होती. तैत्तिरीय संहितेप्रमाणें दाढी धारण करणें हें पुरुषत्वाचें चिन्ह होतें. मेगॅस्थनीज म्हणतो कीं हिंदु लोक आपली दाढी मरेपर्यंत नीट निगा करून राखीत असत. हें म्हणणें खरें दिसतें.

१७ केश.—डोक्याचे केश या अर्थी ब्राह्मणांत ह्याचा वारंवार उल्लेख आलेला आहे. वेदकालीन आर्यलोक आपल्या केशांची विशेष काळजी घेत असत असें दिसतें. अथर्ववेदांतील बऱ्याचशा ऋचा केशाची पूर्ण वाढ कोणत्या तऱ्हेनें होईल ह्या विषयाचें प्रतिपादन करितात. कापणें किंवा श्मश्रु करणें (वप्) ह्याचाहि उल्लेख बरेच वेळां आलेला आहे. मनुष्याला लाल केश असणें हें दुर्बलतेचें द्योतक आहे.

१८ चक्षुस्.— चक्षुस् म्हणजे डोळा. अथर्ववेदामध्यें घोर चक्षुस चा उल्लेख असल्यामुळें त्यावर उपाय म्हणून मंत्र दिले आहेत. त्रिककुद् पर्वतावरील मलम आणि जंगिड वनस्पति हेहि त्यावर उपाय सांगितले आहेत. विवाहविधींत पत्नीला अशुभदृष्टिबाधा होऊं नये म्हणून प्रार्थना आहे (अघोर चक्षुस्). ब्राह्मणांत डोळ्याच्या रचनेचा त्याचे शुक्ल कृष्ण भाग, आणि बुबुळ (कनीनका) असा उल्लेख आला आहे डोळ्याच्या अलजि ह्या नावाच्या रोगाचाहि उल्लेख आहे. चक्षुस् शब्दाबद्दल वरील सर्व माहिती वैद्यशास्त्रसंमत आहे यमुनानदींत सांपडणारें अंजन नेत्रक्षोभ घालवितें. हें अंजन म्हणजे ज्यास हल्लीं सुर्मा म्हणतात तेंच होय, यास वैद्यकांत स्रोतोंजन म्हणतात.

१९ पर्शु.— अथर्ववेद व मागाहून झालेले ग्रंथ ह्यामध्यें याचा अर्थ बरगडी असा आहे.

२० पाद.— अथर्ववेद व मागाहून झालेले ग्रंथ ह्यामध्यें पशु, पक्षी किंवा इतर प्राणी ह्याचा पाय अशा अर्थानें हा शब्द आलेला आहे.

२१ विषाण.— अथर्ववेद व त्यानंतरचे ग्रंथ ह्यामध्यें ह्याचा अर्थ जनावरचें शिंग असा आहे.

२२ जाबिल.— (गुडघ्याची खळगी) हा शब्द मैत्रायणी संहितेंत एकदा आला आहे. जाबील अशा रूपानें हा शब्द काठक व वाजसनेयि संहितामध्यें आला आहे. वाजसनेयि संहितेवरील टीकेंत महीधराचार्य ह्याचा अर्थ टोपराची वाटी असा घेतो, व त्याचें असें म्हणणें आहे कीं हा टोपराची वाटी असा अर्थ घेण्याचें कारण तो जाबिल जाबीर म्हणजे महाळुंग फळासारखा दिसतो. हा शब्द वैद्यकांत नाहीं.

२३ पाद.— ब्राह्मण ग्रंथांत चतुर्थ चरण ह्या अर्थानें हा शब्द नेहमीं आढळतो. हा अर्थ, चतुष्पाद प्राण्याच्या चार पायांपैकीं एक म्हणजे एक चतुर्थांश ह्या लक्षणेनें झाला आहे.

२४ हिता.— ब्राह्मण ग्रंथांत कोठल्याशा अशुद्ध रक्तवहिनी (धमनी) चें हें नाव आहे.

२५ उदान — याचा उल्लेख वाजसनेयि संहितेंत असून पंच प्राणां पैकीं पांचव्याचें हें नाव आहे. कधीं कधीं तो दुसरा म्हणजे प्राणाच्या नंतर आणि व्यान आणि समान याच्या पूर्वी असा असतो. कधीं कधीं तो प्राण याच्या विरुद्ध व प्राण व अपान याच्या पूर्वी असतो. उदान ह्यांत उत् म्हणजे ऊर्ध्व व आन म्हणजे वर येणें, असा शब्दार्थ आहे. ज्यावेळीं श्वास बाहेर सोडला जातो त्यावेळीं जें वायूचें ऊर्ध्व गमन होतें, तें एक उदानाचें कार्य मानतात, शिवाय बोलणें बल, वर्ण, स्मरणशक्ति, या गोष्टीहि उदान वायूच्या योगानें होतात. हा नाभीपासून कंठापर्यंत असतो. ह्याचें मुख्य स्थान छाती आहे. शतपथ ब्राह्मणांत हा वायु अन्नपचन करतो अशी कल्पना आढळते व ती उपनिषदांतहि आहे. परंतु तो मरणसमयीं कंठाच्या बाहेर येऊन जीवाला घेऊन जातो अशीहि कल्पना आहे.

## वैद्यक

### रोग व आरोग्य [ऋग्वेद]

अक्षत
अगद
अज्ञका
[1]अज्ञातयक्ष्मन
अनमीव
अनूक्य ( यक्ष्म )
अप्वन्
अम
अमीवचातन
अमीवत्
अरिष्टि
[2]आशीपद (शि-पद = शिवे )
[3]आशिमिद
आरुज्
[4]ग्राहि
[5]जीवगृभ
दुर्णामन् ( अर्श-रोग )
नवज्वार
पृशान्य
पृष्ट्यामयी
भिषज्
भेषज्
भेषजी
[6]यक्ष्मन्
[7]राजयक्ष्मन्
रत
[8]वन्दन
वभ्रि ( ज्वर )
विवभ्रि
विपृची
[9]सुराम
स्राम
[10]हरिमन् (कावीळ)
[11]हृद्रोग

### [ तै. सं ]

अपमार ( अप-स्मार )
आधि
आध्य
उदावर्त
उभयतःसंश्वा ( दोन्ही कुशींतील कळ )
किश्विदीवि (खोकला )
क्षैव्य
क्षुत्
ग्राहुक
[12]जायेन्य
[13]दुष्कर्मन्
निहाका
पापयक्ष्मन्
पित्त
भेषज्
राजयक्ष्मन्
रोग
लूता
[14]वरुणगृहीत
शीतरु
श्येन
श्वित्र ( पित्तजन्य रोग )
शिप्म (शिंव,सुरमा,)
सुभेषज्
स्रिध

### [ अथर्ववेद ]

[15]अक्षत
अंग
अंगज्वर
अंगभेद
अज्ञातयक्ष्म
अनामन्
[16]अपचित् ( गंडमाळा )
[17]अप्वा
अवल
अभिध्याधिन्
अभिशोक
अभिशोचन
अमीवत्
अयक्ष्मकरणी
अराय ( कुष्ट )
अरुस्राण (व्रण-मुख)
[18]अलजि
अलिश
अश्लोण
असूतिका
असृक्पावान
अस्थिज
अस्थिस्रंस
अहरित
अहि
आधि
आल
[19]आशरीक
आश्रेप
आस
[20]आस्राव (मूत्रातिसार)
उदरदार (अति-सार)
उपकक्ष्य (गंड-माळा, वि.)
ऋक्षग्रीव
ऐलब (चक्षुरोग)
कण्व
काणा
[21]कास
कासा
कासिका
[22]किलास (कुष्ट)
[23]कीदिमल
कुष्ट
कुष्ठिका
कूटा
कृत्ति (गर्भपीडक रोग)
कोक
कोटा
क्लीब
क्लोम्न
[24]क्षत
क्षय
क्षव
क्षुत
क्षुधामार
[25]क्षेत्रिय
गर्भाद
गर्भादकण्व
[26]गलुंत (साध्यांतील गांठी)
गुध्यित
[27]ग्राह्
[28]ग्रैव्य
[29]ग्लौ
[30]जम्भ
जायान्य (संभोग-जन्य क्षयरोग)
[31]तक्मन्
तक्म
तनूज
[32]तृतीयक (तिजारा ताप)
तृष्णामार
तौदी
दशशल
दुराध्य
दुर्णामन्
[33]दूषीका
नाडू
[34]निराल
पंचशल
परस्रंस
पलालानुपलाल
पलीजक
[35]पामन्
[36]पृष्ट्यामय
प्रमीलिन
[37]प्रमोत
बण्डा
बभ्रु
बभ्रुकर्ण
[38]बलास
भरूजि
[39]मन्या
मलिम्लुच
यक्ष्म
राजयक्ष्मा
रुज
रूर
[40]रोग
रोपणा
वत्सप
वध्रिवासस्
वातीकार
वातीकृत
वातीकृतनाशिनी
वालज
[41]विक्लिन्दु
[42]विद्रध
[43]विलोहित
[44]विशर
विशरीक
विपाणका
[45]विसल्पक
[46]विस्कंध-दूषण
विस्रस
व्याध्य
व्राण
शकुं (गर्भिणी पीडक रोग)
शिथिर
शिमिदा
[47]शीर्षक्ति
[48]शीर्षामय
शोक
श्लोणा
[49]संस्कंध
सद्मदि
सुनामन्
सुस्रस (गंड-माळा)
[50]स्कंध्या
स्फाति
[51]हृदयामय

### [ वा. सं. ]

[52]अर्शस् (मूलव्याधि)
[53]उपचित्
[54]पाकारु (पिकलेलें गळू)
[55]लिहाकर्ण
[56]विषूचिका
[57]विष्टा-व्राजिन्
[58]व्याधि
[59]श्लोण्य
[60]श्वयथ
[61]श्वित्र

[1]अ ज्ञा त य क्ष्म न्.—ऋग्वेद, अथर्ववेद आणि काठक संहिता यामध्ये याला ' अज्ञात रोग ' असें म्हटलें आहे. राजयक्ष्म्याचें वर्णन करतांना याचा उल्लेख आला आहे. ग्रोम-नचें असें मत आहे कीं, एकाच आजाराचे हे दोन प्रकार आहेत, एक अतिवृद्धि आणि दुसरा एकांग क्षय. ऋग्वेदांत जो मंत्र आहे तो दोन्ही प्रकारच्या रोगांना दूर करण्याक-

रिता उपयोगी पडतो अथर्ववेदांतील बलास याचें या रोगाशीं साम्य आहे असें ग्रोमन दर्शवितो झिमर म्हणतो कीं, हें अनुमान बरोबर नाहीं ज्याचें पुढें क्षयांत रूपांतर होतें असा जीर्णज्वर म्हणजे हा रोग असावा

[1] (अ) शि प द.—अशिपद या नकारार्थी रूपांत हा शब्द ऋग्वेदांत अशिमिद शब्दाबरोबर आलेला आहे शिपद व शिमिद हे दोन्ही शब्द एखाद्या अज्ञात रोगाचीं नांवें असावीत

[2] (अ) शि मि द —ऋग्वेदांत अशिमिद या समासांत हा आलेला असून त्याचा अर्थ रोग असा असावा अथर्ववेद व शतपथ ब्राह्मण यामध्यें शिमिदा हें स्त्रीलिंगी रूप आलें असून त्याचा अर्थ एका राक्षसिणीचें नांव असा आहे

[3] ग्रा हि —ऋग्वेद व अथर्ववेद यांत हा एक व्याधीचा निशाचरी आहे निद्रा (स्वप्न) ही तिचा मुलगा होय

[4] जी व गृ भ —(जिवंतपणीं धरणारा) रॉथच्या मतें हा शब्द प्रजेच्या जीविताचें रक्षण करणारा या अर्थानें ऋग्वेदांत आलेला आहे. परंतु हा अर्थ जरा त्याच सूक्तांतील पुढील ऋचेंत आलेल्या 'मध्यमशी' (मध्यस्थ) शब्दावरून शक्य असला तरी हा अर्थ घेण्याची आवश्यकता नाहीं व तो संभाव्यहि नाहीं ऋ. १०.९७,११ या ठिकाणीं जीवगृभ याचा जीवानें धरणारा, मारणारा असाच अर्थ होतो

[5] य क्ष्म न् –सामान्यतः शरीराला कृश करणारा रोग या अर्थी हा शब्द ऋग्वेदांत आणि अथर्ववेदांत आलेला आहे वाजसनेयि संहितेंत शंभर प्रकारच्या यक्ष्माचा उल्लेख केला गेला आहे आणि काठकसंहितेंत अयक्ष्म म्हणजे रोगविरहित असा अर्थ दिलेला आहे यजुर्वेदसंहितेत यक्ष्माच्या उत्पत्तीविषयीं माहिती दिलेली आहे यक्ष्म तीन प्रकारचे सांगितले आहेत –राजयक्ष्म, पापयक्ष्म, आणि जायेन्य. दुसऱ्या प्रकारचा यक्ष्म अप्रसिद्ध असून त्याचा अर्थ एक भयंकर रोग असा होतो वैद्यकांत यक्ष्म या शब्दाचा अर्थ रोग असा आहे

[6] रा ज य क्ष्म न्.—राजरोग असा या शब्दाचा अर्थ असून ऋग्वेदांत आणि पुढें पुष्कळ ठिकाणीं याचा उल्लेख आलेला आहे झिमरनें हा रोग म्हणजे क्षयन होय असें म्हटलें आहे. या रोगाचें जें पुढें निदान झालें आहे त्यावरून हें मत बरोबर आहे असें दिसतें याचा अर्थ उपदंश असा असावा असें ब्लूमफील्ड सुचवितो परंतु हें संभवनीय दिसत नाहीं वैद्यकांत या रोगास राजयक्ष्म असेंच म्हणतात हा सर्व रोगांचा राजा आहे म्हणून त्यास राजयक्ष्मा हें नांव दिलें आहे

[7] वि द्र ध —एका रोगाचें नांव म्हणून हा शब्द ऋग्वेदांत आला आहे सर्व शरीरावर उठणारे फोड म्हणजे हा रोग असावा ऋग्वेदामध्य आश्विनांच्या आश्रितांचेंहि हें नांव आहे हा शब्द प्राचीन वैद्यकांत नाहीं

[8] सु रा म —अतिशय सुरापानानें उत्पन्न होणाऱ्या रोगाचें हें नांव ऋग्वेदामध्यें आलेलें आहे नमुचीच्या कथेंत इंद्राला हा रोग झाला होता असें म्हटलें आहे पुढील ग्रंथांत सुराम हें विशेषण सामाला 'आनंददायक' अशा अर्थानें लावलेलें आहे हा विकार वैद्यकांत नाहीं

[9] ह रि म न् —ऋग्वेद व अथर्ववेद यामध्यें हा एक रोग आहे असें म्हटलें असून पिंवळेपणा (कावीळ) असा त्याचा अर्थ आहे

[10] हृ द्रो ग व हृ द्यो त —'काळजाचा विकार' याचा उल्लेख ऋग्वेद व अथर्ववेद यामध्यें अनुक्रमें आला आहे झिमरच्या मतानें अथर्ववेदामध्यें आलेला हा रोग व हृदयामधील रोग हे दोन्ही एकच आहेत ऋग्वेदामध्यें हें संभवत नाहीं पाश्चात्य वैद्यक ग्रंथांत याला अजिना पेक्टोरिस असें नांव दिलें आहे. हृद्रोग म्हणजे हृदय विकृत झाल्यामुळें होणारा विकार याचें वर्णन वैद्यकांत आलें आहे

[11] जा या न्य जा ये न्य --अथर्ववेद व तैत्तिरीय संहिता यामध्यें उल्लेखिलेल्या रोगाचा जायान्य व जायेन्य हीं नांवें आहेत अथर्ववेदांत एके ठिकाणीं हरिमा (कावीळ) व गात्रांतील दुखें (अंगभेदो विसल्पक) यांच्याबरोबर या रोगाचा उल्लेख आलेला आहे झिमरच्या मतें या वेदना म्हणजे त्या रोगाचीं लक्षणें होत व यक्ष्मा रोग [फुप्फुसाचा रोग] आणि हा रोग यामध्यें बरेंच साम्य आहे ब्लूमफील्डचें तर असें मत आहे कीं, हा रोग म्हणजे उपदंशच होय कारण याचीं लक्षणें व कौशिकी सूत्रामध्यें जो कर्मविधि दिलेला आहे त्यांत सांगितलेलीं लक्षणें हीं सारखीं जुळतात रॉथच्या मतें हा रोग म्हणजे संधिविकार होय हा अनिश्चित आहे असें व्हिटनें म्हणतो जायान्य या नांवावरून व बरोबरच्या लक्षणांवरून वैद्यकशास्त्राच्या मतें या रोगाचें निश्चित नांव देतां येत नाहीं. अति स्त्रीगमन करण्यानें क्षय होण्याचा जास्त संभव आहे. तेव्हां कदाचित् हा क्षयरोग असू शकेल ब्लूमफील्डचें मत मान्य बरोबर नाहीं. कारण उपदंश हा रोग [स्त्री पासून होणारा] पूर्वी इकडील लोकांत नव्हता व तो जुन्या वैद्यक ग्रंथांतहि नाहीं

[12] दु श्च र्म न् —त्वग्रोगानें पछाडलेला असा याचा अर्थ असून हा शब्द तैत्तिरीय संहिता व ब्राह्मण ग्रंथ यामध्यें आलेला आहे या शब्दानें बहुधा कुष्ठरोगाचा बोध होत असावा त्या रोगाला दुसरें नेहमीचें नांव किलास असें आहे किलास म्हणजे पांढरें किंवा तांबूस कोड हा पाप रोग आहे असें वाग्भटादि वैद्यक ग्रंथांतहि म्हटलें आहे

[13] व रु ण गृ ही त —'वरुणानें पछाडलेला' जलोदरानें पीडित झालेल्या माणसाचें वर्णन करतांना अनेक ठिकाणीं हा शब्द आलेला आहे पापाबद्दल शिक्षा म्हणून हा रोग वरुणानें पाठविलेला आहे वरुण हा पाण्याचा देव आहे

व जलोदरात पाणीच साठतें या संबंधावरून वरुणगृहीत हें नाव जलोदर या रोगाला सयुक्तिक दिसतें.

[१५] अक्षत अथवा अक्षित.—जायान्यासंबंधीं अथर्ववेदांत जें वचन आहे त्यांत अक्षित आणि सुक्षत या नावाच्या जखमेवर उपाय मागितला आहे. कौशिक सूत्रांत अक्षत आणि सुक्षत व सायणप्रमाणें अक्षित आणि सुक्षित असे शब्द आहेत. ब्लूमफील्ड या शब्दाचे अर्थ ' कापण्यानें न झालेलें' आणि 'कापल्यामुळें झालेलें' असे करतो. पहिल्यानें यानें ' ह्रावर ' अथवा ' गळूं ' असा अर्थ केला. जायान्याचे हे दोन प्रकार आहेत असें व्हिटने म्हणतो. सायणप्रमाणेंच लुडविग अक्षित असा अर्थ करतो व 'पक्केपणीं न मुरलेलें ' असें त्याचें स्पष्टीकरण करतो. यामध्यें क्षय या रोगाचा अंतर्भाव होतो असें झिमरचें म्हणणें आहे. जायान्याचे हे जर प्रकार असतील तर व जायान्य म्हणजे क्षय असा अर्थ असेल तर अक्षत म्हणजे दोषसंचयानें झालेला क्षय व सुक्षत म्हणजे फुप्फुसाला जखम होऊन झालेला क्षय असा अर्थ योग्य होईल. क्षतक्षय म्हणून हल्लीं एक रोग मानीत असतात.

[१६] अपचित्.—अथर्ववेदांत पुष्कळ वेळां हा शब्द उपयोगांत आणलेला आहे. रॉथ, झिमर आणि दुसरे ग्रंथकार असें म्हणतात कीं, याचा अर्थ एक किडा असा असून त्याच्या दंशानें जागा सुजते. परंतु ब्लूमफील्ड म्हणतो कीं, हा शब्द एका रोगाचें नाव आहे व तो रोग म्हणजे गंडमाळा होय, असें केशव आणि सायण यांच्या भाष्यावरून व उत्तरकालीन जो ' अपचि ' व्याधि आहे त्याशीं तुलना करून तो सिद्ध करून दाखवितो.

[१७] अप्वा.—' कोठ्यासंबंधी. ' हा रोग बहुधा आमांश असावा, असें झिमर म्हणतो. कारण शत्रूंच्या सैन्याला त्रास व्हावा म्हणून याला आव्हान करीत असत. वेबर म्हणतो कीं, भीतीमुळें उत्पन्न होणारा हा हगवणीचा रोग असावा, आणि असें वर्णन महाभारतादि पुराणात बहुत करून असतें. या मताला ब्लूमफील्ड व बहुधा यास्क यांचा दुजोरा आहे. अप् ( पाणी ) याचा अतिसार रोगाशीं संबंध आहे म्हणून याला अप्वा हें नाव दिलें असावें. वाईट किंवा पुष्कळ पाणी प्याल्यानें अतिसार होतो हें सर्वमान्य आहे.

[१८] अलजि.—अथर्ववेदामध्यें हें एका व्याधीचें नाव आहे. नंतरचा ' अलजी ' हा शब्द नेत्ररोगाचा द्योतक असून, नेत्रबाह्यपटल आणि बाहुलीचा पडदा यांच्या सांध्यातून पाणी वगैरे वाहणें असा त्याचा अर्थ आहे. वैद्यकांत या रोगाचें वर्णन आहे. नाकाच्या बाजूकडील डोळ्याच्या कोपऱ्यास जी सूज येते तीस अलजि असें म्हणतात.

[१९] आशरीक.—अथर्ववेदांत जंगिड झाडाचें महत्त्व ज्या सूक्तांत वर्णिलें आहे त्यांत हा एक व्याधि आहे असा उल्लेख आहे. ताप येण्याच्या वेळीं अंग दुखतें त्याला हा शब्द योजितात असें झिमरचें मत आहे. व्हिटने सुचवितो कीं, हा शब्द एक विशेषणच आहे. याचा अर्थ काय आहे हें त्याला नीटसें समजलें नाहीं.

[२०] आस्राव.—हा एक रोग आहे असें अथर्ववेदावरून दिसतें, पण तो कोणत्या प्रकारचा असतो हे कळत नाही. एका ठिकाणीं भाष्यकार याचा अर्थ मूत्रातिसार असा करतात; पण लानमनच्या मताप्रमाणें मधुमेह असा त्याचा अर्थ आहे ब्लूमफील्ड म्हणतो कीं, हा रोग हगवण होय पण ज्या अर्थी अरुस्राण हा उपाय सांगितला आहे त्या अर्थी ' जखमांतून पू वाहणें ' हा तो रोग असला पाहिजे असें झिमरचें मत आहे. व्हिटनें फक्त ' पूं ' असा अर्थ करतो व ब्लूमफील्डच्या मताविषयीं शंका प्रदर्शित करतो. त्याचा अर्थ ' आजार, सरदी ' असा असावा असें लुडविग म्हणतो. प्रस्राव या शब्दाचा लघवी असा अर्थ असून, त्याशीं आस्राव हा शब्द बरेंच साम्य दाखवीत असल्यामुळें आस्राव म्हणजे लघवीचा रोग हा अर्थ बरोबर दिसतो. पण निश्चित असें मत मात्र कांहीं देता येत नाहीं.

[२१] कास, कास, कासा, कासिका.—हीं चारहि एकाच शब्दाचीं रूपें ' खोकला ' या अर्थी अथर्ववेदांत आलीं आहेत. हा खोकला डोकें दुखण्याबरोबर येऊन, तो पुढें येणाऱ्या तापाचें ( तक्मन् ) चिन्ह दाखवितो. हा स्वतंत्र असाहि रोग आहे. वैद्यकांत कास नावानेंच या रोगाचें वर्णन आहे.

[२२] किलास.—अथर्ववेद आणि वाजसनेयि संहिता यामध्यें ' श्वेतकुष्ठ, ' या रोगाचें हें नाव आहे. पहिल्यानें तो रोग करडा ( पलित ) व नंतर पांढरे ठिपके या रूपानें शरीरावर दिसतो. रॉथ यानें ऐ. ब्राह्मणांतील अलस या शब्दाचा अर्थहि तोच केला आहे. परंतु हा अर्थ खात्रीलायक नाहीं. ऋग्वेदांतील एका उताऱ्यात किलासी या स्त्रीलिंगी रूपाचा अर्थ मॅक्समुल्लरनें ' ठिपके असलेली हरिणी ' असा केला आहे. वैद्यकांत याचें वर्णन असून किलास या नावानेंच त्याचा उल्लेख आहे.

[२३] कीमिल.—हा अथर्ववेदाच्या पैप्पलाद शाखेंत, बोथलिंकच्या म्हणण्याप्रमाणें एक व्याधिवाचक शब्द आहे. हा व्याधिवाचक शब्द वैद्यकांत नाहीं.

[२४] क्षत.—झिमर म्हणतो कीं, अथर्ववेदांतील हा मुख्य व्याधि होय, परंतु हा शब्द फक्त विशेषणच असावा असें वाटतें. शस्त्रानें अगर बाह्य अपघातानें झालेली जखम असा याचा अर्थ आहे.

[२५] क्षेत्रिय.—अथर्ववेदांत हा एक व्याधि आहे. याच्या उपशमासाठीं तीन ऋचा लिहिल्या गेल्या आहेत. काठक संहिता आणि तैत्तिरीय ब्राह्मण यांतहि तो आला आहे. अथर्ववेदावरील टीकाकार म्हणतात कीं, हा आनुवंशिक रोग आहे. त्याची व्युत्पत्ति म्हणजे बहुत करून ' शेतांत जन्मलेला ' किंवा 'इंद्रिय रोग' अशी असावी. हा नक्की रोग कोणता आहे हें सांगता येत नाहीं. वेबर म्हणतो कीं अर्थ

वेदामध्यें ज्या ऋचा आहेत त्यांचा मुख्य उद्देश शेताना होणारा उपद्रव नाहींसा व्हावा हा होय; परंतु हे शक्य वाटत नाहीं. ब्लूमफील्ड म्हणतो कीं, तो रोग म्हणजे 'गंडमाला, अथवा 'गरमी', 'परमा' होय. याच्यावर उपाय म्हणून जे सांगितले आहेत त्यावरून त्या रोगाचीं चिन्हें काय असतात हें मुळींच समजत नाहीं.

[२६]गलुन्त.—हा शब्द अथर्ववेदांत एकदांच 'फुगणें' सुजणें.' या अर्थी येतो. परंतु व्हिटने 'मान, गळा' असे त्याचें स्पष्टीकरण करतो. याचाहि अर्थबोध बरोबर होत नाहीं.

[२७]ग्राह—हें एका रोगाचें नाव शतपथ ब्राह्मणात आलें आहे. अथर्ववेदात अर्धांगवायु असा त्याचा अर्थ आहे.

[२८]ग्रैव्य—मानेवराल वाळूक किंवा वेड असा याचा अर्थ अथर्ववेदात दिला आहे.

[२९]ग्लौ.—अथर्ववेद आणि ऐतरेय ब्राह्मण यांत हें एका व्याधीचें चिन्ह आहे. 'गळूं, उठाणूं' असा बहुधा त्याचा अर्थ असावा असें ब्लूमफील्ड म्हणतो. वाजसनेयि संहितेवरून याचा अर्थ बरोबर लागत नाहीं, कदाचित् तो यज्ञिय पशूचा कोणता तरी भाग असावा. हा शब्द वैद्यकात नाहीं.

[३०]जंभ.—एक रोग किंवा सर्वांत अत्यंत वाईट रोगाचें नाव म्हणून हा शब्द अथर्ववेदामध्यें आलेला आहे. जंगिड या झाडाच्या योगानें हा रोग नाहींसा होतो असें एका ठिकाणीं म्हटलें आहे. दुसऱ्या एका ठिकाणीं सहनुः (दोन्ही जबडे एकत्र आणणारा) असें त्याचें वर्णन आलें आहे. कौशिक सूत्रावरून वेबर असें म्हणतो कीं, दात येणें हें जे मुलांचें दुखणें आहे तें हें असावें. ब्लूमफील्डच्या मतें बालग्रह किंवा आचके येणें हा तो रोग असावा. हा रोग म्हणजे धनुर्वात होय असें कॅलॅंडचें मत आहे. व्हिटने म्हणतो कीं हा रोग म्हणजे आंकडी किंवा दांतखीळ होय. जृंभा म्हणजे जांभई. जांभई आल्याबरोबर केव्हां केव्हां तोंड तसेंच उघडें रहातें किंवा एकदम मिटतें; उघडें राहिलें तर मिटत नाहीं व मिटलें तर उघडत नाहीं. यास वैद्यकांत 'हनुग्रास' असें म्हणतात. हनुवटीच्या मुळाशीं वायु कुपित झाल्यानें हा रोग होतो. जंभ रोगहि हाच असावा. 'जबडे एकत्र आणणारा' हें विशेषणहि यास चांगलें लागू पडतें.

[३१]तक्मन्.—हा एक प्रकारचा रोग असून याचा उल्लेख अथर्ववेदामध्यें वारंवार येतो. तदुत्तर ग्रंथात मात्र तो याच नावानें प्रसिद्ध नाहीं. अथर्ववेदात या रोगावर पाच सूक्तें आहेत, व इतर ठिकाणींहि या रोगाबद्दल उल्लेख आलेले आहेत. हा रोग म्हणजे 'ताप' असावा असें वेबरचें मत आहे. तापाचीं सर्व लक्षणें या रोगाच्या लक्षणांशीं जुळतात असें ग्रोहमननें सिद्ध केलें आहे. थंडीचे व ऊष्णाचे आळीपाळीनें रोग्यास येणारे झटके, तापामुळें कावीळ झाल्यावर येणारा पिंवळा रंग व त्याची विशिष्ट ठराविक मुदत वगैरेबद्दलचे उल्लेख ठिकठिकाणीं आलेले आहेत. या तापाचे निरनिराळे प्रकार दाखविणारे शब्द म्हणजे 'अन्येद्युः', उभयद्युः, तृतीयक, वि-तृतीय व सदं-दि हे होत. या शब्दांचे निश्चित अर्थ ठरविणें फार मुष्किलीचें आहे. पहिल्या शब्दाचा अर्थ दैनिक ताप (हिंव) असा आहे व याबद्दल एकमत आहे. तरी पण अन्ये हा शब्द 'दुसऱ्या दिवशीं' अशा अर्थी असल्यानें दैनिक असा अर्थ कसा होतो हें गूढच आहे. 'उभयद्युः', याचा अर्थ दर दोन दिवसांनीं येणारा ताप असा आहे. सायणाचार्यांच्या मतें 'उभयद्यु.'चा अर्थ तिजारी (तिसऱ्या दिवशीं येणारा) ताप असा आहे. पण तृतीयक याचा अर्थ तिजारी ताप असा असला पाहिजे. झिमरच्या मतें तृतीयक ताप म्हणजे ज्या तापात तिसऱ्यांदा पाळी आल्यावर रोगाचा जोर होतो व मग रोग असाध्य होतो तो ताप होय. ग्रोहमनच्या मतें वि-तृतीयक म्हणजे असा ताप कीं, जो दक्षिणकडील देशात नेहमीं असतो व जो दररोज येणारा असून ज्याचा जोर एक दिवसाआड होत असतो. ब्लूमफील्डच्या मतें तर वि-तृतीयक व उभयद्युः हे एकच ताप होत. सदंदि हा ताप पुढें ज्याला 'सतत ज्वर' म्हणूं लागले तोच असावा. या आजारात एकदा ताप आला म्हणजे तो पुनः येण्याचे पूर्वी कांहीं दिवस ताप बिलकुल रहात नाहीं. हा ताप निरनिराळ्या ऋतूंत येत असे. शरदृतूंत शरद, उन्हाळ्यात ग्रैष्म, व पावसाळ्यात वार्षिक अशा त्याला संज्ञा असत. हा ताप विशेषतः शरत्कालीं येत असे, म्हणूनच त्याला विश्वशारद म्हणजे दर शरदृतूंत येणारा असें नाव मिळालें आहे. अग्नि जलात शिरला म्हणजे हा रोग उत्पन्न होत असे. यावरून वेबरनें असें अनुमान काढलें आहे कीं, उष्णतेनंतर जी थंडी पडत असते किंवा दलदलीच्या प्रदेशावर उष्णतेचा जो परिणाम होत असे त्याचा परिणाम म्हणजे ही रोगोत्पत्ति होय. ग्रोहमनच्या मतें अग्नि जलात शिरला म्हणजे रोग उत्पन्न होतो याचा अर्थ असा कीं, पावसाळ्यात ज्या वेळीं विजेच्या रूपानें अग्नि पावसाबरोबर पृथ्वीवर अवतरतो त्या वेळीं हा रोग उत्पन्न होतो. झिमरला हें मत ग्राह्य असून त्यानें असें म्हटलें आहे कीं, हिमालयाजवळ ज्याला हल्लीं तराई असें म्हणतात त्या भागात हा रोग दिसून येतो. त्याच्या मतें वन्य म्हणजे अरण्यात होणारा असाच अर्थ अथर्ववेदात सांपडणाऱ्या वन्य शब्दाचा केला पाहिजे. कारण हिमालय पर्वताच्या पश्चिम भागात असणाऱ्या मूजवंत व महावृष या दोन जातींच्या लोकांत हा रोग आढळून येतो, असा उल्लेख आहे. साचलेल्या पाण्यातील 'ॲनोफीलस नावाच्या डासापासून (ते चावल्यावर) हा ताप उत्पन्न होतो अशाबद्दल कोठेंहि उल्लेख नाहीं. पूर्वकालीन वैद्यशास्त्रास या रोगाची उत्पत्ति माहीत होती अशाबद्दलचा शोध त्या शास्त्रावर विनाकारण लादण्यात आलेला आहे. या रोगाचीं लक्षणें किंवा यापासून होणारे इतर उपद्रव जे सांगितले आहेत त्यामध्यें पामन् (खरूज), शीर्षशोक (कपाळदुखी), कासिका (कफ) बलास (क्षय

किंवा एक प्रकारची गरूम ), हे रोग सांगितले आहेत. तक्मन् या रोगाचा उल्लेख अथर्ववेदापासून होतो, ही गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे. कदाचित् वैदिक काळातील आर्यलोक हिंदुस्थानात जेव्हां प्रथम आले तेव्हां त्यांना हा रोग ठाऊकहि नसेल. कदाचित् त्यांना त्या रोगाची माहिती उडत उडत आलेली अशी ठाऊक असली तरी तो रोग स्थानिक होऊन लोकांना भयप्रद होण्यास बऱ्याच पिढ्या लागल्या असतील. या रोगावर कोणते उपाय लोकांस उपयोगी पडत हें निश्चयानें कांहीं सांगता येत नाहीं. कारण, अथर्ववेदामध्यें मंत्रतंत्र व कुष्ठ यांचाच फक्त उल्लेख आहे. पण यांचा जरी पुष्कळ बरेच दिवस लोक उपयोग करीत होते तरी हे रामबाण उपाय खास नव्हत. अथर्ववेदाचे काळांतसुद्धां या तापानें बरेच बळी घेतले असले पाहिजेत. कारण त्याशिवाय या रोगाचा एवढ्या प्रामुख्यानें उल्लेख होता ना. या रोगाचें वर्णन हिंवतापाशीं जुळतें. अन्येद्युः याचा अर्थ दररोज येणारा ताप असाच वाग्भटात दिला आहे.

[३२]तृतीयक.—तिजारी ताप या अर्थी अथर्ववेदामध्ये हा शब्द आलेला आहे.

[३३]दृषीका—' डोळ्याचा श्लेष्मा ' असा याचा अर्थ असून अथर्ववेद व उत्तरकालीन ग्रंथ यांत रोगाचें नांव म्हणून हा शब्द आलेला आहे.

[३४]निराल.—अथर्ववेदामध्यें एकदा हा शब्द आला असून तो एका रोगाचें नांव आहे असें सायणाचार्यांचें मत आहे. ब्लूमफील्ड पदपाठाच्या मदतीनें हे दोन शब्द घेतो त्यांपैकीं निर हा संक्षिप्त आज्ञार्थी असून आल हा संबोधनार्थी आहे. व त्याचा अर्थ एक प्रकारचें रान असा आहे. व्हिटनें यानें प्रथम आल हें क्रियावाचक नाम समजून शेवटीं असें दर्शविलें कीं, निराल हा एक शब्द असून त्याचा अर्थ अनिश्चित आहे. हा शब्द वैद्यकांत नाहीं.

[३५]पामन्.—अथर्ववेदामध्यें हें एका त्वग्रोगाचें नांव असून त्या शब्दापासून पामन हें तद्धित विशेषण आहे. व त्याचा अर्थ त्वग्रोगानें पीडिलेला असा आहे. उत्तरकालीन संहिता व ब्राह्मण ग्रंथ यांत हें विशेषण आढळून येतें. ताप आल्यानंतर हा रोग होतो असें ज्या अर्थी म्हटलें आहे. त्या अर्थी पुरळ किंवा खरूज ( ताप येऊन गेल्यावरची ) असा याचा अर्थ असावा. पामा नांवाचा रोग निदानांत वर्णिलेला आहे. हा खरजेसारखाच एक विकार आहे. या रोगांत येणाऱ्या पुळ्या ढुंगणावर व हातावर दाट अशा येतात.

[३६]पृष्ठ्यामय.—पाठीस किंवा बरगड्यांतील दुःख असा या शब्दाचा अर्थ अथर्ववेदांत दिलेला आहे. निदान तेथें तरी तापाला लागून होणारें दुःख असा याचा अर्थ वाटतो. उरण हा एक पृष्ठ्यामय आहे. केव्हां केव्हां हा विकार होतो.

[३७]प्रमोत.—हें एका रोगाचें नांव आहे असें सं. पी. कोशांत म्हटलें आहे. हा शब्द अथर्ववेदांत आला आहे. झिमरच्या मतें हा शब्द विशेषण असून याचा अर्थ ' मुका ' असा आहे. हें मत ब्लूमफील्ड व व्हिटने यांनीं भीतभीत मान्य केलें आहे. हा रोगवाचक शब्द वैद्यकांत नाहीं व दुसराहि योग्य अर्थ कोणता आहे हें माहीत नाहीं.

[३८]बलास—अथर्ववेद आणि तदुत्तर ग्रंथांत या रोगाचें नांव पुष्कळ वेळां आलेलें आहे. महीधर आणि सायण याचा अर्थ क्षय असा करितात. झिमरहि याच मताचा आहे. कारण हा एक यक्ष्म्याचा प्रकार आहे असा उल्लेख येतो. यामुळें [ अस्थिस्रंस आणि पर्वस्रंस ] हाडें आणि सांधे मोकळे होतात. हा रोग उत्पन्न होण्याचें कारण प्रेम, ईर्ष्या किंवा हृदय [ ? ] होय. पुढील हिंदु वैद्यकांत क्षयाच्या बद्दल हें वर्णन आढळतें. बलास हा नेहमीं तक्मन् या शब्दाबरोबर आढळतो हेंहि योग्यच आहे. कारण तक्मन् हा क्षयाच्या वर्णनाचा एक राक्षस आहे. ग्रोहमनच्या मतानें त्याचा सूज किंवा दुःख असा अर्थ असावा. ब्लूमफील्डच्या मतें याचा अर्थ संशयित आहे. लुडविग याचा जलोदर असा अर्थ करतो. या रोगावर त्रिककुद् व जंगिड या वनस्पतींचें अंजन औषध म्हणून दिलें आहे. वैद्यकांत बलास याचा कफ असा अर्थ आहे. क्षयांत कफाचेंच प्राधान्य असतें आणि त्यांत दुष्ट कफ फार पडतो यावरून आणि इतर वर्णनावरून हा रोग म्हणजे ज्यास कफक्षय म्हणतात असा क्षय रोगाचाच एक प्रकार असावा. क्षयरोगाच्या सुरुवातीस एक प्रकारचा ताप येऊं लागतो त्यास वैद्यकांत वातबलासकज्वर असें म्हणतात. यावरूनहि बलासक हें नांव क्षय रोगासंबंधीं प्राचीन असून लोकरूढ आहे असें वाटतें. कारण रोगांचीं नांवें जीं पूर्वीपासून रूढ होतीं तींच चरकानें वापरलीं आहेत. लुडविग याचा जलोदर असा अर्थ करतो. त्यास आधार काय हें समजत नाहीं. सुश्रुताच्या विचारानें हाडें दूर होतात असें जें त्या विकाराचें लक्षण दिलें आहे तें क्षय रोगांत आढळ संभवतें.

[३९]मन्या—( मानेचा कांटा, अनेकवचनी ) अथर्ववेदांतील एका रोगविषयक ऋचेंत हा शब्द आला आहे. हा रोग म्हणजे बहुधा गंडमाळेमुळें मानेवर आलेली सूज होय. वाइज या शब्दाची मन्सकुंडर म्हणजे मानेवरची गळवें या रोगाशीं तुलना करतो. हा मन्सकुंडर शब्द मन्या व स्कंध्या ( खांद्याचें आणि मानेवरचें दुःख ) या दोन्हीं ( पहिल्या आणि तिसऱ्या अथर्वण ऋचांतून आलेल्या ) शब्दांसारखा दिसतो.

[४०]रोग —अथर्ववेद व मागाहून झालेले ग्रंथ यांत रोग या शब्दाचा आजार असा अर्थ दिला आहे.

[४१]विक्लिंदु.—एका रोगाचें नांव म्हणून हा शब्द अथर्ववेदांत आलेला आहे. ब्लूमफील्डच्या मतानें याचा अर्थ मोतीबिंदु असा आहे. हा शब्द वैद्यकांत नाहीं.

[४२]विद्रध.—सपूयक्षत नांवाच्या एका रोगाचें हें नांव अथर्ववेदामध्यें आलेलें आहे. झिमरच्या मतें यक्ष्मा या रो-

गाचें हें लक्षण आहे याच रोगाला पुढें विद्रधि असे लोक म्हणूं लागले. लुडविग या शब्दाची व ऋग्वेदामधल्या अस्पष्ट विद्रध शब्दाची तुलना करतो, पण ऋग्वेदातील विद्रध शब्दाचा नक्की अर्थ काय आहे हेंच समजत नाहीं. वैद्यकात विद्रधि नावाचा रोग वर्णिला आहे तोच हा रोग असावा.

[43]वि लो हि त.—हें एका रोगाचें नाव अथर्ववेदात आलें आहे. ब्लूमफील्डच्या मतें नाकातून रक्त वहाणें ही ती पीडा असावी. हेनरी याचा अर्थ रक्त नासणें असा करतो. व्हिट नेच्या मतें रक्तक्षय ( ॲनिमिया ) असा त्याचा अर्थ आहे. वैद्यकात ज्यास पंडुरोग म्हणतात तोच हा विलोहित रोग होय कारण, याच रोगात रक्त कमी होतें ( 'ततोऽल्परक्त मेदस्को'—वाग्भट, पंडुरोग निदान ) ब्लूमफील्डचें मत बरोबर नाहीं. कारण, नाकातून रक्त वाहू लागलें म्हणजे तो रक्त वाढल्याचा रोग समजतात. रक्ताचें पृथक्करण हा अर्थ कसा होतो हेंच समजत नाहीं; ही शब्दयोजना चमत्कारिक आहे

[44]वि श र —हा शब्द अथर्ववेदात आढळतो हा एखाद्या रोगाचा निदर्शक असावा. रॉथ म्हणतो कीं, हें एका राक्षसाचे नाव असावें, पण झिमर म्हणतो कीं, ताप ( तक्मन् ) आला असता अंगाचें जें ठणकणें त्यास विशर असें म्हणत असतील, आणि या तर्कास 'विशरीक' व दुसऱ्या एका स्थळीं आलेल्या 'बलास' ह्या शब्दानें पुष्टि मिळते हा शब्द वैद्यकात नाहीं.

[45]विसल्प, विसल्पक.—हा शब्द अथर्ववेदात सापडतो. विसल्पक असा पाठ वैदिक लोक घेतात तेव्हा तोच अधिक युक्त असें, वेदार्थयत्नकार शं. पा. पंडित याचें मत आहे. शल्य म्हणजे बाण, कांटा, वगैरे जर शरीरात घुसला तर त्यामुळें अथवा तो निघाल्यावर जशा प्रकारच्या वेदना होतात तशा वेदना असा याचा अर्थ होईल. ताप आल्यावर मज्जातंतूंना जी व्यथा होते, तिच्या अर्थीहि ह्याचा उपयोग केला असल्याचा संभव आहे.

[46]वि ष्कं ध.—एका रोगाचें नाव म्हणून हा शब्द अथर्ववेदात आढळतो. ह्यावर इलाज म्हणून शिशाचा ताईत, अंबाडी, जंगिड नावाची वनस्पति अथवा एक प्रकारच्या मलमाचा उपयोग करावा असें तेथें म्हटलें आहे एका सूक्तात आलेल्या 'कार्पक' व 'विपक' ह्या नावाच्या वनस्पतींचा या रोगावर उपयोग होत असावा. वेबर म्हणतो कीं विष्कंध म्हणजे माधिवात. कारण यामुळें स्कंध वेगवेगळे होतात ( वि+स्कध ) ब्लूमफील्डच्या मतानें ऋग्वेदातील 'व्यंस' व 'विग्रीव ह्याप्रमाणे 'विष्कंध' हाहि एक राक्षस असावा. वैद्यकशास्त्राप्रमाणें ह्या शब्दाचा काहीं अर्थ लागत नाहीं.

[47]शी र्ष क्ति —अथर्वांत डोकेंदुखीला हा शब्द योजिला आहे हा वैद्यकात नाहीं.

[48]शीर्षामय —याचा अर्थ डोक्याचा रोग. याचा उल्लेख अथर्ववेदात आहे.

[49]स स्कं ध.—विष्कंध ह्या शब्दाबरोबरच हा एक रोगदर्शक शब्द आला आहे. ह्याचा अर्थ 'खांदे एकत्र असलेला.' व्हिटनेच्या मतानें विष्कंधाचा प्रतिकार करणाऱ्या औषधाचें हें नाव असावें हा शब्द वैद्यकात आढळत नाहीं.

[50]स्क ध्या.—हें स्त्रीलिंगी अनेकवचनी रूप अथर्वांत आढळतें खांद्याच्या रोगाचें किंवा कसल्या तरी गळवाचें हें नांव असावें. असा रोग वैद्यकात नाहीं

[51]हृ द या म य.—'काळजाचा' रोग हा शब्द अथर्वामध्यें 'यक्ष्मा' व 'बलास' ह्याच्या संबधानें आलेला आहे झिमरच्या मतें हा क्षय होय तो वैद्यक संहितेंत दिलेल्या मतानुसार म्हणतो कीं, ह्या रोगास जीं कारणें आहेत, त्यात प्रेम हें एक असावें

[52]अ र्श स —वाजसनेयि संहितेंतील क्षय व दुसरे क्षुल्लक रोग याच्या यादींत या रोगाचेंहि नाव आहे. उत्तरकालीन वैद्यकवाङ्मयात त्याचा अर्थ 'मूळव्याध' असा करितात.

[53]उ प चि त्.—वाजसनेयि संहितेंत हा शब्द एका रोगाचा निदर्शक म्हणून आढळतो. रॉथ याचा अर्थ सूज असा करतो, व तो शक्य आहे. उपचय म्हणजे सूज असा वैद्यकदृष्ट्या अर्थ होतो ब्लूमफील्ड उपचित् व अपचित् एकच असें म्हणतो.

[54]पा का र.—हा एक रोग विषूचिका व अर्शस ह्याच्या बरोबरच वाजसनेयि संहितेंत उल्लेखिला आहे. ह्या रोगाचें विशिष्ट स्वरूप जरी माहीत नाहीं, तरी शब्दाच्या व्युत्पत्तीवरून याचा अर्थ पक्व झालेला व्रण असा होईल.

[55]लि हा क र्ण.—वाजसनेयि संहितेंत गुराढोरांच्या मागें विशेषणात्मक रूपानें हा शब्द योजिला आहे. लिहेच्या आकाराचा गुराच्या कानावर दिलेला ठसा असाहि याचा अर्थ संभवेल. पण वाजसनेयि संहितेंत महीधराचार्य याचा एक कर्णरोग असा अर्थ देतात. लिहाकर्ण हा रोग वैद्यकात नाहीं पालिरोग असें एक कर्णरोगात सदर आहे व त्याचा अर्थ कर्णपाळीचा रोग असा आहे. कर्णपाळी म्हणजे कानाची वरची सर्व बाजू.

[56]वि षू चि का.—वाजसनेयि संहितेंत हा शब्द आढळतो सोमपानातिरेकामुळे होणारा हा रोग होय. याचा आमाश किंवा वाईजच्या मताप्रमाणे पटकी असाहि अर्थ होईल. उघड शब्दार्थ 'दोनहि दिशानीं मलविसर्जन' असा आहे. चरकामध्यें हा अजीर्णाचा रोग होय असें लिहिलें आहे. ह्यात सुया टोंचल्याप्रमाणें सर्वांगास वेदना होतात, म्हणून यास विषूचिका म्हणतात.

[57]वि ष्वा जि न् –शतपथ ब्राह्मणातील या शब्दाचा अर्थ संशयित आहे सायणाचार्य याचा अर्थ 'एके ठिकाणीं राहणारा' असा करितात या अर्थाप्रमाणें पाहता सेंट पीटर्सबर्ग-कोश व बोथलिंगचा कोश याच्यात दिलेला ज्याचा

कल्प स्थिर आहे तो' हा अर्थहि बरोबर म्हणता येईल. परंतु शतपथ ब्राह्मणाच्या कण्वशाखीय प्रतीत एके ठिकाणीं त्याचा रोग या अर्थानें उपयोग केला आहे असें एगलिंग म्हणतो. त्याचप्रमाणें विद्वायाजिन् याचा अर्थ आमाशानें व्यथित असाहि होईल.

[7]व्याधि.—व्याधि म्हणजे रोग. वैद्यक वाङ्मयांत अनेक वेळां हा शब्द आलेला आहे. निरनिराळ्या रोगांना निरनिराळीं नांवें दिलेलीं आहेत. वैदिक संहितांमध्यें अनेक शारीरिक व्यंगाचीं नावें आढळतात. वाजसनेयि संहितेंतील पुरुषमेधांत बळी दिल्या जाणाऱ्या व्यक्तींच्या यादींत वामन किंवा कुब्ज, खल्वाटि (टकल्या), अन्ध, बधिर, मूक, पीवन् (लठ्ठ मनुष्य), सिद्मला किंवा किलास (पण्डुरोगी), हर्यक्ष (पीतवर्ण डोळ्यांचा), पिंगाक्ष (पिंगट डोळ्यांचा), पीठसर्पिन् (लुला), श्राम (लंगडा), जागरण (निद्राहीन मनुष्य), स्वपन (निद्रारोग असलेला), अति दीर्घ (उंच सडपातळ मनुष्य), अति ऱ्हस्व (फार टेंगू) अति स्थूल किंवा अत्यलस, अतिकृश, अतिशुक्ल, अतिकृष्ण, अतिखल्व (अतिशय टक्कल पडलेला), अतिलोमश (फार केस असलेला), अशीं नांवें आलेलीं आहेत. मैत्रायणी संहितेंत, ज्याचीं नखें वाईट आहेत, किंवा ज्याचे दांत पिंगट आहेत, अशा माणसाचा दिधिषूःपतीसारख्या पापी लोकांच्या नावाबरोबर उल्लेख आलेला आहे. शतपथ ब्राह्मणांत शुक्ल (पांढऱ्या ठिपक्याचा) टक्कल पडलेला, पुढें दांत आलेला व तांबूस पिंगट नेत्रांचा मनुष्य असें एका माणसाचें वर्णन आलेलें आहे. झिमरची अशी एक कल्पना आहे कीं वाजसनेयि संहितेमध्यें आलेल्या किर्मिर ह्या शब्दावरून दोन जातींच्या लोकांच्या मिश्रणाचा बोध होतो. ही मोठी मजेदार पण निवळ कल्पनाच असून किर्मिर शब्दाचा कृ धातूशीं आलेला संबंध हा त्या कल्पनेस आधार आहे. वाजसनेयि संहिता व तैत्तिरीय ब्राह्मण ह्यामध्यें बायकांना अनेक विशेषणें दिलेलीं आहेत; त्यांतील कांहीं रोगदर्शक आहेत. अथर्वसंहितेमध्यें स्त्रीलिंगी विशेषणें कृष्यपदी (काळविटासारखे पाय असलेली) वृषदती, वगैरेसारखीं जीं आढळतात तीं शारीरिक व्यंगदर्शकच असावीत. शारीर व्यंगासंबंधीं सर्व वैद्यक नावें वैदिक ग्रंथांत आहेत.

[8]श्लो ण्य—तैत्तिरीय ब्राह्मण ग्रंथांत ह्याचा अर्थ त्वग्रोग असा असून (टीकाकाराच्या मतानें) लंगडेपणा असा आहे.

[9]श्व य थ.—शतपथ ब्राह्मणांत ह्याचा अर्थ फुगणें असा आहे. कदाचित् हा, बौधायन श्रौतसूत्रांत म्हटल्याप्रमाणें विदेहामध्यें असलेला श्वयथु नावाचा रोग असावा. या रोगांत सूज वगैरे येत असेल. कारण श्वयथु हा शब्द वैद्यकांत असून त्याचा सूज असा अर्थ आहे.

[10]श्वित्र—पंचविंश ब्राह्मणांत (१५,११,११) जलोदरानें पीडित अशा अर्थी विशेषणाप्रमाणें ह्या शब्दाचा उपयोग केलेला आहे. वैद्यक शास्त्राप्रमाणें ह्या शब्दाचा अर्थ श्वेत कुष्ठ (पांढरें कोड) असा आहे.

## औषधिनामें [अथर्ववेद]

| | | |
|---|---|---|
| अंशुमती | केशवर्धनी | लोमशवक्षणा |
| अघशंसदुःशंस | [1]क्षिप्तभेषजी | वरूथ |
| अतिविद्धभेषजी | [2]चीपुद्रु | [3]विलिष्ट-भेषज |
| अनाबयु (सर्पकाण्ड) | [4]जलाषभेषज | विवरुणा |
| अभ्यंजन | तीक्ष्णशृंगी | विश्वभेषज |
| अमीवचातनी | दुर्नामचातन | विषदूषण |
| असिक्नि | नद्यमार (क्षयावरील औषध) | विषदूषणी |
| अह्राव | नद्यारिष | शतभिषज् |
| आवयु | नद्याय (कुष्ठ) | शतवार |
| आयुर्दद | नानावीर्या | शायु |
| आस्रावभेषज (रक्तस्रावनिवर्तक) | [5]नितत्नि | संवनना |
| इषुमती | निष्कृति | सत्यजित |
| उत्तिर | पिंग | सरूपंकरणा |
| औक्ष [लिपद्रव्य] | पिप्पली | सस्तुव |
| कंकपर्व | पुरुषजीवनी | सहस्रनाम्नी |
| काण्डिनी | पूतुद्रु | सहस्रपर्णी |
| कनक्नक [विषनाम] | प्राञ्जन (लेप) | सहमाघ |
| करभ (विष किंवा काढा) | [6]बज | सिलाची (मोडलेले हाड नीट बसविणारी) |
| काण्दाविष | बलासनाशनी | सिसासु |
| किलासनाशन | बृहस्पतिप्रसूता भेषज | सुभेषज् |
| किलासभेषज | मदावती (मादक वेल) | स्तबिनी |
| कुष्ठ | मूल | स्परणी [लाख] |
| | रयमीत | हरितभेषज् |
| | रोगनाशन | हृद्योतभेषज |

[संहितेतर]

| | |
|---|---|
| ओषधि | [7]भैषज्य |

[1]आवयु.—अथर्ववेदांत हें एका झाडाचें नाव आहे. कदाचित् हें मोहरीचेंहि झाड असेल परंतु हा अर्थ खात्रीलायक नाहीं.

[2]कुष्ठ.—अथर्ववेदांतील एका प्रमुख रोपाचें (वनस्पतीचें) हे नाव आहे. पर्वतावर, सोमवल्लीबरोबर, जेथें गरुड पक्षी आपलीं घरटीं करून राहतात अशा हिमालयाच्या उंच शिखरावर ह्या वनस्पतीची वाढ होत असे आणि तेथून ती पूर्वेकडे मनुष्यांच्या उपयोगाकरितां आणली जात असे. असें म्हणतात कीं, ही वनस्पती प्रथम द्युलोकांत प्रसिद्ध अश्वत्थ वृक्षाच्या खालीं, जेथें देव जमत असत तेथें उगवली आणि तेथून ती सुवर्णनौकेंतून आणली. ह्या वनस्पतीच्या नद्य-मार आणि नद्या-रिष ह्या शुभ नावावरून ही वनस्प-

| | | |
|---|---|---|
| राध | वाजरत्न | सुवीर्य |
| वशाम | विश्वान्न | सुशृन |
| वाज | सुराधस् | हितप्रयस् |

खाणें (क्रियापदें) [ऋग्वेद]

| | | |
|---|---|---|
| अदत् | प्रसितां | भवीत |
| अवशामहे | रध | वेति |
| अविष्यन | मल्मुलः | वेविष्टि |
| अश्नन् | जुषेथां | श्वघ्नन् |
| आदं | बप्सति | संपिबते |
| आवयति | बब्धां | सिस्वदत् |
| ओषिषे | बभस्ति | स्वादते |
| खादति | भक्षत् | वह्राते |

[तै. सं.]

| | | |
|---|---|---|
| अत्त | खायन्ते | पिपृताम् |
| अत्ति | पश्यन्ति | पिप्रयत |
| अदः | पच्यस्व | पिब |
| अद्धि | पपौ | भुनजाम्वै |
| अधते | पान्ति | वे. |
| अनशम् | पापयिष्ट | व्यात्तम् |
| अशीयत | पाहि | व्यात्सीः |
| अश्नाति | पिन्व | व्यानशुः |
| अश्नां | पिपते | समवःयन्त |
| आनशुः | पिपर्तु | स्वात्त |
| खादति | पिपासेत् | |

[अथर्ववेद]

| | | |
|---|---|---|
| अतीतृप. | अपाययत् | पपौ |
| अतृष्याः | अश्नीयात् | प्राशी |
| अदन्ति | अश्नुवे | भक्षत |
| अद्धि | आनशु | सम् आनशे |
| अनश्नवः | आशात | समपिब |
| आतुऽश्रानशे | ग्रसते | |

खाद्यपेय विशेष [ऋग्वेद]

| | | |
|---|---|---|
| अन्तःपेय (दारूचें घर) | करंभ (दधिमिश्र सक्तुपिंड) | घृतान्न |
| अपूप | क्रविष् (कच्चें मांस) | [7] चरु |
| आशिर (दही, दूध) | क्रव्य | जामर्य (दुग्ध) |
| आमिष (मांस) | क्षीरपाक (ओदन) | [8] त्र्याशिर |
| [4] उर्वारुक (कांकडी) | गवाशिर | दध्याशिर |
| उक्षिमेषज (गोमिश्रान्न) | गोऋजीक | [9] दधि |
| [5] ओदन | घासि (तृणादिक) | दुग्ध |
| | [6] घृत | द्रवन्न |
| | | [10] धाना |
| | | निर्लुंपुण |
| | | निर्णिज (क्षीर) |
| [11] पक्ति | [19] फल | [24] रसाशिर |
| [12] पक्व | मदिर (मदकर अन्न) | ररिन् |
| [13] पचत | मदिरा | वृषभान्न |
| [14] पयस् | [20] मधु | शृतपाक (पक्व) |
| परिश | [21] मन्थ | समाशिर |
| परिपान | [22] मांस | सक्तु |
| [15] पान्त | मेदस् | [25] सर्पिस् |
| [16] पितु | मेध (यज्ञार्ह) | सुतपेय |
| [17] पीयूष | यव | [26] सुरा |
| पुरोडाश | [23] यवाशिर | सूद (सोमात घालण्याचें) |
| पृषदाज्य | यूषन् | सौश्रवस् |
| [18] प्रतिधा | | |

[तै. सं.]

| | | |
|---|---|---|
| अपूप | घास (चंदी) | फल |
| अवस (पाथेय) | घृत | भोजन |
| आरण्य (मधु) | दधि | मस्तु |
| उर्वारुक | नवनीत | शृतपाक (मांस) |
| करंभ | निष्पक्व | शृतातङ्क्य (दधि) |
| क्रविष | पक्व | स्वादी (सुरा) |
| खर्जूर | पूर्वपेय | |

[अथर्ववेद]

| | | |
|---|---|---|
| आकृष्टपच् | [28] कीलाल | दधिवान् |
| अग्निमत् (ओदन) | क्रवि | दध्याशिर |
| अतिध्न्य (ओदन) | क्रोड (खाद्य) | दुग्ध |
| अनुप्रास | क्षीर | द्रप्सवत् |
| अनुपसेचन (मसाल्याशिवाय असलेला चरु) | क्षीरवान् | धाना |
| अपूपनाभि | खाद | धाय्यु |
| अपूपवान् | [29] गर | धीति (पान) |
| अवपान | गवाशिर | पंचापूप |
| आज्य | घास | [30] पंचौदन |
| आम | घृत | पयस् |
| आमिक्षा | घृतवत् | पयस्फाति |
| आशिर | चरु | परिवेश |
| उदारथि (मन्थ) | चित्रराधस् | [34] परिस्रुत |
| उर्वारुक | जीवन | पाक |
| उर्वारु (कांकडी) | तलीघ (अस्थिगत मांस) | पाथ |
| ओदन | तिर्यं | पान |
| [27] वनक्रक (विष) | तिल | [35] पिशित |
| काण्डविष | तिलमिश्र | पवि-पाक |
| | तिलवत्स | पीयूष |
| | [31] तैल | पूर्वपेय |
| | [32] तील | पूल्य |
| | दधि | पेट्र (पिष्टमय खाद्य) |

तीमध्यें अतिशय उपयोगी वनस्पति होती असें वाटतें. आणि तिला जीवल आणि जीवला ( चैतन्य पदार्थ ) याचा मुलगा असें म्हटलें आहे. ही वनस्पति डोकें दुखणें ( शीर्षामय ), नेत्ररोग, शारीरिक दुःख, व मुख्यत्वेंकरून ताप ( म्हणून तक्म-नाशन म्हणतात ) आणि यक्ष्म ( क्षयरोग ) ह्या रोगावर उपाय आहे. ह्या वनस्पतीच्या सामान्य गुणधर्मांवरून हिला विश्व-भेषज् असें नाव दिलें आहे. अंजन आणि जटामासी ( नलद ) या वर्गांत हिला घालतात यावरून हिचे सौगंधिक गुण माहीत असावेत असें दिसतें

[3] क्षि प्त.—' जखम ' ( गोळीनें झालेली ), अथवा ' दुखापत ' ( पडल्यानें झालेली ). अथर्ववेदात याच्यावर उपाय म्हणून पिप्पली हेंहि लिहिलें आहे. क्षिप्त याचा अर्थ आचके असा असावा. कारण क्षिप् धातूचा अर्थ पसरणें असा असून वैद्यकात विक्षेप वगैरेचा अर्थ आचके असा करितात. पिप्पली हें औषध यावर सांगितलें आहे यावरून या विधानास पुष्टि येते कारण याच विकारावर पिंपळी वेदात व वैद्यकात पुष्कळ ठिकाणीं सांगितली आहे जखमेवर पिप्पलीचा उपयोग कोठेंहि नाहीं.

[4] ची पु द्रु.— ह्या नावावरून अथर्ववेदामध्यें उल्लेखिलेल्या व दुःख बरें करणाऱ्या औषधीवस्तूचा बोध होतो. सायणाचार्यांच्या मतें चीपुद्रु हा शब्द असून तो एका झाडाचा बोधक आहे. सायणाचार्यांच्या ह्या अर्थाला दुसरा एक असा पुरावा आहे कीं, कौशिक सूत्रात ह्या सूक्ताचा धार्मिक कृत्याचे वेळीं उपयोग करताना पलाश लाकडाचे तुकडे वापरल्याचा उल्लेख आहे. व्हिटनेच्या मतें ह्या शब्दाचें रूप चिपुद्रु असें असावें.

[5] ज ला ष भे ष ज.— ज्याला जलाष हेंच औषध किंवा उपाय आहे असा. ऋग्वेद व अथर्ववेद यामध्यें रुद्राला हें नाव दिलेलें आहे. जलाष हा शब्द अथर्ववेदामध्यें एका स्तोत्रांत आलेला आहे व त्या जलाषाचा उपयोग गंड बरें करण्यास होतो असें म्हटलेलें आहे. ह्या अथर्ववेदातल्या लेखावरचा टीकाकार व त्याचप्रमाणें कौशिक सूत्र ह्याच्या मतें जलाष याचा अर्थ मूत्र असा असून तोच अर्थ बरा दिसतो. पण गेल्डनेरच्या मतें मूत्ररूपानें पावसाचें पाणी हा अर्थ गर्भित असावा. निघंटूच्या मतें जलाष व उदक हे समानार्थी शब्द होत. जलाष हा शब्द वैद्यकांत नाहीं व विषारावर प्रामुख्यानें पाणी या औषधाचा उपयोगहि केलेला नाहीं.

[6] नि त त्नि.—हा शब्द अथर्ववेदामध्यें आलेला असून एकदा उपटून पडले असता पुन्हा केस वाढविणाऱ्या एका वनस्पतीचें हें नाव आहे. ही वनस्पति कोणती आहे हें ठाऊक नाहीं.

[7] ब ज.—रोगाच्या राक्षसावर उपयोगात आणावयाच्या एका वर्गाचें अथर्ववेदांतील हें एक नाव आहे. याचा अर्थ कदाचित मोहरीच्या झाडाचा एखादा प्रकार असा असावा.

[8] भे ष ज.—हा अनेकवचनी उपयोगात आणलेला शब्द अथर्ववेदात आणि सूत्रात आला आहे. व त्याचा अर्थ अथर्ववेदातील ऋचात ( केवळ सांगितलें आहे तेवढें ) बरें करण्याचें सामर्थ्य असा आहे. वैद्यकातहि भेषज शब्दाचा अर्थ अथर्ववेदाप्रमाणेंच आहे

[9] वि लि ष्ट भे ष ज.—अथर्ववेदामध्यें ( पैप्पलाद ) सांधा उखळला असल्यास किंवा कोठें मुरगळलें असल्यास हा इलाज सांगितलेला आहे. ह्याचाहि निश्चित अर्थ समजत नाहीं.

[10] भे ष ज्य.—भेषजाप्रमाणें याचा शतपथब्राह्मण आणि निरुक्त यांत ' औषध ' किंवा ' बरा करणारा इलाज ' असा अर्थ होतो

## अन्न

### अन्ननामें [ ऋग्वेद ]

| | | |
|---|---|---|
| अन्धस् | क्षु | राधस |
| अन्न | चन | वयस |
| अदन्न | त्रिवयस | वर्चस |
| अभिवयस् | धासि | वाज |
| अर्क | नमस् | वाजप्रमहस् |
| अवस | नेम | वाजिन |
| अशृथित | नेमन् | शवस |
| अश्वराधस् | पयस् | शुरुध |
| असक्र (न संप- | पितु | श्रवस |
| णारें) | पुरुक्षु | श्रवस्य |
| आयुस | पुरुवाजस् | सस |
| इरा | पृक्ष | सिन |
| इष | पृक्षुध | सुत |
| इळा | प्रयस | सुपृक्ष |
| ऊर्ज | प्रश्रवस् | सूनृता |
| ओमान | प्रक्षन | स्वधा |
| कीलाल | मर्तभोजन | हविष्य |
| कृति | मनस् | हितप्रयस् |
| क्षद्मन | रस | |

### [ तै. सं. ]

| | | |
|---|---|---|
| अन्धस | लोकातून | मघ |
| अन्न | दिलेलें दान) | राधस् |
| अश्विय | पुरुक्षु | वयस् |
| इत प्रदान (इह- | प्रमव | वाजस |

### [ अथर्ववेद ]

| | | |
|---|---|---|
| अन्ध | आसुति (द्रवीभूत | युक्त) |
| अन्न | अन्न) | दग्धान्न |
| अन्नभाग | इष | पृक्ष |
| अम | गोपुरोगव (गो- | प्रयस् |

| | | |
|---|---|---|
| राध | वाजरत्न | सुवीर्य |
| वशान्न | विश्वान्न | सुशून |
| वाज | सुराधस् | हितप्रयस् |

## खाणें (क्रियापदें) [ऋग्वेद]

| | | |
|---|---|---|
| अदत् | प्रसितां | भर्वीत |
| अवशामहै | ग्य | वेति |
| अविष्यन | मल्गुलः | वेवेष्टि |
| अभन् | जुषेयां | श्रमन् |
| आर्द | घस्ति | संपिबते |
| आवयति | घस्तां | मिस्वदत् |
| ओचिषे | यमस्ति | स्वादते |
| खादति | भक्षत् | वहराते |

## [तै. सं.]

| | | |
|---|---|---|
| अत्त | खायन्ते | पिपृताम् |
| अस्ति | पश्यन्ति | पिप्रयस् |
| अदः | पच्यस्व | पिब |
| अद्धि | पपी | भुनजार्थ |
| अघते | पान्ति | वे. |
| अनशम् | पापयिष्ट | व्यात्तम् |
| अशीयत | पाहि | व्यासीः |
| अश्नाति | पिन्व | व्यानशुः |
| अश्यां | पिपते | समव.धन्त |
| आनशुः | पिपर्तु | स्वात्तं |
| खादति | पिपासेत् | |

## [अथर्ववेद]

| | | |
|---|---|---|
| अतीतृप. | अपाययत् | पपौ |
| अतृप्याः | अश्नीयात् | प्राशि |
| अदन्ति | अश्नुवे | भक्षत |
| अश्नि | आनशु | सम् आनशे |
| अनश्नवः | आशात | सम्पिब |
| आनुऽआनशे | प्रसते | |

## खाद्यपेय विशेष [ऋग्वेद]

| | | |
|---|---|---|
| अन्तःपेय (दारूचें घर) | करंभ (दधिमिश्र-सक्तुपिंड) | घृतान्न |
| अपूप | कविप् (कर्षे मांस) | [७] चरु |
| आशिर (दहीं, दूध) | क्रव्य | जामर्य (दुग्ध) |
| आमिष (मांस) | क्षीरपाक (ओदन) | [८] दध्याशिर |
| [४] उर्वारुक (कांकडी) | गवाशिर | दध्याशिर |
| उस्रिभेषज (गोमिश्रान्न) | गोऋजीक | [९] दधि |
| [५] ओदन | घासि (तृणादिक) | दुग्ध |
| | [६] घृत | द्रवत |
| | | [१०] धाना |
| | | निर्पुण |
| | | निर्णिज् (क्षीर) |
| [११] पक्ति | [१९] फल | [२४] रसाशिर |
| [१२] पक्व | मदिर (मदकर अन्न) | रसिन् |
| [१३] पचत | मदिरा | वृषभान्न |
| [१४] पयस् | [२०] मधु | शृतपाक (पक्व) |
| परिश | [२१] मन्थ | समाशिर |
| परिपान | [३] मांस | सक्तु |
| [१५] पान्त | मेदस् | [२५] सर्पिस् |
| [१६] पितु | मेध (यज्ञार्ह) | सुतपेय |
| [१७] पीयूष | यव | [२६] सुरा |
| पुरोडाश | [२२] यवाशिर | सूद (सोमांत घालण्याचें) |
| पृषदाज्य | यूषन् | सौश्रवस् |
| [१८] प्रतिधा | | |

## [तै. सं.]

| | | |
|---|---|---|
| अपूप | धास (चंदी) | फल |
| अवस (पाथेय) | घृत | भोजन |
| आरण्य (मधु) | दधि | मस्तु |
| उर्वारुक | नवनीत | शृतपाक (मांस) |
| करंभ | निष्पक्व | शृतातन्य (दधि) |
| क्रविष | पक्व | स्वादी (सुरा) |
| खर्जूर | पूर्वपेय | |

## [अथर्ववेद]

| | | |
|---|---|---|
| आकूटपच् | [२८] कीलाल | दधिवान् |
| अग्निमत् (ओदन) | क्रवि | दध्याशिर |
| अतिघ्न्य (ओदन) | क्रोड (खाद्य) | दुग्ध |
| अनुप्रास | क्षीर | द्रप्सवत् |
| अनुपसेचन (मसाल्याशिवाय असलेला चरु) | क्षीरवान् | धाना |
| अपूपनाभि | खाद | धास्यु |
| अपूपवान् | [२९] गर | धीति (पान) |
| अवपान | गवाशिर | पंचापूप |
| आज्य | घास | [३३] पंचौदन |
| आम | घृत | पयस् |
| आमिक्षा | घृतवत् | पयस्फाति |
| आशिर | चरु | परिवेश |
| उदारथि (मन्थ) | चित्रराधस् | [३४] परिसृत |
| उर्वारुक | जीवन | पाक |
| उर्वारु (काकडी) | तलीप (अस्थिगत मांस) | पाय |
| ओदन | तिर्य | पान |
| [२७] कनकक (विष) | तिल | [३५] पिशित |
| काण्डविष | तिलमिश्र | पविःपाक |
| | तिलवत्स | पीयूष |
| | [३१] तैल | पूर्वपेय |
| | [३२] तौल | पूल्य |
| | दधि | पेट्र (पिष्टमय खाद्य) |

| | | |
|---|---|---|
| [7]प्रतिदुह् | मांस | [40]व्रत |
| प्राणदवान् | माध्वी | शतौदन |
| फल | माषाज्य | [41]शालूक |
| ब्रह्मौदन | यवाशिर | सक्तु |
| मद्य | रस | सर्पिष् |
| मधु | रसवान् | सारघ (मधु) |
| मधुधारा | [38]लवण | सुधा |
| मधु | लोकजित् | सुरा |
| मधुपृच् | विघस | सुरोदक |
| मधुभाग | त्रिपक्व | सोमपेय |
| मधू | [39]विष्टारिन् | |

[वा. सं.]

| | | |
|---|---|---|
| [42]उपवाक | बोर) | [44]मासर |
| कर्कन्धु (बोर) | [43]बदर | [45]लाजि |
| कुवल (कोवळें | | |

[मैत्रायणी सं.]

[46]लाज

[संहितेतर]

| | | |
|---|---|---|
| [47]कृसर | [51]पिष्ट | [54]मद्य |
| [48]क्षीरौदन | [52] | |
| [49]तिरश्चीनवंश | फाण्ट | [55]मांसौदन |
| [50]पान | [53]बल्कस | [56]बृक्य |

खाद्यपेय किरकोळ [ ऋग्वेद ]

| | | |
|---|---|---|
| अ न (अद्य- | घृतवत् | पीति |
| मान) | चनिष्ट | पीवोन्न |
| अ गस् | चर्षप्र | पूर्वपाय्य |
| अ श्म (आरोग्य- | जग्ध (भक्षित) | भोज |
| कारक खाद्य) | जमसान | मधुमत् |
| अ ाद (निय- | जुजुपाण | मधुला |
| खाद्य) | जुषमाण | मधुश्चुत् |
| अ ात (अपक्व) | जुषाण | मेमन |
| अ ार्म (अभा- | जुष्ट | यवास्तर |
| धारण) | जुष्टतम | वामजात |
| अ दन | जोष्या | विपिपान |
| अन्न | तदम् | विपश्च |
| आशित | दक्षसाधन | वीती |
| उभाभ | द्विजन्मन् | वृषखादि |
| ऊर्जस्वा | धनमद्य | वृषपान |
| का ालप | पचत्य | शतपा |
| गू (गिळलेलें | पपिवान् | शतपाक |
| खाद्य) | पायन | श्रात |
| घास | पिन्व | सग्म्य |

| | | |
|---|---|---|
| सपीति | सुराधस् | स्वादुक्षद्मन् |
| सयावन् | स्वादिष्ट | |
| सर्पिरासुती | स्वादीय | स्वाद्मन् |
| सुजुष्ट | स्वादु | स्वाद्मा |

[1]अपूप.—हा शब्द ऋग्वेदात आणि तदुत्तर ग्रंथात *पोळीला-मग ती तूप मिश्रित असो, तांदुळाची असो किंवा यवाची असो—सर्व साधारणपणें उपयोगास आणिला आहे.* छांदोग्य उपनिषदात अर्थामध्यें थोडासा फरक केला आहे. मॅक्स मुल्लर 'मधमाशाचें पोळें' बोथलिंग "मधशित्या" आणि व्हिटनि 'पोळी' असा अर्थ करितात.

[2]उर्वारुक.—उर्वारु (स्त्रीलिंगी), उर्वारुक (नपुंसकलिंगी), 'काकडी.' ह्या दोन शब्दांपैकीं पहिला शब्द वेलाचा दर्शक आणि दुसरा फळवाचक परंतु दोनहि शब्द क्वचितच उपयोगात असतात. बहुतेक सर्व उताऱ्यावरून असें अनुमान निघतें कीं, जेव्हा फळ पक्व होतें त्यावेळेस वेलाचा देंठ जरा ठिसूळ होतो. पंचविंश ब्राह्मणात फळालाच उर्वारु असें म्हटलें आहे.

[3]ओदन.—सामान्य अन्न या अर्थी हा शब्द वापरलेला आढळतो. हा शब्द बहुतकरून दुधामध्यें शिजविलेल्या धान्यास लावतात (क्षीरपक्वम् ओदनम्) याच्या निरनिराळ्या *प्रकाराचा उल्लेख आहे,* उ० क्षीरौदन, दध्यौदन, मुद्गौदन, तिलौदन, उदौदन, मांसौदन घृतौदन इत्यादि.

[4]क्रव्य.—कच्चें *मांस* मनुष्य खात, असें वैदिक वाङ्मयात कोठेंच नाहीं. राक्षस फक्त त्याचें भक्षण करीत, *आणि अग्नीला क्रव्याद 'कच्चें मांस खाणारा' असें* म्हणत, कारण तो शवाचा फडशा पाडी. ऋग्वेदात ज्या मनुष्याला दुष्काळामुळें कुत्र्याचें मांस खावें लागल्याचा, उल्लेख आहे त्यानें देखील तें शिजविलें होतें.

[5]क्षीर.—याचा ऋग्वेदात उल्लेख असून त्याला गो (दूध) अथवा पयस् देखील म्हणतात हा वैदिक आर्यलोकाचा अतिशय उपयोगाचा गृहव्यवस्थेंतील पदार्थ होय. ते धारोष्ण दूध (पक्व) सेवन करीत असत अथवा ओदन 'दुधात *शिजविलेला* पदार्थ' [क्षीरपाकम् ओदनम्] तयार करीत. त्याचें सोमानहि *मिश्रण* करीत (अभिश्री, आशिर), त्याच्या पासून *तूप [घृत] तयार करीत.* दूध विरजण्याकरितां दुसऱ्या कित्येक वनस्पतीबरोबर पूतीका *आणि* इतर वनस्पतीहि उपयोगांत आणीत. दह्याचा उपयोग अन्नासारखा करीत असत. आणि ऋग्वेदात एका ठिकाणीं चक्याचाहि उल्लेख आला आहे. अजक्षीर त्याचाहि उल्लेख आला आहे.

[6]घृत.—हा नेहमींच्या आणि यज्ञाच्या वेळीं उपयोगी असलेलें अर्वाचीन तूप याचा वाचक शब्द ऋग्वेदात आणि तदुत्तर आलेला आहे ऐतरेय ब्राह्मणावरील सायण भाष्यांत घृत म्हणजे घट्टतूप [घनी-भूत] आणि सर्पिस् म्हणजे पातळ तूप असा फरक दाखविला आहे. अग्नींत तूप टाकीत, त्यामुळें अग्नीला घृतप्रतीक, घृतपृष्ठ, घृतप्रसत्त आणि घृतश्री असें

म्हणत घृताला शुद्ध करण्याकरिता पाण्याचा उपयोग करीत म्हणून पाण्याला घृतपू असें म्हणत. ऐतरेय ब्राह्मणात आज्य, घृत, आयुत आणि नवनीत हें क्रमशः देव मनुष्य पितर आणि गर्भ ह्याना देत.

[७] चरु—ऋग्वेद व उत्तरकालीन ग्रंथात या शब्दाचा प्रथम 'कटई' अथवा 'भांडें' असा अर्थ आहे त्याला झाकण [ अपिधान ] असून विस्तवावर टांगून ठेवण्याकरिता त्याला आंकडे ( अंक ) असत. तें भांडें लोखंडाचें किंवा कास्य धातूचें (अयस्मय) केलेलें असे. लाक्षणिक अर्थानें कधीं कधीं त्या भांड्यात जें अन्न शिजवीत असत तें अन्न दर्शविण्याकरिताहि हा शब्द योजीत

[८] त्र्याशिर—तीन मिश्रणानीं युक्त असा ह्याचा अर्थ असून हें सोमाचें विशेषण ऋग्वेदामध्यें आलेलें आहे सायणाचार्यांच्या मतें हीं तीन मिश्रणें म्हणजे दहीं, सातु व दूध हीं होत. अधिक विनचूक रीतीनें सांगावयाचें तर हें त्र्याशिर म्हणजे दूध [गवाशिर] सातु (यवाशिर) व दहीं (दध्याशिर) हे तीन पदार्थ सोम रसात मिसळण्याची चाल होती.

[९] दधि—'नासकें दूध' अशा अर्थानें हा शब्द वारंवार ऋग्वेदामध्यें व पुढील ग्रंथात आलेला आहे शतपथ ब्राह्मणात घृत, दधि, मस्तु (दह्याचें पाणी) व आमीक्षा (दही) असे शब्द क्रमानें आलेले आहेत दधि ह्याचा अर्थ अनेकदा दही असाहि आहे, व तें सोमरसात मिसळीत असत.

[१०] धाना.—हा शब्द नेहमीं अनेक वचनीं आलेला आहे व ऋग्वेदात व उत्तरकालीन ग्रंथात धान्याचे दाणे अशा अर्थानें ह्या शब्दाचा अनेकदा उपयोग आलेला आहे हे दाणे कधीं कधीं भाजून (भ्रज) सोमरसात मिसळीत.

[११] पक्ति.—संहितामध्यें याचा अर्थ शिजविलेला पदार्थ (एका प्रकारची पोळी) असा आहे जो अन्न शिजवतो त्याला पक्तृ असें म्हटलेलें आहे

[१२] पक्व—शिजविलेलें दूध किंवा अन्न अशा अर्थी सामान्यनाम म्हणून हा शब्द आलेला आहे भाजलेल्या विटा असाहि ह्याचा अर्थ होतो

[१३] पचन—पक्ति प्रमाणें ह्याहि शब्दाचा अर्थ ऋग्वेद व मागाहून झालेले ग्रंथ ह्यामध्यें शिजविलेलें अन्न असा आहे.

[१४] पयस्—या शब्दाचा अर्थ ऋग्वेद व मागाहून झालेले ग्रंथ ह्यामध्यें गायीचें दूध असा आहे अधिक व्यापक अर्थ म्हणजे वनस्पतींत सांपडणारा रस (ज्याचे योगानें झाडें झुडें वाढतात तो) असा आहे एका ठिकाणीं स्वर्गांतलें पाणी असा ह्याचा अर्थ आहे. शतपथ ब्राह्मणात काहीं वेळ दुधावर राहण्याच्या व्रताचा उल्लेख आलेला आहे

[१५] पान्त.—ऋग्वेदामध्यें अनेक वेळा हा शब्द आलेला असून त्याचा उघड अर्थ पिण्याचा पदार्थ असा आहे. पण गेल्डनेर म्हणतो कीं एके ठिकाणीं पान्त हें एका राजाचें नावच आहे.

[१६] पितु—ऋग्वेद व मागाहून झालेले ग्रंथ ह्यामध्यें ह्या शब्दाचा अर्थ पुष्टिकारक अन्न किंवा पेय असा आहे

[१७] पीयूष—ऋग्वेद व उत्तरकालीन ग्रंथ ह्यांमध्यें गाय प्रसवल्यावर तिचें जें पहिलें दूध निघतें त्याला हा शब्द लाविलेला आहे. सामान्यपणें सोमरसालाहि हा शब्द लावितात.

[१८] प्रतिधा—याचा अर्थ अवर्षण किंवा आकर्षण (घोट) असा दिसतो ऋग्वेदाच्या एका वचनात इंद्र एका प्रतिधेसरशीं तीस सरोवराचें पाणी प्याला असें आलें आहे

[१९] फल—याचा सामान्यतः अर्थ फळ, विशेषतः हा शब्द फळ असा असून ऋग्वेद आणि तदनतरच्या वाङ्मयात याचा उल्लेख येतो

[२०] मधु—याचा अर्थ कोणतीहि खाण्याची गोड वस्तु व ऋग्वेदात बहुधा एक प्रकारचें पेय (मध व पाणी यापासून केलेली जालीम दारू) असा होतो मध व पाणी मिश्रित दारू असाहि होतो काहीं ठिकाणीं 'सोम' किंवा 'दूध' अथवा 'मध' हा या शब्दाचा निश्चित अर्थ आहे. परतु 'मध' ह्याच अर्थी हा शब्द वेदानतरच्या वाङ्मयात विशेष येतो. परतु या मधाच्या उपयोगाविरुद्ध निषेध प्रदर्शित केलेला दिसतो.

[२१] मन्थ—याचा अर्थ ऋग्वेद व तदनंतरच्या ग्रंथात एक प्रकारचें पेय असा आहे. हें एक द्रव पदार्थ व इतर काहीं घट्ट पदार्थ याच्या संमिश्रणानें करितात. बहुधा हें सक्तु व दूध याचेंहि असतें. ह्या प्रकारचीं सर्व संमिश्रित पेयें शाखायन आरण्यकात आलीं आहेत

[२२] मांस—वेदात मांस खाणें अगदीं सामान्य असावें असें दिसतें त्यात कोठेंहि 'अहिंसेचा' उल्लेख येत नाहीं. धार्मिक विधिप्रसगीं मांसाच्या आहुती देव खावोत असें म्हणतात शिवाय ब्राह्मण तो पदार्थ स्वतः खात असत. आणि पाहुण्याच्या पाहुणचाराप्रीत्यर्थ एक 'मोटा बैल' ( महोक्ष ) किंवा बोकड ( महाज ) मारावा असें स्पष्ट म्हटलेलें आहे शिवाय अतिथिग्व याचा अर्थ अतिथिसत्कारार्थ गोहनन करणें हाच असावा। महर्षि याज्ञवल्क्य हा दुभत्या गायीचें किंवा बैलाचें ( धेन्वनडुह ) असल मांस खात असे. यज्ञात अगस्त्यानीं १०० बैल मारले म्हणून त्याच्या नावाचा गौरव केला आहे लग्नप्रसगीं खाण्याप्रीत्यर्थ म्हणून बैलांना मारीत असत. उलटपक्षीं ऋग्वेदात गाईला हळू हळू पावित्र्य येत चाललें होतें असें घ्न्याच उताऱ्यावरून दिसून येतें कारण तिला अघ्न्या असें पुष्कळ ठिकाणीं म्हटलें आहे परतु एवढ्यावरून मांसभक्षण मना होतें असें समजता येत नाहीं पौराणिक गोष्टींचा विचार यापुढे सारला असता ( म्हणजे गो हीच पृथ्वी किंवा अदिति ही गायींसंबधीं—पृथ्वि किंवा अदिति अशी—कल्पना सर्वथैव ब्राह्मणानीं आपल्या बुद्धिबलानें निर्माण केली असें म्हणता येत नाहीं याला दुसरींहि काहीं कारणें असावींत ) आपणांस असें आढळून येईल कीं, खाण्याव्यतिरिक्त गाईचे

दुसरे पुष्कळ महत्त्वाचे उपयोग होते व त्यामुळें तिला पावित्र्य येणें अगदीं रास्त होतें. कर्मांच्याहि पावित्र्याचा उगम पाहूं गेलें असतां आपणाला तो शोधण्यासाठीं इंडो-इराणियन, आर्यन लोक ( म्हणजे हिंदुस्थानांतील आर्यन व इराणांतील आर्यन् हे जेव्हां एकेठिकाणीं रहात असत तेव्हां ) यांच्या कालाकडे धांव घेतली पाहिजे इतका तो जुना आहे. शिवाय प्रेतदहनप्रसंगीं तर गोमांस अवश्य लागत असे, कारण तेव्हां प्रेत मांसानें आच्छादण्याचा (अनुस्तरणी) प्रघात( परिपाठ )होता. वेदकालीन हिंदूंचें अन्न निदान यज्ञप्रसंगींच्या बळींच्या यादीवरून तरी काय असावें हें सहज ताडतां येतें. कारण जें मनुष्य खाई तें तो देवास अर्पण करी,-म्हणजे बोकड मेंढया बैल यांचें मांस खाण्यांत येत असे. अश्वमेध यज्ञ मात्र घोड्याचें मांस भक्षण करीत असत याचें द्योतक समजतां येत नाहीं. तरी पण कदाचित् ते अश्वभक्षकहि असतील, कारण निरनिराळ्या काळीं आणि निरनिराळ्या देशांत प्रचलित असलेल्या अश्वमांसभक्षणाच्या चालीकडे आपणास अगदींच कानाडोळा करून चालणार नाहीं. ओल्डेनबर्ग या ठिकाणीं असा युक्तिवाद लढवितो कीं, अश्वमेध करण्याच्या योगानें कांहीं मानसिक सामर्थ्य, त्याचप्रमाणें घोड्याची गति आणि स्फुरण देव आणि त्याचे याजक-भक्त यांना प्राप्त होत असावें. या मांसाशनास कोणत्याहि प्रकारचा सार्वत्रिक निषेध केला होता असें वाटत नाहीं. कधीं कधीं मांसाहाराचा निषेध आहे. उदाहरणार्थ, जेव्हां एखादा एखादें व्रत करीत असेल तर किंवा जेव्हां मांस त्याज्य मानलें असलें तर. कारण अथर्ववेदांत एका ठिकाणीं मांसाला सुरेच्या दावणींत बांधलें आहे व तेथें त्याला मादक दारूप्रमाणें वाईट मानलें आहे. ऋग्वेदांत गोहनन अघाच्या वेळीं होतें असें दिलें आहे ( हा अघा शब्द मघाचें शुध्द केलेलें रूपांतर आहे ) आणि ज्या वेळीं केवळ गायींचे बळी देत असत त्या प्रसंगींहि मृत्यु आणि अंधार यांच्या स्वाभाविक महत्त्वामुळेंच ही गोष्ट होत असावी. शिवाय ब्राह्मण जी या लोकीं दुसऱ्यास खातो, त्याला दुसऱ्या लोकांत खातात असें तत्त्व आलें आहे. पण येवढ्यावरूनच कांहीं मांस खाण्यास धार्मिक अथवा नैतिक अमान्यता आहे असें म्हणतां येणार नाहीं. आतां ही गोष्ट खरी कीं, वरील मतहि यांत दृग्गोचर होतें व ब्राह्मणग्रंथांत विशदपणें दिसणाऱ्या 'सर्व जग हें एक आहे "अखिलमिदम्ब्रह्म" या तत्त्वाशीं वरील मत बरेंच जुळतें आहे. परंतु अहिंसा तत्त्व उत्पन्न होण्यास पुनर्जन्माचें तत्त्व कारण झालें आणि पुनर्जन्माच्या तत्त्वाचा जन्म ब्राह्मणग्रंथांच्या मागाहून झालेला आहे.

[23] यवाशिर —हा शब्द ऋग्वेदांत सोमाचें विशेषण म्हणून वापरला आहे. याचा धान्यामिश्रित असाहि अर्थ आहे.

[24] रसाशिर —हा शब्द ऋग्वेदांत सोमाचें विशेषण, या अर्थी आहे. दुग्धमिश्रित अशा अर्थानेंहि येतो.

[25] सर्पिस् —याचा अर्थ वितळलेलें लोणी असा आहे. मग लोणी द्रवस्थितींत असो किंवा घन स्थितींत असो. सेंट पीटर्सबर्गकोशाच मतानें सर्पि व घृत यांत फारसा फरक नाहीं. ऐतरेयब्राह्मणावरील भाष्यांतील सायणाचा 'सर्पिस् हें द्रव स्थितींत असतें व घृत हें घन स्थितींत असतें' हा भेद रॉथला मान्य नाहीं. हा शब्द ऋग्वेद व मागाहून झालेल्या ग्रंथांत वारंवार आलेला आहे.

[26] सुरा.— उन्मादक अशा पेयाचें हें नांव आहे. हा शब्द ऋग्वेद व तदुत्तर वैदिक वाङ्मयांत नेहमीं येतो. कांहीं ठिकाणीं या पेयाचा निषेध केलेला आहे. अथर्ववेदामध्यें मांसभक्षण द्यूत या महापातकांबरोबर याची गणना केलेली आहे व द्यूताबरोबर वारंवार याचा उल्लेख आलेला आहे. सोम याच्या उलट सुरा ही नित्य पिण्यापैकीं एक पेय गणली गेली होती. सभेंतल्या लोकांच हें एक पेय होतें व त्यामुळें नेहमीं भांडणें होत. ही सुरा कशा प्रकारची होती हें सांगणें कठिण आहे. एग्लिंग म्हणतो त्याप्रमाणें ही सुरा धान्य किंवा वनस्पति कुजवून बनलेली असे किंवा व्हिटने म्हणतो त्याप्रमाणें एक प्रकारच्या सातूपासून तयार केलेली ही दारू किंवा 'एल' दारूसारखी ही दारू असावी. गेल्डनेरच्या मतानें ही ब्रँडीसारखी असावी. ह्या सुरेचा उल्लेख मधुबरोबर कधीं कधीं येतो. ही चामड्यांत ठेवीत असत व ही निरनिराळे लोक पीत ( विभाग २ पृष्ठ १२१ पहा ).

[27] कनक्नक —हा शब्द अथर्ववेदांत आहे. ह्याचा अर्थ एक तर विष असा असावा, किंवा अथर्वांतीलच काण्डविष नांवाच्या एका विषाच्या जातीचें तें विष असावें. पिवळ्या धोतऱ्याला कनक असें नांव आहे व तो विषारीहि आहे. कनक्नक म्हणजे पिवळ्या धोतऱ्याचें विष असण्याचा संभव आहे.

[28] कीलाल —'मधुर पेय.' हा शब्द अथर्व व इतर संहितांत आहे, पण ऋग्वेदांत मात्र नाहीं. ज्या अर्थी सुराकार ( सुरा करणारा )हा पुरुषमेधांतील बळींच्या यादींत कीलाल ह्याला अर्पण केला आहे त्या अर्थी सुरेच्या सारखेंच तें कांहीं तरी पेय असलें पाहिजे. बहुतकरून झिमरच्या म्हणण्याप्रमाणें ही एक प्रकारची दारू असावी.

[29] गर —म्हणजे विष. अथर्ववेदांत 'गरगीर्ण' ( विष दिलेला ) या समासांत गर हा शब्द आहे. शतपथब्राह्मणामध्यें त्याचा अर्थ पातळ पदार्थ असा आहे. गर म्हणजे कोणतेंहि जालिम विष मद्य करून तयार करितात तें किंवा कृत्रिम विष होय.

[30] तिर्य, तिरिय —अथर्ववेदामध्यें करभाचें ( पेज ) नांव म्हणून हा शब्द आलेला आहे. हा शब्द बहुतेक तिल्य ( तिळापासून झालेलें ) याचा समानार्थवाचक असावा असें रॉथ व व्हिटने यांचें मत आहे. पण तिरिय याचा

अर्थ रॉथच्या मतें एक प्रकारचा तांदूळ असा आहे. हा तिरिय शब्द रामनिर्देशमध्यें आलेला आहे.

[31] तैल—(तिळाचें तेल) हा शब्द अथर्ववेदांत आला आहे व त्या ठिकाणी हें तेल घटामध्यें ठेविलें असल्याचा उल्लेख आहे. शांखायन आरण्यकामध्ये तैलाभ्यंग करण्याबद्दल उल्लेख आलेला आहे.

[32] तौल—हा पाठ अथर्ववेदाच्या मूळांत आहे. हें रूप कसें झालें व ह्याचा अर्थ काय हें निश्चित समजणें शक्य नसल्यामुळें हा तौल शब्द म्हणजे तैलच असावें असें वाटतें.

[33] पंचौदन—अथर्ववेदामध्ये हें विशेषण आलेलें आहे. पांच प्रकारच्या तांदुळांचें शिजवून अन्न करण्याचा उल्लेख त्याच संहितेत आलेला आहे.

[34] परिस्रुत—अथर्ववेदांत प्रथमच उल्लेखिलेल्या एका पेयाचें हें नांव असून तें सुरा व सोम यांपेक्षां निराळें असून शिवाय मादक असें होतें. महीधराचार्यांच्या मतानें हें पेय फुलांपासून करीत असत. झिमर म्हणतो कीं हें घरगुतीक पेय होतें व हें खरें हि वाटतें; कारण अथर्ववेदामध्यें हें घरगुती पेय होतें असें सांगितलें आहे. हिलेब्रँटचे मतें हें पेय व सुरा यांत फारसा फरक नाहीं.

[35] पिशित—अथर्ववेद व उत्तरकालीन ग्रंथ यांमध्यें कच्चें मांस अशा अर्थानें हा शब्द आलेला आहे. अथर्ववेदांत एके ठिकाणीं याचा अर्थ लहान तुकडा असा आहे पण पीटर्सबर्गकोशांत असें सुचविलें आहे कीं, पिशित हा शब्द पिषित म्हणजे पिष्ट (कुटलेलें कण) याबद्दल आलेला असावा.

[36] पूल्य अ० पूल्प—याचा अर्थ अथर्ववेदांत भाजलेलें धान्य (लाजा), लाह्या असा असावा.

[37] प्रतिधुक्—ह्याचा विशेष अर्थ ताजें दूध असा आहे. पुढील संहिता व ब्राह्मण यांतून धारोष्ण दूध हा याचा अर्थ आढळतो.

[38] लवण.—मीठ या अर्थानें हा शब्द ऋग्वेदांत मुळींच आलेला नाहीं. अथर्ववेदामध्यें फक्त एकदाच आलेला आहे. उत्तरकालीन ब्राह्मणग्रंथांत हा उल्लेख आहे व तो अत्यंत किंमतीचा आहे असें म्हटलें आहे. आर्य लोक प्रथम जेथें आले तीं ठिकाणें जर पंजाब व सिंधु नदीची खोरीं अशीं मानलीं—व तेथें तर मिठाच्या खाणी आहेत—तर मिठाचा उल्लेख पूर्वीच्या ग्रंथांत बिलकूल कसा नाहीं याचें आश्चर्य वाटतें. तेव्हां प्रथम आलेल्या आर्यांचें वसतिस्थान कुरुक्षेत्र मानलें तर तें कांहीं निस्संशय खरें होईल असें वाटत नाहीं. तथापि अशीहि कल्पना करणें शक्य आहे कीं, मिठासारख्या नित्याच्या वस्तूचा उल्लेख ज्या ठिकाणीं ती फार उपलब्ध आहे त्या ठिकाणीं ग्रंथांत न झाला तर त्यांत फारसें नवल नाहीं. साधारण असाच रीति दिसून येते कीं, जेथें जी वस्तु दुष्प्राप्य असते त्या ठिकाणीं तिचें महत्त्व पराकाष्ठेचें असून तिचा नामनिर्देश होत असतो.

[39] विष्टारिन्—अथर्ववेदांत ओदनाच्या एका विशिष्ट प्रकाराचा या नांवावरून बोध होतो.

[40] व्रत.—उत्तरकालीन संहिताग्रंथांत व ब्राह्मणग्रंथांत एखाद्या व्रत अथवा तप आचरणाऱ्या माणसानें इतर कांहीं खावयाचें नसल्यानें वापरावयाचें दूध असा याचा विशिष्ट अर्थ आहे.

[41] शालूक—अथर्ववेदामध्यें याचा अर्थ कमळाचीं (कांद्याचीं) फळें असा आहे.

[42] उपवाक.—वाजसनेयि संहितेंत व ब्राह्मणांत एक प्रकारचें धान्य असें याचें वर्णन आहे. नंतर त्याचा अर्थ इंद्रयव असा करितात—टीकाकार महीधर सर्वसाधारण यव असाच अर्थ करितो. वाजसनेयि संहितेप्रमाणें यवांमधील मुख्य अंश किंवा भाग. उपवाकचूर्णाचा (सक्तु) उल्लेख शतपथांत आहे.

[43] बदर—कुवल आणि कर्कंधूप्रमाणें हा एक बोराचा प्रकार आहे. याचा यजुःसंहिता व ब्राह्मण यांमध्यें संबंध आलेला आहे.

[44] मासर—वाजसनेयिसंहितेंत मादक पेय या अर्थी या शब्दाचा उल्लेख केला आहे. कात्यायन श्रौतसूत्रामध्यें हें तयार करण्याच्या रीतीचें वर्णन आलें आहे. हें पेय तांदूळ व तृण भाजून तें दूध व श्यामक यांत मिसळून तयार करीत असत असें दिसतें.

[45] लाजि—वाजसनेयि संहितेमध्यें (२३. ८) व तैत्तिरीय ब्राह्मणांत हा अनिश्चित अर्थाचा शब्द आढळतो. सायणाचार्यांच्या मतें ही लाजिनची संबोधनविभक्ति आहे. (लाजिन = तव्यावर भाजलेलें धान्य) महीधराचार्यांच्या मतें ह्याचा अर्थ तव्यावर भाजलेल्या धान्याची रास असा आहे.

[46] लाज—वाजसनेयिसंहिता व ब्राह्मणग्रंथ यांत हा शब्द पुल्लिंगी अनेकवचनी व तव्यावर भाजलेलें धान्य (लाह्या) या अर्थानें आला आहे.

[47] कृसर.—तांदूळ आणि तीळ यांच्या मिश्रणानें केलेलें अन्न अशा अर्थानें हा शब्द षड्विंश ब्राह्मण व सूत्रग्रंथांत आलेला आढळतो.

[48] क्षीरौदन—दुधांत शिजविलेला भात असा याचा अर्थ असून हा शब्द शतपथ ब्राह्मणांत आढळतो.

[49] तिरश्चीनवंश.—(आडवी दांडी) हा शब्द छांदोग्योपनिषदांत मध याचें पोळें हा अर्थ सुचवितो.

[50] पान—शतपथब्राह्मण व उपनिषद्ग्रंथांत एक प्रकारचें पेय या अर्थानें हा शब्द आला आहे.

[51] पिष्ट.—हा शब्द नपुंसकलिंगी असून ब्राह्मणग्रंथांत पीठ किंवा अन्न अशा अर्थानें आलेला आहे व अथर्ववेदांत कुटलेलें माष या अर्थानें आलेला आहे.

[52] फाण्ट—याचा अर्थ शतपथब्राह्मणांत लोणी घुसळतांना त्याचे प्रथम तयार होणारे परमाणू किंवा विस्कळित झालेलें [सितळलेलें] लोणी असा आहे.

वेल्कस —शतपथ ब्राह्मणात याचा अर्थ फसफसणाऱ्या स्थितींत असलेलें अशुद्ध द्रव्य असा आहे याचा खरा अर्थ कदाचित पाखडा, साय, गाळ असा किंवा कोंडा, भुसा असा जो धान्यातील टाकाऊ भाग तोहि असावा

मद्य —मादक दारू हा शब्द छांदोग्योपनिषदापर्यंत कोठेंहि आढळत नाहीं तेथें मात्र 'मद्यपा' मद्य पिणारा या शब्दात प्रथम आढळतो

मांसौदन —हा एक मांसमिश्रित भाताचा प्रकार असून या पक्वान्नाचा शतपथ ब्राह्मणात उल्लेख आढळतो

वृक्ष्य —शतपथ ब्राह्मणात झाडाचें फळ या अर्थानें हा शब्द आला आहे

### धान्यनामें [ऋग्वेद]

| | | |
|---|---|---|
| धान्य | बीज | यव |
| | [तै स] | |
| अखर्ण (न फुटले | पण ) | महाव्रीहि |
| लें धान्य ) | जर्तिल ( रान | [13] मुद्ग |
| अणु | तीळ ) | यवस् |
| आम्ब | जीवन ( धान्य | व्रीहि यवम |
| अशु | विशेषण ) | [14] व्रीहि |
| कर्ण ( तंदुल विशे | तण्डुल | [15] श्यामाक |
| षण ) | तिल | ( सावे ) |
| कृष्ण ( साळीचें | धान्य | सक्तु |
| भात ) | [11] नीवार | समर्धुक ( धान्य |
| खल्व | पक्तृ ( धान्य विशे | विशेषण ) |
| गर्मुत | षण ) | सस्य |
| गवीधुक | प्रियंगु | सूयवस |
| गोधूम | बीज | स्वविष्ट ( तंडुल |
| जर्ति ( धान्य विशे- | मसुर | विशेषण ) |
| | [अथर्ववेद] | |
| उलप | ( धान्यवि ) | व्रीहियव |
| कण | यज ( मोहरी ) | शाम्याक ( धान्य |
| [17] तण्डुल | [18] बिस | वि ) |
| तसर | माष | [20] शालि |
| तुष | मिश्रधान्य | श्यामाक ( सावे ) |
| धान्य | [19] मुलालिन | [21] सस्य |
| पत्य | यव | सुयवम |
| पूतिधानी | यवस | स्वरस |
| फलीकरण | व्रीहि | |
| | [वा स] | |
| उपवाक | ( यव ) | |
| | [संहितेतर] | |
| पुल्माष | नाम्ब | [22] मसूस्य |
| खलकुल | प्राशुक | |

धान्य —हा शब्द नपुंसकलिंगी असून तो 'धाना' शब्दापासून झालेला आहे. ह्याचा अर्थ मराठींत प्रसिद्धच आहे हा शब्द ऋग्वेद व उत्तरकालीन ग्रंथ ह्यात आलेला आहे बृहदारण्यकोपनिषदात दहा प्रकारचीं (जमीन नांगरून काढलेलीं) धान्यें ( ग्राम्याणि ) आहेत ते दहा प्रकार म्हणजे तांदूळ, यव ( व्रीहियवा ) तिल, उडीद, ( तिलमाषा ), अणु, प्रियंगव, मका ( गोधूमा ), मसुर ( मसुरा ), खल्व व खलकुल असे होत ऐतरेय व शतपथ ब्राह्मण ह्यात घोड्याला धान्याद म्हणजे धान्य खाणारा असें म्हटलें आहे ऋग्वेदामध्यें माणसांना धान्य करणारे ( धान्यकृत ) असें म्हटलें आहे.

बीज —याचा अर्थ बीं. ऋग्वेदात आणि तदुत्तर ग्रंथात पेरणीचा पुष्कळ वेळा उल्लेख येतो हा शब्द अलंकारिक रीतीनें उपनिषद् ग्रंथातून उपयोगात आणिला आहे तेथें जन्माप्रमाणें झालेल्या जातींना हा शब्द लावला आहे छांदोग्योपनिषदाप्रमाणें ह्या जाती तीन आहेत, पण ऐतरेय आरण्यकाप्रमाणें चार आहेत पहिल्या यादींत अण्डज, जीवज आणि उद्भिज्ज असे तीन प्रकार आहेत, व दुसऱ्याप्रमाणें स्वेदज हा आणखी चौथा प्रकार आहे स्वेदज म्हणजे हवेंतील उष्ण ओलाव्यामुळें उत्पन्न झालेले. यात कीटक, माशा इत्यादिकांचा समावेश होतो

यव — ऋग्वेदात कोणतेंहि धान्य या अर्थी हा शब्द आढळतो अथर्वांत आणि नंतरच्या ग्रंथात याचा अर्थ जव किंवा सातू हा आहे जवाचा हंगाम वसंतानंतर उन्हाळ्यात येतो

अणु —वाजसनेयि संहिता आणि बृहदारण्यकोपनिषद ह्यावरून हें एका धान्याचें नांव असावें असें दिसतें

आम्ब —तैत्तिरीय आणि काठक संहितात व शतपथ ब्राह्मणात ज्याला नाम्ब म्हणतात त्या धान्याचें हें नांव आहे.

खल्व —एक जातीचें धान्य किंवा द्विदल जातीचें रोप. वेबरच्या मताप्रमाणें बहुतकरून वाजसनेयि संहितेंतील सर्व प्रकारच्या धान्याच्या यादीत याचाहि निर्देश आहे आणि 'दृषद्' च्या योगानें त्याची डाळ करितात असा उल्लेख अथर्वांत आहे बृहदारण्यकोपनिषदातहि हा शब्द आला आहे आणि श्रीशंकराचार्य त्याचें निष्पाव असें स्पष्टीकरण देतात.

गर्मुत —तैत्तिरीय संहितेंतील एक प्रकारच्या रानवाटाण्याचें नांव काठक संहितेंत गार्मुत म्हणजे 'वाटाण्याचा केलेला' हें विशेषण आहे

गोधूम —गोधूम म्हणजे गहूं यजु संहिता व ब्राह्मण ह्यात अनेक स्थळीं हा शब्द आला असून त्याची व्रीहि व यव यांपासून भिन्नता दर्शविली आहे ह्या धान्यापासून 'सक्तु' देशाल करीत असत शतपथ ब्राह्मणात हा शब्द एकवचनी आला आहे

[९]जर्तिल—याचा अर्थ रानतीळ असा असून हे तीळ यज्ञाच्या वेळीं हवनास अयोग्य म्हणून तैत्तिरीय संहितेंत सांगितलें आहे शतपथात हे तीळ खाले असता शरीराची वाढ होण्यासारखे गुण त्यामध्यें आहेत असें म्हटलं आहे

[१०] तिल—अथर्ववेदात व तदुत्तर ग्रंथात याचा अर्थ तिल किंवा तिळाचें झाड ( ज्याच्या पासून चांगलें तेल निघतें असें )असा आहे. याचा उडीदाबरोबर नेहमीं उल्लेख केला जातो तैत्तिरीय संहितेमध्यें हीं दोन्हीं धान्यें हेमंत व शिशिर या ऋतूंत होतात असें म्हटलें आहे तिळाच्या झाडाचीं चिपाडें जळणाच्या उपयोगीं घेत व तिळाचा अन्नाकरिता ( तिलौदन ) उपयोग होई

[११]नीवार—अरण्यातला तांदूळ हा शब्द यजुर्वेदात व ब्राह्मणग्रंथात आलेला आहे

[१२]मसूर—द्विदल धान्य हा शब्द तैत्तिरीय संहिता, वाजसनेयि संहिता व बृहदारण्यकोपनिषदात आला आहे

[१३]माष—म्हणजे उडीद हें नाव तैत्तिरीय संहिता व तदुत्तर ग्रंथ यांतून आलें आहे हें धान्य हल्लीं सुद्धा प्रसिद्धच आहे अथर्वांत याची डाळ काढल्याचा उल्लेख आहे. हेमंतांत म्हणजे हिवाळ्यात याचें बीज पक्व होई श्रौतकर्मप्रसंगीं यज्ञार्थ नरकुड २९ माषाला विकत घेत असत. या शब्दाचा अर्थ धातूचें वजन असा कांहीं वाटत नाहीं परंतु असा अर्थ नंतरच्या ग्रंथात सापडतो. यजुःसंहितेंत माष त्याज्य मानलेला आढळतो

[१४]मुद्ग—म्हणजे मूग हें नाव तैत्तिरीयसंहितेंत भाज्यांच्या यादींत आढळतें शांखायन आरण्यकात आणि सूत्रात द्विदलासहित तांदुळाच्या रस्स्याचा उल्लेख केलेला आढळतो

[१५]व्रीहि—म्हणजे तांदूळ हा शब्द ऋग्वेदात कधींहि आला नाहीं, पण अथर्व वगैरे उत्तरवाङ्मयात वारंवार आढळतो तांदूळ हिंदुस्थानच्या आग्नेय भागात प्रथम उत्पन्न होत असावेत, म्हणून ऋग्वेदात त्याचा उल्लेख आलेला नाहीं तैत्तिरीय संहितेमध्यें पांढरा व काळा तांदूळ यांची तुलना केली आहे, व ह्या संहितेंत काळा, लवकर होणारा (आशु) व मोठा तांदूळ ( महाव्रीहि ) असें वर्णन आलें आहे कदाचित हा त्वरेनें वाढणारा तांदूळ म्हणजे पुढें ज्याला षाष्टिक (साठ दिवसांत तयार होणारा असें नाव मिळालें ) तो असावा व्रीहि व यव यांची जोडी संहिता ग्रंथांत आढळते

[१६]श्यामाक—म्हणजे सावा हा शब्द उत्तरकालीन संहिता व ब्राह्मणात आलेला आहे या धान्याच्या हलकेपणाबद्दल अथर्वांत उल्लेख आलेला आहे कारण त्यांत असें म्हटलें आहे कीं, ' तें वाऱ्यानें सहज उडून जाईं हें कबूतराचें अन्न आहे असाहि उल्लेख तेथें आला आहे. छांदोग्य उपनिषदात श्यामाक व त्याचें बी ( तंदुल ) याचा उल्लेख आलेला आहे, व त्याचा अर्थ मॅक्समुल्लर ' केनरा बी ' असा करितो

[१७]तण्डुल—अथर्ववेद वगैरे पुढील वाङ्मयात याचा उल्लेख आढळतो ऋग्वेदात तण्डुलाचा उल्लेख नाहीं व ऋग्वेदकालांत तान्दुळाची लागवड होत असल्याचाहि उल्लेख नाहीं. तैत्तिरीय संहितेंत फर्ण ( फुटलेला ) तांदूळ व अफर्ण ( न फुटलेला ) तान्दुळाचा उल्लेख आहे

[१८]बिस—अथर्ववेदकालीं कमलांतील अत्यंत कोमळ तंतूंचा लज्जतदार पदार्थ म्हणून उपयोग करीत असत. याचा उल्लेख ऐतरेय ब्राह्मण व ऐतरेय आरण्यक यांमध्यें आहे

[१९] मुलालिन्—अथर्ववेदात उल्लेखिलेल्या खाण्याच्या कमळाच्या एका भागाचें हें एक नांव आहे

[२०]शालि-पुढील वाङ्मयात याचा अर्थ तान्दूळ असा झाला परंतु रॉथची अशी कल्पना आहे कीं अथर्ववेदातील ' शारिशाका' शब्दातील ' शारि ' याला तुल्य असा हा शब्द आहे सायणाचार्यांच्या मतानें ' शारिशाका ' हें एका प्राण्याचें नाव आहे तेव्हा त्यांतील शारि हें पद वेगळें काढून त्याचा शालि असा अर्थ करणें ठीक नव्हे

[२१]सस्य—अथर्ववेद व तदुत्तर ग्रंथात याचा सर्वमान्य अर्थ धान्य असाच आहे अवेस्तामधील ' हह्य ' शब्दाप्रमाणें हा शब्द आहे

[२२]कुल्माष—छांदोग्य उपनिषदात हा शब्द अनेकवचनीं असून टीकाकारानीं त्याचा अर्थ ' कुत्सिता माषा ' ( घाणेरडे वाटाणे ), असा केला आहे बोथलिंग याने आपल्या कोशात हाच अर्थ दिला आहे. लिटल हा निरुक्तावरून याचा अर्थ अर्धट काजो असा देतो

[२३]खलकुल.—हा शब्द बृहदारण्यकोपनिषदांत आला असून सायणानीं ' कुलत्थ ' एक प्रकारचें कडधान्य असें त्याचें स्पष्टीकरण केलें आहे.

नाम्ब—शतपथ ब्राह्मणात उल्लेख असलेल्या एका धान्याच्या जातीचें हें नाव आहे तैत्तिरीय व काठक संहितेंत आंब असें रूप आढळतें

[२४] आशुक—हा शब्द शतपथ ब्राह्मणांत व्रीहि ( तांदूळ) याचें विशेषण म्हणून आला आहे व तेथें त्याचा अर्थ लवकर उगवणारा असा आहे

[२५]मसूस्य—हा शब्द तैत्तिरीय ब्राह्मणात येतो टीकाकारांच्या मतानें हें एका उत्तरदेशीय धान्याचें नांव आहे

## नातें गोतें

### अपत्यनामें [ऋग्वेद]

| | | |
|---|---|---|
| अपत्य | [१]तनय | [१]तोक |
| अप्नस् | तु | तोक्मन् |
| अर्भक | तनूज | [१]नपात् |
| गय | [२]तान्व | पुत्र |
| जा | तुक | प्रजा |
| तक | [१]तूच् | [१]प्रणपात् |

बीज
भ्रूण
यहु

[अथर्ववेद]

अनपत्य
आमुष्यायण
कन्यला
कन्या
तनूज
तुभ्रा
(दारिद्र्य
पीडित कन्या)
तोक
तोदी (कन्या)
दुहितृ
नपात्
नप्ति
नप्तृ
पुत्र
पुत्रक
पौत्र
प्रनप
सुत
सूनु
[७]वीर
[८]शेपस्
सुतुक
[१]सूनु
रतक

नातें गोतें [ ऋग्वेद ]

अग्रज
अन्योदर्य
अबन्धु
अभ्य
अर्भक
अर्भग
आजानी
आपि
[९]कना
कनीनका
कन्या
[११]जनि (जाया)
[१२]जनितृ
जनित्री
जनिधा
[१३]जन्मन्
[१४]जन्य
[१५]जामातृ
[१६]जामि
[१७]जाया
[१८]जास्पति
[१९]ज्ञाति
[२०]ज्येष्ठ
[२१]तत
तनय
तनया
तनस्
तनु
त्रिबन्धु
[२२]दंपति
[२३]दुहितृ
[२४]देवर
देवृ
द्विजानि
द्विबन्धु
[२५]नना
[२६]ननान्द
नप्त
नप्तृ
[२७]नद्
[२८]नारी
[२९]पति पत्नी
[३०]पितापुत्र
[३१]पितृ
[३२]पुत्र
[३३]बन्धु
बन्ध्वेष ( बन्धूला शोधणारा )
बन्धुपृच्छ ( बन्धूला विचारणारा )
बन्धुमत्
[३४]भर्तृ
[३५]भ्रातृ
[३६]मातृ
मातृ पितृ
मातृतमा
[३७]मित्र
मृत्युबन्धु ( मृत्यो- र्बन्धुभूतः )
[३८]यम ( जुळें )
[३९]योषन्
योषना
योषा
योषित्
[४०]वधू
[४१]वर
विजामातृ
[४२]विधवा
वीर ( पुत्र )
वीरतम
वीरतर
[४३]श्वशुर
[४४]श्वश्रू
[४५]सखि
[४६]सजात
सनितृ ( भगिनी-भर्तृ )
[४७]सपत्नी
[४८]सबन्धु
सयुज् ( सखा )
सयोनि
सरित
सहस्वसृ
समान बन्धु
सास
सुपत्नी
[४९]सुपित्र्य
सुबन्धु
सुमज्जानि
सुसारि
[५०]सूः
स्त्री
[५१]स्नुषा
[५२]स्याल
स्वपत्य
[५३]स्वसृ
स्वापि ( जवळचा नातेवाईक)

[तै. सं.]

आप्त
जनितृ
जामि
ज्येष्ठबन्धु
ततामह
तोक
दुर्मित्र
दुहितृ
नपात्क
नप्तृ
पत्नी
पश्चादन्ववसायनी ( पुढाऱ्याच्या तंत्रानें चालणारी प्रजा)
[५४]पितामह
पितृ
पुत्र
पैतृमत्य
पौत्र
प्रजा
[५५]प्रपितामह
बन्धु
भ्रातृ
भ्रातृव्य
भ्रातृव्यवत्
मिथुन (युग्म)
वधू
विजामातृ
शिशु
सखिन्
सख्य
सगर्भ
सन्तति
सयोनि
सहजाति
सूनु
सूनुमत्
स्याल (मेहुणा)
स्वज
स्वसृ
[५६]स्वस्रीय (बहिणीचा मुलगा)

[अथर्ववेद]

अंबा
असबन्धु
जय
जनित्व्य
जनिता
जनित्री
जनी
जा (नातें)
जामी (आई)
जामि
जाया
ततामह (आजा)
तन (अपत्य)
दधिष्णु
दायद
देवर
वध
धारू (स्तनपान करणारें बालक)
ननान्द
पति
पत्नी
पितापुत्र
पितामह
पितृ
पितृबन्धु
पुत्रिणी
पौत्र्या
[५७]पौत्र
पौत्राय (मुलें)
प्रततामह (पणजा)
प्रपितामह
बन्धु
[५८]भ्रातृव्य
मनुष्यज
मातृ
मातृबन्धु
मातृमत्
मित्रमह
मेदी (स्नेही)
विबन्धु
श्वशुर
श्वश्रू
सजात
सतोक
सनाभि
सपत्नी
सबन्धु
सलक्ष्मत्
सुपत्नी
सुस्नुषा
सूतिका
स्नुषा
स्वसृ
हस्तग्राभ

[संहितेतर]

[५९]गृह्य
[६०]ज्येष्ठिनेय
[६१]तात
[६२]दार
[६३]नप्ती
[६४]पितापुत्रीय
[६५]पुत्रिका
[६६]भगिनी
यां
मातुर्भ्रातृ
मातुल ( मामा )

[१]तनय — हा शब्द ऋक्संहितेंत मुलगा किंवा वंशज अशा अर्थानें आलेला आहे, व त्याच ग्रंथांत कांहीं ठिकाणीं तोक शब्दाबरोबर त्याचें विशेषण म्हणून आला

आहे. तोक म्हणजे पुत्र, मुलें व तनय म्हणजे पौत्र किंवा नातू असा अर्थ घेण्याचें काहींएक कारण नाहीं

[2] तान्व — ऋग्वेदाच्या एका संदिग्ध लेखांत ह्या शब्दाचा अर्थ औरस किंवा धर्मपत्नीजात मुलगा ( जो मुलगा आपला वारसा–ऋक्थ–आपल्या बहिणीस देत नाहीं तो) असा आहे *निश्चित अर्थ या लेखांतून काढणें शक्य नसलें* तरी येवढें म्हणतां येईल कीं पूर्वी बापाच्या मिळकतीवर मुलीचा हक्क नव्हता एखादी मुलगी जर अविवाहित राहिली तर तिच्या भावानें तिच्या हयातींत तिची पोटापाण्याची व्यवस्था केली पाहिजे पण ती स्वतन्त्रपणें हक्क सांगून संपत्तीचा वांटा घेऊं शकत नसे

[3] तुच — ऋग्वेदांत हा शब्द प्रसंगानें आला आहे, व त्याचा अर्थ मुलें असा आहे तसाच तुज हा शब्द याच अर्थानें जास्त वेळा आलेला आहे

[4] तोक — तोक ह्याचा अर्थ मुलें किंवा वंशज असा ऋग्वेदांत व इतरत्र आलेला आहे हा शब्द तनय शब्दाशीं वारंवार जोडलेला असतो

[5] नपात — वैदिक वाङ्मयांत ह्याचा अर्थ वंशज व संहिता *ग्रथांत नातू असा आहे ब्राम्हणांत ह्याचा अर्थ वंशज असा नसून नातू किंवा पणतू असाहि आहे (पुत्रान, पौत्रान, नप्तृन्)* अथर्ववेदांत व नंतरच्या ग्रंथांत पौत्र या शब्दानें नातू असा अर्थ व्यक्त होतो ऋग्वेदांत सुद्धां पणतू ह्या शब्दाकरितां प्रणपात् व नातू ह्या शब्दाकरितां नपात् असे शब्द आहेत नप्ती हा स्त्रीलिंगी शब्द फक्त संहिताग्रंथांतच येतो व त्याचा अर्थ मुलगी असा होतो वेदांत हा जो शब्दप्रयोग आलेला आहे त्यावरून मूळ शब्दाचा कसा प्रयोग होत होता ह्याची कल्पना होत नाहीं

[6] प्रणपात् — याचा ऋग्वेदांत पणतू असा अर्थ आहे

[7] वीर — ऋग्वेद व उत्तरकालीन ग्रंथ ह्यामध्यें शक्तिमान व शूर मनुष्य या अर्थी हा शब्द आलेला आहे एकवचनी सामुदायिक अर्थानें ह्या शब्दावरून पुरुष, अपत्य असा बोध होतो हा मुलगा वैदिक काळच्या लोकांना मोठा स्पृहणीय वाटे पंचविंश ब्राह्मणांत एका राजाच्या आठ वीरांचा उल्लेख आला आहे व ते राज्याचे आधारस्तंभ असल्याचं वर्णन आहे

[8] शेपस् — ऋग्वेदांत ह्याचा अपत्य असा अर्थ आला आहे

[9] सूनु — ऋग्वेद व तदुत्तर सर्व ग्रंथांत हा शब्द पुत्र ह्या अर्थानें नेहमीं येतो ह्याचा व्युत्पत्त्यर्थ जन्माला आलेला असा आहे व नंतर उत्पन्न केलेला असा झाला पण सूनु ह्याचा उपयोग ऋग्वेदामध्यें बापाच्या संबंधानें बऱ्याच वेळा व आईच्या संबंधानें फारच क्वचित आलेला आहे उदाहरणार्थ बाप हा पुत्राला ( सूनुला ) सूपायन म्हणजे सहज जवळ जाण्याजोगा, असें वर्णन आलेलें आहे दुसऱ्या एका लेखांत पृथ्वीला आई या अर्थानें सूपायन हा शब्द



वापरलेला आहे व त्याठिकाणी मुलगा या अर्थानें पुत्र हा शब्द आलेला आहे ह्यावरून आईची सत्ता किती होती *ह्या* बद्दल कांहींच अनुमान काढतां येणार नाहीं

[10] कना, कन्या — ह्या दोन्ही शब्दांपैकीं पहिला क्वचित ऋग्वेदांत, परंतु दुसरा ऋग्वेदानंतर सर्वसाधारण उपयोगांत आलेला आहे *याचा अर्थ ' कुमारी ' अथवा ' तरुण स्त्री '* असा आहे कनीनका ह्या शब्दाचाहि अर्थ तसाच होतो *किंवा डोळ्यातील बुबुळ हा होतो हें सांगतां येत नाहीं* परंतु कनीनका किंवा कनीनिका ह्याचा अर्थ बुबुळ असा उत्तरकालीन संहिता व ब्राम्हण ह्यांत मात्र निश्चित झाला आहे

[11] जनि, जनी — *ह्या शब्दाचा अर्थ लग्नाची बायको असा* आहे सामान्यतः स्त्री या अर्थाबद्दल शंका आहे कारण उपेला जेव्हां सुजनी असें म्हटलें आहे तेव्हां भार्या हा अर्थच *विवक्षित असला पाहिजे त्याचप्रमाणें डेलब्रुकनें* दुसरा एक ऋग्वेदांतला उतारा घेतला आहे त्यांत ' पुनर्युवेन जनय ' *असा उल्लेख आहे या ठिकाणीं पुनर्जन्माचा संबंध* असल्यामुळें जनय याचा अर्थ बायको असाच घेतला पाहिजे ज्या अर्थी हे शब्द अनेकवचनी येतात *त्या अर्थी त्याचा अर्थ कदाचित् लग्नाच्या बायका असा नसून उपस्त्रिया* असाहि असू शकेल अशी शंका कांहीं पाश्चात्य पण्डित काढतात पण मॅकडोनेल असें म्हणतो कीं, हा अर्थ संभवत नाहीं, कारण ऋग्वेदांत ' पत्युर्जनित्वम् ( नवऱ्याची बायको होणें ), व ' जनयो न पत्नी ' (गृहस्वामिनी स्त्रियाप्रमाणें), वगैरे लग्नाचा संबंध दाखविणारीं पुष्कळ वाक्यें आलेलीं आहेत यम व यमी यांच्या संवादांत फक्त जनी हा एकवचनी शब्द आलेला आहे

[12] जनितृ व जनित्री — हे शब्द नेहमींचे आहेत ते ऋग्वेदांत व तदुत्तर ग्रंथांत बाप(उत्पादक)व आई (प्रसविणारी ) ह्याबद्दल आलेले आहेत

[13] जन्मन — ह्या शब्दांत ऋग्वेदामध्यें दोन ठिकाणीं नातेवाईक लोक हा अर्थ असावा दुसऱ्या स्थलीं नातेवाईक हा अर्थ समुच्चयानें घ्यावा लागतो

[14] जन्य — ऋग्वेदांत व अथर्ववेदांत ह्या शब्दाचा ' करवला ' हा विशिष्ट अर्थ आहे

[15] जामातृ. जावई या अर्थी हा शब्द ऋग्वेदांत फार थोडे वेळा आला आहे ऋग्वेदांत विजामातृ असा एक शब्द आला आहे व त्याचा अर्थ अप्रिय जावई म्हणजे एक तर बायको *करितां पुरशी रक्कम न देणारा किंवा इतर दोष अंगीं* असल्यामुळें बायकोबद्दल ज्याला पैसे भरावे लागतात तो असा होतो ऋग्वेदांत जावई व मेहुणा ह्यांच संबंध असल्याचा उल्लेख आलेले आहेत

[16] जामि — ह्या शब्दाचा मूळचा अर्थ एकरक्ताचा किंवा सपिंड असा असून अनेक वेळा स्वसृ—बहीण अशा अर्थानेंहि आला आहे पहिल्या अर्थानें अथर्वांत एके ठिकाणीं

हा शब्द आला आहे. ' उदाहणार्थ 'अभ्रातर इव जामयः '. ऐतरेय ब्राह्मणात एक वाद चालला असता हा शब्द आलेला आहे. हा वाद एका मतात राका ( भगिनी ) व देवपत्नी ह्यामध्यें कोणाला प्रथम हवि द्यावा ह्याबद्दल आहे. एका पक्षाचें असें म्हणणें आहे कीं, बहिण ही बायकोपेक्षा अधिक पसंत करणें बरें ( जाम्यै वै पूर्व पेयम् )कारण बहीण भाऊ हे एका रक्ताचे असतात व बायको ही ' अन्यतोदार्या ' असल्यामुळें ती आपल्या नवऱ्याशीं एकरक्त होऊं शकत नाहीं. नपुंसकलिंगी जामि या शब्दाचा अर्थ नातें असा आहे, व तो ऋग्वेदात आला आहे

[१७] जा या —ह्या शब्दाचा अर्थ लग्नाची बायको असा आहे पत्नी व जाया ह्या शब्दात असा फरक आहे कीं जाया म्हटली म्हणजे ती नवऱ्याच्या प्रेमाचा विषय असते; कारण पुढें वंश चालविण्यास ती कारणीभूत होते, असा अर्थ पत्नी या शब्दावरून होत नाहीं जाया हा शब्द एखाद्या ब्राह्मणाच्या किंवा द्यूतकाराच्या बायकोस ऋग्वेदात लाविला आहे व ह्या शब्दाला पति हा शब्दहि वारंवार जोडलेला ऋग्वेदात व तदुत्तर ग्रंथात आढळून येतो दुसरा एक भेद पत्नी व जाया ह्या दोन शब्दात असा आहे कीं ज्या वेळीं बायको यज्ञामध्यें सहधर्मचारिणी असते त्या वेळीं तिला पत्नी म्हटलेलें आहे. ती जेव्हा तशी नसते तेव्हा तिला जाया म्हणतात एवढें लक्ष्यात टेविलें पाहिजे कीं ह्या दोन शब्दातील भेद सापेक्ष आहे.कारण एका ग्रंथात मनूच्या बायकोला जाया तर दुसऱ्या ग्रंथात पत्नी असें म्हटलें आहे. पुढें पुढें जाया ह्या शब्दाऐवजी दारा हा शब्द आला आहे.

[१८] जा स्प ति —ऋग्वेदात ' कुटुंबाचा मुख्य ' अशा अर्थानें हा शब्द आलेला आहे. ह्या शब्दापासून झालेला भाववाचक शब्द 'जास्पत्य' ( कुलावरील आधिपत्य ) हा सुद्धा ऋग्वेदात आला आहे.

[१९] ज्ञा ति —(पुल्लिंगी) ह्याचा मूळ अर्थ 'परिचय' असा होता असें दिसते. पण ऋग्वेदात व पुढील ग्रंथात या शब्दाचा अर्थ नातेवाईक असा होऊं लागला. विशेषतः बापाच्या बाजूनें एका रक्ताचा संबंध असलेला असा अर्थ—जरी हाच अर्थ प्रत्येक ठिकाणीं अभिप्रेत नव्हता तरी—प्रचारांत येऊं लागला. हाच अर्थ विशेष लोकप्रसिद्ध होण्याचें कारण वैदिक समाजातली मूळपुरुषानुबद्ध कुटुंबपद्धति हे होय.

[२०] ज्ये ष्ठ.—ह्याचा नेहमींच अर्थ ' सर्वांत मोठा ' असा आहे. व विशिष्ट अर्थ ऋग्वेदामध्यें ' सर्वांत थोरला भाऊ ' असा आहे ह्याचा दुसरा एक अर्थ ' सर्वांत वडील मुलगा ' असा आहे हा अर्थ वरील अर्थाचाच दुसरा प्रकार आहे

[२१] त त —ऋग्वेदात व नंतरच्या ग्रंथात बापाकरिता म्हणून हें लाडकें नाव आलेलें आहे.

[२२] दं-प ति —ऋग्वेदात ' गृहाचा मालक ' अशा अर्थानें हा शब्द आलेला आहे. पण बहुतकरून हा शब्द द्विवचनी आला असून त्याचा अर्थ गृहस्वामी व गृहस्वामिनी असा आहे ह्यावरून पूर्वीच्या स्त्रियाच्या दर्जाची कल्पना येते.

[२३] दु हि तृ.—ऋग्वेदापासूनच्या ग्रंथात मुलगी या अर्थी हा शब्द आहे. हा शब्द ' दुह् ' म्हणजे दूध काढणें या शब्दापासून आलेला आहे, व याचा अर्थ मुलास खाऊ घालून वाढविणारी असा आहे. याचा पूर्वीच्या काळीं दूध काढण्याचें काम करणारी कुटुंबातील एक स्त्री किंवा ' वासरू असा अर्थ कोणी करतात तो चुकीचा आहे

[२४] दे व र–दे वृ —हा शब्द वैदिक वाङ्मयात क्वचितच येतो व त्याचा अर्थ दीर असा आहे. ह्याचा समावेश नणंदामध्यें केला आहे,अर्थात् ज्यावर भावजयीचा अधिकार चालतो अशा ह्या नणदा होत. आणखी असें आहे कीं, भावजयीनें तिचा नवरा हयात असताना त्या दिराशीं प्रेमानें व मित्रत्वानें वागलें पाहिजे तिचा नवरा मेला तर तिच्याशीं दिरानें रममाण होऊन आपल्या भावाकरिता तिच्या पोटीं पुत्र उत्पन्न करावयाचा असतो देवृ शब्दास सदृश असा बायकोच्या भावास निराळा शब्द आलेला नाहीं

[२५] न ना —आईबद्दल हे नाव आलेलें आहे. त्याचप्रमाणें तत हें बापाबद्दल आलेलें आहे हे दोन्ही शब्द ऋग्वेदाच्या एका ऋचेंत आढळून येतात, व या ऋचेंत कवीच्या आईबापाचे धंदे वर्णिले आहेत

[२६] न नां दृ.—ऋग्वेदात हा शब्द एकदाच आला आहे. सायणाचार्यांच्या मतें ह्याचा अर्थ ' भावजयीचा ताबा असलेली नणंद ' असा आहे व हाच खरा दिसतो. कारण ऐतरेय ब्राह्मणात अविवाहित व आपल्या भावाच्या येथें राहिलेल्या स्त्रीचें अशाच प्रकारचें वर्णन आलें आहे.

[२७] न द्.—ऋग्वेदात एका ठिकाणीं आलेल्या ' नद्भ्यः ' या पदात मूळ शब्द नद हा आहे असें रॉथ व ग्रासमन याचें मत आहे. व नद् याचें नद्भ्यः हें चतुर्थीचें रूप आहे. पीशेलच्या मतानें याचा बहिणींचीं मुलें असा अर्थ होतो. परंतु या चतुर्थ्यंत पदाचा ' नातवाना ' असा अर्थ करणें बरें.

[२८] ना री.—' स्त्री. ' ऋग्वेद व तदुत्तर ग्रंथात हा शब्द वारंवार आलेला आहे. ऋग्वेदात याचा लग्नाची बायको असा अर्थ आहे. कारण अनेक ठिकाणीं हा शब्द लग्नाचे संबंध व्यक्त करण्यासाठीच आला आहे उत्तरकालीन वैदिक वाङ्मयात हा शब्द फारसा आलेला नाहीं पण कधीं कधीं याच अर्थानें आलेला आहे. डेलब्रुक म्हणतो कीं, या शब्दावरून वैवाहिक संबंध दाखविले जात नसून नर व नारी मिळून बनणाऱ्या मनुष्यजातीपैकीं स्त्री जात असा या शब्दाचा अर्थ आहे.

[२९] प ति प त्नी —सेंटपीटर्सबर्ग कोशात या शब्दाचा प्रथम यजमान व यजमानीण असा अर्थ होता व नंतर नवरा व बायको असा झाला असें विवेचन केलें आहे. स्त्रीपुरुषसंबंध वैदिककाळीं कसे होते हे आपण पाहू.

बा ल वि वा ह—पूर्वी वैदिक कालात पुरुष व स्त्री पूर्णपणें वयात आल्यावरच त्यांची लग्नें होत असत या गोष्टीस पुरावा म्हणजे वैदिक ग्रंथांत अविवाहित स्त्रियांबद्दलचे आलेले अनेक उल्लेख होत. या अविवाहित स्त्रिया पापाच्या घरी वाढत असत. आणि लग्न होऊन चांगला नवरा मिळावा यासाठीं व्रत स नरवांत असत. त्याच प्रमाणें पुरुषांनी व स्त्रियांनी एकमेकांना आपणावर प्रेम करण्यास भाग पाडण्याकरितां अथर्ववेदांतल्या मंत्राचा ( एका कथेंत उपयोगात आणिलेल्या तोडग्याचा ) उपयोग करण्याची चाल होती. खुद्द ऋग्वेदांतच एका प्रियकरानें आपल्या प्रेमविषयक स्त्रीची भेट घेण्याचे वेळीं तिच्या घरच्या सर्व मंडळीस निद्रावश करण्याकरितां मन्त्रप्रयोग केला असल्याचा उल्लेख आहे. बालवधूंच्या विवाहाचा उल्लेख प्रथम सूत्रग्रंथांत आलेला आहे. तरीपण रजोदर्शन होण्याच्या अगोदर किती मुलींचा विवाह होत असे हें सूत्रग्रंथावरून नक्की ठरवितां येणें कठिण आहे. लग्नाचे जे विधी आहेत त्यावरून सुद्धां लग्न म्हणजे स्मृतिग्रंथाप्रमाणें बाहुलाबाहुलीचें लग्न नव्हे तर खरें पुरें लग्न होय. कारण लग्नातील मुख्य विधि म्हणजे वधूला तिच्या नवऱ्याच्या घरीं नेऊन पोंचवावयाची व तेथें त्या दोघां वधूवरांनी एक शय्या करावयाची हा होय.

ल ग्न सं ब ध ां वं ध नें—पूर्वी कोणत्या अटीवर विवाह होत असत हें निश्चित सांगणें कठिण आहे. यम व यमी यांचा ऋग्वेदांत जो संवाद आलेला आहे त्यावरून बहीण व भाऊ यांच्यामध्यें विवाह होत नसत हें स्पष्ट दिसतें. पूर्वी बहीणभावांत लग्नें होत असून पुढें ही चाल बंद पडली असें जें वेबरचें मत तें सर्वस्वी चुकीचें आहे. गोभिल सूत्रांत आईच्या व बापाच्या सोळा पिढ्यांत एकमेकांशीं विवाह करणें निषिद्ध मानलें आहे. पण शतपथ ब्राह्मणांत तिसऱ्या किंवा चवथ्या पिढींत लग्न लावण्याची परवानगी दिली आहे. तिसरी पिढी हरिस्वामिनच्या मतानें कण्वसमत व चवथी सौराष्ट्रसंमत होय दाक्षिणात्य लोकांत मामाच्या मुलीशीं किंवा आतेच्या मुलाशी लग्न लावण्याची चाल होती. त्या वेळीं वरील गोभिलसूत्रांतील निषेध विशेष मानिला जात नसे असें दिसतें तरी पण विषमगोत्रविवाह वरेच होत असत त्याचप्रमाणें जात ही लग्नाचे बाबतींत विशेष गणली जात नसे. कारण धर्मसूत्रामध्येंच अन्यवर्णविवाह समत मानिले आहेत. उदाहरणार्थ ब्राह्मणाला खालील वर्णांपैकी कोणत्याहि वर्णांतील स्त्रीशीं विवाह करण्याची मुभा होती. त्याचप्रमाणें क्षत्रियानें आपल्या जातींतील अथवा खालच्या वर्णांतील स्त्री विवाहास पसंत करावी आणि वैश्यानेंहि वैश्य व शूद्र या जातींतील स्त्री विवाहास पसंत करावी अशी मोकळीक होती. ही अनुलोम विवाहपद्धति होय. याच्या उलट खालील जातींतील पुरुषानें वरच्या जातींतील स्त्रीशीं लग्न करणें ही प्रतिलोम पद्धति मात्र प्रचारात नव्हती. पुढें पुढें वरच्या वर्णांना शूद्र स्त्री पूर्णपणे विवाहास अयोग्य मानली जाऊं लागली. असे मिश्रविवाह महाभारतात पुष्कळ झालेले आढळतात. बृहद्देवतेंत ते सामान्य नियम म्हणून गणले आहेत. थोरल्या भावाचें किंवा बहिणीचें लग्न झाल्याशिवाय धाकट्या भावाचें अथवा बहिणीचें लग्न होणें शिष्टसमत गणलें जात नव्हतें. उत्तरकालीन संहिता व ब्राह्मणग्रथांत अशा शिष्टासंमत विवाहितांची नावें आलेलीं आहेत व असे लोक पापाचे वाटेकरी होतात असें म्हटलें आहे. अशा विवाहितांची नावें म्हणजे 'परिविविदान' किंवा 'अग्रेदधुः ( धाकटा असून थोरल्या भावाच्या अगोदर लग्न करणारा ), 'दिधिषु' ( थोरल्या बहिणीचें लग्न होण्यापूर्वी तिच्या धाकट्या बहिणीशीं लग्न लावणारा ) आणि 'दिधिषु पति '( धाकट्या बहिणीचें आधीं लग्न होऊन अविवाहित राहिलेल्या अशा थोरल्या बहिणीशीं लग्न लावणारा). वर निर्दिष्ट केलेल्या संहिता व ब्राह्मण ग्रंथांत प्रथम जन्मास येईल त्यानेंच प्रथम लग्न केलें पाहिजे असें स्पष्ट म्हटलें नाहीं, तरी पण वर जीं नावें आलीं आहेत त्यावरून अशा तऱ्हेनें नियम मोडून विवाह होत असत हें सिद्ध होतें.

वि ध वा वि वा ह.—विधवेच्या विवाहाला शास्त्राची आडचण नसे. विधवेला दुसरें लग्न करावयाचें असेल तर मृतपतीपासून संतति नसली म्हणजे तिनें आप या दिराशीं किंवा पतीच्या अगदीं जवळच्या नातलगाशीं लग्न लावावें व तें संतति उत्पन्नकरण्यासाठींच लावावें. हाच विधवाविवाहप्रचाराचा पाया होय निदान ऋग्वेदांत तरी और्ध्वदेहिक सूक्तांत ( १०. १८, ८ ) अशा अर्थाचा संदिग्ध उल्लेख आढळतो. हिलेब्रँट आणि डेलब्रुक यांच्या मतानें या सूक्ताचा असा अर्थ करणें बरें नव्हे. या सूक्ताचा पुरुषमेध यज्ञाशीं संबंध आहे असें त्यांचे मत आहे. परंतु ही केवळ निराधार कल्पनाच होय आम्ही जो अर्थ दिला आहे त्याला मात्र आश्वलायन गृह्यसूत्राचा आधार मिळतो. शिवाय ऋग्वेदांत दुसऱ्या एका ठिकाणीं ( १० ४०, २ ) एखाद्या विधवा स्त्रीचा दिराशीं विवाह होत असावा ( ज्याला पुढें नियोगविवाहपद्धति म्हणूं लागले ) असें स्पष्ट दिसतें ही नियोगपद्धति ज्या वेळीं विधवेला पहिल्या नवऱ्यापासून एकहि मूल झालें नसेल अशाच वेळीं प्रचारात येत असे. या पद्धतीला पुनर्विवाहपद्धति असें नाव देतां येईल कीं नाहीं याबद्दल शंका आहे. कारण पुनर्विवाह करणारा दीर हा अगोदरच विवाहित असे. अथर्ववेदांत एका मंत्राचा उल्लेख आला आहे तो मन्त्र जपला असतां स्त्रीच्या ( जर तिनें दुसरा पति कल्पिला असेल तर त्या) दुसऱ्या पतीची परलोकीं गांठ पडते. डेलब्रुक म्हणतो त्याप्रमाणें ज्या स्त्रीचा पहिला नवरा जिवंत असून षंढ अथवा पतित आहे अशा स्त्रीलाच हा मंत्र लागू पडतो. तरी पण एक गोष्ट निश्चित आहे कीं, मागाहून झालेल्या धर्मसूत्रग्रंथांत सामान्य विधवाविवाहाला शास्त्राची संमति मिळाली. विशेष म्हणतो कीं एखाद्या स्त्रीचा नवरा

नष्ट झाला किंवा त्याचा पत्ता नसला तर तिनें खुशाल दुसरें लग्न करावें अशाबद्दल ऋग्वेदात समति असल्याचा पुरावा आहे ( ही केवळ कल्पनेची भरारी आहे मूळ मत्रात, सायणभाष्यात अथवा ग्रिफिथच्या भाषातरात वरील कल्पनेचा सुळींच उल्लेख नाहीं)'

बहुभार्यात्व.—वैदिककालीन आर्यलोकाना अनेक बायका करण्याची परवानगी होती ही गोष्ट ऋग्वेदातील अनेक उल्लेखावरून ( १ ६२. ११, ७, १ वगैर ) सिद्ध होते मैत्रायणी सहितेंतील उल्लेखावरून मनूला दहा बायका होत्या असें ठरतें. शतपथ ब्राह्मणात बहुभार्यात्व पद्धतीच एका मजेदार कथेनें स्पष्टीकरण केलें आहे शिवाय राजाला चार भार्या असत. पहिली महिषी, दुसरी परिवृक्ता तिसरी वावाता आणि चवथी पालागली शतपथ ब्राह्मणाप्रमाणें महिषी हा प्रथम वरलेली असल्यामुळ पट्टराणी होत असे परिवृक्तीचा अर्थ टाकून दिलेली असा आहे वेबर व पिशेल हे म्हणतात कीं, हिला टाकून देण्याचें कारण हिच्या पोटीं सतान झालेलें नसे वावाता म्हणजे राजाची विशेष आवडती बायको होय आणि पालागली म्हणजे वेबरच्या मतें राजपुरुषापैकीं जो शेवटला पुरुष असेल त्याची मुलगी होय ही नावे थोडीं चमत्कारिक दिसतात व त्याचा अर्थहि फारसा सुसगत नाहीं पण एवढें मात्र खरें कीं, जिला प्रथम वरली तीच खरी लग्नाची बायको असे व तिलाच पत्नीचे सर्व हक्क असत या मताला डेल्ब्रुकनें जोर दिलेल्या मुद्द्याचा पाठिंबा आहे तो मुद्दा असा कीं यज्ञामध्यें पत्नी शब्द एकवचनी वापरला आहे व जेथें जेथें अनेकवचनी हा शब्द वापरला आहे तेथें तेथें काहीं पौराणिक कारण देण्यात आलें आहे झिमर असें प्रतिपादन करतो कीं बहुभार्यात्व ऋग्वेदामध्यें नाहींसें होत चाललें होतें व एकभार्यात्वाची चाल सुरू होत होती वेबरचें याच्या उलट असें मत आहे कीं प्रथम एकभार्यात्वाची चाल सुरू होती व बहुभार्यत्वाची चाल मागाहून सुरू झाली

बहुभर्तृत्व—वैदिक काळीं बहुभर्तृत्व नव्हतें वैदिक ग्रथात असा एकहि आधार नाहीं कीं त्यावरून ही चाल सरसहा प्रचारात होती असें सिद्ध होईल फारतर एवढें म्हणता येईल की ऋग्वेद व अथर्ववेद यामध्यें प्रसगानुसार कांहीं मत्र असे आले आहेत कीं ज्यात एकाच भार्येसबधानें अनेक नवऱ्याचा उल्लेख आलेला आहे परतु ऋग्वेदात १०. ८५, ३७, ३८ या ठिकाणीं जो बहुवचनी उल्लेख आहे तो त्याच सूक्तातील ४० व्या मत्रात सोम, गधर्व, अग्नि व मनुष्य असे जे चार पती उल्लेखिले आहेत त्याना अनुलक्षून असावा या पतींपैकीं तीन देवगणांतील असून एकच मनुष्य आहे अशा अर्थाच्या शब्दाचा वगवेगळ्या ठिकाणीं काय अर्थ होतो हे सांगणें कठिण आहे वेबरच्या मताप्रमाणें भर्तार हा बहुवचनी प्रयोग बहुमानार्थी आहे असें जरी मानलें नाहीं तरी डेल्ब्रुक हा या अनेकवचनी प्रयोगाचें दतकथात्मक वर्णन अथवा पौराणिक स्पष्टीकरण देतो ते ग्राह्य मानण्यास बिलकुल हरकत नाहीं शतपथ ब्राह्मणातील एका लेखात हें अनेकवचन व्यापक अर्थानें आलें आहे

वैवाहिक सबध.—बहुभार्यात्व जरी वैदिक कालीं प्रचारात होतें तरी वेबर म्हणतो त्या प्रमाणें वैवाहिक सबध सैल होते असें म्हणता येणार नाहीं प्रत्येक पतीला आपल्या भार्येशी इमानाने वागावें लागत असे पण हें एकपत्नीव्रत नीतिविषयक कल्पनामुळेंच लोक पाळीत असत किंवा काय हें सागता येत नाहीं यज्ञप्रसगीं स्त्रीसगत्यागासबधानें व परस्त्रीशीं बिलकुल सबध ठेवू नये अशा सबधानें अनेक स्थलीं स्पष्ट विधान केलें आहे, याचा एवढाच अर्थ होतो कीं यज्ञ चालू नसताना परस्त्रीगमन केलें असता क्षम्य होतें यज्ञकर्त्यानें व्रती असताना स्त्रीगमन करू नये असा उल्लेख आहे यावरून व्रती नसताना परस्त्रीगमन क्षम्य होत असा अर्थ निघत नाहीं, पण स्त्री या शब्दात मुलगी, दासी व स्वत:ची बायको याचा समावेश होत असल्यामुळें सामान्यपणें समाजात परस्त्रीगमनाकडे कानाडोळा केला जात असे असें म्हणणें चुकाच होईल. चातुर्मास्य यागात वरुणप्रघास नावाचें एक पर्व (कर्म) आहे त्यात यागकर्त्या यजमानाच्या बायकोला 'तुझा जार कोण' असा प्रश्न विचारला जाई परतु डेल्ब्रुक म्हणतो त्याप्रमाणें हें व्रत दुसऱ्या एका व्रताचा भाग असून त्याचा उपयोग यज्ञकर्त्याच्या स्त्रीचें अपवित्र आचरणरूप पाप नाहींसें करण्याकरिता होता. यज्ञकर्त्यानें आपल्या बायकोस विचारावयाचा तो प्रश्न नव्हता. शतपथ ब्राह्मणात याज्ञवल्क्यानें असें मत प्रतिपादिलें आहे कीं आपली स्त्री पतिव्रता आहे कीं भ्रष्ट आहे याबद्दल कोणी पर्वा करीत नाहीं याचा अर्थ असा कीं जे यज्ञ करणारे असतात त्याची बायको त्याच्यापासून दूर असला तरी ते लोक त्याची पर्वा करात नाहींत कारण देवाच्या बायका देखील विशिष्ट व्रत किंवा यज्ञप्रसगीं देवापासून दूर राहतात वैदिककालीं एकपत्नीव्रताला बराच मान असे, यावरून उच्च प्रतीच्या नैतिक कल्पना त्या लोकात रूढ झाल्या असें सिद्ध होतें उलटपक्षीं इडो जर्मन लोकामध्य व्यभिचारीपुरुष एखादा स्त्रीशीं व्यभिचार कर्म करताना पकडला गेला तर त्याला वेलाशक ठार मारावे असा सर्वप्रसिद्ध नियम होता तसा वैदिक काळच्या लोकात होता असें दिसत नाहीं तरी पण मागाहून झालेल्या धर्मशास्त्रग्रंथात असा नियम आढळतो वैदिककालीं स्त्रीपुरुषविषयक नीतिमत्ता विशेष उच्च दर्जाची नव्हती अशाबद्दल हवा तेवढा पुरावा वैदिक वाङ्मयात सापडू शकेल

एकास्त्रीवरमर्यलोकांचीसत्ता—आरासवर्धा प्रम व अशा प्रकारचें प्रेम करणाऱ्या स्त्रीपुरुषाच्या प्रेमापासून झालेल्या सततीचा त्याग याबद्दल ऋग्वेदात पुष्कळ उल्लेख आलेले आहेत हे उल्लेख विशेषत परावृज या नावानें निर्दिष्टिलेल्या इन्द्राच्या आश्रितासबधानें आहेत. वाजसनेयि सहितत 'कुमारापुत्र' असा शब्द आलेला आहे असा जो कोणी

अविवाहित स्त्रीपासून झालेला मुलगा असेल त्याला मातृप्रास नाव यावयाचें अशी चाल होती असें उपनिषद् ग्रंथावरून वाटतें. बृहदारण्यकोपनिषदात ज्या गुरूंच्या याद्या (वंश) आल्या आहेत त्यांमध्यें मातृप्रास नावें येण्याचें कारण हाच प्रचार असावा असें वाटतें. वाजसनेयि संहितेत शूद्र व आर्य (स्त्री व पुरुष दोन्ही वर्ग) याचे अशास्त्रीय संबंध पडल्याचे उल्लेख आढळतात. व पुरुषमेधात बलि दिल्या जाणाऱ्याच्या यादींत अतीत्वरी (वारयोषित्) व अतिष्कद्वरी (भ्रूणहत्या-करणारी) अशा स्त्रियांचीं नावें आलीं आहेत व रजयित्री स्त्री ही विषयोपभोगालाच वाहिलेली असे असें म्हटलें आहे. पिशेल व गेल्डनेर याच्या मतें अनेक पुरुषाची एका स्त्रीवर सत्ता असे अशाबद्दल ऋग्वेदात पुष्कळ उल्लेख आहेत व विशेषतः उषा देवी ही अशाच प्रकारची स्त्री होती असें ते म्हणतात (उषा ही दैनंदिन कालांतील एक अवस्था आहे व तिच्या संबंधीं असलेलें वर्णन रूपकात्मक आहे). निदान एवढें तरी खरें आहे कीं ऋग्वेदामध्यें एके ठिकाणीं उल्लेखिलेली नृतू (नाचणारी स्त्री) ही जिच्यावर सर्व पुरुषाची सत्ता होती अशी स्त्री होती. स्त्रिया 'समना' (भेटण्याची जागा) कडे जात असत असें म्हटलें आहे तेव्हा त्या स्त्रिया अशाच प्रकारच्या असल्या पाहिजेत. अनीतिमार्गाचें पूर्णपणें अवलंबन करणाऱ्या स्त्रीपुरुषांचीं अनेक उदाहरणें ऋग्वेदात आलीं आहेत. बाप व कन्या याच्यामधील संबंध प्रजापतीच्या कथेंत दाखविला आहे व त्यासंबंधानें स्पष्टपणें निषेध प्रगट केला आहे अशा प्रकारचे अयोग्य संबंध समाजांत घडत असत असा उल्लेख अथर्ववेदातहि आलेला आहे. ज्याचे आईबाप किंवा भाऊ नष्ट झाले आहेत अशा मुलींन्या हातून अनीतीच्या मार्गानें उदरनिर्वाह केला जाण्याचा बराच संभव असे.

लग्नाचे प्रकार.—वैदिककालीं जी समाजस्थिति होती तीवरून असें दिसतें कीं स्त्री असो किंवा पुरुष असो दोघानाहि विवाहसमयीं आपला जन्माचा सोबती निवडण्याची मुभा होती. निदान वयात आलेला मुलगा किंवा मुलगी याच्या विवाहाच्या भानगडींत आईबाप पडत नसत. तरीपण बहुधा आईबाप वधूवराचा विवाह जुळवून आणीत असत. ज्याचें लग्न व्हावयाचें त्याचें आपआपसात ठरल्यावर एका मध्यस्थाच्या मार्फत—बहुतेक हा वर असावा—हें लग्न जमत असे त्या वेळच्या समाजात कन्याविक्रय योग्य प्रमाणात असे (ह्या मताच्या पुराव्यासाठीं तै. सं. व तै. ब्रा. यातील उल्लेख मॅकडोनेलनें दिले आहेत परंतु मूळात तसा अर्थ संभवत नाहीं). पण अशा प्रकारच्या कन्याविक्रयाबद्दल समाज आपली नापसंति व्यक्त करीत असे व असले जावई असत ते बहुधा चिकू असत. उलटपक्षीं ज्या वेळीं मुलींमध्यें काहीं व्यंग असेल अशा वेळीं मुलीच्या बापाकडून वराला हुंडा दिला जात असे. प्रसंगानुसार मुलींना पळवून आणून त्यांचें पाणिग्रहण करण्याची चाल होती. पण असले प्रकार म्हणजे वीरांचीं अद्भुत कृत्यें म्हणून घडत असत. उदाहरणार्थ ऋग्वेदातील कथेत विमदान पुरुमित्राच्या इच्छेविरुद्ध त्याच्या कन्येचें हरण केल्याचा उल्लेख आहे पण या विमदाच्या कृत्याला पुरुमित्राच्या कन्येची संमति होती असेंहि वर्णन आहे. मागाहून झालेले धर्मग्रंथ व महाभारत या ग्रंथांमध्यें विवाहाचे निरनिराळे प्रकार सविस्तर वर्णिले आहेत. परंतु हे सर्व प्रकार पुढील तीन वर्गांत समाविष्ट करतां येतील (१) उभयतः वधूवराच्या संमतीनें झालेले ते प्राजापत्य, (२) वधूची किंमत देऊन केलेले आसुर. (३) आर्ष (म्हणजे ऋषीसंबंधीं) ब्राह्म किंवा दैव (४) व ज्यात वधूचें हरण करून लग्न केलं जातें ते क्षात्र किंवा राक्षस होत. या सर्व प्रकाराचा उल्लेख वैदिक वाङ्मयात सापडतो. याशिवाय जैमिनीय उपनिषद् ब्राह्मणातील च्यवनाची गोष्ट किंवा बृहद्देवतेंतील श्यावाश्वाची गोष्ट यावरून कोणीं एखाद्यानें काहीं विशेष गोष्ट केल्यास अथवा दुसऱ्या एखाद्या हेतुस्तव (कामगिराचा मोबदला म्हणून) आपली मुलगी बक्षिस देण्याची चाल होती.

लग्नसमारंभ —लग्नप्रसंगीं जे समारंभ होत असत. ते समारंभ आणि इंडो-जर्मन व इतर लोकातील समारंभ यात फारच साम्य असे. हे समारंभ फार मोठे असून त्यामुळें वधूवराचें ऐक्य कायम होत असून सुफलदायी होत असे या समारंभाला प्रथम सुरुवात वधूच्या घरीं होई व तिच्या घरीं वर, त्याचे नातेवाईक व स्नेही सोबती मोठ्या थाटानें जात व तेथें गेल्यावर वधूच्या नातेवाईकाची व त्याची भेट होई या जमलेल्या वऱ्हाडी मंडळींना मेजवानी देण्यासाठीं गायी मारल्या जात. वरानें वधूला एका दगडावर (अथवा योहल्यावरील सहाणेवर) नेल्यावर तिचें पाणिग्रहण करून घरांतील जो मुख्य अग्नि (गृह्याग्नि) त्याच्या भोंवतीं वर वधूच्या हातास धरून प्रदक्षिणा करतो हा विधि झाल्याशिवाय लग्न पुरें झालें असें समजत नाहींत आणि म्हणून या विधीला 'हस्तग्राभ' (पाणिग्रहण) असं नाव दिलें आहे. हे विधी आटोपल्यावर वर आपल्या विवाहित स्त्रीस मोठ्या थाटानें रथात मिरवणूक काढून आपल्या घरीं घेऊन जातो व हा समारंभ चालू असता काहीं मंत्र पठण केले जातात. घरीं गेल्यावर त्याच रात्रीं वधुवराची एकशय्या होत असते.

स्त्रीची मिळकत व तिचा दर्जा —लग्नानंतर कायद्याच्या दृष्टीनें नवराबायकोंचे परस्परसंबंध कसे होते याबद्दल विशेष माहिती उपलब्ध नाहीं. वधूच्या पित्याकडून वरास जी वरदक्षिणा किंवा हुंडा मिळे त्यावर व वधूची जी इतर काहीं मिळकत असे तीवरसुद्धा तिच्या नवऱ्याचाच हक्क असे असे मानण्यास हरकत नाहीं. महाभारतात सुद्धा स्त्रीधनाचा हक्क हळू हळू कबूल होऊं लागला होता ज्याप्रमाणें एखादा धनी आपल्या गुलामाना पूर्ण मालक असे त्याप्रमाणेंच नवऱ्याचा आपल्या बायकोवर ताबा असे असें मानणें चुकीचें होईल. तरीपण अठराव्या शतकामध्यें इंग्लंडात

बायकोला शिक्षा करण्याचा जो अधिकार असे तेवढा अधिकार वैदिक काळच्या लोकांना आपल्या स्त्रीवर गाजविता येत असे. त्याचें कौटुंबिक ध्येय उच्च दर्जाचें होतें व तें प्रत्यक्ष अमलात आणिलें जात असे हीहि गोष्ट आपणास नाकारिता येणार नाहीं. शिवाय आपल्या नवऱ्याच्या घरीं आल्यावर स्त्रीला महत्त्व प्राप्त होई, तिचा अधिकार तिच्या सासऱ्यावर, दिरावर व तिच्या नवऱ्याच्या अविवाहित बहिणींवर चालत असे. कदाचित् वरील वर्णन कुटुंबातील थोरल्या बायकोस लागू पडण्यासारखें असेल. आईबाप वृद्ध झाल्यावर घरांतील कर्तृत्व सर्वांत थोरल्या मुलाकडे जाई व अर्थातच त्याच्या बायकोस घरधनीणीचें महत्व प्राप्त होई. कारण अविभक्त कुटुंबात तिच्या इतर दिरांचें व नणंदांचें लग्न झालेलें नसे. तरी पण ज्या वेळीं सासरा धडधाकट असून कुटुंबांतील कर्ता पुरुष गणला जाई त्यावेळीं त्याला सर्वजण माने देत असत व थोरला मुलगा त्याचेच अमलाखालीं रहात असे, असें जें इतरत्र वर्णन आलें आहे तें विसंगत दिसत नाहीं. जर थोरल्या मुलानें वेगळें घर करून निराळा संसार थाटला असेल तर त्यालाहि असाच मान मिळत असे. शिवाय पत्नी यज्ञप्रसंगीं सहधर्मचारिणी अशी मानिली जाई, व म्हणूनच तिला ब्राह्मणग्रंथातून 'पत्नी' हें अन्वर्थक नाव दिलें आहे. याच ग्रंथात जाया या शब्दाचा फक्त लग्नाची बायको इतकाच अर्थ दिला आहे. यज्ञकर्मांतील वाटेकरीण असा याचा अर्थ होत नाहीं. या बाबतींत तिची योग्यता कमी कमी होत चालली होती. उदाहरणार्थ शतपथ ब्राह्मणात एका मताचा (हविःकरणाराचा) उल्लेख आहे त्यात तें कर्म करण्यास प्रथम पत्नीस बोलवित असत. परंतु नंतर उपाध्यायासच त्या कर्मासाठीं बोलवूं लागले. त्याच ब्राह्मण ग्रंथात स्त्रियाचा दर्जा कमी होत चालला होता अशाबद्दल इतर पुरावा सापडतो. हा दर्जा कमी होण्याचें कारण बहुत करून मताच्या प्रसं... अप्रमाणाच्या महत्वाची वाढती जाणीव हें असावं. मैत्रायणी संहितेंत सुद्धा स्त्रियाना द्यूत व मद्य याच्या वर्गात ढकललें असून ही तीनहि महापातकें गणलीं आहेत, तसेंच स्त्रीला 'अनृतं' असें म्हटलें असून तिचा संबंध निर्ऋति म्हणजे आपत्ति इत्यादींशी जोडला आहे. तैत्तिरीय संहितेंत स्त्रीला एखाद्या वाईट मनुष्याहून कमी गणलें असून काठक संहितेंत तर 'स्त्री आपल्या नवऱ्याशीं गोड गोड गोष्टी करून त्याजपासून आपणास पाहिजे त्या वस्तू मागून घेते' असें तिचें उपरोधिक वर्णन केलेलें आहे उलटपक्षीं स्त्रियांची स्तुति केलेलीहि पुष्कळ ग्रंथातून आढळते. स्त्रीला नवऱ्याची अर्धांगी म्हटलें असून तिच्यामुळेंच नवऱ्याला पूर्णत्व प्राप्त होतें असेंहि म्हटलें आहे. ऋग्वेदांत स्त्रियांच्यावर जी टीका आलेली आहे तिजबरोबर त्यांच्या सद्गुणांचेंहि वर्णन आलेलें आहे. तरी पण आपण जर ब्राह्मणग्रंथ काळजीपूर्वक वाचले तर आपणास एवढें कळून येईल कीं स्त्रियांचा दर्जा पुरुषांपेक्षा हळू हळू कमी होत चालला होता. कारण त्यात असा एक नियम आढळतो कीं स्त्रियांनीं पुरुषाच्या (आपल्या नवऱ्याच्या) मागाहून जेवावें. एखादेवेळीं नवरा रागानें बायकोस शिव्या देत असे; व नवऱ्याला उलट उत्तर न देणाऱ्या (अप्रतिवादिनी) स्त्रीची स्तुतिहि केलेली आहे. स्त्रियाना राजकारणात पडण्याची परवानगी नव्हती. सभेला पुरुषच जात, स्त्रिया जात नसत अशाबद्दल मैत्रायणी संहितेंत स्पष्ट उल्लेख आहे. उलटपक्षीं शिक्षणप्रसार जसजसा जास्त होऊं लागला तसतशी स्त्रियांची शिक्षणविषयक गोष्टींत प्रगति होऊं लागली उदाहरणार्थ याज्ञवल्क्याच्या दोन स्त्रियाच घ्या. यांपैकीं एकीनें तत्त्वज्ञानविषयात बरीच प्रगति करून घेतली होती. उपनिषद्‌ग्रंथांत बऱ्याच स्त्रियांचा गुरु म्हणून उल्लेख आला आहे. परंतु या विवाहित होत्या कीं नाहीं हें निश्चित सांगता येत नाहीं. पण स्त्रीचा जो विवाह व्हावयाचा त्याचा मुख्य हेतु म्हटला म्हणजे प्रजोत्पादन हा होय. या हेतूचा उल्लेख ऋग्वेद व तदुत्तर ग्रंथातून वारंवार केलेला आढळतो. संततीबद्दल इच्छा असणें हें ज्या समाजात बापाच्या बाजूनें नातें ...विलें जात होतें त्या समाजास अगदीं स्वाभाविक आहे. या इच्छेचें रूपांतर शेवटीं असें झालें कीं पुत्रानेंच बापाचें सर्व और्ध्वदेहिक कर्म करावें व बापाचा वंश पुढें चालू ठेवावा. औरस संतति नसल्यास दत्तक घेण्याची परवानगी होती. परंतु ही चाल ऋग्वेदकालीं संमत नसावी. कारण एखाद्या स्त्रीचा नवरा मृत झाला किंवा ह्यात असून ... संतति नसेल तर त्याच्या भावानें त्याच्या बायकोशीं संबंध ठेवून संतति उत्पन्न करावी अशा प्रकारची नियोगविवाहपद्धति ऋग्वेदकालीं रूढ होती असें वाटतें. अपुत्रता व संपत्तिविरहितता (अवीरता व अमति) या अवस्था सारख्याच गणल्या जात व त्यापासून रक्षण करावें (ही स्थिति नसावी) म्हणून अग्नीची प्रार्थना केलेली आहे. एखाद्याला मुलगी झाली तर त्याबद्दल कोणी कौतुक करीत नसे परंतु मुलगा होण्याबद्दल अथर्ववेदातील एका सूक्तात देवाची प्रार्थना केली आहे आणि मुलगी झाल्याबद्दल दुःख प्रगट केलें आहे. ऐतरेय ब्राह्मणात एक गाथा आलेली आहे तीत पुत्र हा परलोकातील प्रकाश [ज्योतिर्हपुत्रः परमे व्योमन्] असून मुलगी ह संकट (कृपण ह दुहिता) होय असें म्हटलें आहे. पण वैदिककाला मुलीच संगोपनच करीत नसत असें जें मागाहून झालेल्या संहिता ग्रंथावरून झिमर व डेलब्रुक यानीं अनुमान काढलें आहे तें सर्वस्वी चुकीचें असून त्याचा बोयलिंगनेहि निषेध केला आहे.

मु ला चा आ यु ष्य क्र म.—मुलांचें संगोपन करण्याचें काम आईवर सोपविलें जात असे. परंतु प्राचीन वाङ्मयावरून लहानपणीं मुलाचें आयुष्य कसें जात असें हें सांगता येत नाहीं. गर्भावस्थेचा काल दहा [चांद्र] मास गणला आहे. मूल जन्मल्यावरोबर प्रथम त्याला तूप व मध देत असत व नंतर स्तनपान करवीत असत. जन्म

[१]मु ष्टि ह न्, मु ष्टि ह त्या.—ऋग्वेद व अथर्ववेद यांत यांचा अर्थ अनुक्रमें ' हातांहातांची लढाई ( मुष्टियुद्ध ) करणारा ' व ' हातांहातांची लढाई ( मुष्टियुद्ध ) असाहि आहे. ( मुष्टिहन् ) म्हणजे पादचारी योद्धा –रथी नव्हे तो–असा अर्थ होतो. त्याचप्रमाणें अथर्ववेदांत रथी आणि त्यापासून भिन्न असा पत्ति ( पादचारी शिपाई ) व ऋग्वेदांत रथ व त्याहून निराळें पायदळ (ग्राम), असें दाखविलें आहे.

[२]यो ध.—ऋग्वेदांत ' योद्धा ' लढवय्या, या अर्थी हा शब्द आला आहे.

[३]र थि न् आ णि र थी.—ऋग्वेदांत आणि नंतरच्या ग्रंथांत ' रथांतून जाणारा —यांत रथी व सारथी या दोहों चाहि समावेश होतो–असा याचा मॅकडोनेल अर्थ करितो. ऋ. ५.८३,३ या ठिकाणीं सायणभाष्याप्रमाणें याचा अर्थ रथी, रथाचा स्वामी असा असून सारथी असा नाहीं.

[४]' र थे ष्ठा.—रथावर उभा राहणारा, रथांतून लढणारा असा याचा ऋग्वेदांत अर्थ आहे.

[५]शू र.—ऋग्वेदामध्यें नेहमीं येणारा व नंतरच्या वाङ्मयांत केव्हां केव्हां येणारा हा शब्द असून याचा अर्थ वीर, शूर योद्धा, असा आहे.

[६]स त्व न्.–ऋग्वेदांत व नंतरच्या ग्रंथांत कधीं कधीं योद्धा या अर्थानें हा शब्द आला आहे.

[७]महारथ.–(मोठा रथ असलेला ) रथांतील मोठा योद्धा. यजुर्वेदसंहितेंत अश्वमेधप्रसंगीं विशिष्ट कर्माच्या वेळीं प्रार्थिलेल्या एका मोठ्या योध्याचें नांव. महीधरभाष्यांत 'एकाः सहस्रं जयति महारथाः ' म्हणजे हजार योध्यांना जिंकणारा तो महारथ असा अर्थ दिला आहे.

[८]र थ गृ त्स.— तैत्तिरीय व वाजसनेयि संहितेंत आणि ऐतरेय ब्राह्मणांत हा शब्द आला असून मॅकडोनेल त्याचा अर्थ ' हुशार सारथी ' असा करितो. परंतु वाजसनेयि संहितेंत उवटभाष्य व महीधरभाष्य यामध्यें याचा अर्थ रथयुद्धकुशल असा दिलेला आहे; हुशार सारथी असा नाहीं. त्याचप्रमाणें ऐतरेय ब्राह्मणांत सायणभाष्याप्रमाणें राजपुत्र ( रथगृत्सो राजपुत्रः ) असा अर्थ असून एम्. हॉगनेंहि असाच अर्थ केला आहे.

[९]स व्य ष्ठा, स व्यष्टृ, स व्ये ष्ठ, स व्य स्थ.—मॅकडोनेल म्हणतो " या सर्व शब्दांचा अर्थ रथांतून युद्ध करणारा असा आहे. हा सारथ्याच्या डाव्या बाजूस असे. टीकाकाराच्या मतानें सव्यष्ठाचा अर्थ नुसता सारथी असा आहे. पण हा अर्थ चुकीचा आहे; या शब्दाचा असा अर्थ करण्याचें कारण शूद्र सारथ्याबद्दल पुढें उत्पन्न झालेला वातिद्वेष हें होय ( मॅकडोनेलनें हा शेवटीं केलेला तर्क काय आधारानें केला तें समजत नाहीं. ). शतपथ ५. ३, ४, ९ या ठिकाणीं सव्यष्ठ असा शब्द आहे. सायणभाष्यांत त्याचा अर्थ रथाच्या डाव्या भागांत बसणारा ( सारथी ) असा दिला आहे; रथांतील योद्धा असा दिला नाहीं.

[१०]सा दि न्.— अथर्ववेदांत याचा अर्थ घोडेस्वार —असाद म्हणजे पदाती याहून भिन्न अर्थी—असा आहे. अश्वसादी ( घोडेस्वार ) हा शब्द वाजसनेयि संहितेंत आला आहे. तैत्तिरीय ब्राह्मणांत आणि खुद्द ऋग्वेदांतहि अश्वारोहणाबद्दल स्पष्ट उल्लेख आहेत. ऐतरेय आरण्यकांत ( नेहमी ) घोड्याच्या बगलेच्या बाजूनें घोड्यावर बसतात ( मागून किंवा पुढून बसत नाहींत ) असें म्हटलें आहे. अश्वलायन सूत्रांत साद म्हणजे बसण्याचा घोडा– असा शब्द आला आहे.

### युद्धपराभव [ ऋग्वेद ]

| | | |
|---|---|---|
| अपाकृति | नाश ) | संवित |
| अभिभूति | आभूति | सह ( पराभव- |
| अभिभूवरी | पराजित | विता ) |
| अभिवेग | परशक्ति | |
| विरण ( संग्राम- | परिसूति | |

### युद्धविषयक किरकोळ [ ऋग्वेद ]

| | | |
|---|---|---|
| अजीति | कणूकयन्ती ( आ- | महासेन |
| अतूर्त | क्रोशमिच्छन्ती ) | मानुषप्रधन |
| अपर्वारवत् | काष्ठा ( रण ) | युध्यत् |
| अभीति ( शत्रूची- | चित्रसेन | युध्यमान |
| चाल ] | जिगीषा | युयुत्सत् |
| अभिपित्व [ अभि- | जिष्णु | योध्य |
| गमन ) | जेतव्य | रुधत् |
| अयुद्धसेन | जेत्व | वध्र |
| अयुध्य | जेन्य | वर्मण्वत् |
| अयोधृ | जैत्र | शत्रुतूर्य |
| अशत्रु | जैत्री | शिमीवत् |
| अषाह्ळ | त्वद् ( हिंसक ) | संयद्वीर |
| असेन्या ( सेना- | दस ( नाश ) | संसृष्टजित् |
| रहित ) | दुर्ग | सक्मन् |
| अहति ( अहनन ) | दुर्धर | संजयत् |
| आरुंधान ( निरो- | दुर्धर्तु | सत्पति |
| धक ) | देही | सर्ववीर |
| आविर्ऋजीक (सा- | पुरुषाद | सहीयस् |
| धनसहित) | पृतनाज | सिंच |
| आसक्र ( विना- | पृतनायत् | सुवीर |
| शक ) | पृतनायु | सुवीर्य |
| ऋजीप ( अनि- | पृतनासह | स्वगूर्त |
| वार्य ) | पृतनासाह् | स्वाष्ट्र |
| ऋजयन्ती | पृतन्यत् | हनन |

### [ तै. सं. ]

| | | |
|---|---|---|
| अराति ( शत्रु ) | क्षुद्र | जय |
| अश्वाजनि | गोध्र | " |

| | | |
|---|---|---|
| धानिक | वि. ) | शत्रु |
| पथिन् ( शत्रु ) | वध्रिम ( ,, ) | सपत्न |
| पवीरव | विक्रान्ति | मृक |
| युक्तग्रावन् ( मत्र- | विजय | |
| | [अथर्ववेद] | |
| अकवच | ध्वज | विद्देश्य |
| अपराजित | नीपाद् | विरथन |
| आभूति | पराभू | वृत्रहत्य |
| आहनन | पराभूति | वैर |
| ककमाकृत ( से- नावि. ) | पुनर्भुवा (सेनावि.) | संग्राम |
| | पृत | सन्धि |
| कवच | पृतनाजित् | सहस्रकुणपा |
| कवचपाश | पृतनाज्य | सहस्रनि |
| खृगल( चिलखत ) | पृतनासह्य | सेनी |
| ग्रावन् | प्रतिशत्रु | स्वयशस् |
| जय | युद्ध | स्वष्ट |
| जालदण्ड | [7] वप्र | हाविष्मत् |
| ज्याघोष | वर्मन् | हृद्बल |
| ज्यापाश | विजेषकृत् | |
| | [ वाजसनेयि संहिता ] | |
| प्रसिति | महावीर | संघात ( लढाई ) |
| | [ संहितेतर ] | |
| जैयाम्होद | [11] व्युष्ण | [13] बाणवन्त |
| [1] पताका | [12] प्रशास् | [14] समर |

[1] ऊर्जयन्ती.— लुडविग् म्हणतो कीं ऋग्वेदांतील एका उताऱ्यांत हें नामर ह्याच्या किल्याचें नांव आहे. तथापि त्या ऋचेपासून कांहींच अर्थबोध होत नाहीं. निश्चित अर्थबोध होत नाहीं हें जरी खरें असलें तरी लुडविगचा अर्थ चूक असें म्हणतां येत नाहीं, हेंहि तितकेंच खरें आहे.

[2] दुर्ग.— ज्याच्या जवळ जाणें कठिण असतें तो असा ह्याचा अर्थ असून ऋग्वेदांत हा शब्द नपुंसकलिंगी आलेला असून त्याचा अर्थ कधीं कधीं किल्ला किंवा माऱ्याचें ठिकाण असा होतो. सायणाचार्यांनीं पहिल्या ठिकाणीं ' संकट , व दुसऱ्या ठिकाणीं ' युद्ध , असा अर्थ केला आहे. परंतु दोन्हीं ठिकाणीं किल्ला असा अर्थ असणें संभवनीय आहे.

[3] देहि.— ऋग्वेदामध्यें दोन ठिकाणीं शत्रूच्या प्रतिकारार्थ बांधिलेली रक्षणाची जागा म्हणजे मातीची कामचलाऊ भिंत किंवा बांध अशा अर्थानें हा शब्द आलेला आहे. सायणांत एका ठिकाणीं देही याचा अर्थ 'पुरी' असा केला असून ७. ६, ५ येथें ( आसुरी ) विद्या असा केला आहे व ग्रिफिथ कोट असा अर्थ करतो.

[4] पाष्य.— ऋग्वेदामध्यें एके ठिकाणीं वृत्राच्या पराभवासंबंधानें हा शब्द आलेला आहे. दगडी तट असा ह्याचा अर्थ आहे. दुसऱ्या एका लेखांत त्या शब्दाचा अर्थ सोमवल्ली ठेंचण्याकरितां उपयोगी पडणारे दगड असा आहे.

[5] सिच्.— हा शब्द द्विवचनी आलेला असून ह्याचा अर्थ सैन्याच्या बगला व अनेकवचनी सैन्याच्या रांगा असा अर्थ आहे. सायणभाष्यांत सिच्यौ याचा अर्थ सिचमानौ भटौ म्हणजे अभिषेक केले जाणारे दोन राजे असा दिला आहे. ग्रिफिथ साहेबानें त्याचा अर्थ सैन्याचे दोन पंख असा केला आहे. अथर्ववेदांत असलेल्या या शब्दावर भाष्य लिहितांनां सायणानीं तो शब्द शुचः असा घेऊन त्याचा अर्थ शोचमानाः असा केला आहे.

[6] कवच.—अथर्ववेद आणि त्यानंतरच्या वाङ्मयांत हा शब्द उरस्त्राण या अर्थानें आला आहे. हें उरस्त्राण धातूचें करीत असत असें म्हणण्यास मात्र कांहींच आधार सांपडत नाहीं. परंतु तें धातूचेंच केलेलें असणें संभवनीय आहे. अथर्ववेदांत कवचपाश असा शब्द आला आहे त्या अर्थी तागाच्या उरस्त्राणाचा ( जें हिरोडोटसला माहित होतें त्याचा ) व त्या शब्दाचा संबंध असावा असें वाटतें.

[7] वप्र.—ह्याचा अर्थ तट असा कल्पनेनें बसविण्यासारखा पाठ अथर्ववेदामध्यें आलेला आहे.

[8] संग्राम.—ह्याचा मूळ अर्थ शांततेचे वेळीं किंवा युद्धाचे वेळीं भरलेली सभा. लढाईचे वेळची सभा सशस्त्र लोकाची असे. अथर्ववेद व मागाहून झालेले ग्रंथ ह्यांत ह्याचा नेहमींचा अर्थ युद्ध किंवा लढाई असा आहे. वैदिक काळच्या युद्धाविषयीं फारशी माहिती उपलब्ध नाहीं पण त्या वेळचीं युद्धें साधीं होतीं. प्रत्येक सैन्यांत पायदळ व रथी हे असत. हे दोघे एकत्र असत व पदाति लोकांचा पाडाव नेहमीं रथी लोकांकडून होई. हे रथी लोक क्षत्रिय किंवा त्याचे पहिल्या प्रतीचे उत्तम अनुयायी असत. पदाति लोकांजवळ चिलखतें फारसें नसे व लढाईचे वेळीं धनुष्याचाच ते उपयोग करीत. हें वर्णन झरक्सीसनें ज्या हिंदुस्तानांतल्या सैन्याच्या मदतीनें ग्रीसवर चाल केली अशा ज्या सैन्याचें हिरोडोटसनें वर्णन केलें आहे त्या वर्णनाशीं जुळतें. जे सरदार असत त्यांच्या जवळ उरस्त्राण असे, शिरस्त्राण (शिप्रा ) व हस्तघ्न ( हे धनुष्याच्या दोरीच्या घर्षणापासून रक्षण करण्याकरितां ) असत. रथावर सारथी बसे व त्याच्या डाव्या बाजूस योद्धा ( सारथि, सव्यष्ठा ) बसे. लढाईत घोड्यावर बसण्याची चाल नव्हती व ही घोड्यावर बसण्याची कल्पना वैदिक काळच्या कल्पनेला विसंगतच झाली असती. कारण त्या वेळचे वीर धनुष्यावरच सर्व मदार ठेवीत, व घोड्यावर बसून धनुष्यांचा उपयोग करणें सोयिस्कर नसे. त्या वेळचें लढण्याचें साधन म्हणजे धनुष्य. भाला, तरवार व परशु ह्यांचा क्वचितच उपयोग केला जाई. अथर्व ५. २४, ७ या ठिकाणीं जो संग्राम शब्द द्वितीयेचे अनेकवचनांत आला आहे त्याचा अर्थ युद्धाच्या वेळीं भरलेली सभा असा नाहीं. ग्रिफिथचें मतें संग्रामान् म्हणजे सैन्यें. सायण संग्रामान् या-

बद्दल समामम् असा पाठ घेऊन त्याचा अर्थ युद्ध असा देतो तै स ४ ७, १५ १ या ठिकाणीं जो समाम शब्द आहे त्याचा अर्थ युद्ध असाच दिसतो ऋ २ १२, ८ या ठिकाणीं येक्रन्दसीसंयती विह्वयेते। असे शब्द आहेत येथें संयती म्हणजे परस्पर सङ्कुच्छन्त्यौ असा अर्थ आहे. याचा अर्थ एकमेकांशीं मिळून चालणाऱ्या असा धरला तर पदाति व रथी असें सैन्याचे दोन विभाग कल्पिता येण्यासारखे आहेत, परंतु परस्परविरुद्ध दोन सेना एकमेकींशीं भिडणाऱ्या असा अर्थ केल्यास हीं भिडणारीं विरुद्ध सैन्यें पदाति व रथी अशीं द्विविध होतींच असे खात्रीलायक म्हणता येणार नाहीं अथर्व ७ ६४, १ या ठिकाणीं रथीव पत्तीन जयत्। असे शब्द आहेत, त्या ऐवजीं सायण रथाव पत्तीन जयत्। असा पाठ घेतो व त्याचा अर्थ 'रथवान् पुरुष पत्तीम् प्रमाम अन्यदीयी स्त्रीर्या वा नारीं यथा जयति एवम' असा करतो सैन्याची जातवार सघटित व्यवस्था होती कीं, नाहीं (जी व्यवस्था होमरच्या कवितेंत वर्णन केलेली आहे व जिचें अस्तित्व जर्मनीमध्यें टेसिटसनें आहे असें म्हटलेलें आहे ती) हें सांगणें कठिण आहे पण महाभारतात ज्ञाती एकत्र लढत असत व हीच स्थिती वैदिक काळातहि कमी-जास्त प्रमाणात होती हें निश्चित आहे शहराना वेढा पडत असे व लष्करी चौकी वगवून नाकेबंदी केली जाई असें ऐतरेय ब्राह्मणावरून दिसतें (उपसद्, प्रभिद्) कारण त्या वेळची हल्ला करण्याचीं जीं साधनें होतीं त्याच्या योगानें छापा घालून व हल्ला करून एखादें शहर घेणें हें त्रासदायक व खर्चाचें होतें हिलेब्रँट 'आपल्या उपनिषद्ग्रंथ' पुस्तकांत म्हणतो कीं, ऋग्वेदांतला पुरचरिष्णु हा एक प्रकारचा रथ होता. ट्रोजन घोड्याप्रमाणें हा रथ म्हणजे ज्या साधनानीं एखाद्या शहरावर रोमन लोक हल्ला चढवीत त्या साधनांची पूर्वतयारीच होय. नेहमींच्या संरक्षणार्थ व नवीन देश जिंकण्याकरिता जी युद्धें होत त्याशिवाय शेजारच्या मुलखावर घुरटे हल्ले नेहमींचे व वारंवार होत हा हल्ल्याचा हेतु जी लूट मिळेल (उदाज, निराज) ती राजानें व लोकानीं आपसात वाटून घ्यावी हा होय लढाईंत ध्वजाचा प्रचार असे व लढवये लोक दुदुंभि व बकुर या वाद्याचा उपयोग करीत असत. ऐ ब्रा १ २३ २ या ठिकाणीं जो उपसद् शब्द आहे त्याचा अर्थ तेथें उपसद् नावाचा होम असा आहे, सायण हा अर्थ करितो शहराला दिलेला वेढा असा तेथें अर्थ नाहीं ऋ ८ १ २-८ या ठिकाणीं पुरचरिष्णु याचा अर्थ सायणानें रथ असा केलेला नाहीं, व तो तेथें तसा सयुक्तिक दिसत नाहीं सायणानें पुर याचा अर्थ निवासस्थान असा केला आहे. चरिष्णव याचा अर्थ 'चरणशील असा' म्हणजे हिंडण्याचा शोकी असा दिला आहे

[9] ज्या ह्रो द —पचविंश ब्राह्मणात व्रात्याच्या शस्त्राचें जें वर्णन आहे त्यात व सूत्रग्रथात हा शब्द आला आहे याचा अर्थ कांहींसा संदिग्ध आहे कारण एका सूत्रग्रंथात 'अयोग्य धनु' असें याच्याबद्दल म्हटलें आहे व दुसऱ्या एका सूत्रात धनुष्क अनिषु (बाणाशिवाय धनुष्य) असाहि उल्लेख आहे तेव्हां याचा कोणत्या तरी प्रकारचें धनुष्य असाच अर्थ असावा

[10] प ता का —हा शब्द अद्भुत ब्राह्मणापूर्वी कोणत्याहि ग्रथात येत नाहीं याचा वैदिक पर्याय शब्द ध्वज असा आहे

[11] प्यु क्ष ण —शतपथ ब्राह्मणात धनुष्याचें आच्छादन या अर्थी हा शब्द आला आहे हें आच्छादन बहुतेक कातड्याचें केलेलें असावें

[12] प्र श्ला स —ऐतरेय ब्राह्मणात हा शब्द आला असून सेंटपीटर्सकोशाप्रमाणें त्याचा कुऱ्हाड किंवा त्यासारखें तोडण्याचें हत्यार असा अर्थ आहे

[13] वा ण व न्त —बृहदारण्यकोपनिषदात बाण अथवा बाणाप्रमाणें (तीर) अशा अर्थानें हा शब्द आला आहे वाजसनेयि संहितेंतहि हा शब्द बाणवान् असा असून याचा टीकाकारानीं भाता असा अर्थ केला आहे

[14] स म र —लढाई या अर्थी हा शब्द कौषीतकी ब्राह्मणात आला आहे गेल्डनेरच्या मतें ऋग्वेदातहि या शब्दाचा हाच अर्थ असावा

### वज्रनामें [ऋग्वेद]

| | | |
|---|---|---|
| अत्क | नेमि | शतपर्वन् |
| [1]अद्रि | परशु | शताश्रि |
| अशनि | पवि | शम्ब |
| असिन्वन | पवीरव | शरु |
| [2]ऋष्टि | बकुर | सहस्रभृष्टि |
| कुत्स | बाश्रि | सायक |
| कुलिश | भृष्टिमत् | सिध्म |
| गिरि | मेनि | [5]सृक |
| ज्यायत् | वज्र | [6]स्वधिति |
| तिग्म | वध | हेति |
| तुज | [4]वधर् | ह्रादुनि |
| दिद्युत | वृक | |
| नमस् | शतधार | |

### सैनिकांचे प्रकार [ऋग्वेद]

| | | |
|---|---|---|
| अकुशिन् | अश्महन्मन् | इषुमत् |
| अग्रयावन् | अष्ट्रन् | इषुध्य |
| अग्रिम | अस्तृ | चतुरनीक |
| अग्रिय | अस्य | निषंगिन् |
| अधिरथ | आग्निकृत् | पृतना |
| अभिसेन | आजिपति | प्रशर्धिनी |
| अयोग्र | आस्थातृ | ध्वजपति |
| अश्व | इषुवल | शतानीक |
| अश्मचक्र | | |

सैन्यनामें [ऋग्वेद]

| | | |
|---|---|---|
| अनीक | तिग्मानीक | बल |
| आजि | पृतना | [8] व्र |
| [7] जूर्णि | पृशनी | [9] सेना |

[तै. सं.]

| | | |
|---|---|---|
| अनीक | पृत्सुती | सेना |
| पृतना | संका | |

सेनाप्रकार [अथर्ववेद]

| | | |
|---|---|---|
| अनीक | [10] पत्ति | शतानीक |
| अभ्रपर्णी | पृतना | शत्रुतूर्य |
| सत्रभन् | वाहिनी | सादिन् |
| चमू | वीरपोष | सेना |
| जैत्र | वृजिन | सूर्यकेतु |
| (परकीयसैन्य) व्र | | हेतृ |

[1] अ द्रि—ऋग्वेदांत एका उताऱ्यांत हा शब्द "दडक" "दगड या अर्थी योजला आहे. म्हणून झिमर वैदिक कालांत युद्धांत गोफणीनें दगड फेंकीत असत असें अनुमान काढतो. परंतु तो उतारा इंद्राची मदत किंवा साहाय्य या संबंधानें लिहिला आहे, म्हणून तो काल्पनिक आहे. आणि मनुष्यांचीं युद्धें यांचा कांहीं संबंध त्या उताऱ्यांत नाहीं. बऱ्याच अंशीं तो शब्द इंद्राचें वज्र या अर्थी योजिला असावा.

[2] अ श नि.—ऋग्वेदांवरून हा शब्द गोफणीचा दगड अशा अर्थी आहे असें झिमर म्हणतो. त्याची तुलना अद्रि शब्दाशीं केली आहे. कोणत्याहि बाबतींत ही आयुधें इंद्राच्या पराक्रमांच्या वर्णनांत उपयोगांत आणिलीं आहेत म्हणून काल्पनिक आहेत. श्राडर हा अशन् हा शब्द याच अर्थी योजितो परंतु कोणत्याहि वेदाच्या उताऱ्यांत हा अर्थ नाहीं.

[3] ऋ ष्टि.—मरुत् यांच्या हातांतील अस्त्राचा द्योतक असा हा शब्द ऋग्वेदांत बराच वेळ उपयोगांत आणिला आहे आणि म्हणूनच तो विद्युल्लतेचा दर्शक असावा. 'प्राणघातक युद्धांतील भाला' असा अर्थ ऋष्टि शब्दाचा होतो असें झिमर म्हणतो पण तसा अर्थ कोणत्याहि उताऱ्यावरून दिसत नाहीं ऋ. १. १६९, ३ यांत इंद्राच्या प्रसिद्ध वज्राला ऋष्टि असें सायणाचार्य म्हणतात.

[4] व ध र्.—याचा अर्थ सामान्यत्वें शस्त्र असा आहे व ऋग्वेदामध्यें हा शब्द दैवी शस्त्राला लाविला आहे एवढेंच नव्हे तर मानुष शस्त्रालाहि लाविला आहे.

[5] सृ क.—ऋग्वेदामध्यें दोन ठिकाणीं याचा अर्थ इंद्राचें शस्त्र कदाचित भाला असा आलेला आहे.

ऋ. १०, १८०, २ सृक म्हणजे इंद्राचें वज्र व वा. सं. १६, २१ या ठिकाणीं भाष्यांत सृक याचा अर्थ वज्र असा दिला आहे.

[6] स्व धि ति.—ऋग्वेदामध्यें याचा अर्थ कुऱ्हाड किंवा सुरा असा आहे. हा सुरा यज्ञांतील (घोड्याच्या शरीराचे निरनिराळे भाग करण्याकडे उपयोगीं पडे. याचा ऋग्वेद संहितेंत; इतर सर्व ठिकाणीं लांकूड कापण्यास योग्य अशी कुऱ्हाड असा अर्थ असतो. एके ठिकाणीं कुऱ्हाड श्मोत्रावर तीक्ष्ण करण्याचा उल्लेख आलेला आहे. अथर्ववेदामध्यें जनावरांच्या कानावर खूण करण्याकरितां उपयोगीं पडणारी तांब्याची सुरी असा याचा अर्थ आहे. सुताराच्या कुऱ्हाडीचा दोनदा उल्लेख त्याच ठिकाणीं आलेला आहे व पुढें कुऱ्हाड असा सामान्य-अर्थ आहे. शस्त्र असा अर्थ मुळींच प्रचारात नाहीं.

[7] जू र्णि.—याचा अर्थ कोलीत असा आहे व तें झिमरच्या मतें वैदिक काळच्या आर्य लोकांचें एक शस्त्र होतें. पण ज्या अर्थी हें शस्त्र राक्षसांनीं उपयोग केल्याचा फक्त ऋग्वेदांतच उल्लेख आलेला आहे त्या अर्थी इतर युद्धाचे वेळीं याचा उपयोग केला जात असे असें खात्रीनें म्हणतां येत नाहीं. ऋ. १. १२९, ८ या ठिकाणीं येणाऱ्या "जूर्णि" शब्दाचा अर्थ सायण "सेना" म्हणजे सैन्य असा करितो. वेदार्थयत्नकारहि या शब्दाचा अर्थ "सेना" असाच करतात. ग्रिफिथ व इतर यूरोपियन पंडित "जूर्णि" याचा अर्थ "कोलीत" असा करतात; परंतु तो फारसा लागू पडत नाहीं. निरुक्त ६.४ या ठिकाणीं जूर्णि याचा अर्थ शक्तिः असा दिला आहे.

[8] व्र.—रॉथचे मतानें ऋग्वेदांत व अथर्ववेदांत सैन्य अशा अर्थानें आलेला आहे. झिमरच्या मतानें व्र [व्र चें स्त्रिलिंगी रूप) याचा अर्थ एके ठिकाणीं विश याचा भाग व (सुबधु) भाल्यांतला लोकांचें बनलेलें खेडेगावांतलें सैन्य असा अर्थ आहे. उलटपक्षीं पिशेल म्हणतो कीं, जेथें जेथें हा शब्द आलेला आहे तेथें तेथें स्त्री मग ती सामान्य असो किंवा समन नावाच्या मेजवानीला जाणारी असो किंवा लोकांनीं ठेवलेली वेश्या असो किंवा अलंकारिक रीतीनें या वेश्याशीं तुलना केलेलीं सूक्तें असोत हे अर्थ बरोबर दिसतात.

[9] से ना.—या शब्दाचा मूळचा अर्थ अस्त्र असा असून याच अर्थानें तो ऋग्वेद व अथर्ववेद यांमध्यें आलेला आहे. व नंतर त्याचा सैन्य असा नेहमींचा अर्थ झाला. ऋग्वेदांतील सर्व उताऱ्यांत सायणानें सेना याचा अर्थ अस्त्र असा कोठेंहि केला नाहीं. सैन्य असाच केला आहे. वेदार्थयत्न ग्रंथांत वरील उताऱ्यांपैकीं बहुतेक ठिकाणीं सेना शब्दाचा बाण असा अर्थ केलेला आहे. अथर्ववेद ८.८,७ येथें सेना याचा अर्थ सैन्य असा ग्रिफिथनें केला आहे, व तोच बरोबर दिसतो.

[10] प त्ति.—अथर्ववेदांमध्यें रथी याच्या उलट पायदळातला शिपाई असा अर्थ या शब्दाचा आहे. रथी पत्तीचा पराभव करतो असेंहि वर्णन आहे. वाजसनेयि संहितेंतील शतरुद्रीय प्रार्थनेमध्यें रुद्राला जीं विशेषणें दिलेलीं आहेत त्यांपैकीं पत्तीनांपति असें एक विशेषण दिलेलें आहे.

अथर्ववेद ७. ६४, १ या ठिकाणीं पत्तीम् याबद्दल पत्नीम् असाहि पाठ आहे व हाच पाठ सायणानें घेतला आहे. वा. सं. १६. १९ या ठिकाणीं येणाऱ्या पत्ति शब्दाचा अर्थ त्यावरील भाष्यात 'हस्त्यश्वरथ पदाति संख्या पत्तिः' असा दिला आहे.

## सार्वजनिक कामें.

### कूपनामें [ ऋग्वेद ]

| | | |
|---|---|---|
| अंहूरण (अन्धकूप) | कर्त | केवट |
| अवत[1] | कशि | खात |
| अश्मचक्र | काट | नृपाण |
| अश्मास्य | कातु | वय |
| उत्स | कारोतर | वव्र |
| उत्सधि | कुशय | सूद |
| उद्रिण(जलयुक्तकूप) | कूप[2] | स्तिप |
| ऋश्यद | | |

### जलाशय [ ऋग्वेद ]

| | | |
|---|---|---|
| उत्सधि | खात | पूर्त |
| कियाटु(पुष्करिणी) | गोअर्णस् | प्रपा[3] |
| कुल्या (पाट) | तीर्थ | श्मशा (कालवा) |
| खनित्रिम (कालवा) | तूग्वन् | सुतीर्थ |

[ तै. सं. ]

| | |
|---|---|
| खन्या (पाट) | प्रपा |

[ अथर्ववेद ]

| | | |
|---|---|---|
| उत्सर् (उच्छ्वास) | घृतन्हृद (पुष्करिणी) | प्रपा |
| कुल्या | तीर्थ | वर्त्र[4] (तळ्याचा बाध) |
| कूप | पुष्करिणी | |
| खात | | वापी |

### मार्ग [ ऋग्वेद ]

| | | |
|---|---|---|
| प्रपथ | रुद्रवर्तनि | वर्तनि |
| प्राध्वन् | रश्म | वृजिनवर्तनि |
| रघुवर्तनि | | |

[ तै. सं. ]

| | | |
|---|---|---|
| अंजसायनी | पथ्या | सुपथ |
| अध्वन् | रथस्पष्ट | सेतु |
| पथ | वर्तनि | स्रुति |
| | वर्मन् | |

[अथर्ववेद]

| | | |
|---|---|---|
| अध्वन् | रथ्या | व्यध्व |
| अनायन | प्रपथ | सुपथ |
| पथ | परिरथ्य | |

[1] अवत.— उत्स म्हणजे स्वाभाविक झरा याच्या उलट कृत्रिम म्हणजे खणून तयार केलेली विहीर या अर्थानें अवत शब्द ऋग्वेदांत अनेक ठिकाणीं आढळतो. उत्स हा शब्दहि कांहीं ठिकाणीं कृत्रिम विहिरीकरितां वापरलेला आहे. अशा विहिरी झांकून ठेवीत असत आणि त्यांतील पाणी कधींहि आटत नसे, असें वर्णन आहे. त्या विहिरींतून पाणी दगडाच्या चाकाला दोर, पोहोरा लावून काढीत असत. पाणी वर काढल्यावर तें लांकडाच्या भांड्यांत ओतीत असत. कधीं कधीं त्या विहिरींतील पाणी रुंद पाटांच्या योगानें शेतांस उपयोगांत आणीत असत.

[2] कूप.— ऋग्वेद आणि त्यानंतरचे वाङ्मयांत खाच किंवा कृत्रिम खळगा ह्या अर्थी हा शब्द आला आहे. कांहीं ठिकाणीं हे खड्डे अतीशय खोल असावेत, कारण एका कथेंत त्रित हा एका खळग्यांत पडला असून दुसऱ्याच्या मदतीशिवाय बाहेर निघूं शकला नाहीं असा उल्लेख आला आहे.

[3] प्रपा.—याचा अर्थ वाळवंटांतलि ' झरा ' असा आहे. व याचा उल्लेख ऋग्वेदाच्या एका वचनांत आलेला आहे. अथर्ववेदांत याचा नुसता ' पिणें ' किंवा ' पेय असाच अर्थ होतो.'

[4] वर्त्र.—अथर्ववेद व तैत्तिरीयब्राह्मण ह्यामध्यें ह्याचा अर्थ एखाद्या तळ्याचा बाध असा आहे. पूर्वींचे लेख, भाष्यकार व हस्तलिखीत प्रती ह्यांत ' वर्त्र ' हा शब्द आलेला आहे.

## खेळ

### खेळ व खेळसंबंधीं [ ऋग्वेद ]

| | | |
|---|---|---|
| अक्ष[1] (फांसे) | ग्राम (डाव) | मृगण्यु |
| अंकुशिन्(अक्षयुक्त) | तपन [तापक = | यातु (जादूगार) |
| आजि (शर्यत) | दाव्(जुगार) [अक्ष | लक्ष (पण) |
| इरिण[2] | देवन | वराहयु |
| कार्ष्मन्[3][शर्यतीच्या- | देवमान [जुगारी] | व्रन् [ व्याध ] |
| खुणेचें लांकूड] | परिषद[4] | श्वघ्नी |
| काष्ठा[5] | पुनर्हण | सप्त्य ( शर्यतीचें- |
| कितव | प्रतिदीविन् | सुदेव्ये |
| क्रीडि | प्रैहा | |
| क्षेप्नु | | |

[ तै. सं. ]

| | | |
|---|---|---|
| अक्ष | अधिदेवन | क्रीडा |
| अक्षसंग | आख(शिकार पकडण्यासाठीं केलेली खांच ) | त्सारी ( शिकारी— मनुष्य ) |
| अक्षवाप | | |

[ अथर्ववेद ]

| | | |
|---|---|---|
| अंश (द्यूतलक्षण) | कृत | द्यु |
| अतिदीव्न् (जुगारी) | क्रीडन्ति (खेळणें क्रि.) | द्यूत |
| अतुर (द्यूतक्रीडक) | गाष्ठा शर्यतीचें— मर्यादा काष्ठ) | प्रतिदीवन् |
| अधिदेवन (द्यूतस्थान) | | शेपण(फासे टाकणें |
| अप्सरस् (द्यूतदेवता) | ग्लह (डाव) | श्वघ्नी |

संवसव साधुदेविनी

'अक्ष.—ऋग्वेद व तदुत्तर ग्रंथ यामध्यें ह्या शब्दाचा एकवचनी आणि अनेकवचनी असा वारंवार उपयोग केलेला आढळतो. त्याचा अर्थ 'फांसा' आणि 'फासे', असा एकवचनी आणि अनेकवचनी अनुक्रमें केलेला आढळतो. घोड्याच्या शर्यतीबरोबर फासे खेळणें हा वेदकालीन आर्यांचा मुख्य खेळ होता, परंतु वाङ्मयात ह्या खेळाचा पुष्कळ वेळां निर्देश केलेला असला तरी तो कोणच्या तऱ्हेनें खेळत असत ह्याचें बरोबर चित्र काढणें फार कठीण आहे. अक्षाचे उपयोग पुढीलप्रमाणें आढळून येतात. (१) पदार्थ– हे फासे "विभीदक" नावाच्या कठीण कवचीच्या फळाचे केलेले असत. ह्या फाशांचा निर्देश ऋग्वेद आणि अथर्ववेद ह्या दोहोंतहि केलेला आढळतो. म्हणून त्याला "पिंगट" (बभ्रु) आणि "उघड्या जागेवर जन्मलेला" असें म्हणतात. अग्न्याधान्याच्या वेळीं फाशाच्या खेळाचें वर्णन आहे त्यात आणि राजसूय यज्ञप्रसंगींहि फासे कशाचे करीत हें सांगितलेलें नाहीं परंतु विभीदकाच्या फळाऐवजी सोन्याच्या तुकड्याचा प्रसंगविशेषीं उपयोग होत असे हें संभव्य आहे. अर्वाचीनकालीं कवड्याचा उपयोग फाशाकडे होतो पण त्याचा वैदिक वाङ्मयात निर्देश केलेला आढळत नाहीं. (२) संख्या—ऋग्वेदात फासे खेळणाराचें "समूहाचा अग्रेसर" (सेनानीर्महतो गणस्य) असें वर्णन केलें आहे. आणि दुसऱ्या वचनात त्यांची संख्या "त्रिपंचाशः" अशी दिली आहे. याचा अर्थ निरनिराळ्या ग्रंथकारांनीं निरनिराळा केला आहे. लुड्विग, वेबर, आणि झिमर हे त्या शब्दाचा अर्थ पंधरा असा करितात. परंतु मॅकडोनेल तें व्याकरणदृष्ट्या क्वचितच् संभवनीय आहे असें म्हणतो. रॉथ आणि ग्रासमन हे त्याचा अर्थ "त्रेपन्न" असा करितात.व ल्यूडर्स दोडर्शे करतो तथापि तो म्हणतो कीं, अगणित संख्या दाखविण्याकरिता ह्या शब्दाचा उपयोग होत असावा लहान संख्या दाखविण्याकरिता ह्या शब्दाचा उपयोग करितात असा अर्थ आहे असें दर्शविण्याकरिता झिमर ऋग्वेदातील "ज्याच्या जवळ चार आहेत त्याला भितो" हा उतारा देतो. परंतु तो उतारा खेळ खेळण्याच्या रीतीविषयीं आहे. (३) खेळाची रीति—अर्वाचीन संहिता आणि ब्राह्मण ह्यांतील पुष्कळशा उताऱ्यात फासे खेळण्यासंबंधीं कांहीं शब्द सापडतात. तैत्तिरीय संहितेंतील नावें कृत, त्रेता, द्वापर, आस्कन्द, आणि अभिभू हीं आहेत. पुरुषमेधामध्यें जे बळी देतात त्यांतील कितव हा अक्षराजाला, आदिनवदर्श कृताला, कल्पिन् त्रेताला, अधिकल्पी द्वापाराला, आणि सभास्थाणु आस्कन्दाला देतात असें वाजसनेयि संहितेंत म्हटलें आहे. त्याच प्रसंगांचे तैत्तिरीय ब्राह्मणातील शब्द ग्लहि, कितव, सभावी, आदिनवदर्श, बहि:सद, आणि सभास्थाणु हे आहेत आणि देवता अक्षराज, कृत, त्रेता, द्वापार, आणि कलि या आहेत. कलीचें दुसरें नाव अभिभू असें असावें असें शतपथ ब्राह्मणावरून वाटतें आणि त्याच वेळच्या तैत्तिरीय आणि वाजसनेयि संहितेंतील यादींवरून असें वाटतें कीं, अभिभू आणि अक्षराज हे दोन्हीहि एकच होत. पण तैत्तिरीय ब्राह्मणांतील यादींत दोहोंचाहि उल्लेख केलेला आहे. वरील डावांची काहीं नावें ऋग्वेद आणि अथर्ववेद ह्यातहि आढळतात. कलीचा निर्देश अथर्ववेदात केला आहे आणि ऋग्वेदातील पुष्कळशा वचनात कृत म्हणजे "डाव" (पण किंवा जिंकलेलें धन नव्हे) असा अर्थ आहे असें ल्यूडर्स दाखवितो. आणि हाच अर्थ अथर्ववेदातहि आहे. आणखी ऋग्वेदातील एका वचनावरून एकापेक्षा पुष्कळ अधिक डावाचीं नावें होतीं असें दिसतें. देवाची तुलना धन देणारे आणि नाश करणारे डाव यांशीं केली आहे, यावरूनहि वरील गोष्ट स्पष्ट होते. डाव कोणच्या तऱ्हेनें फेंकीत असत हें काहीं कळत नाहीं, सेन्टपीटर्सबर्ग कोशावरून असें अनुमान निघतें कीं, वरील जीं नावें आहेत तीं ४, ३, २ अथवा १ असा चिन्हांकित फाशाना दिलेली असावी अथवा तशा खुणा केलेल्या फाशाच्या बाजूला लावीत असत आणि हा अर्थ आधुनिक टीकाकारांना मान्य आहे असें दिसतें. परंतु पहिल्या अर्थाला काहीं आधार सापडत नाहीं आणि दुसऱ्या अर्थाविषयीं विचार केल्यास विभीदक फळाचा उपयोग फाशाकडे होत असला तर आकारावरून त्या फळाची अमुक बाजू वरची असें सांगणें निश्चितपणें संभवत नाहीं. वरील शब्दांचा अर्थ अग्न्याधेयांतील खेळाच्या विधीचें वर्णन आणि राजसूयातील विधींचें वर्णन यांच्या योगानें बराच विशद झाला आहे. खेळांतील बारीक सारीक गोष्ट जरी खात्री लायक माहीत नाहीं तरी एवढें मात्र दिसतें कीं हा खेळ म्हणजे फाशावरील समसंख्या बहुत करून जी चारनें भागिली जाईल अशी संख्या मिळविणं आणि अशाच संख्येला कृत असें म्हणतात. दुसरे तीन डाव म्हणजे चारनी भागून जर शेवटीं तीन उरले तर त्याला त्रेता असें म्हणत, दोन उरले तर द्वापार एक उरला तर कलि. जर पाच हा भाजक असेल आणि ह्या भाजकानें भागून जर खालीं काहींच उरलें नाहीं तर त्याला कलि म्हणत, खालीं चार उरलें तर त्याला कृत आणि तीन उरले तर त्रेता आणि ह्या प्रमाणें फाशावर कोणत्याहि तऱ्हेचें आकडे खोदलेले नसत तर एकंदर फाशांच्या संख्येची बेरीज करावी लागत असे. ऋग्वेदात वर्णन केलेला खेळ त्याच प्रमाणें खेळत असले पाहिजेत. पण त्यांतील किरकोळ गोष्टींची माहिती मिळत नाहीं. फासे खात्रीनें पुष्कळ असत आणि चार हा डाव टाकावयाचा व एक पडला कीं हरावयाचें या गोष्टीवरून कृत हा शब्द डाव जिंयण्याला का वापरीत याचा उलगडा होतो. दुसऱ्या पक्षीं अथर्ववेदात कली हाच फासा खेळ जिंकावयास पाहिजे असा उल्लेख आहे, एका अर्थी व्यवहारांतील खेळ हा विधींतील खेळांत खेळ

णारे वहुधा फक्त जितके फासे जरूर असत तितकेच घेत असत असें वाटतें यामुळें खेळ खेळलें असता कांहीं अशुभ गोष्टी होण्याचा संभव असे व तो टाळावा म्हणून असें करीत असावे असें दिसतें. व्यावहारिक खेळात पुढीलप्रमाणें खेळत असत असें ल्युडर्स सुचवितो. एकजण खेळणाऱ्याच्या जागेवर फांसे टाकून कांहीं दान घेत असे, नंतर दुसरे *चारानीं किंवा पाचानीं भाग जाणारी संख्या होईल अशी त्या दानात फासे टाकून भर घालण्याचा प्रयत्न करी.* खेळणाऱ्यामध्यें अजमास करण्याची शक्ति पाहिजे ह्यावर जे पुढील ग्रथात ( उ० नलकथेंत ) जोर दिलला आढळतो त्यावरून हा खेळ असाच खेळत असावे असें वाटतें खेळामध्यें फळी वगैरेचा उपयोग करीत नसत परंतु फासे टाकण्या करिता जमिनींत एक खोलगट जागा करीत असत ( अधिदेवन, देवन, इरिण ). फासे फेंकण्याकरता पेटी नसे परंतु फासे ठेवण्याकरिता मात्र असे ( अक्षावपन ) डावाला अथवा फेंकीला प्राचीन ग्रंथात ग्रह अथवा ग्राभ असें म्हणत. पणाला विज ' असें म्हणत जुगारामध्यें अतीशय नुक्सान होत असे. जुगार खेळणारा आपलें सर्व धन आणि त्याची बायको देखील गमावली म्हणून शोक करीत असल्याचें ऋग्वेदात वर्णन आहे. छांदोग्य उपनिषदात खेळाचा दुसरा प्रकार उल्लेखित आहे असें ल्यूडर्स म्हणतो.

[2]इ रि ण — ऋग्वेदोत्तर संहिता आणि ब्राह्मणें यात हा शब्द जमिनींतील भेग ह्या अर्थी बराच वेळ उपयोगात आणिला आहे. *पिशेल म्हणतो कीं हाच अर्थ ऋग्वेदांतील तीन स्थलीं लागू पडतो. एका ठिकाणीं ती भेग पाण्यानें* होत असावी ( अपाकृतम् ) असें दिसतें. ऋग्वेदातील दुसऱ्या *उताऱ्यात ह्या शब्दचा अर्थ अक्ष फेंकण्याची जागा असा* आहे. आणि म्हणूनच अक्षफलकाला हें नाव देत असत असें पिशेल म्हणतो. कारण त्याला भोकें असून त्यात फासे टाकण्याचा प्रयत्न करीत असत असें त्यास वाटतें. पण अक्षफलक पूर्वी उपयोगात नसे. ल्यूडर्स म्हणतो कीं पिशेलचा हा अर्थ चूक आहे अक्ष इरिण ह्या नावाच्या खड्ड्यांत फेंकीत असत आणि तो खड्डा जमीनींत असला तरी तो स्वाभाविक नसे तर मुद्दाम करीत असत. हा अर्थ सायण व टीकाकार दुर्गाचार्य यास मान्य आहे.

[3]का ष्ठा. —शब्दश: अर्थ ' खांच , तास, फणी, असा आहे. हा शब्द ऋग्वेदात फक्त आला असून तेथें रथाच्या शर्यतीच्या अवसानभूमीचें नाव असा त्याचा अर्थ आहे. बहुतकरून शर्यत खेळणारे त्या अवसानस्थानाला वळसा देऊन पुन्हा पहिल्या जागेवर येत असत.

[4]दे व न — ऋग्वेदामध्यें जुगारसंबंधानें हा शब्द एक-दोन आला आहे. ज्या ठिकाणीं फासे टाकीत ती जागा असा ह्याचा अर्थ असला पाहिजे ( याला अधिदेवन असेंहि म्हटलेलें आहे ) व निरुक्तावरील टीकेंत दुर्गाचार्यानें ह्या देवनचा असाच अर्थ दिलेला आहे. सायणभाष्यांत देवनद्यूत असा अर्थ आहे. निरुक्ताच्या टीकेंत 'देवन' याचा अर्थ आस्तार आथरी असा केला आहे. म्हणजे हें द्यूतस्थान असावें.

[5]प रि प द.—ऋग्वेदामध्यें पकडल्यास केलेली गर्ता असा ह्याचा अर्थ आहे.

[6]*प्र हा —हा शब्द ऋग्वेदात, अथर्ववेदात आणि पंचविंशब्राह्मणात आला असून याचा अर्थ ' जयनिक्षेप ' असा फाशाच्या खेळात घ्यावयाचा.* याचा सामान्यतः 'फायदा' किंवा 'लाभ' असा अर्थ होतो. ऋग्वेदात सायणभाष्यात प्रहा म्हणजे प्रहंता असा अर्थ केला आहे.

### गृ ह

### गृहनामें [ ऋग्वेद ]

| | | |
|---|---|---|
| अज्मन् | गोह | रथक्षय |
| अन्तरावत् | छादिस् | ( तबेला ) |
| ( गुप्तगृह) | [5]छर्दिस् | रयिस्थान |
| अरिष्ट | छाया | ( धनगृह ) |
| अमा | त्रिधातु | वयावत् |
| अवमार्जन | दम | (शाखायुक्तगृह) |
| ( अश्वासस्नान | दशान्तरुष्य | वरूथ |
| घालावयाचें | (निवास स्थान) | वर्ती |
| गृह ) | दस्म | वर्मन् |
| अस्त | दीर्घनीथ | वश |
| अस्व | दीर्घप्रसद्मन | वसति |
| उरुक्षय | दुर्दम | [10]वेश्मन् |
| ( विस्तीर्णगृह) | [6]दुरोण | व्रज |
| उरुक्षिति | [7]दुर्य दुर्योण | (गौळवाडा) |
| ओकस् | [8]धामन् | शरण |
| ओक्य | धिष्ण्य | शर्मन् |
| (विश्रान्तिस्थान) | नाभि | शसन |
| कुलाय | निवेश | शुक्रसद्मन् |
| कृत्ति | निवेशन | सदस् |
| कुदर | निषद् | सदन |
| कृपनीळ | नीळ ( लाकडी | सद्मन् |
| क्षय | गृह ) | सहस्रस्थूण |
| क्षामन् | नीळय | सहस्रद्वार |
| गभीर | नृपीत | सुशरण |
| [1]गय | नृषदन | सुस्थान |
| गर्त | पस्त्या | स्वसर |
| गृभ | महागय | हर्म्य |
| [2]गृह | योनि | द्वार |

[ तै. सं. ]

| | | |
|---|---|---|
| अश्मन्मय | अस्त | [11] आवसथ |

| | | |
|---|---|---|
| गृह | नृपद् | शरण |
| दम | नृपदन | सदन |
| दुरोण | प्रतिष्ठा | सद्म |
| निशान्त | [१२] प्राचीनवंश | सप्तदशच्छदि |
| नीस्त | वास्तु | सूपसदन |

[ अथर्ववेद ]

| | | |
|---|---|---|
| अक्ष ( द्यूत शाला ) | त्रिधातु(तिघईघर) | वसाना ( शाला ) |
| | त्रिभुज (,,) | व्रज ( गोठा ) |
| अश्वावती (शाला ) | दशपक्ष | वास्तु |
| अष्टापक्ष | दुर्य | [१५] शाला |
| अस्तक | द्विपक्ष ( दुखांची ) | ऐयस्केत |
| आयतन | धरुणी ( शाला ) | षट्पक्ष |
| आवसथ | धामन् | सद् |
| उत्स | नीड ( घरटें ) | सदन |
| उपानस | पयस्वती [शाला ] | सदोहविर्धान |
| ऊर्जस्वती [ शाला] | परिधि [ प्राकार ] | सद्मन् |
| कुलाय ( घरटें ) | पर्यागार | सनिस्राक्ष |
| खिल ( गोठा ) | पस्त्य | सुक्षय |
| गृह | पुरुदंसस् | सूनृतावती |
| गोमती ( शाला ) | पूतधानी( शाला) | स्थूणा ( शाला ) |
| घृतवती ( " ) | [१३] प्रतिष्ठा | स्वसर |
| चतुष्पक्ष(चौसोपी) | [१४] बृहच्छन्दस् | स्वादुसम्मुद(स्वाद्वन्नसंपन्नगृह ) |
| छदि | भूमिगृह (तळघर) | |
| छर्दि | भूरिधन | हर्म्य |

[ संहितेतर ]

| | |
|---|---|
| [१६] अगार | [१७] प्रासाद |

गृहविशेष [ ऋग्वेद ]

| | | |
|---|---|---|
| अन्तःपेय ( मदिरा गृह ) | ध्वसन ( गायींचें निवासस्थान ) | [१८] व्रज(गौळवाडा) |
| | | शसन ( खाटिकखाना ) |
| अन्तरुष्य ( गुप्त-गृह ) | नहन ( गोठा ) | |
| | नीळ | सहस्रद्वार ( वरुणाचें गृह ) |
| अग्निगृह ( श्वशुर-भोजनगृह ) | नीळय | |
| | नृपीति | सुक्षय |
| अश्वपस्त्य | रथक्षय ( तबेला ) | सूना |
| [१९] गोत्र | रयिस्थान ( खजिना ) | [२०] स्वसर [गोठा] |
| गोष्ठ ( गोठा ) | | [२१] हर्म्य |

[ वाज. सं. ]

| | |
|---|---|
| [२२] अग्निशाला | आपसगृह |

गृहाचे अवयव [ ऋग्वेद ]

| | | |
|---|---|---|
| [२३] आता ( दाराची चौकट ) | [२५] ऊर्दर (धान्याचें कोठार ) | [२६] दुर् ( " ) |
| | | द्वार् |
| [२४] उपमित् | ख ( द्वार ) | [२७] द्वार् |
| [२८] द्रुपद | विवर | [३०] स्थाणु |
| [२९] मयूख ( खुंटी ) | संधि (प्रवेशस्थान) | स्थूणा [ खांब ] |
| मेता ( स्थूणा ) | सूद ( चिखल ) | |
| वक्षय ( खांब ) | स्कंभ [ खांब ] | |

[ तै. सं. ]

| | | |
|---|---|---|
| गोष्ठ | मृगाखर [ गौळवाडा ] | स्यमृ |
| छदि | | स्थाणु |
| बिल | रराट ( तोरण ] | |
| [३१] मेथि | व्रज | |

[ अथर्ववेद ]

| | | |
|---|---|---|
| आष्ट्री [ पचनशाला ] | [३३] परिमित् | स्तम्भ |
| | [३४] पलद ( ओमण ) | स्थाणु |
| गोष्ठ | | स्थूणा |
| छदि [ छप्पर ] | [३५] प्रतिमित् [खांब, तुळई.] | सद |
| द्वार | | हविर्धान |
| [३२] पक्ष [ पाखें ] | स्तम्य | |

[ संहितेतर ]

| | | |
|---|---|---|
| [३६] अर्गल | [३९] भित्ति | [४२] स्तंभ |
| [३७] परिघ | [४०] वृत्रशंकु | |
| [३८] प्राकार | [४१] शीर्पण्य | |

[१] गय.—गय म्हणजे घर. ऋग्वेदांत नेहमी व तदुत्तर ग्रंथात कधीं कधीं येणारा हा शब्द आहे. गय या शब्दाच्या अर्थात घर, घरातील सामान व मनुष्यें यांचाहि अंतर्भाव होतो.

[२] गृह.—हा शब्द बऱ्याच वेळा एकवचनी व त्यापेक्षा अधिक वेळा अनेकवचनी आला असून त्यानें वेदकालीन आर्यांच्या गृहरचनेचा बोध होतो. दम आणि दम या शब्दांचाहि तोच अर्थ आहे. परंतु पस्त्या आणि हर्म्य यांच्या अर्थात घर आणि भोंवतालचें आवार यांचा समावेश होतो. घरामध्यें मोठ्या थोरल्या कुटुंबाचाच समावेश होतो असें नसून गुरेंढोरें व मेंढ्या यांचेंहि तें रात्रीं आश्रयस्थान असे. अनेकवचनी प्रयोगावरून घराला पुष्कळशा खोल्या असाव्यात, तें चांगलें बंदहि करिता येत असावें. दाराचा (द्वार, द्वार्) उल्लेख पुष्कळ वेळा आला असून या द्वारावरूनच घराला दुरोण हें नाव मिळालें. प्रत्येक घरात अग्नि नेहमी प्रदीप्त असे. गृहरचनेविषयीं फारशी माहिती मिळत नाहीं. कदाचित् दगडाचा उपयोग न करिता मेगॅस्थनीजच्या वेळेप्रमाणें लाकडाचा उपयोग करीत असावेत. अथर्ववेदाच्या ऋचांनीं मात्र गृहरचनेवर थोडासा प्रकाश पडतो, तथापि बारीक सारीक गोष्टींचा चांगलासा बोध होत नाहीं. कारण पुष्कळसे उपयोगात आणलेले गृहविषयक शब्द त्याच अर्थानें पुन्हा येत नसल्यानें त्यांचा अर्थ स्पष्ट होत नाहीं. झिमरच्या मताप्रमाणें चांगल्या जागेवर चार खांब [ उपमित् ] उभे करून त्यांना

टेंकू [ प्रतिमित् ] म्हणून त्यांच्याशीं कोन करून तिरके सोट बसवीत. उभे खांब, त्या खांबावरच उभ्या असलेल्या उभ्या आडव्या तुळयांनीं एकमेकांशीं जोडले जात. घराचें छप्पर बांबूच्या (वंश) कांबी, विपूवंत् नांवाची मधली बाजू (आढें) व अक्षु (जाळें) म्हणजे वरील शाकार किंवा केवळ, याचें बनवीत. गवताच्या बिंड्यांनी ( पलद ) भिंती बनविल्या जात असून तो सर्व डोलारा निरनिराळ्या प्रकारच्या बंधनांनीं ( नहन, प्राणाह, संदेश, परिष्वंजल्य ) एका ठिकाणीं स्थित केलेला असे. घराच्या संबंधानें हविर्धान (यज्ञिय हविर्द्रव्य ठेवण्याची जागा ), अग्निशाला ( अग्नीची जागा ), पत्नींनाम सदनं ( गृहीणींची खोली ), आणि सदस् ( बसण्याची खोली ) हे शब्द आले आहेत. हे शब्द जरी यज्ञसंबंधीं असले तरी ते घराचे भाग असल्याचा त्याच्या नावावरून बोध होतो. शिंकीं किंवा लोंबती भांडीं ( शिक्य ) याचाहि उल्लेख आहे. घराच्या भिंती पुऱ्या करण्याकरिता वेतकामाचाहि ( इट ) उपयोग करीत असल्याबद्दल उल्लेख आहे. घराच्या बाजवाना पक्ष असें म्हणत. चौकटीसह दरवाजाला 'आना' हें नाव आहे.

[3] छ दि स्.—हा शब्द एकदां ऋग्वेदांत व ऋग्वेदोत्तर ग्रंथात अनेक वेळा आला आहे, व त्याचा अर्थ चौवाकी गाड्यावरील झाकण, घरावरील छप्पर किंवा अशाच प्रकारचा काहीं पदार्थ, असा आहे. वेबरच्या मतानें अथर्ववेदाच्या एका उताऱ्यांत या शब्दाचा अर्थ नक्षत्रगण असा आहे. व्हिटनेच्या मतें ह्याचा अर्थ नक्षत्रगण असा घेणें जरी आवश्यक नसलें तरी हा नक्षत्रगण कुंभराशीचा होय. कारण अथर्ववेदात छदिस् शब्द आहे त्यापुढील मंत्रात 'विचृती' ( वृश्चिक ) नक्षत्रगणाचा उल्लेख आहे; आणि वृश्चिक राशि ही कुंभ राशीहून फारशी दूर नाहीं.

[4] छ र्दि स्.—हा शब्द ऋग्वेदात वारंवार व तदुत्तर ग्रंथातहि आलेला असून 'राहण्याची सुरक्षित जागा' असा त्याचा अर्थ आहे. हा शब्द चुकीनें लिहिलेला दिसतो, कारण वृत्तावरून असें दिसतें कीं, पहिलें अक्षर नेहमीं लघु पाहिजे. याकरिता रॉथचें असें म्हणणें आहे कीं, छर्दिस्च्या ऐवजीं छदिस् हाच शब्द असावा, पण ह्याला एक अशी अडचण आहे कीं, 'छदिस्' चा अर्थ छप्पर असा आहे व 'छर्दिस्' चा असा अर्थ कधीं होत नाहीं. तेव्हा ब्लूमफील्ड(?) जो छधिस् हा शब्द सुचवितो तें त्याचें म्हणणेंच कदाचित् बरोबर असूं शकेल.

[5] द म.—ऋग्वेदांत अनेक वेळां घर अशा अर्थानें हा शब्द आलेला आहे. रॉथच्या मतें ह्याचा अर्थ 'ज्या ठिकाणीं एखादा मनुष्य अनियंत्रित सत्ता उपभोगितो ( दम म्हणजे ताब्यात ठेवणें या धातूपासून ) तें ठिकाण' असा आहे.

[6] दु रो ण.—ऋग्वेदात व पुढें झालेल्या ग्रंथांत घर अशा अर्थी व अलंकारिक अर्थानें हा शब्द आलेला आहे.

[7] दु र्य.—'दार किंवा घर ह्यासंबंधीं,' संहिता ग्रंथाच्या बऱ्याच उताऱ्यांत अनेकवचनी नाम म्हणून हा शब्द आला असून त्याचा अर्थ दाराचे खांब किंवा घर असा आहे.

[8] धा म न्.—ऋग्वेद व तदुत्तर ग्रंथ यांमध्यें राहण्याचें ठिकाण, घर किंवा कधीं कधीं घरांतले रहाणारे लोक असा याचा अर्थ आहे. या शब्दाचा हुकूम, कायदा, असाहि अर्थ आलेला आहे, व हा अर्थ आणि धर्मन व विशेषतः ऋत या शब्दाबरोबर धर्मन् शब्द आलेला असतांना, दोहोंचा अर्थ सारखाच आहे. ऋत म्हणजे चिरंतन कायदा. हिलेब्रँटच्या मतें एका उताऱ्यात 'धामन्'चा अर्थ नक्षत्र असा आहे.

[9] प स्त्या.—[स्त्रीलिंगी अनेकवचनी.] हा शब्द ऋग्वेदामध्यें अनेक ठिकाणीं आलेला आहे. रॉथ हा शब्दाला घर किंवा राहण्याचें ठिकाण असा विस्तृत अर्थ देतो, त्याचप्रमाणें घरात राहणारें कुटुंब असाहि त्याचा अर्थ करितो. हा अर्थ झिमरला सुद्धा संमत आहे. उलटपक्षीं पिशेलच्या मतानें दोन उताऱ्यात पस्त्याच्या ऐवजीं पस्त्य असा नपुंसकलिंगी शब्द आहे आणि तो पस्त्यसद् व पस्त्यावंत शब्दात आढळून येतो. ह्या पस्त्य शब्दाचा अर्थ ऋग्वेदात तरी लाक्षणिक अर्थानें नैघंटुकात म्हटल्याप्रमाणें 'राहण्याचें ठिकाण' असा अर्थ आहे. त्याच्या मतानें इतर उताऱ्यात या शब्दाचा अर्थ 'नद्या' किंवा 'पाणी' असा आहे. विशेषतः पस्त्याच्या मध्यभागीं सोम असतो असें जेथें म्हटलें आहे तेथें कुरुक्षेत्र व तेथील नद्या असा त्याच्या मतानें अर्थ आहे. ह्या नद्या म्हणजे आपया, दृषद्वती, व सरस्वती या होत. कांहीं ठिकाणीं त्याच्या मतानें पस्त्याचा अर्थ एखाद्या नदीचें ठेविलेलें नांव असा आहे. उदाहरणार्थ सिंधु या शब्दाचा मूळचा अर्थ नदी असा होता व नंतर सिंधु नांवाची एक नदी असा झाला आहे.

[10] वे श्म न्.—ह्याचा अर्थ 'घर' आहे. हा शब्द ऋग्वेद व मागाहून झालेले ग्रंथ ह्यामध्यें आलेला आहे. या ठिकाणीं याचा अर्थ मनुष्य वसति करून (विश्) रहातो तें घर असा आहे.

[11] आ व स थ.—( घर ) तैत्तिरीय संहितेंत ह्या शब्दाचा बरोबर अर्थ पाहुण्याचें आगतस्वागत करण्याची जागा; मुख्यत्वेंकरून मेजवान्या आणि यज्ञ, ब्राह्मण आणि इतर मंडळी यांना बसण्याकरिता जागा, यात्रेकरू लोकांनां राहण्यासाठीं धर्मशाळा असाहि अर्थ होईल. हा अर्थ 'वसतिस्थान' ह्या व्यापक अर्थावरून निघाला असावा.

[12] प्रा ची न वं श.—यजुर्वेदात व शतपथ ब्राह्मणात या विशेषणाचा अर्थ घराला आधारभूत असलेलें व ज्याचें टोंक पूर्वेकडे असून बुंधा पश्चिमेकडे आहे असें आढें असलेलें घर असा आहे. हें आढें कदाचित् बाजूच्या तुळयाहून उंच असावें.

[13]प्र ति ष्ठा.—हा शब्द अथर्ववेदात एका ठिकाणी आढळतो तेथें हा कायद्यासंबंधीं पारिभाषिक शब्द आहे असें झिमर म्हणतो. कदाचित् याचा अर्थ पवित्रस्थान, देवालय, असा असावा. परंतु रॉथनें दिलेला 'घर,' 'राहण्याची जागा' हा अर्थ नीट लागूहि पडत नसून त्याबद्दल वरीच शंका वाटते असें मॅकडोनेल म्हणतो. झिमरच्या कल्पनेला आधार म्हणजे त्याच ऋचेंत प्रतिष्ठा शब्दापूर्वी 'ज्ञातार' म्हणजे साक्षिदार, जामीन, हा कायद्यातील शब्द आला आहे एवढाच. सायणाचार्य याचा अर्थ 'आवासभूमि,' 'आश्रयस्थान,' असा करितात.

[14]बृहच्छंदस्.—हा शब्द अथर्ववेदाच्या एका उताऱ्यात आला आहे. तेथें हा 'शालाचें (घराणें) विशेषण आहे. हें स्पष्टपणें 'बृहत्छदिस्'चें रूप दिसते. 'बृहत्छदिस्' म्हणजे विस्तृत छप्पर असलेलें आणि हाच अर्थ या शब्दाचा असावा असें दिसतें.

[15]शा ला.—अथर्ववेद व मागाहून झालेले ग्रंथ ह्यामध्यें ह्या शब्दाचा स्पष्ट अर्थ म्हणजे घर असा आहे. या शब्दात अर्थात जनावराचा गोठा, धान्याची कोठी, वगैरेंचाहि अंतर्भाव होतो. अथर्ववेदात गृहपतीला शालापति असेंहि म्हटलें आहे.

[16]अ गा र.—हा क्वचित आढळणारा शब्द कौपीतकी उपनिषदात 'घर' ह्या अर्थानें आढळतो.

[17]प्रा सा द.—याचा अर्थ राजवाडा. परंतु हा शब्द अलीकडील 'अद्भुत ब्राह्मणाशिवाय' कोठेंहि या अर्थानें सापडत नाहीं.

[18]गो त्र —ऋग्वेदातील इंद्राच्या अतिप्राचीन अद्भुत कृत्यात ह्याचा बऱ्याच वेळा उल्लेख आला आहे. रॉथच्या मतानें त्याचा अर्थ गोठा असा आहे गेल्डनेर 'कळप' असा अर्थ करितो व हाच ग्राह्य दिसतो, कारण ऋग्वेदोत्तर वाङ्मयात 'कुल' अथवा कुटुंब असा अर्थ केला आहे, आणि छान्दोग्योपनिषदातहि तोच अर्थ आहे. गृह्यसूत्रात सगोत्रविवाह व वराच्या मातेचे जे सपिण्ड असतील त्याच्याशीं विवाह निषिद्ध मानण्यावर विशेष जोर दिला आहे सेनर्ट म्हणतो कीं हें जातीचें मूळ आहे. कारण 'क्युरिआ फ्रेट्रीआ' अथवा वर्ग यातील विवाह म्हणजे इण्डोयूरोपीय विवाहपद्धतीच होय. त्याचप्रमाणें पितृगोत्र व मातुल सपिंड हे विवाहास वर्ज्य करण्याची चालहि त्याचीच होय परंतु ही चाल इण्डोयूरोपीयनांची होती असें म्हणण्यास मुळींच पुरावा नाहीं. शिवाय शतपथ ब्राह्मणाप्रमाणें बापाच्या व आईच्या बाजूनें तिसऱ्या अगर चवथ्या पिढीनंतर विवाहास परवानगी आहे सायणभाष्याप्रमाणें तिसऱ्या पिढीतील विवाह कण्वास मान्य, चवथ्या पिढीतील सौराष्ट्रास मान्य, व वज्रसूची नामक टीकाकार म्हणतो कीं 'कण्वाप्रमाणेंच आंध्राची व दाक्षिणात्याची पद्धत असून वाजसनेयि शाखेचे लोक मामाच्या मुलीशीं लग्न करण्यास विरोध करितात, मॅकडोनेल म्हणतो कीं पूर्वी चुलत बहिणीशीं लग्न करीत असत पण पुढें ती चाल मोडली. परंतु या विधानास तो कोणताच आधार देत नाहीं. पूर्वी गोत्र बदलता येत असे, शुन शेपानें तें बदललें होतें तो पूर्वी गृत्समद आंगिरस होता तो नंतर भार्गव झाला

[19]व्र ज.—ऋग्वेदामध्यें ह्याचा मूळ अर्थ जनावरें ज्या ठिकाणीं आश्रयार्थ जातात ती जागा आणि दुभतीं जनावरें गावातून सकाळीं जेथें चरण्यास जातात व दुभतीं नसलेलीं रात्रंदिवस जेथें राहातात तें चराऊ रान असा आहे त्यावरून पुढें या शब्दाचा गुराचा कळप असा अर्थ झाला असें गेल्डनेरचें मत असून तें रॉथच्या मतापेक्षां अधिक योग्य दिसतें. रॉथ म्हणतो कीं वृज याचा मूळ अर्थ (वृज पासून) कुंपण व नंतर त्या पासून कळप असा झाला. परंतु व्रज ह्याचा नेहमीचा अर्थ काहीं कुंपण असा होत नाहीं. वैदिक कालातील जनावरें सामान्यत काहीं गोठ्यात पोसलीं जात नसत, तथापि काहीं ठिकाणीं गोठा व काहीं ठिकाणीं तबेला असा या शब्दाचा अर्थ निःसंशय आहे. गोहरणाच्या आख्यायिकेत हा शब्द वारंवार उपयोगात आणला आहे. कधीं कधीं ह्याचा 'हौद' असा अर्थ होतो

[20]स्व स र.—सेंटपीटर्सबर्गकोशाप्रमाणें त्याचा अर्थ जनावराचा गोठा, अथवा अधिक सामान्य अर्थ म्हणजे वसतीची जागा, घर, आणि नंतर पक्ष्यांचें घरटें, असा आहे. गेल्डनेर म्हणतो कीं जनावराचे बाबतींत त्याचें 'मोकळे हिंडणें' किंवा 'सकाळचें चरणें व पक्ष्याच्या बाबतींत त्याचें 'प्रत काळीं घरट्याबाहेर उडणें, असा याचा अलंकारिक अर्थ 'सोमवल्लीचा रस सकाळीं काढणें' किंवा 'कोणत्याहि वेळीं रस काढणें' असाहि होतो.

[21]ह र्म्य —ह्या शब्दानें वेदकालीन गृहाचा बोध होतो. ह्यात गोठा, भोंवतालचें कुंपण अथवा भिंत याचा समावेश होतो याचा ऋग्वेदांत व तदुत्तर ग्रंथात पुष्कळ वेळा उल्लेख आला आहे

[22]अ ग्नि शा ला.—अथर्ववेदात एका शालेचें विशेषत जेथ अग्नि ठेवीत अशा घराच्या एका भागाचें नाव अशा अर्थी हा शब्द आला आहे.

[23]आता.—ऋग्वेदाप्रमाणें या शब्दाचा अनेक वचनात उपयोग केला असता घराच्या दरवाज्याची चौकट (जरी हा शब्द आकाशाचे दरवाजे या अर्थानें योजिला आहे तरी) असा अर्थ होतो वाजसनेयि संहितेंतहि याच अर्थानें हा शब्द आढळतो झिमर म्हणतो हा शब्द लॅटिनप्रमाणें आहे व व्युत्पत्तिदृष्ट्या तो अर्थ बरा दिसतो.

[24]उ प मि त्—घराचें नाव या अर्थी ऋग्वेदात दोनदा व अथर्ववेदात एकदा हा शब्द सापडतो. ऋग्वेदातील उताऱ्यावरून याचा व अर्थ सरळ खांब असा असावा असें वाटतें अथर्ववेदात हा शब्द परिमित व प्रतिमित् या शब्दाशीं जोडलेला आहे यावरून साहजिक असें अनुमान निघतें कीं, प्रतिमित् म्हणजे परिमित् याना आधारभूत तुळ्या-( बहुधा

परिमित् याच्याशीं कोनाकार असलेल्या) आणि परिमित् म्हणजे उपमित् याच्याशीं आडव्या येऊन मिळणाऱ्या तुळ्या. परंतु हीं भाषांतरें तार्किकच आहेत.

[२५]ऊर्दर.—हा शब्द ऋग्वेदात धान्याचें कोठार—ज्याप्रमाणें कोठार धान्यानें भरतात त्याप्रमाणें इन्द्रास सोमरसानें भरावयाचा—अशा अर्थानें आला आहे. सायणानीं याचा कोठार असा अर्थ केला आहे. परंतु झिमर व रॉथ हे धान्य ठेवण्याचें माप असें त्याचें भाषांतर करतात. ग्रिफिथचा अर्थ सायणाप्रमाणेंच आहे.

[२६]दुर.—ऋग्वेदात हा शब्द मूळच्या अर्थानें व अलंकारिक रीतीनें दरवाजा या अर्थानें आला आहे.

[२७](द्वा) द्वार्.—ऋग्वेदापासून पुढें झालेल्या ग्रंथात घराचें दार या अर्थानें हा शब्द आहे. मागाहून प्रचारांत आलेला द्वार हा शब्द याच अर्थी आला आहे. शतपथ ब्राह्मणात द्वार बंद करणें याला द्वारपिधान हा शब्द योजिला आहे.

[२८]द्रुपद.—लाकडी खांब या अर्थी ऋग्वेद व पुढील ग्रंथांत हा शब्द आला आहे. शुनःशेपाला यज्ञामध्यें तीन खांबाला बांधिलें होतें. चोरांना चोरी करण्याबद्दल शिक्षा म्हणून बांधीत असत असा उल्लेख आहे.

[२९]मयूख.—ऋग्वेद व तदुत्तर ग्रंथांत याचा खुंटी असा अर्थ आहे. ती मुख्यतः मागें ताणण्यासाठीं उपयोगांत आणीत असत.

[३०]स्थाणु—ऋग्वेद व तदुत्तर ग्रंथांत लाकडी खांब असा याचा अर्थ आहे.

[३१]मेथि.—हा शब्द तैत्तिरीय संहितेंत खुंटी या अर्थी आला आहे. अथर्ववेदांतील लग्नासंबंधींच्या मंत्रात याचा उल्लेख असून 'रथाच्या दांड्याला आधारभूत' असा त्याचा अर्थ असावा असें सेंटपीटर्सबर्ग कोशाचें मत आहे. ऋग्वेदात ८. ५३, ५ येथें गजाचा कठडा करण्यासाठीं या खांबाचा उपयोग करीत असत असें लिहिलें आहे. मेथीला यज्ञांतील गाय बांधीत असत असा पंचविंश ब्राह्मणांत उल्लेख आहे.

[३२]पक्ष.—अथर्ववेदामध्यें घराच्या कांहीं भागाला, रॉथ व ग्रील यांच्या मतें बाजूच्या खांबाला, व्हिटने व ब्लूमफील्ड यांच्या मतानें घराच्या बाजवाना हा शब्द लाविला आहे. अथर्ववेदांत छपराचें (छदिसचें) चतुष्पक्ष—चार बाजवा असलेलें असें जें वर्णन आलें आहे त्यावरून व्हिटनेचा अर्थ बरोबर दिसतो. तैत्तिरीय ब्राह्मणांत रथाच्या बाजूला पक्ष हा शब्द लावला आहे व महिन्याचा अर्धा भाग असाहि त्याचा अर्थ आहे.

[३३]परिमित्.—अथर्ववेदांत हा शब्द आला असून घराचे उभे खांब जोडण्याकरितां उपयोगांत आणलेले आडवे खांब किंवा तुळ्या असा त्याचा अर्थ आहे.

[३४]पलद.—अथर्ववेदांतील घराच्या वर्णनासंबंधींच्या एका सूक्तांत हा शब्द दोनदां आला असून वारा व पाऊस यापासून छपराचा बंदोबस्त होण्याकरितां उपयोगांत आणावयाच्या वेताच्या किंवा गवताच्या पेंढ्या (ताट्या) असा त्याचा अर्थ आहे.

[३५]प्रतिमित्.—अथर्ववेदांत घराच्या वर्णनात हा शब्द आला आहे. याचा अर्थ एक प्रकारचा धिरा असाच असावा. उपमितावर कोन करून ओळंबणारे हे खांब असावेत असें वाटतें.

[३६]अर्गल.—हा शब्द आरण्यकांत 'अर्गलेषीके' या समासांत गोठ्याच्या दरवाजाला जो आडवा दांडा लावतात त्या अर्थी योजिलेला आढळतो. नंतर याचा अर्थ दरवाजा ज्याला अडकविण्याचा खिळा (अडसर) असा झाला.

[३७]परिधि.—छांदोग्य उपनिषद् व नंतरहि लोखंडी गज किंवा अडसर असा याचा अर्थ आहे.

[३८]प्राकार.—शांखायन श्रौतसूत्रांत प्रेक्षकांना बसण्याकरितां उभारलेल्या प्रासादाला आधारभूत अशा भिंतीच्या भागाला हा शब्द लाविला आहे.

[३९]भित्ति.—शतपथ ब्राह्मणात याचा अर्थ वेत नामक गवताच्या पिंजून विणलेल्या चटया असा अर्थ होतो.

[४०]वृत्रशंकु.—याचा शब्दशः अर्थ वृत्राची खुंटी असा असून शतपथ ब्राह्मणात हा शब्द आला आहे. कात्यायन श्रौतसूत्रावरील टीकाकाराच्या मतें दगडी खांब असा त्याचा अर्थ आहे. हा अर्थ थोडा असंभवनीय दिसतो. परंतु शतपथ ब्राह्मणाचा (४. २, ५, १५) या अर्थास दुजोरा आहे.

[४१]शीर्षण्य.—ऐतरेय ब्राह्मण व उपनिषद् ग्रंथांत मंचकाचा (आसंदीचा) पुढील भाग असा याचा अर्थ आहे.

[४२]स्तम्भ.—सूत्रग्रंथात खांब या अर्थी हा शब्द आला आहे. ऋग्वेदातहि हा शब्द आला आहे परंतु तो लक्षणेनें आला आहे.

### गृहांतील सामान [ ऋग्वेद ]

अक्षी, (आकडी)
अतस (काष्ठ)
अधिषवण (चक्की, जातें)
अयस्मय (कलश)
अविष (विषरहित अन्न)
असूर्त (स्थावर)
[१]आसेचन
[२]आहाव
ईषन (दण्ड)
[३]उदचन
[४]उपबर्हण (गिर्दी, उशी)
उपबर्हणी (गाद्या)
उपसेचनी (झारी)
[५]उलूखल
ऊर्णा
एधस् (काष्ठ)
[६]कलश
काणुका (सोमपिण्याचें भांडें)
[७]कारोतर (दभ्र्या, दारुपिण्याचें कातड्याचें भांडें)
[८]कुंभ (कलश)
[९]कूचक (पेटी)
कोश (पोहरा)
क्रिवि (कातण्याची पेटी)
क्षणोत्र (धार लावण्याचा दगड)
खनित्र (कुदळ)
गल्दा (गाळणें)
ग्रावन (दगड)
[११]तल्प (पलंग)
तष्ट (तासलेलें)
[१२]तितउ (चाळणी)
[१३]दण्ड
दामन (दावें)
दारु (काष्ठ)
[१४]दृति (पखाल)
दृपद

| | | |
|---|---|---|
| द्रुघण [लांकूड-तोडण्याचें हत्यार) | [18]पात्र | वस्तु |
| द्रुपद | पीवस् [अछिन्न वस्त्र] | [20]वह्य [ पलंग ] |
| द्रोण (कलश) | प्रेंख [झोंपाळा] | वृषा [ घटिकायंत्र माला ] |
| [16]द्रोणाहाव | प्रोष्ठ [ छपरी पलंग ] | शकृत् [ शेण ] |
| धिषण [पात्र विशेष] | भोजन [ भोग्य-वस्तु ] | [21]शंकु |
| नीक्षण (मांस पचन परीक्षा साधन काष्ठ) | [19] मन्था [ आलोडन ] | शयुत्रा [ शयन ] |
| [17]पचन [काष्ठ] | मयूख [ खुंटी ] | [22]शूल |
| पव्यय [पात्र] | मृण्मय | सर्ग [ रज्जु ] |
| पातल्य (खिळा) | याशु [ भोग ] | [23] सूना |
| | वध्रि [ जोडा ] | [24] सूर्मि |
| | | सृणि ( कोयती ) |
| | | स्तुकाविन |

[ तै. सं. ]

| | | |
|---|---|---|
| क्षखर्व (मातीचें कच्चें भांडें) | दामन् | विपन (चोपणें) |
| अतस् | दृति | [36]विवध |
| अवधान | निर्यास (डिंक) | विविवध |
| आतंचन (आंबट दहि) | निष्क्रय (निसटती गाठ) | शाक |
| [25]आसन्दी | [31]पल्पूलन | शकृत् |
| [26]उपला | [32]पारीणह्य | [37]शल्क |
| [27]उपानह् | [33]प्रेंख (झोपाळा) | शयन (बिछाना) |
| उलूखल | वर्म (गांठ) | शिक्य |
| [28]कट | मयूख (खुंटी) | शुष्कदृति |
| [29]कुमुक | [34]मुसल | [38]शूर्प |
| [30]गुग्गुलु | मेखला | [39]समहन |
| ग्रन्थि | रज्जु | सूचि |
| तल्प | रास्ना | स्यू ( दोरी ) |
| | [35]वंश | [40] स्थाली |
| | वस्त्र | |

[ अथर्ववेद ]

| | | |
|---|---|---|
| अग्नि | एधस् ( काष्ठ ) | तल्प |
| अन्तःपात्र | [46] कंस [ पात्र ] | तिरोध [ झाकण ] |
| अभिधानी(तेपली) | कक्ष्य | तुष [ कोंडा ] |
| [41] अभिपवणी | कम्बूक [ टरफल ] | तैलकुण्ड |
| अभ्रि | कलश | दारु [ काष्ठ ] |
| अर्जुन | [47]कशिपु [ उशी] | दास |
| अश्मन ( दगड ) | कशिपूपबर्हण | दृषद् |
| आदानसन्दान | कुम्भ | द्रुघन ( कुऱ्हाड ) |
| आमपात्र | [48] कुल्मल | द्रुपद [ पायबंद ] |
| आमन्दी | कूर्च [ कुंचा ] | [49] नृति |
| [42] आसाद | खल्व | पल्पूलन [ धनावरें धुण्यासाठीं केलेले स्थल ] |
| [43] आस्तरण | चतुर्बिल [ पात्र ] | पलाली [ कोंडा ] |
| [44] उपधान(उशी) | कर्म | |
| उपरिशयन | जत्रु [ वादी, चामडें ] | |
| [45] उप्यल | | |

| | | |
|---|---|---|
| पलावत् | रज्जु | शिला |
| पवस्त [फिरकुणी] | रशना | षण्मयूख |
| पात्र | राशि | सन्दंश [चिमटा ] |
| पूतिरज्जु | रिक्तकुंभ | सहस्रस्तुका |
| पृत्य | वध्रि [ वादी ] | सुभू [ भृत्य ] |
| पृष्टि [ रांशकु रज्जु] | वरत्रा [51] | सूत्र |
| प्रेंख | [52]वर्ध्र | [55]सेतु |
| [50]बन्धन | शंकु | स्तुका [ लोकर] |
| भस्म | शण [ ताग ] | स्थामन् [ स्थूणा] |
| भृति | [53]शयन [ मंचक ] | स्वप्नाधिकरण |
| मन्थ | शूर्प | हरित |
| मेथि | [54]शिक्य | |

[वाजसनेयि सं.]

| | | |
|---|---|---|
| [56]चप्य | [59]बाल | [61]सत |
| [57]तुला | [60]शल्मली | [62]स्तुप |
| [58]नड्वला | | |

[संहितेतर]

| | | |
|---|---|---|
| [63]अंगारावक्षयण | [74]धृष्टि | [85]फलक |
| [64]आदर्शक | [75]निनाह्य | [86]बृसी |
| [65]उच्छीर्षक | [76]पर्यंक | [87]भस्त्रा |
| [66]उपमन्थनी | [77]परिचर्मण्य | [88]मणिक |
| [67]उपश्रय | [78]परिपवन | [89]मूत |
| [68]उल्मुक | [79]पात्रेजन | यष्टि |
| [69]उल्मुकावक्षयण | [80]पिन्वन | रजव्य |
| [70] करीष | [81]पिशील | [90]वालदामन |
| [71]चूर्ण | [82]प्रणेजन | [91]शुंबल |
| [72]तर्कु | [83]प्रेंख | [92]श्लेष्मन |
| [73]तेजनी | [84]प्रोष्ठ | [93]हिरण्यकशिपु |

[1] आसेचन—यूषन् अथवा तूप वगैरेसारखा पातळ पदार्थ ठेवण्याचें भांडें असा याचा अर्थ आहे याचा आकार अथवा उपयोग याबद्दल माहिती उपलब्ध नाहीं.

आहाव.—विहिरींतून पाणी वर काढण्याचा पोहरा. ऋ १.३४,८ येथें भाष्यात वेदार्थयत्नकारानीं 'द्रोणकलश, असा याचा अर्थ केला आहे. याचा घागर अगर डोणी असाहि अर्थ होऊं शकेल. सायणानीं पाणी पिण्याचें पात्र व एका ठिकाणीं पाणी पिण्याची जागा असा अर्थ केलेला आहे.

[2] उदंचन.—ऋग्वेदात हा शब्द फक्त लक्षणारूपानें आला असून ब्राह्मण ग्रंथात याचा पोहोरा असा अर्थ आला आहे.

[3] उपबर्हण—ऋग्वेद व तदुत्तर ग्रंथात हा शब्द उशी, बहुधा आसंदीवरील गादी या अर्थी उपयोगांत आणिला आहे. ऋग्वेदांत हा शब्द 'उपबर्हणी' असा

स्त्रीलिंगी त्याच अर्थी परंतु अलंकारिक भाषेंत पृथ्वी किंवा भूमि याना लाविला आहे

[7] उ लू ख ल —ऋग्वेद व तदुत्तरकालीन ग्रंथात हा शब्द उखळ या अर्थी योजिलेला आढळतो आणि वारवार तो उलूखलमुसल' असा समासात असतो सूत्रकाला पर्यंत या उलूखलाचा आकार कसा असे याचा उल्लेख नाही

[8] क ल श —ऋग्वेद व तदुत्तर ग्रथात हा शब्द सामान्यत 'भाड', पात्र या अर्थी योजितात आणि हे पात्र भोपळ्याचें किंवा मातीचें केलें असावे, कारण दोन्हीहि प्रकार त्या वेळी उपयोगात असत हे आपल्याला माहीत आहे सोम ठेवण्याच्या लाकडी डोणाचा (द्रोणक ) उल्लेख विधींत नेहमीं केलेला असतो

[9] का रो त र —ऋग्वेदात व तदुत्तरकालीं सुरा ( दारू ) शुद्ध करण्याकरिता जी गाळणी किंवा जो गालक असतो तो 'कारोतरो नाम वैदलक्षर्मवेष्टितो भाजनविशेष । यस्मिन् सुराया स्रावण क्रियते' असें सायणानी भाष्यात स्पष्टीकरण केलें आहे

[10] कु म्भ —ऋग्वेदात आणि नतरहि हा शब्द वऱ्याच वेळा 'भाडें', 'पात्र' या अर्थी आलेला आहे बहुतकरून तो मातीचा केलेला असल्यामुळें लवकर फुटत असे

[11] कू च क्र —ऋग्वेदातील एका संदिग्ध ऋचेमध्यें एक दाच हा शब्द आला असून त्याचा झिमरच्या मतें विहिरीतून पाणी वर काढण्याकरिता चाक असा अर्थ आहे रॉथ त्याचें भाषातर 'स्त्रीचे स्तन' असें करितो, तें काहीं अशी बरोबर दिसतें.

[10] को श —ऋग्वेदात याचा अर्थ विहिरातून पाणी वर काढण्याचा 'पोहरा' असा आहे धार्मिक विधींत हा शब्द आल्यास त्याचा अर्थ सोम ठेवण्याचें कलशापेक्षा मोठें भांडें असा आहे

[11] त ल्प —याचा बिछाना किंवा मचक हा अर्थ ऋग्वेद, अथर्ववेद व नतरचे ग्रंथ यात स्वीकारला आहे औदुंबराच्या लाकडापासून बनलेला पलग असा उल्लेख तैत्तिरीय ब्राह्मणात आलेला आहे छांदोग्योपनिषदात गुरूचा बिछाना भ्रष्ट केल्याबद्दलचा ( गुरुतल्पग ) उल्लेख आलेला आहे शतपथ ब्राह्मणात तल्प्य ( लग्नाच्या बायकोपासून झालेला मुलगा ) या विशेषणाचा कायदेशीर (धर्मपत्नीपासून झालेला) या अर्थी उपयोग केला आहे

[12] ति त उ —हा शब्द ऋग्वेदामध्यें एकदा आलेला आहे व त्याचा अर्थ 'चाळणी' किंवा सक्तु पाखडण्याचें सूप असा आहे

[13] दण्ड —याचा अर्थ सोटा असा आहे या शब्दाचा सामान्य अर्थ म्हणजे जनावराना हाकण्याची काठी अथवा शस्त्र या अर्थानें उपयोग केला आहे राक्षसाना पालवून देण्यासाठी अभिमन्त्रित केलेली काठी यज्ञकर्त्या यजमानास देत असत असा शतपथ, तैत्तिरीय या ब्राह्मण ग्रथात उल्लेख आहे उपनयनप्रसंगीं या दण्डाचे बरेंच महत्व असे यांच्या फरकानें पळीसारख्या वस्तूची मूठ ( लुवदड ) असाहि याचा अर्थ होतो या शब्दावरून राजसत्तेचाहि बोध होतो व राजाचा शिक्षा करण्याचा अधिकार ध्वनित होतो ( राजप्रेषिता दण्ड ) अलीकडील भाषेंत बोलावयाचें म्हणजे त्या वेळी राजा हा फौजदारी कायद्याचें उगमस्थान गणला जाई आणि पुढेंहि हा सत्ता त्यानें सर्वस्वी आपल्याकडे ठेविली होती पचविंश ब्राह्मणात निरपराधी ( अदण्ड्य ) लोकाना शिक्षा करणें हें ब्राह्मणेतर राज्याचे लक्षण समजलें जाई.

[14] दृ ति —ऋग्वेदात व तदुत्तर ग्रंथात प्रवाही पदार्थ ठेवण्याकरिता असलेली कातड्याची पिशवी या अर्थी हा शब्द वारवार आला आहे एके ठिकाणीं या पिशवीला ध्मात म्हणजे फुगलेला भाता असें म्हटलें आहे आणि इत्यादींशीं जलोदरानें फुगलेल्या माणसाची तुलना केली आहे क्षीर व सुरा या पिशवींत ठेवीत असल्याचाहि उल्लेख आहे

[15] दृ ष द् —ऋग्वेद व अथर्ववेद यांमध्यें याचा अर्थ धान्य वाटून बारीक करण्याचा धोंडा ( पाटा ) असा आहे ( जात्याची तळी असा नाहीं ) या दगडावर धान्य ठेवून वाटीत पुढें जेव्हा याचा उपला याच्यासह उल्लेख आला आहे तेव्हा कदाचित् त्याचा जात्याची खालची किंवा वरची तळी असाहि अर्थ होईल परतु हें निश्चितपणें सागता येत नाहीं एगलिंगच्या मतें त्याचा अर्थ लहान मोठ्या जात्याच्या तळ्या असा आहे

[16] द्रो णा हा व —ऋग्वेदात अवत ( विहीर ) याला हें दुसरें नाव आहे. पाणी ओढण्याच्या संबधात जेव्हा हा शब्द येतो तेव्हा याचा ' लाकडी पोहोरा असा अर्थ होतो

[17] प च न —ऋग्वेद व शतपथ ब्राह्मण ह्याप्रमाणें ह्याचा अर्थ अन्न शिजविण्याकरिता भांडें असा आहे

[18] पा त्र —ह्याचा मूळ अर्थ ( पाणी वगैरे ) पिण्याचें भाड ( पा म्हणजे पिणें ह्यापासून ) असा असून ऋग्वेद व तदुत्तर ग्रंथ ह्यामध्यें सामान्यत भाडें अशा अर्थानें हा शब्द आलेला आहे हें पात्र एक तर लाकडाचें केलेलें असेल किंवा चिकण मातीचें केलेलें असेल रॉथच्या मतानें हा शब्द मोजण्याचें माप या अर्थानें काहीं उताऱ्यात आला आहे ह्याच स्त्रीलिंगी रूप पात्री असें असून त्याचा अर्थ भाडें असा आहे

[19] म न्था —याचा ऋग्वेदाच्या एका ऋचेंत उल्लेख आला असून तेथें त्याचा अर्थ ' रवी ' असा आहे. त्याचप्रमाणें तैत्तिरीय संहितेंत 'मथ' या धातूचा अर्थ घुसळणें असा दिला आहे अथर्ववेदाच्या एका उताऱ्यात याचा अर्थ ' मथ प्रमाणें एखादें पेय असा आहे

[20] व ह्य— ऋग्वेद व अथर्ववेद ह्यांमध्ये स्त्रियाना सुखावह असा मचक किंवा बिछाना अशा अर्थानें हा शब्द आला

आहे व मॅकडोनेलहि असेच म्हणतो परंतु सायणभाष्यात याचा झोंपाळा असा अर्थ आहे 'वहयनेनेति वहनसाधन आन्दोलिकादि यानम्।' इ.

[21] शंकु —ऋग्वेद व मागाहून झालेले ग्रंथ ह्यामध्यें याचा अर्थ लाकडाचा खुंटी असा आलेला आहे उदाहरणार्थ शतपथ ब्राह्मणात हा शब्द ज्या खुंट्यांनी कातडें ताणलें जात असे त्या खुंट्या किंवा खोडयाची मेख अशा अर्थानें आलेला आहे छान्दोग्योपनिषदात देठ किंवा पानातील तंतु असा याचा अर्थ होण्याचा संभव आहे

[22] शूल.—ऋग्वेद व तदुत्तर ग्रंथ यामध्यें हा शब्द आला असून त्याचा अर्थ ज्यावर मास भाजावयाचें तो लोखंडी सिळा असा आहे सायणभाष्यात याचा सुरी असा अर्थ आहे

[23] सूना —ऋग्वेद व अथर्ववेद ह्यामध्यें मांस ठेवण्या-करितां विणलेली कळकाची टोपली असा याचा अर्थ आहे

[24] सूर्मि —ऋग्वेद व तदुत्तर ग्रंथ ह्यामध्यें पीटर्सबर्ग कोशाप्रमाणें या शब्दाचा अर्थ 'दिव्याप्रमाणें जिचा उपयोग होतो अशी नळी' असा आला आहे ऋग्वेदात एका ठिकाणीं या शब्दाचा अर्थ पाणी नेण्याची नळी असा असावा सायणानीं भाष्यात 'ज्वाला' असा अर्थ दिला आहे

[25] आसन्दी —ऋग्वेदेतर संहिता व ब्राह्मणग्रंथात हा शब्द कशाचें तरी आसन ह्या अर्थी वारवार उपयोगात आणिला आहे बसण्याकरिता जें आसन किंवा पीठ दिलें जात होतें त्याचें अथर्ववेदात विस्तारपूर्वक वर्णन केलें आहे मॅकडोनेलच्या मतें त्याला दोन पाय होते सायणभाष्या प्रमाणें त्याला चार पाय असून मध्यें विणलेलें असें हातें त्यावर गादी ( आस्तरण ), उशी ( उपबर्हण ) असून बसण्याची जागा ( आसाद ) व धरण्यास आधार ( उपश्रय ) हीं होतीं अशाच पीठांचें वर्णन कौषीतकी उपनिषद् व जैमिनीय ब्राह्मण ह्यामध्यें आलें आहे राज्याभिषेकाच्या वेळीं जें आसन उपयोगात आणीत त्याचें अथर्ववेदात याच भाषेत वर्णन केलें आहे, त्यात त्याच्या पायाची उंची एक वीत, लांबी व रुंदीचे तुकडे एक हात, विणकर ( विवयन ) मुंज गवताची आणि आसन उदुंबर लाकडाचें, असें वर्णन आलें आहे अथर्ववेदातील एका उताऱ्यावरून लानमन म्हणता कीं, ती बैठक आरामखुर्चीसारखी असावी तेथें देखील उपधान व उपवासन या शब्दांचा उल्लेख आहे शतपथ ब्राह्मणातील वर्णनावरून ती मोठी भव्य बैठक असावीसें वाटतें एके ठिकाणीं ती खदिर नामक लाकडाची, छिद्रित (वितृण्ण) पट्यांनीं जोडलेली, ( भारतात वर्णिल्याप्रमाणें ) असें वर्णन आहे सौत्रामणी नामक याग ( इंद्राकरिता यज्ञ ) करतेवळी या आसदीचें वर्णन उदुंबराची बैठक असलेली, गुढघ्याइतकी उंच, अमर्याद लांबी रुंदीचा व वेतानें जाळीदार विणलेली, असें आलें आहे राजसिंहासन खांद्याइतकें उंच, उदुंबराचें, व बल्वज गवतानें विणलेलें असें असे दुसरीकडे हीं आसनें एक वीत उंच, एक हात लांब रुंद, उदुंबर लाकडाचीं, गवताच्या दोरीनें विणलेलीं व मातीनें आच्छादिलेलीं, असत असा उल्लेख आहे.

[26] उपला —ब्राह्मण ग्रंथांत ह्याचा अर्थ दगडाचा वत्ता व दृषद् शब्दाचा खल असा होऊं शकेल परंतु संहितेंत उपर म्हणजे खल व दृषद् म्हणजे वत्ता असा अर्थ आहे तैत्तिरीय संहितेंत याचा अर्थ वरवंटा असा आहे

[27] उपानह् —संहितानंतर ब्राह्मणग्रंथात हा शब्द जोडा या अर्थी योजिला आहे डुकराचें कातडें जोड्याकरिता उपयोगात आणीत असत असें शतपथ ब्राह्मणांत वर्णन आलें आहे दण्डोपानह् ( जोडा व काठी ) हा शब्दसमुच्चय कौषीतकी ब्राह्मणातहि उपयोगात आणिला आहे

[28] कट — वेताची केलेली चटई असा याचा अर्थ आहे वाजसनेयि संहितेंत बुरुडाला विदल-कारी असें म्हटलें असून अथर्ववेदात या कामाकरिता वेत चिरण्याचा उल्लेख आला आहे

[29] कुमुक —हें एका लाकडाचें नाव असून क्रमुक याचें हें बदललेलें रूप असावें

[30] गुग्गुलु — गुल्गुलु असा हि पाठभेद आहे याचा अर्थ गुग्गुळ किंवा देवधूप अथर्ववेदात एके ठिकाणीं हा सिंधु आणि समुद्र यापासून उत्पन्न झाला असें म्हटलें आहे यावरून झिमर म्हणतो कीं हा दर्यावरील व्यापाराचा उल्लेख आहे,कारण गुग्गुळ समुद्रापासून होत नसून तो झाडाचा चीक आहे कदाचित् येथें या शब्दानें दुसराच काहीं पदार्थ अभिप्रेत असावा या रूपात हा शब्द अथर्ववेद व ऐतरेय ब्राह्मण ह्यात असून गुल्गुलु हें जुनें रूपहि वरचेवर आढळतें या दोन रूपासंबधीं पाहता हस्तलिखित प्रतींत केव्हाहि मेळ नसतो

[31] पल्पूलन — तैत्तिरीय संहितेंत व अथर्ववेदात हा शब्द आलेला असून ह्याचा अर्थ 'क्षारजल' कोणता तरी क्षोभणारा पदार्थ मिसळलेलें पाणी, असा असून यात कपडे धूत असत अथर्ववेदात याचा मूत्र असा अर्थ आहे पल्पूलय हें क्रियापद ( पल्पूलयति जले प्लावयति शरीरं प्रक्षालयतीत्यर्थः। ) तैत्तिरीय संहिता व तैत्तिरीय ब्राह्मण ह्यामध्यें आलेलें आहे सूत्रात चर्म व वस्त्र अशा पाण्यानें धुतलीं जात असा उल्लेख आलेला आहे

[32] पारीणह्य — तैत्तिरीय संहितेमध्यें ह्या शब्दाचा अर्थ घरगुती भांडीं असा आहे व पत्नीच्या ताब्यांत हीं भांडीं असत असें त्या संहितेंत म्हटलें आहे

[33] प्रंख — हें प्रेंख याचें दुसरें रूप असून याचा अर्थ झोका, झोला, झोपाळा, दोला असा आहे व तैत्तिरीय संहितेंत व तैत्तिरीय ब्राह्मणात हा शब्द आला आहे

[34] मुसल — ऋग्वेदोत्तर संहितामध्यें व ब्राह्मणात हा शब्द आला असून याचा अर्थ मुसळ असा आहे

[३५] वश —वाबूने केलेले घराचे वासे अशा अर्थानें हा शब्द ऋग्वेदोत्तर संहिता ग्रंथात आलेला आहे

[३६] विवध किंवा वी-वध —एखादें ओझें वाहून नेण्याकरिता खांद्यावर घेतलेलें जू असा याचा अर्थ दिसतो पण ब्राम्हण ग्रंथात ह्या शब्दाचा फक्त अलंकारिक रीत्या उपयोग केलेला दिसतो, जसें वि-विवध' म्हणजे विषम प्रमाणांत विभागलेल्या ओझ्यासहित, आणि 'सवीवधता' म्हणजे ओझ्याचा सारखेपणा.

[३७] शल्क —उत्तरकालीन संहिता व ब्राह्मण ग्रंथात हा शब्द आग पेटविण्याकरिता उपयोगात आणण्याची ढलपी अशा अर्थानें आला आहे

[३८] शूर्प —तैत्तिरीय संहिता, अथर्ववेद व मागाहून झालेले ग्रंथ ह्यामध्यें हा शब्द आला असून त्याचा अर्थ धान्य पाखडण्याचें सूप असा आहे ह्याला 'वर्षवृद्ध' पावसानें फुगलेलें असें अथर्ववेदात म्हटलें आहे यावरून झिमर म्हणतो त्याप्रमाणें हें सूप वाळलेल्या लाकडाचेंच नव्हे, तर कधीं कधीं वेताचें बनवीत असें दिसतें

[३९] संन्हन —नंतरच्या संहिता व ब्राह्मण ह्यांत हा शब्द आला असून याचा अर्थ पट्टी, पट्टा किंवा बांधण्याचा दोर असा आहे

[४०] स्थली —तैत्तिरीय संहिता, अथर्ववेद व मागाहूनचे ह्यामध्यें स्वयंपाकाचें भांडें या अर्थी हा शब्द आहे

[४१] अभिषवणी —अथर्ववेदांतील ह्या शब्दाचें भाषांतर झिमर 'दाबण्याचें यंत्र' असें करितो परंतु तें फक्त अभिषवण-दाबण्यास उपयोगी-या अर्थी असावें

[४२] आसंद —अथर्ववेदात हा व्रात्याच्या वेळचा आसंदीचा भाग आहे असें वर्णन आहे व्हिटने म्हणतो, तो आसनाचा भाग नसून आसनच आहे असें मानणें बरें. अफ्रेट, झिमर आणि रॉथ म्हणतात कीं, याचा अर्थ आसनावर ठेवण्याचा तक्क्या परंतु हा अर्थ व्यक्त करण्यास आस्तरण हा शब्द आहेच

[४३] आस्तरण —व्रात्याच्या वेळी ज्या आसन्दीचा उपयोग करीत तिच्यावर घालण्याचें जें आच्छादन तें राजसूयाच्या वेळचें राजाचें आच्छादन ज्याप्रमाणें असलें तरी घालतें कौषीतकी उपनिषदातील शब्द उपस्तरण हा आहे.

[४४] उपधान —अथर्ववेदात हा शब्द आसन्दीवरील उशी या अर्थानें आला आहे दुसऱ्या ग्रंथात याला उपबर्हण असें म्हटलें आहे

[४५] उब्यल —अथर्ववेदातील पर्यंकाच्या किंवा वैवाहिक रथाच्या वर्णनात हा शब्द आला असून याचा अर्थ चौकटीचीं चार लाकडें असा आहे या पाठाबद्दल संशय आहे बहुतकरून उप्पल असा पाठ असावा

[४६] कंस —अथर्ववेदात व इतर ठिकाणीं हा शब्द धातूचें पात्र या अर्थानें आला आहे

[४७] कशिपु —कशिपु म्ह० चटई किंवा उशी अथर्ववेदात म्हटलें आहे कीं, स्त्रिया दगडानें वेत फोडून त्याच्या चटया करीत उलटपक्षीं शतपथात सोन्याच्या चटईचा उल्लेख आहे

[४८] कुल्मल —अथर्ववेद, मैत्रायणी संहिता व शतपथ ब्राह्मण यात हा शब्द असून याचा अर्थ बाणाच्या फळाच्या ज्या भागात बाणाचा दांडा घालतात तो बाणाच्या मानेसारखा भाग

[४९] नृति —अथर्ववेदाच्या एका लेखात याचा अर्थ कातड्याची पिशवी असा आहे पैप्पलाद शुद्ध प्रतींत जरी हाच शब्द असला तरी रॉथ व व्हिटने म्हणतो त्याप्रमाणें हा शब्द दृति असा आपण समजला पाहिजे लुडविग या नृतीचा अर्थ नर्तक असा करतो पण तो संदर्भास जमत नाहीं

[५०] बंधन —बंधन म्हणजे दोर किंवा दुसरें बांधायाचें साधन हा शब्द अथर्ववेदात व नंतरच्या ग्रंथात आढळतो

[५१] वध्र —विणलेला पलंग जिनें बांधतात ती वादी किंवा पट्टी हा शब्द अथर्ववेद व शतपथब्राह्मण ह्यात आढळतो

[५२] शयन —अथर्ववेद व मागाहून झालेले ग्रंथ यात याचा अर्थ पलंग असा आहे

[५३] शिक्य —अथर्ववेद व तदुत्तर ग्रंथात याचा अर्थ दोरीचें शिंकें असा आहे.

[५४] सूत्र —अथर्ववेद व उदुत्तर ग्रंथात सूत, धागा असा या शब्दाचा अर्थ आहे. बृहदारण्यकोपनिषदात हा शब्द 'यज्ञासंबंधीं नियमाचें पुस्तक' अशा अर्थानें आला आहे

[५५] सेहु —अथर्वात एका तुलनेच्या प्रसंगीं हा शब्द आला असून त्याचा अर्थ रसहीन पदार्थ असा आहे

[५६] चप्य —वाजसनेयि संहिता आणि शतपथ ब्राह्मण यात हें एका यज्ञपात्राचें नाव आहे

[५७] तुला —याचा अर्थ तराजू असा आहे व हा शब्द वाजसनेयि संहितेमध्यें आलेला आहे शतपथ ब्राह्मणात सुद्धा या जगात व पारलौकिक जगात मनुष्याचीं बरीवाईट कृत्यें मापण्याकरिता ताजडीबद्दल उल्लेख आलेला आहे ही ताजडी व मागाहून वर्णन केलेलें दिव्य याकरितां जी ताजडी लागत असे ती ताजडी या दोन्ही निराळ्या आहेत मनुष्य अपराधी किंवा निरपराधी हें ठरविण्याकरिता संशयित माणसाला ताजडींत घालून ब्राह्मणग्रंथोत्तरकालात त्याचें दोनदा वजन करीत व दुसऱ्या वेळीं त्या माणसाचें पहिल्या वेळेच्या वजनापेक्षा जसें कमीजास्त वजन भरेल तसा तो अपराधी किंवा निरपराधी ठरवीत असत ही मागाहून सुरू झालेली चाल पूर्वीच्या काळीं होती असें मानणें शक्य नाहीं

[५८] न ड् व ला.—'वेतांचा विछाना.' हा शब्द वाजसनेयि संहिता ( ३०,१६ ) व तैत्तिरीय ब्राह्मण ( ३,४,१२,१ ) यामध्यें आलेला आहे.

[५९] वा ल —मागाहून झालेल्या संहिता व ब्राह्मण ग्रंथात केसाची चाळणी असा याचा अर्थ आहे.

[६०] श ल ली.–केस वेगळे करण्याकरता व डोळ्यात काजळ घालण्याकरिता या साळपिसाचा उपयोग होतो व अशा अर्थानेंच हा शब्द शतपथ व तैत्तिरीय ब्राह्मणात आलेला आहे.

[६१] स त.—एका यज्ञामध्यें उल्लेखिलेल्या एक प्रकारच्या भांड्याचें हें नांव आहे.

[६२] स्तु प.—वाजसनेयि संहितेत ( ३,२,२५,२ ) केसाचा गोंडा असा याचा अर्थ आहे. हाच अर्थ शतपथ ब्राह्मणात आहे.

[६३] अं गा रा व क्ष य ण.—बृहदारण्यकोपनिषदांतील अनिश्चित अर्थाचा शब्द मॅक्समुल्लर आणि बोथलिंक यांच्या भाषांतरात त्याचा अर्थ साडशी असा केला आहे. सें पी. कोशात त्याचा अर्थ 'कोळसे विझविण्याकरिता भांडें' असा केला आहे. आणि मॉनिअर विल्यम्स् हा कोळसे विझविण्याकरिता यंत्र असा अर्थ घेतो. लहान सें पी. कोशात त्याचें भाषांतर 'कोळसे उचलण्याचा चिमटा' असें केलें आहे.

[६४] आ द र्श —'आरसा.' हा शब्द उपनिषदें आणि आरण्यकें यांतच सापडतो.

[६५] उ च्छी र्ष क —कौषीतकी उपनिषद् ( १,५ ) यातील पर्यंकाच्या वर्णनात आल्यामुळें याचा अर्थ उशी असा असावा.

[६६] उ प म न्थ नी —बृहदारण्यकोपनिषदात 'रवी' या अर्थी हा उपयोगात आणिला आहे. वाजसनेयि संहितेत उपमंथितृ हा पुरुषमेधातील बळींच्या यादींत आहे आणि क्रियापद, उपमन्थ् म्हणजे घुसळण्याकरिता द्रव्यें अशा अर्थी योजिला आहे.

[६७] उ प श्री-उ प श्र य —एकाच शब्दाचे हे दोन पाठ आहेत. पहिला शब्द कौषीतकी उपनिषद या ग्रंथात सापडतो आणि दुसरा पाठ इतर उपनिषदामध्ये आढळतो आणि त्याबरोबर अथर्ववेदातील उताऱ्यातहि जरी मूळ उपश्रयः असा पाठ आहे तरी उपश्रय या अर्थीच असावा असें रॉथ म्हणतो. दोनहि ठिकाणीं त्याचा अर्थ पर्यंक याशीं संबंध असलेला ( अथर्ववेदांत आसन्दी आणि कौषीतकी उपनिषदात पर्यंक)असा होतो. आफ्रेट, रॉथ आणि मॅक्समुल्लर उशी किंवा आच्छादन असा अर्थ करितात. परतु व्हिटने म्हणतो कीं, त्याचा अर्थ 'आधार' किंवा 'स्तंभ'असा आहे.

[६८] उ ल्मु क.—ब्राह्मणांमध्यें जळतें लांकूड या अर्थी हा शब्द सर्वसाधारणपणें उपयोगात आणितात आणि त्यापासून कोळसा (अंगार) काढिता येतो.

[६९] उ ल्मु का व क्ष य ण —शतपथ ब्राह्मणात हा शब्द पुष्कळ वेळां आला असून त्याचा अग्नि शमविण्याचा उपाय अथवा निश्चितपणें त्याचा अर्थ चिमटा असा आहे.

[७०] क री ष.—शतपथ ब्राह्मणात गोवऱ्या या अर्थी हा शब्द आला आहे. अथर्ववेदावरून असें कळतें कीं, शेतांतील प्राण्याच्या नैसर्गिक खताची फार प्रशंसा करीत.

[७१] चू र्ण.—चूर्ण याचा अर्थ चूर्णहस्ता या समासावरून सुगंधि पूड असा होतो. चूर्णहस्ता हें विशेषण कौषीतकी उपनिषदांत अप्सरांना दिलेलें आहे.

[७२] त र्कु —याचा अर्थ चाती असा आहे. यास्काच्या निरुक्तावरूनच ( २,१ ) हा शब्द फक्त वैदिक वाङ्मयांत आलेला आहे असें म्हणता येईल. निरुक्तांत येण्याचें कारण शब्दाच्या स्थानविनिमयाचें उदाहरण म्हणून हा शब्द यास्कानें दिलेला आहे. त्याच्या मतें हा शब्द कर्तृ–कातणें या धातूपासून आलेला आहे

[७३] ते ज नी.—याचा अर्थ उत्तरकालीन संहिता व ब्राह्मण ग्रंथात वेताची जुडी असा आहे व काहीं ठिकाणीं या जुडींचा बनलेला दोर असाहि आहे. कारण तेजनीच्या दोन्ही टोकाचा उल्लेख केलेला आहे.

[७४] धृ ष्टि.—तैत्तिरीय आरण्यकांत द्विवचनी आलेलें त्याचप्रमाणें शतपथ ब्राह्मण व सूत्रग्रंथ ह्यात आलेलें हें रूप निखारे उचलण्याचे चिमटे अशा अर्थानें आलेलें आहे.

[७५] नि ना ह्य.—शतपथ ब्राह्मणात ( ३, ९, २, ८.) पाण्याचा घडा असा अर्थ आहे व टीकाकाराचे मतानें ह्याला निनाह्य म्हणण्याचें कारण तो जमीनींत पुरलेला असे. एगलिंग ह्या शब्दाचा पाणी थंड होण्याकरता जमीनींत पुरलेला हौद किंवा भांडें असा अर्थ करतो.

[७६] प र्यं क —कौषीतकी उपनिषदामध्यें ब्राह्मणाच्या आसनाचें हें नांव आहे. इतरत्र ज्याला 'आसंदि' असें नांव आहे तें व हा पर्यंक एकच होत. उपनिषदात ह्याचा जो उपयोग आलेला आहे त्यावरून अंग टाकण्याकरिता लाकूड आसन असा ह्याचा क्वचितच अर्थ होतो व ह्याचा अर्थ सिंहासन असाहि दिसतो.

[७७] प रि च र्म ण्य.—कौषीतकी ब्राह्मण ( ६, १२ ) व शां. आरण्यक ( २, १ ) ह्यामध्यें कातड्याची वादी असा ह्याचा अर्थ आहे.

[७८] प रि प व न.—निरुक्तामध्यें ( ४, ९, १० ) धान्य चाळण्याचें यंत्र असा याचा अर्थ आहे.

[७९] पा दे ज न —शतपथ ब्राह्मणात पाय धुण्याकरतां एखादें भांडें असा त्याचा अर्थ आहे.

[80] पिन्वन—शतपथ ब्राह्मणात ( १४, १, २, १७, २ १, ११, ३, १, २२, ) एखाद्या व्रताने वेळीं उपयोगी पडणारें भांडें अशा अर्थानें हा शब्द आलेला आहे.

[81] पिशील—शतपथ ब्राह्मणात ( २, ५ ३, ६ ) लाकडी भांडें किंवा ताट असा ह्याचा अर्थ दिलेला आहे. लाट्यायन श्रौतसूत्रामध्यें ( ४, २, ४, ५ ) एका पिशील वीणेचा उल्लेख आलेला आहे व ही वीणा एक प्रकारची सतार असली पाहिजे

[82] प्रणेजन—हा शतपथ ब्राह्मणात (१, २, २, १८) शब्द येतो याचा अर्थ 'धुण्यासाठीं पाणी' असा आहे

[83] प्रेंख—'झोला' झोंपाळा'पाळणा, 'महाव्रत विधीच्या वेळीं येणाऱ्या वर्णनात याचा उल्लेख येतो हा उल्लेख काठक संहिता, ऐतरेय आरण्यक आणि पंचविंश ब्राह्मण आणि इतर ठिकाणीं सुद्धा आला आहे. उपलब्ध माहितीवरून असें म्हणावें लागतें कीं, सध्याच्या झोंपाळ्याप्रमाणेंच पूर्वींहि तो करीत असावेत

[84] प्रोष्ठ—हा शब्द तैत्तिरीय ब्राह्मणात आढळतो तेथें त्याचा समासात उपयोग केलेला नाहीं ऋग्वेदात 'प्रोष्ठशय' या विशेषणात स्त्रियासंबंधीं हा शब्द उपयोगात आणलेला आहे यावरून याचा अर्थ कदाचित 'बाक, हाच असावा पहिल्या उताऱ्यात हा शब्द 'तल्प, आणि 'वह्य' याहून अगदीं वेगळा ( अर्थात ) आहे असें दाखविलें आहे परंतु तेथें त्यातील अगदीं पूर्ण अंतर काय असावें हें सिद्ध करण्यास काहीं पुरेसा पुरावा सापडत नाहीं

[85] फलक—ह्याचा अर्थ 'फळी' हा शब्द गाडी किंवा रथ तयार करण्याच्या प्रसंगीं उपयोगात आणतात किंवा सोम पिळून काढण्याकरिता ( अधिषवण फलक ) किंवा इतर कामाकरिता लागणारी फळी

[86] बृसी.—याचा अर्थ गवताची उशी हा शब्द सूत्रातून व ऐतरेय आरण्यकात आला आहे बृशा व वृषी हीं याचीं चुकीचीं रूपें मधून मधून आढळतात

[87] भस्त्रा—शतपथ ब्राह्मणात याचा अर्थ चामड्याची बाटली किंवा थैली असा आहे ( १ १, २, ७, ६, ३, १६)

[88] मणिक—जुन्या अद्भुत ब्राह्मणात आणि सूत्रात याचा अर्थ पाण्याची बाटली असा आहे.

[89] मूत.—ऋग्वेदोत्तर संहितेंत आणि ब्राह्मणात विणलेली टोपली या अर्थी हा शब्द येतो मूतक म्हणजे एक 'लहान टोपली'

[90] वालदामन्—शतपथ ब्राह्मणात घोड्याच्या केसाची वादी अशा अर्थानें हा शब्द आलेला आहे.

[91] शुबल—शतपथ ब्राह्मणात हा शब्द आलेला आहे ह्या शब्दाचा अर्थ अनिश्चित आहे हरिस्वामी आपल्या टीकेंत ह्याचा अर्थ गवताची पेंढी असा करितो एग्लिंग हा कापसाचा धागा किंवा कोंड्याचा धागा असे अर्थ सुचविता काहींहि असलें तरी लवकर पेट घेणारा पदार्थ असा ह्याचा अर्थ असला पाहिजे

[92] श्लेष्मन्—ह्याचा अर्थ ज्याच्यावर एखाद्या वस्तूचे भाग जोडले जातात तें असा आहे चामडें असेल तर बारिक तारा, रथ असेल तर दोर व लाकूड असेल तर सरस ( चिकटवावयाचा ) असा ह्या शब्दाचा अर्थ होईल,

[93] हिरण्यकशिपु—ब्राह्मण ग्रंथात ह्या शब्दाचा अर्थ सोन्याचें म्हणजे सोनेरी वस्त्रानें बनविलेलें आसन असा आहे

## रज्जुनामें [ ऋग्वेद ]

| | | |
|---|---|---|
| कक्ष्य ( अश्वोदर बंधन रज्जु ) | [2] दामन् | रज्या |
| | निष्पिध | [5] रशना |
| ज्याका | [3] पाश | रश्मि |
| [1] तन्ति (दीर्घप्रसारिता रज्जु) | मुक्षीजा (जाळें) | वयज |
| | [4] योक्त्र | [6] वरत्रा |
| त्रिविष्टिधातु (तिपेडी दोरी) | योग्या | [7] संदान |
| | रज्जु | [8] स्यूमन् |

[ तै. स ]

| | |
|---|---|
| [9] मेखला | [10] रास्ना |

[1] तन्ति—ऋग्वेदामध्यें एके ठिकाणीं हा शब्द आलेला आहे व त्याचा अर्थ रॉथ हा अनेकवचनीं प्रयोगी 'वासराच्या रांगा' असा करतो पण ह्या शब्दाचा पुढें झालेल्या ग्रंथात ज्या अर्थानें उपयोग केलेला आहे तो अर्थ म्हणजे दोऱ्या किंवा वासरास बांधण्याकरिता दावीं हा ऋग्वेदात सुद्धा घेणें बरें

[2] दामन—ह्याचा अर्थ दोर किंवा मेखला असा आहे व हा शब्द ऋग्वेद व पुढील ग्रंथ ह्यात अनेकदा आलेला आहे यज्ञातल्या घोड्याच्या दोऱ्याविषयीं त्याचप्रमाणें वासराना दोरीनें बांधण्याच्या प्रथाताविषयीं उल्लेख आलेला आहे. शतपथ ब्राह्मणात घोड्याच्या केसाचा झुबका असा अर्थानें हा शब्द आलेला आहे

[3] पाश—ऋग्वेद व तदुत्तर ग्रंथ यात बांधून आवळण्याकरिता उपयोगीं पडणारा दोर असा ह्याचा अर्थ आहे दोर व ग्रंथि ह्यांचा एकत्र संबंध अथर्ववेदामध्यें आलेला आहे शतपथ ब्राह्मणात पाश हा शब्द ज्याच्या योगानें मनुष्या जह्याजाला पर्वताशीं बांधिलें होतें त्या दोराला लाविला आहे लक्षणेनें वरुणाच्या पाशाला हा शब्द वारंवार लावलेला आढळून येतो

[4] योक्त्र—ऋग्वेदात आणि नंतर गाडीला किंवा रथाला जुंपण्याच्या चमड्याच्या वाद्या असा याचा अर्थ आहे

[5] रशना—दोर किंवा दोरी या अर्थी ऋग्वेदांत घोडे बांधण्याकरिता म्हणून याचा उपयोग केला जात असे म्हणून लिहिलें आहे पण एका उताऱ्यात 'शीर्षण्या रशना'लगाम अस

अर्थ होत नाहीं. कांहीं उताऱ्यांत पट्टे असा अर्थ ध्वनित होतो. कांहीं मध्यें पट्टे आणि लगाम हे दोन्हीहि अर्थ ध्वनित होतात. इतरत्र साधारण दोर हा अर्थ निघतो.

[6] वरत्रा.—ऋग्वेदामध्यें व पुढें ह्याचा अर्थ वादी किंवा दोरी असा आहे. ह्याचा उपयोग बैल जूंला बांधावयास किंवा कदाचित् जूं दांड्याला बांधावयास होत होता किंवा विहिरींतून (अवत) पाणी काढण्याकरितां उपयोगांत आणलेली दोरी असाहि ह्याचा अर्थ होतो.

[7] सदान.—ऋग्वेदांत व मागाहून झालेले ग्रंथ ह्यामध्यें दोर, काढणी किंवा बेडी ह्या अर्थानें हा शब्द आलेला आहे.

[8] स्यूमन्.—ऋग्वेदामध्यें एके ठिकाणीं रॉथच्या मतानें घराचा दरवाजा घट्ट आवळणारी दोरी असा आहे.

[9] मेखला.—नंतरच्या संहितेंत आणि ब्राह्मणांत कंबरेचा पट्टा या अर्थी, अथवा ब्रह्मचाऱ्यानें कमरेस बांधावयाची दोरी अशा अर्थी हा शब्द आला आहे

[10] रास्ना.—यजुर्वेद संहितेंत आणि शतपथ ब्राह्मणांत कम्मरपट्टा किंवा दोरी या अर्थी, रशना आणि रश्मीप्रमाणें हा शब्द येतो.

## जाती कुलें व वंश

### जाती व कुलें [ ऋग्वेद ]

| | | |
|---|---|---|
| अज | गोपा | भरत |
| अनिग् | चेदि | भलानस |
| अनु | ज्ञाति | भारत |
| अनूच | तुर्व | मत्स्य |
| अलिन | तुर्वश | मूरदेव |
| असूत | तृत्सु | यक्षु |
| आजमीढ | दशग्व | यदु |
| आभि | दस्यवेवृक | रथप्रोष्ठ |
| आयु | दस्यु | राजन्य |
| आरि | दास | वणिज् |
| आर्य | दुर्मद | वनर्गु |
| उग्रदेव | द्रुह्यु | वर्ण |
| औगण | नवग्व | विजामि (विविध-ज्ञाति) |
| कितव | नहुष् | विश् |
| कुयवाच् | पक्थ | विषाणिन् |
| कृष्णयोनि | पणि | वृचीवन्त |
| कृष्टि | पशु | वृपल |
| क्रिवि | पारावत | वैकर्ण |
| क्षत्र | पृथुपर्शु | शर्धीक (दण्ड-वशाज) |
| क्षिति | बार्हत (गन्धर्व वगैरे) | शिग्रु |
| गन्धारि | ब्राह्मण | |
| गोपति | | |
| शिम्यु | शिश्नदेव | सुत |
| शिव | शीष्ट | सौधन्वन् |

### [ तै. सं ]

| | | |
|---|---|---|
| अब्राह्मण्य | धन्वकृत | रथकार |
| अर्य | [2] निषाद | राजन्य |
| आथर्वण | पञ्चजन | राजन्यबन्धु |
| आर्षेय | पाणि | वाणिज |
| इषव्य | पाञ्चजन्य | वैश्य |
| इषुकृत | [3] पुञ्जिष्ठ | शूद्र |
| कर्मार | [4] ब्रह्मन् | [5] शूद्रा |
| [1] कुलाल | ब्राह्मण | श्वनि |
| क्षत्रिय | ब्राह्मणवत् | श्वपति |
| तक्ष | मलिम्लु | [6] सूत |
| तस्कर | मृगयु | स्तेन |
| दुर्ब्राह्मण | यति | स्थपति |

### [ अथर्ववेद ]

| | | |
|---|---|---|
| [7] अग | दास (कोळी, धीवर | रथकार |
| अत्रि | [10] द्विज | राजन्य |
| अब्राह्मण | पर्शु | वणिज |
| अर्किन् | पाञ्चजन्य | [14] मात्य |
| अय | पूरु | [15] शकम्भर |
| आयवन | पौञ्जिष्ठ (कोळि) | शूद्र |
| आर्य | [11] बल्हिक | शूद्रकृत |
| कण्व | ब्राह्मण | सुब्राह्मण |
| [8] कैरातिका (किरात-कन्या) | [12] महावृष | सृञ्जय (जातीचे लोक) |
| क्षत्र | [13] मूजवन्त (जाती-चे लोक) | स्थपति |
| [9] दाक्षायण | मूरदेव | |
| दाशराज्ञ | यदु | |

### [ वाज स. ]

| | | |
|---|---|---|
| [16] चण्डाल | चाण्डाल | [17] पौञ्जिष्ठ |

### [ संहितेतर ]

| | | |
|---|---|---|
| [18] अन्ध्र | [28] कुन्ति | [38] गोत्र |
| [19] आम्रकोशिन् | [29] कुरुपञ्चाल | [39] गौपायन |
| [20] आथर्वन् | [30] कुल | [40] जाति |
| [21] उत्तरकुरु | [31] केकय | [41] निखर्व |
| [22] उत्तरमद्र | [32] केशिन् | [42] निष्करीय |
| [23] उदीच्य | [33] केशिनी | [43] नैषाद |
| [24] ऊर्णनाभि | [34] कोप | [44] पञ्चाल |
| [25] ककतीय | [35] कौरव्य | [45] पुण्ड्र |
| [26] कम्बोज | [36] क्रौह-पचाल | [46] पुलिन्द |
| [27] कारस्कर | [37] क्रैव्य | [47] पौश्लेय |

| | | |
|---|---|---|
| [१८]प्राच्य | [२३]मूतिब | [२८]सत्वन्त |
| [१९]बाल्हीक | [२४]म्लेंछ | [२९]सत्व |
| [२०]भरत | [२५]शबर | [३०]स्पर्धु |
| [२१]मागधदेशीय | [२६]शाल्व | |
| [२२]मूचीप | [२७]श्विक्र | |

[१] कु ला ल—तैत्तिरीय संहितेंत 'शतरुद्रीय' नामक कर्मामध्यें (रुद्राध्यायात) या शब्दाचा कुंभार या अर्थानें उल्लेख आला आहे.

[२] नि षा द—ऋग्वेदानंतरच्या तैत्तिरीय व वाजसनेयि संहिताग्रंथात व ब्राह्मण ग्रंथात हा शब्द आला आहे. या शब्दावरून एखाद्या विशिष्ट जातीचा बोध होतो असें नाहीं तर शूद्र लोकांप्रमाणें जे लोक आर्यांच्या अमलाखालीं नव्हते अशा अनार्य लोकांना हें नाव होतें. कारण औपमन्यवाच्या मतानें पांच प्रकारचे लोक (पंचजना) म्हणजे चार जाती (चत्वारोवर्णा) आणि पांचवे निषाद (निषाद पंचम) होत. वाजसनेयि संहितेंत हा शब्द आला आहे. तेथें टीकाकार महीधरानें त्याचा भिल्ल किंवा भील असा अर्थ दिला आहे. लाट्यायन श्रौतसूत्रात निषादाची वसति असलेल्या एका खेडेगावाचा उल्लेख आला आहे व निषादस्थपति या नावाच्या एका निषादाच्या पुढाऱ्याचा कात्यायन श्रौतसूत्रात व त्याच सूत्रावरील टीकाकारानें उद्धृत केलेल्या एका ब्राह्मण ग्रंथात उल्लेख आला आहे. वेबरच्या मतानें निषादलोक हे मूळचे वसति करून (नि-सद्) राहाणारे लोक असावे. कारण या मताला एका गोष्टीचा आधार आहे ती गोष्ट ही कीं विश्वजित् नामक यज्ञ करणाराला काहीं दिवस निषादाबरोबर रहावें लागे व त्यामुळें जे निषाद अशा आर्यांना आपणात राहू देत त्यांच्यावर थोडी तरी आर्य संस्कृतीचा छाप पडण्याचा संभव असे. पण आर्य लोकांच्या समाजव्यवस्थेच्या बाहेर असलेल्या मूळच्या सर्व लोकांना ही निषाद पदवी लाविता येईल. व्हान श्राडर म्हणतो कीं, हे निषाद लोक 'नीशियन्स' या लोकांशीं सदृश असावेत. कारण ग्रीक इतिहासकारांनीं असा उल्लेख केला आहे कीं अलेक्झांडर हा अश्वकांच्या देशात असताना 'नीशियस्' लोकांनीं त्याच्याकडे एक वकील पाठविला होता. परंतु निषाद आणि हे नीशियन्स लोक दोन्ही एकच कीं काय या बद्दल शंका आहे.

[३] पुं जि ष्ठ—तैत्तिरीय संहिता व तदुत्तर ग्रंथ यांत हा शब्द आला असून त्याचा कोळी असा अर्थ आहे. परंतु वाजसनेयि संहिता १६.२७ येथें टीकेंत महीधर याचा पक्षी पकडणारा (पारधी) असा अर्थ घेतो.

[४] म हा न्—(नपुंसकलिंगी) हा शब्द क्षत्रिय व इतर लोकांहून वेगळा असा ब्राह्मणवर्ग दर्शवितो. अथर्ववेद व तदनंतरच्या ग्रंथातून हा शब्द आढळतो.

[५] मु द्रा—तै संहिता, अथर्ववेद व मागाहूनच्या ग्रंथात हा शब्द गदर्भी या अर्थानें आलेला आढळतो.

[६] सू त—यजुर्वेद संहिता व पुढील ग्रंथात ग्रामणी बरोबर उल्लेख असलेल्या एका राजदरबारातील नोकराचें हें नाव आहे. पंचविंशब्राह्मणात जे आठ वीर आले आहेत व इतर सर्व संहितांमध्यें जे अकरा रत्नी आले आहेत त्यांपैकीं सूत हा एक होय. याचा उल्लेख अथर्ववेदात राजदूतांपैकीं एक ह्मणून आलेला आहे. त्याचप्रमाणें यजुर्वेदाच्या शतरुद्रीय अनुष्ठानामध्येंहि हा शब्द आला आहे. टीकाकाराच्या मतानें सूत याचा राजाचा सारथी असा अर्थ आहे. परंतु अनेक ठिकाणीं सूत शब्दाबरोबर संग्रहीतृ हाहि शब्द आला आहे. तेव्हां टीकाकाराचा अर्थ येथें संभवत नाहीं. एग्लिंग म्हणतो कीं ब्राह्मणकालात तरी हा सूत राजदरबारातील कवि होता. वेबरच्या मतानें या सूत शब्दाचा अर्थ राजाजवळ नेहमीं प्रवेश असतो तो असा आहे. महाभारतकालात सूत म्हणजे राजाचा वंदीजन किंवा भाट असा अर्थ आहे. यजुर्वेदाच्या निरनिराळ्या संहितांतील शतरुद्रीय प्रकरणात सूत याला अहन्ति, अहन्त्य, अहन्त्व असे शब्द लाविले आहेत यावरून सूत हा भाट व वादन करणारा असा दोन्हा प्रकारचा मनुष्य होता असें दिसते. भाट व वादन हे दोन्ही गुण एकत्र असलेले अन्यत्र कोठेंहि आढळत नाहींत.

[७] अं ग—गंधारि, मुजवन्त आणि मगध या निरनिराळ्या लोकांसबधीं जें अथर्ववेदात वर्णन आहे त्यात हें नाव आलेलें असून गोपथ ब्राह्मणात 'अंगमागधा' या सामासिक शब्दातहि याचा उल्लेख आहे. त्यांची वसती गंगा आणि शोण यांच्या काठीं असे यावरून पूर्वीपासून ते त्याच ठिकाणीं रहात असावेत असें दिसतें.

[८] कै रा ति का—किरातलोकाची मुलगी औषधांकरिता पर्वतांवर खणीत असलेल्या अशा संबंधात हिचा अथर्ववेदात उल्लेख आला आहे.

[९] दा क्षा य ण—दक्षाचा वंशज. या दाक्षायण लोकांचा अथर्ववेद व काठक संहितेंत शतानीकाला सोनें (अथवा अलंकार) दिल्याबद्दल उल्लेख आला आहे. शतपथ ब्राह्मणात हा शब्द सोनें या अर्थानेंच आला आहे. याच ब्राह्मण ग्रंथात दाक्षायण लोकांना राजे म्हटलें आहे, व दाक्षायण वंशातील पार्वति नामक कोणी मनुष्यानें दाक्षायण यज्ञ केल्यामुळें त्याला राज्यपद मिळालें व त्याच्या वंशाची पुढें भरभराट होत गेली.

[१०] द्वि ज—दोनदा जन्मलेला हें विशेषण आर्यांना विशेषत ब्राह्मणांना लावलेलें असून अथर्ववेदातल्या एका दुर्बोध सूक्ताशिवाय वैदिक वाङ्मयात अन्यत्र कोठेंहि उल्लेख दिसत नाहीं.

[११] बा ल्हि क—हें एका जातीच्या लोकांचें नाव. अथर्ववेदात येतें. त्यात तापाला (तक्मन्) मूजवन्त, महावृष व बल्हिक यांच्याकडे जाण्यास सांगितलें आहे. मूजवन्त लोक हे खात्रीनें उत्तरेकडे राहाणारे लोक होते. ब्लूमफील्डच्या

मतानें बल्हिक हें नाव म्लेंच्छार्थी (बाहेर रहाणारे या अर्थानें) असावें परंतु हा शब्द निःसंशय उत्तरेकडील कोणत्यातरी जातीवरून घेतला असला पाहिजे. रॉथ व वेबर याचे मतें असें कीं, या बल्हिकांचा इराणी जातीकडे (बल्ख) संबंध असावा हें मत झिमरनेंहि एकदा स्वीकारलें होतें परंतु पुढें तो म्हणतो कीं, पारशी जातीचा बल्हिकाशीं कांही संबंध होता असें मानण्याचें कांहींच कारण नाहीं.

[१२]महावृष —हें एका जातीचें नाव आहे यांचा उल्लेख अथर्ववेदात बाल्हिक याच्या बरोबर आला आहे व याच्याकडे तक्मन् (तापाला)ला जाण्याची आज्ञा झाल्याबद्दलचा तेथे उल्लेख आहे. ब्लूमफील्ड म्हणतो कीं हें नाव विशेषतः आवाज आणि अर्थ याकडेच लक्ष देऊन दिलेलें असावें, त्याचा स्थलाशीं कांहीं संबंध नसावा(हे महावृष म्हणजे महाशक्तिमान = रोगाला तोंड देण्याला समर्थ)असावें परंतु हें मत फारसें सयुक्तिक नाहीं महावृष देशात रैक्पर्ण हें स्थान होतें असें छान्दोग्य उपनिषदात म्हटलें आहे. 'हृत्स्वाशय' हा महावृषाचा राजा होता असा जैमिनीय उपनिषद् ब्राह्मणात उल्लेख असून महावृषाचा बौधायन श्रौतसूत्रातील एका मंत्रात आहे.

[१३]मूजवन्त.—महावृष, बल्हिकाबरोबर उल्लेख आलेल्या लोकाचें नाव. यजुर्वेद संहितेंतहि दूर रहाणारे लोक असाच या शब्दाचा अर्थ आहे. आणि त्याच संहितेंत रुद्राला त्याच्या धनुष्यासह या लोकांच्याकडे जाण्यास आज्ञा केली आहे ऋग्वेदात सोमाला 'मौजवत' (मूजवन्त लोकांकडून अथवा यास्काच्या मताप्रमाणें मूजवान पर्वतापासून येणारा) म्हटलें आहे हिंदी टीकाकाराना मूजवान हें पर्वताचें नाव आहे हें यास्काचें मत मान्य आहे. काश्मीरच्या नैऋत्येस असणाऱ्या एका पर्वताचें नाव मूजवान होय या झिमरच्या मतास पुरावा नाहीं असें हिलेब्रँटचें मत जरी बरोबर असलें तरी मूजवन्त नावाचा एक पर्वत होता त्यावरूनच या लोकानीं मूजवन्त हें नांव धारण केलें हें म्हणणें गैरवाजवी होणार नाहीं. मूजवन्त आणि मुंजवन्त एकच असे यास्काचें मत आहे आणि हिमालयाच्या एका भागानें किंवा त्यातील एका पर्वताचें हें नाव आहे असें महाभारतांत उल्लेखिलेलें आहे.

[१४]व्रात्य —यजुर्वेदात पुरुषमेधप्रसंगीं बलि दिले जाणाऱ्याच्या यादींत हें नांव आलेलें आहे परंतु तेथें या नावाबद्दल जास्त खुलासा नाहीं तो अथर्ववेद व पंचविंशब्राह्मण या ग्रंथात आढळतो अथर्ववेदात व्रात्यासाठीं एका विधीचें सविस्तर वर्णन आलेलें आहे (या विधीचा—व्रात्यस्तोमाचा—उल्लेख ज्ञानकोश विभाग दोन पृष्ट ६५ मध्यें आला आहे). पंचविंश ब्राह्मणात बहिष्कृत् लोकांच्या चार वर्गांचा उल्लेख आला आहे ते चार वर्ग म्हणजे—हीन, (पापाचरणानें निंदित झालेली) निंदित, (बहिष्कृत लोकात राहिल्यामुळें लहानपणींच बहिष्कृत झालेले) बहिष्कृत, व चवथे जे वृद्ध लोक पुरुषत्वहीनतेमुळें बहिष्कृत लोकांत रहात ते असे होत पहिल्या तीन जाती इतक्या महत्वाच्या नाहींत परंतु चवथी जात बनण्याचा हेतु काय असावा हें समजत नाहीं प्रो राजारामशास्त्री भागवत याच्या मतानें हे लोक देशातील बायकाशीं अयोग्य संबंध ठेवल्यामुळें आपली प्रकृति निःशक्त करून घेऊन व षंढ बनले परंतु मुळात या मतास आधार नाहीं. या चार जातींपैकीं हीन हेच लोक महत्वाचे व बाकीचे दुय्यम प्रतीचे असावेत हें संभवनीय आहे. रा. भागवत शास्त्र्यांच्या मतें हीन लोकाचे 'आर्यनूहीन' व 'अनार्यनूहीन' असे दोन वर्ग असावेत. पण ही निवळ कल्पनाच आहे या व्रात्याचा एकच वर्ग असावा असें वाटतें ते अनार्य असतील हें शक्य नाहीं कारण पंचविंश ब्राह्मणात असा स्पष्ट उल्लेख आहे कीं जरी ते स्वतः असंस्कृत होते तरी ते सुसंस्कृत लोकांचीच भाषा बोलत असत. यावरून ते आर्य असावे या मताला पुढील वाक्याचा आधार आहे. 'जे बोलावयास सोपें ते सुद्धा ते लोक उच्चारण्यास अवघड असे समजतात यावरून ते लोक सुसंस्कृत लोकांचीच परंतु त्यापेक्षा थोडी हलक्या प्रतीची भाषा बोलत असावे असें वाटतें सूत्रामध्यें ब्राह्मण व क्षत्रिय याना सदृश अशा अर्हन्त व योध (लढवय्ये) या वर्गांचा उल्लेख आला आहे. इतर अशा पुष्कळ गोष्टी आहेत कीं ज्यावरून हे ब्राह्मण संस्कृतीस पारखे असले तरी आर्यन होते ही गोष्ट सिद्ध होईल. उदाहरणार्थ हे लोक व्यापार किंवा शेतकी करीत नव्हते (यावरून ते एकाच ठिकाणीं वसती करून राहणारे लोक नसावेत) किंवा ते ब्रम्हचर्याचे नियम पाळीत नसत असें वर्णन आहे या लोकानीं एक विशिष्ट मताचरण केलें असता त्याना ब्राह्मणसमाजात प्रवेश करता येत होता. यावरून ते अनार्यन् खास नसले पाहिजेत अशी कल्पना करण्यात आली आहे. व्रात्याचा पोषाख व जीवनक्रम याविषयी कांहीं माहिती पंचविंश ब्राह्मणात मिळते. त्याचीं तत्वें ब्राह्मण लोकांच्या विरुद्ध होतीं ज्याना सुधारता येणें शक्य नव्हतें त्याना ते मारीत असत. त्याचा गृहपति डोक्यावर नेहमीं उष्णीष (शिरस्त्राण, पागोटें) धारण करी, त्याच्या हातात एक चाबूक व धनुष्य (ज्याह्रोड) असे, तो कृष्ण वस्त्र परिधान करी व त्याच्या अंगावर काळें व पांढरें कातडें पांघरलेलें असे त्याची एक चौचाकी गाडी असून त्या गाडीवर चार फळ्या असत एखाद्या पुढाऱ्याच्या अनुशासनाखालीं असलेल्या लोकाचीं वस्त्रें तांबड्या काठाचीं असत व ते अंगावर घेत तें कातडें दोन ठिकाणीं दुमडलेलें असे तसेंच त्या लोकांच्या पायात जोडे (उपानह) असत व त्याच्या पुढाऱ्याला निष्क नामक अलंकार धारण करण्याची फार आवड असे प्रो. राजारामशास्त्री याच्या मतानें हें निष्क म्हणजे एक प्रकारचें हाराचें नाणें होतें व्रात्यलोक सुसंस्कृत झाल्यावर त्यानीं आपली चीजवस्त पुरोहिताच्या ताब्यात द्यावी अशी रूढी असे याशिवाय इतर बरीच माहिती सूत्रग्रंथातून आली आहे (उदाहरणार्थ हे लोक जे जोडे वापरीत त्यांचा वर्ण काळ-

सर असे व त्यांची टोकें पुढें आलेलीं असत ) पण या माहितीला पंचविंशब्राह्मणात आधार नाहीं हे व्रात्यलोक कोठें रहात असत या विषयीं नक्की माहिती सांगणें कठिण आहे पण ज्या अर्थी ते नेहमीं भक्त असत त्या अर्थी ते सरस्वती नदीच्या पलीकडे रहात असावेत अशी कल्पना आहे कदाचित् ते पूर्वेकडेहि रहात असावे या कल्पनेला सूत्रांत आधार आहे तो असा कीं, या व्रात्य लोकांच्या उपभोग्य वस्तूंचें ( पोषाखाचें ) दान घेणारा ब्राह्मण ( कदाचित् व्रात्यस्तोम विधाच्या वेळीं ) मगधातील रहिवासी असे. व्रात्यांचें राहण्याचें ठिकाण निश्चित करण्याच्या बाबतींत अथर्ववेदाची कांहीं मदत होऊ शकत नाहीं कारण त्या वेदाची व्रात्याबद्दल अशी कल्पना आहे कीं ते सर्वत्र रहात असत रॉथ ह्मणतो कीं व्रात्याबद्दल पचविंशब्राह्मणकाराचें जें मत होतें तेंच अथर्ववेदात प्रतिपादिलेलें होतें असें कोणी समजू नये. कारण अथर्ववेदात व्रात्याची स्तुति केलेली असून ते लोक ब्राह्म० लोकातील परिव्राजकाप्रमाणें पूज्य होते असें म्हटलें आहे परंतु रॉथचें हें मत सपशेल चुकीचें आहे कारण अथर्ववेदात व्रात्याजवळ विपथ ( रथ ) प्रतोद ( चाबूक ) व उपानह ( जोडा ) या वस्तू असल्याचें उल्लेखिलें आहे आणि या वस्तू परिव्राजकाजवळ असणें संभवनीय नाहीं आता ही गोष्ट शक्य आहे कीं अथर्ववेदातील जें पंधरावे कांड गूढ म्हणून प्रसिद्ध आहे त्यात ब्राह्मण झालेल्या व्रात्याची खूप स्तुति केलेली असावी व त्याला पूर्णब्रह्मचारी समजून दैवी शक्तीचा अतएव वंदनीय असा मान दिला गेला असावा

[15]शकभर—अथर्ववेदात हा शब्द एका ठिकाणीं आला आहे व तेथें त्याचा अर्थ सन्दिग्ध आहे लुडविग व ग्रिल यांच्या मतें याचा अर्थ एका जातीचें नाव असा आहे ब्लूमफील्ड म्हणतो याचा अर्थ 'दृगवण' असा आहे परंतु व्हिटने म्हणतो कीं हा शब्द महावृष लोकाना निंदासूचक अर्थानें लावला आहे कारण महावृषाच्या देशांत लाकूड नसे त्यामुळें जळणासाठीं त्यांना वाळलेल्या शेणाच्या गोळ्या कराव्या लागत ( शक = वाळलेलें शेण, भर = भरणारे ),

[16]चण्डाल-चाण्डाल — वाजसनेयि संहितेंत उल्लेखिलेलीं हीं अस्पृश्य जातींच्या नावाचीं दोन रूपें आहेत मूळात एक ही निराळी जातच असावी असें वाटतें परंतु ही जात म्हणजे ब्राह्मण आई व शूद्र बाप यांच्यापासून झालेली संतति होय अशी कल्पना धर्मशास्त्रकारांनीं मांडली आहे यजुर्वेद आणि उपनिषदें यावरून ही एक मागसलेली जात आहे एवढीच माहिती मिळते

[17]पौंजिष्ठ—कोळी या अर्थी असलेल्या वाजसनेयि संहिता व तैत्तिरीय ब्राह्मण यात आलेल्या पुंजिष्ठ शब्दाचें हें रूप आहे कदाचित् हें जातिवाचक नाम असावें पुंजिष्ठाच वंशज या अर्थी एकाद्या कामकरी जातीचें हें नाव असावें

[18]आन्ध्र—शुनःशेपास विश्वामित्राचा पुत्र न समजणाऱ्या अशा ज्या लोकाना विश्वामित्रानें घालवून दिलें त्या पैकी अन्ध्र हे आहेत याचा उल्लेख ऐतरेय ब्राह्मणात आहे

[19]आजकेशिन्—इंद्राच्या विरुद्ध ज्या बकानें दाण्ड गाई केली त्याच्या कुलाचें हें नाव आहे असें जैमिनीय उपनिषद्ब्राह्मणात उल्लेखिलें आहे

[20]आथर्वण—अतिप्राचीन अथवा काल्पनिक अथर्वन् पासून हें नाव चालत आलेलें आहे या शब्दाचा अनेकवचनी नपुंसकलिंगी असा उपयोग केल्यास अथर्वन् यानीं केलेल्या सूक्ताचाहि बोध होतो अथर्ववेदाच्या एकोणिसाव्या काण्डात अशा तऱ्हेचा उपयोग केलेला आढळतो, व पंचविंश ब्राह्मणातहि आढळतो एकवचनी अथर्वण (वेद) हा शब्द जरी छांदोग्य उपनिषदापर्यंत आढळत नाहीं तरी तो 'अथर्ववेद' या शब्दाच्या अगोदरच आहे कारण 'अथर्ववेद' हा शब्द सूत्रांत आढळतो व त्याच सूत्रात आथर्वणिक अथवा अथर्ववेदाचे अनुयायी अशा अर्थाचा शब्द आहे अथर्वन् याचे अनुयायी अथवा त्याच्या कुलातील जुन्या परंतु निश्चित अशा लोकांचीं नावें दध्यञ्, बृहद्दिव, भिषज्कबन्ध व विचारिन् हीं आहेत

[21]उत्तरकुरु—महाकाव्यें आणि तदुत्तर वाङ्मयात उत्तरकुरु हे काल्पनिक लोक असावेत असें दिसते ऐतरेय ब्राह्मणावरून ते लोक ऐतिहासिक व हिमालयाच्या पलीकडे राहणार होते असें दिसतें, ऐतरेय ब्राह्मणातील दुसऱ्या एका उताऱ्यात वासिष्ठ सात्यहव्य म्हणतो कीं उत्तरकुरूचा देश देवक्षेत्र हा होता व अत्यराति जानंतपि हा तो देश जिंकण्याच्या विचारात होता या वरून तो देश काल्पनिक होता असें म्हणता येत नाहीं. उत्तरकुरु हे काश्मीरात रहात असावे असें वाटतें. कुरुक्षेत्रात मुख्यत्वेंकरून काश्मीरातून येणाऱ्या लोकांच्याच टोळ्या आढळतात असें जें झिमरचें मत तें सकारण असून ग्राह्य आहे

[22]उत्तरमद्र—ऐतरेय ब्राह्मणात हिमालयाच्या पलीकडे राहणाऱ्या व उत्तरकुरूच्या बरोबर असणाऱ्या एका जातीचा उल्लेख आहे झिमर म्हणतो कीं वंशब्राह्मणात उल्लेखिल्या प्रमाणे काम्बोज औपमन्यव हा मद्रगार याचा शिष्य होता आणि म्हणून काम्बोज आणि मद्र याच्यात फारसें अन्तर नव्हतें हें विधान काम्बोज याचा राहण्याची जागा पाहिली असता अगदीं बरोबर दिसून येईल

[23]उदीच्य—उत्तर प्रान्तातील ब्राह्मण कुरुपचाल उद्दालक आरुणि याच्याशीं वादाला गुंतले असता स्वैदायन शौनक याला त्यानीं आपल्या वतीनें बोलणारा नेमून प्रतिस्पर्ध्यांचा वादात पराभव केला असा उल्लेख शतपथ ब्राह्मणात आहे, आणि त्याच ब्राह्मणात कुरुपंचालाची भाषा उत्तरेकडील लोकांच्या भाषेशीं साम्य पावते असाहि उल्लेख आहे, यावरून त्याचा आणि कुरुपंचालाचा संबंध असावा असें वाटतें, शुद्धपणाबद्दल उत्तरेकडील भाषेची प्रसिद्धि होती

म्हणून अध्ययनासाठीं ब्राह्मण लोक तिकडे जात असत असा कौषीतकी ब्राह्मणांत उल्लेख आहे, आणि बौद्ध ग्रंथांत तक्षशिला येथील पाठशाळेंत पुष्कळ विद्यार्थी अभ्यासासाठी रहात असत असा उल्लेख आहे आणि म्हणूनच संस्कृत भाषा काश्मीरांत श्रेष्ठ पदास पोंचली होती असें कैकांचें मत आहे.

[२५]कर्णनाभि, कर्णवाभि, कर्णवन्त.—हीं सर्व नावें कोळी ( जात ) या अर्थानें काठक संहिता, ब्राह्मणग्रंथ व उपनिषद्ग्रंथ यामध्यें आलीं आहेत.

[२६]केकतीय.—या नांवाचे लोक शाण्डिल्यापासून अग्निचयन शिकले असा शतपथ ब्राह्मणांत उल्लेख आहे. आपस्तंब श्रौतसूत्रांत कंकति ब्राह्मणाच्या पंथाच्या सूक्ष्मथाचा उल्लेख आला आहे. बौधायन सूत्रांतील छागलेय ब्राह्मण आणि हे कंकति ब्राह्मण एकच असावेत

[२६]कंबोज, काम्बोज.—निरुक्तकार यास्क म्हणतात कीं इतर आर्य लोकांची भाषा आणि काम्बोज यांची भाषा यांत फरक आहे काम्बोज हे सिंधुनदीच्या वायव्येस रहात असत आणि जुन्या पारशाच्या ग्रंथात त्यांना कंबुजीय असें म्हटलें आहे. मद्रगार याचा शिष्य काम्बोज औपमन्यव हा अध्यापक म्हणून वंशब्राह्मणांत आलेला आहे. यावरून पार्शी लोक व आर्यन् लोक यांच्याशीं संबद्ध असणारे कम्बोज लोक यांचा मद्र अथवा विशेषत उत्तरमद्र यांच्याशीं संबंध असावा असें वाटतें.

[२७]कारस्कर—बौधायन, आपस्तंब व सत्यापाढ या सूत्रांत एका राष्ट्राचें अथवा जातीच्या लोकाचें म्हणून हें नाव आलें आहे. रा. वि. का. राजवाडे यांनीं कातकरी हेच कारस्कर असावेत असें मत व्यक्त केलें आहे त्यास हरप्रसाद शास्त्री वगैरे मंडळींनीं आक्षेप घेतले आहेत.

[२८]कुन्ति.—या लोकांनीं पंचाल यांचा पराभव केला असा काठक संहितेंत उल्लेख आहे.

[२९]कुरु—ब्राह्मण वाङ्मयांत कुरु लोकांना फार महत्व दिलेलें आहे ब्राह्मण जात अथवा लोक हे कुरु किंवा कुरुपंचाल या देशांत उत्पन्न झाले अशाबद्दल सबळ पुरावा जैमिनीय उपनिषद् ब्राह्मणांत आहे. कुरूंचा स्वतंत्र उल्लेख फारच क्वचित आढळतो. त्यांचा पंचालांशीं निकट संबंध असल्यामुळें पंचालांबरोबरच त्यांचा उल्लेख केलेला आढळतो. कुरुपंचाल हें एकच राष्ट्र होतें असा पुष्कळ ठिकाणीं उल्लेख आहे कुरुपंचालांची यज्ञ करण्याची पद्धतीहि उत्तम होती असें म्हणत. कुरुपंचाल राजे राजसूय यज्ञ करीत असल्याचा उल्लेख आहे. हे राजे हिवाळ्यांत स्वारीकरितां बाहेर पडत व उन्हाळ्यांत परत घरीं येत. बृहदारण्यकोपनिषदांत कुरुपंचालब्राह्मणांचें फार बहारीचें वर्णन आहे. वेबर आणि ग्रीअर्सननें कुरु व पंचाल या दोन राष्ट्रांत वैदिक कालीं तंटे होत असत असें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे मागाहून जे लोक पश्चिमेकडून हिंदुस्थानांत आले आणि जे ब्राह्मण होते; ते पंचालांशीं वैरभावानें वागत असत; कारण ते ब्राह्मणद्वेष्टे होते, असें ग्रीअर्सन म्हणतो आणि या गोष्टीला दुजोरा देण्यासाठीं वेबर काठक संहितेंतील ‘पंचाल देशांत जन्मलेला बकदाल्भ्य व कुरुवंशांतील धृतराष्ट्र वैचित्रवीर्य यांच्या भांडणासंबंधींची गोष्ट देतो. परंतु त्या ठिकाणीं वरील प्रकारच्या भांडणाचा उल्लेख नसून राजा आणि पुरोहित यांच्यांतील धार्मिक विधीसंबंधीं झालेल्या थोड्याशा भांडणाचा उल्लेख आहे. शिवाय त्या ठिकाणीं कुरुपंचालांच्या नैमिषीय यज्ञाचें वर्णन असून या दोन राष्ट्रांतील अतिनिकट संबंधाचाहि उल्लेख आहे. परतु पुन्हा वेबर म्हणतो कीं वाजसनेयि संहितेंतील काम्पील येथील सुभद्रिकाहि त्या कुलाच्या आसपास राहणाऱ्या जातींच्या राजाची पट्टराणी होती आणि त्याच राजाकरितां संहितेंत सांगितलेला अश्वमेध यज्ञ केला होता. परंतु वेबरचें हें म्हणणें जबर संशयाला कारण आहे; आणि संहितेच्या काण्वशाखीय पाठांतील राजसूयाकरितां उपयोगांत आणिलेल्या उताऱ्यावरून कुरु व पंचाल यांचा एकच राजा होता असें वाटतें. शतपथ ब्राह्मणांत पंचालांचें जुनें नाव क्रिवि होतें असा उल्लेख आहे क्रिवि हा शब्द कुरु याचा अपभ्रंश असावा. परंतु झिमर म्हणतो कुरु व क्रिवि मिळून ऋग्वेदांत उल्लेखिलेली वैकर्ण ही जात उत्पन्न झाली कारण या दोन्ही लोकांचा सिन्धु व असिक्नी या स्थलाशीं फार संबंध आढळतो. तसेंच कुरु आणि सृंजय लोक यांचा ‘देवभाग’ नावाचा एकच पुरोहित असल्यामुळें याहि दोन्ही राष्ट्रांत सख्य होतें असें दिसतें. छांदोग्य उपनिषदांत ( ४. १७, ९ ] एका प्रसंगीं कुरूंना एका घोडीनें वाचविल्याचा व वादळामुळें त्यांच्यावर ओढवलेल्या संकटाचा नाश केल्याचा [१ १०, १] हि उल्लेख आहे. शांखायन श्रौतसूत्रांत कुरूंनीं केलेल्या वाजपेय यज्ञाचा उल्लेख असून ज्या शापामुळें कुरूंना कुरुक्षेत्र सोडावें लागलें त्या शापाचाहि उल्लेख [ १५, १६, ११ ] आला आहे. हीच गोष्ट महाभारतांत उल्लेखिलेल्या कौरवांच्या दुर्भाग्याची कल्पना देते ऋग्वेदांत कुरूंचा ‘लोक’ या अर्थानें उल्लेख नाहीं परंतु कुरुश्रवण, पाकस्थामा कौरयाण यांचा उल्लेख आहे अथर्ववेदांत परिक्षित् हा कुरूंचा राजा होता व शतपथ ब्राह्मणांत त्याचा मुलगा जनमेजय हा अश्वमेधयज्ञ करणांत श्रेष्ठ होता असें म्हटलें आहे. ऋग्वेदांत आणखी ज्या जातींचा उल्लेख येतो त्या सर्वांचा कुरूंमध्यें समावेश होतो असें ओल्डेनबर्गचें मत आहे. तृत्सु व भरत हे ऋग्वेदांत जे पुरूचे शत्रू ते नंतरच्या वाङ्मयांत कुरुराष्ट्र बनविण्याकरितां एक झालेले आढळतात. ब्राह्मण ग्रंथांत भरत हे प्राचीन लोकांत प्रमुख होते पण नंतरच्या वाङ्मयांत राष्ट्राच्या यादींत त्यांचा मागमूसहि सांपडत नाहीं. यावरून पुढें ते कोणत्यातरी राष्ट्रांत समाविष्ट झाले असावेत असेंच अनुमान निघतें. पूर्वी ज्या देशांत भरत असत त्याच देशांत पुढें कुरूंची वसती

असल्याचा पुरावा आढळतो. शतपथ ब्राह्मणात एका भरत राजानें काशिराजावर जय मिळविल्याचा आणि एकानें गंगा आणि यमुना यांचें अर्चन केल्याचा उल्लेख आहे. ऐतरेय ब्राह्मणात भरताच्या 'सत्वत' नामक राजावर स्वाऱ्या होत असत असा उल्लेख आहे. वाजसनेयि संहितेंत (११,३) भरत हें कुरुपंचालाचेंच दुसरें नाव आहे असें लिहिलें आहे आणि अश्वमेध करणाराच्या मोठमोठ्या यादींत एक दुर व दोन भरत राजांची नावें आली असून ते कोणत्या राष्ट्राचे राजे होते हें मात्र दिलें नाहीं. परंतु ही माहिती दुसरीकडे दिली आहे असें ओल्डेनबर्ग म्हणतो. ऐतरेय ब्राह्मणात कुरुपंचाल मध्य देशात रहात असत असें म्हटलें आहे पण कुरु लोकांची आणखी एक टोळी उत्तरेकडे-उत्तरकुरु हिमालयाच्या पलीकडे-रहात असे. कुरुपंचालाचा देश म्हणजे ब्राह्मण संस्कृतीचें उगमस्थान होय व मागाहून ते चारी दिशेस पसरलें यात मुळीच संशय नाहीं पंचविंश ब्राह्मणातील व्रात्यस्तोम प्रकरणात व शाखायन आरण्यकात मगध देशात ब्राह्मणानें वसती करणें म्हणजे अब्राह्मण्य होय' असें म्हटलें आहे त्याचा वरील गोष्टींमुळें उलगडा होतो कुरुपंचाल ब्राह्मणाचा वरचेवर उल्लेख येणें हें त्याच्या धर्मप्रसारक चळवळींचें द्योतक होय कुरुपंचालाच्या भौगोलिक स्थानावरून ते कोसल, विदेह अथवा काशि याच्या मागून हिंदुस्थानात आले असावेत आणि पश्चिमेकडील नवीन आर्यन् लोकाच्या लाटेनें आणखी पूर्वेस ढकलले गेले असावेत. ही जी नवीन लाट आली तिचा आणि त्याच्या पश्चिमेकडील शेजाऱ्याचा हिंदुस्थानात गेण्याचा कालदृष्ट्या काय संबंध होता-म्ह० किती कालाच्या अंतरानें या लाटा उसळत असत-याबद्दल वैदिक वाङ्मयात काहीं आधार सापडत नाहीं नंतर वैदिकवाङ्मयदृष्ट्या ज्याच काहींच महत्व नाहीं असे जे भारतेंत काहीं चमत्कार घडून आले त्यावरून पाहता कुरूंनी नवीन मार्गानें येऊन पूर्वपश्चिम देशात वसती करणाऱ्या मूळ आर्यन लोकात आपलें घोडें ढकललें असावें

[30] कुल, कुलपा —कुल हा शब्द स्वतंत्रपणें ब्राह्मणकालाच्या पूर्वी आला नाहीं. गृह अथवा कुलगृह असा याचा अर्थ असून रूपकदृष्ट्या घरातील कुटुंब यालाच हा शब्द लाविला आहे. कुलपा. (अक्षरशः गृहरक्षणकर्ता अथवा कुटुंबातील मुख्य) हा ऋग्वेदात आला असून लढाईतील वाजपतीचा सेवक त्याच्यापेक्षा कमी दर्जाचा असतो आणि वाजपति हा ग्रामसेनेचा नेता समजत असत. अथर्ववेदात मुलीला उपरोधिकपणें कुलपा असें म्हटलें आहे. कारण ती जगात भर्तृहीना असून तिचा पति म्हणजे यम (मृत्युपति) होय. कुल या शब्दाचा उपयोग विभक्त-कुटुंबपद्धति होती असें दाखवितो. एका कुटुंबात मात्र बापाच्या किंवा वडील भावाच्या नेतृत्वाखाली पुष्कळशी माणसें असूं शकतील. आणि याचें कुल म्ह० निवासस्थान. गोत्र शब्दापासून कुल शब्द निराळा आहे. त्याचा अर्थ एका घरात राहणारे—सर्व मंडळी, अविभक्त कुटुंब असा आहे.

[31] ककय.—बहुतकरून वैदिक व तदुत्तर काळात ही जात वायव्येकडे सिंधु आणि वितस्ता या दोन नद्यामध्यें रहात असे वैदिक ग्रंथातील अश्वपति कैकेय या नावावरून केकय या जातीचा अप्रत्यक्षपणें अर्थबोध होतो.

[32] केशिन्—शतपथ ब्राह्मणात येणाऱ्या एका लोकाचें हें नाव आहे त्यात त्याचा राजा यज्ञाच्या वेळीं अशुभ गोष्ट घडली तर तिच्या शुद्धीकरिता खण्डिक याच्यापासून प्रायश्चित्त घेत असे असा उल्लेख आहे.

[33] कैशिनी—'कैशिन्य प्रजा.' म्ह० केशिन यांची मुलें अथवा प्रजा असा शतपथ ब्राह्मणातील एका अप्रसिद्ध ठिकाणीं उल्लेख असून ती प्रजा शतपथ ब्राह्मणाच्या काळात कदाचित् अस्तित्वात असेल अगर नसेल

[34] कोप—शतपथ ब्राह्मणात कोपस हें एक उपाध्यायाचें कुल होतें आणि त्याच्यापैकीं एक सुश्रवस याचें नाव आलें आहे.

[35] कौरव्य—(कुरुस याच्यापैकीं) कुरु लोकांपैकीं एक मनुष्य आपल्या बायकोसह परिक्षित राजाच्या अमलात चैन भोगीत आहे असें अथर्ववेदात लिहिलें आहे. कौरव्य राजा वाल्हिक प्रातिपीय हा शतपथ ब्राह्मणात आला आहे आणि आर्ष्टिषेण व देवापि हे कौरव्य होते असें नंतरची दंतकथा म्हणते

[36] कुरु-पंचाल—कुरुपंचाल यांपैकीं. शतपथ ब्राह्मणात हें आरुणि याचें विशेषण आहे आणि त्याच ग्रंथातील या शब्दानें त्या जातीच्या लोकांच्या संबंधीचा अर्थबोध होतो.

[37] क्रैव्य—क्रिवीचा राजा पांचाल यानें परिवक्रा नदीवर अश्वमेध यज्ञ केला असें शतपथ ब्राह्मणात आहे, तथापि एगलिंग म्हणतो कीं, तें विशेषनाम असून त्याचा अर्थ क्रैव्य पांचाल राजा असा आहे

[38] गोत्र—याविषयीं सविस्तर विवेचन पुढे केलेलें आहे.

[39] गौपायन.—गोपवंशज ब्राह्मणात असमाति, किरात आणि आकुलि याची जी दंतकथा आहे त्यांत गौपायन हें नाव आलें आहे.

[40] जाति.—जाति हा शब्द पालि ग्रंथात जाति अशा अर्थी आलेला आहे पण पूर्वीच्या वैदिक ग्रंथात हा शब्द बिलकुल आलेला नाहीं परंतु कात्यायन श्रौतसूत्रासारख्या ग्रंथात जेथें जेथें हा शब्द आलेला आहे तेथें त्याचा अर्थ घराणें किंवा कुटुंब असा आहे.

[41] त्रिखर्व—पंचविंश ब्राह्मणात यशस्वी रीतीनें एक विशिष्ट यज्ञ करणारे जे पुरोहित होते त्याच्या वर्गाचें हें नाव आहे.

४२ नि ष्कि रीं य.—पंचविंश ब्राह्मणात यज्ञ चालविणाऱ्या उपाध्यायाच्या शाखेचें नाव आलेलें आहे.

४३ नै षा द.—कौषीतकी ब्राह्मण व वाजसनेयि संहितेमध्ये हें नाव आलें आहे.

४४ पं चा ल.—ऋग्वेदात क्रिवी नावाच्या लोकाचें हें मागाहून प्रचारात आलेलें नाव आहे. कुरु या शब्दाशिवाय इतरत्र या शब्दाचा उल्लेख क्वचितच येतो. कुरुपंचालाच्या राजाचा उल्लेख ऐतरेय ब्राह्मणात आलेला आहे. काठक संहितेंत पंचाल म्ह० केशी दाल्भ्य याचे लोक असें म्हटलें आहे उपनिषदें व उत्तरकालीन ग्रंथात पंचाल देशाच्या ब्राह्मणाचें तत्वज्ञानविषयक व भाषाविषयक वादविवादात प्रमुख अंग होतें असा उल्लेख आला आहे. संहितोपनिषद्ब्राह्मणात प्राच्य पंचालाचा उल्लेख आलेला आहे. या पंचाल लोकात क्रिवी लोकाखेरीज इतर जातींचाहि समावेश होतो. हें नाव पंच जनाना लाविलेलें असून हे पंचाल म्ह० ऋग्वेदातले पंचजन होत अशी एक कल्पना पुढें आलेली आहे पण ती फारशी खरी दिसत नाहीं. वैदिक वाङ्मयात व महाभारतात पंचालाची उत्तर व दक्षिण पंचाल अशी विभागणी केलेली असल्याचा उल्लेख नाहीं. शतपथ ब्राह्मणात या लोकाचें परिचक्रा असें नाव आलेलें आहे. ज्याचा उल्लेख आला असे वाटतें तीं शहरें म्हणजे कांपील व कौशांबि हीं होत. कुरुपंचाल याच्या राजाहून निराळे असे पंचालाचे राजे व सरदार म्हणजे क्रैव्य, दुर्मुख, प्रवहणजैवलि व शोण हे होत.

४५ पुं ड्र.—ऐतरेय ब्राह्मणात बहिष्कृत मानलेल्या लोकाचें हें नाव आलेलें आहे. हें नाव सूत्रग्रंथातहि आलेलें आहे. महाभारतात या पुंड्र लोकाचा देश म्हणजे हल्लींचा बहार व बंगाल हे प्रांत होत.

४६ पु लिं द.—ही एक बहिष्कृत जात असून इचा निर्देश ऐतरेय ब्राह्मणात केलेला आहे. परंतु शांखायन श्रौतसूत्रात शुनःशेपाच्या गोष्टीच्या संबंधात याचा उल्लेख येत नाहीं. पुलिंदाचा आम्हांशीं पुनः एकदा अशोकाच्या वेळीं संबंध येतो.

४७ पौं थ ले य,—तैत्तिरीय ब्राह्मणात हा एक दासीपुत्र फलवन्तिणीचा मुलगा असा अर्थदर्शक शब्द आहे.

४८ प्रा च्य.—याचा अनेकवचनी उपयोग केला असता पूर्वेकडील राहणारे हा अर्थ होतो. याचा ऐतरेय ब्राह्मणाच्या यादींत उल्लेख केलेला आढळतो. ओल्डेनबर्गच्या मताप्रमाणें बहुधा ते काशीचे, कोसलचे, विदेहाचे आणि क्वचित् मगधाचे लोक असावेत. शतपथ ब्राह्मणात अमीला पूर्वेकडील लोक शर्व या नावानें पाचारण करीत असत व त्याच ग्रंथात त्याच्या थडगीं बांधण्याच्या चालींचा उल्लेख आला असून त्याबद्दल तेथें तिरस्कार दाखविला आहे. लाट्यायन श्रौतसूत्रात विपथ [ ओबडधोबड गाडी ] या पंचविंश ब्राह्मणातील शब्दाचा अर्थ देताना तो रथ पूर्वेकडील लोकाचा होता असें म्हटलें आहे ( प्राच्य-रथ ) संहितोपनिषद् ब्राह्मणात प्राच्य पांचालांचा उल्लेख आलेला आहे.

४९ बा ही क.—हा शब्द शतपथ ब्राह्मणात पश्चिमेकडील लोकास, (पंजाबातील लोकास) लाविलेला आहे व त्याचा प्राच्य याच्या विरुद्ध उपयोग होतो. ते अमीला भव या नावानें बोलावीत असत.

५० भ र न्त,—भरणारा. सायण मताप्रमाणेंच बोथलिंग या शब्दाच्या पंचविंश ब्राह्मणात एका ठिकाणीं आलेल्या बहुवचनी रुपाचा अर्थ एकवच्ये लोकाची जात असा करतो, परंतु हा अर्थ बरोबर आहे किंवा नाहीं याबद्दल खात्री नाहीं. जरी शब्दाचें रुप वर्तमानकालवाचक धातुसाधित असें आहे तरी वेबरच्या मतें हा शब्द भरताना उद्देशून लिहिला आहे.

५१ मा ग ध दे शी य,—हें सूत्रात मगधदेशीय एका ब्राह्मणाचें नाव आलें आहे. मगधदेशात राहणारा असा याचा अर्थ आहे.

५२ मू ची प अ थ वा मू वी प,—हे ऐतरेय ब्राह्मणातल्या मूतिबाचें व शांखायन श्रौत सूत्रातल्या रानटी नागवाचक जातीचें दुसरें नाव आहे

५३ मू ति ब.—विश्वामित्राची बहिष्कृत संतति म्हणून गणिलेल्या रानटी जातींतल्या एकीचें ऐतरेय ब्राह्मणात आलेलें नाव शांखायन श्रौतसूत्रात मूचीप अगर मूवीप असें नाव येतें.

५४ म्ले च्छ.—हा शब्द शतपथात अशुद्धभाषी या अर्थी आहे. म्लेच्छी भाषा बोलण्याला ब्राह्मणाला बंदी केलेली आहे. असल्या भाषेचें उदाहरण 'हेलवो' असें दिलें आहे त्याचा अर्थ सायणानें 'हेऽरय.' 'म्हणजे हे शत्रु' असा केला आहे. काण्वशाखीय ग्रंथात येथें निराळा पाठ आहे. येथें उल्लेखिलेले अशुद्धभाषी लोक आर्यच होते. पण ते संस्कृत भाषा न बोलता एखादी प्राकृत भाषा बोलत असावे.

५५ श ब र.—ऐतरेय ब्राह्मणात एका जातीचें हें नाव दिलेलें आहे. या जातीच्या लोकाना दस्यु हें नाव दिलेलें आहे व हें लोक अंध्र, पुलिंद मूतिब व पुंड्र याच्या तोडीचे आहेत असें म्हटलेलें आहे.

५६ शा ल्व.—गोपथ ब्राह्मणात मत्स्य लोकाबरोबर एका जातीच्या लोकाचें हें नाव आलेलें आहे.

५७ श्वि क्न.—शतपथ ब्राह्मणात या नावाच्या लोकाचा उल्लेख त्याचा राजा जो ऋषभ याच्या संबंधात आला आहे.

५८ स त्व न्त.—ऐतरेय ब्राह्मणात दक्षिणेकडे राहणाऱ्या लोकाचें हें नाव आलेलें आहे. शतपथ ब्राह्मणात सत्वताचा भरताकडून झालेला पराजय व भरतानें सत्वताचा अश्वमेधातील घोडा बळजबरीनें नेणें या गोष्टींचा उल्लेख आलेला आहे. यावरून हे सिद्ध होतें कीं, ऐतरेय ब्राह्मणातील एका ठिकाणीं 'सत्वनाम्' याचें ऐवजीं 'सात्वताम्' अशी दुरुस्ती केली पाहिजे असें मॅकडोनेल सुचवितो. परंतु ऐतरेय ब्राह्मणात इतर सर्वत्र 'सत्वताम्' असाच पाठ आहे. या

अर्थानें ऋग्वेदांत आला आहे. छांदोग्य उपनिषदांतहि ( ५ १४, १ ) याचा उल्लेख आहे.

[२१]मना—हा शब्द ऋग्वेदांतील एका दानस्तुति-सूक्तांत [८.७८,२] आला आहे तेथें आलेल्या 'सचामना' या रूपावरून हें सोन्याचें नाणें अथवा वजन असावें किंवा अलंकार असावा व म्हणून याची ग्रीक म्ना' व लॅटिन 'मिना' या शब्दांशीं तुलना करितात. हे शब्द मूळचे सेमेटिक भाषेंतील आहेत, व ते फोनेशियन लोकांपासून ग्रीक लोकांनीं घेतले असावेत व फोनेशियनांपैकीच असलेल्या सिसली अथवा एट्रूरिया यांतील कार्थेजियन लोकांनीं रोमन लोकांपासून घेतले व बाबिलोनियन लोकांपासून हिंदुस्थानांतील लोकांनीं घेतले. परंतु ही मनाच्या बाबतींतील कल्पना घोटाळ्याची आहे कारण या कल्पनेला आधार काय तो बाबिलोनियन लोकांपासून हिंदुस्थानांतील लोकांना हें नाणें माहित झालें हा होय; व तोहि जलप्रलयाची हकीकत व नक्षत्रव्यवस्था हिंदी लोकांनीं बाबिलोनियन लोकांपासून घेतल्या या कल्पनेप्रमाणेंच होय. परंतु उलटपक्षीं या मनाचा अर्थ ऋग्वेदांत आणखी आढळणाऱ्या ( १. १७३, २; ४ ३३, २; १०. ६, ३ ) व 'इच्छा' अर्थ असणाऱ्या 'मना' प्रमाणेंच असावा अथवा कदाचित प्रथम दिलेल्या स्थलीं ( ८. ७८, २ ) मना याचा इच्छित वस्तु असाहि अर्थ असेल. बोथलिंकच्या कोशांत मना हा एकटाच शब्द सांपडतो व त्याचा इच्छा किंवा मत्सर एवढाच अर्थ दिला आहे हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

[२२]गोरुत—ऋग्वेद व तदुत्तर वाङ्मयांत लांबी मोजण्याचें माप या अर्थानें हा शब्द आला आहे. परंतु गोरुत या शब्दानें नमकाचो किती लांबी गणली जाई हें सांगता येत नाहीं. नंतर पुढील काळांत योजन म्हणजे चार कोस किंवा नऊ मैल अशी गणना होऊं लागली.

[२३]स्थिवि.—हा शब्द अनेकवचनी रूपांत ऋग्वेदांत(१० ६८, ३ ) एकदा आला असून त्याचा अर्थ एक धान्याचें माप असा आहे हा शब्द ऋग्वेदांत आणखी एकदा ( १०. २७, १५ ) 'स्थिविमन्त' अशा विशेषणात्मक रूपांत आला आहे.

[२४]कुलाल.—याचा अर्थ बोर असा आहे. परंतु पुढे त्याचा वजन या अर्थी व तें वजन चार कृष्णल म्हणजे एक माष [उडीद] असा उपयोग होऊं लागला. यजुर्वेद आणि तैत्तिरीय संहिता या ग्रंथांत हा शब्द येतो.

[२५]बाहु—तैत्तिरीय संहिता आणि सूत्रग्रंथ यांत हा शब्द लांबी मोजण्याचें माप या अर्थानें आला आहे.

[२६]मान—तैत्तिरीय संहिता अथर्ववेद व ब्राह्मण ग्रंथांत हा शब्द येतो व तो नेहमीं रक्तिका किंवा कृष्णल या शब्दांबरोबर येतो. याचा अर्थ गुंज असा आहे

[२७]व्याम—तैत्तिरीय संहिता अथर्ववेद व ब्राह्मणग्रंथांत हा शब्द येतो याचा अर्थ पसरलेल्या बाहूनें व्यापलेला भाग असा आहे. हें लांबी मोजण्याचें प्रमाण आहे. एक व्याम म्हणजे सहा फूट किंवा इंग्रजींत ज्याला फॅदम म्हणतात तें प्रमाण होय.

[२८]आश्विन.—अथवा अश्विन अथर्ववेदांत पुढील ग्रंथांत याचा अर्थ घोडेस्वारानें एका दिवसांत केलेल्या प्रवासाच्या लांबीचें माप असा आहे अथर्ववेदांत हें माप पांच योजनांपेक्षां जास्त होतें असें म्हटलें आहे, पांच योजनांपेक्षां जास्त लांबी मोजण्यास आश्विन याच मापाचा उपयोग करीत असत. ऐतरेय ब्राह्मणांत पृथ्वीपासून स्वर्ग एक हजार आश्विन लांब आहे असें म्हटलें आहे ( ५. १७ )

[२९]शल—सेंट पीटर्सबर्ग कोशांत याचा अर्थ लांबी मोजण्याचें साधन असा आहे व याच अर्थानें अथर्ववेद, काठक संहिता व तैत्तिरीय ब्राह्मण ( ११ १० ) यांत आला आहे व्हिटने म्हणतो कीं हा अर्थ सुसंगत नाहीं.

[३०]कुष्ठ.—मैत्रायणी संहितेंत ( ३. ७, ७ ) अपूर्णांक या अर्थी हा शब्द आला असून ती कला, कुष्ठ, शफ आणि पद अशी मालिका आहे व तिचा अनुक्रमें १६ वा, १२वा, ८ वा व ४ था हिस्सा असा अर्थ होतो [ मूळांत शब्द आहेत परंतु अर्थ मात्र हाच असावा असें दिसत नाहीं ]

[३१]मृद.—काठक संहितेंत हा शब्द समासांत आढळतो. याचा अर्थ मातीचें वजन करण्याचें माप असा आहे व्याकरणदृष्टया पाणिनीमतानें ( २ १, १४३ ) प्रद असा पाठ असावा कीं, काय असा संशय आहे.

[३२]अंगुष्ठ—लांबी मोजण्याचें परिमाण या अर्थी हा शब्द काठक संहितेंत आला आहे

[३३]क्रोश.—'शब्दशः अर्थ 'मोठ्यानें हाक मारली असतां तो ध्वनि जितका लांब जातो ती लांबी' हा शब्द पंचविंश ब्राह्मणांत ( १६. १३, १२ ) आला आहे

[३४]त्रिपद—हा नपुंसकलिंगी शब्द योजनाचा तीनचतुर्थांश या अर्थानें पंचविंशब्राह्मणांत आला आहे त्याच ब्राह्मणांत ( १६, १३ ) योजनाला गव्यूति व योजन चतुर्थांशाला क्रोश म्हटलें आहे.

[३५]पाद—लांबी मोजण्याचें माप या अर्थी हा शब्द शतपथ ब्राह्मणांत आला आहे. हा शब्द कधीं कधीं वजनी माप या अर्थानेंहि उपयोगांत आणिला आहे अपूर्णांकाच्या रूपांत याचा एक चतुर्थांश असा अर्थ आहे. व हा अर्थ चतुष्पाद प्राण्याच्या चार पायांपैकीं एक पाय यावरून आला आहे जसें शफ म्हणजे पायांतील ( खुरापैकीं ) एक भाग म्हणजे एक या संख्येतील आठवा भाग.

[३६]पृथ—हा शब्द तैत्तिरीय ब्राह्मणांत ( १. ६, ४, २) लांबी मोजण्याचें परिमाण या अर्थी आला आहे. याचा तळहात, तळवा, तळहाताची रुंदी असा अर्थ होतो.

[३७]प्रक्रम—हा शब्द शतपथ ब्राह्मणांत लांबीचें परिमाण या अर्थी आहे. पाऊल किती लांब मोजलें जातें हें

तेथ सांगतलें नाहीं सूत्रग्रंथांत याचा अर्थ एका पावलाची लांबी असा आहे.

[३८] प्र सृ त.—शतपथ ब्राह्मणांत ओंजळ्याचें माप या अर्थानें हा शब्द आला आहे. याचा अर्थ 'मूठभर' असा होतो.

[३९] प्रा दे श —लांबीच्या परिमाणाकरितां वारंवार ब्राह्मण ग्रंथात हा शब्द योजिला जातो. याचा अर्थ वीत (अथवा वीच) असा आहे.

[४०] र त्नि.—पंचेचाळीस इंचाचें माप. पंचविंश ब्राह्मणात आलेल्या अरत्नि याच्या उलट हा शब्द आहे.

[४१] श रा व —तैत्तिरीय ब्राह्मण व सूत्रग्रंथात धान्य मोजण्याचे माप या अर्थी हा शब्द आला आहे

[४२] शु ल्क.—ऋग्वेदात याचा अर्थ किंमत असा आहे धर्मसूत्रात याचा अर्थ कर असा आहे व तो अर्थ मूरला अथर्ववेदात आढळून आला आहे (३. २९, ३) या ठिकाणीं शुल्क असा शब्द आला असल्यामुळें अर्थहानी बरीच झालेली आहे (?) हा अर्थ व्हिटने व ब्लूमफील्ड यानीं स्वीकारला आहे. दुसऱ्या एका ठिकाणीं वेबरनें केलेला अर्थ व्हिटनेनें स्वीकारलेला नाहीं, ब्लूमफील्डनें हा अर्थ संशय प्रगट करून स्वीकारला आहे.

द ळ ण व ळ ण

नौकानाम [ ऋग्वेद ]

| | | |
|---|---|---|
| [१] अरित्र | [३] नद | नौका ) |
| अरित्रपरणी | निरारित्रा | पतत्रिन् |
| खनित्र | [४] नौ | [५] प्लव |
| [२] द्युम्न | पाक्षिण(पत्र, सपक्ष | शतारित्रा |

[ तै. सं. ]

| | | |
|---|---|---|
| तरणि | नाव | प्लव |

[अथर्ववेद]

| | | |
|---|---|---|
| अप्लव | पर्पाणि | सामन् |
| तरी | प्लव | स्वरित्रा |
| नाव्य | शतारित्रा | हिरण्यबन्धना |
| नौ | | |

[ संहितेतर ]

| | |
|---|---|
| [६] नावाज् | [७] मण्ड |

[१] अ रि त्र —नावा किंवा होड्या ज्यांच्या योगानें चालवितात त्या वल्ह्यानां हें नांव आहे ऋग्वेद आणि वाजसनेयि संहिता यांत शंभर वल्ह्यानीं वल्हविलेल्या जहाजाचा उल्लेख आहे आणि नाव वल्ह्यानीं वल्हवितात असाहि उल्लेख आहे (अरित्रपरण) ऋग्वेदात दोन उताऱ्यात हा शब्द आलेला आहे त्यावरून सें. पी. कोश म्हणतो कीं, त्याचा एक भाग असा अर्थ ध्वनित होतो. नावेच्या वल्हेकऱ्याला किंवा खलाशाला अरितृ असें म्हणतात

[२] द्यु म्न —ऋग्वेदातल्या एका लेखात पिशेलच्या मतानें याचा अर्थ तराफा असा आहे.

[३] न द [ड]—ऋग्वेदात हा शब्द अनेकदा आलेला असून त्याचा निश्चित अर्थ समजत नाहीं. पिशेलच्या मतानें नद व नड हे शब्द एकच आहेत व या नद शब्दाचा अर्थ एके ठिकाणी तो वेताची नाव असा करितो ही नाव भंगून तिच्यावरून पाणी गेलें असेंहि तिचें वर्णन तो करितो. दुसऱ्या एका लेखात या नदाचा अर्थ वेताचा चाबूक असा तो करितो याचीं तीक्ष्ण टोंकें (कर्ण) घोड्यानां जोरानें पळविण्यास उपयोगी पडतात. दुसऱ्या लेखात लक्षणेनें याचा अर्थ पुरुषाचें जननेंद्रिय असा केलेला आहे. रॉथ याचा अर्थ साधा किंवा लक्षणेनें बैल असा घेतो. एकदा तरी इंद्राच्या घोड्यासंबधानें खिकाळणारा असा या शब्दाचा अर्थ होतो. 'नदस्यकर्णैः' या शब्दसमुच्चयात याचा रथाच्या (बाजूच्या) घोड्याच्या कानामुळें (म्हणजे हुकूम ऐकण्याची त्याची तयारी असल्यामुळें) मरुत लोक आपल्या चपळ घोड्यावर बसून जलदीनें जातात असा अर्थ होतो (तुरयन्त आशुभिः)

[४] नौ —ऋग्वेद व तदुत्तर ग्रंथ यामध्यें हा शब्द नेहमीं येतो. बहुतेक ठिकाणीं हें तारू म्हणजे नद्या ओलांडण्याकरिता केलेली लहानशी नाव होय. तरी पण यमुना, गंगा व पंजाबमधील नद्या या ओलांडण्याचें काम मोठ्या जहाजाशिवाय भागत नसे. पुष्कळ वेळा ही नौ म्हणजे लाकडाची कोरलेली होडी असे. वैदिक काळीं समुद्रमार्गानें हिंदुस्थानचा मोठा व्यापार चालत असे ही गोष्ट जर गृहीत धरली तर जहाजाचे जे भाग उदाहरणार्थ, शीड व शीडकाठी याचा (वल्हे, अरित्र याखेरीज वैदिक वाङ्मयात) उल्लेख नाहीं ही मोठी आश्चर्याची गोष्ट आहे. तरी पण असे कांहीं उल्लेख आलेले आहेत कीं, त्यावरून नद्या ओलांडून जाणाऱ्या बोटींनीं जो व्यापार चालावयाचा त्यापेक्षा जास्त विस्तृत प्रमाणावर व्यापार हिंदुस्थानातून चालत असे ही गोष्ट सिद्ध होते. अथर्ववेदात ज्या राज्यात ब्राह्मणावर जुलूम होतो त्या राज्याच्या नाशाची तुलना फुटलेल्या जहाजाच्या बुडण्याशीं केलेली आहे. जरी या ग्रंथात आलेल्या मापावरून जहाज म्हणजे होडी असा अर्थ निघण्याचा संभव आहे तरी असा अर्थ करणें इष्ट होणार नाहीं. शिवाय माणसें नफा किंवा द्रव्य मिळविण्याकरिता (सनिष्यवः) समुद्राकडे जातात असा ऋग्वेदात (१.५६,२;४.५५,६) उल्लेख आला आहे. झिमर म्हणतो कीं, हा समुद्र म्हणजे पंजाबमध्यें सिंधु नदीला इतर लहान नद्या मिळाल्यावर जो मोठा सिंधु नद होतो तो होय. पण समुद्राचा असा संकुचित अर्थ करणे बरोबर होणार नाहीं. ऋग्वेदात सुद्धां अश्विनानीं भुज्यूचें समुद्रामध्यें शंभर वल्हीं असलेल्या जहाजाच्या योगानें रक्षण केलें अशीं वर्णनें आलेलीं आहेत. तेव्हां वैदिक काळीं अनेक वल्हीं असलेलीं मोठीं जहाजें

होती हे नाकबूल करणें इष्ट नाहीं. बौधायन धर्मसूत्रामध्यें (१.२,४) तरी निदान समुद्रमार्गानें जलपर्यटण करण्याचा उल्लेख आलेला आहे( ऋ १०.१५५,३). या ठिकाणीं सायण दारु म्हणजे पुरुषोत्तमाख्य देवताशरीर असा अर्थ करितो. त्याच भाष्यात दुसऱ्याचा उतारा दिला आहे त्यांत दारु म्हणजे दारुमयी नौ लाकडाची नाव असा अर्थ आहे.

प्लव.—तरंगणारा पदार्थ. याचा अर्थ होडी. हा शब्द ऋग्वेद व तदुत्तर वाङ्मयांत आला आहे.

नावाज.—नावाडी. शतपथ ब्राह्मणांत [२.३,३,५] हा शब्द आलेला आहे.

मण्ड—हा शब्द नौ-मण्ड या सामासिक शब्दांत द्विवचनी येतां व त्याचा अर्थ शतपथ ब्राह्मणात[२.३,३,१५] जहाजाचें सुकाणूं असा आहे.

### मार्गसंबंधी [ ऋग्वेद ]

| | | |
|---|---|---|
| अर्तनपथिन् | दीर्घयाथ | योजन |
| अनपवृज्य | नियान | रघुवर्तनि |
| अंहस् | परमन् | रजस् |
| अध्वन् | परवत् | रथ्य |
| अनुपथ | परस्तुतःशीः | रुद्रवर्तनि |
| अनृक्षर ( निष्कं- | पथ | वक्मन् |
| टक ) | पथिन् | वयुन |
| अन्तःपथ | पथ्य | वर्तनि |
| अरेणु | पदवी | वर्मन् |
| अपाय | पदवीय | विपथि |
| आपथि | पाद | वृजिनवर्तनि |
| उरुगव्यूति | पन्थस् | संगमनी |
| ऋजु | परिगव्यूति | संचरणी |
| एम | परिक्रोश | सुकृत |
| क्षेत्रवित्- | परिज्मन् | सुग |
| ( वाटाड्या ) | पासु | सुगेवृध |
| गातु | पुरुपथिन् | सुपथिन् |
| गायत्रवर्तनि | प्रपथ | सुपदी |
| घृतवर्तनि | प्राध्वन् | हिरण्यवर्तनि |

### [ तै. सं.]

| | | |
|---|---|---|
| अनुवर्त्मन् | दर्शक ) | रेणु |
| अपथ | परिरथ्य (रस्ता) | वर्त्र ( मार्ग ) |
| अभ्यध्व | पासु | वर्मन् |
| कण्टक | प्रतिवर्म | वर्मन्य |
| जनायन | प्रपथ | वधूपथ (वधूचा- |
| दुष्पद | प्रस्तर | मार्ग ) |
| पथ | यान | वायुमत् |
| पथिरक्षि | रघुवर्तनि | व्यध्व |
| पथिषदी | रजस् | सुपथ |
| पद्दाम ( मार्ग- | रथ्या | स्वस्तिवाहन |

प्रपथ—ऋग्वेद आणि ऐतरेय ब्राह्मण यांत याचा अर्थ 'दूरचा प्रवास' असा आहे. विल्सनला एके ठिकाणीं हा शब्द 'उतरण्याची जागा' या अर्थानें आढळला आहे. या ठिकाणीं प्रवाशांनां खादि (अन्न) मिळत असे. सिमर म्हणतो कीं, हा अर्थ होणें शक्यच नाहीं. व त्याच्या मतानें 'प्रपदेषु' ज्या ठिकाणीं पुर्वीनें 'प्रपथेषु' हा पाठ येथें घातला गेला आहे. काठक संहितेंत या शब्दाचा अर्थ ऐसपैस मोठा रस्ता असा आहे. सायणानें प्रपथ याचा अर्थ मोठा मार्ग, रावलचक रस्ता असा दिला आहे. यावरून पुढें दूरचा प्रवास असा ह्याचा अर्थ घेणें शक्य आहे. ऋ १.१६६.९ या ठिकाणीं येणाऱ्या प्रपथ शब्दाचा अर्थ सायणानेंहि विल्सनसारखाच दिला आहे.

### मार्ग व त्याचीं विशेषणें [तै सं.]

| | | |
|---|---|---|
| अश्मायनी | शेवट ) | संचर |
| अध्वन् | पथिन् | सुग |
| अपथ | पथ्या | सुपथ |
| काष्ठा ( मार्गाचा | रथपथ | स्रुती ( मार्ग ) |

### [अथर्ववेद]

परिरथ्य

संचर.—तै. संहिता ग्रंथात ह्याचा अर्थ प्राण्यांच्या संचाराचा मार्ग असा आहे. नेहमीचा सामान्य अर्थ म्हटला म्हणजे यज्ञात भाग घेणाऱ्या अनेक ऋत्विजांनीं व्यापलेला किंवा उपयोगात आणलेला यज्ञातल्या जागेवरील मार्ग असा आहे.

परिरथ्य.—अथर्ववेदामध्यें हा शब्द असून ह्याचा अर्थ एक तर रस्ता किंवा त्याचा भाग. [illegible] लुडविग व व्हिटने म्हणतात त्याप्रमाणें काठ असा अर्थ असावा. ऑफ्रेक्ट याचा अर्थ आकाशाचे मध्यवर्ती प्रदेश असा करितो.

### रथ व रथसंबंधी [ ऋग्वेद ]

| | | |
|---|---|---|
| अंजस्प | त्रिवृ | वृषरथ |
| अनस् | निचक्रा ( शकटी ) | शकटी |
| अनरथ | पंचरश्मि | शतपद |
| अश्वधूरि | पविरथ | शल्मलि |
| अष्टावंधुर | पूर्णबन्धुर | श्येनपत्मन् |
| आपथ्य | पृथुयामन् | षडश्व |
| एकचक्र | पंक | सप्तचक्र |
| गर्त | बृहद्रथ | सर्वरथ |
| चंद्ररथ | यान | सुविवृक्त |
| चित्ररथ | याम | सुरथ |
| ज्योतीरथ | रैथ | सुचक्ररथ |
| घृतयामन् ( दीप्त | रथिनी | सुमद्रथ |
| रथ ) | विद्युद्रथ | सुरथ |
| त्रिबंधुर | वृषनाभि | सुवृत |

नाहीं ) त्याची रचना फारशी माहीत नाहीं. ऋग्वेदातील ज्या सूक्तात सूर्यास्य सूर्या नावाच्या मुलीच्या विवाहाचें वर्णन केलें आहे त्यांत तिला ज्या गाडींत बसविलें होतें त्या गाडीला एक आच्छादन होतें असें वर्णन आहे. रथाच्या तुंबाचें देखील वर्णन आहे. रस्ते वाईट असल्यास विरथ नांवाच्या ओबडधोबड वाहनाचा उपयोग होत असे. विवाह वगैरे समारंभामध्यें ज्या मिरवणुकी निघत असत त्यात गाड्या ओढण्याकडे बैलांचा उपयोग होई. उंचेची गाडी तांबूस बैल अगर गाई ओढीत असें वर्णन आहे.

गर्त.—ऋग्वेदांत प्रथमतः याचा अर्थ योद्ध्याची रथांतील बसण्याची जागा असा आहे. ती बरीच मोठी असे. तदनंतर लक्षणेनें किंवा खरोखर त्या शब्दाचा रथ असा अर्थ होऊं लागला [ सायणभाष्याप्रमाणें याचा रथ असाच अर्थ आहे ].

यान.—ऋग्वेदांत व तदनंतर वाहन या अर्थी हा शब्द आलेला आहे.

रथ.—ऋग्वेदांत आणि नंतरच्या ग्रंथांत अनस् गाडी-पेक्षां निराळ्या (रथ या) अर्थी हा शब्द आला आहे तरी पण फरक विशेष नाहीं. दोहोंच्या रचनेमधल्या फरकाविषयीं आपणास माहिती नाहीं. रथचक्राचें कणा घालण्याचें भोंक गाडीच्या भोंकापेक्षा मोठें असे येवढीच माहिती मिळते. रथाला बहुतकरून दोन चाकें असत व त्याविषयीं उल्लेख वारंवार आलेला आहे. चाकाची रचना म्हणजे त्याला एक धाव असून त्यास एक पाठा (प्रधि), अरे आणि तुंबा हीं असत. पाठा आणशी वर्तुळ मिळून येत होते. तुंबा-मधील भोंकाला ख हें नांव आहे; या ख मध्येंच कणा घाला वयाचा. 'आणीचा अर्थ तुंबात घातलेलें कण्याचें टोंक किंवा चाकामध्यें टोंक नीट बसण्याकरिता घातलेली कुणी असा आहे. कधीं कधीं जाड चाकाचा उपयोग केला जाई. अथर्ववेदात (१.१४ ६;) केव्हां केव्हां अरडु लांकडाचे कणे करीत असत असा उल्लेख आहे. [सायणभाष्याप्रमाणें अरडु हा एक राजा होता.] याच्या टोंकाभोंवतीं चाकें फिरत. कण्यावर रथाचा मुख्य भाग (कोश) ठेवीत. हा भागाला वंधुर हाहि शब्द आहे, परंतु त्याचा अर्थ रथामधील बैठक असाहि होतो. आश्विनांच्या रथविषयीं त्रिबंधुर हें नांव वापरलें आहे. त्रिबंधुराचें आणि त्रिचक्राचें बरेंच साम्य आहे. वेबरच्या मतें रथाला तीन चाकें आणि तीन बैठकी असत परंतु त्सिमरच्या मतें अशा प्रकारचें वाहन केवळ काल्पनिक होय. गर्ता या शब्दानेंहि योद्ध्याच्या आसनाचाच अर्थ सूचित होतो. रथाचा दांडा कण्याशीं काटकोनात असे. साधारणतः एकच दांडा असे व त्याच्या दोन्ही बाजूंला घोडे जुंपीत व घोड्यांच्या मानेवर जूं ठेवीत. जुंवाच्या मधील भोंकात दांडा बसविला जात असे व त्यालाच ख किंवा तर्द्मन् असें म्हणत. नंतर जूं आणि दांडा एकत्र बांधीत असत. जूं घोड्याच्या मानेवर ठेवीत आणि नंतर त्यांना बांधीत. पट्ट्यांचा उल्लेख रश्मि आणि रशना या दोन शब्दांनीं होत असे. हे शब्द घोड्याच्या लगामालाहि लावीत. सारथी लगामाच्या योगानें घोड्यांना आवरून धरी. चाबकाच्या सहाय्यानें त्यांना हाकीत असे घोड्याच्या तंगांना कक्ष्या असें म्हणत. नेहमीची पद्धत म्हणजे साधारणपणें रथास दोन घोडे असत, पण कधीं कधीं तीन किंवा चारहि असत. तीन असल्यास तिसरा घोडा पुढें लावीत किंवा बाजूला लावीत याविषयीं माहिती नाहीं. परंतु बहुधा दोनाहि पद्धती अमलांत असाव्यात. पांच घोड्यांचा सुद्धां उपयोग करीत. रथाला बहुतेक घोडे जुंपीत तरी पण गाढवांचा आणि खेचरांचा उपयोग केलेलाहि आढळतो. गाड्या ओढण्यास बैलांचा उपयोग करीत व म्हणूनच अनड्वाह हा शब्द प्रचारात आला. कधीं गरीब लोकांनां एका घोड्यावरच संतुष्ट रहावें लागे. अशा वेळीं घोड्याच्या दोन्हीकडे दोन दोन दांड्या असलेल्या जुंवाचा उपयोग करीत ( ऋ. १०. १०१.११;१३१.३ ) रथामध्यें सारथी उजव्या बाजूस बसत व आणि योद्धा सव्येष्ठ किंवा सव्येष्ठा हे शब्द दर्शवितात त्याप्रमाणें डाव्या बाजूस बसत असे. आपस्तंबाच्या शुल्ब सूत्रामध्यें रथाची लांबी-रुंदी दिली आहे ती अशी:—रथाचा दांडा १८८ अंगुळें, कणा १०४ अंगुळें, जूं ८६ अंगुळें. धाव शिवाय करून बाकी चहूंकडे लाकडाचा उपयोग करीत रथाच्या दुसऱ्या भागांचाहि उल्लेख आलेला आहे पण तो अस्पष्ट आहे.

शकट, शकटी.—जुन्या वाङ्मयात गाडी अशा अर्थानें हे शब्द विरळा आलेले आहेत. गाडीच्या करकर आवाजाची अरण्यात रात्रीं ऐकलेल्या आवाजाशीं ऋग्वेदात तुलना केलेली आहे.

स्थूरि.—ऋग्वेद व उत्तरकालीन ग्रंथ यांमध्यें दोन घोड्यांचें ऐवजीं एकाच जनावरानें ओढलेला ( व तेंहि हलक्या प्रतीचें जनावर ) असा याचा अर्थ आहे. (ऋ. १० १३१.३ ) या ठिकाणीं हा शब्द आहे. त्याचा अर्थ सायण छकडा असा करितो. ऐ. ब्रा. ५ .३०, या ठिकाणीं 'ययाह्यस्थूरेणैकेन' असे शब्द आहेत. सायणभाष्यांत अस्थूरि असा शब्द घेतला आहे व त्याचा अर्थ घोडा असा दिला आहे.

स्यंदन.—रथ. ऋग्वेदांत एके ठिकाणीं पूर्वीच्या वाङ्मयात हा शब्द आलेला आहे. स्पंदन असाहि पाठ याच ठिकाणीं सर्वसंमत असा आहे.

स्वनद्रथ.—खडखड आवाज करणारी गाडी. याचा अर्थ लुडविगच्या मतानें ऋग्वेदामध्यें आसंगाचें विशेषनांव असा आहे. पण हा शब्द नुसता विशेषण असावा. सायणाच्या मताप्रमाणें हा शब्द नाम आहे; व त्याचा अर्थ "आवाज करणारा रथ" असा आहे. ग्रिफिथच्या

मतें त्याचा अर्थ "ध्वनद्रथ नांवाच्या आसामीचा मुलगा" असा आहे.

[९]वि प थ —आश्वलायनाच्या वर्णनांत 'ओबडधोबड रस्त्याला योग्य असें वाहन' असा अर्थ आलेला आहे.

[१०]वि पृ थु —शांखायन श्रौतसूत्रांत हा शब्द आला असून बरोबर याचा अर्थ विपथ (ओबडधोबड वाहन) याच्यासारखाच आहे. पहुनेक ही चूक दिसते.

[११]दी र्घ प्स न् —ऋग्वेदामध्यें रथाचें विशेषण म्हणून हा शब्द आलेला आहे व रॉथच्या मतें त्याचा अर्थ रथाच्या पुढचा लांब असलेला भाग असा आहे.

[१२]धू र्ष द् —रॉथच्या मतें 'जुवाचें खालीं बसणारा' म्हणजे 'ओझें वहाणारा' अर्थात् अलंकारिक भाषेत बोलावयाचें म्हणजे धुरीण, असा ऋग्वेदांत जेथें हा शब्द आलेला आहे तेथ अर्थ होतो. जास्त संभवनीय अर्थ म्हणजे दांड्यावर बसणारा म्हणजे सारथी असा होईल कारण घोड्यांच्या जवळ व त्याकरितां सारथ्याला पुढें वाकून दांड्यावर किंवा जुवाजवळ सुद्धां जावें लागे.

[१३]म ध्य म व ह् —हें ऋग्वेदांत एके ठिकाणीं रथाचें विशेषण म्हणून आलें आहे. याचा खरा अर्थ कोणता कळत नाहीं. रॉथ याच्या मतें दोन दांड्यांमधून एक घोडा हांकणें, हें विशेषणार्थी वाक्य या शब्दाच्या मागें असावें. सायणाचार्यांप्रमाणें 'मध्यम वेगानें हांकणें' याचा अर्थ 'मध्यम हांकणें' म्हणजे अर्धवट पणानें हांकणें असा आहे. ऋ. २. २९. ४ या ठिकाणीं 'मध्यमवाळ्कृत' असा शब्द आहे याची मध्यमवाट कृत अशीं पदें पडतात मध्यमवाट् मध्यमेन मन्दगमनेन वाहक. म्हणजे मंदगतीनें जाणारा असा सायण अर्थ देतो. ग्रिफिथ हाच अर्थ करितो.

[१४]र थ च र्ष ण —याचा ऋग्वेदांत एकदां उल्लेख आहे, तेथें अर्थ संशयास्पद आहे. रॉथच्या मतें रथाच्या कांहीं भागाकरितां हा शब्द योजिला असावा व बहुधा रथाचा भाग हाच अर्थ असावा. ऋ. ८. ५. १९ या ठिकाणीं येणाऱ्या रथचर्षण शब्दाचा अर्थ सायणाचार्यांनें आपल्या भाष्यांत "रथस्य इत्थे मध्यदर्शे।" म्हणजे रथाचा मध्यभाग असा केला आहे व ग्रिफिथ आपल्या इंग्रजी भाषांतरांत त्याचा "रथाचा मार्ग" असा अर्थ करतो. निरुक्तावरील दुर्गाचार्यांच्या भाष्यांत ५-१२ या ठिकाणीं रथचर्षण याचा अर्थ रथांतून गमन करणारा असा केला आहे. रथचर्षणे हें ज्या अर्थी संबोधन आहे त्या अर्थी असाहि अर्थ असावा असें दिसतें.

[१५]र थ वा ह न.—ऋग्वेदांत (६, ७, ८) आणि अथर्ववेदांत रथ उभा करण्याचा हलती घोडी असा अर्थ आहे. रॉथच्या मतें ग्रीक लोक अथवा प्रकारच्या लांकडी घोड्याचा उपयोग करीत. रथवाहन अथवा रथवाह हा शब्द दोन घोड्यांनीं ओढावयाच्या गाडीला लाविलात वेबरच्यामतें हा शब्द लढाईच्या रथाला रणांगणावर नेणाऱ्या घोड्यांना लावीत ऋ. ६. ७५. ८ या ठिकाणीं असणाऱ्या रथवाहन या शब्दाचा अर्थ सायणानें रथानें वाहिलें जाणारें धन असा केला आहे व "रथ उपयोगांत नसतांना तो ज्या उंचवट्यावर किंवा तिवईवर ठेवतात ती" असा ग्रिफिथनें अर्थ दिला आहे. अथर्ववेद ३. १७. ३ या ठिकाणीं येणाऱ्या रथवाहन शब्दाचा अर्थ ग्रिफिथनें "रथ ओढणारा" असा दिला आहे.

[१६]र थ सं ग.—ऋग्वेदांत रथांचा सामना असा अर्थ आहे. ग्रिफिथनें याच्या विरुद्ध रथांची भेट असा अर्थ दिला आहे व हा अर्थ वरील अर्थास जुळेल असाच आहे.

[१७]अ क्ष —अक्ष म्हणजे कणा. या रथाच्या भागाचा उल्लेख ऋग्वेदांत व नंतरच्या ग्रंथांत वरचेवर आला आहे. तो पट्ट्यांनीं अगर दोऱ्यांनीं रथाच्या मुख्य भागाला बांधलेला असतो. त्या पट्ट्याला अक्षानह म्हणजे "आंसाला बांधलेला" म्हणतात. हा मूळ अर्थ असून शिवाय चाका घोडा असाहि अर्थ करितात. आंसाला तापविणें व तो मोडण्याची भीति याबद्दलची माहिती त्याकाळीं होती असें दिसतें.

[१८]आ णि —हा शब्द ऋग्वेदांत आहे परंतु तदुत्तरग्रंथांत क्वचितच सांपडतो आणि रॉथ व झिमर यांच्या मतें कण्याचा जो भाग चाकाच्या तुंब्यांत येतो, त्याचा या शब्दानें बोध होतो. सायणाचार्यांनीं याचा अर्थ [चाकाची] खुंटी असा केला असून तो निरुक्तकारांना व त्युमनला संमत आहे. ऋग्वेदांत एका ठिकाणीं याचा अर्थ लक्षणेनें सर्व रथ असा दर्शविला आहे, परंतु गेल्डनेरच्या मतानें तो सर्व उतारा संदिग्ध आहे.

[१९]ई षा —ईषा म्हणजे रथाच्या जुंवाचा दांडा. बहुतकरून रथ एका दांड्याचाच [एकेषः] असे, क्वचित् क्वचित् दोन दांड्यांचाहि उल्लेख केला आहे. हा शब्द बहुतेक युग [जूं] शब्दाशीं समासानें जोडलेला असतो. दांडा जुंवांत घालून दोरखंडानें बांधलेला असे, रथाशीं तो बरोबर कसा जोडला जाई हें सांगतां येत नाहीं.

[२०]उ प धि —हा शब्द एकदां ऋग्वेदांत आणि एकदां अथर्ववेदांत प्रधि याच्या बरोबर आढळत असून याचा अर्थ चाकाचा एक भाग असा आहे. परंतु हा भाग कोणता हें नेमकें सांगतां येत नाहीं. रॉथ, झिमर आणि ब्लूमफील्ड हे म्हणतात कीं चाकाच्या सर्व आऱ्यांना मिळून हा शब्द लावला आहे. व्हिट्नी हें अशक्य आहे असें ठरवून म्हणतो कीं भरीव चाकाचा वाचक हा शब्द आहे. प्रधि म्हणजे धाव आणि परि म्हणजे चाकांचा मधला भाग उपधि म्हणजे चाकाचा खालचा कोट किंवा प्रत्यक्ष चाकच असा अर्थ असावा.

[२१]उ प ह्व र.—ऋग्वेदांतील एका उताऱ्यांत हा शब्द असून गेल्डनेर त्याचा अर्थ रथाचा मुख्य भाग (उपस्थ) असा करितो.

वाजविणारा हाहि एक आहे. तैत्तिरीयसंहितेत 'तूणव' याचा अर्थ वेणु असा सायणानें केला आहे. कीथ याचा अर्थ मुरली असा करतो. तैत्तिरीय ब्राह्मण (३. ४, १५, १) यात 'तूणवध्म' म्हणजे वाद्य वाजविणारा किंवा तोंडानें शीळ वाजविणारा असा अर्थ केला आहे. निरुक्तात 'तूणव' म्हणजे मृग असा अर्थ घेतला आहे.

[११] भू मि दुं दु भि.—जमीनीचा नगारा. महाव्रतविधीच्या वेळीं एक खाच चामड्यानें बंद करीत व त्याला नगारा करीत. हा शब्द संहिता व ब्राह्मणग्रंथांतून आला आहे.

[१२] वी णा.—ऋग्वेदोत्तर संहिता ग्रंथ व ब्राह्मण ग्रंथ यांत याचा अर्थ वीणा असा आहे. यजुर्वेदामध्यें पुरुषमेधाच्या वेळी बळी दिले जाणाऱ्याच्या यादींत वीणा-वाद (वीणा वाजविणारा) यानें नाव आलेलें आहे. वीणा शब्दाचा इतरत्रहि उल्लेख आलेला आहे. ऐतरेय आरण्यकात ह्या वाद्यावर केसाळ कातडें (एके काळीं) पसरलें जात असे असें म्हटलें असून याचे निरनिराळे भाग वर्णिले आहेत. उदाहरणार्थ, शिरस् उदर, अंभृण, तंत्र (तार), वादन वगैरे. शतपथ ब्राह्मणात उत्तरमंद्रा याचा अर्थ एक प्रकारचा स्वर किंवा वीणा असा आहे. शांखायन श्रौतसूत्रांत (१७ २, १) शततंतु वीणेचें वर्णन आहे तें असें:— त्या वीणेला पलाशाची मूना (खुंटी) असते, उदुंबराचा दांडा असतो, बैलाचें कातडें केसांसहित गुंडाळतात, दांड्याला दहा भोकें पाडून प्रत्येक भोकांतून दहा दहा तारा ओंवतात व त्या तारा वेगवेगळ्या ठिकाणी बसवितात, पानासहित वेतसाची शाखा वाजविण्याकरितां ठेवतात. ऐतरेय आरण्यक ३. २५ या ठिकाणीं मनुष्याचें शरीर हें वीणा करून त्याची व वीणेची तुलना दाखविली आहे.

[१४] वेणु.—तैत्तिरीय संहिता, अथर्ववेद व उत्तरकालीन ग्रंथ यात वेत किंवा वायु अशा अर्थानें हा शब्द आलेला आहे. तैत्तरीय संहितेमध्यें तो पोकळ (सुषिर) आहे असें वर्णन आहे. ऋग्वेदांत दानस्तुतीमध्यें वालखिल्य सूक्तात एकदा हा शब्द आलेला आहे. रॉथ या ठिकाणीं त्याचा अर्थ वेताची बासरी असा करतो. हाच अर्थ पुढील ग्रंथात बहुधा आला आहे. कौषीतकी ब्राह्मणात वेणु व सस्य यांना एके ठिकाणीं उल्लेखिलें आहे व ते वसंत ऋतूंत पक्व होतात असें म्हटलें आहे. बहुतकरून वायूंची झाडें असा याचा अर्थ असावा.

[१५] तु ण व.—'लांकडाचें वाद्य' अशा अर्थानें अथर्ववेदात पवमानाचें विशेषण म्हणून हा शब्द आलेला आहे.

[१६] ना डी का.—अथर्ववेदामध्यें एकदा हा शब्द आलेला असून याचा अर्थ अलगुज असा स्पष्ट आहे व त्या वेदात वेताच्या बनविलेल्या बाणाच्या टोंकाचाहि संबंध आहे.

[१७] आ ड म्ब र.—एक प्रकारचें ढोलकें. वाजसनेयी संहितेत पुरुषमेधाचे बळींची जी यादी आहे त्यात आडम्बराघात याचा उल्लेख आहे.

[१८] का ण्ड वी णा.—काठक संहितेत महाव्रताच्या वेळी उपयोग करीत असलेलें वेतस पर्वनूपासून केलेलें वीणेसारखें तंतुवाद्य असें लिहिलें आहे. काण्डवीणा वेतसशाखेनें वाजवावयाची असते. या वाणेला वादनकार घाटरी असें म्हणतात (शांखायन श्रौतसूत्र १७. ३, १४–१५).

[१९] बे कु रा.—हा शब्द पंचविंश ब्राह्मणात येतो. व तेथें याचा अर्थ 'आवाज' किंवा 'ध्वनि' असा होतो. हाच अर्थ निघंटुकात दिला आहे. हा बहुधा बकुराप्रमाणें एकाद्या वाद्याचा द्योतक शब्द असावा. तैत्तिरीय आणि काठक संहितातून बेकुरि आणि वेकुरि हे शब्द स्वर्गीय वारांगना किंवा अप्सरा यांना मंजुळ या अर्थी विशेषणें म्हणून वापरलें आहेत. वाजसनेयि संहिता आणि शतपथ ब्राह्मण यांत भाकुरि आणि भकुरि असे शब्द आढळतात. निरुक्तात (२. २३), वाङ्नामाच्या यादींत हा शब्द आलेला आहे. बेकुरयः म्हणजे चंद्रमा गंधर्वाच्या भार्यांची नावें, असा तैत्तिरीय संहितेत भाष्यात अर्थ घेतला आहे. त्याचा तेथें सायण ध्वनीशीं संबंध लावीत नाहीं त्याचप्रमाणें शतपथ ब्राह्मणात चन्द्रमा गंधर्वाच्या स्त्रिया जीं नक्षत्रें त्यांना भेकुरी किंवा भाकुरी (प्रकाशमान्) असें नाव आहे.

[२०] लं ब न.—काण्वशाखीय बृहदारण्यकोपनिषदामध्यें हा पाठ आहे व तो पाठ माध्यंदिन शाखीय आडंबर (डमरू) बद्दल आलेला आहे काहीं प्रतींत या ठिकाणीं लंबन असा शब्द नसून लंबर असा आहे

[२१] वा द न.—ऐतरेय आरण्यकात एका तंतुवाद्याचा एक भाग असा अर्थ होतो. वादन' हा तंतुवाद्याचा भाग नसून वादन म्हणजे 'वाजविण्याची क्रिया' असा अर्थ सायण करतो.

[२२] वादि त.—छांदोग्यउपनिषदामध्यें हा गीतवादित गाणेंबजावणें ह्या समासात व कौषीतकी ब्राह्मणात नृत्य ह्या शब्दाबरोबर (एकटाच) गाणें व नाच या अर्थी आला आहे.

### वि चा र

#### ब्रह्मविशेषणें [ऋग्वेद]

| | | |
|---|---|---|
| ऋत | विश्वतस्पात् | सहस्रपात् |
| ऋतज्य | विश्वतोबाहु | सहस्रप्रधन |
| विश्वभव्य | विश्वतोमुख | सहस्रबाहु |
| विश्वजित् | सत् | सहस्रशीर्षन् |
| विश्वतश्चक्षु | सत्य | सहस्राक्ष |

#### वेदान्त [ऋग्वेद]

| | | |
|---|---|---|
| अधिष्ठान | अविदूर (अत्यंत प्रज्ञानसु) | उपसद (उपासना) |
| आस्था (प्रकृति) | | उद्देति (उपासना) |
| अन्तर्विद्वान् (देवमार्ग जाणणारा) | असुनीति [प्राणनेणार] | उरुचक्षस (बहुद्रष्टा) |
| | | ऋषि (मंत्रद्रष्टा) |
| अभिरक्ष्य (अप्रगम्य रहस्य) | आत्मन्वत् [सजीव] | कवितर (प्राज्ञतर) |
| | आर्य (अभिज्ञ) | कव्यमान (मेधावी |

कुहचिद्विद् [मद्द का यत्र मार्यं-तितत्रतिष्ठामि]
केतु (प्रज्ञान)
गुहा [हृदय]
चिकित्विन्मनस् (सर्व हृदयज्ञता)
जीव
तुरश्रय
दुवस
देवयान [देवमार्ग]
धर्मन्
ध्रुव
नाभि (हेतु)
नाम-धस् (नामा-धापयिता)
नीतिवित् (स्तोत्रा-भिज्ञ)
पंचहाता (वायु वि.)
पश्यत् (विश्वद्रष्टा)
पुरुनेतन (बहुज्ञाता
प्रकेत (विज्ञापक)
प्रज्ञात् (ज्ञानी)
प्रथमच्छद (निर्गु-णब्रह्माच्छादक)
प्रविद्वस् (प्रकृष्ट ज्ञानी)
बोधिन्मनस्
मधुला (मधुविद्या)
मयूख (प्राणात्मक देव)
मरीचि [आत्म-ज्ञानी]
माया
मुमुक्षु
वयुन [ज्ञानसाधन]
वश [अधीन]
वनिन्
वसुवन्
विचक्षण (सर्वतो-दर्शी)
वित
विदाय्य (वेत्ता)
विदुष्टर (विद्वत्तर)
वि प्र (कवी)
विप्रन् (ज्ञानमार्गी)
विप्रनाथम् (ज्ञात-कर्मा)
विधर्मन् [जगद्धा-रण व्यापार]
विराज
विविद्वस् (अभिज्ञ)
वीरवक्षण
व्यान
शाधन्तम (प्रबुद्ध-तम)
शतविचक्षण
श्रद्दिव [श्रद्धया श्रोतव्यब्रह्म]
श्रुतवित्
संवित् (ज्ञान)
सत्
सर्ग [जन्म, सृष्टि]
साधु [साधक]
सुविद्वस [सर्वद्रष्टा]
सुवेद [सुविज्ञान]

[ तै. सं ]

आत्मद
गर्भसद्
देवयान [मार्ग]
निरया [वाच]
प्रणव
ब्रह्मवर्चस
ब्रह्मवादिन्
ब्रह्मसंशित
यजमानलोक
योग
वयुन [ज्ञापक]
नामा-बंधन
विज्ञात
वेद
संवित्
सत्
सत्य
सात्मत्व
सायुज्य
सुकृत
स्वाधिय [इन्द्रिय]

[ अथर्ववेद ]

अक्षर [विनाश-रहित आत्म-स्वरूप]
अविज्ञातन [गहन तत्व न जाण-णारा]
अनन्य कृत (हन्दै-स्नाकृतम् ब्रह्म)
अग्निविद्वन्
आमायु
आचार्य
अश्मन
अश्मन्वत [मात्म-कजगत्]
अश्मन्वद्
उपद्रष्टा
कवि [क्रांतदर्शी]
कर्णीयमान [पर-मात्म्याच वि]
क्रतुविद्
चराचर
चित्त (ज्ञान)
ज्ञानन्
जीवपुर (जीव-शरीर)
तत्व
तपस्
तप्यमान
त्रिपाद्
दशांगुल
देवयान
दैव
दैवी (देवमयं-धिनी वाणी)
दौर्भाग्य
नवद्वार
पितृयान
पुत्रविद्
पुराणवत्
प्रज्ञान
प्रज्ञानी
प्रतिबोध (प्रति-लक्षज्ञान)
प्रबुध
प्रविद्वस्
प्राण
प्राणति
प्राणापान
बोधप्रतीबोध
ब्रह्मजुष्ट
ब्रह्मण्वति
ब्रह्मवर्चसी
ब्रह्मवादिन
ब्रह्मसंशित
भागधेय
भुवनेश्य (परमा-त्म्याचें वि)
मध्यन्दिन
मध्वद्
मनीषिन
ममसत्य
महर्षि
महामनस्
माध्यन्दिन
मीमांसमान
मेधा
मेधावित्
मेधिराय
यजुर्विद्
यज्ञर्त
यज्ञायुध
रथंतर
वर्तनि
वशी
विचक्षण
विज्ञान
विदुषी
विद्या
विपश्चित्
विप्रजूत
विश्वचक्षस्
विश्वचय
विश्वचर्षणि
विश्वजन्मन्
विश्वजन्य
विश्वतःपाणि
विश्वतस्पृथ
विश्वतुर्व
विश्वतोधार
विश्वतोमुख
विश्वतोवीर्य
विश्वदर्शत
विश्वदानी
विश्वदावन्
विश्वदृष्ट
विश्वदेववन्
विश्वधायस
विश्वनाम्नी
विश्वपशस्
विश्वभृत
विश्वभोजस्
विश्वमिन्व
विश्वमानुष
विश्वरोपस्
विश्वरूप
विश्वविद्
विश्ववेद
विश्वव्यचन
विश्वाहृत्य
शिवापर
सत्
सत्यवादिन्
सप्तचक्र
सप्तरश्मि
संवर्ग
संविद्
सम्यग्ज्ञान
सर्वख्यानि
सर्वतनु
सर्वपात्
सर्वपुरुष
सर्वरथ
सर्वरूप
सर्वविद्
सर्वात्मा
सहस्रपाद्
सहस्रपृष्ठ
सहस्रपोष
सहस्रप्राण
सहस्रबाहु
सहृदय
सुप्रज्ञन्
सुमनस्
सुविज्ञान
सुश्रव
सोमराज्ञी

[वाजसनेयि सं]

अकाय
अनुप्रश्यत् (ज्ञानी)
अन्धंतमसमावृत (अन्धतमस्)
यथातथ्यविद्
अवेद्या
अमृत
असुर्य (लोक)
अस्माविर
विमानत् (ज्ञानी)
विद्या
शुद्ध
संभूति (देहात्म-वादी)
हिरण्मयपात्र

## ऋषि

### ऋषिनामें [ ऋग्वेद ]

ऋग्वेदांतील बऱ्याच ऋषींची माहिती याच भागांतील दाशराज्ञयुद्ध या प्रकरणात येऊन गेली आहे.

| | | |
|---|---|---|
| अगस्त्य | कृष्ण | पुरुन्मन् |
| अंगिरस् | क्षत्र | पुरूरु |
| अघर्महूळ | गय | पुरुमु |
| अत्रि | गविष्ठिर | पुष्टिगु |
| अथर्वन् | गृत्समद | पुनवत्स |
| अत्रिज | गोतम | पृथवान |
| अपनिरय | गोपवन | पृनाकुमातु |
| अशगीर | गौरिवीति | प्रगाथ |
| अयास्य | च्यवन–च्यवान | प्रथ |
| अर्चनानस् | जमदग्नि | प्रस्कण्व |
| अर्वेत | जराबोध | प्रियमेध |
| अवत्सार | जुजुरुप | बभ्रु |
| आप्त्य | तकवान | बरु |
| आर्नक | तर्य | बाहुवृक्त |
| आर्जुनेय | तरंत | बृहदुक्थ |
| आर्ष्टिषेण | तिरश्ची | बृहद्दिव |
| इट | त्रित | ब्रह्मचारिन् |
| उपस्तुत् | त्रिशोक | महापुत्र |
| उरुक्षय | दधीच | भरद्वाज |
| उशनस्–काव्य | दध्यङ् | भारद्वाज |
| *ऋषि ( सामान्य नाम ) | दभीति | भूतांश |
| | दशग्व | भृगु |
| एकद्यू | दशोण | मान |
| एतश | दार्भ्य | मान्दार्य |
| एवयामरुत् | दीर्घतमस् | मांधातृ |
| एवावद | दीर्घनीथ | मान्य |
| और्व | दुर्मित्र | मामतेय |
| और्वभृगु | देवक | महान |
| औशिज | नभाक | मिश्रातिथि |
| कक्षीवान् | नाभाक | ×मुनि [ सामान्य नाम ] |
| कण्व | नारद | |
| कटु | नीपातिथि | मेधातिथि |
| कलि | नृमेध | यजत |
| कवष | नृगर | रहूगण |
| कश्यप | नोधा | राम |
| काण्व | परावृज् | वश |
| काण्वायन | पराशर | वम्र |
| काव्य | पर्वत | वसिष्ठ |
| कुत्स | पायु | वसुरुच् |
| कुशिक | पुरणी | वामिन् |
| वातरशन | वेन | शुनवक्ष |
| वाध्र्यश्व | वैदधिन् | श्रुतर्वन् |
| वाच्य | वैददश्वि | श्रुष्टिगु |
| वामदेव | वंश | संवरण |
| विभिंदु | वैयश्व | संवर्त |
| विमद | व्यश्व | सत्यश्रवस |
| विरूप | शतयातु | सदापृण |
| विश्वक | शपथ | सांध |
| विश्ववार | शर | सप्तगु |
| विश्वचर्षणि | शरभ | सप्तवध्रि |
| विश्वमनस् | शातवनेय | सप्रथ |
| विश्वसामन् | शार्यात | सुतंभर |
| विश्वामित्र | शिंजार | सुदक्ष |
| विष्णापु | शुनःशेप | सुदेव |
| वृश | शुनहोत्र | सुमित्र |
| वृषगण | शृंगवृष | सोभरि |
| वृष्टिहव्य | श्यावाश्व | स्थूरयूप |
| | | हिरण्यस्तूप |

### [ तै. सं. ]

टीकाकारांच्या मतभेदामुळे पुढील यादींत कांहीं राजांच्या नांवांचा संग्रह होण्याचा संभव आहे.

| | | |
|---|---|---|
| अंगिरस् | जमदग्नि | मर्क [असुरपुरोहित] |
| अत्रि | [८] जानकि | यज्ञसेन |
| अथर्वन | [९] जामदग्निय | यसश्री |
| अप्नवान | तुमिंज | वसिष्ठ |
| [१] अरुण औपवेशि | त्रसदस्यु | वासिष्ठ |
| आजीगर्ति | दधीच | विश्वकर्मन् |
| [२] आटणार | दध्यच् | विश्वामित्र |
| आथर्वण [ दध्यङ् ] | दार्भ्य | वीतहव्य |
| आन्त्यायन | नाभानेदिष्ठ | शंयु |
| उद्दक | नृमेध | [१३] शंड [ असुर-पुरोहित ] |
| औद्दालकि | पर | शुल्ब |
| औपोदिति | पलिन | [१४] शौनेय |
| और्व | परुच्छेप | शौल्बायन |
| और्वभृगु | [१०] पुलस्तिन् | [१५] श्रायस |
| औशिज | पौरुकुत्स्य | [१६] संश्रवस |
| कक्षीवान् | प्रहन | [१७] सनातन |
| कसर्णीर [काद्रवेय] | [११] प्रयोग | सात्यकामि |
| [३] कुसुरुबिंद | [१२] बंध | [१८] साप्यहव्य |
| [४] केशिन् | भरद्वाज | सानग |
| [५] कौसुरुबिंद | भालन्दन | सार्वसेनि |
| [६] क्रतुजित् | भुवन | सुपर्ण |
| गविष्ठिर | भृगु | ससमेय |
| गोतम | भौवन | |
| [७] चैत्रियायण | भौवायन | |
| | मनु | |

| | | |
|---|---|---|
| सुहोतृ | सौवर्चनस् | [१९] हविष्कृत् |
| सुद्रातृ | हरध्वयु | हविष्मंत |

[ अथर्ववेद ]

| | | |
|---|---|---|
| [२०] अगस्ति | दधीच | [२५] मात्स्य |
| अत्रि | दभीति | मुद्गल |
| अथर्वाङ्गिरस् | दशाव | मुनि (सामा. ना) |
| अर्चनानस् | दीर्घतमस् | मेधातिथि |
| [२१] असित | नवग्व | रम |
| आथर्वण | [२२] नारद | रुशम |
| आर्षेय | नार्षद | वध्र्यश्व |
| इट | नाहुष | वसिष्ठ |
| उशनस् | नोधस् | वामदेव |
| कक्षीवान | पुरुमीह्ळ | विमद |
| कण्व | पुरुहन्मन | विश्वामित्र |
| कश्यप | पैद्व | वीतहव्य |
| कुत्स | प्रस्कण्व | शायु (महर्षि) |
| कृप | प्रियमेध | शृंगवृष |
| गय | [२३] प्रतिबोध | श्यावक |
| गविष्ठिर | [२४] बृहत्सामन् | श्यावाश्व |
| गोतम | बोध | सप्तवध्रि |
| जमदग्नि | भरद्वाज | सुदीति |
| त्रित | भृगु | सोभरि |
| त्रिशोक | मरीचि | सौधन्वन |

[संहितोत्तर]

| | | |
|---|---|---|
| अणीमोचिन् | आसुरिवासिन् | [२८] कात्यायनी |
| अत्य | इटन्तकाव्य | [२९] कानान्ध |
| अतिधन्वन् | उत्तानआंगिरस् | [३०] कुंडपायिन् |
| अनुवक्तृसत्य- | उपकेतु | कुबेरवारक्य |
| सात्यकीर्त | उलवार्ष्णिवृद्ध | [३१] कृष्णहारित |
| अर्गलकाहोडि | उलुक्ययजानश्रुतेय | [३२] कौण्ठरव्य |
| अलम्मपारिजातत | उपस्तचाक्रायण | कौण्डिनी |
| अपादउत्तरपारा- | [२६] कृष्टिषेण | [३३] कौलकावती |
| शर्य | एकयावनगण्डम | [३४] गर्ग |
| अपादकौशिन् | एतश | [३५] गर्दभी-विपीत |
| अपादिसौश्रोम- | कपि | [३६] गाथिन् |
| तेय | कपिल | गाण्डम |
| अष्टक | कपिवनभौवायन | [३७] गार्गीवाचक्नवी |
| अहीनाआश्वत्थ्य | कबंधआथर्वण | [३८] गोयलवार्ण |
| आश्रुलि | कश्यपनैध्रुवि | गोश्रुजाबाल |
| आकाशाश्य | [२७] कहोड कौषी- | [३९] गौश्र |
| आगस्त्य | तकी | [४०] गौश्ल |
| आभिप्रतारिन् | कहोल कौषीतकेय | [४१] चक्र |
| आरुणऔपवेशि | काटविद्धि | चैत्र |

| | | |
|---|---|---|
| [४२] जन्हु | भार्म्यश्व | शायस्थि |
| जयंत | मंगल | [७९] शिशुमार |
| [४३] जातशाकायन | [६४] मधुच्छंदस् | [८०] शुनःपुच्छ |
| [४४] जान्हव | [६५] मंदार | शुनोलांगूल |
| [४५] जाबलजैवलकी | [६६] महर्त्विज | शुष्कभृंगार |
| [४६] जैमिनी | [६७] महर्षि | शूरवीर मांडुक्य |
| तक्षन् | [६८] माध्यम | [८१] शूपवार्णेय |
| [४७] तपोमित्र | माण्टी | [८२] संगप्रयोगि |
| [४८] ताण्ड | [६९] मुण्डिभऔ- | [८३] सत्ययज्ञ |
| ताडविंद किंवा | दन्य | [८४] सत्यवचस् |
| ताडविंदय | [७०] मैत्रायणीय | राथीतर |
| [४९] तारुक्ष | ब्राम्हण | [८५] सनत्कुमार |
| [५०] त्रिशंकु | रजन कोणेय किंवा | [८६] सर्पिर्वात्सि |
| [५१] दाशर्म | कौणेय | सातिऔष्ट्राक्षि |
| देवल | रथीतर | सात्यकीर्त |
| [५२] नचिकेतस् | [७१] रहस्युदेव मलि | सात्ययज्ञ |
| [५३] नाक | म्लुच् | [८७] सामश्रवस् |
| नितानमारुत | [७२] राममार्गवेय | [८८] सामुद्रि |
| [५४] नैमिषि | रायोवाज | [८९] सुश्रोशिन् |
| [५५] पंचालचंड | वस्तुपश्य | भारद्वाज |
| [५६] पर्वत | [७३] वातवंत | सुचितशैलन |
| [५७] प्लक्षदय्यांपाति | [७४] वालखिल्य | सुदक्षिणक्षैमि |
| पार्ष्णशैलन | [७५] विदग्धशाकल्य | [९०] सुदेव काश्यप |
| [५८] पिप्पलाद | विपूजनशौराकि | [९१] सुधन्वन् आंगि- |
| पुनर्दत्त | किंवा सौराकि | रस |
| पुराण | विप्रचिन्ति किंवा | [९२] सनाश्रव |
| [५९] प्रागह्वि | विप्रजिन्ति | सुनीथ-कापटव |
| प्रातरह्नकोह्ळ | [७६] वैयास्क | [९३] सोमदक्षकौश्रेय |
| [६०] बकदाल्भ्य | व्यष्टि | [९४] सौदंती |
| [६१] बाभ्रव | व्याघ्रप | स्थिरकगार्ग्य |
| बृहद्वसु | शकुनि-मित्र | हालिंगव |
| बोध | [७७] शंसकौष्य | [९५] हिरण्यदन्बैद |
| [६२] भंगीर | [७८] शतबलाक्ष | न्हस्वमांडुकेय. |
| भंग्यश्रवस् | मौद्गल्य | |
| भवत्रातशायस्थि | शर्वदत्तगार्ग्य | |

* ऋषि.—या शब्दाची व्युत्पत्ति कठिण आहे. हा शब्द कदाचित अत्यंत पूर्वकालीन धातूपासून झाला असेल. ऋषींचें मुख्य काम म्हणजे ईशविषयक स्तोत्रें तयार करणें. ऋग्वेदांत जुने आणि नवे अशा ऋषींचा उल्लेख आला आहे (अग्निः पूर्वेभिः ऋषिभिः ऋ. १. १, २). जुन्या ऋषींची स्तोत्रें त्यांच्या कुलांतील लोक संरक्षण करीत असत व त्यांत भर घालीत असत. परंतु ऋषींचा मुख्य उद्योग म्हणजे स्तोत्रें करीत असणें हाच असे. संहितीकरणकालापर्यंत ही स्तोत्ररचना सारखी चालू होती. उदाहरणार्थ गाथा. या गाथा आचार्य स्वतःच रचून पठण करीत असत.

असें ऋग्वेद ( ९. ९६, ६ ) व शतपथ ब्राह्मण ( १०. ४, ४, ६ ) यांवरून आढळतें. ब्राह्मणामध्यें जे श्रेष्ठ असत त्यांनाच ऋषि ही पदवी दिली जात असे. व त्याचें कौशल्य देवा असें असें दर्शविल आहे ऋषा बहुतेक राजे लोक यांच्या घरीं पुरोहित या नात्यानें आश्रित म्हणून ग्हात असत. क्वचित् राजेलोकाहि स्तोत्रकर्ते असल्याचे आढळतें. पंचविंश ब्राह्मणात ( १२, १२, ६ ) स्तोत्रकर्त्या राजपुत्रांना ( ओल्डेनबर्गच्या मताप्रमाणें हा शब्द जरी काल्पनिक असला तरी ) राजन्यर्षि अथवा राजर्षि हा शब्द लावीत. स्तोत्रकर्त्यांमध्यें जरी काहीं राजे असले तरी बहुतेक सूक्तें ब्राह्मणांनीच केलेलीं आहेत. ऋषी हे पवित्रभूत अशा कालाचे प्रतिनिधि म्हणून मानिले जात व त्यांना साधु असेंहि म्हणत यांचें सप्तर्षि असें समुच्चयात्मक नाव ऋग्वेदात चार वेळ व अथर्ववेद आणि वाजसनेयि संहिता या ग्रंथातून आढळतें. या सात ऋषींचा बृहदारण्यकोपनिषदांत ( २. २, ४ ) अनुक्रमें उल्लेख असून तेथें दोन नेत्र, दोन कर्ण, दोन घ्राणेंद्रियें आणि सातवी वाणी याशीं त्याचा संबंध जोडला आहे. हे सात ऋषि म्हणजे गोतम, भरद्वाज, विश्वमित्र, कश्यप, वसिष्ठ, जगदग्नि व अत्रि हे होत. उपनिषदांतील उताऱ्यात अत्रीचा संबंध त्या शब्दाच्या व्युत्पत्तीवरून वाणीशीं जोडला आहे. ऋग्वेदात वरील सात ऋषींशिवाय आणखी पुष्कळ ऋषींचा उल्लेख आहे व त्याच्या संबंधीं माहिती याच भागातील दाशराज्ञयुद्धप्रकरणात आली आहे. अथर्ववेदातील एकाच ऋचेंत [ ४. २९, ३ ] सुमारें अठरा ऋषींचीं नावे आलीं आहेत व तीं सर्व ऋग्वेदांत आलेल्यांपैकीच आहेत. भाटचारणादिकांच्या काव्याप्रमाणें ऋषींच्या स्तोत्रात चढाओढीनें कूटस्तोत्रांची रचना होत असे. हीं कूट वाक्यें अथवा भाग [ ब्रह्मोद्य ] अश्वमेध क्रतूतील एक मुख्य अंग म्हणून गणला जात असे. अशा प्रकारच्या कूट वाक्याच्या संबंधीं चढाओढ अथवा वादविवाद उपनिषद्वाङ्मयात जास्त आढळतो. असले वाद जिंकणारे ऋषी त्याचा मोबदला म्हणून राजाकडून दक्षिणा मिळवीत असत. ऋग्वेद १०. ८२, २ यातील सप्तर्षि हा शब्द आकाशातील ताऱ्याचा वाचक आहे असें पाश्चात्य पंडिताचें मत आहे. ते याला मोठें अस्वल असें म्हणतात. याला पूर्वी सप्तऋक्ष असें म्हणत असत परंतु पुढें वारंवार सप्तऋषि असा शब्द आल्यामुळें सप्तऋक्ष याचा सप्तर्षि असा अर्थ होऊं लागला असावा असें मॅकडोनलचें म्हणणें आहे. ऋग्वेदात आलेल्या वरील उताऱ्यातील सप्तऋषि याचा मोठें अस्वल असा सायणानीं अर्थ केला नाहीं परंतु ऋ. १. २४, १० मधील ऋक्ष शब्दाचा 'ऋक्षाः सप्तर्षय.' असा अर्थ केला आहे आणि त्याला 'ऋक्षाइति ह स्मवै पुरा सप्तऋषीनाचक्षते' असा वाजसनेयि संहितेंतील आधार दिला आहे.

×मुनि.—हा शब्द ऋग्वेदात दोन ठिकाणीं आला आहे. तेथें त्याचा अर्थ ईश्वरप्रेरित व अद्भुत शक्ती असलला असा आहे पहिल्या मंत्रांत मुनि हा शब्द अनेकवचनी असून ते पिशंगवर्णाचीं व मळकट वस्त्रें वापरीत असें म्हटलें आहे. सायणमताप्रमाणें हे मुनि म्हणजे वातजूति, विप्रजूति वगैरे नावांचे ऋषि होत व ते विरक्त असून वल्कलें परिधान करीत असत. पर जें मुनींचें वर्णन दिलें आहे तें ऐतरेय ब्राह्मणात ऐतशप्रलाप नामक मंत्रकांड पठण करणाऱ्या ऐतश नामक मुनीशीं सदृश आहे तेथें हें मंत्रकांड पठण करीत असलेल्या आपल्या पित्यास भ्रम झाला आहे असें समजून त्याच्या मुलानें विसंगत अशा प्रकारचें तें मंत्रकांडपठण बंद केले. परंतु हें त्याचें करणें बरोबर नव्हतें. कारण ऐतश भ्रमिष्ट होऊन काहीं तरी प्रलाप काढीत होता असें नसून तें मंत्रकांडच तसें होतें. वर ऋग्वेदातील मुनि व ऐतशमुनि यांचें मॅकडोनेलनें दाखविलेलें साम्य सायणसंमत नाहीं ऋग्वेदात एका मंत्रात इंद्राला 'मुनींचा सखा' असें म्हटलें आहे. अथर्ववेदात ( ८ ६, १७ ) मुनि शब्द सामासिक शब्दात आला असून त्याचा वरीलप्रमाणेंच सायणानीं अर्थ दिला आहे. उपनिषद्ग्रंथात मुनि हे अधिक निग्रही असत असें दाखविलें आहे. जो अभ्यासानें, यज्ञानें तपानें, श्रद्धेनें अथवा व्रतनियमाच्या योगानें पूर्णब्रह्माचें स्वरूप ओळखण्यास शिकतो अथवा ओळखतो त्याला मुनि असें म्हणत. वेदांतील मुनि व उपनिषदांतील मुनि याच्यात फारसा भेद आहे असें म्हणता येणार नाहीं. दोहींमध्यें मुनि हे ब्रह्मानंदात निमग्न असत असेच वर्णिलें आहे. तरी पण वेदांतील मुनींपेक्षा उपनिषदांतील मुनींच्या ऐहिक आकांक्षा अगदींच कमी असत असें दिसतें. वेदवाङ्मयातील मुनींचा अध्यात्मज्ञानाकडे विशेष ओढा नसून ते वैद्यकी करीत असत. वेदग्रंथात मुनींचा विशेषसा उल्लेख नाहीं. म्हणून त्या काळीं मुनि कमी असत असें म्हणता येत नाहीं. श्रौत धर्माचरण करणाऱ्या कर्मठ लोकानीं या मुनींना फारसा मान दिलेला नाहीं. मुनींच्या व कर्मठाच्या ध्येयात फरक होता. केवल संतति अथवा संपत्ति मिळविणें या कर्मठाच्या ध्येयापेक्षा मुनींचें ध्येय श्रेष्ठ प्रकारचे होतें.

[1] अरुण औपवेशि गौतम.— हें एका आध्यापकाचें नाव आहे. तैत्तिरीय संहिता व ब्राम्हण ग्रंथ यात याचा वारंवार उल्लेख आला आहे. प्रसिद्ध उद्दालक आरुणि हा याचा मुलगा होय. हा उपवेशि गौतम याचा शिष्य व राजपुत्र अश्वपतीच्या गुरुचा समकालीन असल्याबद्दल शतपथ ब्राह्मणात (१० ६, १, २) उल्लेख आहे.

[2] आद्णार — पर याचा वंशज. यानें अग्निचयन केल्यामुळें याला संतति प्राप्त झाल्याबद्दल तैत्तिरीय संहितेंत उल्लेख आहे.

[3] कुसुरुबिन्द औद्दालकि.— यानें आपणास पशूंचा लाभ व्हावा म्हणून एक यज्ञ केल्याबद्दलचा तैत्तिरीय संहितेंत उल्लेख आहे. याचा आणखी उल्लेख जैमिनीय ( १.

७, ५ ) व पंचविंशब्राह्मणांत ( २१. १५ १० ) आला आहे.

[4] केशिन्-सात्यकामि.— यानें केशिन् दार्भ्य याला शत्रूंचा नाश होण्यासाठीं आपल्या यज्ञांत एका विशिष्ट मंत्राची भर घालण्यास सांगितल्याबद्दल तैत्तिरीय संहितेंत ( २. ६, २, ३ ) उल्लेख आहे.

[5] कौसुरुबिंदि-प्रोति कौशांबेय.— हा उद्दालकाचा शिष्य व समकालीन असल्याबद्दल शतपथ ब्राह्मणांत ( १२. २, २, १ ) उल्लेख असून तैत्तिरीय संहितेंत याला औद्दालकि म्हटलें आहे या गोष्टीवरून अशा पितृवंशिक नांवांना फार थोडे महत्त्व दिलें पाहिजे हें उघड दिसतें. शिवाय अमुक मनुष्य अमुकाचा समकालीन होता या गोष्टीला सुद्धां विशेष महत्त्व देऊन चालावयाचें नाहीं. [ असें मॅकडोनेल म्हणतो. ]

[6] क्रतुजित्जानकि.— डोळे अधू असलेल्या रजन कौणेय याची दृष्टी साफ होण्याकरितां क्रतुजित्जानकि यानें रजनकौणेय याजकडून एक त्रिहविष्का नामक इष्टि करविल्याबद्दल तैत्तिरीय संहितेंत ( २, ३, ८, १, ) उल्लेख आहे.

[7] चैत्रियायण.— हा यज्ञसेनाचा वंशज असून यानें छंदोभिद् नामक इष्टकाच्या चितीच्या साधनानें पशूंची प्राप्ति करून घेतल्याबद्दल तैत्तिरीय संहितेंत (५. ३, ८, १ ) उल्लेख आहे.

[8] जानकि.— जनकाचा वंशज. हें तैत्तिरीय संहितेंत क्रतुजिताचें, ऐतरेय ब्राह्मणांत क्रतुविदाचें आणि बृहदारण्यकोपनिषदांत अयस्थूणाचें पितृप्राप्त नांव आहे. बृहदारण्यकोपनिषदांत याला चूलभागवित्तीचा शिष्य व सत्यकाम जाबालाचा गुरु असें म्हटलें आहे. वरील सर्व स्थलीं उल्लेखिलेला जानकि एकच किंवा अनेक व्यक्ती याबद्दल खात्री नाहीं.

[9] जामदग्निय.— तैत्तिरीय संहितेंत जमदग्नीच्या दोन वंशजांचें म्हणून हें नाव आलें आहे. जमदग्नीनें चतूरात्र नामक एक यज्ञ केल्यामुळें पुढें त्याच्या पिढींत दरिद्री निपजला नाहीं व एखादा प्रमादानें दरिद्री झालाच तर लगेच दुसऱ्याच पिढींत त्याचें दारिद्र्य नष्ट होत असे असा तेथें (तै. सं. ७.१, ९, १ ) उल्लेख आहे.

[10] पुलस्तिन्.— हा शब्द तैत्तिरीय संहितेंत आला असून याचा अर्थ मोकळे केस ठेवणारा असा होतो व तो कपर्दिन् म्हणजे डोक्यावरील केसांच्या जटा बांधणें याच्या उलट आहे. वरील अर्थ सायणसंमत नाहीं.

[11] प्रयोग.— तैत्तिरीय संहितेंत एका सूक्तकर्त्या ऋषीचें नांव म्हणून याचा उल्लेख आहे. ऋग्वेदाच्या सर्वानुक्रमणिकेप्रमाणें हा तैत्तिरीयांत उल्लेखिलेल्या ऋचेचा ( ऋ. ८. १०० ) द्रष्टा आहे.

[12] वैबाविमायसमौ.— या समासघटित अशा नांवाच्या ऋषींचा तैत्तिरीय संहितेंत उल्लेख आहे. यांनी एका विशिष्ट देवतेला सोमरस अर्पण करण्याचा नवा संप्रदाय सुरू केला.

[13] शण्ड.— हा शब्द मर्क या शब्दाशीं जोडलेला आढळतो. यजुर्वेद संहितेंत यांचा उल्लेख असून शण्ड व मर्क हे दोघे असुरांचे पुरोहित होते असें म्हटलें आहे.

[14] शौचेय सार्वसेनि.— तैत्तिरीय संहितेंत हें एक पैतृक नांव आहे. सायणमतानें शुचा ही स्त्री असून शौचेय हें मातृक नांव आहे. यानें पंचरात्र नांवाचा एक यज्ञ करून पशूंची प्राप्ति करून घेतली.

[15] श्रायस.— याचा उल्लेख तैत्तिरीय संहितेंत दोन ठिकाणीं आला आहे. एका ठिकाणीं ( ५ ४, ७, ५ ) हें कण्वाचें पैतृक नाव आहे असें म्हटलें आहे व दुसऱ्या ठिकाणीं ( ५ ६, ५, ३) हें वीतहव्याचें पैतृक नाव असें म्हटलें आहे. वरील दोन ठिकाणीं उल्लेखिलेला श्रायस हा एकच असेल असें म्हणता येत नाहीं. कारण त्याचा दोन्ही ठिकाणीं निरनिराळ्या प्रकारानें व निरनिराळ्या निमित्तानें उल्लेख आहे.

[16] संश्रवस्-सौवर्चनस.— तैत्तिरीय संहितेंत याचा उल्लेख आहे. सत्रांतील होत्यास करावयाच्या इडोपाह्वानासंबंधीं तुमिंज नामक एका ऋषीशीं याचा संवाद झाल्याबद्दल उल्लेख आहे.

[17] सनातन.— चितिसंबंधानें इष्टकांचें उपधानप्रसंगीं पूर्वादि दिशांची स्तुति करतांना पूर्वादि दिशांच्या ठिकाणीं अनुक्रमें सानग, सनातन, अहभून, प्रत्न आणि सुपर्ण या ऋषींचा उल्लेख आला आहे. बृहदारण्यकोपनिषदांत सनग व सनारु यांचा गुरुशिष्यसंबंध आला आहे [बृ. उ. २५,२२].

[18] सात्यहव्य.— याचा तैत्तिरीय संहितेंत यज्ञयाजक ऋषयांनी सभिष्टयजु नामक मंत्र कोणत्या प्रकारें पठण करावा या विषयीं देवभाग नामक ऋषीला प्रश्न केल्याबद्दल उल्लेख आला आहे. ऐतरेय ब्राह्मणांतहि याचा उल्लेख आहे. याला वासिष्ठ असें म्हटलें आहे.

[19] हविष्कृत् हविष्मत्.— आंगिरस नामक कांहीं ऋषींनी यज्ञानुष्ठानाच्या योगानें स्वर्गप्राप्ति करून घेतली. परंतु त्यांच्यापैकीं हविष्कृत् व हविष्मत् नांवाचे दोघे स्वर्गांतून च्युत झाले. तथापि स्वर्गप्राप्तीसंबंधीं त्यांची अत्यंत उत्कट इच्छा असल्यामुळें द्विरात्र नावाचा यज्ञ करून त्यांनी स्वर्ग मिळविला.

[20] अगस्ति.— ऋग्वेदांत येणाऱ्या अगस्त्य या शब्दाचेंच हें दुसरें रूप असावें. याचा अथर्ववेदांत उल्लेख आला आहे. ऋग्वेदांत याला मित्रावरुणांचा मुलगा म्हटलें असून अथर्ववेदांत याला मित्रावरुणांचा अत्यंत आवडता असें म्हटलें आहे. मरुतांना उद्देशून उपाकरण केलेला यज्ञीय पशु ज्या वेळीं इंद्रानें पकडिला तेव्हां मरुत् हे वज्र घेऊन इंद्राला मारण्यासाठीं उद्युक्त झाले असतां अगस्त्यानें त्यांचें सांत्वन करून इंद्राचें व मरुतांचें सख्य घडवून आणिलें अशी ही कथा

तै. ब्र. (३.५.५,२), तै. ब्राह्मण (२.७,११,१) मै. संहिता (२ १,८), काठक संहिता (१०.११), पंचविंश ब्राह्मण (२१ १४,५), ऐ. ब्रा (५.१६) या ग्रंथांतून आली आहे तिचें मूळ ऋग्वेद १.१६५;१७०;१७१ या सूक्तांतून आहे. ओल्डेनबर्ग, सीग, हर्टेल, व व्हानश्राडर यांचें अगस्त्याच्या वरील कथेसंबंधी एकमत नाहीं. ऋग्वेदांत (१. १७९) लोपामुद्रेबरोबर याचें जें संभोगविषयक संभाषण झालें आहे त्यांत हा ज्ञानी असूनहि तिच्या प्रलोभनेस वश झाला असें म्हटलें आहे. व्हानश्रोडर याच असें मत आहे कीं, हें वृष्टयुद्भवविषयक रूपक असावें. सायणमतानें अगस्त्य हा खेल नामक राजाचा पुरोहित होता, परंतु पिशेल म्हणतो कीं, खेल हीं विवस्वत् देवता होय. [illegible] दश यांपैकीं सीगचें मत सायणप्रमाणेंच आहे तो कीं हाचा भाऊ असून दुसऱ्यांना वसिष्ठाची ओळख करून देतो असें अनुमान ऋग्वद ७.३६,१०;१२ या ऋचावरून निघतें असें गेल्डनेर म्हणतो.

[११]असित—याचा अथर्ववेदांत गय आणि जमदग्नि यांच्यासह घटस्फोटप्रकरणांत उल्लेख आला आहे. शतपथांत याला असितधान्व असें म्हटलें असून शांखायन श्रौतसूत्रांत अश्वमेध प्रकरणांत अनुक्रमें दहा दिवस चालावयाच्या पारिप्लवाख्यानांतील सातव्या दिवशीच्या पारिप्लवाख्यानांत असितधान्वन हा राजा व असुरविद्या हा त्याचा वद असा उल्लेख आहे. पंचविंश ब्राह्मण व काठक संहिता यामध्यें याला असित देवल म्हटलें आहे.

[१२]नारद—अथर्ववेदांत ब्राह्मणानें वशा धेनूचें मांस भक्षण करावें कीं, नाहीं या संबंधींच्या सल्ल्यांत याचा उल्लेख आला आहे ऐतरेय ब्राह्मणांत पुरुषमेधयज्ञार्थ हरिश्चंद्राला यानेंच सल्ला दिली आणि नारद व पर्वत यांनीं आंबाष्ठ्य व युधांश्रौष्टि यांना महाभिषेक केल्याचा उल्लेख आहे.

[१३]प्रतिबोध—अथर्ववेदांत बोध याच्या बरोबर या ऋषींचा उल्लेख आला आहे.

[१४]बृहस्पामन्—अथर्ववेदांत आंगिरस म्हणून याचा उल्लेख आला आहे तेथें त्याला क्षत्रियांनीं अतिशय त्रास दिला व शेवटीं क्षत्रियांचा नाश झाला असा उल्लेख आलेला आहे

[१५]मात्स्य—अथर्ववेदांत याचा उल्लेख आला आहे तैत्तिरीय ब्राह्मणांत (१ ५.२,१) उल्लेखिलेला मात्स्य व हा एकच असावा असें वाटतें. तैत्तिरीय ब्राह्मणांत या मात्स्यानें कोणतेंहि यज्ञकर्म पुण्यकारक अशा वेळीं सुरू करण्याचा सांप्रदाय सत्यश्रम यांच्याकडून अमलांत आणिला.

[१६]ऋष्टिषेण—याचा निरुक्तांत उल्लेख आहे. पण तेथें जास्त माहिती नाहीं. कदाचित ऋग्वेदांतील आर्ष्टिषेणाचा हा बाप असावा.

[१७]कहोड कौषीतकि—याचा उल्लेख शतपथ ब्राह्मणांत म्हटलें आहे तें हें कीं, नवीं धान्यें हीं वृष्टीपासून उत्पन्न होणारीं असल्यामुळें तीं प्रथम देवतांना अर्पण (आग्रयण नामक नवान्नाचा याग) करून भक्षण करावीं ही चाल यानें सुरू केल्याबद्दल उल्लेख आहे. आश्वलायन गृह्यसूत्रांतील ब्रह्मयज्ञांग तर्पणांत याचा उल्लेख आहे.

[१८]कात्यायनी—बृहदारण्यकोपनिषदांत याज्ञवल्क्याच्या दोन स्त्रियांपैकीं एक म्हणून हिचा उल्लेख आहे. याज्ञवल्क्याचा संसारत्यागाचा विचार ठरल्यावर प्रपंचविषयक वरतेची मैत्रेयी आणि कात्यायनी यांना सारखी वाटणी करण्याबद्दल याज्ञवल्क्यानें सांगितलें परंतु मैत्रेयी अध्यात्मज्ञानांत पारंगत असल्याचें आढळून आल्यामुळें प्रापंचिक व्यवसाय कात्यायनीकडेच राहिला.

[१९]कानान्ध.—हा वध्र्यश्वाचा मुलगा असल्याबद्दल बौधायन श्रौतसूत्रांत [२१. १०] उल्लेख आहे.

[२०]कुण्डपायिन्—पंचविंशब्राह्मण आणि आश्वलायन श्रौतसूत्र या (१२. ४) ग्रंथांत याचा उल्लेख आहे. सूत्रग्रंथांत याच्या नावाचें एक सत्र असल्याचा उल्लेख आहे.

[२१]कृष्णहारित.—ऐतरेय आरण्यकांत (३.२,६) याचा उल्लेख आहे व तो यानें एक आपल्या शिष्याला वाग्देवतेसंबंधीं उपासनेचा प्रकार सांगितल्याबद्दल आहे. शांखायन आरण्यकांत कृत्स्न हारित असा पाठ आहे.

[२२]कौरव्य.—यानें अक्षरोपासना अथवा अक्षरासंबंधीं माहिती अमलांत आणल्याबद्दल ऐतरेय आरण्यकांत (३.२,२)उल्लेख आहे.

[२३]कौलकावती.—या नावाच्या दोघा ऋषींनीं रथप्रोत दार्भ्य याच्याकडून एक विशिष्ट याग केल्याबद्दल मैत्रायणी संहितेंत (२.१,३) उल्लेख आहे.

[२४]गर्ग—याचा उल्लेख जरी कोणत्याहि संहिताग्रंथांत नाहीं तरी काठक संहितेंत (१३.१२) गर्गांच्या वंशजाचा उल्लेख आला आहे. पुढें सूत्रग्रंथांत याच्या नावावर एका यज्ञाचा (गर्गत्रिरात्र) उल्लेख आहे.

[२५]गर्दभीविपीत अथवा विभीत.—बृहदारण्यकोपनिषदांत (४.१,५) जनक व याज्ञवल्क्य याच्या तात्त्विक संवादांत याचा उल्लेख आला आहे. तेथें श्रोत्र हेच ब्रह्म असल्याबद्दल यानें मला उपदेशिलें असें जनक म्हणतो.

[२६]गाथिन्—हे विश्वामित्राच्या बापाचें आणि कुशिकाच्या मुलाचें नांव सर्वानुक्रमणींत आढळतें. ही परंपरा बरोबर आहे कीं काय हें सांगणें कठिण आहे. ऐतरेय ब्राह्मणांत गाथींच्या 'दैव वेदा' चा उल्लेख केला आहे. विश्वामित्रानें शुनःशेपाला दत्तक घेतल्यानें शुनःशेपास त्या गाथींच्या 'दैववेदात" भाग घेतां आला एवढ्याच उल्लेखानें वरील वंशानुक्रमास जो काहीं आधार मिळतो तोच.

[२७]गार्गी वाचक्नवी—बृहदारण्यकोपनिषदांत (३.८,१) याज्ञवल्क्याशीं वाद चालू असतां गार्गीनेंहि याज्ञवल्क्याला दोन प्रश्न केले होते असा उल्लेख आहे.

**गोपलचार्ण.**—तैत्तिरीय ब्राह्मणात (३.११,९,३) यानें नचिकेताग्निचयनानें इष्टका[ चिटा ]पूर्वादि पाच दिशांचे ठिकाणीं प्रत्येक पाच पांच इष्टका मांडल्या. त्यामुळें त्याला पशूंची प्राप्ति झाली असा उल्लेख आहे.

**गौश्र.**—शुश्राचा वंशज. याला मधुक नावाच्या एका ऋषीनें सोमवल्लीची देवता कोण असा प्रश्न विचारल्याबद्दल कौषीतकी ब्राह्मणांत (१६.९) उल्लेख आहे.

**गौश्ल.**—याचा उल्लेख ऐतरेय ब्राह्मणांत (१६.३०) आहे. तेथें यज्ञामध्यें शस्त्रें पठण करण्याचा बुलिल आश्वतर याचा संप्रदाय यानें चुकीचा ठरवून आपल्या संप्रदायाप्रमाणें त्यानां शस्त्रें पठण करावयास लाविलें.

**चक.**—पंचविंश ब्राह्मणांतील (२५.१५,२) सर्पसत्रांमध्यें उन्नेतृत्व नामक आर्त्विज्य करणारा हा एक ऋत्विज होता. याच्याबरोबर पिशंगाचा उल्लेख आला आहे.

**जन्हु.**—शुनःशेपाच्या आख्यायिकेंत हा शब्द अनेकवचनी आलेला आहे. ह्या शुनःशेपानें देवरात ह्या नात्यानें जन्हूंचें आधिपत्य व गाथींचा दैववेद ही दोन्ही संपादन केलीं. जन्हूंचा वंशज जान्हव हा पंचविंश ब्राह्मणात आलेल्या उल्लेखावरून विश्वामित्र ठरतो. त्यानें चतुरात्र व्रत करून जन्हु लोकांना, ते वृचीवंताशीं झगडत असतांना राज्य मिळवून दिलें अशी कथा आहे, व त्याचें राजा म्हणून वर्णन आलें आहे. शिवाय ऐतरेय ब्राह्मणात विश्वामित्राला राजपुत्र व भरतर्षभ अशा संज्ञा आहेत तेव्हां ही गोष्ट स्पष्टच आहे कीं, संहिताच्या मतानें नसलें तरी ब्राह्मण ग्रंथाप्रमाणें जरी अलीकडील ग्रंथातील 'तो राजपुत्र होता त्यानें ब्राम्हण्य मिळविलें' ह्या आख्यायिकेचा त्या ग्रंथात मागमूस नाहीं, तथापि विश्वामित्र हा एका काळींच पुरोहित व राजवंशीय होता. जन्हावी हा शब्द ऋग्वेदात दोनदा आलेला आहे व त्याचा अर्थ जन्हूची बायको, किंवा सायणाचार्य म्हणतात त्याप्रमाणें, जन्हूचा वंश, असा असावा. हें घराणें एके काळीं मोठें असावें व पुढें भरतवंशात अंतर्भूत झालें असावें.

**जानश्रायन.**—याचा काटक संहितेंत (२२.७) कर्मांतील एका विशिष्ट संप्रदायाचा प्रवर्तक म्हणून उल्लेख आहे. हा दाल्भ्याच्या समकालीं होता.

**जान्हव.**—याचा अर्थ जन्हूचा वंशज. पंचविंश ब्राह्मणांत हें विश्वामित्राचें पैतृक नांव म्हणून आलें आहे. ही गोष्ट मुद्दाम लक्षांत ठेवण्यासारखी आहे, कारण तीवरून ऑल्डेनबर्गचा, शुनःशेपाचा पिता अजीगर्त ह्याच्याच गोत्रापैकीं जन्हु हे होत हा सिद्धांत बाधित होतो.

**जीवलचैलकि**—शतपथ ब्राह्मणात [२.३.५,२१-३५) याचा उल्लेख असून अग्निहोत्रहोमासंबंधीं माहिती यानें तक्षाला सांगितली असें म्हटलें आहे.

**जैमिनि.**—याचा उल्लेख आश्वलायन सूत्रापर्यंत नाहीं. [३.४] तेथें मंत्रब्रह्मयज्ञांत जें पितृतर्पण आहे त्यांत याचा उल्लेख आहे. सामवेदाचा जैमिनीय संहिता म्हणून एक भाग आहे व तो कॅलॅंडनें छापून त्यावर बरीच चर्चा केली आहे. शिवाय सामवेदाचें एक जैमिनीय उपनिषद् ब्राह्मण आहे.यावर ओअरटलनें अनेक निबंध लिहिले आहेत.

**तपोनित्य.**—पुरुशिष्टाचा वंशज. याचा उल्लेख तैत्तिरीय उपनिषदात (१.९,१) आला आहे. तपानुष्ठानाबद्दल याचा विशेष आग्रह असल्याचें तेथ म्हटलें आहे.

**ताण्ड.**—सामगानासंबंधी गायत्री छंदाचा अष्टाक्षरी प्रस्ताव असावा असें ताड याचें मत असल्याचा लाट्यायन श्रौतसूत्रात (७.१०,१७) उल्लेख आहे. तेथें याला पुराणताण्ड असें म्हटलें आहे ताण्डय या नावाचें सामवेदावरील एक ब्राह्मण आहे. त्याचा प्रवर्तक हा ताण्डच होय.

**तारक्ष्य,तार्क्ष्य.**—ऐतरेय आरण्यक (३.१,६) आणि शांखायन अरण्यकात [७.१९] याचा उल्लेख आहे. यानें एक विशिष्ट ज्ञान संपादन करण्यासाठीं एक वर्षभर गुरुगृहीं वसती करून गुरूची गाय रक्षिल्याचा आरण्यकात उल्लेख असून तेथें तारक्ष्य व तार्क्ष्य असे दोन पाठ आहेत. शांखायनात मात्र तार्क्ष्य असाच पाठ आहे. ऋग्वेदातील १०.१७८ या सूक्ताचा द्रष्टा तार्क्ष्य आहे तो व हा तार्क्ष्य कदाचित् एकच असावा.

**त्रिशंकु.**—तैत्तिरीय आरण्यकात याचा उल्लेख असून तेथें [१.१०,१] तो आपणास मी सर्वज्ञ, मी ब्रह्मज्ञ, मी तेजस्वी, [अध्यात्मज्ञानामुळें] असें म्हणत आहे. महाभारतांत त्रिशंकूला वसिष्ठाच्या शापामुळें विश्वामित्राचा आश्रय करावा लागला व तो पुढें नभोमंडलात नक्षत्ररूपानें अधिष्ठित झाला अशी जी कथा आहे तिचा संदर्भ वैदिक वाङ्मयात आढळत नाहीं भारतातील त्रिशंकूला राजा असें म्हटलें आहे तेव्हां त्याचा व याचा संबंध असणें असंभाव्य. शिवाय एकाच नावाच्या राजा व ऋषि अशा दोन निरनिराळ्या व्यक्ती असणें संभवनीय आहे.

**दाशर्म.**—काठक संहितेंत [७.६] याचा उल्लेख असून तो आरुणीचा समकालीन असल्याचें म्हटलें आहे.

**नचिकेतस्.**—तैत्तिरीय ब्राह्मणात एका प्रसिद्ध कथेंत याचा उल्लेख आला आहे (३.११,८). त्याचप्रमाणें कठोपनिषदातहि [१.१] उल्लेख आला आहे. तैत्तिरीय ब्राह्मणात याला गौतमकुलोत्पन्न वाजश्रवस् याचा मुलगा असें म्हटलें असून कठोपनिषदात त्याच कथेंत याला औद्दालकि आरुणि असें म्हटलें आहे.

**नाक.**—जैमिनीय उपनिषद् ब्राह्मणांत [३.१३,५] याचा उल्लेख आला आहे. तसेंच शतपथब्राह्मण [१२.५,१,१] तैत्तिरीयोपनिषद् [१.९,१]यात उल्लेखिलेला व बृहदारण्यकोपनिषदांत (६.४,४) आलेला नाक मौद्गल्य हे सर्व एकच होत. याचा ग्लाव मैत्रेयाशीं वादविवाद झाल्याबद्दल गोपथ ब्राह्मणात [१.१,३१] उल्लेख आहे.

**नैमिशि**—जैमिनीय उपनिषद् ब्राह्मणात (१०.३६,१) शितिबाहु ऐषकृत याला हे विशेषण लावलें आहे. यावरून शितिबाहु हा नैमिषारण्यांतील असावा असें दिसतें.

[५५]पैंगराज.—ऐतरेय आरण्यकात [ ३. १, ६ ] वर्णांच्या योगानेंच सर्व संहित केलें जातें या मताचा प्रवर्तक म्हणून याचा उल्लेख आहे.

[५६]पर्वत.—ऐतरेय ब्राह्मणांत अनेक वेळा नारदाबरोबर याचा उल्लेख आला आहे. अनुक्रमणीमध्यें याच्या नांवावर ऋग्वेदांतलीं अनेक सूक्तें आलेलीं आहेत.

[५७]प्लक्ष दय्यांपति.—तैत्तिरीय ब्राह्मणात [ ३.१०,९, ३ ] याला आरुणि यानें आपल्या शिष्याकडून सावित्राग्नि-संबंधीं कांहीं प्रश्न कुत्सित भावनेनें केल्याबद्दल उल्लेख आहे.

[५८]पिप्पलाद.—प्रश्नोपनिषदांत भरद्वाज, गार्ग्य व आश्वलायन इत्यादि ऋषींनीं अध्यात्मज्ञानासंबंधीं याला कांहीं प्रश्न केल्याचा उल्लेख आहे. अथर्ववेदाची पिप्पलाद या नावा-ची एक शाखा उपलब्ध आहे त्या शाखेचा प्रवर्तक कदाचित् हाच असावा. गार्बे व ब्लूमफील्ड यांनीं अथर्ववेदाच्या या पैप्पलादसंहितेचा काही भाग छापला आहे.

[५९]प्रागहि.—कौषीतकी ब्राह्मणांत(२६.४ ) याचा उल्लेख यज्ञांतील काहीं कर्म करावयाचें राहिल्यास तें अंतरित कर्म केव्हा करावें याच्याबद्दल विचार करणारा म्हणून आला आहे.

[६०]बक दाल्भ्य.—याचा उल्लेख जैमिनीय उपनिषद् ब्राह्मणात ( १. ९, २ ) आला असून त्यानें ओंकार व वाक् याच्या साहाय्यानें आजमेशीकडून इंद्राला वर्जिलें, (वगळिलें) असा उल्लेख आहे.

[६१]बाभ्रव.—ऐतरेय आरण्यकांत (३. २, २ ) अभ्यासाचे मुख्य विषय वेद, छंद, शरीर व महापुरुष हे होत असें म्हणणारा म्हणून याचा उल्लेख आहे.

[६२]भंगीर.—गाईसंबंधीं हा शब्द वैतान आणि दुसऱ्या सूत्रांत आला आहे. हा शब्द मनुष्याचा अथवा नदीचा बोधक आहे हें निश्चित समजत नाहीं. ज्या ऋचेत याचा उल्लेख आहे तेथेंच गंगा व यमुना या नद्यांचा उल्लेख आहे.

[६३]भार्म्यश्व.—निरुक्तात मुद्गलाच्या बापाचें नाव म्हणून हा शब्द आला आहे (९. २४.)

[६४]मधुच्छंदस.—ऋग्वेदाच्या पहिल्या मंडलांतील पहिल्या दहा सूक्तांचा हा प्रसिद्ध ऋषि. हा द्रष्टा होता असें ऐतरेय आरण्यकांत व कौषीतकि ब्राह्मणांत म्हटलें आहे. ऐतरेय ब्राह्मणात हा विश्वामित्राचा एकावन्नावा मुलगा म्हणून गणला गेला आहे. आणि त्याचें ' प्रउग ' (सकाळीं गावयाचें स्तोत्र )शतपथांत उल्लेखिलें आहे.

[६५]मंदीर.—याचा उल्लेख कात्यायन श्रौतसूत्रांत (१३.३, २१) असून तेथें याच्या गाई गंगेचें पाणी प्याल्या नाहींत असें म्हटलें आहे.

[६६]महर्त्विज.—हें नांव तैत्तिरीय (३. ८,२,४) व शत-पथ ब्राह्मणात (१२. १, १, ४) आणि शांखायन श्रौतसूत्रांत (१३. १–२ ) अध्वर्यु, ब्रह्मा, होता व उद्गाता या ऋत्विजांना उद्देशून आलें आहे.



[६७]महर्षि.—तैत्तिरीय आरण्यकांत (१ ९,६) हें विशेषण जमदग्नीला लावलेलें आढळतें.

[६८]माध्यम.—हें नांव कौषीतकी आरण्यक (१२.३) व ऐतरेय आरण्यक (२. २, २) यांत ऋग्वेदाच्या दुसऱ्या मंड-ळाच्या द्रष्ट्यांनीं लावल्याचें आढळतें.

[६९]मुण्डिभ औदन्य.—अश्वमेधप्रसंगीं होणाऱ्या अनेक भ्रूणहत्यादि पातकांचा नाश होण्यासाठीं अवभृथापूर्वी प्रायश्चित्ताहुति घालावयास सांगणारा म्हणून याचा उल्लेख तैत्तिरीय ब्राह्मणांत (३.९,१५.३) व शतपथ ब्राह्मणात (१३. ३, ५, ४) आला आहे.

[७०]मैत्रायणीय ब्राह्मण.—याचा उल्लेख बौधायन शुल्ब-सूत्रात आला आहे [१२.८]

[७१]रहस्यु देवमलिम्लुच.—यानें मुनिमरण नामक स्थलीं वैखानसांना मारल्याबद्दल पंचविंश ब्राह्मणांत (१४. ४, ७) उल्लेख आहे.

[७२]राम मार्गवेय.—यानें विश्वंतर नामक राजाला क्षत्रि-यांनीं यज्ञामध्यें सोमरसाच्या ऐवजीं उदुंबरफलाचा उपयोग करावा असें सांगितल्याचा ऐतरेय ब्राम्हणात (७,२७) उल्लेख आहे. तेथें याच्याबद्दल बरीच मोठी कथा आहे.

[७३]वातवत.—पंचविंश ब्राम्हणात हें एका ऋषीचें नांव आलें आहे (२५.३,६) यानें व दृति नामक ऋषीनें एक सत्र आरंभिलें परंतु वातवतानें तें सत्र मध्येंच मोडल्यामुळें त्याच्या संततीला पुढें अत्यंत निकृष्ट दशा प्राप्त झाली

[७४]वालखिल्य.—ऋग्वेदांतील आठव्या मंडलांपैकीं काहीं( ४९. ते ५९) सूक्तांना ही संज्ञा आहे. ऋग्वेदांत हीं सूक्तें प्रक्षिप्त मानिलीं आहेत. या सूक्तांचे द्रष्टे वालखिल्य नसून दुसरेच ऋषी सर्वानुक्रमणीकारांनीं दिले आहेत. तैत्तिरीय आरण्यकांत ( १. २३, ३ ) प्रजा उत्पन्न कर-ण्याच्या इच्छेनें तप करणाऱ्या प्रजापतीच्या केशापासून हे वालखिल्य नामक ऋषि उत्पन्न झाले असें म्हटलें आहे.

[७५]विदग्ध शाकल्य.—बृहदारण्यकोपनिषद् ( ३. ९, १ ) व शतपथ ब्राह्मणात ( ११. ६, ३, ३ ) विदेह जनक याच्या दरबारीं याज्ञवल्क्याशीं वादविवाद करणारा म्हणून याचा उल्लेख आहे.

[७६]वैयास्क.—ऋग्वेद आणि ब्राह्मणें यांमध्यें ऋग्वेदांतील वृत्तावर प्रमाणभूत म्हणून याचा उल्लेख आला आहे. रॉथच्या मतें हा व निरुक्तकार यास्क हे एकच होत.

[७७]शबलीध्य.—काठक संहितेत ( २२. ७ ) ज्याच्या-वर आत्रेयायन यानें टीका केली त्याचें हें नांव.

[७८]शतबलाक्ष मौद्गल्य.—निरुक्तात ( ११. ६ ) याचा उल्लेख आला आहे व त्यावरून हा कोणी व्याकरण-कार असावा असें दिसतें.

[७९]शिशुमार.—याचा उल्लेख पंचविंश ब्राह्मणात ( १४. ५ १५ ) आहे तेथें त्याचें दुसरें नाव शर्कर असें आहे.

[८०]शुनःपुच्छ.—ऐतरेय ब्राह्मणात ( ७ १५ ) शुनः-

शेपाचा भाऊ म्हणून याचा उल्लेख आला आहे. शुनःशेपाचा शुनोलांगूल नामक आणखी एक भाऊ असल्याचा उल्लेख आहे.

[१] शूपचार्गीय.—तैत्तिरीय ब्राह्मणांत ( ३. १०, ९, १५ ) याला आदित्यानें साविन्नाग्निसंबंधीं उपदेश केल्याबद्दलचा उल्लेख आहे.

[२] संगप्रयोगि.—याचा उल्लेख मैत्रायणी संहितेंत ( ३. १, ९) आला आहे. याच नांवाच्या ( आसंग प्लायोगि ) एका राजाचा ऋग्वेदांत उल्लेख आहे. त्याचा व याचा कांहीं संबंध कदाचित् असावा.

[३] सत्ययज्ञ.—शतपथ ब्राह्मणांत ( ३. १, १, ४ ) यज्ञभूमीसंबंधीं याज्ञवल्क्याशीं झालेल्या संवादांत याचा उल्लेख आला आहे.

[४] सत्यवचस् राथीतर.—तैत्तिरीय उपनिषदांत सत्याची महती वर्णन करणाऱ्या एका ऋषीचें हें नांव आहे.

[५] सनत्कुमार.—छांदोग्य उपनिषदांत ( ७. १, १, २६; २ ) याचा उल्लेख आला आहे. येथें यानें नारदास उपदेश केल्याचा उल्लेख आहे.

[६] सर्पि वात्सि.—यानें शिरपनामक वालखिल्यशखाच्या शंसनानें आपला यजमान सौवल याला पशूंची प्राप्ति करून दिली. याला वत्सपुत्र [ वात्सि ] म्हटलें आहे. याचा उल्लेख ऐ. ब्राह्मणांत ( ६ २४ ) आहे.

[७] सामश्रवस्.—सामाकरितां प्रसिद्ध. हें नांव बृहदारण्यकोपनिषदांत ( ३. १,२ ) आलें आहे. मॅक्समुल्लरच्या मतें हें याज्ञवल्क्याचें विशेषण आहे परंतु बोथलिंक म्हणतो हा निराळाच मनुष्य असावा. भाष्यकारांचें व मॅक्समुल्लरचें या बाबतींत मतैक्य आहे. कुषीतक याचेंहि हें पितृप्राप्त नांव असल्याचा पंचविंश ब्राह्मणांत ( १७. ४, ३ ) उल्लेख आहे. हा व्रात्यांचा मुख्य स्थपति होता. यानें कांहीं अविधियुक्त कर्मे केल्यामुळें यथार्थ कर्म जाणणाऱ्या लुशाकपीनें याला शाप दिला व तेव्हांपासून याच्या आश्रयास कोणी येईनासें झालें.

[८] सामुद्रि.—शतपथ ब्राह्मणांत ( १२. २, २, १४ ) अश्व नामक ऋषीचें दुसरें नांव म्हणून या नांवाचा उल्लेख आहे.

[९] सुकेशिन् भारद्वाज.—याचा उल्लेख ज्ञानप्राप्तीसाठीं पिप्पलाद ऋषीकडे जाणाऱ्या ऋषींत ( प्रश्नोपनिषद् १.१ ) आहे.

[१०] सुदेव काश्यप.—याचा उल्लेख तैत्तिरीय आरण्यकांत ( २. १८ ) ब्रह्मचारी याच्या हातून कांहीं व्रतभंग झाल्यास त्याबद्दल प्रायश्चित्त सांगणारा म्हणून आला आहे.

[११] सुधन्वन् आंगिरस.— बृहदारण्यकोपनिषदांत ( ३. ३. १. ) मद्र देशांत राहणाऱ्या कपि गोत्रोत्पन्न पतंचलाच्या कन्येच्या अंगांत येत असे असें लह्यपुत्र भुज्यु व याज्ञवल्क्य यांच्या संवादांत उल्लेखिलें आहे. अशा प्रकारच्या अंगांत येण्याबद्दलचा उल्लेख ऐ.ब्रा. यांत आला आहे. तेथें ज्याच्या अंगांत संचार होतो त्याला गंधर्वगृहीत असें म्हटलें आहे. यावरून अंगांत येणें ही कल्पना प्राचीन आहे असें दिसतें.

[१२] सनाघ.— काठक संहितेंत [ २०. १ ] एका अध्यापकाचें म्हणून हें नांव आलें आहे. कपिष्ठल संहितेंत [ ३१.२ ]सहनाश्विव असा पाठ आहे. परंतु दोन्ही शब्दांचीं रूपें चांगलीं नाहींत.

[१३] सोमदक्ष कौश्रेय.— काठक ( ११. ९) व मैत्रायणी ( ३. २, ७ ) संहितेंत एका अध्यापकाचें म्हणून हें नांव आलें आहे मैत्रायणी संहितेंत यानें साहदेव्य.. उप-धान स्थापणांस सांगितल्याचा उल्लेख आहे.

[१४] सोदंति.— याचा उल्लेख पंचविंश ब्राह्मणांत [ १४. ५, १३ ] आहे. हे लोक विश्वामित्रसमकालीन होते. विश्वामित्रानें याच्यावरोबर एक शर्यत जिंकल्याचा उल्लेख आहे.

[१५] हिरण्यदन् बैद.—विदाचा मुलगा. याचा उल्लेख ऐतरेय ब्राह्मण [ ३. ६, ३ ] व ऐतरेय आरण्यक ( २. १, ३ ) यांत आहे. यानें वपट्काराचें वर्णन केल्याबद्दल ऐतरेय ब्राह्मणांत व प्राण हा वाक अग्न्यादि रूप असल्याबद्दल आरण्यकांत उल्लेख आहे.

### यज्ञांतील ऋत्विज[संहितेतर]

| | | |
|---|---|---|
| [१] अच्युत | [१९] कावषेय | [३६] देवभाग |
| [२] अजिर | [२०] किरात | श्रौतर्ष |
| [३] अग्निशिख | किलात | [३७] दारेश्रवस् |
| [४] अयस्थूण | [२२] कुषीतक | [३८] दारेश्रुत |
| [५] अरिमेजय | सामश्रवस् | [३९] नगरिन् जान- |
| [६] अरुणआट | [२३] कुपंड | श्रुतेय |
| [७] अर्बुद | [२४] कौकूस्त | [४०] पिशंग |
| [८] अंपल | [२५] कौतस्त | [४१] पृथुश्रवस् |
| [९] अश्वल | [२६] कुंच आंगिरस | [४२] प्राचीनशाल |
| [१०] असितमृग | [२७] ग्लावमैत्रेय | (औपमन्यव ) |
| [११] आयागव | [२८] जनमेजय | [४३] भूतवीर |
| [१२] उदमयआत्रेय | [२९] जर्यभ | [४४] बिभिंदुकीय |
| [१३] उपगुसौश्रवस | [३०] त्रिवन्- | [४५] शितिपृष्ठ |
| [१४] तपविर्जान- | धैलिनी | [४६] शितिबाहु |
| श्रुतेय | [३१] तिमिर्य दौरे- | [४७] शुचिवृक्ष |
| [१५] ऐषावीर | श्रुत | गौपालायन |
| औदमय | [३२] दुरःकावषेय | [४८] शौल्यायन |
| [१६] औपाविर्जान- | [३३] दृश | [४९] षंड |
| श्रुतेय | [३४] दत्ततापस | [५०] सत्यहविस् |
| [१७] काण्डविय | [३५] रथप्रोत | [५१] सुमदन्य |
| [१८] कापेय | आगस्ति | [५२] सोमशुष्मन् |

[1]अ च्यु त —जैमिनीय ब्राह्मणात विभिंदुकीयांनी केलेल्या सत्रांचें जें वर्णन आलें आहे, त्यात हा प्रतिहर्त्याचें काम करीत होता

[2]अ जि र —पंचविंश ब्राह्मणांत (२५ १५) जें सर्पसत्राचें वर्णन आलें आहे, त्यात सुब्रह्मण्य ऋत्विजाचें काम हा करीत होता

[3]अ नु शि स —पंचविंश ब्राह्मणा (२५ १५)मध्यें जें सर्पसत्राचें वर्णन आलें आहे, त्यात हा 'पोतृ' ह्या ऋत्विजाचें काम करीत होता

[4]अ य स्थू ण —शतपथ ११. ४, ३, १७ येथें म्हटल्याप्रमाणें शौल्बायन हा ज्यांचा अध्वर्यु होता, त्याचाच हा गृहपति होता यानें शौल्बायनाला विशिष्ट सुच्याचा (पळीचा) उपयोग कसा करावा हें शिकविलें

[5]अ रि मे ज य —पंचविंश ब्राह्मण २५, १५ यात जें सर्पसत्र वर्णिलें आहे, त्यांत ह्यानें आध्वर्यव स्वीकारलें होतें

[6]अ रु ण आ ट् —पंचविंश ब्राह्मण २५ १५ येथें जें सर्पसत्र उल्लेखिलें आहे, त्यात हा अच्छावाक नामक ऋत्विज होता

[7]अ र्बु द —पंचविंश ब्राह्मण (२५, १५) येथें जें सर्पसत्र वर्णिलें आहे त्यात हा ग्रावस्तुत ह्या ऋत्विजाचें काम करीत होता. ऐतरेय आणि कौषीतकी ह्या ब्राह्मणांत ज्याचा मंत्रद्रष्टा म्हणून उल्लेख आला आहे, तो प्राचीन अर्बुद काद्रवेय व हा अर्बुद हे एकच होत हें उघड आहे

[8]अ र्य ल —पंचविंश ब्राह्मणात (२३, १, ५) वर्णिलेल्या सर्पसत्रात अर्यल हा गृहपति होता व आरुणि हा 'होता' होता

[9]अ श्व ल —विदेहराजा जो जनक त्याचा हा 'होता' असून बृहदारण्यकोपनिषदात (३ १, २, १०) तो प्रमाण असल्याचा उल्लेख आहे

[10]अ सि त मृ ग —ऐतरेय ब्राह्मणाप्रमाणें हें एका कश्यप कुलाचें नाव आहे ह्यांना जनमेजयानें एका यज्ञातून वग ळलें होतें, तथापि ह्यांनीं राजानें नेमिलल्या भूतवीर नावाच्या ब्राह्मणाकडून यज्ञाचें नेतृत्व हिसकावून आपणाकडे घेतलें जैमिनीय (१ ७५)व षड्विंश (१ ४) ब्राह्मणात असितमृग हे कश्यपाचे पुत्र होते व एकाचें नाव कुसुरुविन्दु औद्दालकि असें होतें असा उल्लेख आहे

[11]आ या ग व.—आयोगव राजा मरुत्त आविक्षित हा यजमान यज्ञकर्ता होता असा शतपथात (१३. ५, ४, ६) उल्लेख आहे त्यात यज्ञप्रीत्यर्थ एक गाथा दिली आहे

[12]उ द म य आ त्रे य —वैरोचन अंग याचा हा पुरोहित होता असें ऐतरेय ब्राह्मण (८ २२) येथें म्हटलें आहे

[13]उ प गु सौ श्र व स.—पंचविंश ब्राह्मण (१४ ६, ८,) यात हा कुत्स औरव ह्याचा पुरोहित होता असें म्हटलें आहे ह्या पुरोहितानें इंद्राला हवि दिला म्हणून त्याच्या यजमानानें त्याला ठार मारिलें

[14]उ पा वि जा न श्रु ते य.—उपसद म्हणजे सोमयागांतील इष्टि हिच्यामध्यें ब्राह्मणवाक्य पठण करणारा हा एक ऋषि होता असा ऐतरेय ब्राह्मण १ २० येथें उल्लेख आहे

[15]ऐ षा वी र —शतपथांत (११ २ ७ ३२)एका यज्ञामध्यें हे याज्ञिक चाल्तीत असून वाईट यज्ञकर्ते होते असा उल्लेख आहे सायणाचार्यांच्या मतें हें विशेषनाम (एषवीराचे वंशज) असून त्याचा अर्थ तुच्छ मानलेल्या कुटुंबांतील गृहस्थ असा होतो परंतु वरील उताऱ्यात आणि दुसरीकडे रॉथ याचा अर्थ अशक्त अथवा यःकश्चित् मनुष्य असा करितो

[16]औ पा वि जा न श्रु ते य —औपावि (उपावीचा वंशज) जानश्रुतेय (जनश्रुतीचा वंशज) ह्याच्याबद्दल शतपथ ब्राह्मण व मैत्रायणी संहिता (१ ४, ५) येथें उल्लेख आला आहे हा वाजपेय यज्ञ करीत असे व त्यामुळें त्यास स्वर्गप्राप्ति झाली

[17]का ण्ड वि य —जैमिनीय उपनिषद ब्राह्मणात (३ १० २) हा उद्गाता होता असें म्हटलें आहे

[18]का पे य —(कपिवंशज) काठकसंहिता (१३ १२) आणि पंचविंश ब्राह्मण (२० १२, ५) यात कापेय यांनीं चित्ररथाकडून यज्ञ करविला व त्यामुळें चित्ररथ धनसंपन्न झाला या चित्ररथाच्या कुलांत वडील राजपुत्र गादीवर बसे व त्याचे भाऊ त्याचे अनुचर होत अशी चाल असे त्याचें वर्णिलें आहे

[19]का व षे य —(कवषाचा वंशज) तुर ह्याचें सर्व ठिकाणीं आलेलें हें पैतृक नांव ऋग्वेदाच्या ऐतरेय (३ २,६) व शांखायन (८. २) आरण्यकात तत्त्वज्ञानाचा अध्यापक म्हणून आलें आहे

[20]कि रा त —पंचविंश ब्राह्मण (१३ १२, ५) येथें आलेल्या असमातीच्या कथेंत किरात आणि अकुलि हे दोन पुरोहित गोपायनाच्या विरुद्ध होते, असें म्हटलें आहे शतपथ [१ १, ४, १४] येथें किलात व आकुलि अशीं नावें आहेत हें उघड दिसतें कीं, ऐतिहासिक म्हणून हें नाव उपयोगात आणलें नसून भाडखोर पुरोहिताला साजेस म्हणून आलें आहे. कारण किरात ह्या डोंगरी लोकाच्या नावाशीं याचें साम्य आहे असें मॅकडोनेल म्हणतो

[21]कि ला त —'किरात' ह्याचें हें दुसरें स्वरूप आहे शतपथ, शाट्यायनक आणि जैमिनीय ब्राह्मणात हा शब्द आला आहे

[22]कु षी त क सा म श्र व स —पंचविंश ब्राह्मण [१७ ४,] येथें उल्लेखिलेल्या कौषीतकीच्या गवसमारंभातील हा गृहपति म्हणजे यजमान होता

[23]कु ष ण्ड —पंचविंश ब्राह्मण [२५ १५ ३] येथें उल्लेखिलेल्या सर्पसत्रात षण्ड नावाच्या ऋत्विजाबरोबर ह्याचेंहि नाव आलेलें आहे त्या सत्रात याच्याकडे अभिगर [स्तुति] व अपगर [निंदा] नामक कर्म असे

[२४] कौकूस्त—शतपथ ब्राह्मण [ ४ ६, १, १३ ] येथें उल्लेखिलेल्या यज्ञात यज्ञ करणाऱ्यां ब्राह्मणाना हा दक्षिणा देत असे. काण्व पाठात कौक्थस्त असें नाव आहे.

[२५] *कौतस्त.*—पचविंश ब्राह्मण [२५ १५, ३] येथ वर्णिलेल्या सर्पसत्रात अरिमेजय व जनमेजय अशीं अध्वर्यूंचीं दोन नांवें आलीं आहेत त्यांचें हें पैतृक नाव असाव हें एकदा द्विवचनी उपयोगात आणिलें आहे.

[२६] *कुरुव् आगिरस*—पंचविंश ब्राह्मण [१३ ९ ११; ११, २० ] *येथ आलेल्या कौश्व मामाचा द्रष्टाच हें नाव* आहे मंत्राला मंत्रद्रष्ट्या ऋषीचें नाव दिल्याच हें एक उदाहरण आहे ह्या नियमाला अपवादहि आहेत.

[२७] ग्लाव मैत्रेय.—मैत्रीचा वंशज छान्दोग्य उपनिषद् [१. १२, १, ३ ] येथें ह्याचा उल्लेख असून हा व बकदाल्भ्य हे एकच आहेत. पंचविंश ब्राह्मण [२५, १५, ३ ] येथें वर्णिलेल्या सर्पसत्रात हा प्रस्तोता होता. याचा उल्लेख षड्विंश ब्राह्मणात हि आहे.

[२८] जनमेजय.—पंचविंश ब्राह्मण [२५ १५, ३ ] मध्यें ज्या सर्पसत्राचा उल्लेख आहे, त्यामध्यें हा प्रमुखपणें याज्ञिक चालवीत होता.

[२९] अर्वर.—पंचविंश ब्राह्मण [ २५ १५, ३. ] येथें उल्लेखिलेल्या सर्पसत्रात हा गृहपति म्हणजे यजमान होता.

[३०] *जित्वन् शैलिनि,*—बृहदारण्यकात [ ४. १, २ ] अध्यापक म्हणून ह्याचे नाव आलें आहे. जनक आणि याज्ञ-*वल्क्य याचा तो समकालीन होता. हा वाग्देवतेला ब्रह्म* समजत असे.

[३१] *तिमिर्घ दौरेश्रुत.*— दूरेश्रुताचा वंशज. पंचविंश ब्राह्मण [२५ १५. ३] *येथें वर्णिलेल्या सर्पसत्रातील अग्निध* [अग्नि पेटविणारा] ऋत्विजाचें हें नाव होय.

[३२] तुर कावषेय—शतपथाच्या दहाव्या कांडाच्या शेवटीं आलेल्या वंशात हें नाव आलेलें आहे, कारण त्या काण्डामध्यें प्रतिपादिलेल्या तत्त्वाचें जनकत्व याच्याकडे येतें. येथें दिलेल्या गुरुशिष्यपरंपरेत हा आणि शाण्डिल्य याच्यामध्यें यज्ञवचस् आणि कुश्री हे दोन गुरु दिलेले आहेत. त्याच ब्राह्मणांत [ ९. ५. २. १५. ] शाण्डिल्यानें कारोती नदीवर एक अग्नीची वेदी बांधल्याचा यानें उल्लेख *केला आहे. जनमेजय पारिक्षित ह्याचा हा पुरोहित होता* व ह्यानेंच त्याला राज्याभिषेक केला असें ऐतरेय *ब्राह्मणात* ( ४. २७; ७ ३४; ८. ३१ ) म्हटलें आहे. बृहदारण्यकात (६. ५४ ) व खिलामध्यें (१. ९ ६). तो पुरातन मुनि असल्याचें म्हटलें आहे. ओल्डेनबर्गच्या मतानें हा वैदिक कालाच्या शेवटीं झाला असावा; व हें मत मॅकडोनेलला योग्य दिसतें. त्याच्या मतें पचविंश ब्राह्मणात(२५. १४. ५) उल्लेखिलेला देवमुनि जो तुर तो व हा हे एकच असावेत.

[३३] त्वष्टा—*मैत्रायणी* ( ४. ८ १) आणि काठक संहिता (३०. १. ) यामध्यें असुरांचा पुरोहित वरूत्री यांच्याबरोबर याचा उल्लेख आला आहे

[३४] दत्त तापस—पंचविंश ब्राह्मण (२५.१५,३ ) येथें *आलेल्या* सर्पसत्रात होतृपद ह्याच्याकडे होतें.

[३५] दृढच्युत आगस्ति.—( अगस्त्याचा वंशज )जैमि-*नीय ब्राह्मणांत वर्णिलेल्या* विभिंदुकीयाच्या सत्रांत हा *उद्गाता होता.*

[३६] *देवभाग श्रौतर्ष.*—शतपथ (२ ४,४,५ ) येथें तो सृंजय व कुरु ह्या दोघांचाहि पुरोहित होता असें म्हटले आहे. याने गिरिज बाभ्रव्याला यज्ञिय पशूचें विशसन (पशोर्विभक्ति) कसें करावें हें शिकविल्याचा उल्लेख ऐतरेय ब्राह्मण ( ७ १ ) यात आला आहे. तैत्तिरीय ब्राह्मणांत ( ३. १०, ९ ११ ) तो सावित्र अग्नीच्या बाबतीत प्रमाणभूत मानला जातो.

[३७] दौरेश्रवस् पृथु—( दूरेश्रवाचा वंशज ) पंचविंश ब्राह्मण (२५. १५ ३. ) येथें उल्लेखिलेलें सर्पसत्र चालविणाऱ्या पृथुश्रव्याचें हें पैतृक नांव आहे.

[३८] दौरेश्रुत—( दूरेश्रुताचा वंशज ) पंचविंश ब्राह्मणा [२५ १५.३.] मध्यें उल्लेखिलेलें सर्पसत्र चालविणाऱ्या तिमि-*र्घाच हें पैतृक नाव होय.*

[३९] नगरिन् जानश्रुतेय.—ऐतरेय ब्राह्मण [५. ३० ] आलेलें हें एका ऋत्विजाचें नांव आहे जैमिनीय उपनिषद् ब्राह्मण [ ३. ४०. २. ] येथें नगरिन् जानश्रुतेय काण्ड्विय असें नांव आहे.

[४०] पिशंग.—पंचविंश ब्राह्मण २५. १५ ३ येथें वर्णिलेल्या सर्पसत्रात हा उन्नेता नावाच्या पुरोहिताचें काम करीत होता.

[४१] पृथुश्रवस् दौरेश्रवस.—( दूरेश्रव्याचा वंशज ) पंचविंश ब्राह्मण [२५ १५. ३.] येथें आलेल्या सर्पसत्रात हा *उद्गात्याचें काम करीत होता.*

[४२] *प्राचीनशाल औपमन्यव.*—*(उपमन्यूचा वंशज)* हें छान्दोग्योपनिषदात ( ५ २, १ ) आलेलें *एका वेदान्ती* गृहस्थाचें नांव आहे. जैमिनीय उपनिषद् ब्राह्मण ३. ७, २; १०. २ येथें एका प्राचीनशालाचें नांव आढळतें. त्याच ग्रंथात (३.१० १) येथें प्राचीन शालांचा उल्लेख आहे.

[४३] भूतवीर.—ऐतरेय ब्राह्मण [७ २७] येथें यांचा उल्लेख आहे. कांहीं दिवस हे जनमेजयाच्या यज्ञांत पौरोहित्य करीत होते.

[४४] *विभिंदुकीय.*—*जैमिनीय उपनिषद् ब्राह्मण ७. २७* येथें उल्लेखिलेल्या सत्रांतील ऋत्विजाच्या समुदायाचें हें नाव आहे.

[४५] शितिपृष्ठ—( पांढरी पाठ असलेला ) पंचविंश ब्राह्मण २५ १५. ३ येथें उल्लेखिलेल्या सर्पसत्रातील मैत्रावरुण ऋत्विजाचें हें नांव आहे.

[४६] शितिबाहु—जैमिनीय ब्राम्हण १.३६३ येथें ह्याचा यजमान म्हणजे यज्ञकर्ता म्हणून उल्लेख आहे. या सत्रांतील

होते एका वानराने पळविला असा तेथे उल्लेख आहे.

शुचिवृक्ष गौपालायन.—ऐतरेय ब्राह्मण (३. ४८ ९)मधे उल्लेखिलेल्या वृद्ध द्युम्न आभिप्रतारिणाच्या पुरोहिताचें नाव आहे. त्याचा मैत्रायणी संहितेतहि ( ३.१०,४) उल्लेख आलेला आहे

शौल्बायन.—( द्युम्याचा वंशज ) उदंक नांवाच्या अध्यापकाचें हें पैतृक नांव आहे शतपथ( ११. ४, २, १७) मधे कोणी एक शौल्बायन अध्वर्यु होता व अयस्थूण हा गृहपति होता असा उल्लेख आहे.

षण्ड.—पंचविंश ब्राह्मणा[२५.२,५३]मध्यें वर्णिलेल्या सर्पसत्रांत हा एक ऋत्विज होता.

सत्यहविस.—मैत्रायणी संहिते [ १.९,१,५] मध्यें हें एका प्राचीनकाल्पनिक अध्वर्यूचें नांव आलें आहे. असें मॅकडॉनेल म्हणतो परंतु त्याला प्राचीनकाल्पनिक समजण्यास ग्रंथात काही पुरावा नाही.

सुब्रह्मण्य.—ब्राह्मण ग्रंथांत उद्गात्याच्या तीन मदतनीसांपैकी हा एक ऋत्विज असल्याचें म्हटलें आहे. सुब्रह्मण्य नामक साम पठन करणें हें याचें काम होय.

सोमशुष्म.—( वाजरत्नाचा वंशज ) ऐतरेयब्राह्मण (८. २१, ५) येथें आलेलें हें एका पुरोहिताचें नाव आहे. यानेंच शतानीकाला राज्याभिषेक केला.

## गुरुशिष्यसंबंध [ संहितेतर ]

| | | |
|---|---|---|
| [1] अंशुधानंजय | [19] कक्ष | [37] दक्षजयंत-लौहित्य |
| [2] अग्निभूकाश्यप | [20] कापटवसुनीथ | [38] निकोथक-भायजात्य |
| [3] अमावास्य-शांडिल्यायन | [21] कापायण | [39] नैगदपार्ण-वल्कि |
| [4] अराडदात्रेय शौनक | [22] कुमारहारित | [40] पाश्निसोमर |
| [5] असितवार्षगण | [23] कुश्रिवाजश्रवस | [41] पालिगुप्तलौहित्य |
| [6] आग्निवेश्य | [24] कौण्डिन्य | [42] पाराशर्यायण |
| [7] आनभिम्लात | [25] गालव | [43] पौतिमाष्य |
| [8] आनंदजचांधनायन | [26] गोश्रुतिवैयाघ्रपद्य | [44] प्रतिथि-देवतरथ |
| [9] आभूतित्वाष्ट्र | [27] गौपवन | [45] प्रातिवेश्य |
| [10] आसुरायण | [28] घृतकौशिक | [46] प्रातिपीय |
| [11] आसुरि | [29] घोरआंगिरस | [47] प्रोष्ठपादवारक्य |
| [12] इंद्रभूकाश्यप | [30] चाक्र | [48] बभ्रुदैवावृध |
| [13] इन्द्रशवाश्रि | [31] जनश्रुत-कांडवीय | [49] बृहस्पतिगुप्त शायस्थि |
| [14] उदरशांडिल्य | [32] जिह्वावत् | [50] ब्रह्मवृद्धि |
| [15] उद्दालकायन | [33] ताडि | [51] महाशाल-जाबाल |
| [16] उपकोसल-कामलायन | [34] त्रिवेद कृष्णरात-लौहित्य | [52] महेन्द्र |
| [17] उपवेशि | [35] त्रैवणि | |
| [18] ऋष्यशृंग | [36] दक्षकात्यायनि आत्रेय | |
| [53] वाजश्रवस् | [63] शाट्यायन | [73] सायक जानश्रुतेय काण्ड्विय |
| [54] वातकाशायण | [64] शूष वान्हेय भारद्वाज | [74] सुदत्तपाराशर्य |
| [55] विचक्षणतांड्य | [65] श्यामजयंत लौहित्य | [75] सुप्रतीत औलुण्ड्य |
| [56] विदर्भिकौण्डिन्य | [66] श्यामसुजयंत लौहित्य | [76] सुमंतबाभ्रव गौतम |
| [57] विपश्चित् दृढजयंतलौहित्य | [67] श्रवणदत्त कौहल | [77] सुप्रयु |
| [58] विष्वक्सेन | [68] सत्यकाम जाबाल | [78] सुयज्ञशांडिल्य |
| [59] वैपश्चित दार्ढजयंति गुप्त लौहित्य | [69] सत्ययज्ञ पौलुषि | [79] सुशारदशालंकायन |
| [60] वैपश्चित दार्ढजयंति दृढजयंत लौहित्य | [70] संवर्गजित् लामकायन | [80] सोमप्रातिवेश्य |
| [61] शवस् | [71] सांकृत्य | [81] सौकरायण |
| [62] शाकदास भाडितायन | [72] साकमश्व देवरात | [82] हरितकश्यप |
| | | [83] ह्रस्वाशयभाल्लवेय |

[1] अंशुधानंजय.—अमावास्य शांडिल्यायनाचा हा शिष्य असें वंशब्राह्मणांत म्हटलें आहे.

[2] अग्निभू काश्यप.—इंद्रभू काश्यपाचा शिष्य म्हणून याचा वंश ब्राह्मणांत उल्लेख आहे.

[3] अमावास्य शांडिल्यायन.—अंशुधानंजय याचा हा गुरु होता असा वंश ब्राह्मणात उल्लेख आहे.

[4] अराडदात्रेय शौनक.—दृतिऐन्द्रोतशौनक याचा शिष्य म्हणून याचा वंश ब्राह्मणांत उल्लेख आहे.

[5] असित वार्षगण.—हरित कश्यपाचा हा शिष्य होता असें बृहदारण्यकांतील वंशावरून ( ६. ५. ३ )दिसतें.

[6] आग्निवेश्य.—बृहदारण्यकाच्या वंशांत या नांवाच्या मनुष्याच अध्यापकांचा उल्लेख आला आहे. माध्यंदिन प्रतींत आग्निवेश्य हा सैतवाचा शिष्य असल्याचें व काण्व प्रतींतील एका वंशांत हा शांडिल्य व आनभिम्लात यांचा शिष्य, आणि दुसऱ्या वंशांत हा गार्ग्याचा शिष्य असल्याचें आढळतें.

[7] आनभिम्लात.—बृहदारण्यक काण्व प्रत (२.६, २.) उपनिषदांतील वंशांत हा दुसऱ्या एका आनभिम्लाताचा शिष्य असल्याचें लिहिलें आहे.

[8] आनन्दजचांधनायन.—हा शाम्बाचा शिष्य असल्याचें वंशब्राह्मणावरून दिसतें.

[9] आभूतित्वाष्ट्र.—हा विश्वरूप त्वाष्ट्राचा शिष्य असल्याचें बृहदारण्यकाच्या दोन वंशांत (२. ६, ३, ४, ६, ३) दिलें आहे. हे दोघेहि आचार्य, मॅकडोनेलच्या मतानें सारखेच प्राचीनकल्पित आहेत.

[10] आसुरायण.—बृहदारण्यकोपनिषदांतील दोन वंशाप्रमाणें हा त्रैवणीचा शिष्य असून तिसऱ्या वंशांत

(६, ५. २, ) हा असुरीचा शिष्य असल्याचा उल्लेख आहे.

"आसुरि —बृहदारण्यकोपनिषदांतील पहिल्या दोन वंशांत हा भारद्वाजाचा शिष्य आणि औपजंघनीचा गुरु असून तिसऱ्या वंशात याज्ञवल्क्याचा शिष्य व आसुरायणाचा गुरु असल्याचें म्हटलें आहे. शतपथाच्या पहिल्या चार कांडांत कांहीं यज्ञविधींवर तो प्रमाणभूत मानला जातो. चवदाव्या काण्डावरून (१४. १. १, ३३ ) तो अनिर्बंध मताबद्दल विशेषत: मसलाच्या आग्रहाबद्दल प्रमाणभूत होतासें दिसतें.

"इंद्रभूकाश्यप —मित्रभू काश्यपाचा हा शिष्य होता असें वंशब्राह्मणात म्हटलें आहे.

"इषश्यावाश्वि -अगस्त्याचा हा शिष्य असल्याचें जैमिनीय उपनिषद् ब्राह्मण (४,१६,१,) येथें म्हटलें आहे.

"उदरशाण्डिल्य.—छान्दोग्य उपनिषदात (१ ९,३) अतिधन्वा शौनकानें ह्याला उद्गीथ शिकविलें असें आहे(उद्गीथ याचा वाच्यार्थ जो 'सामन्' तो येथें अभिप्रेत नसून लक्षणेनें ब्रह्माचें ज्ञान असा अर्थ घेतला आहे) वंश ब्राह्मणांतहि हेंच गुरुशिष्यनातं दिलें आहे.

"उद्दालकायन —बृहदारण्यकात (काण्वप्रत४.६.२) हा जाबालायन याचा शिष्य होता असा उल्लेख आहे.

"उपकोसलकामलायन —छान्दोग्य उपनिषदात (४.१०,१ )याच्या सुंदर कथेला आरंभ झाला आहे. कमलपुत्र उपकोसल हा सत्यकाम जाबालाच्या घरीं अध्ययन करण्याकरिता ब्रह्मचर्यानें राहिला. त्यानें सत्यकामाच्या अग्नीची बारा वर्षे सेवा केली. बारा वर्षांनंतर सत्यकामानें इतर शिष्यांना समावर्तनसंस्कार करून स्वगृहीं जाण्यास परवानगी दिली. परंतु उपकोसलाचें समावर्तन केलें नाहीं. तेव्हां सत्यकामाची भार्या त्याला म्हणाली कीं या ब्रह्मचाऱ्यानें अग्नींची सेवा उत्तमप्रकारें केली आहे करितां अग्नीनें आपल्याला दोष देऊं नये म्हणून आपण याला ब्रह्मज्ञान सांगा. पण तें न सांगतांच तो प्रवासाला निघून गेला तेव्हां उपकोसलानें मानसिक दुःखाच्या भरांत अन्न वर्जिलें. तेव्हां आचार्यपत्नी म्हणाली, "बाळा, तूं अन्न का वर्ज्य केलेंस ? तो म्हणाला कीं, नाना मार्गांनीं जाणाऱ्या अनेक इच्छा मनुष्याला असतात. अशा इच्छांमध्ये व्याधींनीं मी ग्रस्त आहे, म्हणून मी कांहीं खात नाहीं. त्या ब्रह्मचाऱ्यानें आचरलेलें तप व आपली केलेली सेवा लक्ष्यांत आणून त्याला ज्ञान सांगण्याच्या उद्देशानें तीन अग्नी प्रकट होऊन त्यास म्हणाले कीं, प्राण हें ब्रह्म, सुख हें ब्रह्म आणि आकाश हें ब्रह्म होय उपकोसल म्हणाला, "प्राण हें ब्रह्म कसें हें मला समजलें, पण पुढील दोन्हींविषयीं मला समजत नाहीं." नंतर त्या अग्नींनीं त्याचीहि उत्तर दिलें, व प्रत्येक अग्नीनें आपल्या स्वरूपाचें ज्ञान त्याला करून दिलें. मागाहून ते अग्नी म्हणाले बाळा उपकोसला ही आमची विद्या आणि आत्मविद्या आम्ही तुला सांगितली. मार्गसंबंधाचा पुढील मार्ग गुरु आपणांस दाखवील." कालांतरानें त्याचा आचार्य परत आला व शिष्याचें मुखावलोकन करून तो म्हणाला, " बाळा, ब्रह्मज्ञान्याच्या मुखाप्रमाणें तुझें मुख दिसत आहे. तुला कोणीं ज्ञान सांगितलें ?" उपकोसल म्हणाला, "दुसरें कोण सांगणार ? ह्या कंप पावणाऱ्या अग्नीसारखेच दुसरे अग्नी होते, त्यांनीं सांगितलें " पुढें गुरूनें विचारल्यावरून अग्नींनीं सांगितलेलें ज्ञान त्यानें त्याला सांगितलें. नंतर आचार्य सत्यकाम म्हणाला, बाळा, त्यांनीं तुला लोक सांगितले, पण संपूर्ण ब्रह्मज्ञान सांगितलें नाहीं; तर मी सांगतों ज्याप्रमाणें कमलपत्राला उदक स्पर्श करीत नाहीं, त्याप्रमाणें हें ब्रह्म जाणणाऱ्याला पापकर्म स्पर्श करीत नाहीं" उपकोसलानें प्रार्थना केली कीं, "भगवन् तें ब्रह्म मला सांगा," आचार्य म्हणाले, "या चक्षूच्या ठिकाणीं जो पुरुष दिसतो तो आत्मा. हा मरणरहित व भयरहित आहे हाच ब्रह्म होय ह्या चक्षूवर घृत अथवा उदक पडलें तर तें बाजूलाच जातें. या पुरुषाला संयद्वाम असें म्हणतात कारण सर्व शोभनवस्तु ह्याच्या ठिकाणीं एकत्र होतात हाच 'वामनी' होय कारण हाच प्राण्यांना त्यांच्या पुण्यकर्मांचीं सर्व फलें प्राप्त करून देतो. हाच 'भामनी' होय. कारण हा सर्व लोकांमध्यें प्रकाश पावतो हें जो जाणतो, तो सर्व लोकांमध्यें प्रकाशमान होतो. असे ब्रह्मवेत्ते मरण पावल्यावर त्यांचें उत्तर कार्य कोणी करोत अथवा न करोत. ते अर्चिष देवतेप्रत जातात. तेथून दिवसाप्रत (दिवसाभिमानिनी देवतेप्रत ) जातात तेथून शुक्ल पक्षाप्रत, तेथून उत्तरायणाप्रत व मग संवत्सराप्रत जातात. तेथून आदित्याप्रत, पुढें चंद्राप्रत, नंतर विद्युतेप्रत पोहोंचतात, तेथें कोणी ब्रह्मलोकींचा अमानव पुरुष येऊन त्यांना ब्रह्माप्रत नेतो तो देवपथ, तोच ब्रह्मपथ या मार्गानें जाणारे पुन्हा या मानवी भोंवऱ्यात सांपडत नाहींत."

"उपवेशि —बृहदारण्यकोपनिषद् [६ ५, ३] मधील वंशात हा कुश्रि याचा शिष्य असल्याचा उल्लेख आहे.

"ऋष्यशृंग —जैमिनीय उपनिषद् ब्राह्मण ( ३. ४, १ ) आणि वंशब्राह्मण यात हा काश्यपाचा शिष्य असून काश्यप हें पैतृक नावहि त्यानें धारण केल्याचा उल्लेख दिसतो.

"कंस.—जैमिनीय उपनिषद् ब्राह्मणातील ( ३. ४१, १ ) वंशात ह्या नावाच्या दोन व्यक्ती आहेत. एक प्रोष्ठपदवारक्य ह्याचा शिष्य कक्षवारक्य आणि दुसरा दक्ष कात्यायनि आत्रेय ह्याचा शिष्य कक्षवारकि, अथवा (जै० उ० ब्रा० ४. १७, १, प्रमाणें,) कक्षवारक्य हे होत.

"कापटवगुनीथ.—सुतेमनस् शाण्डिल्यायनाचा हा शिष्य असें वंशब्राह्मणात म्हटलें आहे.

"कापायण.—बृहदारण्यकोपनिषदांतील दुसऱ्या वंशात ह्याचें नांव आहे. काण्वप्रतीप्रमाणें [४. ६, ३] हा सायकायन याचा शिष्य आणि माध्यंदिन प्रतीप्रमाणें (४.५, २७ ) शौकरायणाचा शिष्य होय.

[22] कुमारहारित.—गालवाचा हा शिष्य होता असे बृहदारण्यक उपनिषदातील वंशात (माध्यंदिन प्रत (२. ५, २२) आणि काण्व प्रत (२. ६, ३) म्हटलें आहे.

[23] कुश्रि वाजश्रवस्.—शतपथ ब्राह्मण १०. ५, ५, १ येथें पवित्र अग्नीसंबंधींच्या ज्ञानाशीं या आचार्याचा संबंध आहे. बृहदारण्यकातील शेवटच्या वंशात (६. ४, ३३) हा वाजश्रव्याचा शिष्य असल्याचा उल्लेख आहे. बृहदारण्यक काण्व प्रतीच्या शेवटच्या वंशात (६. ५, ४) आलेला कुश्रि व शतपथाच्या दहाव्या काण्डाच्या वंशात याज्ञवचस राजस्तंबायनाचा शिष्य म्हणून ज्याचा उल्लेख आहे, असे दोघे ह्या कुश्रीहून भिन्न कीं, काय हें स्पष्ट नाहीं.

[24] कौण्डिन्य.—बृहदारण्यकातील पहिल्या दोन वंशात हा शाण्डिल्याचा शिष्य असल्याचें म्हटलें आहे.

[25] गालव.—बृहदारण्यक उपनिषदातील पहिल्या दोन वंशात हा विदर्भी कौण्डिन्याचा शिष्य असल्याचा उल्लेख आहे. ऐतरेय आरण्यक (५. ३, ३) येथें गालवाचा उल्लेख आहे. महाव्रताच अध्ययन एका दिवसात संपवावें असें गालवमत आहे. तो गालव आणि हा एकच असणें संभवनीय आहे. निरुक्तात (४. ३) एका वैय्याकरणी गालवाचा उल्लेख आहे.

[26] गोश्रुति वैयाघ्रपद्य.—छान्दोग्य उपनिषदात (५. २, ३,) ह्याची थोडी हकीकत आली आहे. जाबाल सत्यकामानें ह्याला वाणी, श्रोत्र, मन व प्राण ह्या पंचप्राणाबद्दलचें महत्त्व तारतम्यपूर्वक सांगून सर्वांत प्राणाचें महत्त्व कसें अधिक आहे, इतर इंद्रियांपैकीं कोणतेंहि न होसें झाल्यास विशेषसा अपाय शरीरास घडत नाहीं, पण प्राण जाऊं लागल्यास सर्व व्यवहार कसे खुंटतात हें सर्व ज्ञान एका आख्यायिकेच्या द्वारें त्याला सांगितलें. नंतर सत्यकाम त्याला म्हणाला, "हें ज्ञान जरी एखाद्या शुष्क खांबाला सांगितलें तरी त्याला पालवी फुटेल, मग जिवंत व बुद्धियुक्त माणसाबद्दल तर बोलावयासच नको." पुढें त्यानें त्याला महत्त्व प्राप्त करून घेण्याबद्दल एक मत सांगितलें.

[27] गौपवन.—गोपवनाचा वंशज. बृहदारण्यकोपनिषदाच्या पहिल्या दोन वंशात हा पौतिमाष्याचा शिष्य असल्याचें लिहिलें आहे.

[28] घृत कौशिक.—बृहदारण्यकाच्या पहिल्या दोन वंशांवरून हा पाराशर्यायणाचा शिष्य दिसतो.

[29] घोर आंगिरस.—ह्या प्राचीन आचार्याचें नाव कौषीतकी ब्राह्मणात (३०. ६) आणि छान्दोग्योपनिषदात आलें आहे छान्दोग्यात, ह्यानें देवकीपुत्र कृष्ण ह्याला ब्रह्मज्ञानाचा उपदेश केल्याचें नमूद आहे. मॅक्डोनेलच्या मतें हें नाव अंगिरसांपैकीं घोर म्हणजे भयंकर वंशज हा भिषज् आथर्वण अथर्वणाचा रोगघ्न वंशज ह्या प्रमाणेंच निवळ काल्पनिक आहे. ऋग्वेदाच्या आश्वलायन श्रौतसूत्रात (१०.७) व शांखायन श्रौतसूत्रात (१६. २) 'अथर्वण' वेदाचा 'भिषज्' शीं संबंध असून 'आंगिरस' वेदाचा 'घोर' याशीं संबंध आहे. म्हणून घोर आंगिरस हा अथर्ववेदातील जारणादि कृत्यांचें मूर्तस्वरूप होय असें मॅकडोनेल म्हणतो. काठक संहितेंतील अश्वमेधाच्या भागात (१. १) ह्याचा उल्लेख आहे.

[30] चाक.—हें एका व्यक्तीचें नाव असून फक्त शतपथात. 'रेवोत्तरस स्थपति पाटव चाक' १२. ८, १, १७, व 'रेवोत्तरस पाटव चाक स्थपति,' (१२. ९, ३, १) असा निरनिराळ्या तऱ्हेचा उल्लेख आला आहे. तेथें ह्याच्याविषयीं असें म्हटलें आहे कीं, ह्याला सृंजयांनीं हाकून दिलें पण ह्यानें, कौरव्य राजा बल्हिक प्रातिपीय ह्याच्या अश्मव्याला न जुमानता, त्याचा जो दुष्टरीतु राजा, त्याला परत आणून त्याच्या स्वाधीन केलें. पहिल्यानें दिलेल्या शतपथातील उताऱ्यावरून ह्याला योद्धा म्हणण्यापेक्षा ऋषि म्हटलेलेंच अधिक योग्य होय, कारण तेथें फक्त आचार्य म्हणूनच त्याचा उल्लेख केला आहे.

[31] जनश्रुत काण्द्विय.—जनश्रुत म्हणजे लोकप्रसिद्ध. जैमिनीय उपनिषद ब्राह्मणाच्या वंशावरून (३. ४०, २) हा हस्त्वाशयाचा शिष्य दिसतो. त्याच ब्राम्हणात (३. ४१, १, ४. १७, १) जनश्रुत वारक्य हा जयंताचा शिष्य असल्याचा उल्लेख आहे.

[32] जिह्वावत् बाध्योग.—हा असित वार्षगणाचा शिष्य असल्याचें बृहदारण्यकातील शेवटच्या वंशावरून (६. ५, ३) दिसतें.

[33] ताण्ड.—सामविधान ब्राह्मणाच्या शेवटीं असलेल्या वंशावरून हा बादरायणाचा शिष्य दिसतो.

[34] त्रिवेद कृष्णरात लौहित्य.—हा श्यामजयन्त लौहित्याचा शिष्य असल्याचें जैमिनीय उपनिषद् ब्राह्मणातील वंशावरून (३. ४२, १) दिसतें.

[35] त्रैवणि.—बृहदारण्यकातील पहिल्या दोन वंशात हा औपचंधनि किंवा औपजंधनि ह्याचा शिष्य असल्याचें दिसतें. माध्यंदिन प्रतींत [४५.२७] ह्याचें नाव दोन वेळ आढळत व दोन्ही ठिकाणीं हा औपजंधनीचा शिष्य आहे.

[36] दक्ष कात्यायनी आत्रेय—हा शंख बाभ्रव्याचा शिष्य असल्याचा उल्लेख जैमिनीय उपनिषद् ब्राह्मणातील वंशात [३ ४१,१, ४१,७,१] आहे.

[37] दक्ष जयंत लौहित्य.—हा कृष्णरात लौहित्याचा शिष्य असल्याचें जैमिनीय उपनिषद ब्राह्मणातील वंशावरून [५.४२,१] दिसतें.

[38] निकोथक भायजात्य.—(भायजाताचा वंशज). प्रतिथीचा शिष्य म्हणून ह्याचा वंशब्राह्मणात उल्लेख आलेला आहे.

[39] निगद पार्णवल्कि.—पर्णवल्काचा वंशज. वंशब्राह्मणावरून हा गिरिशर्मा नांवाच्या आचार्याचा शिष्य दिसतो.

[४०]पथिन्.—अयास्य आंगिरसाचा हा शिष्य असल्याचें बृहदारण्यकातील पहिल्या दोन वंशावरून दिसतें.

[४१]पतिल्गुप्त लौहित्य.—जैमिनीय उपनिषद् ब्राह्मणातील वंशांत (३.४२,१) श्यामजयंत लौहित्याचा शिष्य म्हणून त्याचा उल्लेख आलेला आहे हें नांव उघडपणें अशुद्ध झालेलें दिसतें. कारण पतिल् हा शब्द प्राचीन वाङ्मयांत आढळत नाहीं व लौहित्य कुलाचा या शिवायचा उल्लेख वैदिक कालानंतरच्या वाङ्मयांतच आलेला आहे.

[४२]पाराशर्यायण.—बृहदारण्यकातील पहिल्या दोन वंशांत पाराशर्याचा शिष्य म्हणून त्याचा उल्लेख आहे

[४३]पौतिमाष्य.—सामविधान ब्राह्मणाच्या शेवटच्या वंशावरून हा जैमिनीचा शिष्य दिसतो

[४४]प्रतिथि देवतरथ.—वंशब्राह्मणावरून हा देवतरस् शावसायनाचा शिष्य दिसतो

[४५]प्रातिबोधीय.—शांखायन आरण्यकांत (१५.१) प्रतिबोधाचा एक शिष्य म्हणून त्याचा उल्लेख आलेला आहे.

[४६]प्रातिवेश्य.—शांखायन आरण्यकाच्या शेवटच्या वंशांत [१५.१] बृहद्दिवाचा शिष्य म्हणून त्याचा उल्लेख आहे.

[४७]प्रोष्ठपाद वारक्य.—कंस वारक्याचा शिष्य म्हणून जैमिनीय उपनिषद् ब्राह्मणाच्या एका वंशांत (३.४१,१) त्याचा उल्लेख आहे.

[४८]बभ्रु दैवावृध.—पर्वत आणि नारद यांचा शिष्य म्हणून ऐतरेय ब्राह्मणांत (७.३४) त्याचा उल्लेख आला आहे.

[४९]बृहस्पतिगुप्त शायस्थि.—भवत्रात शायस्थीचा शिष्य म्हणून वंश ब्राह्मणांत याचा उल्लेख आहे.

[५०]महावृद्धि.—मित्रवर्चस् याचा हा शिष्य असल्याचें वंशब्राह्मणांत उल्लेखिलें आहे

[५१]महाशाल जाबाल.—हें एका अध्यापकाचें नांव आहे. याचा शतपथ ब्राह्मणांत दोनदां उल्लेख आला आहे. पहिल्यानें तो धीर शातपर्णेय त्याला शिकवीत असतां, व दुसऱ्यानें अश्वपतीपासून ज्ञान मिळविणाऱ्या ब्राह्मणांपैकीं एक म्हणून (१०. ६, १, १) त्याच्या जोडीच्या छांदोग्योपनिषदांतील उताऱ्यांत (५. २, १) प्राचीनशाल औपमन्यव हें नांव आढळतें. महाशाल हा शब्द विशेषणापेक्षां विशेष्य म्हणून समजणें अधिक युक्त होय. पीटर्सबर्ग कोशांत हा विशेषण म्हणून मानला आहे.

[५२]यज्ञेषु.—तैत्तिरीय ब्राह्मणांत (१५,२;१) हें एका मनुष्याचें नांव आलें आहे यज्ञ करण्याची अगदीं बरोबर वेळ ज्याला कळत होती अशा मात्स्य नांवाच्या त्याच्या पुरोहिताने त्यास भरभराटीस आणलें

[५३]वाजश्रवस्.—बृहदारण्यकातील शेवटच्या वंशावरून (माध्यंदिन ६.४,३३) हा जिह्वावत् बाध्योगाचा शिष्य दिसतो.

[५४]वामकक्षायण.—शतपथ ब्राह्मणांत (१०.६,५;९) हा वात्स्याचा शिष्य असल्याचा व बृहदारण्यकांत (६.५,४ काण्वप्रत) शाण्डिल्याचा शिष्य असल्याचा उल्लेख आहे.

[५५]विचक्षण ताण्ड्य.—हा गर्दभीमुखाचा शिष्य असल्याचें वंशब्राह्मणावरून दिसतें.

[५६]विदर्भि कौण्डिन्य.—हा वत्सनपाताचा शिष्य असल्याचें बृहदारण्यकातील पहिल्या दोन वंशांवरून दिसतें.

[५७]विपश्चित दृढजयंत लौहित्य.—दक्ष जयंत लौहित्याचा शिष्य म्हणून जैमिनीय उपनिषद् ब्राह्मणांत(३.४२,१) त्याचा उल्लेख आहे.

[५८]विश्वकर्मन्.—सामविधान ब्राह्मणाच्या शेवटच्या वंशावरून हा नारदाचा शिष्य असल्याचें दिसतें.

[५९]वैपश्चित दार्ढजयन्ति गुप्त लौहित्य.—हा वैपश्चित दार्ढजयन्ति दृढजयन्त लौहित्य याचा शिष्य असल्याचें जैमिनीय उपनिषद् ब्राह्मणांतील एका वंशावरून (३. ४२, १) दिसतें

[६०]वैपश्चित दार्ढजयन्ति दृढजयत लौहित्य.—हा विपश्चित दृढजयन्त लौहित्य याचा शिष्य असल्याचें जैमिनीय उपनिषद् ब्राह्मणांतील वंशावरून दिसतें.

[६१]शवस्.—हा अभिभू काश्यपाचा शिष्य असल्याचें वंशब्राह्मणावरून दिसतें

[६२]शाकदास भाडितायन.—विचक्षण ताण्ड्याचा शिष्य म्हणून त्याचें नाव वंशब्राह्मणांत आलें आहे.

[६३]शांखायन.—कौषीतकी ब्राह्मणांत त्याचा उल्लेख नाहीं, पण शांखायन आरण्यकांतील शेवटच्या वंशांत त्याचें नाव असून त्या आरण्यकाबद्दल गुणाख्याला प्रमाणभूत मानितात. श्रौतसूत्रांत शांखायनाचें नाव मुळींच आढळत नाहीं, परंतु आश्वलायन गृह्यसूत्र शांखायनाला आचार्य म्हणून मानितें अलीकडील कालांत ही शाखा उत्तर गुजराथेंत पसरली. तैत्तिरीय प्रातिशाख्यांत काण्डमायनाबरोबर शांखायनाचाहि उल्लेख आहे.

[६४]श्यामजयंत लौहित्य.—या आचार्याचा जयंत पाराशर्याचा शिष्य म्हणून जैमिनीय उपनिषद् ब्राह्मणाच्या वंशांत उल्लेख आहे त्याच ठिकाणीं त्या नांवाच्या दुसऱ्या एका मनुष्याचा मित्रभूति लौहित्याचा शिष्य म्हणून उल्लेख आहे.

[६५]श्यामसुजयंत लौहित्य.—या आचार्याचा कृष्णधृति सात्यकीचा शिष्य म्हणून जैमिनीय उपनिषद् ब्राह्मणांतील वंशांत (३.४२,१) उल्लेख आहे

[६६]श्रवणदत्त कौहल.—या आचार्याचा सुशारद शालंकायनाचा शिष्य म्हणून वंशब्राह्मणांत उल्लेख आहे.

[६७]सत्यकाम जाबाल.—छान्दोग्यांत, श्रद्धा व तप हीं महोपासनेचीं अंगें आहेत हें दाखविण्याकरितां पाठीं पुढें कथा आली आहे ती अशी—जबाला नामक स्त्रीला सत्यकाम नांवाचा पुत्र होता तो आपल्या मातेला दोन

मारून म्हणाला, "आई, मी आचार्यगृहीं राहून ब्रह्मचर्य पालन करून अध्ययन करूं इच्छितों. तर माझें गोत्र कोणतें तें मला सांग." [ गुरूजवळ गोत्र सांगणें अवश्य असे असें दिसतें ] ती त्याला म्हणाली, "बाळा, तुझें गोत्र काय तें मला माहीत नाहीं. पतिगृहीं अतिथिअभ्यागतादिकांच्या सेवेमध्यें व इतर कामांमध्यें मी अत्यंत व्यग्र होतें. शिवाय मी तरुण होतें तेव्हां तूं मला झालास; म्हणून मी गोत्र विचारलें नाहीं. तूं झाल्याबरोबर तुझा पिता मरण पावला. म्हणून तुझें गोत्र काय तें मला माहीत नाहीं. माझें नांव जबाला आहे आणि तुझें नाव सत्यकाम आहे एवढेंच मला माहीत आहे. तेव्हां मी जबालेचा पुत्र सत्यकाम आहे असें आपल्या गुरूला सांग." नंतर तो सत्यकाम गौतम हारिद्रुमत यांजकडे जाऊन मोठ्या नम्रतेनें म्हणाला, "हे भगवन्, ब्रह्मचर्यानें आपल्याजवळ राहून अध्ययन करावें या हेतूनें मी आपणाकडे आलों आहें." तेव्हां गौतम म्हणाला, "बाळा, तुझें गोत्र काय?" त्यावर त्यानें मातेनें सांगितलेलें सत्य गौतमाला सांगितलें. तें ऐकून गौतम म्हणाला, "तूं ब्राह्मणच आहेस. ब्राह्मणेतर असें सत्य भाषण करणार नाहीं. तूं सत्यापासून परावृत्त झाला नाहींस म्हणून मी तुझें उपनयन करतों समिधा घेऊन ये." या प्रमाणें त्याचें उपनयन केल्यानंतर कृश व अशक्त अशा चारशें गाई गोठ्यांतून सोडून गौतमानें त्याला त्यांच्या मागें जाण्यास सांगितलें. त्या गाई अरण्याकडे नेतांना, यांच्या सहस्र गाई झाल्याखेरीज आपण परत येणार नाहीं, अशी त्यानें प्रतिज्ञा केली. नंतर तो वर्षभर गाईंसह वनांत राहिला व तोंपर्यंत एक हजार गाई झाल्या. पुढें वायुदेवतेनें संचार केलेल्या एक ऋषभानें त्याला ब्रह्माचा चतुर्थांश म्हणजे काय हें सांगितलें; व दुसरा चवथा भाग अग्नि तुला सांगेल, असें म्हटलें. नंतर तो आचार्यगृहीं येऊन त्यानें अग्नि प्रदीप्त करून त्याची सेवा केली, व अग्नीनें त्याला ब्रह्माच्या दुसऱ्या चतुर्थांशाचें ज्ञान सांगितलें. पुढें सत्यकामानें आदित्यरूपी हंसाची सेवा केली व त्यानें तिसऱ्या पादाचें ज्ञान सांगितलें. चवथा पाद प्राणरूपी मद्गु नांवाच्या जलचर प्राण्यानें सांगितला. नंतर तो आचार्यगृहीं आला. त्याचें मुखावलोकन करून गौतम म्हणाला, "बाळा, तूं ब्रह्मवेत्त्याप्रमाणें दिसतोस. तुला कोणी उपदेश केला?" सत्यकामानें उत्तर दिलें की "मनुष्याहून इतर अशा देवतादिकांनीं मला उपदेश केला. आतां माझी ज्ञान ऐकण्याची इच्छा असतांना आपणच तें सांगू शकाल. आपल्या सारख्या इतर गुरूंकडून मी ज्ञान संपादन केलें. परंतु जी विद्या आचार्यापासून ज्ञात होते तीच अत्यंत कल्याणकारक होते." हें ऐकून गौतम त्याला म्हणाला "तूं जें जाणलें आहेस त्याहून अधिक ज्ञान कांहींच उरलें नाहीं."

[६८] सत्ययज्ञ पौलुषि — ह्या आचार्याचा उल्लेख शतपथांत ( १०. ६, १, १ ). आहे. छान्दोग्योपनिषदांत एवढेंच नांव छान्दोग्यांत [ ५. ११, १ ] आलें आहे. जैमिनीय उपनिषद् ब्राह्मणांत [ ३. ४०.२ ] हा पुरुष प्राचीन योग्य ह्याचा शिष्य असल्याचा उल्लेख आहे.

[६९] संवर्गजित् लामकायन.— वंशब्राह्मणावरून हा शाकदासाचा शिष्य दिसतो.

[७०] साकल्य — बृहदारण्यकाच्या माध्यंदिनप्रतीतील पहिल्या दोन वंशांत पाराशर्याचा हा गुरु असल्याचा उल्लेख आहे' असें मॅकडोनेल म्हणतो.

[७१] साकमश्व देवरात. — हा आचार्याचा विश्वामित्राचा शिष्य म्हणून शांखायन आरण्यकाच्या शेवटच्या वंशांत उल्लेख आहे.

[७२] सायकायन श्रुतैय — जैमिनीय उपनिषद् ब्राह्मणांत [ ३ ४०, २ ] या आचार्याचा शंगुसुत काण्ड्वी याचा शिष्य म्हणून उल्लेख आहे.

[७३] सुदत्त पाराशर्य — जैमिनीय उपनिषद् ब्राह्मणांत ( ३ ४ ११; ४ १७ १ ) ह्या आचार्याचा जनश्रुत काण्वयाचा शिष्य म्हणून उल्लेख आहे.

[७४] सुधर्मा तऔलून.— वंशब्राह्मणांत, बृहस्पतिगुप्ताचा शिष्य म्हणून ह्याचा उल्लेख आहे.

[७५] सुमन्त्र बाभ्रव गौतम —वंशब्राह्मणांत ह्या आचार्याचा, शूष वाह्नेय भारद्वाज या शिष्य म्हणून उल्लेख आहे.

[७६] सुमन्यु —शांखायन आरण्यकाच्या वंशांत ( १५ १ ) हा बृहद्दिवाचा शिष्य असल्याचा उल्लेख आहे.

[७७] सुयज्ञ शांडिल्य.— जैमिनीय उपनिषद्ब्राह्मणांत [ ४ १७, १ ] कंस वारक्याचा शिष्य म्हणून ह्याचा उल्लेख आहे. दुसरा सुयज्ञ शांखायन हा गृह्यसूत्राचा कर्ता आहे.

[७८] सुशारद शालंकायन —वंशब्राह्मणांत ह्या आचार्याचा ऊर्जयन्ति औपमन्यव याचा शिष्य म्हणून उल्लेख आहे.

[७९] सोम प्रातिवेश्य —शांखायन आरण्यकाच्या वंशांत ह्या आचार्याचा प्रतिवेश्याचा शिष्य म्हणून उल्लेख आहे.

[८०] सौकरायण — बृहदारण्यकाच्या काण्वप्रतीतील दुसऱ्या वंशांत ह्या आचार्याचा काषायणाचा शिष्य म्हणून उल्लेख असून, माध्यंदिन प्रतीतील वंशांत त्रैवणि ह्याचा शिष्य असल्याचा उल्लेख आहे.

[८१] हरित कश्यप —बृहदारण्यकाच्या शेवटच्या वंशावरून हा आचार्य कश्यप याचा शिष्य दिसतो.

[८२] हृत्स्वाशय आल्लकेय.—जैमिनीय उपनिषद् ब्राह्मणांतील वंशांत ( ३ ४०, २ ) सोमशुष्म सात्ययज्ञि प्राचीनयोग्य ह्याचा शिष्य म्हणून याचा उल्लेख आहे.

पितृकनामें [ संहितेतर ]

| | | |
|---|---|---|
| [१] आजीगर्तसौयवस | [३] आमतर आग्नि- अथवा आग्नि- तर आग्नि आग्निवार्ति | [४] आग्नेय आग्नेयीपुत्र आग्नि |
| [२] अभ्यग्निऐतशायन | | [५] आरुणि |

६ आरुणेय
७ आर्तभागीपुत्र
आलंबायनीपुत्र
आलंबीपुत्र
८ आविक्षित
९ आश्वत्थ
१० आह्नेय
११ उद्दालक आरुणि
ऊर्जयंत औपमन्यव
१२ ऐमावत
१३ ऐरावत
ऐपुमत
१४ औदान्य
औदवाहि
१५ औदुंबरायण
औद्धारी
१६ औपमन्यव
१७ औपवेशि
औपस्वस्तीपुत्र
१८ औपोदिति
१९ और्णवाभ
औलुंडय
औद्दालकि
२० कुशब स्वायव लातव्य
२१ काक्षसेनि
काण्वीपुत्र
२२ कात्यायनीपुत्र
२३ कापिलेय
कापीपुत्र
२४ काप्य
२५ कावन्धि
२६ कामलायन
कांबोज औपमन्यव
कार्शकेयीपुत्र
२७ काश्यप
काश्यपीबालाक्या माठरीपुत्र
काहोडि
कृष्णदत्त लौहित्य
२८ कृष्णदेवकीपुत्र
कृष्णधृति सात्यकि
कृष्णरात लौहित्य
केतुवाज्य
कैरिशि
कैशोर्य
कौण्डिन्यायन
२९ कौत्स
कौत्सीपुत्र
कौपयेय
कौभ्य
कौरव्यायणीपुत्र
३० कौशाम्बेय
१ कौशिक
कौशिकायनि
कौशिकीपुत्र
कौश्रेय
३१ कौषारव
३२ कौषीतकि
कौष्य
३४ कौसुरुबिंदि
कौहड
क्रातुजातेय
क्रौतवैतहोत्र
क्रौंचिकीपुत्र
३५ क्षेमधृत्पौंडरीक
क्षैमि
६ खंडिक औद्भारि
खार्गलि
गर्दभीमुख
गल्नस आर्क्षाकाणेय
गार्गीपुत्र
३७ गार्ग्य
गार्ग्यायणि
३८ गिरिक्षित औपमन्यव
३९ गिरिज बाभ्रव्य
गुप्त
गौतमीपुत्र
४० गौतम
गौतमीपुत्र
४१ गौपालायन
४२ गौश्रायणि
चाक्रायण
चांपनायन
चूड भागवित्ति
३ चैकल शाडिल्यायन
४४ चैकितानेय
चैलाकि
४५ जनशार्कराक्ष्य
जनक लौहित्य
जयन्तीपुत्र
४६ जलजातूकर्ण
४७ जातूकर्ण्य
४८ जान
जानश्रुती
४९ जानश्रुतेय
५० जानंतपि
५१ जाबाल
जाबालायन
जारत्कारव
जैवंतायन
५२ ज्वालायन
ताण्ड्य
त्वष्टृ
त्रत ऐपुमंत
त्रैधातव
दात्रेय
५३ दातेय
५४ दाधीच
दार्थेय
दालिभ
५५ दाल्भ्य
५६ दृतिऐंद्रोत
५७ दृप्तबालाकि गार्ग्य
देवतरस श्यावसायण काश्यप
देवरात
५८ दैव्यापति
५९ दैवल
धान्व
धीरशातपार्णेय
नैध्रुवि
६० पाचि
पातंचलकाप्य
पाटव
पाराशर्य
पाराशरीकौंडिनीपुत्र
पाराशरीपुत्र
पार्णवल्कि
६१ पार्षति
पुलुषप्राचीनयोग्य
पैंगीपुत्र
६२ पैंग्य
६३ पौंडरीक
पौतिमाषीपुत्र
पौतिमाष्य
पौतिमाष्यायण
६४ पौरुशिष्टि
पौलुषि
पौशायन
६५ पौष्करसादि
प्रतिबोधीपुत्र
प्रवाहण जैवलि अथवा जैवल
प्राचीनयोगीपुत्र
प्राचीनयोग्य
६६ प्राजापत्य
प्रातिबोधीपुत्र
प्रातृद
प्राध्वंसन
प्रारेय
६७ प्रावहि
प्राश्नीपुत्र-आसुरिसिन
प्रियव्रतसोमापि
६८ प्रैय्यमेध
प्लाक्षि
प्लात
बभ्रकौम्भ्य
बभ्रव
बवशाजद्विप
बर्कुवार्ष्ण
भस्तरामकायन
बादरायण
बाध्योग
बाभ्रव्य
बालंदन
६९ बुधसोमायण
बलिलआश्वतर
बैजवाप
बैजवापायन
बैजवापि
बैद
बोधीपुत्र
७० बौधायन
ब्रह्मदत्त चैकितानेय
७१ भद्रसेन आजातशत्रव
भागवित्ति
भाडितायन
भानुमंत औपमन्यव
७२ भारद्वाजायन
भारद्वाजीपुत्र
७३ भार्गव
भार्गायण
भार्ग्याश्व
भालुकीपुत्र
भाल्ल
भाल्लविन्
७४ भाल्लवेय
भुज्यु लाह्यायनि
७५ भौवायनि
७६ मद्रगारशौंगायनि
मधुक पैंग्य
मशक गार्ग्य
७७ महाचमस्य
७८ महिदास ऐतरेय
माक्षव्य
७९ माडव्य
८० माण्डूकीपुत्र
माण्डूकेय
माण्डूकायनीपुत्र
माथरि
माधव
माधुकि
माध्यंदिनायन
मानव
मानतंतव्य
८१ माल्य
माहाकि
माहित्थि
मित्रभू काश्यप
मित्रभूति लौहित्य
मित्रवर्चस स्थैरकायण
मित्रविंद काश्यप
मैत्रेय
८२ मौन
मौषिकीपुत्र
यज्ञवचस् राजस्तंबायन
यशस्विन जयंत लौहित्य
याज्ञतुर
८३ याज्ञवल्क्य
यास्क
राजस्तंबायन
८४ राथीतर
राथीतरीपुत्र
राधगौतम
राधेय
राम औपतस्विनि
राम क्रातुजातेय
८५ राहूगण
रैभ्य
रौहिण
रौहिणायन
लागलायन
८६ लातव्य
८७ लामकायन
लाह्यायन
लुशाकपि खार्गलि
८८ लौहित्य
वत्सनपात बाभ्रव
८९ वाजरत्नायन
९० वाजश्रवस
९१ वाजसनेय
वाज्य
वातवंत
वार्ष्णि
वात्सीमाण्डवीपुत्र
वात्सीपुत्र
वात्स्य
९२ वात्स्यायन
वारयव

| | | |
|---|---|---|
| वारुणि | शाक्त | [१०३] सांजीवीपुत्र |
| वार्कलि | शाण्डिल | सात्ययज्ञि |
| वार्कारुणीपुत्र | शाण्डिलीपुत्र | सात्राजित |
| वार्षगण | [९६] शाण्डिल्य | साचासह |
| वार्षगणीपुत्र | शाण्डिल्यायन | सारथवाहिनी |
| वार्षगण्य | शातपर्णेय | [१०४] सायकायन |
| वार्ष्णेय | [९७] शाट्यायन | [१०५] सावयस |
| वार्ष्ण | शार्कराक्ष | सैतव |
| वार्ष्ण्य | [९८] शार्कराक्ष्य | [१०६] सोमशुष्मसा- |
| विचारिन्कावंधि | शालंकायन | त्ययज्ञि |
| विपश्चकाश्यप | शालंकायनीपुत्र | [१०७] सौजात |
| विश्वकर्मन्भौवन | शावशायन | आराह्ळि |
| वृषशुष्मवातावत | [९९] शिखंडिन् | सौवल |
| वैदव | यज्ञसेन | सौभर |
| वैदभृतीपुत्र | शिलकशालावत्य | सौमाप |
| वैपश्चित | [१००] शैलालि | सौमापि |
| वैयाघ्रपदीपुत्र | शौंगीपुत्र | सौमायन |
| वैयाघ्रपद्य | शौच | सौयवसि |
| [९३] वैरूप | [१०१] शौनक | [१०८] सौश्रवस् |
| [९४] वैशंपायन | शौनकीपुत्र | सौश्रोमतेय |
| वैश्वामित्र | शौर्पणाय्य | आपाडि |
| वैष्टपुरेय | श्यावसायन | स्थैरकायण |
| व्यासपाराशर्य | शुपवान्हेयकाश्यप | [१०९] स्थौलष्ठीवि |
| शंखबाभ्रव्य | श्रौतआर्षि किंवा | स्वायव |
| शंगशालायनि | श्रौतर्षि | स्वैदायन |
| शाण्डिल्य आत्रेय | श्रौमत्य | हारिकार्णीपुत्र |
| [९५] शाकल्य | [१०२] श्वेतकेतु आरु- | हारिद्रुमत |
| शाकायन्य | णेय औद्दालकि | हैतनामन् |

[१] अजीगर्त सौयवसि—ऐतरेय ब्राह्मणांत (७. १५) शुनःशेपाच्या बापाचें नांव म्हणून हा शब्द आला आहे. हा सुयवस्‌चा मुलगा असावा.

[२] अभ्यग्नि ऐतशायन.—याचा उल्लेख ऐतरेय ब्राह्मणांत (६. ३३) आला आहे. याच्या बापाचें नांव ऐतश. आपल्या मुलापुढें कांहीं मंत्रपठण करीत असतां ते मंत्र अश्लील आहेत असें समजून त्याचा मुलगा अभ्यग्नि यानें त्याच्या तोंडावर हात ठेवून त्याचें मंत्रपठण बंद पाडलें त्यामुळें यानें रागावून तुझें कुल अत्यंत पापी होईल असा शाप दिला व त्याप्रमाणें सर्व औवें कुलांतील त्या ऐतशायन पुत्र अभ्यग्नीला व त्याच्या संततीला पापिष्ट समजूं लागलें असें तेथें म्हटलें आहे. शांखायन ब्राह्मणांत (३०. ५) वरील प्रमाणेंच गोष्ट असून तेथें ऐतशायनाला औवेंकुलोत्पन्न न म्हणतां भृगुकुलोत्पन्न म्हटलें आहे. और्व व भृगु यांचा अगदीं निकट संबंध अथवा एकाच कुलाच्या या दोन शाखा असाव्या. ऋग्वेदापासून याचा एकत्र उल्लेख आढळतो.

[३] अश्वतर आश्वि.—ऐतरेय ब्राह्मणांत (६. ३०) हें बुडिल याचें पितृप्राप्त नांव आहे. सायणमतानें हा अश्व याचा मुलगा व अश्वतर याचा वंशज आहे. सत्रांतील कांहीं शंसनासंबंधीं गौश्ल याच्या बरोबर याचा कांहीं संवाद झाल्याबद्दल तेथें उल्लेख आहे.

[४] आत्रेय.— बृहदारण्यकोपनिषदांत (२. ६, ३) मांटीचा शिष्य म्हणून याचा उल्लेख आहे. ऐतरेय ब्राह्मणांत (८. २२) अंग राजाचा पुरोहित म्हणून एका आत्रेयाचा उल्लेख आहे. शतपथ ब्राह्मणांत (१. ४, ५, १३) गर्भाला अत्रि म्हटलें आहे व गर्भरूप ऋतूचा स्राव होणाऱ्या (ऋतुमती) स्त्रीला आत्रेयी म्हटलें आहे.

[५] आरुणि —उद्दालक याचें हें पैतृक नांव आहे. याचा उल्लेख जैमिनीय उपनिषद् ब्राह्मण (२. ४, १) आणि काठक संहितेंत (१३. १२) आहे.

[६] आरुणेय.— औपवेशि याच्या कुलांतील उद्दालक आरुणि याचा मुलगा श्वेतकेतु याचें हें पितृप्राप्त नांव आहे. याचा शतपथ ब्राह्मण [१०. ३, ४, १] व छांदोग्य उपनिषद [४ ३, १] यांत उल्लेख आहे.

[७] आर्तभागीपुत्र.—बृहदारण्यकोपनिषदांत (६.५२) हा शौंगीपुत्र याचा शिष्य असल्याचा उल्लेख आहे. आर्तभागीपुत्र व शौंगीपुत्र हीं दोनहि नांवें मातृप्राप्त म्हणजे मातेच्या नांवावरून आलेलीं आहेत.

[८] आविक्षित.—मरुत्त याचें पितृप्राप्त नांव. याचा उल्लेख शतपथ ब्राह्मणांत [१३. ५, ४, ६] व ऐतरेय ब्राह्मणांत (८. २१) आला आहे. या मरुत्ताचें कामप्रि असें दुसरें नांव होतें.

[९] आश्वत्थ्य.—अहीना याचें पितृप्राप्त नांव. याला सावित्राग्नीसंबंधीं ज्ञान असल्याबद्दल तैत्तिरीय ब्राह्मणांत (१०. ९, १०) उल्लेख आहे. तेथें हा सावित्राग्नीच्या ज्ञानानें, हिरण्मय रूप होऊन स्वर्गास गेल्याचा उल्लेख आहे.

[१०] आह्नेय.—शौच याचें मातृप्राप्त नांव. स्वाध्याया संबंधीं जे नियम आहेत त्यांत ग्रामाच्या बाहेर जाऊन अध्ययन करावें असा नियम आहे. परंतु ग्रामाबाहेर जाणें शक्य नसेल तर ग्रामांतच अध्ययन करावें असें मत याचें असल्याचा तैत्तिरीय आरण्यकांत (२. १२) उल्लेख आहे.

[११] उद्दालक आरुणि.—अरुणाचा मुलगा उद्दालक हा मोठा प्रसिद्ध अध्यापक होऊन गेला. शतपथ ब्राह्मणांत (११. ४, १२) उल्लेखिल्याप्रमाणें तो कुरुपंचालापैकीं ब्राह्मण होता या विधानाला तो प्रैतिकौसुरु बिंदेकौशाबि (शतपथ १२, २, २, १३) याचा गुरु असून त्याचा मुलगा श्वेतकेतु हा पंचालाच्या सभेंत प्रवाहणपुत्र जैवलि राजा याच्या बरोबर वाद करावयास गेल्याबद्दल बृहदारण्यकांत [६. २, १] जो उल्लेख आहे त्यानें दृढता येते. याचा पिता अरुण हा पातंचल काप्य याचा शिष्य असून प्रसिद्ध याज्ञवल्क्य वाजसनेय आणि कौपीतकि याचा शिष्य होता (बृह० ३. ७, १) दुसऱ्या एका स्थलीं याला (बृह० ३. ७, २२) वाजस-

ल्याने निरुत्तर केल्याचा उल्लेख आहे. यानें प्राचीनयोग्य शौचेय ( शतपथ ११. ५, ३, १ ) आणि यज्ञातशत्रव भद्रसेन ( शतपथ ५. ५, ५. १४ ) यांना घादास शिकविल्याचा उल्लेख आहे तो गौतम होता असाबद्दल शतपथ ब्राह्मण ( ११ ५ ३, २ ) आणि कौषीतकि उपनिषद् ( ११ ) यांत उल्लेख आहे. त्याची धार्मिक व तत्त्वज्ञानासंबंधी विशिष्ट मतें प्रमाण मानिली जात असा बद्दल शतपथ ब्राह्मणात [ १ १,२,११: ३. ३, ४, १९ ], बृहदारण्यक उपनिषदात ( ३ ५, १ ) छांदोग्य उपनिषदात [ ३ ११, ४ ] व ऐतरेय ब्राह्मणात उल्लेख आहे गेल्डनेर म्हणतो की, मैत्रायणी संहितेंत याचा व याचा बाप अरुण याचाहि उल्लेख आहे. वेबर म्हणतो कीं याच उल्लेख काठक संहितेंत [ ७. ८ ] हा दिवोदास भैमसेनि याच्या समकालीन अ त्याबद्दल व जैमिनीय उपनिषद् ब्राह्मणात वासिष्ठाला चैकितान याच्याकडे उपदेश घेण्यासाठी गेल्या । व तेथ त्याला गौतम या नावानें संबोधिल्याचा [ १ ४२, १ ] उल्लेख आहे तैत्तिरीय संहितेत ( ७ २, २१ ) कुसुरुबिंद आरुणि [ उद्दालक पुत्र ] याचा उल्लेख आला आहे आणि तैत्तिरीय ब्राह्मणात [ ३. ११, ८ ] ज्याला भाष्यकार सायण उद्दालक म्हणतात तो नचिकेतस् वाजश्रवस गौतम याचा मुलगा होता. आपस्तंब सूत्रात एका गोष्टींत त्याचें मत प्रमाण म्हणून मानलें आहे आणि ही गोष्ट आरुणीच्या कालासंबंधीं महत्वाची आहे.

[12] ऐभावत.—इभावताचा वंशज हे प्रतीदर्श याचें पितृप्राप्त नाव असल्याबद्दल शतपथ ब्राह्मणात [ १२.८,२३ ] उल्लेख आहे.

[13] ऐरावत.—इरावताचा वंशज धृतराष्ट्र सर्पासुर याचें हें पितृप्राप्त नाव असल्याबद्दल पंचविंश ब्राह्मणात [ २५ १५ ३ ] उल्लेख आहे. त्यात वर्णिलेल्या सर्पसत्रात हा ब्रह्मा नामक ऋत्विज होता.

[14] औदन्य.—उदन्य अथवा औदन याचा वंशज शतपथ ब्राह्मणात [ १३ ३.५ ४ ] ब्रह्महत्येबद्दल प्रायश्चित्त सांगणारा मुंडिभ याचें हे पितृप्राप्त नाव आहे तैत्तिरीय ब्राह्मणात [ ३.९ १५ ३ ] याचा उल्लेख आहे परंतु तेथ तो भ्रूणहत्येच्या पातकाबद्दल प्रायश्चित्त सांगणारा म्हणून आला आहे.

[15] औदुंबरायण.—उदुंबराचा वंशज. निरुक्तात [ १. १ ] एक वैयाकरण म्हणून याचा उल्लेख आहे

[16] औपमन्यव.— हें नाव पुष्कळ अध्यापकांना लावलेलें आढळून येतें. गौतम धर्मसूत्रात [ २२ १ ] एका मंत्राच्या पठणाचें नियम सांगणारा म्हणून याचा उल्लेख आला आहे यास्काचार्याच्या निरुक्तात एक व्याकरणकार म्हणून याचा उल्लेख बऱ्याच ठिकाणीं आला आहे वस्त्वादिकांना जी नांवें पडतात ती त्या पदार्थाचा जो ध्वनि असतो त्यावरून पडतात या मताचा औपमन्यव यानें तेथें निषेध केला आहे.

[17] औपवेशि.— उपवेशाचा वंशज. उद्दालकपिता अरुण याचें हें पितृप्राप्त नाव. याचा उल्लेख काठक संहितेंत ( २२.१० ) आला आहे.

[18] औपोदिति.—उपोदित याचा वंशज तैत्तिरीय संहितेंत तुमिंजय याचें हें पितृप्राप्त नांव आहे ( १.७,२;१ ) बौधायन श्रौतसूत्रात कुरूंचा स्थपति ( सेनानी ) व्याघ्रपाद याचा मुलगा गोपालायन याचें हें पितृप्राप्त नाव आहे शतपथ ब्राह्मणांत ( १ ९ ३;१६ ) उपोदिता नामक स्त्रीचा मुलगा म्हणून औपोदितीचा उल्लेख आला आहे.

[19] और्णवाभ.—ऊर्णवाभाचा वंशज बृहदारण्यकोपनिषदात ( ४ ५ २६ ) कौण्डिन्य याच्या शिष्याचें हें नांव आहे यास्काच्या निरुक्तात याचा उल्लेख आलेला आहे. तेथ तीन ठिकाणीं ( ७ १२; ) तो नैरुक्त नामक व्याकरणकाराच्या मताचें अनुसरण करतो व दोन ठिकाणीं ( ६ १३;१२;१ ) ऐतिहासिक याच्या मताचें अनुकरण करतो. यावरून सीज म्हणतो कीं, हा सर्व संग्राहक असा होता.

[20] कुशाम्ब स्वायव लातव्य.— पंचविंश ब्राह्मणात ( ८.६ ८ ) याचा उल्लेख आला आहे. याचें स्पष्ट नांव म्हणजे लातव्य कुलांतील स्वायूचा मुलगा कुशाम्ब असें आहे. तेथें एका सामाम धानें याचा उल्लेख आला आहे.

[21] काक्षसेनि. कक्षसेनपुत्र, पंचविंशब्राह्मणात ( १.१.१२ ) अभिप्रतारिन् याचें पितृप्राप्त नाव म्हणून उल्लेख आहे. याचा दृत ऐंद्रोत याच्याबरोबर ज्ञानी व अज्ञानी लोकांच्या संबंधीं संवाद झाल्याचा उल्लेख आहे.

[22] काश्यपीपुत्र.—गौतमीपुत्र व कौशिकीपुत्र याचा हा शिष्य असल्याबद्दल बृहदारण्यकोपनिषदात ( ६. ५, १ ) उल्लेख आहे. शांखायन आरण्यकात ( ८.१० ) जातूकर्ण्य नामक एका कात्यायनीपुत्राचा उल्लेख आहे.

[23] कापिलेय.—ऐतरेय ब्राह्मणात [ ७ १७ ] शुनःशेपाला विश्वामित्रानें मृत्यूपासून सोडविल्यानंतर आपल्या मांडीवर घेतलें त्याचा बाप अजीगर्त हा शुनःशेपाला परत मागूं लागला असता 'शुनःशेप हा माझा मुलगा आहे, व हे कापिल आणि बाभ्रव याचे बंधु आहेत' असें विश्वामित्रानें उत्तर दिल्याचा तेथें उल्लेख आहे यावरून कापिल व बाभ्रव हे विश्वामित्राच्या कुलांतील असावेत असें दिसतें.

[24] काप्य.—( कपिवंशज ) जैमिनीय ब्राह्मणात ( ३ २.३३ ) त्र भैंदुकीय याच्या सत्रात आर्त्विज्य करणाऱ्या सनक आणि नवक यांचें पैतृक नाव. बृहदारण्यकोपनिषदांत ( ३ २,१ ) पातंचल याचेंहि काप्य हें पैतृक नाव आहे.

[25] कावन्धि — कबन्धाचा वंशज. गोपथब्राह्मणांत ( २.१०,१८ ) याचा उल्लेख आहे. तेथें याला आथर्वण असें म्हटलें असून पहिल्या उतान्यात ( २.९ ) मातेच्या आज्ञेवरून तो मांधाता यौवनाश्व नामक सार्वभौम राजाच्या यज्ञाला गेला आणि तेथें त्यानें यजमान व ऋत्विज यांना

कांहीं प्रश्न विचारल्याचा उल्लेख आहे आणि दुसऱ्या उतान्यांत (२.१८) अग्न्याधानासंबंधीं आदयायिकेंत जलापासून उत्पन्न झालेल्या अशा अश्वापासून चारहि वेद भीतिपावल त्या अश्वानें या कावष्यानें शमन केल्याचा उल्लेख आहे याला व त्यारिन् अग्नीहि दुसरें नाव आहे.

[२६] कामलायन—कमलाचा वंशज. उपकोसल याचें पितृप्राप्त नाव या उपकोसलानें सत्यकाम जाबाल याच्या घरीं बारा वर्षें अध्ययनासाठीं राहून त्याच्या अग्नींची परिचर्या केली परंतु सत्यकामानें याला ब्रह्मज्ञानाचा उपदेश केला नाहीं. शेवटीं अग्नीनें प्रसन्न होऊन याला उपदेश केला.

[२७] काश्यप—हें एका विस्तृत अशा कुलाचें नाव आहे शतपथ ब्राह्मण (७.५,१,५) प्रमाणें सर्व उत्पन्न केलेल्या सर्वच प्रजा काश्यप (कश्यपकुलोत्पन्न) आहेत असें म्हटलें आहे

[२८] कृष्ण देवकीपुत्र—छान्दोग्योपनिषदांत (३. १७, ६) पुरातन अशा घोर आंगिरसाचा हा शिष्य असल्याचा उल्लेख आहे प्रथमतः ग्रहानबाढर आणि दुसरे कांहीं लेखक म्हणतात कीं, भागवतांतील जो अवतारी कृष्ण झाला आहे तो व छांदोग्य उपनिषदांतील देवकीपुत्र कृष्ण हे एकच त्यांच्या मतें हा मागील कृष्ण ब्राह्मणधर्मविरोधक व क्षत्रियधर्म प्रवर्तक असा होता (?) हें विधान अत्यंत शंकनीय आहे दोघांच्या नावांचो साम्यता दिसते ती आकस्मिक घडून आली असावी. अवतारी कृष्ण आणि उपनिषदांतील कृष्ण यांचा सेंटपीटर्सबर्ग कोशाप्रमाणें एकवाक्यता करणें अगदीं अयोग्य आहे

[२९] कौत्स—कुत्सवंशज शतपथ ब्राह्मणांत [१० ६, ५, ९] माहित्थि याचा शिष्य म्हणून याचा उल्लेख आहे निरुक्तांत [१. १५] वेद अनर्थक [अर्थरहित] आहेत या कौत्साच्या मताचा निषेध दाखविला आहे

[३०] कौशाम्बेय—कुशाम्बवंशज सेंटपीटर्सबर्ग कोश व शतपथ ब्राह्मणाप्रमाणें(१२ २,२,१३) प्रोती याचें पितृप्राप्त नाव पंचविंश ब्राह्मणांतहि (८ ६,८) एका कुशाम्बु नामक मनुष्याचा उल्लेख आहे तथ त्यावरील टीकाकार हरिस्वामि हा याला कौशाम्बी नगरीचा रहिवासी असें म्हणतो व तें बरोबर दिसतें

[३१] कौशिक.—कौशिक हें कुलनाम पुष्कळ लेखकांना लावलेलें आढळतें. कांहीं ठिकाणीं इंद्राला कुशिक म्हटलें आहे व विश्वामित्रादिकांना कुशिकपुत्र म्हटलें आहे बृह० उपनिषदांतील परंपरेंत हा कौण्डिन्य याचा शिष्य असल्याचा उल्लेख आहे

[३२] कौषारव—मैत्रेय याचें पितृप्राप्त नाव ऐतरेय ब्राह्मणांत (८ २८) याचा उल्लेख आला आहे यानें सुत्वन कैरिशि भार्गायण नामक राजाला 'शत्रुविनाशक असा परिमर नामक विशिष्ट कर्माचा उपदेश केला

[३३] कौषीतकि—कुषीतक वंशज. याच्या नांवावर कौषीतकी ब्राह्मण आरण्यक, शांखायन श्रौत व गृह्य सूत्रें इत्यादि ग्रंथ असून त्यांतून याच्या मताचा उल्लेख येतो याशिवाय याचा शतपथ ब्राह्मणांत (२ ४, ३, १) उल्लेख आहे. कौषीतकीच्या मताला कौषीतकि मत असें म्हणतात कौषीतकाच्या शिष्यांना 'कौषीतकि' असें म्हणत आणि लुशाकपि यानें या शिष्यांसह कौषीतकीला शाप दिल्याबद्दल पंचविंश ब्राह्मणांत (१७ ४, ३) उल्लेख आहे

[३४] कौसुरुबिन्द—शतपथ ब्राह्मणांत प्रोति कौशाम्बेय याचें पैतृक नाव म्हणून याचा उल्लेख आहे गोपथ ब्राह्मणांत [१, ४, २४] एका कौशाम्बेय कौसुरुबिंदूचा उल्लेख आला आहे

[३५] क्षेमधृत्वन पौण्डरीक—यानें सुदामन नदीच्या तीरावर यज्ञ केल्याबद्दल पंचविंश ब्राह्मणांत (२२ १८, ७) उल्लेख आहे

[३६] खण्डिक औद्भारि—शतपथ ब्राह्मणांत (११ ८, ४, १) आणि मैत्रायणि संहितेंत (१ ४ १२) केशिन् यानें खण्डिक औद्भारि याचा पराभव केल्याबद्दल उल्लेख आहे बौधायन श्रौतसूत्रांतहि केशिन् याचा शत्रु असलेल्या एका खण्डिकाचा उल्लेख आहे

[३७] गार्ग्य—बृहदारण्यक(२ १,१)आणि कौषीतकी आरण्यक (? १) यांत बालाकि याचें पितृप्राप्त नाव म्हणून उल्लेख आला आहे तैत्तिरीय आरण्यकांत गार्ग्य हा पंचकर्ण वात्स्यायन व सप्तकर्ण प्लाक्षि यांना योगमार्गानें महामेरूवर जाण्यास सांगत असल्याचा उल्लेख आहे (१ ७,२) गार्ग्यांचा उल्लेख निरुक्तांत आणि धर्मसूत्रांतहि आढळतो

[३८] गिरिक्षित् औच्चामन्यव—हा उच्चामन्यूचा वंशज याचा पंचविंश ब्राह्मणांत (१० ५,७) उल्लेख आहे तेथ याचा अभिप्रतारिन काक्षसेनी याच्याबरोबर संवाद झाल्याचा उल्लेख आहे-

[३९] गिरिज बाभ्रव्य.—ऐतरेय ब्राह्मणांत याचा उल्लेख आहे [७ १] हा श्रुत नामक ऋषीचा मुलगा असून सत्रांतील यज्ञिय पशूचे इडारूप अवयव [हविःशेष] सर्व ऋत्विजांनीं कसे कसे वाटून घ्यावे याची माहिती त्याला एका गंधर्वा(अमनुष्य)पासून मिळाली व ती त्यानें पुढें सर्व लोकांना विदित केली असा उल्लेख आहे.

[४०] गोतम—हें एका कुलाचें अथवा गोत्राचें नाव आहे बृहदारण्यकोपनिषद्, छांदोग्य उ० वंशब्राह्मण, व जैमिनीय उपनिषद् ब्राह्मण यांतील वंशांत गोतम कुलांतील अनेक ऋषींचा उल्लेख आला आहे

[४१] गोपालायन—मैत्रायणी संहितेंत (३ ८, १०, ४) व ऐतरेय ब्राह्मणांत [३ ४८] शुचिवृक्ष याचें हें पितृप्राप्त नाव आहे या शुचिवृक्ष गोपालायनानें वृद्धद्युम्न नामक राजाच्या यज्ञांत एक विशिष्ट याग समुचितरूपानें करून त्या राजाला संतति व संपत्ति प्राप्त करून दिल्याचा ऐतरेय ब्राह्मणांत उल्लेख आहे बौधायन श्रौतसूत्रांत इरूचा जो स्थपति त्याचें देखील

हें पितृप्राप्त नांव आहे पंचविंश ब्राम्हणात ( १२ १३, ११) उपोदिति अथवा औपोदिति याचें गौपालेय असें पितृप्राप्त नांव आहे.

[12] गौश्रायणि —कौषीतकि ब्राम्हणांत ( २३ ५) जाया-सन्नांत विप्र गौश्रायणी नामक एका पुरोहिताचा उल्लेख आहे.

[13] चेलक शाण्डिल्यायन.—शतपथ ब्राह्मणांत एका विशिष्ट कर्मासंबंधीं मताचा प्रवर्तक म्हणून याचा आलेला उल्लेख[१०. ४, ५, ३ ] आहे.

[14] चैकितानेय —जैमिनीय उपनिषद ब्राह्मणात[१ ४२, १] वासिष्ठ चैकितानेय या नांवाचा एक सामविदेचा अध्यापक असल्याचा उल्लेख आहे बृहदारण्यकोपनिषदात [१.३, २४] मामासंबंधीं उल्लेखात वसिष्ठ चैकितानेयाचा नामनिर्देश केलेला आढळतो. याचा पडविंश ब्राह्मणातहि उल्लेख आहे. उपनिषदात शंकराचार्य टीकेमध्यें हा शब्द वडिलाच्या नांवावरून झाला आहे असें म्हणतात महाभारतात चैकितान असें नाव आढळतें. कदाचित् त्यावरूनहि चैकितानेय हें नाव झालें असावें.

[15] जनशार्कराक्ष्य —शतपथ ब्राह्मण [१०. ६, १, १] व छांदोग्योपनिषदात[ ५ ११, १] याचा उल्लेख आहे. हा औपवेशि व त्याचा मुलगा उद्दालक आरुणि याचा समकालीन होता.

[16] जलजातूकर्ण्य.–शांखायन श्रौतसूत्रात [१६.२९,६] यानें काशी, विदेह, व कोसल या लोकाचें अथवा राजाचें पौरोहित्य केल्याबद्दल उल्लेख आहे.

[17] जातूकर्ण्य.– हें अन्याच ऋषींचें पितृप्राप्त नाव आहे जातूकर्ण्य हें नांव आसुरायण व यास्क याच्या शिष्यांनीं दिलेलें बृहदारण्यकांत आढळतें. शांखायन आरण्यकात हा जातूकर्ण्य कात्यायनीचा मुलगा असल्याचा उल्लेख आहे[८ १०] कौषीतकी ब्राह्मणात [२६.५] अलीकयु वाचस्पति व इतर ऋषि यांचा हा समकालीन असल्याचा उल्लेख आहे. ऐतरेय आरण्यक व शांखायन श्रौतसूत्रात याचा उल्लेख आलेला आहे.

[18] जान —याचा पंचविंश ब्राह्मणात (१३.३१२)उल्लेख आला आहे हें वृष याचें पितृप्राप्त नाव आहे. हा वार्श नामक सामाचा द्रष्टा आहे, सायणानी [ ऋ. ५.२ ] या सूक्तावरील भाष्यात शाट्यायन ब्राह्मणांतील एक आख्यायिका दिली आहे तीमध्यें वृष हा इक्ष्वाकु कुलोत्पन्न त्र्यरुण त्रैवृष्ण राजाचा पुरोहित होता. एकदा वृष राजासह रथ हांकीत असतां त्या रथाच्या चक्राखालीं चिरडून एक ब्राह्मणाचें मूल मृत झालें हें मूल कोणाच्या हातून मारलें गेलें याबद्दल राजा व पुरोहित यांमध्यें मोठा वादविवाद होऊन शेवटीं पुरोहिताच्या हातूनच तें मारलें गेलें असा निर्णय ठरल्यामुळे वृषनामक पुरोहितानें तें मूल वार्श नामक साम म्हणून बरें जिवंत केलें असा उल्लेख आहे पंचविंश ब्राह्मणांतहि हीच आख्यायिका थोड्या फरकानें आली आहे.

[19] जानश्रुतेय.—ऐतरेय ब्राह्मणात [१.२५] हें उपावि नामक ऋषींचें मातृप्राप्त नांव आहे तेथें उपसद इष्टीसंबंधीं विधि सांगणाऱ्या दुसऱ्या एका ब्राह्मणग्रंथातील श्रोत्रिय ब्राह्मण प्रशंसा केवळ एक वाक्य दिलें आहे शतपथ ब्राह्मणात [५. १,५] जानश्रुतेय हें औपावि याचें पितृप्राप्त नांव आहे. व तेथें त्यानें वाजपेयानंतर बृहस्पतिसव यज्ञ केल्याचा उल्लेख आहे जैमिनीय उपनिषद ब्राह्मणात हें उलुक्य, नगरिन् व सायक याचें पितृप्राप्त नाव आहे

[20] जानंतपि —ऐतरेय ब्राम्हणात (८ २३) महाभिषेक विधि सांगितला आहे तेथें जानंतपि हा राजा नसता त्याचा गुरु सात्यहव्य यानें त्याला महाभिषेक केल्यामुळें जानंतपीनें सर्व पृथिवी जिंकिल्याबद्दल उल्लेख आहे

[21] जाबाल —महाशाल व सत्यकाम यांचें हें मातृप्राप्त नाव असल्याचा शतपथ ब्राह्मणात [१०, ३, ३, १; १३. ५. ३, १] उल्लेख आहे. जैमिनीय उपनिषद ब्राह्मणात याचा दोन ठिकाणीं [३ ७,३,९, ९] उल्लेख असून कौषीतकी ब्राह्मणात [२३ ५] जाबाल गृहपतीच्या सत्राचा उल्लेख आहे

[22] ज्ञालायन.–जैमिनीय उपनिषद ब्राह्मणात(४.१६,१) गोपूर्काचा शिष्य म्हणून याचा उल्लेख आहे ऋग्वेदातील या सूक्ताचा गोपार्कि हा द्रष्टा असल्याचा सर्वानुक्रमणींत उल्लेख आहे.

[23] दार्तेय —या दार्तेयाचा पंचविंश ब्राह्मणात (२५ ३, ६) यज्ञासंबधीं यथार्थ असें मत देणारे म्हणून उल्लेख आहे याच्या वाक्याला आप्तवाक्य असें नाव. आहे दांत व दांतवंत या नावाच्या ऋषींचें हें पितृप्राप्त नाव आहे. यांनी खादववनात सत्र केल्याचा उल्लेख आहे.

[24] दाधीच.—दधीच वंशज च्यवनाचें हें पितृप्राप्त नांव आहे पचविंश ब्राह्मणात ( १४. ६) याचा उल्लेख आहे हा च्यवन अश्वींचा उपासक असे. अति जरठ झालेल्या या च्यवनाला अश्वींनीं पाण्यात बुडवून त्याची जरा नाहींशी करून त्याला तरुण केलें असा उल्लेख आहे.

[25] दाल्भ्य —दल्भाचा वंशज. हा शब्द दार्भ्य याचा पर्याय असावा हें पंचविंश ब्राह्मणात ( १३. १७,८ )केशाचें, छांदोग्य उपनिषद (१.८,१) व जैं उ ब्राह्मणात २. ३८,१ चैकितानेयाच आणि छांदो० उप० [१ २, १३ ] व काठक संहिता [३०.२] यांत वक यांचें पितृप्राप्त नाव आहे.

[26] दृति ऐन्द्रोत --पंचविंश ब्राह्मणात (१४.१, १२;१५) अभिप्रतारिन याचा समकालीन म्हणून उल्लेख आहे याच प्रधान (२५ ३, ६] दृती वातवंत असा जो उल्लेख आहे त्यांतील दृति व हा दृति हे बहुतेक एकच असावेत महाभारतात एक धीवरमाच्या यज्ञ आचरण्यानें दृतीचा उत्कर्ष झाल्याचा उल्लेख आहे याच्या नांवावर एक गान आहे ऐसें त्याला श्रौतसूत्रांतून उल्लेख आहे.

[27] दृप्तबालाकि गार्ग्य.—बृह० उपनिषदात [२. १,१] काशीच्या अजातशत्रु नामक राजाचा हा समकालीन

असल्याचा व या रामाला उपदेश करण्यासाठी तो गेल्याचा उल्लेख आहे.

[५८] दे व्या प ति.—शाण्डिल्यायनानें याला अग्निचितीच्या इष्टका [विटा]संबंधी माहिती दिल्याचा शतपथ ब्राह्मणात [९. ५, १,१४] उल्लेख आहे. तैत्तिरीय ब्राह्मणात [३.१०,९, ३,५] अत्यंहसाचा समकालीन दृक्ष याला देव्यापति हेंच पितृप्राप्त नाव दिलें आहे.

[५९] दे व ल—असिताचें पितृप्राप्त नाव. याचा पंचविंश ब्राह्मणात [४.११,१८] उल्लेख येतो. हा एका सामाचा द्रष्टा आहे. या सामाच्या योगानें याला भूः भुवः स्वः या तीन लोकांचें अन्तर्ज्ञानानें अवलोकन करण्याचें सामर्थ्य प्राप्त झालें.

[६०] पा चि—शतपथ ब्राह्मणात [१, २, ५, ९] सोमयज्ञातील वेदि तीन अंगुळें खणण्याचा प्रघात यानें सुरू केल्याचा उल्लेख आहे.

[६१] पा र्व ति.—दक्षाचें पितृप्राप्त नाव. याचा उल्लेख शतपथ ब्राह्मणात [२, ४, ४, ६] असून यानें दाक्षायण यज्ञ करून राज्य संपादन केलें असें म्हटलें आहे.

[६२] पैं ग्य.—पिंगाचा वंशज. कौषितकी ब्राह्मणात अनेक ठिकाणीं यज्ञकर्मासंबंधीं त्याच्या मताचा स्वीकार केलेला आहे याच्या मताला पैंग्यमत असेंच म्हटलें आहे. शतपथ ब्राह्मणात [११. ७, २, ८] याचा उल्लेख असून तेथें त्याला पैंग्य मधुक असें म्हटलें आहे. याच्या अनुयायांना निदान (४. ७) आणि अनुपद या सूत्रांत ( १ ८ ) पैंगिन् म्हटलें आहे. आपस्तंब श्रौतसूत्रांत ( ५. १५, ८ ) याचा पैंगायणीब्राह्मण असा उल्लेख आहे. आत्रेयी शाखेच्या अनुक्रमणींत पैंग्य हें यास्काच्या वंशाचें नाव असल्याचा उल्लेख आहे. अश्वलायन गृह्यसूत्रांत ब्रह्मयज्ञांग तर्पणांत याचा उल्लेख आहे.

[६३] पौं ड रा क.—पचविंश ब्राह्मणात [२२.१८,७] क्षेमधृत्वन याच्या वंशाचें नाव आहे. यानें सुदाम्नी नामक नदीच्या उत्तर तीरावर यज्ञ केल्याचा उल्लेख आहे.

[६४] पौ रु शि ष्टि—तैत्तिरीय उपनिषदांत [१९. १ ]तपोनित्याचें हें पितृप्राप्त नाव आहे. तपाचरण हेंच सर्वांत श्रेष्ठ होय, असें याचें मत आहे.

[६५] पौ ष्क र सा दि.—तैत्तिरीय प्रातिशाख्य [७. १७] व शाखायन आरण्यक यांत [ १.७ ] याचा उल्लेख येतो. आपस्तंब धर्मसूत्रांत व इतरत्र पुष्करसादीचा उल्लेख येतो.

[६६] प्रा जा प त्य—प्रजावान् याचें पितृप्राप्त नाव. ऐतरेय ब्राह्मणात [ १. २१ ] याचा उल्लेख आहे ऋग्वेदांतील [१० १८३ ] या सूक्ताचा हा द्रष्टा असून प्रवर्ग्य नामक अनुष्ठानांत हें सूक्त पठण केलें असतां संतति प्राप्त होते असें तेथें म्हटलें आहे.

[६७] प्रा म हि.—कौषीतकी ब्राह्मणात ( २६. ४ ) यज्ञविधींसंबंधीं कर्मविपर्यासाबद्दल प्रायश्चित्त सांगणारा म्हणून याचा उल्लेख आहे.

[६८] प्रै य मे ध.—प्रियमेधाचा वंशज अथवा त्या कुलांतील लोकांचें नाव. ऐतरेय ब्राह्मणात ( ८. २२ ) अंग राजाचा पुरोहित उदमय याचें पौरोहित्य या प्रैयमेधानीं केल्याचा उल्लेख आहे. काठक व मैत्रायणी संहितेंत याचा उल्लेख असून याला यज्ञकर्मासंबंधीं विशेष माहिती होती असें म्हटलें आहे. तैत्तिरीय ब्राह्मणात ( २. १, ९, १ ] तीन प्रैयमेधाचा उल्लेख आहे. गोपथ ब्राह्मणातहि [ १ ३, १५ ] तीन प्रैयमधाचा उल्लेख आहे. त्यापैकीं एकजण अग्निहोत्र होम एक वेळच ( सकाळीं ] करीत असे, दुसरा दोन वेळ [सकाळ संध्याकाळ] करीत असे आणि तिसरा तीन वेळ [ सकाळ, दुपार व संध्याकाळ] करीत असे. पुढें त्यांच्यामध्यें वाटावाट होऊन दोन वेळ अग्निहोत्रहोम करण्याचें निश्चित ठरलें. तैत्तिरीय ब्राह्मणातहि थोड्या फरकानें ही कथा आली आहे.

[६९] बु ध सो मा य ण—सोमाचा वंशज पंचविंश ब्राह्मणात [ २४. १८, ६ ] यानें दीक्षा ग्रहण केल्याचा उल्लेख आहे.

[७०] बौ धा य न—सूत्राचा कर्ता. याच्या नावावर बौधायन श्रौत, स्मार्त व धर्म हीं सूत्रें असून बौधायन श्रौतसूत्रात याचा अनेक स्थलीं उल्लेख आहे.

[७१] भ द्र से न आ जा त श त्र व.—शतपथ ब्राह्मणात ( ५. ५, ५, १४) याचा नाश होण्यासाठीं उद्दालक आरुणि यानें अभिचार कर्मरूप एक याग केल्याचा उल्लेख आहे.

[७२] भा र द्वा ज्ञा य न.—पंचविंश ब्राह्मणात [ १०. १२ १] याचा उल्लेख आहे या नावाच्या ऋषींनी सत्र आरंभिलें असतां या सत्रांतील प्रत्येक दिवसाच्या अनुष्ठानासंबंधीं प्राप्त होणाऱ्या फलाविषयीं ब्रह्म लोकांनी यांना प्रश्न विचारल्याचा उल्लेख आहे.

[७३] भा र्ग व—हें एका कुलाचें नाव आहे. च्यवन, गृत्समद इत्यादिकांना हें कुलनाम दिलेलें आढळतें शतपथ ( ४. १, ५, १ ),ऐतरेय( ८. २१ ),कौषीतकी (२२. ४) पंचविंश ( १२. २, २३ ) इत्यादि ब्राह्मणग्रंथात याचा उल्लेख आहे.

[७४] भा ल्ल वे य.—भाल्लवीचा वंशज. इंद्रद्युम्न याचें पितृप्राप्त नाव. याचा उल्लेख शतपथ ब्राह्मणात यज्ञविधीसंबधी मत देतांना अनेक स्थलीं आला आहे छांदोग्य उपनिषदात आत्मविचार करणाऱ्या ऋषींबरोबर याचा उल्लेख असून तेथें त्याला महाशाल असें म्हटलें आहे.

[७५] भौ वा य न.—भुवाचा वंशज. पंचविंश ब्राह्मणांत याचा उल्लेख ( २० १३,४) असून कपिवनाचें हें पितृप्राप्त नाव आहे. हा आयुः अतिरात्र नामक यज्ञ केल्याच्या योगानें समृद्ध झाला असा उल्लेख आहे.

[७६] म द्र गा र शौं गा य नि.—वंशब्राह्मणात याचा

शिष्य कांबोज औपमन्यव असल्याचा उल्लेख आहे या दोन्ही नावाच्या संबंधावरून कंबोज व मद्रास (मद्री) या देशाचा संबंध असावा असें झिमर म्हणतो.

[७७] महाचमस्य.— तैत्तिरीय आरण्यकात (७. ५, १) याचा उल्लेख आहे- 'भूः भुवः स्वः' या ज्या तीन व्याहृती त्यामध्यें 'महः' या व्याहृतीची यानें भर घातल्याचा उल्लेख आहे.

[७८] महिदास ऐतरेय.— इतरेचा मुलगा व ऐतरेय ब्राह्मण व आरण्यक याचा कर्ता. याचा ऐतरेय आरण्यकात वारंवार उल्लेख येतो. छांदोग्य उपनिषदात (३. १६, ७) तो एकशें सोळा वर्षें जगल्याचा उल्लेख आहे व तेथें व्याधी (रोग) बरोबर याचा संवाद झाल्याचा उल्लेख आहे.

[७९] माण्डव्य.— शतपथ ब्राह्मण (१० ६, ५, ९). शांखायन आरण्यक (७.२) आणि आश्वलायन व शांखायन गृह्यसूत्रात याचा उल्लेख येतो. आश्वलायन सूत्रातील ब्रह्मयज्ञांगतर्पणविधींत याचा उल्लेख आहे.

[८०] माण्डूकेय.— ऐतरेय आरण्यकात व शांखायन आरण्यकात शूरवीर, ह्रस्व, दीर्घ, मध्यम, प्रातीबोधीपुत्र यांचें हें पितृप्राप्त नाव आहे. ऐतरेय आरण्यकात एका मताचा प्रवर्तक म्हणून याचा उल्लेख आहे. आश्वलायन गृह्य सूत्रातील ब्रह्मयज्ञाग तर्पणविधींत याचा उल्लेख आहे.

[८१] मात्स्य.— याचा उल्लेख पंचविंश ब्राह्मणात (१३. ४, ११) आला आहे. हें अर्थ याचें गोत्रनाम आहे. शक्वरीछंदाच्या गानासंबंधीं याचें कौणेयाशीं संभाषण झाल्याचा तेथें उल्लेख आहे.

[८२] मौन.— अणीचिन् यांचें पितृप्राप्त नाव. कौषीतकी ब्राह्मणात (२३-५) जाबाल गृहपतीच्या सत्रामध्ये याचा उल्लेख आहे.

[८३] *याज्ञवल्क्य.— यज्ञवल्क्याचा वंशज. याचा उल्लेख* शतपथ ब्राह्मण कांड १ ते ४ व १० ते १४ यांतून यज्ञकर्मासंबंधीं मत देणारा म्हणून उल्लेख आहे. मध्यंतरीच्या ५ ते ९ या कांडामध्यें शांडिल्याचीं मतें विशेषतः घेतलेलीं आढळतात. बृहदारण्यकोपनिषदात हा मोठा तत्त्वज्ञानी होता असा उल्लेख असून विदेहाधिपति जनक याच्या दरबारात अनेक तत्त्ववेत्त्यांशीं याचा वादविवाद झाल्याबद्दलहि उल्लेख आहे. ज्या तत्त्वज्ञानाबद्दल याज्ञवल्क्याचें महत्त्व वर्णिलें आहे त्यात तितकें महत्त्व आहे असें ओल्डेनबर्ग यास वाटत नाहीं व हें ओल्डेनबर्गचें मत मॅक्डोनेल यासहि ग्राह्य आहे. याचा उपनिषदात याचा गुरु जो उद्दालक आरुणि याशीं यानें वादांत जिंकल्याचा व याला कात्यायनी व मैत्रेयी नावाच्या दोन बायका असल्याचा उल्लेख आहे. *या दोन बायकांपैकीं मैत्रेयी तत्त्ववेत्ती होती. याज्ञवल्क्याचा* शतपथ ब्राह्मण व ऐतरेय आरण्यक या शिवाय फारसा कोठें उल्लेख नाहीं. याज्ञवल्क्य विदेहप्रांतांतील राहणारा असावा असें ओल्डेनबर्गचें मत आहे.

[८४] राथीतर.— तैत्तिरीय उपनिषदांत सत्यवचस् *याचें कुलनाम म्हणून याचा उल्लेख आहे (१९,१). बौधायन* श्रौतसूत्रात याच्या मताचा कांहीं ठिकाणीं स्वीकार केलेला आहे.

[८५] राहूगण — गौतमाचें पितृप्राप्त नांव. याचा शतपथ ब्राह्मणात (१.४, १, १०, १८) विदेघ माथव याच्यासंबंधात उल्लेख आहे. ऋग्वेद (१ ८१) या सूक्ताचा हा द्रष्टा आहे.

[८६] लातव्य.— गोपथ ब्राह्मणात (१ १:२५) इंद्रानें प्रजापतीला ओंकारासंबंधीं माहिती विचारली असता त्यामध्यें ओंकाराचें गोत्र लातव्य असल्याचें त्यानें सांगितलें. पंचविंश ब्राह्मणात (८ ६,८) वृशाव स्वायव याचें हें पितृप्राप्त नाव आहे.

[८७] लामकायन.— याचा लाट्यायन (४.९,२२) व निदान [३ १५,२३] या सूत्रात दृश्य कर्मासंबंधीं यथार्थ मत सांगणारा म्हणून उल्लेख आहे. वंशब्राह्मणात संस्वजित् याच्या बरोबर याचा उल्लेख आला आहे.

[८८] लौहित्य.— हें एका कुलाचें नाव आहे या कुलातील बऱ्याच व्यक्तींचा जैमिनीय उपनिषद ब्राह्मणात उल्लेख येतो. यावरून या ब्राह्मणग्रंथाचें अध्ययन या कुलात बरेच होत असावें असें वाटतें.

[८९] *वाजरत्नायन.— सोमशुष्मन् याचें पितृप्राप्त नाव.* यानें सत्राजितपुत्र शतानीक याला महाभिषेक केल्याबद्दल ऐतरेय ब्राह्मणात [८.२१] उल्लेख आहे.

[९०] वाजश्रवस्.— शतपथ ब्राह्मणात (१०.५,५;१) कुश्रीचें व तैत्तिरीय ब्राह्मणात (३.११,८,१) नचिकेताच्या बापाचें पितृप्राप्त नाव आहे याचें उशन् असेंहि नाव आहे. परंतु सायण तें विशेषण मानितात.

[९१] वाजसनेय.— बृह. उपनिषद व जैमिनीय ब्राह्मण यात याज्ञवल्क्याचें पितृप्राप्त नाव म्हणून उल्लेख आहे. शुक्लयजुर्वेदाच्या वाजसनेयि शाखेचा हा प्रवर्तक होय. याचा अनुपद सूत्रातहि (७ ११) उल्लेख आहे.

[९२] वात्स्यायन.— वत्स्याचा वंशज. मनुष्याच्या मस्तकात असलेले सप्तप्राण हे सहस्रसूर्य होत असे कांहीं विद्वानांचें मत आहे. हे सप्तसूर्य मी प्रत्यक्ष पाहिले असें पंचकर्ण वात्स्यायन म्हणत असल्याचा तैत्तिरीय आरण्यकात (१.७,२) उल्लेख आहे. वात्स्यायन हा प्रसिद्ध कामशास्त्रावरील सूत्राचा कर्ता आहे.

[९३] वैरूप.— विरूपाचा वंशज. पंचविंश ब्राह्मणात (८.९,२१) अष्टादंष्ट्राचें पितृप्राप्त नाव म्हणून उल्लेख आहे. हा निपुत्रिक होता परंतु सामाच्या पठनानें याला संतति लाभल्याचा उल्लेख आहे.

[९४] वैशंपायन.— याचा उल्लेख तैत्तिरीय आरण्यकात (१.७,५) आला आहे. [illegible] ज्या [illegible]

उल्लेख येतो ते सात सूर्य असावेत असें ('सप्तदिशोनानासूर्याः' या ऋग्वेदांत उल्लेखिलेल्या मंत्रांतील अर्थावरून कांहींचें मत आहे व वैशंपायन तर हजारों सूर्य आहेत असें ('यथान्हिदं० सहस्रसूर्याभतु' या मंत्रावरून ) म्हणत असल्याचें तै. आरण्यकांत उल्लेखिलें आहे. आश्वलायन गृह्यसूत्रांत (३.३) ब्रह्मयज्ञांग तर्पणामध्यें याचा उल्लेख येतो.

[९५]शाकल्य.—शतपथ ब्राह्मणांत ( ११.६, ३,३) विदग्धाचें व ऐतरेय आणि शांखायन आरण्यकांत स्थविराचें हें पितृप्राप्त नांव आहे ( सायण मतानें स्थविर हें शाकल्याचें पितृप्राप्त नांव नसून विशेषण आहे ). निरुक्तांत ( ६.१८ ) ऋग्वेदाचें विवरण करणारा म्हणून याचा उल्लेख आला आहे. वेबरच्या मतानें ऋग्वेदपदपाठाचा कर्ता म्हणून प्रसिद्ध असलेला शाकल्य व विदग्ध हे एकच होत. ओल्डेनबर्ग म्हणतो हा शाकल्य ब्राह्मणग्रंथकालानंतर झाला असावा. गेल्डनेरच्या मतानें दोन्ही एकच पण हें मत फारसें संभवनीय नाहीं.

[९६]शाण्डिल्य.—हें अनेक व्यक्तींचें कुलनाम आहे. सर्वांत प्रसिद्ध शाण्डिल्य म्हणजे शतपथ ब्राह्मणांत ज्याचा यज्ञविधीसंबंधीं मत देणारा म्हणून अनेक वेळा उल्लेख आला आहे तो होय. शतपथ ब्राह्मणांतील पांचव्या व पुढील कांडात यज्ञविधीसंबंधी विधींत मत देणाऱ्यामध्यें याचाहि उल्लेख येतो. शतपथ काण्ड दहा यांतील वादांत कुश्रीचा शिष्य व वात्स्याचा गुरु म्हणून याचा उल्लेख आहे. बृह० उपनिषदांतील गुरुशिष्यपरंपरेंत हा कैशोर्य काप्य, वैष्टपुरेय, कौशिक, गौतम, वैजवाप, आनभिम्लात यांचा शिष्य असल्याचा उल्लेख आहे.

[९७]शाट्यायन.—याचा उल्लेख शतपथब्राह्मणांत व जैमिनीय उपनिषद् ब्राह्मणांत येतो. याला शालायनाचा शिष्य म्हटलें आहे. शाट्यायन नांवाचें एक ब्राह्मण असून त्यांतहि याचा उल्लेख येतो. ओअर्टेलनें असें सिद्ध केलें आहे कीं, हा ब्राह्मणग्रंथ जैमिनीय ब्राह्मणा इतकाच जुना असावा.

[९८]शार्कराक्ष्य.—शतपथ ब्राह्मणांत व छांदोग्य उपनिषदांत जन याचें पितृप्राप्त नांव आहे. ऐतरेय आरण्यक व तैत्तिरीय आरण्यक यांत याचा अनेकवचनी रुपांत उल्लेख आला आहे.

[९९]शिखण्डिन् यज्ञसेन.—याचा उल्लेख कौषीतकी ब्राह्मणांत आला (७.३,) आहे. हें केशिन् दार्भ्य याचें पितृप्राप्त नांव आहे. तेथें याचा यज्ञदीक्षेसंबंधीं कांहीं लोकांशीं संवाद झाल्याचा उल्लेख आहे. येथें उत्कर्णिन्सूक्त व दृदन्तकाव्य यांचाहि वरील गोष्टींशीं संबंध असल्याचा उल्लेख आहे.

[१००]शैलालि.—शिलालीचा वंशज. शतपथ ब्राह्मणांत ( १३.५,३,३ ) यज्ञविधीसंबंधीं नियम सांगणारा म्हणून याचा उल्लेख आहे. आपस्तंब सूत्रांत ( ८.३,७ ) एका शैलालि ब्राह्मणाचा उल्लेख आहे अनुपम सूत्रांतहि [ ४.५ ] याचा उल्लेख आहे.

[१०१]शौनक.—हें अनेक व्यक्तींचें कुलप्राप्त नांव आहे. शतपथ ब्राह्मणांत इंद्रोत व स्वैदायन यांचें हें पितृप्राप्त नांव आहे. बृहदारण्यकोपनिषदांत रौहिणायनाचा गुरु म्हणून एका शौनकाचा उल्लेख आहे. कौषीतकी ब्राह्मणांत [४.७] एका शौनक नामक यज्ञाचा उल्लेख आहे. छांदोग्य उपनिषदांत [ १.९,३ ] शौनकाचा गुरु अतिधन्वन् होता असा उल्लेख आहे. जैमि० उ० ब्राह्मणांत अभिप्रतारिन् काक्षसेनी याच्या समकालीन एका शौनक कापेयाचा उल्लेख आहे. सूत्रग्रंथ व बृहद्देवता या ग्रंथांत व्याकरणकार व धार्मिक विधीसंबंधीं प्रमाणभूत मत देणारा म्हणून एका शौनकाचा उल्लेख आहे.

[१०२]श्वेतकेतु आरुणेय.—शतपथ ब्राह्मणांत व छांदोग्य उपनिषदांत कोणा एका आत्रेय श्वेतकेतु गौतमाचा उल्लेख आहे. कौषीतकी ब्राह्मणांत यज्ञविधींत कांहीं चूक घडल्यास त्याबद्दल प्रायश्चित्त विधीच्या बाबतींत सदस्याच्या कर्तव्यासंबंधीं वादग्रस्त विषयांत प्रमाण म्हणून याचें व याच्या बापाचें ( आरुणीचें ) मत स्वीकारलें आहे. हा बरा कल्पक डोक्याचा होता असें दिसतें. कारण ब्रह्मचाऱ्यानें मध खाऊं नये असा निषेध असता यानें ब्रह्मचाऱ्यानें मध खावा असें मत दिल्याचा शतपथ ब्राह्मणांत ( ११. ५, ४, १८ ) उल्लेख आहे. हा पंचाल लोकांचा राजा प्रवाहण याचा गुरु व समकालीन होता. हा जनकाचाहि समकालीन होता. जनकाच्या राजदरबारीं जे वादविवाद करणारे ब्राह्मण चमकत असत त्यांत हाहि असे. तो जनकाकडे आला त्यावेळीं त्यानें बरोबर कांहीं ब्राह्मण आणले होते. तो विदेहांतील राहणारा नसून कुरुपंचालांतील राहणारा होता. शांखायन श्रौतसूत्रांत ( १६. २९, ६ ) याच्या संबंधानें एक गोष्ट आली आहे. जलजातूकर्ण्य हा काशी, कोसल व विदेह या लोकांचा अथवा राजांचा पुरोहित झाला या गोष्टीबद्दल श्वेतकेतूला वैषम्य वाटून त्यानें बापाची निर्भर्त्सना केली व यज्ञकर्मावर फाजिल श्रद्धा ठेवल्याबद्दल दोष दिला कारण त्याच्या मतानें यज्ञ केल्यापासून कीर्तीचा व द्रव्याचा दुसऱ्यालाच लाभ होतो आणि यज्ञ करणारा यजमान कोरडाच राहतो. त्याच्या बापानें त्याला असें उत्तर दिलें कीं, तुझा आरोप मिथ्या आहे. यज्ञविधींची खरी माहिती मलाच आहे. या पुढें तो ' रमेवैसरुत्स्नके मखमधौ व्यविज्ञासिषि ' असें म्हणतो. या वाक्याचा अर्थ नीटसा समजत नाहीं, परंतु ' आयुष्यांतील हृदय ध्येय म्हणजे पौरोहित्य करून धन संपादन करणें हें नसून ज्ञान मिळविणें हें आहे , असा त्याचा भावार्थ असावा असें वाटतें. श्वेतकेतूबद्दल जे उल्लेख आले आहेत ते सर्व वैदिक वाङ्मयांतील उत्तर भागांपैकी म्हणजे ब्राह्मणें, उपनिषदें, सूत्रें यांतील आहेत. तेव्हां आपस्तंब धर्मसूत्रांत याला अवर म्हणजे अलीकडील असें जें म्हटलें आहे तें ठीकच आहे. याचा काल फार अलीकडीलहि धरणें इष्ट नाहीं. कारण ज्या शतपथ ब्राह्मणांत याचा उल्लेख आहे तें शतपथ ब्राह्मण

पाणिनीच्या पूर्वीचें आहे व पाणिनीच्या कालींहि हें ब्राह्मण फार प्राचीन आहे अशी समजूत होती. तेव्हां याचा काल अदमासें खिस्ती शका पूर्वी ७०० वर्षे जरी धरला तरी तो फार प्राचीन न होता अलीकडीलच होईल.

[103] सां जी वी पु त्र.—शतपथ ब्राह्मणाच्या दहाव्या कांडातील वंशावलींत याचा उल्लेख आहे. बृहदारण्यकात हा एकदां माडूकायनीचा शिष्य व एकदा आसुरिवंशाचा शिष्य म्हणून उल्लेख आहे. याच्यामध्यें दोन गुरूंच्या दोन शाखा समाविष्ट होतात. एक शांडिल्यापासून सुरू झालेल्या अग्न्युपासकाची व दुसरी याज्ञवल्क्याची होय.

[104] सा य का य न.—शतपथ ब्राह्मणांत ( १०. ३, ६, १०) श्यापर्णाचें हें पितृप्राप्त नांव आहे. बृहदारण्यकोपनिषदात याला कौशिकायनीचा शिष्य म्हटलें आहे. ऐतरेय ब्राह्मणांत ( ७. २६ ) श्यापर्ण कुलाचा उल्लेख आहे. विश्वंतर नामक राजा या कुलाचा द्वेष्टा होता.

[105] सा व य स.—आषाढाचें पितृप्राप्त नांव. शतपथ ब्राह्मणात (१. १, १, ७;) याचा उल्लेख आहे. यागाच्या पूर्व दिवशीं यजमानानें कांहीं खाऊं नये कारण त्या दिवशीं, दुसऱ्या दिवशीं होणाऱ्या यागासाठीं देवता यजमानाचे घरीं येऊन वसतात. तरीं त्यांना हवि अर्पण केल्यावाचून यजमानानें खाऊं नये. असें यानें आपलें मत दिलें आहे.

[106] सो म शु ष्म सा त्य य ज्ञि.—शतपथब्राह्मणात ( ११. ६, २, १) विदेहाच्या जनकाला भेटलेल्या एका फिरस्त्या ब्राह्मणाचें हें नाव आहे. जैमिनीय उपनिषद् ब्राह्मणांत (३. ४०, २ ) सत्ययज्ञाचा शिष्य जो प्राचीनयोग्य त्याचेंहि हें पितृप्राप्त नांव असावें.

[107] सौ जा त आ रा ह्वि.—ऐतरेय ब्राह्मणांत ( ७.२२) आहुती संबंधीं विशिष्ट मत देणारा म्हणून याचा उल्लेख आहे.

[108] सौ श्र व स.—उपगु याचें पितृप्राप्त नांव. पंचविंश ब्राह्मणांत [ १४. ६, ८] याचा उल्लेख आहे. कुत्स नामक राजाचा हा पुरोहित होता. कुत्स राजानें इंद्राला कोणी हवि अर्पण करूं नये. अशी ताकीद आपल्या राज्यातील लोकांना दिली होती उपगुसौश्रवस् हा इंद्रभक्त असल्यामुळें त्यानें चोरून इंद्राला हवि अर्पण केला. तो हवि हातांत घेऊन इंद्र कुत्स राजाकडे जाऊन तुझी आज्ञा निष्फळ झाली. असें म्हणाला कुत्सानें 'तुला हवि कोणी अर्पिला असें विचारतां 'उपगूनें' असें इंद्रानें उत्तर दिलें. हें ऐकताच रागावलेल्या कुत्स राजानें यज्ञ करीत असलेल्या व सद नामक मंडपांत यजमानाच्या आसनावर बसलेल्या उपगूला औदुंबरी नामक लाकडी दंडानें ताडन करून मूर्छित केलें. नंतर इंद्रकृपेनें तो सावध झाला. अशी कथा पंच० ब्राह्मणांत वरील वृत्तान्तांत आली आहे.

[109] स्थौ ला ष्ठी वि —निरुक्तामध्यें ( ७.१४,) एक वैयाकरणी म्हणून याचा उल्लेख आहे.

सुक्त व सामद्रष्टे [संहितेतर]

| | | |
|---|---|---|
| [1] अप्रतिरथ | किंवा गोरि- | लुश |
| [2] अश्वसूक्ति | वीति | [10] वत्सप्री–भाल- |
| अष्टादंष्ट्रवैरूप | तिर्यञ्च अंगिरस | दन |
| आश्वसूक्ति | [4] तुरश्रवस् | वभ्रयश्व आनूप |
| उक्ष्णोरन्ध्रकाव्य | दावसु आंगिरस् | [11] वसुक्र |
| उदल | दशानभार्गव | विदन्वंत भार्गव |
| उपोदितिगोपा- | देवमुनि | विश्वसृज |
| लेय | [5] देवातिथि काण्व | [12] वैखानस |
| ऋषभ | [6] द्विगत भार्गव | [13] शक्ति |
| ऐलूष | पतंग प्राजापत्य | शक्ति—आंगिरस् |
| कर्णश्रवस् आंगि- | [7] परुच्छेप | शर्मद आंगिरस् |
| रस् | पर्वत | [14] शार्ग |
| [3] कल्याण | पष्ठवाह् | शिख व |
| कुरमलबर्हिप | प्रजावान् प्राजा- | अनुशिख |
| क्षुद्रसूक्त | पत्य | शुक्ति आंगिरस् |
| गर | प्लति | श्रुष्टि आंगिरस् |
| गोरांगिरस | बरु | सुकीर्ति काक्षिवत् |
| गो–सूक्तिन् | [8] बृहद्गिरी | सुहविस् आंगिरस् |
| गौरिवीतिशाक्त्य | [9] युक्ताश्व | हरिवर्ण आंगिरस् |

[1] अ प्र ति र थ.—अजिंक्य, व ज्याचा युद्धात पराभव होत नाहीं अशा इंद्राचें ज्या ऋग्वेदसूक्तात वर्णन आहे (१०. १०३) त्या सूक्ताचा हा द्रष्टा असल्याबद्दल ऐतरेय (८ १०) व शतपथ ( ९. २, ३, १ ) ब्राह्मणांत याचा उल्लेख आहे.

[2] अ श्व सू क्ति —ऋग्वेद(८. १४; १५) या दोन सूक्तांचा द्रष्टा. पंचविंश ब्राह्मणांतहि (१९. ४, १०) हा सामद्रष्टा असल्याचा उल्लेख आहे.

[3] क ल्या ण —स्वर्गप्राप्तीसाठीं सत्रानुष्ठान करणाऱ्या आंगिरसांना देवाकडे जाण्याचा जो देवयान मार्ग तो सांपडेना. त्या सत्रानुष्ठान करणारांपैकींच एक कल्याण नामक ऋषि या देवयानासंबंधीं विचार करीत ऊर्ध्व मार्गानें जात असतां वाटेत त्याला अप्सरांच्यासह झोपाळ्यावर बसून क्रीडा करीत असलेला एक ऊर्णायु नामक गंधर्व आढळला. त्या गंधर्वाला यानें देवयानासंबंधीं माहिती विचारली असतां देवयान मार्गसाधनभूत अशा एका सामाचा त्यानें उपदेश केला. नंतर त्या कल्याणानें सत्र करणाऱ्या आंगिरसाकडे येऊन देवयान प्राप्त करून देणारें एक साम मला सापडलें आहे असें तो म्हणाला. त्यावर तुला हें साम कोणीं सांगितलें असें त्याला आंगिरसांनी विचारलें असतां हें साम मलाच प्राप्त झालें असें तो म्हणाला. इतर आंगिरसांना त्या गंधर्वानें सांगितलेल्या

विमान ( अधिपति )
[४] विश्पति
सत्पति
सदस्पति
सेनानी
स्वराज्
स्वराज्य

[ तै. सं. ]

अधिप
अधिपति
अधिपत्नी
अधिराज
अध्यक्ष
आधिपत्य
क्षत्तृ
क्षत्रपति
ग्रामणी
निधिपति
भागदुघ् ( प्रजेपासून कर वसूल करणारा अधिकारी )
संगृहीतृ ( कोशाध्यक्ष )
सत्पति
सत्यराज्
( अन्तःपुराधिकारी )
सुमङ्गल
सुश्लोक
सेनानी
स्वध्यक्ष

[ अथर्ववेद ]

अधिप
अधिपति
अधिपत्नी
अधिराज
अध्यक्ष
अन्नपति
अभिशस्तिप
गृहपति
गृहराज ( गृहाधिपति )
गोपति
अग्निमुख
धनपति
निधिपति
निष्कर्तृ
नृपति
पुष्टपति
यज्ञपति
विशपति
विश्पति
विश्पत्नी
व्राजपती
शालापति
शेवृध ( पाटील )
सत्पति
सेनानी
स्वपति
स्वर्जित्

राजकीय [ ऋग्वेद ]

अद्रिबुध ( दगडी बांधलेला खजिना)
अधिप
आधिपत्य
[६] अधिराज
अनुशासन
अभिराष्ट्र
अमात्य
अरस्तु ( कारागृह )
आस् (कारागृह)
उपशिक्षन्
[८] उपास्ति
कृदीश ( अंधार कोठडी )
एकराट्
कोशयी [ खजिना ]
[६] क्षत्तृ
[७] क्षोणी
चर्षणिप्र
चर्षणिघृत
चर्षणिसह
चित्रिणी ( अनेक प्रजा )
जनराज्
त्रिविष्टिधातु ( त्रिगुणित )
( प्रतिनिधि )
दशराजान्
दुःशासु
निधि
नृपति
नृपात्
पिशुन [ राजद्रोही ]
प्रजा
प्रदिप् [ आज्ञा ]
प्रतिमान ( प्रतिनिधी )
भुज ( पालयित्रि प्रजा )
मध्यमशी ( यथा मध्यस्तितोराजा सानून्बाधते तथा )
मंत्र ( मसलत )
मर्यक ( राष्ट्र )
[१०] मौद्‌गवत ( तुरंग )
[११] रम्भ
राजक
[१२] राजन्
[१३] राजन्य
राज्य
[१४] राष्ट्र
[१५] वसाति (जामदारखाना)
वर्म (किल्ला)
[१६] विराज्
विप्रराज्य
[१७] वैर, वैरदेय
शतदुर ( तुरंग )
शतभुजि (शंभर प्राकार असलेले युद्धोपयोगी यंत्र )
शर्धनीति
शास ( अनुशासन )
शासन (आज्ञा)
शाल्य
[१८] शवधि-
( खजिना )
[१९] संराज
संराज्ञी
सर्वशास्
साम्राज्य
साचि ( सचिव )
सूपायन
स्पश ( गुप्तदूत )
स्मदिष्ट
स्वराज्य
हितमित्र (हितकारक मित्रयुक्त राजा )

[ तै. सं. ]

अनमित्र
अमात्य
[२०] अभिषेक
अयस्मय [ शृंखला ]
आधिपत्य
[२१] आम्यवादिन्
आनराज्य
दुर्ग
दुर्मरायु
दूत
दूती
नाष्ट्र
निधि
नृपति
पर्यारिराष्ट्र (शत्रुवेष्टित)
पर्वत्
मध्यमशी
मनुष्यविश्
महारथ [ महारथी राजा ]
राजन्
राजा
[२२] राज्य
राष्ट्र
राष्ट्रद
राष्ट्रभृत्
[२३] व्रातपति
[२४] संगृहीतृ
संसद्
सत्यधर्म (शास्त्रीय धर्मयुक्त-राजा)
[२५] संधा
सन्धि
समिद्
समिति
सम्राज
सभा
सभावत्
साम्राज्य
सुराष्ट्र
सुपद्
सुपेश
सुसभेय
सूपायन
स्वराज्
स्वराजा
स्वादुषंसद
स्वराज्य

[ अथर्ववेद ]

अंतःकोश (खजिना)
अभिराष्ट्र
अयस्मय (शृंखला)
[२६] अराजन्
आधिपत्य
इतिहास
एकराज्
कोश
जगत्प
जनता
जनराजन् [सेनानायक]
[२७] ज्ञातृ (साक्षादार)
ज्येष्ठराज
दशशल (तुरुग)
द्विराज्
देवकोश

| | | |
|---|---|---|
| धनपाल | [२८] राजकर्तृ | (खजिना) |
| (खजिनदार) | राजकृत् | ससद् |
| निधि | (सचिव) | सत्रसद |
| निधिप | राजवध | सधस्थ (राष्ट्र) |
| नेतृ | राज् | सभा |
| पंचशल | राज्य | [२९]सभासद् |
| (तुरुंग) | राष्ट्र | सभेय |
| परिभू | राष्ट्रदिप्सु | सभ्य |
| (पराभावुक) | राष्ट्रभृत् | समिति |
| परिवेशम् | राष्ट्रभृत्य | सम्राज् |
| (अमात्य) | राष्ट्री (देवता) | संम्राज्ञी |
| परिषद् | वसुपति | सामित्य |
| पौर | वावाता | साम्राज्य |
| प्रजा | (राजपत्नी) | सुप्रजा |
| प्रतिजान | विप्रराज्य | सूपायन |
| प्रतिमान | वैयाघ्र | म्ति बलाहृत |
| (प्रतिनिधि) | (राजाचें आसन | किंवा |
| प्रतिस्था | भूतव्याघ्रचर्म) | पुत्रादिप्रजा |
| भूत [लब्ध | व्याघ्रप्रतीक | [३०]स्थपति |
| सत्ताक] | (व्याघ्रतुल्यपरा- | स्पश |
| मध्यमशी | क्रमी राजा) | (गुप्तदूत) |
| यमराज्य | शेवधि | स्वराज् |
| | | स्वराज्य |

[ काठक व मै स ]

| | | |
|---|---|---|
| [३१] उदाज | [३३]श्लोक | [३५]समाम्न |
| [३२]प्रसेनस् | [३४]शतपति | |

[ संहितेतर ]

| | | |
|---|---|---|
| [३६] उग्र | [४५] महाराज | [५४]राजमात्र |
| [३७]दशपुरुषम्राज्य | [४६] मातृवध | [५५]राजाधिराज |
| [३८] द्वारपाल | [४७]माहाराज्य | [५६]राष्ट्रगोप |
| [३९] धनधानी | [४८] राजकुल | [५७] सभावयितृ |
| [४०] परिद्रा | [४९] राजन्यऋषि | [५८]सचिव |
| [४१]पालागली | [५०]राजन्यबंधु | [५९]सभापाल |
| [४२] भोज | [५१]राजपितृ | [६०] स्थाप्य |
| [४३]भौज्य | [५२]राजपुरुष | |
| [४४] महाभिषेक | [५३] राजभ्रातृ | |

सभानामें [ऋग्वेद]

| | | |
|---|---|---|
| गातुमती | रण्वा | [६२]सभा |
| परिषद् | [६१]विदथ | सभेय |
| परिष्टि | शग्मा | [६३]समिति |
| भाग | संसद | |

[१]गृहप अथवा गृहपति—ऋग्वेद व तदुत्तरकालीन ग्रंथांत घराच्या मालकाचें हें सामान्य नाम आहे त्याच-प्रमाणे घरातील मालकिणीला गृहपत्नी असें म्हटल्याचा ऋग्वेद अथर्ववेदादि सर्व ग्रंथांतून उल्लेख आहे

[२]पूर्पति—हा शब्द ऋग्वेदांत फक्त एकदाच आला आहे. याचा अर्थ नगरराज, नगरशेट, नगराधिपति, किल्ल्याचा स्वामी असा असावा कदाचित् ही एक ग्रामणी प्रमाणें कायमची जागाच असावी अथवा कायमची व्यापलेली वसा-हत असावी पूर्पति याचा अर्थ किल्ल्याचा रक्षणकर्ता किंवा स्वामी असाहि असणें संभवनीय आहे शत्रूनीं वेढा दिला असता हा अर्थ संभवतो. ज्या अर्थी हा शब्द फार क्वचित स्थली उपयोगात आणिलेला आहे त्या अर्थी याचा दुसराच अर्थ असावा असें वाटतें

[३]मध्यमशी—हा शब्द ऋग्वेदाच्या एका ऋचेंत आला आहे व तेथें त्याचा अर्थ रॉथनें मध्यस्थ असा घेतला आहे-हा शब्द मध्यस्थ किंवा पंच या कायद्यातील अर्थानें उपयो-गात आणला असावा असें झिमर म्हणतो लानमन असें सुचवितो की हा शब्द 'प्रतिस्पर्धी' किंवा धावविणारा या अर्थी असावा व्हिटनेच्या मतें याचा अर्थ अगदीं मधला मनुष्य किंवा पुढारी, मुख्य (म्हणजे ज्याच्या भोंवती त्याचे अनुयायी गोळा होतात तो) असा आहे गेल्डनेरला मात्र याचा अर्थ परस्पर शत्रू अशा दोन राजांतील मध्यस्थ, तिऱ्हाईत अथवा तटस्थ राजा असा वाटतो सायणानीं ऋग्वेद भाष्यात मध्यस्थानीं असलेला राजा असा अर्थ केला असून अथर्ववेदातील याच मन्त्रावरील भाष्यात अंतरिक्षातील वायु असा अर्थ केला आहे व वाजसनेयि संहितेंतील याच मंत्रा-वरील भाष्यांत उवट व महीधर मध्यमशी शब्दाचा मर्मभागा-वर घाव घालणारा असा अर्थ करितात

[४]विश्पति—विश् या शब्दाप्रमाणेंच विश्पति या शब्दाचाहि अर्थ अनिश्चित आहे. झिमरच्या मतें ज्याला ढंग्रजीत म्हणतात त्या स्थलभागाचा मुख्य असा याचा अर्थ आहे परंतु हा अर्थ लागू पडेल असें ठिकाण एक सुद्धा नाहीं हें त्यालाहि कबूल आहे व त्यानें स्वमतपुष्ट्यर्थ ज्या लेखाचा हवाला (ऋ. १ ३७, ८) दिला आहे तो लेख त्याच्या मतास खास पुष्टिकारक नाहीं बहुतेक ज्या ज्या ठिकाणीं हा शब्द आला आहे त्या त्या ठिकाणीं या शब्दाचा अर्थ गृहपति म्हणजे घराचा यजमान, सर्व गृहपतींमध्यें श्रेष्ठ असा अग्निदेव, व सभेतील किंवा लोकांच्या समितिगृहातील अग्नि असा आहे हा अर्थ ऋग्वेदांतील ५ ५१, ५ या ठिकाणीं चांगला जुळतो. कारण तेथें एका कुमारिकेच्या प्रियकराला तिच्या आईबापांना व विश्पतीला निद्रावश करून त्या कुमारिकेच्या जवळ जाव-याचें होतें या ठिकाणीं घरातील सर्व मंडळी म्हणजे अवि-भक्त कुटुंबच मानिलें पाहिजे व तसें मानिलें म्हणजे विश्पति हा मुलीच्या बापाहून निराळा म्हणजे मुलीचा आजा किंवा

खुलता असें मानतां येईल. दुसऱ्या एका लेखांत (१० १३,१५) विश्पति म्हणजे विशां (परवश प्रजेचा) पति (राजा) असा अर्थ लागू पडतो. झिमर म्हणतो की या ठिकाणीं राजाच्या निवडणुकीचा उल्लेख आहे. तैत्तिरीय संहितेतील (२. ३, १, ३) *विश्पति शब्दाचा विशापति (प्रजेचा स्वामी)* असाच अर्थ घ्यावा लागतो.

[5]सेनानी—सैन्याचा पुढारी. ही पदवी राजाच्या सेनापतीला दिलेली होती. हा शब्द ऋग्वेदांत आलेला असून त्याचा उपयोग लक्षणेनें केलेला आहे. त्याचा निर्देश यजुर्वेद संहितेतील शतरुद्रीय प्रकरण व ब्राह्मणग्रंथ यांमध्येंहि आलेला आहे. तो राजाच्या [रत्निन्] रत्नांपैकीं एक आहे. क्षुल्लक लढायांचे प्रसंगीं स्वतः राजास जाण्याचा प्रसंग येत नसे अशा वेळीं तो सेनापतीला स्वतः नेमीत असे. ऐतरेय ब्राह्मणात सेनापति या पदवीचा उल्लेख आला आहे.

[6]अधिराज्—हा शब्द प्राचीन वाङ्मयात राजांचा राजा ह्या अर्थी योजिलेला आढळतो. राजन् हा शब्द राजा, राजपुत्र किंवा राजवंशीय ह्या अर्थी योजिला जातो. पण कोणत्याहि उताऱ्यावरून राजराजा असा स्पष्ट अर्थ होत नाही. सर्व बाजूंनीं विचार करता त्या शब्दाचा अर्थ राजपुत्र नसून राजा असाच करावा लागतो.

[7]उपस्ति.—ऋग्वेदात आणि अथर्ववेदांत ह्याचा अर्थ 'आश्रित' असा केला आहे. तदनंतर महाभारतांतहि दुसऱ्या दोन उच्च वर्णांवरील वैश्यांची आश्रितावस्था दर्शविणारा शब्द 'उपस्था' म्हणजे 'आश्रित' असा योजला आहे. ऋग्वेदात एके ठिकाणीं (७.१९,११) 'स्ति' हाच शब्द उपस्ति ह्या अर्थी योजिला आहे. कोणत्या प्रकारचें आश्रितत्व ह्या शब्दानें दर्शविलें जातें तें नक्की सांगता येत नाहीं. झिमर असा तर्क करितो कीं, ग्रीक, रोमन, आणि जर्मन ह्यामध्यें ज्यांच्यामुळें जे लोक आपली स्वतंत्रता गमावित तसे लोक असा याचा अर्थ होतो. यावरून हे आश्रित म्हणजे जित आर्य जातींतील असून ते पुढें राजाची कुळें झालें असावे. *अथर्ववेदांतील (३ ५,६) उल्लेखावरून असें वाटतें कीं, ह्या शब्दामध्यें रथकार, तक्षन्, सूत आणि ग्रामणी ह्यांचाहि* समावेश होत असावा. परंतु ऋग्वेदांतील उताऱ्यावरून असा ध्वनि निघतो कीं, 'स्ति' याचा प्रजा अथवा सर्व राष्ट्र असा अर्थ नसावा. यावरून आश्रित म्हणजे सर्व साधारण प्रजा नसून राजाचे प्रत्यक्ष आश्रयाखालील लोक असावे. *झिमरच्या वरील सूचनेप्रमाणें त्या शब्दात विशिष्ट जातींचाच* फक्त समावेश होतो असें नाहीं, तर उच्च जातींचाहि समावेश होत असावा. उदाहरणार्थ दुसऱ्या राष्ट्रातील परित्यक्त लोक किंवा काहीं एकाडे महत्वाकांक्षी लोक. खरोखर सूत आणि ग्रामणी हे राजगृहातील अधिकारी असत. अथर्ववेदात (३.५,७) वर्णन केल्याप्रमाणें जरी स्वतः राजे नव्हते तरी ते राज्यपद देण्याचें सामर्थ्य असलेले पुरुष असत. तैत्तिरीय संहिता, तैत्तिरीय ब्राह्मण आणि काठक संहिता व ऋग्वेदातील एका उताऱ्यांतहि ह्याचा केवळ लाक्षणिक रीत्या उपयोग केला आहे. अथर्ववेदाच्या पैप्पलाद शाखेच्या ग्रंथांत (३. ५, ७) वैश्य शूद्र आणि आर्य ह्यांना उपस्ति असें म्हटलें आहे. तेथें हा शब्द बहुतकरून 'प्रजा' ह्या *अर्थी योजिला असावा.*

[8]क्षत्तृ—ऋग्वेद, तदुत्तरसंहिता आणि ब्राह्मण ग्रंथ ह्यांत हा शब्द आला असून त्याचा अर्थ राजपरिवारातील एक मनुष्य असा आहे परंतु हा अर्थ थोडा संशयास्पद आहे. ऋग्वेदात आपल्या भक्तांना चांगल्या वस्तू वाटणारा, (देणारा) ईश्वर असा अर्थ केला आहे आणि हाच अर्थ अथर्ववेदात आणि इतरत्र सापडतो वाजसनेयि संहितेत एका ठिकाणीं महीधराच्या टीकेवरून 'द्वारपाल' असा अर्थ निघतो, आणि हा अर्थ दुसऱ्या उताऱ्यावरून शक्य वाटतो. परंतु शतपथ ब्राह्मणातील एका उताऱ्यावरून सायण त्याचा अर्थ 'अन्तःपुराध्यक्ष' असा करितो. दुसऱ्या काहीं ठिकाणीं 'सूत' हा अर्थ संभवतो पुढें क्षत्तृ म्हणजे मिश्रजातिसंभव मनुष्य असा अर्थ होऊं लागला.

[9]क्षोणी.—अनेक वचनी उपयोग केला असता, सेंटपीटर्सबर्ग कोश आणि लुडविगच्या मतें ऋग्वेदांत पुष्कळ ठिकाणीं ह्याचा अर्थ राजाचे स्वतंत्र अनुयायी असा आहे. पहिल्यानें, अनेकस्त्रिया करण्याची मोकळीक असल्यामुळें गेल्डनेरला वाटलें कीं राजाच्या स्त्रिया असा याचा अर्थ आहे. परंतु नंतर विशिष्ट दैवी स्त्रिया असें त्यानें आपलें मत दिलें आहे.

[10]निधि—*ऋग्वेदात आलेल्या ह्या शब्दाचा मूळचा अर्थ ठेवण्याची जागा व नंतर सामान्यतः खजिना असा अर्थ* झाला. छांदोग्य उपनिषदामध्यें निधि ह्याचा अर्थ एक प्रकारचें शास्त्र असा आहे.

[11]रम्भ—ऋग्वेदाच्या एका (८ ४५, २०) सूक्तात काठी किंवा काठीसारखाच आधार या अर्थानें हा शब्द *आला आहे. दुसऱ्या ठिकाणीं एका मनुष्याला रम्भिन् असें म्हटलें आहे व त्याचा वृद्धावस्थेंत आधारासाठीं हातात काठी* घेणारा असा अर्थ असावा. सायणानीं तेथें त्याचा द्वारपाल असा अर्थ केला आहे. पुढील संस्कृत वाङ्मयात दण्डिन् याचा असाच अर्थ आहे.

[12]राजन्.—ऋग्वेदांत आणि तदुत्तर वाङ्मयात हा शब्द नेहमीं आढळतो. प्राचीन कालीं हिंदुस्थानांत साधारणरीत्या राजशासनपद्धति म्हणजे एकसत्ताक राज्यपद्धतीच अस्तित्वांत होती. आणि याचें कारण आर्य लोक हे परदेशीय आणि परराष्ट्रांतून हिंदुस्थानांत आलेले होते. व ग्रीसला पादाक्रांत करणाऱ्या आर्य लोकांप्रमाणें किंवा इंग्लंडला पादाक्रांत करणाऱ्या जर्मन लोकांप्रमाणें या लोकांच्या स्वाऱ्यांचा परिणाम एकसत्ताक राज्यपद्धति दृढ करण्यांत झाला. वेदकालीन एकसत्ताक राज्यपद्धतीचा खुलासा करण्यास झिमरनें

स्वीकारल्याप्रमाणें मूलपुरुषानुसार कुटुंबव्यवस्था पुरेशी नाहीं.

एकसत्ताकराज्यपद्धतीची मुदत.—वेदकालीं राजा हा वंशपरंपरागत असे असें झिमरचें मत आहे. आणि ही गोष्ट वैध्यश्व, दिवोदास, सुदास, पिजवन, पुरुकुत्स, त्रसदस्यु इत्यादि व्यक्तींच्या हकीकतीवरून सिद्ध होते. कित्येक प्रसंगीं राजाची निवड करणारे लोक राजाच्या कुटुंबांतीलच असत कीं सरदारांपैकीं असत हें निश्चयानें सांगता येत नाहीं आणि हेंहि कबूल केलें पाहिजे कीं, निवडपुरीच्या राज्यपद्धतीबद्दल खात्रीलायक असा पुरावाहि नाहीं. झिमरनें असें ध्वनित केलें आहे कीं, या गोष्टीच्या पुष्टयर्थ जे उतारे दिले आहेत ते सर्व प्रजेनें केलेली निवड म्हणून मानिता येत नाहींत. परंतु प्रजेनें मान्यता दर्शविण्याच्या पद्धतीला पुष्टि देतात. आणि हाच अर्थ जास्त संभवतो. परंतु या उताऱ्यावरून राजा कधींहि निवडला जात नसे असें मात्र म्हणता येणार नाहीं. राजघराण्यातील राज्यपदारूढ होण्यायोग्य अशा व्यक्तीला बाजूस सारून दुसरीच व्यक्ति राज्यपदारूढ होण्याची चाल प्रचलित होती हें यास्कांनीं निरुक्तामध्यें ( २. १० ) दिलेल्या कुरुकुलोत्पन्न देवापि आणि शन्तनु यांच्या गोष्टीवरून सिद्ध होतें. राजाची सत्ता अनंत असुरक्षित होती ही गोष्ट स्पष्ट आहे. राजांना राज्यातून हांकून दिल्याविषयीं व राजांनीं आपली सत्ता पुन्हा परत मिळण्याविषयीं खटपट केल्याबद्दल अनेक [ अथर्व ३. ३४; काठक संहिता २८, १; तैत्तिरीय सं. २. ३, १; मैत्रायणी सं. २, २, १; पंचविंश ब्राह्मण १२, १२, ६; शतपथ ब्राह्मण १२. ९, ३३; इत्यादि ] उल्लेख आहेत. अथर्ववेदात राजाच्या हितासंबधीं अनेक मंत्र आहेत.

राजाचें लढाईतील कर्तव्य. — ऋग्वेदकालानंतर साहजिकपणें वैदिक वाङ्मयांत राजाच्या साहसी कृत्याचा फारसा उल्लेख नाहीं. तैत्तिरीय ब्राह्मणांत कुरुपंचाल राजे दिसण्यांत ब्राह्मणासारखे दिसत व ते हिंवाळ्यांत लढाईला निघत [ १. ८, ४, १ ] असा उल्लेख आहे असें मॅकडोनेल म्हणतो. हे ब्राह्मणासारखे दिसत असा उल्लेख नाहीं. पण उद्गान निराज या शब्दाच्या अर्थावरून असे दिसतें. राजेलोक लढाईतील लुटीपैकीं भाग स्वतः घेत असत. वैदिक कालातील लढायाची माहिती ऋग्वेदांत अनेक स्थलीं आली आहे, या विभागांतच दाशराज्ञयुद्ध प्रकरणात ही हकीकत विस्तृत आहे. ज्याप्रमाणें ब्राह्मण आपल्या यज्ञयागादि कर्मात दक्ष असत त्याप्रमाणें क्षत्रियहि लढाईच्या कामांत दक्ष असत लढाईशिवाय देशाचें रक्षण करणें हेंहि राजाचें एक कर्तव्यच असे. त्याला जनतेचें रक्षण करणारा गोपा जनस्य किंवा राजसूय प्रसंगीं म्हटल्याप्रमाणें ब्राम्हणाचें रक्षण करणारा असें म्हटलें आहे. राजाला लढाईत जय मिळावा म्हणून त्याचा पुरोहित मंत्र म्हणत असे व तो स्वतः लढाई करी. कौषीतकी उपनिषदांत प्रतर्दन नामक राजा लढाईत मारला गेल्याबद्दलचा उल्लेख आला आहे. राजसूयामध्यें राजाला शहरें उध्वस्त करणारा पुरांभेत्ता असें म्हटलें आहे.

शांततेच्या कालांतील राजा.—लढाईच्या कामीं लोकांना आपल्या राजाची आज्ञा पाळावी लागे व ते ती पाळीत असत राजसत्तेचें रक्षण त्यांना करावें लागे. लोकांचें भक्षण करणारा म्हणून राजाचा निर्देश ( ऋ. १. ६५, ४ अथर्व ४. २२, ७ ) करीत, परंतु तो लोकांचा छल करीत असे या अर्थानें नव्हे तर लोकांच्या देणगीमुळें त्याचा व त्याच्या नोकरांचा खर्च चालत असे म्हणून होय. अशाच प्रकारचीं उदाहरणें दुसरीकडेंहि सापडतात. राजे आपले हक्क क्षत्रियांना देत व अशा प्रकारें सरदाराचा वर्ग अस्तित्वात आला. साधारणतः क्षत्रियांना किंवा ब्राह्मणांना कर द्यावा लागत नसे. ब्राम्हणानां कर द्यावा लागत नसे असा शतपथ ब्राह्मणात ( १३. ६, २, १८; ) उल्लेख आहे. राजाचें बल लोकामध्येंच साठविलेलें असे. राजा हा न्यायाधीशाचीं कामेंहि पहात असे. तो स्वतः कोणत्याहि शिक्षेपासून मुक्त(अदण्ड्य) असे. तो राजदंड धारण करीत असे असा उल्लेख आहे. फक्त फौजदारी गुन्ह्याचाच राजा निवाडा करीत असे. कारण अशा तऱ्हेचे उल्लेख ( गौतम धर्म सूत्र १२. ४३: ) सापडतात. राजाचे अधिकार केव्हा केव्हा त्याचे अधिकारी बजावीत किंवा एखादा प्रतिनिधि नेमीत असत. काठक संहितेंत ( २७. ४, ) शूद्राला शिक्षा करण्यासाठीं राजन्याला अध्यक्ष म्हणून संबोधिलें आहे. मुलकी न्यायाच्या बाबतींत राजाचे अधिकार बरेच संकुचित असत. आणि या बाबतींत राजा ही न्याय मिळण्याची शेवटची जागा म्हणून मानीत परंतु याबद्दल सबळ पुरावा नाहीं. ऋग्वेदांतील मध्यमशी हा राजानें नेमिलेला न्यायाधीश नसून खाजगी न्यायाधीश किंवा पंच असावा. फौजदारी न्यायाच्या बाबतींत वरुणाच्या हेराचा बऱ्याच वेळां उल्लेख आला आहे यावरून वैदिककालीं फौजदारी न्यायखात्यासंबंधीं बराच विस्तार झाला होता असें दिसतें. बहुधा अशा प्रकारच्या हेराचा लढाईच्या वेळींहि उपयोग केला जात असे ( ऋ. ८.४७,११; ) वेदकालीन वाङ्मयात राजा कायदे करीत असे असा उल्लेख आढळत नाही परंतु पुढील वाङ्मयात मात्र कायदे करणें हें त्याच्या अनेक कर्तव्यांपैकीं एक कर्तव्य होतें असें दिसून येतें. प्रत्यक्ष राजाकडे कोणकोणतीं कामें असत हें नक्की सांगता येत नाहीं. प्रत्येक कार्यामध्यें राजाला बहुतेक आपल्या पुरोहिताची सल्ला घ्यावी लागत असे. राजाच्या दर्जाचीं बाहेरील चिन्हें म्हणजे त्याचा राजवाडा आणि मौल्यवान पोषाख हीं होत. जमीनीसंबंधानें राजाचे अधिकार काय होते हे सांगतां येत नाहीं. यासंबधीं ग्रीकांचे उल्लेख विशेष स्पष्ट नाहींत. कित्येक वेळा ते म्हणतात राजाला प्रजेकडून कर मिळत असे व कित्येकवेळां म्हणतात कीं, राजाच फक्त जमीनीचा मालक असे. हॉपकिन्सचें असें

मत आहे की, प्रजेला स्वसंरक्षणाकरिता राजाला कर द्यावा लागत असे आणि केवळ बाह्यतः राजा जमीनीचा मालक असून खरी मालकी कुटुंबाच्या मुख्याकडेच असे. बेडन पॉवेलचें असें मत आहे कीं, राजा हा जमीनीचा मालक ही कल्पना नंतरची आहे. परंतु हॉपकिन्स म्हणतो कीं, वेद-कालीं राजा हा लोकांचा भक्षक म्हणून उल्लेख आहे आणि ऐतरेय ब्राह्मणात ( ८. १२ ) उल्लेखिल्याप्रमाणें राजा-कडून वैश्याचा वाटेल तेव्हा अपहार केला जात असे आणि राजे त्यांना मारून्हि टाकीत असत. परंतु शूद्राप्रमाणें ठार मारीत नसत [ ऐ. ब्राह्मणात विशामत्ता अशीं पदें असून प्रजेचा उपभोग घेणारा असा त्याचा सायणानी अर्थ दिला आहे. व्यवहार प्रकरणीं सूत्रांत बृहस्पति आणि नारद व त्याच प्रमाणें मानवधर्मशास्त्रहि राजा हा सर्वसत्ताधारी असे ही गोष्ट मान्य करतात ( मानवधर्मशास्त्र ८. ३९; ) राजाला सर्वांचा ईश असें म्हटलें आहे. बुलहर या उतान्याचा राजा जमीनीचा मालक होता या मताच्या पुष्टयर्थ उपयोग करतो परंतु त्याचा पुरेसा उपयोग होत नाहीं. राजा हा जमीनीचा मालक ही कल्पना मूळातील नसून इंग्लंडातील प्रमाणें या तत्त्वाची पुढें हळू हळू क्रांति होत गेली असावी. लोकांच्या वित्ताचें हरण करता येणें ही राज-कीय सत्ता आहे मालकीचा हक्क नव्हे. याच तत्त्वाचें अनु-करण दक्षिण आफ्रिकेंत आढळतें. तेथें मुख्य अधिकाऱ्याला जमीनीच्या मालकापासून जमीनीची मालकी हिरावून घेता येते, परंतु खरी मालकी मूळच्या रहिवाश्यांचीच असते हॉपकिन्स म्हणतो गुरूंना द्यावयाच्या देणग्या म्हणजे जमीनीच असत राजा नसला म्हणजे अराजकता उत्पन्न होत असे. असा ब्राम्हणग्रंथांवरून अंदाज होतो ( तै. ब्रा. १. ५, ९, १; ऐ. ब्रा. १ १४ ). राजाशिवाय युद्ध करणें, व आपल्याला राजा नाहीं म्हणून असुर आपला पराभव करतात, असे अनुक्रमें तै. ब्रा. व ऐ. ब्रा. यात उल्लेख आहेत राजन् हा शब्द ऋग्वेदात ( ऋ. १. ४०, ८;१०८, ७;१०. ४२,१०;९७,६ )राजघराण्यातील एकादा पुरुष अथवा सर-दार या अर्थानें आला आहे ऋग्वेदातील काहीं स्थळांवरून ( १०. ९७, ६; ) झिमर असें म्हणतो कीं, लढाईसारख्या विशिष्ट प्रसंगीच वैदिक कालीं राजा ही व्यक्ति अस्तित्वात असे व शांततेच्या प्रसंगीं जर्मनीच्या राज्यव्यवस्थेप्रमाणें सर्व सरदारांना सारखेच हक्क असत. सरदारांना राजन् म्हणत परंतु झिमरनें लावलेला अर्थ बरोबर आहे असें मात्र म्हणता येणार नाहीं.

[13]रा ज न्य.—वेदकालीन वाङ्मयात राजघराण्यातल्या पुरुषाचें नाव. यातच सरदारांचाहि समावेश होतो. हा अर्थ एखाद्या उताऱ्यातून स्पष्ट रीतीनें निघत नाहीं. मुळात हा शब्द सर्व सरदारांनाहि लावीत. शतपथ ब्राह्मणात ( ३,१,६,२ ) राजन्य आणि राजपुत्र याचे निरनिराळे अर्थ दाखविले आहेत. राजपुत्राचा शब्दशः अर्थ राजाचा मुलगा असा होतो. राजन्यांचीं कार्यें आणि स्थान यांचीं वर्णनें क्षत्रिय या सदराखालीं आलेलीं आहेत. तैत्तिरीय संहितेंत त्याला ब्राह्मणाच्या आणि ग्रामणीच्या कोटींत बसविलें आहे, आणि तो मान्याच्या शिखरास पोहोंचला होता म्हणून लिहिलें आहे.

[14]रा ष्ट्र.—ऋग्वेदात आणि तदुत्तरवाङ्मयात राज्य किंवा राजाचा प्रदेश या अर्थी हा शब्द आला आहे,

[15]व सा ति.—ऋग्वेदामध्यें एके ठिकाणीं रॉथच्या मतें त्याचा अर्थ मामलेदारखाना असा होतो.

[16]वि रा ज्.—राज्यपददर्शक अशी ही पदवी असून ऋग्वेदामध्यें अनेकदा हा शब्द आलेला आहे. पण अलंका-रिक अर्थानें एकदाच हा शब्द आलेला आहे. ही विराज पदवी प्रत्यक्ष अशी ऐतरेय ब्राह्मणात उत्तर कुरु व उत्तरमद्र यांना लाविलेली आहे

[17]वै र व वै र दे य.—हा शब्द वैरदेय असा ऋग्वे-दात आला आहे. या शब्दाचा अर्थ मागाहून झालेले संहिता ग्रंथ व ब्राह्मण ग्रंथ यामध्यें ज्याला इंग्रजींत ( वेरगेल्ड ) असें म्हणतात ( म्हणजे एकाद्या माणसाला ठार मारल्याबद्दल त्याच्या नातलगांना नुकसानभरपाईदाखल दिलेला पैसा) त्या अर्थानें आलेला आहे. हा अर्थ आपस्तंब व बौधायन धर्मसूत्रातसुद्धा मान्य आहे. दोन्ही सूत्रात क्षत्रियाबद्दल एक हजार गायी, वैश्याबद्दल शंभर गायी, शूद्राबद्दल दहा गायी व ह्याशिवाय प्रत्येकाचे मृत्यूचे वेळीं एक बैल जास्त असें नुकसान भरून द्यावें असें लिहिलेलें आहे हें नुकसान कोणास द्यावें ह्याबद्दल आपस्तंब सूत्रात स्पष्ट उल्लेख आलेला नाहीं. पण बौधायन सूत्रात राजाला द्यावें असा स्पष्ट उल्लेख आलेला आहे. कदाचित गायी नातलगांना द्याव्या व गुन्हेगाराचें जीवित्व हिरावून घेऊं नये म्हणून खून झालेल्या माणसाच्या नातलगांशीं रदबदली करणारा जो राजा त्याला नजर म्हणून एक बैल द्यावा अशी कल्पना करणें सयुक्तिक होईल. आपस्तंब सूत्रात बायकोचा खून झाला तर हेंच नुकसान भरून द्यावें असें म्हटलें आहे. पण गौतमसूत्रात स्त्रियाच्या मृत्यूची योग्यता शूद्राच्या वधाच्या यातते बरोबर ठरविली आहे, व त्याला एकच अपवाद आहे. हें नुकसान जें भरून द्यावयाचें असतें तें वैरयातन किंवा वैरनिर्यातन म्हणजे वैरनिष्कृतीबद्दल करावयाचें असतें. मनुष्यवधाबद्दल नुकसानभरपाई म्हणजे शंभर गायी होत अशाबद्दल ऋग्वेदातहि उल्लेख आहे कारण यात शतदाय ( ज्याच्या नुकसानभरपाईची किंमत १०० आहे ) असें एका माणसाला लाविलेलें विशेषण आलेलें आहे. निरनिराळ्या माणसाच्या निरनिराळ्या किंमती असत ह्याबद्दल शंका नाहीं. पण शुनःशेपाच्या बाबतींत त्याची किंमत ऐतरेय ब्राह्मणाचे मतानें १०० गायींचें दान ही होय. यजुर्वेद संहितेमध्यें शत-दाय हा शब्द पुन्हा आलेला आहे. अशा रीतीनें नुकसानाची किंमत ठरविणें ह्यावरून एक गोष्ट सिद्ध होते ती ही कीं,

ऋग्वेदकालात व्यक्तिशः खासगी रीतीनें सूड किंवा नुकसानीची किंमत ठरविण्यापेक्षा समाजाचें मत किंवा राजसत्ता ह्याचाच अधिकार शिक्षा देण्याचे कामीं लोक जास्त मानीत. उलटपक्षीं असेंहि म्हणता येईल कीं, अशी पद्धत त्यावेळीं ज्या अर्थी होती त्या अर्थी राजाचा शिक्षा देण्याचा अधिकार फार दुर्बल होता.

[१८] शे व धि.—ऋग्वेद व तदुत्तरकालीं झालेले ग्रंथ ह्यामध्यें खजिना असा ह्या शब्दाचा अर्थ आलेला आहे.

[१९] स म्रा ज्.—ऋग्वेद व तदुत्तरकालीन ग्रंथ ह्यामध्ये ह्याचा अर्थ श्रेष्ठ राज्यकर्ता म्हणजे राजापेक्षा जास्त सत्तेचा उपभोग घेणारा असा आहे. शतपथ ब्राह्मणात वाजपेय व राजसूय ह्यांबद्दलची जी उपपत्ति दिली आहे तींत असें म्हटलें आहे कीं, सम्राजाला राजापेक्षा जास्त सत्ता असते. कारण तो वाजपेय यज्ञ करून सम्राज् बनतो. त्यावेळीं बादशहा म्हणजे राजाधिराज् असा शब्द प्रचारात नसावा. कारण तशी राजकीय स्थिति–जी स्थिति तिसऱ्या शतकात ( खिस्ती शकापूर्वी ) अशोकाचे वेळीं हिंदुस्थानात होती तशी असण्याचा संभव नाहीं. पण सम्राज् ही पदवी-विदेहाच्या जनकाला त्यावेळीं लावीत असत. ऐतरेय ब्राह्मणांत ही पदवी पूर्वेकडील राजाना लाविली आहे.

[२०] अ भि षे क.—वैदिक कालामध्यें राजाची निवडणूक झाली म्हणजे त्याला मोठ्या समारंभानें अभिषेक करीत, असें तैत्तिरीय, पंचविश, शतपथ आणि ऐतरेय ब्राम्हण ह्या ग्रंथामध्यें सविस्तर वर्णन आहे. आणि संहितेंतहि त्याविषयीं मंत्र दिले आहेत. अभिषेकात पाणी सिंचन करीत असतें ( अभिषेचनीयाआपः ). फक्त राजानांच अभिषेक केला जात असे, कारण प्रजा अभिषेकाच्या योग्य (अभिषेचनीयाः) नाहीं. पुरुषमेधयि बळींच्या यादींत अभिषेक्तृचा उल्लेख आहे. अभिषेक ह्या राजसूयामधील एक मुख्य भाग आहे.

[२१] ग्रा म्य वा दि न्.—सामान्यतः' ग्रामन्यायाधीश ' या अर्थी हा शब्द यजुर्वेदात आला आहे. व ग्राम्यवादिन् याच्या सभेचा उल्लेख मैत्रायणि संहितेंत ( २.१,२ ) आहे.

[२२] रा ज्य.—तैत्तिरीय संहितेंत, अथर्ववेदात व तदुत्तर ग्रंथात सार्वभौमसत्ता या अर्थी हा शब्द आहे. शतपथ ब्राह्मणात ( ५.१,१,१२ ) ब्राह्मणाला सार्वभौम सत्ता मिळत नसे असें लिहिलें आहे. राज्याबरोबरच सार्वभौमसत्तेबद्दलचे दुसरे शब्द आढळतात. शतपथ ब्राह्मणात असें म्हटलें आहे कीं राजसूय यज्ञ राजानें करावा आणि वाजपेय सम्राटानें करावा सम्राटाचा दर्जा राजापेक्षा श्रेष्ठ आहे. त्याच ब्राह्मणात सिंहासनावर बसणें हें साम्राटाचें लक्षण मानलें जात असे असें सांगितलें आहे. इतरत्र राज्याच्या उलट स्वाराज्य शब्द योजिला आहे. राजसूयाच्या विधींत ऐतरेय ब्राह्मणात पुष्कळ शब्द दिले आहेत. राज्य, साम्राज्य, भौम, स्वाराज्य, वैराज्य, पारमेष्ठ्य, माहाराज्य आणि आधिपत्य हे शब्द इतरत्राहि सापडतात. हे शब्द निरनिराळे अधिकार दर्शवितात ह्या म्हणण्याला आधार नाहीं. नृपाधीश असल्याशिवायहि एखाद्या राजाला महाराज किंवा सम्राज् म्हणता येईल. तो श्रेष्ठ राजा असल्यास किंवा त्यानें आपणास म्हणवून घेतल्यास ( विदेहाच्या जनकाप्रमाणें ) महाराज किंवा सम्राज् ही पदवी त्याला लागत असे. गुप्तासारखे किंवा अशोकासारखे महाराजे वेदकाळीं होते असें मानता येत नाहीं.

[२३] ग्रा ज प ति.—यजुर्वेद संहितेंत गणपति शब्दाबरोबर हें एक विशेषण आहे. ह्याचा खरा अर्थ अगदीं अनिश्चित आहे. पण झिमर म्हणतो त्याप्रमाणें ह्या शब्दाचा अर्थ चोराच्या टोळीचा नायक असाहि असूं शकेल.

[२४] सं ग्र ही तृ.—ऋग्वेदोत्तर संहिताग्रंथ व ब्राह्मणग्रंथ ह्यामध्यें हा शब्द आलेला आहे. राजाचे जे कोशाधिकारी असत त्यापैकीं हा एक कामगार होता. प्रत्येक ठिकाणीं जेथें हा शब्द आलेला आहे तेथें तेथें सारथी हा अर्थ लागू पडतो. पण सायणाच्या मतें कांहीं ठिकाणीं ह्याचा अर्थ राजाचा खजिनदार असा आहे.

[२५] सं धा.—ऋग्वेदोत्तर संहिता व ब्राह्मण ग्रंथात ठराव किंवा करार या अर्थानें हा शब्द आला आहे.

[२६] अ रा जा नः.—शतपथातील दोन उताऱ्यात आणि ऐतरेय ब्राह्मणात हा शब्द लोक या अर्थी योजिला आहे. वेबरला सुद्धा हा शब्द अथर्ववेदात आढळला असून तेथें त्याचा संबंध सूत (सारथी) आणि ग्रामणी ( सेनानी ) यांच्याशीं आला आहे म्हणून त्याला असें वाटतें कीं ह्या लोकाना ' अराजानः ' म्हणत असावेत, कारण ते स्वतः जरी राजपुत्र नसले तरी त्याचा राजपुत्राच्या अभिषेकाशीं संबंध आहे.

[२७] ज्ञा तृ.—हा शब्द अथर्ववेदामध्यें दोन ठिकाणी व शाखायन आरण्यकात एके ठिकाणीं अस्पष्ट अर्थानें आलेला आहे. झिमरच्या मतें हा शब्द मूळचा कायद्याच्या परिभाषेतील असून त्याचा अर्थ साक्षीदार असा आहे. प्राक्कालीन समाजात साक्षी ठेवून कामे करण्याची जी चाल होती तिला उद्देशून हा शब्द आला असावा. रॉथच्या मतें ह्या ज्ञातृ शब्दाचा अर्थ खात्री असा आहे पण ब्लूमफील्ड व व्हिटने ह्याना हे दोनहि अर्थ संमत नाहींत.

[२८] रा ज क र्तृ अ थ वा रा ज कृ त्.—राजकर्तृ अथवा राजकृत् म्हणजे राजाची स्थापना करणारा, त्यांना अभिषेक करणारा. जे स्वतः राजे नसत पण राजाना अभिषेक करण्यात मदत करीत अशा लोकास अथर्ववेदात आणि ब्राह्मणात हा शब्द लाविला आहे. सूत आणि ग्रामणी हे अभिषेकप्रसंगीं हजर असत असें शतपथांत ( ६.४,१,१ ) म्हटलें आहे. एगलिंगचेंहि असेंच मत आहे. ऐतरेय ब्राह्मणावरील टीकाकाराच्या मताप्रमाणें याचा बाप, भाऊ असा अर्थ निघतो. मूळात शब्दाचा अर्थ स्पष्ट नाहीं.

[२९] स भा स द्.—लोकसभेत न्यायनिवाडा करण्याकरिता जे पंच असत त्यांस हें नाव आहे. अथर्ववेदात व माग-

हून झालेल्या ग्रंथात जेव्हां हा शब्द येतो तेव्हां ह्याचा अर्थ एक सभासद एवढाच होणें शक्य नाहीं. कोणत्याहि सामान्य मनुष्यापेक्षा कुटुंबाचा पुढारीच सभेस सभासद म्हणून हजर असण्याचा अधिक संभव आहे. ह्या सभेच्या बैठकी सामान्य विषयावर चर्चा करण्यासाठीं किंवा त्याजवर निकाल देण्यासाठीं होण्यापेक्षा न्यायदानाकरिताच वरचेवर भरत असतील.

[30] रथ प ति.–अथर्ववेद व उत्तरकालीन ग्रंथ ह्यामध्यें राजाचा अधिकारी ह्या अर्थी हा शब्द आला आहे. सृंजय लोकांच्या दुष्टरीतु पौंसायन ह्या हद्दपार केलेल्या राजाचा रेवोत्तरस्चाक्र हा रथपति होता व ह्यानेंच त्या राजाला पुनः राज्यपद मिळवून दिलें [ श. ब्रा. १२.८,११, १७] ह्या शब्दाचा अगदीं बरोबर अर्थ समजणें कठिण आहे. प्रांताधिकारी किंवा सुभेदार असाहि अर्थ होईल. पण सर-न्यायाधीश हा अर्थ अधिक संभाव्य आहे. कारण ह्याच्या-कडे पूर्वींच्या इंग्लिश लोकांतील न्यायाधीशाप्रमाणें न्याय व अम्मलबजावणी ह्या दोन खात्यांतील कामें असण्याचा संभव आहे. ह्याचा दर्जा राजभ्रात्यापेक्षा कमी असे.

[31] उ दा ज.—मैत्रायणी संहितेंत ( १.१०, १६ ) हा शब्द आला असून लढाई जिंकल्यानंतर मिळालेल्या लुटींतील राजाचा वांटा असा ह्या शब्दाचा अर्थ आहे. व्हॉन श्रोडर व बोथलिंक यांच्या ( लढाईकरितां )बाहेर (पडणें ह्या जुन्या) अर्थापेक्षा वरील अर्थच अधिक योग्य असून डेलब्रुकहि तोच अर्थ घेतो. हा शब्द होमरच्या 'गेरास्' ह्या शब्दाच्या अर्थाचाच आहे. काठक ( २८. ३ ) व कपिष्ठल ह्या संहिता-मध्यें पाठभेदानें आलेला निराज हा शब्द देखील ह्याच अर्थाचा आहे.

[32] प्र त्ये न स.--काठक संहितेंत व बृहदारण्यकोपनि-षदात ( माध्यंदिन ४.३,४३ ) उग्र व सूतग्रामणी ह्यांच्या बरोबरच हा शब्द आला असून स्पष्टपणें त्याचा अर्थ पोलिस-अधिकारी असा आहे. परंतु ह्याचा अर्थ राजाचा हलक्या दर्जाचा नोकर असा असावा, आणि मॅक्समुल्लर म्हणतो त्या प्रमाणें 'कोतवालासारखा बडा अधिकारी' असा नसावा. पिटर्सबर्गकोशाप्रमाणें काठक संहितेंत ( ८.४ )व शांखायन श्रौतसूत्रात (४.१६,१७ ) ह्या शब्दाचा अर्थ मयताचा लगेच होणारा व त्याच्या कर्जफेडीची जबाबदारी घेणारा वारस असा आहे.

[33] ब्ले ष्क--काठकसंहितेंत ( १३.६ ) ह्याचा अर्थ दोर किंवा गळफास असा दिला आहे. मैत्रायणी संहितेंत याचें ब्लेष्क असेंहि रूप दिलें आहे.

[34] श त प ति —मैत्रायणी संहितेंत व तैत्तिरीय ब्राह्मणात एका ऋचेंत हा शब्द इंद्राचें विशेषण म्हणून आला असून मनुष्यांतील एकटाच शंभराचा अधिपति म्हणून याचें वर्णन केलें आहे. तैत्तिरीय ब्राह्मणावरील टीकेंत 'शंभर देवांचा अधिपति' असा याचा अर्थ केला आहे, तो अगदीं असंभाव्य आहे. मागाहून झालेल्या स्मृति ग्रंथात ज्याला शतग्रामाधिपति असें म्हटलें आहे त्यासा-रखाच हा कोणी मनुष्यकोटींतील अधिकारी असावा. प्राचीन काळीं हा अधिकारी न्याय व जमाबंदी यावरील राजप्रति-निधि असावा.

[35] स मा न्त —समान्त म्हणजे एकच मर्यादा अस-लेले. शेजारी राहाणारे म्हणूनच शत्रू अशा अर्थी हा शब्द मैत्रायणी संहितेंत आला आहे.

[36] उ भ.—बृहदारण्यकोपनिषदांतील एका उताऱ्यात 'अधिकारी मनुष्य' अशा अर्थी हा पारिभाषिक शब्द-असून मॅक्समुल्लरच्या मतानें त्याचा शिपाई असा अर्थ आहे. रॉथनें एका ऋग्वेदांतील उताऱ्यायात हाच अर्थ केला आहे. परंतु सशक्त मनुष्य असा तेथें सामान्य अर्थ आहे. बोथलिंक हा वरील उपनिषदाच्या भाषांतरात याचा विशेषणासारखा उपयोग करतो.

[37] द श पु रु ष रा ज्य—शतपथात ( १५.९ ३, १ ) हा शब्द आला असून स्पष्टपणें ह्याचा अर्थ दहा पूर्वजांपासून चालत आलेली सार्वभौम सत्ता असा आहे. ह्यावरून पूर्वी वंशपरंपरेनें राजसत्ता चालत होती असा बोध होतो. वेबरचें एकदा असें मत होतें कीं, ह्याचा अर्थ दशपुरुषचें राज्य असा होय. ह्या दशपुरुषची तो कालिदासाच्या मेघदूतांतील दशपुर, व मध्यदेशांतील दशार्णया शब्दाशीं तुलना करतो.

[38] द्वा र प.—ऐतरेय ब्राह्मणात ( १. ३० ) विष्णूला देवांचा द्वारपाळ ( विष्णुर्वै देवाना द्वारपः ) असें अलंकारिक भाषेंत म्हटलें आहे. तेथें एकदा व छान्दोग्योपनिषदांतहि [२'१३,६] हा शब्द आलेला आहे.

[39] ध न धा नी—.तैत्तिरीय आरण्यकात ( १०.६७ ) कोशागार म्हणजे जामदारखाना अशा अर्थी हा शब्द आला आहे.

[40] प रि दा.—शतपथांतील [ २.४,१, ११ ] काहीं उताऱ्यात दुसऱ्यास शरण जाणारा असा ह्याचा अर्थ आहे.

[41] पा ला ग ली.—पालागली म्हणजे राजाची चवथी व जिच्याबद्दल सर्वांत कमी आदर आहे अशी बायको.

[42] भो ज —ऐतरेय ब्राह्मणात कित्येक ठिकाणीं हा शब्द राजाची पदवी या अर्थानें उपयोगात आणलेला दिसतो. भोज म्हणजे भोक्ता. अभिषिक्त राजाला भोज म्हणत ( ऐत-रेय ब्राह्मण ( ८. १४ ).

[43] भौ ज्य —हा एक राजाचा दर्जा आहे. या दर्जास पोंचलेल्या राजास भोज ही पदवी होती. ऐतरेय ब्राह्मणांत कित्येक ठिकाणीं हा शब्द आला आहे.

[44] म हा भि षे क —हा शब्द ऐतरेय ब्राह्मणांत आला आहे, आणि त्याचा अर्थ महाराजाच्या प्रीत्यर्थ केलेला अभिषेकसमारंभ असा आहे. हा महाभिषेक ज्यांना केला होता अशा मोठमोठ्या महाराजांची यादीहि दिली आहे.

[45] म हा रा ज.--महाराज म्हणजे मोठा राजा. त्याचा

१

उल्लेख ब्राम्हण ग्रंथांतून वारंवार येतो. याचा अर्थ राजाहून विशेष निराळा असा नाहीं कदाचित् याचा अर्थ सामर्थ्यवान् राजा असा असावा 'विजितवान् राजा महाराजः' असें सायण भाष्यांत म्हटलें आहे. सामान्य राजा व सामर्थ्यवान् राजा ह्यांतील भेद दर्शविण्यासाठींच हा शब्द उपयोगांत आणीत असावेत याला राजन् असेंहि म्हटलें आहे.

[४६] मा तृ व ध—हा अत्यंत घोर अपराध आहे, पण ब्रम्हज्ञानप्राप्तीनें त्याचें क्षालन होतें असें कौषीतकी उपनिषदांत (३ १) म्हटलें आहे.

[४७] मा हा रा ज्य.—महाराज्य म्हणजे मोठ्या राजाचें ऐश्वर्य ऐतरेय ब्राम्हणांत याचा उल्लेख आला आहे. राज्यापेक्षा माहाराज्यांत ऐश्वर्य फार, असें महाभाष्यांत म्हटलें आहे

[४८] रा ज कु ल—राजकुल म्हणजे राजघराणें. जैमिनीय उपनिषद् ब्राह्मणांत (३ २८, ४) हा शब्द आला असून तेथें त्याचा दर्जा ब्राम्हणकुलाच्या वरचा नसून खालचा आहे असें म्हटलें आहे

[४९] रा ज न्य र्षि—राजन्यर्षि याचा अर्थ राजर्षि पंचविंश ब्राम्हणांत सिंधुक्षिताला हा शब्द लाविला आहे परंतु हा तेथील अर्थ केवळ काल्पनिक आहे

[५०] रा ज न्य बं धु—राजन्यच परंतु बहुधा हलक्या दर्जाचा असा याचा अर्थ आहे. शतपथांत (११, ६, २) जनकाकडून वादांत पराभूत झालेल्या ब्राम्हणांनीं त्याला राजन्यबंधु म्हटल्याचा उल्लेख आहे. बृहदारण्यकामध्यें (६ १, ५) अशाच कारणाकरितां प्रवाहण जैवलीला याच नावानें संबोधिलें आहे. उलटपक्षीं एका उताऱ्यांत [शतपथ १ ५, २, १० येथें] पुरुष व स्त्रिया पृथक् पृथक् भोजन करितात असा उल्लेख आहे. व तेथें ही चाल राजन्यबंधूंत विशेष असा याचें म्हटलें आहे. या ठिकाणीं हा शब्द तिरस्कारदर्शक नाहीं परंतु दुसऱ्या उताऱ्यांत (शतपथ ८. १, ४, १०) नमजिताला वागविण्याच्या पद्धतीवरून असें स्पष्ट होतें कीं ब्राह्मणाचा राजाबद्दलचा तिरस्कार दाखविणारा हा शब्द आहे. पुन्हा एका उताऱ्यांत (शतपथ १. १, ४, १२ येथें) चार जातींचा उल्लेख आहे. तेथें वैश्य आधीं व नंतर, राजन्यबंधु अशा नेहमींच्या क्रमाचा भंग चमत्कारिक रीतीनें झाला आहे.

[५१] रा ज पि तृ.—ऐतरेय ब्राम्हणांत हा शब्द आला असून तेथें त्याचा अर्थ, राजसूययज्ञाच्या वेळीं राजाला दिल्या जाणाऱ्या पदव्यांपैकीं एक, असा आहे. याचा अर्थ राजपिता हा आहे. त्यावरून राज्यपद वंशपरंपरागत असे असें दिसतें राज्यकारभारांत राजपुत्राचा प्रवेश प्राचीनकाळीं सुद्धां होत असे. ऐतरेय ब्राम्हणा [८ १२] मधील राजपिता शब्दाचा अर्थ सायणमतानें सर्व राजांचा पालक असा आहे.

[५२] रा ज पु रु ष—राजपुरुष म्हणजे राजाचा नोकर. निरुक्तांत याचा उल्लेख आलेला आहे.

[५३] रा ज भ्रा तृ—याचा अर्थ राजाचा बंधु पंचविंश ब्राम्हणांत (१० १, ५) आठ वीर पैकीं एक किंवा राजसत्तेच्या आधारस्तंभांपैकीं एक म्हणून उल्लेख आलेला आहे. इतरत्रहि याचा उल्लेख आलेला आहे.

[५४] रा ज मा त्र—कौषीतकि ब्राम्हणांत (२७. ६) आणि शांखायन श्रौतसूत्रांत (१७ ५३) हा शब्द आला आहे. ह्यामध्ये सर्व राजन् याचा (म्हणजे राजपुत्र व राजन्य यांचाहि) समावेश होतोसें दिसतें

[५५] रा जा धि रा ज—याचा अर्थ राजांचा राजा पुढें सार्वभौम याच्या पदवी, असा आहे वैदिक वाङ्मयांत फक्त तैत्तिरीय आरण्यकांतच हा शब्द आला आहे.

[५६] रा ष्ट्र गो प—राष्ट्रगोप म्हणजे राष्ट्राचा रक्षक. ऐतरेय ब्राह्मणांत पुरोहिताला हें नाव दिलें आहे आणि त्याचें विशेष कर्तव्य म्हणजे मंत्रतंत्राच्या योगानें राजाचें व राष्ट्राचें रक्षण करणें हें असे

[५७] सं ग्रा ह यि तृ—कौषीतकी उपनिषदांत (२ १) वर्दी देणाऱ्या नोकराच्या म्हणजे द्वारपालाच्या अर्थी हा शब्द आला आहे

[५८] स चि व—सचिव म्हणजे मित्र, अनुचर (सच् म्हणजे अनुसरण) हा शब्द वेदोत्तर वाङ्मयांत आलेला आहे व त्याचा अर्थ राजाचा मित्र, त्याचा प्रधान, असा आहे पण वैदिक वाङ्मयांतहि ऐतरेय ब्राम्हणांत (३ २०) हा शब्द आलेला असून तो इंद्रानें मरुतांना लावलेला आहे हा शब्द जर्मन कोम्स व इंग्रजी गेसिथ या शब्दांशीं सदृश आहे

[५९] स भा पा ल—तैत्तिरीय ब्राम्हणांत (३ ७,४,६) हा शब्द आलेला असून त्याचा अर्थ सभागृहाचा रक्षक असा आहे.

[६०] स्था प त्य—पंचविंश ब्राम्हणांत (१७ ११,६) स्थपतीचा दर्जा असा याचा अर्थ आहे

[६१] वि द थ—हा शब्द ऋग्वेदामध्यें आलेला असून त्याचा अर्थ अस्पष्ट आहे रॉथच्या मतें ह्याचा मूळचा अर्थ हुकूम व नंतर हुकूम सोडणारा मनुष्य आणि मग धार्मिक किंवा ऐहिक गोष्टींकरितां किंवा लढाईकरितां भरणारी सभा असा आहे ओल्डेनबर्गचें एकदा असें मत होतें कीं, विदथ ह्या शब्दांतली मूळ कल्पना म्हणजे धार्मिक कर्म (विध् या धातूपासून) व नंतर यज्ञ असा अर्थ झाला. लुडविगच्या मतें ह्या शब्दाचा मूळ अर्थ म्हणजे सभा, 'विशेषत मघवन् व ब्राह्मण ह्यांची सभा' हा होय गेल्डनेरच्या मतें ह्या शब्दाचा मूळ अर्थ ज्ञान, ब्राह्मणपण, उपाध्याय वर्गाची विद्या, आणि नंतरचा यज्ञ आणि धार्मिक सत्ता असा आहे उलटपक्षीं ब्लूमफील्ड असें म्हणतो कीं ह्याचा मूळचा अर्थ घर (विद् म्हणजे संपादणें यावरून) व नंतर यज्ञ, कारण यज्ञ घरांत होतो. हाच अर्थ सर्व उताऱ्यांना नीट लागू पडतो विदथ्य हा शब्द एकदा राजाला (सम्राट्) लावलेला आहे त्यावरून ब्लूमफील्डचा अर्थ

सर्वस्वी बरोबर नाहीं असें वाटण्याचा कदाचित् संभव आहे पण विदथ म्हणजे पुष्कळ राजवाड्यांच्या जागा असलेला असा अर्थ केला म्हणजे ही अडचण दूर होते आणि सभा शब्दाशीं विसंगत दिसणारा स्त्रियांचा संबंध विदथ शब्दाशीं ज्या अर्थी आला आहे त्यावरून ब्लूमफील्डच्या अर्थासच पुष्टि येते ह्या शब्दाचा अर्थ ब्राह्मणांच्या घराप्रमाणें आश्रयस्थान किंवा धर्मशाळा असा लुडविग करितो पण हें समवनीय नाहीं

[६] स भा —वैदिककालीन आर्यांच्या सभेला व ती सभा ज्या जागेत होईल त्या जागेला हें नाव होतें ह्या शब्दाचा उल्लेख ऋग्वेद व तदुत्तरकालीनग्रंथ ह्यांत वारंवार येतो. परंतु ह्या सभेचें निश्चित स्वरूप काय होतें हें समजत नाहीं ज्या वेळीं त्या ठिकाणीं सार्वजनिक कामकाज चालत नसे त्यावेळीं या सभागृहाचा उपयोग फांसे खेळण्याकडे होत असावा असें स्पष्ट दिसतें फांसे खेळणाराला सभास्थाणु असें म्हटलें आहे ह्यावरून त्याचें सभेंतील सतत वास्तव्य हें निश्चित होतें ह्या सभागृहाचा उपयोग सामाजिक चर्चेस, त्याचप्रमाणें गाई वगैरेसंबंधीं साधारण संभाषणाकडे होत असावा कदाचित् वाग्विवाद व वाग्युद्धेंहि येथें होत असावींत लुडविगच्या मतानें ही सभा सर्व लोकांची नव्हती तर फक्त ब्राह्मण व मघवन् म्हणजे श्रीमंत लोकांची होती ह्या मताला 'सभेय' ( सभेस बसण्यास योग्य अशा एका ब्राह्मणाचें विशेषण) व 'रयि सभावान्' (सभेस शोभणारी अशी संपत्ति ) अशा शब्दांनीं पुष्टि येते पण ब्लूमफील्डचें असें मत आहे कीं, हे शब्द सभेला न लावता एखाद्या गृहाला लावलेले असले पाहिजेत, आणि कित्येक उताऱ्यासंबंधीं हेंच म्हणणें पीटर्सबर्गकोशास संमत आहे झिमर एवढेंच म्हणतो कीं, ही सभा म्हणजे ग्रामपंचायतीची जागा असून या पंचायतीचा अध्यक्ष 'ग्रामणी' असे पण ह्या म्हणण्यास बिलकुल आधार नाहीं हिलेब्रँट म्हणतो कीं, सभा व समिति यांत फरक करितां येणार नाहीं आणि चांगल्या कुळांत जन्मलेल्या (सुजात) लोकांबद्दल जो उल्लेख आहे तो त्या लोकांना दास किंवा शूद्र ह्यांच्याहून निराळे असें दाखविण्यासाठीं असून, आर्यांच्या एका वर्गाहून आर्यांचा दुसरा निराळा वर्ग, असें दाखविण्यासाठीं नाहीं, आणि हें त्याचें म्हणणें बरोबर दिसतें हिलेब्रँट असेंहि म्हणतो कीं 'सभेतला (सभ्य)अग्नि' हा शब्द जो आला आहे त्यावरून जेव्हां सभा भरत असे त्यावेळीं तिच्या तर्फे होणाऱ्या यज्ञांतला अग्नि असा अर्थ होतो ह्या सभांना स्त्रिया जात नसत कारण त्यांना राजकीय चळवळींत भाग घेऊं देत नसत सभेंत काय काम चाले ह्याबद्दल एकहि उल्लेख नाहीं

[६३] स मि ति —ह्या शब्दानें वैदिककालीन जातसभेचा बोध होतो हा शब्द ऋग्वेदांत व पुढील ग्रंथांत वारंवार आला असून तो कधीं कधीं सभेच्या संबंधांतहि आला आहे लुडविगच्या मतानें समितींत सर्वांचा मुख्यत्वें 'विश' (प्रजा) ह्यांचा आणि जर त्यांची इच्छा असेल तर श्रीमंत लोकांचा (मघवन्) व ब्राह्मणांचाहि समावेश होई तथापि ब्राह्मण व श्रीमंत लोकांचा स्वतंत्र सभाहि असेल पण हें मत बरोबर नाहीं आणि झिमर सुद्धां ही सभा म्हणजे ग्रामसभा असें जें म्हणतो तें बरोबर नाहीं हिलेब्रँटचें असें मत आहे कीं दोनहि शब्द जवळ जवळ एकच आहेत. मूळचा अर्थ समिति म्हणजे जमलेले लोक व सभा म्हणजे जमण्याची जागा असा असावा, व हें म्हणणें बरोबर दिसतें ज्याप्रमाणें राजा सभेला जाई तसा तो समितीला सुद्धां जाई झिमर म्हणतो कीं येथेंच राजाची निवडणूक होई पण ह्या समितींत तर राहूंद्याच पण वस्तुत राज्यपदाकरितां निवड होत असे कीं नाहीं याबद्दल शंकाच आहे पण एवढी गोष्ट खरी कीं राजाला जर आपला उत्कर्ष व्हावासा वाटत असेल तर राजा व समिति ह्यांमध्यें ऐक्य असणें जरूर असे. ह्या समितींत सर्व गोष्टींबद्दल धोरण ठरविण्यांत येत असे, उदाहरणार्थ, कायदे करणें व न्याय देणें पण ह्याबद्दल वैदिक ग्रंथांत प्रत्यक्ष पुरावा उपलब्ध नाहीं देवांची ज्याप्रमाणें सभा असे त्याप्रमाणें त्यांची समिति सुद्धां असे, आणि म्हणूनच तिला दैवी समिति असें म्हणत असत बौद्धग्रंथ, महाभारत व स्मृतिग्रंथ ह्यांतून समितीचें राज्यकारभारांतील प्रभावी वजन कमी झालेलें दिसतें

## अ भि चा र

### अभिचार [ऋग्वेद]

ऋग्वेदांतील अशीं बरींच सूक्तें आहेत कीं, ज्यांचा ऋग्विधान नामक ग्रंथांत अभिचाराकडे विनियोग सांगितला आहे

[1]यातुधान [2]विष (तोडगा)

[ तै. सं ]

[3]वलग

### ताईत, गंडे, दोरे वगैरे [ अथर्ववेद ]

| | | |
|---|---|---|
| अनुरोधन [वशीकरण] | [4]आंजन [मणि] | [5]जंगिड |
| | ऐन्द्र | [6]तस्तुव, तस्तुव |
| अभिचार | ओषधिसंशित (मणिवि०) | [7]ताबुव |
| अभिचारिन् | | तिल (मणिसाधन) |
| अभिभु [मणि वि ) | औदुम्बरमणि | तिलपिंज्या (मणि) |
| अभिवार | कल्माषि [मणि] | [8]त्रिवृत [ताईत ] |
| अभ्याचार | कार्शन (मणि) | त्रैककुद [अंजन) |
| अर्क (अर्कवृक्ष विकारो मणि ) | कृत्या (अभिचार) | दर्भ [मणि] |
| | क्षत्रवर्धन (मणिवि०) | [9]दशवृक्ष (मणि) |
| अर्जुन (मणि करण्याचें साधन ) | | दुर्नामचातन(मणि] |
| | चक्षुर्मंत्र | दुर्णामहन् [मणि ] |
| अलाबु [तोडगा] | चतुर्वीर [अंजन] | देवज (मणिवि० ) |

| | | |
|---|---|---|
| पलाला | बभ्रु [मणिसाधन] | [11]शण |
| पर्णमणि (पलाश | फली[मणिविशेषण] | शण [तागाचा |
| मणि) | भ्रमिदृह [दर्भ | दोरा] |
| पिशाचचातन | मणि वि०] | शतदक्षिण |
| पिशाचजंभनी | मण्डूराघणिकी | शतवार (मणि] |
| पिशाचक्षयण | (अलक्ष्मी) | सपत्नक्षयण |
| पांप (चूर्ण) | यज्ञवर्धन (मणि) | [मणिवि०) |
| [10]प्रतिसर [अभि- | यव (मणिसाधन) | समय [मणि] |
| मन्त्रितरक्षासूत्र] | यामुन (मणि) | सहस्रकांड[मणि |
| प्रजापतिसृष्ट | रथजूति [रथवत् | विशेषण] |
| (मणिवि०) | गन्तृ अञ्जन) | सहस्रार्घ |
| प्राणसंशित | वरण (मणि) | सुमङ्गल (मणि) |
| (मणि वि०) | विद्वल [अभिचार | सूर्यतेजस्(मणिवि) |
| प्रत्यभिचरण | करणारे लोक] | [12]स्राक्त्य [मणि] |
| [मणि वि०] | विषाण (मणि) | हिरण्यस्रज् [शत्रु- |
| फाल(खादिरमणि) | विष्कंधदूषणमणि] | नाशक मणि] |
| बधुर [मणि] | वैयाघ्र | हिरण्यशृङ्ग[मणि] |

[ संहितेतर ]

| | | |
|---|---|---|
| [13]असुरविद्या | [15]माया | [17]विषविद्या |
| [14]भूतविद्या | [16]यातुविद् | |

[1] या तु धा न.—ऋग्वेदांत आणि इतरत्रहि हा शब्द येतो ऋग्वेदोत्तर ग्रंथांत याचा मांत्रिक असा अर्थ आहे 'यातुधानी' हा स्त्रीवाचक शब्द ऋग्वेदांत आणि तदुत्तर वाङ्मयांत सांपडतो

[2] त्रि ष —ऋग्वेद व तदुत्तर ग्रंथ ह्यांत ह्याचा नेहमीचा अर्थ तोडगा असा आहे ह्या तोडग्याबद्दल अथर्ववेदामध्यें मंत्र दिलेले आहेत

[3] व ल ग —तैत्तिरीय संहिता, अथर्ववेद व त्यानंतर झालेले ग्रंथ ह्यांमध्यें गुप्तमंत्र अशा अर्थानें हा शब्द येतो

[4] आं ज न —अथर्ववेदांत हिमालयांतील त्रिककुभ् शिखरावरून आणलेल्या या औषधाचा पुष्कळ वेळां उल्लेख आलेला आहे त्याचा उपयोग अंजनाप्रमाणें करीत असत कदाचित् हें यमुना नदीच्या कांठींहि होत असावें आणि हें अंजन कावीळ, यक्ष्मा, जायान्य आणि दुसरे रोग नाहींसे करित असे पुरुषमेधांत जी बळींची यादी आहे तींत अंजन तयार करणाऱ्या एका स्त्रीचा उल्लेख आहे

[5] ज ङ्गि ड —जङ्गिड हा शब्द रोग बरा करणाऱ्या एका वनस्पतीचें नांव या अर्थानें अथर्ववेदांतील सूक्तामध्यें आलेला आहे ह्याचा उपयोग अनेक (तक्मन्, बलास, आशरीक, विशरीक, पृष्ट्यामय, संधिवात) रोगांवर व विष्कंध, संस्कंध, जंभ वगैरेंवर तोडग्याप्रमाणें होत असे इतकेंच नव्हे तर हा सर्व रोगांवर रामबाण उपाय म्हणून गणला जात असे व सर्व औषधींचा राजा अशी त्या वनस्पतीबद्दल ख्याती असे 'कृषीच्या रसापासून ही वनस्पति होत असे असें म्हणतात, पण त्याचा अर्थ इतकाच कीं, लागवडीच्या जमिनींत ती उत्पन्न होत असे. तिची प्रत्यक्ष लागवड होत असे असें नव्हे जङ्गिड शब्दानें कोणती वनस्पति सूचित होते हें समजत नाहीं [सायणमताने जङ्गिड हा मणि असून तो शणांतील उगवणाऱ्या वनस्पतीचा तयार केला जात असे] कारण अथर्ववेदोत्तर ग्रंथांत हा शब्द येत नाहीं कॅलॅंडच्या मतें अङ्गिरस या नांवानें कौशिकसूत्रांत हा शब्द आला आहे.

[6] त स्तु व किं वा त स्तु न —अथर्ववेदाच्या पैप्पलाद संहितेंत हा शब्द सर्पविषावर असलेल्या तोडग्याचें नाव आहे व अथर्ववेदामध्यें ताबुव त्याच्याबरोबर ह्याचा उल्लेख आलेला आहे.

[7] ता बु व —अथर्ववेदामध्य सर्पदंशावर असलेल्या तोडग्याचें हें नांव आहे पैप्पलादशाखेच्या प्रतींत ताबुवाच्या ऐवजीं ताबुक हा शब्द आलेला आहे वेबरच्या मतें ह्याचें मूळचें रूप तावुव होतें व तें = उभें 'उद्गण' ह्यापासून आलेलें होतें व त्याचा अर्थ 'याचणें' असा असावा पण हें असंभाव्य दिसतें

[8] त्रि वृ त् — ह्याचा अर्थ 'तीन प्रकारचा' असा असून अथर्ववेदामध्यें एका मन्त्रसिद्ध ताईताचें किंवा तोडग्याचें हें नाव आहे

[9] द श वृ क्ष —रॉथच्या मतानें हें एका झाडाचें नाव आहे व तें अथर्ववेदामध्यें आलेलें आहे पण व्हिटने ह्या शब्दाला विशेषण समजून त्याचा अर्थ 'दहा वृक्षांचा' असा करतो

[10] प्र ति स र —अथर्ववेदांत हा शब्द पुष्कळ वचनांतून आलेला आढळतो व तदनंतरच्या ग्रंथांतून रॉथच्या म्हणण्याप्रमाणें 'ताईत, तोडगा' या अर्थानें उपयोगांत आलेला आहे तें एक बंधनसाधन असून त्याच्या धारणावरून तें हललें असावें याचा अर्थ संशयात्मक आहे कदाचित् मूळ धात्वर्थ हल्ला करणें असाहि असावा श्रौतकर्मांच्या प्रयोगांत यज्ञदीक्षेच्या पूर्वी प्रतिसरबंध नामक एक कर्म केलें जातें व त्यांत एक दोरा मंत्रून दीक्षिताच्या हातांत बांधीत असतात

[11] श ङ्ख —अथर्ववेदामध्यें कृशनाच्या विशेषणाबरोबर ह्याचा अर्थ ताईत किंवा तोडगा म्हणून उपयोगांत आणलेली मोत्याची शिंप असा आहे अथर्ववेदोत्तर ग्रंथांत ह्याचा वाजविण्याचा शंख असा अर्थ आलेला आहे

[12] स्रा क्त्य —अथर्ववेदामध्यें एका ताइताचें (मण्याचें) हें विशेषण आलेलें आहे वेबरचे मतानें ह्याचा अर्थ स्फटिक (शब्दशः अर्थ बहुकोणाचा) असा आहे टीकाकाराचे मतानें ह्याचा अर्थ 'तिलकवृक्षापासून झालेला' असा आहे

[13] अ सु र वि द्या —'असुरांचें शास्त्र' शांखायन आणि आश्वलायन श्रौतसूत्रें म्हणतात कीं, शतपथ ब्राह्मणांत जो माया शब्द वापरला आहे तो आणि हा एकच आहे. आणि

प्रोफेसर एगलिंगच्या मताप्रमाणें त्याचा स्पष्ट अर्थ "जादु" असा होतो.

[१३]भूतविद्या—हें एक शास्त्र आहे याचा उल्लेख छांदोग्य उपनिषदांत एकेठिकाणीं आला आहे हें बहुधा मनुष्याम पीडा देण्याच्या "पिशाचाचें शास्त्र" असावें, व यांत त्याचें कसें निवारण करावें हें दिलें असावें.

[१४]माया.—हा शतपथ ब्राह्मणांत (१३. ४, ३, ११) असुरविद्या (जादु) या अर्थाचा हा शब्द आहे

[१५]यातुविद—अनेकवचनी ज्यांना चेटकाची उत्तम माहिती आहे असे शतपथ ब्राह्मणांत अथर्ववित या अर्थी याचा उल्लेख आहे

[१६]विषविद्या—आश्वलायन श्रौतसूत्रामध्यें इतर शास्त्रांबरोबर हिचा उल्लेख आलेला आहे

## इतर कर्में

### कर्मनामें [ ऋग्वेद ]

अपस्
अप्नस्
ऋनेकर्म
ओक्य (गृहकर्म)
करण
करस्
करंती
करिक्रत्
क्रतु
कर्तवै
कर्तृ
कर्त्व
कर्वर
कर्हण
कृचन्
कृत्वी

केपथ (पापकर्म)
क्रतु
क्रियमाण
क्षेत्रजेष [वीरकर्म]
चक्रत्
चक्रतु
चकुस्
चर्कृत्य
तदपस्
दंसस्
दुष्कृत
धी
पनयाय्य (स्तुत्यकर्म)
मनोतृ
व्रत

विधर्मन् (विविधकर्म)
विधान
विव्रत
विष्पित, विष्टिवन्
वृषव्रत
वेपस
वेष
शक्ति
शक्मन्
शची
शमी
शिमी
शिल्प
शृध्या (उत्साहनीयकर्म)
स्वापत्य

### कर्मविशेष [ तै. सं ]

अपस् (अनुष्ठीय कर्माचें विशेषण)
असूर्य (हिंस्र)
अस्कन्नहविस् (प्रणीता प्रणयनरूप कर्माचें विशेषण)
उत्सर्ग (अंगुलीचा-

त्याग)
उपसद्य (अनुष्ठेय)
उपस्पृश्य
पितृदेवत्य (व्रताचरणाचें विशेषण)
प्रतीक (कर्म प्रारंभमान)

प्रयोग (विध्यनुष्ठान)
प्रोक्षण
भद्रा
भृत्या (निर्वाहक्रिया)
मिश्र (यज्ञकर्माचें विशेषण)
मुष्टि

विमोचन (मुक्तता)
विलोम (यज्ञकर्म विशेष)

स्वपस् (शोभन व्यापार)
हविष्करण (प्रभृत-

सामयागादि क्रियाचें विशेषण)

### इंद्रियकर्में क्रियापदें [ अथर्ववेद ]

अन्वैक्षन्त
अभ्रवम
ईक्षयस्व

उन्मथायति
उपजिघ्रति
उपागाहि

उपारिम
उपामृज
उपदेति
शृणामासि

### धंदेवाले [ ऋग्वेद ]

अथर्वा [पुरोहित स्त्री]
अग्रसद् [आचारी]
अर्मावचातन
अमीवहन् [वैद्य]
अरितृ [कर्णधार]
अविशस्तृ (हिंसक)
अहर्विद (ज्योतिषी)
इन्द्रगोप
[१] उपलप्रक्षिणी
[२] ध्मार (सोनार)
कार्मार
कला
क्षिपणु (व्याध)
खनमान (खणणारा)
खनितृ
गन्तृ
गायत्
जोष्टृ [सेवक]
[३] तक्षन् [सुतार]
तक्ष्या
तष्टृ [सुतार]
तस्कर

तोद (धनी, शिक्षक)
त्वष्टृ
त्वक्षीयस्
[४] त्सारिन् [पारधी]
द्रवि (सोनार)
दूत
दूती
[५] दृहन्
[६] ध्मातृ
नर्तयत
नृतमान
नृति (नृत्य)
[७] नृतू
नृत्यत्
नैचाशाख (सावकार)
पदज्ञ
[८] पथिकृत्
परिपथिन्
[९] पशुप
पशुरक्षि (गुराखी)
[१०] पाशिन्
[११] वेकनाट [व्याज बट्टा करणारे]
[१२] भिषज
भिषक्तम
भोज्या

मायावत् [जादूगार]
मायिन्
मृगण्यु [शिकारी]
यातुमति
रंभिन् [दौवारिक]
वणिज्
[१३] वप्तृ (न्हावी)
वय्या (कुशलविणकर)
विश्ववार (आतिथ्य करणारे)
[१४] शस्तृ
शाक्म [शिक्षक]
[१५] श्वघ्नी [व्याध]
संवयंती [विणणारी]
सहगोप (पशुपालसहितगो)
सीरिन् (विणकर)
सेक्तृ (पखालवाला)
[१६] स्तेन
स्थिवि (व्याजोपजीवि)
स्फाति (व्याज)
स्थपति (गवळी)

### [ तै. सं ]

अक्षावाप (द्यूतकार)
अधिशास्तृ (अदाफुलशमिता)

गोप (गोरक्षक)
तस्कर
परिचर
भिषज् [वैद्यकीचा धंदा करणारे]

यवमत [कृषिकर्म करणारा]
वाणिज

नाहीं. ऋग्वेदांत वरील स्थलाशिवाय अन्यत्र याचा उल्लेख नाहीं.

क श्य प-भू ता शः— हा १०.१०६ या सूक्ताचा द्रष्टा आहे. याला काश्यप म्हटलें आहे. सदर सूक्तांतील शेवटच्या ऋचेंत याचा उल्लेख आहे. परंतु तेवढ्यावरून तो कश्यपपुत्र अथवा कश्यप कुलांतील असल्याचें सिद्ध होत नाहीं.

का श्य प-नि ध्रु वः—९. ६३ या सूक्ताचा हा द्रष्टा असून याला काश्यप असें म्हटलें आहे. वरील सूक्तांत याचा उल्लेख नाहीं. ऋग्वेदांत निध्रुवि शब्द ७.३, १,८.२० १२;९९, २२ या तीन ठिकाणीं आहे. परंतु तो व्यक्तिवाचक नाहीं. तेव्हां ऋग्वेदांतील आधारावरून हा कश्यपकुलांतील ठरत नाहीं.

का श्य प-अ व त्सा र—४. ५३ ते ६० व ५. ४४ हीं सूक्तें याच्या नावावर असून याला काश्यप म्हटलें आहे. वरील सूक्तांपैकीं ५.४४ या सूक्तांतील १० व्या ऋचेंत याचा उल्लेख आहे. परंतु त्यावरून हा काश्यप कुलांतील असल्याचें ठरत नाहीं. वरील स्थलाशिवाय याचा कोठें उल्लेख नाहीं. याच्याबरोबर एवावद, यमत, सधि याचा उल्लेख आहे.

का श्य प-रे भः—हा ८. ९७ या सूक्ताचा द्रष्टा आहे व याला काश्यप म्हटलें आहे. वरील सूक्ताच्या ११ व्या ऋचेंत याचा उल्लेख आहे. ऋग्वेदांत बऱ्याच ठिकाणीं रेभ शब्द आला आहे. परंतु १. ८, १० येथेंच तो व्यक्तिवाचक अर्थानें आहे. परंतु त्याहि ठिकाणीं तो काश्यप कुलांतील असल्याचा उल्लेख नाहीं.

का श्य प अ सि त अ थ वा दे व ल.—९. ५ ते २४ या सूक्ताचा द्रष्टा असून याला काश्यप म्हटलें आहे. वरील सूक्तांत अथवा ऋग्वेदांत असित अगर देवल या व्यक्तींचा कोठेंच उल्लेख नाहीं. अर्थात तो काश्यप असल्याचाहि उल्लेख नाहींच.

वि वृ ह-क श्य प गो त्रः-१०. १६३. या सूक्ताचा द्रष्टा असून याला कश्यपगोत्री असें म्हटलें आहे. सदर सूक्तांत 'विवृहामि' पद प्रत्येक ऋचेंत आलें असल्यामुळेंच सदर सूक्ताचा विवृह ऋषि आहे असें म्हटलें असावें. विवृहाचा ऋग्वेदांत कोठेंहि उल्लेख नाहीं.

शि खं डि नी-क श्य पा च्या क न्या.—९. १०४ या सूक्ताच्या द्रष्टया कश्यपाच्या शिखंडिनी नामक दोन मुली असल्याचें लिहिलें आहे. या शिखंडिनींचा ऋग्वेदांत कोठेंहि उल्लेख नाहीं.

रे भ सू नू क श्य प-गो त्री— ९. ९९ या सूक्ताचे हे दोघे विकल्पानें द्रष्टे असून यांना काश्यपगोत्री असें म्हटलें आहे. परंतु ऋग्वेदांत यांचा उल्लेख नाहीं. अथवा हे काश्यप गोत्री असल्याचा उल्लेख नाहीं.

सू नु-ऋ भु पु त्र—१०. १७६ या सूक्ताचा हा द्रष्टा असून याला ऋभुपुत्र म्हटलें आहे. वरील सूक्ताच्या आरंभीच्या ऋचेंतच 'सूनव ऋभणां' अशीं पदें आहेत. परंतु तीं एका व्यक्तीचीं बोधक नाहींत. ऋग्वेदांत या सूनुचा व्यक्तिवाचक असा उल्लेख नाहीं.

## भरद्वाजकुल.

१ सर्वानुक्रमणीसिद्ध वंशसंबंध व कुलसंबंध—बृहस्पतीचा मुलगा भरद्वाज. भरद्वाज कुलांतील.-ऋजिश्वन्, पायु, वसु, गर्ग, सुहोत्र. सुहोत्राचे मुलगे पुरुमीह्ळ व अजमीह्ळ.

भ र द्वा ज—हा ऋ. मंडळ ६ चा द्रष्टा असून या मंडलांतील बरींच सूक्तें याच्या नावावर आहेत. सदर मंडलांत भरद्वाजाचा उल्लेख १६।१७ वेळ आला असून ऋग्वेदांत अन्य ठिकाणींहि आला आहे. परंतु अनुक्रमणीकार याला बृहस्पतिपुत्र असें जें म्हणतात त्याला आधार ऋग्वेदांत नाहीं.

ऋ जि श्व.—६. ४९ ते ५२ या सूक्ताचा द्रष्टा आहे व विकल्पानें ९. ९८ याहि सूक्ताचा द्रष्टा आहे. याला अनुक्रमणीकार भारद्वाज अथवा भरद्वाजकुलोत्पन्न असें म्हणतात. वरील सूक्तांपैकीं ६. ५०, १५. व ५१, १२ या दोन ऋचांत भरद्वाजाचा बहुवचनी उल्लेख आहे. परंतु 'भारद्वाज ऋजिश्व' असा उल्लेख नाहीं. ६. २०, ७ या भरद्वाजाच्या सूक्तांतील ऋचेंत ऋजिश्वन् याचा उल्लेख आला आहे. ऋग्वेदांत एक 'वैदथिनऋजिश्वा' आहे. व त्याचा उल्लेख ४.१६, १३ व ५. २९, ११ या दोन ठिकाणीं आहे. आणि दुसरा औशिज ऋजिश्व. याचा उल्लेख १०. ९९, ११ या ठिकाणीं आहे.

पा यु.—हा ऋ. ६. ७५ व १०. ८७ या सूक्ताचा द्रष्टा असून याला भरद्वाजपुत्र अथवा भारद्वाज म्हटलें आहे. वरील दोन्ही सूक्तांत याचा उल्लेख नाहीं. ऋग्वेदांत पायु शब्द बऱ्याच वेळां आला आहे. परंतु त्याचा 'रक्षण करणारा' असाच सर्व ठिकाणीं अर्थ सायण करतात. मात्र ६. ४७ या भरद्वाजपुत्र गर्ग याच्या सूक्तांतील २४ व्या ऋचेंत अश्वयानें पायुनामक ऋषीला दान दिल्याचा उल्लेख असून २५व्या ऋचेंत भारद्वाजाचा उल्लेख आहे. परंतु पायु हा भारद्वाज अथवा भरद्वाजपुत्र असा उल्लेख नाहीं.

ग र्ग.—ऋ. ६. ४७ या सूक्ताचा हा द्रष्टा आहे. याला भरद्वाजपुत्र अथवा भारद्वाज म्हटलें आहे. ऋग्वेदांत गर्गाचा कोठेंहि उल्लेख नाहीं. वरील सूक्ताच्या २५ व्या ऋचेंत भरद्वाजाचा उल्लेख आहे.

व सु.—हा सूक्तकार ९. ८० ते ८२ या सूक्तांचा द्रष्टा असून याला भारद्वाज अथवा भरद्वाजपुत्र असें म्हटलें आहे. वरील सूक्तांत अथवा ऋग्वेदांत वसु या व्यक्तीचा उल्लेख नाहीं.

सु हो त्र.—६. ३१, ३२ या सूक्तांचा द्रष्टा. याला भारद्वाज-भरद्वाज कुलांतील-असें म्हटलें आहे. सदर सूक्तांतील ३१ व्या ऋचेंत भरद्वाजाचा उल्लेख आहे परंतु सुहोत्र भर-

द्राज असल्याबद्दल उल्लेख नाहीं. सुहोत्राचा ऋग्वेदात उल्लेख नाहीं.

पुरुमीढ्‌ळ, अजमीढ्ळ.—४. ४३, ४४ या सूक्ताचे द्रष्टे. याना सुहोत्रपुत्र म्हटलें आहे. वरील सूक्तापैकीं सू. ४४ ऋचा ६ यांत आजमीढ्‌ह्याचा उल्लेख आहे. व पुरुमीढ्‌ह्याचा उल्लेख १. १५१, २;१८३,५. ५. ६१, ९. ८. ६०, १४ या ठिकाणीं आहे. परंतु त्यापैकीं कोणत्याहि स्थळीं पुरुमीढ्‌ळ व आजमीढ्ळ सुहोत्रपुत्र असल्याचा उल्लेख नाहीं. ८. ६० याहि सूक्ताचा पुरुमीढ्ळ द्रष्टा असून त्या सूक्ताच्या शेवटीं त्याचा उल्लेख आहे परंतु तो सुहोत्रपुत्र असल्याचा नाहीं.

### विश्वामित्रकुल.

**[ २ ] सर्वानुक्रमणीसिद्ध कुलसंबंध व ऋग्मंसिद्ध वंशसंबंध.**—कुशिकाचा मुलगा विश्वामित्र

**( ३ ) सर्वानुक्रमणीसिद्ध वंशसंबंध व कुलसंबंध.**—इषीरथाचा मुलगा कुशिक, कुशिकाचा मुलगा गाथी; गाथीचा मुलगा विश्वामित्र विश्वामित्राचे मुलगे ऋषभ, रेणु, अष्टक,कत, मधुच्छंद. कताचा मुलगा उत्कील. मधुच्छंदाचे मुलगे अघमर्षण व जेता. विश्वामित्र कुलांतील प्रजापति व पूरण.

कुशिक.—सर्वानुक्रमणीप्रमाणें हा ३.३३, या सूक्ताचा द्रष्टा असून याला इषीरथपुत्र असें म्हटलें आहे. ऋग्वेदात कुशिकाचा बऱ्याच वेळ उल्लेख आला असून तो सर्व ठिकाणीं कुलवाचक असा बहुवचनी आहे. ३. ३३, ५. या ठिकाणीं हें एकवचनी पद एकाव्यक्तीचें नाव या अर्थानें आलें आहे. परंतु तेथें इषीरथपुत्र असा उल्लेख नाहीं. व इषीरथ या व्यक्तीचा ऋग्वेदात उल्लेख नाहीं. या कुशिकाला सर्वानुक्रमणीकारांनीं १०. १२७ या सूक्ताचा द्रष्टा सांगताना त्याला विकल्पानें सोभरिपुत्र असें म्हटलें आहे. परंतु त्यालाहि ऋग्वेदांत आधार नाहीं.

विश्वामित्र.—ऋग्वेद मंडल तीन चा हा द्रष्टा असून त्यांतील बरीचशीं सूक्तें याच्या नांवावर आहेत. सर्वानुक्रमणीकार याला गाथीपुत्र असें म्हणतात. परंतु याला ऋग्वेदात आधार नाहीं. परंतु हा कुशिक याचा मुलगा असल्याबद्दल ३. ३३, ५ या ठिकाणीं उल्लेख आहे.

मधुच्छंद.—ऋ. १.१ ते १०व ९.१ या सूक्ताचा हा द्रष्टा असून याला वैश्वामित्र म्हटलें आहे. ऋग्वेदांत मधुच्छंदाचा उल्लेख नाहीं.

गाथी.—या सूक्तकाराच्या नांवावर ३. १९ ते २२ हीं सूक्तें असून याला कुशिकपुत्र म्हटलें आहे. ऋग्वेदात गाथी या व्यक्तीचा उल्लेख नसल्यामुळें तो कुशिकपुत्र असल्याचें ऋग्वेदावरून ठरत नाहीं.

ऋषभ.—हा ३. १३, व १४ आणि विकल्पानें १०. १६६ या सूक्तांचा द्रष्टा असून याला विश्वामित्रपुत्र असें म्हटलें आहे. परंतु याला ऋग्वेदांत आधार नाहीं. ऋग्वेदात ऋषभ पद बऱ्याच ठिकाणीं आलें आहे परंतु ते व्यक्तिवाचक नाहीं.

रेणु.—हा १०. ८९ या सूक्ताचा द्रष्टा असून याला विश्वामित्रपुत्र म्हटलें आहे. परंतु याला ऋग्वेदात आधार नाहीं. ऋग्वेदात रेणु नामक व्यक्तीचा उल्लेख नाहीं.

अष्टक.—हा १०. १०४ या सूक्ताचा द्रष्टा असून याला वैश्वामित्र असें म्हटलें आहे. ऋग्वेदात याचा उल्लेख नाहीं.

पूरण.—हा १०. १६० या सूक्ताचा द्रष्टा असून यालाहि वैश्वामित्र म्हटलें आहे. ऋग्वेदात याचा उल्लेख नाहीं.

कत.—हा ३. १७; व १८ या दोन सूक्ताचा द्रष्टा असून याला वैश्वामित्र ( विश्वामित्रपुत्र ) म्हटलें आहे. वरील दोन्ही सूक्तांत विश्वामित्राचा उल्लेख नाहीं व ऋग्वेदात कत याचा उल्लेख नाहीं.

उत्कील.—हा ३. १५;१६ या दोन सूक्तात द्रष्टा असून याला कात्य (कतपुत्र) म्हटलें आहे. वरील दोन्ही सूक्तात विश्वामित्राचा उल्लेख नाहीं व ऋग्वेदात कत या व्यक्तीचा उल्लेख नाहीं

जेता.—हा १. ११ या सूक्ताचा द्रष्टा असून याला मधुच्छंदपुत्र म्हटलें आहे. सदर सूक्तात अथवा ऋग्वेदांत याचा उल्लेख नाहीं.

अघमर्षण.—१०. १९० या सूक्ताचा हा द्रष्टा असून याला मधुच्छंदपुत्र म्हटलें आहे सदर सूक्तात व ऋग्वेदात याचा उल्लेख नाहीं.

प्रजापति—३. ३८ या सूक्ताचा हा द्रष्टा ( विकल्पानें ) असून याला वैश्वामित्र असें म्हटलें आहे परंतु हा वैश्वामित्र असल्याचें ऋग्वेदावरून ठरत नाहीं.

### गोतमकुल.

**( २ ) सर्वानुक्रमणीसिद्ध कुलसंबंध व ऋग्मंसिद्ध वंशसंबंध.**—रहूगणाचा मुलगा गोतम. गोतमाचा मुलगा नोधा.

**( ३ ) सर्वानुक्रमणीसिद्ध वंशसंबंध व कुलसंबंध.**— रहूगणाचा मुलगा गोतम. गोतमाचे मुलगे नोधा व वामदेव नोधसचा मुलगा एकद्यू व वामदेवाचा मुलगा बृहदुक्थ.

गोतम.—या सूक्तकाराकडे १. ७४; व ९ ३१ या सूक्ताचें कर्तृत्व आहे. अनुक्रमणीकार याला ' रहूगणपुत्र ' असें म्हणतात. १. ७८ या सूक्तात बहुतेक सर्व ऋचामध्ये गोतमाचा उल्लेख असून ५ व्या ऋचेत तो आपणास ' रहूगणाः ' म्हणवितो यावरून तो रहूगण याचा मुलगा असावा.

नोधा.—ऋ. १.५८ ते ६४ या सूक्ताचा हा द्रष्टा. अनुक्रमणीत याला गोतमपुत्र म्हटलें आहे. तो ज्या ऋचाच्या

द्रष्टा आहे. त्या पैकीं १. ६१, १४; ६२, १३; ६४, १ या ऋचेंत त्याचा उद्देश असून १.६२, १३; ६०, ५; ६१, १६ या ऋचेंत तो आपणास गोतमास:( गोतमपुत्राः )म्हणवितो. यावरून तो गोतमपुत्र असावा असें वाटतें.

एकद्यू.—८. ६९ या सूक्ताचा हा द्रष्टा असून याला अनुक्रमणीकार नोधसपुत्र असें म्हणतात. यानें द्रष्ट असलेल्या सूक्ताच्या ८ व्या ऋचेंत फक्त 'एकद्यू' असें पद आलें आहे. परंतु त्यात तो नोधसपुत्र असल्याचा उद्देश नाहीं; व अन्यत्रहि तसा उल्लेख नाहीं.

वामदेव.—हा मंडळ ४ चा द्रष्टा असून त्याला अनुक्रमणींत गोतमपुत्र म्हटलें आहे. ऋग्वेदात फक्त ४. १६, १८ या एकाच ठिकाणीं वामदेवाचा उल्लेख आहे. ४. ४, ११ या ऋचेंत तो आपणास गोतमपुत्र म्हणवीत आहे. पण हें सूक्त वामदेवाचेंच असल्याबद्दल निश्चितता नसल्यामुळे वामदेवाला गोतमपुत्र निश्चितपणें म्हणता येत नाहीं.

बृहदुक्थ.—हा १०. ५४ ते ५६ या सूक्तांचा द्रष्टा आहे व त्यामध्येंच त्याचा उल्लेख आहे. परंतु त्यावरून तो वामदेवपुत्र ठरत नाहीं. ऋग्वेदांत वरील स्थळाशिवाय अन्यत्र याचा उल्लेख नाहीं.

## वसिष्ठकुल.

(२) सर्वानुक्रमणीसिद्ध कुलसंबंध व ऋङ्मंत्रसिद्ध वंशसंबंध.–मित्रावरुणाचे मुलगे वसिष्ठ व अगस्त्य. अगस्त्याची बायको लोपामुद्रा.

(३) सर्वानुक्रमणीसिद्ध वंशसंबंध.–मित्रावरुणाचे मुलगे अगस्त्य व वसिष्ठ. वसिष्ठाचे मुलगे मृळीक, चित्रमहस्, शक्ति. शक्तीचे मुलगे पराशर व गौरिवीति.

वसिष्ठ.—ऋ. मंडळ ७ यातील बरींच सूक्तें वसिष्ठदृष्ट व कांहीं वसिष्ठकुलातील ऋषींनीं दृष्ट आहेत असें अनुक्रमणीकार म्हणतात. व म्हणून सातव्या मंडळाला वसिष्ठमंडळ असें म्हणतात. ५. ३३, ११ या ऋचेंत वसिष्ठ मित्रावरुणाचा मुलगा असल्याचा उद्देश आहे. तसेंच ७. ३३, १३ या ऋचेंत वसिष्ठ व मान यांचा मित्रावरुण व उर्वशी यांच्यापासून जन्म झाल्याचा उद्देश आहे.

शक्ति.—हा ऋ. ७. ३२ या सूक्ताचा द्रष्टा आहे. याला वसिष्ठपुत्र असें अनुक्रमणींत म्हटलें आहे. परंतु याला आधार ऋग्वेदांत आढळत नाहीं. याच्या नांवावर असलेल्या सूक्तांत व ऋग्वेदात अन्यत्र शक्ति शब्द आला आहे परंतु तो व्यक्तिवाचक नाहीं.

पराशर.—हा १. ६५ ते ७३ या सूक्तांचा द्रष्टा आहे. वरील सूक्तांत याचा उल्लेख नाहीं. ऋग्वेदात ७. १८, २१; १०४, २१ या दोनच ठिकाणीं पराशराचा उल्लेख आला आहे. *परंतु सर्वानुक्रमणीकार याला जे शक्तिपुत्र म्हणतात तें या ठिकाणीं सिद्ध होत नाहीं.* ७. १८, २१ या ठिकाणीं पराशराबरोबर वसिष्ठ व शतयातु यांचा उल्लेख आहे. निरुक्त ६. ३० मध्यें पराशर हें वसिष्ठाचेंच नांव आहे असें म्हटलें आहे.

मृळीक.—हा १०. १५० या सूक्ताचा द्रष्टा आहे. सदर सूक्तात मृळीक शब्द बऱ्याच वेळां आला आहे व त्याचा 'सुखकार' 'आणि विकरपानें सुख' असा सायणांनीं अर्थ दिला आहे. ऋग्वेदांत आणखी पुष्कळ ठिकाणीं मृळीक शब्द आला आहे परंतु त्याचा सुख असाच सर्व ठिकाणीं अर्थ केला आहे. अनुक्रमणीकार जे याला वसिष्ठपुत्र म्हणतात त्याबद्दल ऋग्वेदात अथवा इतर वेदांत आधार नाहीं. १०. १५ सूक्तांतील ५ व्या मंत्रांत वसिष्ठाचा उद्देश आहे. परंतु त्यावरून तो मृळीकाचा बाप ठरत नाहीं.

चित्रमहस्.—हा १०. १२२ या सूक्ताचा द्रष्टा आहे व अनुक्रमणीकार याला वसिष्ठपुत्र असें म्हणतात. चित्रमहस् हें पद ऋग्वेदात एकदांच व तें वरील सूक्तांतील *पहिल्या ऋचेंत आहे.* परंतु तें व्यक्तीचें नांव नसून अग्नीचें विशेषण आहे. सदर सूक्तांतील शेवटच्या ऋचेंत 'वसिष्ठासः' असें बहुवचनी पद आहे. परंतु तेवढ्यावरून चित्रमहस् नांवाचा कोणी वसिष्ठपुत्र असल्याचें ठरत नाहीं.

गौरिवीति.—हा ५. २९ व १०. ७३ व ७४ या सूक्तांचा द्रष्टा असून अनुक्रमणीकार याला शक्तिपुत्र असें म्हणतात. ऋग्वेदात ५. २९, ११ या ठिकाणीं एकदांच याचा उल्लेख आला आहे. परंतु त्यांत तो शक्तिपुत्र असल्याचें ठरत नाहीं.

## अगस्त्यकुल.

(१) सर्वानुक्रमणी व ऋङ्मंत्रसिद्ध वंशसंबंध.— मित्रावरुणपुत्र अगस्त्य. अगस्त्याची स्त्री लोपामुद्रा.

(२) सर्वानुक्रमणीसिद्ध वंशसंबंध.—मित्रावरुणाचा मुलगा अगस्त्य. अगस्त्याची बायको लोपामुद्रा व मुलगा दृढच्युत. दृढच्युताचा मुलगा इध्मवाह.

अगस्त्य.—अनुक्रमणीकारांनीं १ १६५ ते १९१ या सूक्तांचा हा द्रष्टा आहे असें म्हटलें आहे. याचा मान असें दुसरें नांव असून मित्रावरुणापासून वसिष्ठाचा व याचा जन्म झाल्याचा उद्देश ७. ३३. १० व १३ या ऋचांत आहे. याची लोपामुद्रा नांवाची बायको असल्याचा १. १७९ या सूक्तांत उद्देश आहे.

मान अथवा मान्य.—८. ५६ या सूक्ताचा द्रष्टा. याला मित्रावरुणपुत्र म्हटलें आहे मित्रावरुणापासून याचा जन्म झाल्याचा उद्देश ७. ३३, १३ या ऋचेंत आहे. *अगस्त्याचेंच हें नांव असावें.*

दृढच्युत.—हा ९. २५ या सूक्ताचा द्रष्टा असून *याला अनुक्रमणींत* अगस्त्यपुत्र म्हटलें आहे. सदर सूक्तांत अथवा ऋग्वेदांत याचा कोठेंहि उद्देश नाहीं अर्थात हा अगस्त्यपुत्र असल्याचें ऋग्वेदावरून सिद्ध होत नाहीं.

इ ध्म वा ह.—हा ९. २६ या सूक्ताचा द्रष्टा. याला दृढच्युतपुत्र असे अनुक्रमणीकार म्हणतात. परंतु तसा उल्लेख ऋग्वेदात नाहीं.

## कुलविरहित

पुढील सूक्तकाराचे कुलसंबंध ऋग्मंत्र, सर्वानुक्रमणी अथवा बृहद्देवता यांत आढळत नाहींत.

( १ ) ऋग्मंत्रसिद्ध वंशसंबंध.—त्रिवृष्णाचा मुलगा त्र्यरुण. पुरुकुत्साचा मुलगा त्रसदस्यु. भरताचे मुलगे देवश्रवा व देववात. ऋष्टिषेणाचे मुलगे देवापि व शंतनु. अथर्वन्‌चा मुलगा बृहद्दिव. विवस्वान्‌ची मुले यमी व यम. पिजवनाचा वंशज सुदास. श्रोमाचा मुलगा आरंभ. वृषागिराचे मुलगे ऋज्राश्व, अंबरीष, सहदेव, भयमान, सुराधस्.

[ २ ] सर्वानुक्रमणीसिद्ध वंशसंबंध.—भरताचा मुलगा अश्वमेध. वद्रूचा मुलगा अर्बुद. भलंदनाचा मुलगा वत्सप्री. वृषागिरपुत्र अंबरीष व त्याचा मुलगा सिंधुद्वीप. इश याचा मुलगा धनाक. इंद्राचा मुलगा वम्र. रोहिदश्वाचा मुलगा वसुमना. विवस्वान्‌पुत्र यम व त्याचे मुलगे मथित, संकुसुक, शंख दमन, देवश्रवस्. उशीनराचा मुलगा शिबि. इंद्राचे मुलगे वसुक्र व विमद. दिवोदासाचा मुलगा परुच्छेप व त्याचा मुलगा अनानत. अथर्वन्‌चे मुलगे बृहद्दिव व भिषक्. सोमाचा मुलगा बुध. प्रजापतीचा मुलगा संवरण. अजीगर्ताचा मुलगा शुनःशेप. चित्राचा मुलगा कुरुसुतिबर्हिष्. मनूचे नाभानेदिष्ट व शार्यात युवनाश्वाचा मुलगा मंधाता. इलाचा मुलगा पुरूरवा व पुरूरव्याची बायको उर्वशी. भर्म्यश्वाचा मुलगा मुद्गल व मुद्गलाची बायको मुद्गलानी. सुवेदसचा मुलगा शिरीप. वंदनाचा मुलगा दुवस्यु.

त्र्य रु ण.—५. २७ या सूक्ताचा द्रष्टा. याला त्रैवृष्णि-त्रिवृष्णिपुत्र म्हटलें आहे. वरील सूक्ताच्या पहिल्या ऋचेंत त्रैवृष्ण-त्र्यरुण असा उल्लेख आहे, व त्र्यरुणाचा उल्लेख याच सूक्तात २ व ३ या ऋचांमध्ये आहे.

त्र स द स्यु.— ४. ४२ व ५. २७ या सूक्ताचा द्रष्टा. याला पौरुकुत्स्य असें म्हटलें आहे. वरील सूक्ताच्या ३ ऱ्या ऋचेंत याचा उल्लेख आहे. परंतु तो पौरुकुत्स्य असल्याचा नाहीं. ऋग्वेदामध्यें त्रसदस्यूचा उल्लेख पुष्कळ ठिकाणीं आहे, व तो पुरुकुत्सपुत्र-त्रसदस्यु असा ५. ३३,८;८.१९,३;७.१९,३६ या तीन ठिकाणीं आहे.४.४२ या सूक्ताच्या ९ व १० ऋचांत याचा उल्लेख असून याची आई पुरुकुत्सानी इत्यादि उल्लेख आहे.

अ श्व मे ध.—५. २७ या सूक्ताचा हा द्रष्टा आहे. याला भारत-भरतपुत्र-असें म्हटलें आहे. वरील सूक्ताच्या ४, ५, व ६ या ऋचांत अश्वमेधाचा उल्लेख आहे. परंतु तो भरतपुत्र असल्याबद्दल नाहीं.

दे व श्र वा, दे व वा त.—३. २३ या सूक्ताचे हे दोघे द्रष्टे. यांना भारत-भरतपुत्र-म्हटलें आहे. वरील सूक्ताच्या २ व ३ या ऋचांत 'भारत देवश्रवा देववात.' असा उल्लेख आहे. ऋग्वेदात देवश्रवा, देववात याचा व्यक्तिवाचक उल्लेख आणखी आढळत नाहीं.

ऋ ज्रा श्व, अं ब री ष, स ह दे व, भ य मा न, सु रा ध स्.—१. १०० या सूक्ताचे द्रष्टे. यांचा सदर सूक्ताच्या १७ व्या ऋचेंत एकाच ठिकाणीं उल्लेख आहे. यांना 'वृषागिरपुत्र' असें म्हटलें आहे. वरील पाचहि सूक्तकाराचा एकत्र असा उल्लेख ऋग्वेदात आणखी आलेला नाहीं. एकट्या ऋज्राश्वाचा उल्लेख १. १००, १ १; ११६,१६,११७, १७; १८ या ऋचामध्ये आहे.

दे वा पि.—१०. ९८ या सूक्ताचा द्रष्टा. याला आर्ष्टिषेण ऋष्टिषेणपुत्र म्हटलें आहे. वरील सूक्ताच्या ५,६ व ८ या ऋचांमध्यें आर्ष्टिषेण या नावाचा उल्लेख असून तो देवापि याचा बाप असावा असें दिसतें.

अ र्बु द.—१०. ९४ या सूक्ताचा द्रष्टा. याला काद्रवेय असें म्हटलें आहे. परंतु ऋग्वेदात तसा उल्लेख नाहीं. ऋग्वेदातील अर्बुद याचा कांहीं ठिकाणीं असुर व कांहीं ठिकाणीं सायणानीं मेघ असा अर्थ केला आहे व ८. ४५, २६ या ऋचेंतील 'वद्रुवः' या पदाचा वद्रु कद्रिसंबंधी असा अर्थ केला आहे. परंतु त्याचा आणि अर्बुदाचा संबंध नाहीं.

व त्स प्रि.—९. ६८ व १०. ४५ या सूक्ताचा द्रष्टा. याला भालंदन—भलंदनपुत्र—म्हटलें आहे. ऋग्वेदात वत्सप्रीचा अथवा भलंदनाचा उल्लेख नाहीं.

सिं धु द्वी प.—१०. ९ या सूक्ताचा द्रष्टा. याला अंबरीष पुत्र म्हटलें आहे. ऋग्वेदात याचा उल्लेख नाहीं.

वि व स्वा न्.—१०.१३ या सूक्ताचा द्रष्टा. याला अदितिपुत्र म्हटलें आहे. १०.१४,५;१७,२या ठिकाणीं विवस्वानाचा उल्लेख आहे. परंतु तो अदितिपुत्र असल्याचा नाहीं.

य म.—१०.१४ या सूक्ताचा द्रष्टा. याला विवस्वान्‌पुत्र म्हटलें आहे व तसा उल्लेख सदर सूक्ताच्या १ व ५ या ऋचांत आहे.

य मी.—१०.१० या सूक्ताची द्रष्टी. हिला 'विवस्वत्‌ कन्या' असें म्हटलें आहे. हिचा उल्लेख सदर सूक्ताच्या १० व्या ऋचेंत आहे व ती ती यमाची भगिनी असल्याबद्दल आहे. यमी विवस्वानाची कन्या असल्याचा प्रत्यक्ष उल्लेख नसला तरी यम हा विवस्वान्‌पुत्र असून यमी त्याची भगिनी असा उल्लेख असल्यामुळें यमीला विवस्वान्‌कन्या म्हणावयास हरकत नाहीं.

शं ख.—१०. १५ या सूक्ताचा द्रष्टा. याला यमपुत्र असें म्हटलें आहे. ऋग्वेदात याचा उल्लेख नाहीं.

सं कु सु क.—१०. १८ या सूक्ताचा द्रष्टा.याला यमपुत्र म्हटलें आहे. ऋग्वेदात याचा उल्लेख नाहीं.

द म न.—१०. १६ या सूक्ताचा द्रष्टा. याला यमपुत्र म्हटलें आहे. ऋग्वेदात याचा उल्लेख नाहीं.

दे व श्र वा.—१०. १७ या सूक्ताचा द्रष्टा. याला यमपुत्र म्हटलें आहे. परंतु ऋग्वेदात तसा उल्लेख नाहीं.

मथित—१०. १९ या सूक्ताचा द्रष्टा. याला यमपुत्र म्हटलें आहे. ऋग्वेदांत तसा उल्लेख नाहीं.

विमद.—१०.२० ते २६ या सूक्तांचा द्रष्टा. याला इंद्रपुत्र म्हटलें आहे. वरील सूक्तांपैकीं १०.२०,१०;२३,६७; २४, ४ या ठिकाणीं व ऋग्वेदांत आणखी १.५१,३;११२,१; ११६,१; ११७,२०;८. ९,१५;१० ३९,७ ; ६५, १२, इतक्या ठिकाणीं आहे परंतु तो इंद्रपुत्र असल्याचा उल्लेख नाहीं.

वसुक्र—१०. २७ ते २९ या सूक्तांचा द्रष्टा. याला इंद्रपुत्र म्हटलें आहे. याचा ऋग्वेदांत उल्लेख नाहीं.

कवष.—१०. ३० ते ३४ या सूक्तांचा द्रष्टा. याला इलूषपुत्र असें म्हटलें आहे. कवषाचा उल्लेख ऋग्वेदांत एकदांच ७. १८,१२ या ठिकाणीं असून तो ऋषि नसावा असें दिसतें; कारण त्या ठिकाणीं इंद्रानें त्याला पाण्यांत बुडविल्याचा उल्लेख आहे.

लुश—१०. ३५ व ३६ या दोन सूक्तांचा द्रष्टा. याला धनाकपुत्र असें म्हटलें आहे. धनाक अथवा लुश या दोघांचाहि ऋग्वेदांत उल्लेख नाहीं.

बृहद्दिव—१०.१२० या सूक्ताचा द्रष्टा. याला अथर्वण ऋषीचा पुत्र असें म्हटलें आहे. वरील सूक्ताच्या ८ व्या ऋचेंत बृहद्दिव याचा उल्लेख आहे व ९ व्या ऋचेंत आथर्वण बृहद्दिव असा उल्लेख आहे. ऋग्वेदांत याशिवाय 'बृहद्दिव' पदाचा उल्लेख अन्यांच ठिकाणीं आहे. परंतु तो व्यक्तिवाचक नाहीं.

भिषक्—१०. ९७ या सूक्ताचा द्रष्टा. याला आथर्वण म्हटलें आहे. ऋग्वेदांत भिषक् या व्यक्तीचा उल्लेख नाहीं.

शिबि(राजा)—१०.१७९ या सूक्तांतील १ल्या ऋचेचा द्रष्टा. याला उशीनरपुत्र म्हटलें आहे. ऋग्वेदांत शिबि याचा उल्लेख नाहीं.

वसुमना.—१०. १७९ या सूक्तांतील ३ऱ्या ऋचेचा द्रष्टा याला रोहिदश्वपुत्र असें म्हटलें आहे. ऋग्वेदांत वसुमनाचा उल्लेख नाहीं.

परुच्छेप.—१. १२७ ते १३९ या सूक्तांचा द्रष्टा. याला दिवोदासपुत्र म्हटलें आहे ऋग्वेदांत परुच्छेपाचा उल्लेख नाहीं.

अनानत—१०. ११२ या सूक्ताचा द्रष्टा. याला परुच्छेपपुत्र असें म्हटलें आहे. ऋग्वेदांत अनानत याचा व्यक्तिवाचक अर्थानें उल्लेख नाहीं.

बुध.—१०. १०१ या सूक्ताचा द्रष्टा. याला सोमपुत्र म्हटलें आहे. ऋग्वेदांत याचा उल्लेख नाहीं.

अग्नियुत—१०.११६ या सूक्ताचा द्रष्टा. याला स्थूल ऋषीचा पुत्र म्हटलें आहे. ऋग्वेदांत याचा उल्लेख नाहीं.

संवरण.—५. ३३ या सूक्ताचा द्रष्टा. याला प्रजापतिपुत्र म्हटलें आहे. वरील सूक्ताच्या १० व्या ऋचेंत संवरण ऋषीचा उल्लेख आहे परंतु तो प्रजापतिपुत्र असल्याबद्दल नाहीं. ऋग्वेदांत याशिवाय संवरण याचा व्यक्तिवाचक उल्लेख नाहीं.

शुनःशेप—१ २४ ते ३० या सूक्तांचा द्रष्टा. याला अजीगर्तपुत्र म्हटलें आहे. १. २४, १२; १३;५. २, ७ या ठिकाणीं शुनःशेपाचा उल्लेख आहे परंतु तो अजीगर्तपुत्र असल्याबद्दल नाहीं.

कुल्मलबर्हिष.—१०. १२६ या सूक्ताचा द्रष्टा. याला शैलूषपुत्र म्हटलें आहे. ऋग्वेदांत याचा उल्लेख नाहीं.

मुद्गल—१०. १०२ या सूक्ताचा द्रष्टा. याला भर्म्यश्वपुत्र म्हटलें आहे. वरील सूक्तांतील ५ व ९ या ऋचांत मुद्गलाचा उल्लेख असून २ व ६ ऋचांत मुद्गलानीचा उल्लेख आहे. परंतु मुद्गल हा भर्म्यश्वपुत्र असल्याचा उल्लेख नाहीं.

मंधाता—१०. १३४ या सूक्ताचा द्रष्टा. याला युवनाश्वपुत्र म्हटलें आहे वरील सूक्तांत याचा उल्लेख नाहीं. ऋग्वेदांत १.११२,१३;८.३९,८;४०, १२ या तीन ठिकाणीं मंधाता याचा उल्लेख आहे. परंतु तो युवनाश्वपुत्र असल्याचा नाहीं.

पुरूरवा.—१०. ९५ या सूक्ताचा द्रष्टा. याला इलपुत्र म्हटलें आहे. वरील सूक्ताच्या २,५,७,११ व १५ या ऋचांत पुरूरव्यांचा उल्लेख आहे. परंतु तो इलपुत्र असल्याचा नाहीं.

नाभानेदिष्ठ.—१०.६१व६२ या सूक्तांचा द्रष्टा. याला मनुपुत्र म्हटलें आहे. वरील सूक्तांपैकीं ६१. १८ या ऋचेंत याचा उल्लेख आहे. परंतु तो मनूचा पुत्र असल्याबद्दल नाहीं. ऋग्वेदांत याखेरीज नाभानेदिष्ठाचा उल्लेख नाहीं

शार्यात.—१०. ९२ या सूक्ताचा द्रष्टा. याला मनुपुत्र म्हटलें आहे वरील सूक्तांत याचा उल्लेख नाहीं. १.५१,१२ व ५१, ७ या दोन ठिकाणीं शार्यातचा उल्लेख आहे, परंतु तो मनुपुत्र असल्याबद्दल नाहीं.

सुदास.—१० १३३ सूक्ताचा द्रष्टा. याला पिजवनपुत्र म्हटलें आहे. वरील सूक्तांत याचा उल्लेख नाहीं परंतु ऋग्वेदांत सुदासाचा उल्लेख पुष्कळ ठिकाणीं असून ७ १८.२२;२३;२५ या तीन ठिकाणीं पिजवनपुत्र सुदास असा उल्लेख आहे.

असंग—८. १ या सूक्तांतील ३० ते ३३ या चार मंत्रांचा द्रष्टा. याला प्लयोगपुत्र असें म्हटलें असून त्याचा उल्लेख वरील सूक्ताच्या ३३ व्या मंत्रांत आहे.

शश्वती.—८. १ या सूक्तांतील ३४ व्या मंत्राची द्रष्टी. हिला आसंगपत्नी असें म्हटलें आहे. वरील मंत्रांत हिचा उल्लेख आहे. परंतु आसंगपत्नी असा नाहीं.

सुवेदस्.—१०. १४७ या सूक्ताचा द्रष्टा. याला शिरीषपुत्र असें म्हटलें आहे. ऋग्वेदांत याचा उल्लेख नाहीं.

दुवस्यु.—१०. १०० या सूक्ताचा द्रष्टा. याला वंदनपुत्र म्हटलें आहे. वरील सूक्ताच्या १२ व्या ऋचेंत दुवस्यूचा उल्लेख आहे. परंतु तो वंदनपुत्र असल्याचा नाहीं.

**गोत्रें**—गोत्र ही संस्था प्राचीनकाळीं काय असावी हें निश्चयानें सांगतां येत नाहीं. गो म्हणजे भूमि आणि त्र म्हणजे संरक्षक; म्हणजे गोत्र म्हणजे भूमिसंरक्षक वर्ग असा गोत्र या शब्दाचा अर्थ करून गोत्र हा शासनविषयक

विभाग असावा अशी कल्पना व्यक्त झाली आहे, आणि दुसऱ्याच्या गोत्रांतल मुलगा पळविणें हे मर्दाचें काम या मुळें गोत्राबाहेर लग्न करण्याची रीत उत्पन्न झाली असावी असें गोत्राबाहेर लग्न लावण्याचें स्पष्टीकरण करण्यांत आलें आहे. या प्रकारच्या स्पष्टीकरणाच्या ग्रहणास अडचण येते ती ही कीं गोत्र आणि विवाहसंस्थेचा संबंध प्राचीनकाळीं नव्हता हा संबंध केव्हां उत्पन्न झाला आणि कोणत्या प्रयोजनामुळें झाला हा प्रश्नच उत्तरकालीन इतिहासाचा प्रश्न आहे. यदृच्छ्या गो म्हणजे जमीन आणि त्र म्हणजे संरक्षक असा अर्थ असणें शक्य आहे आणि त्यामुळें गोत्र ही एक राजकीय संस्था असावी हेंहि शक्य आहे परंतु ती तशा होतीच हेंहि आज निश्चयानें मानतां येत नाहीं.

गोत्र हा शब्द ऋग्वेदामध्यें इंद्राच्या पराक्रमाच्या वर्णनांत अनेक वेळां येतो. या शब्दाचा अर्थ रॉथ गोठा असा करतो तर गेल्डनेर गाईंचा कळप असा करतो. मॅकडोनेलच्या मतें वरील दुसऱ्या अर्थावरून पुढें या शब्दास उत्तरकालीन वाङ्मयांत जो कुटुंब किंवा गोत असा अर्थ आला आहे त्याची उपपत्ति लावणें सोपें होतें. छान्दोग्य उपनिषदांत [ ४.४, १ ] कुटुंब या अर्थी गोत्र शब्द आलेला आहे.

दुसऱ्याच्या टोळींतील मुलगा चोरून आणावयाची आणि स्वतःच्या टोळींतील मुलगी करणें म्हणजे नामर्दपणा होय या तऱ्हेच्या कल्पनेचा मातृसंस्कृतीच्या लोकांतील बहिर्विवाह स्पष्ट करण्यास उपयोग होत नाहीं, कां कीं सगोत्र विवाह घ्यावा तर वेद नेहमी उघड नाहीं. बौधायनासारख्या जुन्या स्मृतींतहि त्यास आडकाठी नाहीं, आणि वसिष्ठाच्या धर्मसूत्रांत दत्तकाला समानधर्मी करण्यास आडकाठी जरी घातली आहे तरी बापाच्या बाजूनें पांच पिढ्या व आईच्या बाजूनें तीन पिढ्या सोडून लग्न करावें असें सांगितलें आहे.

ज्या काहीं स्मृतींमधून सगोत्र किंवा सप्रवर विवाह याचा निषेध केला असतो त्यामधीलच बापाकडच्या सात पिढ्या टाळाव्या व आईकडच्या पांच पिढ्या टाळाव्या असाहि उल्लेख करण्यांत येतो. गोत्रसंस्था जर प्राचीन नव्हे तर आपणापुढें प्रश्न एवढाच उरतो कीं ही समाजात शिरली असेल तरी केव्हां आणि वर धर्मशास्त्रकारांनीं दिलेले दोन भिन्न नियम भिन्न काळीं उपस्थित होऊन पुढें ते दोन्ही एकत्र मांडले गेले असे तर नसेल ना ? सात पिढ्यांपर्यंत अगोदरच नातेवाईकांचा हिशेब ठेवणें जास्त महत्त्वाचें आहे अशा व्यक्ती विरळा. पांच पिढ्या आईकडच्या टाळाव्या हा नियम तर कन्याच जातींनीं धाब्यावर बसविला आहे. दक्षिणेकडे अनेक जातींत मामाची मुलगी तर लग्नांत अधिक पसंत केली जाते. बापाकडून सात पिढ्या टाळाव्या हा नियम घेतला तर तो अनावश्यक ठरतो, कारण गोत्राबाहेर जर लग्न करावयाचें तर सात तर काय पण त्यानें कितीही पिढ्या मागच्या

च्या मानतात. वसिष्ठादि जुन्या स्मृतिकारांनीं हे दोन्ही नियम एकसमयावच्छेदेंकरून मांडले असूनहि त्यांत दिसून येणारी परस्परविरुद्धता ओळखून मनुस्मृतीनें फक्त गोत्राचाच नियम ठेविला आहे व बापाकडील सात पिढ्यांचा बगल दिला आहे. मनुस्मृतीचा "असपिंडा च या मातुः असगोत्रा च या पितुः" हा पाठ घेतला तर सपिंडबाहेरचे सगोत्री विवाह ठरतील. विवाहविषयक नियम देणारे धर्मसूत्रकारांच्या पूर्वीचे प्रथकार म्हणजे गृह्यसूत्रकार हे होत. बऱ्याचशा गृह्यसूत्रकारांनीं तर गोत्राचा मुळींच आग्रह धरिला नाहीं.

सेनार्ट हा सगोत्रविवाहाची निषिद्धता व सवर्णविवाहाची प्रशस्तता मूलगृह्यकालापर्यंत नेतो परंतु असगोत्र विवाहाची चाल इंडोयूरोपीय कालापासून अस्तित्वांत असावी असें समजण्यास साधन जें भारतीयांतलि गोत्रप्राचीनता तेंच दुर्दिसत नाहीं. शतपथ ब्राह्मणांत ( १.८, ३, ६ ) दोन्ही बाजूंनी तिसऱ्या किंवा चवथ्या पिढीच्या आंतच विवाह करणें संमत असल्याचा उल्लेख आहे. सायणाचार्यांप्रमाणें काण्व तिसऱ्या पिढीशीं व सौराष्ट्र चवथ्या पिढीशीं विवाह करतात. या उदाहरणास कुमारिलसूचीवरील टीकाकार काण्वांबरोबर आंध्र व दाक्षिणात्य यांचा उल्लेख करितात. वाजसनेयीशाखीय ब्राह्मणांत मामेबहिणीशीं विवाह करणें निषिद्ध आहे एवढेंच नव्हे तर मामाच गोत्राहि बदलावयाची चाल आहे. वरील प्रथांत चुलत बहिणीशीं विवाह करण्यास जो सांप्रत निषेध मानतात त्याचा कोठें उल्लेख आढळत नाहीं. शुनःशेपाच्या कथेवरून व गृत्समद हा आंगिरस असून पुढें भार्गव झाला यावरून गोत्र बदलणें त्यावेळीं शक्य होतें हें स्पष्ट दिसतें. गोत्र ही संस्था फार प्राचीन नाहीं ही गोष्ट गोत्रें व श्रौतधर्म यांचा संबंध लक्षांत घेतला असतां दिसून येईल असें मत शक्य आहे कीं सुतसंस्कृतीच्या आर्यन् लोकांत गोत्रांचें म्हणजे बहिर्विवाहाचें देवकरूपानें अस्तित्व असेल व रोमन लोकांत "जेन्" नांवाच्या समुच्चयाबाहेर लग्न करण्याची पद्धत होती. जर इंडोयूरोपीय काळांत बहिर्विवाह होत असेल तर मधल्या मातृसंस्कृतीच्या लोकांत तो तात्पुरता नष्ट झाला असला पाहिजे असें वाटतें. जेव्हां त्यांत गोत्रसंस्था निर्माण झाली तेव्हां त्याचा प्रवराशीं संबंध जोडला गेला, आणि वेदविरुद्ध पण वैदिक परंपरेवर रचलेली अशी समाजव्यवस्था प्रचलित झाली हें पुढील विवेचनावरून कळून येईल.

**गोत्रें व श्रौतधर्म.—** गोत्राचा वैदिक धर्मसंस्थेंत महत्त्वाचा संबंध दिसत नाहीं. गोत्रें जर मातृसंस्कृतीच्या लोकांची असतीं तर त्यांचा ऋग्वेदप्रदृष्ट श्रौतधर्मांत बराच संबंध असता. गोत्राचा संबंध यज्ञसंस्थेंत अत्यंत बेताचा दिसतो. ऋग्वेदांत त्याचा स्पष्ट उल्लेखहि दिसत नाहीं. गोत्रप्रवरकल्पना ऋग्वेदोत्तर वाङ्मयांत दिसतात, आणि त्यांचें अस्तित्व दोन कारणांमुळें संभवतें. एकतर यज्ञसंस्थेबरोबर

गोत्रप्रवरविचार पुढें गत झाला असावा किंवा मध्यमसूत्रांच्या बाहेरील लोकांत गोत्रसंस्थेचें अस्तित्व असावें आणि गोत्रास धर्मशास्त्र देण्यासाठीं त्याचा यज्ञसंस्थेशीं मुद्दाम कमी तरी संबंध जडविला असावा या दोन कल्पनांपैकीं दुसरी कल्पना म्हणजे गोत्रांचा यज्ञसंस्थेशीं मुद्दाम संबंध जोडला असावा हें अधिक शक्य वाटतें. गोत्रांचा श्रौतधर्मांत जो फारच थोडका संबंध आहे तो इतकाच कीं आप्रीसूक्तें होत्यानें कोणतीं म्हणावयाचीं हें यजमानाच्या गोत्रावरून किंवा प्रवरावरून ठरवावें लागतें.

पशुयागामध्यें पशूच्या वपेचा याग होण्यापूर्वी प्रयाज नामक देवतांना उद्देशून याग करावयाचा असतो (या देवता अकरा किंवा बारा आहेत). या यागांत प्रत्येक देवतेसंबंधी यागासाठीं स्तावक पठण करण्यास मैत्रावरुणानें प्रैष दिल्यावर होत्यानें याज्यारूप ऋचा पठन करावयाची असते. अशा अकरा अथवा बारा ऋचांच्या सूक्तास आप्री सूक्त अशी संज्ञा आहे. हींच आप्री सूक्तें होत्यानें कोणतीं म्हणावीं हें यजमानाच्या गोत्रावरून किंवा प्रवरावरून ठरतें.

*वरील अप्रींमध्यें कोणत्या देवतांना आहुती द्यावयाच्या या संबंधानें फरक आहे.* त्याविषयीं विधिनिषेधात्मक नियम आहेत ते असे. ज्या देवतांना आहुती द्यावयाच्या त्यांपैकीं दहा देवता सर्वगोत्रीयांना सारख्या आहेत. कित्येक गोत्रांचे लोक आणखी दोन देवतांस आहुति देतात व कित्येक या दोहोंकीं एकीस देतात व एकीस वगळतात. या दोन वाद-ग्रस्त देवता म्हणजे नराशंस व तनूनपात् या होत. वसिष्ठ अत्रि वध्र्यश्व व गृत्समद या गोत्रांचे लोक तनूनपात् या देवतेस आहुति देत नाहींत आणि विश्वामित्र, अगस्त्य, कश्यप, जमदग्नि या गोत्रांचे लोक नराशंस देवतेस आप्रीपूर्वक आहुति देत नाहींत. व कण्व आणि आंगिरस हे या दोन्ही देवतांना आहुति देतात. देवता कोणती द्यावी यासंबंधानें आणखी एक नियम असा आहे कीं क्षत्रियांनीं नराशंस देवता घ्यावी. अशा प्रकारची देवता देण्याचा व टाळण्याचा प्रसंग फक्त पशुयागांतच येतो असें नाहीं तर पंधरा दिवसांनीं करावयाचा दर्शपूर्णमास यागां (इष्टी) तील प्रयाज यागांत देखील देवताग्रहण यजमानाच्या गोत्रावरून ठरत असतें.

**गोत्रविशिष्ट श्रौतधर्माचें अर्वाचीनत्व**—आतां *प्रश्न असा उपस्थित होतो कीं, आप्री सूक्तें किंवा देवतापरिग्रह* याचा यजमानाच्या गोत्राशीं जोडलेला संबंध कितपत जुना आहे. आप्रीच्या निवडीपेक्षा देवतापरिग्रहासंबंधी प्रश्न अधिक जुना दिसतो.

आप्रीसूक्तें गोत्रभेदाप्रमाणें म्हणावीं हें तत्त्व ब्राह्मणकालीं प्रचारांत येऊं लागलें होतें असें दिसतें (ऐ. ब्रा. २ ४) परंतु तें फार जुनें असेल असें वाटत नाहीं. कारण आप्रीसूक्तें हा विषय होत्राचा असून होत्रविषयाचें उपदेश करणारे ग्रंथ जे ब्राह्मणें व सूत्रें त्यापूर्वींच्या ग्रंथांत म्हणजे यजुर्वेदांत-ज्यामध्यें याज्ञिकविषयक प्रयाज यागाचा संबंध येतो अशा- दर्शपूर्णमास व पशु या दोहोंचेंहि होत्र पठित आहे (त्याला आम्ही याजुष होत्र असें म्हणतात) व त्यांत आप्री सूक्तें गोत्रपरत्वें वेगळीं सांगितलीं नसून एकच सांगितलें आहे. सूत्रें व त्यावरील टीकाकार यांनीं मात्र याविषयीं जास्त विवक्षा केली आहे. गोत्रपरत्वें आप्रीग्रहणाची चाल अर्वाचीन असल्याविषयीं तिच आणखी एक पुरावा असा आहे कीं, यजुर्वेदांतील होत्रांत जें आप्रीसूक्त सांगितलें आहे त्याची परंपरा मोडतां येत नसल्यामुळें सूत्रकारांनीं ज्या कोणास गोत्रपरत्वें निरनिराळीं आप्री सूक्तें घ्यावयाचीं नसतील त्यांना विकल्पानें वरील (याजुष होत्रांतील) सूक्त घ्यावें असें सांगितलें आहे.

**निरनिराळ्या गोत्रीयांचीं निरनिराळीं आप्री सूक्तें.**— यासंबंधीं आश्वलायनसूत्र पुढील प्रमाणें आहे:- 'समिद्धो अग्निरिति शुनकानां, जुषस्व नः समिधमिति वसिष्ठानां, समिद्धो अद्येति सर्वेषां.' या तिसऱ्या सूत्राचा वृत्तिकार *'वसिष्ठ शुनकांशिवाय' असा अर्थ करतात पण तो जुना आहे* असें म्हणवत नाहीं. सूत्रांत पुढें 'यथर्षिवा' असें एक सूत्र आहे त्यावर भाष्य करतांना वृत्तिकार शौनकोक्त श्लोकाचा आधार घेऊन भाष्य करतात कीं. 'स्वीयर्षिनामधेयस्यात् गुणाऽऽप्र्याःकर्तव्याः'

*आश्वलायन सूत्र वरील वृत्तीप्रमाणें आप्री सूक्तें आणि त्यांचा उपयोग येणें प्रमाणें:—*

| गोत्रनाम | सूक्तप्रतीक | क्रमसंख्या | ऋचा | सूक्तद्रष्टा |
|---|---|---|---|---|
| कण्व | सुसमिद्धो न० | १. १३ | १२ | मेधातिथि |
| आंगिरस | समिद्धो अग्ने० | १. १४२ | १२ | दीर्घतमा. |
| अगस्ति | समिद्धो अद्य० | १. १८८ | ११ | अगस्त्य |
| शुनक | समिद्धो अग्नि० | २. ३ | ११ | गृत्समद |
| विश्वामित्र | समित्समित्० | ३. ४ | ११ | विश्वामित्र |
| अत्रि | सुसमिद्धाय० | ५. ५ | ११ | अत्रि |
| वसिष्ठ | जुषस्व न० | ७. २ | ११ | वसिष्ठ |
| कश्यप | समिद्धो विश्वत | ९. ५ | ११ | असितदेवल |
| वध्र्यश्व | इमां मे अग्ने० | १०. ७० | ११ | सुमित्र |
| भृगु | समिद्धो अद्य० | १०. ११० | ११ | भार्गव, ज० |

आप्रीसूक्त पशुयागांत गोत्राप्रमाणें भिन्न म्हणावें या नियमाला सूत्रकार एक अपवाद 'प्राजापत्ये तु न मदग्न्यः सर्वेषां' हा सांगतात.

*येथें ध्यानांत ठेवावयाचें म्हणजे हे सर्व भेद सूत्रकालीन आहेत. वेदकालीं गोत्र नव्हती व गोत्रानुसार आप्रीसूक्त किंवा देवता यांचे भिन्नत्व स्थापित झालें नव्हतें.*

मंत्रद्रष्ट्या ऋषींच्या संबंधानें शोधणास असें दिसतें कीं, प्रत्यक्ष कर्मांत कुलकल्पनेव्यतिरिक्त गोत्रकल्पनाच नसल्यामुळें अमुक ऋषी अमुक गोत्राचे हें सांगणें शक्य नाहीं. परंतु जे थोडेसे पितृविषयक उल्लेख सांपडतात त्यांचा उप-

येत त्याच विशिष्ट गोत्रात यावयाकडे सर्वानुक्रमणीकारांनी कसा कल केला आहे ते मागल कोष्टकात दाखविलेच आहे. ब्राह्मणग्रंथात आप्रीसूक्ताविषयक विवेचन करितांना प्रवरणाहि ऋत्विजाची कल्पना आली आहे. तथापि तेवढ्यावरून मंत्ररचना करणाऱ्यांच्या ठायीं गोत्रकल्पना होती असें सिद्ध होणार नाहीं. ब्राह्मणग्रंथांचा काल म्हणजे गृह्ययज्ञाचा काल आणि गृह्ययज्ञाचा काल म्हणजे देश्यांच्यावर मंत्रसंस्कृतीच्या संस्था दडपण्याचा काल. या कालात देश्यांची विद्या स्वीकारणें किंवा आपली विद्या देश्यास देणें या गोष्टी होतं असून उद्गाते करीत होते. केवळ नावाच घेत होते असें नाहीं तर देश्यांच्या चालीरीती देखील स्वीकारीत होते. जर देश्यामध्यें गोत्रें असलीं तर त्या गोत्राचा यज्ञसंस्थेशीं संबंध जोडण्याचें काम देखील अवश्य होतें. तर असें असणें शक्य आहे कीं देश्यामध्यें गोत्र आहेत असें पाहून त्याची गोत्रसंस्था मंत्रसंस्कृतीच्या लोकांनीं घेतली असावी. त्या गोत्राचा उपयोग काय करावा याचा याविषयीं मात्र त्याचा निश्चय तात्कालिक झालेला दिसत नाहीं. ऋग्मंत्रात जशी गोत्रकल्पना नाहीं तशी प्रवरकल्पनाहि नाहीं. तसेंच ऋग्मंत्रात ज्या सत्रकल्पनेच्या आश्रयानें श्रौतसूत्रकारांनीं गोत्रप्रवरकल्पनेची मांडणी केली आहे त्या सत्राचाहि उल्लेख नाहीं. जे सत्रविषयक उल्लेख आलेले आहेत त्यांचा अर्थ अनेक व्यक्तींची एकत्र स्थिति या पलीकडे पोहोचू शकत नाहीं.

ऋग्वेदातच सत्रें नाहींत व यजुर्वेदाच्या अनेक शाखातहि सत्रें नाहींत तर सत्रें होतीं तरी केव्हां? सत्राच्या भरभराटीचा काल असा वैदिक वाङ्मय वाचल्यास कोणताच दिसत नाहीं. होत्राच्या ऋचेंत सत्र शब्द ऐकू येत नाहीं आणि ब्राह्मणांमध्यें जर सत्रें पुष्कळशीं दिसतात तर सत्रें वैदिक परंपरेंत मूळचीं नव्हतीं पण वेदबाह्य परंपरेंतून निघून वैदिकांनीं तीं मान्य केलीं असावीं असें म्हणण्यास काय हरकत आहे?

**गोत्राची उत्पत्ति मंत्र कीं देश्य संस्कृति?** — गोत्रें म्हणजे ज्या समुच्चयांतील लोकांनीं आपआपसात विवाहसंबंध करतां कामा नये असे पुंज, अशी लोकांत आज कल्पना रूढ आहे. असले समुच्चय मंत्रसंस्कृतीच्या लोकांत होते असें मंत्रांमधून तर मुळींच सिद्ध होत नाहीं, आणि प्रवरहि मंत्रांत नाहींत. तर ही गोत्रप्रवरात्मक सृष्टि आली कोठून? ही उत्तरकालीं त्याच संस्कृतींतून विकास पावली असेंहि म्हणतां यावयाचें नाहीं. कां कीं मंत्रसंस्कृतीच्या लोकांचें वाङ्मयरूपी साहित्य आपणाजवळ भरपूर आहे. जर गोत्रविहीन समाजापासून गोत्रसंस्था तयार होत गेली असती तर या विकासाच्या मधल्या पायऱ्या दाखविणारे वाङ्मयरूपी किंवा शब्दरूपी उल्लेख आपणास खास सांपडले असते. परंतु तसे उल्लेख आपणास आरण्यकान्त वाङ्मयांत कोठेंच सापडत नाहींत. ज्या समुच्चयाबाहेर लग्न केलें पाहिजे असे समुच्चय काश्मीरपासून द्राविडपर्यंत अनेक जातींत सापडतात. एवढेंच नव्हे तर रशियापासून आस्ट्रेलियापर्यंत देखील सापडतात. कांहीं समुच्चयांत बहिर्विवाहाचा सक्ती जास्त असते व कांहींत कमी असते. एवढेंच या तऱ्हेचा बहिर्विवाह समाजांत उत्पन्न झाला तो कां या विषयीं मानवशास्त्रज्ञांनीं पुष्कळच कारणें पुढें मांडलीं आहेत. त्यांतील एक कारण असें कीं समुच्चयाबाहेर लग्न करणें 'नामर्दपणाचें आहे' खरें मर्दाचें 'काम म्हणजे शत्रूच्या गोटांतील मुलगी पळवून आणावयाची' ही कल्पना समाजाच्या अर्धवन्य अवस्थेंत कदाचित् खरीहि असेल. पण या कल्पनेच्या साहाय्यानें भारतीय ब्राह्मणांमध्यें बहिर्विवाह कां उत्पन्न व्हावा याचें स्पष्टीकरण होणार नाहीं. कां कीं, परसमुच्चयांतून मुलगी पळवून आणण्याचें महत्त्व किंवा त्या क्रियेस अनुकूल परिस्थिति ही जो देश वसलेला आहे व ज्या देशांत राजसंस्था स्थापित झाली आहे अशा देशांत नसते आणि परसमुच्चयांतून मुलगी पळवून आणण्याचें महत्त्व ह्र्स्व झालें किंवा औद्धत्यांत तयार झालेल्या भिक्षुकांत कोठून उत्पन्न होणार? अर्थात बहिर्विवाहाचीं स्वाभाविक कारणें उत्पन्न होऊन बहिर्विवाह मंत्रसंस्कृतीच्या लोकांत स्थापित झाला हें शक्य नाहीं. जर स्वाभाविक कारणामुळें उत्पन्न झाला नसेल तर त्याच्या अस्तित्वाची उपपत्ति अनुकरणाशिवाय दुसरी कशांत सांपडणार? याचा थोडक्यांत अर्थ असा कीं ब्राह्मणांनीं ब्राह्मणेतरांचें अनुकरण केलें परंतु 'तुझ्यावर माझी कडी पाहिजे' असा प्रकार मात्र केल्याशिवाय ते राहिले नाहींत. त्यांनीं लौकिक गोत्र व आध्यात्मिक गोत्र असा निराळा भेद उत्पन्न करून आपलीं गोत्रें ब्राह्मणेतरांवर लादलीं आणि पुष्कळ प्रसंगीं आपल्या शिष्यांस (उदाहरणार्थ रजपुतांस) अशी शिकवण दिली कीं, लौकिक गोत्राचें विवाहादि प्रसंगांत आध्यात्मिक गोत्रापेक्षा महत्त्व कमी.

**गोत्रप्रवरसंबंध व गोत्रप्रवर्तक मुख्य ऋषी** — गोत्रें उत्तरकालीन आहेत ही कल्पना मान्य झाली म्हणजे ब्राह्मणेतिहासांतील जे धागे उलगडावयाचे ते येणें प्रमाणें —

(१) गोत्राचा प्रवराशीं संबंध काय?

(२) गोत्राचा संबंध प्रवराशीं लावून सर्व जनता सप्तर्षिसंभव आहे ही कल्पना कशी उद्भूत झाली?

(३) प्रवरसंस्थापक सप्तर्षि आणि सहस्रावधि गोत्रें यांचा संबंध काय?

(४) वसिष्ठ सप्तर्षींना महत्त्व कसें प्राप्त झालें?

(५) गोत्राचा व प्रवराचा धर्मकृत्यांशीं संबंध?

(६) गोत्राचा व प्रवराचा विवाहविधीशीं संबंध काय?

(७) गोत्राचा व प्रवराचा मंत्रद्रष्ट्यांशीं व वैदिक शाखांशीं संबंध काय होता?

या इतक्या बाजूंनीं विवेचन झालें म्हणजे ब्राह्मणजातीच्या अंतर्रचनेचें स्पष्टीकरण झालें असें होईल.

वरील प्रश्नांपैकीं पहिले चार प्रश्न विचारासाठीं प्रथम घेऊं

ऋषींचीं नावें, त्यांच्या मुलांचीं त्यांच्या नावापासून निघालेलीं नावें आणि मुलांच्या नावांना तद्धित प्रत्यय लागून झालेलीं त्यांचीं पौत्र नामें याप्रकारचीं नावें मंत्रांत बरींच आहेत तथापि अनेक ऋषी विशिष्ट प्रवररचनेनें एकत्रित केलेले दिसत नाहींत

प्रवरांशीं गोत्रांचा संबंध सूत्रकालीन होय. ग्रंथकारांनीं प्रवरऋषी हे व्यक्तींचे गोत्रसंस्थापकापूर्वींचे पूर्वज बनविले आहेत. पण त्या विधानास वेदांत प्रमाण नाहीं.

वेदांत प्रवरासारखा उल्लेख कायतो एकच आहे तो आर्षेयवरणविषयक होय ( तै. स २ ५,८ ). म्हणजे अशी कल्पना होते कीं धौत्र मंडळींचे आठ संप्रदाय स्थापन झाले आणि त्यावेळचे आचार्य किंवा विद्याभ्यासी या आठांपैकीं कोणत्याना कोणत्या सम्प्रदायांत समाविष्ट होत.

वरण या शब्दाचा अर्थच निवड, स्वीकारणें असा आहे म्हणजे त्यावेळचा आश्वलायन किंवा बौधायन हा अगस्त्य किंवा वसिष्ठ इत्यादि कोणत्या तरी ऋषीपासून जे संप्रदाय स्थापन झाले त्यांपैकीं एकाचा स्वीकार करी. म्हणजे ते त्याचे प्रवर झाले

हा गोत्रप्रवराचा इतिहास पूर्णपणें लक्षात येण्यासाठीं प्राचीन निरनिराळ्या विद्यांमुळें किंवा आचारामुळें झालेल्या संप्रदायांचें एकत्रित अवलोकन केलें पाहिजे. विशेषत वेदामुळें म्हणजे यज्ञांतील कोणता भाग करावयास आपण तयार व्हावें यासंबंधींच्या तयारीमुळें ऋग्वेदी, यजुर्वेदी हे झालेले भेद खरोखर संप्रदायच होत

याच संप्रदायाचे पुढे उपसंप्रदाय पडले. ते शाखा या नांवानें लोकास परिचित आहेत. या शाखांचे पुढे आणखी उपसंप्रदाय झाले ते सूत्राच्या नावानें प्रसिद्ध आहेत. अग्नि होत्रा पुढें कोणत्याना कोणत्यातरी सूत्राचा परिग्रह करी, आणि आपलें विशेष संप्रदायाशीं नातें जोडी. अमुक एक होत्याच्या संप्रदायाशीं अमुक एक अध्वर्यूंना संप्रदाय सहकारिता करी आणि इतराशीं असहकारिता करी. यामुळें अग्निहोत्र्यास कोणत्या तरी पक्षास मिळावें लागे ऋग्वेदी किंवा यजुर्वेदी हे कर्मविशिष्ट संप्रदाय होत परंतु शुक्लयजुर्वेदी किंवा कृष्णयजुर्वेदी हे पक्षविशिष्ट संप्रदाय होत.

पक्षविशिष्ट संप्रदाय कर्मविशिष्ट संप्रदायानंतरचे होत. या कर्मविशिष्ट संप्रदायाच्या स्थापनेपूर्वीं देखील म्हणजे ऋत्विजांत होते, उद्गाते व अध्वर्यू असा भेद उर्फ विशिष्टीकरण होण्यापूर्वीं देखील विद्यामूलक अगर आचारमूलक संप्रदाय होतेच. यज्ञसंस्था जी तयार झाली ती आचार संहितांनीं युक्त म्हणून दिसते तशी तयार होण्यापूर्वीं अनेक संप्रदाय चालू असलेले दिसतात; ते येणेंप्रमाणें.—

( १ ) गोत्रमंडळांत दृष्ट होणारे संप्रदाय.

( २ ) प्रवर संस्थापक ऋषी व त्यांचे संप्रदाय.

( ३ ) आप्रीसूक्तद्रष्टे ऋषी व त्यांचे संप्रदाय.

( ४ ) ज्यांच्या नांवावरून विशिष्टक्रिया अगर कर्मांग उत्पन्न झालें त्यांचा संप्रदायाशीं संबंध

( ५ ) सत्रमूलक संप्रदाय.

गोत्रमंडळामुळें ज्या संप्रदायाचें अस्तित्व कळून येतें ते संप्रदाय म्हटले म्हणजे गृत्समद, विश्वामित्र, वामदेव, अत्रि, भारद्वाज, वसिष्ठ. जे ऋषी कोणत्याच मंडळांत किंवा संप्रदायांत नाहींत असे मंत्रद्रष्टे पहिल्या, आठव्या नवव्या व दहाव्या मंडळांत घातले आहेत.

प्रवरसंस्थापक ऋषी म्हटले म्हणजे कश्यप, अत्रि भरद्वाज, विश्वामित्र, गोतम जमदग्नि, वसिष्ठ व आठवा अगस्ति असे धरले जातात. अनेक ऋषींच्या नावाचीं गोत्रें आहेत. तीं सर्व वरील ऋषींच्या नावावर स्थापन झालेल्या प्रवरांशीं जोडलीं जातात.

या प्रवरस्थापकांमध्यें आंगिरसाचें नांव दिलेलें नाहीं. आंगिरस हा तर अत्यंत प्राचीन काल्पनिक पुरुष अगर प्रत्यक्ष अग्नि होय असें शक्य आहे कीं जे ऋषी कोणत्याच पुरुषास आपला संप्रदायप्रवर्तक म्हणून मान्य करीत नसतील ते आंगिरस वरण करीत असावेत.

आप्रीसूक्त म्हणजे काय याचें विवेचन पूर्वीं केलेंच आहे. आणि आप्रीसूक्तावरून जे संप्रदाय दिसून येतात त्यांसंबंधींहि बरंच विवेचन झालें आहे.

या अनेक संप्रदायांची तोंडमिळवणी करून सर्वसामान्य श्रौतधर्म तयार करण्याची खटपट चालू असे. त्या खटपटीचीं अंगें अनेक होतीं. एक अंग म्हटलें म्हणजे अनेक संप्रदायांतील विध्यंश घेऊन कर्मकल्पना करणें, दुसरें अंग म्हटलें म्हणजे कर्मांमध्यें कांहीं संप्रदायाचें वैशिष्ट्य कायम रहावें म्हणून ऐच्छिक क्रिया ठेवणें. या दोन्ही क्रियांचे परिणाम यज्ञसंस्थेवर झालेले दिसत आहेत.

कांहीं संप्रदायामध्यें विशिष्ट कर्में रूढ होतीं. उदाहरणार्थ, आंगिरसामध्यें द्विरात्र, गर्गांत त्रिरात्र, अत्रींत चतुरात्र. जमदग्नींमध्येंहि एक तऱ्हेचा चतुरात्र होताच. उद्दालकपुत्र कुसुरुबिंद याच्या नावावर सप्तरात्र इत्यादि संस्था व्यक्तींच्या किंवा संप्रदायाच्या दिसतात. सोमयागसंस्था पूर्ण होऊन यजुर्वेद व ब्राह्मणें तयार होण्यापूर्वींच्या या संस्था. ज्या क्रियेनें सामान्य एकाहि क्रतु झाला त्याच क्रियेनें या इतर संस्था बनल्या असाव्यात.

जेव्हां अनेक संप्रदायांचें एकीकरण झालें व अनेक गोत्रांमधून ज्याप्रमाणें होत्र तयार झालें. त्याचप्रमाणें सामान्य यज्ञघटना बनवितांना प्रत्येक वरील संप्रदायापाशीं देव घेव करून यज्ञाची मांडणी सर्वमान्य करण्यात आली असावी.

पुढें असें दाखविण्यात येईल कीं यज्ञाची मांडणी सामान्यतः घेऊन त्याच्या संक्षेपानें सोमयाग झाला असावा. ही कल्पना जरी असत्य.स असें म्हणावें लागेल कीं, यज्ञाचा

काल व सत्रे संकोच पावून सोमयाग तयार होण्याचा काल याच्यामध्यें गर्ग, आंगिरस इत्यादि मंडळींनीं आपआपल्या पुरतें सत्रसंक्षेप तयार केले असावेत व त्यांच्यामुळें जे संप्रदाय तयार झाले असतील त्यांच्या क्रियांचे एकीकरण व व्यवस्थितकरण होऊन सर्वजनमान्य असा यागसमुच्चय तयार झाला असावा.

**द्विरात्र, षड्रात्र, व द्वादशाह हे क्रतू सत्रांगच होत असा पुरावा.**—द्वादशाह नामक यज्ञच सत्राग' व 'अहीन' [स्वतंत्र] असे दोन प्रकार आहेत या दोन प्रकारात वस्तुतः कांहीं भेद नाहीं कारण 'अहीन' अथवा सत्राग या दोनहि द्वादशाहात कोणता तरी एक ज्योतिष्टोमविशिष्ट विधि करून सोमयाग करावयाचा असतो. 'आसीरन' 'उपेयुः' अशीं चोदनायुक्त पदें जेव्हा वेदांत आढळतात तेव्हा तें बहुयजमानयुक्त असें सत्र समजलें जातें. व 'यजति' असें एकवचनी पद जेथें आढळतें तेथें सत्रकर्ता यजमान एकटाच अभिप्रेत असतो. यावरून ज्या द्वादशाहात सर्वच ऋत्विज यजमानरूपानें असतात तो द्वादशाह सत्ररूप होय व ज्या द्वादशाहात एकच यजमान असून तो ऋत्विजांच्या सहाय्यानें अनुष्ठान करतो तो अहीन द्वादशाह होय प्राचीन सत्राचा संकोच झाल्यावर द्वादशाह यज्ञाची कल्पना निघालेली दिसते. मोठाल्या सत्रांतूनच द्विरात्रादि द्वादशाहान्त क्रतू निघाले आहेत. द्विरात्र यज्ञामध्यें चार प्रकार आहेत, त्यांपैकीं एक प्रकार आंगिरस कुलांतील हविष्मत् व हविष्कृत् या दोन व्यक्तींच्या नावावर प्रचलित झाल्याचें वर्णन आढळतें. ती कथा अशी.—अंगिरसाचें सत्र चाललें असता त्याच्यांपैकीं हविष्मत् व हविष्कृत् यांनीं अग्निष्टोम व अतिरात्र हे दोन क्रतू जोडून द्विरात्र नावाचा एक यज्ञ करून ते स्वर्गास गेले असा उल्लेख तैत्तिरीय संहितेंत (७.१,४) आला आहे. अहीनांपैकीं षड्रात्र क्रतूस 'देवसत्र' असें नांव दिलें आहे. यावरूनहि मोठ्या सत्राचा संकोच कसा होत होता हें दिसून येण्यासारखें आहे. वास्तविक तेरा दिवसापेक्षां अधिक मुदतीचा सामुच्चयिक यज्ञ असेल तर त्याला सत्र म्हणणें युक्त होईल. परंतु साध्य नामक देवांनीं षड्रात्र क्रतूच सामुच्चयिक म्हणजे सत्ररूपानें केला, अशातऱ्हेची कथा सांगून षड्रात्र क्रतूला देवसत्र हें नाव दिलें गेलें. सत्राचा संकोच होऊन त्यांतूनच एकाह, द्विरात्रादि अहीन क्रतू निर्माण झाले याला दुसरा पुरावा असा देतां येईल कीं, सत्रांतील कांहीं गोष्टी अहीन क्रतूमध्यें आणून त्यानाच सत्र असें नाव देऊन त्यावरच सत्रासंबंधीं तहान भागविण्याचा प्रकार चालू झाला होता. उदाहरणार्थ हविर्धान व आग्नीध्रीया या दोन मंडपांची उभारणी चाकें असलेल्या गाड्यावर करणे; यूपस्तंभ मोठ्या धुड्याचा म्हणजे वाटेल तेथें जमीनीवर उभा करतां येईल अशा प्रकारचा करणें इत्यादि सत्रांतील गोष्टींचा षड्रात्र क्रतूमध्यें समावेश केला आहे.

**सत्ररूप द्वादशाह.**—द्वादशाह हा यज्ञ जेव्हां पुष्कळ यजमान एकत्र मिळून करितात तेव्हां त्या यज्ञास सत्र अशी संज्ञा प्राप्त होते. त्यांत एक मुख्य यजमान निवडला जातो त्यास गृहपति म्हणतात. गृहपति जो ठरेल त्याच्या अरणीवर मंथन करून अग्नि उत्पन्न करावयाचा व गार्हपत्य आणि आहवनीय या दोन रूपानें दोन स्थळीं त्याची स्थापना करावयाची व इतरांनीं आपले अग्नी तेच आहेत असें मानावयाचें. व्रतदुग्ध (नित्य प्राशन करावयाचें दूध) लौकिकाग्नीवर तापवून आणावयाचें असा एक पक्ष, व कोणाच्याहि एका अरणीवर प्रत्येक ऋत्विजानें मंथन करून निरनिराळे (गार्हपत्य व आहवनीय) अग्नी उत्पन्न करून एकाच गार्हपत्यात टाकून मग त्यातील एक भाग आहवनीयात टाकावयाचा असा दुसरा पक्ष. व्रतदुग्धाबद्दल वरीलच नियम असे. सत्राला आरंभ झाल्यावर त्यात समाविष्ट होण्यासाठीं कोणी एखादा दीक्षित आला तर त्यानें गृहपतीच्या अरणीवर मंथन करून मंथनोत्पादित अग्नीपैकीं अर्धा गार्हपत्यात व अर्धा आहवनीयात टाकावा. व्रतदुग्धहि वरील सर्वांप्रमाणेंच एकत्र ठेवावें

**सत्रें व तदंग संस्कार.**—सत्रांतील दीक्षणीयेष्टीमध्यें 'पवन पावन' नामक एक संस्कार करावयाचा असतो त्याचा क्रम सूत्रकारांनीं पुढील प्रमाणें दिला आहेः—अध्वर्यूनें प्रथम गृहपतीचा संस्कार करावा व नंतर होता, ब्रह्मा व उद्गाता यांचा संस्कार करावा. प्रतिप्रस्थात्यानें प्रथम अध्वर्यूचा संस्कार करून नंतर प्रस्तोता, मैत्रावरुण व ब्राह्मणाच्छंसी यांचा संस्कार करावा. अग्नीध्रानें प्रथम प्रतिप्रस्थात्याचा संस्कार करून नंतर अच्छावाक, पोता, नेष्टा व सदस्य यांचा संस्कार करावा. उन्नेत्यानें प्रथम अग्नीध्राचा संस्कार करून नंतर ग्रावस्तुत, सुब्रह्मण्य व प्रतिहर्ता यांचा संस्कार करावा व आपणच आपला स्वतःचा संस्कार करावा. अध्वर्यूनेंच सर्वांचा संस्कार करावा अशी जर सर्वांची इच्छा असेल तर अध्वर्यूनेंच सर्वांचा पवनपावन संस्कार करावा.

**प्रवरण विधि.**—द्वादशाहामध्यें करावयाचा सामुच्चयिक प्रवरणविधि म्हणजे असाः—प्रथम गृहपतीच्या प्रवराचा उच्चार करून नंतर होता, अध्वर्यु, ब्रह्मा व उद्गाता या चार प्रमुख ऋत्विजांचें प्रवरोच्चारण झाल्यावर पुढें अनुक्रमें प्रतिप्रस्थाता, मैत्रावरुण वगैरे सर्व ऋत्विजांचें प्रवरोच्चारण करावयाचें.

दीक्षाहुतींच्या वेळीं अध्वर्यूनें दीक्षाहुति द्यावी व अध्वर्यूला इतरांनीं अन्वारंभ (हस्तस्पर्श) करावा. कृष्णाजिन परिधानाच्या वेळीं अध्वर्यूनें प्रथम गृहपती-

करून मंत्र पठण करावा. नंतर सर्वांकडून करावा. अग्निष्टोमादि क्रतूंमध्यें सुत्येच्या दिवशीं प्रातःसवनांत ऋतुयागासंबंधीं याज्या पठण करावयाच्या असतात त्या अध्वर्यु, यजमान व प्रतिप्रस्थाता यांच्याकरितां होत्याने पठण करावयाच्या असतात. परंतु सत्रामध्यें मात्र त्यांनां होत्यानें म्हणावयास न सांगतां स्वतःच म्हणावयाच्या असतात.

सत्राग द्वदशाहांत बारा दिवस दररोज जे अनुष्ठान व्हावयाचें तें प्रथमदिवशीं अतिरात्र, दुसऱ्या दिवशीं अग्निष्टोम नंतर पुढे सहा दिवस उक्थ्य; व पुढे तीन दिवस छंदोम आणि शेवटच्या दिवशी अग्निष्टोम याप्रमाणें बारा दिवस अनुष्ठान करावयाचें असतें. आतां मत्रावरूनच सोमयाग उत्पन्न झाले काय हे पाहूं.

**सत्रें व सोमयाग यांचा संबंध.**—सत्रें म्हणजे अनेकांनी मिळून याग करावयाचा व तो पुष्कळ दिवस चालू रहावयाचा ही कल्पना अत्यंत प्राचीन असावी. सत्र म्हणजे दीर्घकाल चालणारा एक सामुच्चयिक याग होय. पुष्कळशा यजमानानीं एकत्र रहावयाचें आणि प्रत्येकानें वेगवेगळ्या अथवा सर्वांनी मिळून एकाच अग्नीची उपासना करावयाची; सोमरस, पशुमांस व पुरोडाशादि हविर्द्रव्याचें हवन करावयाचें हेंच सत्राचें सामान्य स्वरूप होय. ऋग्वेदांत पृथकत्वानें होणाऱ्या अग्न्युपासनेपेक्षा सामुच्चयिक अग्न्युपासना जास्त आढळते. मात्र तीमध्यें होत असलेले विधी कोणत्याहि विशिष्ट नियमास धरून अथवा चोदनेस अनुसरून असे होत नसत व त्यावेळी मंत्रपूर्वकता फारच थोड्या विधींच्या वाट्यास येत असावी. किंबहुना मंत्ररहितच ते विधी असावेत. ऋग्वेदांत क्वचित् दैनिक सोमरसाच्या हवनाविषयी उल्लेख सांपडतो. सामुच्चयिक सोमयाग तर स्पष्टच आहेत. अशा प्रकारचे सामुच्चयिक सोमयाग भटकणाऱ्या टोळ्यांच्या भटकण्याच्या श्रमात नऊ महिने, दहा महिने किंवा बाराहि महिने एकसारखे सतत चालत असावेत. प्राचीन कालचीं हींच सत्रें होत. मात्र हे याग जेव्हां प्रत्यक्ष होत असत तेव्हां त्यांनां सत्र हें नाव मिळालेलें असणें संभवनीय नाही. सत्र हा शब्द जुना आहे परंतु तो सामुच्चयिक यागानां ऋग्वेदाच्या अखेरीस किंबहुना यजुर्वेदकालांत रूढ झाल्याचें दिसून येतें. ऋग्वेदांत येणाऱ्या सत्र शब्दाचे कसकसे अर्थ होत गेले याचा कल्पना येण्यासाठीं कांहीं उतारे आम्ही पुढें देत आहोंत. त्यावरून हें सहज आढळून येईल कीं, सत्र या शब्दाचा उपयोग सामुच्चयिक याग या अर्थानें एकदाच केला आहे व तो देखील १० व्या म्हणजे मागाहून जोडल्या गेलेल्या मंडलांत आहे. सारांश ऋग्वेदांत सत्र हा शब्द प्रायः एकदम, बरोबर, बरोबर अशा सामुच्चयिक यागेतर अर्थासाठीं आला आहे. ऋग्वेदांतील सत्र शब्दाचा विचार करावयास पुढील उतारे फार उपयुक्त होतील

'सत्रा विश्व दधिषे केवल सह.' (१.५७,६) केवळ तूं एकटाच सर्वव्यापक आहेस अशा प्रकारचें बळ तूं धारण करतोस हें खरें आहे

'एकः सत्रा सूरो वस्व ईशे' (१.७१,१) शूर असा एकच आदित्य धनांना एकदम मिळवितो.

'सत्रा चकाणो अमृतानि विश्वा' (१.७२,१) सर्व हिरण्यें एकदमच देऊन.

'सत्राकरो यजमानस्य शंसं.' (१.१७८,४) हा इंद्र बरोबरच यजमानाचा लौकिक वाढवितो

सत्रा शंसं यजमानस्य तूतोत् (२.२०,७) यजमानाचा महान अ । अभिलाष पूर्ण करो.

'सत्रदाव देवभिर्गणसातौ' (२ २० ८) देवानीं (स्तोत्यांनां) उदकलाभ व्हावा म्हणून इंद्राला सर्व (सत्रा) दिवसामध्यें हवि अर्पिला

'सत्रा दधिरे हरिवो जुषस्व' (३ ५१ ६) हे अश्वसंपन्न इंद्रा, ऋत्विज बरोबर तुझ्याच साठीं स्तोत्रें धारण करतात.

'सत्रा मदासो बृहतो मदिष्ठा.' (४ १७,६) बरोबर सर्व सोमरस महान् इंद्राला मद आणणारे असेच झाले आहेत.

'सत्रामहो मारस्य पूर्णः' (४ २१,७) बरोबर भार्वराच्या इच्छा पूर्ण करणाऱ्या इंद्राचेंच हें बल आहे.

'नूरूणानि सत्रा सहुरे सहांसि' [४.२२.९] हे सहनशील इंद्रा, सर्वदा शत्रूंना जिंकणारें असे बल तूं आम्हांस दे.

'सत्रा ते अनु कृष्टय.' 'सत्रा महाँ असिश्रुतः' (४ ३०, २) बरोबर तुझ्या प्रजा तुलाच अनुसरून आहेत, तूं बरोबर सर्वविश्रुत असा आहेस.

'सत्रा महाँसि चक्रिरे तनूषु' [५६०,४] तनूंच्या ठिकाणीं महान तेजें एकदम धारण करते झाले.

'दिवो न तुभ्यमन्विन्द्र सत्रा' (६ २०,२) हे इंद्रा, देवांनीं बरोबर सूर्याप्रमाणें तुलाहि स्तविला.

'सत्रा ते विश्वमनु वृत्रहत्ये' (६.२५,८) वृत्रवधाच्या वेळीं देवानीं बरोबर उत्कृष्ट असे बल दिलें.

'सत्रावावृधुर्हवनानि यज्ञैः.' (६ ३४,४) 'यज्ञसाधन अशा हविर्द्रव्यासह स्तोत्रें वाढविलीं'

'सत्रा मदासस्तव विश्वजन्याः' (६ ३६,१) हे इंद्रा तुला आलेले कैफ बरोबरच सर्व जनांनां हितकर होत.

'सत्रा दधिरे अनु वीर्याय' (६ ३६,२) पराक्रम करण्यासाठीं त्या इंद्राला बरोबरच पुढच्या बाजूस धारण करितात.

'सत्रा वाजं न जिग्युषे' (६ ४६ २) प्रभूत अशा अन्नाप्रमाणें तूं जिंकणाराना (देणगी) देतोस.

'सत्रा विश्वानि पौंस्या' (६ ४६,७) महान् अशीं सर्व बळें तूं आमच्यासाठीं हरण कर.

सत्रा कृधि सुहना शूर वृत्रा [ ७.२५,५ ] हे शूरा शत्रूंना सहज मारतां येईल असेंच सर्वदा कर.

'सत्रा राजानं दधिरे सहध्यै' [ ७.३१,१२ ] शत्रूला जिंकण्यासाठी राजांना उद्देशून सर्व बाजूनें स्तोत्रें धारण केली जातात.

'सत्रा विश्वस्य परमस्य राजसि' ( .३२,१६ ) उत्कृष्ट अशा धनाचा खरोखर [ तूंच ] राजा शोभतोस.

'सत्रा हतं सोमसुता रथेन' [ ७.९३,५ ] सोम कुटणाऱ्या लोकांकडून सोम न कुटणाऱ्या लोकांचा नाश नेहमीं केला जाई.

'सत्रा दधिरे शवांसि' ( ८.२,३० ) एकदमच बलाना धारण करतात.

'सत्रा विश्वा स्वपत्यानि दधिषे' [ ८.१५,१० ] सर्व शोभन अपत्यांना एकदम धारण करतोस.

'सत्रा त्वं पुरुष्टुत' ( ८.१५,११ ) अग्रभागीं स्तविला जाणारा तूं एकदमच सर्व शत्रूंना मारतोस.

'अंतं विंदामि सत्रा' [ ८.४६,११ ] खरोखर तुझ्या धनाचा अंत आम्हास लागत नाहीं.

'सत्रा दधानमप्रतिष्कुतं शवांसि' [ ८.९७,१३ ] खरोखर बलाना धारण करणाऱ्या व शत्रूला न हटवणाऱ्या इंद्रालाच आम्हीं बोलावतो.

'सत्रा देव महाँ असि' ( ८.१०१,११ ) हे देवा खरोखरच तू मोठा आहेस.

'सत्रा वृधं जठर आ वृषस्व' [ १०.९६,१३ ] सोमरसाची अतिशय वृद्धि करणाऱ्या इंद्रा हा सोमरस तूं आपल्या जठरात ओत.

'आदिंद्रः सत्रा तविषीरपत्यत' [ १०.११३,५ ] तो इंद्र एकदम पुष्कळाना अधिपति होतो.

वरील उताऱ्याशिवाय ऋग्वेदात सत्र शब्द बऱ्याच ठिकाणीं आढळतो. परंतु तो वरील अर्थानेंच असणार आम्ही दिलेल्या मतास वरील उतारे पुरेसे होतील.

आतां यजुर्वेद संहितेंत सत्र शब्द याग या अर्थी कसा रूढ झाला आहे हें पुढील उताऱ्यावरून समजून येईल. यजुर्वेदात ह्या शब्दाचा अर्थ भाष्यकारांनीं निरनिराळीं सत्रें ( याग )व सत्र करणारे यजमान असा केला आहे.

'सत्राभिजितें' ( ७. ५, १ ) सत्रानुष्ठानानें मिळविलेले. 'सत्रा'( २. २,१२)एकत्र. 'सत्रिणः' (१.७,२;७.२,९;४,११) सत्र करणारे.

याशिवाय तैत्तिरीय संहितेंत १.६,१२;२.३,२;३.१,९;४.७,१३;७.१,४;२,९;३,६;९;४,१;२;५;५,१;५;८;९ या स्थलीं सत्र शब्द सामुच्चयिक याग या अर्थानें आला आहे.

अनेकानीं मिळून एकत्र कांहीं क्रिया करावयाची. ही मंत्रकालीन पद्धति सूतसंस्कृतीमध्येंहि असणें स्वाभाविक आहे, आणि शत्रुदमनासाठीं सामुच्चयिक प्रार्थना किंवा हवन हें सूतसंस्कृतीच्या लोकात होत असल्यास सत्र विषयक कल्पना त्याच्यांत विकसित झाली असल्यास नवल नाहीं. सामुच्चयिक कर्म हे सूतसंस्कृतीच्या देशात होतें, आणि दैनिकयागसमुच्चय मात्रांत होता. तर या दोहोंचेंहि एकीकरण होऊन सत्रविषयक श्रौतविधी तयार झाले असावेत असें दिसतें.

**गोत्रमंडळांतील ऋषींचें संप्रदायांत स्थान.**— गोत्रमंडळामुळें प्राधान्य पावलेल्या ऋषींचे संप्रदायाच्या इतिहासात स्थान येणेंप्रमाणें दर्शविता येईल.

गोत्रमंडळात दृष्ट होणारे संप्रदाय व तैत्तिरीय शाखेत वर्णिलेले संस्थास्थापक समकालीन होत. या दोहोंचा उपयोग पुढील सूत्रसंस्थाकारानीं केला.

प्रवराचे ऋषी आणि गोत्रमंडळाचे ऋषी यात कांहीं ऋषी एक दिसतात.

प्रवराचा उल्लेख सत्रप्रकरणांत व सत्रातील आप्री सर्वांच्या सारख्या असाव्यात या हेतूनें आला आहे

आप्री गोत्रावरून आखलेल्या आहेत. पण गोत्रें हजारों. त्याचा थोडक्या आप्रीसाठीं उल्लेखिलेल्या गोत्राशीं संबंध जोडण्यासाठीं काहींतरी योजना हवी होती म्हणून सर्व गोत्राचा विशिष्ट आप्रीशीं संबंध जोडण्याकरितां प्रवराची यादी तयार होणें अवश्य होतें. ऋग्वेदातील अनेक ऋषी कांहीं विशिष्ट कुलात घालण्याचा प्रयत्न कसा झाला हें मागें दाखविलेंच आहे.

ही योजना भिक्षुकी स्वरूपाची आहे म्हणजे भिक्षुकी कारणाकरिता काल्पनिक इतिहास तयार होण्याचा संभव येथें आहे. म्हणजे बऱ्याचशा लोकास त्याच्या गोत्रप्रवर साहाय्यावरून एका कुलात दडपण्याची खटपट यात दिसते.

तथापि कांहीं मूळची परंपरा असल्याशिवाय आणि ती सर्वमान्य असल्याशिवाय नवीन स त्यात दडपता येणार नाहीं. यावरून असें असणें शक्य आहे कीं कांहीं आर्षेययुक्त गोत्रें व त्यामुळे कांहीं परस्पर संबंध मूळचेच निश्चित झाले असावेत.

प्रवर म्हणून जी आर्षेय परंपरा प्रत्येक उपासक बाळगी ती यज्ञयोजकात व इतर सामान्यातहि तयार झाली असावी.

गोत्रें स्थापित होणें ही आडनावें स्थापन होण्याप्रमाणेंच स्वाभाविक क्रिया आहे. आणि 'अपत्यं पौत्रप्रभृति गोत्रं' असा पाणिनीनें जो नियम दिला आहे तो कुलनाम निर्देशाच्या स्पष्टीकरणास योग्य आहे. कुलाना नावें कशीं पडलीं हें स्पष्ट करावयाचें असेल तर पाणिनीचा हा नियम तें स्पष्ट करील. तथापि आपणास स्पष्ट करावयाची गोष्ट आडनावस्वरूपी गोत्रें कशीं पडलीं एवढाच नसून बहिर्विवाहात्मक संस्था उत्पन्न कशी झाली आणि तिचा गोत्राशीं संबंध कसा जोडला गेला आणि गोत्राचा प्रवराशीं संबंध कसा जोडला गेला इत्यादि प्रश्न आपणास विचारणीय आहेत.

**प्रवरसंस्थापक ऋषींचें महत्त्वस्थापन**—येथें आपण प्रश्न विचारांत घ्यावयाचा तो हा कीं, प्रवराचे संस्थापक म्हणून काहीं ऋषींना महत्त्व का प्राप्त झालें? ऋषींना विशिष्ट महत्त्व प्राप्त होऊन त्यांचे समुच्चय पाडण्याचे प्रसंग प्राचीन इतिहासात चार सांगतां येतील ते म्हटले म्हणजे गोत्रमंडळाचे ऋषी, प्रवरसंस्थापक ऋषी, आप्रीसूक्तात विधिभिन्नत्वामुळें उत्पन्न झालेले ऋषी व आकाशातील सप्तर्षी यामध्यें असें म्हणता येईल कीं आकाशांतील सप्तर्षी हे सर्व प्रवरसंस्थापक नऊ ऋषींमध्यें मोडतील आणि भारद्वाज व गोतम खेरीज करून इतर सर्व प्रवरसंस्थापक ऋषी आप्रीसूक्तात विधिभिन्नत्व उत्पन्न करणाऱ्या ऋषींमध्यें मोडतील. या चौघाचा संबंध दाखविणारें कोष्टक येणेंप्रमाणें.

| गोत्रमंडळांचे ऋषी | प्रवरसंस्थापक ऋषी | आप्रीमध्यें विधिभिन्नत्वकारक | आकाशांतील सप्तर्षी |
|---|---|---|---|
| गृत्समद | | | |
| विश्वामित्र | विश्वामित्र | विश्वामित्र | विश्वामित्र |
| वामदेव | | | |
| अत्रि | अत्रि | अत्रि | अत्रि |
| भरद्वाज | भरद्वाज | | भरद्वाज |
| वसिष्ठ | वसिष्ठ | वसिष्ठ | वसिष्ठ |
| | कश्यप | कश्यप | कश्यप |
| | अगस्त्य | अगस्ति | |
| | गोतम | | गौतम |
| | जमदग्नि | जामदग्न्यभार्गव | जमदग्नि |
| | आंगिरस | आंगिरस | |
| कण्व | | कण्व | |
| | | शुनक | |
| | | वध्र्यश्व | |

प्रवरसंस्थापक ऋषी म्हणून जे समजले गेले त्यास महत्त्व कसें प्राप्त झालें हें दाखविण्यास वरील कोष्टक उपयोगी पडेल. विश्वामित्र, अत्रि, भरद्वाज आणि वसिष्ठ याच्या नावावर तर ऋग्वेदांतील एक एक मंडळच आहे आणि भरद्वाजाखेरीज तिघाचा संबंध ऋग्मंत्राचा श्रौत कर्माकडे उपयोग करताना गोत्राकडे लक्ष देण्याचा एकच प्रसंग, जो आप्रीसूक्तशमन त्याप्रसंगीं येतो येणेंप्रमाणें वसिष्ठ, विश्वामित्र व अत्रि या तीन गोत्रास दोहोंकडून महत्त्व आहे. कश्यपाचें महत्त्व आप्रीसूक्त व आकाशातील सप्तर्षींपैकीं एक या दृष्टीनें आहे. तीच गोष्ट जमदग्नीची होईल अगस्त्य व गोतम याचा ऋग्मंत्रात महत्त्वानें उल्लेख आहे

प्रवरसंस्थापक ऋषी खरोखर नऊ असून सात समजण्याचा प्रचार आहे, व पुढील दोन आणखी म्हणून घातले

सात या आकड्यास प्राधान्य कसें मिळालें व सर्व ऋषी विशिष्ट प्रवरात कसे कोंडले गेले या विचारामधील दुसरा विचार झालाच आहे. परंतु सात आंकड्यास ते ऋषींचे सात संप्रदाय आहेत ही कल्पना कोठून आली. हे सात संप्रदाय कोठले असावेत. ज्या वेळेस होते हे आव्हान करणारेच केवळ नसून हवन करणारेहि होते आणि ज्या वेळेस होता, अध्वर्यु असें वर्गीकरण झालें नव्हतें त्या वेळेस महत्त्वाच्या ऋषींच्या नावावरून होत्यामध्येंच अनेक संप्रदाय स्थापन झाले असावे व काहींच्या दृष्टीनें ते सात असावेत असें दिसतें.

यज्ञ वैयक्तिक उपासनेचें स्वरूप टाकून जेव्हा सामुच्चयिक स्वरूप धारण करूं लागला तेव्हा प्रथमत निरनिराळ्या समुच्चयातले लोक एकत्र गोळा करून सार्वजनिक यज्ञ करावयाचा अशी कल्पना प्रथम प्रवर्तली असावी आणि यासाठीं जे समुच्चय घेतले ते विशिष्ट प्रवरसंस्थापक ऋषींच्या नावावर मोडले जाणारे घेतले असावेत होत्यामध्यें सात संप्रदाय असून त्यावर रूपकें होत होतीं असें पुढील अर्थावरून दिसतें

सप्तते अग्ने समिध सप्तजिह्वा॰ सप्तर्षयः सप्तधाम प्रियाणि ॥
*सप्तहोत्रा॰ सप्तधात्वा यजन्ति सप्तयोनीरापृणस्वा घृतेन ॥*

हे अग्ने सात समिधा तुला अर्पिल्या जातात, तुझ्या जिव्हा सात आहेत, ऋषी सात आहेत, तुला प्रिय अशी सात स्थानें आहेत सात होते सातप्रकारांनीं अगर सात ठिकाणीं तुझें यजन करतात यासाठीं हे अग्ने तुपाच्या योगानें तुझीं सातहि उगमस्थलें भरून टाक.

निरनिराळ्या प्रकारच्या संप्रदायाना एकत्र करण्यासाठीं जे प्रयत्न झाले त्यात सात होते मिळून होणाऱ्या यज्ञाची स्थापना आणि आप्री सूक्ताची योजना या गोष्टी प्रमुख होत सात होत्याच्या यज्ञसंस्थेचे प्रकार आज आपणांस उपलब्ध नाहींत ऋत्विजाचें विशिष्टीकरण झालेली यज्ञसंस्था आपणांस उपलब्ध आहे, तथापि वर दिलेल्या ऋचेसारख्या ऋचा सात प्रकारच्या होत्याचें स्मारक होत. प्रवरसंस्थापक जे ऋषी होते ते सात कुलाचे पूर्वज असावेत असें वाटत नाहीं. का कीं सात कुलापासून सर्व जनतेची उत्पत्ति होईपर्यंतचा इतिहास जाणण्याची शक्ति प्राचीन लोकाना असणें शक्य नाहीं सात पुरुषापासून सर्व जनतेची उत्पत्ति ही गोष्ट उघड उघड अशक्य दिसते. ज्याप्रमाणें एका स्त्रीपुरुषापासून सर्व जनतेची उत्पत्ति देण्यासंबंधींची कल्पना मनोरंजक पण अनैतिहासिक तितकीच ही देखील होय शिवाय प्रवरण ज्यानें करावयाचें ते पूर्वज होते असा कशावरून? 'प्रवरण' या शब्दाच्या अर्थाकडे जर लक्ष दिलें तर ते पुरुष पूर्वज नव्हते असें सिद्ध होईल. वरण म्हणजे निवड व प्रवरण म्हणजे प्रकर्षानें निवड कोणत्याहि संप्रदायामध्यें आपल्या पूर्वजांच्या नावाचा उच्चार करण्याऐवजीं आपल्या संप्रदायातील प्रमुख आचार्यांच्या नावाचा उच्चार करण्याची प्रवृत्ति दोहोंकडेच आहे व आपण ब्रम्हयज्ञाग तर्पणात ती पाहतोंच

सात पुरुषांपासून प्रवराच्या सहाय्यानें आपल्या रक्ताचा इतिहास लावण्याचा प्रयत्न व्यर्थ आहे. त्याच्या योगानें आध्यात्मिक परंपराच कळणार आहे एवढेच केवळ नव्हे तर प्रवराची निवड होत होती व प्रवराची निवड करण्याचें स्वातंत्र्य कमी करण्याचेहि प्रयत्न होत होते.

**प्रवरांची निवड करण्याचें स्वातंत्र्य कमी करण्याचा प्रयत्न.**— प्रवर ऊर्फ आर्षेय ही संस्था विशिष्ट कारणाने स्थानीं स्थित केली. ही क्रिया आपणास सूत्रांत दिसते. *प्रथमतः प्रवरण वाटेल त्यानें करूं नये म्हणून मान्य झालेल्या व्यक्तींनीच प्रवरण करावें आणि तेंच उत्तर* कालीनानीं स्वीकारावें असा प्रयत्न झाला, म्हणजे व्यक्तीच्या इच्छेनुसार प्रवरांची निवड होण्याची क्रिया बंद पडली असें झालें. 'न देवैःमनुष्यः आर्षेयं वृणीते ऋषिभिरेव आर्षेयंवृणीते' हें वाक्य सूत्रकार श्रुति म्हणून सांगतात. पण कोणत्या श्रुतींतील असेल तें अद्यापि कळलें नाहीं. ऋषींनीच आर्षेय वरणाचा मक्ता कां घ्यावा तर देवानां यजमान ऋषिमुखानेंच ओळखतो म्हणून (आर्षेयम् अन्वाचष्टे ऋषिणा हि देवाः पुरुषमनुबुध्यन्त इति)

येणें प्रमाणें व्यक्तीचें वरणस्वातंत्र्य नष्ट करण्याची खटपट झाली तिचीं स्मारकें आपणास दिसतात.

एकानें उपादिलेला संप्रदाय दुसऱ्यानें घेतल्यामुळे घेणाराहि प्रवरांत मोडे ही गोष्ट बरेच काल लोक विसरले नव्हते प्रवरामध्ये अनेक ऋषींचीं नावें येतात त्याचें महत्त्व कात्यायन व लौगाक्षि येणें प्रमाणें सांगतात.

'पूर्वःप्रवर-उत्पादयितुः उत्तरःप्रतिग्रहीतुः'॥ म्हणजे पहिला प्रवर उत्पादकाचा होय आणि दुसरा क्रियेचें अगर धर्माचें प्रतिग्रहण करणाऱ्याचा होय.

या वाक्यावरून कात्यायन व लौगाक्षि यांचीं प्रवर हे संप्रदाय होते अशीच कल्पना दिसते.

क्षत्रियांना हा यज्ञधर्म पाळावयाचा तर त्यांना देखील प्रवर हवा पाहिजे. ते यज्ञ कसे करणार तर जसे जुने राजे करीत त्या संप्रदायाप्रमाणेच आम्ही करतो असें त्यांनी म्हणावें किंवा त्यांनीं पुरोहिताचेच प्रवर घ्यावे. कारण राजा पुरोहित सांगेल तसें करणार. आणि पुरोहित आपल्या प्रवराप्रमाणें करणार. काय करणार यात पुढें तरी फारसा फरक नाहीं. पण आपल्या जुन्या संप्रदायाचा अभिमान म्हणून आपल्या पूर्वपरंपरेतील लोकांचीं नावें घ्यावयाचीं एवढेंच. क्षत्रियांना प्रवर दिले ते मनु, ऐल, पुरूरवा हे होते (अथ क्षत्रियाणां त्र्यार्षेयो मानवैड पौरूरवसेति,) ज्यांना असली परंपरा माहीत नाहीं त्यांनीं (म्हणजे यज्ञधर्म सामान्य झाल्यानंतर जे कोणत्याहि संप्रदायांत नसतील त्यांनीं) पुरोहिताचें किंवा आचार्याचे प्रवर घ्यावे.

**गोत्रें आणि वेदाध्याय.**—निरनिराळ्या वेदाच्या अध्यायी मंडळींच्या गोत्रांची यादी आपण पाहूं लागलों म्हणजे आपणास असें आढळून येईल कीं एकाच गोत्राची मंडळी ऋग्वेदी आहेत व यजुर्वेदीहि आहेत. ऋग्वेदी मंडळींत यजुर्वेद्यांपेक्षां कांहीं गोत्रें भिन्न आहेत हें खरें पण अशांची संख्या फार नाहीं. यजुर्वेदी मंडळींच्या निरनिराळ्या शाखांचे आणि सूत्रांचे अध्यायी घेतले तर आपणांस असें दिसून येईल कीं, *निरनिराळ्या सूत्रांस सामान्य अशींच* गोत्रें अधिक आहेत. सूत्रविशिष्ट गोत्र असल्यास थोडकीं. आश्वलायन सूत्री ऋग्वेदी आणि सत्याषाढ सूत्री यजुर्वेदी *आणि बौधायन सूत्री कृष्ण यजुर्वेदी गोत्रांची आपण तुलना* करूं आणि काय दिसतें तें पाहूं.

*अध्वर्यु गोत्रांपैकीं बौधायनसूत्री असलेलीं पण सत्याषाढ सूत्री नसलेलीं गोत्रें येणेंप्रमाणें:—*

अयास्य, औचथ्य, गौतम, कौण्डिण्य तुथ्य, पतंजलि, माठर, मित्रयुव, मौक, मौन, यास्क, रजतवाह, रैभ, वाधूल, वीतहव्य.

*सत्याषाढसूत्री मंडळींत असलेलीं पण बौधायन सूत्री मंडळींत नसलेलीं गोत्रें—*

अज, आङ्गिरस, आजमीळह, उपनीति, उपमन्यु, ऊर्जयन, कण्व, कुम्भ, तंतु, धनंजय, निलेंदिन, पदंगल, बभ्रु बादरायण, बुगमित्र, बैद, भरण, मद्गण, मथग, मधुच्छन्द, मुद्गल, रथितर, रैफ, वरपावन, सावनार्थ, वाचस्पत्यि, वामरथ्य, वारकि, विहव्य, विष्णुवृद्ध, शठ, सात्यकाम्य, सात्यकि, हरित.

दोघांना सामान्य पण नावांत प्रत्ययात्मक भेद असलेलीं, अवट, आवट; कश्यप, काश्यप; भरद्वाज, भारद्वाज, भृगु, भार्गव; शुनः, शुनक, हीं होत.

*हौत्रसंप्रदाय आणि दोन अध्वर्यु संप्रदाय यांस सामान्य अशा गोत्रांची यादी केली असता ती बरीच मोठी होईल.*

अगस्ति, अघमर्षण, अत्रि, अष्टक, अग्निवेश्य, आर्ष्टिषेण, ऋक्ष, कत, कपि, कश्यप, कामकायन, काल, कुशिक गर्ग, गविष्ठिर, चिकित, तांडि, पराशर, पूतिमाष, पूरण, भरद्वाज, मनु वाम, वामदेव, वासिष्ठ, शांडिल, शुंग, शैशिर, श्रीमत, संकृति इत्यादि नांवें आढळून येतात.

| अध्वर्यु गोत्रें. बौधायनपरंपरा | अध्वर्यु गोत्रें. सत्याषाढपरंपरा | हौत्रक गोत्रें. आश्व०परंपरा |
|---|---|---|
| अगस्ति | अगस्ति | अगस्ति |
| अघमर्षण | अघमर्षण | अघमर्षण |
| | अज | अज |
| अत्रि | अत्रि | अत्रि |
| अभिप्रेण्य | अभिप्रेण्य | |
| अयास्य | अयास्य गौतम | |
| अष्टक | अष्टक | अष्टक |
| | | अष्टादंष्ट्र. |
| | आङ्गिरस | |
| आग्निवेश्य | आग्निवेश्य | आग्निवेश्य |
| | आजमीळ्ह | |
| आवट | आवट | |

| अ. थी. | अ. स. | ही. आ. |
|---|---|---|
| आर्ष्टिषेण | आर्ष्टिषेण | आर्ष्टिषेण |
| इर्मीरे | इर्मीरे | |
| | | उचथ्य |
| | उपनीति | |
| | उपमन्यु | उपमन्यु |
| उलैख्य | उलैख्य | |
| | ऊर्णयन | |
| ऋक्ष | ऋक्ष | ऋक्ष |
| ऐतशायन | ऐतशायन | |
| औचथ्य गोतम | | |
| औशिज गोतम | औशिज गोतम | |
| | | कक्षीवान |
| | कण्व | कण्व |
| कत | कत | कत |
| कपि | कपि | कपि |
| कश्यप | कश्यप | कश्यप |
| कामकायन | कामकायन | कामकायन |
| काल | काल | काल |
| | कालभायनि | |
| | कुण्डिन | कुंडिन |
| | कुत्स | कुत्स |
| कुशिक | कुशिक | कुशिक |
| कौण्डिण्य | | |
| गर्ग | गर्ग | गर्ग |
| गविष्ठिर | गविष्ठिर | गविष्ठिर |
| | | गालव |
| गृत्समद | गृत्समद | |
| | | गौतम |
| चिकित | चिकित | चिकित |
| जलन्द्र | जलन्द्र | |
| जामदग्न्य | जामदग्न्य | |
| जामाल्य | जामाल्य | |
| | | जैमिनि |
| ताण्डि | ताण्डि | ताण्डि |
| | तन्तु | तन्तु |
| तरस्वान् | तरस्वान् | |
| तारकायण | तारकायण | |
| | | तार्क्ष्य |
| तिल | तिल | |
| तुम्य | | |
| दन्द्रकी | दन्द्रकी | |
| | | दर्भ |
| | | दीर्घतमस |
| देवरात | देवरात | |
| देवस्थायन | | |

| अ. थी. | अ. स. | ही. आ |
|---|---|---|
| | धनंजय | धनंजय |
| धौम्य | धौम्य | |
| | नितुन्दिन | |
| | | निघृष |
| पतंजलि | | |
| | पदंजल | |
| पराशर | पराशर | पराशर |
| परिधापयन्त्य | परिधापयन्त्य | |
| पार्थ | पार्थ | |
| | | पिंग |
| पूतिमाष | पूतिमाष | पूतिमाष |
| पूरण | पूरण | पूरण |
| | | प्रपदन |
| प्राचीनयोग्य | प्राचीनयोग्य | |
| | बभ्रु | |
| बध | बध | बध |
| | बादरायण | |
| | | बिद |
| बीजवाप | बीजवाप | |
| | बुधामवत् | |
| बृहदग्नि | बृहदग्नि | |
| | | बृहद्युम्न |
| | बैद | |
| | भद्रण | |
| भरद्वाज | भरद्वाज | भरद्वाज |
| भूयसी | भूयसी | |
| | | भैमगव |
| मण्डु | मण्डु | |
| | मद्रण | |
| | मधुच्छन्द | |
| मनु | मनु | मनु |
| | मपण | |
| माण्डव्य | माण्डव्य | |
| माठर | | |
| मित्रयु | | मित्रयु |
| मौक | | मौक |
| मौन | | मौन |
| यज्ञवल्कि | यज्ञवल्कि | |
| | | यस्क |
| यास्क | | |
| रजतवाह | | |
| | रथितर | |
| | | रहूगण |
| | | रेणु |
| रेतवाह | रेतवाह | |

| अ. औ. | अ. स. | हि. आ. |
|---|---|---|
| | रेफ | |
| रेभ | | रेभ |
| | | रोहिण |
| लोहित | लोहित | |
| | | लोहितहस्त |
| | | लोहिताक्ष |
| वत्स | वत्स | वत्स |
| | वत्सावन सावनार्य | |
| | वात्स्यायनि | |
| वाधूल | | वाधूल |
| वाध्यश्व | | वाध्यश्व |
| वामदेव | वामदेव | वामदेव |
| वामरथ्य | वामरथ्य | वामरथ्य |
| | वारकि | |
| | | वारिधापयन्त्य |
| वासिष्ठ | वासिष्ठ | वासिष्ठ |
| विदु | विदु | |
| | विरूप | |
| विरोहित | विरोहित | |
| विश्वामित्र | विश्वामित्र | |
| | विष्णुवृद्ध | विष्णुवृध्द |
| | | वेणु |
| वैन्य | वैन्य | |
| | | शंख |
| | शठ | |
| | | शमथु |
| शाण्डिल | शाण्डिल | शाण्डिल |
| | | शार्कराक्षि |
| | | शालंकायनि |
| | | शालाक्ष |
| शालावत | शालावत | |
| शालु | शालु | |
| शुंग | शुन | शुंग |
| | शुन | |
| शुनक | | शुनक |
| | | शैवगव |
| शैशिर | शैशिर | शैशिर |
| | | श्येत |
| श्रौमत | श्रौमत | श्रौमत |
| संकृति | संकृति | संकृति |
| | सात्यकाम्य | |
| | सात्यकि | |
| | | सार्ष्टि |
| | | सावर्णि |
| सांशित्य | सांशित्य | |
| सुमंगल | सुमंगल | |
| | | सोमराजकि |
| | हरित | हरित |

ब्राह्मणेतिहासामध्यें प्रथमतः सूक्तकार म्हणून नावाजलेले असे जे मोठमोठे ऋषी होऊन गेले ते विशिष्ट प्रवरात कोंबण्याची खटपट कशी झाली हें मागें दिलेल्या यादीवरून लक्षात आलेंच असेल. पुढें अनेक आडनावाचें म्हणजे अनेक गोत्रांतले असे जे ऋषी होऊन गेले ते देखील कोणत्यांना कोणत्यातरी प्रवरात घुसविण्याचा किंवा त्याचा कोणत्यातरी प्राचीन ऋषीशीं संबंध जोडण्याचा प्रयत्न झालाच या सर्वांचा इतिहास देणें म्हणजे आजचीं सर्वच गोत्रें व त्याचें प्रवर याची यादी देणें होईल पण तितका प्रयत्न आपणास अनवश्य आहे उदाहरणासाठीं एखादी यादी दिली म्हणजे झालें येथें कात्यायनांचीं म्हणजे त्या शाखेच्या गोत्रांची व प्रवराची त्याच्या सूत्राप्रमाणें यादी देतों. *आज ही शाखा संख्येनें फारशी मोठी नाहीं इतकी कात्त या* नावानें ओळखिले जाणारे ब्राह्मण आपण कात्यायन सूत्री आहों असें म्हणवितात.

## कात्यायन स्मृतींतील गोत्रें

## विश्वामित्रगण

**विश्वामित्रगणापैकीं.**—कुशिक, लोहित, रौक्षक, कामकायन, अज, कत, धनंजय, पूरण, अघमर्षण, इंद्रकौशिक.

कु शि क गो त्रां ती ल भे द.—कुशिक, पार्णजंघ्य, वारक्य, औदलि, माणि, बृहदग्नि, आलपि, आयहि, आपद्यप्य, कामंतक, बद्धकथ, चिकित, कामकायन, शालंकायन, कात्यायन, लौक, गौर, सौगतव्य, यमदूत, आजमित्र, तारकायण, चौवल, यज्ञवल्क्य, जाबालि, वितंड, तुवलि, सौशृति, औपगहनि, उदपरि, आष्टय, श्यामेय, चैत्रेय, तालोत्तर, मयूर, सामस्य चित्रतव्य, सातताथन, मनु, तंतु, सातव, पक्ष, नालशब्द, वाभ्रव्य, कालाप, उत्तरथ, देवरात, औलकि, उलूक, बाभ्रा वत, शाल, विशाल, कालवच, सैंधवायन, सौराधि, कारीषि, संश्रुत्य, औलोप्य, पायौदरि, क्षरि, पद्मलि, गालव, वैकृति, वैतंड, मत्स्यशंकु, श्यामायन, काल, वालखिल्य, याजि, सौमेय, आश्वलायन, आवाह, उलूखल, जैमिनि, साकृति, औधेय, साक्षि, बभ्र, ईर्मव, कारकि, शालावत.

लो हि त गो त्रां ती ल भे द.—लोहित, कटुकय, चाक्रवर्णायन, तंतायन, वाह्यकि, अष्टक.

रौ क्ष क गो त्रां ती ल भे द.—रौक्षक, स्वोद्वहल, रेवण.

का म का य न गो त्रां ती ल भे द.—कामकायन, देवश्रव, देवतरस, श्रौमत, ज्यामकायन.

अ ज गो त्रां ती ल भे द.—अज, मार्गमित्र, माधुच्छंदस.

क त गो त्रां ती ल भे द.—कत, औदुंबरि, शैशिरि, स्तैकायनि, स्तोकायनि, तार्क्ष्यायनि, कात्यायनि, करीराभि, लवकय, शालंकायन, मौंजद्दायन, गांगायनि, काल्य,

मोदायनि, वेनियानि, वैनायनि,रामणि. रातकि, मौंजायनि

धनंजय गोत्रातील भेद.—धनंजय, पार्थिव, बंधुल, मद्रक, पाणिल, वैयेत्र, परिकुश.

पूरण गोत्रातील भेद.—पूरण, परिधापयंत्य

## अत्रिगण

अत्रिगणापैकीं.—अत्रि, गविष्टिर, वाद्गुतक, मुद्गल,

अत्रि गोत्रातील भेद.—अत्रि, भूरि, छादि, छादागी, पौष्पिक, मौद्गलि, मौपालगल, छागल, तणबिंदु, भार्गवेय, भालन्दन, व्यालि, सावण्यनि, कामार्यनि, दाक्षायण, रतेदेह, गाथितप, औद्दालकि, द्रोणभव, गौरिग्रीवि, गविष्ठिर, शैशुपाल, कृष्णात्रेय, गौरात्रेय, ऋक्षात्रेय, नीलात्रेय, श्वेतात्रेय, श्यामात्रेय, महात्रेय, गालेय, वालेय, शौभ्रेय, वामरथ्य, श्वेतभाव, शौद्रेय, गोपवन, कालापचय, नीलायन, आनंगि मानंगि, दौरंगि, सौरंगि गौरंगि, पुष्पि, सौपुष्पि, साकेतायन, भारद्वाजायन, इंद्रातिथि, शालरव, आढ्यायन, पवनाश, किकिदीवि, शौनककर्णि, सौश्रुति, गौरग्रीवि, कैरंजि, जैत्रायण, श्वेकि, बहुतेन, वाहमित्र जातुकि, पर्नजन, भागमादन, सांख्येय, सारायण, सौक्तवर, अर्धपथ, गौधन्य, कालजिव्ह, उद्दरग्रीवि, वैडालि, शाकलायन, गौणीपथ, बलर, भवनाद, आर्ध्यगिण, बादर्यायण, मागल, बाहुदंति, भागलेय, अरुणात्रेय, दत्तात्रेय, शौंस्वि, करायण, नीशायन, दम्यै, तुषादुल, वामरथ, वेश्वानकि, शौधूलकि, निकल.

गविष्ठिर गोत्रातील भेद—गविष्टिर, दक्षि, भलंदन, और्णवाभि, चंद्रात्रेय, वेजवापि, पूर्णातिथि श्यामपुष्पि, शिरंदलि, ब्रह्मपुष्पि, कालाक्षि, कालशीर्षि, वाष्प्यपुष्पि, सौपुष्पि, हिरण्यपुष्पि, कार्ष्णशायकि, म्हाक्षि, बलि, कट्कि, मैत्राव्य, शिरीषक

मुद्गल गोत्रातील भेद.—मुद्गल, शालिसंधि, आर्णव, बीधाक्ष, चैतवाह, शिरीषि,शालिमत,गौरित, गौरकि, वामवत.

## भृगुगण

भृगुगणापैकीं—वत्स, बिद, वैन्य, वीतहव्य, आर्ष्टिषेण, वाघ्र्यश्व.

वत्स गोत्रातील भेद.—नालायन, वागायन, अनुमातकि, जन्हति, जीवंति, कावलोदरि, वैहायन, रेवायनि, पार्पति, पार्णिलि, उच्ययमान, सात्यकर्णि, कालकि, तालकेशी, ऋतभाग, आर्तभाग, आजीहित, आतिथि, स्यौमागिरि, स्थौल, सौंग, वर्हिप, देवमति, गार्ग्यायण, गेह्यायन, गोष्ठायन, वैशंपायन, गालव, साकृति, वाणकेय, ऐतिकायन, आश्रेय, भास्रेय, लाक्षेय, लाकुचि, लालाटि, आवि, आयावि, सैन्धिकि, सात्वकायन, नैवर्पि, शाकरय, पाकानुमति, कानिष्णि, जिह्वाशिनि, आश्मकम, पौचहाहि, आनुलोमि, क्रौंचाक्षि, क्रौंचाक्ष, सौरथ्यभि, वाध्यात्रेय, निरीणि, वासि, सादन, स्योप, स्यंदनि, कटेरणि, लवेरणि, यौगोलि, माध्योद, मात्स्य, नाडायन, वैरायण, वैन्य, रौहित्यायनि, कृपानील, सावर्णि, पिकस्वर, विष्णु, स्थौलकेशी, मलिन, वीतिन, फेनयास्तली, शिखापाति, जलधि, सेनाजित, कुभ्र, पैंगलायनि, दिवस्पति, ऋषभ, सुत, पलत, पलव, कौपियत, मित्रयज्ञ, आमिलायन, द्वापाति, वैकर्णि, निर्भोलक्ष्मायनि, लाक्ष्मण, शाल्यायनि, मात्यायनि, कौटलि, सौक्ति, साक्षि, कोटर, साद्मणि, नैकजिव्ह, जिव्हाशून्य, केलकेटि, ह्रिकक्षरि, सारग्रानि, नैमिश्य, लौटाक्षि गरेवणि, पौर्णसैगंधि, काशकृत, विलकृत, सौमदायन, स्वानुमति, मंडचित्र,शौकायण, स्त्रैग्य, कौवहुंदि,शौनायन, शाकपौणि, मौहिमति,मायामति,राभिवकि, कोशन, मौद्गलि, कारवच, सातपनायन, गेहि, भेहि, विरूप स्तन्वत, आलंधि वार्यगिरायाणि, श्येनयागति, नैकदि,शौकर्णि, निडायन.

विद गोत्रातील भेद.—विद, शैल, अवट, प्राचीनयोग्य, अभयदान, काडरय, वैनभृत, पुलस्त्य, आर्कायण, नाड्रायण, सात्रायण, क्रोचायण, कामल, पौलस्त्य, वेदभृत, अभयजात, त्रैकायन, भ्राज, प्रादंस्य, ऐकायन, मृंजायन.

वैन्य गोत्रातील भेद.— वैन्य, पर्थ, बाष्कल, शैत (श्यैत).

वीतहव्य गोत्रातील भेद.—वीतहव्य, यास्क, मौन, मौत, बाधूल, वर्षपुष्प, भागलेप, भागविहेय, दुर्दिन, भास्कर, देवनायन, वार्कलेय, माध्यमेय, वासि, शैशावेय, कौविल्य, सत्यकि, चित्रसेन, भागुरिच्छप, माधूल, मौसल, जीवंतायन, अर्धलेखी, वृकाश्मकि, मदोकथ, वारेय, गैरिक्षित, दैर्घचित्त, पंचालव, पौष्पावत, गोदायन, चडमादन, भागलि, भागवित्ति, पिलि, खलि, काश्यपि, समदागवि, सौरि, ज्वरि, भागातप,मादायन, शालंकायन, तार्क, प्रावरेय, शार्कराक्षि, कौटिल्य, विलोमि, बाभ्रिय, ह्रालेय, दीर्घचित्त.

आर्ष्टिषेण गोत्रातील भेद.—आर्ष्टिषेण, नैर्ऋथि,ग्राम्यायणि, कार्णायन, चाद्रायण, पौटक्लायन, सिद्ध, सुमनायन, गौराभि, मृद्वंशीय, मार्गपथ, नैकर्दि,आपस्तंबि, वाल्मि,कार्दमायनि, गार्लभि, अनूप, वदायनि, कवि,आश्वभि.

वाघ्र्यश्व गोत्रातील भेद.—वाघ्र्यश्व, रैष्टवाण, सार्पिडिन, सुरभिनेय, माल्य, महावाल्य, तार्क्ष्यायन, कैतवायन, खालायन, शाकटायन, मैत्रेय, सार्चय, द्रौणायन, रौक्ष्यायन, आपिशल, आटिकायन, हंसजिव्ह, रौप्यायणि, शालंडि, दिडिकाक्ष मौदायन,कापिशायन, शाढय, साक्षित,मित्रयति, आपिशायन, पाटिकायन मित्रयुव, दिवोदास.

## आंगिरसगण

**गौतमांगिरस, भारद्वाजांगिरस, केवलआंगिरस.**

गौतमांगिरसांपैकीं— अयास्य, शारद्वंत, कौमंड, कारेणुपालय, औशनस.

अयास्य गोत्रातील भेद.—अयास्य, कौमंड, दीर्घतमस, कारेणुपालय, वामदेव, औशनस, श्रोणिवेध, मूढरथ, सत्यकि, वैदेह, कौमारवत्य, तौंदर्भि, दैवकि, सात्यमुग्रि,

कौवाद्य, वौभ्य, नौरि. स्वस्तैपर्नी, कीलालपी. कारुणप, कटारिय, काशिवाज, साक्षिकपार्थिव.

धा र द्वं त गा त्रा ती ल भे द —अभिजित्, रोहिण्य,क्षीरकरंभ, सौमुचि, सौयामुन, औपबिंदव, रहूगण, गणप, भापण्र, क्षौलेय, नैकारि, करभोगिण्य, सैंधव, गालव, सांगर, सौमिनि, पौष्पिंडव, भावल, काडव, कारांड. काशवरि, मार्घर्य, इघव, रोहितायन, अंगारक, कौलायन, कार्तौष्णि, अरुणि, पार्थिव, मौलायन, स्काद, सराव, कौटिल्य, व समूलि, वासपुष्ण, वासस्तेवि,वासधूपि, राचाक्षि, क्षय, वारणय, व रेलि, उतथ्य, योपयोनग, सुगामाक्षि, क्षीरपाष्ठकि, राढकर्णि, सौपुष्य, स मलमकि, पौष्करमिति,भागत्र चंडालक, सुतप, सुरैपिण, रौहिणायनि, मौष्टायनि,अरुणायनि, सौदमनि, कासोप, वौशल्य, रौहिणेय, काराधनि, मूलप, वासव, पुष्पवत, गावक, रेचय, औपमन्य, ष्टैटिक, शौनरि, शौलापि, रूरिक, नैषधि, सोदेय, वारवोट.

कौ मं ड गो त्रा ती ल भे द.—कौमंड, मामंथरेपण, मासुराक्ष, काष्ठरेखय, आमायन, बाजायन, काक्षीवत, औशिज, मासुरेखय, वाशि.

का रे णु पा ल या ती ल भे द.— कारेणुपालय, वास्तव्य, श्वेताय, पौष्णिष्ठ, औदनायन, माधुक्षार, अजगंध.

औ श न स गो त्रा ती ल भे द. —औशानस, दिश्य, प्रशस्त, सरूपाक्ष, महोदर, विकृत, हुच्युय, निहत, गुह.

भारद्वाजांगिरसापैकीं.—भारद्वाज, कपि, गर्ग रैक्षायण.

भा र द्वा ज गो त्रा ती ल भे द.—भारद्वाज,क्षाम्यायण,मंगड देवाश्व, इद्धहव्य, प्रावंशि, बाहस्पंडन, बाहीक, वासीतायन, तैदेह, आरु, औक्ष, श्रुरि, पारिष्क्षेय, वेशावेय, शैहि, करूढ, खारभीवि, औपसयोति, अमिवेश्य, शव, गौरिवायन, खेलक, स्तनकर्ण, ऋक्ष, माणमिंद्र, वद्वोदक, सौज्वलाप, वैल, खौरड, देवयोनि, मरुदेय, भद्रादय, सारंभर, शुंग, देवमाय, इपत्तम, औदमेधि, प्रावाहणेय,कल्माष, राजस्तव,सधोपकृति,पराहराय,बलभाकि.रद्रामपथि,शालद्विल, वेदचेल,नृत्यायन,नृत्य, शात्नालय, शाईलि, काक्षले, बाष्कल, सैत्यकय,कौंडायन, कौण्डिन्य, कदरस्तंभ, राजस्तंभ, असिस्तंभ, वायुस्तंभ, सूर्यस्तंभ, सोमस्तंभ, विष्णुस्तंभ, यमस्तंभ, इंद्रस्तंभ, आपस्तंभ, आरण, सिभव, कौमुदगंधि, शिखायन, माम्यायण, मामाण्य, कुक्ष, कौवाक्षय, तैदुंदय, दार्भि, शामेय, मत्स्यकाघ, वारणायन, कारणपथि, कारिपाय, कावत्य, सौहय, वालिशायन, साराहि, विविपि, शिलामालि, पैल, शालंकायन, जैम्हलायनि, साष्टकि, लापायनि, आपततवि. धौताचकि, त्रियद्रोणि, बाह्वगाषित्र, सम्यकय, स्वारग्रीवि, वाजपृष्ट, प्रवाहि, दशदीवि, स्तूणकर्णि, काचि, देवारि, हारिकर्णि, सपौलि. सौगेय, मालोदर, खगललायन, सौविष्ट, हालोदर, सारयमुग्रि, लेखायन, वरुणायन, चेल, रक्ष, किकायन, वालखश, गौरिव, सौपथ, सौभर, सौगुंदि, पौरुलिक, विकिर, कपिय, माधाइल, भौपय, अपिन, निशागवध, माधुकवर्य, शैलेय, काडण्य, औवेय, मैथुनमति, कोरलेनय, खारणादय, देवस्थानि, शालुद्व, गंगर्गिलि, गंगोदय, अधिकारपीवि, अपर्वाकि, मापायण, शाक, काज, मौविश्व, कमुकायन, सिंधव, सा त्रय, वाहय, सामस्तेवि, सोमस्तंवि, ब्रह्मस्तंवि, आश्वलायन, मार्कंडेय, कक्ष, सौगय.

क पि गो त्रा ती ल भे द. —कपि, स्वस्तितरव, बिंदुब, दंडि, दिक्नशाकि, पतंजलि, भूयसिन्, स्तैरेवय, वैतकि, ऊर्ध्व, राजकेशिन्, कलसिन्, कण्व, करांतप, वान्यायन, आमावास्यायन, कात्यायन, कोतर, स्वेदतर, जलसिंचिय, कुसीदरि, सौजटि, सामवि, सलि, क्षण्य, सावस्थायनि.

ग र्ग गो त्रा ती ल भे द —गर्ग, सामरायण, सखीनय, माधरायण, बाहुलि, आकृत, आग्नधूत, आग्रावद, कौष्ठकि, सौयामुन, आंजनाक्षि, होत्रापचि, सत्यापचि, वात्स्यतरायन, सामाद, वरसचतुरायण, काण्वायन, ग त्रायन, कानायन, वैवलायन, वौडायन, भारमन, पैशग, पैलवकायन, विश्वायवकायन, कालिन, मधुरावह, सापरिवार, वालाकि,शालायनि, साहनि, मायराचर, ऐंद्रालय,

लोपक्षत, वाम्मायन, शारायण, श्यामायन,रामिण,मागिन, कारिण, आस्मिन,

कौडिन, राचारत, भूलदिद, औपमर्कट, कार्पायन,कौजपि शालकायन, कोलास्य, इाम.

रै क्ष य ण गो त्रा ती ल भे द.—रैक्षायण, कापिल,शबल, शिकिल, विंडिंडि, वौयुम, आमानन्द, कर्ण, सुत

केवलांगिरसापैकीं:—हरित, कण्व, रथीतर, विष्णुवृध्द, मुद्ग.

ह रि त गो त्रा ती ल भे द—हरित, शमदार्भि, सौभ, माद, नैयगव, मतायव, वालोदर, महोदर, मिश्रोदक, मैमिथि, कौतप, कपीवय, वालय, पौलय, पौटलय, पौटल, वत्स, आघातव, माडकारि, खाडायन, माडमालि, मदंरणि, मत्स्यमालि, गणगारि, मद्रगारि, कुरस, हंस, हरितवायस, पैगल, पिंग, पालशिन्, दादल, हारितन, कौमारहरित, इल

क ण्व गो त्रा ती ल भे द—कण्व, औपमंदेटायन, बाष्कल पैल, हस्तिन, मौनिभाजि, मौनिमध, वीजिवाजि, बाजश्रवाश्व भाईड, भरंड, रमणी, सन, मर्कट, गर्दभ, प्राकासर, शाकटायन, शानायन, रामायण, शौवेरिण, नारीण, श्यामायनि.

र थी त र गो त्रा ती ल भे द.—रथीतर, हारितद, सिकाष्ठयन, नैतिराक्षि, मैत्रय, निलीमायन, सावहव. भैक्षवाह, हैमगव, वैरूप्य, विरूप, अष्टद्द, अष्टादंष्ट्र, पृषदश्व.

वि ष्णु वृ द्ध गो त्रा ती ल भे द.—विष्णुवृद्ध, शट,मपण मन्दण, भद्रण, भद्रय, बादरायण, सात्यकि, वात्सप्रायण, सात्यवायन, नितुंदिन, रहुल्य भारण्य, देहोद, देवस्थानि क्षत्रिण, छत्रिण, होत्रिण, पुत्रिण, जतृण, बश्रिण, कर्तृण, शावरायण, औपमाति, औपगवि, पुरामित्, वत्सावन, सावनार्य, प्यावायनि, कलमायनि.

मुद्गल गोत्रातील भेद.—मुद्गल, सात्यमुग्रि, हिरण्यस्तंभ, हंसजिह्व, देवजिह्व, आलवाल, बिडाल, अन्या मुनि, छत्रहय, तारण, कार्मभासित, हिरण्याक्ष, दीर्घमंथ, हिरण्यगर्भ, मिदि

**गोत्राचा वेदाध्ययनाशीं संबंध**.—हा कुलविन्यास निरनिराळ्या गोत्रांचे जे लोक झाले ते कोणी होते, कोणा उद्गाते वगैरे हेत. आणि त्याचा अत्यंत प्राचीनाशीं संबंध लावावयाचा झाल्यास तो मत्रर्षीमार्फत लावावा लागला. अशा प्रकारच्या परिस्थितीमध्यें बराच काळ गेल्यानंतर गोत्रास काहींतरी कारणामुळें सहेतुकता उत्पन्न झाली. स्थानिक लोकांत देवकासारखें समुच्चय होते ते आपसांत लग्नें करीत नव्हते आणि मांत्रसंस्कृतीच्या लोकांत अगदीं जवळ लग्न करणें ही गोष्ट प्रिय नव्हती व सात पिढ्यांचा हिशोब ठेवणें शक्य नव्हतें, तर आपण गोत टाकावें म्हणजे आपण बऱ्याच पिढ्या टाकल्या असें होईल अशी तऱ्हेची कल्पना उत्पन्न होणें स्वाभाविक आहे वाटेल त्या ऋषीचें वरण करण्याचें सामर्थ्य जसजसें कमी होत गेलें असेल तसतसे प्रवरहि अर्थात वंशपरंपरागत बनले. कित्येकांत असेंहि झालें असेल कीं, गोत्रें ज्या वेळीं नवीनच असतील त्यावेळेस सात पिढ्या टाकावयाच्या व तेव्हाच सातांची भरती करण्याकरितां प्रवर घ्यावेत ही कल्पना रूढ झाली असेल प्रवरच लग्नव्यवहारात वगळले म्हणजे सात पिढ्या वगळल्यासारखें खात्रीनें होईल असें प्राचीनकाळीं लोकांस वाटू लागून गोत्राबरोबर प्रवरहि वगळण्याची चाल प्रचारांत आली असेल असें वाटतें.

ब्राह्मण्याच्या इतिहासांत ऋग्वेदी व यजुर्वेदी असें जे वर्गीकरण झालें तें कार्यभिन्नत्वामुळें झालें पण पुढे शाखा व सूत्रें जीं निघालीं तीं पक्षभेदरूपी चळवळीमुळें निघालीं त्या चळवळीचा साग्र इतिहास येथें देण्यास अवकाश नाहीं. पण त्या चळवळीचें स्वरूप मात्र आपणास ब्राह्मणग्रंथांतून जागोजाग दिसतें तें उदाहरणासाठीं येथें देतों

**ब्राह्मणग्रंथकालीन पक्षोत्पादक चळवळी**.—ब्राह्मणग्रंथरचनाकाळीं कर्मांची मांडणी अधिकाधिक निश्चित होत होती पण या बाबतींत निश्चय होण्यापूर्वी अनेक तटेबखेडे झाल्याशिवाय निश्चय झाला नाहीं. आजच्या आपल्या दृष्टीस या तंटेबखेड्यांची कारणें अतिशय क्षुद्र अशीं भासतात. पण प्राचीनांना तीं तशीं भासत होतीं किंवा नव्हतीं हें निश्चयानें सांगता येत नाहीं. आपला संप्रदाय किंवा यज्ञ करण्याची रीत किंवा त्यांतील अगदीं बारीकसारीक भाग हा इतरांपेक्षा शास्त्रोक्त ठरविणें आणि दुसऱ्याचा निषेध करणें हो पद्धति त्यावेळच्या भिक्षुकीच्या धंद्यांत स्वतःच्या उत्कर्षासाठीं व परावी लागत असेल यात शंका नाहीं.

**ऐतरेय ब्राह्मणानें स्वमतस्थापनार्थ केलेली खटपट**.—तत्कालीन स्पर्धेच्या स्पष्टीकरणासाठीं प्रथमतः यज्ञविषयक आपला संप्रदाय वाढविण्यासाठीं दुसऱ्या संप्रदायाच्या केलेल्या निषेधाचीं उदाहरणें जीं आपणास ऐतरेय ब्राह्मणांत दिसतात तीं प्रथमतः घेऊं

**मंत्र कोणते म्हणावे याविषयीं स्वमतस्थापन**.—सोमयागांतील दीक्षणीयेष्टीमध्यें 'आज्यभाग' नामक आहुती देतांना होतानें ज्या पुरोनुवाक्या म्हणावयाच्या त्या यज्ञ करणारा यजमान सोमयाग प्रथमच करीत असेल तर 'त्वमग्ने सप्रथा' 'सोम यास्ते' या म्हणाव्या व यज्ञ करणारा दुसऱ्यांदा सोमयाग करीत असेल तर 'अग्नि प्रत्नेन, सोम गीर्भि' या म्हणाव्या, अशी जुनी पद्धत परंतु वरील दोन्हीहि प्रकार रद्द करून 'अग्निर्वृत्राणि, त्वं सोमासि' या म्हणाव्या असें ऐ. ब्रा. कार म्हणतात (१.४).

अग्निष्टोमामध्यें मरुत्वतीय शस्त्रांतील तीन धाय्या पठण करतांना तिसरी 'तान्वो महो' ही म्हणावयाचा पूर्वं परिपाठ असलेला बंद होऊन 'पिन्वत्यपो' ही धाय्या पठण करण्याचा नवा प्रघात सुरू झाला (३.१८)

**अनुयाजांच्या महत्त्वाची स्थापना**.—प्रायणीया नामक इष्टीमध्यें (प्रधान यागापूर्वी व नंतर) करावयाच्या प्रयाज व अनुयाज नामक यागांपैकीं फक्त प्रयाज यागच करावे अशा चालीचा (प्रयाज व अनुयाज हे यजमानाचे प्राण व प्रजा असल्यामुळें अनुयाज याग न केल्यास संततिनाश होईल यासाठीं) निषेध करून ऐ. ब्रा कारांनीं अनुयाजाचा स्थापना कायम केली (१ ११)

**पशुधर्मासंबंधीची अडचण काढून टाकण्याची खटपट**.—अग्नीषोमीय पशु अग्नि व सोम या दोन देवतासंबंधीं असल्यामुळें पांढरा व काळा असा दोन रंगी असावा अशा पूर्वपद्धतीचा निषेध ऐ ब्रा. कार दर्शवितात (२ ३)

**यजमानास पशुइडाभक्षण न देण्याची योजना**.—अग्नीषोमीय पशूमधील इडा यजमानानें भक्षण करूं नये 'कारण यजमानो वै पशु' असें श्रुतिवाक्य असल्यामुळें यजमानानें पशुइडा खाणें म्हणजे स्वतःच्या मांसाचें भक्षण होईल. या पूर्वपक्षाचा निषेध करून यजमानानें पशुइडा अवश्य भक्षावी अशा मताचा स्वीकार (ऐ ब्रा. २ ३)

**होते व सामक यांतील स्पर्धा व काव्याचें गाण्यापेक्षां महत्त्व कमी होऊं नये म्हणून होत्यांची खटपट**.—'बहिष्पवमान' नामक साम पठण करण्यास सामकाच्या बरोबर होत्यानेंहि उत्तरवेदीजवळ बसावें, अशा एका मताचा, सामकाच्या मागें होता गेला असता ऋच्या सामानुगामी होतील म्हणून, निषेध (ऐ. ब्रा २ २२)

**पुरोडाश किती कपालांवर भाजावेत**.—यज्ञांतील मुख्येच्या दिवशीं सवनीय पुरोडाश भाजावयाचे ते प्रातःकालीन सवनांत आठ कपालांवर, माध्यंदिनसवनांत अकरा कपालांवर व तृतीयसवनांत बारा कपालांवर भाजावे असें प्राचीन मत परंतु त्यांना निषेध व सर्वच अकरा कपालांवर भाजावे या मताचा स्थापना

**पुरोडाश तुपासहित भक्षण करावे.**—तुपाचें वज्र करून इंद्रानें वृत्राला मारलें यासाठीं तूपरहित पुरोडाश भक्षावें, या मताचा निषेध व तुपासहित भक्षावे या मताची स्थापना ( ३. २३ ).

**होत्यांत शाब्दिक ठाकठिकीसाठीं खटपट**—'ऐंद्रवायव' नामक पात्रांतील सोमरसाची आहुति देतांना अनुष्टुप छंदातील पुरोनुवाक्या व गायत्री छंदात्मक याज्या म्हणावी अशा एका मताचा ( ज्यास्त अक्षराच्या छंदातील पुरोनुवाक्या व कमी अक्षराच्या छंदाची याज्या होते म्हणून ) निषेध दर्शविला आहे ( २. २६ )

**होते व सामक यांतील स्पर्धा.**— यज्ञातील सुत्येच्या दिवशीं सौम्य नामक चरूच्या आहुती दिल्यानंतर तो चरु ( अवलोकनार्थ ) प्रथम सामकाना देण्याच्या पद्धतीचा निषेध व ( होताच प्रथम सोम भक्षण करणारा असल्यामुळे ) होत्यास प्रथम देण्याचा नवा परिपाठ स्थापन झाला ( ३.३२ )

**ऋग्वेदांतील पाठभेदाविषयीं आग्रह.**—*आतेपितः ( ऋ २. ३३, १ ) या ऋग्वेदातील ऋचेच्या दुसऱ्या अर्धाच्या आरंभीं असलेल्या 'अभि नो' या पदाचा निषेध करून तेथें 'त्वं नो' या पदाचा पाठ करावा* असा आग्रह (३. ३४ ).

**विशिष्ट देवतेचें महत्त्व कमीजास्त करण्याची खटपट.**—सुत्येच्या दिवशीं आग्निमारुत नामक शस्त्रांत अहिर्बुध्न्य देवतेसंबंधीं शंसनानंतर 'राका' देवतेसंबंधी प्रथम शंसन करून नंतर देवपत्न्यासंबंधीं करण्याच्या पद्धतीचा निषेध व अहिर्बुध्न्य देवतेनंतर प्रथम देवपत्नी आणि नंतर राका देवतेसंबंधीं शंसनाचा परिपाठ ( ३.३७ ).

**छंद व सूक्तें विशिष्ट काढून टाकण्याची खटपट.**—अतिरात्र क्रतूमध्यें आश्विन शस्त्र पठण करताना ( प्रातरनुवाकाप्रमाणें ) अग्नि, उषा व आश्विन या देवतासंबंधीं सूक्तें पठण केल्यावर सूर्यदेवतासंबंधींहि सात छंदात्मक सूक्तें पठण करावीं अशा एका पक्षाचा निषेध व सूर्यदेवतेसंबंधीं चारच सूक्तें व तीं कोणत्याहि छंदातील म्हणण्याचा परिपाठ. ( ४. १० )

**अग्निहोत्र विधुरावस्थेंत चालवावें काय.**—अग्निहोत्र्याची बायको मेली असतां त्यानें अग्निहोत्र पुढें चालवूं नये असा एक पक्ष व बायको मेली असतां एकटयानेंच अग्निहोत्र चालवावें असा दुसरा पक्ष. याला कारण.—संतति उत्पन्न करणारा, यजन करणारा व ब्रह्मचारी असणारा हे पितराच्या ऋणातून मुक्त झालेले असतात. म्हणून बायको नसली तरी पितराच्या ऋणातून मुक्त होण्यासाठीं अग्निहोत्र चालू ठेवावें इतकेंच नव्हे तर सोमयाग व सौत्रामणीयाग सुद्धां करावा ( ऐ. ब्रा. ७ ९).

**क्षत्रियांना सोमपानबंदी.**—विश्वंतर नामक राजानें श्यापर्ण नामक ब्राह्मणांना आमंत्रण न करितां यज्ञ आरंभिला. श्यापर्ण ब्राह्मणांना हें कळतांच आमंत्रणावांचून ते यज्ञास आले व यज्ञिय वेदींत बसले. त्यांना पाहतांच 'माझी अवज्ञा करणाऱ्या या ब्राह्मणांना उठवून लाव' असें त्या राजानें दूतास सांगितलें. तेव्हां "पूर्वी जनमेजयानें असाच कश्यपवंशज ब्राह्मणांना वगळून यज्ञ केला असतां कश्यपवंशज असितमृग ब्राह्मणांनी त्या यज्ञामध्यें येऊन तेथें अनुष्ठान करीत असलेल्या भूतवीर नामक ब्राह्मणाचा पराजय करून यज्ञातील आर्त्विज्य आपणाकडे घेतलें. तर आपणा श्यापर्ण ब्राह्मणांत असा कोणी श्रेष्ठ वीर आहे काय?" असें ते मोठ्यानें बोलले. त्यावेळीं त्यांच्यापैकीं मार्गवेय राम हा उभा राहिला व मी तसा वीर आहे असें म्हणून पुढें तो विश्वंतरास म्हणाला कीं आम्ही यज्ञानुष्ठान जाणणारे ब्राह्मण असतांना तूं आम्हांस कसा उठवून लावतोस? राजानें 'तूं कसा अनुष्ठानज्ञ आहेस' असें विचारलें असतां राम सांगतो.—इंद्रानें पांच प्रकारचे अपराध केल्यामुळें त्याला कोणी सोम अर्पण करीनात. व तेव्हांपासून सर्व क्षत्रियजातीनें सोमपान वर्जिलें. नंतर इंद्रानें मात्र स्वसामर्थ्यानें त्वष्टयाच्या घरीं सोमपान केलें. इतर क्षत्रियामध्यें इंद्राप्रमाणें सामर्थ्य नसल्यामुळें सोमपान त्यांना श्रेयस्कर नाहीं; व क्षत्रियांना सोमाच्या ऐवजीं जे पदार्थ सेवन करावयाचे ते आम्हांस माहीत असतां तूं यज्ञांतून कसा घालवून देतोस? नंतर ते क्षत्रियांनीं सेवन करावयाचे पदार्थ तुला माहीत आहेत काय असें विचारल्यावरून राम सांगतो. यज्ञानुष्ठान न जाणणारे असे कांहीं ऋत्विज क्षत्रियांना सोमभक्षण करण्यास सांगतात पण त्यामुळें त्यांचें क्षत्रियत्व नाहींसें होऊन प्रतिग्रह, याजन, याचकवृत्ति हे गुण त्यांच्या अंगीं जडतात. तसेंच कोणी क्षत्रियांना दधिभक्षण करावयास सांगतात त्यामुळें त्यांच्या अंगीं वैश्यगुण शिरतात; कोणी उदक भक्षण करण्यास सांगतात त्यामुळें त्या क्षत्रिय राजाच्या अंगीं अत्यंत हीन असे शूद्राचे गुण वास करूं लागतात. यासाठीं क्षत्रियांना सोम, दहि, अथवा उदक हे भक्ष श्रेयस्कर नाहींत. क्षत्रियांना वडाच्या खांद्याच्या पासून फुटणाऱ्या पारंब्यांचीं अग्रें, व उंबर, पिंपळ आणि पिंपरणी या वृक्षांचीं फळें यांचा कुटून काढलेला रस हा भक्ष अत्यंत श्रेयस्कर आहे असें रामानें राजास सांगितलें. नंतर हा भक्षच क्षत्रियांना श्रेयस्कर असल्याचें निरनिराळ्या ऋषींनीं निरनिराळ्या राजांना सांगितलें ( ऐ. ब्रा. ७. २९ ).

**ऋत्विजाचा दासीपुत्र म्हणून त्याग व विशेष करामत दाखविल्यावर स्वीकार.**—ऋषींनीं आरंभिलेल्या सत्रात आर्त्विज्य मिळविण्यासाठीं कवष नामक ऋषि त्या ठिकाणीं येऊन बसला असतां 'हा जुगार खेळणारा व दासीपुत्रासारखा ब्राह्मण आमच्या सोमयागामध्यें आर्त्विज्यास योग्य नाहीं' असें म्हणून त्या ऋषींनीं कवषाला जेथें उदक नाहीं अशा ठिकाणीं घालवून दिलें. नंतर त्या पाणी नसलेल्या ठिकाणीं तहान लागल्यामुळें कवषानें सरस्वती नदीची स्तुति केली असतां सत्र करणाऱ्या ऋषींस

सन्निध वहात असलेली सरस्वती नदीच कवषाकडे आली. ही गोष्ट सत्रांतील ऋषींनी समक्षतांच कवषावर देवांची अत्यंत प्रीति आहे असें जाणून त्यांनीं कवषाचे सर्व दोष माफ करून त्याला आपल्यामध्यें घेतलें( ऐ. ब्रा. २. १९ ).

**ऋत्विजांना अग्नीषोमीय पशूचें मांस [इडा]भक्षण्यास मोकळीक.**—यज्ञांतील अग्नीषोमीय नामक पशूचें मांस (इडा) ऋत्विजांनीं भक्षण करू नये कारण यजमानानें आत्मस्वरूप असा तो अग्नीषोमीय पशु देवतांना अर्पण केला असल्यामुळें त्या पशूचे मांस भक्षण केलें असतां यजमानाचें मांस भक्षण केल्यासारखें होईल असा एक पक्ष. परंतु 'इंद्रानें अग्नि आणि सोम यांच्यासाठीं वृत्राला मारल्यावर अग्नि आणि सोम या देवतांनीं 'यज्ञांतील सोमाभिषवाच्या पूर्वदिवशीं आमच्या नांवानें ( अग्नि आणि सोम अग्नीषोम)देवतांना पशु अर्पण केला जावा' असा वर मागून घेतला असल्यामुळें अग्नीषोमीय पशु व यजमान यांचा संबंध रहात नाहीं. यासाठीं अग्नीषोमीय पशूचें मांस भक्षण करावें असा दुसरा पक्ष [२.४].

**शांखायनी खटपट.**—यज्ञविषयक आपला संप्रदाय वाढविण्यासाठीं दुसऱ्या संप्रदायाचा निषेध केल्याचीं शांखायन ब्राह्मणांतील उदाहरणें आपण विचारांत घेऊं

दर्शपूर्णमास यागात होत्याच्या प्रयाजयागामध्यें ' देवा आज्यपाजुषाणा अग्न आज्यस्य व्यंतु ' या पाठाचा निषेध व ' देवा आज्यपा जुषाणा अग्नआज्यस्य हविषो व्यंतु ' असा पाठ ( ३. ४).

' सूक्तवाक ' नामक यागामध्यें ( पूर्वी ज्या देवतांना आव्हान केलें असेल त्या देवतांना उद्देशून ) 'अग्निरिदं हविरजुषत' 'सोम इदं हविरजुषत' असा मंत्र म्हणावयाच्या असलेल्या परिपाठाचा निषेध व त्या जागीं नुसतें 'हविरजुषत' असें म्हणावयाचा पाठ ( ४.८).

चातुर्मास्य यागात वैश्वदेवपर्वामध्यें क्षत्रियांना वाजिन यागाचा निषेध ( ५. १).

अग्निष्टोमामध्यें सुत्येच्या दिवशीं प्रउग नामक शस्त्र पठण करतांना त्यांतील सरस्वती देवतेसंबंधीं पुरोरुक् नामक मंत्र पठणाचा निषेध.

या तऱ्हेचे अनेक आग्रह शांखायन ब्राह्मणांत दाखवितां येतील.

यज्ञिय कर्मासंबंधीं शतपथ व तैत्तिरीय यांतील
परस्परनिषेध व विरोध

( १ ) अग्न्याधानासंबंधीं नक्षत्र उक्त कोणतें तें ठरविणे- शतपथात पूर्वाफाल्गुनी घ्यावें असें मत ( १.२,११ ) आहे. व तैत्तिरीयात पूर्वाफाल्गुनीचा निषेध व कामनापरत्वें ग्रहण ( १.१, २).

( २ ) अग्न्याधानासंबंधीं मंथनाचा काल यासंबंधीं. अग्निमंथन रात्रीं करावें व गार्हपत्याधान पहाटे करून सूर्योदयकाळीं आहवनीयाचें आधान करावें असें तैत्तिरीय मत(१.१,४)व अग्निमंथन रात्रीं न करतां दिवसा (सूर्योदयीं) करावें असें शतपथ(१. ४, ८) मत.

( ३ ) चातुर्मास्य यागांत पितृयज्ञाच्या दिवशीं गार्हपत्याच्या दक्षिणेस बसून प्राचीनावीती करून हविर्निर्वाप करावा असें शतपथ मत ( ५ २,८ )व वरील मताचा निषेध करून उत्तरेस बसून व उपवीती करून निर्वाप करावा असें तैत्तिरीय मत (१. ६,८ ).

आपला यज्ञविषयक सांप्रदाय वाढविण्यासाठीं
दुसऱ्या सांप्रदायाचा केलेला निषेध

तैत्तिरीय संहिता.

होत्याच्या स्रुगासादनसंज्ञक मंत्रामध्यें यजमानदेवता या अक्षराच्या पुढें 'यो अग्नि होतारमवृथाः' हीं अक्षरें म्हणण्याची अन्यशाखेत पद्धति होती. तै. संहितेंत त्याचा निषेध करून 'योऽग्निं होतारमवृथाः' हीं अक्षरें म्हणणाऱ्या होत्याचा यजमान दोन्ही बाजूंनीं अग्नीकडून घेरला जातो असें म्हटलें आहे (तै. सं २ ५,९).

होत्याच्या सूक्तवाकसंज्ञक मंत्रसंघाचा आरंभ एका शाखेमध्यें 'उद्यावपृथिवी' असा होता त्याचा निषेध करून 'इदंद्यावापृथिवी' असा पाठ सुरू केला (तै. सं २ ६,९ )

सूक्तवाक मंत्रामध्यें एका ठिकाणीं 'सूपायनानाच स्वध्यवसानाच'असा एक शाखेचा पाठ होता हा पाठ उपयोगात आणल्यास यजमान मरेल अशाप्रकारें निषेध करून 'सूपचरणाच स्वधि चरणाच' अशा प्रकारचा नवा पाठ रूढ केला. ( तै. सं. २.६,९)

दीक्षाहुति देतांना एका मंत्रामध्यें 'हविषा विधेः' असा एका शाखेचा पाठ होता त्याचा निषेध करून हविषा वृधातु हा पाठ रूढ केला (तै. सं. ६.१,२).

प्रायणीयेष्टीमध्यें प्रयाज याग करावयाचे व अनुयाज करावयाचे नाहींत व उदयनीयेष्टींत प्रयाज न करता फक्त अनुयाज करावयाचे असा एक प्रचार होता त्याचा निषेध करून प्रायणीया व उदयनीया या दोन्हीहि इष्टींमध्यें प्रयाज व अनुयाज हे दोन्ही करावयाचे असा प्रचार सुरु झाला. (तै सं. ६.१,५).

अग्नीषोमीय पशूचें हविःशेष मांस भक्षण करूं नये अशी पद्धति होती ती मोडून भक्षण करण्याची पद्धति रूढ केली.

तैत्तिरीय ब्राह्मण

मनूची मुलगी ' इडा ' हिनें अग्न्याधानात अग्निस्थापनाच्या क्रमात नवा प्रचार सुरु केला आहवनीय, गार्हपत्य आणि नंतर दक्षिणाग्नि असा असुरांचा क्रम होता दक्षिणाग्नि गार्हपत्य व नंतर आहवनीय असा देवांचा अग्निस्थापनेचा क्रम होता. इडेनें या दोन्ही क्रमांचा निषेध करून आ-

पत्न्या वापाच्या अग्न्याधानांत गार्हपत्य, दक्षिणाग्नि व नंतर आहवनीय असा सवाच अग्निस्थापनक्रम सुरू केला व हाच क्रम सांप्रत सर्वत्र चालू आहे ( तै. ब्रा. १ १,४ ).

आहवनीय अग्नीचें आधान (स्थापन) करावयाच्या पूर्वी तो अग्नि 'शतदोग्ध्यानशे' या मंत्रानें तीन वेळ खालून वर असा चाळवून नंतर त्या अग्नीची स्थापना करण्याची पूर्वी चाल असावी. तैत्तिरीय ब्राम्हण म्हणतें कीं तसें करूं नये (१. १,८) तर एकदाच हातानें उचलून घ्यावा व त्याची स्थापना करावी.

सत्रामध्ये विषुवान् नांवाचा जो मध्यम दिवस असतो त्याच्या पूर्वीचे ३ व पुढचे ३ असे सहा दिवस अग्निष्टोमाचें अनुष्ठान करण्याची एक पद्धति प्रचारांत होती. तिचा निषेध करून तै. ब्रा. १.२,२ म्हणते कीं पूर्वोक्त सहाहि दिवस उक्थ्य नामक क्रतूचेंच अनुष्ठान करावें.

चातुर्मास्य यागामध्यें पितृयज्ञाच्या दिवशीं गार्हपत्या-च्या दक्षिणेस बसून पितृदेवताच्यासाठीं निर्वाप करण्याची पूर्वी पद्धति होती. कां कीं, दक्षिणदिशा ही पितरांची दिशा म्हणून समजली जाते. परंतु तै. ब्रा (१.६,८) म्हणतें कीं तसें करूं नये. उत्तरेसच बसून निर्वाप करावा. कारण पितृयज्ञा-मध्यें केवळ पितृदेवतांचेंच कांहीं यजन नाहीं. देव व पितर या दोघांचेंहि आहे. पार झालें तर पितरांच्यासाठीं पुरोडाश भाजतांना अग्नीवर दक्षिण बाजूस भाजावा म्हणजे झालें. या बाबतींत शतपथाचा तैत्तिरीयाशीं विरोध (५.२,८.९) आहे.

अग्निहोत्रहोमामध्ये अवदानार्थ चार स्रुवे स्रुचीमध्ये भरून घेतल्यावर गार्हपत्याजवळ ती स्रुची एकदा खालीं ठेवावयाची व मग तेथून पुढें होमासाठीं ती आहवनीयाकडे घेऊन जावयाची अशी पद्धति एका संप्रदायाची होती. तिचा निषेध करून तै. ब्रा. म्हणतें कीं अशा प्रकारें आहवनीयाग्नी-वर होम होण्यापूर्वी गार्हपत्याजवळ स्रुची खालीं ठेवूं नये. कां कीं त्यानें एकासाठीं घेतलेलें अन्न दुसऱ्याचें पुढें ठेवले-ल्यासारखें होतें (२. १,५).

अश्वमेधामध्यें अवभृताचे वेळीं मृत्यूला कारणभूत असल्यामुळें मृत्युरूपच अशा निरनिराळ्या व्याधींना त्याच्या कडून उत्सर्ग होऊं नये म्हणून आहुति देण्याचा परिपाठ होता परंतु तो मोडून मृत्युरूपी मुख्य एकाच व्याधीला आहुति देण्याचा परिपाठ चालू केला ( तै. ब्रा. ३ ९,१५ ).

दहि व दूध यांच्या मिश्रणास सान्नाय्य म्हणतात. सान्नाय्य द्रव्याचें अवदान घेतांना प्राधान्याच्या दृष्टीनें दहि हें आदल्या दिवशीं विरजलें असल्यामुळें तें प्रथम घेऊन नंतर दूध घेण्याची पद्धति होती पण ती मोडून दूध हें दह्याचें पूर्ण किंवा प्रथम स्वरूप असल्यानें आधीं दूध घेऊन नंतर दहि घ्यावें अशी पद्धति सुरू झाली (तै. सं. २.३,५).

शतपथ ब्राह्मण

पत्नीनें हविसाठीं तांदूळ कांडतांना मंत्र म्हणण्याची जी कोणाची पद्धत होती तिचा निषेध करून अमंत्रक तांदूळ कांडण्याचा प्रचार सुरू केला ( श. ब्रा. ८.१,४ ).

मेमार्गदर्भ अग्नीत जाळून टाकण्याचा पूर्वीचा प्रचार बंद करून संमार्गदर्भ कायम तसेच ( पात्रें वगैरे घासतांना उपयोगी पडण्यासाठीं ) उत्करावर ठेवण्याची पद्धति सुरू झाली (श ब्रा. २ ४,११ ). तैत्तिरीयांच्या मतें संमार्गदर्भ जाळणें हें जास्त महत्वाचें आहे ( तै. ब्रा. ३ ३, १ )

पत्नीनें आपल्या कमरेस योक्त्र बांधल्यावर त्याला गांठ घालण्याचा चाल होती तिचा निषेध करून नुसती टोकें वर खोचून देण्याचा प्रचार सुरू केला (श. ब्रा. २ ४-१६ ) तैत्तिरीयांचे मतें पत्नीनें योक्त्र कमरेस बांधल्यावर त्याच्या दोन्ही टोकांना गांठ दिली पाहिजे ( ३.३,३ )

अध्वर्यु व यजमान या दोघांनीं आज्यस्थालींत घेतलेलें आज्य अवलोकन करावयाचा प्राचीन प्रचार होता त्याचा निषेध करून एकट्या अध्वर्यूनेंच आज्य अवलोकन करावयाची पद्धत सुरू केली ( श. ब्रा. २.४,२६ ). तैत्तिरीय ब्राह्मणांत आज्यावलोकन विधीच नाहीं सूत्रांत आहे.

' अग्नयेसमिध्यमानाय होतरनुब्रूहि ' असा प्रैष होत्याला देण्याची एका शाखेंत चाल होती. ती बंद करून तिचा निषेध व ' अग्नयेसमिध्यमानायानुब्रूहि ' असा प्रैष देण्याची पद्धति सुरू केली ( श-ब्रा. ३.२,३ ). निषेध केलेली पद्धति तैत्तिरीयांची नसून-दुसऱ्या कोणाची तरी होती.

वेदीमध्यें उभे करून ठेवलेल्या बर्हीचें ( दर्भाचें ) प्रोक्षण करतांना शेंडा, मध्य व बुडखा या तीन ठिकाणीं प्रोक्षण करण्याचा विधि होता त्याचा निषेध करून फक्त बुडख्याचेंच प्रोक्षण करण्याचा प्रचार रूढ केला ( श. ब्रा. ३ ६,३,४ ).

इध्मा ज्या प्रकारच्या काष्ठाचा असेल त्या काष्ठाचेच ' परिधी ' असावेत असा पूर्वीचा नियम होता त्याचा निषेध करून भिन्न काष्ठाचे परिधी करण्याची पद्धति चालू केली. ( शत. प. ब्रा. २.६,१८). निषेधित चाल तैत्तिरीयाची होती. ( तै. ब्रा. ३. ३. २ ).

स्विष्टकृताची याज्या म्हणतेवेळीं होत्यानें ' अग्नेर-यार् ' ' सोमस्यायाट् ' असें म्हणण्याचा जो प्रचार होता त्याचा निषेध करून ' अग्नाउग्नेः ' ' अयाट् सोमस्य ' असें म्हणण्याचा प्रचार सुरू केला ( श. ब्रा. २ १,१२ ). ( तै. ब्रा. ३, ५, ७ ).

अध्वर्यूनें प्राशित्र संज्ञक पात्र ब्रह्म्याकडे घेऊन जातांना आहवनीयाच्या पूर्व बाजूनें ( दक्षिण बाजूस ) जावयानें अशी कोणा याज्ञिकाची पद्धति होती तिचा निषेध करून अध्वर्यूनें आपल्या जाग्यावरूनच लांब तिरका हात करून प्राशित्र ब्रह्म्याचे हातीं द्यावें असा पक्ष रूढ केला ( श. ब्रा. ६. २, १२ ). तैत्तिरीय उदासीन आहे ( तै. ब्रा. ३. ३, ९. )

सूक्तवाकामध्यें होत्यानें ' उभे च मे द्यावा-पृथिवी ' असें म्हणण्याचा एका शाखेमध्यें पाठ होता त्याचा

निषेध करून ' उभे वेनो द्यावा पृथिवी ' असें म्हणण्याचा पाठ रूढ केला ( श. ब्रा. ७ २. २१ ). तैत्तिरीयांमध्ये 'उभे वेनो द्यावा पृथिवी ' असा पाठ आहे (तै. ब्रा. ३.५ १०).

'पत्नीसंयाज' संज्ञक याग करण्यासाठी पश्चिमेस गार्हपत्याकडे जातांना ( १ ) आहवनीयाच्या पूर्वेस जाऊन नंतर दक्षिणच्या बाजूनें गार्हपत्याकडे यावयाचें ( २ ) पत्नीच्या पाठीमागून जावयाचें व तिच्या दक्षिणेस बसावयाचें ( ३ ) गार्हपत्याच्या उत्तरबाजूनें गार्हपत्य व पत्नी यांच्यामधून जाऊन दक्षिणेस बसावयाचें असे तीन प्रकारचे कोणाकोणाचे परिपाठ चालू होते. त्यांचा निषेध करून गार्हपत्य आहवनीय यांच्यामधून वेदीच्या नैर्ऋत्य कोणावरून पत्नीकडे जावें व्हावें नंतर पत्नीच्या पाठीमागून उत्तर बाजूस जावें असा परिपाठ सुरू झाला. ( श. ब्रा. . ३, २,३,४ ): तै. ब्रा. या बाबतीत उदासीन आहे ३. ३, १० ).

चयनामध्ये चितीखालीं पांच पशूंचीं मस्तकें पुरावयाचीं असतात आणि प्रत्येक मस्तकाच्या ठिकाणीं असणाऱ्या ( २कान, २ डोळे, २ नाकपुड्या व १ मुख या ) इंद्रियाच्या ठिकाणीं एक एक सोन्याचा रज किंवा तुकडा ठेवावयाचा असतो. दुसऱ्या शाखेमध्यें एकच पशूचें शिर पुरलें असलें तरी तें पांच शिरांचा प्रतिनिधि असल्यामुळें पांच शिरांच्याबद्दल प्रत्येकीं सात प्रमाणें पस्तीस सुवर्णाचे तुकडे एकाच पशूचे शिरावर ठेवावे असें एक मत चालू होतें त्याचा निषेध करून पांच शिरांचा प्रतिनिधी म्हणून जरी एकच शिर पुरलें असलें तरी सुद्धा फक्त सात सुवर्णाचे रज किंवा तुकडेच ठेवण्याचा प्रचार रूढ केला. ( श. ब्रा ८. २, १० ).

पशूचीं अंगें शिजवितांना मुख्य देवासंबंधीं ज्या अंगाचें हवन करावयाचें तीं निराळीं शिजवावीं व स्विष्टकृतासंबंधीं याग करावयाची अंगें निराळीं शिजवावीं असा एक पक्ष व सर्व एकच भांड्यांत शिजवावीं असा दुसरा पक्ष (१.३,६) याविषयीं कृष्ण यजुर्वेदांत कांहीं आढळत नाहीं

वाजपेय यज्ञांत करावयाच्या पशूंच्या उपाकरणांत ( देवतांना समर्पण ) वाग्देवत्य पशूचें उपाकरण शेवटीं करावें. असें एक मत व मध्येंच करावें असें दुसरें मत ( १.३,११ ) तैत्तिरीय ब्राह्मणाचे मत शतपथांतील पहिल्या मताप्रमाणें असल्याचें आढळतें ( तै ब्रा. १. ३, ४ ).

राजसूय यज्ञांत यजमानास अभिषेकानंतर वस्त्र परिधान केल्यावर यज्ञोपवीताप्रमाणें वस्त्र यजमानाच्या गळ्यांत माळेप्रमाणें लोंबणारें व शेवटें नाभीजवळ खोंवलीं आहे असें असावें असा एक पक्ष व तें वस्त्र गळ्यांत न घालतां कमरेस बांधून नाभीजवळ गांठ मारावी असा दुसरा पक्ष. (३.५,२४) तैत्तिरीय ब्राह्मणांत यजमानास एक वस्त्र नेसावयास (तुपांत भिजलेलें) व एक पांघरावयास (उष्णीष) दिल्याचें फक्त आढळतें. कमरेस बांधण्याविषयीं कांहींच उल्लेख नाहीं (तै. ब्रा १.७,६).

नवीन वस्त्रें परिधान केल्यावर दीक्षितानें पूर्वीची वस्त्रेंहि पुन्हा धारण करावीं असा एक पक्ष, व एकदां टाकलेलीं पुन्हां घेऊ नयेत असा दुसरा पक्ष. (३ ५,२५ )कृष्ण यजुर्वेदाशीं ह्या विरोध नाहीं.

निरनिराळ्या कर्मांचा प्रघात सुरू करण्याच ऐतिहासिक गोष्टींची जोड.

**प्रायणीयेष्टींत अदिति देवतेसंबंधी भात शिजविण्याचें कारण.**—यज्ञ देवांच्यावर रुसला असतां देव अदितीकडे गेले. अदितीनें यज्ञारंभीं मला हविर्भाग द्याल तर तुमचें कार्य होईल असें मागितलें ( ऐ. ब्रा. १.७ )

**यज्ञामध्यें ' उपसद् ' नामक इष्टि करण्याचें कारण.**—देवासुराच्या लोकत्रयसंबंधीं लढाईंत असुरांनी भूलोक, अंतरिक्षलोक व द्युलोक या तीन लोकांचे तीन किल्ले बनविले. देवांनीं असुरांना जिंकण्यासाठीं पृथ्वीवर ' सद ' नामक मंडप, अंतरिक्षांत ' आग्नीध्र ' नामक धिष्ण्य आणि द्युलोकांत हविर्धान, अशीं तीन स्थळें उत्पन्न केलीं, आणि त्या ठिकाणीं उपसद इष्टींचें अनुष्ठान करून असुरांचा पराभव केला ( ऐ. ब्रा. १-२३ )

**सोमवल्ली विकत घेतांना त्याच्या मोबदला गाय देण्याचें कारण**—गंधर्वांच्या जवळ असलेला सोम मिळविण्यासाठीं ' मला मोबदला देऊन सोम विकत घ्या ' असें वाग्देवता म्हणाली, व गाईचें रूप धारण करणाऱ्या वाग्देवतेला देऊन देवांनीं सोम विकत घेतला ( ऐ. ब्रा. १.-२५ ).

**यज्ञांतील पशु वधस्थानीं ( शामित्र शालेंत ) नेण्यापूर्वीं पशूच्या व यज्ञमंडपाच्या भोंवतीं तीन वेळ अग्नि फिरविण्याचें ( पर्यग्निकरण कर्म ) कारण.**—देवांच्या यज्ञाचा विध्वंस करण्यासाठीं ( पशु पळवून नेण्यासाठीं ) असुर यज्ञांतील यूपाजवळ आले असतां देवांनीं पशूसह सर्व मंडपाभोंवतीं अग्नीचीं तीन पुरें ( वेढे ) उत्पन्न केलीं. त्यामुळें असुर तेथून परत गेले ( ऐ. ब्रा. २.३ ).

**सोम कुटण्यासाठीं अध्वर्यु पाणी मागत असतां होत्यानें ' आपोनप्त्रीय ' मंत्र पठण करण्याचें कारण**—सत्रामध्यें बसलेल्या कवष ऋषीला ( तो दासीपुत्र व जुगारी आहे म्हणून ) उदकरहित अशा ठिकाणीं घालवून दिलें असतां तेथें त्यानें ' आपोनप्त्रीय ' मंत्र पठण करून उदक उत्पन्न केलें ( ऐ. ब्रा. २.१९ ).

**सोमयागांत प्रथम इंद्रवायु देवतांना सोम अर्पण करण्याचें कारण**—देवांमध्यें प्रथम कोणी सोम प्राशन करावा यबद्दल तंटा लागला असतां धावण्याची शर्यत जो जिंकील त्यानें प्रथम सोम प्यावा असें ठरवून प्रथम वायु व त्याच्या मागून इंद्र, मित्रावरुण, अश्विनीदेव हे पळूं लागले. सर्वांत पुढें असलेला वायु लवकरच शर्यत जिंकणार असें पाहून ' मी व तूं ' दोघांनीं शर्यत जिंकली असें आपण ठरवूं आणि दोघेंहि एकदम अर्धा अर्धा सोम पिऊं ' असें इंद्र वायूला म्हणाला. परंतु हें वायु कबूल

करीना. शेवटी इंद्र आपण एक भाग घेऊन तीन भाग वायूस देण्यास कबूल झाला व त्यांनीं मतैक्यानें आम्हीं शर्यत जिंकली असें जाहीर केलें ( ऐ. ब्रा. २. २५ )

**शस्त्रांच्या शंसनारंभीं ( प्रात सवनांत ) तूष्णींशंस नामक मंत्र पठणाचें कारण**—देव व असुर यांच्या युद्धांत देव ज्या ज्या शस्त्राचा उपयोग करीत त्या सर्वांचा असुर प्रतिकार करूं लागले परंतु तूष्णींशंस नामक वज्राचा त्यांना प्रतिकार करता आला नाहीं ( ऐ ब्रा. २. ३ )

ब्राह्मणग्रंथातील अनेक वाद आपणास शुष्क भासतील. वादाचें स्वरूप पाहिलें म्हणजे शुष्क गोष्टींवर ते होते यात शंका नाहीं. पण कारणें मात्र शुष्क नव्हतीं. कारण वैशम्य असणें, आणि तें लपविण्यासाठीं तत्त्वाची जोड होते. आपलें धंद्याचें स्वातंत्र्य स्थापन करणें, तें करण्यासाठीं विधींत फेरफार करणें आणि विधींतील त्या क्षुल्लक फेरफाराचें समर्थन करण्यासाठीं पांडित्य खर्च करणें इत्यादि क्रिया त्यात दिसून येतात. ब्राह्मणग्रंथकालापासून आजच्या याज्ञिकपद्धतीच्या किंवा ऋग्वेदी कोकणस्थानीं हिरण्यकेशीसूत्रपरिग्रह करावयाच्या भांडणापर्यंत इतिहास तत्वतः एकच आहे भिक्षुकीपासून प्राप्ती एका वर्गास व्हावी आणि ती दुसऱ्यापासून जावी हेंच मूळ कारण असतें.

श्रौतसंस्था वाढल्यानंतर जेव्हा स्थानिकाच्या देवताचें प्राधान्य अधिकाधिक होत गेलें तेव्हा शिवविष्णुसारखीं दैवतें संहितांतून कशीं शिरलीं हें मैत्रायणी संहितेंतील उताऱ्यानें स्पष्ट होईल. श्रौतसंस्था जेव्हा अधिकाधिक संकुचित होऊं लागल्या तेव्हा पौराणिक देवतासाठींच याग होऊं लागले याला विष्णुयागासारखीं स्मार्त यागाचीं उदाहरणें देता येतील. अशा रीतीनें मात्रसंस्कृतीचा पराजय व देश्याच्या दैवताची पुनः स्थापना झाली

**सोमयागांच्या वृद्धीचा व संकोचाचा काल.**—मात्रसंस्कृतींतील लोकांचा देश्यांशीं संपर्क होऊन मोठमोठे याग करण्याचा परिपाठ सुरू होऊन तो प्रकार पुन्हा बंद पडला. या क्रियेस किती काळ लागला असावा बरें ? आम्हांस अशी कल्पना होते कीं, ही सब चळवळ दोंदोनशें वर्षांतली असावी. दुसऱ्या पारिक्षित-जनमेजयाचा काळ म्हणजे श्रौत संस्थांचा शेवट असें धरलें तर एकंदर कालभाग येणेंप्रमाणें पडतील.

( १ ) दाशरथी रामचंद्राचा काळ—कुरुयुद्धापूर्वी सुमारें सहासातशें वर्षें. या काळीं ब्राह्मण नव्हते, यज्ञसंस्था विकसित नव्हती व ऋग्वेदमंत्राची रचना झाली नव्हती.

(२) दाशराज्ञ युद्धकाल—या कालांत श्रौतसंस्था तयार नव्हत्या, दैनिक अग्निहोत्रांत सोमाचा उपयोग होत असावा. आजच्या ऋग्मंत्रांपैकीं बहुतेकरून कोणतेंहि तयार नसावें, अर्का, गायत्री, ऋचा हे वर्ग असावेत, ब्राह्मण व ब्रह्मपुत्र या दोन्ही शब्दांचा उपयोग सुरू असावा, सामुच्चयिक आत्मपूजना मंत्रपुष्पासारखी असावी. हा काल दाशरथी रामचंद्रानंतर दोनशें वर्षांनीं असावा. या कालाच्या अंतिम भागात भरत हे कुरुक्षेत्रीं जाऊन पोंचले.

(३) दाशराज्ञ युद्धाताच्या कालापासून पुढील तीनशें वर्षे. या कालामध्यें होते, अध्वर्यु व ब्रह्मे यांच्या स्वतंत्र हवनपरंपरा तयार झाल्या असाव्या, ऋषींचा लोप होत चालला असावा. आणि हे तिन्ही वर्ग ब्रह्मन् वर्गांतून बहुधा निघाले असावेत.

(४) चवथा काल म्हणजे सोमसस्था तयार होण्याचा काल. या काळात निरनिराळ्या तीन संप्रदायांचे एकीकरण होऊं लागलें असावें आणि देश्यांच्या आठवणी, इतिहास व देवता यास श्रौतसंस्थात स्थान मिळूं लागलें असावें उदाहरणार्थ प्रजापतीची कल्पना, ही देखील मूळची सूतसंस्कृतींतील असून ती पुढें यज्ञसंस्थेंत शिरली या सुमारास ऋचा, सामें व यजुर्वाक्यें यांचें पृथक्करण होऊं लागलें असावें व तें पहिलें पृथक्करण होय.

(५) पाचवा काल म्हणजे सोमसंस्था विकासाचा काल या कालात ब्राम्हणें पद्धतशीर होऊन संहितीकरणहि जास्त पद्धतशीर झालें मात्र या वेळेस ऋग्वेदसंहिता आजच्या स्थितींत नव्हती. कुरुयुद्धाचा काल हाच असावा व व्यासाचा व संहितीकरणाचा संबंध याच कालातील असावा.

(६) यज्ञसंस्थेच्या अंतिम विकासाचा व शाखाभेदाचा व संकोचाचा काल. हा कुरुयुद्धानंतर शंभर दीडशें वर्षांतला असावा.

(७) सातवा काल म्हटला म्हणजे श्रौतभिक्षुकी संपुष्टात आली असता अथर्व्यांस हाकलून त्रैविद्यांनीं ती आपली करून घेण्याचा काल म्हणजे सूत्रकाल. याच कालात यांत्रिकीच्या धंद्याबाहेर ब्राम्हणवर्ग पडला असावा आणि त्यांची वृत्ति आपल्याकडेच ओढण्याकरितां श्रौतजीवी मंडळींत धडपड चालू असावी. गृह्यसूत्रें करणें हें त्यांतीलच एक अंग होय व ब्राम्हणाचा इतरजनांशीं आध्यात्मिक संबंध कमी कमी होत जाण्याचा काळ हाच होय. या कालात ब्राम्हणांमध्यें पंचवीसतीस गोटजातीं-निदान गोटजातीचें स्वरूप ज्यापासून दूर नाहीं असे समुच्चय, तयार होण्याचा काल हाच होय आजच्या सूत्रग्रंथांपैकीं मात्र त्यावेळेस कोणतेंहि ग्रंथ अस्तित्वांत नसावे पण त्यांचीं पूर्वरूपें तयार असावीत.

(८) मनुस्मृतीचा काल आपण घेतला तर त्यावेळेस असें दिसून येतें कीं पंचवीस तीस निषिद्ध धंद्यांत ब्राह्मण होतेच व ब्राह्मणामध्यें स्थानिक भेदाह उत्पन्न होऊं लागले होते; ते देखील इतके कीं एखादा ब्राह्मण एका प्रदेशातील असतांना अन्य प्रदेशातील आहे असा त्याच्यावर कोणी आरोप केला असता त्याची अब्रूनुकसानी होई ब्राह्मण पुरुष व क्षत्रिय स्त्री यांच्या अपत्याचें पद समाजांत अनिश्चित होतें यासंबंधानें मनूचें वाक्य स्पष्टोक्तीचें आहे (स्त्रीष्वनंन्तर जातासु द्विजैरुत्पादितान् सुतान् । सदृशानेव तानाहुर्मातृदोषविगर्हितान् ॥ मनु १०.६) मिश्रविवाहाचे मुलगे बापासारखे खरे परंतु आईमुळें त्यांत दोष दिसा जातो.

(९) ब्राह्मणाचें इतरापासून वियुक्तत्व व जातीत इतराचा अप्रवेश हीं दोन्हीं यज्ञसंस्था मोडल्यावरच झालीं. यज्ञसंस्था चालू असती तर त्या संस्थेमार्फत नवीनास त्यात शिरता आलें असतें व ब्राह्मण हा धंदा राहिला असता. ब्राह्मण हा आपला धंदा टाकून इतर धंदा करूं लागला तरी देखील ब्राह्मण राहूं शकतो ही गोष्ट रमेशचंद्र दत्तासारख्यानीं जातिभेद दुर्बल होता यास प्रमाण म्हणून दिली आहे पण तीच गोष्ट जातिभेद बलवत्तर झाला होता असें दाखविते. जेव्हा ब्राह्मण ब्राह्मणेतरास योग्य असा धंदा करूनहि तो ब्राह्मण राहू शकतो तेव्हा ब्राह्मण हा धंदा नसून जात झाली असें समजावें. या प्रकारची स्थिति कुरुयुद्धाच्या अंतीच आली होती अशी गोष्ट द्रोणाचार्य व कृपाचार्य यांच्या उदाहरणावरून दिसते. आणि त्यानंतर नवीन ब्राह्मण होण्याची क्रिया जरी चालू होती- बाप अनिश्चित पण आई निश्चित असलेले म्हणजे क्षेत्रप्रधान असे आचार्य ज्यात बरेच आहेत असा शुक्लयजुर्वेदी ब्राह्मणाचा संघ स्थापन झाला व त्यास ब्राह्मणपदवीहि प्राप्त झाल्याचें दिसत-तरी त्या ब्राह्मणाचा विवाहद्वारा प्रवेश जुन्या ब्राह्मणात झाला नाहीं जुने ब्राह्मण म्हणजे सर्वच रक्तानें शुद्ध असावेत असें खात्रीनें म्हणता येत नाहीं ऋग्वेदाचा ब्राह्मणकार ऐतरेय हा देखील इतरा नामक स्त्रीचा मुलगा म्हणजे क्षेत्रप्रधान आचार्य होता असें म्हणता येईल

त्या वेळेस यज्ञसंस्था चालवून उपजीविका करण्यासाठी अनेकास इकडे तिकडे हिंडावें लागत असे ही गोष्ट चरकांच्यावरून लक्षात येते. व चरकास उभें जाळावें म्हणून त्या वेळेस शुक्लयजुर्वेद्यास वाटत होतें याचें कारण अर्थात भटक्या भिक्षुक एखाद्या सध्याच्या तैलंगी भटजीप्रमाणें येऊन दक्षणा उपटून जातो हेंच असावें. म्हणजे जातीस साधारणपणें इतरांपासून भिन्नता व त्यांच्यातील शाखास एकमेकापासून भिन्नता-म्हणजे शाखावार पोटजाती-या कुरुयुद्धकालीन होत आणि त्याच वेळेस प्रादेशिक भावना देखील उत्पन्न होऊन ब्राह्मणांमध्यें प्रादेशिक जाती पडण्यास प्रारंभ झाला होता असें मानण्यास हरकत नाहीं. म्हणजे ब्राह्मणाचें आज जें जातिस्वरूप आहे त्यातील मुख्य स्वरूपें कुरुयुद्धकालीन आहेत आणि नंतर ब्राह्मणात जे अधिक भेद पडले ते काहीं अंशीं पूर्वीच्याच कारणाच्या अधिक वृद्धीनें व पुढें शिवविष्णुउपासनेच्या भेदामुळें व काहीं भेद नवीन मतें उत्पन्न झाल्यामुळें उद्भूत झाले आहेत (उदाहरणार्थ रामानुज, माध्व इत्यादि) आणि काहीं केवळ लौकिक कारणामुळें उत्पन्न झाले आहेत. ब्राह्मणापैकीं पुष्कळ लोक कारकुनी वगैरे धंद्यात पडले आणि ते इतरापासून वेगळे झाले अशीं उदाहरणें तैलंगी लोकातील नियोगी व गोवळकोंडा व्यापारी या जातीवरून देता येतील.

(१०) सर्व हिंदुस्थानांतील ब्राह्मणांनीं एकत्र होऊन आपल्या जातीला काहींतरी विशिष्ट शिस्त लागावी किंवा सर्वजनहिताकरिता आपली काहीं तरी दृष्टि निश्चित ठेवावी अशा तऱ्हेची सामुच्चयिक भावना त्यांच्यात कुरुयुद्धापासून आजपर्यंत कधीं दृष्टीस पडली नाहीं. ज्याप्रमाणें बौद्धाच्या संघाच्या सभा वारंवार होत व त्यावेळेस धार्मिक गोष्टींतील अवश्यानवश्य भाग ठरविण्यात येई त्याप्रमाणें तडफड ब्राह्मणांनीं कधींच केली नाहीं. राष्ट्र उत्तम नैतिक स्थितींत रहावें याबद्दल ब्राह्मणास सामुच्चयिक जबाबदारी कधींच वाटली नाहीं. बौद्धिक इतिहासात ब्राह्मणजातीचें स्थान जरी मोठें आहे तरी पारमार्थिक व नैतिक इतिहासामध्यें ब्राह्मणजातीचें कार्य फारसें अभिमान बाळगण्याजोगें नाहीं. आपली उच्चता राहण्याकरिता देव बदलणें, आचार बदलणें, धार्मिक संस्था बदलणें, ऐतिहासिक ग्रंथ पूर्वीच्यापेक्षा अगदीं निराळे करून टाकणें, ब्राह्मणाच्या उच्चत्वाच्या कथा प्रसृत करणें याच्या पलीकडे निश्चयात्मक कामगिरी फारच थोडी झाली असावी. समाजातील प्रगतीची साधना ब्राह्मणांनीं फारशी केली नसावी. पण जेव्हा प्रगतीची दिशा निश्चित झाली तेव्हा आपल्या पांडित्यासह त्या प्रवाहात पडून त्यांनीं आपलें तात्पुरतें लौकिक हित करून घेतलें. तथापि हेंहि लक्षात ठेवलें पाहिजे कीं, राष्ट्रास एकस्वरूप देण्याच्या बाबतींत त्याची कामगिरी मोठी झाली. हिंदुस्थानात आर्यन्, मंगोलियन, द्राविड वगैरे अनेक रक्तें आहेत. तथापि इतक्या सर्व प्रकारच्या भिन्न लोकाना एका परंपरेस चिकटाविलें ही कामगिरी लहान सहान नाहीं. लोकांच्या वन्य देवताचें शिवविष्णूशीं किंवा त्यांच्या कौटुंबिक देवताशीं ऐक्य स्थापन करणें, त्यांच्या वन्यतन्त्रेच्या पूजनास थोडेसे पुराणोक्त स्वरूप देणें, ज्यास वैदिक संस्कार मुळींच नाहीं, असा जो एकंदर सामान्यवर्ग त्यास आपण वैदिक संस्कारास अधिकारी आहों अशी समजूत करून देऊन वैदिक परंपरेस चिकटविणें, देशातील अनेक भाग अपवित्र होते तेथें अनेक तीर्थें व पवित्र स्थानें निर्माण करून सर्व देश प्रवासास व वसाहतीस योग्य करणें, अनेक जातींना आपली उत्पत्ति पुराणात सापडवून देऊन त्याचा ब्राह्मणी ग्रंथांशीं संबंध जोडणें इत्यादि क्रिया लक्षात घेतल्या असता त्याचें सामुच्चयिक कार्य वैयक्तिक प्रेरणेनें जरी झालें असलें तरी तें आकारानें फार मोठें होतें हेंहि कबूल करावें लागेल.

---

## प्रकरण ७ वें.

## सूतसंस्कृति

दाशराज्ञ युद्धाच्या पूर्वी सर्व हिंदुस्थानची सामाजिक व सांस्कृतिक स्थिति काय असावी आणि मंत्रसंस्कृतीचा संहितीकरणकाली म्हणजे ब्राह्मणकालीं सूतसंस्कृतीशीं कसा काय मिलाफ झाला या इतिहासभागाचें स्पष्टीकरण करणें आता प्राप्त होतें. पुराणांतील राजावलीच्या याद्या

खऱ्या मानल्या तर दाशराज्ञयुद्धाचा म्हणजे सुदासाचा काल भारती युद्धापूर्वी अजमासें सहाशें वर्षें येतो. या सहाशें वर्षांमध्यें ऋग्वेदांतील बऱ्याच ग्रंथाची रचना झाली व यज्ञसंस्थेच्या विकासाच्या प्रारंभापासून त्याच्या अवळजवळ पूर्ण वाढीपर्यंत क्रिया होऊन गोत्र, मात्रसंस्कृति व सूतसंस्कृति यांचें एकीकरण करण्याचाहि प्रयत्न झाला. या ब्राह्मण कालांतच ज्या अनेक राष्ट्रांचा उल्लेख आपणास ग्रंथांत आढळून येतो तीं राष्ट्रें दाशराज्ञयुद्धपूर्वी असावीं असें मागें आम्हीं मागितलेंच आहे आणि त्यास कारणहि असें दिलें आहे कीं, पूर्वेकडील राष्ट्रें पश्चिमेकडील राष्ट्रापेक्षा अधिक जुनीं असली पाहिजेत. आतां प्रश्न येतात ते असे—(१) मंत्रपूर्व आर्यन् संस्कृतीचा विस्तार दक्षिणेकडे कोठपर्यंत झाला असावा. (२) त्याचें वाङ्मय कशा स्वरूपाचें असावें (३) त्यांचीं दैवतें व मात्रांचीं दैवतें यांत सादृश्य व फरक काय असावा (४) ब्राह्मणादिकांच्या पूर्वीचा हा काल असल्यामुळें त्यावेळीं भिक्षुकी ऊर्फ परमार्थोद्यमांत गुंतलेल्या वर्गाची स्थिति कशा प्रकारची असावी

या चार प्रश्नांवर उत्तरें साधारणपणें येणेंप्रमाणें देतां येतील.

वैदर्भी भीम याचा उल्लेख ऐतरेय ब्राह्मणांत (७.३४) आहे. यावरून वऱ्हाडपर्यंत आर्यनसंस्कृतीचे लोक आले होते हें उघड आहे. पूर्वेकडे आर्यन लोकांचा प्रसार *कितपत झाला होता याविषयीं निश्चयात्मक विधान करतां* येत नाहीं. भारती युद्धामध्यें थेट आराकानच्या डोंगरापर्यंत पसरलेलीं राष्ट्रें युद्धार्थ आलीं होतीं असें दिसतें परंतु त्यांची *भाषाविषयक स्थिति कशी असावी, तीं राष्ट्रें आर्यन् वंशांतील* होतीं अगर मंगोलियन वंशांतील होतीं हें निश्चयानें सांगतां येत नाहीं. बिहारपर्यंतची वसाहत आर्य जातींचीच होती एवढें मात्र निश्चयानें सांगतां येतें. कारण, पुरुषमेधांत बळी म्हणून मागधाचा उल्लेख आहे आणि त्या मागधाचा संबंध विश्वामित्र सूक्तांतील कीकटांपैकीं प्रमगंदाशीं (ऋ. ३ ५३, १४) पोंहोंचवितां येतो हें पूर्वी दाखविलेंच आहे. म्हणजे मगधापर्यंत पूर्वेकडे निश्चितपणें आर्यन लोकांची वसाहत होती आणि दक्षिणेकडे आजच्या महाराष्ट्राच्या अंतिम दक्षिणभागाकडे नसली तरी वऱ्हाडपर्यंत होती हेंहि निश्चयानें सांगतां येतें.

सिंहलद्वीपांतील सिंहली लोकांची भाषा आर्यन् आहे. बुद्धानंतर एक दोन शतकांनीं जरी संप्रदायप्रसारार्थ लोक गेले तरी स्थानिक भाषा आर्यन असून मागधी (पाली) हून भिन्न अशा स्वरूपांत त्यास आढळली हें स्पष्ट आहे. तर ही वसाहत मंत्रपूर्व असावी की कुरुयुद्धोत्तर असावी याविषयीं *निश्चयात्मक विधान करतां येत नाहीं*. कुरुयुद्धपूर्व असावी असें समजण्यास एकच आधार आहे आणि तो हा कीं, वाल्मिकीरामायणकर्त्यांच्या मतें मनुष्यांच्या दक्षिणेपासून कन्याकुमारीपर्यंतचा प्रदेश *जरी भिन्न प्रकारच्या* लोकांचा वसला असला तरी सिंहलद्वीपांतील संस्कृति आपल्या सदृश आहे अशी कल्पना झालेली दिसते. आणि उत्तरकालीं रावण हा आपल्या सदृशच होता ही कल्पना इतकी दृढ झाली कीं दंतकथांनीं त्यास वेदभाष्यकार बनविलें आहे. एळु ऊर्फ जुन्या सिंहली भाषेचें पृथक्करण करून एळु भाषा जरी आर्यन् *ठरते तरी ती वेदभाषासंभव नाहीं हेंहि उघडच आहे तिचें वेद*भाषेपासून व इतर भारतीय भाषेपासून इतकें भिन्नत्व स्थापित झालें आहे कीं. तिला पिशाच भाषा म्हणावें कीं प्रत्ययान्त भाषा म्हणावें याविषयींच संशोधकास संशय उत्पन्न झाला होता. आर्यन भाषा असून भारतीय अनेक भाषांपासून ज्याअर्थी सिंहली भाषा इतकी भिन्न आहे त्याअर्थी तिचा द्वीपकल्पीय तुटकपणा बराच काल प्रस्थापित झाला असला पाहिजे आणि त्यावरून आम्ही असें म्हणतों कीं, दाशराज्ञयुद्धाच्या सुमारास देखील सिंहलद्वीप आर्यन भाषानें व्यापिला गेला असणें अशक्य नाहीं.

थोडक्यांत असें म्हणतां येईल कीं आर्यन् भाषेत व्यापलेलें क्षेत्र आज जेवढें आहे तेवढेंच जवळ जवळ दाशराज्ञयुद्धकालीं म्हणजे वेदपूर्वकालीं असावें.

हें सर्व मंत्रपूर्व आर्यन् संस्कृतीच्या व्यापकतेसंबंधानें झालें. आतां दुसऱ्या प्रश्नाकडे लक्ष देऊं.

वाङ्मयाचें स्वरूप कसें असावें हें निश्चितपणें सांगतां येत नाहीं. कारण वाङ्मयाचें विकृत झालेलें स्वरूप अनेक परंपरांतून उरलेलें आहे. इतिहासपुराणाचा उल्लेख तर वेदांतच आहे आणि शांखायनीय अश्वमेधाच्या वर्णनांत त्याच्या प्रवचनाला व सर्पवेदाच्या प्रवचनाला व गंधर्ववेदाच्या प्रवचनाला दिवस तोडून दिलेले आहेत. महाभारतांत ज्या अनेक कथा येऊन गेल्या आहेत त्यांतील अनेक कथा प्राचीन म्हणून घातल्या आहेत. अशा कथांत नैषध, हरिश्चंद्र, दाशरथीराम, सत्यवान-सावित्री, दुष्यन्त इत्यादि कथांचा उल्लेख करतां येईल. मान्धाता, अम्बरीष हेहि प्राचीन काळचे सूतकथांचे नायक असावेत. परशुरामाच्या एकवीस वेळा निःक्षत्रिय पृथ्वी केल्याच्या कथेबद्दल निश्चित मत देतां येत नाहीं. कारण तींत ब्राह्मणी हात शिरल्याचा संशय येतो. आविक्षित मरुत्त हा प्राचीन राजा म्हणून पुराणांत वर्णिला आहे व ही गोष्ट सार्थक करण्याकरितां ब्राह्मणेंहि उचरतात, तो आविक्षित मरुत्तहि बराच वेदपूर्व असावा असें वाटतें. दाशरथी रामहि वेदपूर्वच असावा. त्याचा काल पुराणांतील यादीच्या प्रमाणें सुदासाच्या पूर्वी दोनएकशें वर्षें पडतो. अर्थात रामकथेची तीन भिन्न भिन्न *प्रकारचीं माहिती आपणास त्यांत पडते* जैन कथेत सीता रावणाची मुलगी केली आहे तर बौद्धांनीं तिला रामाची बहिण केली आहे व रामरावणयुद्धाच्या प्रसंगादिकांची पूर्णपणें अपरिचितता दाखविली आहे.

पुढें आपणास एवढेंच म्हणतां येईल कीं रामायणांतील भाटांनीं आपल्या रामचरित्राप्रमाणें बनावें कसें त्याप्रमाणें प्राचीन काव्येंहि बनलें असावीं अशा शंका येऊं लागतात आणि त्या

कवनाचा भाषा आमच्या संस्कृतापेक्षा किंवा अत्यंत प्राचीन अशा प्राकृतापेक्षा भिन्न असावी

**सूतसंस्कृतींतील लोकांचा उपासनासंप्रदाय**—या विषयीं असें म्हणता येईल कीं, शिवविष्णुपूजा तत्कालीं जवळ जवळ आमच्या स्वरूपातच होती यजुर्वेदीय संहिता व ब्राह्मणें यांचा काळ म्हणजे दोन्हा मस्कृतींच्या मिलाफाचा काळ त्या काळात शंकर, गिरिसुता व स्वामी कार्तिकेय यांनीं युक्त दाख विला आहे विष्णूच्याबरोबर वैनतेयाचा उल्लेख असला तरी तो वैनतेय गरुडपक्षीच होता कीं नाहीं याविषयीं शंका आहे. ऋग्वेदांतील विष्णु व सूतसंस्कृतींतील विष्णु याच अत्यंत प्राचीन म्हणजे कदाचित् पर्शुभारतीय काळीं मूळ एक असेल परंतु क्रमानें परिवर्तन झालेलें वेदात दिसत नसून एकाच नावाचीं दोन भिन्न दैवतें उद्भूत झालेलीं दिसतात महादेवाचें पूजन लिंगस्वरूपातहि होत असावें त्याशिवाय शिश्नदेवाचा उल्लेख इतक्या सरळपणानें स्पष्ट करता येणार नाहीं

सूतसंस्कृतीच्या लोकांत काहीं मतानुयायी शक्रहि असावेत त्याच्यामध्यें इन्द्र हा राक्षसच समजला जात होता आणि इन्द्राला दुय्यम करून प्रजापतीला महत्त्व देणें ही यजुर्वेद कालीं जी क्रिया झालेली दृष्टीस पडते तिचें कारण इन्द्र हा देवता सर्व लोकांस मान्य नव्हती आणि सर्व लोकांस मान्य होईल अशी देवता पुढें सारावयाची होती हें होय प्रजापति मंत्रांत फारसा येत नाहीं तथापि प्रजापतिविषयक म्हणजे एक विशिष्ट पुरुषापासून सृष्टीची उत्पत्ति, अशा प्रकारच्या कल्पना सूतसंस्कृतीच्या लोकांमध्यें पूर्णपणें सिद्ध झाल्या होत्या आणि त्यामुळें प्रजापतीस महत्त्व बृहद्यज्ञसंस्थेच्या उत्पादकानीं दिलें असावें असें दिसतें यजुर्वेदीय प्रजापतीच्या कल्पनेचा ऋग्वेदीयदैवतेतिहासाशीं संबंध मुळींच लावता येत नाहीं (वेदविद्या पृ २५२ पहा) प्रजापतीचें अस्तित्व पुराणानीं कबूल आहे एवढेंच नव्हे तर बौद्ध जैनानाहि कबूल आहे वैश्रवण कुबेर ही देवताहि सूतसंस्कृतींतील असावी दोन्ही परंपराच्या एकीकरणाच्या प्रयत्नात मुख्य देव स्थानिकाचा घेतला, शिवविष्णु हे स्थानिकाचे घेतले ऋग्वेदांतील शिवस्वरूप जें विष्णु त्याचें आणि स्थानिकाच्या विश्वदेव तचें ऐक्य कल्पिलें आणि रुद्राचें शिवाशीं ऐक्य स्वरूपलक्षणकल्पना करून स्थापन केलें, म्हणजे स्थानिकाच्या दैवतांना प्राधान्य देऊन मंत्रास व क्रियांस महत्त्व दिलें अशा तऱ्हेनें दोहोंचें एकीकरण करण्यात आलें आणि आपला श्रौतधर्म स्थानिकास प्रिय करण्यासाठीं तो त्याच्या वाडवडिलांचा धर्म आहे असें शुनःशेपसूक्तास हरिश्चंद्र जोडून देऊन सांगण्यात आलें. आता उपदैवतांसंबंधानें पाहता अमरकोशांत सांगितलें—या 'विद्याधराप्सरोयक्षरक्षोगंधर्वकिंनराः पिशाचो गुह्यकः सिद्धो भूतोमी देवयोनयः' इत्यादि देवयोनींसंबंधीं असें म्हणता येईल कीं, रक्षोगंधर्वासह सर्व देवयोनी सूतसंस्कृतीच्या लोकांस मान्य असाव्या परंतु मात्रसंस्कृतीच्या लोकांस फक्त रक्षोगंधर्व एवढेच मान्य असावे व इतर मान्य नसावेत. पण मांत्रसंस्कृतीस मान्य असलेले साध्य व ऋभु हे सूतसंस्कृतींत आढळत नाहींत व पुढें ते नाहींतसेच झाले रक्षोगंधर्व दोघांसहि मान्य असल्यामुळें त्यांच्या कथा पुढेंहि आढळतात

**सूतसंस्कृतींत परमार्थोद्यमांत गुंतलेले लोक**— या उद्योगात कोण गढलेले असावेत हें आपण आता पाहू. यति व मुनि यांस बौद्ध व जैन या दोन्ही प्रथांच्या पूर्वपरंपरात स्थान आहे नयमन करणें आणि विचार करणें या दोन्ही क्रियांस महत्त्व सूतसंस्कृतीच्या लोकांत होतें त्याचप्रमाणें मात्रसंस्कृतीच्या लोकांतहि होतें पण ऋषींचें अस्तित्व सूतसंस्कृतीच्या लोकांत असावें किंवा नसावें या विषयीं शंका आहे ऋषींचें आद्य कार्य कोणतें, ऋषि शब्दाचा मूळ अर्थ कोणता याविषयीं अजून अस्पष्टता आहे रा राजवाडे ऋषि व इंग्रजी शब्द रश याचा संबंध असावा असें समजतात. आणि ईश्वरी प्रेरणा होऊन किंवा अंगात येऊन बोलू लागणारा किंवा सैरावैरा धावणारा किंवा काव्य करणारा जो तो ऋषि, असा ऋषि या शब्दाचा अर्थ मांडतात ईश्वरी प्रेरणा होऊन बोलणें याचें महत्त्व भारतीय भूमीवर फारसें रुजलेलें दिसत नाहीं ईश्वरी प्रेरणेनें बोलण्याचा बाणा करणारे लोक सेमेटिक लोकांत दिसतात झरथुष्ट्रहि त्याच प्रकारचा मनुष्य समजण्यास हरकत नाहीं परंतु त्याप्रकारच्या व्यक्तींचें अस्तित्व आपल्याकडे फारसें दिसत नाहीं ऋग्वेदांतील वरीचशीं सूक्तें जरा तपासलीं तरी प्राकृताचे उर्फ प्रवक्त्याचे उद्गार या पदवीला शोभतील अशीं फारच थोडकीं आहेत जीं सूक्तें परमार्थसाधनपर म्हणता येतील तीं स्तोत्रें अगर याजक सूक्तें आहेत म्हणजे यज्ञ चालला असता त्यास मदत करणारीं म्हणून आहेत आमची अशी कल्पना होते कीं सूतसंस्कृतीच्या लोकांत अग्नि जनधर्म हा थोडाबहुत असावा परंतु तो जवळजवळ संपुष्टात येत चालला असावा आणि पंजाबातील यदुतुर्वशात तो सुदास दिवोदासाच्या अनुयायांच्या बरोबरीनें असावा परंतु मंत्रांच्या पूर्वेस अग्नियजनास फारसें प्राधान्यच नसावें त्यांचें थोडेंबहुत महत्त्व मगांच्या वंशजानीं जिवंत ठेवलें असावें व कदाचित ते लोक अथर्वविद्या आचरीत असावे तथापि तो अजिबात नष्ट झाला असावा असेंहि म्हणता येत नाहीं कारण तो जर अजीबात नष्ट झाला असता तर मात्रसंस्कृतीच्या लोकांस प्रजापतीस महत्त्व देऊन आपला यजुर्वेदीय ब्राह्मणधर्म तिकडे वाढविता आला नसता मुनि व यति यांचें प्राधान्य पुढें आरण्यकीय धर्मांत विस्तार पावलें असावें आरण्यकीय धर्मसंबंध जितका मंत्रब्राह्मणपरंपरेशीं जोडता येईल त्याहून तितकाच इतिहासपुराणपरंपरेशींहि जोडता येईल असेंहि म्हणता येईल कीं आरण्यकीय धर्म हा देश्य संस्कृतीचें पुनरुज्जीवन व मात्रसंस्कृतीचा विनाश दाखवितो या सूतसंस्कृतीपासूनच आरण्यकीय धर्म उत्पन्न होऊन तो देशभर विस्तारला व जैन बौद्धधर्मांचीं मुळेंहि त्यांतूनच निघालीं.

**आर्ष ग्रंथांतील वंशावळींचें महत्त्व** — प्राचीन भारतीय कालखंडाची व्यवस्थित जुळणी करावयाची झाल्यास या आर्ष ग्रंथांतून आढळणाऱ्या वंशावळ्यांसंबंधाची थोडीबहुत ऐतिहासिक माहिती नीट तपासून तिचें वर्गीकरण केलें पाहिजे. पारगिटरनें या प्रकारचा प्रयत्न केला आहे. त्याचें असें मत आहे कीं प्राचीन आर्यकथान थोडी फार खरी इतिहासपरंपरा असून ती संशोधकास इतिहासार्थ तपासण्यास सर्वथैव योग्य आहे सर्वच ठिकाणचा प्राचीन इतिहास नुसत्या थोड्या लोकांनीं आणि त्यांच्या वैयक्तिक कृत्यांनीं भरलेला असतो या नियमानुसार प्राचीन भारतीय इतिहास संस्कृत ग्रंथाधारें पाहूं लागल्यास, वरील गोष्टीच त्यांत आढळून येणार आहेत

या देशांत प्राचीनकाळीं राजे व ब्राह्मण ( ऋषि, आचार्य ) असे दोन श्रेष्ठ लोकांचे वर्ग असत या दोघांच्या वंशेतिहासांत बराच फरक दृष्टोत्पत्तीस येतो राजाच्या जीवनक्रमाचें स्वरूप त्याचें कुटुंब, राज्य व राजधानी यांनीं निश्चित होई पण ऋषींचा शीलेतिहास स्वतंत्र असे. राजाला कुलमहत्त्व असून, पूर्वजांचा तो अभिमान वाटणें तसें ऋषीचें नसे; त्याला गोत्रनामासेरीज कुलपरंपरा फारशी माहीत नसे. राजाला आपलें कुल व राज्य स्वपराक्रमानें वाढवून आपल्या पुत्राच्या हातीं देऊं अशी आशा बाळगण्याला जागा असे. ऋषि पावित्र्यज्ञान व तपःप्रभाव संपादन करून शिष्याला तें सर्व अर्पण करी. राजाला कुलाची फार महती वाटे; प्रत्येक राजा प्रादेशिक व वांशिक इतिहासशृंखलेचा स्वकुलांतील एक दुवा असे. ऋषीला पवित्र विद्येची महति वाटे व या विद्येची परंपरा भरभराटीनें चालविण्याच्या कार्यांत प्रत्येक ऋषि अगर आचार्य एक दुवा असे. अशा तऱ्हेचें स्वरूप आमच्या पुराणग्रंथांत सांपडतें.

क्षत्रियेतिहासांत वंशावळींची माहिती आणि राजाच्या पराक्रमाच्या गोष्टी वरील कारणामुळें महत्त्वाच्या होऊन बसल्या; पण ब्राह्मणांच्या वंशावळींना त्यांतल्या प्राधान्य मिळालें नाहीं. राजवंशावळी अनेक इतिहासपुराणांतून दिलेल्या आहेत. पण ब्राह्मणवंशावळींचा मात्र फारच क्वचित ठिकाणीं मागमूस लागतो व तेथें गुरुशिष्यपरंपरेची महति असे सूर्यवंश सोमवंश, यादववंश यासारख्या वंशांच्या पन्नासाच्या वर पिढ्या अवगत आहेत पण कोणत्याहि ऋषिकुलांतील पुरत्या पांच सहा स्वतःच्या पिढ्यांचीहि माहिती उपलब्ध नाहीं. राजवंशाची नोंद ऋषींच्याकडे नसून दरबारी भाटांकडे किंवा पुरोहिताकडे असावी क्षत्रियवाङ्मय किंवा सूतवाङ्मय ब्राह्मणी वाङ्मयापासून अगदीं स्वतंत्र रूपानें मंत्रवाङ्मयापासून फाटत गेलें आणि जेव्हां तें स्वाध्याय बनून लोकादरास पात्र झालें तेव्हां कोठें ब्राह्मणांनीं ज्ञानाची एक शाखा म्हणून त्याचें ग्रहण केलें व धर्मशास्त्रांतहि त्यास स्थान दिलें हें आश्वलायन गृह्यसूत्रांतील मागें दिलेल्या उताऱ्यावरून लक्षांत येईल. सूतवाङ्मय ब्राह्मणांनीं ग्रहण करून ब्राह्मणी कल्पनेप्रमाणें त्याची व्यवस्था लावून कथाप्रवचनांनीं तें समृद्ध केलें

आपली वंशावळ आणि विक्रम आपल्यामागेंहि लोकांच्या स्मरणांत रहावा ही राजाची इच्छा भाट व राजपुरोहित पुरी करीत असत. प्रसिद्ध राजांच्या कथा व वर्णनें यांची लोकांत विशेष आवड उत्पन्न होऊन समाजांतल्या एका वर्गानें जुन्या कथा व वंशावळी यांचा अभ्यास करण्याचा क्रम ठेवला. हे "पुराविद्" "पुराणज्ञ" "पौराणिक" "वंशविद्" "वंशपुराणज्ञ" या शब्दांवरून उघड होतें "द्विज" "विप्र" आणि "जन" असे शब्द वरील शब्दांना जोडलेले आढळतात. यावरून या वर्गांत ब्राह्मण व ब्राह्मणेतर दोघेहि असावेत. 'इत्यनुशुश्रुमः' "इतिश्रुतम्" "उदाहरन्ति" अशा वाक्यांतून हा वर्ग किंवा लौकिकपरंपरा उल्लेखिलेली दिसते

तेव्हां या वंशावळी व तदनुषंगिक कथा काल्पित म्हणून टाकाऊ आहेत असेंच समजण्याचें कारण नाहीं या कथांत बरीच खरी इतिहासपरंपरा आहे. क्षत्रियदृष्टीनें प्राचीन भरतखंडाकडे पाहण्यास हें महत्त्वाचें साधन आहे. त्या काळीं क्षत्रियवर्गानें फारच महत्त्वाची कामगिरी केली असल्यानें तज्जन्य वाङ्मयाकडे दुर्लक्ष करणें इतिहासाच्या पूर्णज्ञानास कमीपणा आणील. प्राचीन भरतखंडांत इतिहासकल्पना नाहीं हा आक्षेप ब्राह्मणीवाङ्मयापुरतीच सर्वथैव खरा नाहीं. त्याकाळाला अनुरूप अशी इतिहासदृष्टि क्षत्रियांनीं प्रकट केली आहे. बाबिलोन आणि इजिप्तप्रमाणें या ठिकाणीं त्याचे शिलालेख किंवा मृण्मयफलक नसले तरी पुराणें आणि महाकाव्यें यांतून त्यांच्या कृती ग्रथित केल्या आहेत.

याखेरीज दुसरी एक लक्ष्यांत घेण्याजोगी गोष्ट म्हणजे, ब्राह्मणी वाङ्मयांत ज्यांची प्रशंसा केलेली आढळते ते राजे क्षत्रिय वाङ्मयांत फारसे किंवा कांहीं ठिकाणीं मुळींच प्रशंसिले नाहींत. मान्धातृ (ऋ. १०.१३४ हें सूक्त याचें आहे.) यौवनाश्व आणि कौरवपांडवांमधील युद्धापूर्वी अगमासें एक शतक होऊन गेलेला देवापि यांच्यामधील काळांत ऋग्वेदसूक्त तयार झालें. या मोठ्या काळांत अर्जुन, मरुत्त, सगर, भरत, भगीरथ, अंबरीष, दुसरा दिलीप आणि राम यासारखे महान् विख्यात्, व या शिवाय हरिश्चंद्र, अलर्क, असमाति, पुरु, ब्रह्मदत्त इत्यादि राजे होऊन गेले असतांना भरत(६.१४,४), असमाति[५.४४,६] व कदाचित राम(१.११, १४) सेरीज करून वरील कोणत्याहि राजांचा उल्लेख ऋग्वेदसूक्तांत नाहीं. या राजांच्या वेळीं कोणीहि ऋषि नसेल असा तर्क करणें बरोबर नाहीं. आतां याच्या उलट पाहिलें असतां दिवोदास, सुदास यांच्या सारखे राजे व इतर राजे जे सूक्तांत प्रशंसिले आहेत. त्यांचें वर्णन सूतवाङ्मयांत आढळत नाहीं. यावरून पारगिटर अशी कल्पना करतो कीं एकतर आपल्या स्वतःचा किंवा आपल्या मोठ्या [illegible] ज्यांनीं पूर्ण गौरव केला असे अशा सरासरीच विख्यात राजांना ऋषींकडून

मिळणाऱ्या खऱ्याखोट्या दैवी मदतीची पर्वा नसावी, किंवा ब्राह्मणांचे यज्ञविधी त्यावेळी त्यांच्या परिणत अवस्थेप्रत पोंचले नसावेत; आणि दुसरें, भरतवंशातील राजे व सुदासदिवोदास हे राजे या सारख्या कमी वरिष्ठ पण धार्मिक मध्यदेशीय राजांतर्फे ऋषींनी आपलें पारमार्थिक वर्चस्व स्थापिलें असावें व म्हणून त्या प्रदेशाला विशेष पावित्र्य व महत्त्व दिलें गेलें असावें.

वरील परिस्थितीचें स्पष्टीकरण पारगिटरनें केलें आहे त्यापेक्षा आमचें स्पष्टीकरण निराळें आहे. ऋग्मंत्र आणि पुराणें ही एकाच उपसंस्कृतीचीं वाङ्मयें न समजता आम्ही दोन भिन्न संस्कृतींचीं समजतों. मांत्रसंस्कृतीच्या लोकांमध्यें सूतांचा वर्ग महत्त्वाचा नव्हता व दैश्य आर्यन् संस्कृतीमध्यें यज्ञसंस्था मुळींच वाटली नव्हती आणि यज्ञविषयक स्तोत्रें व यजन करणारा वर्ग दैश्य आर्यन् लोकांत नव्हता. तो जात असता तर त्याचे काहीं विधी यज्ञसंस्थेंत शिरले असते. पौराणिक राजांच्या अनुल्लेखाचें कारण असें होतें कीं ज्या प्रसिद्ध राजांचीं नावें पुराणांत आलीं आहेत त्यांची वैदिक ऋषींस माहितीच नव्हती. कारण गंगेच्या पूर्वेकडील प्रदेशांतील जुन्या राजांचीं नावें नुकत्याच पंजाबपर्यंत पोंचलेल्या मंत्रकर्त्यांस कशीं ठाऊक असणार. दैश्य आणि मांत्र संस्कृतीचें एकीकरण कुरुक्षेत्रांत झालें असावें येथेंच, यज्ञ विकसित झाले; यज्ञसमर्थनार्थ पुराणांचा उपयोग होऊं लागला, दैश्य लोकांचा जो एकंदर वायुष्यक्रम होता त्याचीं अंगें यज्ञसंस्थेंत शिरलीं ? त्यामुळें यज्ञसंस्था एकदम मृत न होतां मरण्यापूर्वी बरीच मनोरम होऊं लागली होती.

**यज्ञामध्यें इतिहास-पुराणांचें महत्त्व**—ब्राह्मणी वाङ्मयांत किंवा नंतरच्या काळांत इतिहास भाग अजीबात वगळला होता असें नाहीं. शांखायन-सूत्रांतून घेतलेला खालील उतारा, आपण ज्यास वेद म्हणतों त्या येरांज असलेल्या वाङ्मयावर कांहींसा प्रकाश पाडतो. हीच हकीकत आश्वलायन सूत्रांत (१०.७) व शतपथ ब्राह्मणांत (१३. ३, १, १) दिलेली आहे. "अश्वमेधाच्या वेळीं, अध्वर्यु गायकांना पाचारण करतो व ते वीणेवर गातात, आणि तो त्यांना राजाची स्तुति करावयास सांगतो. नंतर तो राजा इतर जुन्या सद्गुणी राजांसमवेत यज्ञ करतो. यज्ञाच्या पहिल्या दिवशीं अध्वर्यु मनुवैवस्वतापासून आरंभ होणारी गोष्ट निवेदन करतो. ज्या अर्थीं मनूचे लोक मनुष्य होते व यज्ञाला मनुष्य हजर आहेत त्या अर्थीं ही गोष्ट सांगून अध्वर्यु हा गृहमेध्यांना (कुटुंबी लोकांना) उपदेश करतो. नंतर तो सांगतो कीं, 'ऋक्-गीतें वेद आहे. हा वेद आहेत,' आणि एक सूक्त म्हणतो " दुसऱ्या दिवशीं यमवैवस्वतापासून आरंभ होणारी गोष्ट तो सांगतो. ज्या अर्थीं यमाचे लोक पितर होते आणि पितर येथें हजर आहेत म्हणून तो वृद्धमाणसांना ही गोष्ट सांगून उपदेशितो नंतर तो म्हणतो कीं, ' यजुर्वेद वेद आहे, हा वेद आहे 'आणि यजूंच्या एका अनुवाकाचें पठण करतो. तिसऱ्या दिवशीं वरुणआदित्यापासून आरंभ होणारी गोष्ट तो सांगतो. ज्या अर्थीं वरुणाचे लोक गंधर्व होते आणि ज्या अर्थीं ते हजर आहेत त्या अर्थीं तो शोभिवन्त तरुणांनां ही गोष्ट सांगून उपदेशितो. नंतर तो म्हणतो कीं, ' अथर्ववेद वेद आहे; हा वेद आहे. ' नंतर तो भेषजाचें पठण करतो. चवथ्या दिवशीं तो सोमवैष्णवापासून आरंभ होणारी गोष्ट सांगतो. ज्या अर्थीं सोमाचे लोक अप्सरा होत्या आणि त्या हजर आहेत म्हणून तो शोभिवन्त तरुणींना ही गोष्ट सांगून उपदेशितो. नंतर तो म्हणतो कीं, ' आंगिरसवेद वेद आहे; हा वेद आहे; ' आणि त्या नंतर तो घोराचें पठण करतो. पाचव्या दिवशीं तो अर्बुदकाद्रवेयापासून आरंभ होणारी गोष्ट सांगतो. ज्या अर्थीं अर्बुदाचे लोक सर्प होते आणि ज्या अर्थीं ते हजर आहेत म्हणून तो सर्पांना किंवा सर्पविदांना ही गोष्ट सांगून उपदेशितो. नंतर तो म्हणतो कीं, ' सर्पविद्या वेद आहे; हा वेद आहे; ' आणि सर्प विद्येचें पठण करतो. सहाव्या दिवशीं तो कुबेर वैश्रवणापासून आरंभ होणारी गोष्ट सांगतो. ज्या अर्थीं कुबेराचे लोक राक्षस होते, आणि ते हजर आहेत म्हणून तो सेलगांना किंवा पापकृतांना ही गोष्ट सांगून उपदेशितो. नंतर तो म्हणतो कीं, ' रक्षोविद्या वेद आहे; हा वेद आहे ' आणि तो रक्षोविद्या पठण करतो. सातव्या दिवशीं तो असितधान्वनापासून आरंभ होणारी गोष्ट सांगतो. ज्या अर्थीं त्याचे लोक असुर होते आणि ते हजर आहेत म्हणून तो कुसीदिनांना (किंवा व्याजखाऊंना ?) ही गोष्ट सांगून उपदेशितो. नंतर तो म्हणतो कीं, ' असुरविद्या वेद आहे; हा वेद आहे; ' आणि एक हातचलाखीचा खेळ करून दाखवितो. " आठव्या दिवशीं तो मत्स्य सामदापासून आरंभ होणारी गोष्ट सांगतो. ज्या अर्थीं त्याचे लोक जलचर होते आणि ते या ठिकाणीं हजर आहेत त्या अर्थीं तो मत्स्यांना किंवा धीवरांना ही गोष्ट सांगून उपदेशितो. नंतर तो म्हणतो कीं, ' इतिहासवेद वेद आहे, हा वेद आहे ' आणि तो एका इतिहासाचें पठण करतो. नवव्या दिवशीं तो तार्क्ष्य वैपश्चितापासून आरंभ होणारी गोष्ट सांगतो ज्या अर्थीं त्याचे लोक पक्षी होते आणि ते हजर आहेत, म्हणून तो पक्ष्यांना किंवा ब्रह्मचाऱ्यांनां ही गोष्ट सांगून उपदेशतो. नंतर तो म्हणतो कीं, ' पुराण-वेद हा वेद आहे, हा वेद आहे'; आणि त्या नंतर तो पुराणांतील कांहीं भाग पठण करतो. दहाव्या दिवशीं तो धर्म इंद्रापासून आरंभ होणारी गोष्ट सांगतो. ज्याअर्थीं त्याचे लोक देव होते आणि ते हजर आहेत त्याअर्थीं तो तरुण व अप्रतिग्राहक अशा श्रोत्रियांना ही गोष्ट सांगून उपदेशतो. नंतर तो म्हणतो कीं, 'सामवेद वेद आहे, हा वेद आहे' आणि सामगायन करतो. (शांखा. श्री. सू. १६.१)"

प्रस्तुत उतारा आपणांस अनेक दृष्टींनी महत्त्वाचा आहे.

इतिहासपुराणें यासहि पाचवा वेद म्हणण्यानें शास्त्रीय कारण काय ? तर यज्ञ करण्यामध्यें त्याचाहि उपयोग होता वेदविद्या म्हणजे यज्ञ करणाऱ्या लोकांची विद्या तर जें वाङ्मय यज्ञात म्हटलें जाई तेंहि वेदविद्येचा भाग होय

अध्वर्यु जुन्या गोष्टींचें निवेदन करतो असें यात सांगितलें आहे. याचा अर्थ काय ? अध्वर्यु सूतवाङ्मयाचा अभिमानी होता काय ? कीं सूतवाङ्मय आणि देश्यसंस्कृति याचा आणि मात्रसंस्कृति आणि यज्ञसंस्था यामधील दुवा होता आणि यज्ञ, इतिहास व पुराण हें वाङ्मय समाविष्ट करून त्यानें यज्ञसंस्था अधिक लोकप्रिय केली ? वरील उताऱ्यात आणखी एक गोष्ट दृष्टीस पडते की संहितीकरणाचा प्रयत्न होत असता हौत्र, आध्वर्यव, औद्गात्र आणि ब्रह्मत्व याचाच वेदात समावेश करण्याचें ठरण्यापूर्वी वाङ्मयाचें वर्गीकरण व सामुच्चयिक कल्पना हीं निराळ्या तऱ्हेची होती ऋग्गीतें, युजर्वेद, अथर्ववेद, आंगिरसवेद, सर्पविद्या, रक्षोविद्या, असुरविद्या, इतिहासपुराण व सामवेद हें या वर्गीकरणावरून दिसून येईल.

सर्प राक्षस आणि असुर हीं तीन राष्ट्रें महत्वाचीं असून त्याची विद्या काहीं विशेष होती आणि इतिहास पुराणाप्रमाणें त्या विद्येचाहि समावेश यज्ञसंस्थेंत करून घ्यावा असा अध्वर्यूंचा प्रयत्न असावा. या तीन राष्ट्राचा इतिहास काहीं अंशीं त्या वेळेस ठाऊक असून त्याचें उच्चारण अश्वमेध काली करावें अशी खटपट ते करीत होते असें दिसतें सर्पराष्ट्राचा इतिहास अर्बुद काद्रवेयापासून परिचित होता, राक्षसाचा इतिहास कुबेर वैश्रवणापासून परिचित होता आणि असुराचा इतिहास असितधान्वनापासून परिचित होता.

इतिहास म्हणून जें वाङ्मय त्याकाळीं होतें तें विशेषकरून धीवराना सांगितलें आहे. मत्स्य म्हणजे धीवराचें राष्ट्र त्याचा इतिहास सामदापासून पुढें आहे अशी मत्स्य राष्ट्राची कल्पना होती

पक्षी म्हणजे ब्रह्मचारी म्हणून स्पष्टीकरण करून त्याचा इतिहास तार्क्ष्य वैपश्चितापासून धरला आहे. आणि त्याचा पुराणवेद हा वेद म्हणून सांगितलें आहे.

याचा अर्थ असा दिसतो कीं, त्रयीशिवाय जें इतर ज्ञान शांखायनब्राह्मणात दर्शविलें आहे तें सर्प, राक्षस, असुर व मत्स्य या राष्ट्रांचें परंपरागत ज्ञान तसेंच पुराण नावाचें ब्रह्मचारी वर्गाचें ज्ञान होय.

सर्प, राक्षस आणि असुर या राष्ट्रांचें ज्ञान कोठें गेलें असावें असा प्रश्न उपस्थित होतो. अशी कल्पना करता येईल कीं काहीं भेदोत्तर मंत्रवाङ्मयात आणि पुराणात तें समाविष्ट झालें असावें.

*इतिहास* — 'एक प्रकारचें वाङ्मय' ह्या अर्थी हा शब्द पुराण ह्या शब्दाबरोबर वैदिक कालात जे ग्रंथ लिहिले गेले त्यात योजिला आहे अथर्व वेदाच्या पंधराव्या काण्डात ह्या दोन्ही शब्दाचा उल्लेख आहे त्यानंतर इतिहास हा शब्द शतपथब्राह्मण, जैमिनीय, ब्राह्मण व बृहदारण्यक आणि छांदोग्य या उपनिषदात आलेला आहे छांदोग्य उपनिषदात इतिहास आणि पुराण मिळून पाचवा वेद आणि शांखायन श्रौतसूत्र ( १६. २; २१ २७ ) ह्यात इतिहास एक वेद आणि पुराण एक वेद असें मानिलें आहे. गोपथब्राह्मणात ( १. १० ) देखील इतिहास–वेद आणि पुराण–वेद असा उल्लेख आहे परंतु शतपथात ( १३ ४, ३, १२ ) इतिहास आणि पुराण मिळून वेद होय असें प्रतिपादन केलं आहे आणि त्याच ग्रंथातील एका उताऱ्यात ( ११. १, ६, ९ ) अन्वाख्यान आणि इतिहास हे निरनिराळ्या प्रकारचे ग्रंथ आहेत असा उल्लेख आहे. परतु त्यातील भेद कोणता याचा खुलासा नाहीं बहुतकरून पहिला पूरक असावा. तैत्तिरीय आरण्यकात ( २. ९ ) इतिहास आणि पुराण ह्याचा अनेकवचनी उपयोग केला आहे वैदिक वाङ्मयात पुराण आणि इतिहास यात काय फरक आहे याबद्दल स्पष्ट पुरावा दिसत नाहीं आणि भाष्यकाराचें वाङ्मय देखील(सीजनें संशोधिलेलें–सायणानीं लिहिलेला ऋग्वेदाचा उपोद्घात आणि शतपथब्राह्मणावरील [ ९. ५, ६, ८ ] भाष्य-हें) अनुकूल असा निकाल देत नाहीं. गेल्डनेर म्हणतो कीं, इतिहास-पुराण म्हणजे त्यात सर्व प्रकारच्या दंतकथा उदाहरणार्थ शौर्याच्या, सृष्टयुत्पत्तीच्या, वंशवर्णनाच्या वगैरे आहेत असा हा एक ग्रंथ आहे. परंतु इतिहास आणि पुराण हे निरनिराळे ग्रंथ आहेत असें पतंजलीचें मत होतें ( पाणिनी वरील वार्तिक ४. २, ६० आणि महाभाष्य २. २,४ ) तथापि यास्काला असा ग्रंथ आहे हें मुळींच माहीत नव्हतें ह्या विधानावरून गेल्डनरची चूक सिद्ध होतें त्याचें मत असें आहे कीं, इतिहास हा मंत्रवाङ्मयाचा ( निरुक्त ४ ६ ) भाग असावा आणि ऐतिहासिक हे लोक असून ज्याठिकाणीं दुसरे लोक ऋग्वेदाला काल्पनिक समजतात त्याठिकाणीं हे त्या दंतकथा आहेत असें समजतात. यास्क हा निरुक्तातील बहुतेक उताऱ्यास इतिहास पुराण असें न म्हणता फक्त इतिहास असेंच म्हणतो. या वरून हें सिद्ध होतें कीं, इतिहास पुराण म्हणून एखादा ग्रंथ असा काहीं नव्हता.

इतिहासाचा आख्यानाशीं काय संबंध आहे हें निश्चित सांगता येत नाहीं. सीज म्हणतो कीं, इतिहास आणि पुराण हे शब्द पुराणदंतकथा, इतिहास आणि सृष्टयुत्पत्तीसंबंधी दंतकथा ज्या वैदिक कवींना माहीत होत्या त्यानाच फक्त लावितात आणि ह्यालाच साधारणपणे पाचवा वेद (पूर्णपणे नाहीं)असें म्हणतात तर अशा रीतीनें अन्वाख्यान, अनुव्याख्यान आणि व्याख्यान ह्याचा जन्म झाला आणि ह्या परंपरेच्या बाहेरहि त्यानें असू शकतील. तसाच आख्यान हा इतिहासपुराण ह्याचाहि भाग असू शकेल तो आणखी असेंहि सुचवितो कीं आख्यान या शब्दाना गोष्टींचें

माडणी त्याच्शेहि संबंध आहे. ओल्डेनबर्ग, मुईउिश, गेल्डनेर, आणि सीज व इतर काहीं म्हणतात कीं, आख्यान म्हणजे गद्यपद्यांचा समुच्चय. मुख्य भाग असला म्हणजे विकाराचा किंवा भावनांना जास्त जोर देण्याकरितां पद्यरूप आणि दुय्यम अथवा गौण असला म्हणजे गद्यरूप अशी योजना करावयाची.

ह्या विचारसरणीवर हर्टेल व व्हॉन श्रोडरयांनीं कडक टीका केली आहे. ज्याचा गद्य भाग नाहींसा झाला असला तरी ज्यात ओल्डेनबर्गीला वाङ्मयात्मक ज्ञानाचे नमुने आढळतात त्या ऋग्वेदातील आख्यानसूक्तात वरील विद्वानांना मॅक्समुलर व लेव्ही याच्या जुन्या कल्पनाप्रमाणें धार्मिक नाटकाचे अवशेष सापडतात. दुसरे असें म्हणतात कीं प्रस्तुत सूक्तें म्हणजे फक्त वाङमयात्मक संभाषणें होत.

इतिहासपुराणाचा उल्लेख सर्व मंत्रवाङ्मयामध्यें मात्र स्तोमकाण्डाशिवाय इतर कोठेंहि नसावा ही गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे. आणि ब्राह्मणवाङ्मयात देखील त्याचें स्वरूप असें दिसतें कीं, इतिहासपुराण हें ज्ञान इतकें मोठें आहे कीं त्याचा पाचवा वेद मानावा. अर्थात ब्राह्मणवाङमय इतिहासपुराणाचें ज्ञान गृहीत धरतें आणि त्यात घालावें कोठें याची चर्चा करीत बसतें. ब्राह्मणातील किंवा वेदातील उल्लेखाचे तंतू जमा होऊन त्याचें इतिहासपुराणरूपी पटल बनलें ही गोष्ट फारशी संभवनीय नाहीं. ब्राह्मणवाङ्मयातील अर्थवादामध्यें जो इतिहासपुराणभाग आलेला आहे त्यापैकीं बराचसा दुसऱ्या विभागातील एका प्रकरणात दिलाच आहे. त्याचें स्वरूप असें दिसतें कीं तो पुराणरूपी वाङ्मयास प्रेरक नसून अस्तित्वात असलेल्या इतिहासपुराण वाङ्मयामुळें तयार झालेल्या मनाला यज्ञसंस्था इतिहास पुराणाशीं संबद्ध आहे असें भासविण्याचा प्रयत्न करीत आहे. यज्ञपुरुषाचें विष्णूशी ऐक्य दाखविण्यात विष्णूचें महत्त्व आधींच वाटलें होतें याची कबुली येत नाहीं काय? इतिहासपुराणाची आणि वैदिक वाङ्मयाची लढालढी, वेदाच्या अभिमानेंकरून इतिहासपुराणास पाचवा वेद मानण्यामध्यें दिसून येणारी मान्यता दाखवावी लागली ही गोष्ट पुराणाचे ब्राह्मणाहून बरेंचसें प्राचीनत्व सिद्ध करिते. पुराणाचा आपण एकंदर वृत्तान्त पाहिला तर त्यात पंजाबकडच्या राळवळी फारशा येतच नाहींत. पाण्डवाचे पैतृक देश उत्तरकुरु आणि उत्तरमद्र हे जे मानण्यात येतात, त्यावरून अशी कल्पना सुचते कीं, मंत्रकालीन आर्यांचें आगमन जर खैबर घाटाकडून झालें तर देश्य आर्यन् संस्कृतीच्या आर्यांचें आगमन उत्तरकुरुमार्गानें झालें असावें. कोंकणामध्यें ब्राह्मणाचा प्रवेशहि याच मार्गानें झाला असावा.

हिंदुस्थानातील प्राचीन राजघराण्याच्या वंशावळी रामायण, महाभारत व पुराणें यामध्यें दिलेल्या आहेत, व त्यांत हिंदुस्थानच्या उत्तर, पूर्व व पश्चिम भागातील निरनिराळ्या राज्यात होऊन गेलेल्या राजांचीं नावें असल्याचें सांगतात त्यात प्रत्येक राजाचा नामनिर्देश आहे असें मात्र नाहीं, फक्त ज्यांची नारकीर्द संस्मरणीय झाली तेवढेच राजे दिलेले आहेत, असें सांगण्यात येतें रामवंशाविषयीं इतिहास पुराणें माहिती देतात ती अशी: हीं एकंदर राजघराणीं मूळ दोन राजवंशापासून निघालीं, त्यातला एक मनुपासून निघालेला सूर्यवंश, मनु हा विवस्वत म्हणजे सूर्य याचा मुलगा. दुसरा सोम किंवा चंद्र यापासून निघालेला ऐल उर्फ सोमवंश होय सूर्यवंशातील राजाचीं तीन ठिकाणीं राज्यें होतीं अयोध्या, विदेह व वैशाली; त्यापैकीं अयोध्येचें राजघराणें सर्वश्रेष्ठ होय व त्यालाच सूर्यवंशीय म्हणण्याचा विशेष प्रघात पडला. सोमवंशाचा मूळपुरुष पुरुरवस् ऐल होय. या राजवंशाचींहि पुढें पौरव, यादव, अनु, द्रुह्यु व तुर्वसु हीं पाच निरनिराळीं घराणीं झालीं. पैकीं पौरव यानीं उत्तरहिंदुस्थानात, यादवानीं पश्चिमहिंदुस्थानांत व दक्षिणेत, अनुराजानीं पंजाबात व पूर्वेकडील प्रातात व द्रुह्युनीं हिंदुस्थानच्या वायव्यसरहद्दीवर, येणेंप्रमाणें राज्यें स्थापिलीं. तथापि सोमवंश हें नाव हास्तिनापूर येथें ज्या राजघराण्याच्या मुख्य शाखेनें राज्य केलें त्या पौरवराजघराण्याला लावतात या वंशावळी अत्यंत पुरातन काळापर्यंत नेऊन भिडविल्या असल्यामुळें त्या कितपत विश्वसनीय मानाव्या, हा प्रश्न उद्भवतो.

**पौराणिक वंशावळींचा विश्वसनीयता.**—पौराणिक वंशावळींविषयीं पारगिटर म्हणतो या वंशावळीवरील मुख्य आक्षेप असा कीं, त्या फार पुरातन अशा अज्ञान काळातील असल्यामुळें व त्या काळीं कोणतीहि माहिती लेखनिबद्ध करून चिरकाल टिकाऊ करून ठेवण्याचीं साधनें नसल्यामुळें त्या वंशावळींतील प्राचीनतम भाग काल्पनीक व दंतकथात्मक असण्याचा फार संभव आहे. दंतकथात्मक माहितीला विस्मृतिदोषामुळें, पूर्वेतिहासास उज्वल स्वरूप देण्याच्या लालसेमुळें व जुन्या गोष्टींत काल्पनिक भाग घुसडून देण्याच्या प्रवृत्तीमुळें बरेंच असत्य स्वरूप आल्याशिवाय राहात नाहीं हे दोषसंभव मान्य केले तरी सदरहू वंशावळी सर्वतोपरी अविश्वसनीय आहेत असें मानण्याचें मात्र कारण नाहीं.

पारगिटरचें हें म्हणणें आम्हास ग्राह्य वाटतें. अर्धशतकापूर्वी या प्राचीन दंतकथा केवळ कल्पनीक मानून त्यावरून काहीं लाक्षणिक अनुमानें व उपपत्ती काढण्याचा प्रघात पडलेला होता. या जगाच्या प्रत्येक युगात शौर्यपराक्रमाचीं कृत्यें झालेलीं आहेत; मानवसंघानीं युद्धें करून देश जिंकणें व शाततेच्या काळीं लोकहिताचीं कामें करणें, या दोन्ही गोष्टी केलेल्या आहेत.

अगदीं प्राचीन काळातहि महापुरुषानीं मोठालीं महत्त्वाचीं कृत्यें केलेलीं असलीच पाहिजेत. अर्थात त्याच्या स्तुतिपर कवनें व पोवाडे होऊन त्यात त्या महापुरुषांचीं चरित्रें कमजास्तमानानें ग्रथित झालेलीं आहेत व तींच परंपरेनें आज आपणास उपलब्ध झाली आहेत इतर देशातहि जी जुनी वाङ्मयीन माहिती अर्धशतकापूर्वी अविश्वसनीय मानण्यात

येत असे, तिची सत्यता नवीन शोधामुळें व जमीनींतून उकरून काढलेल्या शिलग्रामुळें प्रस्थापित होऊं लागली आहे, व आता सामान्यतः लोक ती विश्वसनीय मानूं लागले आहेत. कै. रामशास्त्री भागवत यांनी असुर आणि असिरिया यांचा संबंध जोडतेवेळी झाले तेव्हा त्या संबंधाविषयीं अत्यंत माशंका लोकांच्या मनात उत्पन्न झाली ती आज कमी होत आहे. प्राचीन काळींहि लोकांना आपल्याप्रमाणें सत्यासत्याची चाड होती; कारण प्राचीन वाङ्मयामध्येंहि सत्याची स्तुती व असत्याची निंदाच केलेली आढळते. असें आहे तर आपल्या पूर्वजांनीं सत्याकडे दुर्लक्ष करून केवळ खोट्या गोष्टी व्यवस्थित ग्रथित करून आपल्याकरता ठेवल्या आहेत असें मानणें अगदी मूर्खपणाचें होईल तात्पर्य, पन्नास वर्षांपूर्वींची या प्रश्नाबद्दलची स्थिती आता अगदीं उलट झाली आहे म्हणजे तेव्हां प्राचीन दंतकथांवरून घेतलेली माहिती देताना तिची विश्वासपात्रता लेखकाला अगोदर सिद्ध करावी लागत असे पण हल्लीं त्याच्या उलट या कथा सामान्यतः सत्य असें मानण्याचा प्रघात पडला असून एखादी कथा ऐतिहासिक दृष्ट्या त्याज्य म्हणणारावर तें सिद्ध करण्याचा बोजा पडतो

**पौराणिक वंशावळींची रचना व ग्राह्याग्राह्यता** – भारतीय संस्कृति फार प्राचीन असून अगदीं पुरातन काळींहि हिंदुस्थानांत अनेक राज्यें होतीं ज्या देशांत अनेक राज्यें भरभराटीस आलीं व संस्कृतीहि उच्च दर्जापर्यंत पोहोचली होती, तेथील राजांचीं नांवें कथामध्यें ग्रथित होणें अगदीं स्वाभाविक आहे, कारण त्या प्राचीन काळांत यह लेक ज्ञानाचा साठा म्हणजे ऐतिहासिक कथांचा अशावयाचा, हल्लींच्या काळाप्रमाणें विविध विषयांचा भरणा त्या काळीं नव्हता. तेव्हां अशा प्राचीन काळांतील प्रसिद्ध राजांची माहिती राष्ट्रांतील पुढील पिढ्यांना सर्वस्वी अज्ञात असावी, ही गोष्ट अत्यंत असंभवनीय वाटते, आणि उलट असा सिद्धान्त प्रस्थापित होतो कीं राजांविषयींच्या या प्राचीन कथा सामान्यतः खऱ्या असेंच धरून चालले पाहिजे मात्र मानवी पुराण्यांतील काहीं तपशीलाचा भाग चुकीचा असण्याचा संभव असल्यामुळें वरील कथांतील विशिष्ट हकीकतींच्या खरेखोटेपणाबद्दल प्रश्न उपस्थित करण्याची कोणालाहि मुभा राहणारच.

आतां दुसरा एक असा आक्षेप येण्यासारखा आहे की, मूळ वंशावळी खऱ्या असल्या तरी मागाहून त्यांत कोणी फेरफार करून खोटीं नांवें घुसडली नसतील कशावरून ? पूर्वीच्या काळांत राजांनीं व राजघराण्यांच्याहि खोट्या वंशावळी तयार केल्याचीं उदाहरणें आढळतात. येथेंहि आक्षेपकानीं ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं, कोणतीहि खोटी, बनावट गोष्ट होण्यापूर्वी तद्रूप खरी व सत्य गोष्ट अस्तित्वात असावी लागते; इतकेंच नव्हे तर त्या सत्य गोष्टीला विशेष महत्त्व व किंमत असावयास पाहिजे, म्हणजेच तिच्या लोभामुळें मनुष्य बनावट गोष्ट करून ती सत्य असें भासविण्याचा प्रयत्न करतो. याच न्यायानें खोट्या वंशावळी मागाहून झाल्या असल्यास त्यापूर्वी खऱ्या वंशावळी अस्तित्वात असल्याच पाहिजेत. अशा खऱ्या वंशावळी अगदीं प्राचीन काळीं राजे किंवा सत्ताधिपती समाजाचें शास्ते बनूं लागल्यापासूनच तयार होऊं लागल्या असल्या पाहिजेत. आता अशा वंशावळींत आद्यपुरुष कोणी सूर्य किंवा चंद्र मानला गेला एवढ्यावरूनच पुढील वंशावळ आयत चूक मानण्याचें कारण नाहीं, कारण कोणत्याहि वंशाचा अगदीं मूळ पुरुष खऱ्या माहितीच्या अभावीं, कोणी काल्पनिक व्यक्ति मानणें साहजिक असतें परंतु नंतर एकाच घराण्यांतील राजपुरुषांची परंपरा लागून त्याचें राज्य टिकलें म्हणजे खऱ्या वंशावळी निर्माण होतात

तेव्हां सुसंस्कृत समाजाच्या अगदीं आद्य काळापासून खऱ्या वंशावळी प्रथम निर्माण होणार, तर त्या नमुन्यावर काल्पनिक किंवा खोट्या वंशावळी बनविण्याचा विचार कोणाला सुचणार अशा बनावट, खोट्या वंशावळी नवे राजे किंवा सत्ताधारी उत्पन्न झाल्यावर त्यांचा जुन्या प्रसिद्ध घराण्यांशीं संबंध जोडण्याकरता तयार करण्याचा विशेष संभव असतो या अनुमानाप्रमाणें हिंदुस्थानांतील मध्ययुगीन व अर्वाचीन काळत काहीं बनावट वंशावळी नजरेस आल्या आहेत; त्याचप्रमाणें पुराणांतर्गत काहीं लहान घराण्यांचा मोठाल्या प्रसिद्ध राजघराण्यांशीं खोटाच संबंध जोडून दिल्याचीं उदाहरणें पुढें मांडण्यांत आलीं आहेत

तसेंच प्रत्येकाला आपल्या प्राचीन कुलपरंपरेबद्दल अभिमानच वाटत असल्यामुळें राजेलोक, त्यांचे पुरोहित व सामान्य भाटवर्ग यांनीं मोठ्या दक्षतेनें खऱ्या वंशावळींची माहिती जतन करून ठेवली असली पाहिजे. स्तुतिपाठकांचा व पोवाडे करणाराचा वर्ग हिंदुस्थानांत पूर्वापार अस्तित्वात असून तो आपल्या कवनांनीं व कथांनीं राजांच्या स्वकुलाभिमानाला उद्दीपित करीत असे, व लोकांचीहि ऐतिहासिक जिज्ञासा तृप्त करीत असे. संस्कृत वाङ्मयांत अशा कथांवरून श्रवणप्रसंगाचा अनेक ठिकाणीं उल्लेख आढळतो. आणि घराण्याची परंपरा चांगली उज्ज्वल असल्यावर खोट्या बनावट वंशावळी करण्याचें कारणच नाहीं.

आता प्राचीन वंशावळींत मधल्या दीर्घ काळात काहीं चुका काहीं लोप व काहीं स्थानें होणें संभवनीय आहे, तसेंच काहीं अप्रिय गोष्टी त्यांतून वगळल्या जाणेंहि शक्य आहे. उदाहरणार्थ विश्वामित्र ज्याचा शेवटचा पुरुष तें कान्यकुब्ज घराणें व काशीघराणें हीं पौरवकुलांतील सुप्रसिद्ध व धर्मशील राजा भरत याच्या वंशापासून निर्माण झालीं, अशी पुरेशी माहिती काहीं काहीं पुराणांत आढळते. शुद्ध रामायणांतील अयोध्येच्या राजाच्या वंशावळींमध्यें राजांना अनुक्रम चुकलेला आहे व कित्येक राजे गाळलेले आहेत. रामायण ग्रंथ भाटकृत आणि त्या वेळच्या भाटांमध्यें ऐतिहासिक सत्यनिष्ठा तितकी नसल्यामुळें वरील चुका झाल्या असाव्या

पाहिजेत. पण कान्यकुब्ज व काशी घराण्यांतील वंशावळींत मात्र कोणी हेतुपुरस्सर फेरफार केलेला असावा. परंतु उत्तरहिंदुस्थानांत खरी माहिती भरपूर उपलब्ध असल्यामुळें खोटी माहिती चव्हाट्यावर आल्यावाचून रहात नाही. स्तुतिपाठक सर्वत्र पसरलेले असल्यामुळ अनेक गरे अल्प सोयींस मारफ झालेले आहेत कान्यकुब्जघराण्याचा भरतवंशाशी संबंध जोडण्याचें उघड कारण असें दिसतें की भरतराष्ट्रीयलोकांपासूनच पुढें अनेक ब्राम्हणकुलें निर्माण झाली हे गम्य असल्यामुळें विश्वामित्रांच ब्राम्हणत्व लोकांना तितकें क्रांतिकारक वाटलें म्हणून वरील फरक केला असावा. रामायणाची लोकमान्यता हजारों वर्षे चालू असली तरी सूर्यवंशावळी अनेक ठिकाणी प्रथित असल्यामुळें तुद रामायणांतील चुकीची वंशावळ देशांत मान्यता पावू शकली नाही.

संस्कृत ग्रंथांत कांही ठिकाणी काल्पनिक वंशावळी आढळतात, परंतु त्या व खऱ्या राजवंशावळींयांतील फरक चांगला लक्षात येण्यासारखा आहे. अशाल्या काल्पनिक वंशावळींत सृष्टयुत्पत्तीचें वर्णन देतांना दक्षासंबंधानें, पितरांसंबंधानें तसेच निरनिराळ्या प्रकारच्या अग्नींच्या संबंधानें वगैरे दिलेल्या आहेत. तसेच अपुऱ्या माहितीच्या आधारावर खऱ्या वंशावळी तयार करण्याचा प्रयत्न केलेला आहे. उदाहरणार्थ भार्गव, आत्रेय, वसिष्ठ वगैरे ब्राह्मणकुलांच्या ब्राह्म. वायु, मत्स्य व लिंग पुराणांत दिलेल्या वंशावळी. या वंशावळी ग्राह्य मानता येत नाहींत. त्यांतील पिढ्यांचीं कांहीं नांवें बरोबर आहेत, पण बाकी ऋषींच्या व गोत्रांच्या नांवांची कांहींतरी भरती केलेली आहे या ब्राह्मणकुलांच्या वंशावळी क्षत्रिय वंशावळींचें अनुकरण करण्याकरतां मागाहून तयार केलेल्या आहेत हें स्पष्ट दिसतें. आणि प्राचीन काळापासून परंपरेनें खऱ्या वंशावळी चालत आलेल्या नसल्यामुळें मागाहून इकडून तिकडून गोळा केलेल्या तुटपुंज्या माहितीच्या आधारावर त्या बनविलेल्या आहेत

तथापि मूळ प्रसिद्ध पुरुषाच्या खऱ्या वंशावळी नसल्या तर मागाहून ब्राह्मणवंशांच्या व इतर वंशावळी बनावट तयार झाल्या नसत्या तेव्हां मूळच खऱ्या वंशावळी क्षत्रिय राजवंशाच्या होत. खऱ्या क्षत्रिय वंशावळींतील भरपूर व सरळ दिलेली माहिती आणि उलट बनावट वंशावळींतील चुका व अपुरेपणा हीं ताडून पाहिलीं म्हणजे राजकुलाच्या वंशावळींचें प्राचीनत्व व विश्वसनीयत्व हीं दोन्हीं मनाला तात्काळच पटतात.

राजेलोकांच्या वंशावळींचें संरक्षण करण्याचें काम वैदिक ब्राह्मणांनी केलेलें नाहीं, कारण त्यावेळी समकालीन ब्राह्मणवर्ग अस्तित्वांत होता किंवा नाहीं याची शंका आहे. तें काम दरबारांतल्या लोकांनीं म्हणजे ज्यांना राजघराण्यांची परंपरा कायम राखण्याचें खाजगी स्वार्थदृष्टीनें महत्त्व वाटत असतें अशा लोकांनी केलेलें आहे. हे लोक म्हणजे राजाचे स्तुतिपाठक होत. त्यात उत्तरकाली ब्राह्मणहि असत, पण वरील काम ते ब्राह्मकर्म म्हणून नव्हे, तर दरबारांतील नोकर या नात्यानें करीत असत प्राचीन काळचे ऋषी किंवा कडक वर्तनाचे ब्राह्मण असल्या ऐहिक गोष्टींत सहसा लक्ष घालीत नसत. एखाद्या विशेष प्रसंगी कायतें ते त्यांत पडत. त्यांनीं आपल्या स्वतःच्या–ब्राह्मण कुलांच्या—वंशावळींहि तयार करून ठेवण्याची फिकिर केली नाहीं; व त्यामुळेंच खऱ्या ब्राह्मणवंशावळी आज उपलब्ध नाहींत. तशा वंशावळी मूळ असत्या तर त्या वैदिक वाङ्मयाप्रमाणें सुरक्षित राहाणें अशक्य नव्हतें. या अनेक कारणांस्तव राजघराण्याच्या वंशावळी खऱ्या प्राचीन व ग्राह्य धरून चालण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं. या निर्णयाला दुसरा आधार मिळतो तो असा की, ऐल उर्फ सोमवंशीय लोकांनीं उत्तरहिंदुस्थान व दक्षिणेकडील प्रदेश कसा व्यापला याची आपणास जी माहिती आहे तशी बरोबर माहिती संस्कृत ग्रंथांत या वंशावळींतच फक्त सांपडते शिवाय मानववंशशास्त्रविषयक माहितीशीं ही वंशावळींतील माहिती तंतोतंत जुळते. हा तर तिच्या विश्वसनीयतेबद्दलचा अगदीं निर्दोष पुरावा होय.

**वंशावळींचें स्वरूप**—वंशावळतपशिलांत सुनिश्चितता आढळेल असा अशा वाटूं नये. कारण पुष्कळदा याद्या 'विस्तरेण' 'आनुपूर्व्येण' दिल्या असून देखील त्या अपूर्ण असल्याचें त्याच ठिकाणीं सांगितलेलें असतें. प्रसिद्ध राजांचीच नावें त्यांत घातलेली असतात. कधीं कधीं याद्या लांबलचक असूनहि ['संक्षेपेण' किंवा 'समासेन'] त्या आखडलेल्या आहेत असें म्हटलेलें असतें. दोन राजांमधील संबंध दाखविण्याचे चार प्रकार आहेत ते सांगतांना आपण मागील राजाबद्दल 'क' वापरूं व पुढच्या राजाबद्दल 'ख' वापरूं. हे प्रकार येणेप्रमाणेः— (१) ख कचा मुलगा होता; हें नातें पुत्र किंवा जात या अर्थाचा शब्द वापरून दाखविलेलें असतें. उदा. विभयाद् रुरुर्जज्ञे। रुरुकात्तु वृकःसुतः ॥ (गरडपु. १, १३८, २८)

(२)ख कचा—होता; या ठिकाणीं नातें स्पष्ट केलेलें नसतें. उदाहरण हर्यश्वस्य प्रमोदस्तथ। हर्यश्वस्य निकुंभोऽभूत्। मत्स्यपु. १२.३३

(३) कपासून किंवा नंतर ख झाला-पंचमी विभक्ति किंवा या अर्थाचें क्रियाविशेषणरूप येथें योजिलेलें असतें.

उदा भागात् अंबरीषोऽभूत्। सिन्धुद्वीपोऽबरीषतः॥ [गरुडपु. १,१३८, २१] जेव्हां पंचमी व षष्ठीची विभक्तिरूपें सारखींच होतात तेव्हां प्रकार (२) आणि (३) निरनिराळे ओळखूं येत नाहींत उदा. बाहोस्तु सगरः स्मृतः। (गरड. पु. १, १३८, ३८)

(४) ख कचा वारस होता, उदा. शशादस्यतु दायादः ककुत्स्थो नाम। (मत्स्यपु. १२.५१)

कांहीं वेळा या चारहि प्रकारांत पुत्राचेंच नातें निघतें;

परंतु केव्हां केव्हां इतर नातीं निघून कांहीं बाबतींत नातें मुळींच नसतें.

अशा प्रकारच्या अडचणी असल्यानें वंशावळींत निर्दोषपणा येणें अशक्य असलें तरी, आपल्या कार्याला पुरेशी पूर्णता त्यामध्यें आणणें शक्य आहे

वंशावळींची तुलना करितां जी विशिष्ट गोष्ट नजरेस येते ती म्हणजे अयोध्येच्या सूर्यवंशाचा महान् विस्तार होय. यांत ९३ नांवें आहेत. विस्तारानें दुसऱ्या प्रतीच्या दोन याद्या आहेत त्या यापेक्षा बऱ्याच लहान आहेत पश्चिम हिंदुस्थानांतील यादवकुलाची यादी सुमारें ६२ नावांची व सोम किंवा पौरव कुळाची ५० नावांची आहे सूर्यवंशाची यादी चांगली पूर्ण आहे व दुसऱ्या दोन वंशाची तशी नाहीं असें धरून चालण्यास सबळ कारणें आहेत असें पारगिटेर म्हणतो आणि निरनिराळ्या वंशावळ्यांची संगति खालीं दिल्याप्रमाणें लावतो

**कोसल येथील वंशावळींचें महत्त्व**—प्राचीन काळींच या अनेक टोळ्यांनीं भरतखंडांत येऊन उत्तरभाग व्यापून टाकला यासंबंधीं अनेक पुरावे मिळतात. हैहय, तालजंघ आणि शक, पह्लव, कांबोज इत्यादि टोळ्या उत्तर भागांत येऊन, कोसलखेरीज सर्व राज्यें त्यांनीं उलथून पाडिलीं कोसलवंश मात्र अखंड राहून, बाकीचीं राजघराणीं बहुतेक नाश पावलीं यामुळें त्या घराण्यांतील वंशावळींत खंड दृष्टीस पडतात सोमवंशांत अशा प्रकारचा खंड आहे; कान्यकुब्ज घराणें तर नाहींसेंच झालें, काशीवंशाची विस्कळीत झाली आहे, आणि मध्यदेशांत पुढें नवीन घराणीं स्थापन झालीं. कोसलदेश पूर्वेकडे असल्यानें बचावला व त्याच्या घराण्याची वंशावळ अखंड आणि पूर्ण अशी राहिली. याखेरीज सूर्यवंशाची प्रतिष्ठा लोकांमध्यें अव्याहतपणें सर्वांत अधिक असल्यानें याच्या वंशावळी मोठ्या आदरानें संपूर्णपणें जशाच्यातशा चालत आलेल्या आहेत इतर वंशाची तशी गोष्ट नाहीं. तेव्हां सूर्यवंशाचा विस्तार इतर वंशाशीं त्याची तुलना करून कांहीं छाटाछाटीनें दुरुस्त करणें बरोबर होणार नाहीं. उलट त्याच्याशीं इतर वंश ताडून पाहून आपणास त्यांतील उणीव व खंड मोजतां येतील वर आलेल्या दिष्टयतरांखेरीज अंतर्देश पादाक्रांत होत चालल्यानेंहि कांहीं फरक होत होते याप्रमाणें सोमवंशाच्या पौरव अजमीढापासून उत्तर आणि दक्षिणपंचाल घराणीं उद्भूत झालीं, यादव वंशांतील चेदिराजानें चैद्य घराणें पुढें आणलें, पौरव वसूनें (कुरुवंश) मगधापर्यंत सर्व देश जिंकून आपल्या पांच मुलांस वांटून दिले हीं मुलें पुढें पांच घराण्यांचे आद्यपुरुष झालीं

**कालैक्य व नीं काढतांना लागणारी सावधगिरी**—या वंशावळीचा अभ्यास करितांना कालैक्याकडे चांगलें लक्ष ठेविलें पाहिजे एरवीं नुसत्या वंशावळींना कांहींच महत्त्व येणार नाहीं. राजे व ऋषी यांच्या संबंधांच्या अनेक दंतकथा वगैरे असतील तेव्हां कांहीं तरी ठराविक कसोटीला लावून त्यांतील खऱ्याखोट्याचें पृथक्करण केलें पाहिजे त्यातून आपणास बरींचशीं कालैक्यें पुष्कळ अंशीं खरीं म्हणून गोळा करितां येतील व त्यावरून चांगलीं अनुमानें काढतां येतील.

हीं अनुमानें काढतांना कांहीं गोष्टींविषयीं विशेष काळजी घ्यावी लागते या गोष्टी म्हणजे, प्रथमतः पैतृकनामावरून पितापुत्राचें नातें नेहेमींच निघतें असें नाहीं तर तें नाम पुष्कळदा वंशज या अर्थी असतें, उदाहरणार्थ विश्वामित्राला त्याच्या आजोबाच्या नावावरून कौशिक, दाशरथी रामाला राघव आणि कृष्णाला माधव, सात्वत वार्ष्णेय, दाशार्ह, शौरी, अशीं पैतृक नावें असत. दुसरी गोष्ट म्हणजे साधें नाव नेहेमींच मूळपुरुषवाचक नसतें पण कधीं कधीं वंशजानांहि लावण्यांत येतें ऋषींच्या बाबतींत ही गोष्ट विशेष लक्ष्यांत बाळगिली पाहिजे उदा वसिष्ठाचें नाव सूर्यवंशाच्या सर्व काळीं दृष्टीस पडतें व तें वसिष्ठकुलाची परंपरा दर्शवितें याच अर्थी भरद्वाज, कण्व, गौतम, भृगु आणि इत्यादि निरनिराळ्या काळीं दृष्टीस पडणारीं नावें घतलीं पाहिजेत आणखी एक गोष्ट म्हणजे कधीं कधीं एकच नाव अनेक व्यक्तींचें असल्यानें, त्या व्यक्तींच्या निरनिराळ्या कथा एकाच व्यक्तीवर आरोपित केलेल्या असतात. अशा ठिकाणीं सावधगिरी बाळगावी लागते धृतराष्ट्र, जनमेजय, ब्रह्मदत्त, भीष्म, भाम इत्यादि नावाचे अनेक राजे होऊन गेले आहेत त्याचप्रमाणें दिवोदास सुदास किंवा सृंजय या नावाचे एकाहून अधिक राजे होते. हीच गोष्ट ऋषींच्या बाबतींतहि लागू आहे.

आतां यापुढें निरनिराळीं घराणीं घेऊन त्यांविषयीं आधार व थोडें विवेचन जें पारगिटेर देतो तें त्याचें विवेचन आम्हीं जर्मेच्या तसेंच देत आहों वैवस्वतमनूपासून सर्व कुलें निर्माण झालीं सूर्य आणि विदेहवंश त्याच्या इक्ष्वाकु पुत्रापासून, विशाल घराणें त्याच्या नेदिष्ठ पुत्रापासून आणि त्याची कन्या इला हिच्या पुरुरवस् पुत्रापासून इतर सर्व घराणीं उदयास आलीं पुरुरव्याचा वंश म्हणजे आयु, नहुष, ययाति आणि पुढें ययातीचे पांच पुत्र यदु, तुर्वसु, द्रुह्यु, अनु, आणि पूरु मनूच्या इक्ष्वाकुपुत्रापासून निघालेला अयोध्येचा सूर्यवंश अनेक पुराणें आणि रामायण यांतून वर्णिला आहे. पुराणांतून दिलेली वंशावळ जुळते पण रामायणांतील मात्र भिन्न आहे रामायणांतल्या वंशावळीचें नीट परीक्षण करितां ती चुकीची आहे असेंच म्हणणें भाग पडतें, तेव्हां ती बाजूला सारून पुराणवंशावळच स्वीकारली पाहिजे.

विदेहवंश इक्ष्वाकूच्या निमिपुत्रापासून निघाला भागवत, गरुड, वायु आणि विष्णु अशा चार पुराणांतून व रामायणांतून हा विस्तारलेला आहे या सर्वांची बहुतेक एकवाक्यता आहे यांत पुष्कळ राजानें जनक असें नाव आहे पण तें व्यक्तिनाम नसून गोत्रनाम किं । राजविशेषण असावें

ययातीच्या यदुपुत्रापासून यादववंश निघाला असें विधान पुराणांत आहे याचे दोन फाटे झाले एक यदूच्या सहस्र

जितपुत्रापासून — यांच्या हैहय व तालजंघ अशा दोन शाखा प्रसिद्धीस आल्या दुसरा त्याच्या क्रोष्टु नांवाच्या पुत्रापासून—हें घराणें चिरकाल टिकलें होतें. यादववंशाविषयीं सर्व आधारांची एकवाक्यता आहे. याच वंशांत कंस व कृष्ण होऊन गेले

पौरव ( किंवा सोम ) वंश ययातीच्या पूरु नांवाच्या पुत्रापासून निघाला. हा महाभारत व इतर अनेक पुराणांत विस्तारलेला आहे. महाभारताखेरीज सर्व पुराणांचीं या वंशावळींतील पिढ्यांसंबंधीं बहुतेक एकवाक्यता आहे. महाभारतांत ज्या दोन याद्या आहेत त्या मात्र भिन्न असून एकमेकींशींहि जुळत नाहींत या सर्व याद्या ताडून पाहातां, पुराणवंशयादीच बरोबर दिसते.

अहिच्छत्राच्या गादीवर असलेला उत्तर पंचालवंश सोमवंशांतील अजमीढापासून निघाला. हा अनेक पुराणांत सारखाच वर्णिला आहे. ऋग्वेदांत सुद्धां या वंशांतील कांहीं पिढ्या आहेत सृंजय व सोमक कुलें याच्याच शाखा असून ब्राह्मणवाङ्मयांत यांचा विशेष उल्लेख आहे. कांपिल्य येथील दक्षिण पंचालवंश हा अजमीढापासून निघालेला दुसरा वंश होय. हा अनेक पुराणांत दिला असून, त्यांत यासंबंधीं एकवाक्यताहि आहे.

अजमीढाचा भाऊ द्विमीढ यापासून निघालेला मध्यदेशांत दुसरा एक वंश होता. कांहीं पुराणांत हा उल्लेखिला असून त्यांत बहुतांशीं एकवाक्यता आहे

कुरूपासून पांचवी पिढी वसु, यानें एक घराणें स्थापिलें. यानें चेदि राज्य मिळवून आपणाला चैद्य–उपरिचर असें विशेषण घेतलें. मगध देशापर्यंत यानें दिग्विजय मिळविला. त्याच्या घराण्याला मगधवंश असें म्हणावें याचें वर्णन कांहीं पुराणांतून बहुतेक सारखेंच आढळतें

ज्यांत गाधि आणि विश्वामित्र होऊन गेले, तो वंश कान्यकुब्ज येथें राज्यारूढ होता निरनिराळ्या ठिकाणीं याचें सारखेंच स्वरूप दिलें आहे, पण पूर्वज मात्र दोन निरनिराळे सांगितले आहेत. पुरूरवसचा पुत्र अमावसु याच्यापासून याची उत्पत्ति झाली याविषयीं बहुमत पडतें. भरत विश्वामित्राचा पूर्वज धरणें गैरवाजवी होतें, तेव्हां ज्या वंशावळींतून विश्वामित्राचा पूर्वज जो जन्हु याला भरताचा वंशज केलें आहे त्या वंशावळी चुकीच्या असल्या पाहिजेत

काशींत काशीवंश असे. या वंशांतील सुहोत्र आणि सोमवंशांतील सुहोत्र यांची घालमेल होऊन निरनिराळ्या पुराणांत सुहोत्राचे निरनिराळे पूर्वज दिले आहेत सुहोत्रापासून पुढच्या पिढ्या सर्व पुराणांतून बहुतेक सारख्याच आहेत.

ययातीच्या अनु नांवाच्या पुत्राचे वंशज पंजाबांत केकय, शिबि इत्यादि जातींत आणि पूर्वेकडे अंग घराण्यांत समाविष्ट झाले. जयद्रथापासून अंग घराण्याच्या दोन शाखा झाल्या. भाकल्या शाखेंत कर्ण जन्मला असून तो पुढें राजा झाला. महाभारतांत मात्र कर्ण व जयद्रथ हे समकालीन दाखविले आहेत.

मनूच्या ( दिष्ट किंवा नेदिष्ट ) पुत्रापासून दुसरा एक वंश स्थापन झाला या वंशांतील विशाल व त्यापुढील राजांनीं विशाला किंवा वैशाली घराणें स्थापिलें. याला दिष्टवंश म्हणावें. याच्या पिढ्यांविषयीं एकवाक्यता आहे

यापुढें, वंशावळींच्या याद्या देऊन कालैक्यें समजावून देणें आहे पुढील तक्त्यांतून यासंबंधींचा निर्णय दाखविला आहे. यांत मनूपासूनचे जेवढे महत्वाचे वंश होते तेवढे दाखविले आहेत. ऋचीक, जमदग्नि व राम हे तीन भार्गव ऋषी त्यांच्या वेळचीं कालैक्यें स्पष्ट होण्यासाठीं यांत ग्रथित केले आहेत. यांतील वंश होताहोईतों भौगोलिक स्थानाप्रमाणें मांडले आहेत, म्हणजे पश्चिमेकडे होऊन गेलेलीं घराणीं तक्त्यांत डाव्या बाजूला, मध्यदेशांतील मध्यभागीं आणि पूर्वेकडील घराणीं उजव्या बाजूला लिहिलीं आहेत ज्यांचीं स्थानें कालैक्यांनीं अगदीं निश्चित झालीं आहेत अशा सर्व राजांच्या नांवांपूर्वी * अशी फुली आहे, कंसांतील नावें, ज्यांचा वंशावळींत उल्लेख नाहीं पण कालैक्याचा विचार करितांना ज्यांचें अस्तित्व उघडकीस आलें अशा राजांचीं आहेत. ज्या कांहीं याद्या, मग त्या एका कालैक्यापासून दुसऱ्या कालैक्यापर्यंत पोंचल्या असल्या तरी, इतरांपेक्षा कमी भरलेल्या दिसतात, त्यांतील नांवें गळलेलीं आढळतील गळलेलीं नांवें कोठें येतात हें माहीत नसल्यानें, त्या याद्यांतील नांवें नुसतीं अंतर टाकून मांडलीं आहेत, आणि ज्या ठिकाणीं कालैक्यें नाहींत त्या ठिकाणीं शक्य तितकें चांगलें अनुमान बांधून, काम भागविलें आहे तक्त्यांत आलेल्या चक्रवर्ती राजांपुढें × असें गुणिलें चिन्ह दाखविलें आहे. जे राजे आपल्या सभोंवतालच्या प्रदेशावर वर्चस्व स्थापीत, व तेथील राजांना आपले मांडलिक बनवीत अशांना चक्रवर्ती किंवा सम्राज ही पदवी असे. यांच्या विजयामुळें शेजारच्या राजवंशांतून अंदाधुंदी झाल्यास नवल नाहीं. व यामुळें यांच्या काळच्या शेजारील राजवंशावळींत विस्कळीतपणा दिसून येतो शिवाय अशा चक्रवर्ती राजांच्या कारकीर्दी बहुधा मोठ्या असाव्यात, असें दिसतें.

पुढील तक्त्यांत आपणास असें दिसून येईल कीं, यादव, पौरव, काशी, सूर्य, दिष्ट व अनु हे वंश मनूपासून निघाले आहेत. त्यांपैकीं यादववंश, सूर्यवंश व विदेहवंश या घराण्यांच्या वंशावळी बऱ्याच मोठ्या असून त्यांतील बहुतेक नांवांची स्मृति परंपरेनें चालत आलेली आहे व यांत फारच थोडीं नावें गळलेलीं दिसतात पौरव कुलांत जरी बरींच नावें दिसलीं तरी मध्येतरीं मोठमोठीं रिक्तस्थानें आढळतात. अनुवंशाचीहि वंशावळ बरीच मोठी व दीर्घकालपर्यंत पसरलेली आहे. पण तींतहि रिक्तस्थानें मधून मधून बरींच आढळतात. काशीवंश व दिष्टवंश हे यानंतरचे महत्त्वाचे वंश होत. यांचा लोप दाशरथी रामाच्या सुमारास झालेला आढळतो. बाकीचे वंश या मानानें कमी महत्वाचे असून कांहींचा आरंभ बराच उत्तरकालीन दाखविला आहे.

## पुराणांतील वंशावळ्यांचे कालैक्यदर्शक कोष्टक.

| यादव. | हैहय. | पौरव. | कान्यकुब्ज. | | काशीवंश. | सूर्यवंश. | विदेहवंश. | दिष्टवंश. | अनुवंश. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| मनु | | मनु | | | मनु | मनु | | मनु | मनु |
| इला | | इला | | | इला | इक्ष्वाकु | | दिष्ट | इला |
| पुरूरवस् | | पुरूरवस् | | | पुरूरवस् | | | | पुरूरवस् |
| आयुस् | | [ आयुस् | अमावसु ] | | आयुस् | [ शशाद | निमि ] | नाभाग | आयुस् |
| नहुष | | नहुष | | | नहुष | *ककुत्स्थ | | | नहुष |
| *ययाति× | | *ययाति× | | | क्षत्रवृध | अनेनस | | भलंदन | *ययाति× |
| यदु | | पूरु | | | | पृथु | मिथिजनक | | अनु |
| [क्रोष्टु | सहस्रजि ] | जनमे.१ला | भीम | | सु (न) होत्र | विश्वगश्व | | | |
| | | प्राचिन्वत् | | | | आर्द्र | | वत्सप्री | सभानर |
| वृजिनीवत् | शतजित् | प्रवीर | | | काश | युवनाश्व१ला | उदावसु | | |
| | | मनस्यु | | | | श्रावस्त | | | कालानल |
| | हैहय | अभयद | | | काशेय | बृहदश्व | | प्रांशु | |
| स्वाहि | | सुधन्वन् | कांचनप्रभ | | | कुवलाश्व | नन्दिवर्धन | | |
| | | बहुगव | | | दीर्घतपस् | दृढाश्व | | | सृंजय |
| | धर्म | संयाति | | | | प्रमोद | | प्रजानि | |
| रुशद्गु | | अहंयाति | | | | हर्यश्व१ला | सुकेतु | | |
| | धर्मनेत्र | रौद्राश्व | | | धन्व | निकुंभ | | | पुरंजय |
| | | ऋचेयु | सुहोत्र | | | संहताश्व | | खनित्र | |
| चित्ररथ | कुन्ति | | | | धन्वंतरि | कृशाश्व | देवरात | | |
| | | *मतिनार | | | | *प्रसेनजित् | | | जनमेजय |
| *शशबिन्दु× | साहंजि | तंसु | | | | *युवनाश्व२रा | | क्षुप | |
| पृथुयशस् | | | | | केतुमत् | *मान्धातृ× | बृहदुक्थ | | महाशाल |
| पृथुकर्मन् | | | *जह्नु | | | *पुरुकुत्स | | | |
| पृथुजय | महिष्मत् | | सुमंतु | | | त्रसदस्यु | | विंश | |
| पृथुकीर्ति | | | अजक | | | संभूत | महावीर्य | | महामनस् |
| पृथुदान | | | बलाकाश्व | | भीमरथ | अनरण्य | | | |
| पृथुश्रवस् | *भद्रश्रेण्य | | कुश | भार्गव | | पृषदश्व | | विविंश | उशीनर |
| पृथुसत्तम | | | कुशाश्व | ब्राह्मण. | *दिवोदा १ला | हर्यश्व२ रा | सुधृति | | तितिक्षु |
| | *दुर्दम | | *कुशिक | | ( अष्टरथ ) | वसुमनस् | | खनीनेत्र | *शिबि× |
| अन्तर | कनक | | *गाधि | | | त्रिधन्वन् | | | *केकय |
| सुयज्ञ | कृतवीर्य | | | ऋचीक | | त्रय्यारुण | *धृष्टकेतु | *करंधम | रुशद्रथ |
| उशनस् | *अर्जुन× | | *विश्वामित्र | *जमदग्नि | | *त्रिशंकु | | | |
| शिनेयु | जयध्वज | | | | | *हरिश्चंद्र | | अविक्षित | |
| मरुत्त | *तालजंघ | | अष्टक | *राम | | *रोहित | *हर्यश्व | *मरुत्त× | हेम |
| कम्बलबर्हिस् | वीतिहोत्र | | परावसु | | | हरित् | | | |
| रुक्मकवच | वृष | | | | ( हर्यश्व ) | चंचु | | नरिष्यन्त | |
| परावृत | मधु | | | | | विजय | मरु | दम | |
| *ज्यामघ | वृष्णि | | | | ( सुदेव ) | रुरुक | | | सुतपस् |
| | | | | | | वृक | | राज्यवर्धन | |
| *विदर्भ | | | | | *दिवोदा.२ रा | *बाहु | प्रतीन्धक | सुधृति | |
| क्रथ | | ऐलिन | | | *प्रतर्दन | *सगर× | | | *बलि |
| कुन्ति | | | | | वत्स | असमंजस | | नर | |
| धृष्टि | | *दुष्यन्त | | | *अलर्क | अंशुमत् | कृतिरथ | केवल | |
| निर्वृति | | *भरत× | | | | दिलीप १ला | | | अंग |
| विदूरथ | | | | | सन्नति | भगीरथ× | | बन्धुमत् | |
| *दशार्ह | | *वितथ | | | | श्रुत | देवमीढ | वेगवत् | |
| व्योमन् | | *भुमन्यु | | | सुनीथ | नाभाग | | | |
| जीमूत | | बृहत्क्षत्र | | | | अंबरीष× | | बुध | दधिवाहन |
| विश्वात | | सुहोत्र | | | क्षेम | सिन्धुद्वीप | विधृत | तृणबिन्दु | |
| *भीमरथ | | हस्तिन् | | | | अयुतायुस् | | | |

| यादव. | द्विमीढ. | पौरव. | उ. पंचाल | दक्षि. पं. | काशिवंश. | सूर्यवंश. | विदेहवंश. | दिष्टवंश. | अनुवंश. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| नवरथ | | विकुंठन | | | केतुमत् | *ऋतुपर्ण | | विशाल | अनपान |
| दशरथ | [ द्विमीढ | अजमीढ ] | | | | सर्वकाम | महाधृति | हेमचंद्र | |
| शकुनि | यवीनर | [ | नील | बृहदिषु ] | सुकेतु | सुदास | | | |
| करंभ | | | शान्ति | | | कल्मापपाद | | सुचंद्र | दिविरथ |
| देवरात | धृतिमत् | | सुशान्ति | बृहद्वसु | धर्मकेतु | अश्मक | कृतिरात | धूम्राश्व | |
| देवक्षत्र | | | पुरुजाति | | | मूलक | | | |
| मधु | सत्यधृति | | अर्क | बृहद्धनु | सत्यकेतु | शतरथ | | सृंजय | |
| कुरुवश | | | भृम्यश्व | | | वृद्धशर्मन् | महारोमन् | सहदेव | |
| अनु | दृढनेमि | | मुद्गल | | विभु | विश्वसह १ ला | | | |
| पुरुहूत | | | ब्रह्मिष्ठ | | | दिलीप २ × | स्वर्णरोमन् | कृशाश्व | चित्ररथ |
| पुरुहोत्र | सुधन्वन् | | वध्र्यश्व | बृहत्कर्मन् | सविभु | दीर्घबाहु | | सोमदत्त | |
| अंशु | | *ऋक्ष १ | *दिवोदास | | | रघु | ह्रस्वरोमन् | | |
| | | | मित्रयु | जयद्रथ | सुकुमार | अज | | जनमेजय | |
| सत्वत् . | सार्वभौम | | ( देववात ) | | | *दशरथ | *सीरध्वज | *प्रमति | *लोमपाद |
| *सात्वत | | | *सृंजय | *विश्वजित् | धृष्टकेतु | *राम × | भानुमत् | | |
| | | | | | वेणुहोत्र | | शतद्युम्न | | चतुरंग |
| *अंधक | | | च्यवन | सेनजित् | भर्ग | *कुश | शुचि | | |
| | | | सोमदत्त | | | अतिथि | ऊर्जवह | | पृथुलाक्ष |
| कुकुर | | | ( पिजवन ) | रुचिराश्व | | निषध | सनद्वाज | | |
| | | | *सुदास | | | नल | कुनि | | चंप |
| वृष्णि | | *संवर्ण | सहदेव | पृथुषेण | मगधवंश | नभस् | अजन | | |
| | | | *सोमक | | | पुंडरीक | कुलजित | | हर्यंग |
| धृति | | *कुरु | जन्तु | पार १ ला | *कुरु | क्षेमधन्वन् | अरिष्टनेमि | | |
| | | परिक्षित १ | | | सुधन्वन् | देवानीक | श्रुतायुस् | | भद्ररथ |
| कपोतरोमन् | महत्पौरव | *जनमे.२ | | नीप | सुहोत्र | अहीनगु | सुपार्श्व | | |
| | | सुरथ | | | च्यवन | पारिपात्र | सञ्जय | | बृहत्कर्मन् |
| विलोमन् | रुक्मरथ | विदूरथ | | समर | | दल | क्षेमारि | | |
| | | सार्वभौम | | | कृत | शल | अनेनस् | | बृहद्रथ |
| तित्तिरि | सुपार्श्व | जयत्सेन | | पार २ रा | *वसु-चैद्य | उक्थ | समरथ | | |
| तैतिरि | | आराधि | | | | वज्रनाभ | सत्यरथ | | बृहद्भानु |
| | सुमति | महासत्व | | पृथु | बृहद्रथ | शंखन | सात्यरथि | | |
| नल | | अयुतायुस् | | | | व्युषिताश्व | उपगुरु | | बृहन्मनस् |
| | सन्नति | अक्रोधन | | सुकृति | कुशाग्र | विश्वसह २ रा | उपगुप्त | | |
| | | देवातिथि | | | ऋषभ | हिरण्यनाभ | स्वागत | | जयद्रथ |
| | *कृत | ऋक्ष २ रा | | विभ्राज | | पुष्य | स्वनर | | |
| अभिजित् | | भीमसेन | | | पुष्पवत् | ध्रुवसन्धि | सुवर्चस् | | विजय |
| | | दिलीप | | अणुह | सत्यहित | सुदर्शन | सुभास | | |
| पुनर्वसु | | *प्रतीप | | *ब्रह्मदत्त | | अग्निवर्ण | सुश्रुत | | धृति |
| | . . . | | | विश्वक्सेन | ऊर्ज | शीघ्र | जय | | |
| आहुक | | (ऋष्टिषेण) | *नीप[नील | उदक्सेन | गह्यु | मरु | विजय | | धृतव्रत |
| | | *शन्तनु | | भल्लाट | | प्रसुश्रुत | ऋत | | |
| | *उग्रायुध | [* भीष्म] | *पृषत | *जनमेजय | संभव | सुसन्धि | सुनय | | सत्यकर्मन् |
| *उग्रसेन | क्षेम्य | विचित्रवीर्य | | | *जरासंध | अमर्ष | वीतहव्य | | अधिरथ |
| *कंस | सुवीर | *धृतराष्ट्र | *द्रुपद | | | महस्वत् | धृति | | *कर्ण |
| *कृष्ण | नृपंजय | *पाडव | *धृष्टद्युम्न | | *सहदेव | विश्रुतवत् | बहुलाश्व | | |
| | बहुरथ | *अभिम० | *धृष्टकेतु | | | *बृहद्बल | कृति | | |

कौ र व व पां ड व यां च्या म धी ल गु रु

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | परीक्षि २ रा | | | सोमापि | बृहत्क्षण | | | |
| | | जनमे. ३ रा | | | श्रुतश्रवस् | [illegible] | | | |

वरीलप्रमाणें कोष्टक तयार करून त्यात आढळणाऱ्या महत्वाच्या कालैक्यांसंबधानें पारगिटर कालानुक्रम दिग्दर्शित येणें प्रमाणें करतो

*अगदीं प्रथमचें कालैक्य म्हणजे, ययातीचा सर्वांत वडील भाऊ जो यति त्यानें ककुस्थाच्या जो नांवाच्या मुलीशीं लग्न केलें हा ककुस्थ सूर्यवंशातील ककुस्थच असावा तेव्हां ययाति ककुस्थानंतरच्या पहिल्या पिढींतील होता.* हें कालैक्य आमच्या मतें विश्वसनीय नाहीं कां कीं, अनेक राजाचा जनकअसा वर्णिलेला ययाति आम्हास खरो खर व्यक्ति नसून काल्पनिक असावा असें वाटतें

*मान्धातृच्या काळीं सूर्य, सोम आणि यादववंश याच्यातील संबंध स्पष्ट आहे सोमवंशाच्या मतिनाराची मुलगी गौरी हिचें सूर्यवंशाच्या प्रसेनजिताशीं किंवा त्याचा मुलगा यौवनाश्व ( २ रा )याच्याशीं लग्न लागलें होतें आणि म्हणून ती मान्धातृची आजी किंवा आई होती* या विधानालाच परंचसे आधार मिळतात कसेंहि असलें तरी मतिनार हा प्रेसनजिताचा समकालीन होता

मान्धातृनें शशबिन्दूची मुलगी बिन्दुमती चैत्ररथी हिशीं लग्न केलें. हा शशबिन्दु यादववंशातील चैत्ररथाचा विख्यात पुत्र असावा कारण याविषयीं अनेक पुरावे आढळतात तेव्हां शशबिन्दु आणि दुसरा यौवनाश्व समकालीन ठरले

अनुवंशातील उशीनराचा पुत्र शिबि याला चार पुत्र होते त्यानीं वृषदर्भ, सुवीर, कैकय ( किंवा कैकेय ) आणि मद्र अशीं पश्चात चार घराणीं स्थापन केलीं *सूर्यवंशाच्या त्रिशंकूनें एका कैकेय राजकन्येशीं लग्न लाविलें,* या वरून कैकेयघराणें त्रिशंकूच्या पूर्वी स्थापन झालें असलें पाहिजे आणि म्हणून शिबीला त्रिशंकूच्या आधींच्या दोन तीन पिढ्यात घालतां येणार नाहीं.

यापुढील कालैक्य म्हणजे, कान्यकुब्जघराण्यातल्या *जह्नूनें युवनाश्वाच्या कावेरी नांवाच्या मुलीशीं किंवा नातीशीं लग्न केलें.* हा युवनाश्व सूर्यवंशातील दुसरा युवनाश्व असावा, कारण ज्या अर्थीं या नांवाचा नुसताच उल्लेख केला आहे *त्या अर्थी जो प्रख्यात असेल तोच धरला पाहिजे,* पण पहिला युवनाश्व प्रख्यात नव्हता तेव्हां दुसराच असला पाहिजे, हें ठरतें. तेव्हां जह्नूला पुरुकुत्साच्या शेजारी बसविला पाहिजे. *जह्नु राजा प्रख्यात होता (याच्याच नावावरून गंगेला जाह्नवी असें नाव आहे )* पण तो युवनाश्वपुत्र चक्रवर्ती मान्धातृ याच्या मृत्यूनंतरच पुढें आला असावा, तेव्हां *यांची पिढी मान्धातृच्या पुढची एक होते,* व त्याची पत्नी बहुधा युवनाश्वाची नात होती.

यापुढें विश्वामित्र आणि त्याचे समकालीन यांचा विचार करूं. *या ठिकाणीं मागील सूचना* लक्ष्यात आणून विश्वामित्र नांवाचा थाय पुरुष घेतला पाहिजे, कारण विश्वामित्रगोत्राचे अनेक वंशज आहेत प्रसिद्ध विश्वामित्र कान्यकुब्ज देशाचा राजा गाधी किंवा गाधिन् याचा पुत्र असून याचें क्षत्रिय नाव विश्वरथ होतें. याचा सूर्यवंशाशीं निकट संबंध होता. याच्या पित्याची आई पौरुकुत्सा किंवा पौरकुत्सी, पुरुकुत्साची मुलगी किंवा कोणी वंशजा होती, हा *पुरुकुत्स अयोध्येचा ( या नावाचा ) प्रख्यात राजाच असला पाहिजे* स्त्रियां पैतृक नामावरून सामान्यतः हीं पुरुकुत्साची मुलगी असावीशीं वाटतें, पण मागं जी सूचना केली आहे *तीवरून तसेंच असेल असें नाहीं, ती* चार पाच पिढ्या पुढची वंशजाहि असू शकेल या नात्यासंबधीं जास्त विवेचन जरूर असल्यानें व त्या योगानें आपले मागील सिद्धांत व सूचना लावून पाहाण्याची संधी येत असल्यामुळें या नात्याविषयीं आतां विचार करू.

जर पौरुकुत्सा पुरुकुत्साची मुलगी असेल तर विश्वामित्र तीन पिढ्या त्याच्या खालीं येईल, आणि जर निपणती *असेल तर सहा पिढ्या खालीं येईल* याला आणखी एक पिढी जोडली पाहिजे, कारण वास्तविक विश्वामित्र व त्याच्या सत्यवती बहिणीचा मुलगा जमदग्नि एकाच वेळीं जन्मले, तेव्हां विश्वामित्र गाधीच्या खालीं दोन पायऱ्या येतो वरील मत ग्रहण केल्यास विश्वामित्र गाधीच्या चार किंवा सात पिढ्या खालीं येईल ' पौरुकुत्सा " वरून निघणारें नक्की नातें *दुसऱ्या गोष्टींवरहि अवलंबून आहे कथापुराणातून पुरुकुत्साखालून गादीवर बसणारा नववा राजा जो सत्यव्रत* त्रिशंकु आणि त्याचे वारस यांना विश्वामित्राशीं निकट संबंध जोडलेला दृष्टीस पडतो त्रिशंकु व वसिष्ठ यांचें वैर, *विश्वामित्राशीं त्याचें सख्य, त्रिशंकुपुत्र हरिश्चंद्र यानें वरुणाला* घेतलेला नवस, रोहितावद्दल शुनःशेपाचा बलि, विश्वामित्रानें शुनःशेपाला पुत्र केल्याची कथा इत्यादि गोष्टी *पौरुकुत्सा पुरुकुत्साची मुलगी धरून शक्य दिसत नसून नवव्या पिढींतलि वंशजा घेतल्यानें जमतात* गाधीची मुलगी सत्यवती हिचें ऋचीक भार्गव ऋषीबरोबर लग्न लागलें होतें. *तिचा मुलगा जमदग्नि हा विश्वामित्राबरोबरच जन्मला* जमदग्नीला बरींच मुलें होतीं त्यांपैकीं राम सर्वांत धाकटा होता

*यावरून पारगिटर म्हणतो कीं, गाधीचा पिता पुरुकुत्साच्या चार पांच पिढ्या मागचा, विश्वामित्र, त्रिशंकु,हरिश्चंद्र जमदग्नि, आणि अजीगर्त ( शुनःशेपाचा पिता )* हे *समकालीन, आणि रोहित, शुनःशेप आणि जामदग्न्यराम हेहि समकालीन होते.*

जमदग्नि आणि राम यांचीं कालैक्यें आणखी आहेत. हैहयांचा राजा कार्तवीर्यार्जुन आणि भार्गव यांच्यामधील लढायांवरून अर्जुन हा जमदग्नीचा समकालीन होतासें दिसतें हरिश्चंद्राच्या वेळेपासून यांची कारकीर्द सुरू होऊन रोहित आणि हरित यांच्या कारकीर्दीपर्यंत लांबली होती

परशुरामसंबंधें स्पष्टीकरण पारगिटर असें करतो कीं अर्जुनाचा नातू तालजंघ यानें हैहयांच्या पाच जाती केल्या हा रामाचा तरुण समकालीन होता व रामाच्या अंतकाळीं

किंवा मृत्यूनंतर महाराष्ट्रात यराच प्रबल झाला. रामानें एकवीस वेळा पृथ्वी निःक्षत्रिय केल्याबद्दलची कथा खरी नसून, रामाच्या कार्मी तालजंघ-हैहय घातल्यास तें कांहींसें सत्य होईल; कारण त्यांनीं उत्तर हिंदुस्थान पादाक्रांत करून सर्व राजांनां मांडलिक बनविलें होतें. भार्गव आणि हैहय यांनीं आपलें जुनें वैर विसरून एकत्र होऊन दिग्विजयास प्रारंभ केला असावा. व हा दिग्विजय ब्राह्मणांनीं रामाच्या अंगीं लाविला. याचें हुबेहूब प्रतिरूप मराठ्यांच्या इतिहासांत सापडतें. ब्राह्मण आणि सेना एकत्र झाल्या होत्या. ते देशावर स्वाऱ्या करून तो कायमचा पादाक्रांत करीत नसत तर दर वर्षी मोहिमा काढीत व पुन्हां परत येत. अशा प्रकारच्या अर्धराजक चाललेल्या उच्छेदक स्वाऱ्यांना ( तालजंघ-हैहयांचें राज्यहि पण असेंच क्षणिक चाललें होतें ) एकवीस वेळा क्षत्रियांचें निर्मूलन असे नाव देणें गैर होणार नाहीं. आणखी सादृश्य दाखवावयाचें झाल्यास मराठ्यांच्या अमदानींत ज्याप्रमाणें पूर्वीं नादिरशाहाच्या आधिपत्याखालीं एकदा आणि अफगाणांनीं अहमदशहाच्या नेतृत्वाखालीं बारदा हिंदुस्थानावर स्वाऱ्या केल्या, त्याचप्रमाणें हैहयांनीं पादाक्रांत केल्यामुळें उडालेल्या धांदलींत पह्लव, पारद, कांबोज, शक आणि इतर टोळ्या वायव्येकडून हिंदुस्थानांत घुसल्या.

यानंतर, काशीचे राजे आणि हैहय राजे यामधील कालनिर्णयाचा प्रश्न निघतो. यांच्यांतील वैराला हैहय वंशांतील भद्रश्रेण्यापासून प्रारंभ होऊन, तें वीतहव्यापर्यंत टिकलें कथानकांतून दिवोदास नांवाच्या काशीच्या एका राजाला भद्रश्रेण्याच्या मुलाचा समकालीन करून, त्यालाच किंवा त्याचा मुलगा प्रतर्दन याला वीतहव्याचाहि समकालीन म्हटलें आहे. आता एकच दिवोदास घेतल्यास हें अनेक कारणांवरून असमंजस दिसतें. भद्रश्रेण्य आणि वीतहव्य यांच्यात नऊ दहा पिढ्यांचें तरी अंतर आहे. तेव्हां काशीवंशांत दोन दिवोदास, मध्यें सहा सात राजे सोडून, होऊन गेले.

पहिला दिवोदास भद्रश्रेण्याच्या जरा पूर्वीचा होता असे दिसतें. आणखी कांहीं माहितीवरून सगर आणि विदर्भाचे राजे यांच्याशीं तुलना करून प्रतर्दनाचें स्थान ठरविता येणें शक्य आहे.

सगराला दोन बायका होत्या. त्यांपैकीं एक विदर्भकन्या वैदर्भी हा विदर्भ यादववंशांतील ज्यामघाचा मुलगा असला पाहिजे. तेव्हां हा सगराच्या जरा अलीकडला आहे काशीचा राजा अलर्क प्रतर्दनाचा नातू दिसतो व लोपामुद्रेच्या आशीर्वादानें त्याला दीर्घायुष्य लाभलें अशी कथा आहे. लोपामुद्रा निमि नांवाच्या कोणा एका विदर्भराजाची कन्या असून तिनें अगस्त्यऋषीशीं लग्न लाविलें. विदर्भवंशात निमिचें नांव मुळींच नाहीं, तथापि विदर्भानंतरच्या राजांचीं नांवें स्पष्ट नसल्यानें, तो विदर्भानंतरच्या नजीकच्या पिढींतील असावा. कारण दाशार्हराज्यांच्या पुढील सर्व राजकन्यांनीं त्यांच्या नांवावरून दाशार्ही असें संबोधीत. तेव्हां लोपामुद्रेचा कृति राजाशीं व अलर्काचा धृति राजाशीं ( हे दोनहि विदर्भ राजे होत ) समकाल आहे. यावरून प्रतर्दन आणि सगर हे समकालीन असून, त्या उभयतांनीं तालजंघ-हैहयांचें वर्चस्व मोडून टाकलें असें सिद्ध होतें.

आतां दिष्टवंशांतील अवीक्षित्पुत्र चक्रवर्ती मरुत्त आणि त्याच्या वंशांत तृणबिन्दु यांचें स्थान ठरविण्याचा कांहीं प्रयत्न करूं. अवीक्षित किंवा त्याचा पिता करंधम त्रेतायुगाच्या आरंभाला होते असें म्हटलें आहे. आणि तृणबिन्दु "त्रेतायुगाच्या तिसऱ्या मुखांत" ( त्रेता-युगमुखे तृतीय, वायु, २, २४, १५ ), म्हणजे त्या युगाच्या तिसऱ्या पादाच्या आरंभाला होऊन गेला वंशावळींत कोणत्या ठिकाणीं तें युग सुरू झालें असें समजावें हें स्पष्ट नाहीं. असें म्हटलें आहे कीं, जामदग्न्य राम त्रेतायुगांत, आणि दाशरथि राम त्रेता आणि द्वापर युगांच्या मध्यंतरीं होता. याच्या पुढील विधान, विश्वामित्र याच मध्यकालीं होऊन गेला, हें वरील दोन गोष्टींशीं अगदीं विसंगत दिसतें, आणि कदाचित् तो "कृत आणि त्रेतायुगांच्या मध्यकालीं" होऊन गेला असें समजणें रास्त होईल. व अशा तऱ्हेनें वंशावळींत चांगले भाग पाडतां येऊन जो आपल्या कार्याला चांगला उपन्यास होईल यावरून अजमासानें मरुत्ताला जामदग्न्य रामाच्या कालीं आणि तृणबिन्दूला सूर्यवंशांतील अंबरीषाच्या पुढील पिढींत टाकता येईल.

सोमवंशात मतिनाराचें स्थान तर ठरविलेंच आहे आता दुष्यन्त आणि त्याचा पुत्र भरत यासंबधीं विचार करूं.

दुष्यन्तानें विश्वामित्रकन्या शकुन्तला इच्याशीं लग्न लाविल्याचें प्रसिद्ध आहे. जर हा विश्वामित्र पहिला प्रख्यात विश्वामित्र असेल तर दुष्यन्ताला हरिश्चन्द्र किंवा रोहित यांच्या पंक्तीला व भरताला त्याच्या लगेच पुढें बसवावें लागेल, पण असें केल्यानें दोन तीन गोष्टींना बाध येतो. एकतर भरताच्या मागून येणाऱ्या राजांचा हैहयांनीं धुव्वा उडवून द्यावयास पाहिजे होता पण तो दिलेला दिसत नाहीं. भरताला तीन वैदर्भी राण्या होत्या; व विदर्भाचें स्थान यानंतरचें हें मागे दाखविलेंच आहे. भरताच्या मागूनचा दुसरा राजा भुमन्यु याचें लग्न, त्याच पुढील कालांत झालेल्या दाशार्ह राजाच्या मुलीशीं [ किंवा वंशजेशीं ] लागलें होतें. या तीन गोष्टींवरून वरील प्रश्नाचा उलगडा होतो व विश्वामित्र याचा अर्थ विश्वामित्राचा एक वंशज असा घेतल्यानें आपल्या पहिल्या विधानालाहि बाध येऊं शकत नाहीं. तेव्हां सुदैवानें अनुमानें भुमन्यूनें दाशार्हकन्येशीं विवाह केला, भरत नार पिढ्या पुढें झाला आणि

विश्वामित्राचा लगतचाच वंशज होता. यावरून भुमन्यूचा काल दाशराज्ञीनंतरचा असून तो सूर्यवंशाच्या नाभागाशी समकालीन, भरत पहिल्या दिलीपाशी आणि दुष्यन्त अंशुमानाशी समकालीन होता हें ठरतें.

या निर्णयावरून मतिनार आणि दुष्यन्त याच्यांत मोठी खिंड पडते, कारण त्यांच्यामध्यें सारीं दोन तीनच नावें आहेत. पण दुसऱ्या गोष्टी लक्ष्यांत घेतां याचें फारसें आश्चर्य वाटावयास नको

पूरूचें राज्य मध्यदेशाच्या मध्यभागीं—जी सर्वकालीं युद्धमान कुलाची रणभूमि बनली होती—असल्यानें, त्यांत चिरकाल अंदाधुंदी माजून राजपरंपरा नष्ट झाली असावी मतिनाराचें राज्य चक्रवर्ती शशबिन्दूनें नैर्ऋत्येकडून येऊन बळकावलें व त्यानंतर अयोध्येचा मान्धातृ, वायव्येकडील उशिनारपुत्र शिबि, माहिष्मतीचा कार्तवीर्यार्जुन, दिष्टवंशातील अविक्षितपुत्र मरुत्त, हैहयाचें वर्चस्व ( व वायव्येकडून येणाऱ्या टोळधाडी ) आणि शेवटीं अयोध्येचा सगर, याच्या काळच्या सुमारास त्याला चिरकाल ग्रहण लागलें. सगराच्या वेळीं दुष्यन्त तरुण असून पौरव गादीवर आपण बसूं यांविषयीं त्याला मुळींच आशा नसावी तेव्हां, करन्धयाचा पुत्र मरुत्त हा निपुत्रिक असल्यानें त्यानें दुष्यन्त पौरव याला दत्तक घेतलें, आणि पुढें दुष्यन्तानें आपली गादी परत मिळवून तो वंश चालविला. या विधानावर आपला चांगला विश्वास बसतो. यावरून दुष्यन्ताला पौरवांचा " वंशकर " असें जें संबोधण्यात येतें त्याची यथार्थता दिसून येते

भारताच्या कथेवरून दुसरे संबंध उघडकीस येतात. अंगिरस कुळांत दोन ऋषी होऊन गेले एक उतथ्य व दुसरा त्याचा धाकटा भाऊ बृहस्पति. उतथ्याला त्याच्या ममता नांवाच्या स्त्रीपासून दीर्घतमस् नांवाचा जन्मान्ध पुत्र झाला. व बृहस्पतीला ममतेपासूनच भरद्वाज नावाचा पुत्र झाला मोठेपणीं त्याला गंगेत टाकलें असता तो वहात पूर्वेकडील बलिराज्यांत आला. तेथें त्याला वर काढण्यात येऊन, त्यानें बलीच्या इच्छेनुसार राणीच्या ठिकाणीं अंग आणि इतर चार पुत्र उत्पन्न केले. अशा प्रकारचा एक उतथ्य व ममता याचा पुत्र दीर्घतमस् नावाचा अंध ऋषि असून, नदींत बुडत असतांना त्याला वाचविण्यांत आलें अशाविषयीं ऋग्वेदांत उल्लेख आहे. भारद्वाज ही व्यक्ति इतकी स्पष्ट नाहीं. कारण एकीकडे बृहस्पतीचा वडील मुलगा भारद्वाज याला काशीच्या दुसऱ्या दिवोदासाचा समकालीन म्हटलें आहे तर दुसरीकडे भरताशीं त्याचा अंतकालीं संबंध जोडण्यात आला आहे कांहीं कथानकांतून भरताची सर्व मुलें मेल्यावर त्यानें भरद्वाजाला आपला पुत्र केला व तोच पुढें राजा वितथ म्हणून प्रसिद्ध आहे अशी, तर दुसऱ्या कांहींतून, भरद्वाजानें भरताकरितां यज्ञ केला व त्याच्या पासून वितथ नांवाचा पुत्र जन्मास आला, अशी माहिती सांपडते जर दुसरा दिवोदास व भरद्वाज समकालीन धरले तर भरद्वाजानें किंवा त्याच्या पुत्रानें भरताच्या अंतकालीं वितथ नावाच्या त्याच्या पुत्रास जन्म दिला, हेंच अनुमान बरोबर दिसतें.

सोमवंशाच्या अजमीढापासून उत्तर आणि दक्षिण पंचाल घराणीं निघालीं यांचें स्थान समजणें फार महत्त्वाचें आहे. प्रत्यक्षपणें तें ठरविण्यास कांहीं मुद्दा न सांपडल्यानें, अप्रत्यक्ष पुरावे कांहीं सांपडतात कीं काय हें पाहूं यराचसा पूर्ण असलेला सूर्यवंश मापनाला घेऊन जर आपण भरताच्या पुढील पिढ्या मोजूं लागलो तर अजमीढाची पिढी ऋतुपर्णाच्या किंवा त्याच्या नंतरच्या एका पिढीशीं जोडतां येईल, व पुढें उत्तरपंचाल वंशातील पिढ्या मोजूं लागलों तर सृंजय हा दशरथ आणि राम याचा समकालीन होईल, व या ठिकाणीं आपण कालैक्यें गाठल्यानें आपली मोजणी बरोबर झाली असें होईल या पिढींत पुष्कळ वंशातून कालैक्यें आलेली आहेत

विदेहाचा सीरध्वज जनक ( सीतेचा पिता ), अंगाचा लोमपाद आणि वैशालीचा राजा प्रमति हे दशरथाशीं समकालीन होत

राम आणि त्याचा भाऊ शत्रुघ्न याचा यादव घराण्याशीं संबंध जोडणारी एक कथा आहे. प्रारंभीं ती अविश्वसनीय वाटली तरी इतर पुराव्यावरून तींत तथ्य सांपडतें व कांहीं महत्त्वाच्या प्रादेशिक गोष्टींचा उलगडा पडतो. त्यांत ज्याला मधु-दानवांचा राजा म्हटलें आहे, तो वास्तविक यादववंशातील मधु राजा होय. त्या कथेवरून पाहातां, मधूचें म्हणजे यादवाचें राज्य गुजराथेपासून यमुनेच्या तीरीं असलेल्या मधुवनापर्यंत पसरलें होतें त्याच्या चवथ्या पिढींतील वंशज सत्वत असून सत्वतपुत्र भीम रामाच्या कालीं गादीवर होता. शत्रुघ्नानें लवण नांवाच्या राजपुत्राला मारून मधुवन तोडलें व त्या जागीं मधुरानगर स्थापिलें रामाच्या मृत्यूनंतर भीमानें ती नगरी जिंकून तो तेथें राहिला व रामपुत्र कुश कोसल येथ राज्य करीत असतांना भीमपुत्र अन्धक मथुरेच्या गादीवर होता यावरून वरील गोष्टींत ऐतिहासिक तथ्य दिसतें.

वंशावळींतून भीम असें नांव आढळत नाहीं पण त्याच्या जागीं सात्वत असें नाव आहे. वंशावळी आणि कथा यांचा अंधकाला सत्वताचा नातू म्हणून, त्याला मधूच्या सहाव्या किंवा आठव्या पिढींत घालण्यांत एकमेळ दिसून येतो. तेव्हां यादव सत्वताला दशरथाशीं, सात्वताला रामाशीं आणि अन्धकाला कुशाशीं आपणास एककाल करितां येईल आणि मधु व सूर्यवंशातील शतरथ हे समकालीन होते असें म्हणतां येईल.

सत्वताचा दुसरा एक मुलगा भजमान यानें सृंजयाच्या एका किंवा दोघी मुलींशीं लग्न लाविलें. हा सृंजय उत्तरपंचाल घराण्यातील सृंजय रामाच असावा. यावरून सृंजय हा सात्वताचा व त्यावरोवर रामाचाहि समकालीन ठरतो.

व वर जें यांचें स्थान ठरविलें आहे त्याला यानें दुजोरा मिळतो. आजमीढालाहि ऋतुपर्णाशेजारी किंवा त्याच्या लगेच पुढें स्थान दिलें पाहिजे सृंजयाच्या स्थानावरून ऋग्वेदांत वारं-वार उल्लेखिलेल्या दिवोदास आणि सुदास यांची स्थानें ठरविण्याला मदत होते.

सृंजयाला मुद्गल इत्यादि पांच पुत्र होते. " माझे पांच (पंच) पुत्र पांच राज्यें रक्षण करण्याला समर्थ (अलम्) आहेत " असें तो म्हणतो यावरून पंचाल (पंच+अलम्) हें नवीन नांव पडून, जुनें ' क्रिवि ' असें जें देशाचें किंवा लोकांचें नांव होतें तें नष्ट झालें. या पंचालांची सोमक व त्याचा पुत्र जन्तु याच्या कारकीर्दीपर्यंतच भरभराट होती; पुढें हें घराणें पृषताच्या कालापर्यंत नामशेष झालें (तेथ-पर्यंत वंशावळीत खाडे दिसून येतात )

ऋक्ष (पहिला), संवरण आणि कुरु यांचीं स्थानें अज-मीढानें ठरवितां येतात. पंचालांनीं संवरणाला त्याच्या राज्यांतून हाकून दिल्यावर, तो सिंधूच्या तीरीं पुष्कळ दिवस राहिला पुढें वसिष्ठ (वसिष्ठकुलांतील एक ) त्याच्याकडे येऊन त्याचा पुरोहित झाला व वसिष्ठाच्या प्रोत्साहनानें संवरणानें आपलें राज्य परत मिळविलें. पंचाल मुद्गलानंतरचे असल्यानें ही संवरणाची अधिकारभ्रष्टता मुद्गलाच्या नंतरची असली पाहिजे, आणखी असें दिसतें कीं ही गोष्ट दिवोदा-साच्या कालापूर्वींहि आली नसली पाहिजे. कारण इंद्रोत आतिथिग्व ( बहुतेक हा दिवोदासपुत्र असावा ) ऋक्षाच्या पुत्राशीं उघडपणें स्नेहभावानें वागत असे (ऋ. ८. ६८ [५७], १५-१७) तेव्हां ऋक्ष दिवोदासाचा समकालीन दिसतो.

संवरणाला सुदासानें अधिकारभ्रष्ट केलेंसें दिसतें. ऋग्वेदांतील एका सूक्तांत (ऋ ७. २०, २ ) त्याला युद्धें करावीं लागलीं व त्यानें आपलें राज्य वाढविलें असा उल्लेख आहे. त्याचें दाशराज्ञयुद्ध (७ १८; १९, ३; ६; ८) कदाचित् या गोष्टीशीं संबद्ध असूं शकेल. तें युद्ध परुष्णी (७. १८, ८-९) ( हल्लींची रावी नदी ) जवळ झालें; तेव्हां पौरवाच्या राज्यांतून तिकडे जाण्याखेरीज दुसरा त्याला मार्गच नव्हता. आणि ज्या अर्थी भरत लोक ( सोमवंश ) त्याचे शत्रु होते, त्या अर्थी त्यास प्रथम त्यानें जिंकलें. याचा परिणाम असा झाला कीं यादव ( मथुरेचे यादव ), शिवि ( आनव ) द्रुह्यु ( द्रुह्यूचे वंशज गांधार ), ( मथुरेच्या पश्चिमेकडील ) मत्स्य, तुर्वश ( तुर्वसूच्या वंशांतील कोणी राजा ) व इतर लहानसहान कुळांतील लोक पश्चिमेकडून त्याच्यावर उठले, आणखी, " वृद्ध कवष " या लढाईंत पाण्यांत बुडाला (७ १८, १२). एका तुर नावाच्या ऋषीनें जनमेजयपारिक्षिताला ( संवरणाच्या पणतूला ) महाभिषेक केला. याच्या पित्याचें नांव कवष होतें; हा कवष संवरणाचा समकालीन असला पाहिजे ( ऐतरेय ब्राह्मण २. १९; ७. ३४; ८. २१ ). हे दोनहि कवष एकच होते, कारण " वृद्ध कवष" सुदासाच्या विरुद्ध बाजूला म्हणजे संवरणाच्या बाजूला होता आणि कवषपुत्रानें संवरणाच्या पणतूला अभि-षेक केला.

पौरवांची अधिकारभ्रष्टता सहदेवाच्या कारकीर्दींत व पुढें सोमकाच्या कारकीर्दीच्या आरंभींहि तशीच होती. कारण सोमकानें यमुनेच्या तीरीं जे यज्ञ केले तें त्याचें राज्य तेथें असल्याखेरीज होणें नाहीं. सोमकाच्या कारकीर्दीच्या प्रथम भागांत संवरणानें आपलें राज्य परत मिळविलें याविषयीं अनेक पुरावे देतां येतील. पहिला, सोमक आणि जन्तु यांच्या कार्कीर्दींत या पंचाल घराण्याला बरीच उतरती कळा लागली होती हें मागें सांगितलेंच आहे. दुसरा, सुदासाच्या स्तुतिपर सर्व सूक्तें वसिष्ठाचीं म्हणजे वसिष्ठकु-लजांची आहेत. एकदा फक्त सोमक युवराज असतांना त्याची स्तुति केलेली आढळते. ही गोष्ट, वसिष्ठ संवरणाकडे गेला व त्याला राज्य परत मिळ-विण्याच्या कामीं त्यानें मदत केली, या मागील विधानाला पुष्टि देते. सोमकाचा पक्ष सोडून संवरणाला मिळण्याला वसिष्ठाला कांहीं तसेंच मोठें कारण झालें असलें पाहिजे. त्याची वागणूक सूडाची दिसते व याचें कारण सुदासाच्या वंशजांनीं त्याचे पुत्र मारले हें असावें. तिसरा पुरावा म्हणजे सोमकानें आणखी जास्त पुत्र मिळावेत म्हणून आपल्या पहिल्या जन्तु नावाच्या मुलाचा यज्ञ केला. ही कथा स्पष्ट करण्याला दुसऱ्यातील अनुमानाची मदत होते; कारण ज्या ऋत्विजानें असला अमानुष विधि केला तो वसिष्ठ तर खास नसला पाहिजे किंवा त्याची या कामाला संमति नसली पाहिजे. ×

या सर्व कारणांवरून संवरणाला सुदास किंवा सहदेव यांचा आणि कुरूला सोमक किंवा जन्तु यांचा समकालीन करावें लागतें. कुरूची पुष्कळ प्रजा होती. त्यानें कुरुक्षेत्राला आपलें नांव देऊन, प्रयागच्या पुढें आपलें राज्य वाढविलें; त्यावरून त्यानें पंचाल काबीज केला असावासें दिसतें. त्याची उन्नति म्हणजे पंचालाचा ऱ्हास समजावा. अजमीढापासून संवरणा-पर्यंत जो खाडा दिसून येतो त्याला कारण उत्तरपंचालाचें वर्चस्व असतांना सोमवंशाला ग्रहण लागलें होतें. जन्तूपा-सून पृषतापर्यंतचा खाडा याच्या उलट स्थितीचा द्योतक आहे.

वसु चैद्योपरिचरानें नवीन चेदि व मगध घराणीं स्थापन केलीं. वंशावळीप्रमाणें तो कुरूच्या खालीं पांच पिढ्या व म्हणून दुसऱ्या जनमेजय परिक्षितानंतरचा होता. याला जनमेजयाच्या तीन चार पिढ्या खालीं न्यावा. म्हणजे, ययातीचा त्याच्या पुरु व इतर वंशजांजवळ असलेला रथ जनमे-जयाकडून वसूकडे आणल्याबद्दलची कथा बरोबर पटते.

× ज्यानें वसिष्ठाला यातुधान असें संबोधून, त्याच्या तोंडावाटें ( ७ १०४, १५ ) ही ऋचा काढविली, तो हाच ऋत्विज असावा.

सोमवंशातील अयुतनायनें पृथुश्रवसाच्या मुलीशीं लग्न केलें तो अनुतायुगच असावा आणि पृथुश्रवस दक्षिण पंचाल वंशातील पृथुराजा असावा, असें दिसतें

सोम, पचाल, आणि द्विमीढवंश याच्या शेवटच्या भागातून बरीचशीं कालैक्यें आहेत द्विमीढवंशातील कृत हा हिरण्यनाभ नावाच्या कोसल राजाचा शिष्य होता, तेव्हां तो हिरण्यनाभाचा तरुण समकालीन असला पाहिजे दक्षिण पंचालाचा ब्रह्मदत्त आणि सोमवंशातील प्रतीप समकालीन होते. कृताच्या नावानंतर ज्याचें नाव आलें आहे त्या उग्रायुधानें जनमेजय दुर्बुद्धि आणि दक्षिण पंचालाचे सर्व नीप राजपुत्र आणि उत्तर पचालाचा पृषताचा पिता किंवा पितामह जो नीप ( नील ) यालाहि ठार मारलें, आणि भीष्मानें शन्तनूच्या मृत्यूनंतर त्याला मारलें म्हणून उग्रायुध शतन्तु आणि जनमेजय याचा तरुण समकालीन आणि भीष्माचा वृद्ध समकालीन होतो या कालैक्यापासून कांहीं मनोरंजक गोष्टी उघडकीस येतात उग्रायुधाला कृताचा पुत्र असें म्हणण्यात येतें पण त्याच्यात चार पांच पिढ्यांचें अंतर आहे हें उघड दिसतें याखेरीज, प्रतीपाची ब्रह्मदत्ताशीं व शन्तनूचीहि ब्रह्मदत्ताच्या तिसऱ्या पिढीशीं समकालीनता, प्रतीप आणि शन्तनु याच्यामध्यें एक दोन पिढ्यांचा खाडा असल्याचें दर्शविते. महाभारतात किंवा पुराणातून कोठेंहि अशा प्रकारचा खाडा असल्याचें दिग्दर्शित केलें नाहीं, तथापि ऋग्वेदावरून तें सिद्ध आहे. कारण देवापि शन्तनूचा वडील भाऊ होता आणि देवापि स्वतःला आर्ष्टिषेण म्हणवितो याला सर्व ग्रंथातून एकमत आहे तेव्हां ऋष्टिषेण मध्यें घातला पाहिजे हें उघड झालें.

बाकीचे अखेरीचे समकालीन प्रसिद्धच आहेत तेव्हां त्याच्याविषयीं कांहीं सांगण्याची जरूरी दिसत नाहीं

वरील संशोधिलेलीं कालैक्यें एकाच जातीच्या पुराव्यावरून किंवा एकाच उपलब्ध माहितीवरून प्रतिपादिलीं नसून ऋग्वेदापासून तों रघुवंशापर्यंतच्या सर्व जातींच्या ग्रंथावरून, निरनिराळ्या माहितीवरून व कथावरून ताडिलेलीं आहेत

बहुतेक सर्व वंशावळीच्या याद्या कौरवपांडव युद्धापर्यंतच आहेत. कांहीं ग्रंथातून कांहीं कांहीं घराण्यातील पुढील थोड्या पिढ्या किंवा या युद्धानंतर कांहीं वंशात जे राजे होतील त्यांचीं नांवें दिलेलीं आढळतात. तथापि सर्व वंशावळीसंबंधींच्या सामुग्रीत हें युद्ध सर्वसमाप्तिदर्शक म्हणून प्रामुख्यानें नजरेस येतें. जणू काय पूर्ण समृद्धि, सुधारणा आणि ज्ञान याच्या कालानंतर अव्यवस्था आणि अंधकार यांचा काल सुरू झाला. कारण कोणतें का असेना, तो प्रसंग अत्यंत महत्त्वाचा होता यांत संशय नाहीं. तेव्हां या समंदानीच्या कालापासून मागें सर्व वंशावळी कालानुक्रमें लाविल्या पाहिजेत

या वंशावळींना कालक्रमाच्या दृष्टीनें काय उपयोग असा प्रश्न साहजिक उद्भवतो. इक्ष्वाकूपासून भारतीय युद्धापर्यंत यांत त्याण्णव नावें आहेत. तेव्हां सबंध काळ १४०० वर्षांपेक्षा कमी असणार नाहीं मान्धातूचा काळ युद्धापूर्वी अकरा शतक, सगर, भरत आणि भगीरथ यांचा काल आठवें शतक, दाशरथी राम पांचव्या शतकाच्या अर्धांत, आणि दिवोदासापासून सोमकापर्यंतचे पांचाल राजे चौथ्या व पांचव्या शतकात आहेत

वरील पार्गिटरचें विवेचन फारसा फरक न करिता दिलें आहे यांत आमच्या मताप्रमाणें फेरफार करावे लागतात ते येणेंप्रमाणें

( १ ) दिवोदास व सुदास हे पुरु होते हें ऋग्वेद कबूल करतो, पण पुरूंम पुन्हा दिवोदासाच्या शत्रूतघालतो. त्यामुळें या कुलाची कुरुक्षेत्रीं स्थापना झाल्यानतर त्याची पूर्वपरंपरा यविष्ठ व अजमीढ यामार्फत देश्य पुरु घराण्याशीं जोडली गेली असावी अशी कल्पना उत्पन्न होते अजमीढापासून कांहीं राजाकडे दिवोदासाचें पूर्वजत्व स्थापित झालें असावें व अशानें दिवोदासवंशजाचा परकेपणा गेला असावा. ही कल्पना केली म्हणजे सुदासाला त्याच्या पश्चिमेकडील राजानीं वेढलें अशी कल्पना करण्याचें, व तो पश्चिमेकडून आला ही ऋग्वेदोक्त पुराव्यानें सिद्ध होणारी गोष्ट दुर्लक्षिण्याचें प्रयोजन ठरत नाहीं. अजमीढापासून ऋक्षापर्यंत यादी नाहीं तिच्या अभावाचेंहि स्पष्टीकरण यानें होईल. नीलापासून यविष्ठापर्यंतचे राजे हे स्थानिक असावेत आणि त्याच्या वंशजास नाहींसें केल्यानंतर म्हणजे ऋक्षापासूनच्या चारपाच पिढ्यापर्यंत अजमीढवंशजता पैजवनास प्राप्त झाली असावी. ऋक्ष हा कोणी दिवोदासाशीं समकालीन देश्य पुरु घराण्याचा राजा असावा

( २ ) दिवोदासाशीं समकालीन कुत्स, आयु, त्याचा शत्रु तुर्वयाण याच्या अस्तित्वाबद्दल ऋग्वेद साक्ष देतो पण या याद्या यासबंधानें मूक आहेत पुरुकुत्स व त्रसदस्यु यांचा उल्लेख सूर्यवंशात केला आहे पण त्याशीं समकालीन असा एक दिवोदास काशीवंशात दाखविला आहे पण तें कालैक्य भ्रामक आहे. का कीं, त्या वेळेस कुत्स वगैरे मंडळी सरहद्दीवर होती हें स्पष्ट दिसतें. आणि काशीवंशाइतका दूरचा दिवोदास असता तर त्याचा पजाबात उल्लेख न येता म्हणून असें समजावें कीं, दिवोदासाशीं समकालीन जे कुत्स वगैरे राजे झाले त्याचा संबंध हिंदुस्थानात फारसा न आल्यामुळें त्याचीं नावें राजावलिप्रविष्ट झालीं नाहींत

( ३ ) ऋग्वेदात ज्या राजाचा उल्लेख आला आहे त्यांच्या पाठीमागें सूर्यचंद्रसंभवाचें लिगाड लावलें गेलें नाहीं तें देश्यास सूतसंस्कृतीमुळें लावलें गेलें असावें. आणि पुढें दिवोदासाला पौरवत्व याच्या अंगीं असल्यामुळेंच ययाति संभवत्व व ऐलत्व हीं लागलीं असावीत सुदासदिवोदास कथेचा दुवा निश्चयात्मक रीतीनें सूतसरस्वतींतील याद्या व वेद यामध्यें जितका संबंध उत्पन्न करितो तितका स्पष्ट संबंध दुसरा कोणताहि नाहीं

कुरुयुद्धांतील युध्यमान राष्ट्रें






मिसरी साम्राज्य ख्रि पू १४५० ( जमिनी कडील सरहद्द जाड रेघेनें दाखविली आहे )



इजिप्तचा बलाढ्य राजा दुसरा रामोसस

१ २ ३ ४ ५ ६ ७ ८ ९ १०



११ १२ १३ १४ १५ १६ १७ १८

पापपुण्याचा निवाडा ( अनीच्या पापायरसवरून )

१ हु आणि सा, २ हाथोर, ३ होरस ४ इसिस व नेफतिस, ५ नुत, ६ सेब ७ तेफनुत ८ शु ९ तमु १० हार्माचिस–पापपुण्याचा निवाडा करणार देव ११ अनी व त्याचा स्त्री थुथु १२ मस्खनेट व रेनेनेट जन्मकाल व जन्मभूमीच्या देवता १३ तराजूच्या पारड्यात टाकलेलें सदसद्विवेकबुद्धिदर्शक अनीचें काळीज ( अनीचा आत्मा मनुष्यमुखी पक्षिरूपानें त्याच्या बाजूला बसला आहे ) १४ अनीचें दैव १५ तराजूचा काटा पाहणारा अनुबिस देवता, १६ दुसऱ्या पारड्यातील पुण्यदर्शक मआतचें पीस, १७ निवाड्याचा निकाल लिहून घेणारा देवाचा कारकून थोथ १८ मृतभक्षक आमाम किंवा आमित नामक राक्षस

# बुद्धपूर्व जग.

## उत्तरभाग.

---

## प्रकरण १ लें.

### पश्चिमेकडील प्राचीन संस्कृतींचें स्थूल विवेचन.

**इतिहासक्षत्र.**—प्रस्तुत विभागाच्या पूर्वभागातील दुसऱ्या प्रकरणात विश्वोत्पत्तीपासून असुरराष्ट्रसंस्थापनकालापर्यंत मनुष्यसंभवपूर्व सृष्टीचा आणि मनुष्यसंभवोत्तर मनुष्यभ्रमणाचा इतिहास दिला आहे व जेथें इतिहास देणें शक्य नसेल तेथें त्या इतिहासाच्या संशोधनाच्या प्रचलित पद्धती दिल्या आहेत. तेथून एकदम भारतीय इतिहासाकडे अवलोकन केलें आहे आणि भारतीय राजकीय व सांस्कृतिक इतिहास जवळजवळ बुद्धकालापर्यंत आणून ठेविला आहे. आता बुद्धपूर्वकालातील जो इतिहास द्यावयाचा राहिला त्याच्याकडे वळलें पाहिजे. जो राहिला त्याचे स्थूलपणानें तीन विभाग करतां येतील. एक विभाग म्हटला म्हणजे मिसरी, असुरी–बाबिलोनी, व ईजिअन या संस्कृतींचा व चीनच्या संस्कृतीचा. ह्या सर्व संस्कृतींचा इतिहास परस्परसंबद्ध आहे. दुसरा उर्वरित इतिहासभाग म्हटला म्हणजे भारतीयांच्या पूर्वजांचा इतिहास होय. या इतिहासाचीं अंगें म्हणजे अनेक प्रकारचे अभ्यास होत. आर्यन लोकांच्या मूलगृहकालीन इतिहासाचें संशोधन, त्याचेंच पर्शुभारतीय कालीन संशोधन व आर्यन् जातींच्या पश्चिमसंचाराचें संशोधन हे मुख्यतः यात येतात. उर्वरिताचा तिसरा विभाग म्हटला म्हणजे या अधिक प्रगत संस्कृतीबाहेर जीं राष्ट्रें लोक होते त्याजविषयींचें संशोधन. व या तिन्ही विभागाकडे सविस्तर लक्ष दिलें म्हणजे प्राचीन जगाची स्पष्ट व परस्पर–संबद्ध अशी कल्पना येईल.

**इतिहाससाधनें.**—या कालाविषयीं स्थूल गोष्टी सांगावयाच्या म्हटल्या म्हणजे अत्यंत प्राचीनकालचे अवशेष पुष्कळ आहेत पण लेखस्वरूपाचे फारच थोडे आहेत. अमर्नो येथील अंकित लेख व मिटनी याचे अंकित लेख यापेक्षा अधिक प्राचीन इतक्या महत्त्वाच्या लेखाची आपणांस माहिती नाहीं. इजिप्तचें संशोधन सध्या फार जोरात चालू आहे आणि त्यामुळें नवीन माहिती दरमहा बाहेर पडत आहे. यामुळें आम्ही लिहितांना जे लिहूं त्यात एक दोन वर्षांमध्येंच किती फरक पडेल याविषयीं आज कांहींच अजमास करता येत नाहीं. या संशोधनामध्यें भारतीय इतिहासावरहि अधिक प्रकाश पडेल अशी आशा केल्यास ती गैरवाजवी होणार नाहीं.

**भारतीय व पाश्चात्य प्राचीन संस्कृतींचा परस्परसंबंध.**—भारतीय इतिहासाच्या अवगमनासाठीं प्रत्येक कालाचें विवेचन करताना सर्व जगाकडे नजर फेकली पाहिजे. ज्या प्राचीनकाळीं आपल्या देशात सुव्यवस्थित राज्यें होतीं आणि त्यांचें अस्तित्व दाखविणारें आणि प्रौढ विचार व्यक्त करणारें वाङ्मयहि होतें, त्या काळीं आज प्रगमनशील समजला जाणारा जगाचा म्हणजे यूरोपचा भाग सुधारणेच्या दृष्टीनें अत्यंत बाल्यावस्थेत होता. त्या प्राचीनकाळीं कांहीं राष्ट्रें सुसंस्कृत झालीं होतीं, नव्हतीं असें नाहीं. पण तीं राष्ट्रें आज नामशेष झालीं आहेत. आणि चीन खेरीजकरून इतरांच्या संस्कृतींचें सातत्य नष्ट झालें आहे. भारतीय संस्कृतीचा चार हजार वर्षांचा इतिहास आपणास बराचसा सातत्यानें लिहिता येतो, पण तो इतिहास जगाच्या इतर इतिहासाशीं सापेक्षतेनें लिहावयाचा झाल्यास आज या संस्कृतीशीं व राष्ट्राशीं तर उद्या त्या संस्कृतीशीं व राष्ट्राशीं संबंध येतो. पृथु, पर्शु, शक, मग, असुर, यवन इत्यादि राष्ट्रांचा उल्लेख आपल्या ग्रंथात वारंवार येतो तेव्हा त्यां राष्ट्रांच्या समकालीन प्रदेशव्याप्तीचें आणि संस्कृतीचें सामान्य ज्ञान तरी आपणांस पाहिजे असुरांची भौतिक संस्कृति आपणापेक्षा अधिक पाहून भारतीयांनीं असुरांच्या संपत्तीशीं भुताटकीचा संबंध जोडला, इत्यादि प्रकार आपण पौराणिक ग्रंथावरून पाहतोंच तर असुरांची स्थिति काय होती ? हे असुर कोण होते ? हें आपणास समजलें पाहिजे. भारतीय संस्कृतीचा बराचसा विकास होऊन ती संस्कृति जगद्व्यापी होण्याच्या मार्गास लागली तेव्हापासून इतर संस्कृतीशीं झालेलीं युद्धें व त्या युद्धानंतर उरलेले भारतीय संस्कृतीचे अवशेष या गोष्टी प्रस्तावनाखंडाच्या पहिल्या भागात वर्णन केल्या आहेत. दुसऱ्या विभागात व तिसऱ्या विभागाच्या पूर्वभागात भारतीय संस्कृतिघटना दाखविली आहे. भारतीय संस्कृतीच्या आरंभकाळीं जो जगाचा इतिहास भारतीय इतिहासाच्या दृष्टीनें विचारणीय आहे, तिकडे त्यावेळीं लक्ष देतां आलें नाहीं. आता जगाच्या अत्यंत प्राचीन संस्कृतींकडे आणि त्यांशीं भारतीयांच्या संबंधाकडे वळूं. आणि वेदकालाच्या सुमारास भारताबाहेरील जगानें संस्कृतिसंवर्धनाच्या प्रयत्नात काय यश मिळविलें तें पाहूं.

**प्राचीन संस्कृतींचें जन्मस्थान.**— ... इतिहासांत असें दिसून येईल कीं, धातूंचा उपयोग

न्यतः वाढलेला श्रमविभाग, नगरस्थापना, आणि राजशासित राष्ट्रव्यवस्था आणि सृष्टीचा मनुष्यप्राण्याकडून अधिकाधिक उपयोग या तऱ्हेची संस्कृति वाढावयास योग्य परिस्थिति, कृषिकर्म जेथें बरेंच सोपें होईल इतकी उष्णता व पाण्याचा मुबलक पुरवठा ज्या ठिकाणीं असेल तेथेंच दृष्टीस पडते. यामुळेंच नील, युफ्रेटीस, सिंधु, गंगा व यांगत्सी या नद्यांच्या आसपासचे मुलुख हे संस्कृतिवर्धनाच्या प्राचीन इतिहासात बरेच महत्त्वाचे दिसतात. प्राचीनकाळीं मनुष्यप्राण्यानें आपली करामत येथेंच दाखविली, आणि संस्कृति जेव्हां अधिक वाढली तेव्हां जगाचा अधिक थंड भाग खास उपयोगास आणता आला. प्राचीन यूरोपात मनुष्यप्राण्यास सृष्टीशीं लढावयास आणि सृष्टीवर जय मिळावयास उपयोगी पडणारी संस्कृति अधिक उष्ण आणि मुबलक पाण्याच्या प्रदेशात तयार झाली. अमेरिकेच्या सुसंपन्न भूमीचा कमी प्रगति झालेल्या ताम्रवर्ण मनुष्यास उपयोग करता आला नाहीं. पण उष्ण प्रदेशातील गुरूंची विद्या घेऊन थंडप्रदेशातील मनुष्यानीं ती अधिकाधिक वाढविली तेव्हां खास अमेरिकेंतील अलोट पण स्तिमित संपत्तीचा उपयोग करता आला.

**प्राचीन संस्कृतींचें स्थूल पर्यालोचन.**—प्राचीन संस्कृतीच्या इतिहासाचें आता थोडक्यात पर्यालोचन करूं, आणि ज्या वेळेस आपल्याकडे ऋषी व आचार्य सर्व जगाला आदर्शभूत असे विचार व्यक्त करीत होते आणि रामायणादि ग्रंथाचा पाया ज्या वेळेस रचला जात होता आणि राजवंशाची वंशावळी तयार होत होती आणि हिंदुस्थानातील अंबरीष, मान्धाता, मरुत्त इत्यादि थोर पुरुषांचीं चरित्रें कुशीलवाकडून रक्षिलीं जात होतीं, आणि प्राचीन विद्येचें एकीकरण करण्यासाठीं वेदाच्या संहिता तयार होत होत्या त्या वेळेस इतर जगात काय हालचाली दृष्टीस पडतात तें पाहूं.

जगाकडे इतक्या प्राचीनकाळीं नजर फेंकताना पहिली क्रिया ही कीं प्राचीनकाळीं जगाचा कोणता भाग वसला होता, आणि विशेष वर्णनासाठीं आपणांस कोणता भाग घ्यावयाचा याचा निर्णय करणें. आतापर्यंतच्या पुराव्यावरून एवढें म्हणता येईल कीं, मनुष्यप्राण्याची वस्ती चारहि खंडात झाली होती. विशेष वाढलेल्या संस्कृतीसंबंधानें प्रत्येक खंडाविषयीं स्थूल मानानें येणेंप्रमाणें माहिती देता येईल.

अमेरिका.—ख्रिस्ती शकाच्या दहाव्या शतकाच्या पुढें पेरू व मेक्सिको याचा इतिहास सापडतो. ख्रिस्ती शकापूर्वी काय स्थिति असावी याची आज कल्पना नाहीं. मनुष्य प्राण्याचें उत्पत्तिस्थान अमेरिका होतें असें म्हणणारेहि कांहीं शास्त्रज्ञ आहेत. प्रास्तरसंस्कृतीचे अवशेष तेथें सापडावे यात नवल नाहीं. का कीं बराचसा भाग पाश्चात्य लोक आले त्यावेळेसदेखील प्रास्तर संस्कृतींत होता. मास्टोडान हें शास्त्रीय नाव ज्यास दिलें आहे असा एक पूर्वयुगीन प्राणी अमेरिकेंत असता त्या कालातहि मनुष्यप्राणी अमेरिकेंत होता असें दाखविणारे अवशेष तेथील भूस्तरशास्त्रज्ञास परिचित आहेत.

आफ्रिका.—इजिप्त ( अबिसिनियासह ) आणि ट्युनिस हे देश सोडून उरलेले खंड विचारात घेण्याजोगें नव्हतें. ग्रीक संस्कृति इ. स. ७७६ च्या नंतर आफ्रिकेंत आलेली असावी. मोरोक्कोमध्यें जीं मोठीं पाषाणाचीं कृत्यें सापडतात त्याचा काल अज्ञात आहे.

युरोप-इजिअन.— मायसिनियन संस्कृतिची माहिती बरीच मिळाली आहे. इतर भागाची माहिती म्हणजे ख्रि. पू. १५०० च्या सुमारास तेथील लोक लोहपूर्व सांस्कृतिक स्थितींत होते

एशिया मध्यें.—फिनिशियन, बाबिलोन, असुर, अक्कड, सिरिया, सायप्रस, पालेस्टाइन ( यहुदी लोकांपूर्वींचें ), चीन या राष्ट्रांची कांहीं माहिती मिळते. फ्रिजिअन हे नंतरचे होते. यहुदी वगैरे राष्ट्रें प्राचीन खरीं पण तीं सर्व ख्रि. पू. १५०० नंतरचीं आहेत.

ख्रि. पू. १५०० च्या पूर्वीच्या कालाचें सविस्तर वर्णन करण्यासाठीं जे देश घ्यावयाचे ते असे असले पाहिजेत कीं, ज्याची संस्कृति बरीच वाढली होती. या ठिकाणीं प्रास्तरसंस्कृतीच्या पलीकडे जीं राष्ट्रें गेलीं नव्हतीं अशाचा इतिहास आपणास घेता येत नाहीं.

यूरोपीय संस्कृतीचा आरंभ ईजिअन संस्कृतीच्या रूपानें तर खास झाला होता. पण ग्रीक व मायसिनिअन संस्कृतींसुद्धांहि कांहीं आरंभ झाला होता. शिवाय युरोपच्या इतर कांहीं भागात ब्राँझचीं भांडीं करण्यापर्यंत संस्कृति वाढली होती. या सर्व परिस्थितीचा आपणास विचार करिता हें उघड होत आहे कीं, ( १ ) इजिप्त व क्रीट ( २ ) सायप्रस ( ३ ) बाबिलोनिया, खाल्डिया व असुरिया ( ४ ) फिनिशिया ( ५ ) पालेस्टाईन ( यहुदीपूर्व ) ( ६ ) हिटाइट ( ७ ) चिनी. या संस्कृतीविषयीं आपणास विशेष माहिती दिली पाहिजे.

इजिप्तची संस्कृति अधिक प्राचीन कीं बाबिलोनियांतील अधिक प्राचीन या विषयावर आज निश्चयानें सांगता येत नाहीं. संस्कृतीच्या कोणत्या विकासकालात आपण तिला बरीच प्रगत म्हणावें हा प्रश्न पुढें येतो. शिवाय कोणती तरी एक बाब लोकास सुधारलेले म्हणण्यासाठीं निश्चित केली तरी रोज निघणारे नवीन शोध जुने मत बदलावयास लावतात.

इजिप्तमधील ख्रिस्तपूर्व सात हजार वर्षांच्या सुमाराचीं मातीचीं भांडीं सापडलीं आहेत, आणि असुरिया व बाबिलोनिया या विषयींचे तज्ज्ञ ख्रिस्तपूर्व ३८०० वर्षे, ४५०० वर्षे, ७००० वर्षे इतक्या जुन्या कालाच्या गोष्टी मोठ्या धैर्यानें सांगण्यास पुढें येत आहेत. ब्रिटिश म्युझियम मधील कांहीं लेखांवर ख्रि. पू. ४५०० अशी नोंद केली आहे. आणि पेन्सिल्व्हॅनिया युनिव्हर्सिटीनें निप्पुर येथें जें संशोधन चालविलें आणि धूलिकणाचे थर जमण्याचें जे त्यानीं गणित

केलें त्यावरून ९००० वर्षांपूर्वीच्या गोष्टी सांपडल्या आहेत असें म्हणतात

खि पू १५०० सुमारचा इजिप्तचा व बाबिलोनियाचा इतिहास पाहावयाचा म्हणजे दोन्ही साम्राज्यामध्यें पाच सहा हजार वर्षें जें संस्कृतिवर्धन झालें त्याचा इतिहास पाहावयाचा निप्पुर इत्यादि शहरें ज्या लोकांनीं वसविलीं ते लोक कोठून आले त्या लोकांच्या वसाहतकालीं काय स्थिति होती इत्यादि गोष्टीसंबंधानें लिहावयाचें म्हणजे खि. पू ८००० वर्षांपर्यंत जावें लागत किंवा काय फोप आणि प्राचीन इतिहाससंबंधानें आपणास तात्पुरती अशी कल्पना केली पाहिजे की, खि पू ५००० वर्षांच्या सुमारास नील व युफ्रेटीस नदीच्या आसमंतातील प्रदेश काहींशा सुधारलेल्या लोकांनीं वसला गेला होता या लोकात राजे होते, उपाध्ये होते, देवळें होतीं, सामान्य प्रकारचे कायदे होते आणि मनुष्योपयोगी कला हि वाढल्या असल्या पाहिजेत या कालाशीं तुलना केली असता खि पू १५०० हा बराच अर्वाचीन काल भासतो

या दोन्ही संस्कृतींशीं इजियन संस्कृतीचा म्हणजे क्रीट बेटातील लोकांचा संबंध आणावा, असें दिसते इजियन संस्कृति म्हणजे पूर्वग्रीकसंस्कृति.

एशिया खंडातील प्राचीन संस्कृतीचा प्रदेश म्हटला म्हणजे स्मरनापासून चीन पर्यंत पसरलेला पर्वतांत ते चाल्डीस या उत्तर अक्षांशातील प्रदेश होय एशिअन संस्कृति ही देशील या प्रदेशातलीच होय व इजिप्तचा संस्कृति या भूभागातच विकसित झाला

इजिप्तची संस्कृति व बाबिलोनी संस्कृति या दोहोंचा एकमेकाशीं संबंध होता व दोहोंचा पश्चिमेकडे ग्रीसशीं व पूर्वेकडे इराणी व भारतीय या संस्कृतींशीं संबंध होता

**बाबिलोनी व मिसरी संस्कृतीचा परस्पर संबंध**– बाबिलोनियन संस्कृतीचीं दक्षिणेकडे सुमेर व उत्तरेकडे अक्काड हीं दोन केंद्रस्थानें होतीं.त्यापैकीं सुमेर हें जास्त प्राचीन होतें होमेल या प्रसिद्ध पुराणवस्तुशास्त्रज्ञानें काहीं आधार देऊन इजिप्तची संस्कृति बाबिलोनियन संस्कृतीपासूनच निघाली असावी असें प्रतिपादन केलें आहे या गोष्टीस मुख्य आधार ह्या दोन संस्कृतींतील दैवत संप्रदायातील साम्य हा होय होमेल म्हणतो बाबिलोनियन लोकांप्रमाणेच इजिप्त मधील लोकांतहि आकाश देवता " नु " ही सर्व देवतांत प्रमुख समजली जात असे, " नु " चा पुत्र इजिप्तमध्यें ' शु ' या नावानें ज्ञात असून त्याला वायुदेवता कल्पिलें होतें व ' शु " चा पुत्र " केब् " अथवा " सेब् " या नावाचा असून त्याला पृथ्वी देवता मानीत असत " शु " आणि " सेब् " यांच्या पत्नींचीं नावें अनुक्रमें " तेफ्नुत् " आणि " नुत् " हीं असून त्यांना आकाशदेवता असें म्हणत असत बाबिलोनियन लोकांप्रमाणेंच मिसरी लोकांतहि अशी कल्पना होती कीं, पृथ्वी देवता " सेब् " आणि त्याची स्त्री आकाश देवता "नुत" यास चार मुलें झालीं त्यांचीं नावें "ओसिरिस्, इसिस् , सेत् आणि नेफ्थात् अशीं होतीं बाबिलोनियांतील मेरॉडॉक आणि नेर्गल याप्रमाणेंच ऑसिरिस आणि सेत् हा इजिप्तमधील अनुक्रमें उन्हाळ्यांतील व हिवाळ्यांतील सूर्यदेवता असून त्यांचें एकमेकांशीं पटत नसे बाबिलोनियामध्यें ज्याप्रमाणें मेरॉडॉक या देवतेचें नांव लिहिण्याकरिता घर आणि डोळा यांचीं चिन्हें काढीत असत त्याप्रमाणेंच इजिप्तमध्येंहि ऑसिरिस या देवतेचा उस् ( घर ) आणि इर ( डोळा ) या खुणांनीं बोध होत असे मात्र मिसरी लोक या खुणांचा मूळ अर्थ काय हें विसरून गेले होते मिसर देशातील चित्रलिपीचा आपणास अर्थ कळू लागण्यापूर्वीच फार जुन्याकाळीं प्लुटार्कनें काहीं दंतकथा लिहून ठेविल्या आहेत त्यामध्यें दुष्ट देवता " सेत् " हिनें आपला भाऊ " ऑसिरिस " याचा केलेला पराभव, ऑसिरिसचा पत्नी " इसिस " हिनें आपल्या पतीकरिता केलेला शोक आणि ऑसिरिसचा पुत्र होरस यानें आपल्या बापाच्या मृत्यूचा घेतलेला सूड इत्यादि गोष्टी वर्णन केलेल्या आहेत या गोष्टी एका सृष्टिचमत्कारावरील रूपकाप्रमाणें दिसतात व वरतीं दिलेल्या देवतांच्या वंशावळीशीं त्यांचा निकट संबंध दिसतो त्याप्रमाणेंच ही दंतकथा बाबिलोनमधून पश्चिमआशियाकडे प्रसार पावलेल्या ताम्मूझ देवतेच्या दंतकथेसारखीच दिसते दुसरी एक इजिप्त मधील वाङ्मयांत विशेषत मृतसंबंधी ग्रंथात वारंवार आढळून येणारी बाबिलोनियन कालातील दंतकथा म्हटली म्हणजे " र " या सूर्य देवतेचें मेघाधिष्ठित असुर "अपेप् " याशीं झालेल्या युद्धासंबंधी होय हा असुरच जलप्रलयाला कारण झाला असा समजूत होता व या गोष्टी जुन्या कराराच्या प्रवक्त्यांना माहीत होत्या असें दिसतें बाबिलोनियन व मिसरी लोकांमध्यें सामान्य अशा दुसऱ्या कल्पना म्हटल्या म्हणजे जीविताचा एक वृक्ष आहे व सुखी मनुष्यांना विश्रांति मिळण्याची एक जागा अथवा बेट आहे या होत या बेटास मिसरी ग्रंथात " यलूची क्षेत्रें " असें म्हटलें आहे व बाबिलोनियन ग्रंथात " अराल ' असें नाव आहे त्याप्रमाणेंच मिसरी लोक आपल्या निरनिराळ्या देवतांचीं नावें लिहिण्याकरिता जीं चिन्हें वापरीत तीं हा त्यांनीं प्राचीन बाबिलोनियन लोकांपासूनच घेतलीं असावीं उदाहरणार्थ मार्दुक अथवा मेरडॉक आणि रें ऑसिरिस या देवतांचें चिन्ह डोळा आहे " एआ " आणि " ख्नुम " याचें चिन्ह एडका आहे " निन्दार " व बाल सूर्यदेवता " होर " या दोहोंचेंहि चिन्ह गरुड किंवा ससाणा आहे ईस्टर आणि इसिस् दोन्ही देवताहि गो चिन्हानें दर्शित होतात नेर्गल या देवतेचें चिन्ह कोल्हा व सेत संबंधीं अनेक देवता दाखविणारीं चिन्हें बाबिलोनिया मिसरी लोकांत एकच होतीं डॉ होमेल यांचें असें मत आहे कीं, बाबिलोनियांतील देवळांना ज्या सात पायऱ्या असत त्यावरूनच मिसरी लोकांस पिरॅमिडची कल्पना सुचली असावी कारण, त्याला सात टप्पे असत तसेंच इजिप्तमधील पिरॅमिड्स् हीं

जशीं तेथील राजांचीं कबरस्थानें आहेत तशींच बाबिलोनियांतील देवळें हींहि कबरस्थानाचें कार्य करीत. इजिप्तमधील पौंड किंमतीचें नाणें बाबिलोनियामधील चांदीच्या मीना नांवाच्या नाण्यापासून निघालेलें दिसतें. तसेंच इजिप्तमधील एल नांवाचें लांबीचें परिमाण बाबिलोनियांतील त्याच नांवाच्या परिमाणापासून घेतलेलें असावें. बाबिलोनियन लोकांनीं हें लांबीचें परिमाण "द्वितीय लवक" यांच्या लांबीवरून बसविलें होतें. इजिप्तमधील ज्योतिःशास्त्राचें मूळहि बाबिलोनियांतच असलें पाहिजे. तशींच इजिप्तमधील चित्रलिपींतील अनेक चिन्हें बाबिलोनियांतील तत्तद्वस्तुबोधक चिन्हांशीं आकाराच्या बाबतींत अगदीं सारखीं दिसतात. यापैकीं ठळक उदाहरण म्हणजे आयुष्य, भाऊ, गुलाम, डावा बाजू, आकाश-नौका, करणें, रात्र, कुरण, आकाशसिंधु वगैरे दाखविणारीं चिन्हें होत.

बाबिलोनियांतील प्रथम ऐतिहासिक गोष्ट आपणांला निश्चितपणें सांगतां येते ती ख्रिस्तपूर्व ३८०० च्या सुमाराची होय. या वेळीं सार्गान व त्याचा पुत्र नरमर्सीन हे अक्कड येथें राज्य करीत होते. यांचीं नांवें खोदलेल्या वीटा ज्या फरसबंदीमध्यें सांपडल्या आहेत तिच्या खालीं जो कचरा वगैरे सांचला आहे तो सांचण्यास तीन हजार वर्षें लागलीं असावीं असें तज्ज्ञांचें मत आहे. हें खरें असल्यास अक्कड येथील संस्कृति ख्रिस्तपूर्व ६८०० वर्षांइतकी जुनी आहे असें म्हणावें लागेल. अक्कड येथील संस्कृतीपेक्षा सुमेर येथील संस्कृति जास्त जुनी आहे असें दाखविण्यास आधार आहे. बाबिलोनियामध्यें बऱ्याच उत्तरकालापर्यंत सुमेर येथील भाषा पवित्र मानली जात असे. सर्व प्राचीन शिलालेख त्याच भाषेंत खोदलेले आहेत. तशीच प्राचीन राजांचीं नांवेंहि सुमेरियन आहेत. सुमेरियन लोक हे कोणत्या मानववंशांतील होत हें अद्यापि निश्चित झालें नाहीं. परंतु ते मूळचे अक्कड येथील समिटिक लोकांपेक्षा निराळे होते हें निश्चित आहे व त्यांचें मिश्रण फारच प्राचीन कालापासून होत होतें एवढी गोष्ट दिसून येते.

आतां आपण इजिप्तच्या प्राचीन इतिहासाकडे वळूं.

## प्रकरण २ रें

## मिसर अथवा इजिप्त देशाचा प्राचीन इतिहास

शिकंदर बादशहाच्या स्वारीपूर्वी मिसर देशांत ३१ राजघराणीं एकामागून एक अशीं होऊन गेलीं. हें एकतिसावें राजघराणें इराणी होतें. ख्रि. पू. १५०० च्या सुमारास १८ वें राजघराणें चालू होतें व मिसरचें साम्राज्य फार वाढत होतें. मिसर देशांतील लोकांच्या प्राचीन युगांत संस्कृतीची मजल कोठवर गेलेली होती हें भूखननादि मार्गांनीं गोळा केलेल्या पुराव्यांनीं ठरविणें हा एक अलीकडील पुराणवस्तुशास्त्रवेत्त्यांचा विशिष्ट मार्ग आहे. इजिप्तमधील चौथ्या राजघराण्याच्या काळापूर्वी अनेक शतकें नील-खोऱ्यामध्यें राहणाऱ्या लोकांची संस्कृति बऱ्याच प्रगल्भ दशेस पोहचली होती. हें पन्नास वर्षांपूर्वीच्या विद्वानांसहि अगदीं स्पष्ट होतें तरी त्या काळची सविस्तर माहिती देणारीं साधनें उपलब्ध होतील किंवा नाहीं याविषयीं आशा करण्यास इ. स. १८९५ पर्यंत फारशी जागा नव्हती. परंतु त्या सालापासून ऐतिहासिक माहितीच्या अभावामुळें श्मशानवत् भासणाऱ्या त्या प्रागैतिहासिक म्हणून समजल्या जाणाऱ्या युगासंबंधीं नवीन नवीन शोध लागत आहेत व हजारों ख्रिस्तपूर्व पांच सहा हजार वर्षांइतका जुना काल ऐतिहासिककालामध्यें मोडेल इतकी माहिती उपलब्ध झाली आहे. मिसर देशांतील प्राचीन कला व इतिहास यांचा निकट संबंध असल्यामुळें त्यांच्या कलाविषयीं अगोदर थोडेंसें विवेचन केलें पाहिजे.

**प्रागैतिहासिक शिल्पज्ञान.**—मिसर देशांतील प्राचीन काळचे सुसंस्कृत लोक ठाकठीकपणा व हुबेहूबपणा इत्यादि शिल्पविषयक गुणांमध्यें बरेच निष्णात होते. परंतु त्यांस निरनिराळ्या अवयवांचे आकार कसे दाखवावेत हें माहीत नव्हतें. असंस्कृत लोकांप्रमाणेंच ते आपल्या शिल्पकामांत अवयव किंवा त्याचे अग्रभाग दाखवीत नसत. आकृतीच्या रेखीवपणापेक्षा मनोविकाराचें स्पष्ट छायाचित्र उमटविण्याकडे त्यांचें विशेष लक्ष होतें.

या युगांतील स्त्रियांच्या ज्या मूर्ती सांपडतात त्यांस पावलें नसून त्यांचा खालील भाग चिकटलेला व एका टोंकापर्यंत निमुळता होत गेलेला असतो. दोन हातांच्या जागीं दोन खुंटे असतात. नाकाचा भाग पक्ष्याच्या चोंचीसारखा असून डोळे कमी तरी दाखविलेले दिसून येतात. पुरुषांच्या मूर्तींमध्यें फक्त शिरोभागच आढळतो. प्रथम त्या पशुदंतावर खोदलेले असत. नंतर फण्यांच्या अग्रभागावर खोदीत असत. या सर्व मूर्तींमध्यें उंच भालप्रदेश व अणकुचीदार दाढ्या दिसून येतात. चर्येवर रानटीपणाचा छाप नसून एक प्रकारचा गंभीरपणा दिसून येतो. त्यांतील डोळे दोन भोकें पाडून व त्यांत कवडीचे मणी बसवून दाखविण्यांत येत असत. मानवी आकृतीप्रमाणें इतर प्राण्यांच्या आकृतीहि कशा तरी ओबडधोबड काढलेल्या असत. त्या बहुधा फण्यांच्या किंवा दांतण्याच्या डोक्यावर दिसून येतात. सिंहाच्या बऱ्याच मूर्ती सांपडतात परंतु त्यांत पायांचा भाग नीटपणें दाखविलेला नसतो. श्वेनांच्या मूर्तींत तर पायांचा मुळींच पत्ता लागत नाहीं.

या युगाच्या शेवटच्या भागांत उठावाचें खोदीव काम करण्यास सुरवात झाली असावी असें उपलब्ध असलेल्या माहितीवरून दिसून येतें. या कलेची त्यावेळीं नुकतीच सुरवात असल्यामुळें ती या कालीं प्रगल्भ दशेप्रत गेली नव्हती हें उघड आहे. अगदीं अखेर अखेर या उठावाच्या कामांत प्राण्यांचे समुदायहि दाखविण्यांत येऊं लागले होते.

तांबड्या भांड्यावर पांढऱ्या रंगाचीं चित्रें काढण्याची कला फार प्राचीनकाळापासून चालू होती. या चित्रांत मानवी आकृती फार क्वचित् काढलेल्या असत व त्या

काढण्याचा प्रकार म्हटला म्हणजे एक त्रिकोणाकृति देह, कटिभाग अगदीं बारीक, व दोन पाय म्हणजे दोन उभ्या रेघा. पाय मार्गे पुढें होतात हें दर्शविण्याकरितां त्या उभ्या रेघा एका नागमोडी सारख्या रेघेनें जोडलेल्या असत. मकरांचीं व एक प्रकारच्या पाणघोड्यांचीं चित्रें सामान्यतः चहूंकडे दृष्टीस पडतात. या युगाच्या उत्तरकाळात प्राण्यांचे व मनुष्यांचे समुदाय व गलबतें यांचीं चित्रें आढळतात. गलबत शिडानें न चालवितां वल्ह्यांनीं चालविलेलें दाखविलें आहे.

**आरंभीच्या राजांचा काळ**—या काळात कलांची वाढ फार झपाट्यानें झालेली दिसून येते. पूर्वीच्या ओबडधोबड मूर्तींच्या जागीं सुरेख आकृतींच्या, स्वभावाची कल्पना करून देणाऱ्या व शरीराचे सर्व भाग हुबेहूब दर्शविणाऱ्या मूर्ती दृष्टीस पडूं लागतात

या काळचें अगदीं प्रारंभींचें शिल्प काम म्हटलें म्हणजे कॉप्टस येथील मिना देवाच्या भव्य मूर्ती हें होय. परंतु या काळचें मुख्य शिल्प काम एका राजाच्या चुनखडी सारख्या दगडावर कोरलेल्या मुखवट्यात पहावयास सापडतें. हा मुखवटा पाहून प्रो मिर्सेलिस म्हणतो "हें काम अत्यंत काळजीपूर्वक केलेलें आहे व त्यावरून तें करणाऱ्याची विलक्षण अवलोकनशक्ति व डोळ्याची ठेवण दाखविण्याची अप्रतिम हातोटी उत्तम रीतीनें व्यक्त होते" ही प्रतिमा बहुतेक नार्मर नावाच्या राजाची असावी. हा नार्मर राजा पहिल्या राजघराण्यातला होता. यानंतरची प्रतिमा हस्तिदंतावर खोदलेली एका वृद्ध राजाची आहे ही प्रतिमा तर फारच सुरेख असून राजाचें चारित्र्य कसें होतें हें पहाणाऱ्याच्या लक्ष्यांत आणून देणारी आहे नेखेन (हिराकान्पोलिस) व अबिडॉस येथें पुरुष, स्त्रिया व इतर प्राणी यांच्या पुष्कळ हस्तिदंती मूर्ती सापडतात. दुसऱ्या राजघराण्यातील राजा खासेखेम याच्या मुखवट्यात शिल्पकामाची एक ठरीव पद्धत दिसूं लागते; तथापि त्याच्यातहि जो मोहकपणा दिसून येतो तो या पुढील शिल्पकामात दृष्टीस पडत नाहीं

उठावाचें खोदीव काम करण्याची कलाहि या काळात फार झपाट्यानें वृद्धिंगत झाली. या कामाचे नमुने काप्टसच्या भव्य मूर्तींवर पहावयास सापडतात येथील साखराच्या मुखवट्याचें काम अप्रतिम आहे. यापुढचें काम म्हणजे एका तालवृक्षासमोर हरणाची जोडी उभी आहे हें होय यात विलक्षण नैपुण्य दिसून येतें यानंतर नार्मर राजाचें इतिहासप्रसिद्ध कोरीव काम लक्षात घेण्यासारखें आहे यात पायाच्या शिरा व स्नायू, डाव्या हाताची पकड व उजव्या हाताचा ताण इत्यादि सर्व इतक्या उत्कृष्ट रीतीनें दाखविलें आहे कीं त्यावरून या कलेचें ज्ञान त्या काळीं पूर्णावस्थेस पोंचलें होतें असें म्हणण्यास हरकत नाहीं.

**मनोन्यांचा काळ**—या काळात कलेच्या बाबतींत निराळेंच ध्येय दिसून येतें, पूर्वीच्या काळचा स्वभाविकपणा जाऊन त्याच्या जागीं अधिक व्यवस्थितपणा, ठराविक पद्धत व आपण एका विशिष्ट संप्रदायाचे अनुयायी आहोत ही भावना शिल्पी लोकात दिसून येते. या काळातील सर्व कामात भव्यपणा हा सर्वसाधारण गुण आहे. लहान किंवा मोठें कोणतेंहि काम पाहिलें तरी तें काळाचा किंवा श्रमाचा विचार न करितां पूर्णत्वास नेलेलें दिसून येतें.

चिओप्स किंवा खुफू याच्या लहानशा हस्तिदंती मूर्तीकडे पाहिलें तरी त्यावरून चिओप्सचा उत्साह किती विलक्षण होता व इच्छाशक्ति किती प्रबळ होती हें दिसून येते. खाफरे किंवा चेफरेन याची मूर्ती भव्य व गंभीर आहे साधारण माणसाच्या मूर्ति ज्याच्या त्याच्या स्थितीकडे लक्ष देऊन बनविलेल्या दिसून येतात. नेफर्ट व हेम्सेट याच्या शांत मूर्तींकडे पहा किंवा कापरच्या लाकडी मूर्तीकडे पहा त्यात तुम्हाला राजे लोकांची इभ्रत व दबाव दिसून येणार नाहीं. तांब्याचें घडीव काम करण्यात या काळचे शिल्पी किती तयार होते हें पहावयाचें असल्यास मरेन्राची मूर्ती पहावी.

मूर्तिकामाप्रमाणेंच उठावाच्या खोदीव कामात सुधारणा झाली होती हें हेसीच्या लाकडी दरवाजावरील काम पाहिलें म्हणजे कळून येईल यापुढें कबरस्थानावरचीं मनोवेधक व निरनिराळ्या तऱ्हेचीं कामें दृष्टीस पडतात

**बाराव्या राजघराण्याचा काळ**—या काळात जी शिल्पकामाची तऱ्हा प्रामुख्यानें दिसून येते तीस मागील काळातच सुरवात झाली होती

या काळातील शिल्पकामाची नवीन तऱ्हा राजे लोकांच्या मूर्तींच्या कामात प्रथम उपयोगात आली ज्या परकीय राजापासून बाराव्या राजघराण्याचा उगम झाला त्याच्याच या मूर्ती असल्या पाहिजेत परंतु हिक्सॉस राजांनीं त्या आपल्या पूर्वजांच्या आहेत असा समज उत्पन्न केल्यामुळें तशी भ्रामक कल्पना प्रचलित झाली परंतु त्यात काहीं तथ्य नाहीं. या मूर्तींच्या मुखवट्यावर ठसठशीतपणा, जोरकसपणा व मुखावरील स्नायूंचें जाळें इत्यादि गोष्टी प्रामुख्यानें दिसून येतात. या काळात एका ठराविक तऱ्हेनें काम करण्याची पद्धत चालू नसून चित्रकलेत बरेंच स्वातंत्र्य दिसून येतें कामाचा रेखीवपणा, उठावदारपणा व मुखावरील बारीकसारीक रेषांचेंहि योग्य दिग्दर्शन इत्यादि गुणांमध्यें बाराव्या राजघराण्याच्या शिल्पकामाचें वैशिष्ट्य आहे परंतु त्यात चवथ्या राजघराण्याच्या वेळचा भव्यपणा व अठराव्या राजघराण्याच्या वेळचा जीवतपणा दिसून येत नाहीं

उठावाच्या खोदिव कामातहि नवीन पद्धत विशेष स्पष्टपणें दिसून येते मुखावरील रेषा वगैरे दाखविण्याच्या कामीं बाराव्या राजघराण्याच्या वेळेस ही नवीन पद्धत पूर्णत्वास गेली होती. स्वाभाविकपणापेक्षा शास्त्रशुद्धपणावर ज्यांची अधिक भिस्त होती अशा पंथाच्या लोकांकडून ही नवी पद्धत प्रचलित करण्यात आली होती

**अठरा तें वीस राजघराण्यांचा काळ**.—मिसर देशांतील कलेसंबंधीं हा काळ अत्यंत लोकप्रिय होण्याचें कारण अगदीं उघड आहे. भव्यपणा, पूर्णपणा व टसटसित-पणा इत्यादि ज्या गुणांनीं पूर्वकालच्या लोकांनीं आपलीं कामें अजरामर करून ठेविलीं आहेत त्यांचा या काळात लोप झाला होता. पूर्वी प्रचलित असलेल्या पद्धतीस जर चारित्र्यदर्शक कला असें नाव दिलें तर ह्यांच्या पद्धतीस भावनादर्शक कला असें म्हटलें पाहिजे. भावनामय कामें बुद्धीला ग्रहण करण्यास सोपीं असल्यामुळें अधिक लवकर लोकप्रिय होतात तरी प्रत्येक युगात व प्रत्येक देशात असा एक सर्वसामान्य नियम आहे कीं, क्षणिक भावनादर्शक कामापेक्षा कायमच्या चारित्र्यदर्शक कामास अधिक मान असतो प्रस्तुतचा काळ भावनादर्शक कामाचा असल्यामुळें त्याच्या सुबक रूपरेषा, त्यातील उल्हसित पद्धति, त्याची अद्भुत रस उत्पन्न करणारी ऐट व त्याच्यात मधून मधून दिसणारें व म्हणूनच मनोरंजक व मनोवेधक वाटणारें औद्धत्य इत्यादि गोष्टी आपणास या काळच्या कामात पहावयास सापडतात. इतर रेषा स्पष्ट दिसाव्यात म्हणून या काळच्या मूर्तींच्या अंगाचा इतर भाग अस्वाभाविक रीतीनें अगदीं गुळगुळीत केलेला आढळतो, अद्भुत रस उत्पन्न कर-ण्याच्या अनावर इच्छेनें स्मशानयात्रेच्या प्रसंगीं पतिपत्नी हातात हात धालून चालताना दाखविलेले आढळतात. आणि ही इच्छा अखेनटॉनच्या वेळीं इतकी अनावर झाली कीं तो आपल्या रथात पत्नीचें चुंबन घेत आहे किंवा तिला आपल्या गुडघ्यावर नाचवीत आहे अशा प्रकारच्या त्याच्या मूर्ती पहावयास सापडतात. कलाकौशल्याच्या कामात कोणते प्रसंग दाखवावेत किंवा कोणते दाखवू नयेत हा निर्बंध नाहींसा होऊन त्याच्या जागीं जें पहावें तें मूर्तीत किंवा चित्रात दाखवावें अशी पद्धत सुरू झाली. यामुळें त्या काळच्या मूर्ती व चित्रें जरी सुबक व मोहक आहेत तरी ही पद्धत म्हणजे त्या कलाची अखेरची मर्यादा होऊन यापुढें त्याची प्रगति होण्यास जागा उरली नाहीं.

वरील म्हणण्याचा प्रत्यय तिसऱ्या अमेनोफिसच्या मूर्ती-पासून यावयास लागतो. खासगी व्यक्तींच्या मूर्तींत उदाहरणार्थ एका सिद्धीणीच्या लाकडी पुतळ्यात तो त्या-हूनहि अधिक स्पष्टपणें पहावयास सापडतो. अखेनटॉनच्या वेळीं या कलेची मजल कोटवर गेली होती हें पहावयाचें असल्यास तच्या राणीच्या मुखवट्याचा जो एक अल्पसा भाग उपलब्ध आहे तो पहावा. त्यात नाकाचीं व तोंडा-भोंवतालचीं वळणें हीं हुबेहुब आहेतच परंतु जेथें दोन ओंठ मिटतात तो भाग दाखविण्यात तर शिल्पकारानें आपलें कमालीचें कसब दाखविलें आहे. एकोणिसाव्या राजघरा-ण्याच्या वेळचें नावाजण्यासारखें शिल्पकाम म्हणजे टयूरिन येथें काळ्या पाषाणाचा घडविलेला दुसऱ्या रामेसीसचा पुतळा हें होय.

**अठराव्या राजघराण्याचा काळ**.—अठराव्या राजघराण्याच्या प्रारंभींचीं उठावाचीं खोदिव कामें मनोन्याच्या काळातील त्या कामासारखींच होतीं व पुढें चित्रकला जसजशी स्वस्त होत गेली तसतशीं खोदीव कामें मागें पडत चाललीं. अशा प्रकारचीं खोदिव कामें फक्त देवळात करीत असत व या देवालयाचा पुढें ऱ्हास होत गेला या काळचीं हीं कामें मजबूत व सुमर्यादित आहेत परंतु तीं अगदींच ठराविक पद्धतीचीं असून त्यात स्नायू, शिरा वगैरे काहीं दाखविलेले नाहीं. शिवाय या काळच्या कामात पूर्वीच्या काळच्या कामातील पुष्कळशा कल्पनांची नक्कल केलेली आढळते. तिसऱ्या अमेनोफिसच्या काळच्या राएमहातच्या सुंदर मूर्तींत पूर्वीच्या कल्पनांचें प्रतिबिंब आहे. मागें वर्णन केलेली अखेनटॉनच्या वेळची विशिष्ट पद्धत या प्रकारच्या कामातहि दिसून येते. एकोणिसाव्या व विसाव्या राजघराण्याच्या देवळातील असंख्य उठावाचीं खोदिव कामें फक्त इतिहासदृष्ट्या महत्त्वाचीं असून त्यात पूर्वीच्या कामाच्या मानानें कोणतेंच कौशल्य दिसून येत नाहीं.

चित्रकलेच्या अभिवृद्धीस मात्र प्रस्तुत काळ फार अनु-कूल होता, हाताचा हलकेपणा, वृत्तांताची विविधता व आनंदाचें पर्यवसान इत्यादि गोष्टींची रेलचेल त्या काळच्या चित्रात दिसून येते. अधिक कष्टसाध्य शिल्पकामाचा ज्या मानानें ऱ्हास होत गेला त्या मानानें चित्रकलेचा अधिका-धिक उत्कर्ष झाला. त्या काळच्या एका कोलांटउडी मार-णाऱ्या मुलीच्या चित्रावरून त्या वेळीं होणारे शरीराचे संकोच व विकास तत्कालीन चित्रकारास किती शिताफीनें दाखविता येत होते हें लक्षात येण्यासारखें आहे.

यापुढील काळात या कलाचा एकसारखा ऱ्हास होत गेला म्हणजे वर दिलेल्या तीन भागांपैकीं (१) मूर्तिकरण (२) उठावाचें खोदिक काम व (३) चित्रकला यांपैकीं कोणत्याहि भागाचा विचार केला तरी पुढें येणाऱ्या प्रत्येक राजघराण्यात त्या कलाचा उत्तरोत्तर अपकर्ष होत गेल्याचें दिसून येते.

इतिहासलेखनास ज्याप्रमाणें शिल्प कामें हें एक उप-युक्त साधन आहे त्याप्रमाणेंच मनुष्यानें निरनिराळ्या कार्यी वापरलेलीं उपकरणें व हत्यारें हीं त्याच्या निरनिराळ्या सांस्कृतिक अवस्था बोधितात तेव्हा आता प्राचीन मिसरी लोकांच्या हत्यारासंबंधीं येथें थोडी माहिती देतों.

**हत्यारें व जड द्रव्यें**.—मिसर देशांतील हत्याराचे थोडक्यात सामान्य व विशिष्ट असे दोन विभाग करिता येतील. सामान्य विभागात ठोकणाऱ्या, कापणाऱ्या व पास-णाऱ्या हत्याराचा अंतर्भाव होतो व विशिष्ट विभागात लढाई, शिकार, शेतकी, बांधकाम इत्यादि कामास लागणाऱ्या हत्यारांचा समावेश होतो. हीं हत्यारें हल्लींच्या हत्यारापेक्षां प्रथम निराळ्या स्वरूपाचीं होतीं. त्यांपैकीं काहींत बदल होऊन त्यास हल्लींचें स्वरूप प्राप्त झालें, व काहीं तशींच राहिलीं-

**ठोकण्यास लागणारीं हत्यारें**—लाकडी ठोकणी व मोगरी, दगडी गदा, विनदांड्याचे दगडाचे हातोडे, तांब्याच्या व गारगोटीच्या कुऱ्हाडी, गारगोटीच्या कुदळी इत्यादि हत्यारें त्या काळीं प्रचलित होतीं.

**कापण्यास उपयोगी पडणारीं हत्यारें**—गारगोटीचे केलेले दुपाती, एकपाती, पातें मिटविण्यास खाचा असलेले व नसलेले, सरळ व वाकड्या पाठाचे व तांब्याचे बनविलेले इतक्या प्रकारचे चाकू, तांब्याचे वस्तरे ब्रॉंझ धातूचीं केलेलीं लाकडी मुठीचीं व विनमुठीचीं लहान-मोठीं किकरीं व टाक्या इत्यादि हत्यारें त्याकाळीं उपयोगात होतीं

**घासण्याच्या उपयोगाचीं हत्यारें**— ब्रॉंझ धातूच्या केलेल्या कीलाकृति व हल्लीं प्रचारात असलेल्या स्वरूपाच्या कानशा, सदर धातूच्या केलेल्या करवता, कठिण पदार्थांस व मण्यास छेद करण्याकरिता ज्यांचा उपयोग करीत असत असे गारगोटीचे केलेले व लाकडी कामावर ज्याचा उपयोग करीत असत असे ब्रॉंझ धातूचे केलेले सामते इत्यादि हत्यारांचा त्याकाळीं उपयोग करीत असत

**लढाईचीं हत्यारें**—लाकडी दांड्याचे व धातूचे बनविलेले परशू, गारगोटीच्या व तांब्याच्या केलेल्या कट्यारी लाकडी व एका अखंड तुकड्याचीं केलेलीं धनुष्यें निरनिराळ्या आकाराचीं गारगोटीचीं, शिंगाचीं व तांब्याचीं बाणांचीं टोकें इत्यादि हत्यारें त्यावेळीं प्रचारात होतीं

**शिकारीचीं आयुधें**—गारगोटीच्या बरच्या, हाडाच्या व तांब्याच्या मासे धरण्याच्या बरच्या, फेकून मारावयाचे लाकडी सोटे, तांब्याचे मासे धरण्याचे आकडे, प्राण्यांचे पाय अडकून धरण्याचे सापळे, मासे पकडण्याचीं जाळीं इत्यादि आयुधांचा त्याकाळीं उपयोग करीत असत

**शेतकीचीं आयुधें**—लाकडी कुदळी व नांगर, लाकडी दताळें, गवत उडविण्याचा त्रिशूळ, ज्याच्यात गारगोट्या बसविल्या आहेत असे लाकडी कोयते, पाखडताना धान्य साफ करणारीं सुपें, अंड्याच्या आकृतीचीं व सपाट जातीं इत्यादि अनेक वस्तूंचा त्याकाळीं उपयोग करीत असत

**बांधकामास लागणारीं उपकरणें**—दगड फोडण्यास उपयोगीं पडणाऱ्या टाक्या, विटा पाडण्याचे विटाळे, गवंड्याची लाकडी करणी, गुण्या व ओळंबा इत्यादि बांधकामास लागणारीं साधनें हल्लींच्या प्रमाणेंच होतीं

**मातीचीं भांडीं**—फार प्राचीन काळीं चाकावर गति दिल्यावाचून फक्त हातानीं हीं मातीचीं भांडीं तयार करीत असत भांड्यास आकार येण्याकरिता आंतून एक चपटा पटी धरून बाहेरून हात फिरवीत अशा प्रकारें काहींसा आकार आल्यानंतर शेवटीं त्यास घासून गुळगुळीत करीत चवूच्या आकृतीच्या भांड्याचा गळा तयार करण्याच्या कामीं प्रथम चक्राचा उपयोग करण्यात आला बाराव्या राजघराण्याच्या काळापर्यंत लहान लहान भांड्याचा बुडें चाकूनें कापून रेखीव केलेलीं दिसून येतात. भांड्यावर पोढऱ्या मातीचे पट्टे, पशूंच्या व क्वचित् प्रसंगी मानवी आकृती अशा प्रकारची नक्षी काढीत असत हीं भांडीं हातांनीं घडवीत असल्यामुळें त्यास निरनिराळे आकार देण्याचें काम कठिण नव्हतें अठराव्या राजघराण्याच्या वेळीं भांड्याचे काठ तांबडे असत किंवा त्याच्या गळ्याभोंवतीं पट्टे असत तिसऱ्या टेथमॉसिसच्या वेळीं काळ्या व तांबड्या रेषा काढण्याचा प्रघात असल्याचें दिसून येते तिसऱ्या अमेनोफिसाच्या काळीं भांड्याच्या गळ्याभोंवतीं निळ्या रंगाच्या रेषा व पट्टे काढण्याची चाल होती. अठराव्या व एकोणिसाव्या राजघराण्याच्या उत्तर काळात ओबडधोबड परंतु हलकीं भांडीं व त्यांवर पांढरे ठिपके आणि गुळगुळीत व भुऱ्या रंगाचे काठ असलेले आढळतात

आतापर्यंत जें कलाविषयक विवेचन करण्यात आलें त्यावरून इजिप्तमधील कलेचा इतिहासशोधनाकडे कसा उपयोग करता येईल याची कल्पना झाली असेलच गृहवस्तूंमध्यें, नवीन नवीन आकार, गृहवस्तु ज्या साहित्याच्या बनवीत त्या साहित्यामध्यें फरक आणि चित्रकलेचा अतिशय साध्या रेषोटचापासून अधिक सूक्ष्म विकास या सर्व गोष्टींचें सातत्य आपणांस इजिप्तच्या इतिहासात जसें आढळून येतें तसें दुसरें कोठेंहि येत नाहीं हें सातत्य इतकें आहे कीं त्यामुळें वस्तु कालानुक्रमानें लावतां येतात आणि त्यामुळे इजिप्तच्या इतिहासात जीं राजघराणीं होऊन गेलीं त्यांची आणि विशिष्ट कलाविकासाची अगर संस्कृतिविकासाची संगति लावण्यात येते

**प्राचीन इतिहास आणि कला प्रागैतिहासिक युग**—नील नदीच्या काठच्या थीबीज शहराच्या परिसरात व अन्य ठिकाणीं नील नदीच्या मळीत सापडणारे गारगोटीचे कापीव तुकडे मनुष्यांनीं घडविलेले असण्याचा संभव आहे परंतु धो धो वाहणाऱ्या प्रवाहांत सांपडलेल्या पाषाणखंडास केवळ नैसर्गिक पद्धतीनेंहि असले आकार प्राप्त होतात असा यावर काहींचें म्हणणें आहे नीलथडीच्या आसपास असलेल्या मैदानात कित्येक वेळा पुराणपाषाणयुगातील विशिष्ट आकाराचीं हत्यारें व उपकरणें सापडतात आणि त्यांच्यावर असलेल्या खुणा त्यांच्या प्राचीनत्वाची साक्ष पटवितात काहीं वेळां ज्या पाषाणाच्या कारखान्यात तीं घडविलीं असावीत त्या जागेवरच तीं पडलीं असावीत असें दिसून येतें ज्या काळीं तीं हत्यारें घडविलीं असतील त्या काळांत व हल्लींच्या काळात हवामान व देशाची एकदर स्थिति यांत काहीं मोठे फेरबदल झाले आहेत किंवा काय याविषयीं भूस्तरशास्त्रवेत्ते व मानवशास्त्रवेत्ते यांच्यांत अद्याप एकमत झालेलें नाहीं ज्याच्यावरून त्या हत्यारांना काल निश्चित करिता येईल अशा रीतीनें तीं, व प्राचीन युगांतील प्राण्यांच्या देहांचे अवशिष्ट भाग एकत्र सापडले नाहींत, किंवा एखाद्या खडकाच्या किंवा दरीच्या गर्भात सांपडलीं

नवपाषाणयुगांतील अवशिष्ट भाग म्हणजे बाणाचीं टोकें व इतर आयुधं हीं बऱ्याच मोठ्या प्रमाणात अरण्यामध्यें सांपडतात. थीबीजच्या उत्तरेकडील फायूमच्या प्रदेशांत व मोरिस या प्राचीन सरोवराच्या आसमंतात तर या वस्तू अत्यंत विपुल व चमत्कारिक आकाराच्या दृष्टीस पडतात. परंतु त्यांचा नक्की काळ निश्चित करितां येत नाहीं. नीलथडीवर राज्य करणाऱ्या बाराव्या राजघराण्याच्या वेळेस अस्तित्वात असलेल्या प्रगल्भ संस्कृतीशीं त्या समकालीन असाव्यात असें कांहींचें मत आहे. परंतु लागवड केलेल्या मळ्याच्या कडेवर असलेल्या मैदानात जे डी मार्गन, पेट्री, रेसनर व इतर संशोधक यांच्या भूखननादि प्रयत्नांनीं शोधून काढलेल्या अनेक चमत्कारिक कबरस्थानांपासून निश्चित ऐतिहासिक माहिती उपलब्ध झाली आहे. त्या कबरस्थानांत सांपडलेल्या वस्तूंचे निरनिराळे प्रकार पेट्रीनें आपल्या "डायसपोलिसपर्व" नांवाच्या पुस्तकात क्रमवार दिलेले आहेत, आणि अत्यंत परिश्रमपूर्वक केलेले आपले शोध रेसनेरनें प्रसिद्ध केल्यापासून तर पुष्कळच वादग्रस्त प्रश्नावर प्रकाश पडला आहे. त्यातले त्यात प्राग्ऐतिहासिक काल व पहिल्या राजघराण्याचा काळ यांचा कोठें संयोग होतो हें निश्चित करितां आलें आहे. पूर्वी उल्लेखिलेली कुलालचक्राच्याहि साधनावाचून केवळ हातांनीं तयार केलेलीं (कांहीं रंगविलेलीं) अति उत्कृष्ट मातीचीं भांडीं प्राग्ऐतिहासिक युगांतलीं आहेत. त्याचप्रमाणें इतर सर्व देशांतील तत्कालीन हत्यारांपेक्षा आकाराच्या ठाकठीकपणांत व नाजुकपणांत अधिक सरस असलेलीं अतिशय उत्कृष्ट गारगोटीचीं हत्यारें त्याच काळचीं आहेत. फार जुनाट कबरस्थानांतून धातूचा अभाव दिसून येतो परंतु लवकरच तांब्याची धातु दृष्टीस पडूं लागते. बाराव्या राजघराण्याच्या कारकीर्दीपर्यंत कांस्यधातूचा पत्ता नव्हता. नकशीच्या भांड्यांवर वल्ह्यांनीं व शिडांनीं चालविलेल्या नौकांचीं चित्रें व त्या नौकांवर बाहुल्यांच्या खुणा दृष्टीस पडतात. वरच्या म्हणजे दक्षिणेकडच्या व मधल्या मिसर देशाच्या भागात हीं कबरस्थानें सर्वत्र सांपडतात. परंतु नदीमुखाजवळ किंवा त्याच्या आसपास तीं अद्याप सांपडलीं नाहींत. कदाचित मिसर देशाच्या खालच्या भागात रहाणाऱ्या लोकांची मृत देहाची व्यवस्था करण्याची पद्धत निराळी असावी.

**इजिप्तच्या प्राचीन दोन राज्यांचें एकीकरण.—** परंपरा, पुराणकथा व अलीकडे प्रचलित असलेल्या चाली रीती यांच्या योगानें त्या अतिप्राचीन काळच्या राजकीय इतिहासात असलेली खिंड भरून काढतां येते. पहिल्या राजघराण्याचा संस्थापक मेनीस यानं मिसर देशाच्या वरच्या व खालच्या भागात असलेलीं दोन राज्यें एकत्रित केलीं यावरून प्राग्ऐतिहासिक कालात ते दोन भाग निरनिराळ्या सत्तेखालीं होते हें उघड होतें. जेथें हल्लीं एल् काबचें खिंडार आहे तेथें पूर्वी वरच्या मिसर प्रदेशाची नेकेब नांवाची राजधानी होती आणि नदीच्या पलीकडे नेखेल (हिराकॉन्पोलिस) येथें राजवाडा होता. मिसर देशाच्या खालच्या प्रदेशाची राजधानी तेथील पाणथळ प्रदेशात ब्यूटो (प्यूटो किंवा डेप) येथें होती व "पे" नांवाच्या भागात राजनिवासस्थान होतें. वरच्या किंवा दक्षिण दिशेकडील प्रदेशाच्या राज्यात एल् काबची देवता "निखेबी" व "संथे" नांवाचा देव यांचें अधिष्ठान होतें व खालच्या प्रदेशाच्या राज्यात "ब्यूटो" या देवतेचें व "होरस" या देवाचें अधिष्ठान होतें. राजेलोकांकरितां प्रत्येकाच्या राजवाड्यात "श्येन किंवा होरस" ही देवता होती. "नेखेन" येथें मृतराजांचीं पितरें शृगालशीर्ष होतीं असें मानीत तर "पे" येथें मृतराजांचीं पितरें श्येनशीर्ष होतीं असें मानीत असत. पुढील काळात प्राग्ऐतिहासिक राजे "होरस-पूजक" म्हणून मानण्यात येत. या युगाची कालमर्यादा किती होती याचा अंदाज करितां येत नाहीं. वर सांगितलेलीं वरच्या व खालच्या प्रदेशांतील दोन राज्यें यांच्यात केव्हांहि कांहीं बदल झाला नसेल हें संभवनीय दिसत नाहीं.

शरीरविज्ञान शास्त्रज्ञ इलिअट स्मिथ यांच्या मतें मिसर देशाचा सर्व प्राचीन इतिहास धुंडाळला तर असें दिसून येईल कीं राजघराण्यांच्या युगाच्या प्रारंभीच्या भागात वरच्या मिसर प्रदेशांतील लोकांच्या शरीररचनेंत महत्त्वाचा फरक झाला आणि तो फरक मिसर देशाचे दोन्हीं भाग एका राजाच्या सत्तेखालीं आल्यानें त्यांतील लोकांमध्यें जो संकर घडून आला त्यामुळें झाला असें सदर शास्त्रज्ञानें स्पष्टीकरण केलें आहे. चवथ्या राजघराण्याच्या युगांतील उपलब्ध असलेल्या अवशेषांवरून इलिअट स्मिथनें असा सिद्धांत काढिला आहे कीं सीरियांतील देशांतर केलेल्या लोकांच्या आगमनामुळें मिसर देशाच्या वरच्या प्रदेशांतील लोकांपेक्षा खालच्या प्रदेशांतील लोकांच्या मस्तकांतील कवटीची व स्नायूंची वाढ अधिक झालेली होती. राजघराण्यांच्या युगास प्रारंभ झाल्यामुळें संस्कृतीचा पिछेहाट न होतां भरभराटच होत गेली.

प्राग्ऐतिहासिक युगासंबंधीं माहिती देणारें एखादें तरी लिखाण उपलब्ध आहे कीं नाहीं याविषयीं शंकाच आहे. पालेर्मोशिलेच्या पहिल्या ओळींत खालच्या मिसर देशाच्या राजांचीं कांहीं नांवें दिलेलीं सांपडतात. परंतु तेथें त्यांचे शक किंवा इतर माहिती दिलेली नाहीं. पेट्रीच्या मतानें ज्या राजाला अबिडास येथें मूठमाती देण्यात आली होती व खरें नांव 'मर' किंवा "बेझा" असें असतां ज्याला "नरमेर" या नांवानें संबोधीत होते तो मेनीसच्या अगोदर होऊन गेला. त्याची माहिती देणारे अनेक कोरीव लेख आहेत. त्यांत हिराकॉन्पोलिस येथें सांपडलेला व ज्याच्यावर लेख खोदलेला आहे असा एक पाषाण-खंड फारच

भव्य आहे. त्या पाषाणखंडावर राजा व त्याचा प्रधान, युद्धांत वापरण्यात येणारीं निशाणें, कैदी वगैरे सर्व खोदलेलें आहे तो व दुसऱ्या राजघराण्यातील येहों (बार्थोस) हे एकच होते असें म्हणणें उपलब्ध असलेल्या माहितीशीं विसंगत आहे. तो मेनीस नंतर झाला असें सेथे म्हणतो तर कांहींच्या मतानें तो व मेनिस हे एकच होत असें आहे. दुसराहि एक अंकित लेख असलेला पाषाणखंड सापडतो व तो राजघराण्याच्या काळाच्या पूर्वीचा असावा. त्यात "वृश्चिक" नावाच्या राजाचा उल्लेख आहे.

**पहिलीं राजघराणीं**.—पहिल्या राजघराण्यातील पुष्कळ राजांचीं नावें अबिडॉस येथें असलेल्या त्याच्या कबरस्थानावरून समजतात परंतु अबिडॉस येथील व मॅनेथो याच्या यादींत ज्याप्रमाणें त्याचा व्यक्तिश नामनिर्देश आहे तसा तेथें नसल्यामुळें व 'होरस' या विशिष्ट उपपदानी त्याचा जेथें तेथें उल्लेख केला असल्यामुळें नामनिर्णयाचे कामीं बराच घोटाळा उडतो. कांहीं राजाची व्यक्तिश नावें सापडतात, यावरून 'नवीन राज्यातील' लेखकाम तीं कशीं वाचावीत हें नीट अवगत नव्हतें हें सिद्ध होतें पहिल्या राजघराण्याच्या काळातसुद्धा लेखनपद्धतींत महत्वाचे फरक व सुधारणा घडून आल्या. मेनीस हें वैयक्तिक नाव फक्त एकाच जागीं दिलेलें आढळतें त्याचें होरस–नाव 'अहा' असून त्याचा अर्थ 'योद्धा' असा होता. 'अहा' व मेनीस हीं नावें एकाच व्यक्तीचीं असल्याबद्दल शंका घेण्यात येते परंतु ज्या ठिकाणीं त्याचा निर्देश केलेला आहे तेथील लिखाण इतक्या जुन्या पद्धतीचें आहे कीं, त्यावरून त्या शंकेचें निरसन होण्यासारखें आहे. अहा (मेनीस) हें नाव दोन कबरस्थानावर सापडलें होतें. एक कबरस्थान थीबीजच्या उत्तरेस व तांबड्या समुद्रास जाणाऱ्या रस्त्यासमोर जें एक 'नगाडा' नावाचें ठिकाण आहे तेथें होत आणि दुसरें अबिडॉस येथें होतें. मॅनेथो हा पहिल्या राजघराण्यास 'थिनाईट' म्हणतो, कारण, 'थिनिस' ही ज्या प्रांतात अबिडॉस शहर होतें त्याची राजधानी होती. इजिप्तचा वरचा प्रदेश हा खालच्या प्रदेशापेक्षा नेहमींच वरचढ असे. मेनीस हा मूळ वरच्या प्रदेशांतला असून नंतर त्यानें खालचा प्रदेश पादाक्रांत केला होता. त्यानें ज्या प्रांतावर स्वारी केली त्याच्या सीमेवर असलेलें मेम्फिस शहर त्यानें वसविलें होतें अशी आख्यायिका आहे तो तेथें व अबिडॉस या दोन्हीं ठिकाणीं रहात असावा. निदान पहिल्या राजघराण्यातील पुढील राजांपैकीं एकानें स्मारक अबिडॉस येथील विस्तीर्ण स्मशानभूमींत असल्याचें उघडकीस आलें आहे. पहिल्या राजघराण्यातील आठ राजांपैकीं तीन कोण होते हें अबिडॉस येथील कबरस्थानाच्या अवशिष्ट भागावरून सिद्ध झालें आहे आणि दुसराचीहि त्याचप्रमाणें माहिती मिळालेली आहे दोघा-



राजांनीं सिनाइमधील वाडी मघारा येथल्या तांबें व वैदूर्य याच्या खाणीमध्यें दोन शिलालेख खोदून ठेविले आहेत बहुतेक राजांचीं कबरस्थानें विटांचीं बांधलेलीं आहेत परंतु युसफेस नावाच्या एका राजाच्या कबरस्थानाची तक्तपोशी मात्र एलिफन्टाइन येथील ग्रनाइट दगडाची केलेली आहे. त्या कबरस्थानात पुष्कळसें थाटमाटाचें सामान, इतर सर्व प्रकारचीं साधनसामुग्री व अच्नूस व हस्तिदन्त याजवर कोरलेले राजाच्या कारकीर्दीचे प्रतिवार्षिक हकीकतीचे लेख ठेवीत असले पाहिजेत पालेर्मो शिलेवरील लेखाच्या एका भागावरून असें दिसून येतें कीं दरवर्षी पुराचे वेळीं नीलनदीचें पाणी किती उंचीपर्यंत चढत होतें व राजाच्या कारकीर्दीचा प्रतिवार्षिक तपशील काय होता यावर टीप लिहिण्यास लागणारीं साधनें पाचव्या राजघराण्यापर्यंत उपलब्ध होतीं

**पहिलीं चार राजघराणीं**.—मॅनेथोप्रमाणें पालेर्मो शिलालेखात सुद्धा पहिल्या राजघराण्यापासून दुसरें राजघराणें निघालेलें दाखविलें आहे दुसरें राजघराणेंहि थिनाइट होतें आणि त्याच्या नऊ (?) राजांचीं कबरस्थानें अबिडॉस येथें सापडत होतीं. मॅनेथोच्या मतानें तिसरें राजघराणें मेंफाईट होतें म्हणजे त्यातील राजाची राजधानी मेंफिस ही होती या घराण्यातील दोन राजांनीं अबिडॉसच्या नजीक असलेल्या 'बेट खलफ' येथें मनोऱ्याच्या आकाराचीं भव्य कबरस्थानें बांधलीं. परंतु त्यावेळचा सुप्रसिद्ध शिल्पकार व विद्वान लेखक "इम्होप" यानें त्या दोन राजांपैकीं "झोसर" राजाच्या सन्मानार्थ सक्कारा येथील चौफेर पायऱ्या असलेला दुसरा एक भव्य मनोरा बांधला या राजघराण्यातील शेवटचा राजा जो स्नेफू त्याच्यापासून हल्लींच्या शोधांपूर्वी माहीत असलेल्या मिसरदेशाच्या इतिहासास प्रारंभ होतो यापुढें स्मारकें व लेखी टिपणें पुष्कळशीं विपुल व महत्वाचीं आहेत आणि पालेर्मो शिलालेखावरूनहि भरपूर माहिती उपलब्ध होते स्नेफूच्या कारकीर्दींतील तीन वर्षांची उपलब्ध असलेली माहिती म्हटली म्हणजे त्यानें शिही लोकांवर यशस्वी स्वारी केली आणि लेबानानच्या जंगलातून आणलेल्या देवदारूचीं जहाजें व दारें केलीं ही होय सिनाइमध्यें असलेल्या वाडी मघारा येथ स्नेफूनें एक शिलालेख स्थापन केला होता मेंफिस व फायूम या दोन शहरामध्यें असलेले, एक मेडूम येथील पायऱ्याचा मनोरा आणि दुसरा दाशूर येथील संपूर्ण मनोरा असे दोन मनोरेहि त्यानें बांधले.

"नवीन राज्य" स्थापन होईपर्यंत मिसर देशात मनोरे बांधण्याचा क्रम अव्याहत सुरु होता विशेषकरून तिसऱ्या राजघराण्यापासून तों सहाव्या राजघराण्यापर्यंत प्रत्येक राजानें दगडी मनोऱ्याच्या रूपानें आपलें स्मारक करून ठेविलें आहे त्यातील झोसर व स्नेफू याच्याबद्दल उल्लेख केलेलाच आहे चवथ्या घराण्यातील सुप्रसिद्ध राजे म्हटले

म्हणजे चिऑप्स, चेफ्रेन व मायसरिनस. यांनीं अनुक्रमें गिझा येथील "श्रेष्ठ" (ग्रेट) "दुसरा" व "तिसरा" असे मनोरे बांधले. त्या काळच्या कलाकौशल्याच्या कामात जो एक भव्यपणा दृष्टीस पडतो तो तदनंतर कोठेंहि दिसून येत नाहीं. "स्फिंक्स"(स्त्रीमुखीसिंह) च्या देवालयात मेरिएट यास जे अनेक पुतळे सापडले त्यात चेफ्रेन राजाचा डायोराईट नावाच्या पाषाणाचा केलेला पुतळा हा मिसरदेशीय लोक शिल्पकलेंत किती निष्णात होते याचा उत्कृष्ट दाखला आहे. स्फिंक्सचें देवालय म्हणजे स्मारकाकरिता बांधलेली एक वेस आहे ही वेस ज्या पठारावर मनोरे बांधलेले आहेत तेथवर जाण्याकरिता जो एक चालचलाऊ पूल आहे त्याच्या पायथ्याशीं आहे चिऑप्स व चेफ्रेन या दोन राजाच्या दरम्यान होऊन गेलेला डेडेफ्र राजा यानें अबुरोश येथील मनोरा बांधला शेप्सरकाफ हा त्या घराण्यातील शेवटचा राजा होता या बहुतेक राजाचे शिलालेख वाडी मघारा येथील खाणींमध्यें सांपडले आहेत. मनोऱ्याच्या आसपास पुष्कळ राजदरबाराच्या सरदाराचे मुस्ताबे (विशिष्ट प्रकारचीं कबरस्थानें) आहेत. त्यांचें शिल्पकाम वाराणण्यासारखें काहे वर सांगितलेल्या चवथ्या राजघराण्यातील अनियन्त्रित सत्ताधाऱ्याच्या काळात तर काहीं नक्षींचें कबरस्थानें मिसर देशाच्या वरच्या प्रदेशात सापडतात स्फिंक्सच्या देवालयासभोंवार असलेलीं अनेक देवळें चिऑप्सराजानें बांधलीं होतीं असें दाखविणारा शिलालेख उपाध्याय वर्गांतील लोकानीं बनावट केला होता असें सिद्ध करण्यात आलें आहे, तथापि, स्फिंक्सचें देवालयच या चवथ्या घराण्यातील अत्यंत वैभवशाली राजाच्या कारकीर्दीत खडक फोडून तयार केलें असावें असें म्हणण्यास पुष्कळ जागा आहे

**पांचवें घराणें**.—पांचव्या घराण्यास 'एलिफन्टाइनचें घराणें' असें म्हणतात परंतु ही चूक असावी. कारण हे 'होरस' यास मूळ पुरुष न समजता सूर्य हाच मूळ पुरुष असें म्हणून ते सूर्याची उपासना करीत असत शिवाय ते आपल्या नावापुढें 'सूर्यपुत्र' असें उपपद लावून घेत असत या घराण्यातील साहुरे आणि इतर राजे यांनीं मोठमोठीं मंदिर व त्यातील मनोरे बांधून ते सर्व सूर्यास अर्पण केले आहेत त्यापैकीं अबुसीर येथील नोसेरीच्या देवालयासंबंधीं पूर्ण तपास लागला आहे. 'वेस्टकार पापायरस' या लेखातील अद्भुत गोष्टींमध्यें एका सूर्योपासिकेपासून तीन राजांची उत्पत्ति कशी झाली हें सांगितले आहे. पुष्कळ राजाच्या मनोऱ्यासंबंधीं माहिती उपलब्ध झालेली आहे. अबुसर येथील मनोरे अत्यंत प्राचीन आहेत. मनोरे असलेलीं साहुरेचीं देवालयें इतक्या चांगल्या स्थितीत आहेत कीं त्याच्यावर दिसून येणाऱ्या शिल्पकामावरून व नकशीकामावरून मिसरदेशांत इतक्या प्राचीनकाळींहि त्या कलाची अभिवृद्धि किती झाली होती व जलमार्गानें व खुष्कीच्या मार्गानें युद्धविषयक पराक्रम करण्यास लागणाऱ्या धाडसादि गुणाचा किती विकास झाला होता हें कळून येण्यासारखें आहे पाचव्या घराण्यातील अगदीं अखेरचा मनोरा म्हणजे सक्कारा येथील उनस याचा होय. त्यावर आचारविधींचे व जादूगिरीचे ग्रंथ कोरलेले आहेत ज्याचें शिल्पकाम अतिशय उत्तम आहे अशीं या काळचीं पुष्कळ कबरस्थानें मेम्फिस येथें व मिसरदेशाच्या वरच्या प्रदेशात चहूंकडे सापडतात. मिसरदेशातील अत्यंत प्राचीन देवालयातील खोदकामाचा पत्ता लागत नाहीं कदाचित् तें चुनखडीसारख्या दगडावर असल्यामुळें सर्व नष्ट झालें असावें. पालेर्मो शिलेवरील सनावळा ह्याच राजघराण्याच्या काळात खोदलल्या होत्या. या काळच्या मुख्य गोष्टी म्हटल्या म्हणजे देवालयास देणग्या व नेमणुका करून देणें ह्या होत यावरून राजदरबारीं धर्मगुरूंचें वजन फार होतें हें उघड होतें. सिनाइ व न्युबीआ येथील स्वाऱ्याच्या स्मरणार्थहि शिलालेख खोदलेले आहेत.

**सहावें घराणें**.—मागील घराण्यापेक्षा सहावें राजघराणें जरी अधिक तरतरीत नव्हतें तरी त्यानें त्या काळची पुष्कळशी माहिती मागें ठेवली आहे. ज्यावर काहीं मजकूर खोदलेला आहे अशीं त्यावेळचीं कबरस्थानें सर्व देशभर पसरलेलीं आहेत. या घराण्यातील 'पेपी' किंवा 'फिऑप्स' नावाचा तिसरा राजा सर्वांत मोठा कार्यकर्ता होता. त्याच्या सक्कारा येथील मनोऱ्यावरूनच ज्या राजधानीस हा काळपर्यंत 'शुभ्र भिंती' असें म्हणत होते तिला पुढें प्रसिद्ध असलेले 'मेम्फिस' हें नाव मिळालें. 'पेपी' राजाच्या कारकीर्दींत किंवा त्याच्या मागून झालेल्या राजाच्या कारकीर्दींत कोणी एका ऊन नावाच्या मनुष्यानें सिनाइच्या द्वीपकल्पावर व दक्षिण पॅलेस्टाईनवर स्वारी करण्याचे कामीं व एलिफन्टाईन व इतर खाणी यातून 'ग्रॅनाईट' नावाचा दगड वाहून नेण्याच्या कामीं फार मेहनत घेतली अशा प्रकारचें अबिडॉस येथील कबरस्थानाच्या शिलेवर वर्णन आहे एलिफन्टाईनचा राजा व न्युबिआ व लिबिआ येथील लमाणाच्या प्रांताचा पुढारी या नात्यानें हरखुफ नावाचा सरदार मेरेन्रे व दुसरा पेपी याच्या कारकीर्दींत प्रसिद्धीस आला एका वेळीं त्यानें एक वामनमूर्ति नर्तक सूदनहून धरून आणला होता तो पाचव्या राजघराण्यातील असा राजाच्या कारकीर्दींत प्यूऑनी येथून आणलेल्या नाच्या प्रमाणें होता असें त्याचें वर्णन केलें आहे.त्यानें दुसऱ्या पेपीला इतका आनंद झाला कीं त्यानें तो व्यक्त करण्याकरितां हरखुफ यास एक पत्र लिहिलें. तें सर्व पत्र हरखुफच्या कबरस्थानाच्या दर्शनी भागावर खोदले आहे. हा शेवटचा राजा फार लहान वयात गादीवर बसल्यामुळें त्यानें नव्वद वर्षांवर राज्य केलें. ही गोष्ट लोकाच्या स्मरणात इतक्या काळपर्यंत होती कीं मॅनेथो यानें सुद्धा त्याच्या कारकीर्दीचा काळ चव्याण्णव वर्षांचा दिलेला आहे. या दीर्घकालीन कारकीर्दीमुळेंच कदाचित् तें घराणें नष्ट झालें असावें. देशातील लहान लहान राजेरजवाड्यांची सत्ता,

संपत्ति व सत्ता यामध्यें उत्तरोत्तर चलती होत गेली दुसऱ्या पेपीच्या कारकीर्दीनंतर स्मारकांच्या व धर्तीत भिड पडलेली दिसून येते त्यावरून तो काळ अंतःकलहाचा व बेबंदशाहीचा असावा असें दिसतें अखेर त्या जुन्या राज्याचा अंत झाला

**सातवें व आठवें घराणें—**.सातवें व आठवें हीं राजघराणीं मेम्फिस येथील होतीं परंतु त्यांतील कांहीं राजाच्या नावाखेरीज त्यांच्याविषयीं कांहीं एक माहिती उपलब्ध नाहीं.

**नववें व दहावें घराणें उर्फ मध्यकालीन राज्य—** मिसर देशाच्या मध्यभागीं असलेल्या हिराक्लिओपोलिस येथील *नवव्या व दहाव्या राजघराण्यातील राजाच्या हातीं* सत्ता गेल्यामुळें दीर्घकाल चालू असलेलें मेंफिस येथील राजाचें राज्य लयास गेलें त्या राजाचें नाव खेती किंवा अखथोज असावें परंतु त्याची विशेष प्रसिद्धी झाली नाहीं मिसर देशाच्या वरच्या प्रदेशात स्वारी करून व तेथें आपली राज्यस्थापना करून त्यानीं मेम्फिस–राजघराण्यातील राजांवर स्वारी केली असावी त्या काळचीं मुख्य स्मारकें म्हटलीं म्हणजे ज्यांवर लेख लिहिले आहेत अशीं अस्यूत येथील कबरस्थानें होत. मिकरे नावाच्या राजास हिराक्लिओपोलिसमधून पळवून लाविलें असतां त्यानें वरच्या मिसर प्रदेशांतून सैन्य व आरमार गोळा करून व विशेषेंकरून अस्यूत येथील मांड*लिक राजाची मदत घेऊन आपलें हिराक्लिओपोलिस शहर* हस्तगत केलें अशी माहिती मिळते परंतु त्याचा मनोरा मात्र मेम्फिस येथील राजेलोकांच्या श्मशानभूमींत बांधला होता

**अकरावें घराणें—**नंतर थीबीजच्या राजानीं आपलें स्वातंत्र्य प्राप्त करून घेऊन अकराव्या राजघराण्याची स्थापना केली. त्या घराण्यातील राजानीं उत्तरेकडे आपल्या राज्याची मर्यादा वाढवून शेवटीं सर्व देश व्यापून टाकला मॉन्ट हें थीबीज येथील एका देवाचें नांव असल्यामुळें या राजास "मेन्थोप" म्हणत असत *कांहीं दर्जाच्या राजास ' एन्योती '"* हें नांव होतें या राजास थीबीज येथें नेऊन पुरण्याची चाल असावी, कारण, ज्या पेट्यात त्यांचीं शवें पुरण्यास आलीं *असावीं अशा पेट्या एकोणिसाव्या शतकातील पुराणवस्तु* संग्राहकास सापडल्या आहेत पहिल्या निभेप मेन्थोपनें सर्व मिसर देशावर आपला अमल बसविला होता. डेर एल् बाहरी येथील ' मिसर—संशोधन—फंड ' या मंडळानें जमीन खोदून तिसरा नेभेप्र मेन्थोप या राजाचें कबरस्थान उकरून काढलें त्यावरून तें फार भव्य स्मारक असावें असें दिसतें त्याच्या मागून गादीवर येणारा चवथा सान्खेरे मेन्थोप यानें तांबड्या समुद्राच्या मार्गानें प्युन्टवर स्वारी केली होती

**बाराव्या राजघराण्याची कारकीर्द.—***ही मध्यकालीन राज्याच्या केन्द्रस्थानीं होती मेम्फाईट राजघराण्याचा ऱ्हास व हिराक्लिओपोलाईट राजघराण्याचा उदय हे त्याची* संक्रमणावस्था दाखवितात व अकराव्या राजघराण्यातील थीबीजच्या राजानीं जो राज्याचा विस्तार केला त्यानें मध्ययुगाच्या खरोखरीचा प्रारंभ त्या वेळीं झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं सहाव्या राजघराण्याच्या वेळचीं स्मारकें अगदीं ओबडधोबड व रानटी तऱ्हेचीं होतीं परंतु बाराव्या राजघराण्याच्या काळचीं स्मारकें भव्य, नमुनेदार, उत्कृष्ट कारागिरीचीं व विपुल आहेत बाराव्या राजघराण्यासंबधानें जरी पुष्कळशी माहिती उपलब्ध नाहीं तरी टयूरिन पापायरसच्या व इतर अनेक मनवार असलेल्या खोदीव लेखावरून त्या घराण्यातील ८ आठ राजाच्या कारकीर्दीचा काळ व त्याचा क्रम बरोबर रीतीनें निश्चित करिता येतो राज्यावर अनेक वेळा संकटें आल्या*मुळें हे राजे आपल्या मागून येणारे गादीचे वारस वर्तमान* व खंबीर असावेत अशी खबरदारी घेत असत तत्का*लीन राजाचा व त्याच्या मांडलिकाचा उद्देश आपलें* वर्चस्व सभोवारच्या मुलुखावर प्रस्थापित करण्याचा असल्यामुळें प्रतिपक्षास आपल्या हुकमतींत ठेवण्याकरिता व इमानी अनुयायास पारितोषिकें वगैरे देऊन उत्तेजन देण्याकरिता मुख्य गादीवरचा राजा खंबीर मनाचा असणें अत्यंत आवश्यक होतें. राजाच्या मेहेरबानींतल्या लोकांचीं धनाढ्य सरदारांचीं व विशेषकरून मध्यमिसरदेशातील बेनी हसन, एल् बरशा, अस्यूत व डेर रिफा येथील कांहीं विशिष्ट कुटुंबातील माणसांचीं कबरस्थानें फार भपकेदार आहेत आणि राजदरबाराप्रमाणें ल्हान प्रमाणावर दरबार भरविण्याची चाल त्यांच्यामध्यें असावी असें उपलब्ध असलेल्या माहितीवरून दिसून येतें शेवटीं अनेक दृढनिश्चयी राजाच्या प्रयत्नामुळें तिसऱ्या सेन्वोस्री व तिसऱ्या अमेनेम्हेच्या कारकीर्दींत सर्व सत्ता त्यांचे *ठिकाणीं केंद्रीभूत झालेली दिसून* येते या घराण्यातील राजाचीं दोन नावें आहेत, एक, अमेनेम्ह व दुसरें सेन्वोस्री पहिला अमेनेम्हे हा पहिला राजा होता याचा व मागल्या घराण्यातील राजाचा काय संबध होता एतद्विषयक माहिती उपलब्ध नाहीं त्यानें तीस वर्षेंपर्यंत राज्य केलें *त्यातील दहा वर्षें तो व त्याचा पुत्र पहिला सेन्वोस्री हे दोघे* भागीदार या नात्यानें राज्य चालवीत होते त्याला राज्य मिळविण्याला व त्यास व्यवस्थित स्वरूप देण्यास लढावें लागलें व तें कार्य पार पडल्यानंतर त्यानें आपली राजधानी थीबीजहून हलवून ती मेम्फिसच्या दक्षिणेस पंचवीस मैलावर मध्यभागीं असलेल्या लिष्ट *शहरीं नेली व तेथें आपलें* निवासस्थान केलें त्याचीं स्मारकें सर्व मिसरदेशभर पसर*लेलीं असून सिनाईपर्यंतच्या दूरदूरच्या दगडाच्या व इतर खाणी त्याच्या कर्तृत्वाचा साक्ष* पटवितात न्यूबियाच्या लोकांवर त्यानें एकदा स्वारी केली होती हीहि एक गोष्ट त्याच्या संबधानें माहीत आहे त्यानें आपला मुलगा सेन्वोस्री यास केलेला उपदेश म्हणून जो प्रसिद्ध आहे त्यात वरील गोष्टींचा उल्लेख असून त्यावरून त्याचें आपल्या प्रजेच्या ठिकाणीं असलेलें वात्सल्य व त्याच्या खुद्द राजवा-

ल्यात त्याच्या भरवशाच्या नोकराकडून त्याचा खून करण्याचा प्रय न झाला होता यावरून ते किती कृतघ्न होते हे व्यक्त होतें

पहिला सेन्वोस्री दहा वर्षे आपल्या बापाबरोबर राज्याचा भागीदार होता हे वर सांगितलेंच आहे त्या काळात तोच मुख्य कार्यकर्ता असून त्यानें सुदनमध्यें व लिबिअन लोकांवर पुष्कळ स्वाऱ्या केल्या अमेनेम्हेच्या मृत्यूनंतर त्याने आपल्या पंचेचाळीस वर्षांच्या कारकीर्दीत आपल्या राजघराण्याचा लौकिक चांगलाच वाढविला हेलिओपोलिस येथील चौकोनी मनोरा हा त्याच्या सुप्रसिद्ध स्मारकांपैकीं एक असून मोरिसच्या सरोवरास बांध घालण्याचें पुष्कळसें काम त्याच्या कारकीर्दीत झालें असावें त्यानें नील नदाच्या उगमाजवळ वाडी हाल्का येथ एक देवालय बांधलें व न्युबियातील निरनिराळ्या जातींवर मिळविलेल्या जयाचें स्मारक म्हणून तेथें एक विजयस्तंभ उभारला. बेनी हसन येथील अमेनीचें आणि अस्यूत येथील हेप्झेफाचें अशीं दोन उत्कृष्ट कबरस्थानेंहि त्याच्याच कारकार्दीत बांधली गेलीं पहिला अमनेम्हे व पहिला सेन्वोर्स्री या दोघा पितापुत्राचे मनोरे लिष्ट येथें आहेत

दुसरा अमेनेम्हे यास दाशूर येथ मूठमाती देण्यात आली त्याच्या मागून दुसरा सेन्वोस्री गादीवर बसला त्याचा मनोरा फायूमनदीच्या मुखाशीं इलाहून येथ आहे बनीहसन येथील नेमहोंपच्या कबरस्थानावरील रंगकाम याच्याच कारकीर्दीत केलें होत सदर रंगकामात सेमिटिक बेदुइन लोक पूर्वेकडील अरण्यातून मिसर देशात एक प्रकारच नेत्रविलेपन आणीत आहेत असा अत्यत मनोहर देखावा दाखविला आहे तिसरा सेन्वोस्री यानें पॅलेस्टाईन व न्यूबिआ प्रांतावर स्वाऱ्या केल्या व आपल्या राज्याच्या दक्षिणमर्यादेवर सेम्ना येथ एक पुतळा व अनक जयस्तंभ उभारले त्याच्या मनोऱ्याजवळ त्याच्या कुटुंबातील एका राजकन्येचे जवाहिराचे अलंकार सापडले ज्याच्यावरील चित्रकामात एक राक्षसी पुतळा एका जागेवरून दुसऱ्या जागीं नेल्याचें दाखविलें आहे अशा एल बरशा येथील थेथॉपच्या कबरस्थानाचे बांधकाम या राजाच्या कारकीर्दीत संपूर्ण झालें.

तिसरा अमेनेम्हे याने मोरिस सरोवराचे काम पुरें केलें आणि सेम्ना येथें नीलनदाच्या पुराचें पाणी किती उंचीपर्यंत चढतें हे नमुद करण्याचा प्रघात सुरू केला तो क्रम त्याच्या मागून गादीवर बसलेल्या राजानीं पुढें चालू ठेवला त्याच्या शेचाळीस वर्षांच्या कारकीर्दीत त्यानें दाशूर येथें एक व मोरिस सरोवराच्या जवळ हावरा येथें एक असे दोन मनोरे बांधले हावऱ्याच्या मनोऱ्याजवळ चक्रव्यूह ( लॅबिरॅथ ) नावाचें एक भलें मोठें कबरस्थान आहे चवथ्या अमेनेम्हेची कारकीर्द अल्पकालिक होती आणि हें राजघराणें सेबेक्नेफ्रू नावाच्या राणीबरोबर नष्ट झालें लॅबिरिंथच्या उपलब्ध असलेल्या अवशिष्ट भागात त्या राणीच नाव सापडते या म्हणजे बाराव्या राजघराण्यात आठ राजे झाले आणि तें एकदर दोनशेंतरी वर्षे टिकलें या घराण्याचा नावलौकिक जरी मोठा आहे तरी त्यानें आपल्या राज्याचा विस्तार नील थडीच्या बाहेर केला नाहीं शिवाय मनोऱ्यापेक्षाहि अधिक वाखाणलेल्या त्याच्या मोठ्यातल्या मोठ्या स्मारकाचें एका कपऱ्याच्या मोठ्या राशीशिवाय सांप्रत काहींएक उपलब्ध नाहीं

**तेराव्यापासून सतराव्यापर्यंत घराणीं —** " नूतन साम्राज्याचा " उदय होईपर्यंत यापुढच्या काळाचा इतिहास फारदी अप्रसिद्ध आहे मॅनेथो यानें तेराव्यापासून सतराव्या राजघराण्यापर्यंत सर्वांचीं नावं दिलेलीं आहेत परंतु पधराव्या व सोळाव्या "हिक्सॉस" राजघराण्यातील राजाशिवाय त्याने दिलेल्या इतर नावांचा लोप झालेला आहे अबिडॉस येथील शिलालेखात बाराव्यापासून आठराव्या राजघराण्याचा उल्लेखहि केलेला नाहीं टयूरिन येथ असलेल्या कागदपत्रावरून बरींच नावें सापडतात आणि इतर स्मारकावरूनहि त्याच्यात भर पडते. परंतु त्यावरून त्याच स्थलकालादि निश्चित करण दुरापास्त आहे हिक्सॉस घराण्यातील नावें मात्र त्याच्या परदेशीय स्वरूपावरून ज्यावर तीं खोदलीं आहेत त्या जवाहिराच्या विशिष्ट आकारावरून व मनेथोनें दिलेल्या नावाशीं दिसून येणाऱ्या सादृश्यावरून निश्चित करिता येतात सतराव्या घराण्यातील राजेहि त्याच्या विशिष्टप्रकारच्या नावावरून व अन्य पुराव्यावरून ओळखता येतात मॅनेथोनें तेराव्या व चवदाव्या राजघराण्यात बऱ्याच राजाचा गर्दी केला आहे परंतु या एकदर राज्याचा काळ तीनशें चारशें वर्षांचा होता असें धरून चालणें सयुक्तिक दिसतें

तेराव्या घराण्यातील व क्वचित् चवदाव्या घराण्यातील राजाचे ( विशेषकरून थीबीज व टॅनिस येथे ) ग्रानाईट दगडाचे घडविलेले, भव्य आकाराचे व उत्कृष्ट कारागिरीचे पुतळे आहेत, काहींच्या इमारतींचे अवशिष्ट भाग आहेत तर काहींचे पहिल्या धबधब्याच्या आसपास असलेल्या खडकात कोरीव लेख व मूर्ती आहेत

**हिक्सॉस घराण्यांतील राजांची कारकीर्द —** मिसर देशाच्या अन्तःकलहामुळें तो परक्याच्या हातीं जावा यात काहीं नवल नाहीं मिसर देश काबीज करण्यास हिक्सॉस राजाना युद्ध करावें लागल नाहीं असें मॅनेथो म्हणतो ॲपोफिस राजाच्या कारकीर्दीच्या तेहतिसाव्या वर्षी ऱ्हिंड येथील गणितविषयक कागदपत्राची नक्कल करण्यात आली यावरून हिक्सॉस घराण्याचें राज्य बराच वेळ टिकलें असावें असें दिसतें हिक्सॉस राजाचीं स्मारकें व त्याचें " स्कॅरब " नावाच्या किड्याच्या आकृतीच्या जवाहिरावर खोदलेले लेख वरच्या व खालच्या मिसर

प्रदेशांत चहूंकडे सापडतात खिआन राजाची तमली स्मारकें व कोरीव लेख तर क्रीट व बगदादपर्यंत पसरले होते हिक्सॉस राजे आपल्या सिरियातील देवाचे उपासक होते त्यांनीं आपला देव व मिसर देशाचा देव सेप हे दोन्ही देव एकच होत असें मत प्रस्थापित करून त्या पंथाचा प्रसार सर्व मिसर देशभर करण्याचा जोराचा प्रयत्न केला व त्यामुळे त्या देशांतील मूळच्या देवाचें महत्त्व फार कमी झालें ज्यामुळें मिसर देशांतील लोकांच्या चारित्र्यावर व इतिहासावर इतका विलक्षण परिणाम झाला त्या संक्रमणकालाची कांहीं तरी निश्चित माहिती एखादे वेळीं उपलब्ध होईल अशी आशा आहे हिक्सॉस राजाची सत्ता समूळ नष्ट झाल्यावर "नूतनसाम्राज्यातील" कला-कुसरीच्या व प्रतापशाली युगास सुरवात झाली सतराव्या राजघराण्यातील अर्धवट स्वतंत्र अशा लहान सहान राजे रजवाड्यांनीं हिक्सॉस राजाच्या सत्तेस विरोध केला या लढायामध्यें सिकेनेन्रे याचें नांव प्रामुख्यानें पुढें येतें तिसऱ्या सिकनेन्रेच्या 'मर्मी" (मसाला भरून ठेवलेलें प्रेत) वरून हिक्सॉस याच्या बरोबर झालेल्या लढाईत त्याच्या मस्तकावर भयंकर वार लागून तें छिन्न भिन्न झालें असल्याचें दिसून येतें

**अठरावें राजघराणें–नूतन साम्राज्य**—या युगास "नूतन युग" म्हणतात व "राज्य" या शब्दाच्या, ऐवजीं "साम्राज्य" हा शब्द वापरतात यावरून या काळीं राज्याचा विस्तार बराच झाला होता हें उघड दिसतें वैभवशाली अठरावें राजघराणें याचा सतराव्या राजघराण्याशीं निकटचा संबंध होता या अठराव्या राजघराण्यातील राजांनीं नील नदीच्या–मुखप्रदेशाच्या–वायव्येकडील हिक्सॉस राजाची सत्ता उलथून पाडण्याचें कार्य प्रथम हातीं घेतलें व अव्हारिसचा किल्ला सर करून अठराव्या घराण्याचा संस्थापक "अह्मोसी" यानें तें कार्य यशस्वी रीतीनें पार पाडलें त्यानें फिरून पॅलेस्टाईन मध्यें त्याच्यावर स्वारी केली व तींत शाहुरेन शहराला तीन वर्षे वेढा देऊन अखेर तें हस्तगत केलें शिवाय, आपल्या राज्यातील बंडाळी मोडून त्यानें सीरिया व न्यूबिया या देशावरहि स्वाऱ्या केल्या याच वेळेस कोणा एका अबाना नावाच्या गृहस्थास राजाच्या नावाचा म्हणजे अह्मोसी नावाचा मुलगा होता त्याच्या एल काब येथील शिलालेखावरून या काळची पुष्कळशी ऐतिहासिक माहिती उपलब्ध होते अह्मोसी नंतर पहिला अमेनॉफिस राज्यावर बसला त्यानें लिबिया व इथिओपिआ या देशावर स्वाऱ्या केल्या यानंतर पहिला टेथमॉसिस हा तिसरा राजा होऊन गेला तो दुसऱ्या घराण्यातील होता परंतु त्यानें आपल्या अह्मोसी नावाच्या बायकोकडून राज्यावर आपला हक्क लागू केला अशा रीतीनें कांहीं एक दंगा धोपा नसता जेव्हां तीस वर्षेपर्यंत राजसत्ता नीट रीतीनें प्रस्थापित झाली तेव्हां दुसऱ्या देशावर स्वाऱ्या करून आपला राज्यविस्तार करण्याइतका मिसर देश धनाढ्य व बलाढ्य झाला त्याच्यांत आता क्षात्रतेज चमकूं लागलें राजा, त्याचा प्रधान व इतर दरबारचे अंमलदार याच्या हातांत सर्व राजसत्ता एकवटली होती व मध्यकालीन राज्याच्या वेळेस प्रचारांत असलेल्या सरंजामी पद्धतीना मागमूसहि शिल्लक नव्हता टेथमॉसिस यानें "कुश" प्रांत पूर्णपणें काबीज केला व तेथील राज्यकारभार चालविण्यास आपल्या प्रतिनिधीची नेमणूक केली हा "कुश" प्रान्त दक्षिणेस चवथ्या धबधब्याच्या किंचित् खालीं असलेल्या नपाट्यापासून उत्तरेस एल काब पर्यंत विस्तृत झाला होता त्यामुळें वरच्या मिसर देशाचे पहिले तीन प्रांत त्यांत समाविष्ट होते नंतर सीरियाकडे मोर्चा वळवून टेथमॉसिस हा युफ्रेटिसपर्यंतचा मुलुख सर करीत गेला कदाचित् त्याच्या पूर्वीचा राजाहि तेथवर गेला असेल परंतु तें सिद्ध करणारीं साधनें उपलब्ध नाहींत वर दिलेल्या स्वाऱ्या खर्चाच्या दृष्टीनें नुकसानकारक नव्हत्या. उलट केवळ वाढ लुटालूट व खंडणी या योगानें मिसर देशाचा सांपत्तिक भरभराट होत गेली मिसर देशाच्या बादशहानीं कर्णक येथील थीबीज शहरच्या ॲमन नामक देवाच्या देवस्थानाचा विस्तार करून, त्याच्या ऐश्वर्यात भर घालून जगातील सर्व देवस्थानामध्यें त्याला जें अत्यंत श्रेष्ठ स्थान प्राप्त करून दिलें यास प्रथम पहिल्या टेथमॉसिसनें सुरवात केली असें म्हणण्यास हरकत नाहीं डेर एल बाहरी येथील देवालयाच्या रचनेस त्याचीच कल्पकता कारणीभूत झाला त्याच्या कारकीर्दीच्या अखेर त्याचे वडील मुलगे मृत झाल्यामुळे टेथमॉसिस यानें अह्मोसी पासून झालेल्या हाटशेपसूत नावाच्या आपल्या मुलीकडे राज्यकारभाराचा कांहीं भाग सोपविला. ज्या खिंडींत थीबीसच्या राजांचीं कबरस्थानें आहेत तेथें पहिल्या टेथमॉसिस यासच प्रथम मूठमाती देण्यांत आली होती त्याच्या मागून त्याचा मुलगा हाटशेपसूतचा पति दुसरा टेथमॉसिस राज्यावर बसला परंतु त्यानें दोन तीन वर्षेच राज्य केलें तेवढ्या अवधींत त्यानें न्यूबियावर स्वारी केली व आपल्या एसी नावाच्या रखेलीचा मुलगा जो तिसरा टेथमॉसिस यास आपल्या बरोबर गादीवर बसविलें परंतु आपल्या पतीच्या निधनानंतर हाटशेपसूतनें सर्व सत्ता आपल्या हातीं घेतली. तिच्या पुतळ्यांत तिचा पेहराव व स्वरूप जरी मर्दानी व पुरुषासारखें आहेत तरी शिलालेखांत तिचा उल्लेख स्त्रिलिंगातच केलेला आढळतो या काळच्या कांहीं स्मारकांत तिचेंच नांव फक्त आढळतें तर कांहींत तिचें व तिसऱ्या टेथमॉसिसचें जोडीनें आढळतात व कांहींत फक्त टेथमॉसिसचें आढळतें, परंतु, या अद्वितीय बाईचें आपल्या सावत्र मुलावर पुष्कळच वर्चस्व असलें पाहिजे, कारण मिसर देशाची सर्व राजसत्ता तिच्या हातीं असल्या-

बद्दल तिची प्रसिद्ध आहे टेथमॉसिसच्या मर्मीवरून ( त्याच्या जतन केलेल्या शवावरून ) किंवा त्याच्या कारकीर्दीच्या शकावलीवरून पाहू गेलें तर तो उतारवयाचा दिसून येतो. तथापि त्याच्या आयुष्याच्या उत्तरार्धांत दिसून येणारा त्याचा प्रभाव तो ज्यावेळीं हाटशेपसूत बरोबर जोडीनें राज्यकारभार चालवीत होता त्यावेळीं दृष्टीस पडत नाहीं. शांततेच्या काळांत ज्या कलांची अभिवृद्धि करणें शक्य असतें त्यांची अभिवृद्धि हाटशेपसूत हिनें केली हिक्सॉस घराण्यातील राजांच्या जुलमामुळें व अनास्थेमुळें ज्या वरच्या व खालच्या मिसर देशांतील देवस्थानांची अव्यवस्था झाली होती तेथाल पूजाअर्चा तिनें पूर्ववत सुरू केली देरएल्बाहरी येथील देवालयाचें काम पुरें करून व त्यास उत्तम तऱ्हेनें शृंगारून तिनें त्याच्या भिंतावर आपली दैवी उत्पत्ति, अॅमनच्या देखरेखीखालीं आपलें संगोपन व आपल्या पित्याबरोबर जोडीनें राज्य चालविणें इत्यादि गोष्टींचीं चित्रें काढविलीं प्यूण्टेवर जलमार्गानें केलेल्या स्वारींचीं व इतर अन्य प्रसंगांचीं सुप्रसिद्ध शिल्पकामें येथ पहावयास सांपडतात पहिल्या व दुसऱ्या टेथमॉसिसच्या कारकीर्दींत कर्णक येथें सुरू केलेलीं कामें पुरीं करण्यात हाटशेपसूत हिनें फार मेहनत केली व तेथाल वेशीजवळ तिनें दोन चौकोनी मनोरे उभारले त्यांपैकीं एक अद्याप उभा आहे व तो त्या नमुनेदार देवालयास विलक्षण प्रकारची शोभा देतो. जेव्हां हाटशेपसूत ही पहिल्या टेथमॉसिस बरोबर राज्यकारभार चालवीत होती तेव्हांपासून बाविसाव्या वर्षाचा सन सिनाइ येथें सांपडला आहे त्यानंतर थोड्याच अवधींत तिसरा टेथमॉसिस हा आपल्या कारकीर्दीच्या बाविसाव्या वर्षी मोठ्या जोमानें राज्यकारभार चालवीत आहे असें दिसून येतें हाटशेपसूत हिच्या ठिकाणीं असें कांहीं तेज होतें कीं ती असेपर्यंत तिच्यावर सर्व सेवकांची निष्ठा होती व कोणाची वर मान करण्याची छाती होत नव्हती. परंतु तिच्या मृत्युनंतर थोड्याच अवधींत प्रतिक्रियेला सुरवात झाली स्त्रीप्राबल्यासंबंधानें तिटकारा, त्यांत दुसऱ्यावर छाप ठेवण्याची त्या स्त्रीची तऱ्हा व आपल्या सावत्र मुलाचा वास्तविक हक्क असता तो तिनें बळकावणें इत्यादि गोष्टी त्या प्रतिक्रियेस कारणीभूत झाल्या असाव्या. त्यामुळें तिच्या खोदीव मूर्ती छिन्नभिन्न करण्यांत आल्या व तिचीं स्मारकें नष्ट करून त्यावर नवीन इमारती होऊं लागल्या आणि कबरस्थानांत कायमची विश्रांति घेत पडलेल्या तिच्या एकनिष्ठ सेवकाचाहि तसाच सूड घेण्यांत आला. तदनंतर अखेनटान यानें आपल्या धर्मवेडामुळें अॅमनदेवाच्या सर्व मूर्ति आणि त्याचें नाव ज्यावर आहे असे सर्व कोरीव लेख छिन्नविछिन्न करून टाकले यात हाटशेपसूत हिचीं सर्व उत्तम उत्तम स्मारकें नष्ट झालीं एकोणिसाव्या राजघराण्याच्या संस्थापकांनीं तर तिला राज्य करण्याचा हक्कच नव्हता म्हणून तिचीं नावें खोडून त्याजागीं पहिला, दुसरा व तिसरा टेथमॉसिस यांचीं नावें घातलीं. हीं कल कौशल्यविध्वंसकबुद्धि सर्व मिसरदेशभर त्यावेळीं दिसून आली परंतु सिनाइच्या दूरदूरच्या खाणींत असलेल्या हाटशेपसूतच्या मूर्ती मात्र अभंग राहिल्या. पहिल्या सेतीनें व दुसऱ्या रामेसीसनें केलेल्या राजाच्या यादीमध्यें हाटशेपसूतचें नाव नाहीं व यापुढील कोणत्याहि स्मारकांत तिच्या कारकीर्दींचा उल्लेख नाहीं

**तिसरा टेथमॉसिस याच्या लढाया.**—तिसरा टेथमॉसिस यानें आपल्या सर्व सामर्थ्याचा उपयोग युद्धाकडे केला हाटशेपसूतच्या मृत्यूनंतर सिरियानें बंड केलें परंतु हा राजा केवळ बावीस वर्षांचा असता त्या बंडखोराची खोड मोडण्यास सिद्ध झाला. ऑरोन्टीज या नदीवर असलेल्या कडेश शहरानें जरी या बंडांत पुढाकार घेतला होता तरी बंडाची साथ सर्व पश्चिम सिरियाभर पसरली होती मेगीडो येथील सिरियन लोकांचें पायदळ व रथदळ यांच्याशीं सामना व अखेर तें ठिकाण हस्तगत करणें इत्यादि सर्व प्रथम युद्धांतील टेथमॉसिसच्या हालचाली दररोज टिपून ठेवण्यात येत होत्या या बखरींतील उतारा व टेथमॉसिसच्या पुढील युद्धाचा त्रोटक वृत्तांत कर्णक येथील देवालयाच्या भिंतीवर खोदलेले आहेत. पाच वेळ युद्ध केल्यानंतर त्यानें सर्व दक्षिण सिरिया पादाक्रान्त केला व फिनिशियाचीं बंदरेंहि हस्तगत केलीं. सहाव्या युद्धांत त्यानें कडेश शहर सर केलें. पुढील वर्षी टेथमॉसिस यानें फिरून फिनिशियाच्या बंदरास भेट दिली व बंडखोरास शासन करून सिरियापासून खंडणी वसूल केली इतकें झालें तरी राज्य-विस्तारांचें बाबतींत आणखी एक वर्ष नाईपर्यंत त्याचें पाऊल पुढें पडलें नाहीं. तदनंतर त्याच्या कारकीर्दीच्या तेहतिसाव्या वर्षी तो कडेशमधून कारकेमिशपर्यंत लढाया मारीत गेला व युफ्रेटिस नदी ओलांडून मिटनीच्या राजाच्या मुलखांत शिरला. तेथें त्यानें पहिल्या टेथमॉसिसच्या शिलेजवळ लेख कोरून आपली एक शिला बसविली व नदी मार्गानें दक्षिणेंत निऊपर्यंत गेला. येथें त्यानें एकशेवीस हत्तींच्या कळपाची शिकार केली आणि नंतर पश्चिमेकडे वळून नहरिणाचा खंडणी वसूल करून एशियामायनरमधील हिटाइट लोकांच्या व बाबिलोनच्या राजाच्या देणग्यांचा स्वीकार केला कडेशच्या दुसऱ्या वेढ्याच्या वेळीं बंड करण्याच्या प्रवृत्तीचा पूर्ण नायनाट होईपर्यंत या राजानें सिरियावर एकंदर सतरा स्वाऱ्या केल्या लिबिया व एथिओपिया या देशावरील त्याच्या स्वाऱ्या विशेष महत्वाच्या नाहींत. लढायांच्या मध्यंतरींच्या काळांत तिसरा टेथमॉसिस जो राज्यकारभार पाही त्यावरून तो मोठा कर्तव्यवान् राजकारणी पुरुष होता असें दिसून येतें राज्याच्या कानाकोपऱ्यांतहि काय चाललें आहे इकडे त्याचें लक्ष असे त्याच्या कारकीर्दींतील बहुतेक महत्वाच्या वर्षांतील सहा महिने सिरियावरील स्वाऱ्यांत खर्ची पडत असत परंतु राहिलेला सर्व काळ तो राज्याच्या अंतर्गत व्यवस्थेकडे लावी-

तो यात अन्याय व दरोडे याचा बंदोबस्त करी, जिंकलेल्या देशांच्या लुटींतून व खंडण्यांतून व धरून आणलेल्या बंद्यांकडून देवालयें दुरुस्त करणें व त्यास सुशोभित करणें इत्यादि कामें करून घेई, किंवा अॅमन देवाच्या देवळांतील भपकेदार उपकरणीं तयार करण्याकरिता कल्पनाचित्रें रेखाटून देई. त्याच्या कारकीर्दीच्या उत्तर काळांत त्याने न्युबियावर कांहीं स्वाऱ्या नेल्या. टेथमॉसिस हा आपल्या कारकीर्दीच्या चोपनाव्या वर्षी वारला. डेरएल्‌बाहरी येथील तळघरात सांपडलेल्या त्याच्या ममीवरून (जतन केलेल्या शवावरून) तो फार वृद्ध होता असें दिसतें. तो सर्व मिसर देशाच्या इतिहासात नसला तरी "नूतन साम्राज्यांतील" सर्वांत मोठा राजा होता हें निर्विवाद आहे.

**तिसरा अॅमेनोफिस.**–तिसरा टेथमॉसिस यानें आपल्या कारकीर्दीच्या शेवटीं शेवटीं दुसरा अॅमेनोफिस नावाच्या मुलास आपल्याबरोबर गादीवर बसविलें होतें आणि तोच त्याच्या मागून राज्यावर बसला. गादीवर बसल्यानंतर नव्या राजानें प्रथम सिरियावर स्वारी केली, कारण, तेथें चढाव्या प्रवृत्तीस फिरून ऊत आला होता. त्यानें युफ्रेटिस-पर्यंत जाऊन तिकडील सात राजास कैद केलें व त्यास बरोबर घेऊन व पुष्कळशी लूट गोळा करून तो थीबीज येथें परत आला. कैद करून आणलेल्या राजाचें त्यानें अॅमन देवास बळी दिले व त्यापैकीं सहाचीं धडें भिंतीवर लटकत ठेवून सातव धड दक्षिणेस नपाता येथे नेलें व इथिओपिअन लोकांस वचक बसेल अशा ठिकाणीं त्याची स्थापना केली. अॅमेनोफिसनें सव्वीस वर्षें राज्य करून तें आपल्या चवथ्या टेथमॉसिस नावाच्या मुलाच्या स्वाधीन केलें. या चवथ्या टेथमॉसिसनें "स्फिंक्स" नामक एका मोठ्या मनोऱ्याची साफसफाई केली व तसें केल्याबद्दल एका शिलालेखांत खोदून ठेवलें आहे. त्यानें उत्तर सिरियावर व कुश देशावर स्वाऱ्या केल्या. त्याचा मुलगा तिसरा अॅमेनोफिस हा बांधकामा-विषयीं प्रसिद्ध आहे. त्यानें पुष्कळ देवळांचीं कामें केलीं त्यांत लक्सॉरचें देऊळ नवीन बांधलें व कर्णकच्या देवळास पुष्कळसे रस्ते व दरवाजे केले, त्यानें एका "तय्या" नावाच्या बाईशीं लग्न केलें. ही बाई जरी अप्रसिद्ध कुळांतली होती तरी तिला तिचा पति व त्याच्या मागून तिचा मुलगा हे दोघेहि मोठ्या सन्मानानें वागवीत असत. तिसऱ्या अॅमेनोफिसनें इथिओपियामध्यें स्वाऱ्या केल्या परंतु नपातापासून युफ्रेटिस-पर्यंत त्याची सत्ता दीर्घकाल अबाधितपणें चालू होती. मिसर देशांत व ग्रीसच्या वर्तुळांत त्याच्या तय्याच्या नावाच्या लहान लहान वस्तु सांपडतात. तेल एल्‌ अॅमर्ना येथील दफ्तरखान्यांत त्याच्या मुलानें जतन करून ठेवलेले कीलाकृति शिलालेख सुदैवानें उपलब्ध झाले आहेत. त्यावरून मिटना, असीरिया व बॅबिलोनियासारख्या मोठ्या प्रदेशाचे राजे सुद्धां अॅमेनोफिस याच्याशीं पत्रव्यवहार करण्यांत, त्याच्याशीं आपल्या मुलींचीं लग्नें लावून देण्यांत व त्याची मैत्री संपादन करण्यांत धन्यता मानीत होते असें दिसतें. सायप्रसचा राजाहि त्याची मर्जी संपादन करीत होता. शिवाय सीरियाचे राजे त्याच्या बापानें जिंकले असल्यामुळें त्यांच्या मुलांचें सर्व शिक्षण मिसर देशांत झालेलें होतें व त्या कारणानें ते राज्यावर बसल्या-नंतरहि अॅमेनोफिसशीं बंद्या गुलामाप्रमाणें वागत असत. या वेळीं मिसर देशांत जो चहूंकडून खंडण्यांचा प्रवाह चालू होता त्यानें तेथें चालू असलेल्या सर्व भपकेदार कामांचा खर्च भागत असे. अॅमेनोफिसनें आपल्या तय्या राणीचें नाव व व वंशावळ खोदून व त्यापुढें आपल्या राज्याच्या मर्यादा मिटनीच्या राजाची मुलगी गिलुखिपा हिच्याबरोबर त्याचें दुसरें लग्न, थीबीज येथें पवित्र सरोवर बांधणें, रानटी पशूंचा शिकार, आपल्या कारकीर्दीच्या पहिल्या दहा वर्षांत त्यानें मारलेल्या सिंहाची संख्या इत्यादि सर्व माहिती देऊन "स्कॅरॅब" नावाच्या किड्याच्या आकाराचे अनेक पाषाण-खंड तयार केले होते. ज्या भव्य पुतळ्यास ग्रीक लोक होमर कवीच्या "मेम्नन" नायकाच्या नावावरून ओळखीत होते व जे थीबीजच्या पश्चिमेकडील मैदानाकडे तोंड करून बसविलें होते त्यांत या राजाची प्रतिमा आहे आणि ते याच्या कबरस्थानाच्या वेशीपुढें ठेवण्यांत आले होते. ती वेस खेंगीज करून कबरस्थानाचा कोणताहि भाग हल्लीं शिल्लक नाहीं. त्याच्या कारकीर्दीच्या छत्तिसाव्या वर्षांच्या शेवटीं उत्तरेकडून हिटाइट लोकांनीं व पूर्वेकडून खाबिरी लोकांनीं सिरियावर स्वारी केली त्यावेळेस कांहीं विरकोळ राजांनीं स्वारी करणाऱ्यांना मिळून मिसर देशाची सत्ता उलथून पाडण्याचा प्रयत्न केला व जे राजे मिसर देशच्या राजाशीं इमानानें वागले त्यांनींहि चिन्ताजनक स्थिति असल्याबद्दल त्यास खबर दिली.

**चवथा अॅमेनोफिस.**—तिसरा अॅमेनोफिस व तय्या याचा मुलगा चवथा अॅमेनोफिस हा मिसर देशीय राजाच्या मालिकेंत विशेष सुप्रसिद्ध राजा होऊन गेला तो धर्मवेडा असून हेलिऑपोलिस येथील सूर्य देवतेचा मुख्य उपाध्याय होता आणि म्हणून सूर्य हा जीवन, उत्पादन, वर्धन आणि चलन या सर्वांचें प्रत्यक्ष मूळ कारण आहे आणि मिसर देशाप्रमाणेंच इतरत्र त्या देवतेची सत्ता एकसारखी अबा-धित चालते अशी त्या देवतेसंबंधी त्याची भावना होती. मिसर देशांतील अनेक देवतास व हेलिऑपोलिस येथील सर्व पौराणिक कथास फाटा देऊन त्यानें आपल्यास दृश्य सूर्यबिंबोपासक पैगाम वाहून घेतलें. आतापर्यंत अप्रसिद्ध असलेला सूर्यवाचक "अटॉन" हा शब्द त्यानें प्रचारात आणला. परंतु हेलिऑपोलिसच्या द्वैतशार्य सूर्यदेवाचें पर-परागत चालत असलेलें "हरख" हे नाव त्यानें तसेंच पुढें चालू ठेवलें व कर्णक येथें त्या देवाचें एक देवालय बांधलें. त्याच्या कारकीर्दीच्या पाचव्या वर्षापर्यंत इतर देव-तांचीहि पूजा करण्यास सरकारी रीत्या परवानगी होती परंतु तदनंतर इतर सर्व उपासना बंद करून फक्त एकच

पंथ कायम करण्यात आला सर्व जुन्या देवतामध्ये सत्तेच्या व उत्पन्नाच्या दृष्टीनें अॅमन देवाचें वडें प्रस्थ होतें म्हणून या दीर्घकाल सर्वमान्य झालेल्या देवाविरुद्ध राजानें मोठ्या निकराचा हल्ला चढविला. त्यानें आपलें "अमनहोटेप" (अॅमन सतुष्ट आहे) हें नाव टाकून देऊन "अखेनटॉन" (अटॉनचा पवित्र) हें नाव धारण केलें, सर्व स्मारकावरून अॅमनचीं नावें व मूर्ती नाहींशा केल्या व जेथें अॅमनचें स्थान होतें तें भव्य थीबीज शहर सोडून त्यानें हर्मापोलिसच्या मैदानात एल् अॅमर्ना येथें आपली नवीन राजधानी बाधली त्यानें आपल्या कारकीर्दीच्या सहाव्या वर्षी ती राजधानी व तिच्या भोंवतालचा बराचसा मुलख अटॉन देवास अर्पण केला तेथें भव्य देवळें, राजवाडे, घरें व कबरस्थानें बाधण्यात आलीं पुष्कळ स्मारकावर अनेकेश्वरी मत दाखविणारें "देव" शब्दाचें अनेकवचनी रूप नाहींसें केल्याच्या खुणा आहेत.

सर्व स्थानिक देवालयातून अटॉनची पूजा सुरू करण्यात आली. अमॉनचें जप्त केलेलें उत्पन्न आणि सिरिया व कुश मधून आणलेली खडणी याचा उपयोग एखटनला–अटॉनचा मुलूख–नवीन राजधानी सुशोभित करण्याचें कामीं व ज्यानीं अटॉन पथाची शिकवण मोठ्या उत्साहानें स्वीकारली त्याना पारितोषिकें देण्याच्या कामीं करण्यात आला परंतु दरम्यान साम्राज्याच्या हिताच्या दृष्टीनें अवश्य करावयाच्या गोष्टींची हेळसाड झाली. तिसऱ्या अमेनोफिसच्या कारकीर्दीच्या शेवटीं देशावर जे संकट आलें होतें त्याचा पूर्णपणें मोड करण्यात आला नव्हता. सिरियातील राजे कधीं हिटाइट लोकाची तर कधीं खाबिरी लोकाची मदत घेऊन आपआपसात लढत होते. त्यापैकीं जे राजे आपल्या पूर्वजाप्रमाणें मिसर देशाच्या राजाशीं एकनिष्ठपणें वागत होते त्यानीं त्या राजास शत्रूपासून सरक्षण करण्याविषयीं पत्रावर पत्रें धाडलीं त्या कामावर कांहीं फौज घेऊन जरी एका सरदारास पाठविलें होतें तरी त्यानें भाडणाचा निवाडा नीट न केल्यामुळें त्यापासून फायद्याऐवजीं तोटाच अधिक झाला. शेवटीं त्या राजाचीं निराशेचीं पत्रें येऊ लागलीं व त्या मिसरदेशाभिमानी राजास मिसर देशात पळून जाण्याशिवाय दुसरा मार्ग उरला नाहीं. या राजाची कारकीर्द सपण्यापूर्वी सिरियातील मिसर देशाची सत्ता संपुष्टात आली होती. अखेनटॉन हा आपल्या कारकीर्दीच्या सतराव्या वर्षी म्हणजे इ. स पूर्वी १३५० व्या वर्षी मरण पावला त्याच्या पोटीं पुत्रसतान नव्हतें. त्यास सर्व मुलीच झाल्या व त्या सर्व समारंभात त्याच्या बरोबर असत. त्याच्या मागून त्याचे दोघे जावई एकामागून एक गादीवर बसले परंतु त्यानीं फार वेळ राज्य केलें नाहीं. त्यापैकीं तुतेनखातन यानें आपल्या नावाचा त्याग करून "तुतेनखामन" हें नवीन नाव धारण केलें आणि एखटनचा सर्वस्वी त्याग न करता कर्णकच्या देवालयास त्याचें पूर्वीचें वैभव प्राप्त करून दिलें. त्यात त्यानें नवीन स्मारकें करून अॅमन देवास अर्पण केलीं. याच्या कबरस्थानाचा नुकताच शोध लागला असून त्यात अगणित संपत्ति व स्मारक वस्तू सापडल्या आहेत. अखेनटॉननें केलेला बदल सामान्य जनतेस मान्य झाला नव्हता सामान्य लोकानीं आपल्या जुन्यापुराण्या धार्मिक चालीरीति व कल्पना तशाच उराशीं बाळगून ठेवल्या होत्या आणि उपाध्ये मंडळी जरी त्या राजाच्या जिवन्तपणीं धाकानें किंवा लाच घेऊन स्तब्ध बसली असली तरी ती त्या पाखडवादाचा मनापासून विरोध करीत असली पाहिजेत हें उघड आहे. तदनंतर अखेनटॉनच्या पंथाचा अभिमानी 'ए' नावाचा उपाध्याय यानें कांहीं काळ राज्य केलें तथापि "अटॉन" यास अनेक दवतापैकीं एक यापेक्षा अधिक महत्व उरलें नव्हतें. शेवटीं अखेनटॉनच्या हाताखालचा हर्मोहिब नावाचा एक सरदार गादीवर बसला व त्यानें जुन्या पंथाचा उघड उघड पुरस्कार केला. त्यामुळें अॅमन देवाची पूर्वी जी गति झाली तीच आता अटॉन देवाची व त्याच्या उपासक राजाची झाली. त्याचीं स्मारकें उध्वस्त करण्यात आलीं, त्याची नावें खरडून टाकण्यात आलीं व त्याच्या मूर्ती छिन्नभिन्न करण्यात आल्या व अॅमनचीं स्मारकें, नावें व मूर्ती पुनःप्रस्थापित करण्यात आल्या. दुसऱ्या रामेसिसपासून हर्मोहिबपर्यंत पाखंडी राजाच्या कारकीर्दीची जी सनावळ करण्यात आली त्यात अखेनटॉन यास "गुन्हेगार अखेनटॉन" असें वर्णिलें आहे. राज्यकर्त्यांनीं दुर्लक्ष केल्यामुळें शासन पद्धतींत अनेक दोष शिरले होते हर्मोहिबची दृष्टि व्यावहारिक होती. त्यानें ते सर्व दोष काढून टाकून राज्यामध्यें शिस्त उत्पन्न केली. अधिकाऱ्याच्या लाचलुचपतीच्या प्रकारास कडक उपायानीं आळा घातला. एतद्विषयक त्याचे कायदे कर्णकच्या देवालयातील विजयस्तंभावर खोदलेले आहेत व त्या खोदीव कामाच्या अवशिष्ट भागावरून त्याचे हेतू किती उच्च होते हें कळून येण्यासारखें आहे. त्याच्या मागून गादीवर बसलेल्या राजाच्या कारकीर्दींत जी देशाची भरभराट झालेली दिसून येते तीवरून त्याला राष्ट्राच्या गरजा किती उत्तम रीतीनें समजत होत्या हें स्पष्ट होतें शिवाय त्यानें आसपासच्या प्रदेशावर स्वारी करून मिसर देशाचा दरारा चहूंकडे पुन्हा प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला

**एकोणिसावें घराणें.**–पहिला रामेसीस हा या घराण्याचा संस्थापक होय. आपल्या दोन वर्षांच्या छोट्याशा कारकीर्दीत त्यानें कर्णक येथील भव्य दिवाणखाना बाधण्याचें योजून त्याला सुरवात केली त्यायोगें त्याच्या मोठमोठ्या कल्पना लोकाच्या नजरेस आल्या, तथापि त्या पार पाडण्याला त्याचें वार्धक्य आड आलें असावें. त्याचा मुलगा पहिला सेती हा आपल्या बापाच्या मृत्यूनंतर, पॅलेस्टाइनवर चालून जाणाऱ्या बेदुइन शत्रू याला नामोहरम करण्यास एकदम सिद्ध झाला. पुढें तो लेबाननपर्यंत सरकला त्यावेळीं त्यास लिबियन लोकाचाहि समाचार घेणें अवश्य होतें. तसें करून

नंतर सेती पुन्हा पॅलेस्टाइनमधून पुढें जाऊन ॲमोराइट लोकांचा प्रदेश त्यानें उध्वस्त केला. व हिटाइट लोकांबरोबर त्याचें भांडण सुरू झालें. नेताच्या राजाशीं तह होऊन सेतीच्या लढायांचा निकाल लागला. गादीवर आल्यानंतर ९ वर्षांनीं त्याचें लक्ष न्युबियाच्या अरण्यांतील सोन्याच्या खाणीकडे गेलें व त्यानें तेथपर्यंत रस्ता दुरुस्त केला. या अवधींत त्याच्या बापानें सुरू केलेल्या कर्णक देवळाचें जंगी काम पुढें चालू होतेंच व अमेनहॉटेपच्या स्मारकाची इजिप्तमध्यें जिकडे तिकडे झालेली दुर्दशा त्यानें नाहींशी करण्याचा सतत उद्योग चालविला. ॲबिडॉस येथील सेतीचें मंदिर आणि राजाच्या कबरा असलेल्या दरींत थापलेली त्याची कबर, कारागिरी आणि सौंदर्य या दृष्टीनें त्या काळचे अत्युत्कृष्ट शिल्पाचे नमुनेच म्हणता येतील. दुसरा रामेसीस लहानपणींच गादीवर आला. त्यानें ६७ वर्षें राज्य केलें. आपल्या कारकीर्दींत सेतीनें आरंभिलेलीं पुष्कळशीं कामें त्यानें तडीस नेलीं. व इजिप्त आणि न्युबिया या ठिकाणीं जिकडे तिकडे आपलीं स्वतःचीं स्मारकें करून ठेविलीं. अबूसिंबेल या दगडी देवस्थानाचीं खोदणी आणि कर्णक येथील भव्य दिवाणखान्याच्या बांधकामाची परिसमाप्ति ही वास्तुशास्त्राच्या क्षेत्रांत त्याची सर्वोत्कृष्ट कामगिरी ठरेल. गादीवर आल्यानंतर दुसऱ्या वर्षीं त्याच्या लढायांस सुरुवात झाली. न्युबियन, लिबियन, सिरियन, आणि हिटाइट हे त्याचे प्रतिस्पर्धी होत. पांचव्या वर्षीं कडेशजवळ त्याचें सैन्य हिटाइट व त्यांचे दोस्त यांकडून पराभव पावण्याच्या अगदीं बेतांत होतें. पण रामेसीसच्या अंगच्या मर्दुमकीमुळे तो प्रसंग टळला. त्याच्या देवळावरील मूर्तिशिल्पांत हा प्रसंग उत्तम रेखाटला असून त्यावर काव्येंहि रचलेलीं होतीं. कारकीर्दीच्या २१ व्या वर्षीं रामेसीस आणि हिटाइट राजा खतुशील यांच्यामध्यें तह झाला. ३४ व्या वर्षीं म्हणजे सुमारें इ. स. पूर्वी १२५० त खतुशील हा आपला मित्र किंवा मांडलिक जो कोडेचा राजा याच्या समवेत आपल्या दूर असलेल्या राजधानींतून जातीनिशीं इजिप्तमधील चमत्कार पाहण्यास आला. दुसऱ्या रामेसीसनें नीलमुखाकडे बरेंच लक्ष पुरविलें तानीसचें देवालय वाढवून जें मोठें शोभिवंत केलें गेलें तेंहि त्याच्याकडूनच. या ठिकाणीं उभारलेला राजाचा पुतळा ९० फुटांवर उंच होता. त्याच्या कारकीर्दीच्या अखेरीस त्याची करडी नजर व उत्साह कमी झाल्याकारणानें इजिप्शियन राष्ट्रांतला लष्करी जोम नाहींसा झाला. सूदन, लिबिया आणि उत्तरेकडील राष्ट्रें यांतील भाडोत्री शिपाई आणून सैन्यांत भरती करावी लागली. तेथेंच नीलमुखाच्या सुंदर वनांत परकीय लोकांनीं ठाणें दिलें. दुसऱ्या रामेसीस नंतर त्याचा मुलगा मिनेप्टाह सुमारें इ. स. पूर्वी १२२५ त गादीवर आला. आपलें राज्य व एकंदर साम्राज्य राखण्यासाठीं त्याला बऱ्याच लढाया कराव्या लागल्या. त्याच्या कारकीर्दीच्या ५ व्या वर्षाच्या सुमारासच हें युद्ध थांबलें. लिबियन व त्यांचे दोस्त यांचा पूर्ण पराभव होऊन इजिप्त पुन्हा निर्धास्त झालें. मिनेप्टाह हा आपल्या बापाप्रमाणेंच आपल्या पूर्वजांच्या स्मारकाचा अपहार करणारा होता. रामेसीसच्या मोठ्या परिवारांतील मिनेप्टाह हा १३ वा मुलगा असून गादीवर आल्यावेळीं तो म्हतारा असला पाहिजे. त्याच्या कारकीर्दीचीं पहिलीं कांहीं वर्षें सोडून पुढें त्याच्यानें कांहीं काम होईना. त्याच्या मागून लवकर लवकर एकामागून एक असे अपेशी राजे होऊन गेले.

**विसावें घराणें.**—तिसऱ्या रामेसीसच्या मृत्यूनंतर लिहिलेल्या पपायरस हस्तलिखितांत इजिप्तची दशा पुढीलप्रमाणें वर्णिली आहे.—" इजिप्तची भूमि लहान मोठ्या नगराधिपाच्या किंवा अधिकाऱ्याच्या ताब्यांत असून, एकमेकांत त्यांचें हाडवैर असे; नंतर कोणी एक सिरियन स्वतः सत्ताधीश बनला; सर्व प्रदेश त्याच्या अंकित राहिला, त्यानें आपले सोबती गोळा करून दुसऱ्या राजांना लुबाडलें त्यांनीं देवांना माणसासारिखे बनविलें, तेव्हां साहजिकच देवस्थानाच्या देणग्या बंद पडल्या पण जेव्हां देवानाच तह करावासा वाटला तेव्हां त्यांनीं आपला मुलगा सेटेनखाट याला सर्व प्रदेशाचा राजा बनविलें. " सुमारें इ. स. पू १२०० मध्यें सेटेनखोट गादीवर होता. त्याला लोक खरा वारस समजत नव्हते तरी त्याचें घराणें चिरकाल टिकलें साम्राज्याचें वैभव पुनरुज्जीवित करणाऱ्या तिसऱ्या रामेसीसचा तो जनक होय. मिनेप्टाह गादीवर आल्यावेळीं जसें इजिप्तवर अरिष्ट कोसळलें होतें तसेंच यावेळींहि इजिप्त संकटग्रस्त होतें. लिबियन व त्याचे सहकारी यांच्याशीं टक्कर देऊन रामेसीसनें त्यांचा पिछेहाट केला व इजिप्त स्वतंत्र राखलें. त्याच्या कारकीर्दीचीं शेवटचीं वर्षें शांततेंत गेलीं तथापि तिसरा रामेसीस हा कांहीं अद्वितीय राजा नव्हता. तो मोठा वस्ताद होता किंवा उच्च विचाराचा होता, असेंहि नाहीं दुसऱ्या रामेसीसचें अनुकरण तो करीत असे पुरोहित लोकांचा आपणावर बसणारा पगडा टाळण्याचेंहि त्यानें मनांत आणिलें नाहीं. पूर्वीच्या राजांनीं देवस्थानांना दिलेली मालमत्ता त्यानें जशीच्या तशीच परत केली इतकेंच नव्हे तर त्यांत आणखी बरीच मोठी भर घातली. समग्र इजिप्तमधील शेंकडा १५ इतकी जमीन निरनिराळ्या देवतांच्या नावावर होती. जरी त्याच्या कारकीर्दींत एकंदरीत पाहतां इजिप्त समृद्ध होतें तथापि जनतेच्या कांहीं वर्गांतून नि सदय आपत्ति दृग्गोचर होत होती. एका पपायरस लेखांत थीबन स्मशानांतल्या उपासमार झालेल्या मजुरांनीं संप केल्याचें आढळतें. हा वृद्ध राजा मरण पावण्यापूर्वी थोडे दिवस त्याला ठार मारून त्याचा एक पुत्र गादीवर बसविण्याचा अंतःपुरांत झालेला एक कट उघडकीस आला होता. त्यांत मोठमोठ्या अधिकाराचे स्त्रीपुरुष होते. विसाव्या घराण्याची अखेर होईपर्यंतच्या ८० वर्षांत रामेसीस नावाचे ९ अप्रसिद्ध राजे एकामागून एक होऊन गेले. ॲमोनच्या धर्माधिकाऱ्यांची सत्ता एकसारखी

वाटत होती. यावेळीं थीवनची स्मशानभूमी मोठ्या व्यवस्थेशीरपणें पूर्वीपेक्षा अधिक लुबाडली जाऊ लागली नवव्या रामेसीसच्या कारकीर्दीत त्याचा तपास लागून असें आढळून आलें कीं राजकबरींपैकीं एक अगदीं पुरा उध्वस्त झाली असून त्यांतील "ममी" जाळल्या गेल्या आहेत तीन वर्षांनीं पुढें राजकबरा असलेल्या दरीवर हल्ला होऊन पहिला सेती व दुसरा रामेसास यांचीं थडगीं लुबाडलीं गेलीं

**नीलमुखामधील घराणीं, लिबियन काळ**—२०व्या घराण्यातील शेवटचा राजा जो बारावा रामेसास याची सत्ता अगदीं मृतप्राय झाली होती त्याच्या कारकीर्दींतील धर्माधिकारी ऱ्हाहोर यानें सर्व सत्ता आपल्या हातीं घेऊन तो त्याच्या मागून इ स. पूर्वी ११०० च्या सुमारास थीबीज येथ गादीवर बसला याच वेळीं तानिस येथें स्मेंडस नावाच्या एका राजानें नीलमुखामध्यें एक स्वतन्त्र घराणें स्थापिलें (घराणें २१ वें). तानाईटवंशातील राजे सामान्यत थीबीजच्या धर्माधिकाऱ्याच्या मुठींत असत ऱ्हाहोरचे वंशज कधीं कधीं या घराण्यातील राजकन्यांशीं शरीरसंबध जोडून राजचिन्हें धारण करीत, कांही वेळा तर सबंध इजिप्त त्यांच्या अधिकारात असे या घराण्यातील राजे उध्वस्त केलेल्या राजकबरींमधील ' ममी " चा फार काळजी घेत एका कबरींतून दुसरींत असें करता करता शेवटीं डेर एल् बह राच्या देवळानजिक त्यांना पुरण्यात आलें या " ममी ' ३००० वर्षे या ठिकाणीं राहिल्यानंतर पुराणसंशोधनाची लाट येऊन केरो पदार्थसंग्रहालयात त्याची उचलबांगडी करण्यात आली

लिबियन शिपाई फार दिवस सैन्यात होते व त्यांच्या लष्करी वरिष्ठांनीं मोठमोठ्या शहरांतून राहून संपत्ति व बल पैदा केलें इकडे स्थानिक राज्यकर्ते दिवसानुदिवस दुर्बल होत चालले. तानाईट घराणें लिबियन असावेंसे दिसतें २२ वें घराणें त्यातील नावावरून परकीय असल्याचें उघड दिसतें या घराण्याचा संस्थापक पहिला शशांक (शिशक) इ स पूर्वी ९५० च्या सुमारास डेल्टामध्यें बुबस्तास येथें रहात असावासें दिसतें त्याच्या मुलानें तानाईट घराण्यातील शेवटच्या राजाच्या मुलीशीं लग्न लाविलें होतें यापुढें पुष्कळ शतकेंपर्यंत हरॅक्लिओपोलिस हें मध्यइजिप्तची राजधानी होऊन राहिलें होतें शशांकनें थीबिज हस्तगत करून, आपल्या एका मुलाला ॲमोनचा मुख्य धर्माधिकारी नेमिलें पॅलेस्टाईन आणि न्युबिया या ठिकाणीं आपली सत्ता पुन्हा स्थापित केला पहिल्या ओसोरकोनला आपल्या बापाचें भरभराटीचें राज्य लाभलें होतें तरी त्यानें पुढें कांहीं एक केलें नाहीं लिबियन राजांना दडपून टाकण्यासाठीं मोठा जोरकस माणूस पाहिजे होता, पण तसा कोणी नसल्यानें, राज्यात लवकरच तट पडले २२ वें घराणें बऱ्याच पिढ्या टिकलें २३ व्या घराण्यातील राजाचा मांडलिक राजांवर मुळींच दाब नव्हता. हे मांडलिक राजे एकमेकांत भांडून देशातील संपत्तीचा अपव्यय करीत इकडे या अवधींत एथिओपियामध्यें एक देश्य राज्य स्थापन झालें एथिओपियन राजा पखी यानें थीबिज आपल्या ताब्यात ठेविलें साइसचा उत्साही राजा नेनाखट व डेल्टामधील दुसरे राजे मध्य इजिप्त पादाक्रांत करून एथिओपियासरहद्दीपर्यंत आले पखी राजानें हेऱ्याक्लिओपोलिस मॅग्नाला वेढा घालणाऱ्या तेफनाखट राजाचा पराभव करून मध्य इजिप्तमधून त्याला हाकून लाविलें, इतकेंच नव्हे तर मेंफिस घेऊन इतर राज व लहान लहान संस्थानिक यांना शरण आणिलें एथिओपियन संस्थानचा कारभार राजामार्फत ॲमॉन येथील धर्माधिकारी पाहात असे असें म्हणतात.

**एथिओपियन घराणें**—२४व्या घराण्यात एकच बोक्चोरिस नावाचा सैते राजा होऊन गेला त्याला शाबाको या एथिओपियननें जिवंत जाळलें म्हणतात- या वेळीं २५व्या घराण्यातील एथिओपियन सत्ता पूर्णपणें प्रस्थापित होऊन, सिरिया आणि फिनिशिया जिंकण्याच्या कामीं त्याचा बराच उपयोग झाला असावा पण इकडे असुरी लोकाचें साम्राज्य लष्करी सामर्थ्यामुळें बरेंच पुढें येऊन, इजिप्तला दटावू लागलें तेव्हा सार्गन आणि सेन्नाचेरिब यांच्याशीं स्वातंत्र्याकरितां लढत असलेल्या सिरियनांना मदत करण्याखेरीज दुसरें कांहींच एथिओपियनांना करता येणें शक्य नव्हतें शाबाकोनंतर शेबिट्कु आणि शेबिटकूनंतर तिरहाका गादीवर आला तिरहाकानें असुरी लोकांना पुढें न येऊ देण्याचा प्रयत्न चालविला पण ख्रि पू ६७०मध्यें इजिप्तच्या सरहद्दीवर एसरहडननें त्याच्या सैन्याचा पराभव केला व मेंफिस आणि राजाचा जनानखाना काबीज करून मोठी लूट मिळविली इजिप्शियन लोकांचा असुरांना होणारा विरोध पूर्ण अंत करणापासून नव्हता असें दिसतें उत्तरेकडे, विशेषत एथिओपियन सत्तेविरुद्ध एक प्रबळ पक्ष निर्माण झाला होता तिरहाकानें एथिओपियनाचें राज्य इजिप्तमध्यें सर्वत्र मान्य व्हाव अशी खटपट चालविली एसरहडननें थोडी पाठ फिरविली नाहीं तोंच तिरहाका दक्षिणेंतून परतला व असुरी लष्कराची कापाकाप सुरू झाली एसरहडननें लवकरच दुसरी मोहिम तयार केली, पण वाटेंतच इ स. पू ६६८ त तो मरण पावला त्याचा पुत्र असुर बनिपाल यान मोहिम पुढें ढकलली व तिराहाकाचा पराभव करून आपले सुभेदार पुन्हा नेमिले साइस व मेंफिस याचा राजा नेको (निकु) हा त्यांचा मुख्य असून तो २६ व्या घराण्याचा संस्थापक जो सामेटिकस याचा पिता होता पुढें नेकोवर तिरहाकाशीं पत्रव्यवहार ठेवल्याचा आरोप येऊन निनेव्हेला त्याला बांधून नेण्यात आलें तेथें काय झालें असेल तें होवो, पण एवढें खरें कीं त्याला परत सन्मानपूर्वक पाठविण्याचा मुत्सद्दीपणा दाखविण्यात आला तथापि उत्तर इजिप्त तिरहाकाशीं राजनिष्ठ होतें, मेंफिस येथें एक ॲपिस बैल जो पुरण्यात आला तोहि याच्याच कारकीर्दींत होय

असें पुरोहित म्हणतात. पुढें लवकरच तो मारला व त्याचा पुतण्या तांडमाने याला वरच्या प्रदेशांतील लोकांनी मोठ्या आनंदानें आपला राजा केलें. त्यानें मेंफिसला वेढा देऊन तें काबीज केलें. नेदो या चकमकींत ठार झालासा दिसतो. पण ६६१ ख्रि. पू. मध्यें असुरबनि-पालनें एथिओपिअनांना दक्षिण इजिप्त मधून हुसकून लाविलें व नाईलपर्यंत त्यांचा पाठलाग केला व थीबीज लुटलें. हें आलेलें असुरी अरिष्ट शेवटचें म्हणता येईल.

**२६ वें घराणें.**—नेकोचा पुत्र सामेटिकस (इ. स. पू. ६६४–६१०) हा बापामागून असुरियाचा मांडलिक म्हणून गादीवर आला. यानें इतर कांहीं राजांच्या मदतीनें आपला सत्ता वाढवून ती दृढ केली. आपल्या कारकीर्दीची नऊ वर्षे झालीं नाहीं तोंच थीबीज त्याच्या पूर्ण मालकीचे झालें. या प्रसंगीं असुरबनि-पालचें सर्व सामर्थ्य बाबिलोन, इलाम आणि अरबस्तान येथील बंडाळी मोडण्याकडे गुंतलें होतें. पुन्हां असुरी सैन्याचा जिकडे तिकडे विजय झाला पण त्याची सर्व शक्ति क्षीण झाली. सामेटिकसच्या अमदानींत इजिप्तला पुन्हां चागले दिवस प्राप्त झाले; त्याचें उत्पन्न भराभर वाढत गेलें. सामेटिकसनें इजिप्तची सरहद्द सुरक्षित ठेविली. असुरी लोक त्याच्यावर जरी चालून आले नाहींत तरी सिथियनांची टोळधाड दक्षिणेकडे चालून येत होती तिला त्यानें कांहीं लाललूच दाखवून व देणग्या देऊन परत लाविलें. मरणापूर्वी सामेटिकस दक्षिण पॅलेस्टाइनमध्यें जाऊन आला होता.

जेव्हां सामेटिकसच्या कारकीर्दीला सुरवात झाली तेव्हां इजिप्तची स्थिति पूर्वी साम्राज्यसत्तेखालीं असतांना जी होती तीपेक्षां फारच निराळी अशी होती. भूमध्यसमुद्रांतील व्यापाराची वाढ, व नवीन लोकांशी व नवीन संस्कृतींशी येणारा संबंध यांमुळें इजिप्शियन लोकांत नवीन विचारांचा प्रादुर्भाव झाला होता, व त्याबरोबरच स्वतःच्या बलाविषयीं त्याना विश्वास वाटेनासा झाला होता. थीबीजचें वर्चस्व जाऊन, डेल्टा हा इजिप्तमधील संपत्तिमान व प्रागतिक भाग बनला. धाडस व शौर्य नसलेल्या या लोकांत धार्मिकता वरीच बोकाळली. तसेंच वैभवशाली पूर्वजांबद्दल अवास्तव अभिमान जागृत झाला. थीबीस आणि ॲमॉन तसेंच साम्राज्याच्या स्मारकविशिष्ट गोष्टी, यांनी एथिओपिअनांचा बराचसा संपर्क पोंचलेला दिसत होता. तेव्हां मेंफाईट डेल्टाइक घराण्याच्या आचार्यांना मेंफिसच्या प्राचीन वर्चस्वाच्या काळांतील गोष्टींकडे अनुकरणार्थ वळणें मुद्दाम भाग पडलें; व पाषाणशिल्पकृति, आणि देवस्थान व कबर यावरील लेख, हे शक्य तितके जुन्या राज्यांतील कृतिलेखाबरहुकूम बनवावे लागले. धार्मिक बाबींसेरीज इतर बाबतींत इजिप्शियन हे बरेच व किंबहुना अनुकरणशील असे होते.

सामेटिकस हा आपल्या ५४ वर्षांच्या अमदानीनंतर मारला व त्याचा मुलगा नेको (इ. पू. ६१०–५९४) हा त्यामागून गादीवर आला. असुरी लोकांची दीन अवस्था लक्षांत घेऊन, नेकोनें सिरियामधील साम्राज्याचा प्राचीन मुलूख परत मिळविण्याकरितां मोहीम काढिली. असुरियाच्या राजातर्फे जोसियानें आपल्या दुर्बल सैन्यानिशीं नेकोला तोंड दिलें; पण त्याचा पराभव होऊन लढाईंत तो गारद झाला. नेको युफ्रेटीसकडे जाण्याला पुढें सरसावला व त्यानें तो प्रदेश आपला मांडलिक बनविला. निनेव्हेच्या ऱ्हासानंतर पश्चिमेकडील असुरी लोकांचा वारसा बाबिलोनचा राजा नबापोलेसर याच्याकडे आला; तेव्हां त्यानें तावडतोब आपला मुलगा नेबु काडरेसर यास नेकोशीं टक्कर देण्यास धाडून दिलें बाबिलोनियन आणि इजिप्शियन सैन्याची कारचेमिश येथें गांठ पडून (ख्रि. पू. ६०५), इजिप्शियनांचा इतका मोड झाला कीं, नेकोला सिरिया सोडून पळावें लागलें व नबो पोलासरच्या मृत्यूमुळें विजयी वीराला परत जावें लागलें नसतें तर सबंध इजिप्त त्यानें पादाक्रांत केलें असतें यांत शंका नाहीं. यानंतरचा राजा दुसरा सामेटिकस (इ. स. पूर्व ५९४—५८९) यानें सिरियावर किंवा फिनिशियावर मोहीम केली व अबु सिंबेलपर्यंत एथिओपिआमध्यें भाडोत्री सैन्य पाठविलें असें एके ठिकाणीं लिहिलेलें आढळतें. फारो होफ्रा (इ. स. पूर्व ५८९–५७०) यानें ज्यूडामधील बाबिलोनियन सत्तेविरुद्ध बंडाळी माजविण्याचा प्रयत्न केला. पण फारसा उपयोग झाला नाहीं. हिरोडोटस लिहितो कीं, त्याची कारकीर्द फार भरभराटीची होती. सायरेनेच्या ग्रीक वसाहतीविरुद्ध लिबियन लोकांना त्यानें मदत केली. व त्या मोहिमेंत भाडोत्री शिपायांवर त्याची कृपादृष्टि जास्त वळल्याच्या संशयावरून त्याचे देश्य शिपाई त्याच्यावर रागावले व त्यांनीं अमॅसिसला राजा निवडला. या दुसऱ्या अमॅसिसने (इ. स. पूर्व ५७०—५२५) आपल्या अनुयायांच्या मदतीनें ग्रीक सैन्याचा पराभव केला; तथापि त्याच्या पदरींहि ग्रीक असत व तो त्यांच्यांतील जुरमां माणसाशीं सख्य करी. त्याची सत्ता इजिप्तपुरतीच कायती होती पण खुद्द इजिप्त त्या वेळीं अत्यंत भरभराटींत होतें. त्याच्या मृत्यूनंतर थोड्याच महिन्यांनीं कॅंबिसेसच्या आधिपत्याखालीं असणाऱ्या इराणी सैन्यानें इजिप्तमध्यें येऊन त्याचा मुलगा तिसरा सामेटिकस याला पदच्युत केलें.

**इराणीकाल, २७ वें घराणें.**—कॅंबिसेसने प्रथम इजिप्शियन लोकांशीं समेटार्थ वर्तन ठेविलें होतें व तो त्यांच्या धर्माचा मान ठेवी; पण एथिओपिआमधील त्याची मोहीम अयशस्वी झाल्यानंतरच बहुधा त्यानें आपलें सबंध धोरण बदललें व आपलें नाव बद्द करून घेतलें. त्यानें परत जातांना इजिप्तला इतकें चिरडून टाकिलें होतें कीं, लगेच पुढें इराणची गादी दुसऱ्या कोणी बळकावली असताहि या बाजूला दंगाधोपा वगैरे कांहींएक घडून आलें नाहीं. डरायस (इ. स. पू. ५२१—४७६) हा चांगला राजा निघाला व तो इजिप्तला आला त्यावेळीं येथील धर्माविषयीं त्यानें बरीच आस्था

दाखविली. "ग्रेट ओॲसिस" (मोठी ओलवण) मध्ये त्यानें एक ॲमॉनकरितां देवालय बांधिलें. इजिप्त आणि सायरेने यांच्या अधिपतींवर बरीच वार्षिक खंडणी लादली गेली होती तरी ती वसूल करण्यास फारसा त्रास पडत नसे. नाईलपासून तांबड्या समुद्रापर्यंत जाणारा कालवा पुरा होऊन व्यापार वाढला. त्याच्या कारकीर्दीच्या शेवटीं इजिप्त बंड करण्यास उद्युक्त झालें. हें बंड मोडणारा क्सर्क्सीझ (इ. स. पू. ४८६—४६७) व त्याच्या मागून आलेला अर्टाक्सर्क्सीझ (इ. स. पू. ४६६—४२५) हे कॅबिसेस प्रमाणेंच इजिप्शियनांनां अप्रिय झाले होते. अर्टाक्सर्क्सीझ गादीवर बसण्याच्या वेळीं माजलेल्या अराजकतेमुळें इजिप्शियनांनां बंड करण्याची पुन्हां संधी आली पण त्यांना यश आलें नाहीं. दुसरा क्सर्क्सीझ व दुसरा डरायस यांच्या कारकीर्दींत इजिप्तमध्यें विशेष कांहीं घडलें नाहीं. शेवटीं इ. स. पू. ४०५च्या सुमारास त्या ठिकाणीं एक यशस्वी बंड होऊन इराणी वर्चस्व नाहींसें झालें.

इजिप्तमध्यें इराणी सत्तेचे अवशेष फारच थोडे आहेत. साइस येथील नीथच्या उपाध्याय पेफ्टुऔनीट याच्या लेखांवरून त्याचा कॅबिसेस व डरायस या राजांशीं असलेला संबंध व्यक्त होतो. अरेमाइक भाषेमध्यें लिहिलेले कांहीं पपायरसवरील हस्तलेख एलेफंटाईन व मेंफिस येथें सांपडले आहेत. त्यांवरून पुढील राजांची थोडीबहुत माहिती मिळते. इ.स.पू. ४४० च्या सुमारास, म्हणजे अर्टाक्सर्क्सीझच्या अमदानींत हिरोडोटस इजिप्तला आला होता. त्याच्या ग्रंथांवरून सैते राजांच्या इतिहासाची व त्या काळच्या चालीरीतींची माहिती मिळते. पण ही माहिती फारशी विश्वसनीय म्हणतां येणार नाहीं.

**२८ ते ३१ घराणीं.**—इ. स. पू. ४०५ च्या सुमारास साइसच्या अमिरटेयसनें दुसऱ्या डरायस विरुद्ध बंड उभारलें; त्याचा परिणाम म्हणजे इजिप्तला पुन्हां स्वातंत्र्य मिळून तें साठ वर्षे टिकलें. या पुढला राजा नेफ्युरेट (पहिला नेफेरिटीझ) हा मेंडेसियन असून त्यानें २९ वें घराणें स्थापिलें. हकोर व दुसरा नेफ्युरेट यांच्या मागून राज्य ३० व्या घराण्याकडे गेलें. हेंच शेवटचें इजिप्शियन राजघराणें होय. नेख्थरहेब (पहिला नेक्टानेबस) आणि नेख्तनेबफ (दुसरा नेक्टानेबस) या मेंडेसियन राजाच्या कारकीर्दींत विशेषतः कलेला उत्तेजन मिळालें. इ. स. पू. ३७८ त नेख्थरहेब गादीवर बसल्यावेळीं इराणकडून लवकरच हल्ला होईल अशीं चिन्हें दिसत होतीं. हकोरनें या पूर्वीच उत्तम सैन्य तयार ठेवलें होतें; त्यात बरीचशी ग्रीकांची भरती होती. तेव्हां या सैन्यबलाच्या योगानें इजिप्शियन राजानें मेंडेसजवळ इराणी सैन्याचा धुव्वा उडविला व इजिप्त स्वतंत्र केलें.

नेख्थरहेबनंतर टेकॉस किंवा टेऑस गादीवर आला. त्याची छोटीशी कारकीर्द इराणशीं युद्ध करण्यांत गेली. या युद्धांत इजिप्शियन राजानें, स्पार्टन राजा ॲगेसिलैास याच्या आधिपत्याखालीं असलेल्या भाडोत्री ग्रीक लष्कराची व आथिनियन सेनापति चॅब्रियस याच्या आरमाराची मदत घेतली होती. जयाच्या आशेनें तो फिनिशियांत शिरला पण ॲगेसिलैासचा अपमान केल्यामुळें त्याला पदच्युत व्हावें लागलें. त्याच्या जागीं नेख्तनेबफ किंवा दुसरा नेक्टानेबस आला. हा इजिप्तचा शेवटचाच राजा होय. या वेळीं एक बंड उपस्थित होऊन हा नवीन राजा पदच्युत होण्याची वेळ आली होती. पण ॲगेसिलैासनें हात देऊन त्याला सिंहासनावर स्थिर केलें. पण इकडे इराणवर जोराचा हल्ला चढविण्याची संधी वाया गेली. तिसरा अर्टाक्सर्क्सीझ यानें इजिप्त रसातळास पोंचविण्याचा निश्चय करून त्यावर मोहीम पाठविली, पण नेख्तनेबफच्या भाडोत्री ग्रीक शिपायांनीं ती परत लाविली; तेव्हां अर्टाक्सर्क्सीझ स्वतः दुसरी मोहीम घेऊन निघाला व त्यानें ग्रीक शिपायांचा मोड केला. नेख्तनेबफ हा आपल्या सैन्याच्या मदतीस जाण्याऐवजीं मेंफिसला परतला व तेथून एथिओपियाला पळाला (इ. स. पू. ३४०?). याप्रमाणें सुमारें ३००० वर्षे टिकलेली फारोंची राजसत्ता धुळीस मिळाली. तेव्हांपासून आतापावेतों २००० हून अधिक वर्षे झालीं व या अवधींत पुष्कळ वेळां इजिप्त स्वतंत्रहि झालेलें आहे; पण कोणीहि देश्य राजा फॅरोंच्या तख्तावर अद्याप बसला नाहीं. 'इजिप्त देशातला यापुढें कोणीहि अधिपति होणार नाहीं" (यहेज्केल ३०:१४) हा बायबलमधील परमेश्वराचा शाप बाधला कीं काय कोण जाणें?

यानंतर ओकस (अर्टाक्सर्क्सीझ) नें अमानुषपणें जितराष्ट्राला छळलें. या पुनःप्रस्थापित झालेल्या इराणी वर्चस्वा (या वर्चस्वाला मॅनेथो ३१ वें घराणें म्हणतो) पासून पुढचे कागदपत्र मुळींच सापडत नाहींत; नाहीं म्हणावयास तिसऱ्या डरायसच्या कारकीर्दींतील एक पापायरस उपलब्ध झालें आहे.

वरील इतिहासाचा इत्यर्थ थोडक्यात येणेंप्रमाणें देता येईल.

प्राचीन इजिप्तचा इतिहासकाल म्हणजे पहिल्या राजघराण्याच्या पूर्वीचा काल, पेट्रीच्या मतें तो खि. पू. ५,५०० पूर्वीचा असावा. तत्कालीन अंकित पाषाणखंड व इतर अवशेष उपलब्ध आहेत.

इतिहासकाल म्हणजे पुष्कळ सुधारणेचा काल नव्हे. इतर संस्कृति पुष्कळ वाढण्यापूर्वी इतिहासरक्षणाची चाड इजिप्तमध्यें वाढली. बाराव्या घराण्यापर्यंत ब्रॉंझचा उपयोग दिसत नाहीं. मातीचीं भांडीं फार जुनीं दिसतात आणि त्यांचा कालानुक्रम त्यातील कलेच्या प्रगतिवरून लावता येतो. इतर लढाईचीं, शिकारीचीं, शेतकीचीं, हत्यारें यावरून प्रगतीच्या कालाच्या, अनुक्रमाचा अदाज करता येतो.

इजिप्तच्या राजघराण्यापैकीं हिक्सॉस व इराणी राजे सोडून करून बाकीचीं देश्य होतीं.

*अठराव्या घराण्याच्या अमदानींत इजिप्तचें साम्राज्य पुष्कळच वाढलें होतें व त्या काळीं त्या राज्यांत न्युबिया, इथिओपिआ, ग्रीस, सिरिया, फिनिशिया, मिटनी, हिटाइट, असुरिया, बाबिलोनिया इत्यादि देशांतील भाग समाविष्ट होत होते.*

*अर्थात् त्या वेळीं वर उल्लेखिलेल्या सर्व राष्ट्रांशीं इजिप्तचें दळणवळण सुरू होतें व मिटनी, असुरिया व बाबिलोनिया* येथील राजांशीं शरीरसंबंध व पत्रव्यवहार चालू होता हें अमर्ना येथील लेखांवरून दृष्टीस पडतें.

त्यानंतरच्या घराण्यांचा काळ असुरिया, बाबिलोनिया, *इराण वगैरे निरनिराळ्या राष्ट्रांशीं युद्धें करण्यांत* गेला व कधीं इजिप्त स्वतंत्र तर कधीं परकीय सत्तेखालीं होतें. याप्रमाणें एकतिसाव्या घराण्यापर्यंत इजिप्तची देश्य सत्ता मधून मधून वर डोकें काढीत असे पण त्यानंतर ती कायमची लुप्त झाली.

---

# प्रकरण ३ रें.

## ईजियन संस्कृति.

आतां यूरोपीय संस्कृतीच्या जनक अशा प्राचीन संस्कृतींचें विवेचन करतांना आमयांकडे सुरवात करूं. जी संस्कृति यूरोपीय संस्कृतीच्या मुळाशीं होती ती प्रथम घेऊं. ही संस्कृति ईजियन होय. ही संस्कृति, इजिप्तची संस्कृति बाबिलोनी संस्कृति, चिनी संस्कृति व भारतीय संस्कृति या पांच स्वतंत्र संस्कृती आहेत. यांचा एकमेकांवर परिणाम झाला आहे. तथापि प्रत्येक संस्कृतीमध्यें इतक्या स्वतंत्र गोष्टी आहेत कीं त्यांस पृथकत्व दिलें पाहिजे.

**ईजियन संस्कृति.**—या नांवाचा उपयोग पाश्चात्यांच्या ऐतिहासिक कालापूर्वी होऊन गेलेल्या संस्कृतीचा निर्देश करण्याकडे करितात. ही संस्कृति ग्रीक संस्कृतीच्या आधीं होऊन गेली, म्हणून हिचें महत्त्व फार आहे. ह्या संस्कृतीचा ग्रीक लोकांवर परिणाम झाला. क्रीट बेटाचा इतिहास समजण्यास हिचा फार उपयोग होतो. या संस्कृतीची माहिती क्रीट बेटांत नोसस गांवीं शोधून काढिलेल्या पुराणवस्तूंवरून काढलेली आहे. ती बऱ्याच अंशीं अनुमान स्वरूपाची आहे. ज्या अवशेषांवरून या संस्कृतीचें स्वरूप लक्षांत येतें, ते येणेंप्रमाणें.—(१) राजवाड्यासारख्या दिसणाऱ्या इमारतींचे भाग, त्याचप्रमाणें जुनी घरें, थडगीं यांचे उकरून काढलेले अवशेष. (२) खांबांवर, भिंतींवर केलेलें नक्षीकाम, तसेंच शोभेकरितां ठेवलेल्या पदार्थांवरील रंगी चित्रकाम. (३) दगड, हस्तिदंत, धातू व रत्नें यावरील खोदीव, कातीव, उठावदार व रंगीत चित्रकर्म. (४) आयुधें, हत्यारें, आउतें हीं दगड, माती, तांबें, व शेवटीं लोखंड यांचीं केलेलीं आढळतात. यांवर कधीं चित्रें काढलेलीं असतात व कधीं हीं रत्नजडीत असतात. (५) अंगावरील अलंकार (६) सामानसुमान—(गृह्य) भांडीं लहान मोठीं, सिंहासनें, मेजें, आसनें, उपासनेसाठीं केलेल्या मूर्ति, शवपेटिका. (७) लेख–भाजलेली माती व रत्नें यावरील लेख (८) उकरलेलीं थडगीं. (९) लोकोपयोगी कामें–पूल, फरशी, रस्ते, गटारकाम. हा पुरावा संस्कृतींत आविष्ट होणाऱ्या वस्तूंचा होय. भौतिक अवशेषांखेरीज या संस्कृतीसंबंधानें पुरावा म्हटला म्हणजे (१) समकालीन सुधारणेचे उल्लेख व स्मारक चिन्हें. (२) होमरसारख्याच्या ग्रथांत या लोकांविषयीं केलेले उल्लेख आणि (३) परक्या लोकांच्या प्रचारांत अंशांकरून शिल्लक राहिलेल्या पण त्या परक्यांच्या सुधारणेशीं विसंगत अशा ईजियन चाली, पंथ, विधि वगैरे होत.

**राजकीय संघटना.**—क्रीट बेटांतील राजवाडे व मायसीनी, टिरिन्स व हिसारली येथील तटबंदी केलेले अंतर्कोट हीं सर्व एका घराण्याच्या राहण्याच्या सोयीचीं दिसतात. हीं सभोंवतालच्या घरांत प्रमुख दिसतात. यांवरून येथें सर्व सत्ता राजाच्या हातीं असावी अशी संशोधकांची समजूत आहे. खिस्तपूर्व दीड हजार वर्षांपूर्वी निरनिराळ्या ठिकाणीं झालेल्या कलाच्या वाढीवरून तेथें स्वतंत्र राज्यें असूं शकण्याचा संभव आहे. वरील कालानंतर सर्व सत्तेचें केंद्र नोसस येथें असावें असें अनुमान तेथें सापडलेल्या खंडणीच्या नोंदीवरून निघतें.

**पारमार्थिक कल्पना.**—आजपर्यंत सांपडलेल्या सर्व समाधी राजवाड्यांत आढळल्या. यावरून धार्मिक सत्ता राजाकडे असावी किंवा राजेच धर्मगुरू असावेत. देवाविषयींच्या कल्पनांचा खालीं सांगितल्याप्रमाणें विकास झाला असावा. प्रथम ज्यांवर पीकपाणी अवलंबून आहे अशा सृष्टींतील प्रमुख पदार्थांची उदाहरणार्थ, सूर्य, चंद्र, पर्वत, झाडें वगैरे यांची उपासना होई. त्याचाच अवशिष्ट संस्कार मनावर राहिल्यामुळें, झाडें, स्तंभ, परशु अशा वस्तूंस पूजेचा मान मिळत असला पाहिजे. यापुढें देवांच्या मूर्तींची पूजा प्रचारांत आली असावी. ही मूर्ति म्हणजे मानवी जननतत्त्वाचें एक स्वरूप होय. सामान्यतः बहुतेक सर्व प्राण्यांस व वनस्पतींस पूज्य मानीत. खि. पू. १५०० इतक्या प्राचीन ग्रीक लोकांची पारमार्थिक व धार्मिक विचारपद्धति व ही ईजियन लोकांची विचारपद्धति एकच असणें शक्य आहे. ईजियन समाज म्हणजे प्राचीन ग्रीकांच्या पूर्वजांचा समाज होय असें विरुद्ध पुरावा येईपर्यंत धरून चालण्यास हरकत नाहीं. अत्यंत प्राचीन ग्रीक पारमार्थिक विचार पुढें विवेचिले आहेत.

**समाजघटना अथवा व्यवस्था.**—याविषयीं कांहीं निश्चित विधानें करितां येत नाहींत. सशस्त्र शिपायांचीं फारच थोडीं चित्रें सांपडतात, म्हणून कदाचित येथें क्षत्रिय वर्ग प्राधान्यानें नसावा. नोंदणा करण्याविषयीं येथें

विस्तृत व पुष्कळ नियम आढळतात यावरून कायद्याची बरीच वाढ येथें झाली असावी. सत्ताधिकारी वर्गाची राहणी ऐषआरामाची होती. हे लोक मांसाहारी असत. मादक पेयें पिण्याचा प्रघात येथें होता. निरनिराळ्या प्रकारची मातीची व ब्राँझ धातूची भांडीं तयार होत असत. येथें द्राक्षें व आलिव्ह फळें पिकवीत असत. हवा व उजेड आंत घेण्याकरितां कुशलतेच्या योजना अमलांत आणिल्या होत्या. शहरांतील फाजील पाणी बाहेर काढण्याची व्यवस्था केली होती. वृषभयुद्ध, मुष्टियुद्ध, नाच, सशस्त्र द्वंद्वयुद्ध यांनीं लोकांची करमणूक होत असे.

**उगम.**—क्रीट बेटांतीलें पुराणवस्तू जास्त जास्त सापडत गेल्यामुळें ही संस्कृति किती काळ टिकली व ती अव्याहत कोठपर्यंत चालू होती या प्रश्नाचें उत्तर सध्यां देता येतें. तिचा उगम मानववंशशास्त्रज्ञाच्या मतें प्रत्येक स्थानाच्या प्रागैतिहासिक युगांपैकीं प्रास्तरायुध युगाच्या उत्तरकालात झालेला आहे असें दिसतें. ती तीन हजार वर्षे अविच्छिन्नपणें अस्तित्वात होती. वरील विधान करण्यास पुरावा एवढाच आहे कीं, क्रीट बेटात जेथें पुराणवस्तूंच्या शोधाकरिता खणलें आहे, तेथें प्रास्तरायुध युगातील अवशेष त्याच थरात सापडतात. त्याला लागूनच उत्तरसंस्कृतिनिदर्शक नक्षीकाम केलेले मातीच्या भांड्याचे तुकडे सापडतात.

यानंतर लगेच ब्राँझयुगास सुरवात होते. ब्राँझ युगाचे मुख्य तीन भाग कल्पिले आहेत व या तीन भागाचें आठ पोटविभाग करितात. मातीचीं भांडीं करणें व त्यावरील नक्षीकाम या कालांची वाढ व तींत आपोआप होणारे फरक सारखे चालू होते असें दिसतें.

या फेरबदलामध्यें बाहेरच्या कलेचा परिणाम झाला नाहीं तर अंतस्थ सुधारणा झाली. सुधारणा बाहेरची आली नाहीं म्हणण्यास कारण या युगाच्या थरात दुसऱ्या परकीय देशांतील कलांचे अवशेष येथें क्वचितच आढळतात.

येथल्या संप्रदायासंप्रदायाविषयी माहिती फारच थोडी आहे. त्याच्या परमार्थविषयक विचारांकडे पाहिलें तर सृष्टीतील शक्तींच्या पूजेपासून अवतारोपासनेपर्यंत जीं जीं स्थित्यंतरें दिसतात, तीं तीं या लोकांत संशोधकास आढळून येतात.

**संस्कृतीचा इतिहास.** — कालक्रमनिर्णयासंबंधानें ठाम मत देतां येत नाहीं. या संस्कृतीच्या ब्राँझ युगाचे "इव्हॅन्सच्या" मतें तीन मुख्य भाग पडतात व त्यांस मिनोआन अशीं नावें दिलीं आहेत. प्रत्येक मिनोआनचे तीन पोटभाग पाडलेले आहेत. पहिल्या मिनोआनच्या १ ल्या पोटभागाच्या वेळच्या भांड्यासारखीं भांडीं इजिप्त देशांत अबिडॉस गांवीं सापडली यावरून या युगाचा काल खिस्त पूर्व ४००० वर्षे असावा असें अनुमान संशोधक काढितात.

**व्यापार.**—येथील भांडीं मेलॉस इजिप्त व ग्रीक देशांत सांपडतात. व मेलॉसचीं तशीं भांडीं क्रीट बेटांत आढळतात, यावरून या देशांचे व्यापारनिमित्तानें दळणवळण होतें असें दिसतें.

**मृतांची व्यवस्था.**—शवास दगडाच्या पेटींत घालून पुरीत असत. पुढें एका खळग्यांत हाडें टाकीत. नंतर शवपेटिका व मधमाशीच्या घरासारखी घट्कोनी थडगीं प्रचारांत आलीं. मृतांबरोबर त्यांचीं हत्यारें, अन्नपाणी, उटणी, दागिने पुरीत असत. मृतांस जाळण्याची चाल असल्याचें कोणत्याहि काळांत दिसत नाहीं.

**कलाकौशल्याचीं कामें.**—खिस्तपूर्व अडीच हजार वर्षांच्या सुमारास मातीच्या कामांत या लोकांनीं चांगलें प्राविण्य संपादन केलें होतें. भाजलेल्या मातीचीं चित्रें करणें हस्तीदंत व पाषाणशिल्प याची कला या लोकांस अवगत होती. शोभेच्या भांड्यांवरील चित्रकाम, रत्नावरील खोदीव काम व जडावाचें काम हीं ह्या लोकास चांगलीं माहीत होतीं.

**या सुधारणेचें स्वरूप व उगम.**—ह्या संस्कृतीस आलेलें महत्व व तिच्या वैशिष्ट्यमुळें आहे ही संस्कृति अमक्या एका देशात उदयास आली म्हणून हीस महत्व देत नाहीत, तर ही इतर तत्कालीन संस्कृतींपासून अनेक बाबतींत भिन्न असल्यामुळें व तिच्या अंगच्या विशिष्ट धर्मांमुळें ही इतक्या मोठ्या पदवीस पोंचली आहे.

**विशिष्ट धर्म.**—

( १ ) या लोकांच्या लिपीचें दुसऱ्या कोणत्याहि लिपीशीं जवळ जवळ अगदींच कांहीं साम्य नाहीं.

( २ ) कला कौशल्याचीं कामें.

( ३ ) वास्तुविषयक रचना व भूषणें.

( ४ ) थडग्याचा आकार व ठेवण.

मिनोआन भाग दुसरा पोटभाग दुसरा या वेळच्या मातीच्या भांड्यावरील नक्षीकामात नागमोडीसारखा आकार प्रमुख आहे. अशाच प्रकारचें नक्षीकाम इजिप्त देशांत १२ व्या घराण्याचे वेळीं आढळलें. यावरून या भागाचा काल खिस्तपूर्व २५०० ( अडीच हजार ) वर्षें असावा. त्याप्रमाणें इजिप्तमधील "ख्यान" राजाचें चित्र मिनोआन भाग दुसरा पोटभाग तिसरा याबेळच्या थरात सापडलें. या राजाचा काल खिस्तपूर्व १९०० वर्षे धरतात. मिनोआन भाग तिसरा पोटभाग एक व दोन या वेळीं इजिप्त देशात १८व्या घराण्याची सत्ता अथवा अंमल चालू होता. याचा काल ( १६००–१४०० खिस्तपूर्व ) आहे.

कांस्य युगाचा शेवट व आयस युगाचा आरंभ या संबंधानें नक्की असें कांहीं सांगता येत नाहीं.

**कालक्रमानुसार इतिहास.**—ज्या लोकांनीं ईजियन संस्कृति नांवारूपास आणिली त्या लोकांचे पूर्वज ानी प्रास्तर युगात फार प्राचीनकाळीं ईजियन समुद्राच्या आसपासच्या मुलुखांत वसाहत केली. या लोकांच्या डोक्याचा आकार भूमध्यसमुद्रावरच्या ( उत्तर अफ्रिकेतील ) देशांतील लोकांच्या




इंजियन संस्कृतीचा प्रदेश दाखविणारा नकाशा



मायसीनीच्या अक्रॉपोलिस येथील संग्रहांपैकी वेनीय देवतेचे चित्र असलेली सुवर्णमुद्रिका



क्नॉसॉस येथे सापडलेली सर्पविभूषित देवता

उ. भा. २२ व्या पृष्ठासमोर

डोक्यासारखा होता क्रीट बेटातील वसाहती, दुसऱ्या लोकांचा संसर्ग नसल्यानें व तेथील जमीन सुपीक असल्या मुळें लवकरच रानटी स्थितींतून बाहेर पडल्या. या बेटात फार प्राचीन काळापासून संस्कृतीच्या प्रगतीस सुरवात झाली व सुमारें २५०० ( ख्रिस्तपूर्व ) च्या सुमारास येथील तुरळक असलेल्या वसाहती एकवटल्या व त्यामध्यें राजकीय सत्ता स्थापित झाली. धर्मासंबंधींचे अधिकार राजाच्या हातीं असत, असें वाटतें. त्यानें येथें एक मोठा दगडाचा राजवाडा बांधला. यास मांडलीक राजाकडून खंडणी मिळत असे. व्यापारासंबंधानें येथील लोकाचें इजिप्त देशाशीं दळणवळण होतें व या दोन देशाचा एकमेकाशीं मातीच्या भांड्यांचा व्यापार चालत असे. येथें एका विशिष्ट प्रकारच्या लिपीची वाढ झाली

तटबंदी वगैरे दृष्टीस पडत नाहीं यावरून या वेळीं या बेटांत शांतता नांदत असावी. सुपीक जमीन ताब्यात ठेवण्याकरिता बेटाच्या निरनिराळ्या भागीं वसाहती स्थापन केल्या. यांचा व्यापारनिमित्तानेंहि उपयोग होत असे येथील संस्कृति ख्रिस्तपूर्व १००० वर्षांपूर्वी कळसास पोंचली. नंतर उतरत्या कळेस आरंभ झाला असावा.

याचवेळीं क्रीटबेटाबाहेरील वसाहतींच्या संस्कृतीवर या बेटातील श्रेष्ठ संस्कृतीचा परिणाम झाला व पुढें कांहीं काळानें ईजियन संस्कृति जिकडे तिकडे एकाच स्वरूपाची झाली व क्रीटमधील संस्कृतीस नवीन चलन मिळालें. इजिप्तसारख्या देशाशीं व्यापार वाढला. व ईजियन कलेचें अनुकरण दुसरीकडे पसरलें. खडणीच्या नोंदणीवरून या सुधारणेचें व सत्तेचें केंद्रस्थान क्रोसस गावीं असावें. पण हा क्रीट लोकांचा वरचष्मा फार थोडा काल अस्तित्वात असावा.

ख्रिस्तपूर्व १५०० च्या सुमारास या बेटावर रानटी लोकांनीं स्वारी करून यांच्या संस्कृतीचा घडी मोडली, पण स्वत च्या संस्कृतीच्या अभावामुळे त्यांनीं येथील संस्कृतीचा अंगीकार केला. यामुळे या संस्कृतीनें उचल खाल्ली व कला पूर्ववत होण्याचा रंग दिसत होता.

पण ही स्थिति फार काल टिकली नाहीं. आयसयुगाच्या आरंभीं पुन्हा रानटी लोकाच्या स्वाऱ्या झाल्या व या कारणानें जी यांची संस्कृति नष्ट झाली, तिचें मात्र पुनरुज्जीवन पुन्हा कधीं झालें नाहीं.

---

## प्रकरण ४ थें.

### असुरी बाबिलोनी संस्कृति.

बाबिलोनियाचा इतिहास देण्यापूर्वी सुमारें खि.पू.१५०० या सुमाराचे कोणकोणते प्राचीन प्रांत आधच्या किंवा काळच्या आशियांतील तुर्कस्तानामध्यें मोडतात याचा विचार करूं. कारण असुरी बाबिलोनी व त्याचे प्रतिस्पर्धी लोक याच प्रदेशात रहात होते. लिडिया, मायसिया, कारिया, लिसिया, हे प्रांत ग्रीसच्या अगदीं तोंडाशींच आहेत. हिटाइट लोकाचें राज्य स्मर्नाच्या पूर्वेस पण काळ्या समुद्राच्या दक्षिणेस आहे. सुमेर हा प्रांत युफ्रेटिस नदीच्या मुखाशीं आहे आणि त्याच्यामध्यें व हिटाइट मुलुखामध्यें परंतु तैग्रिस व युफ्रेटिस याच्या दुआयात अनुक्रमानें अक्कड व असुर हीं शहरें आहेत. पॅलेस्टाइन, फिनिशिया हे आज जेथें सिरिया आहे त्याचे भाग होत. आर्मेनिया हिटाइटच्या पूर्वेकडे पण असुराच्या प्रदेशाच्या उत्तरेस आहे हिटाइटच्या प्रदेशासच पुढें कॅपॅडोशिया नाव पडलें आणि आसुरिया, बाबिलोन, अक्कड या विस्तीर्ण प्रदेशास पुढें मेसापोटेमिया नाव पडलें असुर व बाबिलोन याची संस्कृति व राज्यें युफ्रेटिसच्या काठीं होतीं. फिनिशिअन याची भूमध्यसमुद्राच्या पूर्व किनाऱ्यावर व्यापार करणारी वस्ती होती हिटाइट यानीं आशियामायनरचा पूर्वभाग व्यापला होता आणि लिडियामधील (मायासिया, लिसिया, कारिया व बिथनिया धरून) ग्रीक इजिअन समुद्राच्या आसपासच्या इतर लोकाशीं संबंध ठेवून मोठा उच्च संस्कृतीचा आयुष्यक्रम आचरित होते परंतु आर्मेनियापासून पूर्वेकडे म्हणजे आज जेथें इराण आहे तेथील लोकांविषयीं निश्चयपूर्वक माहिती आपणास देतां येत नाहीं.

**वाङ्मयाचें लेखन.**—लोकात असुराची जरी अधिक माहिती आहे तरी त्याच्या संस्कृतीला बाबिलोनी संस्कृति हें नाव अधिक सार्थ होईल सत्य व पूर्वपरिचितता याचें समीकरण करण्यासाठीं असुरी बाबिलोनी असें नाव देण्यात आलें आहे. बाबिलोनी संस्कृतीच पुढें असुरियात प्रसार पावली, तरी पण या दोन देशातील संस्कृतींमध्यें कांहींसा फरक आहे असुरियन वाङ्मयामध्यें स्वतंत्र ग्रंथरचना अशी फार थोडी झालेली आहे, आणि बाबिलोनियामध्यें जें शिक्षण सामान्यत. सर्व समाजात पसरलेलें असे, तेंच उत्तरेकडील असुरिया देशात समाजातील फक्त एका वर्गास मिळत असे. बाबिलोनियात ज्ञानप्रसाराची परंपरा फार पुरातन काळापासून चालत आलेली होती. तेथें बहुतेक सर्व शहरात व देवालयात मठशाला असत, आणि बाबिलोनी लोकात एक जुनी सुमेरियन म्हणहि प्रचलित होती कीं, "ज्याला लेखक व ग्रंथकार यामध्येंहि श्रेष्ठ पदवीला चढावयाचें असेल त्यानें उष.काल होताच उठलें पाहिजे." बाबिलोनियात पुरुष व स्त्रिया दोघेहि लिहिण्यावाचण्यास शिकत असत, व सेमेटिक काळातील त्यांच्या शिक्षणक्रमांत मृत झालेल्या सुमेरियन व तसेंच अत्यंत घोटाळ्याच्या व संख्येनें पुष्कळ अशा शब्दावयवदर्शक चिन्हांचा ( वर्णांचा ) त्याना अभ्यास करावा लागत असे. सेमेटिक बाबिलोनियन वाङ्मयातील बरेचसे ग्रंथ मूळ सुमेरियन भाषेंतील ग्रंथांची भाषांतरेंच होतीं, आणि धर्म व कायदा या दोन्ही प्रकारच्या व्यवहारांत जुनी खाल्डियांतील चिकटी भाषा ( शब्दाच्या रूपात किंवा अर्थांत फरक बिल-

कूल न करता ते समासातल्याप्रमाणें एकमेकाला जोडून घनवाक्याची भाषा ) पुष्कळ काळपर्यंत उपयोगांत होती. शब्दकोश, व्याकरणग्रंथ व मूलाधोलिखित भाषांतर ग्रंथ विद्यार्थ्यांच्या उपयोगाकरितां तयार केलेले होते. तसेंच जुन्या ग्रंथावर टीकात्मक ग्रंथ व जुन्या अपरिचित शब्द व म्हणी यांच्या अर्थविवरणात्मक ग्रंथहि झालेले होते. शब्दावयवात्मक लिपीचे सर्व वर्ण नीट एकत्र जुळवून त्यांना नावें दिलेली होती, व सविस्तर व श्रमपूर्वक सर्व वर्ण लिहून त्यांच्या याद्या तयार केलेल्या होत्या. बहुतेक ग्रंथ चिकणमातीच्या विटावर धातूच्या खिळ्यांनीं खोदून लिहून तयार केलेले होते. शिवाय इजिप्तमध्यें पपायरस नामक लव्हाळ्यापासून तयार केलेल्या एका जातीच्या कागदावरहि ग्रंथलेखन करीत असत, परंतु ते सर्व नष्ट झाले आहेतसें दिसतें. पुढें द्वितीय असुरियन साम्राज्याच्या काळांत जेव्हां निनेव्हे मोठें व्यापारी शहर बनलें त्या वेळीं व्यापार व राजव्यवहार यांची जी आरेमाइक भाषा तिचाहि अभ्यास विद्यार्थ्यांस करावा लागूं लागला. पुढें सेल्यूकिडी कारकीर्दीपासून ग्रीक भाषेचाहि बाबिलोनियांत प्रवेश झाला आणि सुमेरियन व असुरियन ( म्ह. सेमिटिक बाबिलोनियन ) शब्द ग्रीक लिपींत लिहून तयार केलेले त्या वेळचे कित्येक लेख उपलब्ध झालेले आहेत.

**बाबिलोनी वाङ्मय व शास्त्रें.**—त्या काळांतील कित्येक ग्रंथांचीं आज आपणास नावें उपलब्ध झालीं आहेत. अशा अत्यंत प्रसिद्ध ग्रंथांपैकीं गिलगमेश महाकाव्य हें एक होय. त्याचीं एकदर बारा पुस्तकें असून प्रत्येकांत गिलगमेशच्या चरित्रांतील एकेका साहसकृत्याचें वर्णन केलेलें आहे. दुसरें प्रसिद्ध महाकाव्य सृष्ट्युत्पत्तीविषयींचें असून त्यांत मार्डुकचे तियामतशीं झालेल्या युद्धाचें वर्णन आहे. शिवाय राजाच्या नोकरांनीं बखरींवजा लिहून ठेवलेल्या लेखांत कित्येक जुन्या पौराणिक कथा उपलब्ध झालेल्या आहेत या सर्वांची माहिती इतरत्र दिली आहे.

या शुद्ध वाङ्मयात्मक ग्रंथांशिवाय खासगी किंवा निमसरकारी रीत्या लिहिलेले लेख व पत्र पुष्कळ सांपडलीं आहेत. त्यांपैकीं खम्मुरबि किंवा हमुरब्बी यांचीं पत्रें फारच मनोवेधक आहेत, तीं एल. डब्ल्यू. किंगनें प्रसिद्ध केलीं आहेत. शिवाय ज्योतिःशास्त्र व फलज्योतिष यावरचेहि पुष्कळ महत्त्वाचे ग्रंथ आहेत बाबिलोनियांत ज्योतिःशास्त्र बऱ्याच प्राचीन काळापासून अस्तित्वांत होतें, व त्यावरील सर्वमान्य ग्रंथ फार पूर्वी अक्कड येथील सार्गनच्या काळीं तयार झालेला असून त्याचें बेरॉससनें ग्रीकभाषेंत भाषांतर केलें होतें. आकाशांतील नक्षत्रमाला हिचा शोध प्रथम बाबिलोनी लोकांनीं बऱ्याच प्राचीन काळीं लावलेला आहे; आणि सूर्याचीं व चंद्राचीं ग्रहणें वर्तविण्यास लागणारें ग्रहगतिज्ञान व गणितशास्त्र याचीहि त्यांना माहिती होती. आकाशांतील ग्रहांची स्थिति व गति पाहण्याच्या वेधशाळा देवालयांना जोडलेल्या असत व तत्संबंधीं सर्व अहवाल राजाकडे नियमितपणें ज्योतिष्यांना कळवावा लागत असे. बऱ्याच प्राचीन काळीं ग्रहांची संख्या ठरवून त्यांना नावें देऊन टाकलेली होती, आणि चंद्र व शुक्र यांचे उदयास्तकाल व त्यांच्या कला यांविषयीं निश्चित माहिती देणारीं त्या काळीं तयार करून ठेवलेलीं कोष्टकें आज उपलब्ध झालीं आहेत. सेल्यूकिडि व पार्थियन यांच्या काळांतील, ज्योतिषशास्त्रविषयक नमूद करून ठेविलेली माहिती पूर्णपणें शास्त्रशुद्ध असल्याचें दिसतें; पण ही इतकी प्रगति सदरहू शास्त्रांत किती पूर्वीपासून झालेली होती हें नक्की ठरवितां येण्यासारखें नाहीं. वार्षिक पचांग फार काळजीपूर्वक तयार करीत असत, व त्यावरून सात दिवसांचा आठवडा व दुसरा पांच दिवसांचा आठवडा त्या काळीं प्रचलित होता असें दिसतें. या ज्योतिषशास्त्राच्या प्रगतीवरून गणितशास्त्राचीहि वाट बरीच झालेली असली पाहिजे हें उघड होतें अर्थात् बाबिलोनी यांनीं आकडे मोजण्याची अत्यंत सोपी रीत शोधून काढली असली किंवा अत्यंत उपयुक्त द्वादशमान पद्धतीचा शोध लावला असला तर त्याचें आश्चर्य वाटावयास नको. त्यांचा सॉस किंवा ६० चें परिमाण भूमध्य रेषेच्या एका अंशाबरोबर असून त्यावरून त्यांनीं आपला ६०० चा ‘नेर’ व ३६०० चा ‘सॉस’ बनविला होता. सेंकेरा येथें ज्यावर एकापासून साठापावेतों सर्व आकड्यांचे वर्ग व घन लिहून ठेविले आहेत अशा पट्या सांपडल्या आहेत; ज्या लोकांना छायायंत्र,घटकापात्र,तरफ व कप्पी यांचें ज्ञान झाले होतें त्यांचें यंत्रशास्त्राचें ज्ञान कांहीं टाकाऊ नसलें पाहिजे. लायार्ड यास निमरुड येथें कातून तयार केलेलें एक बाह्यगोल भिंग (लेन्स) व सार्गन यांचें नाव असलेलें एक कांचेचें भांडें सांपडलें आहे यावरून कित्येक असुरियन शिलालेखांत आढळणारी अत्यंत बारीक अक्षरें त्यांना कशीं काढतां येत व आकाशांतील ग्रहांचे वेध ते कोणत्या साधनांनीं घेत असत, हें स्पष्ट होतें.

**कलाकौशल्य**—असुरियन संस्कृतीचें व त्यापेक्षांहि अधिक बाबिलोनी संस्कृतीचें प्रधान अंग वाङ्मय हेंच होय. इजिप्त किंवा ग्रीसमधील लोकांत दिसून येणारा कलाकौशल्याविषयींचा प्रेमादर या लोकांत आढळत नाहीं. बाबिलोनियांत चिकणमातीचा सुकाळ व दगडाचा दुष्काळ असल्यामुळें तेथील इमारती विटांच्या असत. बाबिलोनियांतील देवालयें मोठीं भव्य पण ओबडधोबड विटांचीं व आकाररूपविरहित आणि बाजूनीं टेकू लावून बांधलेलीं असत; पावसाचें पाणी निघून जाण्याकरितां पन्हळ केलेले असत, त्यांपैकीं उर येथील पन्हळ अस्ताचे होते. विटांचा उपयोग करीत असल्यामुळें भिंतींत बसविलेले व स्वतंत्र खांब निरनिराळ्या प्रकारानें बांधलेले आढळतात, व मीन्यांचीं कौलें वापरीत असत असें दिसतें. भिंतींना भपकेदार रंग दिलेले असून कित्येक भिंती पितळेच्या किंवा सोन्याच्या पत्र्यांनीं मढविलेल्या दिसतात. भाजलेल्या मातीचे व रंगविलेले

त्रिकोणाकृति कीन ईस्टरमध्यें बसविलेले आहेत असुरियामध्यें दगड पुष्कळ असूनहि इमारती व देवळें विटांचीच बांधलेलीं आहेत, कारण इतर अनेक बाबींतल्याप्रमाणें या बाबतींतहि असुरियानें बाबिलोनियाचें निव्वळ अनुकरण केलेलें दिसतें तथापि कांहीं काळानंतर असुरियांत उपरिनिर्दिष्ट अनुकरणप्रवृत्ति कमी होऊन दगडाच्या इमारती बांधूं लागले, व भिंती रंगीबेरंगी दगडांचे तुकडे बसवून सुशोभित करूं लागले तिसरा असुर नर्झीर पाल याच्या कारकीर्दीत ही कला साध्या स्वरूपांत होती पुढें सार्गनच्या वेळीं तिला मोठ्या काळजीपूर्वक यथातथ्य स्वरूप दिलेलें दिसतें व अखेर असुर बनिपालच्या अमदानींत ती उत्तम पण नाविन्यविरहित स्थितींत होती बाबिलोनियांत दगडाचें दुर्भिक्ष असल्यामुळें साध्या कारागीरालाहि मोठी किंमत आलेली होती व पैलू पाडण्याची कला फार उत्कृष्ट स्थितीस पोहोंचली होती प्राथमिक काळांतलें उत्तम धातुकाम फारसें आढळत नाहीं, तथापि नंतरच्या काळांत सोन्याचीं कर्णभूषणें व कंठभूषणें विशेष उत्तम प्रकारचीं तयार होत असत असें दिसतें तांब्याच्या धातूचें काम चाललें होतें असें, इतकेंच नव्हे तर तांब्याच्या कामाची कला मूळ बाबिलोनियांत उत्पन्न होऊन नंतर ती पश्चिमेकडील देशांत पसरली असावी असें वाटतें कपड्यावरील विणकाम व नकशीकाम याबद्दलहि त्या लोकांची प्रथमपासून प्रसिद्धि होती पण यासंबंधाचे नमुने अद्याप फारसे उपलब्ध झालेले नाहींत, व उपलब्ध झालेल्यांचा स्थल व कालनिर्णय नक्की देतां येत नाहीं इतकें खरें कीं, असुरियांतील मातीच्या भांड्यांचे नमुने फार सुंदर आहेत, कांचकाम वगैरे जें सांपडतें त्याची कला इजिप्तमधून इकडे आलेली असावी. पारदर्शक कांच तयार करण्याची सुरवात सार्गनच्या कारकीर्दीत झालेली दिसते. भांडीं दगडाचीं, चिनमातीचीं व कांचेचीं करीत असत, दगडी भांड्यांचे नमुने टेलो येथें सांपडले आहेत व ते इजिप्तमधील प्रथमच्या राजघराण्याच्या काळांतल्यासारखे आहेत.

**सामाजिक स्थिति.**—बाबिलोनियांत व असुरियांत जातिभेद नव्हता, पण सामाजिक वर्ग होते बाबिलोनियांत धर्माधिकारी वर्गाचें प्राबल्य होतें तर उलट असुरियांत लष्करी बाण्याच्या प्रतिष्ठित वर्गाचें प्राबल्य होतें धर्माधिकारी लोकांत निरनिराळे वर्ग होते व भिक्षुक वर्गाची गणना त्यांच्यांतच होत असे वेळप्रसंग येईल तेव्हां सैन्यभरती सक्तीनें करीत असत, खडें सैन्य ठेवण्याची पद्धत प्रथम असुरियांत सुरू झाली द्वितीय असुरियन साम्राज्यकालांतील राजांनीं लष्करी खात्यांत एकामागून एक अशा अनेक सुधारणा केल्या. घोडदळाऐवजीं रथांची योजना केली, तिसरा तिगलथ पिलेसर यानें घोडेस्वारांकरितां खोगीर व उंच बूट पुरविण्याची व्यवस्था सुरू केली व सेनाकेरिबनें गोफणवाल्यांच्या पलटणी सैन्यांत ठेवण्याचा उपक्रम केला लष्करी स्वारीबरोबर तट्टू, युद्धसामान वाहणाऱ्या गाड्या, भिंती व तट पाडण्याचीं यंत्रें नेण्याची योजना झाली, आणि तर्तन म्हणजे मुख्य सेनापति याचा दर्जा राजाच्या खालोखाल ठरला दोन्ही देशांत गुलामांची संख्या बरीच मोठी होती त्याच्या वरचा वर्ग शेतकरी व व्यापारी लोकांचा. पण असुरियांत हा वर्ग संख्येनें थोडासा कमी होता उलटपक्षीं लेखकवर्गाला बाबिलोनियांतल्यापेक्षां असुरियांत अधिक महत्त्व होतें. कारागीर लोक, व्याजबट्टा करणारे सावकार, कवी व गायनवादनकुशल लोक दोन्हीहि देशांत होते

लोकांच्या राहत्या घरांत सामानसुमान बेताचेंच असे, तथापि खुर्च्या, टेबलें, कोचें इत्यादि वस्तू असत असुर बनिपाल राजाचें एक चित्र सांपडलें आहे, त्यांत तो राजा कोचावर टेंकून बसून जेवीत आहे व त्याची राणी शेजारीं खुर्चीवर बसलेली आहे असें दाखविलें आहे मनुष्य मेल्यावर त्याला व त्याचबरोबर त्याची पुरण्याची चीजवस्त अर्धवट जाळण्याची चाल असे शहरा या राहत्या जागाशेजारींच स्मशानभूमि असे, व तींत रस्ते वगैरे करून मधून स्वच्छ पाण्याचे पाट केलेले असत थडगीं विटांचीं असत व त्यापैकीं पुष्कळांच्या भोंवतीं बगीचाहि केलेला असे, शिवाय वेदीप्रमाणें उंचवटे करून त्यावर मृतांना अर्पण करण्याच्या वस्तू ठेवीत असत जुनींजुनीं थडगीं नष्ट होत तेव्हां तेथेंच दुसरीं नवीं बांधण्यांत येत असत असुरियांत सिल्यूकस किंवा पार्थियन काळांतल्यापेक्षां जुनी स्मशानभूमि अद्याप सांपडलेली नाहीं, ही गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे

**बाबिलोनिआच्या प्राचीन इतिहासाचें स्थूल अवलोकन.**—इतिहाससंशोधकास ज्ञात असलेल्या अतिप्राचीन कालांत बाबिलोनिआमध्यें स्वतंत्र छोटीं राज्यें होतीं व त्यांच्या मर्यादा कालवे व सरहद्द दाखविणारे शिलास्तंभ यांनीं नियमित झाल्या होत्या दक्षिणेकडील 'एरिडु' व उत्तरेकडील 'निप्पुर' या दोन मुख्य संस्कृतिकेंद्रांपासून बाबिलोनिअन मिश्र संस्कृतीचा उगम झाला असावा परंतु या दोन्ही मूळ प्रगतिप्रवाहांमध्यें महत्त्वाचा फरक आहे. निप्पुर संस्कृतींमधील मुख्य देवता एन्लिल असून ती प्रेतलोकावर अम्मल चालवीत असे, व निरनिराळे मंत्र,तंत्र, जादूटोणे मनुष्य जातीला त्या देवतेपासून प्राप्त झाले इष्ट किंवा अनिष्ट करणाऱ्या देवतांस देखील हिचे हुकूम पाळावे लागत त्याच्या उलट स्वरूपाच्या देवतेचें स्थान 'एरिडु' हें, मानवी प्राण्यांचें हित करणाऱ्या, प्रकाश व कल्याण देणाऱ्या त्याचप्रमाणें आजारास बरें करण्यांत व मृतास पुनरुज्जीवित करण्यांत आपल्या दैवी सामर्थ्याचा व शहाणपणाचा उपयोग करून त्यांत समाधान मानणाऱ्या 'एआ' ह्या देवाचें निवासस्थान आहे खोल समुद्रांत असणाऱ्या आपल्या प्रासादांतून दररोज प्रातःकाळीं 'एआ' देव क्षितिजावर प्रकाशमान होतो. त्यानें मानवजातीस कला, शास्त्रें, उद्योगधंदे व प्रगति संपादनाच्या

पद्धती दाखविल्या. लेखनकला त्याजपासूनच उगम पावली व पहिलें कायद्याचें पुस्तक त्यानेंच केलें, अशी त्या लोकांची समजत होती. एके काळीं एरिडु हें बंदर असल्यामुळें,त्यातून परदेशाशीं चालणाऱ्या व्यापाराचा व दळणवळणाचा त्याच्या संस्कृतिविकासावर पुष्कळ परिणाम झाला आहे. त्याची सृष्टिरचनेची कल्पना तेथील भौगोलिक स्थितीप्रमाणेंच उद्भूत झाली आहे. युफ्रेटिस नदीच्या मुखाशेजरच्या, वारंवार विस्तार पावणाऱ्या तरिप्रांताप्रमाणें सर्व पृथिवी ही समुद्रांतील जलामधून बाहेर पडली असें मानण्यांत येत असे. तथापि इतिहासकालाच्या फार पूर्वींच ' एरिडु ' व 'निप्पुर'-ह्या ठिकाणच्या दोन्ही संस्कृतींचें पूर्ण मिश्रण झालें होतें. ज्याप्रमाणें बाबिलोन ही ' एरिडु ' याची वसाहत झाल्याचें दिसतें त्याचप्रमाणें एरिडु शेजारींच असलेला उर हा प्रांत निप्पुरची वसाहत असला पाहिजे, कारण तेथील चंद्रदेवता ही ' एन्लिल' देवतेचा पुत्र म्हणून मानली आहे. ह्या दोन्ही संस्कृतिमिश्रणामध्यें ' एरिडु ' येथील संस्कृतीचा परिणाम जास्त प्राचुर्यानें दृग्गोचर होतो.

बाबिलोनिआची प्राचीन संस्कृति सुमेरिअन असावी असें म्हणता येईल ज्या मानवजातीनें ह्या संस्कृतीचा विकास केला, ते लोक चिकटी भाषा( अग्लुटिनेटिव्ह ह्यास इतिहाससंशोधक राजवाडे यांनीं चिकटी भाषा हा प्रतिशब्द वापरला आहे) बोलत व ह्यांनींच प्राचीन चित्रलिपि, (हींपासूनच पुढें कीलाकृति लिपीचा उद्भव झाला ) देशांतील मुख्य नगराची स्थापना वगैरे संस्कृतींतील प्राथमिक गोष्टी शोधून काढल्याचें सिद्ध झालें आहे. पाणथळ जमिनींतील पाणी काढून लावण्याकरिता केलेलीं मोठमोठीं बांधकामें नद्यांच्या पुराचें पाणी कालव्यांच्या योगानें नियमित करणें इत्यादि गोष्टी, तसाच मागाहूनच्या बाबिलोनिअन परमार्थसंप्रदायापैकीं बराच भाग व बाबिलोनिअन कायद्याचा प्रारंभ इत्यादि गोष्टी सुमेरिअन कालातच उद्भूत झाल्या असाव्यात. सेमाइट लोक येथील राज्यकर्ते झाल्यानंतर देखील बराच कालपर्यंत परमार्थसंप्रदाय व कायदा ह्यांची भाषा सुमेरिअन होती. हे सुमेरिअन द्रविड महावंशातील होते असें हालचें म्हणणें आहे.

**बाबिलोनियामधील कायदेपद्धति.**—बाबिलोन येथील समाजाची कल्पना देण्यासाठीं लोकांचें धार्मिक व पारमार्थिक स्वरूप पूर्वीं दिलें आहे. पण यापेक्षाहि समाजस्थितीवर तेथील कायद्यांनीं अधिक प्रकाश पडतो बाबिलोनियामधील कायदेपद्धतींचा जर कोणी अभ्यास करूं म्हणेल तर त्याला साहित्य व ग्रंथभांडार विपुल मिळूं शकेल, कारण न्यायाधीशाचे फैसले, करारनामे, हिशेब, त्याचप्रमाणें ऐतिहासिक शिलालेख, राजांनीं दिलेले परवाने, खासगी कागदपत्रें इ.बऱ्याचशा गोष्टी उपलब्ध झाल्या आहेत. पण खमुरबी ( हमुरबी ) चें "कोड " अथवा ज्याला नुसतें "कोड" म्हणतात व ज्याचा नुकताच शोध लागला आहे, तें मात्र संगतवार अभ्यास करण्यास फार सोयीचें आहे.

हें हमुरबीचें कोड बाबिलोनीं कायद्याचें केन्द्रस्थान झालें आहे. ग्रीक, पार्थिअन व पर्शिअन लोकांच्या स्वारीनंतर देखील, " कोड " मधील बऱ्याचशा भागाची अंमलबजावणी केली जात असे, व इलींच्या मेसापोटेमियामधील कायदेपद्धतीवरहि ह्याचा परिणाम झाल्याशिवाय राहिला नाहीं. हें "कोड" अस्तित्वांत येण्यापूर्वीच्या कायदेपद्धतीस व चालीरीतींस " प्राचीन ", व " कोड " नंतरच्या पद्धतीस "अर्वाचीन" म्हणतात

सेमिटिक लोकांनीं बाबिलोनियातील शहरात वसाहत केल्यानंतर त्याच्याच चालीरीतींस कायद्याचें स्वरूप प्राप्त झालें. या देशाच्या प्राचीन इतिहासाचीं पानें केवळ सत्तेकरितां व वर्चस्वाकरिता केलेल्या लढायांनीं भरलेलीं आहेत राजधानीची सत्ता खंडणीच्या व सहाय मागण्याच्या बाबतींत इतर सर्व शहरावर चालत असे पण प्रत्येक शहरातील कायदे पद्धति स्वतंत्र असून तेथील रहिवाशाचे हक्क मात्र योग्य रीतीनें पाळिले जात असत.

बाबिलोनियामध्यें पुष्कळ जातींचे लोक होते. प्रत्येक शहरांतील माणसास इतर शहरात जाण्याची परवानगी होती. ह्या दळणवळणामुळें एकमेकांच्या रीती एकमेकांस घेता आल्या. पण एकच कायदेपद्धति सर्व देशभर प्रचलित करून देण्याचें श्रेय मात्र खमुरबीकडेच आहे.

" कोड " मधील कायदेपद्धतींत बहुतेक जातिविषयक चाली रीती पार नष्ट झालेल्या दिसतात. "कोड" मधील कायदेपद्धति म्हणजे सर्व देशाची कायदेपद्धति. स्वत स झालेल्या अपकाराचें स्वतःच निराकरण करणें किंवा स्वतः हरण करून आणलेल्या स्त्रीबरोबर लग्न करणें इत्यादि पद्धती मोडल्या होत्या पण दिव्य, कुटुंबाचें स्वायत्तत्व वगैरे जुन्या गोष्टी अस्तित्वात असलेल्या या कोडवरून दृष्टीस पडतात. राजाची सत्ता निरंकुश मानीत तरीपण राजा दयाळू असून कोणालाहि थेट राजापर्यंत जाण्याची मोकळीक असे. निर्बलाचें संरक्षण करण्यास राजा तयार असे. न्यायाधीशावर कडक देखरेख असे. सगळीकडे जमान लष्करी जहागिरीच्या पद्धतीप्रमाणें विभागून दिलेली असे. टपालखातें वगैरे लोकोपयोगी कामें चालत असत. स्त्रीवर्गास मान असून कोणत्याहि तऱ्हेचीं बंधनें नव्हतीं, इत्यादि गोष्टी या कोडवरून दिसतात.

**खमुरबीचें कोड.**—कोडमध्यें केवळ तत्कालीन अथवा प्राचीन कायदेपद्धतीच नाहींत, तर त्यात नवीन कायदेपद्धतींचाहि समावेश केल्यामुळें प्राचीन कायदेपद्धतीत या कोडनें बराचसा फरक घडवून आणला. लेखी करारनामे सुरु झाले. दोन पक्षाच्या संमतीनें वाटेल ते करार होण्यास मोकळीक असे. करारनामे नोंदणीअधिकाऱ्यासमोर शपथेवर देवळांत केले जात असत.

त्यांवर सार्वजनिक शिक्षा असे. निदान करारनामे करण्याच्या पद्धतीवरून तरी त्यात बेकायदेशीर अथवा धर्मविरुद्ध कांहीं असेल असें वाटत नव्हतें. न्यायाधीशांच्या फैसल्यावर राजाकडे 'विनंति अर्ज' करितां येत असे. व पुष्कळ बाबतींत कोडनें, राजानें कसा निकाल द्यावा हे दाखविलेलें असे. कोडची रचना फार उत्तम तऱ्हेनें व काळजीपूर्वक केलेली होती व त्यांतील विषयांचा क्रम फार सोयीवार होता.

लो का चे व र्ग.—कोडप्रमाणें लोकांचे तीन वर्ग होऊं शकतात. (१) आमेलू, (२) मुस्किनु, (३) अर्डु. आमेलू म्हणजे कुटुंबांतील मुख्य मनुष्य. त्याच्या जन्मकालाची व मरणकालाची नोंदणी केली जात असे. त्यास राजाचे हक्क असत. तो गैरवाजवी वर्तनाकरितां कडक शिक्षा व दंड सुद्धां करूं शकत असे. त्या वर्गांत राजा, राजसभासद, मोठमोठाले हुद्देदार व उद्योगधंदे करणारीं माणसें ह्यांचा समावेश होतो. मुस्किनु वर्गाचें लक्षण सांगणें मात्र फार कठिण आहे. कांहीं कालानंतर मुस्किनु म्हणजे "दरिद्री" असें समजलें जात असे. पण कोडमध्यें मुस्किनु शब्दाचा अर्थ दरिद्रीपणा असा घेतला नाहीं; त्यापाशीं जमीन मात्र नसूं शकेल. तो स्वतंत्र असे. तो शहरांतील वेगळ्या भागात रहात असे. त्याचा संबंध राजदरबाराशीं असावा असें मानण्यास योग्य कारणें सापडत नाहींत. कोणास शारीरिक इजा झाल्यास त्याबद्दल दंड वसूल करणें त्याचेकडे असे. पुढील दाखल्यात याचा उल्लेख नसल्यामुळें विशेष माहिती सांगणें शक्य नाहीं. तिसरा वर्ग म्हणजे आर्डु. आर्डु हा गुलामांचा वर्ग. लोकसंख्येंत ह्या वर्गाचीच फार भर होती. तो मालमत्ता साठवूं शकत असे. त्याला इतर गुलाम ठेवतां येत असत. कपडे, जेवण व औषधें, यांचा खर्च धनी पुरवीत असे. त्यानें दुसऱ्या गुलामाच्या मुलीशीं धनी लग्न करून देत असे. गुलाम नसलेल्याच्या मुलीशीं गुलामाचें लग्न झाल्यास तीमुळें मिळालेलें जें आंदण त्यावर धन्याचा काडीइतका हक्क नसे. पण एखादा गुलाम मेल्यानंतर मात्र त्याच्या धन्याला त्याचा वारस म्हणून अर्धी संपत्ति मिळत असे. धन्यापासून दुसऱ्या कोणीं विकत घेतल्यास तो स्वतन्त्र होऊं शकत असे. बरेच गुलाम पळून जात असत. कोणीं पकडून त्यास धन्याच्या स्वाधीन केल्यास कोडप्रमाणें त्याला २ 'शेकेल' इनाम मिळत असे. एखाद्या गुलामास प्रतिबंध करण्याबद्दल अथवा घरीं जागा देण्याबद्दल देहांत शिक्षा होती. प्रत्येक गुलामाच्या अंगावर ओळखीकरितां कांहीं चिन्ह असे, क्वचित् तें गोंदलेलें असे किंवा भाजलेलें असे. असुरियात बरेचसे गुलाम असत पण बाबिलोनियामध्यें फारच थोडे असत.

रा ज स त्ता.—शहरात ज्यास ईश्वर म्हणून मानीत असत तोच सर्व जमीनीचा मालक समजला जात असे. राजा ईश्वराचा प्रतिनिधि (राज्यकारभार पाहणारा पुरुष) असे पूर्वीपासून चालत आलेल्या रयतवारी पद्धतींत राजानें ढवळाढवळ करण्याचें टाळून दिलें होतें. जमीनीची किंमत ठरीव असे पण राजा एखादा योग्य पुरुषास जमीन बक्षीस म्हणून देऊं शकत असे. या बक्षीसपद्धतीमुळें जमीन स्वीकारणारावर बरींचशीं कर्तव्यें लादलीं गेलीं. देश सैनिकाची मागणी करीत असे. कांहीं मर्यादित भागातून एक धनुर्धारी (तिरंदाज) व त्याला मदत करणारीं माणसें द्यावीं लागत. नंतर कांहीं नियमित भागांतून घोडेस्वार द्यावे लागत असत. गुलाम लोक नोकरीचीं कामें करीत, व आमेलु व कधीं कधीं मस्किनु वर्गांतील लोक लढाईवर जात असत. धर्माधिकारी व गुराखी लोक मात्र वरील अटींपासून मोकळे होते. भाडवलातील व पिकातील कांहीं भागावर देशाचा हक्क असे. प्रत्येक शहरात मालावरील महसूल, जकात, रस्त्यावरील व पाण्यावरील कर, त्यासंबंधाची व्यवस्था वेगवेगळी असे. राजाचा जमीनीवरील सत्ता नाहींशी झाली होती. त्याची खासगी जिंदगी व भांडवल आणि प्रजेपासून मिळालेला कर वेगळा असे. मोठमोठे अधिकारी मालक रहाण्याच्या जागा व जहागिरी असत. कांहीं वर्गांकरितां कोडमध्यें नियम बांधले होते. त्या वर्गांनीं राजापासून इस्टेट घ्यावी व गरज लागली असता मदत करावी. मरण पत्करल्यास देखील त्यास आपलें कर्तव्य दुसऱ्यावर टाकिता येत नाहीं. कोणास मदत करण्यास दूरदेशीं जावें लागल्यास त्यानीं आपल्या मुलावर आपलीं कर्तव्यें सोंपवावीं. इस्टेट दुसऱ्याला अगदीं देता येत नसे. त्याचप्रमाणें ज्या वंशाची इस्टेट त्याच वंशात राहत असे.

दे वा ल यें.—देवळांना फार महत्त्व होतें. पैसे व कायमच्या देणग्या यांजकडून पुष्कळशा रीतींनीं त्यांना पैशाचें साहाय्य मिळत असे. मोठमोठ्या देवळांत पुष्कळसे अधिकारी व नोकर असत. प्रत्येक शहरांतील लोक एकेक देवळात जात असत व कुटुंबातील प्रत्येक पुरुषास पुरोहित बनण्याचा अधिकार असे. जसजशी शहराची वाढ होऊं लागली तसतसे वर्षांतील कांहीं दिवस अमुक एका देवळात जावें कांहीं दिवस दुसऱ्या देवळात जाऊन धर्मोपदेश करावा त्यासंबंधाचे हक्क कांहीं ठराविक कुटुंबांना देण्यात आले. देऊळ म्हणजे मोठालीं धान्यकोठारें बनलीं. प्रत्येक देवळाकडे कांहीं नेमलेलीं कर्तव्यें होतीं. शत्रूंनीं एखाद्या नागरिकास कैद केल्यास व त्यापाशीं पैसा नसल्यास, त्यास पैसे देऊन सोडवावें लागत असे. गरीब लोक देवळातून धान्य उसनें नेत असत व परत आणीत असत. देवळावर राजाची सत्ता मालक या नात्यानें नसून कारभार पहाणारा या दृष्टीनें होती. उत्पन्नाचा एक दशांश कर म्हणून द्यावा लागत असे.

ईश्वराची सेवा करणारा 'व्हेस्टेल' नावाचा एक वर्ग आहे त्यासंबंधीं कोडमध्यें नियम सांगितले आहेत त्या वर्गांतील लोकांना पावित्र्य राखण्याची शपथ घ्यावी लागत असे. त्यांना खाणावळींत जाता येत नसे. पण यांना खासगी हक्कहि बरेच होते.

मा ल म त्ते चा क्र य वि क्र य.—कोडमध्यें मालमत्ता देण्याघेण्यासंबंधाचे विक्री, ठेका, अदलाबदल, देणगी, ठेव, कर्ज व गहाण वगैरे निरनिराळे मार्ग सांगितले आहेत. कसे दाखले

अथवा साक्षीदार यावरून सिद्ध झाल्याशिवाय कोणाचाहि हक्क मान्य करणें हें कोडविरुद्ध आहे. विकत घेणारानीं विकणाऱ्याच्या हक्काचा नीट चौकशी केल्याशिवाय विकत घेऊं नये. अज्ञान अथवा मुखत्यारांचा अधिकार नसलेल्या गुलामापासून जो कोणी विकत घेईल तो चोर समजला जाऊन मरणाच्या शिक्षेस पात्र होईल. विकत घेणाराजवळील माल जर चोरीचा ठरेल व जर तो विकणारा व विक्रीपत्र ह्यास पुढें आणणार नाहीं तर तो चोर ठरेल व त्यास देहान्त शिक्षा मिळेल. पण विक्रीपत्र सिद्ध केल्यास विकणाऱ्याच्या इस्टेटींतून पाचपट रक्कम मिळेल. इतर देशात जर कोणी गुलाम विकत घेतला व मागून असें कळलें कीं, तो बाबिलोनियामधून चोरून अथवा कैद करून आणलेला होता तर त्याला त्याच्या पूर्वीच्या मालकाकडे कांहींएक नफा घेतल्याशिवाय परत केलें पाहिजे.

शेतकरी.—जमीनीचे मालक बहुतेक स्वतःच जमीनीची लागवड करीत असत, पण त्याना शेतकऱ्यास भाड्यानेंहि जमीन देता येत असे. शेतकरी लोकाना योग्य लागवड करून पीक घेता येत असे व शेत सुस्थितींत ठेवावी लागत. पीक न आल्यास काय खंड द्यावयाचा हे कोडमध्यें ठरवून दिलें होतें. पीक वाटून घेण्याच्या इच्छेनें जर जमीन दिली तर जमीनदार व शेतकरी हे ठरावाप्रमाणें पीक वाटून घेत असत. शेतकऱ्यानीं भाड दिल्यास व व जमीन चांगली ठेवल्यास त्याला पोटभागीदार करिता येत असे. पडीत जमीनीची लागवड करण्याकरिता ती भाडें न घेता ३ वर्षांकरिता दिली जात असे. बगीचे वगैरे देण्याची पद्धतहि जमीनीप्रमाणेंच असे. जमीनदार बैल वगैरे व इतर शेतकीच्या उपयोगाचें सामान ठेवीत असे. शेतकऱ्यानें जर बीं वगैरे चोरलें तर त्याचीं बोटें कापलीं जावीं अशी शिक्षा असे.

कालवे.—कालव्याची फार जरूर होती. कालव्याचें पाणी देणारानें निष्काळजीपणामुळें जर बांधाची दुरुस्ती राखली नाहीं व त्यामुळें पाण्याचा मोठा प्रवाह येऊन पिकें वाहून गेलीं तर नुकसानीची भरपाई त्यास करावी लागत असे.

घरें.—घरें पुष्कळ वर्षांकरिता भाड्यानें दिलीं जात असत पण सहा महिन्यांचें भाडें अगोदर द्यावें लागत असे. रहाणारानें घराची उत्तम व्यवस्था ठेवावी असा करार असे. करार संपपर्यंत घरमालकास घरातून जा म्हणून भाडेकऱ्यास सांगता येत नसे. घर बांधण्याकरिता जमीन मोफत दिली जात असे पण आठ दहा वर्षांनंतर घरावर जमिनीच्या मालकाचा ताबा होत असे.

मजूर.—गुलाम पुष्कळ असून देखील हंगामाच्या वेळेस पैसा देऊन मजूर कामावर आणावे लागत. बैल सुद्धा नांगरण्याकरिता, बैलगाड्यास जुंपण्याकरिता किंवा पाण्याचीं यंत्रें चालविण्याकरिता भाडें देऊन आणले जात असत. पेरणारे, गाडी हांकणारे व शेतात काम करणारे यांचीं मजुरी, त्याचप्रमाणें बैल भाड्यानें आणल्यास किती भाडें द्यावें ह्यासंबंधीचे नियम कोडमध्यें ठरवून टाकिले होते.

गुरें.—गुराचे कळप पुष्कळ होते. गुराखी मालकास रसीद देऊन नंतर रानात गुरें चारण्यास नेत असे. त्याची मजुरी कोडप्रमाणें ठराविक होती. गुराची उत्तम तऱ्हेनें काळजी घेण्याचें व परत आणण्याचें काम गुराख्याकडे असे. निष्काळजीमुळें झालेलें कोणतेंहि नुकसान गुराख्यास भरावें लागत असे. धान्याच्या शेतात गुरें चारल्यास गुराख्याला झालेल्याच्या चौपट नुकसान भरावें लागत असे.

कर्ज.—कर्ज घेताना कर्जदार आपली मालमत्ता गहाण ठेवीत असे. शेत गहाण ठेविल्यास कर्जदार पिकातून सावकाराचें कर्ज फेडे. नापिकी झाल्यास व्याज माफ केलें जात असे. सावकारास, कर्ज न दिल्यास कर्जदाराची मालमत्ता जप्त करण्याचा अधिकार नव्हता, व तसें केल्यास कर्जदाराचा माल कर्जदारास परत करावा लागे, एवढेंच नव्हे तर सावकाराचा कर्जदारावरील हक्क नाहींसा होत असे. परवानगीशिवाय जप्ती केल्यास दंड होत असे. कर्जाकरिता कर्जदारास पकडल्यास कर्जदाराला आपली बायको, मूल अथवा गुलाम कर्ज फिटेपर्यंत सावकाराकडे काम करण्यास ठेवावा लागे. मूल, गुलाम अथवा बायको ह्यास स्वाभाविक मृत्यु प्राप्त झाल्यास सावकार जबाबदार नसे. पण सावकाराच्या दुष्टपणाच्या वर्तनामुळें जर त्यापैकीं कोणाला मरण आलें तर मात्र सावकारास मुलाबद्दल मूल व गुलामाबद्दल गुलाम द्यावा लागे. कधीं कधीं कर्जाइतक्या किंमतीचा माल गहाण ठेवला जात असे किंवा कधीं सर्व मालमत्ता गहाण ठेविली जात असे. कर्जाकरिता जामीनकीहि घेतली जात असे.

व्यापार.—व्यापार फार जोराचा होता. व्यापाराची साधारण पद्धत म्हणजे गावोगाव माल घेऊन फिरणाऱ्या एखाद्या 'एजंट' च्या स्वाधीन माल करून देण्याची होती. मालाच्या गाड्या दूरदूरच्या देशात जात. कोडमधील नियमाप्रमाणें एजंटला व्यापाऱ्यापासून विकण्याकरिता घेतलेल्या सामानाची एक यादी करावी लागे व ते पोहोंचल्याची रसीद द्यावी लागे. एजंटला जरा नफा झाला नाहीं तरी घेतलेल्या मालाच्या दुप्पट रक्कम परत करावी लागे पण लुटल्या गेलेल्या मालाबद्दल तो जबाबदार नसे. परत आल्यावर व्यापाऱ्यास पोहोंचलेल्या मालाची पावती एजंटला द्यावी लागे. जलमार्गानेंहि बराच व्यापार केला जात असे. माल पाठविण्याकरिता जहाजें भाड्यानें घेतलीं जात असत. मालाबद्दल नौकाध्यक्षास जबाबदार रहावें लागे. दोन जहाजाची टक्कर झाल्यास जें जहाज चालत असेल त्या जहाजास नांगरून राहिलेल्या जहाजास जबाब द्यावा लागे.

विवाह.—विवाह म्हणजे जवळ जवळ स्त्री विकत घेण्याची पद्धत, विवाहासंबंधाचा एक करारनामा असे.

विवाहाचे ठराव प्रथम मुलामुलींच्या नातलगात होत. मुलाच्या बापानें कांहीं रकम मुलीजवळ द्यावी व तींत इतर नजराण्याची भर टाकून मुलीने मुलीच्या बापाकडे पोहोंचती करावी. लग्नानंतर ती रकम मुलाचा बाप मुलीला देत असे. मुलीच्या बापाला देण्याची रकम एकमेकांच्या स्थितीवर अवलंबून असे. कोडमध्यें असा नियम घालून दिला होता कीं, रकम घेतल्यानंतर जर मुलगी दिली नाहीं तर मुलीच्या बापानें मुलाला दुप्पट रकम परत करावी व जर मुलाचा लग्न करण्याचा बेत फिरला तर दिलेली रकम त्यास मिळूं नये. मुलीला मिळालेली रकम व बापानें दिलेलें आंदण ह्यावर मरेपर्यंत तिचा हक्क राही व मेल्यावर तिच्या मुलाना ती संपत्ति मिळे. लग्नाचा विधि म्हणजे हातात हात घालणें व नवऱ्यानें "मी सरदाराचा मुलगा आहे, तुझी ओटी सोन्यारुप्यानीं भरली जाईल, तू माझी पत्नी होशील व मी तुझा पती होईन" इत्यादि शब्द उच्चारणें यापलीकडे नव्हता.

घटस्फोट.—लग्नाच्या करारनाम्यात कांहीं अटी असत त्या मोडल्यास प्रत्येकास काडी मोडण्याचा अधिकार असे. ह्या अटी कोणच्या असाव्या ह्यासंबंधीं कोडमध्यें कांहीं नियम बांधून दिलेले नव्हते. बायकोनें लग्नापूर्वी काढलेल्या कर्जाबद्दल सुद्धा नवऱ्यास जबाबदार धरीत असत. नवऱ्याला बायकोस इनामपत्र करून देण्याचा अधिकार असे. व त्या इनामावर मरेपर्यंत तिची सत्ता राही. लग्न झाल्यावर देखील मुलगी आपल्या बापाच्या कुटुंबातील अंश आहे असें समजलें जात असे. अमुक एकाची बायको म्हणण्याऐवजीं अमक्याची मुलगी अथवा अमक्याची आई असें म्हणत असत.

काडीमोड करणें हें मनुष्याच्या मर्जीवर असे. पण त्याला मोडलेल्या बायकोस, आंदण व मुलें झालीं असल्यास मुलें परत द्यावीं लागत. मुलें वयात येईपर्यंत तिचा व मुलाचा खर्च द्यावा लागत असे. जर मुलें नसलीं तर आंदण व मुलीला मिळालेली रकम परत केली म्हणजे पुरे.

पतिपत्नी.—स्त्री जर व्यभिचारी असेल तर पुरुषाला तिला घालवून देऊन मुलें ठेऊन घेण्याची परवानगी होती, किंवा तिला गुलाम म्हणून ठेवता येत असे. तिला पुरुषावर त्यानें दाखविलेल्या दुष्टपणाबद्दल अथवा केलेल्या दुर्लक्षाबद्दल फिर्याद करण्याची मोकळीक असे. जर तिला तसें सिद्ध करून दाखविता आलें नाहीं तर तिला पाण्यात बुडवून मारण्याची शिक्षा असे. पण जर तिच्या पोटगीची व्यवस्था नसेल तर नवऱ्याच्या गैरहजरींत तिला दुसऱ्याजवळ रहाता येत असे. पण तो परत आल्यास लागलेच तिलाहि परत जावें लागे.

विधवा.—नवऱ्याच्या निधनानंतर कुटुंब चालविण्याची जबाबदारी स्त्रीवर असे. तिनें घरांत राहून मुलाना योग्य शिक्षण द्यावें. पुन लग्न करावयाचें असल्यास तें न्यायाधिशाच्या संमतानें करता येत असे. न्यायाधिशानें सामानाची यादी करून नंतर त्याच्या स्वाधीन सर्व सामान करावें व त्या दोघानीं तें मुलाचे ट्रस्टी या नात्यानें वापरावें. सामानातील एक भांडें सुद्धा गहाळ होता कामा नये.पण जर तिनें लग्न केलें नाहीं तर मुलें वयात आल्यानंतर तिला नवऱ्याच्या इस्टेटींतील काहीं भाग मिळे.

संतति.—पुरुषानें लग्न एकदाच करावें असा नियम होता. पण मुलें न झाल्यास बायकोनें एखादी दासी पुरुषाच्या स्वाधीन करावी व तिला झालेलीं मुलें आपलीं आहेत असें समजावें. पण स्त्रीनें तसें न केल्यास पुरुषास वेश्येस आणता येत असे. जसें दासीवर स्त्रीचें वर्चस्व असे तसें वेश्येवर नसे. वेश्या स्वतंत्र असे. दोन्हींकडून झालेली संतति कायदेशीर मानीत. गुलामाच्या मुलीपासून झालेली प्रजा सुद्धा कायदेशीर होऊं शके. पण तसें होण्याकरिता बापानें साक्षीदारासमक्ष कबुली दिली पाहिजे असे, व अशा तऱ्हेचीं मुलें कधीं कधीं दत्तक म्हणून घेतलीं जात.

स्वतंत्र स्त्रियास गुलामाशीं लग्न करिता येत असे व त्याची संततीहि स्वतंत्रच असे.

मुलाचीं लग्नें होईपर्यंत त्यावर बापाची पूर्ण सत्ता असे तो त्याना मजुरीकरिता पाठवूं शकत असे किंवा त्याना विकून टाकण्याचाहि त्यास अधिकार असे. बापामागें आईसहि तसाच अधिकार असे. व आईबापानंतर वडील भावांना देखील तसाच अधिकार पोहोंचत असे.

मुलीचें लग्न करणें बापाच्या स्वाधीन होतें, इतकेंच नव्हे तर ईश्वराच्या सेवेला लावून तिला मुरळी म्हणून अथवा वेश्या म्हणून देता येत असे. लग्न करून दुःखात राहाण्यापेक्षा वयात आलेल्या मुलीस मुरळी होता येत असे, व बापाला तिच्या इच्छेविरुद्ध जाता येत नसे. लग्न केल्यास वरील कोणत्याहि स्थितींत तिला तिच्या बापानें अथवा बाप वारल्यानंतर भावानीं हक्काचा हिस्सा दिला पाहिजे.

दत्तक.—दत्तक घेण्याचा प्रघात बराच दृष्टीस पडतो. दत्तविधान करारनाम्यानें होत असे. व करारनाम्यातील अटीप्रमाणें दत्तकानें आपलें कर्तव्य न बजावल्यास करारनामा रद्द केला जात असे.

धंदेवाल्या माणसास आपला धंदा चालविण्याकरिता दत्तक घेता येत असे. दत्तकानें मिळवलेल्या द्रव्यावर बापाचा हक्क असे. दत्तकाला त्यास आपला धंदा शिकवावा लागे व न शिकवल्यास दत्तकास बापावर फिर्याद करून करार रद्द करून घेण्याचा हक्क असे.

दत्तक घेऊन जर पुन: मनुष्य लग्न करील व करार मोडील तर दत्तकास जगम मिळकतीचा एक तृतीयांश हिस्सा द्यावा लागत असे.

आईबापाच्या संमतीशिवाय दत्तक घेता येत नसे पण व्यभिचारानें झालेलीं अथवा गुलामाचीं मुलें ह्यांना दत्तक घेण्याचें असल्यास कोणाचीहि संमति लागत नसे. दत्तक घेतलेल्या मुलाचे आईबाप सापडल्यामुळें जर तो जाण्यास तयार झाला तर त्याचा डोळा अथवा जीभ काढली जात असे.

वा र सा.—लग्नापासून झालेल्या मुलांना बापाच्या संपत्तीवर सारखा हक्क पोहोंचत असे. फक्त बाप लग्न होणाऱ्या मुलाकरिता मुलीला देण्याची रक्कम व मुलीला देण्याचें आंदण काढून ठेवीत असे दोन बायका असल्यास दोघींच्या मुलांत संपत्तीची विभागणी होत असे

पूर्वी बापास मुलाला वारसाच्या हक्कावरून काढून देता येत असे पण पुढें असे करण्यास न्यायाधिशाची संमति लागू लागली जो मुलगा बापाला बाप म्हणण्याचें नाकबूल करील त्याचे डोक्याच्या समोरील भागाचे केस काढून गुलाम म्हणून विकण्याचा अधिकार असे, आई नाकबूल गेल्यास पूर्वीप्रमाणेंच करून फक्त त्याला गुलाम न बनविता शहरातून एक दाखला म्हणून मिरवीत.

व्य भि चा र —व्यभिचार करणारास बुडवून मारण्याची शिक्षा होती. पण स्त्रीचा विवाहित पती जर तिला क्षमा करण्यास तयार असेल तर राजाच्या मध्यस्थीनें तो जारकर्म करणारा पुरुष देखील सुटत असे मुलानें आईशीं व्यभिचारकर्म केल्यास दोघासहि देहांत शिक्षा असे. मुलीशीं व्यभिचार केल्यास बापास हद्दपारीची शिक्षा मिळत असे सुनेशीं व्यभिचार करणाऱ्या माणसास बुडविलें जात असे. जी स्त्री परपुरुषाकरिता आपल्या पतीला ठार करवीत असे तीं फाशीं दिली जात असे

गुन्हे व शिक्षा —'जशास तसें' हें फौजदारी कायदेपद्धतीचें तत्त्व होतें बापास मारणाऱ्या मुलाचा हात तोडला जात असे. पाहुण्यास प्रतिबंध केलेल्या जागीं पाहुणाराचा डोळा फोडला जात असे डाक्टरच्या हातून रोगी जिवास मुकल्यास अथवा त्याचा शरीराचा एखादा भाग नाहींसा झाल्यास डाक्टरचा हात तोडला जात असे दुसऱ्यावर खोटे आरोप रचून त्यास मरणाच्या शिक्षेस पात्र केल्याचा प्रयत्न केल्यास खोटे आरोप रचणारास देहांत शिक्षा होत असे.

चोरीकरिता अथवा चोरीखालीं येणाऱ्या इतर गुन्ह्याकरिता देहांत शिक्षा असे, उदाहरणार्थ, राजवाड्यांत शिरून चोरी करणें, चोरीचा माल विकणें, खोटा हक्क सिद्ध करणें, माणस पळवून नेणें, पळून जाणाऱ्या गुलामास आश्रय देणें, चोरून दारू विकणें इत्यादि. पण वरील गुन्ह्यांकरिता शिक्षेची तऱ्हा मात्र ठरली नव्हती. पुढील अपराधास कोडमध्यें मरणाची शिक्षा सांगितली आहे. रात्रीं घर फोडणारास, गुलामाच्या अंगावरल चिन्ह पुसून टाकणारास, व पतीचा मृत्यु घडवून आणणाऱ्या स्त्रीस, फाशीची शिक्षा असे मातेशीं व्यभिचार केल्यास व मुरळीनें खाणावळ काढल्यास जाळून मारण्याची शिक्षा असे. व्यभिचार, पतीचें कर्तव्य सोडणारी स्त्री, व सुनेस पळविणें, ह्याकरिता बुडवून मारण्याची शिक्षा होती

घर उत्तम न बांधल्यामुळें घर पडून घरमालकाचा मुलगा मेल्यास, घर बांधणाराचा मुलगा ठार केला जात असे. एखादा दुसऱ्याच्या मुलीच्या मरणास कारणीभूत झाल्यास त्याची मुलगी मारली जात असे

वरिष्ठाच्या अंगावर उद्दामपणें चालून आल्यास त्यास ६० फटके मारले जात असत विवाहित स्त्रीचा अपकीर्ति पसरविल्यास डाग देण्याची शिक्षा असे लाच घेणाऱ्या न्यायाधिशास कायमचें बरखास्त केलें जाई आईबापाविरुद्ध वागणाऱ्या पोरास व उधळखोर बायकोस गुलाम बनविलें जात असे

सर्वसाधारण शिक्षा दंडाची असे मालमत्तेचें नुकसान केल्यास, करार मोडल्यास दंड केले जात असत दंडाचें मान अपराधावर अवलंबून असे दुप्पट, चौपट, पाचपट, बारापट व कधीं तर तीसपट सुद्धा दंडाची मजल जात असे

कोडमध्यें हेतूला विशेष महत्त्व दिलें होतें परस्पराच्या भांडणांत जर एखादा मेला तर दुसऱ्यानें मी त्याला मुद्दाम मारलें नाहीं अशी शपथ घेतल्यास तो केवळ दंडावर सुटत असे तंट्यांत जर नुसती दुखापत झाली तर ज्या मनुष्याकडून इजा झाली असेल त्याला वैद्याचे पैसे द्यावे लागत बैलानें रस्त्यावर जर एखाद्यास मारलें, तर मालकास बैल द्वाड आहे हें माहित असल्यास फक्त नुकसान भरून द्यावें लागत असे कर्जाची फेड होईपर्यंत ठेवलेला गुलाम जर सावकाराच्या घरीं स्वाभाविक मरणानें मेला तर सावकारास कोणत्याच तऱ्हेचा जबाब द्यावा लागत नसे पतीनें टाकून दिलेली स्त्री दरिद्री असल्यास तिला दुसरें लग्न करण्याची मोकळीक होती

निष्काळजीपणानें अथवा दुर्लक्षामुळे झालेल्या कोणत्याहि अपराधास जबर शिक्षा असे जसें, एखाद्या डाक्टरनें आपल्या धंद्यांत विशेष प्रविण्य नसल्यामुळें जर कोणी इसम मेला अथवा त्याचे अवयव दुखावले तर डाक्टरचे हात कापले जात असत. गुलाम मेल्यास दुसरा गुलाम आणून द्यावा लागत असे गुराच्या डाक्टरकडून एखादें ढोर मेल्यास ढोराच्या किंमतीच्या एक चतुर्थांश किंमत द्यावी लागे. घर बांधणाऱ्याच्या निष्काळजीपणामुळें जर घरमालक मेला तर त्याला स्वतःला मरावें लागत असे.

कोडमध्यें सर्व ठिकाणीं समाजातील योग्यतेस विशेष महत्व दिलें आहे

कैद करण्यास केवळ संशय घेऊन भागत नसे. तर गुन्हेगारास गुन्हा करितांना धरावें लागे चोरीचा माल जवळ सांपडल्याशिवाय चोरीची शाबिती होत नसे.

खटल्याच्या बाबतींत वादीला ज्या योग्य दिसतील त्या गोष्टी व मुद्दे तो पुढें मांडीत असे. वकीलांचा धंदा करणारे असे कोणीच नव्हते नोंदणी अधिकारी या तक्रारी लिहून काढण्याच्या कामात मदत करी. न्यायाधीश ह्यावाचून इतर पक्षकाराना व साक्षीदाराना बोलावी. लागलेच ते येऊं शकत नसतील तर खटल्याचें काम पुढें एखाद्या दिवसावर टाकी. देहांत शिक्षेसारख्याचे व इतर महत्वाचे खटले ' न्यायसभे ' पुढें असत न्यायाधिशाना मदत करण्याकरितां कांहीं वृद्ध माणसेंहि असत.

पक्षकाराना व साक्षीदाराना शपथ घ्यावी लागे. खोटी साक्ष दिल्यास गुन्हेगाराला जी शिक्षा मिळाली असेल तीच त्यालाहि मिळे मनुष्याच्या माहितीबाहेरील गोष्टींत अपराधाची अथवा निरपराधित्वाची कसोटी पाण्यात टाकून लाविली जात असे अपराध्यानें पवित्र नदींत उडी घ्यावी व निरपराधी असल्यास तो तरेल नाहीं तर बुडेल माहीत असलेल्या बाबतींत शपथ घ्यावी लागे. लेखी दाखल्यास फार महत्व होतें दाखला हरविणें म्हणजे भयंकर चूक होती. पुराव्यावरून सिद्ध करून दाखवितांस देखील न्यायाधीश दाखला सांपडल्यावर आणून द्यावा म्हणून सांगत असत.

फैसले लिहून वाढले जाऊन त्यावर शिक्का मारीत असत. व खालीं न्यायाधिशाची, त्यांबरोबर असलेल्या वृद्ध मंडळींची, साक्षीदाराची व लिहिणाराची साक्ष असे. प्रत्येक पक्षकार एक एक प्रत नेत असे व नोंदणी अधिकारी एक प्रत दप्तरखान्यात राखून ठेवीत असे.

राजाकडे विनंतिअर्ज करण्याची मुभा असे. बाबिलोनमधील न्यायासनें वरिष्ठ समजलीं जात असत. तरी प्रतिवादीला स्थानिक न्यायासनासमोर जबाब देण्याची मोकळीक होती.

शेवटीं एवढेंच लक्षांत घेण्याजोगें आहे कीं, खोटें बोलणें, खोटीं वचनें वापरणें वगैरेसारखीं बरीचशीं वाईट कृत्यें न्यायासनापुढें मांडलीं जात नव्हतीं. अशा अपराधाबद्दल योग्य शासन ईश्वरच करील असें " ओमेन टॅबलेट " मध्यें सांगितलें होतें.

आता बाबिलोनच्या इतिहासांतील मुख्य गोष्टी सुसंगत व कालानुक्रमानें देऊं.बाबिलोनियाचा इतिहास सुसंगत व गोष्टीरूपानें पूर्णपणें देण्याइतकी माहिती उपलब्ध झालेली नाहीं. पण अलीकडे चालविलेल्या खोदकामात उपलब्ध झालेल्या अवशेषांवरून व कीलाकृति अंकित लेखावरून कांहीं कांहीं मुख्य मुख्य गोष्टींचें ज्ञान होतें त्या खालीं दिल्या आहेत.

**बाबिलोनिआंतील प्राचीन राज्यें**—बाबिलोनिआ प्रांतांतील अगदीं प्राचीनकालचे ज्ञात असे रहिवासी कोणते होते याबद्दल माहिती म्हणजे ते सेमाइट नव्हते इतकीच होय. यानंतर त्याना कधीं सुमेरियन व कधीं अक्केडियन म्हणत असत. बाबिलोनियाच्या दक्षिण भागास सुमेर म्हण व उत्तर भागास ' अक्काड ' म्हणत. अक्केडिअन भाषा ही जुन्या सुमेरियन भाषेपासून विकास पावलेली पोटभाषा होय असें समजतात.

बाबिलोनी संस्कृतीचा काल सुमारें खिस्तशकपूर्व ६००० वर्षेपर्यंत मागें जातो खिस्तपूर्व ५००० ते ४००० च्या सुमारास या लोकावर एका क्षत्रिय वृत्तीच्या सेमिटिक वंशातील लोकांनीं स्वारी केली हे लोक म्हणजे बहुतेक अरबस्तानांतून आलेले इतिहासकालीन बाबिलोनिअन लोक होत. या नव्या जेत्या लोकांनीं कांहीं देश्य लोकास हाकलून न देता अगर नष्टप्राय न करता आपणात मिळवून घेऊन हळूहळू त्यांच्याच प्राचीन संस्कृतीचा अवलंब केला.

या प्रांताच्या राजकीय स्थितीसंबंधीं अगदीं प्रथमची माहिती म्हणजे या प्रांतांतील निरनिराळ्या छोटेखानी स्वतंत्र नगरराज्याची होय. ह्या स्वतंत्र राज्याचें एक एक मुख्य नगर असून त्यामध्यें एक विशिष्ट देवतेचें देवालय असे या देवतेचा धर्मोपदेशक अगर ' पटेसी 'हाच या छोटेखानी स्वतंत्र राज्याचा शास्ता असे .

**केंगीचें राज्य.**—खिस्तपूर्व ४५९० या सुमारास दक्षिण बाबिलोन प्रांतांतील केंगीचा राजा 'एन् शाग कुश अन ' नावाचा होता. हा सुमेरिअन होता किंवा सेमाइट होता याबद्दल नक्की माहिती नाहीं,परंतु हा एन्लिल देवतेचा पटेसी असून याची राजधानी शिपुर्ल-गिर्सु किंवा सुगीर ही होती. सुंगीर यासच पुढें सुमेर म्हणू लागले व दक्षिण भागास तेंच नाव पडलें. कीशचे सेमिटिक राज्य याचें प्रतिस्पर्धी असून एन्शागकुशन यानें त्यावर कांहीं कालपर्यंत आपला अम्मल बसविला. यांखेरीज दुसरा कोणताहि केंगीचा राजा प्रसिद्ध नाहीं. ही माहिती निप्पुर येथील उपलब्ध शिलालेखावरून कळते.

**किशचें राज्य.**—केंगीचा राजा ' एन्शाग कुशन ' याचा या राज्यावर कांहीं कालपर्यंत अम्मल चालून पुढें युडग हा कीशचा पटेसी असताना हें राज्य पुन्हा स्वतंत्र झालें खि. पू ४४००—मेसिलिम या किशच्या राजानें लुगल शुगर याच्या वेळीं शिपुर्ल काबीज केलें परंतु हा अम्मल थोडेच दिवस ( खि. पू. ४२०० ) राहून शिर्पुर्लचा राजा ' ए अन्नटुम ' यानें स्वतंत्र होण्याचा प्रयत्न केला कांहीं काळपर्यंत किशचें राज्य दुर्बल होतें परंतु पुन्हा लौकरच ते पूर्व स्थितीवर आलं. खि. पू ३८५०—पहिला सार्गन यानें हें राज्य जिंकण्यापूर्वीचा शेवटचा राजा अलुशरशिद यानें किशवर अम्मल चालविला. हा इतिहास दर्शविणारे पुष्कळ प्राचीन भांड्यावरील लेख उपलब्ध आहेत.

**गिश्बनचें राज्य.**—खि. पू ४४०० या वेळीं मेसिलिमचा समकालीन ' उश ' नांवाचा पटेसी असून त्यानें शिर्पुर्ल राज्याशीं सीमेबद्दल युद्ध केलें. खि पू ४२००-सरतेशेवटीं गिश्बन हें ए अन्नटुम याच्या हस्तगत झालें. एअन्नटुम याच्या मरणामुळें गिश्बनचा पटेसी उर्लुमा यानें शिर्पुर्लवर

स्वारी केली व पराजित झाला. शिर्पुलेचा राजा एटेमेना याजकडून उर्लुमाचा जगी पराभव झाला. ख्रि. पू. ४०००–युकुशचा पुत्र लुगल झगिसी हा पटेसी असून तो दक्षिण भागावर चाल करून गेला व दक्षिण आखातापर्यंत बाबिलोनचा सर्व भाग त्यानें कबजात घेतला. तो 'इरेके'चा राजा होऊन स्वतःस 'पृथ्वीश" म्हणवू लागला. मेसापोटेमियाच्या सखल प्रदेशांतील प्राचीन आचारविचार व चालीरीती यांचा त्यानें पुनरुद्धार केला. हा इतिहास प्राचीन भांड्यावर कोरलेल्या लेखांवरून कळतो.

**शिर्पुलेचें राज्य**.—शिपुला ज्याला पूर्वी लगश असेंहि म्हणत व ज्यास सांप्रत 'टेलो' असें म्हणतात तें मुघीरच्या उत्तरेस शेटेलहाइ याच्या पूर्व बाजूस आहे. या राज्याचा ज्ञात कालांतील पहिला राजा (ख्रि. पू. ४५००) उरुकगिन हा शूर तो शूर योद्धा व हुशार मुत्सद्दी होता. त्यानें पुष्कळ देवालयें बांधलीं व कांहीं दुरुस्त केलीं व सुगीर (गिर्सू) या राजधानीकरितां एक कालवा बांधला. ख्रि. पू. ४४००–याचा एक वंशज एन गेगेल असून दुसरा लुगलशुगुर ह्यास कीशाचा राजा मेसिलिम यानें पटेसीच्या दर्जापर्यंत खालीं ओढलें. ख्रि. पू. ४३००–अशा रीतीनें किशराजाच्या वर्चस्वाखालीं निर्बल झालेल्या सिंहासनावर उर्नीन या नांवाच्या पुरुषाच्या नेतृत्वाखालीं एक नवीन घराणें आलें. देवालय बांधणारा म्हणून याची पुष्कळ प्रसिद्धि झाली. यानें आपल्या प्रजेची किशची परकीय सत्ता झुगारून देण्याकरितां पुष्कळ तयारी केली. त्याचा मुलगा पटेसीच होता. तरी त्यानें आपणास राजा म्हणवून घेतलें. ही माहिती पुष्कळशा प्राचीन चबूतऱ्यावरील लेखांवरून कळते. ख्रि. पू. ४२५०–अकुर्गल ह्या नांवाचा राजा उर्नीन ह्याच्या मागून राज्यावर बसला. हा ए अनटुम आणि पहिला एनअन्नटुम या दोघांचा पिता होय. ख्रि. पू. ४२०० एअन्नटुम यानें आपल्या देशास किशच्या पारतंत्र्यांतून मोकळें करून स्वतः राजसत्ता हातांत घेतली. यानंतर गिशबनचें राज्य त्यानें आपल्या अमलाखालीं आणलें, आणि इरेक, ऊर, लार्सा, अक्ष आणि उरु या राज्यांबरोबर लढाया केल्या. या राजानें सिर्पूल याच्या आसमंतांत असलेल्या एका प्रदेशाभोंवतीं एक भिंत बांधिली आणि सरहद्दीच्या उपयोगाकरितां नवीन कालवे खणले. हा मोठा शहाणा, कार्यकर्ता व शूर योद्धा होता. य सर्वांची माहिती सांप्रत लुव्र येथें असलेल्या व्हल्चर्सस्टीलवरून व दुसऱ्या अनेक प्राचीन लेखांवरून कळते. त्याच्यामागून त्याचा भाऊ पहिला एन् अनटुम हा गादीवर बसला, त्या वेळीं गिशबनच्या पटेसीकडून सिर्पुलेवर स्वारी होते. ख्रि. पू. ४१२०–पहिला एन् अनटुम याचा मुलगा एन् टेमेना यानें गिशबनच्या पटेसीचा पराजय करून धूळधाण केली. या हकीकतीचें स्मारक एंटेमेना याचा कोन आणि सिंगूर येथील नीनादेवाच्या यज्ञकुंडावर ठेवलेलें चांदीचें चबूच्या आकाराचें सुरेख भांडें हें होय. ख्रि. पू. ४१००–यानंतरचा दुसरा एन् अनटुम हा उर्नीनच्या घराण्यांतील शेवटचा पटेसी होय. कारण त्याचा मुलगा लेमेंडु याला कांहींच उपपद आढळून येत नाहीं. याच्या कारकीर्दीत गिशबनचा लुगलजगिमी यास सिर्पुलेवर जय प्राप्त झाला. ख्रि. पू. ४१००—३८०० या काळांतील सिर्पुलेचे पटेसी याजवर लुगलजगिमी व त्याचे वंशज यांचा अम्मल चालू झाला. ख्रि. पू. ३८००—३१००—बाबिलोनच इतिहासांतील हें अत्यंत अज्ञात युग होय. लुगलउशुगल हा पटेसी असून पहिल्या सार्गन राजाचा मांडलिक होता. बहुत करून सिर्पुलेच्या राज्यावर ऊर येथील दुसऱ्या राजघराण्याचा अम्मल सुरू होइपर्यंत अगडेचे राजे सिर्पुलेवर सत्ता चालवीत असावेत. ह्या वेळच्या मांडलिक राजांपैकीं हुबां (३१००) व गुडिया (३२००) हे दोन पटेसी अत्यंत महत्त्वाचे होत. यांपैकीं हुबांची कारकीर्द शांततेची झाली. परंतु गुडिया हा योद्धा असून त्यानें एलामपासून अनूशनचा प्रांत हिसकावून घेतला. आणि सिंगूर येथें नीनादेवीकरितां एक देवालय बांधिलें. या हकीकतीचे पुष्कळ शिलालेख उपलब्ध आहेत. सिर्पुलेची संस्कृति उच्च दर्जाची असून तींमध्यें सेमेटिक स्वरूपाच्या गोष्टी बिलकुल नव्हत्या.

**ऊर्वेचें राज्य.—पहिलें घराणें.**—या घराण्यांतील पहिला राजा, गिशबनचा लुगलजागसी यानें इराक जिंकल्यानंतर होऊन गेलेला दिसतो. ख्रि. पू. ३९००–लुगल किगुब नीडुडु लुगल–क्सिला हा याचा मुलगा होय. या राजाच्या सत्तेखालीं ऊर, इराक आणि निप्पुर येथील राज्यें होतीं, आणि त्यांनीं सिर्पुलेच्या सत्तेहि काबीज केली असावी. या घराण्यांतील इतर राजांचीं नांवें आणि कृत्यें याविषयीं पूर्ण अज्ञान आहे. परंतु अगडेच्या सत्तेपुढें हें घराणें नामशेष झालें असावें. या दोन राजांचे कांहीं शिलालेख उपलब्ध आहेत.

**गुति आणि लुलबी या ठिकाणचीं राज्यें.**—गुतीचा राजा लॅसिरब आणि लुलबाचा अनुबनिर्प या दोघांबद्दल माहिती देणारे कांहीं शिलालेख आहेत, त्यांवरून हे राजे ख्रिस्तपूर्व ३८०० च्या सुमारास होऊन गेलेल्या पहिल्या सार्गन राजाशीं समकालीन असावेत.

**अगडेचें राज्य.**—ख्रि. पू. ३८०० या ठिकाणचें ज्ञात असलेलें अत्यंत प्राचीन घराणें सेमेटिक असून या घराण्यांतील पहिल्या राजाचें नांव शर्गणी शरअली किंवा पहिला सार्गन हें होय. हा इटिबेलचा मुलगा असून त्यानें आपल्या कर्तबगारीनें इलामपासून भूमध्यसमुद्रापर्यंत आणि बाबिलोनच्या अगदीं दक्षिण टोंकापासून आपिरक आणि गुति या ठिकाणापर्यंत एक साम्राज्य स्थापिलें. ही हकीकत दर्शविणारी जुनीं खोदकामें व बरेचसे अभिलेख उपलब्ध आहेत.

ख्रि. पू. ३७५०—सार्गननंतर त्याचा मुलगा नरमासिन हा गादीवर [illegible]. हा अत्यंत शूर असून बांधकामाचाहि शोकी होता [illegible] जगाच्या चारी दिशांचा अधि-

पति ही संज्ञा धारण केली, व आपिरक आणि मग या राज्यावर त्यानें स्वारी केली त्यानें निप्पुर आणि अगडे येथील देवालयें बांधिलीं सिप्पुर येथील शामशच्या एबर देवालयामध्यें नवोनिडस यास नरमसिनच्या नावाचें लिहिलेला असलेला एक शिलालेख सांपडला आहे त्यावरून त्या राजाच्या कारकीर्दीचा काल निश्चित करण्यास मदत झाली आहे पहिला सार्गन आणि नरमसिन यांच्या कारकीर्दीत राज्यव्यवस्था व सुधारणा उत्तम दर्जाचा दिसून येते त्यावेळीं न्यायाधीश, गवई, वैद्य, व उत्तम रस्ते असत त्याचें आटळतें थरोडाजन हा एके ठिकाणीं असें म्हणतो कीं " सार्गन आणि नरमसिन यांच्या कारकीर्दी म्हणजे प्राचीन पौरस्त्य इतिहासांतील सुधारणेचा अत्यंत कळस होय " पुष्कळ शिलालेखावरून वरील माहिती आढळून येते खि पू ३७०० त नरमसिनचा मुलगा बिंगनी शरअली राजा होता अगडेच्या राज्याचा पुढील इतिहास अद्याप उपलब्ध नाहीं बहुतेक मागाहूनच्या राजानीं ऊर येथील दुसऱ्या घराण्याच्या जोरदार सत्तेपुढें आपली सत्ता नामशेष करून घेतली असावी या ठिकाणीं बाबिलोनच्या इतिहासांतील पहिल्या कालविभागाची समाप्ति होते व कालांतरानें सर्व प्रदेश सेमाइट लोकांच्या ताब्यात आलेला दिसतो यावेळीं अगडे येथें राजसत्तेचे मुख्य स्थान दिसत असून सिपुल येथील राजास पटेसीचा दर्जा प्राप्त झालेला दिसतो

**ऊरचें दुसरें राजघराणें**—हे राजे स्वतःस ऊर खेरीज सुमेर आणि अक्कड यांचे अधिपती म्हणवितात आणि अशा रीतीनें उत्तर आणि दक्षिण या दोन्ही प्रांतांतील परस्परविरोधी लोकास एका सत्तेखालीं एकत्रित करण्यात आलें खि पू ३२०० त उरगुर हा सेमाइट आणि सुमेरियन ( अगडे आणि सिर्पुर्ल ) या दोघांवर अमल चालवीत असे त्याची राजधानी ऊर येथें असून त्यास देवालयें बांधण्याचा फार शोक होता त्यानें ऊर येथें नन्नर देवतेकरिता नमिला देवालय, इरेक येथें इस्टार देवीकरिता एअन देवालय आणि लार्सा येथें शामस देवतेकरिता एबर देवालय अशीं देवालयें बांधलीं ही सर्व माहिती निप्पुर येथील पिरॅमिडच्या आकाराचा मनोरा आणि इतर प्राचीन लेख यावरून कळते खि पू ३१५० त पहिला डुंगी हा राज्यावर येतो व आपल्या बापाचें धोरण पुढें चालवितो यानें सुगीर, निप्पुर आणि कूथ या ठिकाणीं निनमर, निना, निगिरसु, हम्गल नुस्त्र आणि शआ या देवांचीं देवालयें बांधिलीं वरील दोन्ही राजापासून पुढें बराच कालपर्यंत वंशावळ चालू असावी परंतु ही सर्व माहिती अज्ञात स्थितींत आहे

**इरेकचें राज्य.**—खि पू ३१००—३००० या कालांतील शुद्ध सेमेटिक नावाचे दोन राजे माहीत आहेत यांपैकीं सिंगासिड हा या घराण्याचा बहुतेक संस्थापक असावा, आणि दुसरा सिनगमिल हा होय. या राज्याचा इतिहास म्हणजे ही दक्षिण बाबिलोन मधील एक जोरदार सेमेटिक वसाहत असून तीन पुढें हळूहळू स्वतंत्र होऊन सरतेशेवटीं इरेक ही राजधानी असलेलें हें एक निराळेंच राज्य बनलें याच्या इतिहासाचा भाग सिंगाशिद राजानंतर आढळून येत नाहीं ही माहिती राजवाडा, देवालय व गुन्ना देवाच्या जीर्णोद्धार या संबंधाच्या प्राचीन लेखावरून कळून येते

**इसिनचें राज्य**—इरेकच्या राज्याप्रमाणें या सेमेटिक राज्याची स्थापना उत्तरेकडे इसिन या ठिकाणीं झाली या ठिकाणच्या राजाना निप्पुर ऊर, एरडु आणि इरेक या ठिकाणीं तथील राजघराणीं नष्ट करून आपला अमल बसविला उत्तरकालीन राजे इसिन खेरीज सुमेर आणि अक्कड या ठिकाणचे अधिपती असल्याबद्दल स्वतःस म्हणवून घेतात त्यावरून यावेळीं ऊरच्या दुसऱ्या घराण्याचें अस्तित्व दिसून येत नाहीं खि पू ३००० चे लिबिट इस्टार या संबंधीं पुष्कळ स्मारकावशेष आणि शिलालेख उपलब्ध आहेत याखेरीज इश्चिगर पहिला उसिन, उर्निनिब, व इडिन डगन हे दुसरे राजे होत खि पू २८५० तला इस्मेडगन हा सुमेर व अक्कड येथील अधिपती म्हणवून घेणारा शेवटचा राजा होय त्याचा मुलगा एन आटुम हा ऊरच्या तिसऱ्या राजघराण्याचा मांडलिक असलेला दिसून येतो याच्या वेळचीच थोडे शिलालेख उपलब्ध आहेत.

**ऊरचें तिसरें राजघराणें**—या घराण्यातील प्राचीन राजे आपणास स्वतः ऊरचे राजे म्हणवून घेतात खि पू २८०० त गुंगुनू हा इसिनच्या राजघराण्याचा शेवट लावतो याच्या मागाहून दुसरा उर्गुर व दुसरा डुंगी हे राज्यावर येतात या दोघांनीं पुष्कळ देवालयें बांधिलीं आणि दुसरा उर्गुर यानें आपल्या राजधानीभोंवती एक मोठा तट बांधिला यावरून याला शत्रूकडून बराच त्रास झाला असावा असें दिसतें उपलब्ध असलेल्या पुराव्यावरून सिर्पुर्लच्या पटेसींचें अस्तित्व यावेळींहि सिद्ध होतें ही माहिती देवालयांतील कित्येक शिलालेखांवरून कळते खि पू २७०० तील तिसरा डुंगी या राजापासून पुढचे सर्व राजे आपणास जगाच्या चारी दिशांचे अधिपती म्हणवितात आणि या कारणामुळें कांहीं विद्वान याच राजाला चौथ्या राजघराण्यातील पहिला राजा समजतात याच्या मागून दुसरा बुसिन, गमिलसिन आणि इनेसिन हे राजे झाले व यांपैकीं इनेसिन हा २५८० च्या सुमारास राज्य करीत होता. याखेरीज दुसऱ्या राजाची माहिती उपलब्ध नाहीं. खि पू २४००—२४०० या सुमारास उत्तरेकडील बाबिलोन मधील पहिल्या राजघराण्याच्या वाढत्या सत्तेमुळें आणि दक्षिणेस लार्सा येथील कूरमदाद याच्या वाढत्या सत्तेमुळें ऊर घराण्याची सार्वभौम सत्ता कमी झालेली दिसते ही सर्व माहिती इमारती संबंधीच्या प्राचीन कागदपत्रावरून कळून येते.

**लार्साचें राज्य**—ख्रि पू २४०० या सुमारास दक्षिण बाबिलोन प्रांतानें ऊरच्या राजाविरुद्ध उभारलेल्या बंडांत विजय मिळविला, आणि नूरअदाद यानें लार्साच्या राज्याची स्थापना केली ख्रि पू २३७०मध्यें नूरअदादच्या मागाहून सिनइदिं हा गादीवर आला. आणि त्यानें आपला सत्ता सुमेर आणि अक्कड या प्रांतावर वाढविली ख्रि पू २३५०मध्यें कुडूरननरवुडी या नावाचा एलामचा राजा दक्षिण बाबिलोन प्रांतावर स्वारी करितो याच्या मागाहून कुडूरलागमर या राजाच्या कारकीर्दीत एलमाइट लोक लार्सा येथें रिन् शिन् ( एरिअकु ) याच्या नेतृत्वाखालीं स्वतंत्र राज्याची स्थापना करितात रिनशिन् हा सिनिद्दिनच्या पदव्या आपणा स्वतःकडे लावून घेतो यामुळें सिनिद्दिन हा बाबिलोनचा राजा खमुरबा याच्याकडे मदत मागतो आणि खमुरबी हा रिनुशिन् याचा पाडाव करितो

**बाबिलोनचें राज्य**—पहिला राजवंश ख्रि पू. २४५०—२१५०—सुमर आणि अक्कड यांच्या काळांत बाबिलोनचा उल्लेखहि आटळून येत नाहीं परंतु अवांतर पुराव्यावरून इसिनच्या वर्चस्वकाळीं ( ३०००—२८५० ) बाबिलोनच्या सत्तेचा थोडथोडा विकास झाला असावा. ख्रि पू, २४५० त सुमुअबी हा बाबिलोनमधील ऊर घराण्याचा निःपात करितो, परंतु ही बंडाळी ऊर शहराबाहेर पसरत नाहीं ख्रि पू २४४० त सुमुलइलू यानें बाबिलोनमध्यें महा मजबूत किल्ले बांधिले ख्रि पू २४०५त जबू यानें सिप्पर येथें एबर देवालय बांधिलें यावेळीं बाबिलोन हें राज्यक्रांतीच्या स्थितींत असलेलें दिसतें कारण यावेळीं इम्मेरु या नावाच्या एका तोतयाचा उल्लेख केलेला आढळतो ख्रि पू २२९०मध्यें आपिलसिन व २३७०मध्यें सिनमुबालित या कारकीर्दीची फक्त स्मारकें उपलब्ध झालीं आहेत ख्रि पू २३४२त हमुरबि (खमुरबी) हा बायबलमध्यें उल्लेखिलेला अम्रफेल नावाचा अब्राहामचा समकालीन राजा असावा यानें सबंध बाबिलोनप्रांत एका सत्तेखालीं आणिला ख्रि पू २३१२ त सिनइद्दिनच्या विनंतीवरून त्यानें रिनुशिनूच्या आधिपत्याखालीं असलेल्या एलमाइट लोकांस लार्साबाहेर हांकलून लाविलें आणि दक्षिण बाबिलोन आपल्या प्रांतांत सामील करून त्यानें स्वतःस ऊर, इसिन आणि लार्सा या प्रांताचा राजा म्हणविलें आपल्या नव्या राज्याची भरभराट व्हावी म्हणून पाणीपुरवठ्याकरितां कालवे खणिले, आणि बाबिलोनमध्यें गव्हाकरितां एक मोठें कोठार बांधून बार्सिप्पा येथील एझिडा आणि एसगिला यांचीं देवालयें वाढविलीं ही माहिती करून देणारे बरेच कागदपत्र आणि शिलालेख उपलब्ध झाले आहेत ख्रि पू २१८७–२१५० या कालांत या घराण्यांतील राजांनीं पूर्ण शांतता उपभोगिली या काळांतील उपलब्ध झालेल्या थोडक्याच अवशेषावरून त्या काळांतील भरभराट व श्रेष्ठ दर्जाची सुधारणा याविषयीं खात्री होते

**दुसरा राजवंश**—ख्रि पू २१५१—१७८३. हा ऊरअझकचा राजवंश म्हणतात. या ३६८ वर्षांच्या मुदतीमध्यें सुमेरियन वंशांतील अकरा राजांनीं राज्य केलें या राजांविषयीं फार थोडा माहिती उपलब्ध आहे कारण या राजघराण्याचीं स्मारकें सांपडलीं नाहींत

**तिसरा राजवंश.**— ख्रि पू. १७८३–१२०७–१७८३ त कोसियन किंवा कसाइट या नावाचे लोक एलाम पर्वतांतून येऊन त्यांनीं गॅंडिश किंवा गॅंडॅश या नावाचा पहिला राजा असलेल्या राजवंशाची स्थापना केली या लोकांनीं टोळ्याटोळ्यांनीं सबंध देशभर फिरून बाबिलोन प्रांत मिळविला,आणि राजसत्ता संपादन केली व बाबिलोनमधील उच्च संस्कृति व सुधारणा आत्मसात केली ख्रि पू १७००तील अगुम् काइम् हा या घराण्यातील ज्याविषयीं बारीकसारीक गोष्टी माहीत आहेत असा पहिला राजा होय खमुरबापेक्षा याचें राज्य मोठें होतें पेडनप्रांत हा त्याच्या वर्चस्वाखालीं होता. पूर्वी ने काहीं देवतांचे पुतळे दुसरीकडे नेण्यांत आले होते ते या राजाच्या कारकीर्दीत परत आणण्यात आले ख्रि पू १४५०त काराइंडश या राजाच्या कारकीर्दींत बाबिलोन व असुरिया या दोन राज्यांचा एकमेकांशीं प्रथमच संबंध आलेला दिसून येतो, तो म्हणजे काराइंडश यानें सरहद्दीबद्दल असुरियाचा राजा अशुर बेलनिशयेशु याच्याशीं केलेला तह हा होय या कारकीर्दींत एअनाची देवता नेना इजच्रीलर्थ एक देवालय बांधण्यांत आलें ख्रि पू १४३० त कदशमन्बेल हा राजा इजिप्तचा तिसरा ॲमेनहोटेप याच्याशीं समकालीन होता असें टेलएल अमर्ना येथें सांपडलेल्या कागदपत्रावरून कळतं ख्रि पू १४२०तील पहिला बूर्नबूरियश हा असुरीयाचा राजा बुझुर अशुर याचा समकालीन असून याजबरोबर बूर्नबूरियास यास सामानिर्णय करतांना बऱ्याच अडचणी आल्या असाव्या असें दिसतें यानें लार्सा येथें सूर्य देवतेकरितां एक देवालय बांधिलें आहे. ख्रि पू १४१० त पहिला कुरिगल्झू याच्या नांवावरूनच डूरकूरिगल्झू हें त्यानें जीर्णोद्धार केलेल्या एका शहरास नांव देण्यांत आलें असें अमर्ना कागदपत्रावरून दिसतें ख्रि पू १४००तील दुसरा बूर्नबूरियश याची कारकीर्द बरीच मोठी आणि भरभराटीची झाली असें अमर्ना कागदपत्रावरून दिसतें. ख्रि पू १३७० त करखरदस यानें असुरियाचा राजा अशुरउबलित याच्या मुलीबरोबर विवाह केला याचा मुलगा पहिला कदशमनखर्बे यानें सुतु प्रदेशावर स्वारी करून तो प्रदेश जिंकला आणि त्यामध्यें आपल्या प्रजेपैकीं काहीं लोकांस वसाहत करण्यास परवानगी दिली ख्रि पू १३६० या सुमारास कसाइट लोकांनीं बंड केलें या लोकांना असुरियन लोकांचें वाढतें वजन सहन न होऊन त्यांनीं राजास ठार मारिलें व नझीबुगश या नावाच्या मनुष्यास राजा केलं परंतु असुरियाचा राजा अशुर ऊबलित यानें त्याचा पाडाव करून त्यास ठार मारिलें ख्रि पू १३५० त दुसरा कुरिगल्झू यास असुरियन राजानें राज्यावर

बसविलें. कुरगल्झू यानें एलामवर स्वारी करून सूसा हें शहर जिंकिलें. यानें असुरियाचा राजा बेलनिरारी याज-बरोबर युद्ध केलें. खि. पू. १३४०-१२८६ या काळात नाझिमरतश ( १३४० ), कदशमन तुरु, कदशमनबुरिया ( १३३० ), कुदुरबेल ( १३०४-१२९६ ) शगरा्किबुरियश ( १२९८-१२८६ ) या राजाच्या कारकीर्दीत बाबिलोन आणि असुरिया या दोन प्रातांमध्यें युद्धें सुरू होतीं. खि. पू. १२८२-१२७५असुरियाचा राजा पहिला टुकुलटी निनिब यानें बाबिलोन प्रातावर स्वारी करून शहरात प्रवेश केला आणि तेथील देवालयाचा खजिना लुटून मारडुक नावाच्या देवास असुरिया देशात नेलें. ही स्वारी बहुतेक बिबइशू याच्या कारकीर्दीत झाली असावी आणि बिबइशूच्या मागाहूनचे राजे बेलशुमइद्दीन, दुसरा खदशमन खर्वे आणि अद्दशुम-इदिन हे टुकुलटनिनिब याचे बहुतेक मांडलिक असावेत व सात वर्षेपर्यंत बाबिलोनचा खरा राजा टुकुलटुनिनिब हाच असावा. खि. पू. १२७० त बाबिलोनमधील लोक बंड करून असुरियन लोकांस बाबिलोन प्रातावाहेर काढतात. खि पू. १२६९ साली हे लोक आददशुम उसुर याला आपला राजा करितात आणि बाबिलोनी सत्तेचें पुनरुज्जीवन होतें. या सुमारास बाबिलोनी लोकांची असुरियावर स्वारी होऊन असुरियाचा राजा बेलकुडरडसुर हा मारला गेला आणि असुरियन प्राताचा कांहीं भाग बाबिलोनमध्यें सामील होतो. खि पू. १२३८-१२२४ मध्यें मेलिसिपक हा निनिबअपलेशर या असुरियन राजावर जय मिळवितो. खि.पू.१२२३-१२११दरम्यान मार-डुक अपल इदिन याच्या नेतृत्वाखालीं बाबिलोन प्रांताचा त्या सबंध खोऱ्यांत विस्तार होतो. खि. पू. १२१० तील या घरा-ण्यातील शेवटचे दोन राजे झगमगुम इदिन आणि बेलशुम-इदिन हे होत. खि. पू. १२०९ त बाबिलोन प्रातावर अशु-रदेन या असुरियन राजाची स्वारी होण्याचा पुष्कळ रंग दिसून येतो. खि. पू. १२०७ त सेमेटिक राज्यक्रांतीचा परि-णाम असा होतो कीं, या घराण्याची समाप्ति होते.

**चौथा राजवंश.**—खि. पू. १२०७ ते १०७५ या कालांतील इसिन घराण्याची उत्पत्ति संशयित आहे. या वंशांत एकंदर अकरा राजे होऊन गेले परंतु त्यांपकी चारपांच राजा. बद्दल पूर्ण अज्ञान आहे. खि. पू. ११३१ त पहिला नेबु काड-रेझर हा पूर्वीप्रमाणें असुरियावर हल्ला करितो, परंतु त्याचा पराभव होतो. एलाम आणि लुलुबी या लोकावर केलेल्या स्वाऱ्यामध्यें त्यास जय मिळतो आणि सिरिया प्रान्तामध्यें त्याचा प्रवेश होतो ही माहिती रिट्टीमारडुक येथील रिटिमार्डुक या देवतेस केलेल्या भूमिदानासंबंधीं दिलालेखा-वरून कळून येईल. खि. पू. १११० त मार्डुक-नदिन-अरवे याच्या कारकीर्दीत असुरियाचा राजा पहिला तिग्लथपिले-सर हा बाबिलोन प्रातावर स्वारी करतो, आणि मुख्य शहर ताब्यांत घेतो. खि पू. १०८३ त मार्डुक शपिक झेरम्ती याच्या मृत्यूनंतर आददआपलइदिन नांवाचा एक पुरुष सिंहासन बळकावितो. खि. पू. १०७८ नवुशुम याच्या मृत्यूमुळें वरील राजवंशाची समाप्ति होते.

**पांचवा ते आठवा राजवंश.**—खि. पू. १०७५-७२८.—या कालात थोडयांच्या कालापर्यंत राज्य करणाऱ्या राजघराण्याची मालिका असुरियाच्या वाढत्या सत्तेबरोबर झगडताना दृष्टीस पडते. खि. पू १०७५च्या सुमारास इराणी आखातावर तैग्रिस आणि युफ्राटिस याच्या अनेक शाखामध्यें असलेल्या सखल प्रदेशानें राजघराणें सत्ता चालवीत असून या घराण्यानें बाबिलोनच्या इतिहासावर बराच परिणाम घडवून आणला आहे. या घराण्यामध्यें सिंबरसिपक, एआ मुकिंझर व कशुनदिनअखे या तीन राजानी सुमारें २१ वर्षे-पर्यंत राज्य केलें. यापैकीं पहिल्या राजाच्या कारकीर्दीत एलामाइट लोकानीं सिप्पुर लुटलें व पुष्कळ नासधूस केली. या तिन्ही राजानीं सिप्पुर येथील सूर्याच्या देवालयाचा जार्णोद्धार केला होता. खि. पू. १०५३-१०३३ याकालात विटवसाचा राजवश अंमल चालवू लागला. या वंशातहि युल्बर-शकिनशुम, निनिब कुदुरउसुर, आणि सिलनिम शुकमुन या नावाचे तीन राजे होऊन गेले, व त्यानंतर एलामच्या राजवंशातील एकाच अप्रसिद्ध राजानें राज्य केलें. खि. पू.१०२७आठवा राजवंश बाबिलोनियन वंशातील ओम कमी झाल्यामुळें या वंशाचा कसाई व इतर परकीय लोकाशीं संकर झाला.खि. पू.७४० त नेबुनसिर (नवोनझर) हा आठव्या राजवंशातील राजा सिंहासनावर येतो. हा वाळ्यात्मक चळवळींचा काल होता खि. पू ७३२ त नेबुका-डनेझर हा राजा नेब्युशुमउकिन याजकडून मारला गेला. खि. पू. ७३१त किंझर हा नेब्युशुमउकिन यास पुन्हां सिंहा-सनावर बसवितो. असुरियाचा राजा तिसरा तिग्लथ पिलेसर हा बाबिलोन प्रातावर स्वारी करितो आणि बाबिलोनमधील दैवत राजाची सत्ता नामशेष करण्याचा निश्चय करितो. खि.पू. ७२८ त प्राचीन बाबिलोनी साम्राज्याची समाप्ति होऊन तिग्लथ पिलेसर हा बाबिलोन प्राताचा राजा होतो.

**असुरियन साम्राज्य प्रथमकाल.**-खि. पू. १८३० ते ११२०.—असुरिया प्रात प्रथम बाबिलोनी लोकाकडूनच वस-विला गेला. या वसाहतीचा काल जरी अनिश्चित असला तरी खि पू.३०००च्या सुमारास निनेव्हे हें अस्तित्वात होतें. या प्रातातील अगदीं प्रथमचे राजे तेथील मुख्य उपाध्याय असून ते बाबिलोन प्राताच्या राजाचे मांडलिक असत. खि. पू. १८३०-१८१० मध्यें पहिले ज्ञात असलेले राजे ( इशके ) इस्मेडगन आणि त्याचा पुत्र पहिला शमशिअदद हे होत. यानें असुर नगरामध्यें अनु आणि अदद या देवताकरिता एक मोठें देवा-लय बांधिलें. खि. पू. १८००-१७०० या वेळच्या इगुर-कपक्कू (दुसरा शमसी अदद) या राजाबद्दल फारशी माहिती नाहीं व सल्ल आणि इरीशुम याचा काल हि निश्चित नाहीं. खि.पू १७००त बेलकपकपू यानेंच प्रथम स्वतंत्र राजा म्हणवून घेतलें. आणि यावरून राजसत्तेची खरी संस्थापना यानेंच

केली असावा असा समज आहे आणि एसरहडन हा ज्या पुरुषाचा वंशज असल्याबद्दल मानतो तो बेलबनी नांवाचा राजा हाच असावा. ख्रि. पू. १७००-१४५० या असुरियन इतिहासातील कालाची माहिती अगदीं अज्ञात आहे. १५२५ च्या सुमारास नेमिहान्या युद्धानंतर असुरियाच्या राजानें तिगऱ्या टेहुटहम्मला नजराणा पाठविल्याची गोष्ट मात्र आपणास माहीत झाली आहे. ख्रि. पू. १४५० च्या सुमारास बाबिलोन प्रांतापासून असुरियानें स्वातंत्र्य कबूल करण्यात आलें असुरियाचा राजा असुरबलनिशेशु यानें बाबिलोनियाचा राजा काराइंडश याजबरोबर राज्यांच्या सीमेबद्दल तह केला. ख्रि. पू. १४२० त बुझुरअसुर यानेंहि व बिलोनी लोकांबरोबर राज्यमर्यादेबद्दल तह झाले. ख्रि. पू. १४०० मधील दुसरा असुरनदिन अखेर हा इजिप्तचा राजा चौथा अमेनहोटेप याशीं समकालीन असून त्यानें असुर येथें एक राजवाडा बांधिला आहे किंवा दुरुस्त केला आहे. अमर्ना कागदपत्रावरून ही हकीकत कळते. ख्रि. पू. १३८० या वेळीं असुरउबलित या असुरियन राजाच्या मुबालितत शेरूआ नामक कन्येचा विवाह बाबिलोनचा राजा करहर्दस याजबरोबर करण्यात आला. करहर्दसचा मुलगा पहिला कदशमनखर्बे मारला गेल्यामुळें असुरियन राजास बाबिलोनीं गोष्टीत ढवळाढवळ करण्याचा मार्ग सापडला आणि असुरउबलित याचा नातु कुरिगल्झु नामक राज्यावर बसविण्यात आले. अशा रीतीनें बाबिलोन प्रांतावर असुरियाचें थोडेबहुत वर्चस्व होऊं लागलें. या सुमारास असुर उबलित यानें सुबरीवर स्वाऱ्या केल्या. ख्रि. पू. १३६० त असुरउबलितचा मुलगा बेलनिरारी यानें एल गाइड टेक्स्टच्या राहिवाशांस जिंकिलें व यामुळें दुसरा कुरिगल्झू आणि बेलनिरारी या दोघामध्यें लढाई होऊन बलनिरारी यास जय मिळाला आणि दोन्ही राज्यांतील सीमारेषाची नवीन व्यवस्था करण्यांत आली. ख्रि.पू. १३५० त त्याचा मुलगा पुडुइलु हा शूर योद्धा असून त्यानें आपल्या राज्याचा बराच विस्तार केला वगैरे माहिती कांहीं थोड्या शिलालेखावरून कळते. त्याचा मुलगा पहिला अददनिरारी यानें शेजारचे देश जिंकण्याचें धोरण पुढें चालविलें व हस्तगत केलेल्या शहरांची डागडुजी करून आपल्या राज्यास बरीच मजबुती आणिली याच्या नांवाची एक तलवार व एक प्राचीन लेख उपलब्ध आहे. ख्रि. पू. १३३० त याचा मुलगा पहिला शाल्मनसर यानें उत्तरेकडील लाबऱ्या प्रदेशांतून येणाऱ्या रानटी लोकांकडून त्रास न व्हावा म्हणून युफ्रेटिस आणि टैग्रिस या दोन नद्यांमध्यें वसाहतींची स्थापना केली. यानें उत्तरसीरियातील मुस्री नामक प्रदेश आपल्या ताब्याखालीं आणिला आणि असुरियन लोकांनीं प्रथमच याच्या कारकीर्दींत युफ्रेटिस नदी ओलांडिली व अशा रीतीनें वाढणाऱ्या असुरियन सत्तेस बालिकपर्यंत किंवा युफ्रेटिस पलीकडे पसरण्यास वाव मिळाला आणि कॅला येथें नवीन राजधानी स्थापण्यात आली. यावेळचे दोन विटांवरील लेख उपलब्ध झाले आहेत. ख्रि. पू. १२९० त याचा मुलगा पहिला तुकुलटिनिनिब याच्या कारकीर्दींत असुरिया आणि बाबिलोन या प्रांतांत पुन्हा यादवी सुरू झाली.

**द्वितीयकाल.** ख्रि.पू. ११२० ८८५.—११२० त पहिला तिग्लथ पिलेसर या थोर पुरुषानें असुरियन साम्राज्याची पुनश्च स्थापना केली. त्यानें एकदर जिंकलेल्या प्रदेशांविषयीं स्वत च मोठ्या अभिमानाचे उद्गार काढिले आहेत. युद्धांतील त्यानें शौर्य व शांततेच्या काळांतील त्याची सुव्यवस्थित राज्यपद्धति यामुळें त्याची योग्यता फार मोठी समजली जाते. याच्या कारकीर्दींत असुरियाची राजधानी कॅला येथून पूर्ववत असुर येथें आणण्यात आली, आणि एस्टार, अदद आणि बल या देवतांचीं देवालयें व कित्येक राजवाडे पुन्हा बांधण्यात आले. याच्या कारकीर्दीसंबंधीं हकीकत कॅला येथील अष्टकोनी शिलालेखावरून कळून येते. ख्रि. पू. १०९० त तिग्लथ पिलेसरच्या मागाहून असुरबेलकल आणि तिसरा शमसिअदद या दोन मुलांनीं बापाचे व्यवस्थेप्रमाणें राज्य चालविलें परंतु यांच्या अमदानींत साम्राज्यसत्तेस आणि वैभवास थोडी उतरती कळा लागलेली दिसते. असुरबेलकल यानें बाबिलोनचा राजा मार्डुक शपिकझर्मटी या राजाबरोबर शांतता पाळण्याबद्दल तह केला. पहिला शमसिअदद यानें निनव्हे येथील इस्टार देवतेचें देवालय पुन्हा बांधिलें एवढीच गोष्ट त्याजबद्दल माहीत झाली आहे. ख्रि. पू. १०१०-९५० या स्तिमित युगामध्यें असुरियाचें वैभव कमी कमी झालेलें दिसतें या कालांत दुसरा असुरनझिरपाल, पूर्वअदद, असुरनदिनअखे आणि असुरएरबा या राजांनीं राज्य केलें. यापैकीं शेवटच्या राजानें बरेच प्रांत अरेमियन लोकांस सोडून दिला परंतु त्यानें फिनिशिया प्रांतावर स्वारी केल्याचें दिसून येतें. ख्रि. पू. ९५० यावेळच्या दुसऱ्या तिग्लथ पिलेसरनें स्वत स किस्साटी आणि अदसूर याचा राजा म्हणवून घेतलें. ख्रि. पू. ९३० त याचा मुलगा दुसरा असुर्डन यानें राज्य केलें. ख्रि. पू. ९११ त दुसरा अददनिरारी याच्या कारकीर्दींत बाबिलोन प्रांताशीं पुन्हा यादवी सुरू झाली. यानें बाबिलोनचा राजा शमस मुदमिक याचा व त्याच्या मागाहूनचा राजा नबुबशुमइष्कुन या दोघांचा पराभव केला. शेवटीं असुरियन शहरें बाबिलोन प्रांतास देण्यात येऊन दोन्ही राष्ट्रांमध्यें शांततेचा तह घडवून आणण्यात आला. ख्रि. पू. ८९० त दुसरा तुकुलटिनिनिब याच्या कारकीर्दींत बरेंचसे शांततेत चालला आणि त्यामुळें बाबिलोनचा त्रास कमी झाला. असुरियानें उत्तर आणि पश्चिमेकडे स्वारी दिग्विजयास आरंभ केला आणि आर्मेनिया वगैरे प्रदेशांत या राजानें लुटालूट केली.

**तृतीयकाल.** ख्रि. पू. ८८५—७२२.—८८५ त तिसरा असुरनझिरपाल यानें एकदम परकीय प्रांतावर स्वाऱ्या करण्यास

सुरुवात करून दहा वर्षांच्या अवधींत पहिल्या तिग्लथ पिलेसर राजाचें उत्तर, पूर्व आणि पश्चिम दिशेस जिंकलेलें साम्राज्य पुन्हां परत मिळविलें हे देश जिंकतेवेळीं त्यास पुष्कळ निर्दयपणाच्या गोष्टी व रानटी लोकांस शोभण्यासारखी जाळपोळ करावी लागून या जिंकलेल्या प्रांतांवर त्यानें जबरदस्त खंडणी बसविली. ख्रि. पू. ८७६ या सुमारास अशुरनासिरपाल यानें पश्चिमेकडे मोठी स्वारी आरंभिली व याच्या आगमनाची वार्ता कळताच कर्केमिश पासून टायर शहरापर्यंत सर्व नगरांनीं नजराणे व खंडणी अगदीं ठरविण्यास सुरुवात केली. या स्वारीच्या शेवटीं निनेव्हे येथील इश्टार देवतेच्या देवालयाकरिता इमारतीचें लाकूड जमा करण्यात आलें. ख्रि. पू ८६७ या सालीं कुमुक, कुर्ख आणि मेसियन पर्वतासभोंवतालचा प्रदेश याजवर निकराची स्वारी करण्यात आली. अशुरनासिरपाल यानें कॅला शहर पुन्हा व धून लोअर झाब नदींतून शहरास पाणीपुरवठा करण्याकरिता एक कालवा तयार केला या कारकीर्दीची सर्व हकीकत निमरुड येथें जमीनींतून उकरलेल्या राजस्थावरून व इतर काहीं प्राचीन लेखावरून उपलब्ध होते. ख्रि. पू. ८६० त दुसरा शाल्मनसर यानें आपल्या बापाची शेजारच्या प्रदेशावर स्वाऱ्या करण्याची परंपरा तशीच पुढें सुरू ठेवली. नैरी या प्रांतावर आणि इतर उत्तरेकडील व पूर्वेकडील प्रदेशावर ८३० सालापर्यंत याच्या स्वाऱ्या सुरू होत्या. ख्रि पू ८५७ मेसापोटेमिया खोऱ्यांतील बिटआडिनी येथील अरेमियन लोक यास जिंकून त्यांस कायमचें असुरियन सत्तेखालीं ओढण्यात आलें ख्रि. पू. ८५४ त शाल्मनसर यानें उत्तर सीरियांतील राजे इस्रायल आणि फिनिशिया या त्रिकूटावर हल्ला करून कॅर्कर या ठिकाणीं त्याचा पराभव करून उत्तर सीरियांतील संस्थानावर त्यानें वार्षिक खंडणी बसविली. ख्रि. पू. ८५२ त बाबिलोनचा राजा मार्दुकनदिनशुम यानें आपला बंडखोर भाऊ मार्दुकबेलउसती याला चिरडून टाकण्याकरिता शाल्मनसरची मदत मागितल्यावरून शाल्मनसरनें बंड मोडून टाकिलें, आणि मार्दुकनदिनशुम हा असुरियाचा मांडलिक होऊन राज्य करूं लागल्यामुळें बाबिलोन प्रांतावर असुरियाचें वर्चस्व सुरू झालें. ख्रि पू.८४९-८३४ तील पश्चिमेकडील स्वाऱ्यांचा परिणाम फक्त पुढील वाट मोकळी करण्याकडे झाला. दमास्कसचा राजा दुसरा बेनहदद आणि त्याचे दोस्त याजवर हल्ला करण्यात आला. आणि जेहु प्रांतानें दमास्कसच्या विरुद्ध याजूस मदत केल्यामुळें असुरियाचें इस्रायल प्रांतावर प्रथम बरेंच वर्चस्व झालें. ख्रि. पू ८२७त शाल्मनसरचा मुलगा अशुर्दैनिनअपलि याच्या बंडाळीमुळें राज्यात दोन तट पडले. ख्रि पू. ८२५ त शाल्मनसर याचा मृत्यु. ही माहिती या राजाच्या युद्धकथा असलेल्या भाजलेल्या मातीच्या तुकड्यावर कोरलेला प्राचीन लेख, त्याचा पुतळा व त्यावरील लेख व बॅलाउट येथील द्वारावरील शिलालेख यावरून कळते. ख्रि. पू. ८२३ त दुसरा शाल्मनसर याच्या दोन्ही मुलांत युद्ध होऊन सरतेशेवटीं चौथा शमसिअदद हा कायदेशीर राजा ठरला. ख्रि. पू. ८२२-८१४ मध्यें उत्तर, पूर्व आणि पश्चिम या दिशाकडील प्रदेशानीं आपलें मांडलिकत्व कबूल करावें म्हणून त्यांजवर स्वाऱ्या करण्यांत आल्या. ख्रि. पू ८१३ खाल्डियाची स्वारी. ख्रि पू. ८१२ त बाबिलोनचा राजा मर्दुकबलतसुइक्बी यानें खंडणी देण्याचें नाकारिल्यावरून त्याजवर स्वारी करण्यात येऊन जय मिळाला. या कारकीर्दीसंबंधीं शिलालेख उपलब्ध आहेत. ख्रि. पू ८११ त तिसरा अदद्निरारी यानें असुरियाचा दरारा पुष्कळ दूरवर पसरविला. आणि पश्चिम दिशेकडे व मीड लोकांवर अनेक स्वाऱ्या केल्या, व जय मिळविले. ख्रि पू. ७९६-७९५ यावेळीं बाबिलोनवर स्वारी करण्यात येऊन तो पूर्णपणें असुरियाचा प्रांत झाला. यावेळीं राजानें बाबिलोनप्रमाणें असुरियामध्यें देवालयें बांधून व असुरियन धर्म-विधीमध्ये बाबिलोनी पद्धतीचा प्रवेश करवून त्यानें दोन्ही प्रांतातील सर्व राष्ट्रीय भेद नाहींसे करण्याचा प्रयत्न केला. ही माहिती कॅला येथील देवालयात सापडलेल्या नेब्यूच्या पुतळ्यावरून आणि इतर शिलालेखावरून मिळते ख्रि पू ७८२ त तिसरा शाल्मनसर याच्या कारकीर्दीत असुरियन सत्तेच्या ऱ्हासास सुरुवात होते. यानें केलेल्या दहा स्वाऱ्यांपैकीं सहा स्वाऱ्या असुरियापासून नैरीप्रांत हिसकावून घेण्याचा प्रयत्न करीत असलेल्या उर्हर्तु प्रांताच्या वाढत्या सत्तेविरुद्ध करण्यात आल्या. ख्रि. पू. ७७१ त तिसरा अशुरडन याच्या कारकीर्दीत असुरियन सत्तेचा ऱ्हास सुरू असून दमास्कस आणि सीरिया प्रांतातील हद्रिक याजवर स्वाऱ्या करण्यात आल्या तसेंच बाबिलोन प्रांतावरहि दोन स्वाऱ्या करण्यात आल्या. ख्रि. पू. ७६३-७५८ मध्यें राज्यातील निरनिराळ्या भागात पुष्कळशी बंडाळी माजली. ख्रि. पू. ७५४ त दुसरा अशुरनिरारी यानें अर्पड आणि नैरी याजवर स्वाऱ्या केल्या, परंतु खंडणी बसविण्याचा काहींच प्रयत्न झाला नाहीं. ख्रि. पू. ७४६ यावर्षी कॅलामध्यें बंड झालें व त्या बंडात अशुरनिरारी व त्याजबरोबर तो सबंध राजवंश नाहींसा झाला.

चतुर्थ काल.—ख्रि पू. ७४५-६०६—ख्रि. पू. ७४५ या सुमारास कॅला येथे उद्भवलेल्या बंडाळींत पुलु नावाच्या एका अज्ञात वंशातील मनुष्यानें राज्य बळकाविलें त्यानें तिसरा तिग्लथ पिलेसर हें नाव धारण करून साम्राज्य वाढविण्यास आरंभ केला आणि प्रथम बाबिलोन प्रांतावर स्वारी केली. बाबिलोन प्रांत दक्षिणेकडे निपुरपर्यंत जिंकला गेला व तेथील राज्यव्यवस्था सुधारण्यात आली. यानें नवीन वसाहती करण्याचें एक निश्चित धोरण ठरविलें आणि त्या ठिकाणीं गुन्हेगार लोकांस पाठविण्यास सुरुवात केली. नंतर त्यानें असुरियाच्या पूर्वेकडील डोंगराळ प्रदेश पादाक्रांत केला आणि आपला सेनापति अशुरदनिनअनि यास मीडिया प्रांतावर पाठविलें, परंतु ख्रि. पू. ७३७ मध्यें दुसरी

स्वारी करूनहि हा प्रांत स्वतंत्रच राहिला. यानंतर उत्तरेकडील उरर्तु येथील अर्गिस्टिस यानें मिळविलेल्या मुलुखावरील राजा दुसरा सर्दूरीस यानें उत्तरेकडील पुष्कळ राजांबरोबर तह केला होता त्याजविरुद्ध युद्ध पुकारिलें व या युद्धांत सर्दुरिस यास हार खावी लागली खि पू ७४२ यानंतर तिग्लथपिलेसरनें अर्पडवर स्वारी केली. यावेळीं शेजारच्या बऱ्याच संस्थानांनीं त्याला नजराणे पाठविले उर्फीच्या राजानें कांहीं कालपर्यंत नेट धरिला परंतु सरतेशेवटीं त्याचाहि मुलूख असुरियामध्यें समाविष्ट करण्यांत आला खि पू ७३९ यामालीं नैरी प्रांताचा कांहीं भाग काबीज करण्यात आला. यानंतर तिग्लथपिलेसर यानें आपल्या विरुद्ध असलेले सीरियन राजांचें मडळ व त्याचा मुख्य पुढारी जूडा येथील ऊझिया याचा बीमोड करण्याचें ठरविलें त्यामुळें इस्रायलच्या मिनहेमनें असुरियाची जबर खडणी भरली. यानंतर तिग्लथपिलेसर यानें जूडा प्रांतावर स्वारी करण्याचें सोडून देऊन त्या मंडळा तील इतर राजास दुर्बल करून त्याजपासून खंडणी मिळविली खि पू ७३५ यावेळीं तिग्लथ पिलेसर यानें उरर्तु प्रांतावर केलेल्या स्वारीचा इतकाच परिणाम झाला कीं, तो देश जरी जिंकला गेला नाहीं तरी त्या देशाचा रग बराच जिरला खि पू ७३४-७३२मध्यें सीरियामधील स्वाऱ्या होऊन दमास्कस काबीज करण्यात आलें. जूडा प्रांतातील अहॅझ यानें मांडलिकत्व कबूल केलें व दुसरे कित्येक देश असुरियामध्यें सामील करण्यात आले. गाझा प्रांतहि सामील करण्यात आला. खि. पू. ७३१-७२९ या सुमारास बाबिलोन मधील अंतस्थ कलह यावविण्याकरिता स्वारी केली आणि तद्देशीय राजास दूर करण्याचा त्यान निश्चय केला यावेळीं उकीझर याला पदच्युत करण्यात येऊन बिटयेकिनचा मेरोडक बालाडन यानें असुरियाचें मांडलिकत्व कबूल केलें. खि पू. ७२८ तिग्लथ पिलेसर बाबिलोन प्रांताचा कायदेशीर राजा समजण्यांत आला या सर्व माहितीचे प्राचीन लेख एसरहडन यानें बरेच छिन्नभिन्न करून टाकलेले उपलब्ध आहेत त्याचप्रमाणे निमरुड येथील शिलालेख व मातीच्या विटावरील लेख सुप्रसिद्ध आहेत खि पू ७२६ त चौथा शाल्मनसर हा गादीवर येतो. खि. पू. ७२५ त इस्रायलचा हुशिया व इजिप्तचा शबाक या दोघांचें संगनमत होऊन ते दोघे खडणी नाकारितात व शाल्मनसर हा सुमेरियाला वेढा देतो

**सार्गोनाइड**—खि. पू. ७२२—६०६—७२२ दुसरा सार्गन नावाचा एक नवीन राजा गादीवर येतो यावर्षी समरियाचा पराभव होऊन तेथील रहिवाशी मेडियन पर्वतामध्यें वाहून लावण्यात आले, आणि त्यांची जागा कूथमधल्या वसाहतवाल्याकडून भरण्यात आली खि पू ७२१ त मेरोडकबलडन यानें बंड केलें आणि स्वतःस बाबिलोनचा राजा झाल्याबद्दल जाहीर केलें सार्गननें त्याच्यावर स्वारी केली परंतु उपयोग झाला नाहीं. हामथ, गाझा आणि समरिया या प्रांतांत बंडें उद्भवलीं. खि. पू. ७२० त या संयुक्त बंडवाल्यांचा राफिया येथें पराभव करण्यांत आला. खि. पू. ७२०-७१० मध्यें सारख्या स्वाऱ्या चालू होत्या उरर्तु प्रांत काबीज करण्यात आला व उत्तरेकडील जमियत मोडण्यात आली. खि पू ७१७ सबध देशात असुरियन प्रांताधिकारी नेमण्यात आले आणि कर्चेमिशची कारकीर्द संपुष्टात आली. खि पू. ७१० त मेरोडकबलडन याचा पराभव झाला आणि सार्गन यानें बाबिलोन प्रांताचा शक्नक (प्रांताधिकारी) अशी पदवी लावून घेतली खि पू ७०७ त डरशरूकिन् (खोरसाबाद) या नगरांतील त्याचा भव्य राजवाडा पूर्ण झाला, व पुढील वर्षी त्यानें या राजवाड्यात प्रवेश केला. या राजवाड्याच्या भिंतीवर कोरलेले लेख व इतर कांहीं शिलालेख सांप्रत खणून काढण्यांत आले आहेत खि पू. ७०५ त याचा मुलगा सिनाखेरिब हा गादीवर आला खि. पू. ७०२ त यानें बाबिलोन प्रांतास भेट देऊन त्या ठिकाणीं बेलइब्नि यास राज्यावर बसविलें खि पू. ७०१त सीरियन राजे आणि इजिप्तचा तिराहाक यांनीं सिनाखेरिब याजविरुद्ध कट केला यावर असुरियाच्या राजानें फिनिशिअन शहरावर स्वाऱ्या केल्या, आणि सीरियाचा बहुतेक भाग काबीज झाला. यावेळीं अल्टकूच्या युद्धामध्यें सिनाखेरिबच्या सैन्याचा रोगराईनें नाश झाला, आणि तो निनेव्हे या आपल्या राजधानीस परतला. खि. पू ७०० त बाबिलोनी लोक ज्या म्हणण्यावरून बेलइब्नि यानें असुरियाशीं शत्रुत्व धरिलें व त्यास मेरोडकबलडन आणि खाल्डियाचा मार्डुक उशेझिब हे दोघे येऊन मिळाले. सिनाखेरिब यानें त्याचा पराभव करून आपला मुलगा अशुर्नदिनशुम याला बाबिलोनच्या राज्यावर जाहीर रीत्या बसविलें. खि.पू.६९४त एलममध्य राहिलेल्या खाल्डियन लोकांवर स्वाऱ्या करण्यात आल्या परंतु एलमाइट लोकांनीं अशुर्नदिनशुम याला पकडून नेर्गलउशेझिब याला गादीवर बसविलें खि पू ६९० त मोशेझिब मार्डुक यास बाबिलोनचा राजा करण्यात आलें. एलमाइट याजबरोबर बाबिलोनियन लोकांनींहि खाल्यूल येथें सिनाखेरिब यास विरोध केला आणि स्वतःचा पूर्ण पराभव करून घेतला. खि. पू. ६८९ त सिनाखेरिब यानें बाबिलोन प्रांताचा नासधूस केली. खि. पू. ६८८-६८२ त सिनाखेरिब याचा अरबस्तानात प्रवेश खि पू. ६८१ सिनाखेरिबचा त्याचे पुत्र नेर्गलशरएशीर आणि अदरमलिक याजकडून वध करण्यात आला. खि. पू ६८१ त एसरहडन हा आपल्या बापानंतर गादीवर आला. खि. पू. ६८१-६७२ मध्यें साम्राज्यांतील निरनिराळ्या भागात उद्भवलेलीं बंडाळी मोडण्याकरिता ९ स्वाऱ्या पाठविण्यात आल्या. खि. पू. ६७२ त सायडन शहराचा विध्वंस करण्यात येऊन त्याच जागीं करअशुरअखेइदिन हे नवें नगर वसविण्यात आलें खि पू ६७०त एसरहडन हा तिराहाक यास शासन करण्याकरिता इजिप्तमध्यें गेला, व त्यानें मेंफिस काबीज केले यामुळें सर्व प्रांत एसरहडन यास शरण येऊन

एसरहडन यानें पुन्हां नवीन राज्यव्यवस्था केली ख्रि पू. ६६८ एसरहडन यानें राज्याचा त्याग करून आपला मुलगा शमसशुमऊकीन याला बाबिलोन प्रांताचा अधिकारी नेमून असुरबनि पाल या नावाच्या दुसऱ्या मुलास असुरियाच्या राज्यावर बसविलें या संबंधीं माहिती झेंजिर्ली येथील पोलादाच्या तुकड्यावरील लेख आणि इतर शिलालेख याजवरून कळते ख्रि पू ६६८ त असुरबनिपाल याच्या कारकीर्दीस आरंभ झाला ख्रि पू ६६७ तिरहाक यानें मेंफिस परत घेतल्यामुळें त्याचा पराजय करण्याकरिता इजिप्तमध्यें सैन्य पाठविण्यात आलें इजिप्शियन राजानीं तिरहाक यास पुन्हा गादीवर आणण्याकरिता कट केल्यामुळें त्याना पकडून शासन करण्यात आलें आणि टायरचा बाल नावाचा राजा व दुसरे कित्येक राजे याजकडून खंडणी उकळण्यात आली ख्रि. पू. ६५५ त इजिप्तचा राजा पहिला प्संतेख यानें असुरियाचें वर्चस्व झुगारून दिलें एलामवर याचवेळीं स्वारी करण्यात आली. शमसशुमऊकीन यानें असुरियाविरुद्ध कट केल्यामुळें बाबिलोन प्रांतास सक्ततर शासन करण्यात आलें. आणि एलाम व अरब आणि इतर सहाय्यकर्ते यांनीं शमसशुमऊकीन यास मदत केल्यामुळें त्यांची निर्दयपणें कत्तल करण्यात आली असुरबनिपाल याची बांधकामाबद्दल प्रसिद्धि आहे निनेव्हे येथील एकुरगल्कुरा या देवतेचें देवालय सुशोभित करण्यात आलें बाबिलोनमधील इसँगिलचें बांधकाम पूर्ण झालें बोर्सिप्पामधील एझिडा सुशोभित करण्यात आले. निनेव्हे येथील राजवाडा पुन्हा बांधण्यात येऊन एक मोठें ग्रंथसंग्रहालय तयार करण्यात आलें बाबिलोन आणि आर्बेला या प्रांतामध्यें मोठमोठीं बांधकामें करण्यात आलीं असुरबनिपाल याची कारकीर्द शांततेच्या दृष्टीनें फार भरभराटीची झाली परंतु या कारकीर्दीत इजिप्त प्रांत ताब्यातून नाहींसा झाला आणि दुसरे कित्येक प्रांतहि आपलें स्वातंत्र्य परत मिळविण्याच्या मार्गास लागले या कारकीर्दीसंबंधीं पुष्कळ प्राचीन कागदपत्रे निनेव्हेच्या ग्रंथसंग्रहालयातून उपलब्ध झाला आहेत ख्रि पू ६२६–६०९मध्यें असुरबनिपालानंतर असुरयेतिलइलिकान सिनशुमलिसिर आणि सिनशरइष्कुम (सॅरॅकस) यांनीं राज्यें केलीं परंतु त्यासंबंधीं फारशी माहिती उपलब्ध नाहीं. ख्रि. पू ६२५ या सुमारास असुरियामध्यें सीथियन लोक प्रथम आलेले दिसून येतात. त्यांनीं या प्रांतावर हल्ला करून कॅला शहर जाळिलें. ख्रि. पू. ६०९त सिनशरइष्कुम यानें बाबिलोन प्रांतावर स्वारी केली आणि बाबिलोनचा राजा नबोपोलासर यानें मेड येथील सिथियन लोकांशीं संगनमत करून निनेव्हेशहरावर हल्ला केला सिनशरइष्कुम यानें राजवाड्यास आग लावून दिली आणि स्वत. आगींत जळून मेला. निनेव्हे दरशरुकिन, असूर या तिन्ही शहरांचा नाश करण्यात येऊन मेड येथील सिथियन लोकांनीं असुरिया व त्याच्या उत्तरेकडील हॅलीस नदीपर्यंतचा प्रांत ताब्यांत घेतला. बाबिलोनियन लोकांनीं दक्षिणभाग आणि सीरिओफिनिशिअन प्रदेश ताब्यात घेतला, आणि अशा रीतीनें असुरियन साम्राज्याची समाप्ति झाली

**बाबिलोनमधील नवीन साम्राज्य** —*ख्रि पू. ६०६–५३८*—नबोपोलासर हा ६२५च्या सुमारास बाबिलोन प्रांतावर आसुरियातर्फे अधिकारी नेमण्यात आला व त्यानेंच पुढें राज्यपद स्वीकारून तो असुरियाचा एक बलाढ्य प्रतिस्पर्धी बनला निनेव्हेच्या नाशानंतर जुन्या असुरियन साम्राज्यातील त्याचा वांटा त्याला मिळाला आणि त्यानें आपली कारकीर्द मोठ्या शांततेनें घालविली इजिप्तचा राजा दुसरा (नेको)नेकू यानें बाबिलोनवर स्वारी केली त्याच्या कारकीर्दीत बाबिलोन प्रांत मोठमोठ्या इमारतींमुळें सुस्थितींत होता या कारकीर्दीत सिप्पुर येथें बेलट देवाचें देवालय पुन्हा बांधण्यात आलें ख्रि पू. ६०४–५६२ मध्यें नेबुकाडरेसार (नेब्यूकुडरउसुर) हा राजा होण्यापूर्वींच यानें कार्चेमिश येथें नेकूचा पराभव केला व जूडा प्रांतावर स्वारी केली ख्रि पू ५९७ च्या सुमारास यरुशलेम दोनदा काबीज करण्यात आलें व जेहुयाचिन याला हार खावी लागली व त्याच्या जागीं जोशियाचा मुलगा मटेनिया याला झेडेकिया या नावाखालीं राजा करण्यात आलें पुन्हा ख्रि. पू ५८६ मध्ये यरुशलेम शहराचा लुटालूट व नासधूस करण्यांत आला आणि तेथील लोकांस हद्दपार करण्यात येऊन गेडेलिया यास अधिकारी नेमण्यात आलें ख्रि. पू ५८५-५०३ —१३ वर्षेपर्यंत टायरचें राज्य राखण्यात येऊन शेवटीं ५७३ मध्यें तेथील राजा दुसरा इथोबाल याला पदच्युत करण्यात येऊन हा भाग बाबिलोन प्रांतात सामील करण्यात आला ख्रि पू ५६७ या वर्षीं दुसरा आहमेस याच्या कारकीर्दीत इजिप्तवर स्वारी करण्यात येऊन पुष्कळ लूट जमविण्यात आली परंतु कायमचा फायदा असा कांहींच झाला नाहीं या वेळच्या पुष्कळ प्राचीन शिलालेखांत शांततेच्या अनेक सुंदर कामें व मोठमोठा विस्तृत बांधकामें करण्यात आलीं. बाबिलोनचा तट पुन्हा बांधण्यात येऊन अभेद्य करण्यात आला अनेक कालवे दुरुस्त करण्यात येऊन पुष्कळ देवालय आणि सिप्पुर लार्सा, ऊर, गिल्बत, बाझ आणि इरेक या शहराभोंवतालच्या भिंती पुन्हा बांधण्यात आल्या या वेळचें पुष्कळ शिलालेख उपलब्ध आहेत ख्रि पू. ५६२ त अमिलमार्डुक (बायबलग्रंथामधील एव्हिल्मेरोडॅक) याजबद्दल शिलालेख उपलब्ध नाहींत याचा पुढील राजानें खून करण्यात आला ख्रि पू ५६० त नेर्गलशरउसूर याच्या कारकीर्दीत बाबिलोन प्रांताचा विस्तार होऊन त्यास पुष्कळ शोभा आली एशगिलचें देवालय अलंकृत करण्यात आलें कालवे पद्धतीचें नियमन करण्यात आलें ख्रि पू ५५६ त लाबाशीमार्डुक हा राजा राज्यावर येऊन ९ महिन्यांच्या कारभारा नंतर त्याचा वध करण्यात आला. ख्रि पू. ५५५ त नेबुनैद (नबोनिडस) हा एक वयस्थ मनुष्य राजा गादीवर बसला.

यानें बांधकाम आणि देवालयाची सुधारणा करण्यात आपला वेळ घालविला शुब्बार देवालय आणि बाबिलोनियन प्रांतातील सिप्पुर आणि खरन हीं देवालयें पुन्हा बांधण्यांत आलीं. ख्रि पू. ५३९ त बाबिलोन प्रांतावर एलाम आणि पर्शिया येथील राजा सायरस यानें स्वारी केली ख्रि. पू ५३८ त सिप्पुर नगर घेण्यात येऊन बाबिलोनप्रांत सायरसच्या हातात गेला व सायरसनें शहरामध्यें मोठ्या इतमामानें प्रवेश केला या वेळेपासून बाबिलोन प्रांत हा इराणी सत्तेखाली गेला.

बाबिलोनिया, असुरिया व त्या सभोंवतालच्या प्रांतांच्या तत्कालीन संस्कृतीची कल्पना येण्यासाठीं तथें शहराचा कितपत विकास झाला होता याचाहि विचार केला पाहिजे देशाची संस्कृति शहरात केंद्रित झालेली असते या साठीं या प्रदेशातील अत्यंत प्राचीन शहरांची पुढें दिलेली माहिती महत्वाची आहे

**अक्कड.**—हें हिब्रू नाव असून फक्त एकदाच जुन्या करारांत (जे १०-१०) आलें असून शीनार किंवा बाबिलोनिआ ह्या प्रांतातील निमरुडच्या राज्यात जीं मुख्य चार शहरें आहेत त्यापैकीं एक आहे. तीं चार शहरें म्हणज अक्कड, बाबेल, इरेक व काल्ने हीं होत हें बायबलातील शहर म्हणजे बहुश: उत्तर बाबिलोनियांत ज्ञात असलेले अगडे' शहरच असावें हें अगडे शहर प्राचीन व निलोनिअन राजा पहिला सार्गन ह्याची राजधानी होती. त्या राजाचा काल, बाबिलोनियाचा शेवटचा सेमिटिक राजा नबोनिडस ( इ. सना पूर्वी ५५५-५३७) यानें इ. सनापूर्वी ३८००हा दिला आहे. 'अगडे हें नाव सेमिटिक नसून पुष्कळशा प्राचीन शिलालेखात आढळते व हें एका प्राचीन महत्वाच्या राजधानीचें नाव असल्याचे पूर्णपणें सिद्ध झालें आहे. बाबिलोनी वाङ्मयात राजाच्या उपपदात सुमेर शहराबरोबर याचा उल्लेख आढळतो

**एकर**—तिसऱ्या टॅथमोसि (थॉथमिस १५०० ख्रि पू) याच्या खंडणीच्या यादींत एआक नाव आहे हेंच एकर असावें. अमर्ना पत्रव्यवहारात एका म्हणून उल्लेखिलेलें शहर एकर असावें. हिब्रू लोक याला एको म्हणत. हें सर्व सिरिया प्रांतात महत्वाचें होतें. ख्रि. पू. ७२५ मध्यें शालमनसरच्या विरुद्ध सिडॉन व टायर याच्या बाजूनें हें बंडात सामील झालें होतें.

**अपामिया**—असुरियन लेखांतील तिलनारसिप व आधुनिक बिरेजिक युफ्रेटिसच्या पश्चिम तीरावर.

**अरबेला.**—अदियाबेनमधील एक प्राचीन शहर. असुरियन व तत्पूर्वकाली ल्हान व मोठ्या झाब नद्यांच्या मधील प्रदेशाची राजधानी होतें एस्टार संप्रदायाचें महत्वाचें ठिकाण. अलेक्झांडरनें डरायसचा पराभव ख्रि. पू. ३३१त या ठिकाणीं केला.

**असुर.**—असुरियाची राजधानी.तैग्रीसच्या पश्चिम तीरावर या शहरानें नाव देवतेवरून पडलें कीं, देवतेस नाव शहरावरून पडलें हें गूढ आहे पुरोहित राजे होते प्रथम बाबिलोनियाचे अंकित, पुढें स्वतंत्र अनु व हदाद यांचीं मोठीं व बेल आणि एस्तार यांचीं लहान देवळें आहेत.

**ॲस्कॅलन**—पाच मुख्य फिलिस्टाइन शहरांपैकीं एक भमध्य समुद्रावर गाझाचे उत्तरेस १२ मैलावर आहे येथें मत्स्य देवता डरकेटोची पूजा होत असे हें शहर इस्राएलान्या ताब्यात कधींच नव्हतें बायबलमधील सॅमसनगधर्वी गोष्ट दुसऱ्या शहरासंबंधीं असावी सिनाखेरबनें ख्रि. पू. ७०१ मध्यें हें काबीज केलें.

**बिसमिया**—तैग्रिस नदीजवळ निपुरच्या आग्नेयीस येथें पूर्वी एक शहर व देऊळ होतें. येथें ख्रि पू ३००० वर्षांचे नरमसीन व सारगनचे अवशेष सापडले आहेत. व शिलालेख सापडले आहेत.

**बोरसिप्पा.**—बाबिलोनच्या नैऋत्येस १५ मैलावर ग्रामदेवता नेबो अथवा नबु होती खमुरबीनें बाबिलोन राजधानी केल्यावर ( ख्रि पू २००० ) हें उदयास आलें. यांत एझिदा देऊळ मार्डुक याचे बांधलें पुढें नेबो (मार्डुकचा पुत्र) याची स्थापना झाली

**कॅला**—निनेव्हेच्या दक्षिणेस १९ मै लावर असुरियाची राजधानी होतें. हें इ. स. पू १३०० च्या सुमारास शालमानसर( पहिला )यानें बांधलें. असुरनाझिरपाल( ८८० ख्रि.पू.) यानें पुनरुज्जीवन केलें

**दमास्कस**—हें सध्या अस्तित्वात असलेल्या सर्वांत जुन्या शहरांपैकीं एक आहे अशी समजूत आहे.इजिप्तची सत्ता पॅलेस्टाइनवर होती त्यावेळीं उत्तर प्रांताची राजधानी होतें.

**एडम**—येथील प्राचीन रहिवाशी शासु (तिरंदाज) होते. जुन्या करारावरून असे दिसतें कीं, एडम येथील लोकांनीं मूळच्या होराइट(गुहानिवासी)लोकांस हाकून दिलें. हें इस्रायलापेक्षा प्राचीन राष्ट्र आहे

**एलाम.**—हें इराण देशाबद्दल बायबलांत नाव आढळतें इराणला प्राचीन भूगोलवेत्ते सुसियाना म्हणतात. हे अक्कडच्या सारगननें जिंकलें त्यावेळीं सुसा हें तद्देशीय शहर होतें व बाबिलोनियाचा सुभेदार तेथ रहात होता. ख्रि पू.२२८०त कुतुर नाखखुन्ते नावाच्या एलामच्या राजानें बाबिलोनियावर स्वारी करून इरेक येथील नना देवीची मूर्ती नेली. याच घराण्यातील उन्तास गाल नावाचा राजा इमारती बांधण्याबद्दल प्रसिद्ध होता. सुत्रुक नाखखुन्ते यानें (ख्रि. पू १२२०) बाबिलोनियावर स्वारी करून तेथील राजास ठार मारिलें व नरमसिनचा स्तम्भ व सिप्पुर येथील खमुरब्बी कोड व अकडचा तनिस्तुसुचा स्तम्भ घरोबर आणले. यानेंच असुनाक देश जिंकला.

**इरेक.**—बाबिलोनियातील प्रसिद्ध शहर इलाम विरुद्ध लढाईत पुढें आलें (ख्रि पू. २००० ). पुढें विद्येचें माहेरघर

म्हणून प्रसिद्ध. असुर बनि पाल यानें येथून निनेव्हेस ग्रंथ नेले.

**एरिडु.**—राजकीय महत्व नाहीं. इआ देवाची पूजा बाबिलोनियन काळात.

**गाथ-गाझा**—फिलिस्टाइन शहरें. व्यापारी मार्गावर.

**गेन्हा**—येथें बाबिलोनियांतील हद्दपार केलेले लोक रहात.

**हिरा.**—हें व्यापारी मार्गावरील महत्वाचें शहर. उल्लेख खि. पू. ११००.

**हारेब.**—कानानाईट लोकाचा देव याह्वे याचें स्थान.

**यरुशलेम.**—इस्रायलपूर्वी जेबुसाइट लोक होते. इजिप्शियन सत्ता होती.

**लगाश.**—हें बाबिलोनियांतील सुमेरियन संस्कृतीचें माहेरघर. खि. पू. ४००० च्या सुमारास लगाश हें फार महत्त्वाचें शहर होतें. उरनिनाव याचे वंशज या ठिकाणीं स्वतंत्र राजे होते, नंतर सेमेटिक लोकांनीं घेतलें परंतु उर, उरगुर, दुंगी येथील राजाश्रयाखालीं लगाशच्या कलेचा उत्कर्ष होत राहिला.येथून बऱ्याच दूरवर व्यापार चाले अवशेष १८७७त फ्रेंच कॉन्सल अर्नेस्ट सार्झेक यानें शोधून काढले.

**लार्सा**—एरेकच्या आग्नेयीस १५ मैलावर. उरगर राजाच्या वेळेस ( खि.पू. २८००–२७०० ) उल्लेख सापडतो या राजानें एवाबर शमाश ( सूर्यदेवता ) इचें मंदीर दुरुस्त केलें

**लिसिया.**—लिसियनाचा उल्लेख अमर्ना कागदपत्रात सापडतो (खि. पू. १४०० ) हे प्रथम लिसिअन किनाऱ्यावर स्थाइक झाले. हे पूर्वी चाचे असावे ( लिसिअन अथवा लुर्वी ).

**लिडिया**—येथें काहीं हिटाइट अवशेष सापडले आहेत येथें अँटिस ही सूर्यदेवता होती. इच्या पुजारिणी सशस्त्र असत.

**निनेव्हे**—येथें एस्तार देवीचा संप्रदाय होता. तिचें दुसरें नाव निना हें होतें. या शहराचा इतिहास म्हणजे सर्व असुरियाचा इतिहास होय. पहिल्या शालमनसरनें एस्तारचें देवालय समरी हदाद यानें बांधलें असें आपल्या लेखात म्हटलें आहे. याचा जीर्णोद्धार असुर उबलितनें केला ( खि. पू. १३०० पू. ).

**निप्पुर.**—हें बाबिलोनियातील अतिप्राचीन शहर. सुमेरियन देव एनलिल याचें हें मुख्य स्थान होतें. युफ्रेटिसचा एक प्रवाह यामधून वहात होता. खि. पू. चवथ्या सहस्रकात हें एनलिल देवळामुळें प्रसिद्ध होतें. राजकीय दृष्ट्या याला मुळींच महत्व नव्हतें. तिसऱ्या सहस्रकारंभी अक्कडच्या सेमिटिक राजांनीं हें जिंकून घेतलें होतें. नंतर उर येथील पहिल्या सेमिटिक घराण्याची सत्ता सुरू झाली. उर-गुर यानें देऊळ चांगलें बांधलें. एका विटेवर देवळाचा नकाशा सांपडला आहे. द्वितीय सहस्रकात हामुरबीनें बाबिलोनिअन साम्राज्य स्थापन केल्यामुळें बाबिलोनचें महत्त्व वाढून निप्पुरचें कमी झालें. यानंतर या शहराकडे खि. पू. ८ व्या शतकाच्या शेवटीं सारगन व ७ व्याच्या शेवटीं असुरबनिपाल यानीं लक्ष देऊन येथील पूजा व महत्त्व वाढविलें. मंदिराच्या आवारात सुमारें ४०,००० विटालेख व इतर अवशेष सापडले. यांत शाळापाठ, क्रमिक पुस्तकें, गणिताचीं कोष्टकें, वाङ्मयात्मक लेख, व एका राजवाड्यांत इराणी व्यापारी दप्तर सापडलें येथील लेखावरून ५००० वर्षांपूर्वीपासून मध्ययुगापर्यंत सुसंगत इतिहास लाविता येतो. यातील लेखात जलप्रलयाची कथा आहे.



**फ्रिजिया**—फ्रिजियन लोक फार प्राचीन असून याची भाषा म्हणजे मूळ मानववंशाची भाषा अशा ग्रीक दंतकथा आहेत. या प्रातात हिटाइट स्मारकें सापडतात. प्राचीन फ्रिजियन कलेचा कॅपॅडोशिअन कलेशीं संबंध असावा. ग्रीक कलेचा उगम फ्रिजियामधून झाला असावा होमरनें फ्रिजियाचा उल्लेख केला आहे. खि. पू. ८ व्या व ९ व्या शतकात फ्रिजिया व ग्रीक याचा संबंध दिसतो.

**प्तेरिया**—१९०६ सालीं बर्लिन येथील विंक्लेर यानें जे अवशेष शोधून काढले त्यावरून येथें खि. पू. १६०० ते १२०० पर्यंत हट्टि घराणें राज्य करीत असून या शहराचें नाव हट्टि असावें असें दिसतें.

**समोसत**—एक हिटाइट केंद्र काहीं अवशेष सापडतात.

**सिडोन**—फिनिशिअन राजधानी येथें जुने अवशेष, दगडी शवपेटिका, खोदकाम, रंगीत काम वगैरे सापडतात.

**सिपारा**—सूर्य देवाचा व देवी अनुनितचा असे दोन भाग बाबिलोनियन कालात होते. दुसरीं दोन सिपारा शहरें प्राचीन शिलालेखात उल्लेखिलेलीं आढळतात. यापैकीं एक अक्कड असावें. नोव्हानें येथील देवळात जलप्रलयापूर्वीची इतिहाससामुग्री ठेविली, अशी दंतकथा प्रचलित आहे.

**सोलाय**—ट्रोजन युद्धानंतर अॅकॅमास यानें हें वसविलें अशी दंतकथा आहे. येथें लोहयुगापूर्वीचे अवशेष आढळत नाहींत. असुरबानेपाल याचा मित्र सिलुवा हरिसु हा होता. सिलु हेंच सोलाय असावें असा काहींचा तर्क आहे.

**सुमेर**—हें नाव अक्कड बरोबर शिलालेखात आढळतें सुमेर व अक्कडचा प्रदेश म्हणजे सर्व बाबिलोनिया असा समज होता. सुमेर म्हणजे दक्षिण बाबिलोन व अक्कड म्हणजे उत्तर बाबिलोन असा समज होता.

**टायर.**—फिनिशियातील प्रसिद्ध शहर.

**उर.**—बाबिलोनियन शहरांपैकीं प्रसिद्ध शहर. येथें एननारचें प्रसिद्ध मंदिर होतें. येथें ननार ( नंतरची सिन ) या चंद्रदेवतेची पूजा होत असे. हें अब्राहामचें मूळ गाव असा बायबलात उल्लेख आहे. हें राजकीय व व्यापारी दोन्हीं दृष्टींनीं सुमेरियन काळात ( खि. पू. ३००० ) फार प्रसिद्ध होतें. सेमेटिक सत्तेखालीं उरगर अथवा उरएनगुर राजाच्या सत्तेखालीं हें फार प्रसिद्धीस आलें. याचें दक्षिण व

उत्तर बाबिलोनियावर वर्चस्व होतें समुरबीनें बाबिलोनियन साम्राज्य स्थापन केल्यामुळे (खि पू २०००) याचें महत्त्व कमी झालें.

येणेंप्रमाणें तत्कालीन असुरिया, बाबिलोनिया हे देश व त्याच्या अमामतातील शहरें याविषयींची माहिती करून घेत. त्यानंतर आपण त्याच्या आसपासचे प्रदेश व तेथील प्राचीन लोक यासंबधीं काय माहिती मिळते तें पाहूं

---

## प्रकरण ५ वें.

### असुरकालीन आशियांतील राष्ट्रें व संस्कृती

असुरराष्ट्र वैभवात असता त्याचा आशियामायनरमधील तत्कालीन अनेक राष्ट्राशीं संबंध आला अशा राष्ट्रांपैकीं विशेष प्राचीन म्हणजे हिटाइट व मिटनी हीं राष्ट्रें होत परंतु त्यासंबंधीं आज आपणास विशेष माहिती नाहीं कीलाकृति शिलालेखाचें वाचन व मेसापोटेमियात चाललेलें संशोधन या राष्ट्राविषयीं नवीं नवीं माहिती रोज उजेडात आणीत आहे व काहीं दिवसानीं या राष्ट्राचा सुसंगत इतिहास लिहिता येण्यासारखी साधनसामुग्री उपलब्ध होईल अशी आशा आहे. यानंतर दुसरें महत्त्वाचें राष्ट्र पॅलेस्टाइनमधील यहुद्यांचें होय या राष्ट्रानें जुना करार नामक वाङ्मय उत्पन्न करून सेमेटिक संस्कृतीस चिरकालित्व आणलें आहे पुढें नवा करार व ख्रिस्ती संप्रदाय यास जन्म देऊन जगाच्या बऱ्याच मोठ्या भागास ऋणी करून ठेवलें आहे व वाङ्मयोत्पादनानें आपल्या विषयींचा इतिहास बराचसा सुसंघटित स्वरूपात कायम ठेवला आहे लिपीची उत्पत्ति इत्यादि अनेक सुधारणाचा उगमहि या संस्कृतींत झाला असें मानण्याची बऱ्याच पाश्चात्य पंडिताची प्रवृत्ति आहे संप्रदाय स्थापनेच्या कामात जसें यहुदी राष्ट्राचें नाव ऐकूं येतें तसें व्यापाराच्या कामात फिनिशिअन राष्ट्राचें नाव ऐकू येतें. या राष्ट्रानेंहि व्यापाराच्या कामात बरीच प्रगति करून आपल्या वसाहती दूरदूरच्या अनेक ठिकाणीं स्थापन करून संस्कृतिप्रसारास मदत केली व अनेक धाडसी सफरी करून आफ्रिकेला वळसा घालून भौगोलिक ज्ञानात बरीच भर घातली व एका काळीं रोमसारख्या बलाढ्य राष्ट्राचें जीवितहि साशंकित केलें.

यासेराज त्यावेळीं आशियामायनरमध्यें कमी अधिक महत्त्वाचीं सिरिया, लिडिया, सावियन, अरेमियन, मायसिनी, बिथिनन वगैरे राष्ट्रें होतीं व आशियामायनरबाहेर पूर्वेकडे मीडिया, इराण, मगोल व चीन हीं राष्ट्रें होतीं. चीनशिवाय हीं सर्व राष्ट्रें त्यावेळीं बाल्यावस्थेंत होतीं व त्यानीं आपणामागें स्वत चें असें विशेष काहीं ठेवलें नाहीं. आता आपण क्रमाक्रमानें एक एका राष्ट्राच्या संस्कृतीचें विवेचन करूं. प्रथम सर्वांत प्राचीन हिटाइट व मिटनी हीं राष्ट्रें घेऊं.

**हिटाइट अथवा हट्टि राष्ट्र व संस्कृति** — हे लोक अतिप्राचीन काळीं सिरिया व पूर्व आशियामायनर या प्रदेशभर पसरलेल्या एका मानवजातींतील होते इ स पू १६ व्या शतकात त्यानीं प्रथमच उत्तरकालीं कॅपॅडोशिया नावानें प्रसिद्ध असलेल्या प्रातात आपलें एक बलिष्ठ राष्ट्र निर्माण केलें सुबिल्लुलिउम हा त्याचा पहिला मोठा राजा होऊन गेला, याच्या आधीं खत्तुशील नावाचा निदान एक तरी राजा झाला असावा. या वेळीं हट्टी लोक मोठ्या जोमानें दक्षिणेंत घुसले. त्यानीं मिटनि लोकाचें राज्य पादाक्रांत केलें व उत्तर सिरिया आणि पश्चिम मेसापोटेमिया हे देश काहीं अशीं व्यापण्याकरिता व काहीं अशीं माडलिक बनविण्याकरिता ते पुढें सरसावले, या देशात त्याचे काहीं सजातीय अगोदरच येऊन राहिले होते लवकरच त्याचें इजिप्तशीं वितुष्ट आलें आणि दुसऱ्या खत्तुशीलच्या अमदानींत याच्या सत्तेची वरकमान असताना दुसऱ्या रामेसीस बरोबर हे कडेशची लढाई खेळले या लढाईचा निकाल अनिश्चितच झाला पण या लढाईंत त्याचें सामर्थ्य त्याच्या प्रतिपक्षाच्या सामर्थ्यापेक्षा मुळींच कमी दिसून आलें नाहीं. या व यापूर्वींन्या काळच्या हट्टी राजाच्या राजकीय पत्रव्यवहारावरून असें दिसून येतें कीं, ते इजिप्त व बाबिलोनी दरबाराशीं व्यवहारदृष्ट्या समान दर्जाचें वर्तन ठेवीत, आणि सिरियामध्ये विशेषत. ॲमोराइट जातींशीं त्याचें एकसारखें युद्ध चालू असे. या काळीं हट्टींच्या साम्राज्यसत्तेखालीं पश्चिमेकडील फ्रिजिया व लिडिया हे दोनहि देश येत असावेत. दुसऱ्या खत्तुशीलच्या पुढील पिढींत बोगझकुइ येथील पत्रव्यवहाराला फारसें महत्त्व राहिलें नाहीं व यानंतर दोन शतकानी सुरुवात झालेल्या असुरी बखरीवरून त्या वेळीं कॅर्केमिश हे प्रमुख हट्टी शहर असून, उत्तर सिरियालाच हट्टिस्थान म्हटलेलें आढळतें तेव्हा असें शक्य दिसतें कीं, हट्टी लोकाना जेव्हा इजिप्तची भीति वाटेनाशी झाली तेव्हा साम्राज्यकेंद्राचें उत्तरसिरियांत स्थलातर झालें असें असेल तर, पुढील हट्टींचा इतिहास बोगझ कुइ येथील अवशेषात न पाहाता जेरॅब्रस आणि इतर मध्ययुफ्रेटिस नदीकाठचीं स्थळें यातील अवशेषात पाहावा लागेल कर्केमिस येथील हट्टीलोकाच्या वसाहतीमुळें ते पुरे व्यापारी बनून त्याच्यातील डोंगरी ताकद नाहींशी झाली, इतकेंच नव्हे तर असुरियाच्या वाढत्या उत्तरसेमिटिकमधील सत्तेशीं त्याचें निकट सान्निध्य होऊं लागलें दुसऱ्या खत्तुशील राजाला या सेमिटिक सत्तेच्या प्रादुर्भावाची भीति वाटत असे याच्या नंतरच्या अनीत नावाच्या एका राजाला असुरी लोकाची जाचणी वाटूं लागली होती आणि यापुढें अजमासें एक शतकानतर, पहिला तिग्लथ पिलेसर याच्या राज्यारोहणापासून हट्टी सत्ता नष्ट करण्याची असुरी लोकाची प्रयत्नपरंपरा सुरु झाली. निनेव्हेच्या सैन्यानीं उत्तर सिरिया आणि आग्नेय आशियामायनर यावर स्वाऱ्या करून हळू हळू हट्टी लोकाचा बीमोड

केला. तथापि हट्टी लोकांनीं पुष्कळ काळपर्यंत मोठ्या नेटानें त्याचा प्रतिकार केला व सिरिया आणि पूर्व-आशियामायनर या ठिकाणीं इ. स. १००० वर्षे पर्यंत सर्वांत जास्त वर्चस्व यांचेच होतें; व नवव्या शतकाच्या उत्तरार्धांत असुरी लोकांची सत्ता बरीच वाढेतोंपर्यंत हट्टींचें सिरियातील स्थान नाहींसें झालें नाहीं इतकेंच. कॅपॅडोशिया प्रांताची काय स्थिति होती याचो आपणास अद्याप माहिती मिळत नाहीं, पण प्राचीन काळीं जेथें यांचें चांगलें वर्चस्व होतें त्या एउयुक आणि टॅना येथील फ्रिजिअन शिलालेखाच्या अस्तित्वावरून असें दिसतें कीं, असुरिया आणि हिटाइट यामधील कलहाच्या पूर्वावस्थेंत संगॅरियस दरींतील मांडलिक राजा स्वतंत्र झाला आणि त्यानें हट्टींच्या दौर्बल्यावस्थेंत आपल्या पूर्वीं वरिष्ठ असलेल्या राजाच्या घरचा मुलूख बळकावून आपलें राज्य वाढविलें. क्रिमेरियांतील लोकांनीं फ्रिजियाचें राजघराणें बुडवून, लिडियाला मर्मनड सत्तेच्या अन्तर्गत स्वातंत्र्य दिल्यानंतर सुद्धा "श्वेत सिरियन लोक" कॅपॅडोशियामध्यें होते क्रोएससला साहाव्या शतकात हे लोक सेरिया येथें आढळल्यावर त्याचा त्यानें अशेरचाच नायनाट केला. तथापि याच्या कच्याचशा धार्मिक व इतर चाली मागें होत्या व त्या ग्रीक ग्रंथकारांनीं नमूदहि केल्या आहेत. याचे संबंधीं थोडी सविस्तर माहितीची टीप पुढें दिली आहे.

**हिटाइट लोकांचें वर्णन.**—सीरिया आणि मेसापोटेमिया याच्या वायव्येस जें आशियामायनरचें द्वीपकल्प आहे त्याचें महत्त्व फार आहे कारण आशिया आणि आफ्रिका याना जोडणारा पालेस्टाइन प्रांत ज्याप्रमाणें फार महत्वाचा होता, त्याचप्रमाणें आशिया आणि यूरोप यांना जोडणारा आशियामायनर हा सरहद्दीवरील प्रांत अत्यंत महत्त्वाचा होता. दोन खंडांतील मोठमोठ्या राष्ट्रांच्या मध्यें ठेवलेल्या 'बफर' प्रमाणें याची स्थिति होती. त्यामुळें अर्थातच इतिहासांत अत्यंत प्राचीन काळापासून या प्रांताना अत्यंत महत्त्व आहे. आशियामायनरमध्यें राहणाऱ्या लोकांनीं तत्कालीन राष्ट्रामध्यें योद्धे व जेते म्हणून मोठें नाव मिळविलें होतें असें प्राचीन इतिहासावरून दिसतें.

हिटाइट नामक लोकांनीं आशियामायनर हा प्रांत व्यापला होता, व त्यांच्या पराक्रमामुळें ख्रि. पू. सोळाशें पासून गातशेंपर्यंत या प्रांताला विशेष महत्व होतें. बायबलमधील वर्णनावरून हिटाइट लोक हॅमचा मुलगा कानान व कानानचा मुलगा हेथ याचे वंशज होत, असें दिसतें. बायबलवरून असें दिसतें कीं, या हिटाइट लोकांवर हिब्रू लोकांनीं महत्त्व वर्चस्व स्थापिलें. परंतु अलीकडील ऐतिहासिक संशोधनावरून असें सिद्ध झालें आहे कीं, हिटाइट लोकांचें प्राचीन राष्ट्र फारच पराक्रमी व युद्धप्रेमी होतें. त्या काळीं हिटाइट लोकांचें राज्य सर्व आशियामायनरवर व उत्तर सीरियावर पसरलें होतें. इतकेंच नव्हे तर एका बाजूस इजिप्त व दुसऱ्या बाजूला असुरिया या प्राचीन बलिष्ठ राष्ट्रांशीं हिटाइट लोकांचे सामने होत असत हिटाइट लोकांना इजिप्सियन लोकांच्या प्राचीन लेखात खेटा, आणि असुरियन लोकांच्या प्राचीन लेखात खट्टी हीं नावें दिलेलीं आढळतात. इजिप्सियन लोकांचा राजा तिसरा तेहुतिमस (थेटमासिस) यानें ख्रि पू.१५२८मध्यें मेगिड्डो येथें आणि त्यानंतरच्या सेती यानें ख्रि पू १३६० मध्यें कडेश येथे या खेटा लोकांवरोबर लढाया केल्या असा उल्लेख इजिप्तच्या प्राचीन इतिहासात आहे. इजिप्त मधील दुसरा रामेसीस राजा यानें कडेशच्या लढाईंत (ख्रि पू १३४०) हिटाइट लोकांचा पराभव केला, हे खरें आहे तथापि लढायांच्या या अनेक वर्णनावरून हिटाइट लोक चांगलेच पराक्रमी व सामर्थ्यवान होते असें स्पष्ट दिसतें.

या नंतरच्या काळात ख्रि. पू. ११५० पासून ७१० पर्यंत हिटाइट लोकांचा बलाढ्य असुरियन राष्ट्राबरोबर झगडा चालू होता. या संबंधाचा हिटाइट लोकांचा प्राचीन इतिहास अगदीं अलीकडे इजिप्त आणि असुरियामधील प्राचीन लेखाचे अर्थ विद्वान संशोधकांनीं लावल्यानंतर उपलब्ध झाला आहे त्यावरून हिटाइट राष्ट्र बरीच शतकें फार बलिष्ठ आणि महत्वाचे होतें असें सिद्ध झालें आहे शिवाय अगदीं अलिकडे खुद्द आशियामायनरमध्यें प्रत्यक्ष हिटाइट लोकांचेच लेख सापडले आहेत आजपर्यंत विद्वानांचें असें मत होतें कीं, लेखनकला ही अगदीं स्वतंत्रपणें फक्त चार ठिकाणीं म्हणजे चीन, मध्यअमेरिका, इजिप्त आणि मेसापोटेमिया या ठिकाणीं उत्पन्न झाली. परंतु हिटाइट लोकांच्या लेखाचें संशोधन झाल्यापासून या लोकांनीं आपली स्वतंत्र पाचवी लेखनपद्धति निर्माण केली होती असें वाटूं लागलें आहे. शिवाय हिटाइट लोकांतल्या अनेक प्राचीन मूर्तीहि सापडल्या आहेत. त्यावरून हिटाइट लोकांतलीं पादत्राणें आणि शिरस्त्राणें कांहीं एका विशिष्ट प्रकारचीं होतीं असें दिसून येतें. या हिटाइट लोकांच्या प्राचीन भाषेतील विशेषावरून असें दिसून येतें कीं, हिटाइट लोक सेमेटिक वंशाचे नसून त्यांचे सिथियन लोकांशीं व चीनकडील लोकांशीं अधिक साम्य आहे. तथापि या अनेक प्राचीन गोष्टींसंबंधाचें ऐतिहासिक संशोधन अद्याप बरेंच अपुरें व अनिश्चित आहे. अगदीं अलीकडील इतिहास संशोधक चार्लस डब्ल्यू सुपर म्हणतो कीं, आर्मीनियन्स हे लोक हिटाइट लोकांचेच वंशज होत.

**हिटाइट व मिसरी लोकांचा संबंध**—ख्रि पू. १७ व्या शतकापासून हिटाइट लोकांचा इजिप्शियन उर्फ मिसरी लोकांशीं युद्धविषयक संबंध येऊं लागला. त्यापूर्वीची हिटाइट लोकांची माहिती मिळत नाहीं. हिटाइट लोकांच्या मिसरी लोकांशीं राजकीय उलाढाली झाल्या त्या येणें प्रमाणें —ख्रि. पू. १५२८ हिटाइट लोकांचा तिसरा टेथमॉसिस याच्या बरोबर मेगिडो येथें लढाई झाला. ख्रि. पू

१४०० या वेळेपासून हिटाइट लोक बरेच प्रबळ झाले. त्यांनीं सीरियामधील मिसरी लोकांच्या प्रांताकडे मोर्चा वळविला. आणि कडेश हें आपलें दक्षिणेकडील राजधानीचें शहर बनविलें. खि. पू. १३६० मिसरी राजा पहिला सेती यानें हिटाइटांच्या कडेश राजधानीवर हल्ला केला खि. पू. १३४१ त मरोसर याचा मुलगा मौथनर याला त्याचा भाऊ खेटसर यानें ठार मारिलें, व गादी बळकाविली. खि. पू १३४० त कडेशचा दुसरी लढाई यांत मिसरी राजा दुसरा रामसेस यानें हिटाइट व त्याचे दोस्त यांच्यावर मोठा विजय मिळविला. खि पू. १३२५ त हिटाईटांचा राजा खेटसर आणि मिसरी सत्तुशील राजा दुसरा रामसेस यांच्यामध्यें तह झाला कडेशच्या लढाईचीं कवितावद्ध आणि इतर वर्णनें आणि उपर्युक्त तहासंबंधाचा लेख सांपडला आहे. एवर्स म्हणतो या महत्त्वाच्या लेखावरून हिटाइट लोकांची संस्कृति आणि त्यांचें राजकारण बरेच सुधारलेलें होतें असें दिसतें. या तहनाम्याचें ब्रुगशनें केलेलें भाषांतर मोठाल्या कागदाचीं सात पानें आहेत या तहाचीं कलमें एका चांदीच्या पत्र्यावर खोदून व त्या पत्र्याच्या मधोमध खेटा लोकांच्या सुटेख या प्रमुख देवतेचें चित्र काढून हा रत्नपट खेटा राजानें रामेसीस राजाला दिला होता हिटाइट लोकांचे लेख उपलब्ध झाल्यापासून मिसरी देवालयांच्या भिंतीवरील देखाव्यांचा अर्थ बरोबर समजू लागला आहे. या एकंदर साधनावरून हिटाइट लोकांचें हे प्राचीन राष्ट्र किती सुधारलेलें होतें याची कल्पना येते.

**हिटाइट आणि असुरियन लोकांचा संबंध**-इजिप्तनंतर हिटाइट लोकांचा खि पू. १११० पासून ७१७ पर्यंत असुरियन राष्ट्राशीं संबंध आला. त्यांतील महत्त्वाच्या गोष्टी येणेंप्रमाणें:—खि पू. १११० हिटाइट उर्फ खटी या लोकांचा पहिला तिग्लथपिलेसर यानें पराभव केला खि. पू ८७२त हिटाइट लोकांनीं तिसरा अशुर नझिरपाल याला खंडणी दिली. कारण त्यानें हिटाइट लोकांचे कांहीं राजपुरुष कैद करून नेले होते. खि. पू ? ८७६ त हिटाइट लोकांच्या एकेकाळीं राजधानी असलेल्या कर्चेमिश शहरांत अशुरनझिरपाल यानें प्रवेश केला. खि. पू. ८५४ हिटाइट लोकांनीं दमास्कसचा दुसरा बन-हदाद याचे बरोबर दोस्तीचा तह केला. त्याचा कारकार येथें पराभव झाला आणि हिटाइट लोकांचीं बरींच लहान लहान संस्थानें असुरियन लोकांनीं आपल्या राज्याला जोडलीं. खि. पू. ७१७ त हिटाइट लोकांच्या साम्राज्यापैकीं सेगर हें एकच संस्थान स्वतंत्र स्थितींत उरलें होतें. या संस्थानचा राजा पिसिरिक यानें मोश्चिच्या मिटाबरोबर सख्य करून असुरियाला खंडणी देण्याचें नाकारिलें त्यामुळें असुरियन राजा दुसरा सार्गन यानें सेगरावर स्वारी केली. व त्यांच्या कार्चेमिश या राजधानींतील लोकांना असुरियांत नेऊन त्या शहरांत असुरियन लोकांची वसाहत करविली याप्रमाणें असुरियन लोकांनीं हिटाइट लोकांचें शेवटचें संस्थान पूर्णपणें हस्तगत केल्यापासून हिटाइट साम्राज्याचा अंत झाला. ज्या असुरियन लेखावरून वरील ऐतिहासिक माहिती उपलब्ध होते त्यावरून हिटाइट लोकांचें राष्ट्र बरेंच सुधारलेलें होतें, आणि खि. पू. १३ व्या १४ व्या शतकांत तें फारच भरभराटींत होतें या मिसरी लेखावरून होणाऱ्या ज्ञानाला अधिक पुष्टि मिळते.

**हिटाइट आणि हिब्रू लोकांचा संबंध**—हिटाइट लोकांचा असुरियन लोकांशीं ज्या काळांत झगडा चालू होता त्याच काळांत त्याचा शेजारच्या इस्रायल लोकांशीं निकट पण मित्रत्वाचा संबंध चालू होता, अशी माहिती हिब्रू वाङ्मयावरून मिळते हिटाइट आणि इस्रायल या लोकांमध्यें विवाहसंबंध सुद्धां होत असत हिटाइट लोकांचा उरीआह याची बायको बाथशेबा ही एका उच्च इस्राईल घराण्यांतली होती. तात्पर्य खि पू. एक हजार इतक्या प्राचीन काळीं इस्रायल राष्ट्रावर हिटाइट राष्ट्राचें वर्चस्व होतें हें निःसंशय आहे

**हिटाईट लोकांचें कलाकौशल्य.**—हिटाइट लोकांमध्यें कलाकौशल्याचा स्वतंत्र उगम झालेला दिसत नाहीं. त्यांनीं बऱ्याच गोष्टी असुरियन लोकांपासून घेतल्या होत्या. हिटाइट लोकांच्या ज्या मूर्ती उपलब्ध आहेत, त्याच्या आंगावरील पोशाख आणि मूर्तीची ठेवण या बाबतींत असुरियन लोकांचीच नक्कल केलेली दिसते. तथापि कोठें कोठें फरकहि आढळतो. उदाहरणार्थ हिटाइट आस्टार्टेची मूर्ति बाबिलोनच्या एस्टार सारखीच आहे तथापि हिटाइट मूर्तीला पंख आहेत. हिटाइट लोकांतील वर लेख कोरलेली अशी एक सिंहाची मूर्ति सांपडली आहे ती मूळची मूर्ति हल्लीं कान्स्टांटिनोपल येथें असून तिचा ओतीव पुतळा ब्रिटिश म्यूझिअममध्यें आहे सिलिसिआंत सांपडणाऱ्या मूर्ती मात्र स्वतंत्र पद्धतीवर तयार केलेल्या आढळतात, पण त्या अधिक ओबडधोबड आहेत. या हिटाइट मूर्तींत आढळणाऱ्या विशेष गोष्टी म्हणजे स्त्रियांच्या डोक्यावर असलेली उंच टोपी आणि टोकें असलेले जोडे या होत. कॅपॅडोशियांत हिटाइट लोकांचे बरेच अवशेष सांपडलेले आहेत. प्राचीन राजधानी बोगझकुइ येथें प्राचीन राजवाड्याचे अवशेष सांपडलेले आहेत त्याचें, असुरियांतील इमारतींशीं बरेंच साम्य आहे. नवीन संशोधनांत सांपडलेल्या राजवाड्याचेंहि असुरियांतील इमारतींशीं साम्य आहे परंतु राजवाड्याच्या दरवाजाजवळ एक स्त्रीमुखी सिंह (स्फिंक्स) ठेवलेला आहे, त्यावरून मिसरी कलेचें अनुकरण केलें आहे असें दिसतें. पण असुरियन आणि हिटाइट यांच्या स्मारकविषयक गोष्टींत असा फरक आहे कीं, असुरियन लोकांचीं स्मारकें राजांच्या गौरवपर आहेत आणि हिटाइट लोकांचीं स्मारकें पारमार्थिक व धार्मिक स्वरूपाचीं म्हणजे देवादिकांसंबंधाचीं आहेत. हिटाइट लोकांच्या स्मारकविषयक वस्तु कॅपॅडोशियांत आणि तारस पर्वताच्या दोन्ही अंगांना खडकामध्यें कोरलेल्या वगैरे

यन्याच सापडतात, त्यावरून हें स्पष्ट दिसतें की ह्या अर्धवट सुधारलेल्या राष्ट्रांत कलाकौशल्याच्या बाबतींत स्वतन्त्र पद्धतीचें वैशिष्ट्य प्रगट करण्याचें बुद्धिसामर्थ्य नव्हतें. त्याचप्रमाणें राजकीय बाबतींत इजिप्त आणि असुरिया यांचें वर्चस्व झुगारून देऊन स्वतंत्र राष्ट्र राखण्याचेंहि सामर्थ्य नव्हते.

**मिटनि लोक**-*मिटनि हें प्राचीन महत्त्वाच्या राष्ट्रांपैकीं* एक आहे. इजिप्शियन लोक यांनाच नहाराइन म्हणतात, आणि बायबलमध्यें यांचा आराम-नहाराइम या नांवानें उल्लेख आहे. तथापि या राष्ट्राचा संगतवार असा इतिहास *अद्याप उपलब्ध झाला नाहीं. आधुनिक संशोधनांत मिटनि* राष्ट्रासंबंधीं कांहीं तुटक तुटक माहिती मिळाली आहे ती येणें प्रमाणें.-खि.पू १५८०त इजिप्तचा पहिला राजा तेहुतीमस यानें आशियावर स्वारी केली तेव्हां तो मिटनि राज्यावर चालून गेला होता सरहद्दीवर झालेल्या लढाईंत त्यानें मिटनीच्या राजाचा पराभव केला यावेळेपासून नाइल नदीच्या प्रदेशांतील लोक, आणि युफ्रेटीस नदीच्या प्रदेशांतील लोक यांचे सतत दळणवळण सुरू झालें खि पू. १५२२ त तिसरा तेहुतिमिस यानें मिटनीचें राज्य जिंकून घेऊन इजिप्तचें मांडलीक बनविलें. खि पू. १४७०-१४०० तेल एल अमर्ना येथील कागदपत्रांवरून या काळांत मिटनीच्या राज्यांत आर्तटन, अर्तडम, तुशर्त, दुश्रत्त या नांवाचे राजे होऊन गेले. या काळांत पुष्कळ मिसरी राजांनीं मिटनि येथील घराण्यांतील राजकन्यांशीं लग्नें केलीं होतीं यावरून या वेळीं मिटनी लोकांचें राज्य बरेंच महत्त्वास चढलें होतें असें दिसतें खि. पू १४०० या सुमारास मिटनी लोकांनीं हिटाइट लोकांशीं दोस्ती केल्याचें दिसतें आणि त्यांनीं हिटाइट लोकांना अनेक लढायांत मदतहि केली होती इजिप्तमधील १८ व्या घराण्याच्या अखेरीस इजिप्शियन लोकांना आमोराइट लोकांच्या देशांतून हाकून देण्यास मिटनी लोक कारणीभूत झाले होते यावेळीं मिटनी लोकांचें सामर्थ्य चढत्या स्वरूपांत होतें मिटनि लोकांनीं कानानाइट व बाबिलोनियन राजांशीं सख्य करून मिसरी लोकांबरोबर सतत झगडा चालविला होता खि पू १२२५त मिटनि लोकांचा राजा कुशन रिश-अथइम यानें सीरियावर स्वारी करून इस्त्रायल लोकांना आठ वर्षें बंदिवासांत टाकलें होतें. या नंतर आलेपो, हमात आणि दमास्कस हीं आरेमियन लोकांच्या ताब्यांत गेलीं होतीं, व यांतूनच नंतर दमास्कस, हमात, झोबाह वगैरे राज्यें स्थापन झालीं. मिटनि आणि मेसापोटेमियांतील आरेमियन राष्ट्रें यांची सत्ता असुरियन राष्ट्राचें सामर्थ्य वाढत गेल्यामुळें कमी झाली खि. पू ११२०त पहिला तिग्लथपिलेसर या असुरियन राजानें बराच मिटनीप्रांत जिंकला आणि तिसरा अशुरनसिरपाल यानें सर्वच मिटनी देश असुरियन राज्याला जोडला

**पॅलेस्टाइनचा प्राचीन इतिहास— प्रागैतिहासिक काल.**—पॅलेस्टाइनच्या प्रागैतिहासिक कालाविषयीं विचार करतां आधुनिक शास्त्रीय संशोधनानें कांहीं नवप्रस्तरायुधयुगासंबंधीं व प्राचीन प्रस्तरायुधयुगासंबंधीं शिलालेख उपलब्ध झाले आहेत, त्यावरून पॅलेस्टाइन प्रांतांत राहणाऱ्या प्राचीन मनुष्य प्राण्याचें चित्र काढण्याचा प्रयत्न करतां येईल. गेझर येथील एका स्मशान भूमींत अतिप्राचीन असे मानव शरीराचे अवशेष सापडले आहेत. त्यावरून पॅलेस्टाइनमध्यें *एका ठेंगण्या व किरकोळ परंतु पिळदार* बांध्याच्या, डोक्याची कवटी लांबट व चेहऱ्यावरील हाडें जाड व वजनदार असलेल्या एका मानवजातीचें अस्तित्व सिद्ध होतें. हे लोक गुहांतून किंवा ओबडधोबड झोंपड्यांतून रहात असून ते मेंढ्या, गाई, डुकरें इत्यादि ग्राम्य पशू पाळीत असत व त्याच्याच हाडांचीं निरनिराळीं हत्यारें व इतर उपकरणें घडवीत असत गेझर येथें सामान्यतः उंच बांध्याचा, चेहऱ्यावरील हाडाचीं पूर्ण वाढ झालेला व मजबूत असा जो मानव शरीराचा नमुना सापडतो तो इ सनापूर्वी ३०० वर्षांपूर्वीच्या इजिप्तमधील खोदकामांत आढळणाऱ्या मानव शरीराच्या नमुन्याशीं व अर्वाचीन तद्देशीय मानवशरीराशीं पूर्णपणें जुळतो परंतु त्या लोकांपासून पॅलेस्टाइन मधील प्राचीन लोक शरीरदृष्ट्या अगदीं निराळे दिसतात ऐतिहासिक दृष्ट्या प्राच्य मानव वंशाचा अभ्यास अद्याप अपूर्व स्थितींतच आहे, परंतु प्राचीन काळांत घडलेल्या गोष्टींची एकंदर परंपरा पाहिली असतां सेमाइट लोकांत त्यांच्या मूलगृहाच्या दक्षिण दिशेकडील व उत्तरेकडील कांहीं मानववंशाचें मिश्रण झाल्याचें दिसतें. पॅलेस्टाइन प्रांतास सेमिटिकभूमि असें नांव केव्हांपासून देतां येईल हें अनिश्चित आहे. त्याचप्रमाणें ह्या प्रांतांत, विशेषत जॉर्डन नदीच्या पूर्वेस असलेलीं भव्य दगडी स्मारकें हीं सेमिटिक भाषा व स्थान संज्ञा आणणाऱ्या मानववंशाच्या पहिल्या लाटेचीं दर्शक आहेत किंवा काय हेंहि अनिर्णीतच आहे. ज्या काळांत बाबिलोनिया, इजिप्त व क्रीट ह्या राष्ट्रांत एका अत्युच्च *संस्कृतीची भरती आली होती त्या काळांत* म्हणजे इ सनापूर्वीच्या तृतीय वर्षसहस्रकाच्या शेवटच्या शतकांत घडलेल्या घडामोडींत पॅलेस्टाइन देश बरोबरीनें वाटेकरी असावा असें त्या युगांतील पॅलेस्टाइन व इतर देश ह्यांमधील विशेष संघटनावरून व सुधारलेल्या मानवी जीवितक्रमावरून दिसून येतें, आणि इजिप्त ह्या प्राचीन राष्ट्रानें पॅलेस्टाइनमधील सुपीक शेताकडे वारंवार मोर्चा फिरविल्याचें जरी दिसतें तरी देखील पश्चिम दिशेकडे भूमध्यसमुद्रापर्यंत बाबिलोनिया थोडीबहुत सत्ता गाजवीत असल्याचें दिसतें

**इजिप्तची सत्ता.**—इसवी सनापूर्वी १७००च्या सुमारास इजिप्तवर स्वाऱ्या करणारे जे हिक्सॉस त्यांच्या काळांत, पॅलेस्टाइनच्या इतिहासाची रूपरेषा थोडी स्पष्ट दिसूं लागते. "जेकब" व "यनथ" ह्या विशेष नामांतील देवतावाचक शब्दावरून हे हिक्सॉस मूळ आशियाखंडांतील रहिवाशी असल्याचें दिसत आहे ह्या लोकांची इजिप्तमधून हकालपट्टी

झाल्यानंतर एक गोष्ट विशेष नजरेस येते ती ही की, पॅलेस्टाइन व सीरिया ह्या प्रांतांत युफ्रेटीस नदी पावेतों इजिप्तनें स्वाऱ्यांचें सत्र सुरू केलें होतें, व ज्याचें राजकीय ध्येय असुरिया व एशियामायनर ह्या देशांशीं निगडित झालें होतें अशा ह्या प्रदेशावर इजिप्तनें लागोपाठ जयपरंपरा मिळविल्यामुळें पुढें रूढ झालेल्या राजकीय धोरणाचा पायाच पक्क्या रीतीनें बसविला गेला.

बाबिलोनिया व इजिप्त ह्यांच्या वर्चस्वासंबंधींच्या काहीं त्रुटित गोष्टी वगळता, इसवी सनापूर्वीच्या१६व्या शतकापर्यंत पॅलेस्टाइन प्रांताचा स्पष्ट इतिहास सापडत नाहीं. ह्यानंतर मात्र पॅलेस्टाइनची इतिहासपरंपरा बरीच सुसंबद्ध आढळते. इ. स. १८८७ मध्यें सापडलेल्या अमर्नालेखांत पश्चिम आशिया व इजिप्त यामध्यें तिसऱ्या आणि चौथ्या ॲमेनोफिसच्या कारकीर्दींत (इ. सनापूर्वी १४१४–१३६०) काहीं वर्षें चाललेल्या राजकीय गोष्टींसंबधीं पत्रव्यवहार आहे. ह्याजमुळें प्रसिद्धीस आलेलें पहिलेंच बाबिलोनियन राजघराणें पूर्वकालांत मोडतें. वरील शिलालेखांतील भाषा व लिपि या एशियामायनरमधील हिटाइट लोकांत व सिरिया व पॅलेस्टाइन येथील राजेलोकांत प्रचलित होत्या. कालक्रमानुसार इजिप्तच्या वैभवास ओहोटी लागली व मध्यंतरीं असलेल्या भूप्रदेशाच्या मालकी हक्कांत हिटाइट हे इजिप्तचे प्रतिस्पर्धी बनले. मिटनी (उत्तर सीरिया व मेसापोटेमिया) ह्या बलाढ्य राज्यातून बाहेर पडलेल्या हिटाइट लोकांशीं संबंध असलेल्या इराणी लोकांनीं यरुशलेमपर्यंत आपले विशिष्ट सांस्कृतिक परिणाम घडवून आणले होते हें त्यावेळच्या व्यक्तिनामांवरून दिसतें. त्याचप्रमाणें सुक्रयाच जमीनींत सापडलेल्या अवशेषांवरून इजियन संस्कृतीबरोबर दिसून आलेल्या संबंधामध्यें भर म्हणून वरील कागदपत्रांनीं, मेलुहा (अरबस्तान) मेसापोटेमिया, व लिव्हॅन्ट या प्रांतांतून स्वाऱ्या करणाऱ्या लुटारू टोळ्यांचे उल्लेख केले आहेत. ह्या पॅलेस्टाइन प्रांतांतील लहान लहान शहरांवर बऱ्याच परस्थ राजांचा अम्मल होता. ह्यांपैकीं काहीं राजास इजिप्तच्या राजानें नेमलेलें होते इतकेंच नव्हे तर काहींस त्याच्या हातून राज्याभिषेक झाले होते. ह्या पौरराज्यांचे विस्तार किती लहान लहान असत हें अगदीं परस्परालगत असलेल्या यरुशलेम, गेझर, अस्कॅलॉन व लॅकिश ह्या ठिकाणच्या राजाच्या वारंवार आलेल्या उल्लेखांवरून स्पष्ट दिसतें. ह्या राजामध्यें जरी परस्परांशीं भाऊबंदकी व वैमनस्यें असत तरी इजिप्तच्या राजाची सार्वभौम सत्ता व अंतिम न्यायाधिकारित्व ते कबूल करीत व किरकोळ प्रसंगीं इजिप्तच्या राजास प्रतिरोध करण्यास मात्र ते एकत्र मिळत असत व आपापसांत परस्पर दोस्ती राखीत. समुद्र किनाऱ्यालगतचीं यरुशलेम इत्यादि नगरें सोडून देतां, चंदोबस्ताचा सारा भर उत्तरेकडे व विशेषतः अमूर ह्या पौरराज्यावर पडत असे. उपरिनिर्दिष्ट युग हें अंतस्थ बंडाळीचें होतें व सुफ्लोंनें व जलमार्गानें उत्तरमिरीया व आशियामायनर ह्या प्रांतांतून ह्याकाळीं वारंवार लुटारूचे जबरदस्त हल्ले होत असत. चोहोंकडे खळबळ माजून राहिली होती व एकीकडे इजिप्तच्या सार्वभौमत्वाची निष्ठा व दुसरीकडे उत्तरदिशेस चाललेल्या खळबळीशीं अंतस्थ तह यामध्यें पॅलेस्टाइन राष्ट्रास स्वतःच्या सामर्थ्यावर काहीं करणें अशक्य झाल्यामुळें त्याची स्थिति फार केविलवाणी झाली होती. ह्यावेळच्या कागदपत्रांत शत्रूच्या आगमनाचें हुबेहुब वर्णन केलें आहे, त्याच प्रमाणें पॅलेस्टाइन हें राष्ट्र इजिप्तशीं किती राजनिष्ठ आहे व त्या मानानें इतर लगतचे राजे इजिप्शियन सार्वभौमाशीं किती राजद्रोहपूर्वक वागतात इत्यादि गोष्टींबद्दल विवेचन आलें असून शेवटीं लेखकानें स्वतःच्या संशयित वर्तनाची माफी मागितली आहे. समुद्रकिनाऱ्याबद्दलच्या वैमनस्याचें वर्णन करणारे यरुशलेमचे कागदपत्र अत्यंत मजेचे आहेत. ह्यामध्येंच हबिरु नामक शेजारच्या लोकांनीं बराच गोंधळ माजवून दिल्याचें वर्णन आहे. "हबिरु" याचा 'हिब्रू" याशीं संबंध दाखविला जातो. त्यामध्यें मानववंशशास्त्रदृष्ट्या व इतिहासदृष्ट्या काहींच महत्त्व नाहीं. परंतु ह्या राजनिष्ठ मांडलिकांना मदत करण्याची इजिप्तच्या अंगांत ताकद नव्हती इतकेंच नव्हे तर प्राचीन मिटनी राष्ट्रानें आपलें राजकीय स्वातंत्र्य गमावलें होतें व हिटाइट लोकांची सत्ता स्थिर झाली होती. ह्या अमर्ना कागदपत्रांतून उपलब्ध झालेली तत्कालीन इतिहासपरंपरा, बोगझ्कुइ ह्या प्राचीन हिटाइट साम्राज्यांतील राजधानींत सापडलेल्या शिलालेखांतहि पुढें चालू आहे. त्यानंतरच्या इजिप्तमधील कागदपत्रांवरून असें दिसतें कीं, एकोणिसाव्या राजघराण्यांतील पहिला सेती ह्यानें इ. सनापूर्वी १३२० मध्यें पॅलेस्टाइनवर स्वारी केली. परंतु इ. सनापूर्वी १३०० च्या सुमारास दुसरा रामेसीस ह्याचा पॅलेस्टाइनपेक्षा थोडा जास्त प्रांत स्वतःकडे ठेवण्याबद्दलचा हिटाइट लोकांशीं मोठ्या शिकस्तीनें तह होईपर्यंत हिटाइट लोकांशीं भांडणें चालूच होतीं. हा प्रांत देखील मोठ्या मुष्किलीनें राखला गेला, कारण लिव्हॅन्ट व आशियामायनर यांतील बंडाळी व असीरियाचें पुनरुज्जीवन ह्या गोष्टी पश्चिम आशियाच्या राजकीय इतिहासाची पुनर्घटना करीत होत्या.

तिसऱ्या रामेसीसच्या कारकीर्दींत म्हणजे ख्रि. पू. १२००–११६९च्या सुमारास पॅलेस्टाइन प्रांतांत पुनः बंडाळी सुरू झाली. फिलिस्टाइन लोकांचा त्या चळवळीशीं बराच संबंध होता. तथापि इजिप्तनें आपली राजसत्ता पुन्हा बरीच विस्तृत केली व पॅलेस्टाइन आणि सिरियाचा काहीं भाग परत मिळविण्यांत रामेसीस यास बरेंच यश आलें. सबंध आशियाखंडापासून पॅलेस्टाइन प्रांत तुटक राखून आपल्या अंकित ठेवण्याचा प्रयत्न करणाऱ्या इजिप्तची कारकीर्द संपुष्टांत आली होती आणि ह्या पॅलेस्टाइन प्रांतासहि आपल्या

नैर्ऋत्य दिशेस असणाऱ्या बलाढ्य इजिप्शियन साम्राज्याची सत्ता जाणवूं लागली होती. थोड्या कालानंतर तिग्लथ-पिलेसर यानें इ. सनापूर्वी ११०० च्या सुमारास असुरियन साम्राज्यसत्तेचा विस्तार पूर्वीच्या मोठ्या हिटाइट साम्राज्याच्या सत्तेखालीं असणाऱ्या पश्चिमेकडील भूप्रदेशावर लोंवपर्यंत वाढविला ज्या कालासंबंधीं बाह्य पुरावा फारच थोडक सापडतो त्या ह्या कालातच नवीन नवीन राजकीय घडामोडी होऊं लागल्या व नवीन नवीन चौरराज्यसंघ अस्तित्वात येऊं लागले राजकीय दृष्टीनें पॅलेस्टाइन प्रांत इजिप्शियन किंवा हिटाइट साम्राज्याचा भाग झाला होता. परंतु ह्यानंतरच्या कालात पॅलेस्टाइनचा इस्रायली इतिहासाशीं बराच निकट संबंध येतो.

**अमर्ना काल.**—ज्या बलाढ्य राष्ट्रांच्या इतिहासाशीं व संस्कृतीशीं पॅलेस्टाइन बरींच शतकें निगडित झाला होता त्यापैकीं कोणाहि राष्ट्रानें अद्यापपर्यंत त्या प्रांतास पूर्णपणें आत्मसात् करून घेतलें नव्हतें ह्या अमर्ना कालात वरील छोट्या राजांनीं इजिप्शियन राजकीय कारवानाचे व्यापाराचे रस्ते सुरक्षित राखणें, खडणी देणें, सार्वभौम सत्तेविरुद्ध कट न करणें व सामान्यपणें सार्वभौमसत्ता व तिचे प्रतिनिधी याची बाजू उचलून धरणें इत्यादि गोष्टी संभाळल्या म्हणजे त्यास एक प्रकारचें स्वातंत्र्यच असे. एकंदर प्रदेशावर बाबिलोनियन संस्कृतीनें जरी बरेच दृढ परिणाम घडविले असले तरी जमिनींतून सापडलेल्या अवशेषामध्यें ह्या संस्कृतीच्या अगदीं फारच थोड्या विशिष्ट गुणा दिसून येतात. कीलाकृति शिलालेखाचा अभ्यास केला असता त्यातील पॅलेस्टिनियन अक्षरावरून असें दिसतें कीं, तद्देशायाची मूळ भाषा अगदीं प्राचीन व्यक्तिनामाप्रमाणें मागाहून प्रचलित झालेल्या 'कॅनेनाइट' ( हिब्रू, मोवाइट व फिनिशियन ) या भाषासारखीच असावी पॅलेस्टाइन, मिटनी व हिटाइट याचे परस्पर संबंध विचारात घेता हे उघड दिसतें कीं, बाबिलोनियन संस्कृतींचे ह्या देशावरील परिणाम अप्रत्यक्ष रीतीनें झालेले असावेत आणि जोंपर्यंत खऱ्या बाबिलोनियन गोष्टींचा निर्णय झाला नाहीं तोंपर्यंत केवळ सादृश्यावरून कसल्याहि तऱ्हेचीं अनुमानें काढणें गैर होईल. वरिष्ठ सत्तेचा शासित लोकाच्या संस्कृतीवर कांहींच परिणाम होत नाहीं हें म्हणणें अर्थातच प्रशस्त होणार नाहीं. परंतु इतिहासावरून असें ठरलें आहे कीं, अशा तऱ्हेचा परिणाम होणे त्या दोन समाजातील बाह्य व आंतर सादृश्यावर अवलंबून असतें आणि हा परिणाम नेहमीं दृढ किंवा टिकाऊच होईल असें म्हणतां येत नाहीं. इजिप्तची परिस्थिति तर वरील सिद्धातास जास्तच अनुकूल आहे, तथापि इजिप्तच्या वसाहतींचें अस्तित्व इजिप्तमधील उपासनासंप्रदाय, इजिप्तच्या धर्ताचीं देवालयें व मूर्ती यांची स्थापना हे व अशासारखे परस्पर संबंधदर्शक दुसरे जमिनींतून सापडलेले अवशेष इत्यादि गोष्टी लक्षांत घेता देखील, पॅलेस्टाइन प्रांताची संस्कृति इजिप्तमधील म्हणण्यापेक्षा आशियामधील म्हणणेंच अधिक सयुक्तिक होईल. आशियामधील संस्कृतींचा परिणाम इजिप्तला सुद्धा हिक्सॉस कालापासून व पुढें पुढें अठराव्या व त्या पुढील राजघराण्याच्या अमलात जास्तच जाणवूं लागला होता, व सीरिया पॅलेस्टाइनमधील प्रसिद्ध देवताना ( रेशेफ, बाल्, अनथ्, किटेशचा बॅलथ्, कडेश्, अॅस्टर्ट् ) बरेच महत्त्व प्राप्त झालें. सामान्यतः त्यावेळच्या संस्कृतींचा व विचारविकासाचा मूलभूतपाया एकच असून, त्यामध्यें परिस्थित्यनुरूप स्थानिक, जातिविशिष्ट अगर राष्ट्रीय वाढीमध्यें काय फरक पडतो तेवढाच. कारण एकंदर सेमेटिक प्रथातील पारमार्थिक कल्पनाचें इजिप्तमधील पारमार्थिक कल्पनाशीं बरेंच साम्य आहे आणि बऱ्याच शतकाचा इतिहास दाखविणार इजिप्तमधील किंवा कीलाकृति शिलालेख व इतर विशेष पुरावा म्हणजे अमर्ना कागदपत्रें, आर्मिनियातील कॅनानाइट शिलालेख, जुना करार व त्यानंतरचें यहुदी वाङ्मय इत्यादींमध्यें अशाच तऱ्हेची त्या भूभागातील आचारविचारविषयक साप्रतच्या परिस्थितीपर्यंत तुलना केली तर पुष्कळच नवीन नवीन माहिती मिळेल व त्यावरून पुढील तीन गोष्टींबद्दलच्या अनुमानास बरीच बळकटी येईल

( अ ) धार्मिक, सामाजिक व राजकीय जीवनक्रमातील चिरकालिक दृढ संबंध.

( आ ) प्रचलित असलेल्या सर्वसामान्य धार्मिक समजुती व त्याचीं कांहीं एक विशिष्ट तऱ्हेनें झालेली वाढ ह्यामधील भेद.

( इ ) इतिहासदृष्ट्या ह्या विशिष्ट वाढीतील फेरबदल अगर स्थित्यंतरें.

**परमार्थसंप्रदाय.**— अमर्ना कालातील पॅलेस्टाइनमधील परमार्थसंप्रदाय म्हणजे केवळ कांहीं अपरिपक्व व अस्पष्ट कल्पनाच्या स्वरूपात नव्हता एवढें स्पष्ट होण्यास पुष्कळ जागा आहे. आधिभौतिक प्रगतीप्रमाणें हा संप्रदायहि प्राथमिक अवस्थेपलीकडे गेला असून तो पूर्ण विकास पावलेला जरी नसला तरी त्याचें स्वरूप बरेंचसें परिणत झालेलें दिसतें. उत्तरकालाप्रमाणें प्राचीन कालींहि विशिष्ट स्थानाशीं संबद्ध अशा पुष्कळ स्थानिक देवता होत्या परंतु सामान्यतः त्याच्या उपासनेचे प्रकार सर्वत्र सारखेच होते. व्यापारी व राजकीय दळणवळणामुळें अनेक दैवतें कांहीं त्याच्याबद्दलच्या वास्तविक पूज्य बुद्धीमुळें, कांहीं त्याना पूर्वकालीं असलेल्या महत्त्वामुळें व कांहीं राजकीय सत्ताधाऱ्यांनीं लादल्यामुळें प्रचारात आलीं. अमर्ना कागदपत्रावरून ही गोष्ट स्पष्ट होते कीं, इजिप्तच्या राजकीय सत्तेबरोबरच तेथील साप्रदायिक सत्ताहि मान्य करावी लागे अर्थात् राजनिष्ठ असे पॅलेस्टाइनचे सत्ताधीश हे आपला देश इजिप्तच्या राजाच्या व इजिप्तातील राष्ट्रीय दैवताच्या मालकीचा आहे असें कबूल करीत.

त्याचप्रमाणें मानवी अंतःकरणामध्यें नेहमीं वास करणाऱ्या श्रद्धेनुरूप राजसत्ता ही मानुष व दैवी गुणांनीं मिश्रित अशी संस्था मानली जात होती व 'फॅरो' हा 'ॲमनरे' या देवतेचा अवतार मानला जात असे या समजुतीमुळें स्थानिक दैवतसंप्रदायांत एकतन्त्रीपणा येऊन सुसंगत उपासनापद्धति उत्पन्न झाली असावी. मांडलिक राजे स्वाभाविकपणें फॅरोचें ईश्वराशीं तादात्म्य मान्य करीत व आपल्या दैवतसंप्रदायांत त्याला सर्वांत श्रेष्ठ स्थान देत म्हणूनच *कीलाकृति लेखांत त्याला 'शामाश्' किंवा 'अडू' ह्या* संज्ञा लावल्या आहेत. ह्यांपैकीं पहिली सूर्यदेवता पॅलेस्टिनियन लोकांस ज्ञात होती हें 'बेथ्-शामस्' ह्या सारख्या स्थलनामावरून दिसतें दुसरी 'अडू' ही वायुदेवता किंवा पर्जन्यदेवता असून *ती पश्चिमआशियाकडील आहे व* तिचें 'हदद' किंवा 'रम्मन्' या देवताशीं ऐक्य असण्याचा संभव आहे बहुशः ही देवता मेघगर्जना, वीज व *वेल यांशीं संबंध असणारा 'बाल' नामक देवच असावा* कारण तो इजिप्तच्या एकोणिसाव्या व विसाव्या घराण्यांतील राजेलोकांस त्यांच्या दैवीगुणयुक्त मूळ राजाच्या स्तुतींत परिचित आहे तानक येथें सांपडलेल्या एका खाजगी कीलाकृति शिलालेखांत उल्लेखिलेला 'देवांचा अधिपति' हाच असावा ह्या किंवा अशाच आणखी प्रसिद्ध असलेल्या देवांशिवाय 'अशीर', व 'एस्टार-अस्टार्ट' ह्या दोन देवांगनाहि *आढळून येतात यहवेह् या देवतेचें नांव पॅलेस्टाइन*मध्यें रूढ असावें, परंतु तें प्रामुख्यानें आढळून येत नाहीं यावरून दुसऱ्या कित्येक देवतांप्रमाणें ह्या देवतेची पूजाहि राजकीय परिस्थितीमुळें प्रसार पावली *असावी असें दिसतें* असो याप्रमाणें पॅलेस्टाइनसंबंधीं प्राचीन माहिती मिळते *यापुढील माहिती व यहुदी आणि खिस्ती संप्रदायाचा विकास* हे विषय चौथ्या विभागांत यथाक्रम येतीलच आतां त्या वेळचें प्रसिद्ध व्यापारी राष्ट्र फिनिशिया त्याकडे वळू

**फिनिशिया-देशासंबंधीं**—प्राचीन काळीं "फिनिशिया" या नांवानें प्रसिद्ध असलेल्या प्रदेशांतील मुख्य शहरें अमर्ना" कागदपत्रांवरून व इजिप्शियन, असुरियन आणि जुन्या कराराँतील लेखांवरून समजण्यासारखीं आहेत तीं येणें प्रमाणें—(१) अर्को (प्रस्तुत 'एकर" किंवा अक्का या नांवानें प्रसिद्ध आहे), (२) ॲक्झिब (ह्याचें नांव एझिब,) (३) अहलाब, *टायरच्या दक्षिणेस समुद्रकिनाऱ्यावर* असलेलीं तीन शहरें, (४) कान्हा, (५) टायर, (६) झरेफाथ *किंवा सरेप्टा (हलीं सरफंद या नांवानें ज्ञात असलेलें),* (७) सिडन (हल्लींचें नांव सैदा), (८) बेरिस (ह्याचें नांव बैरत), (९) बिब्लस (हल्लींचें नांव जिबैल), गिडनच्या उत्तरेस, (१०) अर्वाद, (११) सिन, (१२) सिमिर (हल्लींचें नांव सुम्रा), (१३) मॅरॅथस (हल्लींचें नांव अमृत) इत्यादि

**वंश व भाषा**—फिनिशियन लोक हे मूळचे सेमिटिक वंशांत उत्पन्न झाले असून कनानाईट शाखेचे होते, अर्थात कनानाईट लोकहि सेमिटिकच होते. ते सेमिटिक नव्हते असा ध्वनि जुनाकरार काढतो *कनान लोकांचा आद्य पुरुष जो* "सिडन" तो इजिप्शियन वंशस्थापक "हॅम" याचा वंशज होता असें जुन्या करारांत विधान आहे तथापि जुन्या करारांत दिलेली राष्ट्रांची वंशावळ ही कांहीं मानवजातिशास्त्राच्या अगदीं नियमाबरहुकूम दिलेली नाहीं, कदाचित *हिब्रू लोक व कनानाइट लोक यांच्यामध्यें जो धार्मिक* —म्हणजे आचाराच्या बाबतींत—विरोध होता त्यामुळें कनानाईट लोकांचे पूर्वज आपल्या पूर्वजांहून निराळे होत आणि फार प्राचीन काळापासून फिनिशियन व इजिप्शियन लोकांचा जो निकट संबंध होता त्यावरून ते दोन्ही लोक एकाच वंशांतले होत असें हिब्रूंस वाटणें स्वाभाविक आहे पूर्वेकडील समुद्राच्या कांठीं असलेल्या आपल्या पूर्वीच्या स्थानापासून देशांतर केल्याबद्दलचा फिनिशियन लोकांचा स्मृति कायम होता (त्या समुद्रास हिरोडोटस हा 'तांबडा समुद्र" असें म्हणतो कदाचित् त्याचे मनांत त्यास इराणचें आखात" म्हणावयाचें असावें) येणें प्रमाणें परंपरागत आख्यायिकांवरून तरी आपले पूर्वज मूळ बाबिलोनियामधून आले होते अशी फिनिशियन लोकांची समजूत होती असें दिसतें सिरियाच्या किनाऱ्यावर राहूं लागल्यापासून *फिनिशियन लोकांमध्यें दर्यावर्दी जीवनक्रमाची* आवड वाढत गेली व त्याच्या चालीरीतींत आणि *अंत प्रदेशांत राहणाऱ्या कनानाईट लोकांच्या चालीरीतींत* *बरीच तफावत पडत गेली असावी ते आपणास कनानाईट* व आपल्या प्रदेशास कनान म्हणूं लागले "अमर्ना" *शिलालेखांत त्यास हेंच नांव दिलेलें आहे त्याच प्रमाणें* हिकाटिअसच्या लेखांतहि तशा प्रकारचा उल्लेख आहे जुन्या करारांत मधून मधून "फिनिशिया" व 'फिनिशियन लोक" यांच्या बद्दल 'कनान" व "कनानाईट" असा शब्द *प्रयोग केलेला आढळतो*

**भाषा**—शिलालेख, नाणीं, ग्रीक व लॅटिन ग्रंथकारांनी रूढ केलेलीं स्थलवर्णनपर नांवें प्लॅटसच्या 'पिन्यूलस' नामक हास्यरसप्रधान नाटकांत आढळणारी स्त्रीपुरुषांचीं नांवें आणि कार्थेजवर्णनपर भाग इत्यादि सर्व पुराव्यांवरून हें निर्विवाद सिद्ध होतें कीं, फिनिशियन भाषा ही उत्तरसेमिटिक शाखेच्या कनानाईट नामक उपशाखेंतून निघालेली असून तिच्यांत *हिब्रू व मोआबी या दोन भाषांचा अंतर्भाव होतो. व्याकर*णाच्या रूपांच्या दृष्टीनें किंवा शब्दसंग्रहाच्या दृष्टीनें कोणत्याहि तऱ्हेनें तुलना *केली तरी* फिनिशियन व हिब्रू भाषेमध्यें बरेंच साम्य दिसून येतें *फिनिशियन भाषेंत कांहीं ठिकाणीं जुनीं लक्षणें कायम टिक*लेलीं दिसून येतात, कांहीं ठिकाणीं नवीन लक्षणें आढळतात तर कांहीं ठिकाणीं त्या भाषेचीं विशिष्ट लक्षणें दृष्टोत्पत्तीस

पडतात. काव्यविषयक, अप्रसिद्ध व फार क्वचित उपयोगांत आलेले असे बरेचसे हिब्रू भाषेतले शब्द फिनिशियन भाषेत नित्याच्या परिपाठातले आहेत. यावरून असें अनुमान निघतें की, एका मूळ भाषेपासून या दोन भाषांची उत्पत्ति व स्वतंत्र विकास झाला असला पाहिजे आणि ती मूळ भाषा म्हणजे प्राचीन कनानाइट ही होय. या भाषेतील कांहीं शब्द 'अमर्ना' लेखात पहावयास सांपडतात. परंतु एकंदर फिनिशियन भाषेचें महत्त्व अजमावण्यास आपलेपाशीं साधनसामुग्री अगदीं अपुरी व मर्यादित आहे हें लक्षात घेतलें पाहिजे. फिनिशियन लोक कोणत्याहि दृष्टीनें विद्याव्यासंगी नव्हते. त्यांचे बहुतेक अंकित लेख इ. स. पूर्वी सहाव्या शतकाच्या नंतरचे आहेत. त्यातहि बरेचसे लेख इ. स. पूर्वी चौथ्या शतकातले आणि त्यानंतरचे आहेत, त्या वेळेस फिनिशियन भाषेस उतरती कळा लागली असावी, फिनिशियन लोकांनीं एका बाबतींत मात्र वाङ्मयाची उत्तम सेवा केली आहे आणि ती म्हणजे त्यांनीं वर्णबोधक लिपीचा उत्तम विकास व प्रसार केला. त्या भाषेतील वर्णमालेनें ग्रीक व इतर सर्व पाश्चात्य लिपींचा पाया घातला असें म्हणण्यास हरकत नाहीं, हिंदुस्थानातील लिपी देखील फिनिशियन लिपीपासून निर्माण झाल्या असा पुष्कळ संशोधकांचा समज आहे. फिनिशियन भाषेतील मूळचे वर्ण बहुतेक हिब्रू, मोआबी आणि उत्तर सीरियातील अरेमियन लोकांच्या वर्णासारखे होते. कालांतरानें त्याच्यात नाना प्रकारचे फेरबदल झाले. मूळ जन्मभूमी सोडल्यानंतर सायप्रस व अॅटिका या ठिकाणच्या शिलालेखात दिसून येणारी लिपी अधिक धांवत्या व जलद रीतीनें लिहिलेली दिसून येते आणि कार्थेजच्या भरभराटीच्या काळात तर त्या लिपीची ही धांवती मोडणी विशेष स्पष्टपणें दिसून येते. कार्थेजच्या ऱ्हासापासून इ. स. पहिल्या शतकापर्यंत फिनिशियन लोकांची भाषा व लिपी या दोन्हींहि अत्यंत अवनतीप्रत गेल्या आणि अखेर उत्तरआफ्रिकेंत इ. स. पाचव्या शतकापर्यंत ही वशीतरी अस्तित्वात होती पण तिला एक "गावठळ भाषा" यापेक्षा जास्त महत्त्व नव्हतें,

इतिहास.—इजिप्शियन लोकांप्रमाणें फिनिशियन लोक आपलीं प्राचीन शहरें प्रत्यक्ष देवांनीं वसविलीं आहेत आणि आपला वंश तीस हजार वर्षांपासून चालत आलेला आहे असें मोठ्या अभिमानानें प्रतिपादन करीत असत. हिरोडोटसनें एका आख्यायिकेच्या आधारें ही वंशोत्पत्तीनी कालगणना इ. स. पूर्वी २७५६ पर्यंत नेऊन ठेवली आहे. जस्टिनच्या मतानें ट्रॉयच्या नाश होण्यापूर्वी एक वर्ष फिनिशियन लोकांनीं "टायर" शहर वसविलें, मिनेंडरच्या कालगणनेप्रमाणें "टायर" चा शक इ. स. ११९८ वर्षी सुरु झाला. परंतु या सर्व आख्यायिकांच्या आधारावर केलेल्या कालगणनास विशेष किंमत देता येत नाहीं.



कार्थेज.—कार्थेजच्या स्थापनेसंबंधीं पुढील माहिती आढळते.

अतिशय प्राचीन काळापासून फिनिशियन खलाशी आफ्रिकेच्या किनाऱ्याकडे येत व अर्वाचीन ट्यूनिस ज्या ठिकाणीं सध्या वसलें आहे त्या भागात रहाणाऱ्या लिबियन जातीशीं त्यांचें व्यापारानिमित्त दळणवळण असे, यापूर्वीच इ. स. पूर्व १६ व्या शतकात सिडॉनच्या लोकांचीं या किनाऱ्यावर व्यापारी ठिकाणें होतीं; यूटिका येथील टायर वसाहतीशीं स्पर्धा करण्याच्या हेतूनें त्यांनीं पुढील काळात कार्थेज शहर ज्या जागीं वसलें त्याच जागीं बरोबर क्याम्बे किंवा ककॅम्बे नाचें व्यापारी ठिकाण स्थापिलें, बोर्ज-ओदद जवळ या प्राचीन वसाहतीचे विश्वसनीय अवशेष सापडले आहेत. तरी तिच्या इतिहासाविषयीं अद्याप कांहीं माहिती मिळालेली नाहीं टायर येथील लोकांनीं आपला देश सोडून येऊन इ. स. पू. सुमारें ८५० त कार्थेज शहर स्थापिलें. त्यावेळीं मटन ( १ ला ) या राजाची कन्या एलिसा किंवा एलिझर हिनें त्याचें पुढारीपण पत्करिलें होतें अशा तऱ्हेची एक वाङ्मयीन कथा आढळते.

इजिप्शियन लोकांचा अंमल.—खि. पू. १६००–११००—इ. स. पूर्वी सुमारें १६०० व्या वर्षी इजिप्त देशाच्या अमेनोफिस नामक राजानें प्रथम सिरियावर स्वारी करून पॅलेस्टाइन आणि फिनिशिया हे प्रांत पादाक्रांत केले, त्यानंतर पहिला टेथमॉसिस यानें ती युफ्रेटीजपर्यंत स्वारी केली. तिच्यापासून काय फलनिष्पत्ति झाली हें जरी सांगता येत नाहीं तरी तिसरा टेथमॉसिस यानें पुन्हा स्वारी करून सिरिया व फिनिशिया यांतील लहान लहान संस्थानावर इजिप्शियन लोकांचा अंमल बसविला हें अनेक प्रमाणांनीं सिद्ध करून दाखविता येण्यासारखें आहे विशेषतः अमर्ना लेखात आढळणाऱ्या तत्कालीन फिनिशियन मांडलिक राजांच्या पत्रावरून व फिनिशियावर अंमल चालविण्यास धाडलेल्या इजिप्शियन सुभेदाराच्या पत्रावरून इ. स. पूर्वी पंधरासें ते चवदासें वर्षांच्या दरम्यान फिनिशिया देशाची काय स्थिति होती याविषयीं बरीच माहिती उपलब्ध होते, फिनिशियात तो काळ राजकीय उलाढालींचा होता. सिरियावर हिटाइट लोकांच्या स्वाऱ्या होत होत्या, त्यास रानटी लोकांची मदत असे; साधल्यास इजिप्शियन लोकांचा अंमल झुगारून द्यावा या हेतूनें पुष्कळ स्थानिक सरदार तसल्या संधीचा फायदा करून घेत होते. फिनिशियांतील शहरात दोन पक्ष होते; अराडस, सिमिरा व सिडन हीं शहरें इजिप्तच्या विरुद्ध बंड करण्यास अनुकूल होतीं, बिब्लसचा जहागिरदार रिब्हादद व टायरचा राजा अबिमिलेख हे इजिप्तच्या बाजूचे होते; जीं जीं शहरें राजनिष्ठ असल्याबद्दल बढाया करीत तीं वास्तविक स्वतःचे हित साधण्यांत गुंतलेलीं असत; याचा

परिणाम असा झाला कीं, विब्लस खेरीजकरून इतर सर्व शहरांनीं इजिप्तचा अमल झुगारून दिला, ही हकीकत ज्या शिलालेखावरून उपलब्ध झाली आहे ते बाबिलोनियन भाषेंत व लिपींत लिहिलेले असल्यामुळें त्यावरून पॅलेस्टाइन व फिनिशिया या देशांत बाबिलोनियन संस्कृतीचा किती प्रसार झाला होता व कनानाइट शहरें आणि सत्ताधीश इजिप्त यांचा किती निकट संबंध होता हें कळून येतें चौथ्या अमेनोफिसच्या कारकीर्दीनंतर इजिप्शियन लोकांचा अमल सर्वस्वी नाहींसा झाला, परंतु त्याच्या वंशजानीं तो फिरून प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला आणि दुसरा रामेसीस यानें बैरूतपर्यंत सर्व फिनिशिया पादाक्रांत केला आणि आपला विजय संस्मरणीय करण्याकरितां तीन शिलालेख खोदवून ठेविले यापुढें तिसऱ्या रामेसीसच्या कारकीर्दीत आशियामायनर व युरोप इकडील लोकांच्या सिरियावर स्वाऱ्या झाल्याकारणानें बरेच फेरबदल घडून आले तिसऱ्या रामेसीसनंतर त्याच्या वंशाचा कनानवरील अमल नाहींसा झाला इ स पूर्वी सुमारें ९२८ व्या वर्षी शशाक नावाच्या इजिप्शियन राजानें पूर्वीप्रमाणें फिनिशियावर इजिप्तची सत्ता प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला परंतु त्याला फारसें यश आलें नाहीं आणि जुन्या करारांत नमूद करून ठेवल्याप्रमाणें इजिप्तचा सत्ता यापुढें बहुतेक अस्तंगत झाला सीरियामध्यें असुरियन लोकांची सत्ता प्रस्थापित होण्यापूर्वीच्या काळांत फिनिशियन लोकांवर कोणाचाहि अमल चालू नव्हता हा काल त्यांच्या प्रगतीचा होता आणि याच वेळीं टायर हें फिनिशियाचें मुख्य शहर झालें

**फिनिशिया देशाचा स्वतंत्रतेचा काल**—सीरियामधून इजिप्शियन लोकांचा अमल नष्ट झाल्यानंतर आणि असुरियन लोकांची पश्चिमेकडे चाल सुरू होण्यापूर्वी या मध्यंतरीच्या काळांत फिनिशियाच्या पौरराज्यावर ( पौरराज्य म्हणजे शहर व त्याच्या भोंवतालचा प्रदेश यांचें संस्थान ) कोणाचाहि अमल चालू नव्हता या काळचा फिनिशियाचा इतिहास म्हणजे मुख्यत्वेंकरून टायर शहराचा इतिहास होय या वेळीं टायर शहर हें सर्व फिनिशियन संस्थानामध्यें अग्रेसर झालें इतकेंच नव्हे तर लांब लांबच्या प्रदेशीं त्यानें आपल्या वसाहती स्थापन केल्या इ. स पू ९७०—९३६ इतकीं वर्षे अबिबालचा मुलगा पहिला हिराम यानें टायरवर राज्य केलें त्यानें टायरचा पूर्वेकडे विस्तार करून जुन्या देवालयांच्या दुरुस्त्या केल्या व त्यास मोठाल्या देणग्या दिल्या हिरॅक्लीज व अस्टार्टी यांचीं नवीन देवालयें बांधलीं, "हिरॅक्लीसच्या जागृती" बद्दल उत्सव करण्याचा प्रघात सुरू केला आणि युटिकाच्या रहिवाश्यांवर आपला पूर्ण अमल बसविला यापूर्वी फिनिशियन लोक व इस्रायल लोक यांच्यांत जरी सलोखा होता तरी त्याच्या कारकीर्दीत तो अधिक दृढ झाला त्यामुळें हिराम व इस्रायल लोकांचा राजा सॉलोमन यांच्यामध्यें बऱ्याच नजराण्याची देवाणघेवाण होत होती. शेवटीं देवालय बांधण्याकरितां हिरामकडून सॉलोमनकडे जो सुवर्णनिधि अर्पण करण्यांत आला त्याचा मोबदला म्हणून हिरामला "गॅलीलीचा" कांहीं भाग मिळाला इतकेंच नव्हे तर या दोन राजाच्या मैत्रीमुळें त्या दोघांनीं मिळून व्यापाराच्या अभिवृद्धीसाठीं "एझिआनगेबर"पासून तों "ओफीर" पर्यंतच्या प्रदेशावर स्वाऱ्या केल्या हिरामनंतर टायरच्या गादीवर निरनिराळ्या घराण्यांतील राजे बसले, परंतु अस्टार्टीचा धर्मगुरु पहिला इथोबाल हा राज्य करूं लागल्यापासून त्याला जास्त व्यवस्थित स्वरूप प्राप्त झालें पहिल्या हिरामला "टायरचा राजा" म्हणत असत तर इथोबाल यास 'सिडोनियन लोकांचा किंवा फिनिशियन लोकांचा राजा" या नावानें संबोधीत यावरून टायरच्या राजांनीं फिनिशियाच्या इतर शहरांवर आपला अमल बसविला होता असें दिसून येतें एथबॉलच्या कारकीर्दीत राज्याचा अधिक विस्तार झाला विब्लसच्या उत्तरेस बाट्रिस आणि उत्तरआफ्रिकेंत एऔझा हीं शहरें त्यानें वसविलीं आणि त्याच्या मागून होऊन गेलेल्या पहिल्या मटनच्या मृत्यूनंतर जे अंत कलह उपस्थित झाले त्यांत सुप्रसिद्ध कार्थेज शहराचा पाया घातला गेला असें म्हणतात केवळ आख्यायिकेवरून पाहिलें तर मटनचा पुत्र पिग्मॅलियन ( ८२०-७७३ ) यानें जेव्हां आपल्या एलिसा नावाच्या बहिणीच्या पतीस मारलें तेव्हां तिनें टायरमधून आपला पाय काढला आणि लिबियामध्यें जाऊन कार्थेज शहराचा पाया घातला अशीहि एक दंतकथा आहे

**असुरियन लोकांचा अमल**—इ स पूर्वी ८७५-६०४-एथबालच्या कारकीर्दीनंतर असुरियाच्या उत्कर्षाची चढती कमान झाली आणि त्यामुळें फिनिशियाच्या स्वातंत्र्यावर गदा आला इ स पूर्वी ११००वर्षी पहिला तिग्लथपिलेसर यानें उत्तर फिनीशियावर स्वारी केली आणि समुद्र किनाऱ्यावरील एखादें बंदर हस्तगत करण्याच्या हेतूनें त्यानें अर्वद ( अराडस ) हें शहर काबीज केलें. परंतु त्यानंतर तेथें कोणी कायमची वसाहत केली नाहीं इ स पूर्वी नवव्या शतकापासून मात्र असुरियानें आपला मोर्चा पद्धतशीर,रीतीनें पश्चिमेकडे वळविला इ स पूर्वी ८७६ व्या वर्षी तिसऱ्या असुर नसिरपालनें "आपलीं हत्यारें महासमुद्रांत धुतलीं" आणि टायर, सिडन, बिब्लस अर्वद व इतर शहरें यांच्या राजापासून खंडणी वसूल केली टिरियन व सिडोनियन लोकांपासून ८४९ त व फिरून ८४६ त खंडणी वसूल केल्याबद्दल, ८४६ त बिब्लियन लोकांपासून ती वसूल केल्याबद्दल आणि ८५४ किंवा ८०३ मध्यें करकर येथें ज्या राजाचा पराभव झाला त्यांत अर्वदाच्या लोकांचा राजा मेटन बॉल असल्या बद्दल असुरमणिपालचा पुत्र दुसरा शाल्मनसर याच्या खोदीव लेखांत

नमूद केलेलें आहे. येणेंप्रमाणें शालमनसर यानें फिनीशियाच्या किनाऱ्यावर त्याच्या पित्यानें सुरू केलेल्या स्वाऱ्या यशस्वी रीतीनें तडीस लावल्या आणि तेथें आपलें वर्चस्व प्रस्थापित केलें. हें वर्चस्व एका शतकापेक्षा अधिक काळपर्यंत चालू होतें आणि त्याच्या कबुलीदाखल जित लोकांपासून मधून मधून खंडणीहि वसूल करण्यांत येत होती. परंतु कालांतरानें फिलिस्टिया, जूडा, इजिप्त, एथिओपिया इत्यादि देशांच्या राजांनीं एक संघ स्थापन करून असुरियाची जुलमी राजसत्ता उलथून पाडण्याचा प्रयत्न सुरू केला. या वेळीं आपल्या नेहमींच्या पद्धतीस अनुसरून फिनिशियाचीं पौरराष्ट्रें त्या सर्वसाधारण शत्रूच्या विरुद्धहि एकत्र झालीं नाहींत आणि त्यांपैकीं कित्येक पौरराष्ट्रें टायरचा संबंध तोडून असुरियाला जाऊन मिळालीं. इ. स. पूर्वी ७०१ या वर्षी जें एक मोठें युद्ध झालें त्यांत असुरियन राजा सिनाखेरीब हा या बंडखोर पौरराष्ट्रावर चालून गेला आणि त्यानें सिडोनचा राजा लुली याचा पराभव करून त्यास सायप्रसकडे पळवून लाविलें. त्याचीं मुख्य मुख्य शहरें घेतलीं आणि वार्षिक खंडणी देण्याचें अभिवचन घेऊन टुबाल (एथबाल) यास त्याच्या गादीवर बसविलें. सिनाखेरीबच्या शिलालेखांत टायरच्या वेढ्याचा उल्लेख नसावा हें आश्चर्य आहे. तथापि मिनॅन्डरनें त्या वेढ्याचें वर्णन दिलेलें आहे. त्या वेढ्यांत टायर शहर जरी टिकून राहिलें तरी "एल्यूलासचें विस्तीर्ण राज्य" म्हणून जो त्याचा एवढा मोठा विस्तार झाला होता त्या सर्वांस त्यास मुकावें लागलें. शिवाय टायर व सिडोन या दोन पौरराष्ट्रांच्या जुटीमुळें जे त्याचें प्रस्थ माजलें होतें तें ह्मणून पाडण्याचा सिनाखेरीबचा उद्देश या योगानें तडीस गेला. सिडोन येथें एथबॉलच्या नंतर अब्दमिल्काथ हा त्याच्या गादीवर आला होता. इ. स. पूर्वी ६७८ सालीं त्यानें एका सिलिसियन सरदाराबरोबर स्नेह करून एसरहडनच्या विरुद्ध बंड उभारलें परंतु अखेर त्याला त्याचे दुष्परिणाम भोगावे लागले. सिडन शहराचा विध्वंस झाला. अब्दमिल्काथ हा एसरहडनच्या हातीं लागला आणि एसरहडननें पूर्वीच्याच जागीं नवें सिडन शहर बसविलें परंतु तेथें परकी लोकांचा भरणा केला व त्या शहरास आपलें नाव दिलें. असें झालें तरी त्या शहराचें जुनें नावच प्रचारांत राहिलें. परंतु त्याचें पूर्वीचें स्वरूप पार बदलून जाऊन सायरसच्या वेळेपर्यंत सिडन शहर नाहींसें झालें. याप्रमाणें टायरलाहि अनेक संकटें भोगावीं लागलीं. एल्यूलास नंतर बालराजा टायरच्या तख्तावर बसला व त्यानें असुरियाच्या विरुद्ध बंड करण्याचे कामीं इजिप्तचा एथिओपियन राजा तिरहाका यास मदत केली, त्यामुळें एसरहडन हा ज्यावेळीं दुसऱ्यानें इजिप्तवर चालून गेला तेव्हां त्यानें त्याबद्दल टायरला शिक्षा करण्याचा निश्चय केला व याप्रमाणें टायरला वेढा देऊन त्याचा पाणीपुरवठा बंद करण्याच्या हेतूनें त्यानें त्याच्या किनाऱ्यावर मातीच्या भिंती बांधल्या. तथापि त्यानें तें शहर काबीज केलें नाहीं. झेंजिर्ली येथें जो एसरहडनचा पुतळा सापडला आहे त्यांत त्यानें टायरचा बाल आणि इजिप्तचा तिरहाका यांच्या नाकांत वेसण घालून ती आपले हातांत धरली आहे असें दाखविलें आहे. परंतु एसरहडन यानें त्यांपैकीं कोणास कैद केल्याचा पुरावा नाहीं. असुरबनिपाल हा राज्यावर बसल्यानंतर लगेच त्यानें टायरला पुन्हा वेढा दिला. परंतु त्यांत त्याला त्याच्या पूर्वजांपेक्षा अधिक यश आलें नाहीं. तथापि गेबल आणि अर्वदचे राजे, जुडाचा मनसे आणि इतर कनानाईट सरदार यांच्यासह बाल हाच शेवटीं शरण गेला. सायप्रस बेट काबीज करण्यांत असुरियन लोकांस पूर्ण यश आलें. अरबस्तानावरील स्वारीहून परत आल्यावर असुरबनिपालनें उशू व अक्को येथील बंडखोर रहिवाशांचें चांगलेंच पारिपत्य केलें व त्यांतून जे वाचले त्यांची असुरियांत रवानगी केली. फिनिशिया व इतर प्रदेश यांवरील असुरियाचें राज्य ह्मणजे जुलूम व लुटालूट यापेक्षां अधिक कांहीं नव्हतें.

*उत्तर बाबिलोनियन राजांचा काळ*—इ. स. पूर्वी ६०५—५३८—असुरियन सत्तेचा ऱ्हास झाल्यानंतर कांहीं काळपर्यंत इजिप्शियन लोकांनीं फिनिशियावर स्वाऱ्या केल्या परंतु इ. स. पूर्वी ६०५ सालीं कारचेमिशच्या लढाईंत त्याचा मोड झाल्यावर पश्चिम आशियाचें स्वामित्व खाल्डियन लोकांकडे होतें. इ. स. पूर्वी ५८८ सालीं इजिप्शियन राजा एप्रीज यानें खाल्डियन लोकांची सत्ता उलथून टाकण्याचा प्रयत्न केला. त्यानें टायर व सिडन या दोन पौरराष्ट्रांचा पराभव करून इतर पौरराष्ट्रास शरण यावयास भाग पाडलें. अशा रीतीनें फिनिशियावरील सत्तेसंबधानें इजिप्शियन व खाल्डियन लोकांत झटापट चालू असतां कांहीं फिनिशियन राजांनीं व त्यांतले त्यांत टायरचा नवा राजा दुसरा इथोबाल यानें बाबिलोनियन लोकांविरुद्ध आपला वैरभाव उघड उघड व्यक्त केला. ही गोष्ट नेबुकाडरेसर याच्या लक्षांत आल्यावांचून राहिली नाहीं. इथोबालच्या पाडाव झाल्यानंतर तो फिनिशियावर चालून गेला. एप्रीज आपल्या सैन्यासह परत गेला व टायरच्या वेढ्यास सुरुवात झाली. त्या व्यापारी शहरानें तेरा वर्षेंपर्यंत टिकाव धरला. एझीकीलच्या मतानें नेबुकाडरेसर व त्याचें सैन्य यास टायरच्या वेढ्यांत जो खटाटोप करावा लागला त्याचा मोबदला कांहीं न मिळतां शेवटीं तें शहर जरी शत्रूच्या स्वाधीन झालें तरी त्याला अनुकूल अशाच शर्तीवर तहू झाला. नेबुकाडरेसरनें दुसरा बाल यास गादीवर बसविलें. त्याच्या मृत्यूनंतर लोकसत्ताक राज्यपद्धति स्थापन झाली. तिच्या अध्यक्षास "सुफेट" किंवा 'जज्ज" म्हणत असत. कांहीं काळानें पुन्हां राजसत्ताक पद्धति सुरू झाली. शेवटीं तिसरा हिराम राज्य करीत असतां फिनिशिया देश खाल्डियन लोकांपासून इराणी लोकांच्या ताब्यांत गेला आणि त्याच सुमारास इजिप्तचा राजा दुसरा अमेनोफिस यानें सायप्रस

हस्तगत केलें हें सर्व होत असतां टायरच्या लोकांकडून कसलाहि विरोध करण्यात आला नाहीं दार्घकालपर्यंत वेढ्यात सांपडल्यामुळें व तदनतर उपस्थित झालेल्या अन्त-कलहामुळें टायरचे लोक अगदीं हतवीर्य झाले आणि त्यामुळें पौरराष्ट्राच्या पुढारीपणाचा मान सिडन या पौरराष्ट्रास मिळाला या सुमारास कार्थेज येथें हॅनो दी ग्रेट हा राजा राज्य करात होता त्यानें ही संधि योग्य आहे असं पाहून टायरच्या वर्चस्वापासून आपल्या देशाची सुटका करून घेतली या-पुढें टायर येथें होणाऱ्या मेलकार्थच्या उत्सवाला कार्थेजनें दर वर्षी आपले कांहीं प्रतिनिधी पाठव वेत या शर्तीशिवाय कार्थेजवर टायरची कोणतीहि सत्ता उरली नाहीं टायर राष्ट्रावर जी हा संकट परंपरा येत गेली त्यावरून त्याच्या उत्कर्षाला थोडीशी ओहोटी लागली असल असें वाटण्याचा संभव आहे परंतु टायर राष्ट्र हें राजकीय उत्कर्षापेक्षा व्यापाराच्या भरभराटाकरिताच जास्त प्रसिद्ध होतें आणि ती भरभराट तशीच अबाधितपणें कायम राहिली टायर राष्ट्राच्या ताब्यातील सर्व वसाहती जरी शत्रूच्या हातात गेल्या तरी टायर शहर शत्रूच्या हस्तगत झालं नाहीं त्याचा दर्यावरील व्यापार पूर्वीप्रमाणेंच निर्विघ्नपणें चालू राहिला

**राज्यपद्धति** — कनानाइट लोकांच्या सर्वसामान्य राज्यपद्धती लक्षात घेतल्या म्हणजे फिनिशियन लोकांची मूळची राज्यपद्धति राजसत्ताक असावा असंच अनुमान निघतें तद्देशीय खोदीव लेखात फिनिशियातील पौर राष्ट्राच्या व सायप्रसच्या अधिपतीस 'राजा" हीच संज्ञा दिलेला सापडते राजघराण्यातील लोक आपण प्रत्यक्ष देवाचे अवतार आहोंत असें प्रतिपादन करीत असत आणि त्याना सोडून बाहेरच्या मनुष्याची राजपदाकरिता निवड होणें अशक्य होतें परंतु सार्वजनिक हिताहिताच्या प्रकरणात धनाढ्य व्यापारीवर्गाचें बरेंच वजन असल्याकारणानें राजाची सत्ता बरीच मर्यादित होती आणि म्हणून टायर किंवा सिडन या पौरराष्ट्रात युद्ध पुकारणें किंवा तह करणें या गोष्टी राजाच्या गैरहजीरींत किंवा त्याच्या मर्जीविरुद्धहि घडून येत असत टायर येथें मेलकार्थच्या पुरोहितास राजाच्या खालोखाल मान होता राजाला राजकारणात सल्ला देण्याकरिता एक वृद्ध मंडळ होतें गेबेल (बिब्लस) येथें ही पद्धत अव्वल पासून अखेरपर्यंत अव्याहत चालू होती सिडन येथें हें मंडळ शंभर सभासदाचें होतें व टायर येथेंहि बहुतेक तसेंच असावें नेबुकाडरेसरच्या कारकीर्दीत टायर येथें राजसत्ताक पद्धतीचे जागीं काहीं वेळ लोकसत्ताक पद्धति स्थापन झाली होती हें वर दिलेलेंच आहे. इराणी लोकांचा अंमल चालू असता सिडन, टायर व अरडस या राष्ट्राचा एक संघ निर्माण झाला या संघाच्या नियमांप्रमाणें वरील तीन राष्ट्रांनीं इराणी अारमारास वल्ह्याच्या तीन रागा असलेलीं ३०० जहाजें द्यावयाचीं असत त्याचप्रमाणें मोठ्या शहराच्या तंत्रानें लहान शहरांनीं चालावें असा नियम होता या नियमास अनुसरून अरेडसच्या वर्चस्वाखालीं तीन लहान राष्ट्रें होतीं वेरिटसला राजा नसल्या कारणानें त्याचें व बिब्लसचें मिळून एक संयुक्त राज्य झालें आणि ट्रिपोलिसमध्यं तीन शहराचा अंतर्भाव झाला होता फिनिशियामध्यें यापेक्षा अधिक व्यापक स्वरूपाचा जूट शक्य नव्हता कारण त्या देशातील निरनिराळीं राष्ट्रें एकत्रित करण्यास लागणारी राष्ट्रैक्यभावना तेथें अस्तित्वात नव्हती लक्ष व्यापारवृद्धिकडे असल्या-मुळें ते स्थानिक कारभाराकडे जरी दक्षतेनें लक्ष देत असत तरी शिस्त व देशभक्ति या गुणांचा त्याच्यामध्यें विकास झाला नव्हता प्रसंगविशेषीं फिनिशियातील शहरें मोठ्या धैर्यानें आपल्या स्वातंत्र्याचें रक्षण करीत परंतु एकंदरीनें फिनिशियन लोकांमध्यें प्रागतिक राष्ट्रीय चारित्र्यास लागणारे सद्गुण उदित झाले नव्हते असें म्हणावं लागतें

आपल्याकडील कांहीं लेखक फिनिशियन लोक तेच ऋग्वेदातील पणी असावेत म्हणून सूचना करितात याला आधार एवढाच कीं हीं दोन्हीं राष्ट्रं व्यापारी होतीं आणि दोन्हा राष्ट्रांच्या नावामध्यें उच्चारसादृश्य आहे

**सुर्या ऊर्फ सीरिया** —ओबडधोबड शिलास्मारकें व इतर इतिहासपूर्वकालीन अवशेष यावरून सीरियात मानव-प्राण्याची वसती फारच प्राचीन कालापासून झाल्याचें दिसतें ऐतिहासिक कालात अनेक भिन्न भिन्न राष्ट्रांनीं या प्रदेशात स्वाऱ्या मारल्या व आपआपल्या वसाहती केल्या परंतु त्यापैकीं बहुतेक राष्ट्रें सेमेटिक' वंशातील होतीं ह्या शेवटच्या गोष्टीमुळें त्या देशातील अतिप्राचीन स्थानिक संप्रदायांच्या दंतकथातून बराच विश्वसनीय भाग सांपडणें शक्य झालें आहे आर्मीनियन लोकांनीं तेथील मूळ रहि-वाशी आपल्या समाजात समाविष्ट करून घेतल्यानंतर ग्रीकोरोमन संस्कृतीचा त्याच्यावर पुष्कळच परिणाम झाला, तरी आपली मूळ अरेमियन भाषा मात्र त्यांनीं कायम राखली प्राचीन काळीं सीरियाचे जगाशीं राजकीय संबंध कशा प्रकारचे होते हें अज्ञात आहे प्रत्येक शहर भोंवतालच्या प्रदेशासह एक छोटें राज्यच समजलें जाई व एकंदर शासनकार्याची दिशा साहजिकच तेथील प्रमुख घराण्यावर अवलंबून असे इ स पू सोळाव्या शतकाच्या उत्तरार्धात सर्व उत्तरसीरिया कॅपॅडोशियन ह्या सत्तेखालीं आला. सीरियाचा दक्षिण भाग अक्कडच्या मार्गानें राजास 'अॅम्मन' या नावानें माहीत होता व त्याच्या सैन्यानेंहि पुष्कळ वेळा त्या प्रांताकडे मोर्चे फिरविले होते ह्या कालास 'कॅननाइट्' युग म्हणतात ह्यानंतर इ स. पू १००० वर्षांच्या सुमारास अरेमियन युग सुरू झालें फार प्राचीन काळीं म्हणजे इ सनापूर्वी १६०० च्या सुमारास सीरियात इजिप्शियन व बाबिलोनी या संस्कृतींचा संगम होऊन त्यापासून एक पाश्चिम आशियाकडील नवानव

विशिष्ट संस्कृति निर्माण झाली व फिनिशियन लोकांच्या व्यापारी चळवळीमुळे या संस्कृतीनें भूमध्यसमुद्राच्या पश्चिमेकडील भूभागापर्यंत प्रवास केला. विशेषतः उद्योगधंद्यांची चांगलीच वाढ झाली. उत्तम उंची वस्त्रें दिणणें, कांचसामान, घोडे हिरे व मातीचीं भांडीं वगैरे तयार होऊं लागलीं. प्राचीन ग्रेस्या लोकांनीं येथून नेलेल्या लुटीच्या उपलब्ध यादींत अनेक भिन्न उपकरणें व गोष्टींचे उल्लेख आहेत. इजिप्शियन सम्राटांच्या फिनिशिया व पॅलेस्टाइन या प्रांतावर झालेल्या परिणामाचे दर्शक असे जे अवशेष अलीकडे उपलब्ध झाले आहेत त्यावरून वरील अनुमानच दृढ होतें कीं, सीरियन कलाकौशल्यावर शेजारच्या बलाढ्य राष्ट्रांनीं चिरतन परिणाम घडवून आणले. पारमार्थिक बाबतींत सीरियन लोक स्वतंत्र डोकें चालवीत असत. प्रत्येक स्थानानीं, प्रत्येक जातीची आपली एक मुख्य पुरुषदेवता ( बाल् ) व एक स्त्रीदेवता ( बालत् ) असे. या स्त्रीदेवतेस 'अष्टार' किंवा 'अस्टारेट' असं म्हणत असत. या स्थानिक देवतांखेरीज 'स्वर्गाचा प्रभु' व इतर देवताहि होत्या व त्यांच्याकरितां सामान्यरीत्या नरमेध करीत असत. परंतु सीरियन देवतेतिहासांत मात्र परकियांचे परिणाम वारंवार दृग्गोचर होतात. सीरियामध्यें स्वतंत्र कल्पनाशक्तीचा अभाव असतांना देखील सीरियन संस्कृतीनें पश्चिमेकडील बराच प्रदेश व्यापला, इतकेंच नव्हे तर ख्रिस्ती शकास प्रारंभ होण्यापूर्वी कितीतरी वर्षे सीरियन लोकांनीं उत्तरेकडील अरब लोकांवर पुष्कळ सांस्कृतिक परिणाम घडवून आणिले व हेच परिणाम इस्लामी मताच्या प्रारंभीं नॅबेटियन लोकांच्या सत्तेमुळें फारच जोरावले. अरब लोकांना सीरियन लोकांपासूनच लेखनकला उचलली.

सीरियाच्या प्राचीन राजकीय व भौगोलिक संबंधाविषयीं इजिप्तमधील कागदपत्रावरून विशेषतः तिसरा टेथमोसिस याच्या पश्चिम आशियांतील स्वाऱ्यांसंबंधीं व चवथा ॲमेनोफिस याच्या कारकीर्दीसंबंधीं जे कागदपत्र सांपडले आहेत त्यावरून थोडीबहुत माहिती मिळते. इजिप्तचे लोक आपल्या पूर्वेकडील शेजाऱ्यास 'अमू' ही संज्ञा लावीत. युफ्रेटिसच्या पलीकडून त्या नदीपर्यंत पसरलेल्या सीरियाच्या प्रदेशाचें 'खार्हो' हें नाव आहे व त्यामध्यें पुढील प्रदेश मोडतात, ते.—

( १ ) रटेनू म्हणजे साप्रतचा पॅलेस्टाइन ( कधीं कधीं कोएलेसिरियासह पॅलेस्टाइन प्रांतास 'वरचा रटेनू' व त्या खालच्या युफ्रेटिस नदीपर्यंतच्या भागास ' खालचा रटेनू ' म्हणण्याचा प्रघात आहे )

( २ ) खेतची भूमि ( रामेसाइड युगांतील ऑरांटस नदीकांठीं कडेश राजधानी असलेल्या रटेनू प्रांताकडेच कांहीं काळ असलेली )

( ३ )नहरिन नामक युफ्रेटिस नदीच्या दोही कांठचा प्रदेश. (सीरियन सरहद्दीच्या बाहेर )

कॅनन्नाइट लोकांस सामान्यतः गरु म्हणत. या प्रदेशांतून इजिप्तच्या राजांनीं पुष्कळ मौल्यवान् वस्तू लुटल्या त्यावरून त्या काळीं सीरिया बराच भरभराटींत व अत्यंत सुधारलेला देश होता हें उघड आहे. याशिवाय कर्णक येथील देवालयांतील भूगोलविषयक याद्या व तिसऱ्या टेथमॉसिसनंतरचे २०० वर्षांच्या सुमाराचे शिलालेख यामध्यें बऱ्याच शहरांचे उल्लेख आढळतात. त्यामध्यें अलेप्पो, कॅडेश, सिडन, यासारखीं व पॅलेस्टाइनमधील शहरें यांचीं नावें जुळतात इ. स. पू. च्या १५ व्या शतकांतील अमर्ना कागदपत्रांवरून असें दिसतें कीं, सीरियाचा कांहीं भाग दुष्काळाच्या बाजूस दक्षिणेकडे हालचाल करणाऱ्या इजिप्तच्या राजप्रतिनिधींच्या अमलाखालीं होता व बाकीचा भाग अमोराइट लोक, त्याचप्रमाणें मिटनी व खेत येथील लोक यांच्या उपद्रवामुळें त्यांच्या अमलाबाहेर होता 'सेमेटिक' कक्षेबाहेर असणाऱ्या या लोकांचे पॅलेस्टाइनमध्यें सुद्धां अरेमियन लोकांशीं मिश्रण झालें. यावरून एवढें लक्षांत येईल कीं, मुख्यतः त्याच लोकांनीं इ. स. पू. १६ व्या पासून १४ व्या शतकापर्यंत इजिप्तच सीरियाशीं वारंवार संबंध आणिले. दुसऱ्या रामेसिसच्या कारकीर्दीत हे लोक ऑरॉंटसवरच्या कडेशच्या आसपास असणाऱ्या प्रदेशांत केंद्रीभूत झाले होते व त्यांना पॅलेस्टाइन व खेत येथें जाण्यास त्या मानानें पूर्ण मुभा होती. त्यानंतर हें केंद्रस्थान युफ्रेटिसच्या आसमंतांत गेलें व मध्यंतरींच्या हिट्टि राजसत्तेमुळें इजिप्तचा या लोकांशीं संबंध तुटला परंतु इ. सना पूर्वी १०५०च्या सुमारास पहिल्या टिग्लथपिलेसरच्या कारकीर्दीत पश्चिमेकडे असुरियाचा बराच विस्तार होईतोंपर्यंत या लोकांची सत्ता प्रामुख्यानें होतीच. पुढें आठव्या शतकांत तिसऱ्या सार्गननें कार्चेमिश घेतलें व हिटाइट सत्तेचा शेवट अशा रीतीनें झाला.

सीरियामधील ज्या लोकांविषयीं विशेष उल्लेख केला पाहिजे असे लोक म्हटले म्हणजे साबियन, फिनिशियन व पॅलेस्टाइनमधील यहुदी लोकांच्या अगोदर वसती करणारे लोक होत. यहुदी लोकांचा खि. पू. १००० वर्षांपूर्वीचा पॅलेस्टाइनमधील इतिहास पूर्णपणें उपलब्ध नाहीं याचा व फिनिशियनाचा उपलब्ध इतिहास पूर्वी दिलाच आहे. आतां साबियन व यांच्यासंबंधीं माहिती देतों.

**साबियन्**—' येमेन ' येथील लोकांचें प्राचीन नाव ' साबा ' हें असून त्यासंबंधीं अतिप्राचीन उल्लेख हिब्रू धर्मग्रंथांत आले आहेत जुन्या करारांत ( जेनेसिस १० ७,—२९ ) जोक्टनच्या मुलाच्या नांवांची यादी आली आहे त्यापैकीं बरोबरच नावें अरबी भौगोलिक ग्रंथांत अगर शिलालेखांत आढळतात त्यावरून हे लोक येमेन मधील असावेत असा इतिहाससंशोधकांचा निर्णय झाला आहे.

सेबा "( शेबा ) हीं संज्ञा प्रथम हिब्रू ग्रथात फारच कमी महत्त्वाची आहे म्हणजे दक्षिण अरबस्थानाशीं निगत मालाचा व्यापार करणाऱ्या सौदागराना समुदायवाचक अर्थानें लावण्यात येते. जेनेसिसमध्यें आलेल्या दुसऱ्या दोन उल्लेखावरुन साबिअन लोकान्च्या वसाहती, भोसाड अरण्यातून व्यापारी दळणवळण वाढावें याकरता त्यानीं स्थापलेले कारखाने व मुक्कामाच्या जागा इत्यादि माहिती मिळते. त्याचप्रमाणें शेबाची राणी ही सालोमन यास भेटण्यास आली ती व्यापारी टोळीबरोबर आली असावी ह्या व इतर उल्लेखावरुन सालोमन पासून सायरसच्या कालापर्यंत व्यापारीदृष्ट्या महत्त्वास चढलेल्या ह्या साबिअन लोकाच्या संपत्तीची व भरभराटीची साक्ष पटते. असुरियातील शिलालेखावरूनहि वरील तऱ्हेचीच माहिती मिळते साबिअन व इतर दक्षिण आरबी लोकाबद्दल इ स पूर्वी तिसऱ्या शतकाच्या वेळची ग्रीक लोकानीं दिलेली माहिती उपलब्ध आहे, त्यावरुन व्यापारी व वाटसरु यानीं आणलेल्या साबिअन लोकाच्या ऐश्वर्याच्या व संपत्तीच्या बातम्यावरून रोमच्या ऑगस्टसच्या तोंडासहि पाणी सुटून त्यानें केलेल्या एकदर स्वारीचें साग्र वर्णन स्ट्रेबोनें दिलें आहे त्याचप्रमाणें आफ्रिकाखंडातहि साबिअन लोक फार पूर्वीपासून व्यापार चालवीत असत व अबीसीनिया प्रातातील भाषा व लिपि यावरुन तो प्रात बहुतेक दक्षिण आरबस्तानातील लोकानीं भरून गेला होता असें दिसतें. पुढे ज्या वेळीं खुष्कीनें चालणारा अतर्गत व्यापार बसला व जलमार्गानें व्यापार करणारी बंदरें पुढें आलीं त्या वेळीं अर्थातच पूर्वीचें व्यापारी चळवळीचें स्वरूप बदलून गेलें व नवीन शहरें व नवीन लोक पुढें आले आणि त्यामुळें साबिअन लोकाचें महत्त्व बरेंच कमी झालें

**लिडिया**—हिटाइट राष्ट्र नष्ट झाल्यानंतर आशियामायनरमध्यें काहींसें महत्त्वास चढलेलें राष्ट्र लिडीया हें एकटें होतें. तथापि त्यावरहि ग्रीस व इराण याचा पगडा होता लिडिया प्राचीन भूगोलात आशियामायनरचा एक जिल्हा होता हिरोडोटस म्हणतो कीं, लिडियन हें नाव मिओनिस लोकाना ॲटीसचा मुलगा लिडस याच्या नावावरून मिळालें. या राज्यात सार्डीस हें मुख्य शहर असून मॅगनेशिया ॲड सिपिलम हें त्याच्या खालोखाल होतें. आयोनियाच्या किनाऱ्याचा लिडियन राज्यात समावेश होत असे. अत्योटेस व क्रोसस यानीं लिडीयन राज्याचें साम्राज्यात रूपातर केलें. रोमनकाळीं लिडिया म्हणजे मायसिया व कारिया आणि त्याप्रमाणें फ्रिजिया व इजियन समुद्र यामधला प्रदेश होता. लिडिया हा सुपाक प्रदेश होता. डोंगराळ भागात द्राक्षाचे मळे व लोकरीचा धदा चागला चाल व सपाट प्रदेशात अनेक प्रकारचें धान्य विपुल पिकत असे.

लिडियन लोक मूळ आर्यन, सेमिटिक किंवा तुरेनियन वंश तले आहत ह निश्चित नाहीं. लिडियन जात ही आर्य व मूळचे रहिवाशी याच्या मिश्रणापासून झाली असावी. उद्योग व व्यापार यावद्दल याची प्रसिद्धी होती. याच्यामधील निसर्गपूजा रानटी व वैषयिक तऱ्हेची होती. सुर्यदेव मेयुस असून तो व ॲटीस ही सूर्यदेवता याची पूजा होत असे. ॲटीस हा सिपीला या आदमातेचा पुत्र व पति होता. येथें स्त्रीचीच पूजा होती, त्यावरुन ही देवता ग्रीक आर्टेमिस असावी. लिडियन लोकानीं आपले धार्मिक संप्रदायविधि हिटाइट लोकापासून घेतले होते असं दिसत अटिसदेवतेच्या पूजारिणी सशस्त्र असून त्याच्या चित्रावरून ॲमेझॉन स्त्रियाची कल्पना कशी प्रादुर्भूत झाली असावा हे समजत. लिडियातील मुली देहविक्रय करून हुड्याचे पैसे जमा करीत व ही चाल धार्मिक गणली जाई.

तद्देशीय इतिहासकार क्झान्तस (इ स पूर्वी ४६०) हा लिडियात एका मागून एक अशी तीन राजघराणीं झाली असें म्हणतो यापैकीं पहिलें अटियाडस हें काल्पनिक असावें दुसऱ्या घराण्याची दैवी उत्पत्ति होती अशी समजूत होती

काहीं हिटाइट अवशेष लिडियात सापडले आहेत यावरून येथें हिटाइट अमल असावा ह्याच्या नंतर हेरॅक्लिद घराण्याचा उदय झाला. हें घराणें ५०५ वर्षें होतें. गायजरनें शेवटचा पुरुष साडयाटेस यास ठार मारून मम्नीद घराणें स्थापिलें (इ. स. ६८७). या घराण्याच्या वेळीं लिडियाची समुद्रावर व जमीनीवर बरीच सत्ता वाढली. कित्येक ग्रीक शहरें व आयोनियाचा किनारा या लोकानीं जिंकून घेतला. क्रोससनें तर अनेक विजय मिळवून लिडियन साम्राज्य बनविलें मध्यतरीं किमेरिअन लोकानीं याच्या राज्यावर स्वारी केली. म्हणून त्यानें असुरबनिपालकडे खंडणी व दोन लढाईत कैद केलेले किमेरियन सरदार पाठविले नंतर यानें असुरियाविरुद्ध बंड केलें परतु त्या युद्धात हा पडला व याचा मुलगा आर्दीस यानें निनेव्हेचें माडलिकत्व कबूल केलें. आर्दीसचा नातु अल्याटेस यानें किमेरिअन लोकाचा नायनाट करून स्मर्ना घेतलें यानेंच लिडियन साम्राज्य स्थापिलें यानंतर (ख्रि पू ५६०) क्रोसस गादीवर बसला. सायरसनें सार्डिस शहर काबीज केलें व क्रोससला कैद केलें. पुढें लिडियन लोकानीं पॅक्टिआसच्या नेतृत्वाखालीं बड केल्यावरून इराणच्या राजानें लिडियन लोकापासून हत्यारें काढून घेतलीं. सार्डीस हें इराणी साम्राज्याची पश्चिमेकडची राजधानी झालें. अलेक्झाडरच्या मरणानंतर लिडिया ॲंटिगोनसच्या ताब्यात आलें. अकिअसनें स्वत. सार्डीसचा राजा असें जाहीर केल्यावरून ॲंटायोकसनें त्याचा पराभव करून त्याला ठार मारिलें. रोमन लोकानीं हा प्रात युमेनेसला दिला.

लिडियन साम्राज्य हें प्राचीनकाळीं उद्योगधंद्याचें माहेरघर होतें. येथें, फासे वगैरे खेळ, सोन्यारुप्याचीं नाणीं याची

सुरुवात झाली. याचें वाङ्मय उपलब्ध नाहीं गायन व शारीरिक खेळ याबद्दल लिडियाची प्रसिद्धी होती

लिडियन राष्ट्राची सुप्रसिद्ध राजधानी जें सार्डिस शहर त्याबद्दल बरीच माहिती मिळते या शहरांत ग्रीक, मिसरी, आसुरी वगैरे निरनिराळ्या संस्कृतींचें मिश्रण होतें अनेक ठिकाणीं अेसियन थडग्याच्या पद्धतीचीं मृताचीं स्मारकें बांधलेलीं होतीं गुराच्या कळपानें देखावे बांधलेले आढळतात, शहरांतील अरुंद रस्त्यांतून माणसांचा व मालाची वाहतुक करणारे रथ व घोडे यांची गर्दी असे बाजार पेठेत लहान लहान अरुंद व लांबट दुकानें असत एका बाजूला रंगीबेरंगी कातड्यांच्या पिशव्या, जोडे, वहाणा, चामड्याचे पट्टे वगैरे जिनसाची दुकानें होतीं एका बाजूला कापडवाल्याचीं, एका बाजूला सराफाची, एका बाजूला सुगंधी सामानाची, अशा दुकानांची व्यवस्थित मांडणी दिसते या सुखसाधनाबरोबरच तेथील लोकांचें आचरण, शिथिल व चैनीचें होतें सर्व चैनी लोकांना एकत्र जमण्याकरितां एक वृक्षलतांनीं आच्छादलेला मोठा बाग व नाचरंग तमाशाकरितां नाटकगृहासारख्या इमारती बांधलेल्या होत्या

**आरेमियन लोक** —हे लोक सेमेटिक वंशाचे, सेमेटिक भाषा बोलणारे आणि सेमेटिक धर्माचेच होते हे मूळ अरबस्तानच्या उत्तरेकडून येऊन बाबिलोनिया आणि पश्चिम आशियांतील उच्च प्रदेश यांच्या मधल्या प्रदेशांत वसाहत करून राहिले आरेमियन लोकांनीं सारिया जिंकल्यावर तेथें त्यांचीं झोबाह, हमात, पाठिन, व दमास्कस वगैरे लहान लहान राज्यें स्थापन झालीं त्यांपैकीं दमास्कसचेंच राज्य कायतें जगाच्या इतिहासांत महत्त्वाचें आहे, आणि बायबल मध्यें सीरियाचें राज्य म्हणून जो उल्लेख आहे, तो या दमास्कसच्या राज्याबद्दलच होय दमास्कसच्या राजाचा इतिहासांत प्रथम डेव्हिडच्या कारकीर्दीत येतो ख्रि पू १००० त डेव्हिडनें दमास्कसच्या राजाला खंडणी देणें भाग पाडिलें ख्रि पू ९५० त दमास्कसचें राज्य सालोमनच्या ताब्यांतून निघून स्वतंत्र झालें, त्यावेळीं रेझन हा दमास्कसचा राजा होता त्याच्या मागून हेझिओन हा राजा झाला असें दिसतें त्याच्या नंतर टाब्रिमोन गादीवर आला हीं राजांचीं नांवें फक्त बायबलमध्यें आढळतात, तथापि हेझिओन आणि रेझोन हे एकच असावे असें दिसतें ख्रि. पू ९०० त पहिला बेन-हदद दमास्कसच्या राज्यावर आला बेन-हददची मदत जूडाच्या आसानें देवालयांतील आणि राजवाड्यांतील संपत्ति देऊन मिळविली, आणि इस्राएलच्या बादशहा बरोबर युद्ध केलें ख्रि पू ८७० दुसरा बेन-हदाद ( असुरियन स्मारक लेखांत हदाद-इद्री असें नांव आढळतें ) या दमास्कसच्या राजानें इस्राएल लोकांशीं उघड शत्रुत्व सुरू केलें, तेव्हां ओम्री आणि अहब यांनीं फिनीशियन लोकांशीं सख्य करून त्याला विरोध केला बेन-हदादनें समरिया राजधानीला वेढा घातला, परंतु त्याला अहाबनें हाकून लाविलें. पुढल्या वर्षी बेन-हदादनें पुन्हा वेढा दिला पण पुन्हा त्याचा आफेक नजीक लढाईत पराभव झाला तथापि अहाबनें आपलें धोरण बदलून बेनहददाशीं मैत्रीचा तह केला आणि असुरियाच्या वाढत्या सत्तेला विरोध करण्याची तयारी केली ख्रि पू ८५४ त दमास्कस, इस्राएल आणि हामात यांचा मित्रसंघ बनून बेनहदाद हा त्याचा मुख्य बनला आणि हीं तीन आणि इतर राष्ट्रें यांनीं मिळून हमातवर स्वारी करून आलेला दुसरा शाल्मनसर याशीं सामना दिला करकर येथें लढाई झाली पण त्यांत या दोस्त राष्ट्रांचाच पराभव झाला तेव्हां या दोस्त राष्ट्रांत फाटाफुटून होऊन दमास्कस व सीरिया यांनींच कायतें युद्ध चालू ठेविलें ख्रि पू ८४९त बेनहदाद आणि हमातचा इर्हुलिन यांनीं, शाल्मनसर यानें हमातवर स्वारी केली असतां त्याला विरोध केला पण या लढाईचा निकाल कोणत्याच पक्षाच्या बाजूनें निश्चित झाला नाहीं ख्रि पू ८४६ या सालीं शाल्मनसर यानें तिसऱ्या वेळीं हमातवर स्वारी केला परंतु बेनहदादच्या पराक्रमामुळें त्याला तो देश जिंकता आला नाहीं ख्रि पू ८४५ त हाझायेल हा आपला बाप बेनहदाद याच्या मागून गादीवर आला बेनहददाचा खून झाला असावा असें दिसतें ख्रि पू ८४२ त हाझायेल यानें इतर सर्व राजे सोडून गेल्यामुळें एकट्यानेंच शाल्मनसर बरोबर युद्ध करण्याचें ठरविलें शाल्मनसरच्या सारियावरील ही चौथी स्वारी होय दमास्कसला बरेच दिवस वेढा पडला होता परंतु विजय कोणत्याच पक्षास मिळाला नाहीं. ख्रि पू ८३९ या सालीं शाल्मनसरनें दमास्कसवर पुन्हा स्वारी केली, पण याविळींहि त्याला जय मिळाला नाहीं, आणि उलट दमास्कसच्या राजानेंच इस्राएलवर स्वारी केली. या शतकाच्या अखेर जॉर्डनच्या पूर्वेकडील आणि लेबानॉनच्या उत्तरेकडील प्रदेश हाझायेलनें आणि त्याच्या नंतरचा राजा तिसरा बेनहदाद यांनीं आपल्या राज्यास जोडला परंतु लवकरच असुरियन लोकांनीं दमास्कसवर पुन्हा हल्ला केला ती संधि साधून इस्राएलाइट लोकांनीं आपला प्रदेश पुन्हा परत मिळविला ख्रि पू ८०६ त ७९७मध्यें तिसरा अदाद निरारी यानें दमास्कसवर स्वारी केली आणि तिसरा बेनहदाद याच्या नंतरचा राजा मरी याला जबर खंडणी देण्यास भाग पाडलें ( ७९७ ) ख्रि पू.७७३त असुरियाच्या राजानें पुन्हा दमास्कसवर स्वारी केली व इस्राएल राष्ट्रहि यावेळीं फार बलिष्ट होऊन त्यानें दमास्कसला आपलें मांडलिक बनविलें या दुहेरी हल्ल्यामुळें दमास्कसच्या राज्याला भराभर उतरती कळा लागली ख्रि पू ७३५ त पेकह यानें रेझिन बरोबर दोस्ती केली, आणि जुडाच्या अहझवर स्वारी केली याप्रमाणें सीरिओ एफ्रामिटिक युद्ध सुरु झालें अहझनें तिसरा तिग्लथ पिलेसर याची मदत मागितली व ती त्याला मिळाली. ख्रि पू ७३४ त तिग्लथ पिलेसरनें सीरियावर चाल केली, आणि रेझिनचा पराभव केला तेव्हां रेझीन दमास्कस शहराचा आश्रय

धरून राहिला. खि. पू. ७३२ त दमास्कस शहर हस्तगत करून रेझीनला ठार मारण्यांत आलें, आणि शहरांतील रहिवाशांना हद्दपार करण्यात आले व अशा रीतीनें दमास्कसचें राज्य असुरियाच्या साम्राज्यात सामील करण्यात आलें.

वरील हकीकतींत वारंवार उल्लेखिलेल्या मायसिनी लोकाबद्दल आपणास थोडी माहिती करून घेतली पाहिजे.

**मायसिनी.**—होमरच्या ग्रंथात मायसिनी लोकाचें नाव ट्रोजन लोकांच्या साथीदाराच्या यादींत असून टेलिफस राजा परगेमम शहराला येण्याचें वेळेस ते कैकसन्या खिंडींत राहात होते असा मजकूर आहे. परंतु त्याच्या पूर्वेतिहासाची या पेक्षा अधिक माहिती उपलब्ध नाहीं. ट्रोजन युद्धापूर्वी टयूकियन लोकास मदतीस घेऊन त्यानीं यूरोपखंडावर स्वारी केली, या हिरोडोटसच्या म्हणण्यास कल्पितकथेपेक्षा जास्त किंमत देता येत नाहीं. लिडियन क्रोससनें आसपासच्या राष्ट्रावरोबर मायसिनी लोकास पादाक्रांत केलें ही त्याच्याविषयीं पहिलीच ऐतिहासिक गोष्ट आपणास अवगत आहे.

**बिथिनिअन.**—हिरोडोटस, झेनोफोन, स्ट्रेबो इत्यादि प्राचीन ग्रंथकाराच्या मतें बिथिअन लोक थ्रेसमधून आले असावे. थ्रेसमध्यें थिनि नावाच्या लोकाचें अस्तित्व असल्यावद्दल पुरावा सापडतो व ते आणि बिथि हे बरोबरच एशियाच्या जवळपासच्या प्रांतांत एकाच वेळीं स्थाइक झाले असावे. त्यानीं मायसिनी कॅकोन इत्यादि लोकाच्या लहान लहान टोळ्याचा पराभव करून त्याचा प्रदेश व्यापला. हिरोडोटसनें थिनि व बिथि हे शेजारी शेजारींच रहात असत असें वर्णन केलें आहे. परतु पुढें बिथि प्रवळ झाले असावे व म्हणून त्यांचेच नाव त्या प्रदेशास मिळालें असावें. क्रोसस राजानें त्याच्या प्रदेशाचा आपल्या लिडियन साम्राज्यात अन्तर्भाव केला होता. पुढें ते लिडियनलोकावरोबरच इराणचे अंकित झाले ( खि. पू. ५४६ ). आणि त्याचा फ्रिजिया या सत्रपींत अन्तर्भाव झाला. हेलेस्पॉंट व वास्कोरस हे प्रदेश याच सत्रपींत मोडत. परंतु अलेक्झाडरच्या स्वारीपूर्वीच त्यानीं इराणपासून आपलें स्वातंत्र जिंकून घेतलें होतें. वास व झिपोटेस या दोन स्वजातीय राजाच्या हाताखालीं त्यानीं आपलें स्वातंत्र्य कायम राखलें व झिपोटेस याचा मुलगा पहिला निकोमिडिस यानें आपणास प्रथम राजा असें म्हणविलें.

**मीडिया.**—या प्रांतांतील लोकाचा ऐतिहासिक उल्लेख प्रथम खि. पू. ८३६ त येतो. त्यावेळीं असुरी राजा शालमनसर दुसरा यानें 'अमदाई, या लोकापासून खंडणी घेतली. त्यावेळीं तो झमोस लोकांशीं युद्ध करण्यात गुंतला होता. या राष्ट्रांतील पुरोहितवर्ग 'मग' या नांवानें प्रख्यात असून जरथुष्ट्राची जन्मभूमि हाच देश असावा असें एक मत आहे. या देशांतील मग लोक फार प्राचीन काळीं हिंदुस्थानात येऊन त्यानीं मगध देशास आपलें नांव दिलें. हे इन्द्रास न पूजिणारे होते म्हणून याचा ऋग्वेदात उल्लेख आला आहे ( ३. ५३, १४ ) अथर्ववेदातहि व्रात्यावरोवर याचा उल्लेख आला आहे. सध्या हिंदुस्थानातहि कांहीं मग ब्राह्मण आहेत.

**इराण.**—इराणच्या इतिहासास आरंभ मीडियावरील शालमनसरच्या ( दुसऱ्या ) स्वारीपासूनच होतो. तत्पूर्वींची त्याची संस्कृति म्हणजे ते व भारतीय आर्य एक होते नतर विभक्त झाले त्या कालची अवेस्तामध्यें दिसून येते. अवेस्ता व वेद यामध्यें अनेक गोष्टींत साम्य आहे अनेक शब्द वर्णविपर्यय भेद वजा केल्यास एकच आहेत ही गोष्ट सिद्धच आहे. त्या संस्कृतीविषयीं विवेचन पुढें येईल

**मंगोल**—याचा प्राचीन इतिहास फारच अस्पष्ट आहे. या शब्दाची व्युत्पत्तीहि अनिश्चित आहे परतु मॉंग म्हणजे शूर या शब्दापासून हा शब्द निघाला असावा हें शॉट याचे मत आता सामान्यत. ग्राह्य झालें आहे. याचा त्रोटक उल्लेख चीन देशावर राज्य करणाऱ्या त अंग घराण्याच्या वखरींत ( इ. स ६१९-६९० ) येतो. इतिहासाच्या अभावीं याच्या उत्पत्तीसंबधीं बऱ्याच दतकथा प्रचलित झाल्या आहेत. एका कथेनें एका लाडग्यास याच्या पूर्वज त्वाचा मान दिला आहे, दुसऱ्या एकीने बुदन्तसर या नावाच्या मनुष्यास आद्य मंगोल वनविले आहे. याच्यापासून नववा पुरुष चेंगिझखान हा होय. येथपासून त्याचा इतिहास साधार मिळतो.

**चिनी संस्कृति.**—चिनी लोक असें समजतात कीं, फुहि नामक त्याच्या एका पुरातन बादशहानें त्याच्या समाजास व्यवस्थित स्वरूप आणलें. त्याच्या मतें या फुहि बादशहापासूनच त्यांच्या इतिहासास सुरुवात होत असून त्याची कारकीर्द ते खिस्त पूर्व २८५२-२७३८ या काळात घालतात. चिनी लोकाच्या समजुतीप्रमाणें फुहीपूर्वी ते पशुप्रमाणें जगलात राहत होते; तेव्हा त्यांचा समाज अगदीं विस्कळित स्वरुपात असून त्यामध्यें कौटुंबिक जीवनक्रम अस्तित्वात आला नव्हता; मुलें फक्त आपल्या आईलाच ओळखीत-त्यांना आपला बाप कोण हे ठाऊक नसे. अशा स्थितींत समाज असताना फुहीनें विवाहसंस्था अमलात आणून पतिपत्नींपैकीं पतीकडे समाजाचें धुरीणत्व दिलें. त्यानें पाकुआ म्हणजे तीन तीन तुटक तुटक अथवा सलग अशा रेषांचीं आठ सांकेतिक चिन्हें काढून ज्या एका द्वैतवादाचा उपक्रम केला असें मानण्यात येतें त्यातहि हेंच तत्त्व दृग्गोचर होतें. ज्या राजाने कुटुंबाचे धुरीणत्व पुरुषाकडे दिल्याचें म्हटले आहे त्यालाच स्त्रीपुंवादाच्याहि उपक्रमाचें श्रेय दिलें आहे ही गोष्ट ध्यानात ठेवण्यासारखी आहे. ह्या वादानुसार सर्व चागल्या वस्तू किंवा चागले गुण हे पुंजातीय असून त्याच्याच जोडीच्या ज्या दुय्यम प्रतीच्या वस्तू किंवा गुण आहेत ते स्त्रीजातीय मानले आहेत. उदाहरणार्थ द्यावापृथिवी, सूर्यचंद्र, दिवसरात्र, दक्षिणउत्तर

इत्यादि ह्या परंपरागत कथा जर खरोखरच चिनी लोकांच्या इतिहासपूर्वकालीन कल्पनांच्या निदर्शक असतील तर असें म्हणावयास हरकत नाहीं कीं, ज्या सरळ भावनेमुळें आपल्या किंवा यूरोपियांच्या पूर्वजांच्या डोक्यांत लिंगभेदाची कल्पना आली तीच भावना प्राचीन चिनी लोकांतहि अस्तित्वांत होती फरक एवढाच कीं,आपणा दोघांमध्यें ती कल्पना केवळ भाषेंतील लिंगभेददर्शक पूर्वगामी किंवा उत्तरगामी प्रत्ययांच्या रूपानेंच शिल्लक राहिली आहे, तर चिनी लोकांच्या भाषेंत लिंगभेद नसला तरी ती कल्पना त्यांच्या अध्यात्म ज्ञानांत जिवंत आहे कारण, त्यांनीं निसर्गसंबंधीं स्पष्टीकरणाचे जे जे म्हणून प्रयत्न केले आहेत त्या सर्वांच्या मुळाशीं वस्तुजातामध्यें स्त्रीपुंभाव वास करीत असतो ही कल्पना दिसते

ज्याच्या योगानें मनुष्याचा पाशवी जीवनक्रम जाऊन त्यास सामाजिक स्थिति प्राप्त झाली ते सर्व प्राथमिक शोधहि ह्या फुहि बादशहाच्याच नांवावर घालण्यांत येतात त्यानें आपल्या लोकांस मृगया करण्यास, मासे धरण्यास व शेळ्यामेंढ्या राखण्यास शिकविलें, त्यानें वाद्यें तयार केलीं व तत्पूर्वी प्रचारांत असलेली ग्रंथियुक्त लिपि काढून टाकून तिच्या ऐवजीं चित्रलिपीचा एक प्रकार चालू केला अर्थात या सर्व गोष्टींस इतिहासानें महत्त्व देतां येत नाहीं, तथापि यावरून एवढें मात्र खास दिसतें कीं, कुटुंबरहित अशा समाजाच्या विस्कळित अवस्थेंतून मानवी संस्कृतीच्या उत्क्रांतीस सुरवात करून नंतर मनुष्यास मृगया मच्छीमारी, पशुसंगोपन यासारख्या धंद्यांचें ज्ञान झालें असें कल्पणाऱ्या उत्तरकालीन चिनी ग्रंथकारांचा युक्तिवाद तर्कशास्त्रास सोडून नव्हता या नंतर पुढें शान-नुंगच्या कारकीर्दींत लोक शेतकीचा धंदा करूं लागले म्हणून जें म्हटलें आहे तेंहि अगदीं सयुक्तिकच आहे शान-नुंग हा ख्रिस्तपूर्व २८ व्या शतकांत होऊन गेला असें चिनी लोक मानतात व यानेंच शेतकीचीं आउतें व अनेक वनस्पतींतील रोगनाशक गुण शोधून काढले अशी त्यांची समजूत आहे

हुआंगति ( पीत राजा ) हा ऐतिहासिक महत्त्वाचा तिसरा बादशहा आहे याच्या कारकीर्दीस कांहींच्या मतें ख्रि. पू २७०४ त तर कांहींच्या मतें ख्रि पू २४९१ त आरंभ झाला याच्या नांवावर, ज्या दुसऱ्या कोणाच्या नांवावर घालण्यास आधार नाहीं अशा बहुतेक सर्व सुधारणा मोडतात यानें साम्राज्याचा विस्तार केला, याच्या कारकीर्दींत 'हुन्यू' नामक एका राष्ट्रजातीचा उल्लेख आला आहे हे लोक चीन देशाच्या उत्तर सरहद्दीवर राहत होते व ते पुढें ऐतिहासिक काळांत परिचित झालेल्या हिउंग नु जातीचे पूर्वज होत अशी चिनी लोकांचा फार जुनी समजूत आहे.या तीन बादशहांच्या अस्तित्वाबद्दल शंका घेण्याचें कारण नाहीं, परंतु त्यांच्या संबंधीं दिलेली हकीकत मात्र उघड उघड काल्पनिक दिसते कारण त्यांच्या कारकीर्दीचा काळ मनुष्यजीविताच्या मर्यादेच्या मानानें पाहतां बराच मोठा आहे तर त्यांत झालेल्या प्रगतीच्या मानानें फारच लहान आहे. हुआंगति यानेंच प्रथम देवळें, घरें व शहरें बांधण्याचा उपक्रम केला, अधिक महिना घालून पंचांग बसविलें व गाड्या, होड्या सुरू केल्या असें चिनी लोक समजतात त्याच्या राणीनें रेशमी किड्याची जोपासना सुरू केली व वेणूचा शोध लावून संगीतकलेस उत्तेजन दिलें संगीतामुळेंच वजनें व मापेंहि अस्तित्वांत आलीं

या तीन बादशहांच्या गोष्टी ज्या लिखाणांत सांपडतात तीं त्या बादशहांच्या मानानें बरींच अलीकडचीं आहेत कनफ्यूशसपूर्वकालीन इतिहासासाठीं आधारभूत समजल्या जाणाऱ्या व स्वतः कनफ्यूशसच्याच नांवावर मोडणाऱ्या शुकिंग नामक ग्रंथांत या तिन्ही बादशहांचा उल्लेख नाहीं या ग्रंथास यौ व शुन यांच्या कारकीर्दीपासून आरंभ होतो यौ हा ख्रि पू २३५७-२२५८ मध्यें होऊन गेला असें एके ठिकाणीं म्हटलें आहे तर दुसरीकडे त्याचा काळ २०० वर्षें अलीकडे दिला आहे यौनंतर शुन हा गादीवर बसला यानें आपल्या कारकीर्दींत ज्या सॅनमिओ लोकांस हद्दपार केलें ते चीनच्या नैर्ऋत्येस असलेल्या टांगुटान, तिबेटी व मिओटिस लोकांचे पूर्वज होते असें म्हणतात

**हिया घराणें**—शुननंतर यू हा बादशहा झाला त्यानें ख्रि पू २२०५ पासून २११८ पर्यंत राज्य केलें यानें पीत नदीच्या महापुराचें पाणी ओसरविण्याकरितां कालवे खोदले व आपल्या राज्याचे ९ विभाग करून निरनिराळे प्रांत बनविले. या घराण्यांत एकंदर १८ बादशहा होऊन शेवटीं ख्रि पू १७६६ त तें लयास गेलें असें म्हणतात या घराण्यापैकीं चुग काग नामक बादशहाच्या कारकीर्दींत ख्रि पू. (२१५९-२१४७) त्याच्या दरबारांतील ज्योतिष्यांनीं न वर्तविलेलें असें एक सूर्यग्रहण दिसलें

**शांग उर्फ यिन घराणें**—हें घराणें ख्रि पू १७६६ पासून ११२२ पर्यंत टिकलें व हिया घराण्याप्रमाणेंच चौसिन नामक एका राज्यकर्त्याच्या दुर्गुणामुळें लयास गेलें त्या वेळीं चीनच्या आसपास सर्वदूर रानटी राष्ट्रजाती पसरल्या असून त्यांच्या स्वाऱ्यांपासून चिनी लोकांना आपलें रक्षण करावें लागत असे या सर्वांत पश्चिम व उत्तर सरहद्दीवर असलेल्या हिउंग नु ऊर्फ हूण लोकांच्या पूर्वजांपासून चीनला विशेष त्रास होत होता चौसिन हा ऐषआरामांत दंग असल्यामुळें या लोकांच्या स्वाऱ्यांचें निवारण करण्याचा सर्व भार पश्चिम सरहद्दीवर असलेल्या चौ प्रांताच्या एका राजघराण्यातल्या सुभ्यावर पडत असे तेथील सुभेदार वोन वाग या नांवाचा प्रसिद्ध शूर पुरुष होता. त्यानें चौसिन याची दुष्कृत्यांबद्दल चांगली कानउघाडणी केली परंतु तिचा कांहीं उपयोग न होतां या धीटपणाबद्दल वोन-वाग यास तुरुंगवास मात्र भोगावा लागला वोन-वान यानें आपल्या

तुरुंगवासात इ किंग नामक जो ग्रंथ लिहिला तो चिनी वाङ्मयातील सर्वांत पुरातन ग्रंथ समजला जातो चीन देशात या ग्रंथाइतका आज दुसऱ्या कोणत्याहि ग्रंथाचा अभ्यास केला जात नाहीं चौ सिनच्या जुलमीपणामुळें त्याची प्रजा कटाळून ती वोन वागचा पुत्र वु वाग याच्या आधिपत्या खालीं आपल्या बादशहाविरुद्ध उठली, व शेवटीं 'पश्चिमे कडील लोकांच्या' म्हणजे बहुधा हूणांच्या पूर्वजांच्या मदतीनें वू वाग यानें चौसिन याचा पूर्ण पराभव केल्यामुळ चौसिन यानें राजवाड्यास आग लावून आत्महत्या केली

चीनमध्यें सांस्कृतिक प्रगतीबरोबर परमार्थसाधनादिकांतहि प्रगति होत होती तेव्हां या वेळच्या चीनच्या पारमार्थिक कल्पनांचेंहि आपणास ज्ञान करून घतलें पाहिजे

चीन देशात तीन धर्मसंप्रदाय प्रचलित आहेत (१) बौद्धसंप्रदाय, (२) कन्फ्यूशिअससंप्रदाय, व (३) ताओसंप्रदाय बौद्धधर्माचा प्रसार चिनात कसा झाला हें पहिल्या विभागात दाखविलेंच आहे (पृ २३२) कन्फ्यूशिअस हा चिनी ऋषि खि पू ५ व्या किंवा ६ व्या शतकात होऊन गेला त्यानें काढलेला संप्रदाय सध्या चीनमध्यें प्रमुख आहे त्यानें आपल्या मागील तत्त्वज्ञान्यांचीं मतें एकत्र करून तीं पुढील पिढीला दिलीं, स्वत चें मत म्हणून मुळींच प्रतिपादन केलें नाहीं याचें कार्य आपणाकडील व्यासाच्या कार्याप्रमाणें आहे शु, शिह् यी, व लाकी या अत्यंत प्राचीन 'किंग' ग्रंथांवर त्याच्या संप्रदायाची उभारणी आहे या ग्रंथातून कन्फ्यूशिअसनें जें उद्धृत केलें तें जसेंच्या तसेंच आलेलें नाहीं कारण मध्यतरीं एकदा चीनमधील सर्व ग्रंथ राजाज्ञेनें जाळण्यात आले कन्फ्यूशिअसच्या मृत्यूनंतर ५ व्या किंवा ६ व्या शतकात हान घराणें राज्यारूढ असता काहीं पंडितांनीं कन्फ्यूशिअसचे पुन संशोधित ग्रंथ म्हणून लोकांपुढें काहीं ग्रंथ मांडले तेव्हां या कन्फ्यूशिअस संहितेतील सर्वच विचार त्याचे असें म्हणता येणार नाहींत कन्फ्यूशिअसनें स्वत "चुन् खिऊ" हा इतिहास लिहिला आहे, इतर काहीं छोटे ग्रंथ त्याचे म्हणून मानण्यात येतात शू ग्रंथातील 'लुन् यू' मध्यें त्याच्या म्हणी व संवाद दिले आहेत.

**कन्फ्यूशिअस याचा परमार्थसंप्रदाय**— वास्तविक पाहाता, कन्फ्यूशिअसचा संप्रदाय हा धार्मिक नसून केवळ नीतिधर्म व राजधर्म म्हणता येईल कन्फ्यूशिअसनें आपल्या वेळच्या संस्कारांना धार्मिक स्वरूप देण्याचा प्रयत्न केला 'जेव्हां राज्यकारभार चांगला चालतो तेव्हां भाषा उच्च व धिटाईची असते व वागणूकहि तशीच असते जेव्हां कारभार वाईट असतो तेव्हां वागणूक उच्च व धिटाईची असते पण भाषा मात्र काहींशी स्वैर बनते" या त्याच्या तत्त्वाप्रमाणें तो तत्कालीन अनीतीच्या प्रकाराबद्दल मूकवृत्ति ठेवी तो लोकांना जुन्या धर्माला चिकटून राहाण्याचा उपदेश करी, पण धार्मिक संस्कारांची चिकित्सा मात्र त्यांनीं करूं नये म्हणून बजावी यज्ञात बलिदान करणें मोठें महत्त्वाचें आहे असें तो माना पण शांतिप्रीत्यर्थ मोठा यज्ञ का करावयाचा व त्याचा अर्थ काय याविषयीं अज्ञान प्रदर्शित करी देव व दैवी प्राणी या विषयींच्या तत्कालीन ज्ञानात त्यानें मुळींच भर टाकिली नाहीं, मृत्यु किंवा परलोक यासंबधीं त्यानें काहीं सांगितलें नाहीं चालू आयुष्यात मनुष्यांनीं काय करावें यावर त्याचा सर्व भर असे, म्हणून प्रचलित दु खाचें निरसन होण्याकरिता त्यानें शिस्तीचे नियम घालून दिले मांडलिक संस्थानांच्या भांडणामुळें जेव्हां साम्राज्य डळमळूं लागलें, तेव्हां अनेक संस्थानिकांना आपल्या महत्त्वाकांक्षा मर्यादित करण्याचा व एकी करून देणारी समता राखण्याचा त्यानें उपदेश केला समाजाच्या निरनिराळ्या घटकांनीं एकमेकांच्या हिताकरिता सुरळीतपणें चालावें, प्रत्येक संस्थानानें आपल्या वाट्यास आलेली साम्राज्याची नोकरी बजावावी व प्रत्येक राज्यकर्त्यानें व अधिकाऱ्यानें आपआपल्या जागेवर काम करावें, म्हणजे मध्यवर्ती सत्ता सरहद्दीवरील रानटी लोकांना नमुनेदार व परकीयांना उच्चाटन करण्यास फार भारी होईल, अशा तऱ्हेची त्याची शिकवण असे

कन्फ्यूशिअस हा प्रमुखत्वानें राजकीय सुधारणा करणारा होता असें म्हणता येईल त्याच्या राजकीय सुधारणा नीतीच्या पायावर उभारलेल्या असत सृष्टींतील एकतानता मानवी जगात दिसावी म्हणून त्यानें आपल्या संप्रदायात ज्ञानाचें विशेषत निसर्गज्ञानाचें संवर्धन हें आद्य तत्त्व गोंवून दिलें ज्ञानानें आत्मोन्नति होते व आत्मोन्नत मनुष्य साम्राज्य स्थिर करण्यामध्यें भाग घेऊं शकतो कन्फ्यूशिअसच्या वेळच्या चीनच्या साम्राज्याची स्थिति लक्षात घेतल्यास तो साम्राज्य स्थिर करण्याकरिता का झटत असे व त्यानें राजधर्म प्रामुख्यानें का उपदेशिला हें कळून येईल.

कौटुंबिक व सामाजिक संबंधात सरसकट भाऊपणाची जाणीव ठेवल्यास आयुष्य चैतन्ययुक्त राहातें (१) परोपकारशीलता, (२) मनाची ऋजुता, (३) वागणुकींत औचित्य, (४) व्यावहारिक चाणाक्षपणा, व (५) सद्हेतु या गोष्टी बंधुभावाला आवश्यक आहेत, राजा आणि प्रजा, पिता आणि पुत्र वडील आणि धाकटा भाऊ, नवरा आणि बायको व मित्र आणि शत्रु यामधील संबंध या प्रतियोगी सहकारितेच्या तत्त्वावर चांगले टिकतील व आयुष्य सुखमय होईल पिता पुत्रधर्म आणि त्यायोगें उत्पन्न होणारा बंधुभावपर कनिष्ठपणा हे जगताला आधारमय असून त्यावर केवळ आत्मोन्नतीच नव्हे तर कुटुंबाचा व सरकारी कारभाराचा सुयंत्रितपणा अवलंबून असतो, व याच कारणाकरितां कन्फ्यूशिअसनें पितृपूजे (श्राद्ध) कडे समाजाचें असलेलें फाजील लक्ष कमी करण्याचा प्रयत्न केला नाहीं कारण दैवी हक्क व प्रचलित पद्धतीला मान देण्याचा अत्यावश्यकता या त्याच्या तत्त्वांना पितृपूजमुळें दुजोरा मिळत होता प्रत्येक राज्यकर्ता देवाचें फर्मान मिळवून गादीवर बसतो, तेव्हां

त्याच्या प्रजेपैकीं प्रत्येकानें त्याला राजनिष्ठ राहून आपआपलें काम करीत राहिलें पाहिजे, त्याचप्रमाणें कुटुंबातील प्रत्येक मनुष्यानें वागलें पाहिजे घरात किंवा राज्यात नियमबाह्य वर्तन मुळींच होता कामा नये समाजात शांततेचा कोणीहि भंग करू नये ही त्याच्या "मध्यमस्थितीच्या तत्वा" ची शिकवण होय सामाजिक संबंध सुखदायक व साम्राज्य समाधानी राहण्याकरिता साम्यता व एकतानता या दोन गोष्टींची अतिशय जरूरी असते

वर्तन सरळ ठेवणाऱ्या गोष्टींमध्यें काव्याची गणना होते, कारण तें मोठालीं कृत्यें करण्याला स्फुरण देतें. दुसरी गोष्ट संस्कारविधी, यायोगें सरळ कृत्यें करण्याची सवय जडते, तिसरी, गायन, हें जुन्या पद्धतीचें असेल तर सद्गुणाचें संवर्धन करण्यास चांगलें वातावरण उत्पन्न करतें व स्वभावाला टाकठिकी आणतें, व चवथी गोष्ट म्हणजे धनुर्विद्या, ही नैतिक शिस्त लावण्यास उपयोगी पडते

वरील विचारावरून कनफ्यूशिअसच्या तत्त्वज्ञानात किती थोडा परमार्थ भरला होता हें दिसून येईल तेव्हा त्याला इतकी लोकप्रियता व सर्वमान्यता कशी लाभली हा प्रश्न पुढें येतो खरें पाहता त्याच्या हयातींत व पुष्कळ शतकें पुढेंहि त्याला कोणी विचारात नसे त्याचीं तत्त्वें आचारात आणण्याचें धाडस त्यावेळचा कोणी राज्यकर्ता करीत नसे पण पुढें असा काळ आला कीं राजघराण्यातून त्याला कोण अधिक मान देतो याविषयीं मोठी चढाओढ लागून राहिली त्याच्या गौरवाला व भक्तीला सीमा राहिली नाहीं ती इतकी कीं चालू शतकाच्या आरंभीं तर त्याला "यावा-पृथिवीच्या जोडीनें काम करणारा न्यायाधीश" असें लोकाच्या श्रद्धेंत स्थान मिळालं आहे कनफ्यूशिअसचा संप्रदाय इतका वाढला याच कारण राजा व प्रजा या दोघाच्याहि हिताला तो पोषक आहे राजाला दैवी हक्क असतो हा त्याचा उपदेश उपटसुंभ राजालाहि फायदेशीर होतो, व त्याच प्रमाणें वैयक्तिक सुख मिळण्यासंबधीं त्यानें प्रतिपादलेले जनतेचे हक्क प्रजेपैकीं कोणालाहि आवडतील असेच आहेत शिवाय त्याच्या तत्वाप्रमाणें सर्वांनीं वागल्यास देशात किंवा कुटुंबात अराजकता माजणार नाहीं. यामुळेंच त्याच्या संप्रदायाच वाङ्मय आपत्तीच्या काळांतूनहि सुरक्षितपणें बाहेर पडलें व तें लोकांमध्यें पूर्णपणें बिंबविण्याकरिता पाठशाळा निघाल्या. सरकारी नोकरींत शिरण्यापूर्वी या विषयाची परीक्षा द्यावी लागे इतकें त्याला सरकारी महत्व मिळालें होतें असो आता आपण चीनमधील तिसऱ्या संप्रदायाकडे वळू.

**ताओ संप्रदाय.**—*ताओ संप्रदाय हा चीन देशातील* एक उपासनासंप्रदाय आहे 'ताओ तेह किंग' या लौड्झेच्या पुराणग्रंथावरून ह्या संप्रदायाला हें नाव पडलें वरील *प्रबंधातील त्याच्या मतावर ह्या संप्रदायाची उभारणी केली* असल्यानें लौड्झेलाच त्याचा उत्पादक म्हणून मानण्यात येतें

*खिस्ती शकापूर्वी ६०४ या सालात लौड्झेचा जन्म झाला* असावा असा अदाज आहे कनफ्यूशियस व ताओ सम कालीन असावेतसें जुन्या लीचा वगैरे ग्रंथावरून दिसत *लौड्झेसंबधीं विश्वसनीय जास्त माहिती मिळत नाहीं त्याला* अज्ञातवासात राहण्याचा फार आवड असे व म्हणून त्याच्या हातून ताओचें (मोक्ष मार्गाचें) परिशीलन व *सद्गुणाची अभिवृद्धि झाली* जगापासून कायमचेच दूर राहण्यापूर्वी ताओ व सद्गुण यासंबधीं आपलीं मतें जगा पुढें मांडावीं या उद्देशानें त्यानें एक ग्रंथ तयार केला असें सागतात पुढें त्याच्या आयुष्याचा शेवट कशा रीतीनें झाला याविषयीं काहीं माहिती मिळत नाहीं लौड्झे हा एक खरी व्यक्ति होती कीं, निव्वळ एक कल्पनाजन्य व्यक्ति इतिहासात घुसडून दिली आहे अशी आता शंका उत्पन्न झाली आहे तथापि चिनी तत्वज्ञानवाङ्मयात त्याचा उल्लेख अवश्य केला पाहिजे इतकी त्याची योग्यता आहे

जुन्या लेखकाच्या ग्रंथातील लौड्झेच्या म्हणून मानल्या गेलेल्या उक्ता सापडतील तशा एकत्र करून त्याचा एक प्रबध तयार केला व तो त्याच्या नावावर प्रसिद्ध केला हा ग्रंथ म्हणज विख्यात 'ताओ तेह किंग" किंवा 'ताओ ते चिंग" हा होय तेव्हा या ग्रंथात लौड्झेचा हात कितपत आहे हें सागणें कठिण जाईल कदाचित् आपणाकडील मनुस्मृति आदि ग्रंथाप्रमाणें प्राचीन परंपरा सकलित करणारा हा ग्रंथ असेल व यातील तत्वज्ञान त्याच्या काळापूर्वी बराच काल प्रचलित असेल शिवाय हा ग्रंथ ज्या वेळीं लोका पुढें आला असें सागतात त्या वेळेपासून चार शतकेंपर्यंत त्याचा चिनी वाङ्मयात मागमूस देखील नाहीं असो आता ताओ तेह किंग हा लौड्झेनेंच लिहिलेला ग्रंथ आहे असें धरून चालून त्यातील मुद्याकडे वळणें बरें त्यातील निरनिराळ्या भागांतील युक्तिवादातील विसंगतता, लहान सूत्रा सारखी त्याची मांडणी, ग्रंथ गूढ व काव्यमय करण्याकडे लेखकाची दिसत असलेली प्रवृत्ति वगैरेंनीं हा प्रबंध फार दुर्बोध झाला आहे सर्वांत महत्वाची गोष्ट म्हणजे यातील ताओ या शब्दावरून काय बोध होतो त्याचा निर्णय करणें ही होय *याचे तीन अर्थ होऊ शकतात*–(१) *मार्ग*, (२) बुद्धि, (३) वाक् तेव्हा ग्रंथकर्त्यानें कोणत्या अर्थी हा शब्द वापरला असावा अशाबद्दल टीकाकारात बराच वाद आहे *त्यातल्या त्यात "मार्ग"* हा अर्थ व्युत्पत्तिशास्त्र व अक्षरचिन्ह यावरून पाहता जास्त बरोबर होईल या 'मार्गा" चा अर्थ फार व्यापक आहे हें एका (विशेष) 'गुणा'चें नाव आहे लौड्झेच्या मनातील ताओ ह्या शब्दानें संबोधिलेला हा विशिष्ट गुण कोणता हें एका शब्दात सुबोध रीतीनें सागणें अवघड जाईल हा गुण म्हणजे स्वाभाविक घडणाऱ्या गोष्टींतील साधेपणा व फक्त सिद्धा

नि स्वार्थ बुद्धीनें केलेलें निष्काम कर्म (ह्याला अकर्महि म्हणता येईल) हा होय. जड सृष्टींत याचे दाखले पदोपदीं सांपडतात. "तींतील सर्व वस्तू कांहींएक गवगवा न करता उद्भवतात व आपला जन्मसिद्ध हक्क न वजाविता वाढत रहातात. अभिमान न बाळगता आपआपलीं कर्में करितात. त्याच्यापासून होणाऱ्या उत्पन्नावर मालकी सांगत नाहींत. ह्या आपलेपणाच्या अभावामुळेंच सृष्टींतील क्रिया व कार्यें कधींहि बंद पडत नाहींत"[प.२] समाज सुखी राखण्यासाठीं राज्यपद्धतींत ह्याच गुणाची आवश्यकता आहे. "सिद्ध पुरुषानीं राज्यकारभार पाहिला तर प्रजाजनाच्या बेसुमार मनाच्या मावळतील, त्याना पोट भरण्याचीं साधनें प्राप्त होतील व त्याच्या महत्त्वाकांक्षा कमी होऊन शरीरात भर पडेल. हे पुरुष त्याना (जरूर नसलेलें) ज्ञान करून देणार नाहींत व त्याचा हव्यास नाहींसा करतील व ज्या काहींच्या ठिकाणीं ज्ञान असेल त्याना आपल्या तत्त्वज्ञानाचा उपयोग करता येऊं नये असें करून टाकतील' (प ३) प्रत्येक व्यक्तीनें जर आपल्या स्वत च्या कारभारात अशाच वागणूक ठेवली-थोडक्यात म्हणावयाचें म्हणजे पुन्हा ती व्यक्ति जर लहान मूल बनला—तर तिला अशाच तऱ्हेचें फळ मिळेल. ताओ तेह किंग ह्या ग्रंथातील विषय अशा प्रकारचा आहे. सृष्टि, समाज व व्यक्ति यांच्या कारभारातील निर्हेतुक क्रिया—अशी क्रिया कीं, जिच्या सिद्धिविषयीं मनात हव्यास नाहीं किंवा सिद्धिविनाश झाला तरी त्याबद्दल दु ख नाहीं—म्हणजेच ताओतत्त्वावरहुकूम केलेली क्रिया असें या ग्रंथात प्रतिपादन केलें आहे. या तत्त्वाचा जेव्हा वैयक्तिक शीलाशीं संबंध येतो तेव्हा जेवढें चांगलें व व्यावहारिक असेल तेवढेंच त्यात पिकवून दिलें जातें. निरभिमानता ह्या सद्गुणाविषयीं काय सांगू व किती सांगू असे ह्या ग्रंथकाराला होऊन गेलेलें दिसतें (प ७) मदयता, मितव्यय व जगात पुढें यण्याची हाव नसणें या तीन गुणानां तो फार महत्त्व देत असे (प ६७) "कांहीं हेतू न धरता वागणें, कांहीं त्रास न वाटता कामें करणें, रुचि न समजता खाणें, लहानाला मोठें समजणें व मोठ्याला लहान समजणें (म्हणजे लहानमोठें यात भेद न मानणें), दु ख देणाऱ्यावर दया करणें हा ताओ मार्ग आहे" असें त्यानें एके ठिकाणीं प्रतिपादन केलें आहे.

शासनपद्धतीविषयीं त्यानें जें लिहिलें आहे तें फारसें बरोबर व समाधानकारक दिसत नाहीं. देहांत शिक्षेच्या तो विरुद्ध असे [प ७३ व प ७४] व युद्धाचा तर त्याला तिटकारा असे [प ७९] समाजोन्नति किंवा औद्योगिक यांविषयीं त्याला मुळींच सहानुभूति नसे. जेथें "ताओ" तत्त्वाप्रमाणें वागण्यात फार बाधकगार बनले होते त्यानीं लोकाना सुसंस्कृत करण्याचा कधीं प्रयत्न केला नाहीं. उलट, त्याचा हेतु त्याना गावंढळ ठेवण्याचा असे. "लोकाना जास्त ज्ञान असलें म्हणजे त्यांना ताब्यांत ठेवावयाला व त्यांच्यावर राज्य करण्याला फार त्रास पडतो, आणि म्हणून जो प्रजेला ज्ञान देऊन राज्य चालवू बघतो तो त्या राज्यावर अरिष्ट आणतो. आणि जो ह्या उलट वागतो तो त्या राज्याचें कल्याण करतो असें तो म्हणतो" (प ६५) एखाद्या कमी लोकसंख्येच्या लहानशा राज्यात मी अशी व्यवस्था करून टाकीन कीं, तेथील लोकाना हत्यारें दिलीं तरी ते त्याचा मुळींच उपयोग करणार नाहींत (किंवा त्यास करण्याचें कारण पडणार नाहीं), मरण ही एक मोठी दु ख दायक व हानिकारक गोष्ट आहे असें मी त्याना कारणाकारणानें दाखवून देईन, तरीपण तें टाळण्याकरिता ते दूर कोठें तरी जाण्याची इच्छा करणार नाहींत, त्याच्या जवळ नावा गाड्या इत्यादि वाहनें असतील पण त्यात बसण्याची कधी वेळच त्याना येणार नाहीं, लिहिण्यास वर्णाक्षराएवजीं त्याना पूर्ववत् गाठींच्या दोऱ्याचा उपयोग मी करावयास लावीन. त्याना स्वत ची ओलीकोरडी भाकर गोड लागेल, जाडा भरडा कपडा सुंदर दिसेल, मोडका तोडकी झोपडी चागलें आरामस्थान वाटेल आणि त्याची साधी रहाणी सुखावह होईल, अगदीं शेजारी चिकटून दुसरें राज्य किंवा प्रदेश असला तरी अगदीं मरेपर्यंत त्याशीं संबंध किंवा दळणवळण ते ठेवणार नाहींत (म्हणजे दुसऱ्याच्या मदतीची अपेक्षा त्यास राहाणार नाहीं)"

येथपर्यंत "ताओ" चें जें विवेचन केलें तें कळण्याला फारसें अवघड नाहीं. शील व कर्म याचें विवरण करणारा हा एक गुण आहे, हा गुण प्रत्येक व्यक्तीनें आपल्यात आणण्याविषयीं झटलें पाहिजे व राज्यकर्त्यानें आपल्या शासनपद्धतींत हा उतरविला पाहिजे. निसर्गाच्या वावर्तात ताओसंबंधीं केलेलें विवेचन इतकें सुबोध नाहीं. सर रॉबर्ट डग्लस म्हणतात कीं, मार्ग हा ताओचा अर्थ सर्वोत्तम ठरेल, पण ते लगेच असेंहि म्हणतात कीं ताओ म्हणजे नुसता 'मार्ग' नव्हे तर मार्ग व मार्गानें जाणारा होय. हा मार्ग शाश्वत आहे. ह्या मार्गानें सर्व जीव व चराचरवस्तु जात आहेत. परंतु हा कोणी प्राण्यानें केला नाहीं तर हा स्वत च प्राणी आहे. हा सर्व कांहीं आहे व नाहींहि. आणि सर्वांचें कार्य व कारण हाच आहे. सर्व वस्तूंचा ताओपासून उगम होतो, सर्व ताओला अनुसरतात व शेवटीं "ताओ" प्रत जातात.

लौइझे हा सगुण ईश्वराचें अस्तित्व मानतो कीं नाहीं ह्याविषयीं वाद आहे.

आतापर्यंत "ताओ तेह किंग" मधील ताओ तत्त्वाविषयीं माहिती झाली पण सध्या चीन देशात प्रचलित असलेल्या त्या संप्रदायाविषयीं माहिती त्यांत आलेली नाहीं. हा संप्रदाय लौइझेच्या पाठीमागून सबंध साडे ५०० वर्षांनीं अस्तित्वात आला. तथापि त्रिगुणात्मक हें त्याला दुसरें नांव दिलें आहे. हें औचित्यानें कोठें बरोबर उलगडण्यासाठीं मर्मदेशकांना ही एक प्रकारचें

तळमळ लागलेली असते ती शांत करण्यासाठीं म्हणून लौड्झेनंतरच्या लेखकांनीं त्याच्या थोड्याबहुत असलेल्या उक्तींवरून एक विचारसंप्रदाय तयार केला. लौड्झेन ताओचा कमोटी तयार केला होता त्याच्या पुढील काळांतील अनुयायांनीं "ताओ" हा केवल आदिकरण ऊर्फ ब्रह्म व शेवटीं ज्याच्या ऐक्यामध्यें सर्व परस्परविरोधी गोष्टींचा पूर्ण मिलाफ होतो असा एक आहे असा त्याचा अर्थ लाविला. मानवी जीविताचें उगमस्थान जो हा "एक" तो गोचर विश्वाच्या पलीकडे होता. मरणानंतर सायुज्य मुक्ति व अमरत्व मिळण्यासाठीं लौड्झेच्या तत्वाप्रमाणें चालून शरीराची विकारजडता नाहींशी करून टाकणें हेंच आवश्यक होतें. पुढें पुढें अशी कल्पना बनली कीं, 'एक" हा दूरवर आकाशामध्यें एक देदीप्यमान व अचल असा प्रकाशबिंदु आहे व त्याभोंवतीं मर्त्यदेहरूपी कात टाकून वर गेलेल्यांचे आत्मे फारच जलद गतीनें एकसारखे वाटोळे फिरत असतात. पुढें लवकरच किमयेचे प्रयोग सुरू झाल्यापासून व अमृताबद्दल विश्वास उत्पन्न झाल्यापासून या वरील अत्युत्तम कल्पनांचा बिघाड झाला. जेव्हां बौद्धसंप्रदायाचा पगडा लोकांच्या मनावर बसू लागला तेव्हां ताओ संप्रदायाचें रूप मुळातच बदललें. त्यांनीं बौद्धसंप्रदायातून कांहीं संस्कार, धर्मोपदेशकाचीं वस्त्रें, उपासनापद्धति, नरकाविषयीं कल्पना, देवळांसंबंधीं व्यवस्था इत्यादि गोष्टी घेतल्या व उपासनासंप्रदाय काढला. बौद्धसंप्रदायानेंहि कांहीं गोष्टींत—चांगल्याच गोष्टींत तेवढें—या संप्रदायाचें अनुकरण केलें. चूशी म्हणतो 'बौद्धसंप्रदायानें ताओ संप्रदायातील चांगल्या गोष्टी तेवढ्या चोरल्या. पण उलट ताओ संप्रदायानें बौद्धसंप्रदायांत जेवढें म्हणून वाईट होतें तेवढेंच चोरून घेतलें. जसें एकानें दुसऱ्याजवळून रत्न घेतलें तर त्या रत्नाच्या मालकानें त्या ऐवजीं एक खडा मिळविला". सध्यांच्या काळीं हे दोन्ही संप्रदाय सारखेच बनले आहेत त्यामुळें हा अमुक म्हणून ओळखण्यास जड जातें.

हल्लींचा ताओ संप्रदाय म्हणजे ज्ञान व जाचक धर्मवेडेपणा व आचारविचार यांचा एक समूहच आहे. ह्यांत किमया, भूरमलविद्या आणि पिशाच्चवाद हाहि येतात. इकडे लौड्झेला देवाचें अस्तित्व कबूल होतें कीं नाहीं या विषयीं शंका आहे, तर तिकडे हा संप्रदाय अनेकेश्वरपूजक आहे. लौड्झेला हें कितपत खपलें असतें हें सांगावयालाच नको. अशा 'ताओ संप्रदायाचा" मूळ उत्पादक म्हणून त्याला गणणें हा त्याची केवळ निंदाच होय असें एक लेखक म्हणतो.

याप्रमाणें आशियामध्यें निरनिराळीं राष्ट्रें संस्कृतींच्या निरनिराळ्या विकासावस्थेंत आपला जीवितक्रम आचरीत असतां पश्चिमेकडे यूरोपखंडातील सांस्कृतिक प्रगति कोठपर्यंत येऊन पोंचली होती हें अवलोकन करूं.

---

# प्रकरण ६ वें.

## प्राचीन यूरोपीय संस्कृति.

यूरोपमध्यें स्वतंत्रपणें विकास पावणाऱ्या भिन्न संस्कृती म्हटल्या म्हणजे ग्रीक, रोमन, ट्यूटन व स्कॅंडिनेव्हियन या होत. या संस्कृतींची विकसित अवस्था आपणास बुद्धपूर्व कालांत दृष्टीस पडत नाहीं. तेव्हां या संस्कृतींचें सविस्तर विवेचन करण्याचें स्थान या विभागांत नसून बुद्धोत्तर जग या विभागांतच योग्य होईल. तथापि या संस्कृतींचा उगम जरी अल्प प्रमाणावर असला तरी तो बुद्धपूर्व कालांत झालेला असल्यामुळें आपणास त्याचा निर्देश करणें भाग आहे.

वर ज्या चार भिन्न संस्कृती दाखविल्या त्या जरी भिन्न प्रदेशांत व भिन्न काळांत विकास पावत असल्या तरी त्यांचा परस्परांशीं थोडाफार संबंध आलेला असावा, एवढेंच नव्हे तर ग्रीक व ट्यूटन या इंडोयूरोपीय अथवा मूलगृहकालीन आर्यन संस्कृतीच्याच शाखा असाव्या असा संशोधकांचा सिद्धांत आहे. रोमन संस्कृति तर बहुतांशीं ग्रीक संस्कृतीचीच उत्तरावस्था म्हणतां येईल म्हणून तिचें वर्णन पूर्णपणें चवथ्या विभागांतच दिलें आहे. स्कॅंडिनेव्हियन संस्कृतीची प्रगति तर खि. पू. ५०० पर्यंत फक्त आयसयुगापर्यंत झाली होती. तेव्हां तिची पूर्वावस्था या विभागांत वर्णन केली आहे.

ट्यूटन संस्कृति ही तिच्यापेक्षां अधिक प्रगत दिसते. पण ग्रीक संस्कृति खि. पू. ५०० च्या सुमारास बरीच प्रगत झालेली असावी असें होमर वगैरे ग्रंथांवरून दिसतें. या संस्कृतीनें ईजियन संस्कृतीपासून बऱ्याच गोष्टी उचलल्या होत्या व जरी ईजियन संस्कृतीची प्रगति कांहीं कारणामुळें कुंठित झाली तरी तिची परंपरा ग्रीक संस्कृतीमार्फत कायम राहिली. यामुळें ग्रीक संस्कृतीचें महत्त्व अधिक आहे.

ईजिअन संस्कृतीच्या अमलाखालील प्रदेशांपैकीं आशिया मायनर हा एक भाग असल्यामुळें ईजियन संस्कृतीचा परिणाम आशियामायनरवर कांहीं प्रमाणांत झाला. तसाच तो पश्चिमेकडे ग्रीस वगैरे देशांवरहि झाला. त्या परिणामाची व त्याच्या पुढील संस्कृतींची कल्पना मिळवावयाची झाल्यास अत्यंत प्राचीन काळचा ग्रीक लेख म्हणजे जे होमरचें काव्य त्यांतील विधानें घेऊन पाठीमागल्या कालाविषयीं अनुमानें काढीत बसावयाचें या प्रकारचा उद्योग करावा लागतो. असा उद्योग करून ग्रीक लोकांच्या उपासनापद्धतीसंबंधानें 'एन्सायक्लोपीडिआ ऑफ रिलिजन अँड एथिक्स' या पुस्तकांत खालीलप्रमाणें माहिती दिली आहे. हा माहिती (वैदिक वाङ्मयाशीं तुलना करून) हिंदुस्थानाचा यूरोपाशीं दुवा जोडणाऱ्या कालावर प्रकाश पाडण्यास उपयोगी आहे.

**आशियामायनरमधील ग्रीकलोकांच्या परमार्थविषयक कल्पना.**—ग्रीक लोकांच्या परमार्थविषयक कल्पनाविषयींची एकंदर माहिती द्यावयाची म्हटल्यास त्याचे पुढीलप्रमाणें चार कालविभाग पाडणें सोयीचें होईल, (१) प्रागैतिहासिककाल म्हणजे ख्रिस्तपूर्व दुसऱ्या सहस्रकापासून होमरच्या काव्यरचनेपर्यंतचा काळ, (२) इ स पू ९०० पासून ५०० पर्यंतचा काळ (३) इ स. पू ५०० पासून ३३८ पर्यंत म्हणजे ग्रीकलोकांच्या अत्यंत भरभराटीचा काळ व (४) ग्रीक-रोमन काळ तथापि या कालविभागांतील संप्रदायाची सनवार माहिती देणें कठिण आहे, कारण संप्रदायाच्या प्राचीन लेखांत वर्ष वगैरे काल दिलेले नसतात, किंवा ज्या लेखकानें एखाद्या संप्रदायाबद्दल प्रथमच उल्लेख केलेला आढळतो, त्याच्याच आयुष्यांत तो संप्रदाय प्रथम जन्मास आला असेंहि म्हणता येत नाहीं सदरहू माहिती मिळण्याचीं मुख्य दोन साधनें म्हणजे वाङ्मय व अंकित लेख हीं होत यांपैकीं फार जुनें ग्रीक वाङ्मय तर नाहींच, पण अंकित लेखसुद्धां ख्रिस्तपूर्व ७ व्या शतकाहून जुने अद्याप उपलब्ध झालेले नाहींत अशा स्थितींत पहिल्या कालविभागांतील म्हणजे ख्रिस्तपूर्व दुसऱ्या सहस्रकांतील ग्रीकलोकांच्या परमार्थकल्पनांची माहिती होण्यास होमर व हेसियड या दोन कवींचीं काव्यें हें अमूल्य साधन होय शिवाय निरनिराळ्या परमार्थसंप्रदायांच्या तौलनिक अभ्यासापासून निघणारीं अनुमानें व मानुष्यकशास्त्र या दोन साधनांचीहि पुष्कळ मदत होण्यासारखी आहे शेवटचें साधन म्हणजे मिनोन-मायसिनी लोकांच्या परमार्थसाधनांचीं स्मारकवस्तूंवरून मिळणारी माहिती मिनोन-मायसिनी लोकांची संस्कृति उच्च दर्जास पोहोंचलेली होती, व तिचा काळ होमरच्या काव्याच्या काळापेक्षां फारच पूर्वीचा असून सदरहू लोकांपासून हेलेन लोकांनीं (प्राचीन ग्रीकांनीं) बऱ्याच धार्मिक कल्पना व गोष्टी उचलल्या आहेत, याबद्दल आतां शंका उरलेली नाहीं

**होमरच्या काव्यांतील परमार्थविषयक कल्पना** – देव अनेक असून त्यांत उच्चनीच दर्जाचे आहेत व ते सर्व देव मिळून बनलेल्या कुटुंबाचा एक मुख्य देव किंवा परमेश्वर आहे. वगैरे अनेकेश्वरीमतांतून एकेश्वरवादाकडे संक्रमण दाखविणाऱ्या कल्पना होमरच्या काव्यांत दृष्टीस पडतात या देवता प्राचीन रोमन देवताप्रमाणें अस्पष्ट व संदिग्ध स्वरूपाच्या, चैतन्ययुक्त पण व्यक्तित्वरहित अशाच केवळ नसून पूर्णपणें सगुण, साकार, मनुष्यस्वरूपी पण अतिमानुष गुणांच्या आहेत, त्यांना आत्मा आहे, त्यांचें शरीर अतिमानुष द्रव्याचें बनलेलें असून त्या देवता अमर आहेत, इत्यादि वर्णन त्या काव्यांत आढळतें या वर्णनांत देवतांवर मनुष्यांतील गुणधर्मांचा अध्यारोप करण्याची प्रवृत्तीच विशेष दिसून येते स्कॅमँड्रॉस सारखी नदीदेवतादि एखाददुसरी आढळते, परंतु अशा दृश्य भौतिकवस्तूंवर देवत्व आरोपित करणाऱ्या दैवतकल्पना फारशा नाहींत वनदेवता व नदी पर्वत स्वर्गीय आदेवता त्यांत आहेत तरी त्यांचें मूलवस्तुबोधक स्वरूपवर्णन दिलेलें नसून त्यांना नावेंहि 'तरुण स्त्रिया' किंवा 'वधू' अशीं मनुष्य वाचक दिलेलीं आहेत या देवतांना आपल्या इच्छेप्रमाणें कोणत्याहि पशुपक्ष्याचें स्वरूप धारण करतां येतें, असें आहे तरी त्या मूळ मनुष्यस्वरूपीच आहेत हेरा नामक 'गो-मुखी' देवतेचें किंवा अथेनी नावाच्या घूकशीर्ष देवतेचें वर्णन होमरनें केलेलें नाहीं. त्याच्या देवतामध्यें मनुष्यांत असणाऱ्या नैतिक कल्पना, त्याच प्रमाणें मनोविकार आणि नीति व कलाविषयक भावना वगैरे सगुणदेवतेचें स्वरूप पूर्ण आहे. मूर्तींतील पंचमहाभूतात्मक देवतांना प्राचीन ग्रीक दैवतसृष्टींत सर्वश्रेष्ठ मानलेलें नाहीं सूर्य-देवता, नदी-पर्वत-देवता, वायु-देवता व वनदेवता त्यांत आलेल्या असल्या तरी त्यांना श्रेष्ठत्व नाहीं, इतकेंच नव्हे तर त्यांना अगदीं कमी महत्त्व आहे त्यांचा श्रेष्ठ देव झूस हा जरी अंतरिक्षस्थ व्यापाराचा नियामक असला तरी तो म्हणजेच विद्युद्देवता किंवा आकाशदेवता असा स्पष्ट उल्लेख कोठेंच नाहीं. तात्पर्य, होमरच्या काव्यांतील ईश्वरकल्पना निराकार दैवतपर नाहींत, किंवा प्रत्येक पदार्थमात्रांत देवत्व आहे असें मानणाऱ्या सर्वेश्वरीमतपरहि नाहींत, तर मनुष्याप्रमाणेंच देवतांची म्हणजे उच्च दर्जाच्या पण मनुष्यसदृश व्यक्तींची एक निराळी जात आहे, अशा प्रकारच्या आहेत.

दैवतास मनुष्य स्वरूप आलें म्हणजे तीं दैवतें लोकप्रिय करण्यासाठीं दैवतांच्या लीलांचें वर्णन सुरू होतें होमरच्या काव्यांत अश्लीलपणाचे व दुर्वर्तनाचे प्रसंग फक्त एकदोनच असून ते वगळल्यास बाकी सर्व वर्णनांत पवित्र धार्मिक वृत्ति व उच्च नैतिक कल्पना पूर्णपणें भरलेल्या आहेत. देवतांचा अपमान किंवा अन्याय कोणी केल्यास त्याचा मत्सर करणें किंवा सूड घेणें, हे प्रकार देवतांत आढळतात, पण एकंदरीनें त्या सदाचरणी व कृपाळु अशाच आहेत धर्मपर विचारहि उच्च दर्जाचे व प्रौढ दिसतात उदाहरणार्थ, एके ठिकाणीं झूस म्हणतो, " देव कधींच कोणाला दुःख देत नाहीं, तर स्वतःच्या दुष्कर्मांचें फळ म्हणूनच मनुष्यास दुःख भोगावें लागतें " काव्यांत दिलेले धर्मविधीहि उच्च दर्जाचे आहेत, त्यांत रानटीपणा मुळींच नाहीं, जादूटोण्याचे प्रकारहि थोडेच आढळतात तसेंच यज्ञ करणें म्हणजे देवतांना लांच देणें अशी नीच कल्पना नसून देव व मानव यांच्यामधील स्नेहभाव दर्शित करण्याचा तो मार्ग आहे असें मानलेलें आहे वेदी, देवळें, धर्मोपाध्याय वगैरे गोष्टी त्यांत असून मूर्तिपूजेची कल्पना मात्र नुकतीच प्रादुर्भूत झालेली दिसते.

सदरहू वर्णनावरून पहिल्या सहस्रकापूर्वीच्या कांहीं शतकांतील परमार्थकल्पनांची कल्पना होण्यासारखी आहे कारण काव्यांतील सर्व गोष्टी होमरनें केवळ स्वकल्पनेनें वर्णिल्या आहेत असें मानणें शक्य नाहीं, तें वर्णन इ. स. पू १०००

च्या सुधारलेल्या ग्रीक समाजाचें असलें पाहिजे परंतु हें वर्णन परिपूर्ण आहे असें मानता यावयाचें नाही.

**होमरपूर्वकालीन दैवतकल्पना.**—धर्मविधी, तसेंच नैतिक व अतींद्रियज्ञानविषयक कल्पना यांची वाढ किती सावकाश होत असते, आणि एकदा रूढ झाले म्हणजे मग ते विधी व त्या कल्पना नष्ट होणें किती दुरापास्त असतें, हा अनुभव लक्षांत घेतल्यास होमरच्या काव्यांत वर्णिलेले धार्मिक विधि व कल्पना होमरच्या पूर्वीच्या अनेक शतकांच्या जुन्या असल्या पाहिजेत हें उघड ठरतें. हेलेनलोक, एकियन, इओलियन, मिन्यन, मिनोनमायसिनी वगैरे ज्या जातींच्या संमिश्रणापासून झाले, त्या जातींमध्यें देव म्हणजे विशिष्ट गुणरूपसंपन्न अशा व्यक्तींची भावना, अशा कल्पनेपर्यंत मजल गेलेली असावी अर्थात् हेलेनलोक आरंभापासून प्रत्येक सृष्ट पदार्थांत गूढ दैवी शक्ति वास करीत आहे या समजुतीच्या पुढील पायरीवर म्हणजे सगुण व साकार अशी स्वतंत्र देवमाला मानणारे होते. अलीकडे सांपडलेल्या शिलालेखावरून इराणीलोकांप्रमाणें, मित्र वगैरे वैदिक देवता मानीत असल्याचें सिद्ध झालेलें आहे तेव्हां त्याचे समकालीन (इ. स. पू. १४००) व नातलग असे जे पाश्चात्य प्रदेशांत वस्ती करून राहणारे आर्यन लोक ते धार्मिक बाबतींत त्यांच्या बरोबरीचे असले पाहिजेत असें मानणें चुकीचें होणार नाही. तात्पर्य होमरच्या काव्यांतील देवता म्हणजेच उपरिनिर्दिष्ट निरनिराळ्या जातींतील व हेलेनलोकांत एकत्र झालेल्या देवता, असें मानणें जरूर आहे. अशा स्थितींत झूस, अपोलो व पोसीडॉन या अनेक जातिमान्य देवताच संमिश्र अशा हेलेनजातीनें श्रेष्ठ कां मानल्या याचाहि चांगला उलगडा होतो.

तेव्हां "एकेका जातीचा एकेक स्वतंत्र देव" अशा स्थितींतून होमरपूर्वकालीन ग्रीक देवकल्पना पुढें गेलेल्या होत्या. अनेक जातींतल्या देवांना हेलेन लोक पूज्य मानीत होते व त्यांपैकीं झूस हा सर्वश्रेष्ठ देव किंवा परमेश्वर असें मानण्याइतकी त्यांच्या ईश्वरविषयक कल्पनेची वाढ झालेली होती. देवतेवर मनुष्यगुणाध्यारोप करण्याची त्यांची मजलहि प्राचीन रोमन लोकांपेक्षा पुढें गेलेली होती. उदाहरणार्थ, देवतांचे विवाह व त्यांचीं कुटुंबें यांचें वर्णन होमरच्या काव्यांत आहे.

**मिनोनमायसिनी लोकांतील दैवतकल्पना.**—होमरनें वर्णिलेल्या दैवतकल्पनांपैकीं उत्तरेकडून आलेल्या आर्यन हेलेनी लोकांनीं आणलेल्या कोणत्या हें वर सांगितलें, त्या बरोबरच मूळ पाश्चात्य प्रदेशस्थ लोकांच्या कल्पना कोणत्या हेंहि पाहिलें पाहिजे. तद्देशीय मिनोन मायसिनी लोकांची दैवतपरंपरा व आर्यन् हेलेनीपरंपरा यांतील मुख्य फरक असा आहे कीं, पहिल्यांत स्त्री देवता श्रेष्ठ तर दुसऱ्यांत पुरुष देवता श्रेष्ठ मानीत असत. हा मिनोनमायसीनी लोकांतील उपासनाविशेष त्यांची या बाबतींत अधिक प्रगति झाल्याचा निदर्शक असून हाच विशिष्ट संप्रदाय ऐतिहासिक काळांतील कांहीं ग्रीक लोकांनीं कायम टेवलेला आढळतो. तथापि कोणती विशिष्ट स्त्रीदेवता भूमध्यसमुद्रांतील भूभागांतल्या कोणत्या विशिष्ट जातींत प्रचलित होती, ही गोष्ट तेथील भाषांच्या आपल्या अज्ञानामुळें अद्याप ठरविता आलेली नाहीं या अनेक देवता व तत्संबंधीं धर्मविधि यांविषयींची सविस्तर माहिती तूर्त मिळण्यासारखी नाहीं.

**हेलेनसमाजाचा प्राथमिक काळ.**— होमरनें वर्णिलेल्या धर्मकल्पना व विधी बऱ्याच उच्च दर्जाचे आहेत. आणि या कल्पना व विधी हेलेन लोकांनीं त्यांच्या पूर्वीच्या भूमध्यसमुद्रानिकटवासी सुधारलेल्या लोकांपासून घेतलेल्या आहेत, हें सिद्ध झाल्यावर सदरहू कल्पना व विधी हेलेन लोकांच्या काळापूर्वी अनेक शतकें परिणत स्वरूप पावत आलेल्या असल्या पाहिजेत. तेव्हां त्या लोकांची सुधारणेची मजल अनेक बाबतींत कोठपर्यंत गेलेली होती याची कल्पना नंतरच्या काळांतील हेलेन लोकांच्या दैवतसंप्रदायांतील सर्व गोष्टी बारकाईनें पाहिल्यास होण्यासारखी आहे, म्हणून येथें त्याचें सविस्तर वर्णन करूं.

**कौटुंबिक धर्मविधी.**—दुसऱ्या सहस्रकांतील उत्तरार्धांत शेतकीची पुष्कळच सुधारणा झालेली होती तसेंच एकपतिपत्नीविवाहपद्धतीचें कुटुंब उत्तम मानण्यापर्यंत मजल जाऊन तीच व्यवस्था प्रचलित होती डेमीटर ही देवता मूळ आर्यनलोकांतील असल्याचें सिद्ध झालेलें असून हेलन लोकांच्या अनेक जातींत तिलाच पृथ्वीवरील धान्य देवता म्हणून मानीत असत, व थेस्मोफोरिया नामक धार्मिक समारंभ तिच्याच संबंधाचा असे खाजगी कुटुंबांतील नैतिक आचारविचाराचाहि धर्मविधींशीं बराच संबंध होता झूस देवतेचा पूजाहि बरीच पूर्वापार चालत आलेली असून प्राचीन आर्यन कुटुंबांतील नातलग अंगणांतील वेदीभोंवतीं जमून तिची पूजाअर्चा करीत असत दुसरा एक विधि नवीन जन्मास आलेल्या मुलासंबंधाचा होता घरांतील दालनांत एक चूल व चुलीचा दगड ठेवलेला असे, त्याच्या भोंवतीं त्या मुलाला घेऊन धावत फिरत असत व अशा रीतीनें अग्निदेवतेच्या दिव्य शक्तीला तें समर्पण करीत.

**राजकीय धर्मविधी.**—तसेंच तितक्या प्राचीन काळींहि बऱ्याच सामाजिक व राजकीय बाबींशीं धर्मविधींचा संबंध असे त्या वेळचा समाज ल्हानलहान खेड्यांत राहात असे परंतु पुष्कळ वेळां देवतांच्या देवळांभोंवतीं शहरें वाढत जात व ते लोक राजकीय बाबतींत तीच देवता श्रेष्ठ मानीत. उदाहरणार्थ अथेनी ही देवता अथेन्स शहरांत अत्यंत प्राचीन काळापासून महत्त्व पावत आलेली असावी. व म्हणून होमरच्या काव्यांत, राजकीय कारस्थानांत सल्लामसलत व उत्साह देणारी देवता, असें तिचें वर्णन आढळतें. तात्पर्य, झूस व अथेनी या देवतांच्या भक्तांनीं आपआपल्या शहरांचें महत्त्व वाढवून राजकीय वर्चस्व प्रस्थापित केलेलें आहे कारण पोलियस हें नांव इतर कोणत्याहि देवतेला लावलेलें

आढळत नाहीं. होमरच्या काव्यात वर्णिलेल्या प्रकारचें महत्त्वाचें राजकीय स्वरूप वरील दोन देवतास दुसऱ्या सहस्रकात मिळालें असलें पाहिजे, ही गोष्ट अनेक दंतकथांच्या आधारेंहि सिद्ध होते झूस पोलियस देवतेच्या पूजनसंप्रदायातील धार्मिक विधींसंबधानें जी लेखी माहिती मिळालेली आहे तीवरूनहि वरील मतास पुष्टि मिळते .

होमरपूर्वकालीन समाजात वर उल्लेखिलेल्या दोन देवता खेरीज इतरहि कित्येक दैवतसंप्रदाय अस्तित्वात येऊन महत्त्व पावलेले होते राजकीय विषयावर वक्तृत्वपूर्ण भाषणें करण्याचें आद्य ठिकाण जें 'मार्केट' ( बाजारचा चौक ) त्यालाहि पवित्र ठिकाण मानण्याचा प्रघात पडलेला असल्याचें होमरच्या काव्यावरून दिसते त्या मार्केटमध्यें हर्मीस नामक पवित्र पाषाण ठेवलेला असे. तसेंच अपोलो नामक देवता शहरें वसविणारी अधिष्ठात्री देवता मानली जात असे, व शहराच्या मुख्य रस्त्यात तिची मूर्ति स्थापन केलेली असे पायथो शहरात तर भविष्यकथन करणारी देवता म्हणून तिला बरेंच राजकीय महत्त्व आलेलें होतें

**प्राचीन दैवतकल्पनांतील नैतिक स्वरूप**—देवपूजेच्या संप्रदायाचा राजकारणाशिवाय आणखी कित्येक बाबतींतहि प्रवेश झालेला होता त्या प्राचीन समाजातील नैतिक आचारविचारानाहि देवताचें अधिष्ठान असे देवाविषयींचा आदर केवळ भीतिप्रेरित नसून धर्मसमजुतींत बऱ्याच सौम्य भावना उत्पन्न झालेल्या दिसतात नैतिक बाबतींत, देव सत्यप्रिय असून दुष्टांचा सूड घेणारा आहे, या कल्पनेच्याहि पुढें पाऊल पडून तो दयाळु कृपाळु आहे, दीनाचा व अनाथाचा कैवारी आहे, वगैरे कल्पना रूढ झालेल्या दिसतात. परमुलखात हिंडत फिरणाऱ्या लोकाचें संरक्षण करणारा झूस देव आहे, असें मानीत स्वर्ग व पाताळ यातील अनेक देवताच्या नावानें शपथा घेऊन खासगी व सामाजिक व्यवहार करीत असत व त्यामुळें त्यातील नैतिक बंधनें पाळलीं जात असत

**उपासनेंत कलाविषयक अंग**—होमरपूर्वकालीन समाजातील अनेकेश्वरी धर्मसंप्रदायात मनुष्यातील उच्च कर्तृत्वशक्तीच्या इतर कित्येक अंगासहि पावित्र्य प्राप्त झालें असल्याचें दिसतें. गायन व संगीत या ललितकलात एक प्रकारची निराकार दैवतशक्ति वास करीत असल्याचें ते लोक मानीत असत, इतकेंच नव्हे तर, अशा काहीं देवताना मनुष्यस्वरूपहि दिलेलें असल्याचें आढळतें उदाहरणार्थ म्यूझेस किंवा चाराईट्स ह्या देवता घ्या या होमरपूर्वकालीन अनेकेश्वरपंथी समाजात रूढ झालेल्या असल्याचें दिसतें. चाराईट्स नामक देवता मायसिनी संस्कृतीचें केंद्रस्थान जें बिओशियन आर्कोमिनॉस तेथें उदयास आलेल्या दिसतात आपोलो व अथेनी या श्रेष्ठ देवतानाहि ललितकला व गायन याच्या अधिष्ठात्री मानूं लागले होते.

**हेलन समाजांतील प्राथमिक धर्मविधीः**—वरील विवेचनावरून असें दिसून येतें कीं, ग्रीसदेशाच्या इतिहासातील अगदीं प्राचीन काळात प्रचलित असलेला अनेकेश्वरी संप्रदाय बरेंच परिणत स्वरूप पावलेला होता. ह्या अनुमानाला तत्कालीन धर्मविधींच्या स्वरूपाच्या माहितीवरूनहि पुष्टी मिळण्यासारखी आहे होमर व हेसिअड याच्या काव्यात त्याच्या परिचयात असलेल्या धार्मिक उपासनेच्या प्रकाराची पुष्कळ माहिती आलेली आहे अर्थात हे प्रकार रूढ होण्यास बराच काल जरूर असल्यामुळें ते दुसऱ्या सहस्रकातील अंतिम शतकातले असले पाहिजेत देवतेची पूजा करण्याचें पवित्र ठिकाण मूळ एखाद्या गुहेंत किंवा रानात झाडझूड नोढून साफ केलेल्या व कुंपण घालून बंद केलेल्या जागेत असावें, व तेथें पूजेकरता देवतेची प्रतिमा म्हणून केवळ एखादा पवित्र वृक्ष किंवा पुरलेला स्तंभ घेत असावेत पुढें मनुष्यगुणाचा देवतेवर अध्यारोप करण्याची प्रवृत्ति जसजशी बळावत गेली तसतसें स्वतंत्र देवळें बाधून त्यात देवताच्या मूर्ती स्थापन करण्यात आल्या. इतकी वाढ होमरच्या पूर्वीच्या काळातच झालेली दिसते मिनोन–मायसिनी संस्कृतीच्या काळातहि देवळें बाधलेलीं असल्याचें सिद्ध झालें आहे. पण तीं देवळें राजवाड्याचा भाग असल्याचें आढळतें यावरून त्याकाळीं राजा हाच समाजाचा धर्मगुरूहि मानण्यात येत असावा मिनॉस व ऐकॉस या राजासंबंधाच्या ज्या दंतकथा आहेत त्यावरून वरील अनुमानास पुष्टि मिळते अर्गास व आलिंपिया येथें देवतांचीं देवळें जमिनींत खणताना सापडलीं आहेत, तीं इ स पू ९०० च्या सुमाराचीं असावीं परंतु डेल्फि येथील देवालय व अथेनियन ॲक्रॉपोलीस येथील अथेनी देवतेचें देवालय हीं त्यापेक्षाहि जुनीं आहेत.

अनेक देवालयें बाधलीं गेल्यानंतर लवकरच देवताचे पुजारी व उपदेशकहि अस्तित्वात आले असले पाहिजेत. झूस देवतेच्या पुजाऱ्याचा उल्लेख होमरनें आपल्या काव्यात केलेला आहे पुरोहित वगैरे इतराबरोबर लढाईवर जाणे वगैरे लौकिक व्यवसायहि करीत असत तथापि त्याना राजकीय व सामाजिक बाबतींत विशेष सत्ता असल्याचें आढळत नाहीं परमार्थमूलक व्यवहारात राजालाच श्रेष्ठ मानीत असत ही अत्यंत प्राचीन काळातील विशेष महत्वाची गोष्ट आहे पण जसजसे विधी वाढत गेले तसतसे राजाला मदतनीस म्हणून धार्मिक बाबींतले पंडित लोक धर्मोपाध्याय म्हणून नेमण्यात येऊं लागले, पण त्या सर्वांवर अधिकार व देखरेख राजाचीच असे त्यामुळ धर्मसत्ता व राजसत्ता यांच्यामध्यें तटाभांडण झाल्याचें उदाहरण ग्रीसच्या प्राचीन किंवा प्राचीनतर काळात क्वचितच आढळतें ग्रीसच्या प्राचीनतम काळात किंवा ऐतिहासिक काळात आचार्यांच्या सत्तेचें विशेष बंड माजलें असल्याचें कधींच आढळत नाहीं या विधानाला दुसरा अप्रत्यक्ष पुरावा असा आहे कीं, देवता अगात येऊन

तद्वारा विलक्षण गोष्टींत भाविष्य कथन करून लोकांना घाब रवून सोडण्याचे व त्यायोगाने पुष्कळांनीं स्वत चा फायदा करून घेतल्याचे उदाहरणहि आढळत नाहीं. भविष्य कथन करणारे लोक त्या वेळीं असत पण ते या वर्गाहून निराळे असत.

यदाकदा बसून देवतेला हविर्द्रव्य अर्पण करीत त्या करता एखादा पशु धान्य किंवा कधीं फळेंहि घेत असत अशा यज्ञात मद्य कधीं असे, कधीं नसे पण, मद्यविरहित यज्ञ अधिक प्राचीन असावा असे वाटतें या यज्ञाचा हेतु देवतेवरोवरचा स्नेहभाव व अनुभाव वाढावा, हा, दिसतो होमरच्या काव्यात असेच वर्णन असून पुढे तशाच भावना प्रचलित राहिला असल्याचे, धार्मिक इतिहासावरून दिसत हेलन लोकांच्या यज्ञात हे सौम्य स्वरूप त्या नमुन्याच्या इतर समाजातहि आढळते होमरने वर्णिलेल्या यज्ञविधीत दुसरा एक विलक्षण गूढार्थमूलक प्रकार आढळतो, व तो अत्यंत पुरातन काळापासून चालत आलेला असावा. तो प्रकार असा कीं, यज्ञातील पशुमांस यज्ञ करणारांनीं भक्षण करण्यापूर्वी पशूच्या शरीराच्या ज्या भागात प्राण असतो तो अन्तर्भाग जिभेने चाखावयाचा याच त्याचे कारण, असे कीं, त्या विशिष्ट भागाच्या स्पर्शाने देवता व तिचा भक्त यांच्यामध्ये खरा ऐक्यभाव उत्पन्न होऊ शकतो, अशा समजुत असावा

अथानियन व ऑलिंपियन धर्मविधींमध्ये एक महत्त्वाचा फरक आढळतो अथानियन यज्ञात पाताळातील देवताना संतुष्ट करण्याचा हेतु असे व त्याकरिता यज्ञिय पशूंस टाकें जमीनींत एक भोक पाडून त्यावर धरून तें तोंडात असत आणि त्यातून सांडणारे रक्त त्या भोकात पाडीत असत पण ऑलिंपियन यज्ञात आकाशातील देवताना संतुष्ट करण्याचा हेतु असे व त्याकरिता यज्ञिय पशूंच डोकें वर उंच धरून व तोंड आकाशाकडे फिरवून कापीत असत हा दोन्हा प्रकारच्या यज्ञाच वर्णन होमरच्या काव्यात आढळतें ग्रीक लोकाच्या मृतांच्या संबंधाचे धर्मविधी पाताळस्थ देवताच्या धर्मविधीच्या नमुन्यावर रचलेले दिसतात

अथानियन संप्रदायातील वरील प्रकारावरून असे दिसतें कीं, ग्रीक लोकातील अत्यंत प्राचीन काळच्या धर्मविधीचे स्वरूप होमरच्या काव्यात वर्णिलेल्या इतक सौम्य व सोज्ज्वल नव्हते शिवाय अधकारात व्यापलेला असा एक लोक असून त्यामध्ये सत्ता चालविणाऱ्या व पापाचरणी दुरात्म्याना मरणोत्तर शिक्षा करणाऱ्या यमासारख्या देवता आहेत, वगैरे कल्पना होमरला परिचित असल्याचें दिसत ; भूतपेतादि तामस दैवताचा पूजाहि ग्रीसच्या निरनिराळ्या भागात प्रचलित असल्याचा पुरावा मिळतो

थोर व पराक्रमी पूर्वजांचे उत्सव करण्याचा संप्रदाय होमरोत्तर कालातल्या प्रमाण होमर पूर्वकाळातहि असल्याचें दिसते मायसिनी लोकात मृताच्या थडग्यांचा फार काळजी घेत असत या प्रकारावरूनच पुढे मृताची स्वतंत्ररीत्या पूजा व उत्सव करण्याचा प्रघात पडला असावा, शिवाय अनेक ईश्वर मानण्याच्या धार्मिक वृत्तीमुळें थोर पूर्वजाचे उत्सव करण्याची बुद्धि वाढत गेला असावी परंतु होमरच्या काव्यात या वावतींत स्पष्ट पुरावा सापडत नाहीं, आणि यान्या पुढील पायरी म्हणजे भूतपिशाचावर विश्वास ठेवण, त्यांच्या त्रासदायक, दुष्ट कृत्याची धास्ती वाटण, मरणोत्तर स्थिति व स्वर्गनरकादि लोक याबद्दल चिंता वाहणे, इत्यादि गोष्टी हेलेन लोकाच्या इतिहासात कोठेंहि फारशा आढळत नाहींत. हेलेन लोकातील अगदीं प्राचीन दंतकथातहि तशा गोष्टी नाहींत पृथ्वीच्या खालीं मृत्युलोक म्हणून आहे असें ते मानीत असत पण खालील देवता भयानक नसून उलट दयाळू दिसतात होडिस डेमीटर या कृपाळू, कल्याणकारक देवता आहेत

**प्राचीनतम शुद्धीकरण (प्रायश्चित्त) विधि—** शुद्धीकरणाच्या आवश्यकतेची कल्पना होमरला मुळींच नव्हती असे कोणी म्हणतात, पण ते चूक आहे इलियडच्या पहिल्या पुस्तकातच अगॅमेम्नानच्या हुकुमावरून एकियन लोकानीं प्लेगपासून आपली शुद्धि करून घेण्याकरिता त्याचें साधन म्हणून एक दूषित वस्तु समुद्रात टाकून दिला असे वर्णन आहे शिवाय हेसियडमध्ये असा एक नियम सांगितलेला आढळतो कीं, एखाद्याचा प्रेतविधि करून आल्यावर त्याच दिवशीं मनुष्यानें अपत्योत्पादन करणे पहाण अनर्थकारक असतें हा समज व ग्रीक समाजात पसरलेले इतर असलेच अनेक समज बऱ्याच प्राचीन काळापासून चालत आले असल्याचें दिसतें परंतु प्रायश्चित्तविधासंबंधीच स्वतंत्र सविस्तर ग्रंथ मात्र झालेला दिसत नाहीं

**प्राचीनतम काळातील अपरिपक्व धर्मकल्पना.—** अगदीं प्राचीन काळातल्या ग्रीक लोकाच्या ईश्वरविषयक कल्पना बऱ्याच सुधारलेल्या होत्या हे खरें असलें तरी त्यांच्यात काही समाजैकरसंबंधीतक व अप्रगत कल्पनाहि होत्या हें खोटें नाहीं कारण सर्वात्मवाद अचेतनवस्तुपूजा, पशुस्वरूपी देवतासंप्रदाय, निराकारदैवतोपासना किंवा या पेक्षाहि देवताविषयींच्या अमंगल कल्पना, तसेच मनुष्य यज्ञ, वायुनिवारक व जलनिदर्शक अभिचारप्रयोग, पापवाहक अजापुत्र इत्यादि धर्मविधी व कल्पना त्यांच्यात आढळतात या अपरिपक्व धर्मसमजुतींचा उल्लेख होमरच्या काव्यात आलेला नसला तरी त्या होमरोत्तरकालीन आहेत किंवा हेलेन लोकानीं नंतर त्या पौरस्त्य लोकापासून घेतल्या, किंवा पुढील अवनतीच्या काळात त्या उत्पन्न झाल्या असाव्या, यापैकीं कोणताच गोष्ट खरी नसून त्या हेलन लोकाच्या अगदीं प्राचीन पूर्वकाळापासून चालत आलेल्या होत्या, असे मानणेंच जरूर आहे. ग्रीक लोकाच्या परमार्थ साधनाच्या इतिहासात आकस्मिक,

अशी एकहि गोष्ट नाहीं, भूतकालीन कल्पनात एकदम मोठी क्रान्ति केव्हांहि झालेली नाहीं, किंवा धार्मिक कल्पना सुधारत गेल्यामुळे पूर्वीच्या अप्रौढ गोष्टी नष्ट करण्यांत आल्या असेंहि नाहीं, कोणाहि मार्गेफिरू धर्मोपदेशक अवतरलेला दिसत नाहीं, किंवा तत्वज्ञानाचा मोठा वाढ झाल्यावरहि प्राचीन अपरिपक्व धार्मिक विधांचा व कल्पनांचा तीव्र निषेध केलेला नाहीं, आणि जो सौम्य निषेध केला त्याचा परिणाम झाला नाहीं. प्राचीन धर्मविधांपैकीं अत्यंत भयंकर तेवढेच विधी कायद्याने गाडून बाकीचे यथाव्यापार फरकानें कायम ठेवण्यात आलेले होते त्याबद्दल नंतरच्या वाङ्मयात भरपूर पुरावा आढळतो

**पशुदेवता व पशुपूजा** — देव म्हणून एक स्वतंत्र व्यक्तींची जात आहे अशी कल्पना उभारण्यास देवतांवर मनुष्यगुणाचा अध्यारोप करणे ही युक्ति चांगली असली तरी ती कांहीं सर्वोत्तम युक्ति नव्हे तथापि वरील मनुष्यगुणाध्यारोपाच्या तत्वाचा हेलन लोकांचें अनवस्थरामन बन विण्यास मोठाच उपयोग झाल्ला दिसतो सदरहू कार्यास होमरच्या पूर्वीच आरंभ झाल्ला दिसतो कित्येक पशूनाच देवाचे अवतार मानून त्यांची उपासना होऊ लागलेली होती उदाहरणार्थ अपॉलो या देवतेच्या नावाचा संबंध लांडग्याशीं असलेला दिसतो. अपॉलोला शिकारी लोक एके काळीं आपला देव मानीत असावेत तसेंच एपायरस व मॅसेडोनिया या देशात सर्पाची पूजा करीत असल्याचा पुरावा सांपडतो ॲटिका व अर्केडिया यात आर्टेमिस नामक अस्वलाची पूजा होत असावी नंतरच्या काळात डेमाटर नामक अश्वमुखी देवतेची पूजा चालू होती, यूरानोम नामक अर्ध-स्त्री, अर्ध-मत्स्यरूपी देवता अर्केडियातच आढळते

प्राचीन मानवशास्त्रवेत्त्यांची या पशुपूजनाबद्दलची अशी कल्पना होती कीं, प्रथम निरनिराळ्या राष्ट्रांची प्राचीन काळापासून चालत आलेलीं कांहीं दैवतें असत, व या दैवतोपासनेचीच परिणतावस्था आपणांस पशुपूजनात दिसते परंतु मानवशास्त्रात अधिक गति असलेल्या अर्वाचीन अभ्यासकांनीं ही कल्पना त्याज्य ठरविली आहे कारण ग्रीक किंवा आर्यन जातीच्या लोकात दैवतपूजेचा मागमूस कोठेंहि लागत नाहीं, आणि पशुदैवतांची उपासना ही प्रत्यक्ष पशुपूजनापूर्वींची एक अवस्था आहे, असें गृहीत धरण्याचें कारण नाहीं कारण कांहीं जातींमध्यें मानवाकृति दैवतोपासना व पश्वाकृति दैवतोपासना या दोन्हींहि एकाच काळीं रूढ असल्याचीं उदाहरणें आढळतात. तसेंच मनुष्याच्या मानसिक विकासामध्यें पश्वाकृति दैवतोपासना ही पहिली पायरी असून तिच्यापासून पुढें मानवाकृति दैवतोपासना निघाली असें आपणांस न्यायपूर्वक म्हणता येणार नाहीं

**क्रियावाचक देवता** — होमरच्या पूर्वींच्या काळात देवताविषयक समजुतीचा दुसराहि एक प्रकार आढळतो कित्येक गुण, क्रिया व व्यवसाय यांत दैवी शक्ति असल्याचें मानून त्यांची उपासना करीत असत उदाहरणार्थ, नांगराच्या फाळाचा देवता, बिनधान्यपिकविणारा देवता, धान्यसमृद्धिदायक देवता असत, शिवाय क्षणिक कार्य करणाऱ्या देवता असत उदाहरणार्थ, यज्ञ करणाऱ्या व्यक्तींना तत्कालीन त्रास देणाऱ्या माशा, त्या हाकलून लावणारी देवता आढळते आणि सामान्यत दु खनिवारक देवता, जन्मदात्री देवता, न्याय्य मोबदला देणारी देवता अशा अनेक गुणक्रियावाचक देवता होत्या. पुढील काळातील हेलेन लोकांच्या देवताविषयक उच्च कल्पनांच्या मानानें वरील कल्पना अपरिपक्व व रानटी दिसतात, तथापि त्या एके काळीं प्रचलित होत्या यात शंका नाहीं

**सर्ववस्तुगतदेवतावाद किंवा वस्तुवस्तुगतदेवतावाद** —वायु, जल व आकाशस्थ सृष्टिव्यापार, तसेंच पृथ्वीवरील फळांमुळे यांविषयींच्या विशिष्ट धर्मकल्पना हेलन लोकात होत्या सुधारलेल्या धार्मिक काळात एतद्विषयक देवतांचें स्वतंत्र व वस्तुबाह्य अस्तित्व असल्याचें मानूं लागले होते पण तत्पूर्वी मागासलेल्या समाजात अशा देवता त्या त्या वस्तूंतच वास करीत असल्याची कल्पना होती अर्केडियन लोकात ' झूस-मेघनिनाद ', लॅकोनियात ' आकाशपतित पवित्र पाषाण झूस', 'डेमीटर-हारित वनश्री' अशीं नावें आढळतात. यावरून पूर्वीतील कित्येक विलक्षण वस्तु किंवा व्यापार यांना सजीव दैवत मानीत असल्याचें स्पष्ट दिसत. हेलेन जातीपैकीं अर्केडियन लोक हे सर्वांत मागासलेले असत व त्यांच्यात वरच्यापेक्षांहि रानटी कल्पना व धर्मविधी आढळतात हे लोक विद्युत्, मेघध्वनि व वादळ यांना हविर्द्रव्य अर्पण करीत असत ते कित्येक नद्यांना व झऱ्यांना आहुती देत म्हणजे तेथील शुद्ध जलालाच ते पवित्र मानीत हीच गोष्ट 'सूर्य' व घरातील 'चूल' यांना लागू आहे. म्हणजे या वस्तूंनाच देवता मानून त्यांची ते पूजा करीत असत एतद्विषयक स्वतंत्र देवता असल्याचें ते मानीत नसत.

**अभिचार उर्फ जादू**.—वस्तुगत दैवतपूजेचा पवित्र भावना उद्दीपित करण्याकडे उपयोग कदाचित् होत असल पण तिचा संबंध बहुतांशीं जादूटोणा इत्यादि प्रकाराशीं येतो असले जादूटोण्याचे प्रकार हेलेन लोकात होते याबद्दल शंका नाहीं या प्रकाराबद्दल होमर कांहीं बोलत नाहीं व त्याचा उल्लेख होमरोत्तरकालीन वाङ्मयातच आढळतो हें खरें असलें तरी मानुष्यक शास्त्रातील सामान्य सिद्धांतास अनुसरून असल्या गोष्टी ग्रीक लोकात अत्यंत पुरातन काळापासून चालत होत्या असें मानणें भाग आहे उदाहरणार्थ, थेस्मोफोरिया नामक धर्मविधीनें देवता संतुष्ट होते इतकेंच नव्हे तर त्याचा जादूसारखा कांहीं अद्भुत पण प्रत्यक्ष परिणाम होतो असें समजत असत तसेंच थर्गेलिया नामक विधींत मनुष्यानें केलेल्या पापाचा अध्यारोप एखाद्या बकऱ्यावर करून त्याला दूर हाकलून दिल्यानें

पापमुक्तता होते या गोष्टीचा संबंध धर्मापेक्षां जादूटोण्याशींच अधिक आहे असें दिसतें. मंत्र म्हणून व बळी देऊन आकाशात घडणाऱ्या भयंकर गोष्टी टाळणें किंवा वादळ बंद करणें हीं कृत्यें करण्याकरितां कित्येक स्वतंत्र धर्माधिकाऱ्याची नेमणूक केलेली असे व अशा धर्माधिकाऱ्यांचीं नावें अथेन्स येथील प्राचीन लेखात आढळतात. दुसऱ्याचा घात करण्याचे जादूचे प्रकारहि कांहीं आढळतात. पण हे सर्व प्रकार मर्यादित असून त्याच्यामुळें उच्च धार्मिक कल्पनांची वाढ होण्यास अडथळा झाला असल्याचें दिसत नाहीं.

**मनुष्य बळी देण्याचे प्रचार.**—ग्रीक लोकाच्या आद्य कालातील परमार्थकल्पनाविषयीं आतापर्यंत जी हकीकत दिली तिच्यावरून आणखी एक प्रश्न सहजच उद्भवतो, तो मनुष्यें बळी देण्यासंबंधाचा. प्रथमावस्थेंतील समाजात आणि मागासलेल्या व रानटी धर्मांत मनुष्यें बळी देण्याची चाल असावयाचीच असें आपण मानून चालतों. परंतु अखिल मानव जातीचा इतिहास अवलोकन केल्यास वरील समजूत कित्येक वेळीं चुकीची ठरते. उलटपक्षीं कित्येक सामाजिक व नैतिक बाबतींत उत्तम सुधारलेल्या लोकसमाजातहि मनुष्य बळी देण्याची पद्धत आढळते. तात्पर्य, वरील सामान्य सिद्धांत सरसहा लागू करणें योग्य होणार नाहीं.

होमरच्या काळात मनुष्ययज्ञाचा उल्लेख कोठेंहि आढळत नाहीं व त्यावरून एकियन समाजात ही दुष्ट चाल कधींच प्रचारात नसावी असें कित्येकाचें म्हणणें आहे. पण खुद्द होमरनें आपल्या काव्यात पेट्रोक्लोसच्या चितेजवळ ट्रोजन युद्धकैदी आणून त्याची कत्तल केल्याचें वर्णन केलें असून त्याबद्दल होमरनें ॲचिलिसला खूप दोषहि दिलेला आहे. यावरून हें सिद्ध होतें कीं, चितेजवळ मनुष्याना धरून बळी देण्याची चाल प्रचलित होती इतकेंच नव्हे तर ती होमरला माहीत होती आणि त्याला ती पसंत नव्हती. अर्गोस व मिसेनी या शहरातील मायसिनी लोकाच्या थडग्याशेजारीं अवशेष सापडले आहेत त्यावरून त्या ठिकाणीं गुलाम किंवा कैदी आणून बळी दिले असले पाहिजेत असेंच अनुमान निघतें. तथापि हा धार्मिक आचार होता असें मानता येत नाहीं. कारण मृतांना घोडे लागतात म्हणून ते चितेजवळ मारावयाचे, तद्वतच चाकरनोकर लागतात म्हणून गुलाम मारावयाचे अशी केवळ साधी समजूत असेल. त्यांत मृतात्म्याची मनुष्याचे बळी देऊन उपासना करण्याचा हेतु नसावा. तथापि वर दिलेल्याइतका भरपूर पुरावा असतां होमरनें अशा चालींचा धार्मिक विधी म्हणून उल्लेख केलेला नसला तरी अशा चाली प्रचारात होत्या हें निःसंशय आहे. आता कित्येक म्हणतात कीं, त्या हेलेन लोकानीं मागाहून पौरस्त्यापासून घेतल्या असाव्या पण प्राचीन हेलेन लोकाची तरफदारी करण्याचा हा पाश्चात्य युक्तिवाद पोकळ आहे. तसेंच अशस्या चालींनंतरच्या काळात ग्रीक लोकाची हरएक सामाजिक व नैतिक बाबतींत सुधारणा होत असता एकदम अचानक प्रचारांत आल्या असाव्या असें मानणेंहि फार कठिण आहे. तात्पर्य त्या चाली हेलेन लोकात अगदीं प्राचीन काळापासून चालत आलेल्या असल्या पाहिजेत असें मानल्यावाचून गत्यंतर नाहीं. शिवाय या सिद्धान्ताला दंतकथा व साम्प्रदायिक लेख यावरून भरपूर पुष्टि मिळते. इसला मनुष्य बळी देण्याची चाल, आपोलोला यात्रेकरू मारून त्याचीं शिरें अर्पण करण्यासंबंधींचा प्रकार, अर्टेमिस देवतेला एक कुमार व कुमारी बळी देण्याची चाल व आयोनियन लोकातील मनुष्यें बळी देण्याची चाल इत्यादिकाच्या दंतकथा व लेख आढळतात. असले बळी देण्याचे हेतू निरनिराळे असत एके ठिकाणीं तर झ्यूसबद्दलच्या विधींत मनुष्यभक्षणापर्यंत मजल गेलेली असल्याचें आढळतें. तेव्हां मनुष्य बळी देण्याच्या चाली हेलेन लोकात पूर्वापार चालू होत्या याबद्दल तिळमात्र शंका नाहीं.

**प्रथमकालविभागांतील ग्रीक धर्मकल्पना.**—होमरपूर्वकालीन पारमार्थिक कल्पनाचा इतिहास बराचसा आनुमानिक व संशयितच सापडतो. परंतु कांहीं महत्त्वाच्या व निश्चित गोष्टी प्रस्थापित झाल्या आहेत अत्यंत प्राचीन रोमन परमार्थसंप्रदायातहि आढळत नाहीं इतकी मानवाकृति देवतोपासना ग्रीसमध्यें प्रचलित होती, एवढेंच नव्हे तर तिचें वर्चस्व स्थापित झालें होतें, आणि नंतरच्या अनेक दैवतसंप्रदायातील बहुतेक मुख्य मुख्य वैयक्तिक दैवतें त्या कालीं रूढ झालेलीं होतीं. फक्त डायोनिसस याची उपासना ग्रेसच्या पलीकडे गेली नव्हती, आणि होमरला ज्याची पुसट पुसट माहिती होती असा ॲस्क्लिपिॲस हा ग्रेसमधील एका लहानशा जातीचा स्थानिक देव होता. पॅन ही देवता दूरच्या आर्केडिया प्रांतात फक्त पशुगलनाची अधिष्ठात्री समजली जात असे. क्रीटबेटातील संप्रदायामध्यें दैवतविषयक कल्पना बऱ्याचशा वैयक्तिक स्वरूपाच्या असून त्याचीं दैवतेंहि बहुतेक मानवाकृति होतीं या क्रीटबेटातील संप्रदायाचा ठसा ग्रीसवर बराच उठलेला दिसतो, आणि त्यातील कांहीं दैवतें उदाहरणार्थ, देवाची माता ऱ्हिया व अफ्रोडिटी याचा प्रवेश या उत्तरेकडील लोकात झालेला होता. परंतु त्याच्या दैवतपरंपरेंत या दोन देवतांचें स्थान प्रारंभीं फारसें महत्त्वाचें नव्हतें तत्कालीन देवतेसंबंधाची कल्पना म्हणजे देवता ही केवळ एक अस्पष्ट निसर्गशक्ति अशी नसून एक दिव्य मनुष्य आहे अशा तऱ्हेची होती, आणि त्यामुळें त्याच्या परमार्थसंप्रदायामध्यें कलाकौशल्य, संस्कृति व नीतिसंबंधीं कल्पनाची वाढ होण्यास पुष्कळ अवसर मिळाला. परंतु याच वेळीं त्या लोकास पाशवी सृष्टींतीलहि अनेक गोष्टी पवित्र व अतिमानुष कोटींतील भासत असत; आणि त्याची अशी समजूत असे कीं, कधीं कधीं देवता पशुयोनींत अवतरतात. तथापि याच वेळीं त्याच्या मनात निरा-

वार देवताबद्दलच्याहि काहीं कल्पना वास करीत होत्या आणि या कल्पनाप्रमाणें त्यांचीं काहीं दैवतें अनेक दैवतसंप्रदायांतील नसून बहुवस्तुगतदैवतसंप्रदायांतील किंवा निराकार दैवतसंप्रदायांतीलहि होतीं व या देवताबद्दलच्या कल्पना काहीं नैसर्गिक शक्तींना दिव्य स्वरूप देऊन बनविलेल्या असत.

तत्कालीन दैवतांसंबंधीं उपलब्ध असलेल्या माहितीवरून असें दिसून येईल कीं, ग्रीकांच्या अनेक दैवतसंप्रदायाचा उगम या प्राचीन कालातहि सापडत नाहीं. हेलेन लोकांचा वास्तविक इतिहास ख्रिस्तपूर्व द्वितीयसहस्रकापासून उपलब्ध होतो. त्या वेळीं आपणास दैवतें बनविण्याची क्रिया चालू असलेली दिसत नाहीं. मात्र काहीं दैवतांचीं मूळचीं साधीं स्वरूपें अधिक गुंतागुंतीचीं होत चाललीं होतीं. तसेंच आपणास या काळीं मुळींच दैवत नव्हतीं असेंहि म्हणता येत नाहीं. आपणास असें म्हणता येईल कीं, देवतोपासना ही मनुष्यप्राण्याच्या इतिहासात प्रथम सर्व वस्तूंमध्यें दैविक शक्ति आहे, या समजुतीपासून (सर्ववस्तुगतदैवतकल्पना) अथवा या जगात अनेक निराकारी दैविक शक्ती वास करीत असतात या समजुतीपासून (अनेकनिराकारदैवतकल्पना) निघाली असावी. तसेंच आपण पाहिजे तर असें म्हणावें कीं, पश्वाकृतिदैवतोपासनेंतूनच मानवाकृतिदैवतोपासनेचा विकास झाला पण याबद्दल बराच संशय आहे. काहीं लोक असेंहि म्हणणारे आहेत कीं, पश्वाकृतिदैवतसंप्रदायात पशुदैवकसंप्रदायाचाहि अंतर्भाव होतो. परंतु आपणास असें स्पष्ट दिसतें कीं, या सर्व विश्वासाच्या अवस्था भूमध्यसमुद्रांतील व उत्तरेकडील लोकांचें मिश्रण होऊन, त्यांची हेलेन ही जात बनण्यापूर्वींच होऊन गेल्या होत्या. हेलेन लोकांच्या इतिहासात आपणास परमार्थविषयक उच्च व नीच तसाच शुद्ध व संकीर्ण कल्पनांचें सर्वकाल, एकसमयावच्छेदेंकरून अस्तित्व असून त्यांचा परस्परांवर परिणाम होत असल्याचें दिसून येतें, आणि उच्च कल्पनांची या द्वंद्वात जरी सरशी झाल्याचें दिसून येतें तरी इतर कल्पना केव्हांहि पूर्णपणें नष्ट झाल्या असें दिसत नाहीं. कारण त्या कल्पनाहि अतिशय प्राचीन असून वैदिक परंपरेंतूनच आलेल्या होत्या. ग्रीक परमार्थसंप्रदायाचा उगम शोधून काढण्याचे बरेचसे पाश्चात्य प्रयत्न त्यांतील कालविपर्यासामुळें व्यर्थ झालेले आहेत, आणि सर्व अज्ञात वस्तूंचें मूळ पशुदैवकोपासनेमध्येंच शोधून काढण्याची प्रवृत्ति, अलीकडे जसजसें या संप्रदायासंबंधींच्या पूर्वींच्या चुकीच्या कल्पना व त्यावर आधारलेली समाजशास्त्रीय तत्त्वें चुकीचीं आहेत असें आढळून येऊं लागलें, तशी कमी होत चालली आहे.

**ख्रिस्तपूर्व १० व्या शतकाच्या सुमाराची स्थिति**—ख्रिस्तपूर्व १० व्या शतकाच्या सुमारास हेलेन ... थ्रेस व मॅसेडोनिया या प्रांतांतील नव्या प्रकारच्या पारमार्थिक कल्पना व एक नवीन आणि भव्य डायोनिसस नामक देवता प्रवेश करीत होती. या नव्या गोष्टी हेलेन लोकांतील पारमार्थिक कल्पनांशीं विरोधी असल्यामुळें त्याचा प्रवेश होणें अवघड गेलें, तथापि प्रथम थिबीजमध्यें त्याचें वर्चस्व प्रस्थापित होऊन नंतर डेल्फी येथें त्याचा प्रवेश झाला. हेलेन लोकांतील परंपरागत देवतांहून या देवतेचें स्वरूप निराळें होतें. तिच्या संबंधाचे धार्मिक विधी निराळे होते व भक्तांच्या मनावर होणारे परिणामहि निराळे होते. डायोनिसस देवतेला वैयक्तिक स्वरूप होतें पण तें आपोलो किंवा अथेनी यांच्या इतकें स्पष्ट नव्हतें, तें निराकारदैवतकल्पनेला किंवा नंतर सर्वव्यापी देवकल्पनेला अनुरूप असून ती देवता अनेक पश्वाकृति स्वरूपांत अवतरते, तसेंच अनेक प्रकारच्या वनस्पती उत्पन्न करण्याचें कार्य करते, आणि तिच्या आगमनाबरोबर अंतरिक्षात सृष्टीचे अद्भुत चमत्कार होऊं लागतात, वगैरे कल्पना प्रचलित होत्या.

या देवतेच्या धार्मिक विधींमध्यें तिच्या जन्ममरणाच्या कल्पना होत्या व त्या हेलेन लोकांना अगदीं अपरिचित होत्या. हिचा मृत्यु हें धार्मिक विधींचें एक अंग होतें, कारण वेडे भक्त तिचे फाडून तुकडे करीत व ते श्रद्धेनें भक्षण करीत. याकरितां ते एखादा बैल, बकरा किंवा प्रत्यक्ष एखादा मुलगा मारीत असत व खात असत, कारण त्याला ते तात्पुरता डायोनिससचा अवतार मानीत असत. या रानटी व मनुष्यभक्षक विधींच्या योगानें त्या देवतेचें रक्त आणि चैतन्य शरीरात पूर्णपणें भरून त्या योगानें त्या देवतेप्रमाणें तिच्या भक्तांतहि अद्भुत गोष्टी करण्याची शक्ति येते, अशी त्यांची समजूत असे. वरील प्रकारें रक्त व मांस भक्षण केल्यानें व त्याच्या बरोबर काहीं मादक व उत्तेजक पेयें प्राशन केल्याच्या योगानें या देवतेच्या भक्तांची एक प्रकारची अत्यानंदमय तल्लीन स्थिति होऊन जात असे आणि शारीरिक व मानसिक व्यवसाय करण्याचा त्यांच्या अंगांत विलक्षण आवेश चढत असे; तसेंच ते आपलें स्वतःचें देहभानहि विसरून जात असत. अशी स्थिति प्राप्त होणें म्हणजे सजीव मुक्त होऊन देवतेच्या स्वरूपात तात्पुरतें पण पूर्णपणें विलीन होणें असल्यामुळें आपलें जीवितसाफल्य झालें व अशी तन्मयता होणें आपणास मरणानंतरहि कल्याणप्रद होईल, अशी त्याच्या भक्ताची निष्ठा असे. अशा आनंदमय अवस्थेचा काहीं अद्भुत चमत्कार करण्याच्या कामीं उपयोग होण्यासारखा असे, तथापि अशा व्यावहारिक फायद्याकडे लक्ष न देतां जिवंतपणीं प्रत्यक्ष अनुभवावयास मिळणाऱ्या या विलक्षण स्थितींतच ते भक्त मोठा आनंद मानीत असत. डायोनिसस देवतेच्या या पारमार्थिक संप्रदायात कोणताहि नैतिक उपदेश करण्याचा हेतु नव्हता, तसेंच वरील धार्मिक विधि, लौकिक व्यवहारात रूढ करणेंहि मोठें कठिण होतें. परंतु या विधींनें

ध्येय एक प्रकारची विलक्षण अतिमानुष मानसिक शक्ति प्राप्त करून घेण्याचें असल्यामुळें हेलेन लोकांनीं हा धार्मिक संप्रदाय थोड्या फार फरकानें आपल्या समाजांत प्रविष्ट करून घेतला होता असें ऐतिहासिक पुराव्यावरून सिद्ध होतें.

**जर्मन अथवा ट्यूटॉनिक संस्कृति.**—पुराणवस्तुशास्त्राच्या दृष्टीनें पाहतां जर्मनीची समग्र रचना एकरूप नाहीं. तिच्या दक्षिण भागाची सांस्कृतिक वाढ उत्तरभागाहून भिन्न तऱ्हेनें होत होती व पश्चिमभागावर सांस्कृतिक परिणाम करणाऱ्या गोष्टी पूर्वभागावर परिणाम करणाऱ्या गोष्टींहून अगदीं निराळ्या होत्या, इतकेंच नव्हे तर ज्या ठिकाणीं संस्कृतीचा प्रसार एकाच उगमापासून होत होता त्या ठिकाणीं सुद्धां तो निरनिराळ्या प्रांतांत निरनिराळ्या वेळीं झालेला दिसून येतो. तेव्हां या सबंध देशाच्या सामान्य वर्णनांत येणारा सांस्कृतिक कालानुक्रम बराच अजमासिक असणार हें उघड आहे.

**प्राचीन पाषाणयुग ( पूर्वार्ध ).**—मनुष्याच्या हातकामाचे प्राचीन अवशेष हिमपूर्व कालाच्या अंतीचे किंवा एखाद्या हिमांतर कालांतील सांपडतात. पण हा हिमांतर काल अशा कालाच्या मालिकेंतील पहिला आहे कीं नाहीं याविषयीं वाद आहे. विशिष्ट जर्मन अवशेष म्हणजे वीमरजवळ टॉबक या ठिकाणीं आढळून आलेले होत. तेथें बदामाच्या आकाराच्या दगडी पाचरी, लहान गारेचे चाकू, गारेचे ओबडधोबड सापा पाडलेले लहान दगड व याबरोबरच हत्तींचे अवशेषहि सांपडले आहेत. शिवाय फ्रान्समध्यें अतिशय प्राचीन कालीं न सांपडलेलीं हाडांचीं शस्त्रेंहि या स्थानीं उपलब्ध झालीं.

**प्राचीन पाषाणांतर युग.**—या युगांत जास्त सुधारलेलीं अवशेष रूपें सांपडतात. उदाहरणार्थ, मामथ जातीचा हत्ती दिसून येतो. भोंकें पाडण्याच्या व खरवडण्याच्या उपयोगासाठीं म्हणून केलेल्या तासींव दगडी हत्यारावरून अशी कल्पना होते कीं, वस्त्रप्रावरणासाठीं मनुष्य कातडीं कमावीत असावा. भोंकें पाडलेले दात व शिंपा यांचे अलंकारहि सांपडले आहेत.

**प्राचीन पाषाणयुग (उत्तरार्ध)**—या युगांत विशेष म्हणजे रेनडियर नावाच्या हरिणाचें अस्तित्व होय. "स्वाबियन अच्चल" मधील "होरहेफेल्स" अवशेषांत अद्यापि मातीच्या भांड्यांचा पत्ता नाहीं. रेनडियरच्या वखदींचे मोठ्या कौशल्यानें पाणी वगैरे पिण्याचें भांडें बनविलेलें आढळून येतें. करवती, सुया, आरी, आणि मासे मारण्याच्या हाडाच्या बरच्या सांपडल्या आहेत. या काळीं फ्रान्समध्यें रहाणाऱ्या लोकांच्या ठिकाणीं असुन कलाभिरुची जी प्रामुख्यानें दिसून येते तिचा मागमूसहि या जर्मन अवशेषांत आढळून येत नाहीं हें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे.

प्राचीन पाषाणयुगीन संस्कृतीची नवपाषाणयुगीन संस्कृतीपर्यंतची वाढ कशी झाली यासंबंधींच्या ज्ञानांत जो एक खंड पडला होता तो नुकताच उत्तरजर्मनी व फ्रान्स या ठिकाणच्या पूर्वयुगाहून जास्त सुधारणा दाखविणाऱ्या वस्तूंच्या संशोधनामुळें अंशतः भरून निघाला आहे. पण या वस्तूंत मडकीं सांपडलीं नाहींत. या नवपाषाणसंस्कृतीचा आरंभ नवीन मनुष्यजात तेथें असल्यामुळें झाला कीं काय असा एक प्रश्न उपस्थित झाला आहे.

**नवपाषाणयुग** ( दक्षिणजर्मनींमध्यें ख्रि. पू. २००० पर्यंत)—नवपाषाणयुगीन मनुष्य ज्याप्रमाणें हल्लीं हवा आहे अशा हवेंतच रहात असे. फरक इतकाच कीं, तो देवदारूच्या वनांत राही. प्रत्येक बाबतींत याची प्रगति दिसून येते. नवपाषाणयुगाच्या उत्तरार्धाच्या अंतीं कुंभारकाम व विणकाम यांत तो प्रवीण झाला व कृषिकर्मांत आपला वेळ घालवूं लागला. तो जनावरें पाळी व घासलेलीं व गुळगुळीत केलेलीं किंवा सुरेख तासलेलीं सुंदर आकाराचीं हत्यारें आणि शस्त्रें तो करीत असे. नवपाषाणयुगीन वसाहतींचे अवशेष विशेषत. वर्म्सच्या आसपास मेन प्रांतात थुरिंगिया येथें सांपडले आहेत. हीं घरें म्हणजे बहुधा जमिनींतील बिळें असून त्यावर कदाचित् शाकारलेलीं छपरें असावीत. उत्तरनवपाषाणयुग व त्यापुढील युगाविषयीं माहिती मुख्यत्वानें जर्मनींत (बव्हेरियांत) सांपडलेल्या सरोगृहावशेषांवरून आपणास मिळते. मेक्लेन्बर्ग, पोमेरेनिया आणि पूर्व प्रशिया या ठिकाणचीं सरोगृहें निराळ्या पद्धतींचीं आहेत व तीं पाषाणयुगांतील आहेत कीं नाहींत याविषयीं अजून शंका आहे. हिंकेलस्टेन, अल्झे आणि वर्म्सच्या भोंवतालचीं इतर ठिकाणें यांत विशिष्ट नवपाषाणयुगीन कबरस्थानें सांपडलीं आहेत. या कबरींतून सांगाडे ताठ निजविलेले दिसतात. पण इतर कबरस्थानांतून (उदा. ऱ्हाईन—हेसेनमधील फ्लोंमबार्न येथील हेलब्रानजवळील कबरस्थान) हे सांगाडे अस्ताव्यस्त स्थितींत दिसतात. भूमध्यसमुद्रांतील शिंपाच्या माळा व कंकणें यावरून त्या काळीं व्यापार बऱ्याच मोठ्या प्रमाणावर असावा असें दिसतें. कबरींतून सांपडलेल्या दुसऱ्या वस्तू म्हणजे लहान गारेचे चाकू, दगडी कुऱ्हाडी, विस्तव तयार करण्यासाठीं गार व पायराईट या खनिज पदार्थांचीं ढेंकळें आणि स्त्रियांच्या कबरींतून धान्य दळण्याचीं जातीं या होत. मातीच्या भांड्यांना बहुधा वाटोळें बूड असे. प्राचीन अलंकरणाची तऱ्हा म्हणजे बोटाचे छाप वठविणें होय. यानंतर दक्षिण जर्मनींत दोन पृथक् काळांत नागमोडीच्या आकृती काढलेल्या दिसून येतात. या काळाच्या मध्यावस्थेंत मळसूत्राकार किंवा लाटासारख्या रेषा आढळतात. याच वेळीं उत्तर व पूर्वजर्मनींत सूत्रमंडन पहाण्यांत येतें. या युगाच्या अंतीं उत्तरजर्मनींतील रहिवाशी मोठमोठ्या

कबरा यांत व हॅनोवर येथील लोक विशेषत आंत जाण्याला वाटा असलेल्या कबरी उभारीत

**कांस्ययुग**(दक्षिणजर्मनींत खि. पू. २०००-१०००) —पाषाणयुगाच्या उत्तरकालीं आपणाला कधीं कधीं तांबें उपयोगांत आणलेलें दृष्टीस पडतें व त्यानंतर हळू हळू कांसें उपयोगांत येऊं लागलें इजियन कांस्यसंस्कृतीचा डॅन्यूब व एल्बे यांच्या काठच्या प्रदेशावर प्रत्यक्ष परिणाम झाला व याचप्रमाणें मध्यजर्मनीच्या पश्चिम भागांतील सुधारणा इटाली आणि फ्रान्स या देशांतून तिकडे गेली असावीसें दिसतें. या कालांतील उत्तरेकडच्या, विशेषत डेन्मार्कचा उत्कर्ष अंबरच्या व्यापारामुळे झाला व दक्षिणेकडील सुधारणा एल्बेच्या मुखापासून वर जटलंडपर्यंत गेली ह नि संशय आहे. या प्राचीन काळची विशिष्ट गोष्ट म्हणजे देशरिवाजाप्रमाणें माती, दगड किंवा वाळू यांचा ढिगारा प्रेतावर रचणें ही होय. या कालीं कांसें तयार करीत व यापुढील कालीं तर त्यावर घणाचे घाव घातलेले दिसून येतात बव्हेरियात कबरींतून सापडलेल्या अवशेषांवरून असें दिसतें कीं, मोठीं हत्यारें म्हणजे बरचीं व लांब अणकुचीदार भाले (पॅलस्टव) असत उत्तरेकडे लहान बरच्या कुऱ्हाडीप्रमाणें लांब काठीवर बसवीत बायका बाशाचे दोन आकडे, प्रत्येक हातांत एक कंकण, अंबराचे अलंकार आणि कांशाच्या या करीं नळ्याच्या तुकड्यांच्या माळा वापरीत. प्रत्येक कबरींत बोटांचे छाप व रेघा यांनीं सुशोभित केलेलीं एक दोन उभीं भांडीं सांपडलीं आहेत. पुढील काळांत प्रेतें दहन करण्याची पद्धत दिसते, तथापि त्याचे अवशेष दिगाऱ्यांतून पुरून ठेवीत. या वेळीं तरवारी आढळतात. बायका अड जड दागिने वापरूं लागल्या. भांडीं फारच उत्कृष्ट तऱ्हेनें शिलाई केलेलीं असून त्यांचा आकार सुंदर असे व त्यावर नागमोडीची नक्षी असे

**हॅलस्टट युग** (जर्मनींत खि पू ८-५वें शतक) -हॅलस्टट हें नांव उत्तर आस्ट्रियांतील या नांवाच्या प्रांतांत बबरस्थानावरून घेतलें आहे. हॅलस्टट संस्कृतिकाल लोरेडाच्या ओघापासून सुरू होतो. जर्मनींत या संस्कृतीचे केंद्र बव्हेरिया बेडन आणि वुर्टेंबर्ग हा प्रदेश आहे. याची उत्तर सीमा थुरिंगी अरण्य आहे. ब्रॅन्डन्बर्ग लुसेटिया सिलेसिया, पोसेन आणि मॅसमनी या प्रदेशांत कांस्ययुगावशेष फारसे जरी आढळले नाहींत, तरी हॅलस्टट युगाचा परिणाम चांगलाच दृग्गोचर होतो पश्चिम प्रशियांत मानवी चेहेरे असलेली उभीं रक्षापात्रें ( चंद्रुसारखीं ) सापडलीं आहेत. मृतांना दिगाऱ्यामध्यें पुरीत किंवा जाळीत. विशेषतः उत्तर आणि पूर्व जर्मनींत जाळण्याची चाल होती. बव्हेरियांत या दोन्ही चाली अस्तित्वांत होत्या. या कालांत सुंदर आकारांची व रंगाचीं मातीचीं भांडीं तयार होत व कांस्ययुगीन धाटणीच्या ऐवजीं दंडक "बरल"—कुपा नगाऱ्याच्या आकाराची—वापरण्यांत येऊं लागली.

**ला—टेनेयुग** (इ. स. पू ४—१ शतक )—हा वेळ पावेतों लोकवस्तींतील विशिष्ट संबंधाबद्दल फारच थोडा पुरावा सापडतो या देशाच्या इतिहासारंभकालीं जर्मनीच्या पश्चिम आणि दक्षिण भागांत केल्ट लोक राहात होते स्वित्झर्लंडातील 'ला टेने' या सरोगृहभूमीवरून या युगाला हें नांव मिळालें आहे या युगाचा पूर्वकाल म्हणजे केल्टवर्चस्वाचा काळ होय या केल्ट लोकांनीं रोमन आणि ग्रीक संस्कृती चांगल्या रचनीं पाहून, आपल्या नवीन कला आपल्या टयूटॉनिक शेजाऱ्यांना घ्यावयास लावल्या परकी नाण्यावरहुकूम आपलीं नाणीं पाडिलीं त्यांच्या संस्कृतीवर परकीय संस्कृतीचा फार मोठा परिणाम झाला असला तरी,त्यांची संस्कृति कांहीं बाबतींत स्वतंत्रच म्हणावी लागेल यापुढें या लोकांत जास्त सुधारणा झाली नाहीं कारण या जातीचा राजकीय वर्चस्वांत ऱ्हास होऊं लागला जर्मनींतील यांचीं मुख्य ठिकाणें म्हणजे थुरिंगियापर्यंतच दक्षिणेकडील प्रांत आणि मेन व सार हीं खोरीं. या लोकांचीं रूपें टराविक वनस्पतींच्या आकाराचीं असत, सोन्याचा र र सहा उपयोग करीत, व पुढील कालांत जर्मनींत जो रोमन मीना '(इन्यामेल)' वापरीत त्यापेक्षा अगदीं निराळा असा मीना शस्त्रें आणि दागिने यांना लावीत लटारीत रथ असत व तटबंदी शहरें बांधलेलीं असत, तथापि. घराच्या भिंती कुडाच्या असून त्यावर मातीचा गिलावा लावीत या प्रदेशांत धडग्यावर चबुत्रे बांधण्याची चाल जेव्हांपासून सुरू झाली त्या वेळेपासून ला—टेने युगाचा त्यावर होणारा परिणाम दिसून येतो. पण किनाऱ्यावरच्या प्रांतांतून हा परिणाम रक्षापात्रें असलेल्या कबरस्थानांत संशोधिला पाहिजे.

**रोमनी युग** (इ स. १. ल्या शतकापासून ).—ला—टेने युगानंतरच्या युगाला रोमनी—जर्मन युग म्हणणें जास्त सयुक्तिक होईल, कारण टयुटॉनिक वंशाचा रोमन संस्कृतीशीं आलेला संबंध मागील युगांत केल्ट लोकांचा प्राचीन (लॅटिन-ग्रीक) संस्कृतीशीं आलेल्या संबंधाइतकाच जवळ जवळ आहे ऱ्हाईन प्रदेश रोमन संस्कृतीचें केंद्र होतें. या संस्कृतींत रोमन रस्ते, किल्ले, दगडी व कौलारू घरें आणि संगमरवरी देवस्थानें आढळतात. या वेळीं टयुटॉनिक लोकांनीं लेखनकला बहुधा साध्य करून घेतली होती; तथापि यांच्या राष्ट्रीय वर्णमालेच्या उगमासंबंधीं अद्यापि वाद चालू आहे. या काळच्या कबरींतून मातीचीं किंवा कांचेचीं रक्षापात्रें सापडतात; प्रेतदहनाची चाल दृढ असे कबरींत सापडलेल्या वस्तूंत एक किंवा अधिक नाणीं असतात

**राष्ट्रस्थानांतर युग** (इ. स. ३००—५००) —रोमन इतिहासकारानीं वर्णिलेला या वेळचा भयंकर युद्धाचा काळ कबरींत सापडलेल्या अवशेषांवरून मुळींच बोधप्रद नाहीं. उलट, कबरींतून शस्त्रें फार क्वचितच सापडतात. त्यांत ज्या वस्तू आढळतात त्यांवरून या वेळचें असाधारण शैनीचें आयुष्य दिग्दर्शित होतें साधारणपणें अशा कबरींतील

अवशेष म्हणजे पाणी वगैरे पिण्याचीं उत्तम उत्तम पात्रें, सुंदर नक्षीदार फासे व बुडबुडे, छानदार मण्यांच्या माळा, हे होत. या युगांतील विशिष्ट गोष्ट म्हणजे प्राण्यांचे आकार पाहून झालेली अलंकरणाची वाट. या अलंकरणपद्धतीनें विचित्र, काल्पनिक व वाकड्या तिकड्या आकृती काढलेल्या दिसून येतात. या काळीं स्लॅव्होनिक लोकांनीं आक्रमिलेला जर्मनांच्या पूर्वेकडील भागच फक्त या युरोपगत संस्कृतीपासून अलग राहिला.

**मेरोव्हिंगियन युग** (इ. स. ५००–८००) –मेरोव्हिंगियन हें फ्रँक लोकांवर राज्य करणारें पहिलें घराणें होय. या युगांत जर्मन टोळ्यांतील लोकांना ख्रिस्ती संप्रदायांत पूर्णपणें ओढलेलें दिसतें. रेहेन्ग्रेवर नांवानें प्रसिद्ध असणाऱ्या कबरी जर्मनांच्या सर्व ट्यूटॉनिक भागांत सांपडल्या आहेत. या कबरी हल्लींच्या रांगेनें प्रेतें पुरलेल्या कबरींप्रमाणेच आहेत. त्यांमध्यें फरक इतकाच कीं रेहेन्ग्रेवरमध्यें मौल्यवान वस्तू असतात. या वेळीं देखील कांहीं जर्मन जाती विशेषतः ॲलेमानि लोक मृतांवर ढिगारे रचीत असतसें दिसतें. फ्रँक आणि बर्गंडियन लोकांमध्यें रोमन चालीला अनुसरून अखंड दगडाच्या प्रेतांच्या पेट्या ठेवलेल्या आढळतात व इतर प्रांतांतून या पेट्या अनेक दगडी तोरळ्यांच्या केलेल्या दिसतात. या काळचीं हत्यारें म्हणजे स्पथ नांवाची दुधारी जर्मन तरवार, सॅक्स नांवाची आखूड तरवार किंवा लांब चाकू, भाला, ढाल व सर्वसामान्य जर्मन कुऱ्हाड, हीं होत. स्कँडिनेव्हियांत ही वरील कुऱ्हाड दिसत नाहीं. दागिन्यांत मणी, कुडलें, कपड्यांना खोंवण्याचे कांटे, बांगड्या, कंकणें इत्यादि वस्तू असून त्यांत मौल्यवान खडे बसविलेले असत.

**स्कँडिनेव्हिया** — स्कँडिनेव्हियामध्यें पूर्वप्रास्तरायुधयुगांत मनुष्यवस्ती नव्हती. उत्तरप्रास्तरायुधयुगांत डेन्मार्कमध्यें देवदारु कालांत मनुष्यवस्ती आढळते. बाल्टिक गोड पाण्याचा समुद्र होता त्या वेळीं म्हणजे ख्रि. पू. ३००० (एस. मुलर यांच्या मताप्रमाणें) अथवा ८००० (ओ. मांटेलिअस यांच्या मताप्रमाणें) च्या सुमारास स्वीडनमध्यें लोकवस्ती दिसते. रेनडिअरच्या शिंगाचीं व गारांचीं हत्यारें दक्षिणनॉर्वेस्वीडनमध्यें सांपडतात. येथें जे दुसरे कांहीं अवशेष सांपडतात त्यावरून त्यांस कृषिकर्म माहीत नसून ते परिभ्रमणवृत्तीनें रहात असत असें दिसतें. पुष्कळसे अवशेष समुद्रकिनाऱ्यावर सांपडतात. गारेच्या हत्यारांत कुऱ्हाडी, भाल्यांचीं टोकें, चाकू इत्यादि सांपडतात. हाडाचीं हत्यारें व मातीचीं भांडीं वगैरेहि आढळतात. त्याचप्रमाणें प्राण्यांच्या दातांचे ओंवून दागिने केलेले आढळतात. उत्तरपाषाणयुगकालीन अवशेषांमध्यें गोपवृत्ति व कृषिकर्मवृत्ति प्रचलित असल्याचें दिसतें. हे अवशेष डेन्मार्कमध्यें आढळतात. घरांच्या अवशेषांमध्यें घरांत बांधलेल्या शेगड्या व वातघाहेरून चिखलानें मढविलेल्या कुडाच्या भिंती वगैरे आढळतात. जमीनीवर सर्व किंवा कांहीं फरसबंदी असे.

कांस्ययुगाचा आरंभ स्कँडिनेव्हियामध्यें ख्रि. पू. २००० ते १७५० च्या सुमारास झाला असावा. पहिलीं हत्यारें दगडी हत्यारांच्याच प्रतिकृती असत. पुढें त्यांत सुधारणा होत गेली. स्वीडननॉर्वेमध्यें या कालांतील कांहीं दगडावरील खोदकामें आहेत. यावरून त्या काळीं घोड्यांचा गाड्यांकडे, नांगराकडे वगैरे उपयोग करीत असत. गहूं, ओट, बार्ली इत्यादि धान्य पिकवीत असत. शिडाशिवाय पण मोठाल्या होड्यांचीं चित्रें आढळतात. चित्रांवरून पोषाखाचा बोध होत नाहीं पण कांहीं शवपेटिकांतील प्रेतांवरून त्यावेळीं (३००० वर्षांपूर्वी) जाड टोपी घालीत, लढाईंत शिरस्त्राण घालीत, लोकरीचा अंगरखा (ट्यूनिक) घालीत पण पाय उघडे असत, एक झगा असे व जोडे घोट्यापाशीं कापडाच्या तिरक्या पट्टीनें बांधीत. एक कमरपट्टा, झग्याला टांचण्या खोंवलेल्या व एक कांकण असे. एक लहान चाकू असे त्यावरून ते हजामत करीत असावे. टोंकाच्या हत्यारावरून ते गोंदीत असावे. बायका केंसावर जाळें घालीत व फणी घालीत. एक पोकळ चोळी कोंपरापर्यंत असलेला व एक लांब झगा असे. तो कमरेभोंवती एका पट्ट्यानें बांधीत. त्या पट्ट्याच्या पुढें दागिना असे. एक माळ, दोन कांकणें व एक कट्यार जवळ असे. पुरुष उंच असून केंस पिंगट असत.

लोहयुगाचा आरंभ ख्रि. पू. ५०० च्या सुमारास झाला.

वरील विवेचनावरून यूरोपमध्यें मनुष्यजातीची वस्ती प्रथम कोणकोणत्या प्रदेशांत होती व त्याची प्रगति कोणकोणत्या पायऱ्यांनीं होत गेली; व इकडे आशियामध्यें मोठमोठीं साम्राज्यें उदयास येऊन उच्च सांस्कृतिक जीवितक्रम आचरीत होतीं, अनेक कला, शास्त्रें, वाङ्मय यांचा विकास करीत होतीं, त्या वेळीं त्यांचे यूरोपीय बंधू संस्कृतीच्या कोणत्या अवस्थेंत होते हें कळून येईल.

याप्रमाणें अत्यंत प्राचीन पण ज्या कालाविषयीं आपणास अवशेषरूपानें कांहीं प्रत्यक्ष प्रमाणें मिळतात अशा कालांतील संस्कृतिविकाससंबंधीं माहिती देऊन आपण ख्रिस्तपूर्व ५०० म्हणजे सरासरी बुद्धजन्मकालापर्यंत कथासूत्र आणलें आहे. आतां ज्याला प्रागैतिहासिक काल असें म्हणतां येईल त्यासंबंधीं आपणास आज कितपत ज्ञान करून घेतां येईल तें पाहूं.

---

## प्रकरण ७ वें.

## मूलगृहकालीन उर्फ इंडोयूरोपीय संस्कृति

आतांपर्यंत आपण वेदकालीन व वेदोत्तरकालीन संस्कृतींचें पर्यालोचन केलें परंतु आपणास, त्याबरोबरच अशी, जिज्ञासा होणें साहजिक आहे कीं, वेदकालीन किंवा तदुत्तर निरनिराळ्या संस्कृती या कोणत्या तरी प्राचीन

संस्कृतीच्या परिणतावस्था असल्या पाहिजेत. तर या अपरिस्फुट अवस्थेंतील पण मोठ्या संस्कृतींच्या जनक संस्कृती कोणत्या होत्या? त्या कोणकोणत्या प्रदेशांत विकसित होत होत्या व त्याच्या विकासाच्या पायऱ्या आपणांस सापडणें शक्य आहे किंवा नाहीं? वेदपूर्व काल हा पूर्णपणें अज्ञानमय असणें शक्य नाहीं. तेव्हां आपणांस त्या अज्ञात अशा वेदपूर्व युगातील मानवजातीची प्रगति कसकशी होत गेली हें जाणणें बरेंच बोधपर व मनोरंजक होईल. वेदपूर्वकालीन मानवी संस्कृतीचें ज्ञान देणारीं प्रत्यक्ष प्रमाणें सापडणें बरेंच कठिण आहे. तत्कालीन संस्कृतीचें ज्ञान आपणास बहुतेक अनुमानानेंच करून घेतलें पाहिजे. अशा तऱ्हेचीं अनुमानें आजपर्यंत निरनिराळ्या साधनांवरून अनेकांनीं केलेलीं आहेत. मानवोत्पत्ति प्रथम कोठें झाली असावी व निरनिराळे मानववंश कोठें व कसे विकसित होऊन त्याचे परिभ्रमणमार्ग कोणते असावे याविषयींचीं निरनिराळीं मतें व अनुमानें पूर्वी दुसऱ्या प्रकरणात दिलींच आहेत. मानवी प्रगतीचे जे पूर्वपाषाणयुग, नवपाषाणयुग, इत्यादि कालखंड पाडिले आहेत तेहि पूर्वी दिलेच आहेत. त्यात आपणास काकेशियन व त्यातल्या त्यात आर्यन् वंश हाच पुढें विशेष प्रगत झाला ही गोष्ट स्पष्ट झालीच आहे. या आर्यन् वंशाच्या संस्कृतीची जन्मभूमि कोणती, तिचें स्थलांतर कसकसें झालें वगैरे गोष्टींचें ज्ञान आपणास करून घेतलें पाहिजे. या विषयावर निरनिराळ्या पंडितांनीं परिश्रम करून आपल्या संशोधनाचे निष्कर्ष जगापुढें मांडले आहेत. जगात आज आर्यन्वंशोद्भव निरनिराळीं राष्ट्रें आहेत त्यात आर्यन् मूलसंस्कृतिबोधक अवशेष कोणते आहेत याचाहि भाषाशास्त्रादि शास्त्राच्या मदतीनें अभ्यास झाला आहे. त्यांचा निष्कर्ष पुढें थोडक्यात मांडला आहे.

या वेदपूर्वकालीन संस्कृतीचे मुख्य दोन कालविभाग पडतात. पहिला कालविभाग ज्या वेळीं सर्व आर्यन् वंशाचे लोक एकत्र रहात होते तो काल. यांस इंडोयूरोपीय अथवा इंडोजर्मानिक किंवा मूलगृहकाल म्हणतात यानंतर या मुख्य वंशाच्या शाखा निरनिराळ्या दिशांस पसरल्या. त्यांपैकीं ज्या पश्चिमेस गेल्या त्यांनीं ग्रीक संस्कृति व ट्यूटन वगैरे इतर संस्कृतींस जन्म दिला. जी शाखा पूर्वेकडे आली ती बरेच दिवस इराणात राहून तेथें एका संस्कृतीचा विकास झाला. या कालास पशुभारतीय काल व संस्कृतीस पशुभारतीय संस्कृति म्हणतात. यानंतर वेदभाषी आर्य लोकांच्या पूर्वजांची एक शाखा भरतखंडात येऊन तिनें भारतीय संस्कृतीचा [illegible] केला.

आतां आपण प्रथम जी मूलगृहकालीन इंडोयूरोपीय संस्कृति तिजकडे वळूं.

**इंडोयूरोपीय किंवा मूलगृहसंस्कृतिविषयक विचार सुचण्याचीं कारणें** —वेद हेच आद्य ग्रंथ [illegible] ते ईश्वरप्रणीत म्हणजे ईश्वरानें आपल्या प्राचीन पूर्वजांस म्हणजे भारतीय आर्यांस या भरतखंडात सांगितले अशी आपली पूर्वापार समजूत आहे. अर्थात् भरतखंड हेंच जगातील वाङ्मयाचें, संस्कृतीचें किंबहुना मानवोत्पत्तीचेंहि आद्य स्थान होय असें आपण मानीत आलों व अद्यापहि जुन्या ज्ञान परंपरेच्या लोकात हीच समजूत कायम आहे अशा लोकांस वेदपूर्वकाल, आर्यांचें (भारतेतर) मूलगृह, इंडोयूरोपीय संस्कृति म्हणजे हिंदुस्थान व यूरोप या दोन ठिकाणच्या लोकांना साधारण असलेली अशी एक संस्कृति व त्यावरून निघणारीं अनुमानें म्हणजे हिंदुस्थानांतील लोक व यूरोपातील लोक हे मूळ एकाच वंशातले आहेत, ते पूर्वी एके काळीं एके ठिकाणीं एकत्र रहात होते वगैरे गोष्टी फार चमत्कारिक किंबहुना विक्षिप्तपणाच्या वाटण साहजिक आहे. सदरहू प्रकारचे विचार प्रगट करणारे ग्रंथ आपल्या प्राचीन संस्कृत भाषेत बिलकुल नाहींत कारण अशा विचारांना प्रसवणारें जे भाषाशास्त्रविषयक, मानववंशशास्त्रविषयक, गाथाशास्त्रविषयक, पुराणवस्तुसंशोधनशास्त्रविषयक, तुलनात्मक संशोधन तें अलीकडील एक दोन शतकातले असून त्याचा पायाहि नूतन भूभागाचे संशोधन व अतिक्रमण करणाऱ्या यूरोपीयांनीं घातला आहे

सतराव्या शतकात यूरोपीयांचा हिंदुस्थानात प्रवेश झाल्यानंतर लवकरच यूरोपीय विद्वानांचे लक्ष हिंदुस्थानांतील प्राचीन संस्कृत भाषा व तिच्यातील वाङ्मय आकृष्ट झालें व संस्कृत भाषा शिकत असता स्वभाषेशीं किंवा यूरोपातील प्राचीन ग्रीक व लॅटिन भाषाशीं संस्कृत भाषेचें शब्दसाम्य व अर्थसाम्य असल्याचें त्यास आढळून येऊं लागलें संस्कृत भाषेप्रमाणे या यूरोपीय पंडितांनीं इराणांतील प्राचीन झेंद भाषेचेंहि अध्ययन केलें व त्यातहि त्यांना शब्द व अर्थसाम्य आढळून आलें. संस्कृत, झेंद वगैरे भाषातील वाङ्मयात प्रवेश झाल्यावर त्यातील पौराणिक कथा वाचताना त्या कथांच्या बाबतींतहि कांहीं कांहीं साम्यें लक्षात येऊं लागलीं. यामुळें कुतूहल वाटून पौरस्त्य भाषांचा व वाङ्मयाचा अभ्यास यूरोपीय पंडितांनीं अधिकच नेटानें चालू केला, आणि त्यांनीं पौरस्त्य व पाश्चात्य भाषातील शब्दांची व प्राचीन कथांची तुलना करून तौलनिक भाषाशास्त्र(फायलॉलजी) व तौलनिक गाथाशास्त्र (मायथॉलजी) निर्माण केलीं. तसेंच आशिया व यूरोप या दोन खंडातील माणसें एकत्र येऊं लागल्यावर माणसामाणसातील शारीरिक भेदाच्या चिकित्साहि सुरू झाली व तींतून मानववंशशास्त्र (एथ्नॉलजी) आणि मस्तकविज्ञानशास्त्र (क्रेनिऑलजी) हीं शास्त्रें प्रगत झालीं.

या सर्व साम्यांचा विचार करता एक मोठी क्रांतिकारक कल्पना विद्वानांच्या डोक्यात उत्पन्न झाली ती अशी कीं, वरील प्रकारचीं साम्यें असलेले पण आज दूरदूरच्या देशात राहणारे लोक मूळ एकाच लोकसमाजाचे वंशज असावेत ही एकमानवकुलोत्पत्तीची कल्पना सुचल्यावर हा मतमा[illegible]

वंश कोणत्या परिस्थितींत रहात होता, काय खातपीत होता, त्याच्या चालीरीती काय होत्या, एका शब्दात सांगावयाचें म्हणजे त्याची संस्कृति कोणत्या प्रकारची होती याबद्दल संशोधन सुरू झालें हें संशोधन संस्कृत, ग्रीक, झेंद, लॅटिन, लिथुआनियन, जुनी स्लॉव्होनिक, गॉथिक, जर्मन, केल्टिक, जुनी प्रशियन, आल्बेनियन व आर्मेनियन इत्यादि प्राचीन भाषांतील शब्दांच्या तुलनात्मक अभ्यासानें सुरू झालें या कार्यांत अडिलुंग ( १८०६ ), बाप ( १८३३ ), श्लेगेल ( १८०८ ), जे. जी. र्‍होडस ( १८२० ), एफ ए पॉट ( १८४० ), लॅसेन ( १८४७ ), जे. ग्रिम ( १८४८ ), ए. कुह्न ( १८४५ ), श्राडर ( १८९० ) वगैरे विद्वानांचे परिश्रम विचारार्ह आहेत. या इंडोयूरोपीय किंवा आर्यन लोकांच्या मूळ पूर्वजांबद्दल तीन महत्त्वाचे प्रश्न उद्भवतात ते संस्कृतिविषयक, मूलगृहविषयक व मूलगृहकालविषयक हे होत यांपैकीं संस्कृतिविषयक प्रश्नाचा प्रथम विचार करूं

**संशोधनाची आणि ज्ञानाची व्याप्ति.**—इंडोयूरोपीय स्थितिसंबंधानें जी माहिती आम्ही देत आहों त्या माहितीच्या अपूर्णतेविषयीं येथें कबूलीजबाब दिला पाहिजे महाराष्ट्रात या विषयावरचे संशोधक नाहींत संशोधन शक्य होण्यासाठीं अनेक यूरोपीय आणि आशियातील पण हिंदुस्थानच्या पश्चिमेस असलेल्या लोकांच्या भाषांचें ज्ञान पाहिजे तथापि महाराष्ट्रीयांना ग्रीक व लॅटिन या भाषांचें देखील ज्ञान फारच थोडें आहे, किंवा जवळ जवळ नाहींच म्हटलें तरी चालेल मग लिथुआनियन इत्यादि भाषांचें ज्ञान तर दूरच राहिलें ग्रीक शब्द आणि संस्कृत शब्द यांचीं समीकरणें जर पाश्चात्य ग्रंथात आलीं तर तीं तपासण्यास देखील उपयुक्त साहाय्य ज्ञानकोशकारास मिळालें नाहीं पाश्चात्य ग्रंथकारांपैकीं ज्यास संस्कृत येते अशास भारतीय अर्वाचीन भाषा मुळींच अवगत नाहींत, असें म्हटलें तरी चालेल आणि त्यामुळें त्यांचें प्राचीन कालाविषयींचें ज्ञान बरेंच अपूर्ण रहातें. आर्यन लोकांच्या सर्व शाखांस सामान्य आणि संस्कृत ज्या प्रारंभकालीं उपलब्ध असणाऱ्या अनेक जिनसा केवळ घरगुती असल्यामुळें त्यांचा आणि तद्विषयक भारतीय शब्दांचा परिचय पाश्चात्य ग्रंथकारास झाला नाहीं प्राचीन स्थिति जाणण्यास अर्वाचीन भाषांचें आणि परिस्थितीचें ज्ञान अवश्य आहे आजच्या परिस्थितीचीं अनेक अंगें जुनाट आहेत. आजच्या शब्दांपैकीं अनेक शब्दहि फार जुनाट आहेत, शिवाय असे अनेक शब्द आहेत कीं जे पुरातन भाषेतून एकदम प्रचलित देशी भाषांत आले आणि त्यांचा प्रवेश शिष्ट संस्कृतमध्यें झालाच नाहीं उदाहरणार्थ 'वग्ह' म्हणजे बोलणें हा शब्द पाणिनीच्या धातुपाठांत आहे, तथापि संस्कृत काव्यात आढळत नाहीं. पाणिनीय शब्दांचा आणि धातूंचा ऐतिहासिक पद्धतीनें अजून विचार व्हावयाचाच आहे वि का राजवाडे यांनीं पाणिनीच्या शब्दांचें व प्रचलित मराठीचें नातें पुष्कळ दाखविलें आहे, तथापि वेदकाल आणि पाणिनि यांच्या भाषेंतील फरकानीं व्यक्त होणारा समाजशास्त्रीय संबंधहि जोडला गेला नाहीं.



वेदपूर्वकालीन स्थिति काढण्यासाठीं होणाऱ्या परिश्रमास अर्वाचीन भारतीय भाषांशीं अपरिचयाखेरीज दुसरी अडचण म्हटली म्हणजे वैदिक वाङ्मयांतर्गत ऋचांचा कालानुक्रम समाधानकारक लागला नाहीं ही होय तो लागला तर हिंदुस्थानातच ज्या शेंकडों किंवा हजारों वर्षांत वैदिक वाङ्मय तयार झालें त्या कालांतील निरनिराळ्या कालांच्या अनुक्रमबोधक चिन्हांचा संकर झाल्यामुळें अस्पष्ट झालेल्या संस्कृतीच्या पायऱ्या स्पष्ट होतील आणि वेदकालीन संस्कृतीच्या पहिल्या पायरीचा शोध लागेल ही कार्यें जेव्हां समाधानकारक रीतीनें होतील तेव्हां त्यांचा उपयोग तौलनिक संस्कृतिशास्त्राकडे अधिक विश्वासानें करितां येईल येथें प्राचीन कालचे इंडोजर्मानिक लोकांची संस्कृति कशी काय होती याविषयीं विविध भाषांतील तुल्य शब्दांनीं जी कल्पना पुढें दिली आहे, तिचा उपयोग संपूर्ण सत्य दाखविण्यासाठीं नाहींच आजची माहिती अशास्वरूपी व संदेहपूर्ण आहे आणि ती कालक्रमांकित नाहीं यामुळें येथें जी माहिती श्राडर व त्यासारख्या दुसऱ्या ग्रंथकारांवर अवलंबून देत आहों ती सर्वस्वी विश्वसनीय आहे असें भलावणपत्र जोडण्यासहि आम्ही तयार नाहीं जी माहिती दिली आहे तिचा हेतु मुख्यत पाश्चिमात्यांच्या मूलगृहविषयक संशोधनपद्धतीशीं सोदाहरण परिचय व्हावा हा होय आणि हेंच अभ्यासाच्या अपूर्णत्वाचें दर्शक आणि कारणविवेचक विधान बऱ्याच अंशानें पर्शुभारतीयकालविषयक संशोधनाकडे लागू पडेल

**आजचे मूलगृहकालीन अवशेष आणि त्यांचा उपयोग**—तुल्य शब्द तपासून मूलगृहीं वायव्य, आरण्य, आणि ग्राम्य पशुपक्षी काय असावे, तत्कालीन शेतकी कशी असावी, कालमापन कसें होतें, भक्ष्यें काय होतीं याची माहिती मिळते अंगावरचे दागिने, घरें व गृहांतर्गत साहित्य, व्यापार, दळणवळण, कुटुंब आणि राज्यव्यवस्था यावरहि पुष्कळसा प्रकाश या तुल्य शब्दांनींच पडणार आहे श्राडरनें तुल्यशब्द हेंच साहित्य विशेष वापरलें आहे आणि मध्यें मध्यें प्राचीनकालचे सरोगृहात्मक अवशेष पूर्वकालबोधासाठीं उपयोगांत आणिले आहेत वेदकालीन दैवतें, वतें इत्यादि गोष्टी श्राडरनें उपयोगांत आणल्या आहेत तथापि या विषयावर भारतीय अभ्यासकहि आहेत प्रथमत शब्दमूलक माहिती देऊन नंतर इतर गोष्टींचा विचार करूं

आता प्रथम मूलगृहकालीन प्राण्यांचा म्हणजे तद्वाचक निरनिराळ्या भाषांतील शब्दांचा विचार करू

स स्त न मा सा ह रा प्रा णी

कुत्रा —संस्कृत–श्वा, झेंद–स्पा, आर्मीनियन–शुन्, लॅटिन–कॅनिस. गॉथिक–हुंड्स्, इं हाउंड.

लाडगाः—संस्कृत-वृक; झेंद-वेह्र्क; आर्मीनियन-गेल; लॅटिन-लुपुस; गॉथिक-व्हुल्फ्स.

अस्वलः—संस्कृत-ऋक्ष;आर्मीनियन-अर्ज्,लॅटिन-उर्सुस.

उद्राः—एक जातीचा मांसाहारी प्राणी. संस्कृत-उद्र; झेंद-उद्र; प्राचीन उच्च जर्मन ओट्टिर.

कोल्हाः—संस्कृत-शृगाल; अर्वाचीन फारसी-शगाल.

तीक्ष्ण दंती प्राणी.

उंदीरः—संस्कृत-मूष; अर्वाचीन फारसी-मूस; आर्मीनियन-मुक्; लॅटिन-मूस.

ससाः—संस्कृत-शश, अर्वाचीन उच्च जर्मन-हसो.

ग्राम्य पशू.

याच्या खेरीज घोडा, गाढव, बैल, शेळी, मेंढी, उंट, डुकर या प्राण्यांना निरनिराळ्या भाषांत ज्या संज्ञा आहेत त्याच्यातील ध्वनिसादृश्यावरून हेहि प्राणी पूर्वीच्या लोकांना माहीत होते असें म्हटलें पाहिजे. आर्यन् लोकांचें मूळ ठिकाण कोणतें या गोष्टीचा निर्णय होण्यासारखें यांत कांहीं नाहीं. वेदभाषा बोलणाऱ्या लोकांना भरतखंडांत सिंह, हत्ती, माकड, वगैरे जीं चतुष्पाद जनावरें आढळलीं, त्यांचे तुल्य शब्द अजून सांपडले नाहींत आणि म्हणून संशोधकांनीं तीं मूलगृहीं नव्हतीं असें ठरविलें आहे

**सिंह वाघ.**—आर्य लोकांना सिंह हा प्राणी पंचनद्यांच्या प्रदेशांत आल्यावर व इराणी लोकांपासून फुटून निघाल्यावर आढळला असावा. ऋग्वेदाच्या अत्यंत जुन्या सूक्तांत सिंह हा मनुष्यें व जनावरें यांचा वैरी आहे अशीं वर्णनें आहेत. व त्याच्या गर्जनेची वायूच्या भरारीस उपमा दिलेली आहे.

सिंहविषयक ऋग्वेदांतील तीन अर्ध्या ऋचा येथें देतों.

सिंहा इव नानदति प्रचेतसः पिशाइव सुपिशो विश्ववेदसः

ऋ. १. ६४, ८

ज्याप्रमाणें गिरिगव्हरा (गुहे) मध्यें सिंह गंभीर शब्द करतात त्याप्रमाणें ज्ञानसंपन्न मरुत अत्यंत गर्जना करितात.

रक्षा अग्रिमद्रुपं तुरीयाणं सिंहो न दमे अपांसि वस्तोः ॥

ऋ. १. १७४, ३

हे इंद्रा सिंह ज्याप्रमाणें स्वाश्रयभूत वनाचें उपद्रवकारी गजादिकांपासून रक्षण करतो. व निर्भय होऊन विरोधी पशूंनां मारावयास धावतो त्याप्रमाणें तूं आमचें रक्षण करण्याकरितां धांव.

यदीं गृभीततातये सिंहमिव द्रुहस्पदे ॥.

ऋ. ३. ७१, ४

हे अश्विनीकुमारानों अरण्यामध्यें गर्जना करणाऱ्या प्रबल सिंहाला ज्याप्रमाणें शूर पुरुष च्युत करितात (हांकलून देतात) त्याप्रमाणें गर्जना करणाऱ्या मेघांना वृष्टिपर्यंत च्युत करा (मेघांना फाडून पाऊस पाडावयास लावा).

सिंह हा प्राणी जरी पूर्वीच्या काळांत सर्व यूरोपभर आढळत असे(लबक प्री-हिस्टॉरिक टाइम्स पृ.२९४)आणि स्वित्झर्लंडमधील लोक ज्या वेळीं तळ्यामध्यें लांकडी घरें करून रहात असत (महाराष्ट्रीय ज्ञानकोश सरोगृह शब्द पहा.) त्या काळीं सिंह हा प्राणी नव्हता,तरी पण सिंहाची एक जात ग्रेस व त्याच्या भोंवतालच्या प्रदेशांत होती (हिरोडोटस७.१२५) इंडोयूरोपियन लोकाच्या यूरोपीय शाखेस सिंहाची माहिती यूरोपखंडातच झाली असें एक अनुमान केलें आहे तें निर्दोष आहे अशी आमची खात्री नाहीं.

व्याघ्र हा शब्द प्रथम अथर्व वेदांत (४. ३, १) येतो.

सिंह आणि वाघ हे दोन प्राणी जरी आपण घटकाभर बाजूस ठेवले तरी पूर्वीच्या काळांतील श्वापदांत वरींच चतुष्पाद जनावरें शिकार करण्यालायक आढळतात. परंतु 'शिकार करणें' 'पारध' 'पारधी' यांना समर्पक शब्द इंडोजर्मानिक भाषांत अजून सांपडले नाहींत हें लक्षांत घेण्यासारखें आहे. सामान्यत. हिंस्र जनावराच्या नांवावरून बनविलेलीं रूपें वगैरे या कामीं उपयोगांत आणीत. जसें संस्कृतांत—मृगया शब्द जरी ऋग्वेदांत आढळत नाहीं तरी ऋग्वेद १०. ४०, ४ मध्यें युवां मृगेव वारणा मृगण्यवा दोषा वस्तो हविषा नि ह्वयामहे । असें वर्णन आहे.येथें 'मृगण्यवः' याचा अर्थ सायणाचार्यांनीं (मृगभक्षक) शार्दूल असा केला आहे. परंतु ग्रिफियनें सरळ शिकारी म्हणजे मृगया करणारे असा अर्थ केला आहे. यावरून त्या वेळीं शिकार करणें भारतीय लोकांस ठाऊक होतें असें दिसतें.

परंतु शिकार करणें या गोष्टीला मनुष्याच्या आयुष्याचा प्रधान भाग समजत नसत.व शेतकी हा प्रधान धंदा मानून शिकार हें त्याचें गौण अंग समजलें जात असे. शिकार करून मिळालेलें मांस वगैरे देवादिकांनां देत नसत व खात तरी अडचणीच्याच प्रसंगीं खात असें श्राडर म्हणतो (प्रीहिस्टॉरिक अँटिक्विटिज पृ. २५); पण त्याला भक्कम पुरावा नाहीं.

**पक्षी.**—इंडोजर्मानिक लोकांना कोणते पक्षी माहीत होते याचा विचार करतांना पक्ष्यांच्या नांवांत त्यांच्या ध्वनीचें जें अनुकरण करण्यात येतें त्यामुळें फार घोंटाळा होतो. जसें. संस्कृत—उलूक, कोकिला, वृकवाकु, तित्तिरी या पक्ष्यांना लॅटिन, ग्रीक, आर्मीनियन वगैरे भाषांतून जीं नांवें आहेत त्यांतील ध्वनिसादृश्य त्या त्या पक्ष्यांच्या ध्वनीशीं मिळतें. तरी पण श्येन, हंस वगैरे पक्षी आशिया व यूरोप या दोन्ही खंडांत सांपडतात. पक्ष्यांचें आगमन निर्गमन म्हणजे त्यांनीं डावीकडून अगर उजवीकडून जाणें यावरून शुभाशुभ शकुन पहाण्याचा प्रघात पूर्वीं होता. देवाची इच्छा काय आहे किंवा भवितव्यतेच्या पोटांत काय आहे हें अगल्या शकुनावरून जाणीत. दिवाभीत व कपोत या पक्ष्यांनां अनेक राष्ट्रें अशुभ मानीत. रोमन लोक पुढें त्यांना शुभ मानूं लागले असावे असें दिसतें. इंडोजर्मानिक लोकांची ही गोष्ट खरी.

वेदांत सुद्धां अशा प्रकारच्या समजुती आढळतात. ऋग्वेदांतील दहाव्या मंडळातील एकशें पांसष्टाव्या सूक्तांत कपोतास यमाचा दूत म्हटलें आहे.

देवा कपोत इषितो यदिच्छन्दूतो निर्ऋत्या इदमाजगाम।
तस्मा अर्चाम कृणवाम निष्कृतिं शं नो अस्तु द्विपदे शं चतुष्पदे ॥ १ ॥

हे देवानों, निर्ऋतीचा दूत कपोत प्राप्त झाला (आहे) (त्याला) धनाची इच्छा आहे त्याची बाधा होऊं नये म्हणून आम्ही पूजा करितों व त्या बाधेचें निरसन करितों यामुळें आमच्या पुत्रपौत्रास व गवादि पशूस कल्याण असो.

शिवः कपोत इषितो नो अस्त्वनागा देवाः शकुनो गृहं नः। २।

हे देवानों आमच्या घरीं आलेला कपोत पक्षी सुखकर अपापहेतु असो.

मा नो हिंसीदिह देवाः कपोत । ३ ।

हे देवानो या ठिकाणीं कपोत आम्हांस बाधक न होवो

यस्य दूतः प्रहित एष एतत्तस्मै यमाय नमो
अस्तु मृत्यवे । ४ ।

ज्याचा दूत येथें आला आहे त्या यमाय-मृत्युदेवतेस नमस्कार असो

पक्ष्यांशीं परिचय इतका अतिप्राचीनांस होता असें दाखविण्यासाठीं आणि पक्षिमूलक कांहीं आचार अगर कल्पना प्राचीनांत प्रचलित असल्यास त्यावर ऐतिहासिक प्रकाश पाडण्यासाठीं कांहीं वाद उत्पन्न झाले आहेत. त्या वादांत एक प्रश्न असा उत्पन्न झाला आहे कीं, पक्षिगमन शुभशकुनकारक होतें तें पक्षी ज्या दिशेनें जातो त्यावरून होतें कीं ज्या हाताकडून जातो त्यावरून होतें ? या वादांत पुराणकथांचा अभ्यास करून त्यावरून इतिहास काढण्याचे परिश्रम करणारा प्रसिद्ध जर्मन पंडित याकोब ग्रिम (१७८५—१८६३) याचें मत श्राडर यानें देऊन तें खोडण्याचा प्रयत्न केला आहे दोघांच्या मतांत भेद बराच सूक्ष्म आहे दिशांच्या शुभाशुभत्वावरून हाताचें शुभाशुभत्व निष्पन्न झालें आहे आणि नंतर हातावरून पक्ष्यांच्या गमनागमनाचे शकुन ठरले आहेत असें ग्रिमचें मत आहे असें श्राडर प्रतिपादितो आणि आपला अभिप्रायभेद दाखवितो तो असा कीं, हाताचें वामदक्षिणत्व हें गुणमूलक आणि त्यामुळेंच शकुनोत्पादक आहे दक्षिण दिशा वाईट आहे अशी प्राचीन समजूत होती असें ग्रिम म्हणतो आणि श्राडर त्याच्याविरुद्ध खालील प्रमाणें आणतो.

अवक्रन्द दक्षिणतो गृहाणां सुमङ्गलो भद्रवादी शकुन्ते
ऋ. २. ४२. ३

हे कपिंजल, तू सुमंगल आणि कल्याणवादी असा घरांच्या दक्षिण दिशेला ओरड.

प्रदक्षिणिदभि गृणन्ति कारवो वयो वदन्त ऋतुथा शकुन्तयः ,
ऋ. २. ४३. १

कपिंजल पक्षी हेच स्तोते योग्य कार्ळी शुभ सुचवून दक्षिण दिशेला गात असतात

"इंडोजर्मानिक भाषांमधून उजवा याला जो शब्द आहे त्याचा धात्वर्थ सर्व ठिकाणीं 'कुशल' असा सांपडतो संस्कृत-दक्षिण, झेंद—दाशिन्, लॅटिन—डेक्स्टर शुभ शकुन उजवीकडून येत असें मानण्याचें कारण दक्षिण म्हणजे कुशल हा अर्थ आहे. उजवा किंवा डावा याचा पूर्व, पश्चिम, दक्षिण व उत्तर यांच्याशीं कांहीं संबंध नाहीं असें श्राडरचें मत आहे श्राडरचें मत आम्हांस ग्राह्य दिसतें दक्षिण आणि वाम हे शब्द शकुनमूलक नसून हाताचे गुणनिदर्शक आहेत, त्या अर्थी त्यास आलेला अर्थ शकुनमूलक आहे असें धरण्याचें कांहीं कारण नाहीं. उलटपक्षीं शकुनच हस्तगुणमूलक असण्याचा संभव आहे

ग्राम्य पशू —गाई मनुष्याला मुकाट्यानें दूध काढूं देतात, घोडे मुकाट्यानें लगाम घालूं देतात, मेंढरें कुत्र्याबरोबर नीट शिस्तीनें जातात, या व अशा तऱ्हेच्या अनेक गोष्टी मनुष्याच्या इतक्या अंगवळणीं पडल्या आहेत कीं, त्यांत अस्वाभाविक कांहीं असेल अशी शंका सुद्धां मनाला शिवत नाहीं परंतु हें सारें जनावरें माणसाळवून टाकण्याचें फळ आहे आणि जनावरें माणसाळवण्यास सुरवात केव्हां झाली याचा आठवणहि मनुष्याला नाहीं इतका हा प्रकार जुना आहे पशूंचें गृह्यीकरण म्हणजे माणसाळणें सिद्ध होत असतां होत असलेल्या प्रयत्नांच्या परंपरेचा इतिहास लिहावयास आपणास इंडोजर्मानिक काळाच्या पूर्वींच्या काळांत गेलें पाहिजे गृह्यीकरणांतर्गतचा बोध करून घेण्यास या मूलगृहविषयक संशोधनाचा उपयोग होत नाहीं फक्त रासणें, पाशांत पकडणें या जर गृह्यीकरण सिद्ध होण्यापूर्वींच्या क्रिया असतील तर त्यांचे मात्र शब्दावशेष सांपडतात. इंडोयुरोपीय लोक सुद्धां जनावरांचे कळप पाळीत ही गोष्ट संस्कृत—शर्ध, गॉथिक—हेर्द, इंग्लिश—हर्ड्स या तुल्य शब्दांवरून स्पष्ट होते पशू माणसाळविण्यास सुरुवात झाली असावी असें पशु शब्दाच्या पाश (पाशयामि) या शब्दाशीं असलेल्या सादृश्यावरून वाटतें निरुक्तामध्यें पशु शब्दाची व्युत्पत्ति दिलेली नाहीं

घोड्याविषयीं श्राडर म्हणतो —घोडा या प्राण्याचे बोधक निरनिराळ्या भाषांतील शब्द तुल्य दिसतात संस्कृत—अश्व, झेंद—अस्प, ग्रीक—इप्पॉस, लॅटिन—एक्वस, लिथुॲनियन—अस्वव यावरून हा प्राणी इंडोयुरोपीय लोकांस निःसंशय माहीत असून तो त्यांच्या पाळीव प्राण्यांत होता असें वाटतें परंतु घोड्यावर बसणें या अर्थी ग्रीक, झेंद इ. भाषांतील शब्द विसदृश असून ते बरेच नंतरचे असावेत असा तर्क आहे ऋग्वेदामध्यें लगाम [अभीशव], स्वार [सद] इत्यादि शब्दांचे वाचक शब्द असून घोड्यावर बसण्याची कल्पनाहि आढळते

**मूलगृहांच्या वनस्पती.**—आता इंडोयूरोपीय लोकांस माहीत असलेल्या वृक्षांपैकीं वन्यवृक्षाचा विचार करितांना तो प्रदेशसंगतीच्या दृष्टीनें केला पाहिजे. मूलगृहशोधक इतिहासशास्त्राच्या दृष्टीनें वृक्ष आणि प्रदेश यांच्या संगतीचें महत्त्व मोठें आहे.

सर्व यूरोपखंड व हिंदुस्थानपर्यंतचा प्रदेश यांत ज्या वृक्षाचीं नावें सदृश आहेत असा एकच वृक्ष आहे, आणि तो भूर्ज वृक्ष होय. याला इंग्रजींत बर्च असें म्हणतात. यांतील धातु भ्राज् प्रकाशणें हा असावा. उत्तरेकडील प्रदेशांत होणारा पांढरा चमकदार 'बर्च' वृक्ष या शब्दानें निर्दिष्ट केला जात असावा. यूरोपच्या दक्षिण भागांत हा वृक्ष क्वचितच सांपडतो.

यूरोपीय भाषांची तुलना केली असतां बऱ्याच वृक्षांचीं नावें सदृश आढळतात. यूरोपीय वृक्षांतील सर्वांत महत्त्वाचा वृक्ष म्हटला म्हणजे ओक होय. याला सर्वश्रेष्ठ वृक्ष म्हटलें आहे. या वृक्षाला निरनिराळ्या अनेक यूरोपीय भाषांत जे शब्द आहेत त्यांतील स्वरांत जरी फरक असला तरी द् व र हीं दोन व्यंजनें सर्व शब्दांमध्यें आहेत आणि त्या शब्दाचा अर्थ कधीं कधीं 'ओक' वृक्ष तर कधीं कधीं केवळ 'वृक्ष' असा होतो. यावरून हे शब्द प्रथम केवळ वृक्षवाचक असून पुढें यूरोपीय कालांत त्या शब्दांस विशिष्टवृक्षवाचक अर्थ लक्षणेनें प्राप्त झाला असावा अशी कल्पना बसवून वृक्ष, वृक्षांगें किंवा वृक्षमूलक वस्तु व्यक्त करणाऱ्या अनेक भाषांतील शब्दांचें एकमेकांशीं आणि विशेषेंकरून द्, व र, या व्यंजनांशीं ध्वनिसादृश्य दिसावें म्हणून श्राडर कांहीं उदाहरणें देतो. संस्कृत व झेंद-द्रु (वृक्ष), प्राचीन सॅक्सन-ट्रिओ (लाकूड), आरमेनियन-द्रु (लाकूड), ग्रीक-ड्रुस (ओक वृक्ष) संस्कृत-दारु (लाकूड), झेंद-दाउरु (लाकूड), ग्रीक-दोरु (भाला), मॅसिडोनियन-दोरुलॅरा (ओक वृक्ष), लिथुआनिअन-देरा (धूपाच्या झाडासारखें लाकूड) यांशिवाय यूरोपीय भाषांतून एकच वृक्षवाचक असे सदृश शब्द पुष्कळ आहेत पण ते येथें देत नाहीं.

सस्तन प्राण्यांच्या नांवांत यूरोप व आशिया खंडांतील भाषांमधून जेवढें सादृश्य आढळतें त्यापेक्षा वृक्षांच्या नांवांत फारच कमी आढळतें. केवळ यूरोपीय संस्कृति असें ज्याला म्हणतां येईल तेथें मात्र विशिष्ट वृक्षवाचक तुल्य शब्दांचें आधिक्य आढळतें. वृक्षवाचक कांहीं शब्दांचा अभ्यास देखील महत्त्वाचा आणि मनोरंजक आहे. उदाहरणासाठीं बीच वृक्ष घेऊं.

बीच वृक्ष हा सार्वत्रिक आहे. यूरोपखंडांत एपायरस व मॅसिडोनिया यांच्यामधील थेसली या ग्रीसमधील प्रांतांतहि तो आढळतो. परंतु ग्रीक भाषेमध्यें बीचवाचक शब्द नाहीं, तर वास्तविक बीचवाचक जो 'फीगॉस' शब्द तो ग्रीकमध्यें ओक वृक्षाला लावतात. यावरून ग्रीकांना प्रथम बीच वृक्ष माहीत असून पुढें त्याचा त्या वृक्षाशीं अपरिचय झाला. कारण थेसॅलियन व मॅसिडन भागांतल्या दक्षिणेस बीच वृक्ष आढळत नाहीं. तेव्हां तेथें आढळणाऱ्या ओक वृक्षालाच त्यांनीं 'फागॉस' हा शब्द लावला. फीगॉस हा शब्द मूळचा ओक वृक्षवाचक नव्हे. यावरून ग्रीक लोक प्रथम थेसली प्रांतांत असून नंतर ते दक्षिणेकडे गेले असावे असें त्यांच्या परिभ्रमणमार्गासंबंधीं अनुमान करितां येतें.

तौलनिक अभ्यास करतांना निरनिराळे वृक्ष, प्राणी इत्यादिकांचीं निरनिराळ्या सर्व राष्ट्रांत नावें शोधून ते वृक्ष सृष्टीच्या ज्या भागांत स्वाभाविकपणें उत्पन्न झालेले किंवा प्राचीन असतील तेथेंच आर्यांचें मूल वसतिस्थान असावें ही विचारपद्धति संशोधकांनीं अंगीकारिली असावी असें दिसतें. मूलगृहशोधनास वन्य वृक्ष, पशु, पक्षी यांचा पुरावा मंद त्याचा अशाकरितां धरावयाचा कीं इतर बाबतींमध्यें सामान्य शब्दशोधन ही संस्कृतीचा पुढची पायरी आहे आणि त्यावरून अगदीं प्राचीन स्थानबोध होईलच असें नाहीं.

इंडोयूरोपीय लोक ज्या वेळेस चोहोंकडे पांगले त्या गृहीत धरलेल्या कालांत सुद्धां त्यांना शेतकीचा निदान ओनामा तरी माहीत होता असें टॅसिटस, सीझर, स्ट्रेबो, अर्नोल्ड वगैरे ग्रंथकारांच्या तत्कालीन निदान जर्मन इत्यादि मागसलेल्या जातींच्या केलेल्या आयुष्यवर्णनावरून दिसतें. पायथियस उत्तरसमुद्राकडे जात असतां म्हणजे खि. पू. ३०० वर्षांच्या सुमारास त्याला माणसाळलेलीं जनावरें व शेतकीसंबंधीं मूलभूतच पण कांहीं गोष्टी आढळल्या असें स्ट्रेबो (प्र. २०१) यानें लिहिलें आहे. या व अशा तऱ्हेच्या ऐतिहासिक पुराव्याबरोबरच आपण जर भाषाशास्त्राचा पुरावा पाहिला तर मूलगृहांच्या लोकांची कृषिकर्मविषयक प्रगति देखील संशयित दिसते. यूरोपीय भाषांत व आशियांतील भाषांत शेतकीच्या ज्या संज्ञा आहेत त्यांत सादृश्य फारच थोडें आढळेल. यूरोपांतल्या यूरोपांत मात्र हें सादृश्य निरनिराळ्या भाषांतून बरेंच आढळतें.

संस्कृत-यव, झेंद यव, लिथु-जवै ही शब्दमालिका, व संस्कृत-सस्य, झेंद हह्य, संस्कृत-कर्प, झेंद-करेप, संस्कृत उर्वरा, झेंद-उर्वरा, संस्कृत-गोधूम, अर्वाचीन फारसी-गंदुम वगैरे शब्दमालिकांकडे पाहिलें असतां व तत्सदृश यूरोपीय शब्दांचा अभाव लक्ष्यांत घेतला असतां अशी सहज कल्पना होते कीं, कृषिविषयक संस्कृतिसंवर्धन यूरोपीय शाखा आणि पशुभारतीय शाखा यांचा वियोग झाल्यानंतरच झालें आणि गुरें ढोरें पाळण्यापेक्षां शेतकीकडे इंडोयूरोपीय लोकांचें लक्ष्य फारच कमी होतें असें म्हणावें लागतें.

मनुष्याचा स्वभाव व चालीरीती ह्या त्यांच्या भोंवताल च्या परिस्थितीवर, व प्रदेशावर अवलंबून असतात ही गोष्ट शेतकीसंबंधानें तर विशेषच खरी आहे. कारण कर्तृत्व प्रथम पोट भरण्याच्या बाबींकडेच दिसावयाचें आणि पोट भरण्याच्या बाबतींत बुद्धि आणि परिश्रम यांच्या सहतीनं झालेलें राष्ट्राचें पहिलें कार्य धान्याचें उत्पादन होय. तेव्हां

इंडोयूरोपीय लोक ज्या वेळेस चोहोंकडे पांगले त्या वेळेस यूरोपीय शाखा ज्यास्त सुपीक प्रदेशाकडे वळली असावी व यापूर्वीन मूळच्या लोकांचे शेतकी व गुरेंढोरें वगैरे पाळणें हे धंदे करणारे, व इतर असे दोन भाग झाले असावे अशी कल्पना श्राडरनें केली आहे. आता एवढें खरें की जी शेतकी इंडोयूरोपीय लोक पूर्वीच्या काळात करीत असें म्हटलें ती अगदीं बाल्यावस्थेंतील व्यावयास पाहिजे. धातूंचा उपयोग किंवा धातूंचीं केलेलीं शेतकीचीं आउतें वगैरे या लोकाना माहीत नव्हतीं. गवत कापण्यासाठीं पार्श्वीचा म्हणजे बरगडीच्या फासळीचा उपयोग यज्ञात होतो तो उपयोग आणि पार्श्वी हा शब्द प्राक्कालीन परिस्थितीचा सूचक आहे. स्मृतिकालात देखील चोलास वापरावयाचा वस्तरा ताव्याचा असावा असें आश्वलायन सागतो. इंडोजर्मानिक लोकांचा नागर म्हणजे एक वाकविलेली झाडाची शाखा होय. यापलीकडे नांगराची कल्पना त्याना नव्हती, असें निरनिराळ्या भापात नागराला जे शब्द आहेत त्याच्या सामान्य कल्पनेवरून दिसतें. वैदिक शेतकीविषयीं विस्तृत वर्णन पुढें येईलच.

स्थावर मालमत्ता करण्याची कल्पनाहि पूर्वीच्या लोकास नव्हती असें दिसतें. मालमत्ता, संपत्ति वगैरेंना जे शब्द प्राचीन लोक वापरीत त्यात गुरांखरी मालमत्ता असे. आपण ज्याला आज म्हणतों तसली कल्पना मुळीच नव्हती. पूर्वीच्या काळात कोणतीं कोणतीं धान्यें पिकत याबद्दलचा भाषाशास्त्राचा पुरावा लक्षांत घेतला तर सातू, गहूं, मिलेट नांवाचें एक तृणधान्य, अंबाडी किंवहुना वाटाणा, कादा इत्यादिकांची यूरोपीय भाषातील नावें सदृश असल्यामुळें तीं बऱ्याच प्राचीन काळात उत्पन्न होत असावीं असें दिसतें. परंतु या शब्दाचीं तुल्यें सर्व राष्ट्रात मिळत नाहींत. गहू शब्दाचीं तुल्यें वर दिलींच आहेत. संस्कृत आणि अवेस्ता या भाषात शेतकीविषयक शब्दांचीं बरींच तुल्यें आढळतात हें वर दाखविलेंच आहे. तेव्हा या शाखेनें शेतकीची प्रगति स्वतंत्र रीतीनें केली असावी.

कालगणना.— गुरेंढोरें पाळून स्थावर उपजीविका करणाऱ्याच्या नजरेस ज्यास्त स्पष्टपणें येणारे कालविभाग म्हणजे हवामानांतील फरकामुळें पडणारे होत. उदाहरणार्थ, त्यांची गुरें चारण्याकरितां त्यांनां मोकळ्या मैदानावर जावें लागे व आश्रयाकरितां एखादी दरी अगर गुहा पहावी लागे. याच आयुष्यावरील परिणामाच्या दृष्टीनें ते वर्षाचे विभाग पाडीत असत. तुर्कोतातार लोक आपल्या प्राथमिक स्थितींत उन्हाळा व हिवाळा असे वर्षाचे दोनच ऋतू मानीत असें व्हांबेरी यानें म्हटलें आहे ( व्हांबेरी-प्रिमिटिव्ह कुल्टूर पृ. १६२ ).

इंडोजर्मानिक भाषांतून ज्या ऋतूनें नांव साधारणतः प्राधान्यानें आढळून येतें तो ऋतु म्हणजे हिवाळा होय. मरेंन-हायन (वर्ष), झेंद-झयनो (हिवाळा), ग्रीक-चिम-ओन् (वर्फ), लॅटिन-हाएम्स (हिवाळा), संस्कृत-हिम (वर्फ); झेंद-झिम (हिवाळा वर्ष), या शब्दमालिकावरून हीच गोष्ट स्पष्ट होते.

हिम शब्दाची व्युत्पत्ति सांगतां येत नाहीं. परंतु याचा अर्थ ज्या पायऱ्यांनीं बदलत गेला त्या पायऱ्या पाहिल्या म्हणजे उत्तरेकडील लोकाचा जो हिवाळा त्याच्या स्थितींत फरक कसकसा होत गेला हें स्पष्ट होते

संस्कृत-वसन्त, झेंद-वंघ्रि, प्राचीन सॅक्सन-वेस्न; लॅटिन-वेर; ग्राक-एर, या सर्वांचा अर्थ वसन्त ऋतु असा आहे व लिथुआनियन-वसर म्हणजे उन्हाळा होता

संस्कृत-समा (वर्षार्ध, किंवा वर्ष), झेंद-हम (वर्ष); आर्मेनियन-अमर्न (वर्ष), इटालियन-सम, समरद (उन्हाळा), प्राचीन उच्च जर्मन-समर (उन्हाळा)

या शब्द मालिकेवरून वसन्त किंवा उन्हाळा याचे अन्वर्थक शब्द सुद्धा सारखे दिसतात संस्कृत समा-अर्धवर्ष हा शब्द सम-अर्ध या शब्दावरून निघालेला दिसतो व अर्धवर्ष या मूळ अर्थावरूनच ऋतु निश्चित होऊन इतर सर्व भाषातील शब्द तयार होऊन त्यास ऋतुवाचक अर्थ प्राप्त झाला असावा.

सर्व राष्ट्राच्या इतिहासात प्राचीन काळीं वर्षाचे दोन ऋतू मानीत असत असें दिसतें. त्याप्रमाणेंच तद्वाचक शब्द मूळ शब्दास एकच विशिष्ट प्रत्यय लागून झालेले दिसतात. संस्कृत-वसन्त, हेमन्त; झेंद झिम, हम, टयूटॉनिक-समर, विंटर.

इंडोजर्मानिक राष्ट्रांपैकीं बहुतेक राष्ट्रात वसन्त व हेमंत या दोन ऋतूंत विरोध असून त्याचें वैर असतें ही कल्पना रूढ झालेली दिसते.

या सर्व गोष्टींवरून पूर्वी वर्षाचे विभाग दोन मानीत असत असें अनुमान काढण्यास हरकत नाहीं. इंडोजर्मानिक लोकात शेतकीच्या धंद्यांत बरीच प्रगति झाली होता हें वर सांगितलेंच आहे. यामुळें पिकें काढून घेण्याच्या काळाला प्राधान्य आलें आणि मूळचे जे वर्षाचे दोन भाग वसंत व हेमंत यामध्ये तिसरा एक ऋतु शरत् आला. शरत् याची व्युत्पत्ति क्षीरस्वामींनी 'शीर्यन्तेऽस्यां पाकेन ओषधयः सा शरत्' अशी दिली आहे. निरुक्तात शरद याची व्युत्पत्ति नाहीं व ऋग्वेदात हा शब्द वर्षवाचकच आहे.

अवेस्तामध्येंहि वसन्त व हेमन्त हेच कालगणनेंत व वर्षांचे दोन विभाग मानिले आहेत.

भरतखंडामध्यें ऋतूंच्या संख्येची वाढ क्रमानें झालेली दिसते. पूर्वीपासून चालत आलेले विभाग म्हणजे वसन्त हेमन्त व शरद. शतपथ ब्राह्मणात 'त्रयो वा ऋतवः संवत्सर.' असें म्हटलें आहे. वेदकालात पंजाब सोडून अलीकडे येतांन' त्याचे पाच ऋतू बनले. वसंत, ग्रीष्म, वर्षा, शरद, हेमन्तशिशिर; किंवा हेमन्त व शिशिर निरनिराळे मानले तर सहा ऋतू होतात.

सर्व ऋतू मिळून एक वर्ष बनतें ही कल्पना भारतीय लोकांना आली होती ही गोष्ट संवत्सर, परिवत्सर वगैरे शब्दावरून स्पष्ट आहे. यावद्दल विवेचन पूर्वी आलेलें आहे. ही गोष्ट मूलगृहकालीन लोकांस ठाऊक होती असें श्राडर म्हणतो, पण तुल्यशब्द त्यानें दिले नाहींत.

महिना या शब्दाचे वाचक असे संस्कृत व झेंद शब्द घेतले ( सं.—मास, झें.—माओह, फारशी. माह ) तर त्यात साधारण घटक मा, मोजणें हा संस्कृत धातु दिसतो. याचा व चंद्राचा कांहीं तरी संबंध असावा अशी पाश्चात्य संशोधकाची कल्पना आहे व ते चांद्रमास हें एक प्राचीन कालगणनेचें माप समजतात.

चांद्रमासाचें मान २९ दि. १२ ता., ४४ मि. व ३ सेकंद इतकें आहे. पूर्वीच्या कालगणनेचें स्वरूप दाखविणारा एक परिचित कालविभाग म्हटला म्हणजे गर्भावस्था होय. श्राडरनें यावद्दल असें म्हटलें आहे कीं "पूर्वीच्या काळात गर्भावस्थेचा काल . नऊ महिन्याच्या ऐवजीं दहा महिन्यांचा धरीत. यावरून पूर्वीच्या लोकांना सौरमास माहीत नसून चांद्रमासानेंच कालमापन होत असे असें म्हणावें लागतें" परंतु श्राडरने दहा महिन्यांनीं गर्भ पूर्ण होतो असें प्राचीनांचें गणित दिलें आहे त्याला आधारभूत ऋचा 'तं ते गर्भं हवामहे दशमे मासि सूतवे' (ऋ. १० १८४,३) ही आहे. त्या ऋचेचा दहा महिने पूर्ण झाल्यावर असा अर्थ श्राडर करितो आणि त्या समजुतीवर प्राचीनांस केवळ चांद्रमासच ठाऊक होता असें गृहीत धरतो परंतु आधारभूत ऋचेंत 'दशमे मासि' असा शब्द आहेत हें लक्षात ठेवलें पाहिजे त्याचा अर्थ दहाव्या महिन्यात असा आहे आणि दहाव्या महिन्यात नऊ मास पूर्ण भरल्यावर प्रसूतिकाल स थाव्याहि दिवसात आहेच. शिवाय सौरमास व चांद्रमास यातील फरक इतका थोडा आहे कीं त्यामुळें या दोन गणितांनीं दहा महिन्याच्या अवधींत एक महिन्याचा फरक पडणें शक्य नाहीं म्हणून या युक्तिवादानें श्राडरचा मूळ हेतु कीं त्या कालीं चांद्रमासच प्रचलित होता हें सिद्ध करणें, तो सफल होत नाहीं उलट

वेद मासो धृतव्रतो द्वादश प्रजावत । वेदा य उपजायते या (ऋ. १ २५ ८.) ऋचेवरून तत्कालीन लोकांस द्वादश मास ठाऊक होते एवढेंच नव्हे तर 'य उपजायते' म्हणजे जो द्वादश मासानंतर एक अधिक मास येतो तोहि ठाऊक होता असें स्पष्ट होतें. व यावरून चांद्रमान व सौरमान यांचा मेळ घालण्याची पद्धति ऋग्वेदकालीन लोकांस माहीत होती हें स्पष्ट आहे व यामुळें श्राडरचें पुढील विधान निरर्थक ठरतें "वर्षाचे महिने नेहमींप्रमाणें १२ धरले काय किंवा कांहीं आर्दियोंतील रात्रीप्रमाणें १३ धरले काय सौरवर्षाचे ३६५। दिवस कोणत्याच प्रकारानें येत नाहींत. तेव्हा प्रश्न असा उपस्थित होतो कीं चांद्रमान व सौरमान यांचा मेळ घालण्याची पद्धति पूर्वीच्या लोकांना माहीत होती कीं नाहीं. गणित करून सौरवर्ष व चांद्रवर्ष यांचा मेळ घालण्याची पद्धति या लोकांना माहीत नव्हती असेंच म्हणावें लागतें."

पाश्चात्य देशात मात्र रोमन लोकांची कालमापनपद्धति लोकांना माहीत होईपर्यंत सध्याचा प्रचलित कायमची महिने मोजण्याची पद्धति अमलात आली होतीसें दिसत नाहीं.

रात्र व दिवस याचे वाचक असे शब्द जरी घेतले तरी हीच स्थिति दिसते. सूर्यावरून कालमापन करण्याची पद्धति त्या कालीं आढळत नाहीं. द्विरात्र, दशरात्र म्हणजे, दोन, तीन, दहा दिवस, निशानिशम् वगैरे शब्दांवरून दिवस मोजण्याच्या पद्धतीतहि चंद्रावरून ठरविलेल्या मापाचें म्हणजे रात्रीचें प्राबल्य दिसतें.

पूर्वीच्या लोकांच्या कल्पनाशीं जुळणारा असा शब्द संस्कृतातील संगव म्हणजे ज्या वेळेस गाई कळपानें हाकून नेल्या जातात तो काळ म्हणजे गाई सोडण्याचा वेळ ( दुपार किंवा सायंकाळ ) हा होय सायं हा शब्द सा—बांधणें या धातूपासून निघाला असावा असें श्राडरचें मत आहे. परंतु सायणाचार्यांनीं संगव काल म्हणजे संगच्छंते गावः दोहनभूमिम् यस्मिन् काले स रात्र्यपरकाल असा केला आहे व सा धातु बांधणें या अर्थी आढळत नाहीं.

प्राचीन कालमापनविषयक कल्पना लो० टिळक यांच्या शोधामुळें संपूर्ण बदलाव्या लागतात त्यांचें विवेचन येथें करण्यात अर्थ नाहीं टिळकांच्या मताचें विवरण करताना याचा विचार होईलच.

**भक्ष्यपदार्थ.**—प्राचीन कालीं मनुष्य प्राणी हा इतर प्राण्यासारखाच एक प्राणी मानला जात असे वेदांच्या भाषेत 'पशव' 'पशू' या शब्दात मनुष्य प्राणी व गुरें ढोरें या दोहोंचाहि समावेश होत असे असें श्राडर म्हणतो पण त्याला प्रमाण देत नाहीं आणि मूलगृहकालीन चालीरीतीनें कांहींच सांगत नाहीं. इंडोयूरोपीय लोकात ज्या प्राण्याच्या मांसाचा उपयोग करीत ते प्राणी साधारणत कळप करून रहाणारे असत. यातच पुढें शिकार करून आणलेल्या प्राण्याचा अंतर्भाव होऊं लागला ऋग्वेदात रानटी पशूंच्या शिकारीवद्दल अनेक ठिकाणीं उल्लेख आहेत परंतु शिकार करून आणलेल्या प्राण्याचा उपयोग खाण्याकडे करीत असत किंवा नाहीं यावद्दल त्यात उल्लेख नाहीं यावरून त्या वेळीं शिकारींत मारलेले प्राणी खात नसावे असा श्राडर यानें तर्क केला आहे.

मांसाशनासंबंधीं कांहीं शब्दांचीं तुल्यें उदाहरणार्थ घेऊं संस्कृत—क्रव्य, क्रवी, ग्रीक—क्रिअस, लॅटिन—कॅरो हे सर्व शब्द बहुधा कच्च्या म्हणजे रक्तमय मांसाचे वाचक आहेत. संस्कृत—मांस, आर्मेनिअन—मिस्, प्राचीन फारशी—मॅस, लिथु०—मिएस, गॉथिक—मिंस हे शब्द बहुधा पक्व मांसवाचक असावेत असा भाषा शास्त्रज्ञाचा अभिप्राय आहे. कारण इंडोयूरोपीय लोकास शिजविण्याची क्रिया माहीत

होती याबद्दल शंका घेण्यास जागाच नाहीं तथापि संस्कृत पच्, झेंद—पच, ग्रीक—पस्सो, प्राचीन सक्सन—पेक, लिथु०—केपु इत्यादि शब्दांचा अर्थ प्रथमत शिजविणें असा नसून भाजणें असा असावा असा श्राडरचा तर्क आहे

मांस खाण्याकरिता मारावयाच्या प्राण्यांचा विचार करू लागलें असता अर्थातच प्रथम प्राचीनांच्या जवळ ज्या पशूंचे कळप असत त्यांच्याकडेच लक्ष्य जातें व ते लोकहि प्रथम याच प्राण्यांचें मांस खात ही गोष्ट ते ज्या प्राण्यांचा वर्ग देत असत त्या प्राण्यांची नावें पाहिलीं असता सहज लक्षात येईल यद्यपि पशूंमध्ये घोडा, बैल, मेंढी, शेळी वगैरे प्राण्यांची नावें आढळतात इटालीमध्यें शेतीच्या कामास असलेले बैल मारावयाच नाहींत असा निर्बंध असे

पक्ष्यांचा उपयोग खाण्याकडे करीत असत असें दिसत नाहीं खाण्याच्या प्राण्यांच्या यादींत पक्षी अजीबात आढळत नाहींत यावरूनहि त्या काळीं पक्षी माणसाळले नसावे असें अनुमान निघतें सध्याच्या हिंदूंच्या भक्ष्याभक्ष्य कल्पनांमध्यें बकऱ्यांच्या सागोतीपेक्षा कोंबडी खाण्यास अधिक आक्षेप आहे पन्नास वर्षांपूर्वी कायस्थ प्रभु वगैरे जातींत देखील अंडीं खाण्यास हरकत वाटे हें उपर्युक्त श्राडरच्या कल्पनेस साधक दिसतें. यज्ञामध्यें पक्षी मेध्य धरले नाहींत.

जसजसा शेतीचा प्रसार जास्त होऊ लागला तसतसे धान्य व त्यांच्या निरनिराळ्या जाती हे खाण्याच्या पदार्थांमध्यें प्रामुख्यानें मोडू लागले पिकें विळ्यासारख्या हत्यारानें कापीत व बैलांच्या पायाखालीं मळून त्यातून धान्य काढीत हें धान्य भाजून खात किंवा तें दगडाच्या ओबड धोबड जात्यांत दळून किंवा पाट्यावर वरवंट्यानें कुटून त्याचें पिठ करीत व त्याची भाकरी भाजीत असत हिलाच संस्कृत मध्यें करंभ असें नाव आहे वरील दोन क्रियांचे वाचक शब्द दोन तीन भाषांत सारखे आढळतात संस्कृ –भ्रस्ज, ग्रीक–फ्रुगो, लॅटिन–फ्रिगो संस्कृत–पिष् ग्रीक–सिस्सो लॅटिन–पिन्सो ( पिस्टोर–रोटीवाला ) जरी त्या वेळीं आताप्रमाणें भाकरी करीत असत असें आपणास निश्चयानें म्हणता यावयाचें नाहीं तरी ही क्रिया फार प्राचीन काळापासून चालत आलेली आहे ( के एफ हर्मन–प्रिव्हेटल्‌ टुमर पृ २१४–जे. मार्कार्ट–दास प्रिव्हेटलेबा डर रोमर पृ ३९८, झिमर–अल्टि लेबा पृ २६८ ) पामीरमधील काहीं शब्दप्रयोगावरून प्राचीन इराणी लोक राखेमध्यें पुरोडाशाप्रमाणें रोडगे पुरून भाजीत असत असें दिसतें (टोमाश्चेक–पामिर भाषा पृ ६३)

इंडोयुरोपीय लोकांस मीठ हा पदार्थ माहीत असावा असें दिसत नाहीं. कारण मीठवाचक शब्द जे पाश्चात्य व पौरस्त्य भाषांत आढळतात त्यांत मुळींच साम्य दिसत नाहीं लवण व सैन्धव हे शब्द अथर्ववेदामध्येंच व एकएकदाच आले आहेत ( अथर्ववेद ७ ८०, १, १९ ३८, २ ) लवण या शब्दाचा अर्थ समुद्रातील मीठ असा असून तत्कालीन लोकांस खाणींतील मीठ माहीत नसून समुद्रापासून निघणारें मीठ माहीत होतें असें झिमर यानें म्हटलें आहे ( झिमर–अल्टि लेबा पृ ५१ ). परंतु लवण हा शब्द जेथें आला आहे तेथें सायण या भाष्यकारानें सैन्धव हा शब्दच योजला आहे व जेथें सैन्धव शब्द आला आहे तेथें मूळ ऋचा यद् गुल्गुलु सैन्धवं यद् वाप्यासि समुद्रियम् अशी आहे यावरून समुद्रापासून होणाऱ्या मिठापेक्षा सैंधव हें निराळें होतें व तें सिंधु देशांत अर्थात् खाणींत सापडत असे हें उघडच आहे अद्यापहि सैन्धव शब्दानें एका विशिष्ट पण खाणींत लच मिठाचा बोध होतो हें मराठी वाचकास सांगावयास नकोच. सिंधु हा शब्द टिळक हिंदुस्थानच्या नद्यांचा वाचक धरीत नाहींत त्यांचें हें भिन्न मत सिंधु या शब्दाच्या प्रत्येक उपयोगाकडे लागणार नाहीं असें वाटतें. सिंधु हा शब्द भारतीय हिंदुस्थानात येण्यापूर्वीचा असेल तरी सैंधव परिचित असेलच असें म्हणता येणार नाहीं यज्ञागांत होणाऱ्या पाकसिद्धींत मीठ नाहीं त्यावरून मिठाशीं अपरिचय असेल अशी कल्पना विरुद्ध पुरावा येई पर्यंत गृहीत धरली पाहिजे.

इंडोयुरोपीय कालांतील पेयांचा विचार करताना प्रथम आपण दूध या पदार्थाकडे वळू दूध याचे वाचक शब्द आशिया व यूरोप यामध्यें सदृश दिसत नाहींत फक्त संस्कृत दधि व प्राचीन इराणी दहन या शब्दामध्येंच कायतें साम्य दिसतें दूध काढणें या क्रियेचे वाचक शब्द अगदींच विसदृश दिसतात

दूधदह्याचा उपयोग करण्याची जुनी रीत तुर्की तार्तार लोकांत आढळते हे लोक दूध नासून घट्ट झालें म्हणजे तें उन्हांत वाळवून त्याच्या वाटोळ्या वड्या करीत व त्याचा दूरच्या प्रवासांत उपयोग करीत असें व्हावेरी यानें वर्णन केलें आहे ही रीत टयूटन लोकांत व ऐतिहासिक लोकांतहि आढळून येते

दुधांतील चरबीचा अंश वेगळा करण्याची कला प्राचीन लोकांस माहीत होती असें दिसतें परंतु ते लोणी व तूप याचा उपयोग खाण्याकडे करण्याच्या ऐवजीं अंगाला व केसांना लावण्याकडे करीत असत असें व्हीहेन यानें म्हटलें आहे परंतु हें कितपत सत्य आहे याबद्दल विचार केला पाहिजे

एकंदरीत दूधदुभत्याची कला त्या काळीं बरीच वाढत्या वर्तीत होती असें सामान्यत म्हणता येईल असें श्राडर म्हणतो भारतीय कालांतील परिस्थिति दूधदुभत्यामध्यें अनेक प्रकार दाखविते परंतु दूध एवढेंच कायतें त्या काळीं पेय होतें असें नाहीं. संस्कृत–मधु ( गोड पेय ), झेंद–मधु (गोड पेय), ग्रीक–मेधु (मद्य), प्राचीन उच्च जर्मन–मेतु, प्राचीन सॅक्सन–मेदु ( मध, मद्य ) या शब्दांस पुढें जो निरनिराळ्या भाषांतून मध असा अर्थ प्राप्त झाला व त्यावरूनच मत्तपणाची जी कल्पना पुढें या लोकांत प्रगत झाली तीवरून आणि दारू आणि मध या दोहोंसहि बोधिण्यासाठीं संस्कृत "मधु" याच शब्दाच्या उपयोगा-

वरून पहिल्या मादक पेयामध्यें मधाचा कांहीं तरी संबंध असावा असें वाटतें. परंतु हाहि एक केवळ तर्क आहे.

इंडोयूरोपीय लोकांत जसजशी शेतकीमध्यें सुधारणा होत गेली व जसजसे ते स्थायिकपणें राहूं लागले तसतसे त्यांच्या इंडोइराणी शाखेमध्यें सोम, 'झेन्द–हओम' व सुरा, 'झेन्द–हुरा' या पेयाचा प्रचार पडला व यूरोपीय शाखेमध्यें 'बिअर' व 'वाइन' या मादक पेयाचा प्रघात सुरू झाला, अशी कल्पना पुढें आलेली आहे ती मान्य करणें कठिण जातें कारण सोमवल्लीचे मळे कोणी करीत नसत. जंगलांतील लोकांकडून सोम विकत घेण्याचा आणि त्याच्या किंमतीबद्दल भाडाभाड करून विक्रय करणाऱ्यास मार देण्याचा विधि सोमयागांत आहे.

मद्यवाचक 'वाइन' शब्द कसा उत्पन्न झाला याबद्दल यूरोपीय ग्रंथकारामध्यें दोन निरनिराळ्या उपपत्ती आहेत. एक उपपत्ति कुह्न आणि पिक्टेट यांनीं पुढें मांडली आहे. ती अशी कीं इंग्रजी शब्द 'वाइन' व लॅटिन 'व्हिनम' इत्यादि शब्दांचा परस्परसंबंध असून ते संस्कृत वेन.(कान्तिमान्) या सोमाला लाविलेल्या विशेषणापासून उत्पन्न झाले असावे म्हणजे इंडोयूरोपीय लोकांस मद्य माहीत असावें असें यांचें मत आहे दुसरी उपपत्ति अशी आहे कीं यूरोपीय भाषांतील मद्यवाचक शब्द सेमिटिक, इथिओपियन –'वाइन' हिब्रू–याइन इत्यादि शब्दांपासून निघाले आहेत. या मताचा मुख्य पुरस्कर्ता व्ही. हेन हा आहे या मताप्रमाणें इंडोयूरोपीय लोकांमध्यें मद्याचा प्रसार करण्याचें श्रेय प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्षपणें सेमाइट लोकांस म्हणजे यहुदी व अरब यांच्या पूर्वजांस दिलें पाहिजे. श्राडर यानें एक तिसरेंच मत प्रतिपादन केलें असून तें या दोहोंच्या मधलें आहे. त्याचें म्हणणें असें आहे कीं ग्रीक व इटालियन लोकांचे पूर्वज व बाल्कन, इलिरिअन, थ्रेशन, मॅसिडोनियन इत्यादि लोकांचे पूर्वज जेव्हां एकत्र रहात होते त्या कालींच त्यांना द्राक्षांच्या वेलींची माहिती होती या वेळीं त्यांची वसाहत बाल्कन द्वीपकल्पाच्या उत्तरेस कोठेंतरी असावी. नंतर ग्रीक व इटालियन जसजसे दक्षिणेकडे वगैरे गेले तसतसा द्राक्ष वेलींचा प्रसार वाढत गेला व फिनीशियन व्यापाऱ्यांनीं व ग्रीक वसाहतकारांनीं या वेलींचा व तिच्यापासून प्राप्त होणाऱ्या पेयाचा सर्वत्र प्रसार केला असावा. परंतु सेमाइट लोकांस द्राक्ष वेलीचें ज्ञान कसें झालें व हिब्रू–याइन, अरबी व इथिओप–वाइन हे शब्द कसे निघाले याबद्दल श्राडर यानें कांहींच माहिती दिली नाहीं. त्याप्रमाणेंच सुरा व सोम (हुरा व हओम) हीं जीं पशुभारतीय लोकांचीं पेयें त्यांच्याहि मूलस्वरूपाची कल्पना करणें कठिण आहे सोमवल्लीच्या शोधार्थ आजपर्यंत केलेल्या परिश्रमास अद्यापि यश आलें नाहीं.

**पोशाख वगैरे.**—इंडोयूरोपीय लोकांस वस्त्रें वापरण्याचें ज्ञान होतें ही गोष्ट वेष्टु–पांघरणें या सामान्य धातूपासून जे शब्द निरनिराळ्या भाषांत प्रचारांत असून सदृश स्वरूपाचे आहेत त्यावरून दिसून येईल उलटपक्षीं नग्नतावाचक शब्दहि बऱ्याच भाषांत सदृश आहेत हें खालीं दिलेल्या शब्दमालिकावरून दिसून येईल संस्कृत–वसन, वस्त्र, झेंद–वङ्ह, वङ्हन, वस्त्र, ग्रीक–एस्नुमि, एह्म, एस्थॉस, लॅटिन–व्हेस्तिस, व्हेस्टिओ; गॉथिक–वस्जन इत्यादि. संस्कृत–नग्न, प्राचीन सॅक्सन–नाग्रु; लिथुअॅनिअन –नुगस, लॅटिन–नुडस इत्यादि. नग्नतेची कल्पना वस्त्राच्छादन रूढ झाल्यानंतरच येणार हें उघड आहे. इंडोयूरोपीय लोक कळप पाळून रहात असत त्यामुळें अर्थातच ते प्रथम ढोरांचीं कातडीं पांघरीत असत याचा आपल्यातील अवशेष म्हणजे यज्ञोपवीत होय. यज्ञोपवीताचें मूळ प्रथम आर्य लोक बैलाचें कातडें पांघरीत असत हें होय. व आताहि उपनयन झाल्याबरोबर ब्रह्मचाऱ्याच्या यज्ञोपवीतामध्यें मृगचर्माचा तुकडा बांधून ठेवतात हें आपण पहातोंच ब्रिटन व टयूटन लोक सीझरनें स्वारी केली त्या वेळीं कातडींच पांघरीत असत ही गोष्ट त्यानें लिहून ठेवलेल्या वर्णनावरून दिसून येते. गॉथ लोक तर रोमन दरबारातून परत आल्याबरोबर लागलेच आपलीं कातड्यांचीं वस्त्रें पांघरून बसत, इतकी ती त्यांच्या आवडीचीं झालीं होतीं असें वेस्मन यानें वर्णन केलें आहे (वॅट्र झेडजी. डी. ५ १, २६) सॅलस्ट यानें टयूटन लोकांचा राष्ट्रीय पोशाख म्हणजे मेंढ्याच्या कातड्याचीं 'रेनॉन्स या नावाचीं वस्त्रें होत असें म्हटलें आहे. रेनॉन्स हा शब्द 'मेनॉन्स' या शब्दाचा अपभ्रंश असून त्याचा संस्कृत ऊर्णा या शब्दाशीं संबंध असावा असा श्राडर याचा तर्क आहे. कातडें कडक असल्यामुळें तें कमावून मऊ करण्याची कलाहि प्राचीन लोकांस अवगत असावी असें दिसतें. परंतु या क्रियेचे वाचक शब्द निरनिराळ्या भाषांत सदृश आढळत नाहींत. कातडीं कमावण्याची कृति होमरनें यापूर्वींच आपल्या काव्यांत दिली आहे (इलि १७ ३८९)

परंतु इंडोयूरोपीय लोकांचा पोशाख केवळ कातड्याचाच होता असें नाहीं तर त्यास कातडीं कमावण्याप्रमाणेंच नमदा अगर बुरणुस तयार करण्याची व गुंफण्याची कला माहीत झाली होती असें दिसतें ही गोष्ट विशेषतः यूरोपीय शाखेसंबंधानें म्हणतां येईल. कारण नमदा (फेल्ट) याचे वाचक शब्द यूरोपीय भाषांतच सदृश आढळतात. उदाहरणार्थ ग्रीक पिलॉस, लॅटिन–पिलेडस, प्राचीन उच्च जर्मन–फिल्झ, प्राचीन सॅक्सन फुल्ता परंतु तुर्कोतातार लोकहि लोंकरीच बरोबर भर टेवून, पाणी शिंपडून, व चिकट चरबी टाकून दाबून तिचा नमदा तयार करीत अशी माहिती सांपडते. गुंफण्याची कला म्हणजे दोरी वळणें, टोपली विणणें याहि कला प्राचीनांस माहित असाव्या असें दिसतें.

आतां विणण्याच्या कलेविषयीं विचार करूं लागलें असतां प्रथम पुढील शब्दमालिका आढळतात. संस्कृत–वा (विणणें),

धातु ( आठवें भागें ) ग्रीक-नीत्रान ( उभे धागे, विणण्याचें यंत्र ) इराण ( चाती ), लिथु०-वेरप्स ( काळा, कातीण ), प्राचीन उच्च जर्मन-वात ( विणलेलें वस्त्र ) लॅटिन-वेलम ( कपडा ) संस्कृत-ऊर्णवाभि ( लोकर विणणारा कोळी ) झेंद-उब्द ( विणलेला ), पामीर वाफ ( विणणें ) प्राचीन नॉर्वेजिअन-वेफ ( विणणें ), अँग्लोसॅक्सन-वेफ्त ( बारीक धागा ) मध्य उच्च जर्मन-विफ्त ( बारीक धागा ) वगैरे लॅटिन-टेक्सो, संस्कृत-तक्ष् ग्रीक अतोमइ ( विणणें ) अनुति आन ( भागाचा एक भाग ) संस्कृत अत्क ( विणलेले, व्यूत )

वरील शब्दमालिकेकडे पाहिलें असतां असें दिसून येईल कीं विणण्याच्या कलेंत बरीच प्रगति झाली होती माग आणि विणणारा या अर्थी जे शब्द वापरले आहेत त्यावरून असें दिसून येत कीं त्या वेळचे माग उभे राहून वस्त्र विणता येतील अशा प्रकारचे असत कारण त्यांत स्था ( स्ता ) हा धातु दृग्गस पडतो लॅटिन-स्तामेन लिथु० स्ताकलस ( माग ), प्राचीन नॉर्वेजियन-वेफ्स्ताद्र, संस्कृत स्थवि ( विणणारा ) हीच गोष्ट भाषाशास्त्र्यांच्या मदतीशिवाय ग्रीक इटालियन व नॉर्वेजियन प्राचीन मागांची तुलना करून 'श्राडरेन्स' यानें सिद्ध करून दाखविली होती सूत कातणें व गुंफणें या क्रियांच्या वाचक निरनिराळ्या भाषांतील शब्दांकडे पाहिलें असतां असें दिसतें कीं, या क्रिया पयकृपण दर्शविण्याइतकी सर्व भाषांची प्रगति झाली नव्हती श्राडरनें कर्त ( कातणें ) व कट ( चर्ई ) हे संस्कृत शब्द तुलनेकरितां घेतले आहेत परंतु ते दोन्हीही वैदिक नाहींत श्राडरनें तर्कु ( चाती ) हा शब्द वैदिक आहे असें म्हटलें आहे परंतु ऋग्वेदांत अथवा इतर वेदांत तो आढळत नाहीं. आतां कातण्याच्या पदार्थांकडे पाहिलें असतां अवि ( मेंढी ) व ऊर्णा ( लोकर ) या संस्कृत शब्दांचे समानार्थक व सदृश शब्द अनेक भाषांत आढळतात. यावरून प्राचीन लोकांस लोकरीचीं वस्त्रें माहीत असत असें दिसतें त्याप्रमाणेंच ताग व अंबाडी किंवा वाख या अर्थी शब्द यूरोपांतील भाषांमध्यें सदृश आहेत, व टॅसिटस याच्या म्हणण्याप्रमाणें लिनन ( तागाचें वस्त्र ) ट्यूटन स्त्रियांस परिचित होतें असें दिसतें व या विधानास प्लिनि याचीहि पुष्टि मिळते ( हिस्ट नॅच १८. १, २ ) हेन यानें असें म्हटलें आहे कीं, लिनन हें प्रथम आशियांतून यूरोपांत गेलें परंतु श्राडरचा यावर असा तर्क आहे कीं जेव्हां ग्रीक लोक पश्चिमेकडे गेले तेव्हां ते तागाच्या ऐवजीं लोकर वापरू लागले कारण त्या प्रदेशांत तागाची लागवड होत नसे परंतु त्यांनां तागाच्या कापडाची माहिती त्यापूर्वीच झालेली होती याप्रमाणें इंडोयूरोपीय लोकांस ताग व लोकर या दोन्ही पदार्थांच्या वस्त्रांची माहिती होती प्राचीनांच्या वस्त्रांविषयीं पाश्चात्यांनीं जे शोध लावले आहेत ते अद्यापि अपूर्ण आहेत यांच्या शोधावरून एवढी मात्र कल्पना होते कीं, ग्रीक, इटालियन व ट्यूटन इत्यादि यूरोपीय लोकांचे पूर्वज पुरुष व स्त्रिया फक्त एकच वस्त्र अंगाभोंवतीं गुंडाळीत असत शिवणें किंवा कापून जोडणें किंवा एकावर एक वस्त्र वापरणें किंवा शरीराच्या वरच्या भागावर केवळ वस्त्र घेणें व कमरेखालीं निराळें वस्त्र नेसणें या गोष्टी त्यांस पौरस्त्य लोकांनीच शिकविल्या पौरस्त्य लोकांच्या पूर्वजांच्या वस्त्रांविषयीं श्राडरनें कांहींच माहिती दिली नाहीं परंतु ऋग्वेद २ ३२, ४ या ठिकाणी 'सीव्यत्वपः सूच्याच्छिद्यमानया' असा उल्लेख आला आहे याचा अर्थ आच्छिद्यमान अशा सुईनें शिवावें याप्रमाणें इत्यादि आहे यावरून तत्कालीन लोकांस शिवण्याची कला माहित होती हें स्पष्ट होतें ऋ. १. १९१,७ मध्यें कसानां सुईची उपमा दिलेली आहे त्याप्रमाणेंच ऐतरेय ब्राह्मणांत ( १२ ७ ) 'यथा सूच्या वासः संदधदियादेवमेव नाभिवस्त्रस्य च्छिद्रं संदधाति' असें म्हटलें आहे यावरून सुईनें वस्त्र जोडणें त्यांना माहीत होतें हें स्पष्ट होतें या शिवाय शरीराच्या खालच्या व वरच्या भागास वेगळीं वस्त्रें असत अशीहि उदाहरणें अनेक ठिकाणीं आहेत. याखेरीज या प्राचीन लोकांत कर्णविभूषण, गोंदणें इत्यादि प्रकार कोणत्या स्वरूपांत होते यावद्दलची माहिती गोळा करणें अवश्य आहे आतां विभूषणासंबंधानें एवढें येथें म्हटलें पाहिजे कीं, संस्कृत-मणि या शब्दासारखे विभूषणवाचक शब्द इतर भाषांतहि आढळतात उदाहरणार्थ झेंद मिनु ग्रीक मन्नॉस, लॅटिन मॉनिले, प्राचीन सॅक्सन मॉनिरतो, प्राचीन उच्च जर्मन-मेनि इत्यादि

**घरें दारें** —स्थाइकपणें न राहतां भटकत फिरणाऱ्या लोकांचा सर्व संसार गाड्यांवर असतो हें आपणास आजहि कांहीं रानटी लोकांत दिसून येतें याप्रमाणें केवळ गुरें ढोरें पाळून उपजीविका करणाऱ्या इंडोयूरोपीय लोकांचीहि घरें शेतकी करू लागून स्थायिक होण्यापूर्वीं गाड्यांवरच असावीं असा तर्क करण्यास कांहीं हरकत नाहीं गाड्याचे जे निरनिराळे भाग दिसतात त्यांचे वाचक शब्द अनेक भाषांत सदृश आढळतात ही गोष्ट वरील विधानास आधारभूत मानण्यास हरकत नाहीं अशा प्रकारच्या शब्दांपैकीं कांहीं शब्द उदाहरणार्थ घेऊं चाक लॅटिन रोटा, लिथु-राटस, प्राचीन उच्च जर्मन-राड, संस्कृत-रथ ( गाडी ) चाक — संस्कृत-चक्र ग्रीक-कुक्लास, प्राचीन सॅक्सन-कोलो आस - संस्कृत-अक्ष, लॅटिन अक्सिस, प्राचीन उच्च जर्मन अह्स लिथु०-ॲशिस तुंबा -संस्कृत-नाभि, ॲंग्लोसॅक्सन—नफु प्राचीन उच्च जर्मन—नब, प्राचीन फारसी—नविस परंतु संस्कृत अर [ आरे ] किंवा अरम [ आरे ] हा शब्द ऋग्वेदांत या अर्थानें आढळत नाहीं यावरून प्रथम चाकास आरे नव्हते असें दिसतें अगदीं प्राचीन काळीं चाकें करण्याची कृति म्हटली म्हणजे एक लाकडाचा जाड ओंडा घेऊन तो मध्यें सर्व बाजूंनीं पोखरून त्याच्या मध्यभागीं आस राखावयाचा व बाजूला दोहोंकडे वाटोळा भाग कायम

ठेवून त्याचीं चाकें करावयाची अशी असावी. ऋग्वेद १. १६६, ९ मध्यें मरुतांच्या रथाचें वर्णन करीत असतां 'अंसेष्वावः प्रपथेषु खादयोऽक्षोवश्चक्रा समाया विवावृते।' असें वर्णन आहे. या पदातील उत्तरार्धाचा अर्थ तुमच्या चाकाबरोबर अक्ष फिरतो असा आहे. म्हणजे त्या वेळीं अक्ष स्थिर राहून चाक फिरत होतें असें दिसत नाहीं तर अक्ष चाकास चिकटला असल्यामुळे अक्ष व चाकें बरोबरच फिरत असत असें दिसतें. ही गाडे करण्याची कला इंडोयूरोपीय लोकापासूनच इतरानीं घेतली अशाबद्दल त्यांच्या भाषांतून जे शब्द गाडे वगैरे यांचे वाचक आढळतात ते इंडोयूरोपीय भाषांतूनच घेतलेले आहेत यावरून स्पष्ट होतें. तुर्क लोकांनीं गाडे बांधण्याची कला इराणापासून घेतली असें व्हॅंबरी यानें म्हटलें आहे ( प्रिमि. कुल्टुर पृ. १२८ ).

इंडोयूरोपीय लोक जेव्हां कांहींसे स्थाइक झाले तेव्हां त्यांचीं घरें कशीं होतीं याबद्दल आतां विचार करूं या ठिकाणीं आपणाला प्रथम जमीनींत पोखरलेलीं बिळें अथवा गुहा आढळतात. यांच्यापासून ऊन व थंडी या दोहोंचाहि बचाव होत असे आणि हीं घरें दाखविणारे शब्द बहुतेक सर्व इंडोयूरोपीय वंशातील भाषांत आढळतात. अवेस्तामध्यें अशा घरांना 'कत' ( कन्–खणणें ) अशी सज्ञा असे व अर्वाचीन फारसीमध्यें घराला 'कद' किंवा 'कदह्' हे शब्द रूढ आहेत. व पामीर भाषांत 'केद' 'चेद' इ. शब्द वापरतात [ टोमाश्चेक पामीर भाषा ]. झेनोफॉन यानें आर्मीनियन लोकांत अशीं घरें असल्याचा उल्लेख केला आहे. टॅसिटस यानें टयूटन लोकांत अशीं घरें होतीं असा उल्लेख केला आहे व प्लिनी यानेंहि असेंच वर्णन केलें आहे. सिथियन व ग्रीक लोकांतहि अशीं घरें असल्याचें वर्णन आढळतें.

परंतु इंडोयूरोपीय लोकांस केवळ गुहा करण्याचें ठाऊक होतें असें नाहीं तर झोंपड्या व घरें बांधण्याची कलाहि त्यांना कांहींशी अवगत होती ही गोष्ट पुढील शब्दमालिकांवरून दिसून येईल. संस्कृत–दम; आर्मीनियन–तुन; ग्रीक–डोमास; लॅटिन–डोमस. प्राचीन सॅक्सन टोमु; इत्यादि. सं.—शाला; ग्रीक–कलिआ; लॅटिन–सेला; टयूटानिक हला इत्यादि

यूरोपांतील उत्तरेकडील लोकांचीं घरें टॅसिटस, हेरोडोटस इत्यादि ग्रंथकारांच्या वर्णनावरून केवळ लाकडाचीं असून त्यांच्या भोंवतीं कुड विणलेलें असून तीं चिखलानें लिंपलेलीं असावीत व त्यांना विटांचा किंवा दगडांचा उपयोग घर बांधण्याच्या कामीं माहीत असावा असें दिसत नाहीं ही गोष्ट टयूटन व स्लाव्ह लोकांची झाली. दक्षिण यूरोप तर आज आपणास जरा संगमरवरी भव्य इमारती आढळल्या तरी पूर्वींच्या झोंपड्यांचे अवशेष भाषेमध्ये आढळून येतात व ग्रीक आणि इटालियन लोकांस त्या प्रांतांत येण्यापूर्वी गवत, फळ्या व चिखल यांच्या योगानें तयार होणारा घरें ठाऊक होतीं असें हेलबिग यानें म्हटलें आहे ( दाय इटालिकर इन डर पोएबने पृ. ४५ ). अथर्व वेदावरून येणाऱ्या घराच्या कल्पनेचें चित्र झिमरनें दिलें आहे तें लाकडी असून त्यावर बांबू टाकून छप्पर केलेलें असे,व भोंवतीं गवत, टह्याळे यांचा कूड असे असें आहे [आल्टिंड लेबो पृ, १५३ ]. तैत्तिरीय संहितेमध्यें पहिल्या काण्डाच्या तिसऱ्या प्रपाठकाच्या आरंभीं व सहाव्या काण्डाच्या पहिल्या प्रपाठकाच्या आरंभींच सद व शाला बांधण्याविषयीं मन्त्र आहेत त्यावरून व ते मन्त्र म्हणून ज्या कृती करावयाच्या असतात त्यावरून या शाला दुपाखी झोंपडीसारख्या उभे खांब रोंवून वर बांबू टाकून बाजूला कूड बांधून तयार करीत असें दिसतें.

अवेस्तामध्यें वेन्दिदाद फरगर्द आठ यांत असें वर्णन आहे कीं, जर एखादा मनुष्य अथवा कुत्रा घरांत मेला तर त्याचें प्रेत बाहेर नेण्यास सोइस्कर असेल तर प्रेत बाहेर नेऊन घर शुद्ध करावें पण जवळ दख्म वगैरे नसल्यामुळें प्रेत नेणें सोयीचें नसेल तर घर दुसऱ्या जागीं उचलून नेऊन शुद्ध करावें व प्रेत त्याच जागीं टाकून द्यावें. या ठिकाणीं श्राडरनें गायजरचा आधार देऊन भलतेंच विधान केलें आहे तें असें कीं, जर एखादा मनुष्य घरापासून दूर अंतरावर मरण पावला तर त्याचें प्रेत घरांत आणावें किंवा त्याचें घर त्या ठिकाणीं न्यावें. परंतु आम्हीं जो वर मजकूर दिला आहे तोच मूळ वेंदिदादप्रमाणें असून डार्मेस्टेटर यानें सेक्रेड बुक्स ऑफ दि ईस्ट या मालेतील ग्रंथांतहि असाच अर्थ केलेला आहे. वरील मजकुरावरून इराणी घराची थोडी बहुत कल्पना येइल.

**व्यापार व दळणवळण.**—आपणाजवळची एखादी वस्तु देऊन दुसरी घेणें ही कल्पना इतकी सरळ आणि उघड आहे कीं, तिचें अस्तित्व संस्कृतीच्या कोणत्याहि पायरींत आपणांस आढळून येईल. त्यामुळ देवघेवीची पद्धति फार प्राचीन कालापासून सुरू असली पाहिजे असें आपणास म्हणावयास हरकत नाहीं. परंतु सध्याच्या क्रय आणि विक्रय या दोन अगदीं पृथक् क्रिया असून त्यामध्यें किंमतीचें परिमाण ठरविणारी कांहींतरी सामान्य वस्तु असल्याशिवाय या क्रिया होऊं शकत नाहींत. ही सामान्य वस्तु देवघेवीच्या प्रकारापासूनच कांहीं जिन्नस उदाहरणार्थ गाय वगैरे सर्व लोकांच्या सामान्य आवडीचे ठरून त्याप्रमाणें निश्चित झाली असली पाहिजे.

अशा प्रकारानें देवघेवीमधील पदार्थांची किंमत कोणत्या तरी तिसऱ्या पदार्थानें दाखविता येईपर्यंतचा व्यवहार केवळ देवघेवीचा असतो. नंतर त्यास क्रयविक्रयाचें स्वरूप येतें व पुढें त्याचें परिणत स्वरूप व्यापारामध्यें दृष्टीस पडतें.

इंडोयूरोपीय कालांत गाय ही सामान्य किंमतीचें परिमाण दाखविणारी वस्तु होती. सहस्रापर्यंत गाईंच्या संख्येची कल्पना व तितक्या किंमतीच्या पदार्थांच्या किंमतीची कल्पना त्यांना असावी असें वाटतें.

एकाच राष्ट्रजातीमध्यें मोडणारे लोक तेवढे एक व समान हक्काचे, त्यामुळें दुसऱ्या जातींतील लोक तेवढे परके व त्याना काहीं हक्क नाहींत ही कल्पनाहि फार प्राचीन दिसते. प्राचीन लोकाच्या कल्पनेप्रमाणें परके आणि शत्रू यामध्यें काहीं फरक नाहीं. त्यामुळें परकीयाना दास करणें *किंवा त्याना बळी देणें याबद्दल त्या लोकास काही वाटत* नसे.

यामुळ असें वाटण्याचा संभव आहे कीं, प्राचीन काळात निरनिराळ्या जातींमध्यें परस्पर दळणवळण असणें किंवा देवघेव, व्यापार इत्यादि व्यवहार होणें अगदीं अशक्य *असलें पाहिजे. परतु वास्तविक गोष्ट तशी दिसत नाहीं* कारण काहीं संस्कृतींच्या कनिष्ठ अवस्थेंत असलेल्या लोकात एकमेकाशीं बोलल्याशिवाय किंवा एकमेकाच्या दृष्टीस पडल्याशिवाय देवघेवीचा व्यवहार होत असल्याचें आपणास दिसून येतें. ज्या लोकास आपला माल विकावयाचा *असतो ते एका ठिकाणीं आपला माल माडून निघून* जातात नतर दुसरे लोक येऊन त्या मालाच्या मोलाचे दुसरे जिन्नस ठेवून दृष्टीआड होतात. नतर पाहिले लोक येऊन आपणास पसत पडल्यास दुसरा माल घेऊन जातात व आपला जाग्यावर ठेवतात व याप्रमाणें तो व्यवहार पुरा होतो. जर त्यानीं दुसरा माल ठेवलेला असेल तितका घेतला नाहीं तर विकत घेणाऱ्याला आणखी माल ठेवावा लागतो.

याखेरीज निरनिराळ्या जातींमध्यें असें ठरलेलें असते कीं, विवक्षित दिवशीं एखाद्या विशिष्ट स्थळीं देवघेवीच्या *व्यवहारानिमित्त वैमनस्य विसरून* युद्ध वगैरे बद राहील त्या दिवशीं सर्व शस्त्रास्त्रें बाजूस ठेवून दोन्ही जातीचे लोक परस्परात मिसळतात अशींच सम्मेलनें बहुतकरून एखाद्या देवतेनिमित्त भरविण्यात येत. यातूनच जत्राचा उगम झाला.

*याप्रमाणेंच परकीय पाहुणा, तद्धाकरिता आलेला मनुष्य,* इत्यादिकाच्या ठिकाणचें वैर तात्पुरतें बाजूस टेवण्यात येऊं लागलें व आतिथ्य शिष्टाचार इत्यादिकाचा प्रघात पडला व व्यवहाराचें कार्यक्षेत्र वाढत गेलें.

**यूरोपांतील पाषाणयुगाशीं आर्यन लोकांचा संबंध**—*आतापर्यंत निरनिराळ्या भाषातील शब्दाच्या* तुल्यावरून इंडोयूरोपीय लोकाच्या राहणीची वगैरे कल्पना दिली. आता तिची यूरोपामध्यें पुराणवस्तुसशोधकानीं शोधून काढलेल्या यूरोपातील दगडाचीं हत्यारें वापरणाऱ्या आणि पाषाणयुगीन नावानें बोधिल्या जाणाऱ्या लोकाच्या व *कालाच्या अवशेषावरून अनुमानानें निघणाऱ्या सामाजिक* व सास्कृतिक स्थितीशीं थोडीशी तुलना करून नंतर पुन्हा इंडोयूरोपीय सामाजिक व कौटुंबिक स्थितीकडे वळूं

स्विट्झर्लंड देशाच्या पूर्व व पश्चिम भागात सरोगृहें अथवा 'लेक ड्वेलिंग्ज' म्हणजे तळ्यात उथळ पाण्यात खाबावर बाधलेलीं घरें सापडलीं आहेत. तीं इतिहासास अपरिचित अशा पूर्वकाळातील आहेत.

या सरोगृहात धातूंचा मागमूसहि नाहीं. तर फक्त दगड व हाडें यापासून बनविलेलीं आयुधें आढळतात अशा प्रकारचीं हत्यारें एका सरोगृहसमूहात ५८०० वर *सापडलीं आहेत. क्वचित् ताब्याचा उपयोग केलेला आढ*ळतो पण दगड व हाडें याच्याशीं तुलना केली असता तो काहींच नव्हे. यावरून हीं घरें पाषाणयुगीन आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं व इंडोयूरोपीय काल म्हणजे पाषाणयुगच होय

*इंडोयूरोपीय कालात बाण, धनुष्य, परशु इत्यादि मारक* आयुधें आढळतात परतु कवच, शिरस्त्राण यासारखी संरक्षक साधनें आढळत नाहींत त्याप्रमाणेंच सरोगृहातहि धनुष्ये, भाल्याचीं टोंकें, सुरे, गारांचीं बाणाग्रें इत्यादि मारक आयुधें आढळतात पण सरक्षक आयुधें आढळत नाहींत.

गुरेंढोरें व माणसाळलेलीं जनावरें याविषयीं विचार केला तरी हीच स्थिति आढळते इंडोयूरोपीय लोकास माहीत असलेलीं जनावरें म्हणजे गाय, मेंढी, बकरा, कुत्रा, डुकर व घोडा हीं होत सरोगृहातहि हेच प्राणी आढळतात व यातील या दोन्ही ठिकाणचें साम्य विस्मयजनक आहे. जी घोड्याची जात आपल्या नेहमीं पहाण्यात येते त्या जातीच्या घोड्याचीं हाडें सरोगृहांत आढळतात पण तीं फारच तुरळक दृष्टीस पडतात.

शेतीकडे पाहतांहि इंडोयूरोपीय लोकास गहूं, जव, मिलेट हें तृणधान्य, हीं धान्यें ठाऊक होतीं असें दिसतें व सरोगृहातहि याच धान्याचा प्रसार दिसतो. अलीकडे यूरोपीयास परिचित असलेलीं राय, ओट हीं धान्यें त्यावेळीं माहीत होतीं असें दिसत नाहीं त्याप्रमाणेंच ताग माहीत नव्हता पण अंबाडी ( फ्लॅक्स ) माहीत होती असें दिसतें.

आहाराच्या बाबतींतहि सरोगृहातील लोक मत्स्य खात एवढी गोष्ट वगळली तर सर्वतोपरी सारखेपणा आढळेल.

सरोगृहामध्यें चात्या, अंबाडीचे दोर, दोऱ्या व अंबाडीच्याच विणलेल्या वस्त्राचे अवशेष सापडले आहेत. त्यामुळें त्यास इंडोयूरोपीय लोकाप्रमाणें वस्त्रें विणण्याची कला माहीत होती असें दिसतें. मात्र या सरोगृहात लोकरीचीं वस्त्र मुळींच आढळत नाहींत त्याचा पोशाख कसा असावा याची नीटशी कल्पना होत नाहीं. *परतु केलरनें ते केवळ एकच वस्त्र अगाभोंवती गुंडाळीत* असावे असें अनुमान केलें आहे.

घरासबधीं विचार करिताना इंडोयूरोपीय लोकाचें घर प्रथम गाडे हेंच असून ते पुढें स्थायिक झाल्यावर प्रथम गुहा व नंतर झोंपड्या वगैरे बाधून राहू लागले हें आपण पाहिलेंच

आहे. सरोगृहासंबंधीं विचार करितां त्या कालचीं घरें अग्नीमुळें व अन्य कारणानीं नाश पावलीं आहेत परंतु केलर यानें अनुमानानें त्यांचें असें वर्णन दिलें आहे कीं, 'त्यांच्या झोंपड्या वाटोळ्या आकाराच्या असून सभोंवतीं कुडाची भिंत असे व ती चिखलानें सारवीत असत. जमीनहि चिखल सारवीत असत. छप्पर झाडाच्या साली, गवत, बोरु वगैरेनीं आच्छादित असत.' परंतु तत्कालीन लोकांच्या घराची काहींशी कल्पना येण्यास आपणास दुसरें साधन म्हटलें म्हणजे इटली, जर्मनी, डेनमार्क इत्यादि देशांत भूम्यन्तर्गत गृहें सांपडलीं आहेत तीं वाटोळीं असून त्यांच्या भिंती टहाळे व चिखल यांच्या बनविलेल्या असाव्यात आणि त्यांचें छप्पर गवत व बोरू यांचे थर बांधून बनविलेलें असे असें हेलबिग यानें वर्णन केलें आहे (दाय इटालिकेर इन डर पोएबने पृ. ५०). या घरांना उजेड आंत येण्याकरितां किंवा धूर बाहेर जाण्याकरितां दरवाजाचा व कांहीं ठिकाणीं एक लहानशी तिकोनी खिडकी छपरामध्यें काढलेली असे तिचा उपयोग होत असे. याप्रमाणें कांहीं लोक तळ्यांत खांब रोंवून त्यावर घरें बांधून रहात असतांना कांहीं लोक जमीनीवर रहात असत असें दिसतें. व या दोहोंच्याहि राहणींत बरेंच साम्य असून ती इंडोयूरोपीय लोकांच्या राहणीशीं जुळते.

मातीचीं भांडीं वगैरे करणें यासारख्या कांहीं किरकोळ कला सरोगृहांतील लोकांस माहीत होत्या परंतु गाड्या तयार करणें ही गोष्ट त्यास अवगत नव्हती. कारण त्याचा त्यांना उपयोगहि नव्हता. नावा मात्र त्यांना माहीत होत्या.

वरील साक्ष्याकडे पाहतां भाषाशास्त्र व इतिहास यांनीं जें प्राचीनतम संस्कृतीचें स्वरूप आपणास दाखविलें तें स्वरूप व स्वित्झर्लंडमधील सरोगृहांतून दिसून येणारें प्राचीन संस्कृतीचें स्वरूप या दोहोंत बरेंच साम्य आहे व या दोन्ही संस्कृती जवळ जवळ एकच आहेत असा तर्क करण्यास बरीच जागा दिसून येते. कै. लो. टिळकांचें मत असें होतें कीं सरोगृहांतील संस्कृति मूलगृहकालीन संस्कृतीपेक्षां अधिक कनिष्ठ दर्जाची आहे आणि यूरोपांत गेल्यानंतर इंडोयूरोपीयांची सांस्कृतिक अधोगति झाली असावी.

**कौटुंबिक पद्धतीचा इतिहास**—हा पाहिला असतां आपणास असें दिसून येतें कीं प्रारंभीं विवाहसंस्था ही अस्तित्वातच नव्हती ही संस्था अस्तित्वांत आल्यापासून कौटुंबिक पद्धतीच्या इतिहासाला प्रारंभ होतो प्रारंभीं वैवाहिक बाबतींत मनुष्य प्राणी पशूंपेक्षां फारसा निराळा नव्हता. मुलाची पैतृकपरंपरा ओळखण्यास अडचण असे. म्हणून प्रथम मुलगा आईच्या नावानें ओळखला जाण्याचा प्रघात पडला व विवाहसंस्था दृढ झाल्यानंतर मुलगा पित्याच्या नावानें ओळखला जाऊं लागला याप्रमाणें मातृकन्यापरंपरा ही जुनी असून पितापुत्र परंपरा ही नंतरची आहे असें लर्बाक व हुलवॉल्ड प्रभृति समाजशास्त्रज्ञांचें मत आहे.

याच्या उलट स्टार्की यानें असें प्रतिपादन केलें आहे कीं विवाहसंस्था ही अस्तित्वांत येण्याचें कारण कामेच्छा नसून गृहसौख्येच्छा (डोमेस्टिक इकॉनम) होय. मनुष्याला एक नोकर व आपल्या मालमत्तेचा रक्षक पाहिजे होता म्हणून त्यानें स्त्रीशीं संबंध ठेवला व पुढें वंश वाढावा मुलें असावीं अशी इच्छा होऊन ती कोणापासूनहि होवोत तो आपल्या कुटुंबांत सामील करूं लागला, व त्याच्या बराच नंतर वैवाहिक स्थिति ही प्रथम स्त्रीच्या बाबतींत व नंतर पुरुषाच्या बाबतींत निश्चित झाली. असो.

आपणास या ठिकाणीं या वादविवादांत पडण्याचें कारण नाहीं. आपणास आज तत्कालीन स्थितीच ज्ञात होण्याच अडचणी बऱ्याच आहेत. ज्या लोकांची आपणास फारशी माहितीहि नाहीं त्याच्या मनातील हेतूंचा पत्ता लावणें ही बरीच पुढची पायरी झाली. आपणास त्या वेळच्या कौटुंबिक स्थितीबद्दल अनुमान करावयाचें म्हणजे आपण प्रथम तत्कालीन नातलगास लावण्यांत आलेल्या निरनिराळ्या भाषांतील शब्दांच्या सादृश्यवैलक्षण्याचा विचार करूं.

बाप.— संस्कृत-पितर; झेंद—पितर, आर्मेनिअन हेअर, ग्रीक—पतिर, लॅटिन—पेटर; इराणी—अथिर, गॉथिक फॅडर, इंग्लिश—फादर

माता:—संस्कृत—मातर, झेन्द—मातर आर्मेनिअन मइर, ग्रीक—मॉतिर; लॅटिन—मेटर, इराणी-मथिर, प्राचीन उच्च जर्मन—मुओटर; इंग्लिश—मदर.

पुत्र— संस्कृत—सूनुः, झेंद—हुनु, गॉथिक—सुनुस; लिथु०—सुनुस, प्राचीन सॅक्सन—सिनु; इंग्लिश—सन, संस्कृत—पुत्र, झेन्द—पुत्र ऑस्क०—पुक्लो;

कन्या — संस्कृत-दुहितर, झेन्द-दुग्धर, आर्मेनिअन-दुस्त (पुत्र), इंग्लिश-डॉटर

भाऊ — संस्कृत-भ्रातर; झेन्द-भ्रातर, ग्रीक फ्रॉतिर; लॅटिन—फ्रेटर, इराणी—ब्राथिर, गॉथिक-ब्रोथर, लिथु०-ब्रॅटेरेलिस; इंग्लिश ब्रदर.

बहीण.— संस्कृत-स्वसर; झेंद—ह्व-हर लॅटिन सारोर; इराणी-सिउर, प्राचीन सक्सन-स्वेस्र, इंग्लिश-सिस्टर.

वरील शब्दमालेकडे पाहतां लॅटिन भाषेंत पुत्र व कन्या या अर्थी सदृश शब्द आढळत नाहींत व ग्रीक भाषेंत भाऊ व बहीण या शब्दांना सदृश शब्द आढळत नाहींत. पुत्रवाचक शब्द सु प्रसवणें या धातूपासून निघाले असावे असें दिसतें व पितावाचक शब्द पितृ याचा पति या शब्दाशीं व पा—रक्षण करणें या धातूशीं संबंध असावा असा तर्क आहे.

वरील शब्द सर्व जवळच्या नातलगासंबंधीं आहेत. या शब्दांत जितकें साम्य आढळतें तितकें दूरच्या नातलगांच्या वाचक शब्दांत आढळत नाहीं. मात्र मुलतावाचक निरनिराळ्या भाषांत जे शब्द आहेत त्यांत बरेंच साम्य आढळतें.

चुलताः- संस्कृत-पितृव्य; झेंद-तुइर्यो.ग्रीक-पत्रोस; लॅटिन पेतृउस; प्राचीन उच्च जर्मन-फॅतुरेओ; ॲंग्लो सॅक्सन-फिडेरा. आतां दुसरी एक शब्दमालिका पाहूं.

संस्कृत-नपात् ( वंशज ); इराणी—झेंद-नपात ( नातु ), उत्तर फारसी—नवाद ( नातु ), नप्ति-नातलग; लॅटिन नेपोट ( नातु ) याचाच पुढें इंग्लिश. नेव्ह्यू ( पुतण्या ) हा शब्द झाला. यावरून नपात् हा शब्द प्रथम केवळ वंशज या अर्थी असून पुढें निरनिराळ्या ठिकाणीं त्याला निरनिराळे विशिष्ट अर्थ प्राप्त झाले असें दिसतें.

इंडोयूरोपीय लोकांतील कौटुंबिक संबंध दाखविणारी दुसरी एक महत्वाची गोष्ट म्हटली म्हणजे इंडोयूरोपीय कुटुंबांतील सुनेचे सासरच्या घरातील मंडळींशीं संबंध दाखविणाऱ्या शब्दांचीं तुल्यें अधिक आढळतात व उलट पक्षीं जावयाचा सासुरवाडच्या मंडळींशीं संबंध दाखविणाऱ्या शब्दांचीं तुल्य कमी सापडतात.

सुनः-संस्कृत-स्नुषा; उत्तर फारसी--सुनार; आर्मेनियन-नु; ग्रीक-नुओस; लॅटिन-नुरुस; प्राचीन उच्च जर्मन-स्नुरा; प्राचीन सॅक्सन-स्नुचा ( शा ) इत्यादि.

जामातवाचक शब्दांचीं तुल्यें सर्व शाखांत न आढळता केवळ निकटसंबंधी भाषांतच आढळतात.

संस्कृत-जामातर; झेंद-झामातर; लिथु.-स्लॅझेन्तस.

याप्रमाणेंच सासरा व सासू वाचक शब्दांचीं तुल्यें पाहिलीं असताहि वरील अनुमानासच बळकटी येते. तेव्हां इंडोयूरोपीय कुटुंबामध्यें विवाहाच्या योगानें वधू व तिच्या सासरचीं माणसें यामध्यें संबंध उत्पन्न होत असे अशी कल्पना वास्तविक दिसते. विवाह झाल्यानंतर मुलीनें आपल्या आईबापाचें घर व नात्यागोत्याचीं माणसें सोडून नवऱ्याच्या घरा व त्याच्या नातलगामध्यें जाऊन राहिलें पाहिजे व त्यामुळें तिचीं माहेरचीं सर्व नातीं सुटून जात व तिच्यामुळें नवऱ्याच्या नातलगामध्यें व बापाच्या नातलगांमध्यें काहीं विशेषसा संबंध उत्पन्न होत नसे. ती केवळ नवऱ्याच्या कुटुंबांत मिळून जात असे. नवऱ्याच्या नातलगाचा व बायकोच्या माहेरच्या नातलगाचा संबंध जडण्यास बराच कालावधि लागला असावा व विचारामध्यें बरीच उदारता आल्यानंतर हा संबंध दृढ झाला असावा असें दिसतें. पण यावरून पितृपुत्रपरंपरा समाजांत स्थापित झाली होती असें दिसतें.

**इंडोयूरोपीय विवाहसंस्था व त्या समाजांत वधूचा दर्जा**—इंडोयूरोपीय विवाहसंस्था बहुधा वधू पैसे देऊन विकत घेणें या चालीच्या पायावर उभारलेली आहे. टयूटन लोकांमध्यें प्राचीनकाळीं ही चाल सर्वत्र दिसून येते. स्लाव्ह लोकांतहि ही चाल प्रचलित असून दक्षिणेकडील स्लाव्ह लोकांत एका काळीं मुलीची किंमत इतकी बेसुमार वाढली होती कीं ---- नाम या राजानें ती किंमत एक ड्यूकट या नाण्यावर आणून ठेवली असें क्राउस या ग्रंथकारानें म्हटलें आहे.

हिंदू लोकांतहि वधू विकत घेण्याची चाल काहीं अपरिचित नव्हती. अष्टविवाहापैकीं आर्ष विवाहामध्यें वरापासून एक किंवा दोन गोमिथुनें घेऊन कन्या द्यावी असा विधि सांगितला आहे ( मनुस्मृति ३, २९. ) वैदिक काळांत भावी श्वशुराला उत्तमोत्तम देणग्या देऊन वधू मिळण्याचा प्रघात होता असें झिमरनें म्हटलें आहे ( अल्टिंडि.ले पृ ३१० )

वधू विकत घेण्याच्या चालीबरोबरच वधू हरण करून आणण्याची चालहि प्रचारांत होती आता या दोन्ही चाली जर एकाच काळीं प्रचलित असतील तर त्यांची परस्परसंगति कशी लावावयाची असा प्रश्न उपस्थित होतो. त्यावर असें उत्तर सुचविता येईल कीं वधू विकत घेण्याची चाल ही जेव्हां वर व वधू एकाच राष्ट्रजातींतील असतील तेव्हां आचरणांत रत असावी व दुसऱ्या चालीचा अवलंब जेव्हां परक्या जातींतील वधू मिळवून आणावयाची असेल तेव्हां करावयाचा असावा यावरून वधू हरण करून आणावयाची ही चाल फार पुरातन काळीं जेव्हां आर्यन् लोक स्थाईक झाले नसून भटकत फिरणारे होते त्या काळची असावी. त्या वेळीं निरनिराळ्या जातींमध्यें संबंध फार थोडा असावा व एक प्रकारचें शत्रुत्व असावें. यामुळें नवऱ्याच्या नातलगांचा व बायकोच्या माहेरच्या नातलगांचा काहींएक संबंध नसतो ही कल्पना त्या वेळीं विशेष रूढ असली पाहिजे. याप्रमाणें वर जें आपण विधान केलें कीं वधूचा नवऱ्याच्या घरीं गेल्यावर माहेरचा संबंध जवळ जवळ पूर्णपणें तुटत असे तसें होणें साहजिक दिसतें.

संस्कृत विवाह यामध्यें जो वह् धातु आहे त्यांतहि वधू पित्याच्या कडून समारंभानें अगर हरण करून नेणें असा अर्थ आहे व इतर भाषांतील लग्नवाचक शब्दामध्येंहि थोडाबहुत तसाच अर्थ आहे.

नवरा ही कल्पना प्राचीन भाषांतून ज्या शब्दांनीं व्यक्त केली जात असे त्या शब्दाचा अर्थ सामान्यतः मालक किंवा धनी असा असे. संस्कृत पति; झेंद-पइति,ग्रीक-पॉसिस,संस्कृत दम्पति; (गृहपति ). लिथु०--पत्स ( पति-विवाहित मनुष्य ). यावरून नवरा हा घरचा मालक समजला जात असे. व युरोपीय भाषांतील स्त्रीवाचक शब्द आहेत त्यांचा धात्वर्थ जन्म देणारी असा होतो यावरून पत्नी म्हणजे मुलास जन्म देणारी, पती म्हणजे धनी असा पूर्वी नवरा व बायको यांचा परस्परसंबंध समजला जात असावा असा तर्क आहे.

प्राचीनकाळीं स्त्रियांचा दर्जा हल्लीपेक्षा उच्च प्रतीचा होता असा साधारण समज आहे. हा समज होण्याचें मुख्य कारण म्हणजे यज्ञामध्यें वगैरे पत्नीची जरूर लागत असे. हिंदु व रोमन लोकांत पत्नीशिवाय यज्ञ करितां येत नसे. परंतु रोमन लोकांत मार्स नावाच्या देवतेला बळी देताना पत्नी जवळ लागत नाहीं व भारतीयांमध्यें प्रवर्ग्य विधीच्या वेळीं

पानानें पुरला घ्यावा असें शतपथ ब्राह्मणांत सांगितलें आहे. यावरून व ज्या काळीं स्त्री केवळ द्रव्य देऊन विकत घेतलेली अगर हरण करून आणलेली असेल त्या काळीं तिला बरोबरीचें समजलें जाण्याचा संभव कमी दिसतो.

बायको जर विकत घ्यावयाची तर एकीहून अधिक बायका विकत घेण्यास काय हरकत आहे असा साहजिकच प्रश्न येतो, व यावरूनच एकीहून अधिक बायका करण्याची चाल प्रचारांत आली असावी. पण ही चाल जेव्हां समाज स्थाईक होऊन त्यात कांहीं लोक श्रीमंत झाले असतील तेव्हांच पडली असली पाहिजे. कारण एकीहून अधिक स्त्रिया विकत घेणें त्या ना व त्यांच्या मुलांना पोसणें ही गोष्ट श्रीमंताशिवाय किंवा कामाचा पसारा वाढल्याशिवाय होणें शक्य नसतें. अधिक स्त्रिया करण्याची कल्पना पहिल्या बायकोस मूल किंवा विशेषत पुत्र न झाल्यास निघणें स्वाभाविक आहे. अशा तऱ्हेनें दक्षिण स्लाव्ह लोकांत मुलाकरिता एक बदली बायको करण्याची चाल अद्यापिहि रूढ आहे (क्राउस पृ २२८). जेव्हां एखाद्या स्त्रीस नवरा अपात्र असेल तेव्हां नियोगानें पुत्रोत्पत्ति करण्याचा प्रघात भारतीय, ग्रीक, ट्यूटन लोकांत होता. या चालीचें मूळ या कल्पनेंत दिसून येतें कीं स्त्री ही पुरुषाच्या मालकीची वस्तु असून त्याच्या शेताच्या ठिकाणीं होणाऱ्या धान्याप्रमाणें स्त्रीच्या ठिकाणीं होणाऱ्या पुत्रावर त्याचा मालकी आहे. स्त्री ही केवळ मालकीची वस्तु ही कल्पना स्कांडिनेव्हियामध्यें जो आपली स्त्री देऊन अतिथीचा सत्कार करण्याचा प्रघात आहे त्याच्या मुळाशीं असावी [वेनहोल्ड अल्टि पृ ४४७].

आता अशा कल्पना असणाऱ्या लोकांमध्यें विवाहित पुरुषानें अन्य स्त्रीशीं संबंध ठेवला तर तें गर्हणीय मानलें जात नसे व उलट स्त्रीनें मात्र व्यभिचार केल्यास तिला अतिशय क्रूर शिक्षा देण्यात येत असे या गोष्टीचें फारसें नवल वाटण्याचें कारण नाहीं. कारण स्त्रीच्या व्यभिचारामुळें पुरुषाच्या एक प्रकारच्या मालकीस हरकत बाध येत असे अशी त्यांची साहजिक समजूत होती. ग्रीक व ट्यूटन लोकांत अशाच प्रकारची चाल होती. पुरुषाच्या स्वैर वर्तनाकडे कोणी पहात नसे परंतु स्त्री व्यभिचार करितांना आढळल्यास तिला तिच्या मित्रासह प्राणास मुकावें लागे.

स्त्रीच्या पोटीं होणाऱ्या पुत्रासहि जिवंत ठेवणें अगर टाकून देणें केवळ बापाच्या मर्जीवर असे अशी ट्यूटन लोकांत चाल होती, व रोमन लोकांत मुलास विकण्याचा बापास हक्क होता असें स्पष्ट दिसतें. शुनःशेपाची कथाहि याच गोष्टीचा अनुवाद करते. उत्तर ट्यूटन, रोमन, व गॉल लोकांत स्त्रीलाहि विकण्याचा अगर ठार मारण्याचा पुरुषाना हक्क असे असें दिसतें (वेनहोल्ड आल्टि डे पृ २४९, रॉसबॅक-रोमन एथ्नोलॉजी पृ २०, गॉयर ६ १९).

नवऱ्याच्या मागें जिवंत राहण्याचा स्त्रीला सत्ता नाहीं अशी चाल इंडोयूरोपीय लोकांत असावी. या चालीचें मूळ मृत मनुष्याचें आयुष्य परलोकांत या लोकाप्रमाणेंच सुखाचें असावें ही कल्पना असावी. उत्तर यूरोपांतील लोकांच्या या चालीचें वर्णन व्हील्डा यानें आपल्या ग्रंथांत विस्तृत दिलें आहे. ऋग्वेदामध्यें (१० १८,७) या ऋचेंत मृत पुरुषाच्या पत्नीचें सांत्वन केलें आहे यावरून त्या वेळीं सर्वच स्त्रिया सती जात असें दिसत नाहीं. विशेषत ज्या स्त्रीस पुत्र नसेल ती सती जाऊं नये व दिरापासून पुत्र उत्पन्न करणें हें तिचें काम असावें असें ऋग्वेद (१०. ४०) या सूक्तावरून दिसतें. पुढें ही चाल सौम्य होत जाऊन सती जाण्याची चाल बंद पडत चालली. परंतु यूरोपांतही विधवांस पुन्हां लग्न करण्याची मनाई असे असें ट्यूटन व ग्रीक लोकांत दिसून येतें.

यावरून कोणी असें विचारील कीं इंडोयूरोपीय कालांत दासी व पत्नी यांमध्यें काय फरक होता, तर त्याचें उत्तर असें कीं हा कांहीं बाबतींत नाजूक पण कांहीं बाबतींत महत्त्वाचा होता. पत्नी ही समान जातींतील असून तिच्या ठिकाणींच झालेली संतति कायदेशीर समजली जात असे. तिला दासीपेक्षा वरच्या पायरीची समजण्यात येई व यज्ञ वगैरे प्रसंगीं पत्नीलाच यजमानाबरोबर बसण्याचा हक्क असे. बाकी इतर बाबतींत तिच्यांत व दासींत विशेष फरक नसे.

**राज्यव्यवस्था**.—इंडोयूरोपीय लोकांतील राज्यव्यवस्थेचा पाया कुटुंबव्यवस्थेवरच बसविला आहे ही गोष्ट आदरला सिद्ध झाल्यासारखी वाटते. या व्यवस्थेची वाढ इंडोयूरोपीय कालांत कोठपर्यंत झाली होती एवढेंच आपणास पहावयाचें आहे. मात्र ही भाषांतील शब्दांच्या तुलनेवरून शोधून काढणें कठिण आहे. कारण त्यांत सादृश्य फारसें आढळत नाहीं व शब्दांचे अर्थ फारच लवकर बदलले गेले आढळतात. इंडोयूरोपीय कुटुंबामध्यें गृहपति, त्याच्या स्त्रिया, मुलें, दास, दासी इत्यादिकांचा समावेश होत असे हें आपण वर सांगितलेंच आहे. नातीं वगैरे फक्त पित्याच्या किंवा सगोत्र बाजूनेंच ओळखलीं जात व मातृपक्षाशीं फारसा संबंध नसे. तथापि भारतांतच शतपथ ब्राह्मणाच्या कालापर्यंत अनेक व्यक्तींचीं नांवें मातृनामसाधित आहेत आणि अनेक यूरोपीय लोकांत हाच प्रकार दिसतो हेंहि विसरतां कामा नये. परंतु या पैतृक कुटुंबांत किती लोकांचा समावेश होत असे हें आपणास पहावयाचें आहे. हिंदू, ग्रीक व ट्यूटन लोकांत अशी एक प्राचीन कालापासून चालत आलेली चाल आहे कीं मुलानें लग्न केलें म्हणजे तो पित्याचें घर सोडून स्वतंत्र अग्नीचें आधान करून निराळें घर करून राहतो. हें अनेक पंडितांचें विधान बरोबर असेल पण त्यास पुरावा पाहिजे. डेल्ब्रुकच्या मताप्रमाणें हीच मूळची चाल असावी परंतु श्राडरचें मत असें आहे कीं ही चाल

इंडोयूरोपीय लोक स्थाईक झाल्यानंतर व शेतकी करून राहू लागल्यामुळें जमीन वगैरे मालमत्ता झाल्यानंतर प्रचारात आली असावी. प्रारंभीं भ्रमण करीत फिरत असतांना इंडोयूरोपीय लोक हिंदूंच्या एकत्र कुटुंबपद्धतीप्रमाणें किंवा आयर्लंडमधील 'सेप्ट' प्रमाणें राहात असावे.

क्राउस याच्या म्हणण्याप्रमाणें असें कुटुंब म्हणजे पैतृक संबंधानें दोन तीन पिढ्यांपर्यंत बद्ध झालेल्या पुरुषांचें व स्त्रियांचें मिळून ५० । ६० माणसांचें असावें व गृहपति हा त्यांतील मुख्य समजला जात असे. मात्र रोमन लोकांतील पेटर फॅमिलिअस प्रमाणें त्याची सर्व कौटुंबिक मालमत्तेवर मालकी नसे, तर सर्व मालमत्ता सर्वांच्या समाइक मालकीची असे. हे सर्व एकाच घरांत रहात असत. मध्यें अग्निशाला असून बाजूला यांच्या रहाण्याच्या जागा असत. जेवण एकत्र होत असे. पुरुष प्रथम जेवीत व स्त्रिया नंतर जेवीत असत.

ही स्थिति आजहि हिंदु कुटुंबांत आहे हें हिंदु वाचकांस सांगावयास नकोच. परंतु या चालीचे अवशेष ग्रीक व रोमन लोकांच्या प्राचीन चालींत दिसून येतात. ग्रीक लोकांत या चाली असल्याचीं अनेक उदाहरणें आढळतात. टयूटन लोकांत समारंभाच्या वेळीं पुरुष प्रथम जेवल्यानंतर स्त्रिया जेवण्याची चाल होती.

यावरून एकत्र कुटुंबाची पद्धति जुनी असून विभक्त कुटुंबाची पद्धति मागाहून पडली असावी असें दिसतें.

कुटुंब व जाति यांच्या मधली अवस्था आपणांस अद्यापि दक्षिण स्लाव्ह लोकांत सांपडते. जेव्हां एका कुटुंबांतील भाऊबंद विभक्त होतात परंतु एकाच ठिकाणीं एकाच संघानें एकाच धर्माचें आचरण करून राहतात व सर्वांचा मिळून समाईक जमीनजुमला असतो तेव्हां दक्षिण स्लाव्ह लोकांत भ्रत्स्त्वो या नांवानें ओळखला जाणारा 'बांधवसंघ' निर्माण होतो. या संघाच्या आनुवंशिक परंपरा व पूर्वजांच्या कथा एकच असतात. यांतील मुख्य निवडला जातो, व तो लढाई किंवा तह करण्याच्या कामीं पुढारी समजला जातो व न्यायनिवाड्याचें काम तोच करितो.

ग्रीक 'फ्राट्री' व लॅटिन 'गेन्स' हेहि याच प्रकारचे संघ असावे. अशाच संघाचे पुढें क्लॅन बनून त्यांच्या 'ट्राइब्स' अथवा राष्ट्रजाती बनल्या असाव्या.

दक्षिण स्लाव्ह लोकांत प्रत्येक 'झूपा' (एकाच जातीनें व्यापलेला प्रदेश) मध्यें एक स्वसंरक्षणासाठीं किल्ल्यासारखी जागा बांधण्याची चाल असे. ही जागा म्हणजे त्यांच्या राजकीय सत्तेचें केंद्र असून धार्मिक गोष्टींचेंहि मुख्य स्थान असे. येथें त्यांच्या शिष्टांच्या बैठकी होत व लढाईच्या वेळीं त्यांच्या हालचालींचें केंद्र असे.

भ्रत्स्त्वो याचें आणि गोत्राचें स्वरूप एकसारखेंच आहे. भ्रत्स्त्वो हा जमीनीचें संरक्षण करणारा आणि तिजवर मालकी भोगणारा समूह होता. गो म्हणजे जमीन आणि त्र म्हणजे संरक्षण करणारा. गोत्र या प्रथमतः समूहाच्या बाहेर लग्न करण्यास भाग पाडणाऱ्या संस्था नव्हत्या. सगोत्र विवाहास निषेध श्रुतींत तर नाहींच पण जुन्या स्मृतींतहि नाहीं. ही निषेधाची चाल आर्य नसून अनार्य असण्याचा संभव आहे. कुल आणि जाति यांच्या मधला एक समुच्चय एवढेंच त्याचें प्राचीन लक्षण दिसतें. रोमन जेन्स व भारतीय गोत्रें हीं दोन्हीं समूहांत विवाहनिषेध करणाऱ्या संस्था मागाहूनच बनल्या असाव्यात.

इंडोयूरोपीय लोकांच्या परिभ्रमणकालांत त्यांचा कोणत्याहि प्रदेशाशीं विशेष संबंध दृढ होऊन अमुक प्रदेशाबद्दल त्यांना पितृभूमीची भावना उत्पन्न झाली होती असें म्हणतां येणार नाहीं. जेव्हां ते स्थायिक होऊन शेतकी करूं लागले तेव्हांच त्यांच्या टोळींतील नायक होत ते राजे बनून अर्वाचीन राज्यव्यवस्थेचा उगम होऊं लागला असावा. वेदांत देखील लोकांनीं निवडल्यानंतर राजत्व प्राप्त होई.

**मूलगृहविषयक संशोधन व भिन्न भिन्न मतें**:— श्राडरच्या मताचें आणि त्यानें पुढें मांडलेल्या पुराव्याचें थोडक्यांत निरीक्षण झालें. मूलगृह शोधण्यासाठीं श्राडरची विचारपद्धति सामान्यतः येणेंप्रमाणें आहे. सर्वांस जें परिचित तें मूलगृहांतील आणि तें एकसमयावच्छेदें करून जेथें सांपडेल तें मूलगृहस्थान होय. सर्वांमध्यें ज्या गोष्टी सांपडतील त्यावरून मूलगृहकालीन सामाजिक स्थिति काढावयाची हेंहि या पद्धतीचें अंग आहे. श्राडरच्या संशोधनाची उपयुक्तता सहज दिसून येणारी आहे. तथापि सर्व ठिकाणीं सामान्य विकास होऊन उत्पन्न होणारी सरूपता मूलगृहीं होती असा समज होण्याची शक्यता विसरतां कामा नये. शिवाय मूलगृहाचा पत्ता या पद्धतीनें खास लागेल असें नाहीं. अनेक अनुभव एका ठिकाणीं उत्पन्न होतात आणि ते अनुभवहि असे असतात कीं ज्यामुळें भाषेंत शब्द उत्पन्न होतात. ते अनुभव देणारें स्थान मनुष्याच्या स्थानांतराच्या इतिहासांतील उत्तरकालीनहि असूं शकेल. इंडोयूरोपीय लोक वेगवेगळे होण्यापूर्वी किती भटकले हें कोणास ठाऊक आहे? ते पुष्कळच भटकले असतील आणि ही शक्यता असल्यामुळें श्राडरनें कल्पिलेलें जें मूलगृह आहे तें एका अर्थानें मूलगृह आणि दुसऱ्या अर्थानें उत्तरकालीन गृह समजणें अयुक्त होणार नाहीं. श्राडरनें मूलगृहकालविषयक विचार फारसा केला नाहीं.

मूलगृहविषयक व तत्कालविषयक विचार करतांना भोंवळ येइल अशा उचीवर नजर पोहोंचणारा ग्रंथकार कै. बाळ गंगाधर टिळक हा होय. त्यांची विचारपद्धति श्राडरच्या व इतर पाश्चात्य पंडितांच्या पद्धतीपेक्षां भिन्न आणि त्यांनीं जें साहित्य वापरलें तें श्राडरच्या साहित्यापेक्षा भिन्न प्रकारचें नाहीं. जो फरक आहे तो कल्पकतामूलक आणि वैदिक वाङ्मयांत अधिक खोल गेल्यामुळें उत्पन्न झालेला आहे.

**इंडोयूरोपीय किंवा इंडो-जर्मानिक अथवा आर्यन लोकांचें मूलगृह**—इंडो-यूरोपीय उर्फ आर्यन्, ज्याला कॉकेशियन वंश असेंहि म्हणतात त्या, मानववंशापासून निघालेल्या अनेक शाखा आज यूरोप व आशियांत पसरल्या आहेत असें भाषादि शास्त्राच्या तौलनिक अभ्यासानें सिद्ध झाल्यावर हा मूळ आर्यन् वंश शाखा फुटण्यापूर्वी कोठें राहात होता हा महत्त्वाचा प्रश्न उद्भवला. या प्रश्नासंबंधानें विविध मतें पुढें आलीं आहेत. त्यांत मुख्य मतें तीन आहेत. कांहीं विद्वान् मध्ययूरोप हें मूलगृह मानतात, तर कांहीं मध्यआशिया हें मूलगृह मानतात तिसरें सुप्रसिद्ध मत बा. गं. टिळक यांचें असून त्यांनीं उत्तरध्रुवप्रदेश हें आर्यांचें मूलगृह असें प्रतिपादन केलें आहे.

यासंबंधानें प्रथम आडॉल्फ पिक्टेट यानें १८५९ मध्यें आपलें मत पुढें मांडलें. आशियांतील बॅक्ट्रिया नामक प्रदेशांत मूळ आर्यन लोक राहात होते असें त्याचें म्हणणें आहे. मूलगृहाचा निश्चय करतांना ऋतुमानाचा पुरावा आधाराला घेण्यांत आला. इंडो-यूरोपीयांना हिंवाळा, वसंतऋतु व उन्हाळा हे फक्त तीन ऋतु माहीत होते. आपण जों जों उत्तरेकडे जातों तों तों तेथें फक्त उन्हाळा व हिंवाळा असे दोनच ऋतु असतात तर उलटपक्षीं दक्षिणेकडे तीन चार किंवा पांच ऋतूहि होतात. तेव्हां तीन ऋतु ज्या अक्षांशावर असतात अशा बॅक्ट्रिया देशांत ऑक्सस नदीनजीक मूलगृह असावें असें पिक्टेटचें म्हणणें आहे, या मताला पुष्टि म्हणून बॅक्ट्रियांतील आढळणारे खनिज पदार्थ वनस्पती व प्राणी इंडो-यूरोपीयांना माहीत होते असें त्यानें सिद्ध केलें आहे.

याच्या अगदीं उलट इंडो-यूरोपीय लोकांचें मूलगृह यूरोपमध्यें होतें असें लॅथम, बेनफी, व्हिटने, वगैरे विद्वानांनीं मत दिलें लॅथमचें म्हणणें असें कीं, संस्कृत भाषेचा लिथुस्लॅव्होनिक म्हणजे लिथुआनियन, स्लॅव्होनिक, लॅटिन, ग्रीक व जर्मन या भाषांशीं फार संबंध आहे म्हणून लिथु-स्लॅव्होनिक भाषांचा देश जो मध्ययूरोप तेथून संस्कृत भाषा बोलणारे लोक हिंदुस्थानाकडे आले असणें अधिक संभवनीय आहे एल्. गायजर यानें तर जर्मनी विशेषतः मध्य व पश्चिम जर्मनी हेंच इंडो-यूरोपीय लोकांचें मूलगृह होय असें प्रतिपादिलें, व त्यामुळें या मूळ आर्यवंशाला इंडो-जर्मानिक असें म्हणण्याचा प्रघात पडला. गायजरनें आपला पुरावा मुख्यतः तीन झाडाच्या नांवावर उभारला आहे. बर्च (सं.—भूर्ज) बीच व ओक हे तीन वृक्ष इंडो-यूरोपीयांस माहित होते व या तीन झाडांपैकीं बीच झाडाचें मूलस्थान प्रशियन बाल्टिक प्रदेशाच्या पश्चिम भागांत असल्यामुळें हा प्रदेशच इंडो-जर्मानिक लोकांचें मूलगृह होय. जे. जी. क्यूनोनें मध्ययूरोप (उरल पर्वतापासून अटलांटिक महासागरापर्यंतचा प्रदेश) विषयक मतालाच पुष्टि दिली. याप्रमाणें मध्य आशियावादी व मध्ययूरोपवादी अशा मूलगृहविषयक दोन पक्षामध्यें बरेच वर्षे झगडा चालू होता. या वादाचा निकाल कांहीं काळ मृगराज सिंह या प्राण्यावर अवलंबून राहिला. तो असा कीं, मूलगृहविषयक संस्कृतींतील लोकांना सिंह हा प्राणी माहीत होता हें भाषाविषयक पुराव्यानें सिद्ध झालें, पण मध्ययूरोपांत सिंह तर अलीकडे आढळत नाहीं. तेव्हां प्राचीन काळीं तेथें सिंह हा प्राणी राहात असे हें सप्रमाण सिद्ध होईपर्यंत मध्ययूरोपमतवाद लंगडा पडला. उलट मध्यआशियामतवादाला बळकटी येण्यास असें एक सबळ कारण एफ् होमेल (१८७८) यानीं पुढें मांडलें कीं, प्राचीन सेमिटिक लोकांचा व इंडोयूरोपीयांचा परस्पर दळणवळणाचा संबंध होता असें भाषाविषयक शब्दसाम्यावरून सिद्ध होत असल्यामुळें व प्राचीन काळीं सेमिटिक लोक पश्चिम आशियांत मेसापोटेमिया प्रांतांत राहात असल्यामुळें इंडो यूरोपीय लोक तेथें शेजारींच मध्यआशियांत राहात होते हें अधिक मान्य मानणें जरूर आहे. यानंतरहि कोणी दक्षिण यूरोप, कोणी पश्चिम रशिया (यूरोपीय) तर कोणी स्कांडिनेव्हिया याप्रमाणें यूरोपीय मूलगृह-मत पुढें मांडणारे विद्वान् निघाले. मध्यआशिया मतवादाच्या बाजूच्या विद्वानांपैकीं एक सुप्रसिद्ध संस्कृतज्ञ विद्वान म्हटला म्हणजे आपल्या विशेष परिचयाचे मॅक्स मुल्लर साहेब हे होत

याप्रमाणें मूलगृहविषयक वाद मध्य-आशिया व मध्य यूरोप यांच्यामध्यें हेलकावे खात बरीच वर्षे राहिला त्यांत विशेष गोष्ट ही कीं, मध्य आशियाविषयक मताचा पुरस्कार करणारे सर्व विद्वान यूरोपीयच होते. त्यामुळें स्वखंडाभिमानाचा आक्षेप घेऊन त्यांच्या प्रामाणिकपणावर शितोंडे उडविणें शक्य नव्हतें या अत्यंत महत्त्वाच्या व बिकट प्रश्नावर यूरोपीय विद्वानांत माजलेल्या रणकंदनांत कोणीहि भारतीयच काय पण आशियाटिक विद्वानहि १८९० पर्यंत उतरलेला आढळत नाहीं. प्रश्न मोठा गहन असून तौलनिक भाषाशास्त्र, गाथाशास्त्र, मानववंशशास्त्र वगैरे अनेक शास्त्रें जाणणाऱ्या अष्टपैलु विद्वानांखेरीज एकांगी विद्वत्ता असलेल्या इतरेजनांना या वादांत लुडबुड करणें शक्यच नव्हतें. त्यांतून प्रसंग पडला यूरोपीय विद्वानांबरोबर दोन हात करण्याचा. अशा अनेक बाजूंनीं अवघड होऊन बसलेल्या या वादांत १८९० च्या सुमारास सुप्रसिद्ध महाराष्ट्रीय विद्वद्वर बाळ गंगाधर टिळक यांनीं उडी घातली आणि प्रथम मूलगृहाच्या कालविषयक प्रश्नासंबंधानें 'ओरायन' नामक ग्रंथ १८९३ सालीं व नंतर मूलगृहाच्या स्थलविषयक प्रश्नासंबंधानें 'आर्टिक होम इन दि वेदाज' हा दुसरा ग्रंथ १९०३ सालीं प्रसिद्ध केला.

लोकमान्य टिळकांच्या या दोन ग्रंथांतील विषयासंबंधानें कांहींसा गैरसमज होण्याचा संभव आहे. त्याबद्दल स्पष्टीकरण केलें पाहिजे. पहिल्या ग्रंथाचें '

इंडोयूरोपीय लोक स्थाईक झाल्यानंतर व शेतकी करून राहू लागल्यामुळें जमीन वगैरे मालमत्ता झाल्यानंतर प्रचारात आली असावी. प्रारंभीं भ्रमण करीत फिरत असतांना इंडोयूरोपीय लोक हिंदूंच्या एकत्र कुटुंबपद्धतीप्रमाणें किंवा आयर्लंडमधील 'सेप्ट' प्रमाणें राहात असावे.

क्राउस याच्या म्हणण्याप्रमाणें असें कुटुंब म्हणजे पैतृक संबंधानें दोन तीन पिढ्यांपर्यंत बद्ध झालेल्या पुरुषांचें व स्त्रियांचें मिळून ५० । ६० माणसांचें असावें व गृहपति हा त्यांतील मुख्य समजला जात असे. मात्र रोमन लोकांतील पेटर फॅमिलिअस प्रमाणें त्याची सर्व कौटुंबिक मालमत्तेवर मालकी नसे, तर सर्व मालमत्ता सर्वांच्या समाईक मालकीची असे हे सर्व एकाच घरांत रहात असत. मध्ये अग्निशाला असून बाजूला यांच्या रहाण्याच्या जागा असत. जेवण एकत्र होत असे. पुरुष प्रथम जेवीत व स्त्रिया नंतर जेवीत असत.

ही स्थिति आजहि हिंदु कुटुंबांत आहे हें हिंदु वाचकास सांगावयास नकोच परंतु या चालीचे अवशेष ग्रीक व रोमन लोकांच्या प्राचीन चालींत दिसून येतात. ग्रीक लोकांत या चाली असल्याचीं अनेक उदाहरणें आढळतात. टयूटन लोकांत समारंभाच्या वेळीं पुरुष प्रथम जेवल्यानंतर स्त्रिया जेवण्याची चाल होती.

यावरून एकत्र कुटुंबाची पद्धति जुनी असून विभक्त कुटुंबाची पद्धति मागाहून पडली असावी असें दिसतें.

कुटुंब व जाति यांच्या मधली अवस्था आपणास अद्यापि दक्षिण स्लाव्ह लोकांत सांपडते. जेव्हां एका कुटुंबांतील भाऊबंद विभक्त होतात परंतु एकाच ठिकाणीं एकाच संघानें एकाच धर्माचें आचरण करून राहतात व सर्वांचा मिळून समाईक जमीनजुमला असतो तेव्हां दक्षिण स्लाव्ह लोकांत ब्रत्स्त्वो या नांवानें ओळखला जाणारा 'बांधवसंघ' निर्माण होतो. या संघाच्या आनुवंशिक परंपरा व पूर्वजांच्या कथा एकच असतात. यांतील मुख्य निवडला जातो, व तो लढाई किंवा तंटे करण्याच्या कामीं पुढारी समजला जातो व न्यायनिवाड्याचें काम तोच करितो.

ग्रीक 'फ्राट्री' व लॅटिन 'जेन्स' हेहि याच प्रकारचे संघ असावे. अशाच संघांचे पुढें क्लॅन बनून त्यांच्या 'ट्राइब्स' अथवा राष्ट्रजाती बनल्या असाव्या.

दक्षिण स्लाव्ह लोकांत प्रत्येक 'झूपा' (एकाच जातीनें व्यापलेला प्रदेश) मध्यें एक स्वसंरक्षणासाठीं किल्ल्यासारखी जागा बांधण्याची चाल असे. ही जागा म्हणजे त्यांच्या राजकीय सत्तेचें केंद्र असून धार्मिक गोष्टींचेंहि मुख्य स्थान असे. येथें त्यांच्या शिष्टांच्या बैठकी होत व लढाईच्या वेळीं त्यांच्या हालचालींचें केंद्र असे.

ब्रत्स्त्वो यांचें आणि गोत्रांचें स्वरूप एकसारखेंच आहे. ब्रत्स्त्वो हा जमीनीचें संरक्षण करणारा आणि तिजवर मालकी सांगणारा समूह होता. गो म्हणजे जमीन आणि त्र म्हणजे संरक्षण करणारा. गोत्रें या प्रथमतः समूहाच्या बाहेर लग्नें करण्यास भाग पाडणाऱ्या संस्था नव्हत्या. सगोत्र विवाहास निषेध श्रुतींत तर नाहींच पण जुन्या स्मृतींतहि नाहीं. हा निषेधाची चाल आर्य नसून अनार्य असण्याचा संभव आहे. कुल आणि जाति यांच्या मधला एक समुच्चय एवढेंच त्याचें प्राचीन लक्षण दिसतें. रोमन जेन्स व भारतीय गोत्रें हीं दोन्ही समूहांत विवाहनिषेध करणाऱ्या संस्था मागाहूनच बनल्या असाव्यात.

इंडोयूरोपीय लोकांच्या परिभ्रमणकालांत त्यांचा कोण त्याहि प्रदेशाशीं विशेष संबंध दृढ होऊन अमुक प्रदेशाबद्दल त्यांना पितृभूमीची भावना उत्पन्न झाली होती असें म्हणतां येणार नाहीं. जेव्हां ते स्थायिक होऊन शेतकी करूं लागले तेव्हांच त्यांच्या टोळींतील नायक होते ते राजे बनून अर्वाचीन राज्यव्यवस्थेचा उगम होऊं लागला असावा. वेदांत देखील लोकांनीं निवडल्यानंतर राजत्व प्राप्त होई.

**मूलगृहविषयक संशोधन व भिन्न भिन्न मतें.—**

श्राडरच्या मताचें आणि त्यानें पुढें मांडलेल्या पुराव्याचें थोडक्यांत निरीक्षण झालें. मूलगृह शोधण्यासाठीं श्राडरची विचारपद्धति सामान्यतः येणेंप्रमाणें आहे:- सर्वांस जे परिचित तें मूलगृहांतील आणि ते एकसमयावच्छेदें करून जेथें सांपडेल तें मूलगृहस्थान होय. सर्वांमध्यें ज्या गोष्टी सांपडतील त्यावरून मूलगृहकालीन सामाजिक स्थिति काढावयाची हेंहि या पद्धतीचें अंग आहे. श्राडरच्या संशोधनाची उपयुक्तता सहज दिसून येणारी आहे. तथापि सर्व ठिकाणीं सामान्य विकास होऊन उत्पन्न होणारी सरूपता मूलगृहीं होती असा समज होण्याची शक्यता विसरतां कामा नये. शिवाय मूलगृहाचा पत्ता या पद्धतीनें खास लागेल असें नाहीं. अनेक अनुभव एका ठिकाणीं उत्पन्न होतात आणि ते अनुभवहि असे असतात कीं ज्यामुळें भाषेंत शब्द उत्पन्न होतात. ते अनुभव देणारें स्थान मनुष्याच्या स्थानांतराच्या इतिहासांतील उत्तरकालीनहि असूं शकेल. इंडोयूरोपीय लोक वेगवेगळे होण्यापूर्वी किती भटकले हें कोणास ठाऊक आहे? ते पुष्कळच भटकले असतील आणि ही शक्यता असल्यामुळें श्राडरनें कल्पिलेलें जें मूलगृह आहे ते एका अर्थानें मूलगृह आणि दुसऱ्या अर्थानें उत्तरकालीन गृह समजणें अयुक्त होणार नाहीं. श्राडरनें मूलगृहकालविषयक विचार फारसा केला नाहीं.

मूलगृहविषयक व तत्कालविषयक विचार करतांना मोंवळ येईल अशा उंचीवर नेऊं पाहणारा ग्रंथकार कै. बाळ गंगाधर टिळक हा होय. यांची विचारपद्धति श्राडरच्या व इतर पाश्चात्य पंडितांच्या पद्धतींपेक्षा भिन्न आणि त्यांनीं जें साहित्य वापरलें तें श्राडरच्या साहित्यापेक्षा भिन्न प्रकारचें नाहीं. जो फरक आहे तो कल्पकतामूलक आणि वैदिक वाङ्मयांत अधिक खोल गेल्यामुळें उत्पन्न झालेला आहे.

**इंडोयूरोपीय किंवा इंडो-जर्मानिक अथवा आर्यन लोकांचें मूलगृह.**—इंडो-यूरोपीय उर्फ आर्यन्, ज्याला कॉकेशियन वंश असेंहि म्हणतात त्या, मानववंशापासून निघालेल्या अनेक शाखा आज यूरोप व आशियांत पसरल्या आहेत असें भाषादि शास्त्रांच्या तौलनिक अभ्यासानें सिद्ध झाल्यावर हा मूळ आर्यन् वंश शाखा फुटण्यापूर्वी कोठें राहात होता हा महत्त्वाचा प्रश्न उद्भवला. या प्रश्नासंबंधानें विविध मतें पुढें आलीं आहेत. त्यात मुख्य मतें तीन आहेत. कांहीं विद्वान् मध्ययूरोप हें मूलगृह मानतात. तर काहीं मध्यआशिया हें मूलगृह मानतात. तिसरें सुप्रसिद्ध मत बा. गं. टिळक यांचें असून त्यांनी उत्तरध्रुवप्रदेश हें आर्यांचें मूलगृह असें प्रतिपादन केलें आहे.

यासंबंधानें प्रथम आडॉल्फ पिक्टेट यानें १८५९ मध्यें आपलें मत पुढें मांडलें. आशियांतील बॅक्ट्रिया नामक प्रदेशात मूळ आर्यन लोक राहात होते असें त्याचें म्हणणें आहे. मूलगृहाचा निश्चय करतांना ऋतुमानाचा पुरावा आधाराला घेण्यांत आला. इंडो-यूरोपीयांना हिंवाळा, वसंतऋतु व उन्हाळा हे फक्त तीन ऋतु माहीत होते. आपण जों जों उत्तरेकडे जातों तों तों तेथें फक्त उन्हाळा व हिंवाळा असे दोनच ऋतु असतात तर उलटपक्षीं दक्षिणेकडे तीन चार किंवा पाच ऋतुहि होतात. तेव्हां तीन ऋतू ज्या अक्षांशावर असतात अशा बॅक्ट्रिया देशात ऑक्सस नदीनजीक मूलगृह असावें असें पिक्टेटचें म्हणणें आहे, या मताला पुष्टि म्हणून बॅक्ट्रियातील आढळणारे खनिज पदार्थ वनस्पती व प्राणी इंडो-यूरोपीयांना माहीत होते असें त्यानें सिद्ध केलें आहे.

यांच्या अगदीं उलट इंडो-यूरोपीय लोकांचें मूलगृह यूरोपमध्यें होतें असें लॅथॅम, बेनफी, व्हिटने, वगैरे विद्वानांनीं मत दिलें. लॅथॅमचें म्हणणें असें कीं, संस्कृत भाषेचा लिथूस्लॅव्होनिक म्हणजे लिथुआनियन, स्लॅव्होनिक, लॅटिन. ग्रीक व जर्मन या भाषांशीं फार संबंध आहे म्हणून लिथु-स्लॅव्होनिक भाषांचा देश जो मध्ययूरोप तेथून संस्कृत भाषा बोलणारे लोक हिंदुस्थानाकडे आले असणें अधिक संभवनीय आहे. एल्. गायजर यानें तर जर्मनी विशेषतः मध्य व पश्चिम जर्मनी हेंच इंडो-यूरोपीय लोकांचें मूलगृह होय असें प्रतिपादिलें, व त्यामुळें या मूळ आर्यवंशाला इंडो-जर्मानिक असें म्हणण्याचा प्रघात पडला. गायगरनें आपला पुरावा मुख्यतः तीन झाडाच्या नांवावर उभारला आहे. बर्च (सं.—भूर्ज) बीच व ओक हे तीन वृक्ष इंडो-यूरोपीयांस माहित होते व या तीन झाडांपैकीं बीच झाडाचें मूलस्थान प्रशियन बाल्टिक प्रदेशाच्या पश्चिम भागात असल्यामुळें हा प्रदेशच इंडो-जर्मानिक लोकांचें मूलगृह होय. जे. जी. क्यूनोनें मध्ययूरोप (उरल पर्वतापासून अटलांटिक महासागरापर्यंतचा प्रदेश) विषयक मताला पुष्टि दिली. याप्रमाणें मध्य आशियावादी व मध्ययूरोपवादी अशा मूलगृहविषयक दोन पक्षांमध्यें बरीच वर्षें झगडा चालू होता. या वादाचा निकाल कांहीं काळ मृगराज सिंह या प्राण्यावर अवलंबून राहिला. तो असा कीं, मूलगृहविषयक संस्कृतींतील लोकांना सिंह हा प्राणी माहीत होता हें भाषाविषयक पुराव्यानें सिद्ध झालें; पण मध्ययूरोपात सिंह तर अलीकडे आढळत नाहीं. तेव्हां प्राचीन काळीं तेथें सिंह हा प्राणी राहात असे हें सप्रमाण सिद्ध होईपर्यंत मध्ययूरोपमतवाद लंगडा पडला. उलट मध्यआशियामतवादाला बळकटी येण्यास असें एक सबळ कारण एफ्. होमेल (१८७८) यानीं पुढें मांडलें कीं, प्राचीन सेमिटिक लोकांचा व इंडोयूरोपीयांचा परस्पर दळणवळणाचा संबंध होता असें भाषाविषयक शब्दसाम्यावरून सिद्ध होत असल्यामुळें व प्राचीन काळीं सेमिटिक लोक पश्चिम आशियात मेसापोटेमिया प्रांतात राहात असल्यामुळें इंडो-यूरोपीय लोक तेथें शेजारींच मध्यआशियात राहात होते हें अधिक मान्य मानणें जरूर आहे. यानंतरहि कोणी दक्षिण यूरोप, कोणी पश्चिम रशिया (यूरोपीय) तर कोणी स्कांडिनेव्हिया याप्रमाणें यूरोपीय-मूलगृह-मत पुढें मांडणारे विद्वान् निघाले. मध्यआशिया मतवादाच्या बाजूच्या विद्वानांपैकीं एक सुप्रसिद्ध संस्कृतज्ञ विद्वान म्हटलें म्हणजे आपल्या विशेष परिचयाचे मॅक्स मुल्लर साहेब हे होत.

याप्रमाणें मूलगृहविषयक वाद मध्य-आशिया व मध्य यूरोप यांच्यामध्यें हेलकावे खात बरींच वर्षें राहिला. त्यात विशेष गोष्ट ही कीं, मध्य आशियाविषयक मताचा पुरस्कार करणारे सर्व विद्वान यूरोपीयच होते. त्यामुळें स्वखंडाभिमानाचा आक्षेप घेऊन त्यांच्या प्रामाणिकपणावर शिंतोडे उडविणें शक्य नव्हतें या अत्यंत महत्त्वाच्या व बिकट प्रश्नावर यूरोपीय विद्वानात माजलेल्या रणकंदनांत कोणीहि भारतीयच काय पण आशियाटिक विद्वानहि १८९० पर्यंत उतरलेला आढळत नाहीं. प्रश्न मोठा गहन असून तौलनिक भाषाशास्त्र, गाथाशास्त्र, मानववंशशास्त्र वगैरे अनेक शास्त्रें जाणणाऱ्या अष्टपैलु विद्वानांखेरीज एकांगी विद्वत्ता असलेल्या इतरेजनांना या वादात लुडबुड करणें शक्यच नव्हतें. त्यांतून प्रसंग पडला यूरोपीय विद्वानांबरोबर दोन हात करण्याचा. अशा अनेक बाजूंनीं अवघट होऊन बसलेल्या या वादात १८९० च्या सुमारास सुप्रसिद्ध महाराष्ट्रीय विद्वद्वर बाळ गंगाधर टिळक यानीं उडी घातली आणि प्रथम मूलगृहाच्या कालविषयक प्रश्नासंबंधानें 'ओरायन' नामक ग्रंथ १८९३ सालीं व नंतर मूलगृहाच्या स्थलविषयक प्रश्नासंबंधानें 'आर्टिक होम इन दि वेदाज' हा दुसरा ग्रंथ १९०३ सालीं प्रसिद्ध केला.

लोकमान्य टिळकांच्या या दोन ग्रंथातील विषयासंबंधानें कांहींसा गैरसमज होण्याचा संभव आहे, त्याबद्दल प्रथम स्पष्टीकरण केलें पाहिजे. पहिल्या ग्रंथाचें 'ओरायन' किंवा

'वेदकालनिर्णय' असें व दुसऱ्या ग्रंथाचें (वेदकर्त्या) 'आर्यांचें वसतिस्थान' असें नाव दिलेलें केळकरकृत टिळक चरित्रांत व इतर ठिकाणीं आढळतें. अशा प्रकारच्या शब्दयोजनेवरून वेद म्हणजे विशेषतः सर्वांत जुना जो ऋग्वेदसंहिताग्रंथ तो ख्रि. पू. ४००० वर्षांच्या सुमारास रचला गेला व त्याचे कर्ते ऋषी उत्तरध्रुवाजवळ राहत होते, असा समज होण्याचा संभव आहे. वास्तविक पाहतां ऋग्वेदसंहिता या ग्रंथाची जुळणी भरतखंडातच व ती कुरुयुद्धकालाच्या सुमारास म्हणजे अजमासें ख्रि. पू. २००० ते ३००० च्या दरम्यान झालेली आहे. टिळकानीं जें ठरविलें तें हें कीं, वसंतसंपात कृत्तिकानक्षत्रात होता असा जो प्राचीन काल तत्संबंधाच्या आठवणी भारतीय आर्यांनीं आपल्या ऋग्वेदसंहिता ग्रंथात ग्रथित करून ठेविल्या आहेत. म्हणजे वेदकर्त्या आर्यांची पूर्वजपरंपरा ख्रि. पू. ४००० वर्षांच्या पलीकडेहि जाऊं शकते, आणि हे वेदकर्त्या आर्यांचे जे पूर्वज ते उत्तरध्रुवानजीक राहात होते, आणि या भारतीय आर्यांचे पूर्वज आणि यूरोपीय आर्यांचे पूर्वज प्राचीनतर काळीं एकत्र राहत होते असें सिद्ध झाले असल्यामुळें या इंडो-यूरोपीय लोकाचा एकत्र वसतिकाल ख्रि. पू. ४००० वर्षांपूर्वीचा असून त्याचें एकत्र वसतिस्थान उत्तरध्रुव हें होय. अशा रीतीनें मूलगृहाचा काल व स्थल दोन्हींहि प्रश्नाबद्दल फार धाडसीपणाचे वाटणारे सिद्धात टिळकानीं आपल्या उपर्युक्त दोन ग्रंथात १९०० च्या सुमारास पुढें मांडून यूरोप खंडातील विद्वानाचें लक्ष आधुनिक भारतीय विद्वत्तेकडे जोरानें खेचलें.

यापूर्वी वेदकालनिर्णयासंबंधाच्या विषयाची बरीचशी माहिती ज्ञानकोशाच्या दुसऱ्या विभागात (पृष्ठ१८६) दिली आहे. त्यावरून मूलगृहकालविषयक प्रश्नाशीं वाचकाना परिचय करून घेता येईल. आता टिळकानीं मूलगृहस्थलविषयक जी उत्तरध्रुवोपपत्ति पुढें मांडली तिचा तात्पर्यार्थ येथें थोडक्यात देऊन हें इंडोयूरोपीय अथवा मूळ आर्यवंशाच्या माहितीचें प्रकरण संपवूं.

"'आर्यांचें वसतिस्थान' या पुस्तकाची कल्पना ओरायनप्रमाणें ज्योतिःशास्त्रावर अवलंबून नाहीं. तें शास्त्र स्वतः टिळकाच्या पूर्ण परिचयाचें असल्यामुळें त्यानां त्यात स्वतंत्र विचार करितां येत होता. पण या दुसऱ्या पुस्तकाचे कांहीं आधारभूत असे काही सिद्धात भूगर्भशास्त्रावरून घेतलेले असल्यामुळें या बाबतींत टिळकाना काहींसें परावलंबी व्हावें लागलें. या विषयावरील अनेक पुस्तकें त्यांनीं वाचलीं व टिपणें केलीं. पण त्यांवरून निष्कर्षभूत असा सिद्धांत मांडताना केवळ अज्ञ नसले तरी अतज्ज्ञ म्हणून टिळकाना प्रथम आत्मविश्वास पटेना. वास्तविक या नव्या दिवसात प्रत्येक विषयातील उपांगाचा अभ्यास करून तीहि सगळ सवळ शास्त्रें बनलेलीं असतात. शिवाय एका विषयाचें अध्ययन करणाऱ्याला, त्याच्या बरोबरीच्या इतर सगहोदर शास्त्र विषयातून, केव्हां केव्हां माहिती समजावून घ्यावी लागते. सुदैवानें पाश्चात्य विद्यापीठातून अनेक शास्त्रांचे पंडित एकत्र कार्य करीत असतात; यामुळें एकाला दुसऱ्याची मदत घेणें सोपें जातें. पण हिंदुस्थानांत तशी व्यवस्था नाहीं. यामुळें टिळकाना मोठी अडचण पडली. तथापि स्वतः भूगर्भशास्त्री नसताहि केवळ या विषयावरील पुस्तकें वाचून जीं प्रमेयें त्यानीं बनविलीं त्यात कोणी फारशा चुका काढलेल्या नाहींत पण त्याच्या या ग्रंथातील वादाचा मुख्य विषयहि तो नसून, वेदातील काहीं ऋचाचा जो अर्थ त्यानीं बनविला व आर्यांचें मूल वसतिस्थान उत्तरध्रुवाजवळ होतें असें ठरविलें त्या अर्थासंबंधींच होता

"उत्तरध्रुवाजवळील प्रदेश ख्रिस्तशकापूर्वी आठ हजार वर्षें वसति करून राहण्याला योग्य होता हें शास्त्रज्ञानी ठरविलें. पण तेथें कोणी लोक प्रत्यक्ष रहात होते कीं नाहीं याविषयी स्पष्टनिर्णयाचीं जीं साधनें त्यानां भूस्तरशास्त्रात मिळालीं नाहींत तीं ऋग्वेदात टिळकाना आढळलीं. अर्थात् उत्तरध्रुवाजवळच्या प्रातातील निसर्गसिद्ध देखाव्याचें वर्णन जर ऋग्वेदात सापडतें, तर ऋग्वेद लिहिणारे किंवा त्याचे पूर्वज हे सदर देखावे दृष्टीस पडण्यासारख्या ठिकाणींच कोठेंतरी रहात असावे, असें अनुमान टिळकानीं काढलें. या कल्पनेनें आर्यांच्या मूल वसतिस्थानावर जसा प्रकाश पडला तसाच ऋग्वेदाच्या कांहीं ऋचाचा जो अर्थ पूर्वी लागत नव्हता, अथवा भाष्यकार किंवा निरुक्तकार यानी लाविला पण मनास पटण्यासारखा नव्हता, तो चागला लागण्यालाहि मदत झाली. टिळक म्हणतात, ही कल्पना माझे मनांत येऊन पुष्कळ दिवस झाले, पण भूगर्भशास्त्राची मदत मिळाल्याशिवाय सगळा ठाम वाटणारा सिद्धान्त बोलून दाखविण्याचें धैर्य होईना. इराणी वेदपंडितानाहि ही कल्पना सुचली होती पण हिमकाल संपून ध्रुवसंनिध प्रदेश वसतिक्षम झाला होता ही गोष्ट चाळिसपन्नास वर्षांपूर्वी शास्त्रसिद्ध ठरली नव्हती म्हणून त्यानांहि आपली कल्पना प्रगट करण्याचें धैर्य झालें नाहीं. पाश्चात्य पंडिताना स्वकीयानीं ठरविलेले भूगर्भशास्त्रविषयक नवे सिद्धात पटण्यास अभिमानाची अडचण नव्हती पण वेदकाल हा त्याच सिद्धान्तावरून इतका जुना ठरतो या गोष्टीबद्दल त्याना अभिमान किंवा उत्साह का वाटावा! टिळकाचे सिद्धान्त काहीं पाश्चात्य पंडिताप्रमाणें हिंदुस्थानांतील पंडितासहि मान्य झाले नाहींत; पण याचेंहि कारण अभिमान, मात्र उलटा अभिमान, इतकेंच काय तें. हिंदी आर्यांचा वेदकाल आमच्या किंवा आम्हास माहीत असलेल्या संस्कृतीपेक्षा जुना कसा ठरेल असें पाश्चात्य पंडितांनी म्हणावें; आणि टिळकांच्या विचारसरणीनें वेदकाल प्राचीन ठरत असला तरी आमचे आर्य लोक भरतभूमीतलेच स्वयंभू आहेत, ते काय म्हणून बाहेरून आले असतील, असें हिंदी पंडितांना वाटावें। पण तें कसेंहि असो, डॉ. वॉरन यांसारखे कांहीं थोडे पाश्चात्य पंडित व टिळक यांनी मिळून

आर्यवंशाचा, किंवा निदान आदिमानववंशाचा पाळणा कॉकेशस पर्वताच्या शिखरावरून उचलून उत्तरध्रुवाच्या कडील अडकविला सरा! अजूनहि यांत वादचीजें अनेक राहिलेलीं आहेत. तथापि जुन्या संकुचित कल्पनांना टिळकांच्या या प्रमेयानें जोराचा धक्का दिला गेला यांत शंका नाहीं.

"टिळकांच्या या ग्रंथाचे एकंदर तेरा भाग आहेत, पहिल्या भागांत टिळकांनीं सामान्यतः असें दर्शविलें आहे कीं, इतिहासकालाची मर्यादा शास्त्रीय शोधापूर्वी फार अलीकडे पडत होती ती पुष्कळच मागें जाऊन, आपणास पूर्वी अर्थ कळत नव्हता म्हणून ज्या गोष्टी आपण पौराणिक किंवा काल्पनिक मानीत होतों त्या या शोधानंतर आतां ऐतिहासिक व सत्यस्वरूपाच्या सहजच वाटूं लागल्या आहेत. भौतिक शास्त्रप्रगतीमुळें गाथाशास्त्राची हानि झाली, पण उलट इतिहासशास्त्र अधिक पुष्ट झालें, मिळून खरी हानि कांहीं नाहीं. दुसऱ्या प्रकरणांत ऋतुपर्याय होण्याचें कारण समजून सांगितलेलें असून, प्राचीन व अर्वाचीन युगांत पृथ्वीच्या निरनिराळ्या भागांवरील हवेंत फेरफार कसे झाले, ध्रुवप्रदेशांतहि एक वेळ हवा उष्ण कशी होती, हवा थंड थंड होत जाऊन अखेर बर्फाचा पूर आल्यानें एखादा प्रदेश मनुष्यवस्तीला निरुपयोगी कसा होतो, पण फिरून कांहीं कालानें बर्फ वितळून तेथील हवा सौम्य व नंतर समशीतोष्ण होऊन फिरून ती कशी उष्ण होऊं लागते वगैरे गोष्टींचें वर्णन दिलें आहे. आणि इतकेंच सिद्ध केलें आहे कीं, ऋग्वेदांतील कांहीं सृष्टिवर्णनावरून ध्रुवसंनिध प्रदेशांत मनुष्यवस्ती असल्याची कल्पना कोणास सुचली व ती त्यानें स्वीकारली तर ती गोष्ट नवीन शास्त्रसंशोधनानें अशक्य ठरत नाहींच पण उलट तिचें समर्थनहि होऊं शकतें. तिसऱ्या प्रकरणांत ध्रुव प्रदेशाचें वर्णन दिलें आहे. तेथें थंड उन्हाळे व गरम हिंवाळे म्हणजे अक्षय वसंतऋतु अगदीं अलीकडच्या हिमप्रलयापूर्वी होता; तेथें सूर्य दक्षिणेस उगवतो, तारका उगवत नाहींत किंवा मावळतहि नाहींत, तर वाटोळ्या फिरून चोवीस तासांत एक प्रदक्षिणा करितात, सहा महिन्यांचा एक अखंड दिवस व सहा महिन्यांचा एक अखंड रात्र मिळून वर्ष होतें, तेथें सूर्य वर्षांतून एकदांच उगवतो व एकदांच मावळतो म्हणून वर्षांतून एकच खरी सकाळ व एकच खरी संध्याकाळ असते व संध्याप्रकाशहि दोन दोन महिने टिकून फक्त पूर्वेस किंवा फक्त पश्चिमेस असा न दिसतां क्षितिजावर वाटोळ्या प्रदक्षिणा करितो, तेथें उषःकाल अतिशय रम्य असतो व कित्येक दिवसपर्यंत एकसारखा टिकतो, हें वर्णन देऊन यापैकीं वेदांत काय सांपडतें तें पाहण्याविषयीं एकप्रकारची प्रस्तावना टिळकांनीं केली आहे. चौथ्या प्रकरणांत, ऋग्वेदामध्यें वर वर्णन केलेल्या ध्रुवविशिष्ट गोष्टींपैकीं सहा महिन्यांची रात्र व सहा महिन्यांचा दिवस म्हणतात, देवयान–पितृयान यांचा संबंध संवत्सराच्या प्राचीन विभागाशीं असावा; आणि आर्यसंस्कृतीशीं समांतर असलेली इराणी संस्कृति व समकालीन इराणी वेदग्रंथ यांतच काय, पण ग्रीक, नॉर्स, जर्मन वगैरे लोकांच्या पौराणिक कथांतहि देवांची रात्र व देवांचा दिवस या कल्पना आढळतात, म्हणून त्या सार्थ व साधार असल्या पाहिजेत असें अनुमान काढलें आहे. पांचव्या प्रकरणांत वैदिक उषःकालाचें सविस्तर विवेचन केलेलें असून वेदग्रंथांतील उषावर्णनपर प्रत्यक्ष वाक्यें व ऋचा पुराव्यादाखल दिल्या आहेत. सहाव्या प्रकरणांत दीर्घ रात्र व दीर्घ दिवस यांचें वैदिक आधारासह विवेचन असून सातव्यांत मास आणि ऋतु यांचें विवेचन करून असें दाखविलें आहे कीं, पूर्वी केव्हांतरी वर्षमान सात महिन्यांचें किंवा दहा महिन्यांचें म्हणजे तुटकें मासांत, पांच ऋतूंचें वर्ष होत असे, व हीं वर्णनें म्हणजे निव्वळ कांहींतरी पौराणिक कथा अशी जी समजूत आजवर होती ती खरी नसून तें ऐतिहासिक सत्य होय, आणि हें सत्य ध्रुवसंनिध वसती करणाऱ्या लोकांच्याच अनुभवास यावयाचें अशी अनुमानाची सांखळी टिळकांनीं बांधली आहे. आठव्या प्रकरणांत दहा महिन्यांच्या वर्षाची कल्पना सिद्ध करण्याकरितां "गवाम् अयन" सारख्या सत्रसमारंभाच परीक्षण कसें उपयोगी पडतें हें दाखविलें आहे. हें यज्ञसत्र दहा महिन्यांतहि संपत असे, रोमन लोकांत एकवेळ ३०४ दिवसांच्या वर्षाची कल्पना होती, 'गवाम्' शब्दाचा दिवस असा अर्थ कसा होतो, व दिवस कमी पडल्यानें वृत्रानें गाई चोरल्याच्या कथेसारख्या कथा निर्माण होऊं शकतात, इतर अनेक सत्रांची वर्षमानावर केलेली रचना धर्माचार व ज्योतिर्गणित यांचा आर्य लोकांच्या अनुभवातला संबंध न कळल्यानें यूरोपियन पंडितांना आर्य धर्मग्रंथ समजण्यास अडचण कशी पडली व ध्रुवसंनिध दिसणाऱ्या अद्भुत चमत्कारावरून अद्भुत पौराणिक कथा कशा बनविल्या गेल्या वगैरे गोष्टींची चर्चा केली आहे. नवव्या प्रकरणांत अनेक गूढ वैदिक कथा घेऊन विशेषतः इंद्र व वृत्र यांच्या चिरकालिक युद्धाची कथा घेऊन ती ध्रुवासंनिध वसतीच्या उपपत्तीचें ग्रहण केल्यास सर्व सुसंगत कशी लागते हेंच मुख्यतः दाखविलें आहे. इंद्रवृत्रयुद्धाचें मूळ ढग, पाऊस, वादळ अशा अंतरिक्षांतील चमत्कारांतहि नसून अखंड काळोखाची दीर्घ रात्र पडणें व त्या रात्रीनंतर दीर्घ प्रकाश येणें या देखाव्यांत आहे, व ज्या अर्थी हे देखावे फक्त उत्तरध्रुवाजवळ दिसतात त्या अर्थी या पौराणिक कथेचा जन्म ध्रुवसंनिध घेतलेल्या अनुभवांतच आहे असें टिळकांनीं दाखविलें आहे. दहाव्या प्रकरणांत हीच विचारसरणी पुढें चालवून वैदिक कथांतर्गत प्रातःकालिक देवता, विष्णूचा त्रिपादविक्रम, वेदांतील सप्तमूल–दशमूल विभाग, दाशराज्ञ युद्ध, दशमुख रावण वगैरे कल्पनांचा उलगडा केला आहे. अकराव्या प्रकरणांत इराणी वेद जो झेंदावेस्ता त्यांतील याच विचारपरंपरेस पोषक अशीं प्रमाणें दाख-

विली असून बाराव्या प्रकरणात तुलनात्मक गाथाशास्त्राच्या आधारें पाश्चात्य पुराणकथांचाहि वैदिक प्रमाणानाच दुजोरा कसा मिळतो हें दाखविलें आहे आणि शेवटचें म्हणजे तेरावें प्रकरण समारोपाच्या स्वरूपाचें असून त्यात पूर्वीच्या सर्व प्रमाणांचा एकत्र विचार करून ध्रुवाजवळील वसतिस्थानाचा काल खिस्तशकापूर्वी आठ हजार वर्षांपलीकडचा ठरतो, अशा प्राचीन काळीं ध्रुवसन्निध राहणाऱ्या आर्य लोकांची संस्कृति श्रेष्ठ व जुनी ठरते, आर्य जातीचें व आर्य धर्माचें मूळ इतक्या प्राचीन काळात घुसलेलें असल्यामुळे त्याविषयींचीं अनुमाने स्थूलच करीं असूं शकतात, तरी पण वेदोत्पत्ति व वेदस्वरूप याविषयीं आपले ऋषी व आचार्य यानीं जीं मतें प्रदर्शित केली आहेत तींहि खरीं कशीं ठरतात, भूगर्भशास्त्रातील प्रलय व प्रलयोत्तर फिरून जीवसृष्टीचा उदय या गोष्टींनीं प्रलयकाळीं वेद नष्ट होऊन फिरून शब्दशः नसले तरी अर्थशः पुनर्जन्म पावणें आणि याच कारणानें वेदाचें अनादित्व मानणें लक्षणेन कसें सिद्ध होतें वगैरे गोष्टी सांगितल्या आहेत (लो टिळक चरित्र पूर्वार्ध, पृ.३३०--३५)

टिळकांच्या ग्रंथावर कित्येक यूरोपीय विद्वानांनीं अभिप्राय दिले आहेत व एक दोन महाराष्ट्रीय विद्वानांनीं टीका केला आहे. त्यापैकीं रा. नारायण भवानराव पावगी यांची टीका विशेष महत्त्वाची आहे, कारण त्यानीं 'आर्यावर्त हीच आर्यांची जन्मभूमि' या नावाचें स्वतंत्र पुस्तक लिहून टिळकांच्या मताला काहींशीं विरोधी अशी एक निराळीच उपपत्ति पुढें माडली आहे. आर्य लोक बाहेरून म्हणजे उत्तरध्रुवाकडून दक्षिणेकडे उतरत उतरत स्वारी हिंदुस्थानात आले, म्हणजे आर्य हे बाह्य आहेत हा गोष्टच पावगी यास मान्य नाहीं त्याचें असें म्हणणें आहे कीं आर्यवंशाचा उद्गम मूळ आर्यावर्तातच (भरतखंडाला) आणि नंतर आर्य वंशाच्या कांहीं टोळ्या दिग्विजय करीत करीत उत्तर ध्रुवापर्यंत गेल्या. आर्यांची मूळ जन्मभूमि आर्यावर्तच होय हे सिद्ध करण्याकरिता आद्य मानवोत्पत्तीला आर्यावर्त ही भूमि भूशास्त्रदृष्ट्या लायक होती, अशा तऱ्हेचीं काहीं पाश्चात्य विद्वानांचीं मतेंहि त्यानीं आधाराकरिता आपल्या पुस्तकात दिलीं आहेत शिवाय अग्नीची प्रथम सिद्धता आर्यावर्तात, प्रथममेघोदकवृष्टीचें स्थान आर्यावर्त, प्रथम प्रकाशस्थान आर्यावर्त, गोमवल्लीचें उत्पत्तिस्थान आर्यावर्त वगैरे प्रमाणें वैदिक ऋचांच्या सहाय्यानें त्यानीं पुढें माडलीं आहेत. परंतु प्रकाश(गा) प्रथम आम्हाग दिसला, पहिली मलवृष्टि आर्यावर्तात झाली इ. विधानें वैदिक ऋचातील शब्दें घेऊन सिद्ध करूं पाहणाऱ्या पावगी यांच्या विचाराचें विधान हेंच त्याचें खंडण होय. मनुष्यजातीची किंवा चेतन्याची उत्पत्ति हिंदुस्थानात झाली हे दाखविण्यासाठीं कोणत्या प्रकारचा पुरावा दिला पाहिजे याची या सात्त्विक भाग्यणाला कल्पनाहि नसावी असे दिसतें. आसन्नायानें पूर्ण गपार आहे असें सिद्ध करूं पाहणाऱ्या प्राचीन व अर्वाचीन कोशाप्रमाणें मनोरंजक म्हणून पावगी याचें "आर्यावर्तिक होम ॲन्ड आर्टिक कॉलनीज" हें पुस्तक वाचण्यास हरकत नाहीं. परागंदा झालेल्या लोकाच्या लेखाचा परिणाम राष्ट्रांतील ग्रंथाच्या अंगावर आणि आठवणीवर कसा होतो हें कळत नाहीं उत्तरध्रुवाजवळ जाऊन वसाहत करण्याचा हेतु आणि परत येण्याचीं कारणें यावर पावगी काहींच सांगत नाहींत. वसाहत करण्यास जाऊन राहिल्यानंतर परत येईपर्यंत त्यानीं भाषा व संस्कृति बदलली नसेल काय, याविषयीं पावगींनीं विचार केला नाहीं असो

याप्रमाणें मूलगृहकालीन संस्कृतीचें व मूल स्थानाबद्दलचें आनुमानिक ज्ञान आतापर्यंत पुढें आलें आहे. मूलस्थानाबद्दलच्या वादाचा अद्यापि निश्चित निकाल लागला नाहीं व कदाचित तो प्रश्न यापुढेंहि बराच कालपावेतों अनिश्चितच राहील असा संभव दिसतो. तथापि या वादामध्यें पाश्चात्य विद्वानांची प्रवृत्ति मूलस्थान पश्चिमेकडे म्हणजे यूरोपात असावें असा सिद्धान्त प्रस्थापित करण्याकडे असते तर इकडील पंडितांची प्रवृत्ति तें शक्य तितकें पूर्वेकड हिंदुस्थानापर्यंत आणण्याकडे असते. असो आता यानंतरच्या संस्कृतीच्या दुसऱ्या कालखंडाकडे म्हणजे पर्शुभारतीय संस्कृतीकडे वळू.

---

## प्रकरण ८ वें.

### पर्शुभारतीय संस्कृति.

मागील प्रकरणात इंडोयूरोपीय ऊर्फ मूलगृहकालीन संस्कृतीबद्दल विवेचन केलें आहे आर्यन् लोक ज्या ठिकाणीं एकत्र रहात होते त्या ठिकाणची व तत्कालीन संस्कृति कशी काय होती हें त्यावरून बरेंचसें अवगमिता येण्यासारखें आहे. काहीं काळानें आर्यन लोकांच्या निरनिराळ्या शाखा निरनिराळ्या प्रदेशात परिभ्रमण करीत गेल्या. त्यापैकीं एक शाखा काहीं काळ सध्यां इराणच्या प्रदेशात स्थायिक होऊन राहिली होती व या लोकांपैकींच काहीं लोक परिभ्रमणवृत्ति आचरीत पूर्वेकडे पुढें येऊन आर्यावर्तात वसाहत करून राहिले हे जे आर्यावर्तात वसाहत करून स्थायिक झालेले लोक त्यातच आपले वेदभाषी पूर्वज होते. ते आर्यावर्तात येण्यापूर्वी काहीं आर्यन्‌पूर्वी इकडे आले होतेच त्यांच्याशी या वेदभाषी आर्य लोकांनीं युद्धें करून त्यास पंजाबातून पूर्वेकडे हाकून लाविलें, आणि सरस्वतीनाजीं यज्ञयाग करून राहूं लागले व वेदांची रचना करून व यज्ञयागादिकांनीं त्यानीं आपल्या संस्कृतीचा प्रसार भरतखंडात केला. पण ज्यांस आजच्या इराण्यांचे पूर्वज कोणत्यातरी प्रदेशात काहीं काळ वेदभाषी लोकांच्या पूर्वजांसह राहिले होते तेथेंहि एका विशिष्ट संस्कृतीचें संवर्धन झालें होतें त्या संस्कृतीस पर्शुभारतीय (इंडोइराणियन) संस्कृति व त्या काळास पर्शुभारतीय काळ असें म्हणतात.



डेल्फायचें देऊळ.

मध्यभागीं मुख्य देऊळ असून त्यामागें डाव्या बाजूस नाटकगृह व पुढील भागांत निरनिराळ्या ग्रीक संस्थानचीं उपायनगृहें आहेत. देवालयाच्या मागील देखावा पार्नासस डोंगराचा आहे.



फिडिअसनें केलेल्या ऑलिंपिअन झूसची ऊर्ध्वांगप्रतिमा.



होमर-कॅपिटॉल मधील उर्ध्वांग प्रतिमा.

उ. भा. ९२ व्या पृष्ठा समोर.

या संस्कृतीचें ज्ञान आपणास पारशी धर्मग्रंथ झेंद अवेस्ता यांची वेदांशी तुलना केली असता मिळतें. आर्यांचे पारशी हे तत्कालीन इराणात स्थायिक झालेल्या पर्शूंचे वंशज होत. यांची एक टोळी सुदास राजास साहाय्य करण्याकरितां त्याबरोबर पृथूंसहित भरतखंडांत आली होतीच. पारशी लोकांच्या धर्मग्रंथाची भाषा वैदिक भाषेशीं अगदीं निकटची दिसते. त्याप्रमाणेंच त्यांच्या यज्ञयागादि धर्मविधींतहि बरेंच साम्य आहे सोमाचें हवन करणें हा धर्म दोघांतहि आढळतो. यामुळें वैदिक लोकांचे व पारशी लोकांचे पूर्वज एका काळीं एका ठिकाणीं रहात असावे व एकाच संस्कृतीचे असावे याबद्दल शंका रहात नाहीं

या संस्कृतीसंबंधीं आनुमानिक माहिती आजपर्यंत बरीच उपलब्ध झालेली आहे. या अनुमानाचें मुख्य साधन म्हणजे त्यांच्या भाषेंतील शब्द हे होत. तेव्हां त्यांच्या भाषेंतील संस्कृत भाषेशीं जुळणारे जे शब्द आहेत त्यांची संस्कृत सदृश शब्द व मराठी अर्थ यांसह यादी पुढें दिली आहे ती-वरून त्यांच्या संस्कृतीची बरीचशी कल्पना येईल.

यांखेरीज काहीं संशोधकांच्या संशोधनाचें फलहि पुढें दिलें आहे.

**पुराव्यांचें विविधत्व आणि त्यांची संगति लावण्यांत अडचणी**—इंडोयूरोपीय शाखेच्या सर्व लोकांसंबधानें कोथ यास असा एक चमत्कारिक प्रकार दिसून येतो कीं या शाखेंतील कोणत्याहि लोकांनीं स्वतः करतां स्वतःच्या कल्पनेनें लिपी तयार केलेली नाहीं, तर इतर लोकांनीं आपल्या अकलेनें ठरविलेल्या वर्णमाला यांनीं आयत्या ग्रहण केल्या. शिवाय यापेक्षाहूनहि अधिक चमत्कार असा कीं, लेखनकला अवगत असलेल्या लोकांशीं या इंडो-यूरोपीयांचा प्रत्यक्ष संबंध सुरू झाल्यावरहि त्या कलेचा उपयोग करून घेण्याच्या विरुद्धच ते प्रथम असत, ही गोष्ट इराण व हिंदुस्थान या दोन देशांतच दिसून येते, असें नाहीं तर ग्रीसमध्यें सुद्धां खिस्तपूर्व १८०० च्या सुमारापासून एक प्रकारची रेषामय लिपी अस्तित्वांत असूनहि त्या देशावर स्वारी करणाऱ्या ग्रीक, आयोनियन, एकियन व डोरियन यांपैकीं कोणत्याहि लोकांनीं वरील लिपीचा तावडतोब स्वीकार केला नाहीं, तर अक्षर लिपिप्रसाराचा मान फिनिशियन लोकांनीं मिळविला आणि त्या लिपीपासूनच इतरांची ग्रीक लिपी निघालेली आहे.इंडो-यूरोपीयांस त्यांच्या मतें कमीपणा आणणारी ही एक गोष्ट आहे व तिच्याबरोबर दुसरी कमीपणाची गोष्ट म्हणजे ऐतिहासिक स्वरूपाच्या ग्रंथांचा अभाव ही होय. या उणीवीमुळें या राष्ट्राच्या उन्नतीचा इतिहास भयंकर अज्ञानांधकारांत लोपून गेला आहे. कालगणनापद्धति शोधून काढण्याचा पहिला मान इजिप्त राष्ट्राला आहे भारतीय लिपिज्ञान पाचव्या विभागांत विवेचिलें आहे(पृ.५१).

**ऐतिहासिक व्यक्तींच्या दंतकथांची किंमत**—ऐतिहासिक पुरुषासंबंधाच्या केवळ दंतकथा विश्वास ठेवण्यास किती अल्पतेनें पात्र असतात, ही गोष्ट इजिप्तच्या उदाहरणावरूनच चांगली सिद्ध झाली आहे. हिरोडोटस व मॅनेथो यांनीं इजिप्तच्या प्राचीन इतिहासासंबंधानें जी माहिती दिलेली आहे तिच्यावरून, पूर्वकालीन थोर पुरुषासंबंधानें लोकांमध्यें हरएक प्रकारच्या केवळ तोंडी गोष्टी कशा प्रचलित होत जातात, हें चांगलें सिद्ध झालें आहे. आणि सुदैवानें मूळ अस्सल स्मारकलेख अलीकडील संशोधनांत उपलब्ध झाले म्हणून बरें झालें, नाहीं तर इजिप्तच्या इतिहासाचें आपलें ज्ञान म्हणजे एक भयंकर चुकांचा संग्रहच होणार होता ग्रीसच्या दंतकथात्मक इतिहासांतूनहि काहीं विश्वसनीय निश्चित माहिती कित्येक पिढ्यांतील विद्वानांना आपली सर्व अक्कल खर्च करून काढतां आली नाहीं, याबद्दल इजिप्तच्या उदाहरणामुळें आतां फारसें आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं केवळ दंतकथावरून निश्चित अनुमानें काढण्याची जी पद्धत आहे तिच्याविरुद्ध तात्त्विकदृष्ट्या जे आक्षेप घेण्यांत येत असतात त्या आक्षेपांना, क्रीटबेटांत जमीनींतून खणून काढलेल्या वस्तूंवरून प्राचीनकाळीं अस्तित्वांत असलेल्या एका अनपेक्षित संस्कृतीचा शोध लागल्यामुळें, फार बळकटी येऊन दंतकथामूलक सिद्धान्तावरील आक्षेपाचें खंडण करणें त्यामुळें अशक्य झालें आहे. हिंदुस्थानचे बाबतींत वरील दंतकथावलंबी अनुमानपद्धति स्वीकारणें ग्रीसपेक्षाहि अधिक धोक्याचें आहे कारण येथील रामायणमहाकाव्य हाच सर्वांत जुना लेखी ग्रंथ होय आणि ज्या आख्यायिकावरून अनुमानें काढण्याचा विद्वान लोकांनीं हल्लीं उद्योग चालविला आहे त्या आख्यायिका ग्रथित करणारे ग्रंथ म्हणजे महाकाव्यें व पुराणें हे अलीकडील असून त्यांचा काल अद्याप अनिश्चित आहे. शिवाय ती अनुमानपद्धति अग्राह्य असल्याचें आतां ठरलें आहे.मात्र सुदैवानें वरील विचार हिंदुस्थानचे बाबतींत फारसे महत्त्वाचे नाहींत, कारण त्यांनीं वेदकालीन धार्मिक वाङ्मयाचा बिनचुक पौर्वापर्य विषयक कालनिर्णय करण्याचे कामाला कोणत्याहि प्रकारें बाध येऊं शकत नाहीं पण हिंदुस्थानचे बाबतींत मात्र पार्शी दंतकथावर अयोग्य विश्वास ठेवल्यामुळें अनंत घोटाळा व अडचणी उत्पन्न झाल्या आहेत

दंतकथात्मक माहितींतील दोषाचें ग्रीसचे बाबतींत काहींसें दूरीकरण करतां आलें आहे. त्या दूरीकरणाचें साधन असें कीं, इजिप्तला धरून जे समानकालोल्लेख आले आहेत त्यांचा पडताळा इजिप्तमध्यें सापडलेल्या स्मारकलेखांशीं पाहून दंतकथांतील सत्य व कालनिर्णय हीं निश्चित करावयाचीं आणि दुसरें साधन म्हणजे इंडोयूरोपीय लोकांच्या प्राचीन इतिहासासंबंधानें गेल्या थोड्या वर्षांत जो पुरावा जमला आहे त्याशीं संगति लावावयाची. तथापि दुर्दैवानें या पुराव्याची नक्की योग्यता ठरविण्याचें काम विशेष अवघड आहे. कारण हा पुरावा म्हणजे नॉन-इंडोयूरोपीय लोकांच्या

लेखसमूहात देवतांचीं व मानवांचीं आढळणारीं नावें घेऊन या नावांशीं इंडोयूरोपीय नावांचा संबंध आहे किंवा दुसऱ्या कोणत्या शाखेंतील लोकांच्या देवतादींच्या नावांशीं संबंध आहे हें पहावयाचें आहे. एका भाषेंतील नावें दुसऱ्या परक्या भाषेंत घेतलीं गेल्यास त्यांत निःसंशय बराच फरक होत असतो, तरीहि साधारण विद्वानाला आपल्या हुषारीनें कल्पनाशक्तीच्या जोरावर अशा नावांचा आपल्या पूर्वकल्पित भाषाविषयक सिद्धांताना परिपोषक असा परस्पर व्युत्पत्तिसंबंध जोडून देणें फारसें कठिण जात नाहीं. या म्हणण्याला सत्यालायक आधार म्हणजे हिरोडोटसनें उल्लेखिलेल्या *मिथ* लोकाच्या भाषेसंबंधानें माजलेला प्रसिद्ध वाद हा होय. त्या भाषेंतील देवतांचीं व मानवांचीं नावें इराणी आहेत असें कांहीं विद्वानांना निश्चित सिद्ध झालेसें वाटतें तर कांहीं विद्वान त्यांचा फिनोउग्रियन भाषेशीं संबंध दाखवूं पहात आहेत, आणि तिसरा एक पक्ष मिश्र भारतीय लोकांच्या भाषेशीं संबंध लावीत आहे. आणि या वादांत आणखी अडचण अशी आहे कीं, ज्या भाषेंतील नावांबद्दल हा वाद चालू आहे ती भाषाहि कोणास चांगली अवगत नाहीं. कारण हिटाइट लिपीवरील वाद चालूच आहे. कांहीं कसाइट राजांचीं नावें व कसाइट शब्दांस बाबिलोनियन प्रतिशब्द देणारी एक जंत्री एवढाच काय तो अद्यापपर्यंत या बाबतींत पुढें आलेला अति प्राचीन पुरावा होय. यूर्नबूरियश व नझिबुगश या राजाच्या दोन नावांत फर्न व बग हीं इराणी रूपें मूळस्वरूपांत दिसतात. परंतु त्यापासून निश्चित कांहींच अनुमान होत नाहीं. सूरिअश या इराणी नावाला देखील असाच घोटाळा उडाला आहे. कारण त्याचा सूर्य असा अर्थ करण्यांत येतो व इ. मेयर यानें तर त्या शब्दाचा वैदिक 'सूर्य' या देवतेशीं संबंध जोडला आहे. परंतु प्रथमेचा 'स्' हा एकवचनी प्रत्यय इराणी 'सूरिअश' या शब्दांत आला या एका गोष्टीशिवाय इतर ग्राह्यलायक पुरावा पुढें येत नसल्यामुळें या दोन शब्दांतील ऐक्य प्रस्थापित करणें चुकीचें आहे. परंतु इतर कसाइट शब्दांबद्दलचें डेलिट्झ्च यांचें मत जर गृहीत धरलें तर अशा प्रकारचा पुरावा उपलब्ध होईल, परंतु इ. मेयर यांचेंहि मत ही गोष्ट अशक्य असल्याबद्दल झालें आहे. तथापि इ. स. पू. १७६० पासून बाबिलोनवर राज्य करीत असलेल्या कसाइट वंशाच्या ऐतिहासिक कागदपत्रांतून घोड्याचे पुष्कळ उल्लेख येतात व 'पर्वतांतील गाढव' हें त्याचें केलेलें वर्णन त्याची जन्मभूमि दाखवितें. ही गोष्ट इ. मेयर यानें आर्यन् गोष्टीचा परिणाम म्हणून गृहीत धरली आहे. परंतु या प्रमाणाला कांहींच महत्त्व नाहीं. कारण हमुरबी याच्या वेळीं नव्हे तरी त्याच्या मुलाच्या कारकीर्दींत म्हणजे इ. स. पू. २००० पूर्वीच 'घोडा' बाबिलोनियांत आणला गेला. त्याचप्रमाणें हमुरबीच्या पराभवानंतरील डोंगरांतल्या राजाच्या पूर्वी होऊन गेलेल्या राजाच्या कारकीर्दींत उल्लेखलेले सूरिअश व सुवर्तिं येथून आलेले गौरकाय गुलाम आर्य लोकांपैकीं होते हें मत व पहिल्या कसाइट राजानें बाबिलोनिया हस्तगत करून घेतल्याबद्दल ब्रुन्होफर याग ऋग्वेदांत कल्पनाविस्तरतेनें आढळलेला उल्लेख इत्यादि अनुमानांना थोडी देखील किंमत देणें योग्य नाहीं.

उत्तरमेसापोटेमियांतील मिटनी यांच्या कागदपत्रांवरून मिळणारा पुरावा मात्र बराच महत्त्वाचा आहे. कारण मिटनी लोकांचा व हिटाइट व कदाचित् कसाइट या लोकांचा देखील अत्यंत निकटचा संबंध असल्याबद्दल जवळ जवळ ठरल्यासारखेंच आहे. निदान ते लोक इंडोयूरोपीय खास नव्हते. परंतु इ. स. पू. १३८० च्या नंतर थोड्याच काळांत सुब्बिलुलिउमा या हिटाइट राजाशीं झालेल्या तहांत मत्तिवझ यान मित्र, वरुण, इंद्र, नासत्या, या बहुशी वैदिक देवता सदृश असलेल्या देवतांची स्तुति केली आहे. यानंच आणखी एका गोष्टीची भर पडते, ती गोष्ट म्हणजे इजिप्तचा (इ. स. १४१४-१३३९) राजा तिसरा ॲमेन्होटेप याचा मेहुणा मिटनी राजा दुश्रत, त्याचा भाऊ अर्तसुमर, त्याचा बाप सुतर्ण व त्याचा आजा अर्तताम या सर्वांच्या नावांत एक प्रकारचा इराणी स्वर ऐकूं येतो, इतकेंच नव्हे तर मिटनीची राज्यकन्या तिसऱ्या ॲमेन्होटेपची स्त्री तय्या हिच्या शरीराच्या ठेवणीतहि श्रद्धामय अंतःकरणास आर्यन तऱ्हा दिसून येते. त्यापेक्षा जास्त महत्त्वाची अशी एक सूचना विंक्लरनें केली आहे ती ही कीं मिटनी बद्दल योजलेलें ' हरी ' हें नाव निःसंशय आर्यन् आहे व त्याला पुराव्यादाखल म्हणून त्यानें असें दाखविलें आहे कीं दरायसच्या शिलालेखाच्या सुसामध्यें केलेल्या परिवर्तनांत त्या राजानें धारण केलेल्या आर्य नावाचे उल्लेख आहेत. त्याचप्रमाणें विंक्लर यानें मिटनीमधील शूर वीरांना लावण्यांत येणाऱ्या 'मरियानि ' या संज्ञेंत देखील वैदिक शूरवाचक ' मर्य ' शब्द प्रतीत होतो. परंतु यावरून जुन्या करारांतील सृष्टयुत्पत्तिवर्णनात्मक पहिल्या पुस्तकांत वर्णन केलेल्या होराइट लोकांचा, केवळ त्याच्या राजाचीं नावें सेमेटिक होतीं एवढ्याच एका कारणावरून, या ठिकाणीं संबंध जोडणें ही सूचना मात्र ग्रहणीय नाहीं तरी पण इ. सनापूर्वी १४०० च्या थोड्या पूर्वी व थोड्या नंतर झालेल्या अमार्ना लेखांत असें दिसतें कीं, सुवर्दत, अस्दत, अर्तमन्य, ऋष्मन्य-अर्शनीय, बिरिदाय अथवा बिरिद्रय, नम्यवश, तेउवटी, सुर्यांघ आणि सुतर्ण या सीरियाच्या राजांच्या नांवांपैकीं सर्व जरी नाहीं तरी पुष्कळशीं नावें आर्य लोकांचीं आहेत. इ. स. पूर्वी ८५४ व ७४० च्या सुमारास उद्धरिलेली कुंडस्पी व कुस्टस्पी, त्याचप्रमाणें विदाय्य आणि बिस्ताप ही कोमॅजेनच्या राजांचीं नावें मात्र इराणी नमुन्याचीं आहेत. इ. सनापूर्वी ८३८ सालापासून पुढें मीड लोकांत व असुरियन् लोकांत लढायांबद्दल उल्लेख

आढळतात, व इ. सनापूर्वी ७४० च्या सुमारास 'मझ्दक' हें नांव आले असून त्याचा अर्थ मझ्द या देवतेचा पूजक असा असून, असुरबनिपाल ( इ. स. पूर्वी ६६८–६२६ ) याच्या लेखात हाच शब्द असुर मझास् या जुन्या स्वरूपात आढळतो.

**पर्शुभारतीयांच्या आगमनमार्गाविषयीं अनुमान.**— या सर्व पुराव्यावरून ऐतिहासिक अनुमानें कोणतीं काढतां येतील ? प्रथम हें नीट लक्षांत घेतलें पाहिजे कीं, उत्तर मेसापोटेमियांत किंवा सीरियांत एखाद्या आर्य जातीचें अस्तित्व *असल्याबद्दल कोणत्याहि प्रकारचा पुरावा उपलब्ध नाहीं, व केवळ आर्य नांवाच्या राजाचें अस्तित्व हें कांहीं मोठ्या प्रमाणावर झालेल्या स्थलांतराचा पुरावा नाहीं,* इतकेंच नव्हे तर आशियखंडातील इतिहासांतल्या प्रमाणें यूरोपीय इतिहासांतहि अशा प्रकारचे लुटारू व धाडसी लोक असल्याबद्दल कल्पना सहज होते शिवाय दुसरी गोष्ट म्हणजे त्या इतिहासांत एकदम आर्य नांवें दृष्टीस पडतात या गोष्टीवरून देखील आर्यांचें या भागांत आगमन बरेंच अर्वाचीन *कालीं झालें असावें अशी कल्पना होते* त्यानंतर असा प्रश्न उद्भवतो कीं, आर्यांनीं या देशांत कोणत्या बाजूनें प्रवेश केला, ते समुद्रमार्गानें आले असतील ही कल्पना तर असंभवनीय आहे. मेरेन्प्टः व तिसरा रामेसीस यांच्या कारकीर्दींत म्हणजे इ. सनापूर्वी १२२९ पासून पुढें सीरियन् किनाऱ्यावर, तेराव्या शतकांत झालेल्या अनेक राष्ट्रांच्या स्थलांतर करण्याच्या चळवळींत, पुष्कळ परकीय धाडसी जातींनीं लुटालूट व वसाहत केल्याचें त्या वेळच्या कागदपत्रांत नमूद केलेलें आहे, व फिलिस्टाइन लोक हे थोड्या अंशानें आर्यच असावेत ही गोष्ट बरीच संभवनीय आहे. परंतु ही गोष्ट फार प्राचीन काळीं घडून आली असती तर अमर्ना लेखांत उल्लेख आल्याशिवाय राहता ना. खुष्कीच्या मार्गाविषयीं विचार करतां, एशियामायनरमधील मार्ग साहजिकपणेंच सुचतो व दुसऱ्या ट्रॉय शहराची स्थापना फ्रीजियन लोकांनीं केली हें क्रेट्मरचें मत स्वीकारलें तर वरील सूचनेसच जोर मिळतो. परंतु हें मत असंभवनीय दिसतें, कारण *एशियामायनरचा* इतिहासच पूर्णपणें ज्ञात नाहीं, तरी देखील एवढें निश्चित ठरलें आहे कीं, आर्यांचा पहिला महत्त्वाचा विस्तार, सीरियन किना-ऱ्यावर वसाहती करणाऱ्या लोकांच्या स्थलांतरामुळें झाला-व फ्रीजियन व इतर लोकांनीं पश्चिम एशियामायनर प्रांतांत प्रवेश केला तो इ. स. पूर्वी १४०० नंतर होय.

तिसरें एक संभवनीय मत असें आहे व त्यासच जर्मन *विद्वान् हर्ट यानें मान्यता दर्शविली आहे तें हें कीं,* इन्डोयूरोपीय लोकांचें मूलगृह यूरोप खंडांतच किंबहुना उत्तर जर्मनींत *असावें व इन्डोइराणी लोक हे कॉकेशस पर्वताच्या* बाजूनें आपल्या भविष्यत्कालीन निवासभूमींत शिरले असावेत. परंतु *या उपपत्तिविरुद्ध एक मोठा आक्षेप आहे* व तो हर्ट याला देखील निवारण करतां आला नाहीं. कारण वरील उपपत्ति मान्य धरली तर *आर्मेनिया प्रांतांत आर्य*लोकांच्या जाती राहिल्याबद्दलच्या प्राचीन खुणा आहेत असें *आपणास दाखवितां आलें पाहिजे, परंतु वास्तविक प्रकार* फारच निराळा आहे. उलट आर्मेनियांत एका जातीच्या साहसप्रिय अशा अनार्य लोकांची वस्ती दिसून येते, व त्याच लोकांनीं व्हानचें राज्य मोठ्या चतुराईनें स्थापन करून असुरियाबरोबर दोन शतकें तंटा करून विजय मिळविला. फ्रीजियन लोकांशीं अत्यंत निकट संबंध असलेले इण्डो-यूरोपीय आर्मेनिअन लोक यांचा प्रवेश इ. स. पूर्वी ७०० च्या *पलीकडील काळांत झालेला नाहीं. जे ओसेट लोक पश्चिमेकडून आलेल्या इन्डोइराणी लोकांचे अवशेष समजले* जात असत, ते निःसंशय पूर्वेकडून आलेले मागाहूनचे अलनी जातीचे इराणी *लुटारू* होत हें *निश्चित* झालें आहे. दुसऱ्या उपलब्ध अशा कसल्याहि विचारपद्धतीनें हर्टच्या मतावरील हा आक्षेप दूर होण्यासारखा नाहीं. हिंदुस्थानावर प्राचीन बाबिलोनियन संस्कृतीचे परिणाम झाले आहेत *असें जरी ठरवितां आलें तरी त्यावरून इन्डो इराणी लोक* हे आपल्या भविष्यकालीन गृहस्थानांत कास्पियन समुद्राच्या दक्षिणेकडील बाजूनें घुसले ही गोष्ट सिद्ध होत नाहीं. कारण अशा रीतीनें बाबिलोनियन सुधारणेनें कोठवर प्रवास केला हें अंतर अजमावणें अशक्य आहे कोणत्याहि बाजूनें विचार करतां अशा सांस्कृतिक परिणामावरून सिद्धांत ठरविणें सदोष आहे. ऋग्वेदांतील एकट्या 'मना' या शब्दास बाबि-*लोनियन मिना हा प्रतिशब्द म्हणून* वारंवार देण्यांत येतो, परंतु परकीयाकडून घेतलेला हा मूल्यवान शब्द पुढें कोठेंच दिसत नाहीं या गोष्टीबद्दल कोणी कांहींच पुरावा आणलेला नाहीं, त्याचप्रमाणें 'कुऱ्हाड' अर्थ असलेल्या 'परशु', शब्दाची सुमेरियन 'बलग' याशीं व ॲकेडियन' पिल्कू, याशीं, व संस्कृत 'लोह' या शब्दाची सुमेरियन 'उरुडु, शब्दाशी नेहमीं तुलना केली जाते, परंतु वस्तुत त्याचें ऐक्य जरी गृहीत धरलें तरी त्यावरून कांहींच निष्पत्ति होत नाहीं, कारण हे शब्द मूळचे कोणत्या भाषेंतील असावेत हें दाखविण्यास बिलकुल पुरावा नाहीं, इतकेंच नव्हे तर कदाचित् एखाद्या तिसऱ्या अशा अज्ञात भाषेंतूनहि वरील शब्द घेतलेले असणें संभवनीय आहे. हिंदुस्थानांतील *सात* आदित्य देवांची कल्पना ही कोणातरी सात ग्रहांची पूजा करणाऱ्या अशा-लोकांपासून घेतलेली असून तीमुळें भारतीय धर्मांत भासत असलेली नैतिक पावित्र्याची उणीव भरून काढली गेली ही ओल्डेनबर्गची प्रसिद्ध उपपत्ति देखील विचारणीयच आहे वरील उपपत्ति योग्य ठरण्यास बाबिलोनियामध्यें इतक्या प्राचीन काळीं सात ग्रहांची पूजा लोकांत प्रचलित होती हें सिद्ध होत नसल्यामुळें वरील उपपत्ति त्याज्यच आहे त्याचप्रमाणें वैदिक असुर शब्दापासून इराणी अहुर शब्द तयार झाला कीं *अहुरापासून असुर झाला याबद्दल*

कांहींच निश्चित नाहीं. कारण वरील शब्दांतील कल्पनांच्या स्वभावधर्मांत ऐक्य नाहीं इतकेंच नव्हे तर त्यांतील शब्द-सादृश्य हें देखील अत्यंत दूरचें आहे. वस्तुतः इन्डोइराणी "असुर" हा शब्द "असु" ह्या पासून साधलेला असून अश्शुर याचें प्राथमिक स्वरूप 'असिर', असावें हें दिसून येतें आणि पॅलेस्टाइन प्रांतांत 'असेर' हें एक स्थाननाम आहे, आणि ॲमोराइट लोकांत पवित्र स्थावास व त्यांत राहाणाऱ्या देवतेस 'असेर' ही संज्ञा आहे. त्याचप्रमाणें वैदिक कालच्या ३६० दिवसांच्या वर्षमानपद्धती आणि 'सात', या सख्येचें पावित्र्य ह्या गोष्टींचा उलगडा होण्याकरितां बाबलोनियाकडेच धाव घेण्याची जरूर नाहीं. ह्याप्रमाणें सर्व बाजूंनीं विचार केल्यावर उघडपणें पुढील अनुमानच शिल्लक राहतें ते हें कीं मिटनी व सीरिया यांतील आर्य लोकांनीं ह्या प्रदेशांत पूर्वेकडील बाजूनें प्रवेश केला व बाबिलोनियांतील कसाइट राजघराणें नष्ट होऊन चोहोंकडे गडबड व गोंधळ माजल्यामुळें आर्यांच्या विस्तारास जास्त मदत झाली. अशाप्रकारचें अगदीं सरळ व समाधानकारक मत स्वीकारलें तरी देखील मिटनीच्या राजाचे देव व आर्य नावें ह्यांची उपपत्ति कशाप्रकारें लावावयाची हा प्रश्न पुनः शिल्लक राहतोच. हे देव व हीं नावें हिंदुस्थानी आहेत कीं इराणी आहेत, कीं हिंदू व इराणी भिन्न होण्यापूर्वींच्या कालांतील आहेत? इराणांत दिसून येणारी 'नासत्या' ही देवता, व मिटनी राजाच्या नावांतील 'अर्त' ह्यावरून पंडित याकोबी यानें असा निष्कर्ष काढला आहे कीं हे देव मूळचे भारतीय असून ते पूर्वेकडील एखाद्या इराणी टोळीनें इराणांत आणले असावेत. जे. होप मोरटन् यानें या मताचा स्वीकार करून असें म्हटलें आहे कीं कांहीं आर्य टोळ्या हिंदुस्थानच्या राहणीवर असंतुष्ट होऊन पुनः परत दिशेनें प्रदेश आक्रमूं लागल्यामुळें वरील आर्य नावें व देवता त्यांजबरोबर इराणांत आणली गेलीं, व ह्याच मतास पुष्टि देण्याकरितां त्यानें अशी उपपत्ति स्वीकारली कीं इराणी "तिश्त्र्य यश्त्" ह्या ग्रंथामधील वर्णन केलेली परिस्थिति प्रत्यक्ष हिंदुस्थानांतील राहणीवरून इ. स. पू. १८००–९०० च्या सुमारास नमूद केली असावी. परंतु हा मुद्दा दोषयुक्त असून वरील उपपत्ति तर अगदींच असंभवनीय आहे. यावरून ओल्डेनबर्गचें मतच ग्राह्य ठरतें तें हें कीं, ह्या मूळ आर्य-इराणी देवताच असाव्यात. कारण इराणी ग्रंथांत इंद्र व नासत्या ह्यास इंद्र व नाओन्हइथ्या ह्या नांवाचे दैत्य मानलें आहे; त्याचप्रमाणें हिंदुस्थानांतल अग्निपूजनाच्या प्रगल्भावस्थेंतील अग्नि ही देवता व तिचा इराणांत आभार असणें ही गोष्ट देखील वरील मतासच पुष्टि देते.

याच्या अगदीं उलट इ. मेयर याचें असें मत आहे कीं, हे देव इराणी नसून भारतीय होत व भारतीय आणि इराणी सादृश्यावरून कल्पनेनें पुनर्घटना करतां येणाऱ्या त्या पूर्वींच्या आर्यकालाचें यथार्थ दिग्दर्शन ह्या देवता करीत असल्यामुळें त्यांचीं नावें हें एक ह्या मतास अनुकूल असें प्रमाणच आहे. ह्या इ. मेयरच्या मतांत पंडित याकोबी यानें असंबद्धतेचा दोष दाखविला आहे. परंतु जरी त्यानें आपलें मत सुस्पष्ट शब्दांत दिलेलें नाहीं तरी त्यांतील खरा अर्थ उघड आहे; ज्या कालीं आर्य लोक एकत्र असे सोमलता उगवणाऱ्या प्रदेशांत, म्हणजे बहुतकरून बॅक्ट्रिया व पश्चिम हिंदूकुशकडे रहात होते तो काल इ. सनापूर्वी १४०० वर्षांपर्यंत टिकला नाहीं, कारण हिंदुस्थानावरील आर्यलोकांच्या दिग्विजयाचा काल इ. स. पूर्वी १५०० च्या नंतर आणताच येत नाहीं. हिंदुस्थानांत व इराणांत विस्तार पावलेल्या आर्य लोकांचा परस्पर संबंध एकदमच तुटला असेल असें म्हणतां येत नाहीं. तर हा संबंध एकत्र राहणीच्या वेळेपासून कालांतरानें हळू हळू कमी होतां होतां इराणांत झोरोआस्टरच्या कालांत ह्या परस्परसंबंधाचा शेवटचा धागा तुटला. आर्यांचे भारतीय व इराणी असे विभाग पडण्याचें मूळ कारण झोरोआस्टरच्या चळवळीमुळें धार्मिक बाबतींत पडलेला मतभेद होय. ह्या जुन्या सूचनेबद्दल दुसरी एक कल्पना स्वीकारली पाहिजे ती अशी कीं, आर्यन् लोकांच्या एकत्रित राहणींतच धार्मिक बाबतींतील दृष्टिकोण बदलत जाऊन, देश, काल, व परिस्थिति यास अनुसरून त्यामध्यें महत्त्वाचे फेरबदल घडून आले. ह्यावरून मिटनीच्या देवता आर्यन् लोकांच्या आहेत. व ती भाषाहि ज्याअर्थीं वैदिक किंवा इराणी भाषेपासून भिन्न दिसते त्या अर्थीं ती आर्यलोकांचीच बोलण्याची भाषा आहे हें म्हणणेंच जास्त सयुक्तिक दिसेल. कारण 'नासत्या' यांतील वर्णांत 'स' हें अक्षर ठेवणें हें इराणींशीं विसदृश असून 'ऋत' ह्या ऐवजीं 'अर्त' हा शब्द घालणें वैदिक संस्कृतशीं विसदृश आहे—तथापि ह्यांतील दुसरें अनुमान विशेष जोरदार नाहीं, कारण मिटनी लिपींत 'ऋत' हा शब्द जसाच्या तसाच लिहिणें अशक्य होतें. उदाहरणार्थ सुवर्दत्त हा स्पष्टपणें 'सुवर्दत्त' ह्या संस्कृत शब्दाचें रुपांतर म्हणतां येईल. त्याचप्रमाणें बाह्य स्वरूपावरून दिसतें त्यापेक्षा प्राचीन कालांत घेतलेली इराणी 'अगुर मझाह्' ही देखील आर्य संज्ञाच आहे हें सहज दाखवितां येईल. खरोखर मूळ शब्दांचें हें स्वरूप ध्वनिदृष्ट्या बरोबर नाहीं. तथापि त्यांत 'स' हा शिल्लक आहे व 'ह' हा वर्ण स्पष्ट आर्यन् आहे, व त्यावरून असें म्हणण्यास बिलकूल हरकत नाहीं कीं, ज्यांतून हा शब्द घेतला ती भाषा इराणी किंवा वैदिक ह्यापेक्षांही प्राचीन असली पाहिजे. ह्यावरून अर्थांतच असें खात्रीलायक म्हणतां येणार नाहीं कीं ज्या भाषेंतून हीं नावें आलीं ती इराणी किंवा वैदिक भाषेची जननी होय. फक्त ती पश्चिमेकडील आर्यांची प्राचीन व्यावहारिक भाषा होती. एवढेंच म्हणतां येईल.

**मूलगृहविषयक प्रश्नाची अधिक चर्चा.**— ह्या सर्व विवेचनाची किंमत, मुख्यतः इन्डोयूरोपीयांच्या

उगमस्थानाविषयीं बराच काळपर्यंत माजून राहिलेल्या रणावर नवीन प्रकाश पाडून हा प्रश्न सुटण्यावर अवलंबून आहे. एकंदर पुराव्यावरून असें स्थोत्पत्तीस येतें कीं आर्य इराणात ईशान्य दिशेनें शिरले. व एकंदर इतिहासातील, इराणी टोळ्यांनीं केलेल्या चळवळीच्या सर्वसाधारण परंपरेशीं वरील कल्पना बरोबर जुळते. प्रथम इन्डोइराणी यूरोपमधून इकडे आले ही कल्पना अद्याप स्वीकारता येण्यासारखी आहे, व जर्मन आणि संस्कृत ह्या भाषांतील कांहीं गोष्टींतील सादृश्यावरून मोल्टन यानें अशी कल्पना बसविली आहे कीं मूळ इराणी लोक त्यांनीं प्रथम यूरोपांतून स्थलांतर केलें व त्यानंतर अतिशय झपाट्यानें कांहीं जर्मन टोळ्यांनीं स्थलांतर करून आपली भाषा वरील इराणी लोकांवर लादून हिंदुस्थानात गमन केलें, व इराणमध्यें राहिलेल्या जातभाईंस इराणी लोकांत मिसळण्यास सवड दिली. परंतु हें अनुमान निराधार आहे, कारण सर्व इन्डोयूरोपीय भाषांमध्यें कांहीं विशिष्ट सारख्या गोष्टी आहेत, ह्यावरून जातिसंकर व स्थलांतर सिद्ध करूं पाहणें अशक्य आहे

शिवाय टोखेरिअन भाषेच्या शोधामुळें इन्डोयूरोपीयांची मूळ उत्पत्ति आशियातच असल्याबद्दलच्या कल्पनेस जास्तच जोर मिळाला आहे किस्ट या विद्वानानें केलें त्याप्रमाणें या पुराव्यास फाजील महत्त्व देण्याचें कारण नाहीं. गॉल लोकांच्या परिभ्रमणाविषयीं विचार केला असता टोकेरियन भाषा यूरोपमधून आशियाखंडात झालेलें स्थलांतर दर्शवीत नाहींत, असें म्हणणें अशास्त्रीय ठरेल. परंतु पूर्वेकडून पश्चिमेकडे अशा प्रकारची हालचाल होण्याचा जितका जास्त संभव आहे, तितका यूरोपमधून आशियाखंडात होणें संभवनीय नाहीं, व ज्या अर्थी दक्षिण रशियाचा इन्डोयूरोपीयांचें मूलगृह होण्याचा मान फक्त तो वाटेवरचें तात्पुरतें स्थान आहे या एका गोष्टीमुळें नाहींसा होतो. त्या अर्थी जर्मन लोकांकडून ध्वनिदृष्ट्या इन्डोयूरोपीय भाषेस अत्यंत निराळें वळण लागलें आहे या एका गोष्टीमुळें जर्मनीचा तशाच प्रकारचा इन्डोयूरोपीयांचें मूलस्थान होण्याचा हक्कहि नाशाबीत होतो कारण जर्मनीमध्यें कांहीं थोड्या लोकांनीं आपली इन्डोयूरोपीय भाषा तेथील पूर्वीच्या रहिवाशांवर लादली ह्या उपपत्तीनें वरील गोष्टींचा कार्यकारणसंबंध उत्तम तऱ्हेनें दाखविता येईल कंठ्य वर्णाविपर्यांच्या व्यवस्थेंत व 'ए.' खेरीज 'ई' व 'ओ' हे स्वर ठेवण्यात टोकेरियन भाषा यूरोपांतील सेंटम भाषेजवळजवळ आहे ही एकच गोष्ट इन्डोयूरोपीयांचें मूलगृह सागराहूनच्या पश्चिमेकडील उदाहरू मंगोलियनांचें उगमस्थान असलेल्या मध्यआशियाच्या सपाट प्रदेशात असल्याचें दर्शवितें. सेंटम भाषा बोलणाऱ्या लोकांचा जो थोडा भाग मागें शिल्लक राहिला त्याची भाषा टोकेरिअन असावी, व सातेम भाषा बोलणाऱ्यांपैकीं कांहीं लोक, अरल पर्वताच्या उत्तर दिशेनें कास्पिअन समुद्राच्या बाजूनें पश्चिमेकडे स्थलांतर करून गेले होते, आणि आर्य हे वायव्य दिशेनें पसरत होते, व त्याच वेळीं स्कोलोटी व सीथिअन यासारख्या रानटी जाती पूर्वींच्या लोकांनीं मळलेल्या मार्गांनीच सरकत होत्या. ई. मेयरनें हीच कल्पना स्वीकारली आहे आणि जरी ही कल्पना, किंवा दक्षिण रशियातील इ. स. पूर्वी २५००-२००० च्या सुमाराची ट्रिपोल्जे संस्कृति ही इंडोयूरोपीय लोक पश्चिमेकडे भ्रमण करूं लागल्याची निदर्शक आहे ही दुसरी कल्पना ह्या दोन्हीहि कल्पनांस शक्यतेपेक्षा जास्त किंमत नाहीं; तरी या कल्पनांचा भाषाशास्त्रेतिहासांतील पुष्कळसे अवघड प्रश्न सोडविण्यास उपयोग करता येईल. शिवाय वरील विवरणानें प्राचीन इंडोयूरोपीय व इतर रानटी जाती व मंगोल लोक यांच्यातील निकट सादृश्याचीहि नीट उपपत्ति लावतां येते, कारण व्यावहारिक चालीरीती, धर्मसमजुती व प्रेतविधि इत्यादि गोष्टींतील परिस्थितीचें सादृश्य सारखेच परिणाम घडवून आणील

त्यावरून असें म्हणता येणार नाहीं कीं, इंडोयूरोपीय लोकांनीं निर्मानुष प्रदेशात प्रवेश केले. कारण इंडोयूरोपीय भाषांतील महत्त्वाचे भेद व त्या लोकांचे स्वभावधर्म वरील गोष्टींविरुद्ध पुरावा देत असून मानववंशशास्त्रातील व ऐतिहासिक पुराव्याशीं जुळते आहेत. टोकेरियन भाषेंत इंडोयूरोपीय संस्कारांनीं आत्मसात केलेल्या एखाद्या प्राचीन भाषेचे अवशेष आढळणें असंभवनीय नाहीं टोकेरियन भाषेंत 'अस्सल' हा एक युग्मदर्शक प्रत्यय आढळतो व मिटनी कागदपत्रात मित्र, वरुण इत्यादि देवतांस जोडलेल्या 'अश्शिल' या प्रत्ययाशीं त्याचें फारच चमत्कारिक साम्य आहे त्यातील रहस्य कांहीं असो, एवढें नेहमीं लक्षात ठेवलें पाहिजे कीं, इंडोयूरोपीय ऐक्याचा काल इ स. पू. ३००० वर्षांपलीकडे नेण्याची जरुरी नाहीं व पृथ्वीवरील मानवजातीच्या इतिहासात हा काल फारच मागाहूनचा आहे [ भांडारकर स्मृति ग्रंथ–कीथ याचा लेख ].

**अवेस्ता उर्फ पारशांचा धर्मग्रंथ.**—अवेस्ता किंवा झेंद अवेस्ता हा ग्रंथ म्हणजे झरथुस्त्रानें प्रवर्तित केलेल्या धर्माचें बायबल व प्रार्थनापुस्तक होय आज ह्याला च पारशी उर्फ अग्निपूजक पवित्र ग्रंथ म्हणून मानतात. अवेस्ता हा शब्द 'अविस्ताक–ज्ञान, ज्ञान देणारें पुस्तक' या पहूलवी भाषेतल्या शब्दावरून बनलेला आहे पवित्रग्रंथ, धर्म( कायदा ) ग्रंथ असा त्याचा खरा अर्थ असावा. झेंद–अवेस्ता हें नाव मात्र बरोबर नाहीं. पहूलवी भाषेंत 'अविस्ताक वा झंद,' 'अवेस्ता व झेंद' म्हणजे धर्मग्रंथ व टीका असा मुख्य शब्दप्रयोग आहे.

अवेस्ताला धर्मग्रंथ मानणारे म्हणजे झरथुस्त्री धर्माचे पारशी लोक हल्लीं हिंदुस्थानात सुमारें ८०००० व इराणात १०,००० पर्यंत आहेत. परंतु अवेस्ता ग्रंथाचें ऐतिहासिक महत्त्व फार आहे कारण त्यात इराणातील फार प्राचीन काळच्या लोकांच्या धार्मिक समजुती व चालीरीती संगृहीत केलेल्या आहेत.

भारतीयांना जें वेदाचें महत्त्व तेंच पारशांना अवेस्ताचें आहे. कारण त्यांच्या साहाय्यानें पारशाचें प्राचीनत्व व त्याच्या संस्कृतीचें उन्नतत्व सिद्ध होणारें आहे. मानव जातीच्या प्राचीन इतिहासातहि त्याचें फार महत्त्व आहे, कारण बुद्ध-पूर्व इतिहासातील पर्शु-भारतीय कालावर म्हणजे वैदिक *आर्यांच्या भारत-प्रवेशापूर्वीच्या काळ वर प्रकाश पाडण्यास* त्याची मदत होणार आहे. म्हणून त्याची माहिती थोडक्यात येथें देतों.

**अवेस्तामधील विषय व त्या विषयांची मांडणी** – अवेस्ता हा एका काळच्या मोठ्या वाङ्मयाचा केवळ अवशेष होय. त्याची त्रोटक प्रकरणेंच आजपर्यंत चालत आलेली आहेत एकाहि हस्तलिखितात आज उपलब्ध असलेले सर्व ग्रंथ एके-ठिकाणीं सापडले नाहींत. म्हणून ते निरनिराळ्या संग्रहातून घेतले आहेत विद्यमान अवेस्ताचें खालीं लिहिल्याप्रमाणें सहा भाग करितां येतील. ते असेः—

१ यस्न यात गाथाचा अंतर्भाव केला असावा. २ विस्पेरेद ३ यस्तप्त. ४ न्याइशे गाह वगैरे अप्रधान ग्रंथ ५ वेन्दीदाद. ६ हादोख्तनस्क *वगैरेंतील त्रुटित भाग.*

पहिल्या पाच भागाचें दोन गट मानतात पहिल्या गटात वेन्दीदाद, विस्पेरेद व यस्न येतात. याचा उपयोग पूजाप्रसंगीं केला जात असल्यामुळें पहिल्यापासून पूजाविषयक म्हणून याचा निराळा गट मानला आहे व यालाच मुख्य अवेस्ता म्हणतात. ह्या तीन ग्रंथाच्या हस्तलिखित प्रती दोन तऱ्हेच्या उपलब्ध आहेत. कांहींत पल्हवी भाषान्तर आहे व काहींत नाहीं. जेथें जेथें हे तीन ग्रंथ निरनिराळे सापडतात. तेथें त्यांचें बहुधा पल्हवी भाषेंत भाषांतर दिलें आहे परंतु ह्या तीन ग्रंथाचा, एक पुरा संपल्यावर दुसरा, अशा तऱ्हेनें धर्मकार्यांत उपयोग केला जात नाहीं, तर जसे त्यांचे भाग विधींमध्यें उपयोगात आणतात, त्या क्रमानें परंतु या ग्रंथातला हा एक भाग तर दुसऱ्या ग्रंथातला दुसराच एक भाग या तऱ्हेनें हे ग्रंथ सापडतात. प्रयोगाच्या सोईनें जुळविलेल्या ह्या ग्रंथांच्या आवृत्तींत पल्हवी टीका नसते, व या संग्रहाला ' वेन्दीदाद साधो ' किंवा शुद्ध वेन्दीदाद म्हणतात. दुसऱ्या गटामध्यें दुय्यम प्रार्थना आणि त्यांच्याबरोबर हस्तलिखितांत सांपडणारे यस्न येतात व त्यांना ' *खोर्दाह् अवेस्ता* ' किंवा छोटा अवेस्ता म्हणतात. ह्या दुसऱ्या गटांतील बहुतेक ग्रंथावर पल्हवी टीका उपलब्ध नाहीं. वरील सहा भागाबद्दल थोडें विवेचन येथें देणें अप्रस्तुत होणार नाहीं.

धर्मसंग्रहापैकीं पूजाविषयाचा यस्न म्हणजे यज्ञ किंवा पूजा हा मुख्य ग्रंथ होय. हा मुख्यतः देवस्तुती व देवप्रार्थनांचा बनला असून यातच गाथाचा अंतर्भाव केला आहे. गाथा किंवा सूक्तें या झरथुस्त्राच्या प्रवचनांतील कविता आहेत, व त्या अवेस्तामधील अतिप्राचीन व अतिपवित्र भाग होत. यस्न ( संस्कृत यज्ञ ) चे ७२ अध्याय आहेत, व त्यांना हा किंवा हाति म्हणतात. पुरोहित ह्या श्रुती यज्ञाच्या वेळीं म्हणतात. या ग्रंथाचे जवळ जवळ सारखे तीन भाग पडतात. पहिल्या भागाचा आरंभ ( अध्याय १–२७ ) ओरमज्ददेव व धर्मांतील दुसऱ्या देवता याना नमन करून झाला आहे. या भागात पवित्र जला ( झओथ्रा)च्या शुद्धीचे मंत्र आहेत व त्याचप्रमाणें बरेस्म म्हणजे समिधाची शुद्धी इध्या शुद्धीचे मंत्र आहेत. हओम तयार *करण्याचे व त्याच्या अर्पणाचे मंत्र आहेत* हओम (हिंदुस्थानातील लोक ज्याला सोम म्हणतात ) हा एका वल्लीचा रस असून तो यज्ञकाळीं पुरोहित पीत असत, व हें पिणें एक धर्मकृत्य असे. तसेंच पुरोडाशाच्या व मांसाच्या हवनाचे मंत्र आहेत. ह्या पुरोडाशाचा व मांसाच्या हवनाचा अंश पुरोहित प्रसाद म्हणून भक्षण करीत असत या भागात मध्यें मध्यें धर्म व आचारविषयाचें अप्रत्यक्षपणें विवेचन ज्यात केलेलें आहे असे कांहीं अध्याय आले आहेत उदाहरणार्थ यस्न १२ यात नंतरचा झरथुस्त्री धर्म आहे व यस्न १९-२१ यांत प्रश्नोत्तररूप विषय आहे. दुसऱ्या भागात गाथा–शब्दशः गाणीं, धर्मगीतें-याचा समावेश केला आहे ह्या गाथा छंदोमय असून त्याच्यात झरथुस्त्राचे उपदेश, प्रवचनें व धर्मदर्शनें आलीं आहेत. त्यात त्यानें मनुष्यांना वाइटापासून दूर रहाण्याचा व चांगल्याचा आश्रय करण्याचा उपदेश केला आहे. अंधकाराचें साम्राज्य टाकून प्रकाशाच्या, ज्ञानाच्या, साम्राज्यात जाण्यास सांगितलें आहे. गाथा छंदोमय असून त्यातील भाषा इतर अवेस्ता-मधील भाषेपेक्षा प्राचीन आहे. गाथा पाच आहेत व त्याची मांडणी वृत्तवारीनें असून त्याच्या प्रारंभीच्या 'अहुन वैति, उष्ट वैति ' इत्यादि शब्दावरून त्यांची नावें ठेविलीं आहेत. गाथाचीं सतरा सूक्तें आहेत व 'स्विस्ति साम' प्रमाणें नंतरच्या काळात तीं प्रार्थनेच्या वेळीं म्हटलीं गेलीं असलीं पाहिजेत. ज्या छंदोमय ग्रंथावरून, नंतरच्या काळातल्या बुद्धाप्रमाणें झरथुस्त्रानें धर्मोपदेश केला म्हणतात त्याच मूळांत *या गाथा असाव्या असें दिसतें. या गाथामध्यें* सप्ताध्यायी यस्न ( यस्नहेप्ताघैति ) मध्येंच घुसडलें आहे. हें सप्ताध्यायी यस्न गद्यात असून त्यात प्रार्थना व अहुरमज्द, प्रधान देवदूत, सद्धर्मीयाचे आत्मे, अग्नि, जल व पृथ्वी याची स्तुति आहे. प्राचीनत्व व जुनाट भाषा यामध्यें हेप्तांघैति हें *जरी गाथांच्या थोडेसें नंतरचें असलें तरी,* गाथात ज्या धर्माचा उदय दृष्टीस पडतो त्याच धर्माचें थोडें नंतरचें व जास्त सुधारलेलें स्वरूप यात दृष्टीस पडतें. गाथामध्येंच तीन किंवा चार विशेष पवित्र मंत्र आहेत. हे मंत्र अहुन वैर्य किंवा होनोवर ( यस्न २७, १३ ), अशेमवोहु ( यस्न २७, १४ ), ऐर्यम इशो ( यस्न ५४-१ ) व येंघहातेम ( यस्न ४, २६ ) हे होत. यांची नांवें त्याच्या पहिल्या शब्दावरून पडलीं आहेत. तिसऱ्या भागांत ( भाग ५२, ५५ ते ७२ ) किंवा नंतरच्या यस्नमध्यें ( अपर यस्न ) निरनिराळ्या देवताच्या स्तुती व कृतज्ञता दर्शविली आहे.

वीस्पेरेद् ( अवेस्ता वीस्पेरतवो ) मध्यें यस्नच्या कांहीं भागांत जास्त घातलेला विषय आला आहे व यांतील भाषा व रचना यस्नाप्रमाणेंच आहे. याचे २४ अध्याय किंवा कर्दे असून तें यस्नच्या सातव्या हिश्शाएवढें मोठें आहे. धर्माचारग्रंथांत यस्नमधील अध्यायांबरोबरच वीस्पेरेद्-मधील अध्यायांचा समावेश केला आहे. अवेस्ता वीस्पेरतवो यामध्यें विश्वे ( सर्व ) देवांना आवाहनाचे व आत्मार्पणाचे मंत्र आहेत व म्हणून याला वीस्पेरेद् म्हणतात.

यस्त ( अवेस्ता येश्ती.– स्तुतीनें पूजा करणें ) ची एकवीस सूक्तें आहेत. यामध्यें यजत ( इजद् ) च्या किंवा देवताच्या स्तुती आहेत. अर्द्विसूर म्हणजे जलदेवता (यस्त ५), तिश्त्र्य तारका ( यस्त ८ ), मिथ्र म्हणजे सत्यदेवता ( य. १० ), फ्रवशी किंवा सद्गुणी लोकांचे मृतात्मे ( य. १३ ), वेरेथ्रघ्न म्हणजे यशोदेवता ( य. १४ ) व राजतेजाची देवता ( य. १९ ) ह्यांच्या स्तुतिपर यस्त, हे यस्तांमधील मुख्य यस्त होत. यस्तांची रचना मुख्यतः छंदोमय असून, त्यांत काव्य आहे व त्यांतील पुष्कळशा कथा व ऐतिहासिक भाग फिरदोसीच्या 'शहानामा' या पारसी महाकाव्यांतील कथांशीं पडताळून पहाण्यासारख्या आहेत.

न्यायशे, गाह, सिरोझा, आफ्रिगन या अप्रधान ग्रंथांत छोट्या प्रार्थना, स्तुती व वरप्रार्थना असून त्या दररोज व विशेष प्रसंगीं म्हणावयाच्या आहेत.

वेन्दीदाद म्हणजे 'दएव ( राक्षस ) विरुद्ध कायदा'.—हा एक धर्मविषयक कायद्याचा ग्रंथ असून त्यांत बावीस अध्याय ( फर्गर्द ) आहेत. या ग्रंथांतील कांहीं भाग फार जुने तर कांहीं फार अलीकडचे आहेत व त्याचप्रमाणें त्यांची भाषाशैलीहि निरनिराळ्या प्रकारची आहे. या ग्रंथाचा बराचसा भाग नंतरचा असला पाहिजे. पहिल्या अध्यायांत ( फर्गर्द १ ) अवेस्ताधर्मानुसार सृष्ट्युत्पत्ति दिलेली आहे. यांत सृष्टि सदसद्रूपी ( बरें व वाईट ) द्वैतापासून झाली म्हणून ती सदसद्रूपी द्वैतमय आहे असें दिलें आहे. दुसऱ्या अध्यायांत यिमाची कथा, सुवर्णयुग (कृतयुग ) व इराणी जलप्रलय म्हणजे एका सर्वविध्वंसक हिमकालाचें आगमन हे विषय थोडक्यांत दिले आहेत. तिसऱ्या अध्यायांत अन्य विषय असून त्यांत कृषिविद्येपासून होणारे फायदे दिले आहेत. चवथ्या अध्यायांत करार मोडणें, देहपारुष्य,वाक्पारुष्य व शिक्षा यांच्याबद्दलच्या कायद्याचा विषय आहे अध्याय ५ ते १२यांत मृताशौच हा मुख्य विषय आहे. अध्याय १३—१५ मध्यें मुख्यतः कुत्र्याला वागविण्याबद्दल नियम आहेत. अध्याय १६, १७ व अठराव्याचा कांहीं भाग यांत निरनिराळ्या अशौचापासून शुद्धीच्या पद्धतीचें विवेचन आहे. अध्याय १९ मध्यें अरिमान्याचा जरथुष्ट्राला पातकांत पाडावयाचा प्रयत्न, झालेला मोह व तो जिंकल्यानंतर त्याला झालेलें धर्मदर्शन या गोष्टी आहेत. अध्याय २०—२२ वैद्यकविषयक आहेत. आचारग्रंथामध्यें वेन्दीदादचे अध्याय गाथांत घातलेले आहेत.

वरील ग्रंथाशिवाय आणखी पुष्कळ त्रोटक प्रकरणें आहेत व त्यांतील एक दोन हदोख्तनस्कमधील आहेत. अनुपलब्ध नस्कमधील कांहीं अवतरणें आहेत व कांहीं टीका व शब्दसंग्रह आहेत. नीरंगीस्तान, अओगेमदएच व फ्रेन्दपल्हवीकोश व दुसरे कांहीं त्रोटक भाग हीं याच भागांत अंतर्भूत होतात. हीं अवेस्ता भाषेत लिहिलीं असून एका कालच्या मोठ्या वाङ्मयाचे अवशिष्ट भाग होत झरथुश्त्री धर्माच्या वाङ्मयांत, अवेस्तांत लिहिले गेले नसले तरी पल्हवी भाषेत लिहिलेल्या ग्रंथांचा समावेश केला पाहिजे. हे पल्हवी ग्रंथ बरेचसे मूळ अवेस्ताचें भाषांतर असून त्यांत प्राचीन धर्मग्रंथांतील जुना विषय आलेला आहे.

वरील विषयवारीवरून हल्लींचा अवेस्ता बायबल म्हणण्यापेक्षा प्रेअर बुक म्हणण्यासारखा आहे हें लक्षांत येईल. पुरोहितांनीं आपल्या कामाकरितां वेन्दीदाद, विस्पेरेद् व यस्न हीं एके ठिकाणीं केलीं. या सगळ्या धर्मग्रंथांचें पठण दररोज करणें हें पुरोहितांचें कर्तव्य होतें. या योगें त्यांची स्वतःची शुद्धि राहून त्यांना दुसऱ्याच्या पापक्षालनार्थ प्रायश्चित्ताच्या धर्मक्रिया करितां येत असत व प्रायश्चित्तें देतां येत असत. यज्ञकालीं वेन्दीदाद, विस्पेरेद्, यस्न यांचें गंभीरपणें पठण होत असे. ख्रिस्ती धर्मांतील येशूचा प्रसाद घेणें, गॉस्पेल म्हणणें वगैरे गोष्टींसारख्या सोमपान व गाथा म्हणणें या गोष्टी दिसतात. खोर्दाह अवेस्तांतील मोठ्या यस्नची तुलना बायबलमधील कथाविषयक भागांशीं करितां येईल. परंतु खोर्दाह अवेस्तामध्यें कोणत्या तरी एखाद्या देवतेला उद्देशून एकेक भाग असल्यामुळे व कथा फार पुराण काळच्या असल्यामुळे बायबलच्या प्रक्षिप्त भागांत सुद्धा अशासारखा भाग सांपडणार नाहीं. डिनकर्ड ( पुस्तक ३ ) मध्यें असें सांगितलें आहे कीं मूळ अवेस्ताच्या दोन प्रती होत्या व त्या दोन्हीहि प्रतींत २१ नस्क ( पुस्तकें ) होते. अर्द विराफ म्हणतो कीं त्यांतील एक पर्सेपोलीस येथील पुस्तकालयांत ठेविलेलें अलेक्झांडरनें इराणवर स्वारी करून राजवाडा जाळला त्या वेळीं जळून खाक झालें. असें म्हणतात कीं दुसरी प्रत ग्रीकांनीं नाहींशी केली. पण कशी नाहींशी केली हें सांगता येत नाहीं. रिवायत व डिनकर्डमध्यें या एकवीस नस्कांचीं, त्यांच्या पहिल्या शब्दांवरून पडलेलीं नांवें,व त्यांचीं वर्णनें दिलीं आहेत. या प्रत्येक नस्कमध्यें अवेस्ताश्रुति व पल्हवी भाष्य दिलें आहे. याबद्दलची पारशांची परंपरागत माहिती महत्त्वाची आहे व तदनुसार प्रत्येक नस्कची मूळ ग्रंथसंख्या व विषय खालीं देत आहों.

| नस्क | परिच्छेद | विषय |
|---|---|---|
| १ | २२ | सद्गुण व धर्मश्रद्धा |
| २ | २२ | धर्मविषयक आचार |
| ३ | २१ | मज्दयस्न धर्म व त्याचीं तत्वें |
| ४ | ३२ | हें जग व दुसरें जग, मृतांचें सशरीर पुनरुत्थान व पापपुण्याचा निवाडा |
| ५ | ३५ | ज्योतिषशास्त्र. |
| ६ | २२ | यागविषयक आचार व त्यापासून मिळणारें पुण्य. |
| ७ | अलेक्झांडरच्या काळा पूर्वी ५० पण अलेक्झा डरचेवेळीं विद्यमान १३ | मुख्यत राजकीय व सामाजिक विषय |
| ८ | अलेक्झांडर पूर्वी ६० आज उपलब्ध १२ | कायदा |
| ९ | अलेक्झांडर पूर्वी ६० नतर शिल्क राहिलेलें १५ | धर्म व त्याचा मनुष्याशीं व्यावहारिक संबंध |
| १० | अलेक्झांडरपूर्वी ६० शिल्क उरलेले नुसते १० | राजा गुश्ताप व त्याची कारकीर्द |
| ११ | प्रथम असलेले २२ अलेक्झांडरनतर शिल्क ६ | झोरोआस्टरच्या उपदेशाचा परिणाम, धर्म व त्याचा मनुष्याशीं व्यवहारत सबध |
| १२ | २२ | द्रव्यमत्यें व आध्यात्मिक पुनर्जन्म |
| १३ | ६० | पुण्यकर्मे व झोरोआस्टरच्या बाळपणाचें सक्षिप्त वर्णन |
| १४ | १७ | ओरमज्द व प्रधान देवदूत. |
| १५ | ५४ | व्यवहारात व वजनें आणि मापें यांमध्यें सचोटी, पुण्यमार्ग |
| १६ | ६० | या धर्मातील, भवळच्या नातलगाशीं विवाहाच्या तत्वासंबधी |
| १७ | ६४ | भविष्यकाळीं मिळणाऱ्या शिक्षा, फलज्योतिष |
| १८ | ५२ | अधिकाराचा उपयोग करण्यात न्याय, मृतांचें सदेह पुनरुत्थान व असताचा विध्वस |
| १९ | विदेव्दाद अ वेन्दीदाद २२ अजून उपलब्ध आहेत | अशौच व त्याची शुद्धि |
| २० | ३० | साधुत्वाविषयी |
| २१ | २३ | ओरमज्द व प्रधान देवदूत यांची स्तुति |

**अवेस्ता ग्रथाचा नष्ट व अवशिष्ट भाग**—अलेक्झाडरच्या नासधुसीनतरच्या पाच शतकात नि सशय पुष्कळसा धर्मग्रथ नाहींसा झाला व पुष्कळसा विसरला पारशी परपरा व डिनकर्ड व रिवायत यामध्यींहि ही गोष्ट कबूल केला आहे त्याचप्रमाणें ८ ९ १० ११ व्या नस्क मधील बराच भाग नाहींसा झाला असें सागितलें आहे अलेक्झाडरच्या स्वारीपासून ससानियन राजांच्या कालापर्यंत पाचशें वर्षांत नाहींसा झालेला धर्मग्रथाचा भाग ससानियन काळापासून आज तागाईत झालेल्या धर्मग्रथाच्या लुप्त झालेल्या भागापुढें कांहींच नाहीं म्हटलें तरी चालेल इ सनाच्या सातव्या शतकात झालेल्या मुसुलमानाच्या स्वारीनें व कुराणाच्या धडाक्यानें पारशी धर्माचें अतोनात नुकसान झालें जुलुमानें ग्रस्त झालेल्या पारशी लोकाना आपल्या धमग्रथाची काळजी घेता आली नाहीं त्यामुळें पुष्कळ भागाचा लोप झाला प्राचीन अवेस्तामधील ससानियन काळांत शिल्क राहिलेल्या एकवासि नस्कपैकीं एकोणिसावें म्हणजे वेन्दीदाद तेवढ आज पूर्णपणें उपल ध आहे पण त्यात सुद्धा विषयाची व मजकुराची जुळवाजुळव मागून केली गेली असावी अशा बद्दल सातच पुरावा आहे आणखी आज उपलब्ध असलेल्या यस्न व विस्पेरेद् मधील काहीं भाग आणि स्तओ यस्त (स्तओत येस्न्य) किंवा ज्याला नुसतें यस्त (येस्न्य) म्हणतात, त्यातील काहीं भाग हे एकच आहेत असें दाखविता येईल पह्लवी ग्रथात सापडणाऱ्या पण आज उपलब्ध नसलेल्या पुष्कळ अवेस्ता अवतरणावरून ह्याच गोष्ट सिद्ध होते एकदरीनें हिशेब केला तर असें आढळून येईल कीं ससानियन काळापासून आजपर्यंत धर्मग्रथाचा जवळ जवळ दोनतृतीयांश भाग नाहींसा झाला आहे

**ग्रथरचनाकालाविषयक अनुमानें.**—कालानुक्रमाच्या दृष्टीनें अवेस्ताचे भिन्न भाग भिन्न कालाचे असणें शक्य आहे हें ठरविण्यास छंदाच्या दृष्टीनें केलेलें मूळ ग्रंथाचें सूक्ष्म परीक्षण फार उपयोगी आहे मूळ धर्मपुस्तकाचे बहुतेक भाग छंदोमय आहेत व नतरचे व मागून घुसडलेले भाग नेहमीं नसले तरी बहुतेक गद्यांत लिहिलेले आहेत.

व्याकरणाची कसोटीहि उपयोगाची आहे. अलीकडच्या काळच्या ग्रंथात व्याकरणाच्या शुद्ध ज्ञानाचा लोप होत चाललेला दिसतो. या दृष्टीनें छंदोमय ग्रंथ फारच व्याकरणशुद्ध आहेत. ह्या अवेस्तामधील भाग अतिप्राचीन असून प्रत्यक्ष झोरोआस्टरच्या काळापासून आहेत. मोठे यस्त व यस्नचा पद्यमय भाग यांमध्यें पुष्कळ प्राचीन काळच्या म्हणजे इराणच्या प्राचीन धर्मापासून आलेल्या गोष्टी आहेत. परंतु त्याची सामान्य रचना व स्वरूप या दृष्टीनें ते गाथानंतर कांहीं शतकांचे असावेत. या बाबतींत वेन्दीदादमध्यें मात्र कोणत्याहि तऱ्हेची संगति नाहीं. त्यातल्या कांहीं भागाचें स्वरूप अपभ्रष्ट झालें असलें तरी ते फार प्राचीन काळचे आहेत व दुसरे भाग यस्तच्या अलीकडच्या भागाप्रमाणें अगदीं अलीकडचे आहेत. अवेस्तामधील मंत्रमय उताऱ्याबद्दल व विस्पेरेद व न्याइशेमधील यज्ञाकरिता व अन्य संस्काराकरिता निराळ्या काढलेल्या भागाबद्दलहि वरच्यासारखीच स्थिति आहे गोल्डवेरनेंं सर्व धर्मग्रंथाचा कालक्रम खालीं दिल्याप्रमाणें होईल

१ गाथा ( यस्न २८—५३ ) व मंत्र यस्न २७ १३, १४ व ५४ धरून

२ यस्न हेसार्धंति ( य. ३५–४२ ) व दुसरे भाग य. १२, ५८ आणि ४.२६ गाथाच्या भाषेंत

३ छंदोमय यस्न व यस्त जसें—यस्न ९,१०,११,५७, ६२,६५, यस्त ५,८,९,१०,१३,१४,१५,१७,१९. वेन्दीदादमधील २,३,४,५,१८,१९ व विस्पेरेद, न्याइशे व आफ्रिंगन यात मध्यें मध्यें आलेल्या कविता.

४ अवेस्ताचा उरलेला गद्यमय भाग या शेवटच्या म्हणजे चवथ्या भागात भाषासरणी व रचना यांच्यावरून मूळ ग्रंथ कोणता व नंतरचा गद्यमय व घुसडलेला भाग कोणता हें बहुतकरून ओळखता येतें.

पारद्याचा धर्मग्रंथ अवेस्ता याची माहिती वर दिली आहे. आता अवेस्ता भाषा व संस्कृत भाषा याच्यामधील सादृश्य दाखविणारी यादी प्रथम देतों

**अवेस्ता कोशांतील व गायग्नरच्या प्राचीन इराणी संस्कृति या ग्रंथांतील अवेस्ता व संस्कृत यांतील सादृश्यांची यादी मराठी अर्थासह.**

| अवेस्ता | संस्कृत | मराठी |
|---|---|---|
| अइति | अति | मार्गें |
| अइध्य | अद्य | येथें, आता |
| अइनिक | अनीक | मुख्य(?)चेहरा, कपाळ |
| अइपि, अइपी, | अपि | देखील, वर, तर |
| अइबी, अइवि, अइवी | अभि | उंच, वर, नजीक |
| अइर्य | अर्य,आर्य | मान देण्यास योग्य, पूज्य, उच्चकुलोत्पन्न |
| अइर्यमन् | अर्यमन | सुखशांतिदायक अर्यमन्‌ची प्रार्थना, सुखदायक देव |
| अइविति | अभीति | जवळची |
| अइवितो | अभितस् | आसपास, जवळ, दोहोबाजूंला |
| अउरुन | अरुण | जंगली |
| अउरुष | अरुष | पांढरा, किरमिजी |
| अउर्वत् | अर्वन्त, अर्वन् | पळणारा, चलाख, मजबूत |
| अएत | एत | हा, तो |
| अएनङ्ह | एनस् | अपमान, नुकसान, अपराध, पाप |
| अएम | अयम | हा, तो |
| अएव | एक | एक, एकटा, फक्त |
| अएव | एव | याप्रमाणें |
| अएवो–दस, अवए–दस | एकादश | अकरावा |
| अएवादशैन् | एकादशन | अकरा |
| अएस्म | इध्म | लांकूड |
| अएष | एष, एषा | इच्छित |
| अओजङ्ह | ओजस | शक्ति |
| अओर | अवर | अधिक, खाली |
| अक | अक | वाईट गोष्ट, पाप |
| ,, | अङ्क | आंकडा |
| अख्श् | ईक्ष् | चौकशी ठेवणें, पाहणें |
| अघ | अघ | पाप |
| अघ्र | अग्र | शिखर |
| अङ्ह,इथ्य | असत्य | खोटें |
| आझि | अहि | साप |
| अझ् | अह् | बाधणें |
| ,, | अज् | दूर करणें, फेंकणें, आडरस्त्यानें नेणें |
| अझी | अही | फिरणें, चालणें |
| अझेम् | अहम् | मी |
| अंक | अङ्क | बाक देणें, वळविणें |
| अंग | | |
| अंगिश्त, अंगुश्त | अङ्गुष्ठ | अंगठा |
| अंघ | अंह् | दुःख देणें |
| अंच् | अञ्च् | जाणें |
| अंज् | अञ्च् | वाकविणें, फेंकून देणें, |
| अंज् | अञ्ज् | अपवित्र करणें |

| अवेस्ता | संस्कृत | मराठी |
|---|---|---|
| अंत | अन्त | शेवट, टोंक |
| अंतर | अन्तर | आंतील |
| अंतर | अन्तर् | आंत [उभा राहणारा |
| अंतरेश्ता | अन्तरस्थ | जमीन व अस्मान यांमध्यें |
| अंतेम | अन्तिम | दुसऱ्या टोंकास |
| अंद् | अन्ध् | आंधळें करणें |
| अंदा | अन्ध | आंधळा |
| अथ | अथ | याप्रमाणें |
| अध्र | अत्र | येथें |
| अद् | अद् | खाणें |
| अद्वएप | अद्वेप | निरुपद्रवी |
| अध | अध | येथें |
| अधर | अधर | खालचा |
| अध्वन् | अध्वन् | रस्ता |
| अन् | अन् | श्वास घेणें |
| अन् | अन् | न |
| अन | अनेन | दर्शक सर्वनाम |
| अनइर्य | अनार्य | हीनकुलोत्पन्न |
| अनु | अनु | माफक |
| अनुम इति | अनुमति | धर्मविषयक कायद्याच्या अनुरूप विचार करणें |
| अन्य | अन्य | दुसरा |
| अप् | अप् | पाणी |
| अप | अप | दूर.वेगळें नसणें दर्शविणा. |
| अप् | आप् | पोहोंचणें, मिळणें [उपसर्ग |
| अपख्रओसक | अपक्रोश | ओरडणें |
| अपगइति | अपगति | पलायन |
| अपर | अपर | उत्तरकालीन, हलका |
| अपुत्र | अपुत्र | संततिविहीन |
| अपेम | अपम | शेवटचें |
| अब्द | अब्द | मेघ |
| अम् | अम | हिंमत |
| अमवण् | अमवन्त् | हिम्मतवान् |
| अयह्ह् | अयस् | लोखंड |
| अयन | अयन | मार्ग |
| अयह्य | अयास्य | देवद्रुजाचें नांव, उजाड |
| अर | अर् | जाणें, मिळविणें |
| अरेज् | अर्ह् | लायक असणें–होणें |
| अरेझ् | अर्जु् | पांढरा होणें |
| अरेझ् | अर्ज् | सरळ मार्गानें जाणें |
| अरेझ् | अर्जू | काम हातीं घेणें |
| अरेत | ऋत | सत्यता |
| अरेत | ऋत् | खरें बोलणें |
| अरेथ | अर्थ | नफा |
| अरेथमण्त | अर्थवन्त | खरा, रास्त |
| अरेद | अर्ध् | उच्च दर्जा वाढविणें |
| अरेद | अर्द | दुःख देणें |
| अरेध | अर्ध | अर्धा |
| अरेप् | अर्प | जखम करणें |
| अर्षन् | वर्षिण, वृषन् | पशु (नर) |
| अर्शित | ऋष्टि | भाला |
| अव | अव | जवळ, दूर, खालीं |
| अवङह् | अवस् | मदत |
| अब्र | अभ्र | मेघ |
| अस् | अशू | जलदी करणें |
| असङ्ह् | आशा | रुंद, जंगली जागा |
| असन् असान | अशन् | दगड, भाला |
| असून | अशन्य | भरपूर |
| अस्त | अस्त | पाठविलेला |
| अस्तन् अस्ति | अस्थन्, अस्थि, | हाडूक, हाड |
| अस्व | अश्व | घोडा |
| अस्पो–स्थान | अश्वस्थान | तबेला |
| अस्प्य | अश्वय, अश्वीय, आश्विक | घोड्यासंबंधीं |
| अस्म | अश्मन् | दगड |
| अस्रु | अश्रु | आंसवें |
| अष् | अश् | पोहोंचणें |
| अष | ऋता | पावित्र्य |
| अषवन् | ऋतावन | पवित्र |
| अषि | अक्षि | डोळा |
| अश्तदस | अष्टादश | अठरावा |
| अश्तदसन् | अष्टादशन् | अठरा |
| अश्तन् | अष्टन् | आठ |
| अश्ताइति | अशीति | ऐंशी |
| अश्तेम | अष्टम | आठवा |
| अश्त्रा | अष्ट्रा | खंजीर |
| अह् | अस् | असणें, होणें |
| परअह् | परा-अस् | पळून जाणें |
| आअत् | आत | त्यावरून |
| आइ | ए | (केवलप्रयोगी) अ. |
| आएङ्ह | आस्य | तोंड |
| आओध | आस | तोंड |
| आकृति | आकृति | भव्य चेहरा |
| आझइति | आहुति | सुवत्ता, आबादी |
| आथ्रवन् | अथर्वन् | उपाध्याय |
| आथ्व्य | आप्त्य | फेरिदून राजाच्या बापाचें नांव |
| आदान | आधान | स्वीकार |

| अवेस्ता | संस्कृत | मराठी |
| --- | --- | --- |
| आवृइति | भूषा, भूषण | शोभा |
| आयु | आयु | आयुष्य |
| आर्मइति | आरमति | पवित्र विचार, देवता |
| आविश् | आविस् | स्पष्ट, जाणणें |
| आश् | अश् | पोहोंचणें |
| आशु | आशु | जलद |
| आस्तुइति | स्तुति | स्तुति |
| आएङ्ह, आङ्ह | आस् | बसणें |
| इ | इ | हा,ते,(सर्व) |
| इ | इ | येणें, जाणें |
| इ | इ | ज्ञान मिळविणें |
| अइवि-इ | अभि-इ | जवळ जाणें |
| आ-इ | आ-इ | येणें |
| उप-इ | उप-इ | जवळ येणें |
| उस्-इ | उस्-इ | बाहेर येणें |
| पइति इ | प्रति-इ | भेटीला जाणें |
| पर इ | परा-इ | दूर पळून जाणें |
| फ्र-इ | प्र-इ | पुढें जाणें |
| हं-इ | सम्-इ | मिळणें |
| इन | ईह | इच्छा करणें |
| इज | अज | बकरा |
| इजएनि,इज़एन | अजिन | चामड्याचें वस्त्र |
| इंद्र | इंद्र | इंद्र |
| इत | इत | चालरीत |
| इति | इति | ,, |
| इथ | इत्था | याप्रमाणें |
| इथ्य | इत्य | नाश पावणारें |
| इध्, इद् | इध | जाळणें |
| यर्, इर् | ईर् | उंच करणें |
| इध | इह | येथें |
| उश्-यर्,उश्-इर् | उद्-ईर् | [सूर्य] उगवणें |
| रि, इरि | री | खराब करणें |
| इरिप् | रिप् | जखम करणें |
| इस् | इष्, इच्छ् | इच्छा करणें |
| इस् | ईश | समर्थ असणें |
| इसा | ईशा, ईषा | गाडीचा दांडा |
| इष् | इष् | इच्छा करणें |
| पइति-इष् | प्रति इष् | ,, |
| पइरि-इष | परि ईक्ष | परीक्षा करणें |
| इषु | इषु | बाण |
| इश्त | इष्ट | इच्छिलेलें |
| ईश्ति,इश्ति | इष्टि | इच्छा |
| इश्त्य, इश्त्व | इष्टका | वीट |
| ईर् | ईर | हलविणें |
| ईरा | इरा | लष्कर |
| उख्त | उक्त | बोललेलें |
| उख्ति | उक्ति | शब्द |
| उख्श् | उक्ष् | शिंपडणें |
| उख्शन् | उक्षन् | बैल |
| उग्र | उग्र | बळकट |
| उश् | ऊह् | प्रीति करणें |
| उज्वएज़ | देहो | बाधीत |
| उत | उत | तथा |
| उदर | उदर | पोट |
| उद्र | उद्र | पाण्यात राहणारा कुत्रा |
| उन | उर्णा, ऊर्णा | डोक्यावरील केंस |
| उप | उप | जवळ |
| उपइरि | उपरि | वर |
| उपेम, उपम | उपम | वरील |
| उपमन | उपमा,उपमान | उपमा |
| उपयत | उपयत | जिंकणें [ स्वयंवरात ] |
| उपर | उपर | वर |
| उपास्ति | उपास्ति | प्रार्थना |
| उब | उभ | दोघे |
| उब्ज | उब्ज | नाश करणें |
| उब्द | उप्त | विणलेला |
| उरु | उरु | मोठा, विस्तीर्ण |
| उरूद् | रोध | नदी |
| उर्वरा | उर्वरा | झाड, रोप |
| उरुपइद्ह | उशधि | एक प्रकारचें विषारी झाड |
| उस्तान | उत्तान | उताणा हात |
| उस्तानज़स्त | उत्तानहस्त | हात जोडलेला |
| उस्तेम | उत्तम | उच्च दर्जाचें |
| उष् | उष् | जाळणें, प्रकाशणें |
| उष् | उष् | आजारी पडणें |
| उषा, उषड्ह | उषस् | उषा, संध्या |
| ऊ | ऊन् | कमी होणें |
| ऊन | ऊन | गरजवंत |
| एरेज़त | रजत | चांदी |
| एरेज़िफ्य | ऋजिप्य | ससाणा |
| एरेज़ु | ऋजु | सत्य |
| आंज़ड्ह | अंहस् | संकट |
| आंसु | अश्रु | उन्हाळी |
| क | क | कोण, कोणी |
| कइर्य | कार्य | काम |
| कउर्व | कर्बु, कर्बुर | डाग पडलेला |
| कएत | केत | इच्छा, किंवा |
| कतार | कतर | दोहोंपैकीं कोणीहि ? |

| अवेस्ता | संस्कृत | मराठी |
|---|---|---|
| कथ | कथा, कथम् | कशा रीतीनें |
| कध | कध | कोठें ? |
| कन् | खन् | खोदणें |
| उस्-कन् | उद्-खन् | उकरून काढणें |
| नि-कन | नि-खन् | पुरणें |
| कन् | कन् | प्रीति करणें |
| कन | केन | कोण |
| कन्या | कन्या | कुमारी |
| कफ | कफ | फेस-तोंडातून येणारा |
| कम् | कम् | प्रेम करणें |
| कमेरेध | कुमूर्धन् | विगर मेंदूवाला |
| कयध | कयाद | दुष्ट माणूस |
| कर् | कर् | करणें |
| फ्र-कर् | प्रकर् | उत्पन्न करणें |
| हण्-कर् | सङ्कर् | संपूर्ण करणें |
| कर् | कर् | पहाणें, परीक्षा करणें |
| करेति, करेत | कर्तनी, कर्तरि | कात्री |
| करेफ्त् | कर्त् | कापणें |
| करेन | कर्ण | कान |
| करेप् | कल्प् | आकार देणें |
| करेस् | कर्श् | अशक्त असणें, होणें |
| करेष् | कर्ष् | नांगरणें |
| ,, | ,, | खेंचणें, ओढणें |
| अव-करेष् | अवकर्ष | ,, ,, |
| पइरि-करेष् | परिकर्ष | ,, ,, |
| कर्षा, कर्ष | कर्ष् | नांगरणें |
| कर्षि | कर्ष् | नांगरणी |
| कर्शित | कृष्टि | ,, |
| कस् | काश | प्रकाशणें |
| कस्यप | कश्यप, कच्छप | कासव |
| कष् | कष् | खेंचणें |
| कष् | कक्ष | बगल |
| ,, | कच्छ, कक्ष | किनारा |
| का | कन् | प्रेम करणें |
| काम | काम | इच्छा |
| कार | कार | उद्योग |
| कास् | काश् | प्रकाशणें |
| कु | कु | त्रास देणें, आंधळे होणें |
| कु | कु | वाईट ( स्त्री ) |
| कुन्द | कबन्ध | राक्षसाचें नांव |
| कुर् | कूल | रक्षण करणें |
| कुष् | कुप् | रागावणें |
| कुष् | कुष् | ठार मारणें |
| केरेत | कृत | केलेलें |

| अवेस्ता | संस्कृत | मराठी |
|---|---|---|
| केरेतर | कर्तृ | करणारा |
| केरेति | कृति | काम |
| केरेमा | कृमि | किडा |
| केरेस | कृश | रोडका |
| केहर्प | कृप् | शरीर |
| केहर्पे | कल्प, कृप्, | आकार देणें |
| क्व | क्व | कोठें |
| ख्व् | स्व | आपलें |
| ख्वङ्हर् | स्वसर् | बहीण |
| ख्वण्ज | संपरि-सञ्ज | वेढा घालणें |
| पइरिश-ख्वण्ज | ,, ,, | ,, ,, |
| ख्वतो | स्वतस् | स्वतः |
| ख्वन | स्वन् | प्रकाशणें |
| ख्वप् | स्वप् | निजणें |
| ख्वफ्ज | स्वप्न | ,, |
| ख्वर् | स्वर | दु:ख देणें |
| ख्वर् | सुर | प्रकाशणें |
| ख्वर | स्वरु | जखम |
| ख्वसुर | श्वशुर | सासरा |
| ख्वाप् | स्वर्द | खाणें |
| ख्वीस् | श्वस् | श्वास टाकणें |
| खद् | खद् | खोदणें |
| वी-खद् | वि-खद् | उलथापालथ करणें |
| खा | खा | झरा पाण्याचा |
| खुम्ब् | कुम्भ्, कुम्ब | झाकण घालणें |
| खुम्ब | कुम्भ | मातीचें भांडें |
| ऋतु | क्रतु | अक्कल |
| ऋप्, ऋफ्म् | क्रप् | दरिद्री होणें, रागणें |
| खु | क्रव्य | कच्चें मास |
| खुद् खूध | क्रुध् | रागावलेला |
| खुस् | क्रुश् | नांवें ठेवणें |
| ख्रूर | क्रूर | क्रूर |
| ख्षएन | क्षीण | रोडका |
| ख्षओध्ङ्ह | क्षोदस् | विपुलता |
| ख्षथ्र | क्षत्र | राज्य |
| ख्षन् | क्षण् | जखम करणें |
| ख्षप् | क्षप् | झाकणें |
| ख्षय | क्षय | घर |
| ख्षि | क्षि | राज्य चालविणें |
| ख्षित् ख्षि | क्षि | राहणें |
| ,, ,, | ,, | कर्मी होणें |
| ख्षुइश्व | क्षु | दूध |
| ख्षुद् | क्षुद | ओला करणें |
| ख्षुद | क्षुद | बीज |

| अवेस्ता | संस्कृत | मराठी |
|---|---|---|
| स्पुन् | क्षुभ् | हलणें |
| स्नु | क्ष्णु | धुप होणें |
| ,, | ,, | धार लावणें |
| स्वश् | षष् | सहा |
| स्वश्ति | षष्टि | साठ |
| स्वश्-दस | षोडश | सोळावा |
| स्वश्-दसन् | षोडशन् | सोळा |
| स्प्विव्, स्प्विप् | क्षिप् | जलदी करणें |
| स्त्व | षष्ठ | सहावा |
| गइति | गति | गति |
| गइंति | गन्ध | डाग |
| गइरि | गिरि | पर्वत |
| गओ | गो | गाय |
| गओकेरेन | गोकर्ण | एक झाड |
| गओजन् | गोहन् | ढोरें मारणारा [द्विवाळा] |
| गओतेम | गोतम | गौतमबुद्ध |
| गओधन | गोधन | गुराढोरांची वाढ |
| गओन | गुण | फायदा |
| गओमण्त् | गोमन्त् | गोमांसाचें भोजन |
| गओयओइति | गव्यूति | कुरण |
| गओष, घोष<br>घोश् ( घाउल )<br>घोवर | कर्ण | कान |
| गद्द् | घस् | खाणें |
| गंदरेव | गन्धर्व | एका बलवान पण दुष्ट देवाचें नाव |
| गन् | घ | खरोखर |
| गध | गद | एक प्रकारचा रोग |
| गधा | गदा | गदा |
| गए | जभ् | जांभई देणें, खोल करणें |
| गम् | गम् | जाणें, येणें |
| अइवि-गम् | अभि-गम् | जवळ जाणें |
| आ-गम् | आगम् | येणें |
| हण्-गम् | सम्-गम् | बरोबर येणें |
| गय | गय | जीवित |
| गर् | गर्, जागर् | जागें राहणें |
| गर् | घर् | गरम होणें |
| ,, | गल् | जड होणें |
| ,, | गर् | आधाशीपणानें खाणें |
| ,, | गर् [गॄ] | गाणें, स्तुति करणें |
| अइवि-गर् | अभि-गर् | स्तुति करणें |
| गर | गर | विष |
| गरद्द् | गल | गळा |
| गरेज | गर्ज् | रडणें |
| गरेव् | गर्ह्, ग्रह् | धरणें, स्वागत करणें |
| गरेध् | ,, | पत्करणें, आदर करणें |
| अइवि-गरेध् | अभि-ग्रह् | काळजीनें अभ्यास करणें |
| गरेध् | ग्रह् | बुद्ध करणें, समजणें |
| गरेम | घर्म | गरम |
| गरेव् | ग्रभ्, ग्रह् | मिळविणें |
| अप-गरेव् | अप-ग्रह् | निरनिराळें करणें |
| अव-गरेव् | अव-ग्रह् | पकडणें |
| आ-गरेव् | आं-ग्रह् | पोहोंचणें |
| उझ्-गरेव् | उद्-ग्रह् | उचलून धरणें |
| नि-गरेव् | निग्रह् | खालीं दाबणें |
| पइरि-गरेव् | परिग्रह् | चिकटणें, वेष्टणें |
| फ्र-गरेव् | प्रग्रह् | मदत करणें |
| वी-गरेव् | वि-ग्रह् | जाळ्यांत पकडणें |
| हण्गरेव् | सङ्ग्रह् | पकडणें |
| गरेव | गर्भ | गर्भस्थान |
| गवो-स्तान | गोस्थान | गोठा |
| गा | गा | येणें |
| ,, | गा, गै | गाणें |
| गातु | गातु | जागा |
| गाथा | गाथा | पवित्र गीत |
| गाय | गाय | पाऊल |
| गावय | गव्य | गाईचें दूध |
| गि | जि | जिवंत राहणें |
| गु | गु | खराब, घाण करणें |
| ,, | ,, | मोठा आवाज काढणें |
| गुझ् | गुह् | छपविणें |
| गुप् | गुप् | आसरा देणें |
| गुप् | धुप् | लक्ष देणें |
| गूथ | गूथ | कचरा |
| गेरेझा | गर्ज, गर्जा, गर्जन | मोठ्यानें रडणें ( ना. ) |
| गेरेध | गृह | भुयार |
| गेउषा | घोष | घोष |
| गोउरु | घोर | वाईट |
| ग्रह् | ग्रस् | खाणें, गिळणें |
| ग्रीव | ग्रीवा | मान |
| घ | घ | ठार मारणारा |
| घन | हन | ,, ,, |
| घर् | हर् | आठवण करणें |
| घ्जर् | क्षर् | दूध काढणें |
| घ्न | हन | मारणारा |
| घ्न | घन | पट दर्शक प्रत्यय |
| चइति | कति | किती |

| अवेस्ता | संस्कृत | मराठी |
|---|---|---|
| चख्र | चक्र | चाक |
| चथ्र | चतुर् | चार |
| चथ्रुदस | चतुर्दश | चवदावा |
| चथ्रु-दसन | चतुर्दशन | चौदा |
| चथ्रुश्रुस् | चतुश्चतुः | चार वेळा |
| चथ्वरे | चत्वारस् | चार |
| चथ्वरेसत | चत्वारिंशत् | चाळीस |
| चर् | चर् | चालणें |
| अन्तरेचर् | अतर्-चर | आत शिरणें |
| आचर | आचर् | जाणें, येणें |
| फ्रचर् | प्रचर् | पुढें जाणें |
| वीचर् | विचर् | हाळणें |
| ह्राम-चर् | सं चर् | आत जाणें |
| चरण | चरण | पाय ( गति देणारें साधन) |
| चरेमा | चर्मन | चामडें |
| चष | चक्ष् | तपासणें |
| चष्मन् | चक्षन , चक्षुस् | डोळा |
| चि | चि | एकत्र करणें |
| ,, | ,, | शिक्षा करणें |
| चित् | चित् | विचार करणें |
| ,, | चिद् | इत्यादि ( अव्यय ) |
| चिथ्र | चित्र | प्रगट |
| चिस्ता | चित्त | ज्ञान |
| चिस्ति | चित्ति | ज्ञानदेवता |
| जइति | जाति | कुटुंब |
| जघ्न्वङ्घ | जघ्निवस्, जघन्वस् | मारणारा |
| जहस् | जस | हल्ला करणें |
| जन्तर् | ( हन्तृ )हन्तर् | ठार मारणारा |
| जत | हत | ठार मारलेला |
| जद् | गद् | आर्जव करणें |
| जन् | हन् | ठार मारणें |
| अव जन् | अव-हन | ,, ,, |
| उप-जन् | उप-हन् | मारणें, ताडन करणें |
| नि-जन् | निहन् | नाश करणें |
| पइति-जन् | प्रति-हन् | हटविणे |
| जन | हन | मारणारा |
| जप्, जम् | जम् | बंद करणें |
| जम् | गम् | जाणें |
| अइवि-जम् | अभि-गम् | मिळविणे |
| आ जम् | आ-गम | येणें |
| उस् जम् | उद्-गम् | दिसणें |
| उप जम् | उपगम | जवळ येणें |
| पइति-जम | प्रतिगम | पोहोंचणें |
| वी-जम् | वि-गम | आत शिरणें |
| ह्म-जम | सम-गम् | मिळणें |
| जय | जय | जय |
| अप-जस् | अप-गम | पळून जाणें |
| आ-जम | आ-गम | पोहोंचणें |
| उस्-जस | उद्-गम | पुढें जाणें |
| उप-जम् | उप गम | जवळ जाणें |
| पइति-जम् | प्रति-गम | विरुद्ध जाणें |
| पइरि-जम | परि-गम | पोहोंचणे |
| फ्र-जम् | प्र-गम | पुढें जाणें |
| वी-जस | वि-गम् | सर्वत्र पसरणें |
| ह्म्-जस् | सम-गम | भेटणें |
| जह् | जस् | वाटेल तें करणें |
| जि | जि | जिंकणें |
| जि | जिव | इच्छा—चौकशी करणें |
| जीव् | जीव् | जिवंत राहणें |
| जीव्य | जीव्य | ताजें दूध |
| ज़ु | जू | जलदी करणें |
| जेनी | जनी | बाई |
| ज्या | ज्या | वृद्ध होणें |
| ,, | ,, | धनुष्याची दोरी |
| ज्यातु | जीवातु | आयुष्य |
| ज़्ना | ज्ञा | जाणणें |
| ज़्नातर् | ज्ञातर् | ज्ञाता |
| ज़्नु | जानु | गुडघा |
| ज़इरि | हरि | हिरवा, ताजा |
| ज़इरित | हरित | पिवळा, हिरवा |
| ज़इरिन | हरिण | पिवळा, फिकट |
| ज़ओतर् | होतर् | उपाध्याय |
| ज़ओथ्रा, ज़ओथ्र | होत्र | हवनद्रव्य |
| ज़ओष | जोष | खुशी |
| ज़ंग | जंघा | तंगड्याचें—घोट्याचें हाड |
| ज़न्तु | जन्तु | गाव |
| ज़द् | हद् | हगणें |
| ज़न् | जन् | जन्मणें |
| ,, | ज्ञा | जाणणें |
| ज़र् | जर् | म्हातारें होणें |
| ,, | हर् | दुःख देणें |
| ,, | ,, | पिवळें होणे |
| ,, | ,, | पकडणें |
| ज़रन | हिरण | सोनें |
| ज़रनएनि, ज़रनएन | हिरण्य | सोन्याचें |

| अवेस्ता | संस्कृत | मराठी |
|---|---|---|
| ध्वरव्ष् | त्वक्ष् | जोराने वाहणें |
| ध्विष् | त्विष् | प्रकाशणें |
| दइवित्य | द्वितीय | दुसरा |
| दएनू | धेनु | गाय |
| दएव | देव | खोटा देव, असुर |
| दएवी | देवी | खोटी देवता |
| दघ | दाह | डाग |
| दहृर | दक्ष | शहाणा |
| दइद् | दंस् | पाहणें |
| दझ् | दह् | पोळणें |
| अप-दझ् | अप-दह् | जाळणें |
| हण्-दझ् | सम्-दह् | नाश करणें |
| दण्तन् | दन्त | दांत |
| दंस् | दंश् | चावणें |
| ,, | ,, दंस् | शहाणें होणें, पक्षणें |
| दन | धन | दौलत |
| दव्, दव् | दम्भ्, दभ् | फसविणें |
| दम् | धम्, ध्मा | श्वासोच्छ्वास घेणें |
| दम् | दम् | आज्ञाधारक बनणें |
| दर् | दर् | फाडणें, तोडणें |
| निश्-दर् | निस्-दर् | फाडणें |
| दर् | धर् | पकडणें |
| वी-दर् | विधर् | टेका देणें, मदत करणें |
| दर् | दर | तारीफ करणें |
| दरेघ | दीर्घ | लांब |
| दरेघो-बाझु | दीर्घबाहु | लांब हात असणारा |
| दरेझ् | दर्ह् | मजबूत बसविणें |
| दरेन | धारणा | पक्कें धरणें |
| दरेना | दारण | अरुंद जागा |
| दरेव् | दर्भ्, दभ् | बाधणें |
| दरेस् | दर्श् | पाहणें |
| दरेस | दर्श | देखावा |
| दरेस्य | दृश्य | पाहणें ( ना. ) |
| दरेष् | धर्ष् | धाडस करणें |
| दरतर् | द्रष्टृ | पाहणारा |
| दर्स्ति | दृष्टि | दृष्टि |
| दव् | धाव् | पळणें |
| ,, | ,, | स्वच्छ करणें |
| दस् | दंश् | दंश करणें, चावणें |
| दस् | दंश् | श्रीमंत होणें |
| दसन् | दशन् | दहा |
| दसेम | दशम | दहावा |
| दष् | दक्ष् | सशक्त होणें, योग्य होणें |
| दषिन | दक्षिण | उजवा |

| अवेस्ता | संस्कृत | मराठी |
|---|---|---|
| दह् | दास् | नाश करणें, प्रेम करणें |
| दह् | दम्,दंश् | इजा करणें |
| दा | दा | देणें |
| आ--दा | आ--दा | परत घेणें |
| दा | धा | बनविणें |
| अवि-दा | अभि--दा | हल्ला करणें |
| नि-दा | नि--धा | खालीं ठेवणें |
| वी-दा | वि-धा | विकडून राहणें |
| हण्--दा | सम्-धा | एकत्र ठेवणें |
| दा | ध्यै | विचार करणें |
| ,, | दा,दो | कापणें |
| दाइति | दाति | देणें [ना] |
| दाउरु | दारु | लाकूड |
| दात | दत्त | दिलेला |
| ,, | धित | तयार केलेलें |
| दातर् | दातृ, दातर् | देणारा |
| दातर् | धातृ, धातर् | ब्रह्मा, उत्पन्न करणारा |
| दान | धान | ठेवणारा |
| दान | धाना | धान्य |
| दार | धारा | धार |
| दारन | धारणा | टेका देणें ( ना. ) |
| दाहि | धासि | उत्पत्ति |
| दि | धा, धे | स्तनपान करणें |
| दिझ् | दिह् | बाधणें |
| दिव् | दिव् | प्रकाशणें |
| दिस् | दिश् | शिकविणें |
| हण्- दिस | सम्--दिश् | देऊन टाकणें |
| दिश | दिश् | दाखविणें |
| दी | धी, ध्यै | विचार करणें |
| दु | दु | एखाद्यास वाईट बोलणें |
| दु | धू | हलविणें |
| दुघ् | दुह् | दूध काढणें |
| दुघ्धर् | दुहितर् | मुलगी [ कारक |
| दुझित | दुरित | दुष्ट मार्गाचें, नुकसान |
| दुझुख्त | दुरुक्त | वाईट शब्द |
| दुझगइन्ति | दुर्गंधि | दुर्गंधियुक्त [वारा] |
| दुझ्वचङ्ह | दुर्वचस् | वाईट बोलणारा |
| दुन्मन् | धूम | धूर |
| दुश | दुष् | खराब होणें. |
| दुज् दुश | दुष्, दुस् दुर् | वाईट अर्थी उपसर्ग |
| दुश्कॆरेत | दुष्कृत | दुष्कृत्य |
| दुशमनङ्ह् | दुर्मनस् | खराब मनाचा |
| दुषिति | दूषित, दूषिता | त्रास, दुःख |

| अवेस्ता | संस्कृत | मराठी |
|---|---|---|
| दूत | दूत | दूत |
| दूर | दूर | दूर |
| दूरएपार | दूरपार | पार करण्यास कठिण |
| देरेतर् | धर्तर् धर्तृ | आधार देणारा |
| दो घो, | दो | कापणें |
| द्रओष | द्रोष | खोटें भाषण |
| द्रप्ष | द्रप्स | निशाण |
| द्रु | द्रु | पळणें |
| ,, | ध्रु | मजबूत होणें |
| ,, | द्रु | लांकूड, लाकडाची वस्तु |
| द्रुवश (ध्व?) | ध्रुव | अचल, सशक्त |
| द्रुज, द्रुग् | द्रुह | फसविणें, अपाय करणें |
| द्रुज् | ,, | फसविणारा, अपाय करणारा |
| अइविद्रुज् / अइवि-द्रुज् | अभि द्रुह् | करार मोडणें |
| द्व | द्व, द्वि, | दोन |
| द्वदसन | द्वादशन् | बारा |
| द्वदस | द्वादश | बारावा |
| द्वपइद्द | द्विपाश | शृंखलावद्ध |
| द्वर् | द्वर् | झाकणें |
| द्वर | द्वार | दार |
| द्विप | द्विप | दुःख देणें |
| द्वान् | ध्वन | झाकलेलें असणें |
| द्वाग् | ध्वग | पळून जाणें |
| न | न | नाहीं, खचित |
| नइरे-मनङ्ह | नृमनस | शूर |
| नइर्य | नर्य | बहादुरीचा |
| नइर्योसङ्ह | नराशंस | अग्नीचें व देवदूताचें नाव |
| नएम | नेम | अर्धा |
| नख्तु | नक्त | रात्र |
| नज | नह | बांधणें |
| नद् | निन्द | धिक्कार करणें |
| नना | नाना | निरनिराळ्या रीतीनें |
| नप्तर, नपत | नपात | नातू |
| नबा | नभस् | आकाश |
| नबि | नाभि | बेम्बी |
| नबानझ्दिश्त | नाभानेदिष्ट | जवळचे वारसदार भाऊ-बंद |
| नम् | नम् | वाकणें, नमस्कार करणें |
| नर, नर् | नर, नर् | मनुष्य |
| नव | नव | नवीन |
| नवइति | नवति | नव्वद |
| नवदस | नवदश | एकोणिसावा |
| नवदसन् | नवदशन् | एकोणीस |

| अवेस्ता | संस्कृत | मराठी |
|---|---|---|
| नवन् | नवन् | नऊ |
| नवसत | नवशत | नऊशें |
| नस् | नश् | नाहींसें होणें |
| नस् | नश | मिळविणें |
| नाइरी | नारी | स्त्री |
| नाउम / नओम | नवम | नववा |
| नाएदहा | नासा | नाक |
| नाएइहन् | ,, | ,, |
| नाओङ्हइथ्य | नासत्य | असुराचें नांव |
| नाओघ, (म्त्) | नासा | नाक |
| नाफ्य | नाभ्य | नातलग, नाभीसंबंधी |
| नावय | नाव्य | वाहणें (पाणी) |
| नि | नि | खालीं |
| निस्र | निज् | झाडून टाकणें |
| निण्द | निन्द् | हासें करणें |
| निर | नीर | पाणी, सूर्यास्त |
| निश, निश, | निस्, निष्, | बाहेर अर्थी उपसर्ग |
| नी | नी | मार्ग दाखविणें |
| उप-नी | उप-नी | नेणें |
| नुद् | नुद् | उठणें |
| नुर नूर, | नुर, नूर | आता |
| नु | नू, नु | हल्लीं |
| नेम, नेमङ्ह | नमस | नमस्कार |
| नामन् | नामन् | नाव |
| न्याएञ्च | न्यञ्च | खालीं जाणें |
| पइति | पति | मालक |
| पइति | प्रति | मागें, पुन्हा, प्रत्येक |
| पइतिवच् | प्रतिवचन | जबाब |
| पइतिश्ता | प्रतिष्ठा | मान, अन्न |
| पइतिश्तान | प्रतिष्ठान | पाऊल |
| पइरि | परि | सभोंवतीं |
| पइरिकर | परिकर | नागराचा वाटोळ्या पडलेला तास |
| पइरिवार | परिवार | कुंपण |
| पइरिथ्र | पृतना | लढाई |
| पउर्व | पूर्व | पूर्वी |
| पउर्वता | पर्वत | पर्वत |
| पच् | पच् | शिजविणें |
| पएसङ्ह | पेशस् | दागिना |
| फ्र-पच | प्र-पच् | भाजणें, शिजाविणें |
| पञ्चदस | पञ्चदश | पंधरावा |
| पञ्चदसन् | पञ्चदशन् | पंधरा |

| अवेस्ता | संस्कृत | मराठी |
|---|---|---|
| पञ्चन् | पञ्चन् | पाच |
| पञ्चासत् | पञ्चाशत् | पन्नास |
| पतर्, पितर्, | पितर् | बाप |
| पतर | पत्र, पतत्र | पंख |
| पतित | पतित | गुन्हेगार |
| पत् | पत् | पडणें |
| आ-पत् | आ-पत् | दौड करणें |
| उस्-पत् | उद्-पत् | पडणें |
| पइरि-पत् | परि-पत् | आजूबाजूला पडणें |
| फ्र-पत् | प्र-पत् | उडणें |
| हाम्-पत् | सम्-पत् | जोरानें पडणें |
| पथ् | पथ् | जाणें |
| पथन् | पथिन् | रस्ता |
| पथ्नी | पत्नी | बायको |
| पद् | पद् | पडणें |
| पध, पद | पद, पाद | कवितेंतील चरण |
| पयङ्हु | पयस् | दूध |
| पर् | पर् | निराश्रित करणें |
| ,, | ,, | शेवटास पोहोंचणें |
| पुर्, पर् | पूर्, पर् | भरणे |
| हाम्-पर् | सम्-पर् | काठोकाठ भरणें |
| पर् | पर् | उडणें |
| पर | पर, परा | दूर |
| परेन | पर्ण | पंख |
| परेस् | प्रच्छ् | प्रश्न करणें |
| पइति-परेस् | प्रति-प्रच्छ | पृच्छा करणें |
| पइरिपरेस् | परिप्रच्छ् | उलट प्रश्न करणें |
| हाम्-परेस् | सम्-प्रच्छ् | विचार घेणें |
| परेसु | पर्शु | फासळी ( ब्या ) |
| पंरेप् | पर्प् | पाणी शिंपडणें |
| पश्चश् | पराच, परांच् | मागें |
| पर्ष्टि | पृष्ठ | पाठ |
| पस् | पश् | बांधणें |
| अव-पस् | अव-पश् | जखडणें |
| पसु | पशु | चतुष्पाद जनावर, |
| पस्कात् | पश्चात् | मागें |
| पस्च | ,, | नंतर |
| पा | पा | बचाव करणें |
| पा, पि | पा | पोषण करणें |
| पात | पात | रक्षिलेलें |
| पातर् | पातर, पातृ | रक्षण करणारा |
| पाथ्र | पात्र | रक्षण |
| पाद | पाद, पद | भीन |
| पाध, पध | पाद | पाय |
| पामन् | पामन् | त्वचारोग |
| पायु | पायु | रक्षण करणारा |
| पार | पार | शेवट |
| पाश्न | पार्ष्णि | टाच |
| पिव्, पि | पीव | पोषण करणें |
| पिख् | पिञ्ज् | मुरडणे |
| पितु, पिथ्व | पितु | खुराक, अन्न |
| पिस् | पिश् | आकार देणें |
| ,, | पिस | भोसकणें |
| पिष् | पिष् | मारणें, ठोकणें |
| पु, पू | पु, पू | पवित्र करणें |
| पुथ्र | पुत्र | मुलगा |
| पुथ्रवन्त् | पुत्रवन्त् | पुत्रवान् |
| पुथ्रो-दा | पुत्रदा | पुत्र देणारा |
| पुसा | पुच्छ | मुकुट |
| पूइति | पूति, पूतिक | सडणें ( ना. ) |
| पेरेथु | पृथु | रुंद |
| पेरेथु श्रयङ्ह् | पृथु-श्रयस् | महासागराचें पाणी |
| पेरेन | पूर्ण | पूर्ण |
| पेरेनो-माएङ्ह | पौर्णिमा | पूर्णिमा |
| पेरेसु | पर्शु | बरगडी |
| पोउरु | पुरु | पूर्ण |
| पास्नु | पांशु, पांसु | धूळ |
| फ्रएश्त | श्रेष्ठ | पहिला |
| फ्रओख्त | प्रोक्त | बोललेलें |
| फ्रकर | प्रकर | धंदा |
| फ्रज़इन्ति | प्रजा | पुत्र, संतति |
| फ्रतेम | प्रथम | पहिला |
| फ्रथ् | प्रथ् | रुंद असणें |
| फ्रब्द | प्रपद | पावलाचा आतील भाग |
| फ्रमनङ्ह् | प्रमनस् | स्नेह वृत्तीचा |
| फ्रवाज़ | प्रवाह | वाट |
| फ्रवार | प्रवार | लांब भिंत |
| फ्रसस्ति | प्रशस्ति | शिकवण |
| फ्रस्न, फ्रश्न | प्रश्न | प्रश्न |
| फ्राप | प्राप | ( पावसाचें ) पाणी वाटणें ( ना. ) |
| फ्रायत | प्रयत | ठरलेला |
| फ्रिति | प्रीति | स्तुति |
| फ्रीन | प्रीण | प्रार्थना, आशीर्वाद |
| फ्रु | प्रु, प्लु | भिज्ञणें |
| ,, | प्लु | उडणें, जाणें |
| ,, | ,, | ओढणें |
| फ्राश् | प्राच् | पुढें |

| अवेस्ता | संस्कृत | मराठी |
|---|---|---|
| भ्रू | भ्रु भ्रु. | विझणें, जाणें भुगें, |
| पधु | प्सु | पाडणें |
| ब्रप | प्रिय | प्यार [ ओडणें |
| परस्तान | स्तन | स्तन |
| बएषज | भेषज् | उपाय |
| बओध | बोध बुद्धि | बुद्धि |
| बओधङ्ह | बुद्धि | ,, जीव |
| बङ्ह् | भास | प्रकाशणें |
| बङ्ह | भास, भाम | प्रकाश |
| बज् | भज्,भञ्ज् | फोडणें, विभागणें |
| बग | भङ्गा | भाग |
| बन्द् | बन्ध | बांधणें |
| बर् | भर् | नेणें, आणणें |
| आ बर् | आ भर् | ,, |
| फ्र बर् | प्र-भर् | वापरणें |
| हाम बर् | सम्-भर् | एकत्र आणणें |
| बर्, बरेन् | भर् | भोंक पाडणें |
| बरण्त | भरन्त् | घेऊन जाणें ( ना ) |
| बरन | भरण | ठेवणें( ना.) |
| बरज् | भ्राज् | प्रकाशणें |
| बरेज | बर्ह् | वाढविणें |
| बरेशिन् | बर्हिन् | बैठक, गालिचा |
| बरेस्मन | ब्रह्मन् | डाळिंबाच्या झाडाची डहाळी |
| बस्त | बद्ध | बांधलेलें |
| बा | भा | प्रकाशणें |
| बाहु | बाहु | हात |
| बानु | भानु | किरण |
| बानुमण्त | भानुमन्त | प्रकाशित |
| बाम | भाम | प्रकाश |
| बित्य | द्वितीय | दुसरा |
| बिद्, बिध | भिद् | मोडणें, तुकडे करणें |
| बिश् | द्विस | दुष्पट |
| बी | भी | भिवविणें |
| बुज | भुज् | देणें |
| बुझ,बूझ | बुक | बकरा |
| बुध | बुध | समजणें |
| बुन | बुध्न | तळ |
| बू | भू | होणें |
| पइरि–बू | परि–भू | अंतर्भाव करणें |
| फ्र–बू | प्र–भू | होणें, असणें |
| बूइरि | भूरि | विपुल |
| बूमि | भूमि | जमीन |
| बूष् | भूष् | भूषित करणें |

| अवेस्ता | संस्कृत | मराठी |
|---|---|---|
| बेरेत | भृत | आणिलेलें |
| बेरेतर् | भर्तृ | आणणारा, उत्तेजन देणारा |
| बेरेति | भृति | नजराणा |
| बाज | बह् | रागत करणें |
| ब्राज | बर्ह् | प्रकाशणें |
| ब्रातर् | भ्रातर् | भाऊ |
| ब्राम | भ्रम्, भ्रंश | चक्कर घेऊन पडणें |
| ब्रवत. | भ्रू | भुवई |
| मइति | मति | विचार |
| मइध्य | मध्य | मधला भाग, कमर |
| मइनि | मणि | कंठी |
| मएघ | मेघ | मेघ |
| मएघोकर | मेघकर | मेघ करणारी ( वाफ ) |
| मएझ | मेह | मूत्र |
| मएष | मेष | मेंढा |
| मओइरि | वम्रा, वम्री, वल्मी | मुंगी |
| मख्शि | मक्षिका | माशी |
| मगवन् | मघवन् | धर्मात्मा |
| मघ्न | नग्न | नागवें |
| मझ् | मह् | वाढविणें |
| मझ | मह, महा | मोठा |
| मझङ्ह् | महस् | महत्त्व |
| मझण्त् | महन्त् | विस्तृत |
| मझिश्त | महिष्ठ | सर्वांत मोठा |
| मझ्ग | मज्जा | चरबी |
| मण्तर् | मन्तृ | विचार करणारा |
| मण्तु | मन्तु | विचार |
| मत | मत | ,, |
| मत | स्मद् | सहित, सुद्धा |
| मद्, मध | मध | औषधोपचार करणें |
| ,, | मद् | मस्त होणें |
| मधु | मद, मधु | मध, मद्य |
| मधुमण्त् | मधुमन्त् | मद्यासह ( जेवण ) |
| मधेम | मध्यम | अगदीं मधला |
| मन् | मन | विचार करणें |
| मनङ्ह | मनस् | विचार, मन |
| मर् | मर् | मरण |
| मर् | स्मर् | हिशेब जमविणें |
| मरक | मरक | व्याधि |
| मरेझ | मर्ज् | स्पर्श करणे |
| मरेण्च् | मर्च् | ठार मारणें |
| मरेत | मर्त | मरणाधीन मनुष्य |
| मरेद् | मर्द् | चर्वण करणें |

| अवेस्ता | संस्कृत | मराठी |
|---|---|---|
| मरेद् | मर्ध् | खून करणें |
| मस्य | मत्स्य, मच्छ | मासा |
| मष्य | मर्त्य | मरणाधीन, मनुष्य |
| मा | मा | मोजणें |
| उप-मा | उप-मा | पुढें चालविणें |
| फ्र-मा | प्र मा | हुकूम करणें |
| मा | मा | नाहीं |
| माएङ्घ् | मास्, मास | महिना |
| मातर् | मातर् | आई |
| माह्य | मास्य | मासिक |
| मि | मि, | मापणें, पाहणें, मोजणें |
| मिझ् | मिह् | शिंपडणें, लघवी करणें |
| फ्र- मिझ् | प्र-मिह् | लघवी करणें |
| मित् | मिद् | प्रेम करणें |
| मिथ् | मेथ् | राहणें |
| ,, | मिथ | दुरावत करणें |
| मिथ | मिथ्या | खोटें |
| मिथ्र | मित्र | वि०नाम |
| मिथ्वन् | मिथुन | जोडी |
| मिद् | मिद् | मेहेरबानी करणें |
| मिव् | मीव् | लठ्ठ होणें |
| मुघ् | मुह् | तोडणें |
| मुच् | मुच् | सोडून देणें |
| पइति-मुच | प्रति-मुच | वर पसरणें |
| फ्र-मुच् | प्र-मुच | काढून टाकणें |
| मुद् | मुद् | मजा करणें, आनंदणें |
| मुश्ति | मुष्टि | मूठ |
| मूथ्र | मूत्र | मूत्र |
| मेरेति | स्मृति | स्मृति |
| मेरेथ्यु | मृत्यु | मृत्यु |
| मोउरु | मरु | शहराचें नाव |
| मोषु | मक्षु | जलद |
| माथ्र | मन्त्र | मंत्र |
| म्रुव् | भ्रुव् | जाणें, हलणें |
| म्रू | ब्रू | बोलणें |
| य | य | जो |
| यओइति | यूति | संयोग |
| यओन, उपस्त | योनि उपस्थ, | स्त्रीजननेंद्रिय |
| यओश्, यओझ्, योस् | | पवित्र |
| यश्ति | यष्टि | काठी |
| यङ्घ् | यम | प्रयत्न करणें |
| यझ् | यज | पूजा करण |
| यझत | यजत | पूजार्ह |

| अवेस्ता | संस्कृत | मराठी |
|---|---|---|
| यतार | यतर | दोहोंपैकीं कोणी तरी |
| यत् | यत् | जलदी करणें |
| यथ | यथा | जशा रीतीनें |
| यथ्र | यत्र | जेथें |
| यदा | यदा | जेव्हां |
| यम | यम | वश करणें |
| आ-यम | आ-यम | ताब्यात जाणें |
| फ्रयम | प्र-यम | ठरविणें |
| यम | यम | मिळणें |
| यव | यव | जिवाचा आधार |
| यव्वत् | यवन्त् | जितकें |
| यवन्, ग्वन | युवन् | तरुण |
| यस् | यच्छ | येणें |
| यस्न | यज्ञ | स्तुतिपर प्रार्थना |
| यस्न्य | यज्ञिय | स्तुतीस पात्र |
| यश्तर् | यष्टर्, यष्ट | आराधना करणारा |
| या | या | जाणें, चालणें |
| अइवि-या | अभि-या | वर जाणें |
| पइति-या | प्रति-या | विरुद्ध जाणें |
| या | या | मेहेरबानगी करणें |
| याह्, य , | यास | घालणें |
| ,, | यस् | काम करणें |
| यात | यात | वर्तणूक |
| यातु | यातु | जादू |
| यान | यान | देणगी |
| यास् | याच | याचना करणें |
| यिम | यम | विवस्व[ स्व ]न्ताचा |
| यु | यु | जोडणें [ मुलगा ] |
| युज् | युज् | बाधणें [ जोडणें ] |
| अप-युज | अप युज् | वियुक्त करणें |
| युझ् | युज | एकत्र असणें |
| युध | युध | लढाई करणें |
| यूइति | यूति | संबध |
| येधि, येझि | यदि | जर |
| येम | यम | जोडी |
| रइथ्य | रथ्य, रथ्या | मार्ग |
| रए | रै | दौलत |
| रएखेनङ्घ | रेक्णस | मूल्यवान वस्तु |
| रएवन्त् | रेवन्त् | श्रीमत |
| रओचङ्घ् | रोचिस् | प्रकाश |
| रओचन | रोचन | दिवसाचा प्रकाश, दिवस |
| रघ् | लङ्घ् | हलके होणें |
| रङ्घ् | रस् | स्तुति करणें |
| रजि | रंज | प्रीति करणें |

| अवेस्ता | संस्कृत | मराठी |
|---|---|---|
| रश् | रद् | सोडून देणें |
| ,, | राज् | जमाविणें, न्याय करणें |
| रमङ्ह् | रहम् | जंगल |
| रश्तित | रजिष्ट | खरा सत्यनिष्ठ |
| रतु | ऋतु | वेळ |
| रथ | रथ | रथ |
| रन् | रण् | खेतविणें |
| रन | रण | समरांगण |
| रप् | रभ् | हिरावून घेणें |
| रम् | रम् | आराम घेणें, तुष्ट होणें |
| आ-रम् | आ-रम् | ,, ,, |
| रम् | रम् | मारणें |
| रा | रा | देणें |
| रा | रा | अटकाव करणें |
| राइति | राति | नजराणा |
| राज् | राज् | राज्य करणें |
| राथ्नि | अरत्नि | एक माप |
| राद् | राध् | देणें |
| रादङ्ह् | राधस् | देणगी, आहुति |
| राम | राम | शांति, सुख |
| रि | री | स्रवणें, पाझरणें |
| रिच् | रिच् | रिकामें करणें |
| रिप् | रिप् | जखम करणें |
| रुच् | रुच् | प्रकाशणें |
| अइवि-रुच् | अभिरुच् | प्रकाशणें |
| आ-रुच् | आ-रुच् | ,, |
| रुध्, रुद | रुह् | वाढणें |
| ,, ,, | रुद् | रडणें |
| रुप् | लुप् | लुटणें |
| रू | लू | वेगळें करणें, कापणें |
| रेवुश् | लघु | हलकें होणें |
| रेन | रण | लढाई |
| वइरि | वारि | सरोवर |
| वइर्य | वार्य | पसंत |
| वएघ | वेग | ठोसा |
| वएज | बीज, वीज | मूळ बी |
| वएति | वेत्र | फांदी |
| वएस्मन् | वेश्मन् | वसतिस्थान |
| वओइरि | बरि | एक फळ ( ? ) |
| वक् | वङ्घ् | दुःख देणें |
| वख्श् | वक्ष् | वाढणें |
| वख्श्य | वक्षथ | वाढ |
| वङ्ह् | वस् | राहणें |
| ,, | ,, | झाकणें, [ कपडे ] घालणें |

| अवेस्ता | संस्कृत | मराठी |
|---|---|---|
| वङ्ह् | वस् | प्रकाशणें |
| ,, | ,, | पसंत करणें |
| वङ्हन | वसन | वस्त्र |
| वङ्हु | वसु | चांगलें |
| वङ्हुधा | वसुदा | देणगी देणारा |
| वच् | वच् | बोलणें |
| पइति-वच् | प्रति-वच् | जबाब देणें |
| फ्र-वच् | प्र-वच् | जाहीर करणें |
| वच् | वच् | वाणी |
| वचङ्ह् | वचस् | ,, |
| वज् | वह् | वाहून नेणें |
| अइवि-वज् | अभिवह् | उंच चढणें |
| आ-वज् | आ-वह् | पुढें जाणें |
| उज् वज् | उद्-वह् | उडणें |
| नि-वज् | निवह् | खालीं घेऊन जाणें |
| फ्रवज् | प्रवह् | नेणें |
| हांम्-वज् | सम्-वह् | बरोबर जाणें |
| वज् | वज् | मजबूत करणें |
| वज़न | वहन, वाहन | गति देणें ( ना. ) |
| वज़्य | वह्य | बोजा |
| वज्र | वज्र | गदा |
| वत् | वत् | जाणणें |
| वद्, वध् | वद् | हलणें |
| ,, ,, | वह | लग्न करणें |
| ,, ,, | वाध्, बाध् | मारणें |
| ,, ,, | उन्द् | ओलें करणें |
| वन् | वन् | जिंकणें, मारणें |
| ,, | ,, | प्रेम करणें |
| वना | वन | झाड |
| वन् | वप्, वे | विणणें |
| ,, | वप् | बी पेरणें |
| वम् | वम् | ओकणें |
| वयु | वायु | वारा |
| वर् | वर् | झांकणें, आश्रय देणें |
| हांम्-वर् | सम्-वर् | ,, पसरणें |
| वर् | वर् | प्रेम करणें, आवडणें |
| ,, | ,, | भरंवसा ठेवणें |
| ,, | ,, | प्रतिकार करणें |
| वर, उर्थ, | उरस् | छाती |
| वराज़ | वराह | डुकर |
| वर्क्, वरेक् | वृक, मच्छ् | चिरणें |
| वरेच् | वर्च् | प्रकाशणें |
| वरेचङ्ह् | वर्चस् | प्रकाश |
| वरेज् | वर्ह् | उद्योग करणें |

| अवेस्ता | संस्कृत | मराठी |
|---|---|---|
| वरेध, वरेद | वर्ध | फुलझाड रोप |
| वरे | वर्प् | पेरणें |
| वरेध्, वरेद् | वर्ध | वाढविणें |
| वरेष | वर्क्ष | झांकणें |
| वरेष | वृक्ष | जंगल, झाड |
| वस् | वश् | इच्छा करणें |
| वस्र | वस्त्र | कपडा |
| वहिश्त | वसिष्ठ | सर्वोत उत्तम |
| वा | वा | अथवा |
| ,, | ,, | वाहणें [ वारा ] |
| फ्र-वा | प्र-वा | फुंकणें |
| हांम्-वा | सम्-वा | एकदम एकत्र फुंकणें |
| वात | वात | वारा |
| वाम | वाभ | मारण्याचें हत्यार |
| वार् | वार् | पाऊस पडणें |
| वाइरि, वार | वार, वारि | वर्षाव |
| वार | वार | इच्छा |
| ,, | ,, | पंख |
| ,, | ,, | आसरा |
| वारेम्मन | वर्त्मन् | ,, |
| वाष | वह, वाह, वस्र | रथ |
| वि, वय, | वि | पक्षि |
| विज् | विज् | दुःख देणें |
| विद् | विद् | समजणें |
| आ-विद् | आ-वि | जाहीर करणें |
| नि-विद् | नि-विद् | बोलाविणें |
| पइति विद् | प्रति-विद् | खबर असणें |
| विद् | विद | मिळणें, पोहोंचणें |
| विध् | भिद् | मोडणें |
| विध्या | विद्या | विद्या, ज्ञान |
| विन् | वेण्, वेन् | पाहणें |
| विप् | विप्, वप् | बी पेरणें |
| विप् | विप् | पाणी शिंपडणें |
| विप | विप | वीप |
| विश् | विष् | ,, |
| वी | वी | पडणें, उडणें |
| वी | वि | दूर, विरुद्ध |
| वीत | वीत | गेलेला |
| वीतस्ति | वितस्ति | वीत |
| वीद् | विद् | ज्ञान |
| वीवरेध्वन् | विभूत्वन् | प्रसिद्ध |
| वीर | वीर | वीर |
| वीरजन् | वीरहन् | वीराला मारणारा |
| वर्यि | वीर्य | वीरपुत्र, वीर्यवान् |

| अवेस्ता | संस्कृत | मराठी |
|---|---|---|
| वीवङ्हवत् | विवस्वत् | जमशेद राजाचा बाप |
| वांस् | विस | होणें, असणें |
| ,, | ,, | रस्तें, रस्ता |
| वीसत, वीसइति | विंशति | वीस |
| वीसांस्तेम | विंशतितम, विंश | विसावा |
| वीस्प | विश्व | सर्व, |
| वीस्पइति | विश्पति | गांवाचा धनी |
| वेरेथ्रघ्न | वृत्रहन् | मित्र, विजयी |
| वेह्र्क | वृक | लांडगा |
| वोइघ्ना | विघ्न | विघ्न |
| वोउरु | उरु | रुंद, मोठा |
| वोउरु—गओयओइति | उरु-गव्यूति | रुंद कुरणाचा मालक |
| वोहुन, वोहुनि | वसा | रक्त, ऋतुस्राव |
| व्यच | व्यच | कप |
| व्यरेथा | व्यर्थ | घाण |
| व्रच | व्रश्च् | नाश करणें |
| सउर्व | शर्व | अमर्वैयांचा शत्रु, असुर |
| सख् | शिक्ष् | शिकणें |
| सङ्ह् | शंस्, शास् | बोलणें |
| अइवि-सङ्ह् | आभि-शंस् | शाप देणें |
| सङ्ह | शंसा | शिक्षण |
| सच | शक् | शिकणें |
| सत | शत | शंभर |
| सतौ—दार | शतधार | शंभर अंगें असलेली [ गदा ] |
| सद् | शाध् | नुकसान करणें |
| सफ | शफ | खूर |
| सम् | शम् | शांत होणें |
| सर् | शर् | मोडणें, दुखापत करणें |
| सर, सार | शिरस् | डोकें |
| सरेध | शरद, शरदा | सौर वर्ष |
| सरेध | शर्धस् | तऱ्हा |
| सवङ्ह् | शवस् | नफा, सुख |
| सा | शा | नाश करणें |
| साएङ्ह् | शास् | शिकविणें |
| साम | श्याम | काळा |
| सास्तर | शास्तर् | राजा |
| सास्ना | शासन | मत, धार्मिक आज्ञा |
| सिक्ष | शिक्ष् | शिकणें |
| सिप्, सिफ् | क्षिप् | पालथें करणें |
| सिप् | क्षिप् | सोडून देणें |
| सी | शी | निजणें |

णाऱ्या गोष्टी म्हणजे वैदिक वाङ्मय, ब्राह्मण जाति, व यज्ञसंस्था या तीन होत या तिहींचा अन्योन्याश्रय निकट आहे तो वेदविद्येंत सविस्तर दिला आहे त्यांतील मुख्य गोष्टी येणेंप्रमाणें मांडता येतील वैदिक वाङ्मयाची घटना अशी सांगता येईल कीं आज जें चार संहिता व ब्राह्मणें असें पृथक् स्वरूप आहे तें ऋग्वेदाचें तृतीयसंहितीकरण असावें संहितीकरणें एकंदर तीन झालीं असावीं. पहिलें संहितीकरण जेव्हा ऋक्सामयजु असें वर्गीकरण ऋग्मंत्रातच दिसून येतें त्या काळचें होय दुसरें संहितीकरण परंपराप्रसिद्ध व्यासाचें संहितीकरण असावें तिसरें संहितीकरण व्यासशिष्यकालीन असावें दुसरें व तिसरें यांत अर्थात् अंतर फारसें नसावें आणि जरी या दुसऱ्या व तिसऱ्या संहितीकरणाच्या कालामध्यें वेदाच्या निरनिराळ्या शाखा बांधल्या गेल्या असाव्या तरी तो काल यज्ञसंस्थेच्या विकासाचा नसून अवनतीचाच होता असें म्हटलें पाहिजे. एवढेंच की ही संस्था मरतां मरता थोडी भरभराटली असावी हाच काल आरण्यकीय धर्माच्या उदयाचा काल होय, हाच काल ब्राह्मणसंघाचें वर्गस्वरूप जाऊन जातिस्वरूप मिळण्याचा काल होय, आणि हाच काल शाखावैशिष्ट्याचा व शाखानुरूप नवीन गृह्यनिर्माण करून तेंच जातिवैशिष्ट्य करणाच्या प्रारंभाचा काल होय

ऋग्मंत्रकालीं दैनिक अग्निहोत्रामध्यें सोम दिसत होता तो सोम दुर्मिळ होत जाऊन दैनिक अग्निहोत्रातून तर गेलाच, परंतु प्रसंगोपात्त होणाऱ्या मोठ्या यज्ञातून देखील सोम नाहींसा होऊन सोम न मिळाल्यास कोणती तरी वल्ली वापरण्यास प्रारंभ होऊं लागला हें वस्तुतंत्र यजुर्वेदात व ब्राह्मणांत दिसून येतें इतका सोमवल्लीचा यज्ञसंस्थेच्या इतिहासाशीं संबंध देता येईल

घरोघरचें दैनिक अग्निहोत्र अप्रिय किंवा लुप्त होऊं लागलें अशी स्थिति ऋग्मंत्रांत दृष्टीस पडते, व त्यामुळ मोठमोठ्या यज्ञास सार्वजनिक वर्गण्या घेऊन सुरवात झाली, आणि लहान यज्ञाचे मोठे यज्ञ बनले म्हणजे त्रैविद्याच्या धंदेवाईक अस्तित्वास जागा उत्पन्न झाली ज्या अर्थी इष्टीचें व पशूचें हौत्र ऋग्वेदावरील ब्राह्मणांत नाहीं, व तें यजुर्वेदांत आहे त्या अर्थी मोठ्या सोमयागाची कल्पना उद्भवल्यानंतर ऋग्वेदाच्या संहितीकरणास प्रारंभ झाला असावा असें दिसतें ऋग्वेदाचें दहावें मंडळ जेव्हा अथर्व्यांनीं गृह्य हिसकावून घेण्याची मसलत निघाली असावी त्यावेळचें दिसतें. गृह्यास उपयोगी पडणारे मंत्र दहाव्या मंडळातच आहेत इतरत्र फारसे नाहींत ऋत्विग्वर्गांत दोन मुख्य स्पर्धा दिसतात एक स्पर्धा त्रैविद्य व अथर्वे यांची, व दुसरी स्पर्धा कृष्णयजुर्वेदी व शुक्लयजुर्वेदी अध्वर्यूंची अथर्व्यांनां मागून बाहेर पडलेल्या शुक्लांनीं प्रसंगीं हातात घेतलें असावें असें दिसतें. कारण वैतानसूत्र व पारस्कर यांचा गट्टी दिसते अथर्व्यांचा प्रवेश यज्ञसंस्थेंत बऱ्याच उशीरा झाला असावा असें वाटण्यास प्रमाण म्हणून अथर्वांतील हौत्रउत्तरभागांत विनाव्या काण्डांत आहे असें देतां येईल आणि ते सर्व ऋग्वेदांतीलच मंत्र आहेत हेंहि आणखी प्रमाण म्हणून देतां येईल

ऋग्वेदांतील मंत्रामध्येंच अनेक स्तोते एकत्र मिळून प्रार्थना करीत आहेत असें चित्र वारंवार येतें आणि त्या स्तोत्यांत कांहीं तरी प्रकार होते असेंहि दिसतें त्यांत गायत्री, अर्की, होते, ब्रह्मे हे मुख्यत्वानें सांगतां येतील आणि त्या वेळेस या सर्वांचें स्वरूप जवळ जवळ सारखेंच असावें, पुढें स्पर्धेमध्यें होते व ब्रह्मे टिकले, व अर्की व गायत्री हे लयास गेले असें दिसतें होता या शब्दाचा अर्थ अध्वर्यूच्या आदेशानें हौत्रवाक्य म्हणणारा किंवा आव्हान करणारा असा नसून हवन करणारा किंवा मुख्यत्वानें हवन करणारा असा होता असें दिसतें (वेदविद्या पृ ३७३–३७८) दुसऱ्या भागांत दिलेल्या उताऱ्यावरून असें दिसून येईल कीं, होता यांतील हु धातूचा जितका आव्हानार्थी अर्थ निघेल तितकाच हवनार्थीहि अर्थ निघेल. अध्वर्यु हें पद शब्दाच्या स्वरूपावरूनच कर्मविशिष्ट न दिसता पदवीविशिष्ट दिसतें, त्यामुळें त्यांचे उल्लेख चारहि वेदांतून फार थोड्या वेळा आलेले आहेत हा अध्वर्यूंचा वर्ग होत्यांतूनच निघाला असावा, आणि प्रमुखत्वानें काम करणारा म्हणून अध्वर्यु म्हणवून घेत असावा याचेंहि पहिलें भांडवल बरेंचसें ऋचाच्या स्वरूपात असावें आणि तें आज याजुषहौत्र म्हणून शिल्लक असावें सर्वच क्रिया अगदीं प्रारंभीं समंत्रक नसाव्या ज्यावेळेस मोठमोठे याग करावयाचे असतील त्यावेळेस एकेक क्रिया समंत्रक होऊं लागली असावी या वेळेस एकानें जर यज्ञांतील प्रत्येक क्रिया नियमबद्ध व मंत्रबद्ध करण्याकडे आपलें लक्ष घातलें तर दुसऱ्यानें अधिकाधिक स्तोत्रमंत्राचा संचय करण्याकडे लक्ष घातलें होत्यांची जी यज्ञसंस्था असेल तींत बरेचसे मंत्र म्हणून अग्निसमर्पण करण्यात येत असेल तर अध्वर्यूंच्या क्रियेमध्यें कर्मवैचित्र्य असल त्यांनीं कर्मवैचित्र्याकडेच लक्ष ठेवून आणि सोम दुर्मिळ होत असल्यामुळें सोमाशिवाय यजनपद्धति निर्माण करून, 'सप्तहवि संस्था' निर्माण केल्या, आणि त्या करताना दुसऱ्या वर्गांची फारशी मदत घेतली नसावी 'सप्तसोमसंस्था' ज्या वेळेस उत्पन्न झाल्या त्या वेळेस मात्र इतर लोकांची जरूर लागली होता आणि अध्वर्यु यांचें एकीकरण अर्थात् सोमसंस्थामुळें झालें एवढेंच नव्हे तर प्रत्यक्ष ऋग्वेदाची मांडणी देखील सोमसंस्थास अनुरूप करण्यात आली म्हणजे दर्शपूर्णमास, पशु यांचें हौत्र यजुर्वेदातच आहे ऋग्वेदांत नाहीं सोमसंस्थेमध्यें मात्र होत्याप्रमाणेंच उद्गात्यालाहि आमंत्रण करण्यांत आलें आहे हात्याच्या संघामध्यें जे आज यज्ञसंस्थेंत ऋत्विज् दिसतात ते त्यांची यज्ञसंस्था निराळी होती अशा स्थितींतच अस्तित्व दाखवितात जो यज्ञांतील मुख्य मनुष्य, तो प्रेष देणार, तोच प्रशास्ता, परंतु जेव्हा अध्वर्यू व होते या दोघांचें एकीकरण झालें तेव्हा मुख्य पदवी 'होता' ही कायम राहिली व प्रशास्ता

या पदवीऐवजी मैत्रावरुण ही पदवी झाली असावी. म्हणजे होत्यापैकीं जो समुच्चय अध्वर्युप्रधान सोमयागाला मिळाला त्यातील होतृसहाय्यकांत प्रैष देण्याच्या कामानें महत्त्वच कमी करण्यांत आलें. ब्रह्मे हे देखील निराळ्याच यज्ञपरंपरेतील होते. ब्रह्मयाचे सहाय्यक स्वतंत्र आहेत व त्यातहि हौत्र व आध्वर्यव करणारे आहेत. ब्राह्मणाच्छंसी हा ब्रह्मयाचा मनुष्य, पण कर्म करतो हौत्राचें. आग्नीध्र हा ब्रह्मयाचाच सहाय्यक पण कर्म करतो आगमेहेनतीचें, अध्वर्युसारखें. पोता हाहि ब्रह्मयाचा मदतनीस पण याचें कर्म होत्यासारखें आहे. ज्या पद्धतीनें होते अध्वर्युप्रधान यज्ञसंस्थेत शिरले आणि त्याचे मदतनीस आपल्या कामाचें स्वरूप न बदलता प्रविष्ट झाले म्हणजे वस्तुतः अध्वर्यु इत्यादींचे सहाय्यक बनून देखील नावानें मात्र होत्याचे साहाय्यक राहिले, तीच क्रिया ब्रह्मयास त्रैविद्याच्या यज्ञसंस्थेत स्थान मिळाल्यानें झाली. ही अध्वर्यूंची व *ब्रह्मयाची एकी झाली ती बराच काळ स्पर्धा झाल्यानंतरच* झाली. त्या स्पर्धेमध्यें ब्रह्मयानीं सोमयागाची अनवश्यकता वगैरे सांगून अध्वर्यूंच्या कामाला हरकत केलीच. ब्रह्मयाची यज्ञसंस्था राजाश्रयानें चालत असावी व अध्वर्यूंची लोकाश्रयावर चालत असावी. यामुळें अध्वर्यूंस ब्रह्मयास आपल्यात घेण्याची इच्छा स्वाभाविकच झाली. तथापि ब्रह्मयास लोकसमाज अध्वर्यूंकडेच जास्त वळतो व अध्वर्यूंच्या यज्ञसंस्थेत लोकाकर्षक भागहि बराच आहे ही गोष्ट पटली असावी व त्याशीं समेट करण्याची इच्छा झाली असावी. अध्वर्यूंनीं ब्रह्मयास महत्त्वाचें स्थान दिलें. परंतु मुख्य व्यवस्थापकाचें काम आपणाकडेसच ठेविलें अध्वर्यूंनीं कित्येक लहानसहान क्रियास सोमसंस्थाचें स्वरूप *दिलें आणि अशा रीतीनें त्या क्रिया ब्रह्मयाच्या ताब्यातून आप*णाकडे घेतल्या, याला व्रात्यस्तोमाचें उदाहरण देता येईल, असो.

यज्ञसंस्थातील अंतस्थ घटनेसंबंधानें हें विवेचन झालें. संस्थाचें पौर्वापर्यहि माडण्यात आलेंच आहे. आता सत्रविषयक विचाराचें पुनर्निरूपण करूं. सत्रें हीं प्राचीन मान्त्रलोकाचीं नसावींत असें वाटतें. सत्र शब्द तशा अर्थानें ऋग्वेदात नाहीं. सत्रें या शब्दाचा समुच्चयात्मक स्थान इतपत अर्थ फार तर ऋग्वेदात आलेल्या उदाहरणातून काढतां येईल. सत्रें शुक्ल यजुर्वेदात दिलीं नाहींत व कृष्णयजुर्वेदात देखील त्याची माडणी फार पुसट पुसट आहे. त्यावरून सत्रें फारशीं प्रचारात नव्हतीं असें म्हणता येईल. *लोक फिरते असताना जी क्रिया स्वाभाविकपणें होई ती* क्रिया पाचपन्नास मंडळींनीं एकत्र बसून करावयाची हें मुख्य सत्रस्वरूप होय. सामुच्चयिक अग्न्युपासना ऋग्वेदात दृष्टीस पडते, तिचें एक विशिष्टीकरण जर सोमयागाच्या रूपानें

दक्षाइकाकडून झालें तर सामान्यांकडून सत्ररूपानें झालें. सामान्य जनास आपण एकत्र होऊन कांहीं क्रिया करावयाची इच्छा उत्पन्न झाल्यास, ती कृति करावयाची तें सत्ररूपात अर्थात सर्वसामान्यांनीं जमून तें केलें असल्यामुळें दक्षिणा नाहीं, यजमान ऋत्विज् ही भिन्नता नाहीं व त्याचा कार्यक्रम विशेष विशिष्टीकरण पावला नाहीं, व नियमानींहि बद्ध झाला नाहीं. कृष्णयजुर्वेदामध्यें मात्र सत्रात त्याच्या वाढलेल्या संख्याप्रमाणें दररोज याग करावेत असें सांगितलें आहे. लो. टिळकानीं सत्राच्या मुदतीचा संबंध तितक्या मुदतीचा दिवस असावा असा लावून त्यावरून उत्तरध्रुवात्मक मूलस्थानाच्या कल्पनेस तो आधार म्हणून दिला आहे.

समाजाचा इतिहास लिहिण्यासाठीं अनेक प्रकारच्या पद्धती वापरल्या जातात. त्या पद्धतींचें याथातथ्य ज्ञान करून देण्याचें हें स्थान नव्हे. त्याचें कांहीं दिग्दर्शन पहिल्या विभागाच्या तिसऱ्या प्रकरणात केलें आहे. त्यामध्यें प्राचीन भारतीय व प्राचीन भिन्नस्थलीय भाषाचा तौलनिक अभ्यास, संस्कृत भाषेचा ऐतिहासिक अभ्यास व भिन्नकालीन भारतीय भाषाचा तौलनिक अभ्यास, प्राचीन कालाच्या अवशिष्ट वस्तूंचा अभ्यास उ. मोडकीं देवळें, जमीनीखालीं गाडलेलीं शहरें, राजवाडे वगैरेंचा स्थावरजंगम लिखाणाचा अभ्यास, मुद्राविज्ञान, तसेंच भारतीय संस्कृतीचा ज्या इतर भाषावर परिणाम झाला असेल त्या इतर भाषाचा अभ्यास, संस्थारूप अवशेषाचा अभ्यास ( उ. जातींचीं नावें, कुलदेवता इ. ) तसेंच दैवतें, कल्पना, विचार, तत्त्वज्ञान इत्यादिकावर अभ्यास म्हणजे तौलनिक दैवतशास्त्र इत्यादींचें स्वरूप वर्णिलें आहे. आणि या सर्व प्रकारच्या अभ्यासापासून उत्पन्न होणारें ज्ञान तेंहि माडलें आहे. उदाहरणार्थ तौलनिक दैवताभ्यास दुसऱ्या विभागात दैवतेतिहासाबरोबर दिला आहे भारतीय व अन्यस्थलीय भाषाच्या अभ्यासापासून जी इतिहासज्ञानप्राप्ति होते ती *मूलगृहकालीन व पर्शुभारतीय संस्कृतीच्या वर्णन*कालीं माडलीच आहे. स्थावरजंगम लिखाणें व मुद्राविज्ञान याच्यापासून होणारी फलप्राप्ती, जे ऐतिहासिक राजावलीचें व कथासूत्राचे धागे, त्याचेंहि फल प्रसंगानुसार माडलेंच आहे. द्राविडी भाषेतील शब्दसंग्रहाचा अभ्यास हा ऐतिहासिक पद्धतीनें करून त्यापासून उत्पन्न होणारी फलश्रुति ही मात्र फारशी माडली गेली नाहीं. याचें कारण या इतिहासावर फारसा परिश्रमच झाला नाहीं. संस्कृत भाषेचा ऐतिहासिक अभ्यास करून त्यापासून जी इतिहासप्रगतीची माडणी करावयाची त्या माडणीचें प्रारंभस्थान वेदकालीन शब्दाचा साकल्यानें अभ्यास होय. हा अभ्यास प्रस्तुत विभागात पहिल्या प्रथमच माडला गेला आहे आणि भविष्यकाळीं या *अभ्यासाची पद्धतशीर वृद्धि होईल अशी अपेक्षा आहे.* वेदकालीन शब्दसंग्रहाचें साकल्यानें ज्ञान झाल्याशिवाय भाषेच्या ऐतिहासिक अभ्यासाच्या कल्पना व्यर्थ आहेत. आणि यासाठीं प्रस्तुत विषयाचा प्रारंभ म्हणून आम्ही त्याकडे पराविशीं पृष्ठें दिलीं आहेत. शब्दसंग्रहाचा जो ऐतिहासिक अभ्यास व्हावयाचा त्याचे प्रकार मुख्यतः दोन आहेत. नवीन शब्द आपणास कोणते आले हें पूर्वीच्या

शब्दाच्या मादींकडे लक्ष देऊन पाहावयाचें. आणि जुन्या शब्दाचें अर्थांतर कसकसें होत गेलें हें पहावयाचें. या दोन प्रकारच्या अभ्यासांनीं स्थित्यंतरामुळें बदललेली सामाजिक व सांस्कृतिक परिस्थिति लक्षांत येते. असो.

संस्कृतसंभव भाषाचा, निदान संस्कृतसंभव म्हणून समजल्या जाणाऱ्या भाषाचा,ऐतिहासिक अभ्यास होण्यास आवश्यक साधन शब्दसंग्रहाचे प्रयत्न होत. ते प्रयत्न बरेचसे झाले आहेत आणि बऱ्याचशा प्राकृत समजल्या जाणाऱ्या भाषाचे कोशहि झाले आहेत. आता उत्तरकालीन भाषाच्या शब्दाचें व्युत्पादन करण्याचे प्रयत्नहि चालू आहेत. त्या भाषाचें व्याकरणहि अभ्यासिलें जाऊन त्याचा संस्कृत व्याकरणाशीं संबंध पाहण्याचें काम चालू आहे. राजवाड्याचें ज्ञानेश्वरीचें व्याकरण हा एक त्या प्रकारच्या अभ्यासाचा उत्कृष्ट नमुना होय.

ऐतिहासिक विवेचनामध्यें आपण एकाच प्रगतीच्या दोन भिन्न कालातील अवशेषाची तुलना करूत प्रगति मोजतों. किंवा दोन भिन्नस्थलीय भिन्न लोकाचे अवशेष तुलनेकरितां घेतलेच तर ते त्या दोहोंपासून त्याच्या पूर्वीचें स्वरूप अवगमिण्याकरितां ते तुलनेस घेतों. यात सदोष अनुमानाला जागा कमी असते. परंतु याहून जराशी अधिक सदोष परंतु वापरली गेलेली तौलनिक पद्धति म्हटली म्हणजे प्रगत व रानटी लोकाचे आचार व संस्था घेऊन त्या रानटी लोकाच्या आचारापासून प्रगत लोकाचे आचार उत्पन्न झाले असावे अशा तऱ्हेची कल्पना करून संस्थाच्या इतिहासाची मांडणी करणें होय. आपण सुधारलेले लोक त्याच रानटी स्थितींतून विकास होत होत सुसंस्कृत स्थितीस येऊन पोंचलों तर आजच्या रानटी लोकाचे जे आचार विचार असतील तेच आपल्या पूर्वजाचे असतील आणि त्यापासून आजचे सुधारलेले आचार विचार विकास पावले असतील अशा प्रकारची कल्पना करून निरनिराळ्या मानववंशातील व जातींतील धार्मिक, सांस्कारिक, राजकीय व गृह्य संस्थाचा इतिहास मांडण्यांत आला आहे, बाकोफन, मॉर्गन वगैरेंनीं या प्रकारच्या इतिहासास प्रारंभ केला त्याच प्रकारच्या अभ्यासास पुढें इतर लेखकानीं विस्तृत स्वरूप दिलें. स्पेन्सरचा 'समाजशास्त्राचीं मूलतत्त्वें' हा ग्रंथ याच प्रकारचा आहे आणि वेस्टरमार्कचे विवाहसंस्थेच्या इतिहासावरील ग्रंथ व नैतिक कल्पनाच्या इतिहासावरील ग्रंथ याच प्रकारचे आहेत. बुद्धपूर्व जगातील चर्चेस घेतलेल्या राष्ट्राच्या इतिहासामध्यें आजच्या सुधारलेल्या बहुतेक संस्था पूर्णपणें संस्थापित झालेल्या दिसतात. तेव्हा वन्य व नागरिक याच्या तौलनिक अभ्यासापासून जो इतिहासभाग निघेल तो त्यापेक्षाहि प्राचीन काळचा असावा, फार तर त्यावेळच्या आज प्रगत म्हणून समजल्या जाणाऱ्या लोकाच्या पूर्वजाचा पण त्या वेळेस अप्रगत असलेल्या लोकाचा तत्कालीन इतिहास असावा असें म्हणण्यास हरकत नाहीं.

इजिप्त व असुर येथील लोकाचा प्राचीन इतिहास ख्रिस्तपूर्व आठ हजार वर्षांपूर्वीपासून सुरू होतो, आणि त्या कालापासून आपणास अमर्ना लेखाच्या कालापर्यंतचें म्हणजे भारती युद्धाच्या कालापर्यंतचें त्या राष्ट्राचें ज्ञान अधिकव्यवस्थित आहे. दाशराज्ञयुद्धकाल आपण घेतला तरी तो ख्रिस्तपूर्व अडीच हजार वर्षाच्या पलीकडे नेता येत नाहीं. सुदासदिवोदासाच्यापूर्वीची राजावली आपण घेतली तर ती फार तर हजार पंधराशें वर्षे आणखी पाठीमागें आपणास पोंचवील. जास्त पोंचवूं शकणार नाहीं. म्हणजे फार तर ख्रिस्तपूर्व तीन हजार वर्षांपर्यंत आपणास नेईल. इतकें जरी झालें तरी अत्यंत अनुमानानें काढलेल्या प्राचीनतम भारतीय कालापूर्वी चारपाच हजार वर्षें पाश्चमेकडे दोन मोठ्या संस्कृती नांदत होत्या असें स्पष्ट दिसून येईल. पर्शुभारतीयकाल आणि मूलगृहकाल या कालाचा आपणास आज अजमास करताच येत नाहीं परंतु असें म्हणता येईल कीं, ज्या वेळेस या आर्यन् राष्ट्राची प्राचीनतमस्थिति केवळ शब्दसादृश्यावरून काढावयाची आहे व ज्या काळामध्यें आर्यन राष्ट्रें भटकींच होतीं त्या वेळेस असुर्य व इजिप्त या दोन राष्ट्राचीं संस्कृति चागलीच वाढली होती; व ज्या वेळेस ऋग्वेदमंत्ररचना झाली असेल कीं नसेल याविषयींच संशय आहे त्यावेळस असुरियामध्यें शासनपद्धति इतकी सुधारली होती कीं, त्याचा कायदा लेखनप्रविष्ट झाला होता एवढेंच नव्हे, तर त्याचा ग्रथहि [ हमुरबीचें कोड ] करण्यात आला होता. एवढेंच नव्हे तर हमुरबीच्या कायदेसंग्रहात व्यावहारिक कायद्यापासून आचारविचार गोष्टी पृथक् होऊन व्यावहारिक गोष्टीच केवळ कायद्याचा विषय झाला होता. इतकी सुधारणा प्रत्यक्ष रोमन लोकामध्यें बारा नियमाच्या काळापर्यंत झाली नव्हती. आणि भारतामध्यें तर जोराजनिर्मित शासनावलीचा संग्रहच कधीं झाला नाहीं. काहीं व्यावहारिक नियमाचा संग्रह झाला तो धर्मशास्त्रकार अर्थशास्त्रकार याच्याकडूनच झाला. मोठमोठ्या इमारती, मोठमोठे मनोरे या बाबतींत देखील अत्यंत प्राचीन अवशेष या दोन संस्कृतींत जसे उपलब्ध होतात तसे आपल्याकडे उपलब्ध नाहींत. व आपल्याकडे अशोकपूर्व लेखहि उपलब्ध होत नाहींत असें म्हटलें तरी चालेल. म्हणजे भौतिक सुधारणाच्या बाबतींत प्राचीन आर्यन् याच्या पेक्षा असुर व मिसरी याची संस्कृति अधिक जुनी व अधिक उच्च होती असें म्हटल्याशिवाय गत्यंतर नाहीं.

तुर्कस्थानातील अस्कलॉनमध्यें खोदकामात जे अवशेष सांपडले (टाइम्स ऑफ इंडिया२८-५-२१) त्यामध्यें सर इतक्या मोठ्या मूर्ती आढळल्या कीं त्या मूर्तीचे तळपाय एकमाराहून मोठे आहेत. अस्कलॉन शहराचा भरभराटीचा काळ म्हणजे ख्रि. पू. चवदावें शतक होय. इकडेच म्हणजे १८-९-२१ च्या सुमारास( त्या तारखेचा टाइम्स ऑफ इंडियाचा अंक पहा) सर आर्थर इव्हेंन्स यानीं बाहेर काढलेल्या इजिप्तनसंस्कृ-

नीच्या चित्रकलेविषयीं वर्णन आलें आहे. व त्यावेळचीं कांहीं चित्रेंहि सापडलीं आहेत त्यांवरून तत्कालीन पशुपक्ष्यांविषयीं फार सुंदर माहिती मिळते. त्याच पत्राच्या २९-८-२१ च्या अंकांत लंडनहून आलेल्या तारेमध्यें फ्रान्समध्यें प्राचीन कालीं असलेल्या मूर्तिशिल्पाचें ज्ञान दाखविणारा एक संग्रह सापडल्याचें प्रसिद्ध झालें आहे. त्यामध्यें उत्तम अनेक पशुपक्ष्यांचीं सुंदर कोरणीचीं चित्रें आहेत, त्यांपैकीं बरेच प्राणी आज नष्ट झाले आहेत. तीं चित्रें कोणत्या कालीं काढलीं असावीं याविषयीं निश्चय झाला नाहीं, पण तो काळ वीस हजारापासून पंचवीसहजार वर्षांपूर्वीचा असावा अशी कल्पना केली गेली आहे.

या सर्व गोष्टींवरून असें दिसतें कीं, असुरीमिसरी संस्कृतीच भौतिक बाबतींत भारतीय संस्कृतीच्या पुढें आहे एवढेंच नाहीं तर ग्रीस फ्रान्स येथील संस्कृती हि भौतिक बाबतींत भारतीय संस्कृतीच्या पुढें आहे.

पर्शूंची संस्कृति व भारतीयांची संस्कृति, यांची तुलना केली तर आपणास असें म्हणता येईल कीं, राजकीय सत्तेची घटना आणि साम्राज्यविस्तार याच्या बाबतींत पर्शूंचें महत्व खिस्तपूर्व सहाव्या शतकापासून ते मुसुलमानी उदयापर्यंत होतें. परंतु बुद्धपूर्वकालीं यांचें राजकीय महत्त्वहि फारसें नसावें. बुद्धोत्तरकालीं एवढेंच म्हणता येईल कीं मागधांच्या पराक्रमकालापेक्षा पर्शूंचा पराक्रमकाळ २०० वर्षें अधिक अगोदर येतो. परंतु अलेक्झांडरच्या नेतृत्वाखालीं ग्रीक सैनिकापुढें पर्शियन लोकांस टिकाव धरता आला नाहीं. आणि स्पष्ट राजसत्तेचें क्षेत्र अशोककालीन राजसत्ताक्षेत्रापेक्षां कधींच मोठें नसावें. पर्शूंना रोमन साम्राज्याशीं लढता लढता जरी आपलें महत्त्व कायम टिकवता आलें तरी त्यांची एकंदर राजकीय करामत भारतीय सम्राटांपेक्षां अधिक होती असा निर्णय देववत नाहीं. सांस्कृतिक दृष्ट्या त्यांचें एकंदर कार्य भारतीय कार्यापेक्षा कमी महत्वाचें व अधिक उत्तरकालीन होतें असें म्हटलें पाहिजे. झरथुष्ट्र हा बुद्धपूर्वकालीन होता असें साधनानें सिद्ध झाल्याचें आम्ही समजत नाहीं. शिवाय पर्शूंमध्यें वेदांगादि शास्त्रांचा विकास मुळींच झाला नाहीं म्हणून त्या बाबतींमध्यें पर्शूंना प्राचीन भारतीयांपेक्षां उच्चतर संस्कृतीचे वाहक किंवा जनक असें म्हणता येणार नाहीं. सूतसंस्कृतीशीं समकालीन इराणी संस्कृति काय असावी याविषयीं अनुमानसुद्धां करतां येत नाहीं; एवढेंच नव्हे तर पर्शूंच्या राजावलीचा व निश्चित इतिहासाचा प्रारंभ शैशुनागांपेक्षां पूर्वी नाहीं.

---

## परिशिष्ट.

## जैनवाङ्मय.

**बौद्ध व जैन संप्रदाय** — बौद्ध धर्मग्रंथांमध्यें गौतम बुद्धाचा एक प्रतिस्पर्धी म्हणून "नीगंठनातपुत्त" या नांवाचा वारंवार उल्लेख आला आहे. अर्थात् हा उल्लेख सुप्रसिद्ध महावीर या जैनधर्मसंस्थापकाचा होय, यांविषयीं बिलकुल संदेह नाहीं. गौतमाच्या पूर्वी थोडेच दिवस "नीगंठ" (पाशरहित) या नांवाच्या एका बऱ्याच जुन्या संप्रदायांतून "वर्धमान महावीर" यांच्या पुढारीपणाखालीं हा जैन संप्रदाय उदयास आला. जैन संप्रदायाचें बौद्ध संप्रदायाशीं इतकें साम्य आहे कीं, जैन संप्रदाय हा बौद्ध संप्रदायांतीलच पोटभाग होय ही समजूत बरेच कालपर्यंत रूढ होती. तथापि बौद्ध संप्रदायापेक्षा या जैन संप्रदायांतील कांहीं तत्त्वें इतकीं भिन्न आहेत कीं त्यामुळें जैन संप्रदाय अगदीं स्वतंत्र आहे असें मानणें भाग पडलें. उदाहरणार्थ बौद्ध संप्रदायापेक्षां जैन संप्रदायामध्यें तापसवृत्ति व इतर सांप्रदायिक आचार यांजवर फारच भर देण्यांत आला आहे. इतकेंच नव्हे तर गौतम बुद्धाच्या उलट, महावीर यानें पूर्ण विकास पावलेल्या आत्मतत्त्वाच्या अस्तित्वासंबंधीं विवेचन केलें आहे. दोन्ही संप्रदायांना सामान्यपणें लागू असणाऱ्या गोष्टी म्हणजे प्राचीन भारतीयांत प्रचलित असलेली तापसवृत्ति व तत्संबंधी नीतिकल्पना या होत. बौद्ध व जैन संप्रदायाचें साम्य या बाबतींत दाखवितां येण्यासारखें आहे, इतकेंच नव्हे तर सर्वसामान्य भारतीय विरक्तिपर काव्यशास्त्रांत अशाच प्रकारचें वातावरण भरून राहिलें आहे हें दाखवितां येईल.

या दोन्ही संप्रदायांमध्यें मुख्य एक भेद असा आहे कीं, जैन संप्रदाय हा सर्वकाल पूर्ण भारतीयच राहिला, परंतु बौद्ध संप्रदाय मात्र अधिक व्यापक झाला व त्यामुळेंच बौद्ध वाङ्मयास विशेषच महत्त्व प्राप्त झालें आहे. या दृष्टीनें पाहतां अंतर्गत विषयामध्यें देखील जैन वाङ्मयाची बौद्ध वाङ्मयाशीं तुलना करतां येणार नाहीं. जैनांचे मूळ धर्मग्रंथ रूक्ष अशा उपदेशाच्या पद्धतींत लिहिले गेले असल्यामुळें कीं, धर्मग्रंथांत अनेक ठिकाणीं आढळून येणारें सामान्य मानवजातीच्या हिताच्या दृष्टीनें केलेलें विवेचन या जैन ग्रंथांत मुळींच आढळून येत नाहीं.

**जैन सिद्धान्त** — इ. सनानंतर पहिल्या शतकांत जैन संप्रदायांत एक अत्यंत महत्त्वाची गोष्ट घडून आली ती ही कीं, त्यामध्यें श्वेतांबर व दिगंबर असे दोन पंथ उत्पन्न झाले. या सर्व धर्मग्रंथांस दोन्ही पंथांचे जैन लोक 'सिद्धांत' अथवा 'आगम' असें म्हणतात. या मूळ धर्मग्रंथांतील पहिला महत्त्वाचा भाग म्हटला म्हणजे बारा "अंगें" होत, असें श्वेतांबर व दिगंबर पंथानुयायांचें म्हणणें आहे. परंतु आतापर्यंत फक्त श्वेतांबरपंथांतील 'सिद्धांत' उपलब्ध झाला असून त्यामध्यें पुढील 'सुत्त' ग्रंथांचा समावेश होतो. या धर्मग्रंथांची भाषा 'आर्ष' किंवा 'अर्धमागधी' या नांवानें संबोधली जाणारी प्राकृत होय. महावीरानें याच भाषेंत धर्मोपदेश केला असें म्हणतात; परंतु या ग्रंथांपैकीं गद्यभाग व पद्यभाग यांच्या भाषेंत पुष्कळ अंतर आहे.

प्राकृत पद्य भागांत बौद्ध ग्रंथातील पाली गाथाप्रमाणें बरींच जुनीं शब्दांचीं रूपें सापडतात. अत्यंत प्राचीन अर्धमागधीचें स्वरूप 'आयारंगसुत्त" (आचारांगसूत्र)"सूयगडांग', (सूत्रकृतांग) व "उत्तरज्झयणसुत्त" (उत्तराध्ययनसूत्र) या तीन ग्रंथांत पहावयास सापडतें. धर्मग्रंथाखेरीज इतर वाङ्मयाची भाषा 'अर्धमागधी' किंवा जैन महाराष्ट्री ही असून देखील वरील धर्मग्रंथाच्या भाषेपेक्षा अगदीं भिन्न आहे.

**ग्रंथकाल**—ह्या धर्मग्रंथाच्या कालासंबंधीं व प्रमाणभूततेसंबंधीं श्वेतांबर जैनांमध्यें पुढील दंतकथा प्रचलित आहे.

प्रत्यक्ष महावीरानें गणधर वगैरे शिष्यास जो तत्त्वोपदेश केला तें मूळ जैन तत्त्वज्ञान होय व तो चौदा"पुव्व" (पूर्व) ग्रंथांत समाविष्ट झालेला होता, परंतु लवकरच ह्या प्राचीन ग्रंथाची माहिती नष्ट झाली. मात्र महावीराच्या एका शिष्यानें हें ज्ञान पुढें प्रसृत केलें व पुढें कित्येक पिढ्यापर्यंत अशा रीतीनें ह्या मूळ धर्मग्रंथाचें संरक्षण करण्यात आलें.

महावीराच्या मृत्यूनंतर दुसऱ्या शतकांत मगध देशांत १२ वर्षेपर्यंत भयंकर दुष्काळ पडला. त्या वेळीं मौर्य चंद्रगुप्त हा मगध देशाचा राजा होता व भद्रबाहु हा जैन लोकांचा मुख्य अग्रणी होता. दुष्काळामुळें भद्रबाहु हा कांहीं अनुयायासह दक्षिण हिंदुस्थानांतील कर्नाटक देशांत गेला; व चौदा पूर्वांच्या ज्ञानांत पारंगत असलेल्यांपैकीं शेवटचा जो स्थूलभद्र तोच मगध देशांत मागें राहिलेल्या जैनसंप्रदायी लोकांचा धुरीण झाला. भद्रबाहूच्या अभावीं ह्या चौदा पूर्वांचें ज्ञान नाहींसें होतें, अशी स्थिति प्राप्त झाल्यामुळें पाटलिपुत्र शहरांत एक धर्मसभा भरविण्यात आली व ह्या सभेंत ११ अंगांची रचना करण्यात येऊन १४ 'पूर्वांचें' अवशेष जमवून त्यांचें १२ वें अंग बनविण्यात आलें. जेव्हां भद्रबाहूबरोबर गेलेले लोक स्वदेशीं परत आले, त्या वेळीं परदेशीं गेलेल्या व देशीं राहिलेल्या जैन लोकांमध्यें बरेंच अंतर पडलें होतें. देशीं राहिलेल्या लोकांस श्वेतवस्त्रें वापरण्याची सवय झाली होती, परंतु भद्रबाहूचे अनुयायी जैन ह्यांनीं महावीराच्या आज्ञेप्रमाणें नग्न स्थितींतच आयुष्य घालविण्याचें व्रत चालविलें होतें व अशा रीतीनें श्वेतांबर व दिगंबर हे दोन तट जैन लोकांत पडले. ह्याचा परिणाम असा झाला कीं, दिगंबर जैनांनीं १४ 'पुव्व' आणि 'अंगें' नाहींशीं झालीं, असें ठरवून श्वेतांबर जैनांनीं संग्रथित केलेले धर्मग्रंथ प्रमाण मानण्याचें सोडून दिलें. कालांतरानें श्वेतांबराच्या धर्मग्रंथांत घोंटाळा माजून ते ग्रंथ नामशेष होण्याच्या मार्गास लागले. ह्यामुळें महावीरनिर्वाणानंतर ९८० (किंवा ९९३) वर्षांनीं म्हणजे इ. सनाच्या ५ व्या शतकाच्या मध्याच्या सुमारास गुजराथ देशांतील वलभी नगरांत पुनः एक धर्मग्रंथाचें एकत्रित संग्रथन करण्याकरितां धर्मसभा भरविण्यात आली. ह्या वेळीं "पुव्व" यापैकीं त्रुटित अवशेष मिळून एकत्र केलेलें १२ वें 'अंग' नष्ट झालें होतें. ह्यामुळें "देवर्द्धिगणी" याच्या धर्मग्रंथाच्या प्रतींशीं समान अशा सांप्रत उपलब्ध असलेल्या जैन धर्मग्रंथांत आपणास ११ 'अंगें' च सापडतात.

अशा रीतीनें श्वेतांबर जैनांच्या दंतकथेप्रमाणें देखील ह्या धर्मग्रंथांचा काल इ. सनाच्या ५ व्या शतकाच्या पूर्वीं जाऊं शकत नाहीं. अर्थात् ह्या धर्मग्रंथांचा उद्भव पूर्वीच्या पाटलिपुत्र नगरांतील धर्मसभेच्या कालीं व त्यापूर्वींहि महावीराच्या कालीं झाला, असें त्यांचें म्हणणें आहे. १४ 'पुव्व' व ११ 'अंगें' ह्यांचें ज्ञान महावीराच्या कांहीं पट्टशिष्यास होतें ही गोष्ट दिगंबर जैन देखील कबूल करतात; परंतु त्यांचें इतकेंच म्हणणें आहे कीं, ह्या १४ 'पुव्व' ग्रंथांचें ज्ञान अकालींच नष्ट झालें इतकेंच नव्हे, तर महावीरनिर्वाणानंतर ४३६ वर्षांच्या अवधींत ११ 'अंगें' यांचें ज्ञान असलेला शेवटचा आचार्यहि मृत झाला, व मागाहूनच्या आचार्यांचें "अंगज्ञान" कमी कमी होत जाऊन महावीरनिर्वाणानंतर ६८३ वर्षांनीं ह्या धर्मग्रंथांतील खऱ्या ज्ञानाचा मागमूसहि उरला नाहीं.

मूळ जैन दंतकथेप्रमाणें ह्या वरील धर्मग्रंथांचा काल फार मागें नेता येत नाहीं; तथापि ह्या ग्रंथाचा कांहीं भाग अत्यंत जुना असून फक्त देवर्द्धि यानें जुन्या हस्तलिखितावरून कांहीं भाग व तोंडीं दंतकथेच्या रूपानें आलेला कांहीं भाग, ह्या सर्वांचें संकलन केलें, असें म्हणण्यास बराच विश्वासजनक पुरावा आहे. कारण इ. सनाच्या पहिल्या व दुसऱ्या शतकांतील कांहीं शिलालेखावरून असें स्पष्ट दिसून येतें कीं, त्या वेळीं देखील जैनांमध्यें श्वेतांबर व दिगंबर हे भेद झाले होते, व सध्याच्या उपलब्ध जैन धर्मग्रंथांत आढळून येणाऱ्या वंशपरंपरासारख्या परंपरा असणारे कांहीं पंथ (गण) त्या कालीं अस्तित्वांत होते. ह्याच शिलालेखामध्यें "वाचक" नावाच्या जैन संन्याशाचें उल्लेख आहेत, त्यावरून त्या कालीं जैन धर्मग्रंथ कोणत्या तरी मूळ स्वरूपांत अस्तित्वांत असावेत असें दिसतें. ह्या शिलालेखावरून व तत्कालीन अवशेषाच्या शिल्पावरून असेंहि दिसून येतें कीं, इ. सनाच्या पहिल्या शतकांत महावीर-दंतकथा सांप्रत उपलब्ध असल्याप्रमाणेंच होती. जैन साधूंनीं नग्नतेनें रहावें अशाबद्दल घालून दिलेल्या नियमांत श्वेतांबरी यांनीं फेरफार केलें नाहींत. ह्या एका गोष्टीवरून त्यांनीं धर्मग्रंथांत लागेल तसा फेरफार करण्याचें धाडस न करतां एकदर धर्मज्ञान शक्य तितकें, आहे ह्या स्थितींत राखण्याचा प्रयत्न केला ही गोष्ट स्पष्ट दिसून येते. शिवाय ही जैनपरंपरा पुष्कळशा बाबतींत बौद्ध परंपरेसारखीच आहे, ह्याबद्दल बरीचशी खात्री ह्या शिलालेखावरून पटते.

वरील विवेचनावरून ही गोष्ट मात्र सिद्ध होते कीं, जैनांचे 'सिद्धांत' ग्रंथ एकाच वेळीं रचले गेले नसावेत. देवर्द्धीनें संग्रथन केलेले व सांप्रत आपणास उपलब्ध असलेले जैन धर्मग्रंथ हे त्या काळच्या वाङ्मयात्मक चळवळीच्या अगदीं शेवटीं शेवटीं रचले गेले, व लागलीच जैन पंथाची व

संन्यासवृत्तीची सुव्यवस्थित स्थापना झाली. ह्या गोष्टी महावीरनिर्वाणानंतर लवकरच घडून आल्या असाव्यात. अर्थात् ह्या जैन धर्मग्रंथांपैकीं प्राचीन भागाचा काळ महावीराच्या अगदीं पहिल्या शिष्याच्या अमदानीचा. म्हणजे इ. सनाच्या दुसऱ्या शतकाच्या पुष्कळ मागें लोटतां येईल; वरील जैन दंतकथेप्रमाणें हा काल मौर्य चंद्रगुप्ताच्या कारकीर्दीत येतो व ह्यापैकीं अगदीं मागाहूनचा भाग देवर्द्धिगणीच्या कालांत तयार झाला असावा.

यानंतर जैन धर्मग्रंथांतील एक एक भागाकडे आपण क्रमशः वळूं.

**धर्मग्रंथांचे भाग, प्रथम अंग, आयारंग सुत्त —** 'सिद्धांत' ग्रंथांतील पहिलें अंग "आयारंगसुत्त." (आचारांग सूत्र) नामक असून त्याचे 'श्रुतस्कंध' (विभाग) दोन आहेत, व त्यांमध्यें एकंदर आचारांचें विवेचन आहे. त्यापैकीं पहिला भाग दुसऱ्यापेक्षां एकंदरीनें जरी अधिक प्राचीन दिसतो तरी त्यामध्यें देखील विसदृश विषयांचें एकीकरण आढळतें. ह्या ग्रंथात बौद्ध वाङ्मयाप्रमाणें गद्य व पद्य भागाचें मिश्रण आढळतें. कधीं कधीं मागून्या एकामागून एक कविता आढळतात, तर कधीं गद्य भागच सारखा सापडतो व पुन्हा लागलीच गद्य व पद्य आळीपाळीनें असलेलें आढळतें. ह्यांतील मुख्य विषय म्हटला म्हणजे अहिंसा, भूतदया इत्यादि गोष्टींबद्दल उपदेश व निरनिराळ्या प्रकारचे वागणुकीचे नियम सांगणें हा होय. उदाहरणार्थः—

"ह्याप्रमाणें माझें म्हणणें आहे भूत, वर्तमान व भविष्य ह्या तिन्ही कालांतील पूज्य 'अर्हत्' व माननीय 'भगवत्' यांचेंहि असेंच म्हणणें आहे. ते नेहमीं असाच उपदेश करतात व नेहमीं ह्याच गोष्टींचे विवेचन करतात कीं.—

"कोणीहि मनुष्यानें कोणत्याहि सजीव प्राण्याची हत्या करूं नये, किंवा त्यास वाईट शब्द बोलूं नयेत किंवा दुसऱ्या कोणत्याहि प्रकारें त्यास त्रास देऊं नये. विश्व जाणणाऱ्या सूक्ष्म दृष्टीच्या साधुपुरुषांनीं आखून दिलेल्या धर्माची ही पवित्र सनातन, व असकृदुपदिष्ट अशी आज्ञा आहे.

"तुम्हाला ज्या भावना आहेत त्याच प्रकारच्या भावना तुम्ही ज्याला ठार करणार त्याला आहेत तुम्ही ज्याला गैरशिस्तपणें वागवितां, अत्यंत त्रास देतां त्या प्राण्याला देखील तुम्हाप्रमाणेंच सुखदुःखाच्या संवेदना होत असतात ही गोष्ट मनात बाळगून जो कोणी वर्तन करील तो दुसऱ्याला वध स्वतः करणार नाहीं व करण्यास परवानगी देणार नाहीं."

बौद्धधर्मीय भिक्षुवृत्तीच्या नियमामध्यें जैनधर्मीय यतिवृत्तीच्या नियमापेक्षां विशेष भेद असा आहे कीं, जैन धर्माज्ञा अतिकडक तापसवृत्तीवर जोर देतात, इतकेंच नव्हे तर धर्मदृष्ट्या आत्महत्याहि करण्यास सांगतात "जैन मुनींनें शीतापासून त्रास होत असला तरी थंडीमुळें मरावें परंतु आपल्या व्रताचा भंग होऊं देऊं नये - जर तो दुर्बल व आजारी असला तर एक वेळ त्यानें मृत्यु पत्करावा परंतु उपवासव्रतभंग करूं नये. - चालताना गवताच्या पात्या टोंचतील, डांसचिलटें चावतील, वाईट घाणेरड्या दुष्ट हवेपासून त्रास होईल अशा तऱ्हेनें नग्नस्थितींत फिरावें (१.८,८)." ह्या लांबलचक अशा महत्त्वाच्या पद्यमय उताऱ्यामध्यें बौद्धग्रंथात आढळून येणारी एक नेहमींची आज्ञा आली आहे ती ही:—"त्यानें (मुनीनें) जिवंत राहण्याची इच्छा करावयाची नाहीं किंवा मृत्यु येण्यासाठींहि अधीर व्हावयाचें नाहीं." परंतु त्यानंतर लागलीच, पूर्ण शहाण्या मनुष्यानें उपवास करीत करीत हलके हलके मृत्यूचा पल्ला कसा गाठावा ह्याबद्दलच्या निरनिराळ्या पद्धतींचें विवेचन दिलें आहे. त्यानंतर कर्मआख्यानपर काव्य आहे. वस्तुतः ह्या भागास पद्य किंवा गद्य यांपैकीं काय म्हणावें याचीच शंका आहे. ह्या "उवहाणसुयम" नामक भागामध्यें महावीराच्या तापसवृत्तीचें अतिशय हुबेहुब वर्णन केलें आहे.

"तो (महावीर) अनिकेत अशा नग्नवृत्तींत इकडे तिकडे फिरे, लोक त्याला खूप झोडपीत व त्याला त्रास देत. परंतु त्याचे ध्यान कधींहि भंग पावलें नाहीं. लाढ देशांतील रहिवाशांनीं त्याचा अत्यंत छळ केला व त्यावर कुत्रे सोडले, त्यांनीं काठ्या व हाताच्या मुठी यांनीं त्यास खूप मारलें व त्याच्या अंगावर फळें, मातीचीं ढेकळें व मृत्कुंभाचे तुकडे वगैरे फेंकले व अशा रीतीनें अनेक प्रकारच्या त्रासांनीं त्याचें ध्यान भंग करण्याचा प्रयत्न केला. परंतु संग्रामांतील मुख्य सेनानीप्रमाणें महावीरानें ह्यांपैकीं कोणत्याहि गोष्टीस जुमानलें नाहीं. कसलीहि जखम झालेली असो नसो त्यानें कधींहि औषधोपचार केले नाहींत तो कधींहि स्नान करीत नसे किंवा दांत घाशीत नसे. हिंवाळ्यात छायेखालीं तो ध्यान करी व उन्हाळ्यात सूर्याच्या प्रखर उन्हांत बसे. तो महिनेच्या महिने पाणी पीत नसे, व भोजनाचा सहावा, आठवा किंवा दहावा दिवस अन्न ग्रहण करून कोणत्याहि प्रकारची वासना न ठेवता ध्यानमग्न राही.'

'आयारंगा' चा दुसरा खंड त्याच्या पोटभागास दिलेल्या "चूडे" या नांवावरून बराच उत्तरकालीन दिसतो. ह्यांपैकीं पहिल्या दोन चूडामध्यें भिक्षावृत्ति व पर्यटन त्याचप्रमाणें भिक्षु व भिक्षुणी यांची दिनचर्या कशी असावी ह्याबद्दल नियम सांगितले आहेत. तिसऱ्या चूडामध्यें महावीराच्या चारित्रास उपयुक्त असें साहित्य आहे व त्याचाच उपयोग भद्रबाहूनें "कल्पसूत्र" रचताना केला आहे ह्या पुस्तकाची समाप्ति बारा श्लोकांनीं केली आहे, व हे श्लोक काहींसे बौद्धाच्या 'थेरगाथा' सारखे दिसतात.

**दुसरें अंग, सूयगडाङ्ग —** जैनसिद्धांतातील दुसरें अंग "सूयगडाङ्ग" हें होय ह्यांतील विषय जैन मुनींचा पवित्र आयुष्यक्रम कसा असावा हा असून ह्यांतील

दुसरा भाग प्रतिपक्षीयांचीं मतें खोडून काढण्यांत गेला आहे या अंगाचेहि दोन खंड आहेत व त्यांपैकी प्रथम खंड प्राचीन असून दुसरा खंड उत्तरकाली जोडलेला असावा.

ह्या पहिल्या खंडाची रचना पद्य श्लोक व इतर कृत्रिम वृत्तांत केली असून ह्यांतील उपमा वगैरेवरून ग्रंथकर्त्यास कवि म्हणवून घेण्याची हौस असावी असें दिसतें. त्यांपैकी कांहीं उपमा अत्यंत मार्मिक आहेत. उदाहरणार्थ "हिंस्र पक्षी ज्यांचीं अजून उडतांहि येत नाहीं अशा कोवळ्या पिलांवर झडप घालून त्यांना ज्याप्रमाणें लांबविनात त्याप्रमाणें सदसद्विवेकशून्य माणसें तरुण तपस्व्यांना कुमार्गास लाव ण्याचा प्रयत्न करीत असतात" (१. १४,२) तरुण तपस्व्यास दुसऱ्या संप्रदायप्रवर्तकांनीं स्थापन केलेल्या भिन्न भिन्न मतापासून दूर राखणें, मार्गांत येणाऱ्या अडचणी व मोह यांचें निवारण करण्याबद्दल त्यास उपदेश करणें त्याचप्रमाणें आपल्या (जैन) मतावर पूर्ण श्रद्धा ठेवावयास लावून उच्चतम पदाकडे त्याला नेणें हाच या ग्रंथाचा स्पष्ट उद्देश आहे.

या ग्रंथाच्या आरंभीं महावीराच्या जैन तत्त्वज्ञानाविरुद्ध असलेल्या बौद्ध व इतर सांप्रदायिक मतांचा निषेध केला आहे अथवा कर्म व संसार यासंबंधीं केलेलें विवेचन मात्र इतर मतांतील विवेचनासारखेंच आहे. नरकांतील भावी जन्मांतील दुःखें व संकटें यांचें या भागांत हुबेहुब वर्णन आढळतें. परंतु नवख्या मनुष्यानें त्यांना धडकी भरून न जातां उत्पन्न होण्याची नाहीं त्यानें मित्र व आप्तेष्ट यांनीं कांहीं काळ आयुष्यक्रमांतील सुखदायक प्रसंग त्याला भडक रंगांत मोहक पद्धतीनें दाखवून मुनिधर्मापासून त्याला पराङ्मुख करण्याचा प्रयत्न करीत असतात. राजे, सावकार, ब्राह्मण, क्षत्रिय त्याला ह्या व्यावहारिक जगांत बळेंच ओढण्याचा प्रयत्न करीत असतात परंतु ह्या सर्व मोहपाशांतून त्याला पुढें मार्ग आक्रमावा लागतो जुगारी. नास्तिक हे त्याच्यावर वारंवार आघात करीत असतात परंतु नवख्या तपस्व्यास ह्या लोकांनाहि धैर्यानें तोंड द्यावें लागतें. परंतु सर्वांत स्त्रिया ह्या नूतन तापसास मोह घालण्याचा शक्य तो प्रयत्न करीत असतात. तेव्हां विशेषतः अशा स्त्रियांच्या जादूगारीपासून त्याला फार दूर रहावें लागतें. एकदां मनुष्य-प्राणी स्त्रीमोहांत गुरफटून गेला म्हणजे त्याची काय स्थिति होते ह्याचें वर्णन अत्यंत विनोदपूर्ण आहे रथवाहक ज्याप्रमाणें रथचक्रांस लागेल तिकडे लावील तशी गति देतो त्याप्रमाणें स्त्रिया मोहबद्ध पुरुषास भोवऱ्यासारखा गरगर फिरवितात. अशा पुरुषाची स्थिति नंतर काय होते याचें वर्णन नंतरच्या श्लोकांत केलें आहे.

पुष्कळ पुराणें किंवा बौद्धसुत्त यांच्याप्रमाणें या जैन अंगांत एका पूर्ण भागांत नरक व त्यांतील यातना (१. ५ १) यासंबंधी हृदयस्पर्शी वर्णन आहे. तरी पण पुनःपुन्हा ग्रंथकारानें परपक्षखंडनाचा प्रयत्न केला आहे. उदाहरणार्थ १. ७ मध्यें असें म्हटलें आहे कीं:—"शीतोदकाच्या अंगलिंपनानें पूर्णपदाची प्राप्ति होते ही गोष्ट जर खरी असेल तर मासे, कासवें, सर्प इत्यादि अनेक जलचरांना पूर्णपदप्राप्ति होईल. जलस्नान जर मनुष्यप्राण्याचीं अनंत पातकें धुवून काढीत असेल तर तेंच पुण्यफलेंहि नाहींशीं करील. ब्राह्मण म्हणतात कीं प्रतिदिन अग्नि प्रज्वलित केल्यानें मुक्ति प्राप्त होते परंतु हें जर खरें असेल तर सोनार, लोहार, शिपाई इत्यादि धंदेवाईक लोकांना अनायासें मोक्षप्राप्ति होईल"

हा ग्रंथ एकाच ग्रंथकारानें रचलेला असण्याचा संभव आहे परंतु त्यापेक्षां एकाच गृहस्थानें एकाच विषयावरील विविध श्लोक व उपदेशपाठ एका ठिकाणीं गोळा केले असण्याचा संभव आहे. ह्याच्या उलट गद्यांत रचलेलें दुसरें प्रकरण लहान लहान स्फुटांचें बनलेलें आहे. ह्यामध्ये देखील परमतखंडन हाच मुख्य विषय असल्यामुळें त्याचें संग्रथन ह्या ठिकाणीं झालें असावें. भारतीय पंथाविषयींच्या माहितीच्या दृष्टीनें हा ग्रंथ अत्यंत महत्त्वाचा आहे

**तिसरें अंग, ठाणांग.**—*ह्यापैकीं "ठाणांग" हें तिसरें अंग होय बौद्ध "अंगुत्तर निकाय" या ग्रंथांतल्याप्रमाणें* ह्या जैन ग्रंथांतहि दहा ह्या संख्याक्रमानें पुष्कळसे धार्मिक विषय विवेचिले गेले आहेत ह्या यादींत कित्येक ठिकाणीं गूढ अशा उपमा आढळून येतात. उदाहरणार्थ, 'घटक (घटी) किंवा उपदेशक यांचे चार प्रकार असतात; मत्स्य किंवा याचक यांचेहि चारच प्रकार असतात; त्याचप्रमाणें कंदुक व मनुष्याचेहि चार असतात," ही उपमा पहा ह्या भागामध्यें एके ठिकाणीं "दिट्ठिवाय" नामक नष्टप्राय झालेल्या धर्मांगाची *विषयवार यादी आली आहे. ती फार महत्त्वाची आहे*

**चवथें अंग, समवायांग**—यानंतरचें चौथें अंग समवायांग हें असून त्याच्या दोनतृतीयांश *भागांत ठाणांग' प्रमाणेंच विषयवारी आली आहे.* फक्त भेद इतकाच कीं ह्या विषयवारीची संख्या १०० वर नेली आहे. या ग्रंथाचा शेवटचा एक तृतीयांश भाग मागाहून जोडलेला दिसत असून त्यामध्ये सर्व बारा अंगांचे विषय व विस्तार ह्याबद्दल बिनचूक माहिती आढळते. तथापि ह्यामध्यें उल्लेखिलेल्या १८ प्रकारच्या ब्राह्मी लेखना-वरून, त्याचप्रमाणें "उत्तरज्झयण" या ग्रंथाच्या ३६ प्रकर-*णाच्या व अशाच इतर उल्लेखावरून हें अंग उत्तरकालीन असल्याचें निःसंशय सिद्ध होतें*

**पांचवें अंग, भगवती वियाह.**—'भगवती-वियाह' किंवा 'विवाहपन्नत्ति' किंवा थोडक्या शब्दांत "भगवती" या संज्ञेनें उल्लेखिलें जाणारें पांचवें अंग अत्यंत महत्त्वाच्या अंगांपैकीं एक आहे. ह्या ग्रंथामध्यें जैन धर्माच्या सांप्रदायिक उपदेशाचें बरेंच सविस्तर उपपादन आलें आहे अर्थात् ह्या विवेचनाचा कांहीं भाग सारांशरूपानें आला असून कांहीं भाग 'इतिहाससंवाद' रूपांत

रचलेला आहे त्यांपैकी एका दंतकथात्मक भागामध्यें, महावीरापूर्वीच्या जैनपरंपरेंतील पूर्वजांनी व इतर कांहीं पवित्र मुनींनी अत्यंत खडतर तपश्चर्या करून निर्वाणपद-प्राप्ति कशी करून घेतली त्याचें वर्णन आहे. पवित्रमार्गानें पुण्यकर्में करणारांस आयुष्य संपल्यानंतर प्राप्त होणारें उत्तम उत्तम स्वर्गलोक, त्याचप्रमाणें दुराचारी पापकर्मी लोकांना भोगावा लागणारा नरकवास व त्यांतील अनंत दुःखें यांचीं वर्णनेंहि पुष्कळ ठिकाणीं आढळतात.

ह्यामध्यें विशेषतः महावीराचे पूर्वकालीन व समकालीन पुरुष म्हणजे पार्श्वनें शिष्य जामली व गोशाल मक्खलिपुत्त यांच्या विषयीं आलेल्या आख्यायिका जास्त महत्त्वाच्या आहेत जामाली व गोशाल मक्खलिपुत्त हे जैन पंथसंप्रदायाचे संस्थापक असून, या पाचव्या अंगाचें १५ वें प्रकरण गोशाल याजबद्दलच्या माहितीनें भरलेलें आहे विरुद्ध संप्रदायसंस्थापकाचें जीवनचरित्र एखाद्या संप्रदायामार्फत कशा रीतीनें वर्णन केलें जातें त्याचें हें उत्तम उदाहरण आहे. ह्या वर्णनावरून असें दिसून येतें कीं, पार्श्व व महावीर यांचे अनुयायी जे "नीगंथ" व गोशालाचे अनुयायी "आजीविक" ह्या दोन विरुद्धपंथी लोकांमध्यें विभक्त होण्यापूर्वीं अगदीं निकट संबंध होता, बहुतक "भगवती" अंगाचें १५ वें प्रकरण मूळांत अगदीं स्वतंत्र असावें व मागाहून विशिष्ट ह्या माहितीनें भरलेल्या प्रकरणाची त्यामध्यें भर पडलेली असावी.

**सहावें अंग, नायाधम्मकहाओ** —सहाव्या अंगाच्या "नाया धम्मकहाओ" (ज्ञातधर्मकथा) हें नांव आहे ह्या अंगाच्या पहिल्या भागांत २३ प्रकरणें असून त्या प्रत्येक प्रकरणांत एक एक आख्यायिका संपूर्ण केलेली आहे ह्यापैकीं बहुतक आख्यायिका त्यांतील कथाभागापेक्षां त्यांतील उपदेशपर भाग जास्त महत्त्वाचा आहे, इतकेंच नव्हे तर मूळ उपदेशाच्या मागाहून कथानकें दिली गेलीं असावीं.

वरीलसारख्या रूपकपूर्ण दंतकथांशिवाय प्रवासवृत्तें, दर्यावर्दी व्यापाऱ्यांचीं अद्भुत कथानकें, कादंबरीवजा गोष्टी इत्यादि पुष्कळ असा भाग ह्या ग्रंथांत आढळतो कीं ज्यामध्यें उपदेशपूर्ण अशा रूपकांना संबंध फारच थोडा लागतो आठव्या प्रकरणामध्यें 'मल्ली' नांवाच्या फक्त एकच स्त्री-तीर्थंकराची नमुनेदार आख्यायिका आली आहे १६ वें प्रकरण अत्यंत मजेचें आहे त्यामध्यें "दोवई" (द्रौपदी) हिचें कथानक अवतारस्वरूपांत वर्णन केलें आहे. द्रौपदीचें पांच पांडवांबरोबर लग्न झाल्याचें दाखविणाऱ्या महाभारतकथानकाची सुधारणा करण्याचा हा जैनांचा प्रयत्न दिसतो परंतु तो यशस्वी झालेला दिसत नाहीं

ह्या अंगाचा दुसरा भाग आंतील विषयाच्या दृष्टीनें व बाह्यस्वरूपांतहि पहिल्या भागापेक्षां अगदीं भिन्न दिसतो व ह्या भागाचें एकंदरीनें सातव्या व नवव्या अंगाशीं अत्यंत निकट सादृश्य दिसतें.

**सातवें अंग, उवासगदसाओ** —हें 'जैन उपासकाचे धर्म सांगणारीं दहा प्रकरणें' ह्या नांवाचें बहुतेक कथास्वरूपी आहे ह्या दहा प्रकरणांत दहा कुटुंबवत्सल अशा धनाढ्य व्यापाऱ्यांचीं कथानकें आहेत ह्या दहा व्यापाऱ्यांनीं स्वत करितां कांहीं नियम घालले व महावीरानें सांगितलेलीं व्रतें पाळलीं व ते जैनउपासक बनले. ह्या दहाहि कथानकांचा सांचा अगदीं इतका ठरल्यासारखा आहे कीं शेवटच्या गोष्टींतून पूर्वींच्या गोष्टींतील त्या त्या प्रसंगाचीं कांहीं वाक्यें सुचवून थोडक्यांत काम भागविलें आहे. त्यांपैकीं सातवें प्रकरण अत्यंत मनोरंजक असून त्यामध्यें 'सद्दालपुत्त' नांवाच्या श्रीमंत कुंभाराचें कथानक दिलें आहे. प्रथम सद्दालपुत्त हा गोशाल मक्खलिपुत्त याचा अनुयायी होता, परंतु पुढें तो महावीराकडे गेला त्या वेळीं महावीरानें आपल्या तत्त्वाच्या सत्यस्वरूपाविषयीं ह्या कुंभाराची कशी खात्री पटविली हा प्रसंगानें संभाषण वाचलें असतां बौद्ध-ग्रंथांतील एखाद्या सुंदर संवादाचें स्मरण होतें. तथापि हा ग्रंथ पारमार्थिक कृत्याकरितां रचिला असावा ही गोष्ट स्पष्टपणें निदर्शनास येते वस्तुतः हें कांहीं धार्मिक काव्य नाहीं, तर इंग्रजी नसंबंधी लेखनाचा एक नमुना आहे

**आठवें नववें अंग, अंतगडदसाओ व अणुत्तरोववाइयदसाओ** —पुढील दोन अंगांना वाङ्मयात्मक दृष्टीनें फारसें महत्त्व आहे. यांची रचना मागल्या अंगाप्रमाणेंच केली आहे. आठवें अंग "अंतगडदसाओ" नामक १० प्रकरणाचें असून हल्लीं साम्प्रत त्याची आठ प्रकरणांत विभागणी झाली आहे नववें अंग "अणुत्तरोववाइयदसाओ" हें असून त्याचीं तीन प्रकरणें व प्रत्येक प्रकरणाचे ३३ परिच्छेद आहेत बाह्य-स्वरूपावरूनहि ह्या ग्रंथांना वाङ्मयदृष्ट्या फारसें महत्त्व देतां येत नाहीं. कारण हीं कथानकें एकाच पद्धतीनें सांगितलीं आहेत, इतकेंच नव्हे तर ग्रंथकारानें फक्त ठरलेल्या सांचांत लागतील ते शब्द व वाक्यें घालावयाचीं एवढेंच काम केलेलें दिसतें उदाहरणार्थ एका आख्यायिकेंत म्हटलें आहे "चंपा नावाचें एक नगर, 'पुण्णभद्द' नावाचा पवित्र निधि व एक अरण्य होतें. वर्णन" याचा अर्थ इतकाच कीं, नगर, निधि व अरण्य यांचें पहिल्या उपांगांत असलेलें ठरा-विक वर्णन त्या त्या ठिकाणीं घालावयाचें. त्याचप्रमाणें महा-वीराचा एक शिष्य 'थेर सुहम्म' याच्याबद्दल उल्लेख करतांना इतकेंच सांगितलें आहे कीं सहाव्या अंगांत सापडतें त्याप्रमाणें या ठिकाणींहि ह्या पवित्र मनुष्याचें वर्णन घालावयाचें. हीं 'वर्णकें' (वर्णनें) लांब समासपद्धति भाषेंत रचलेलीं असून ह्या धर्मग्रंथांतील जुन्या पद्यभागापेक्षां अर्वाचीन असून प्रसिद्ध पंडित याकोबी यानें अशी उपपत्ति काढली आहे कीं यद्यपि प्राचीन टीकाकार हीं वर्णकें गद्यभाग समजतात व जरी ह्या वर्णकांचीं वृत्तें जुन्या भारतीय पद्यवाङ्मयांत कोठेंहि सापडण्यासारखीं नाहींत, तथापि हीं वर्णकें जुन्या पद्यभागा-

प्रमाणच वाचली पाहिजेत परंतु डॉ. विंटरनिट्झ याच्या मतें ही उपपत्ति चुकीचा आहे कारण ह्या वर्णकाचीं भाषा समासघटित गद्यभागापेक्षा भिन्न दिसत नाहीं. असलीं वर्णकें इतर सर्व धर्मग्रंथात सापडतात परंतु 'गोयम' राजपुत्राचा विवाह, अशासारख्या प्रसंगीं हीं वर्णनें ज्या ज्या ठिकाणीं दिलेलीं आढळतात त्या त्या ठिकाणीं तीं अगदीं नीरस असून त्यात अनेक गोष्टींचीं नावें मात्र पुष्कळ आढळतात. परंतु राजपुत्र सर्वसंगपरित्याग करण्याचा निश्चय करीत असल्याबद्दलचा व त्याचे आईबाप त्यास त्या निश्चयापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न करीत असल्याचा कथाभाग ज्या वेळीं येतो त्या वेळीं मात्र कथानकास बराच रंग चढलेला दिसतो ८व्या अंगात'गोयम'ह्या सप्रदायात प्रवेश होण्याबद्दल विनवणी करतो त्या वेळीं तो पुढील उद्गार काढतो'—"विश्व हें अग्नि ज्वालेच्या मध्यभागीं आहे वार्द्धक्य व मृत्यु त्याच्या वणव्यात जगाची राखरांगोळी होत आहे." ह्या ठिकाणीं बुद्धाच्या सुप्रसिद्ध "अग्निरूपकपूर्ण" उपदेशाचें स्मरण होतें. हें अंग भारतीय दैवतकथा व भारतीय धार्मिकसंप्रदायाचा इतिहास ह्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचें आहे कारण ह्या अंगात महाभारतांतील कृष्णकथा जैनांनीं केलेल्या थोड्या रूपांतरानें आलेली आहे द्वारावती नगरीचा समुद्रात प्रवेश व कृष्णनिर्याण हे दोन प्रसंग महाभारतांतील कथेप्रमाणेंच वर्णन केले आहेत. फक्त त्यात फरक इतकाच केला आहे कीं निर्याणापूर्वी कृष्णानें जैन धर्माची दीक्षा घेतल्याचें दाखविलें आहे.

नवव्या अंगात पवित्र मुनी उपोषण वृत्तीनें मृत्युमुखातून अंतिम निर्वाण कसें प्राप्त करून घेतात. त्याचें अत्यंत कंटाळवाण्या एकच एक पद्धतीनें वर्णन केलें आहे अर्थात् हें "वैराग्याच्या" अनुपम सौंदर्याचें वर्णन त्याचप्रमाणें तपस्व्याच्या कृश झालेल्या प्रत्येक अवयवाचें उपमा, रूपकें इत्यादि अलंकारानीं भूषित केलेलें नीरस वर्णन, साप्रत विसाव्या शतकात तरी मानवी प्राण्यास चित्ताकर्षक होणार नाहीं. एका बाजूस जैन मुनींच्या ठिकाणीं आढळून येणारें मृत्यूबद्दलचें उत्कट प्रेम, व त्याच्याच उलट एका क्षुद्र कृमीची किंवा तृणांकुराची हत्या होईल त्याविषयीं क्षणोक्षणीं वाटणारी भीति ह्या जैनाच्या दोन्ही धार्मिक वृत्ती किती परस्परविरुद्ध आहेत ही गोष्ट अत्यंत मौजेची आहे.

**दहावें अंग पण्हावागरणाइम्**—या दहाव्या अंगात सर्वसामान्य वागणूक, धर्माज्ञा व वर्ज्यावर्ज्य गोष्टी ह्यासह दहा द्वारानें वर्णन केलें आहे. हें अंग अगदीं जैन साप्रदायिक गोष्टींचेंच वर्णन करणारें आहे.

**अकरावें अंग, विवागसूयम.**—या अगामध्यें अवदानशतक व कर्मशतक ह्या बौद्ध ग्रंथातील दंतकथा प्रमाणें सुकृतदुष्कृताचा परिणाम प्रत्येक जिवास कसा भोगावा लागतो याबद्दल आख्यायिका दिल्या आहेत. ह्या ग्रंथाचें स्वरूप म्हणजे 'इदभृति' अनेक दु:खी प्राणी पाहात आहे व त्याच्या विनंतीवरून महावीर, त्या प्राण्यानें पूर्वजन्मात केलेल्या कोणत्या वाईट कृत्यामुळें त्याला ह्या आपत्ती आल्या, त्याचप्रमाणें त्यानें किती नीच योनींत जन्म घेतला, अद्यापि त्यास किती हाल भोगावयाचे आहेत व सरते शेवटीं तो पुन्हां उत्तम जन्मास कसा जाणार इत्यादि गोष्टी विवरण करून त्यास सागत आहे. उदाहरणार्थ, उंबरदत्त नामक मनुष्यास सर्व प्रकारचे व्याधी झाल्याचें वर्णन आहे त्याचें कारण असें कीं पूर्वजन्मीं तो रोगपरीक्षक असताना त्यानें आपल्या रोग्यास बरें होण्याकरिता मांसाशन करण्याविषयीं सांगितलें व त्यामुळें त्याच्याकडून अनेक प्राण्याची हिंसा झाली. म्हणून त्याला अद्याप ह्यापेक्षा हलक्या जन्मास जावें लागणार व सरते शेवटीं तो पुन व्यापाऱ्याच्या जन्मास येऊन निर्वाण पद प्राप्त करील असें त्याजबद्दल सागितलें आहे

**बारावें अंग दिट्ठिवाय**—ह्यानंतरच्या नष्टप्राय झालेल्या "दिट्ठिवाय" नामक बाराव्या अंगामधील विषयाची कल्पना येण्यास इतर जैन धर्मग्रंथात पुष्कळ पुरावा आहे परंतु बारा उपांगाच्या अस्तित्वावरून बारा अंगेंहि अस्तित्वात होतीं हें उघड आहे.

*उपांगाचा प्रत्येक अंगाशीं संबंध आहे. तथापि हा संबध अगदीं बाह्य तऱ्हेचा आहे. बारा उपांगाचे विषय दंतकथात्मक व जैनसाप्रदायिक माहितीचे असून वाङ्मयदृष्ट्या त्यास अत्यंत थोडें महत्व आहे*

**पहिलें उपांग**—हें ओववाइय अगर ओवाइय ह्या नावाचें असून त्यामध्यें अनेक प्रकारचे विसदृश विषय एकत्रित करण्यात आले आहेत. पहिल्या भागात एका राजानें धार्मिकदृष्ट्या पूज्य अशा एका स्थळीं केलेल्या यात्रेचें वर्णन आहे ह्या ठिकाणीं महावीर हा त्या राजास जैन धर्माचा उपदेश करतो व सरते शेवटीं राजा जैन धर्मांत सामाविष्ट होतो असें दाखविलें आहे. ह्या भागाचा दुसऱ्या भागाशीं काहीं एक संबंध नाहीं कारण दुसऱ्या भागात बारा स्वर्लोकाची प्राप्ति कशी होते ह्याचे विवरण आहे.

**दुसरें उपांग.**—वाङ्मयग्रंथ या दृष्टीनें सर्वांत महत्त्वाचें पुस्तक रायपसेनैज्ज नावाचें दुसरें उपाग होय. ह्या ग्रंथाच्या आरंभींच' सूरियाभ" नावाच्या देवानें महावीराच्या केलेल्या यात्रेचे लाब, कंटाळवाणें वर्णन आहे. परतु ह्या ग्रंथातील अत्यंत सारभूत भाग म्हटला म्हणजे ह्या कथेंत आलेला पैशी राजा व केशी मुनि याजमध्यें झालेला सवाद होय.

**चौथें उपांग**—याचा सर्व धर्मग्रंथापेक्षा असा एक विशेष आहे की हें उपांग "अय्य साम" नांवाच्या ग्रंथकाराच्या नावावर मोडतें

**पांच ते सात उपांगें**—हीं उपांगें तत्कालीन खगोलशास्त्र, भूगोलशास्त्र, सृष्ट्युत्पत्ति, व कालगणना इत्यादि अनेक शास्त्राचे ग्रंथ होत तथापि "सूरियपण्णत्ति" ह्यामध्यें आकाशस्थ गोलाच्या खऱ्या निरीक्षणापेक्षा, त्यामधीं अवांतर वेडगळ कल्पनाच जास्त दिसून येतात. त्याचप्रमाणें

" जंबुद्दवपण्णत्ति " ह्या भूगोलशास्त्रीय प्रकरणात भारतवर्षाच्या वर्णनातील बरीचशी जागा भरत राजाच्या आख्यायिकांनीं व्यापून टाकली आहे.

आठ ते बारा उपांगें.—हीं "निरयावलीसुत्तम्" ह्या एका नावानें एका धर्मग्रंथाचेच पांच परिच्छेद म्हणून प्रसिद्ध आहेत. ह्यांपैकीं "निरयावलीयाओ" ह्यामध्यें "कूणीय" किंवा "अजातशत्रु" नावाच्या चंपानगरीच्या राजाचे दहा सावत्र भाऊ आपल्या आजाबरोबर युद्ध करीत असतां त्याजकडून कसे मारले गेले व मृत्यूनंतर ते अनेक नरकात कसे पुन्हा जन्मले ह्याचें वर्णन आहे.

पैण्ण.—या नावाचीं दहा पुस्तकें वैदिक परिशिष्ट ग्रंथासारखीं पद्यरूपात रचलेलीं असून जैन संप्रदायासंबंधीं उपासनापद्धति, अर्हत्, सिद्ध, साधु व धर्म यांना शरण जाणें, साधु पुरुषाचा मृत्यु, गर्भावस्था, गुरुशिष्यगुणदोष, अनेक देव इत्यादि माहिती त्यात दिली आहे.

सहा छेदसूत्रें.—हीं जैन धर्मग्रंथात मागाहूनच्या कालात समाविष्ट झालीं असावींत, कारण नेहमीं ह्यांचा धर्मग्रंथात समावेश करण्यात येत नाहीं. ह्यांपैकीं अगदीं मूळ ग्रंथ ३–५ सूत्रें असून तो अत्यंत प्राचीन ग्रंथात मोडतो. ह्या तीन सूत्रांना मिळून " दसा-कप्प-ववहारा " ही संज्ञा आहे इतर विविध आख्यायिका धरून शिवाय ह्या छेदसूत्रामध्यें बौद्धाच्या " विनय " ग्रंथाप्रमाणें जैन जोगी व जोगिणी यांच्या आचाराचे " नियम " तपश्चर्येचे वगैरे नियम, किंवा, थोडक्यात सांगावयाचें म्हणजे जैनांची साम्प्रदायिक सर्व माहिती आली आहे. ह्यांपैकीं 'आयारदसाओ' किंवा " दशाश्रुतस्कंध " ह्या नावानें प्रसिद्ध असलेलें चवथें सूत्र ह्याचें कर्तृत्व दंतकथेप्रमाणें भद्रबाहु यांजकडे देण्यात येतें व ह्याचा ८ वा परिच्छेद " भद्रबाहुकृत कल्पसूत्र " ह्या नावानें पुष्कळ दिवस प्रसिद्ध आहे.

भद्रबाहु हा जैनांतील एक प्राचीन उपदेशक व मोठा ग्रंथकार म्हणून समजला जातो. महावीरानंतरचा तो सहावा थेर असून तो महावीरनिर्वाणानंतर १७० व्या वर्षी वारला असें समजतात. नष्टप्राय झालेलें पुव्व जाणणारा शेवटचा पुरुष भद्रबाहु हाच होय व नवव्या 'पुव्वा'तून तीन व चार हीं छेदसूत्रें त्यानेंच काढलीं अशी आख्यायिका सांगतात कल्पसूत्रामध्यें ज्या तीन निरनिराळ्या प्रकारच्या प्रकरणाचा एका ठिकाणी समावेश केलेला दिसतो. तीं सर्व भद्रबाहूनें लिहिलीं असणें असंभवनीय आहे. पहिल्या परिच्छेदात जिनचरित्र दिलें आहे. ह्या प्रकरणाचा मुख्य भाग महावीराचा जीवनवृत्तात हा असून एकंदर कथाभाग सविस्तर रीतीनें बारिकसारिक गोष्टीसुद्धां अतिशयोक्तिपूर्ण पद्धतीनें काव्यमय भाषेंत लिहिलेला आहे व त्यावरून ललितविस्तर ह्या ग्रंथाची आठवण होते. महावीराचा गर्भवास, जन्म इत्यादि प्रसंग आयारंगसुत्ताप्रमाणेंच वर्णन केले आहेत. ह्यानंतर महावीरमाता देवानंदा हिला पडलेली १४ स्वप्नें व त्यांचा अर्थ, महावीराचें बाल्य, बाराव्या वर्षी त्यानें धारण केलेली तापसवृत्ति व तीस वर्षांच्या अवधीत त्यानें केलेली धार्मिक चळवळ इत्यादि गोष्टींचें वर्णन आहे. ह्याखेरीज महावीरापूर्वींच्या तीर्थकरांची व पूर्वीच्या पार्श्वनाथापर्यंतच्या जिनांची जीवनचरित्रें ह्या महावीरचरित्राच्या धर्तीवरच लिहिलेलीं आहेत व तीं मुख्यतः साम्प्रदायिक उपयोगाकरितां आहेत.

कल्पसूत्राच्या दुसऱ्या परिच्छेदात थेरावली, निरनिराळ्या गणाच्या याद्या, त्याच्या शाखा व त्याचे गणधर इत्यादि माहिती आहे. ही यादी भद्रबाहूच्या पुढील पुरुषाचाहि समावेश करते व त्यामुळें ही भद्रबाहूची कृति नसावी. परंतु इ. सनाच्या पहिल्या शतकात सांपडलेल्या कोरीव शिलेखावरून ह्या यादींतील नांवें केवळ दंतकथात्मक नसून ऐतिहासिक आहेत हें सिद्ध होतें.

कल्पसूत्रातील तिसरा परिच्छेद अत्यंत जुना असावा. ह्यामध्यें " सामाचारी " अथवा तपस्व्यांनीं पावसाळ्यात पाळावयाचे नियम आहेत. ह्या कल्पसूत्राचें पूर्ण नाव " पज्जोसवणाकप्प " ( पर्युषणाकल्प ) हें असून ते ह्याच भागास अन्वर्थक होतें व त्यावरून साम्प्रतच्या कल्पसूत्रातील हाच भाग फार प्राचीन असावा ही गोष्ट संभवते जिनचरित्र, थेरावली व सामाचारी हे भाग कल्पसूत्र ह्या नांवाखालीं मुळात मोडत नव्हते, परंतु मागाहून देवर्द्धि यानें "सिद्धांत' ग्रंथात त्यांचा समावेश केला, ह्या जैन आख्यायिकेंत बराच सत्यांश असावा असें दिसतें.

पाचव्या छेदसूत्रास अत्यंत प्राचीन व खरें कल्पसूत्र म्हणतां येईल. ह्या सूत्राचें नाव ' बृहत्कल्पसूत्र " किंवा बृहत्साधुकल्पसूत्र असें आहे. जैन तपस्वी व तपस्विनी ह्यांचें आचरण कसें असावें ह्यावरील हा मुख्य ग्रंथ आहे. ह्याला पूरक असें " ववहार " नावाचें तिसरें छेदसूत्र आहे. कल्पसूत्रामध्यें योग्य शासन केलें असतां शेवट परिणाम कसा गोड होतो हें दाखविलें असून व्यवहारामध्यें मिळालेल्या शासनाचा स्वीकार कसा करावा ह्याचा उपदेश आहे. ' निसीह ' नावाचें पहिलें छेदसूत्र उत्तरकालीन आहे. दैनिक आचारनियमाविरुद्ध घडून आलेल्या अनेक गुन्ह्याबद्दल कसें शासन करावें ह्याबद्दल ह्या ग्रंथात नियम घालून दिले आहेत. पंचकप्प नावाचें सहावें छेदसूत्र अद्यापि उपलब्ध झालेलें नाहीं. तथापि व्रतभंग केल्यामुळें योग्यतऱ्हेनें शिक्षा झालेल्याचा जिनभद्रानें पद्यस्वरूपात रचलेली जितकप्प नांवाची सविस्तर यादी हिलाच कधीं कधीं सहावें छेदसूत्र समजण्यात येतें. ह्याचप्रमाणें पिण्ड व ओघानज्जुत्ती ह्या आचारनियम विवरण करणाऱ्या ग्रंथाचाहि छेदसूत्रांत कधीं कधीं समावेश करण्यात येत असतो. ह्या दोन्हीं " निज्जुत्ती " ग्रंथांच्या बराच मागाहूनच " महानिसीह सुत्त " नावाचा ग्रंथहि दुसरें किंवा सहावें छेदसूत्र म्हणून समजण्यात येतो. परंतु वस्तुतः जैन धर्मग्रंथात ह्या ग्रंथाचा मोठ्या मुष्किलीनें समावेश

करता येणार आहे. सांप्रतचा ग्रंथ हा बहुतेक मूळ जुन्या नष्ट झालेल्या "महानिसीह" नामक धर्मग्रंथाच्या जागीं रचून घातला असावा. निर्वाणाकडे नेणाऱ्या सोपानाच्या अत्यंत महत्वाच्या पायऱ्या ज्या पश्चात्ताप व तप त्या संबंधीं अनेक प्रकारच्या नियमाचें विवरण हाच ह्या ग्रंथाचा विषय होय. त्यापैकीं नीतिशास्त्राच्या भागामध्यें कर्मतत्वाप्रमाणें प्राण्यास विविध प्रकारचीं सुखदुःखें कशीं भोगावीं लागतात त्याबद्दल विवरण आहे. विशेषतः पावित्र्य वगैरे व्रताचा भंग करण्याचें पातक, चांगले व वाईट तपस्वी त्यांचीं लक्षणें इत्यादिकांबद्दल बरेंच विवेचन ह्या ठिकाणीं आढळतें. त्याचप्रमाणें कांहीं नवीन काढलेल्या व कांहीं जुन्या ग्रंथांतून घेतलेल्या कल्पित कथाहि ह्या ग्रंथामध्यें घुसडून दिल्या आहेत ह्या ग्रंथाची भाषा व विषय, त्यांतील तात्विक वाक्प्रचार, धार्मिकेतर ग्रंथाचे उल्लेख इत्यादि गोष्टींवरुन सदर ग्रंथ बराच मागाहूनचा आहे ही गोष्ट सिद्ध होते. यांशेरीज दुसरे "मूलसूत्रें" नावाचे चार धर्मग्रंथ आहेत, त्यांपैकीं पहिले तीन ग्रंथ वाङ्मयात्मक दृष्टीनें देखील अत्यंत महत्त्वाचे आहेत. त्यांपैकीं पहिलें उत्तरज्झयण किंवा उत्तराध्ययनसूत्र हें एक धार्मिक काव्य असून धर्मग्रंथाच्या बहुमोल भागांपैकीं एक आहे. ह्या काव्याचे ३६ परिच्छेद असून त्यामध्यें नव्या जुन्या भागाचें संहितीकरण झालें आहे. त्यांतील अत्यंत प्राचीन भाग म्हणजे उपदेशपर संवाद व कविता, रूपकपूर्ण कथानकें व स्फुटप्रकरणें ह्या प्रकारचा असून तो प्राचीन भारतीय वैराग्यपर काव्यामध्यें गणला जातो व अशाच प्रकारचा भाग बौद्ध "सुत्तनिपात" वगैरेसारख्या ग्रंथामधूनहि आढळतो. शिष्यांना उपदेशपर पाठ, स्फुट विषयांची मालिका वगैरे, त्याचप्रमाणें मुनीनें (१) मानवजन्म, (२) धर्मशिक्षण, (३) धर्मश्रद्धा व (४) आत्मदमन ह्या चार महत्वाच्या गोष्टींकरितां जे होतील ते हाल सोसले पाहिजेत अशीं वर्णनें पुष्कळ प्रकरणांत आहेत. त्याचप्रमाणें कर्मतत्त्व व पाप, सत्पुरुषाचें इच्छामरण व मूर्खांचें कुरकुरत मरणें, खरे व खोटे तपस्वी इत्यादींबद्दल फार बहारीचीं वर्णनें आहेत. चित्ताकर्षक उपमा व जोरदार भाषा ह्यांनीं युक्त अशीं पुष्कळ सुभाषितेंहि ह्या ठिकाणीं सांपडतात "सुत्तनिपात' व 'धम्मपद' यांतील श्लोकाप्रमाणें या ग्रंथातील कित्येक श्लोकांमध्यें एक सामान्य श्लोकार्ध आढळतो.

सातवा परिच्छेद हा बहुतेक रूपकांनीं भरलेला आहे ह्या ठिकाणीं तीन व्यापाऱ्यांची एक रूपकपूर्ण गोष्ट आली आहे तिजवरून बायबलमधील "टॅलंटस" च्या कथानकाचें स्मरण होतें. ही गोष्ट पुढीलप्रमाणें:—

"तीन व्यापारी प्रवासास गेले व जातांना त्या तिघांनीं आपापलें भांडवल बरोबर घेतलें. त्यांपैकीं एक व्यापारांत पुष्कळ नफा मिळवून आला, दुसऱ्यानें पूर्वीं जितका पैसा नेला तितकाच त्यानें परत आणला, व तिसऱ्यानें सर्व भांडवलाची उधळपट्टी केली. आतां हेंच रूपक धर्मास कसें लागू करावयाचें तें पहा. ह्यांतील भांडवल म्हणजे मानवजीवित होय, नफा म्हणजे स्वर्गांतील पुण्यभोग होत, व ज्यानें आपलें भांडवल उधळलें त्यास नरकांत सांप्या क्षुद्र प्राण्या-प्रमाणें पश्चात्ताप करण्याची पाळी येईल."

"सुत्तनिपात" ग्रंथाप्रमाणें "उत्तरज्झयण" सूत्रामध्यें अनेक सुंदर ऐतिहासिक संवाद व वैराग्यपर काव्यवाङ्मयांतील अनेक गीतें आढळतात ह्यांशिवाय ज्यामध्यें क्षत्रियधर्म व राजधर्म ह्यांविरुद्ध श्रमणाचें ध्येय मांडलें गेलें आहे, अशा बौद्ध आख्यानिकाहि 'नेमि' राजाच्या सुंदर वचनांत असल्या आहेत. त्याचप्रमाणें हरिकेशाच्या गीतांत एक गर्विष्ठ ब्राह्मण व नीच जातींतील एक बहिष्कृत विरागी ह्यांचा जो मजेदार संवाद झाला आहे त्यामध्यें ब्राह्मणधर्मांतील औपचारिक दंभ व पोकळ डौल यांची जैनमुनींच्या इंद्रियदमन, पावित्र्य इत्यादि गोष्टींशीं परिणामकारक रीतीनें तुलना केली आहे. पुरोहित व त्याचे पुत्र ह्यांमधील उत्कृष्ट संवादामध्यें देखील ब्राह्मणांच्या ध्येयापेक्षा त्या विरुद्ध असणारें जैनमुनींचें वैराग्यपर ध्येयच सर्वोत्कृष्ट असें दाखविलें आहे. ह्या संवादांपैकीं कांहीं भाग शब्दशः महाभारत, पुराणग्रंथ, जातककथा ह्यांमध्यें आढळून येतो, ह्या गोष्टीवरून हा संवाद भारतीयांच्या सामान्य वैराग्यपर वाङ्मयापैकीं असल्याचें सिद्ध होतें.

२३ व्या अध्यायांतील संभाषण जैनसंप्रदायाच्या इतिहासास अत्यंत उपयुक्त आहे. ह्यामध्यें पार्श्व व महावीर ह्यांचे दोन शिष्य आपआपसांत आपआपल्या संप्रदायांतील भेद व त्यांपासून मिळणारे फायदे ह्याबद्दल वाद करतांना दाखविले आहेत. एकंदर संवाद कांहींसा प्रश्नोत्तरांच्या गूढार्थपूर्ण प्रश्नोत्तररूपांत दाखविला आहे. बहुतेक सर्व गीतामध्ये संवाद हेच प्रमुखत्वानें दिसतात. फक्त २२ व्या अध्यायांतील गीतांमध्यें कथानकाचा भाग, कृष्णविषयक आख्यायिकेमुळें व इतर कथानकांतील गोष्टिमुळें असेल मनोरंजक झाला आहे तो थोडक्यांत पुढील प्रमाणें:—

शौर्यपुर नगरामध्यें दोन पराक्रमी राजे रहात असत. त्यांपैकीं वसुदेवास त्याच्या रोहिणी व देवकी ह्या दोन बायकांपासून राम व केशव असे दोन पुत्र झाले होते. दुसऱ्या समुद्रविजय नामक राजास त्याच्या शिवा नामक भार्येपासून अरिष्टनेमि नांवाचा पुत्र झाला होता. केशव यानें अरिष्टनेमि करितां राजिमती नांवाच्या राजकन्येबद्दल मागणी घातली, व त्यास अनुमति मिळाली त्याप्रमाणें अरिष्टनेमि आपल्या भावी पत्नीस आणण्याकरितां मोठ्या थाटानें निघतो; परंतु मार्गांत अनेक प्राणी पिंजऱ्यांत किंवा दुसऱ्या बंदिस्त ठिकाणीं कोंडून ठेवलेले त्यास आढळतात. व त्यास असें कळून येतें कीं हे सर्व प्राणी त्याच्या विवाहप्रसंगीं मारावयाचे आहेत. ह्या बातमीनें त्याचें मन इतकें खिन्न होतें कीं तो अरिष्टनेमि सर्वसंगपरित्याग करून वैराग्याचें व्रत धारण करतो.

## कर्मकांड

### ऋग्वेद

संहिता ( शाकल, बाष्कलसंहिता उपलब्ध नाहीं )— ऋक्संहिता म्ह शाकलसंहिता प्रथम पूर्णपणें प्रसिद्ध करण्याचें श्रेय ईस्ट इंडिया कंपनी व मॅक्समुल्लर यांजकडे आहे मॅक्समूलरसंपादित ऋग्वेदसंहिता, १ ली आवृत्ति१८४९-७४,दुसरी १८९०-९५० त्याशिवाय रोसेन यांचीहि आवृत्ति आहे. देशी आवृत्ति –( १ ) ऋग्वेदसंहिता अजमीर १९०० (२)बनारस चौखंबा संस्कृत सीरीजमध्यें (३) ऋग्वेदसंहिता, मुद्रक गणपत कृष्णाजी, संपादक राजारामशास्त्री बोडस व शिवराम शास्त्री गोरे, मुंबई शके १८११ श्रुतिबोध-ऋग्वेद (अपूर्ण) मुंबई १९१२

ब्राह्मणें व आरण्यकें —ऐतरेयब्राह्मण ( आनंदाश्रम संस्कृतग्रंथावलि ) पुणें १८९६ बनारस ( चौखंबा ) संस्कृत सीरीजमध्यें ऐतरेयब्राह्मण व आरण्यक प्रसिद्ध झालें आहे पंडित सत्यव्रत सामाश्रमी–ऐतरेयब्राह्मण, कलकत्ता १८९५ शांखायनब्राह्मण ( आनंदाश्रम ), पुणें १९११

महत्त्वाचीं भाषांतरें —संहितेचीं ग्रासमनचें छंदोबद्ध जर्मन भाषांतर, लाइप्झिग, १८७६-७७ लुडविगचें गद्य जर्मन भाषांतर, प्राग १८७६-८८ मॅक्समुल्लर व ओल्डनबर्ग यांनी सेक्रेड बुक्स ऑफ दि ईस्ट भाग ३२ व ४६ मध्यें प्रसिद्ध केलेलीं भाषांतरें ( कांहीं सूक्तांचीं ) विल्सनचें इंग्रजी भाषांतर, सायणानुयायी, ग्रिफिथ–इंग्रजी भाषांतर,काशी १८९६-९७ वेदार्थयत्न,इंग्रजी व मराठी भाषांतर (अपूर्ण) मुंबई १८७६ रोझेन– लाटिन भाषांतर श्रुतिबोध–ऋग्वेद मराठी भाषांतर अपूर्ण रा काशीनाथ वामन लेले यांनीहि ऋग्वेदाचा थरा । भाग भाषांतरिला आहे, तसेंच, रा धुलेशास्त्री, नागपुर यांनीहि भाषांतरास सुरवात केली होती पण तें काम फारच थोडें झालें

ब्राह्मणांचीं—ऐतरेय ब्राम्हण हागचें इंग्रजी भाषांतर मुंबई १८६३ कीथचें इंग्रजी भाषांतर धुंडिराजशास्त्री बापट पाचवड यांनी ऐतरेय ब्राह्मणाच्या एका पंचकाचें मराठी सटीक भाषांतर केलें आहे ( स्वाध्याय मासिक वर्ष १ लें ) शांखायन ब्राह्मण व एतरेयआरण्यक–कीथचें इंग्रजी भाषांतर लंडन१९०८ )

टीका —र्व वेदावर सायणभाष्य आहे अर्वाचीन टीका यामध्यें दयानंदी टीका येतें, पण तिचें अथवाधान्या दृष्टीनें महत्त्व नाहीं

### यजुर्वेद

संहिता —वेबर–तैत्तिरीयसंहिता ( इंडिश्‌च्ये स्टुडिएन मध्यें रोमन लिपींत –१२ ) तैत्तिरीयसंहिता, बनारस सीरीज काशी कृष्णयजुर्वेद तैत्तिरीय संहिता ( आनंदाश्रम पुणें १९००, तैत्तिरीय संहिता, म्हैसूर १८९४-९८ –तै संहिता. बिब्लिओथिकाइंडिका कलकत्ता १८६०–९९ शुक्लयजुर्वेद भाग १ वाजसनेयी संहिता बर्लिन व लंडन १८५८ शुक्ल यजुर्वेद संहिता ( निर्णयसागर ) मुंबई १९१२ वाजसनेयी संहिता बिब्लिओथेका इंडिका कलकत्ता १८६२ वेबरनें वाजसनेयीसंहिता तीन भागांत प्रसिद्ध केली आहे. शुक्लयजुर्वेद काण्व संहिता, आनंदवन १९, बनारस संस्कृत सीरीज, १९१५ श्रोडरसंपादित काठकसंहिता लाइप्झिग मैत्रायणीसंहिता लाइप्झिग, १८८१-८६

ब्राह्मणें व आरण्यकें —शतपथब्राह्मण वेबरसंपादित बर्लिन आणि लंडन १८५५ शत ब्राह्मण बिब्लिओथेका इंडिका, कलकत्ता १९०३ यजुर्वेदीय माध्यंदिन शतपथ ब्राह्मण अजमीर १९०२. बनारस संस्कृत सीरीजमध्यें शतपथब्राह्मण तैत्तिरीय ब्राह्मण व तै आरण्यक प्रसिद्ध झालें आहे तैत्तिरीय ब्राह्मण ( आनंदाश्रम ) पुणें १८९८ मित्रसंपादित बिब्लिओथेका इंडिका. तैत्तिरीय ब्राह्मण, म्है १८९८ म्हैसूर १९०८-१३ तैत्तिरीयारण्यक, म्हैसूर १९ आनंदाश्रम ग्रंथावलि पुणें १८९७, मद्रास १८९४.

महत्त्वाचीं भाषांतरें —ग्रिफिथ– यजुर्वेदाचें इंग्रजी भाषांतर, काशी १८९९ कीथ—तैत्तिरीय संहितेचें इं भाषांतर ( हारवर्ड ओरि सीरीज १९१४,)

एग्लिंग–शतपथ ब्राह्मणाचें भाषांतर ( सेक्रेड बुक्स ऑफ दि ईस्ट )१८८२–१९०८

### सामवेद

संहिता —सामदेव संहितामूलम् चौखंबा सीरीज, काशी सामवेदसंहिता (बिब्लिओथेका इंडिया ) कलकत्ता सामवेद संहिता, अजमेर १९०२ बेनफे संहिता.

ब्राह्मणें व आरण्यकें —बर्नेल आर्षेयब्राह्मण कूर १८७६ ताण्ड्य महा ब्राह्मण. बिब्लिओ इंडिका, कलकत्ता १८७०-७४ मध्यें झालें आहे वेबरनें अद्भुत भाषांतरासहित प्रसिद्ध केलें आहे ( ट्रांझॅक्शन्स ऑफ बर्लिन ॲकेडमी ऑफ सायन्स १८५८ ) दैवत व षड्विंश ब्राह्मण चौखंबा संस्कृत सीरीज, काशी, पंडित विद्या दैवत व षड्विंश ब्राह्मण कलकत्ता १८८१ बर्नेल मंहि पद्ब्राह्मण मंगलूर १८७७ सामविधानब्राह्मण, बंगाली भाषा सहित, कलकत्ता १८९५ सत्यव्रतभट्टाचार्य वंश ब्राह्मण, कलकत्ता १८९२ बर्नेल· सामविधानब्राह्मण १८७३ जैमिनीयउपनिषद्ब्राह्मण (दयानंद महाविद्यालय संस्कृत ग्रंथमाला ) लाहोर १९२१.

महत्त्वाचीं भाषांतरें –संहितेचीं–थिओडोर जर्मन भाषांतर लाइपझिग् १८४८, ग्रिफिथ इंग्रजी काशी १८९३, दुसरी आवृत्ति १९०७ स्टिव्हन्सन्स भाषांतर

ब्राह्मणांचीं—बर्नेल,तलवकारब्राह्मणाचें भाषांतर

## अथर्ववेद

संहिता —अथर्ववेदसंहितामूल, चोवखामहत्न मारील श्री अथर्ववेदसंहिता ( निर्णयसागर ) शंकर पांडुरंग पंडित यांनी संशोधलेला, मुंबई १८९५ अथर्ववेदसंहिता अजमेर, संवत १९५७ रॉथ आणि व्हिट्नी-अथर्वसंहिता व्हिट्नी आणि लानमन-अथर्वसंहिता (काशिनाथ आवृत्ती)

ब्राह्मणें व आरण्यक —गोपथब्राह्मण, नीलाचा साराज काशी, बिब्लिओथेका इंडिका, कलकत्ता १८७२

महत्त्वाचीं भाषांतरें —ग्रिलनें कांहीं सूक्तांचें जर्मन भाषांतर केलें आहे, स्टटगार्ट १८८८ वेबरनें इंडिश्चे स्टुडियन मध्ये ( ४, ५ १३ १७ १८ ) वेबरनें १–५ आणि १४ या कांडाचें भाषांतर केलें आहे ग्रिफिथनें संपूर्ण भाषांतर काशी येथें १८९५-९६ मध्यें प्रसिद्ध केलें आहे दुसरी आवृत्ति १९१६ व्हिट्नी व लानमन—इंग्रजी भाषांतर काशिमरी आवृत्त च (हार्वर्ड) ब्लूमफील्ड अथर्ववेदातील मुख्य सूक्तांचें भाषांतर

## ज्ञानकांड

**उपनिषदें**—उपनिषदांचा एक यादी फारकरन रिलिजिअस लिटेरेचर आफ इंडिया' यामध्यें अनेक प्रकारच्या साहित्याच्या साहाय्यानें दिली आहे ही यादी येथें अवतरितों ऋग्वेदी१ ऐतरेय, २. कौषीतकि सामवेदी ३ छांदोग्य,४केन कृष्णयजुर्वेदी–५ तैत्तिरीय ६.महानारायण,७ काठक किंवा कठ८ श्वेताश्वतर, ९ मैत्रायण शुक्लयजुर्वेदी १० बृहदारण्यक, ११ ईश अथर्ववेदी-१२ मुण्डक,१३ प्रश्न,१४ माण्डुक्य, १५ गर्भ, १६ प्राणाग्निहोत्र, १७ पिण्ड, १८ आत्म, १९ सर्वोपनिषत्सार२०, गारुड,२१ ब्रह्मविद्या,२२ क्षुरिका, २३ चूलिका२४ नादबिन्दु, २५.ब्रह्मबिन्दु, २६ अमृतबिंदु, २७ ध्यानबिन्दु, २८ तेजोबिन्दु २९ योगशिखा, ३० योगतत्त्व, ३१ हंस, ३२. ब्रह्म, ३३ सन्यास, ३४ आरुणेय, ३५ कठश्रुति किंवा कठश्रुति, ३६ परमहंस, ३७ जाबाल, ३८ आश्रम, ३९ अथर्वशिरस्, ( अ ) ४० अथर्वशिखा, ४१ नीलरुद्र, ४२.कालाग्निरुद्र, ४३ कैवल्य, ४४ महा, ४५ नारायण, ४६ आत्मबोध, ४७ नृसिंहपूर्वतापनीय, ४८ नृसिंहोत्तरतापनीय, ४९.रामपूर्वतापनीय, ५० रामोत्तरतापनीय, ५१. कौल, ५२ अमृतनाद, ५३ बृहज्जाबाल, ५४. मैत्रेय, ५५ सुबाल, ५६ मंत्रिका, ५७ निरालम्ब, ५८ शुकरहस्य, ५९ वज्रसूची, ६० नारदपरिव्राजक, ६१. निरालम्बब्राह्मण, ६२. सीता, ६३. योगचूडामणि, ६४ निर्वाण, ६५ मण्डलब्राह्मण, ६६ दक्षिणामूर्ति, ६७ शरभ, ६८ स्कन्द, ६९ त्रिपाद्विभूतिमहानारायण, ७० अद्वयतारक, ७१ रामरहस्य, ७२ वासुदेव, ७३ मुद्गल ७४ शाण्डिल्य, ७५ पैंगल, ७६ भिक्षुक, ७७ शारीरक, ७८ तुरीयातीतावधूत, ७९ परमहंसपरिव्राजक, ८०. अक्षमालिका,८१ अव्यक्त, ८२ एकाक्षर, ८३ अन्नपूर्णा, ८४. सूर्य ८५ अक्षि- ८६; अध्यात्म ८७ कुण्डिका; ८८ सावित्री; ८९ पाशुपतब्रह्म ९० परब्रह्म ९१ अवधूत ९२ त्रिपुरातापनीय,९३ देवी ९४ त्रिपुरा, ९५. कठरुद्र ९६. भावना ९७ रुद्रहृदय ९८ योगकुण्डली, ९९. भस्मजाबाल, १०० रुद्राक्षजाबाल १०१ गणपति- १०२ दर्शन, १०३ तारसार १०४ महावाक्य १०५ पञ्चब्रह्म १०६. गोपालतापनीय १०७ कृष्ण १०८ याज्ञवल्क्य १०९ वराह,११० शाट्यायन, १११ हयग्रीव- ११२ दत्तात्रेय, ११३ कलिसन्तरण ११४ जाबाल ११५ सौभाग्यलक्ष्मी, ११६ सरस्वतीरहस्य ११७ बह्वृच, ११८ मुक्तिका ११९ गोपीचन्दन १२० वरदतापनीय, १२१ वरदोत्तरतापनीय, १२२ स्वप्न, १२३ अथर्वशिरस् ( ब ), यांतील वर्गीकरणासंबंधाने बराच मतभेद आहे उ आवालावरिण्द हे शुक्ल यजुर्वेदांत जाइल

टीका —८ वें शतक-गौडपाद, अनुक्रमांक १४,४७,४८ ९ व्या शतकाचा आरंभ-शंकर, अनुक्रमांक १, ३, ४, ५,७, ८, १०, ११,१२, १३, १४ ३९, ४०, ४७ १३ वें शतक –मध्व, अनुक्रमांक १, ३, ४, ५ ७, १०, ११, १२, १३, १४ सुमारें इ स १३५०, शंकरानन्द, अनुक्रमांक २. ४, ८, ९, १२, १५ १६, १७–१९,२०–३४, ३६, ३७,३९-४१, ४३, ४५ ४९, ५०, १०६, नारायण, अनुक्रमांक ४–८,११ –२०, २३, २५, २७ ३३, ३४, ३६ ३७ ४०–५०, ९२, १०६, १०७ ११९–२१,

महत्त्वाच्या आवृत्त्या —ईशोपनिषद् कौलाचार्य सत्यानन्दकृत भाष्यासह ज्ञानेंद्रलाल मजुमदार लुझाक व लंडन १९१८, इशाकनकठप्रश्नमुण्डमाण्डुक्यानन्दवल्लीभृगूपनिषदें त्यावरील टीकांसह आनंदाश्रम पुणें १९१० ईशकेनकठोपनिषद्–दिगम्बरानुचरविरचितार्थप्रकाशाख्यव्याख्येसह आनंदाश्रम पुणें ईशावास्योपनिषद सटीक शांकरभाष्यासह, आनंदाश्रम पुणें, १९१२ उपनिषत्समुच्चय १–३२—नारायणशंकरानंदविरचित दीपिकेसहितांना, आनंदाश्रम पुणें १८५ ऐतरेयोपनिषद आनंदगिरीकृत टीका व शांकरभाष्य यासह–आनंदाश्रम पुणें, १९२१ काठकोपनिषद सटीक व दोन शांकरभाष्यासह—आनंदाश्रम पुणें, १९१४ केनोपनिषद सटीक व शांकरपदभाष्यवाक्यभाष्यासह आनंदाश्रम पुणें, सन १९१७ श्रीगणेशाथर्वशीर्ष सभाष्यम् आनंदाश्रम पुणें. सन १८८८ छांदोग्योपनिषद, आनंदगिरीकृतटीकासवलितशांकरभाष्यासह आनंदाश्रम पुणें, सन १९१३ छांदोग्योपनिषद, रंगरामानुजमुनिविरचितप्रकाशिकेसह–आनंदाश्रम पुणें, सन १९१० छांदोग्योपनिषद, नित्यानंदमिताक्षराव्याख्येसह, आनंदाश्रम पुणें,सन १९१५ तैत्तिरीयोपनिषद, आनंदगिरीकृतटीकासंवलितभाष्यासह पुणें, सन १९०९ तैत्तिरीयोपनिषद्भाष्यवार्तिक सुरेश्वराचार्यकृत सटीक, आनंदाश्रम पुणें सन १९११ नृसिंहपूर्वोत्तरतापनीयोपनिषद शंकराचार्यविरचित पूर्वतापनी-

## कर्मकांड.

### ऋग्वेद

संहिता ( शाकल, बाष्कलसंहिता उपलब्ध नाहीं )— ऋक्संहिता म्ह. शाकलसंहिता प्रथम पूर्णपणें प्रसिद्ध करण्याचें श्रेय ईस्ट इंडिया कंपनी व मॅक्समुल्लर यांजकडे आहे. मॅक्समूलरसंपादित ऋग्वेदसंहिता, १ ली आवृत्ति१८४९-७४;दुसरी १८९०-९५० याशिवाय रोसेन याचीहि आवृत्ति आहे. देशी आवृत्तिः-( १ ) ऋग्वेदसंहिता अजमीर १९०० (२) बनारस चौखंबा संस्कृत सीरीजमध्यें (३) ऋग्वेदसंहिता, मुद्रक गणपत कृष्णाजी, संपादक राजारामशास्त्री बोडस व शिवराम शास्त्री गोरे, मुंबई शके १८११. श्रुतिबोध-ऋग्वेद (अपूर्ण), मुंबई १९१२

ब्राह्मणें व आरण्यकें.—ऐतरेयब्राह्मण ( आनंदाश्रम संस्कृतग्रंथावालि ) पुणें १८९६. बनारस ( चौखंबा ) संस्कृत सीरीजमध्यें ऐतरेयब्राह्मण व आरण्यक प्रसिद्ध झालें आहे. पंडित सत्यव्रत सामाश्रमी-ऐतरेयब्राह्मण, कलकत्ता १८९५. शांखायनब्राह्मण ( आनंदाश्रम ), पुणें १९११.

महत्त्वाचीं भाषांतरें—संहिताची. ग्रासमनचें छंदोबद्ध जर्मन भाषांतर, लाइप्झिग, १८७६-७७. लुडविगचें गद्य जर्मन भाषांतर, प्राग १८७६-८८ मॅक्समुल्लर व ओल्डनबर्ग यांनी सेक्रेड बुक्स ऑफ दि ईस्ट भाग ३२ व ४६ मध्यें प्रसिद्ध केलेलीं भाषांतरें ( कांहीं सूक्तांचीं ) विल्सनचें इंग्रजी भाषांतर, सायणानुयायी, ग्रिफिथ-इंग्रजी भाषांतर,काशी १८९६-९७ वेदार्थयत्न,इंग्रजी व मराठी भाषांतर (अपूर्ण). मुंबई १८७६. रोसेन- लाटिन भाषांतर. श्रुतिबोध-ऋग्वेद. मराठी भाषांतर अपूर्ण. रा. काशीनाथ वामन लेले यांनीहि ऋग्वेदाचा बराच भाग भाषांतरिला आहे; तसेंच, रा. घुलेशास्त्री, नागपुर यांनींहि भाषांतरास सुरवात केली होती पण तें काम फारच थोडें झालें.

ब्राह्मणाचीं—ऐतरेय ब्राम्हण-हागचें इंग्रजी भाषांतर, मुंबई १८६३. कीथचें इंग्रजी भाषांतर धुंडिराजशास्त्री बापट पाचवड यांनी ऐतरेय ब्राह्मणाच्या एका पंचकाचें मराठी सटीक भाषांतर केलें आहे ( स्वाध्याय मासिक वर्ष १ लें ) शाखायन ब्राह्मण व ऐतरेयआरण्यक-कीथचें इंग्रजी भाषांतर लंडन१९०८ ).

टीका.— र्व वेदावर सायणभाष्य आहे अर्वाचीन टीका यामध्यें दयानंदी टीका येते; पण तिचें अर्थबोधाच्या दृष्टीनें महत्त्व नाहीं

### यजुर्वेद

संहिता.—वेबर-तैत्तिरीयसंहिता ( ईडिश्चे स्टुडएं मध्यें रोमन लिपींत -१२ ). तैत्तिरीसंहिता, बनारस सीरीज काशी कृष्णयजुर्वेद तैत्तिरीय संहिता ( आनंदाश्रम पुणें १९००, तैत्तिरीय संहिता, म्हैसूर १८९४-९८. —तै. संहिता. बिब्लिओथिकाइंडिका. कलकत्ता १८६०-९९. शुक्लयजुर्वेद भाग १ वाजसनेयी सं्ता. बर्लिन व लंडन १८५८. शुक्ल यजुर्वेद संहिता ( निर्णयसागर ). मुंबई १९१२ वाजसनेयी संहिता बिब्लिओथिका इंडि कलकत्ता १८६२. वेबरनें वाजसनेयीसंहिता तीन भागांत प्रसिद्ध केली आहे. शुक्लयजुर्वेद काण्व संहिता, आनंदवन १९; बनारस संस्कृत सीरीज, १९१५ श्रोडरसंपादित काठकसंहिता, लाइपझिग मैत्रायणीसंहिता लाइप्झिग, १८८१-८६

ब्राह्मणें व आरण्यकें —शतपथब्राह्मण वेबरसंपादित बर्लिन आणि लंडन १८५५. शत. ब्राह्म बिब्लिओथेका इंडिका, कलकत्ता १९०३. यजुर्वेदीय माध्यान्दिन शतपथ ब्रा. अजमीर १९०२. बनारस संस्कृत सीरीजमध्ये शतपथब्राह्मण तैत्तिरीय ब्राह्मण व तै आरण्यक प्रसिद्ध झाले आहे. तैत्तिरीय ब्राह्मण ( आनंदाश्रम ) पुणें १८९८ मित्रसंपादित बिब्लिओथिका इंडिका. तैत्तिरीय ब्राह्मण, म्है १८९८- म्हैसूर १९०८-१३ तैत्तिरीयारण्यक, म्हैसूर १९ आनंदाश्रम ग्रंथावलि पुणें १८९७, मद्रास १८९४.

महत्त्वाचीं भाषांतरें —ग्रिफिथ- यजुर्वेदाचें इंग्रजी भाषांतर, काशी १८९९. कीथ—तैत्तिरीयसंहितेचें इं भाषांतर ( हारवर्ड ओरि. सीरीज १९१४,)

एग्लिंग-शतपथ ब्राह्मणाचें भाषांतर ( सेक्रेड बुक्स ऑफ दि ईस्ट )१८८२-१९०८

### सामवेद.

संहिता—सामवेद संहितामूलम्, चौखंबा सीरीज, काशी सामवेदसंहिता (बिब्लिओथेका इंडिया) कलकत्ता सामवेद संहिता, अजमेर १९०२. बेनफे संहिता.

ब्राह्मणें व आरण्यकें:—बर्नेल-आर्षेयब्राह्मण ... १८७६. ताण्ड्य-महा ब्राह्मण, बिब्लिओ. इंडिका, कलकत्ता १८७०-७४ मध्यें आलें आहे. वेबरनें अद्भुतब्राह्मण भाषांतरासहित प्रसिद्ध केलें आहे ( ट्रॅन्झॅक्शन्स ऑफ बर्लिन ॲकॅडमी ऑफ सायन्स १८५८ ) दैवत व षड्विंश ब्राह्मण चौखंबा संस्कृत सीरीज, काशी, पंडित विद्यासागर दैवत व षड्विंश ब्राह्मण कलकत्ता १८८१ बर्नेल संहितोपनिषद्ब्राह्मण मंगलूर १८७७ सामविधानब्राह्मण, बंगालीभाषासहित, कलकत्ता १८९५, सत्यव्रतभट्टाचार्य वंश व आर्षेय ब्राह्मण, कलकत्ता १८९२. बर्नेल- सामविधानब्राह्मण १८७३ जैमिनीयउपनिषद्ब्राह्मण (दयानंद महाविद्यालय संस्कृत ग्रंथमाला) लाहोर १९२१.

महत्त्वाचीं भाषांतरें.-संहितेचीं-थिओडोर बेनफे जर्मन भाषांतर. लाइपझिग् १८४८, ग्रिफिथ इंग्रजी भा काशी १८९३; दुसरी आवृत्ति १९०७ स्टिव्हन्सन्स सं भाषांतर.

ब्राह्मणांचीं—ओर्टेल,तलवकारब्राह्मणाचें भाषांतर

यभाष्य व विद्यारण्यकृत नृसिंहतापनीयदीपिका यासह आनंदाश्रम पुणें, सन १८९५ प्रश्नोपनिषद् आनंदगिरीविरचित टीकासवलितशांकरभाष्य व शंकरानंदविरचित प्रश्नोपनिषद्दीपिका यासह आनंदाश्रम पुणें सन १९११ बृहदारण्यकोपनिषद्, आनंदगिरिकृतटीकासवलितशांकरभाष्यासह आनंदाश्रम पुणें, सन १९१४ बृहदारण्यकोपनिषद्भाष्यवार्तिक, सुरेश्वराचार्यविरचित भाग १-३ आनंदाश्रम पुणें, १८९२-९४ नित्यानंदविरचित बृहदारण्यकोपनिषन्मिताक्षरा आनंदाश्रम पुणें सन १८९५ बृहदारण्यकोपनिषद् रंगरामानुजविरचित प्रकाशिकासह सन १९११ सगौडपादीयकारिकाथर्ववेदीय माण्डूक्योपनिषद्—आनंदाश्रम पुणें सन १९११ मुण्डकोपनिषद् आनंदगिरिकृतटीकासवलितशांकरभाष्यासह—आनंदाश्रम पुणें सन १९१८ कृष्णयजुर्वेदीय श्वेताश्वतरोपनिषद् शांकरभाष्यासह आनंदाश्रम, पुणें, सन १९०५ आनंदगिरिकृतटीका व शांकरभाष्य सवलित ईशकेनकठप्रश्नमुण्डकमाण्डुक्योपनिषदें—संपादक डॉ. ई. रोअर बाप्टिस्ट मिशन प्रेस कलकत्ता सन १८५० सार्थ उपनिषत्संग्रह हरि रघुनाथ भागवत ईशाद्यष्टोत्तरशतोपनिषदें—वासुदेव लक्ष्मण पणशीकर, निर्णयसागर प्रेस, सन १९१७

## प्राचीन-अभ्यास.

वेदांच्या प्राचीन अभ्यासामध्यें पदपाठ, अनुक्रमणी बृहद्देवतासारखे ग्रंथ, व वेदांगें म्हणजे, शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छंद, ज्योतिष, हीं होत कल्पामध्यें श्रौतसूत्रें गृह्यसूत्रें, व धर्मसूत्रें हीं येतात आपस्तंब यांत शुल्बसूत्रहि घेतो या शिवाय ऋग्विधानासारखे ग्रंथ पुढें निर्माण झाले यास वेदाभ्यासांत जागा देतां येणार नाहीं चरणव्यूहामध्यें ज्या अनेक शाखा, व सूत्रें दिलीं आहेत त्या सर्वांचा शोध लागला नाहीं

कल्पसूत्रें-श्रौतसूत्रें -१ ऋग्वेद —शांखायन आश्वलायन २ कृष्णयजुर्वेद —आपस्तंब, हिरण्यकेशिन् बौधायन, भारद्वाज, मानव ३ शुक्लयजुर्वेद—कात्यायन ४साम वेद—मशक, लाट्यायन, द्राह्यायण, जैमिनि ५ अथर्व वेद—वैतान गृह्यसूत्रें —(मुख्य ग्रंथ)—१ ऋग्वेद—शांखायनशांबव्य, आश्वलायन २कृष्णयजुर्वेद आपस्तंब हिरण्यकेशिन्, बौधायन भारद्वाज, मानव, वैखानस ३ शुक्ल यजुर्वेद— पारस्कर ४ सामवेद— गोभिल, खादिर, जैमिनि ५ अथर्ववेद—कौशिक धर्मसूत्रें—१ वसिष्ठ वासिष्ठ—(कृष्णयजुर्वेद)—आपस्तंब, हिरण्यकेशिन् बौधायन २ मध्यदेशीय गौतम,वासिष्ठ शुल्बसूत्र— बौधायनशुल्बसूत्र, आपस्तंबशुल्बसूत्र कात्यायनशुल्बसूत्र

पुष्पसूत्र अथवा पुष्पसूत्र—( सामवेदीय ) गायन विषयक यांची एक प्रत भांडारकर इन्स्टिट्यूटमध्यें आहे

शिक्षा—शिक्षावेदांग (पोथी, निर्णयसागर १९१४)

या शिवाय खालील शिक्षा आऊफ्रेक्टच्या कॅटालॉगमध्यें आहेत अमर्षशिक्षा अमोघनंदिनी, आत्रेयशिक्षा, आपिशला आरण्यकशिक्षा, कात्यायनीशिक्षा किंवा याज्ञवल्क्यशिक्षा कालनिर्णयशिक्षा, कौहलीशिक्षा, केशवीशिक्षा, कौण्डिन्यशिक्षा गौतमीशिक्षा चारायणीयशिक्षा तैत्तिरीयशिक्षा नारदीय पाणिनीयशिक्षा पाराशरीशिक्षा पाराशर बौधायन भारद्वाज, माण्डवी, माण्डूकी माध्यंदिनी याज्ञवल्क्य लक्ष्मीकांत, लाम वाजसनेय, वाल्मीकि, वासिष्ठ व्यास, व्यास, शंकर, शंभु शिक्षासमुच्चय, सर्वसम्मतशिक्षा सामवेदशिक्षा सिद्धांत शिक्षा हारीतशिक्षा, शिक्षासूत्राणि याज्ञवल्क्यशिक्षा शुक्लयजुर्वेद साहतेच्या निर्णयसागर आवृत्तीत दिली आहे

निरुक्त-ह रायन प्रथम प्रसिद्ध केले (गॉटिनजेन) बिब्लि इंडिकामध्येंहि निरुक्तटीका व सूचीसह छापलें १८८२-९१)

पिंगलाचा छंदःशास्त्रावरील ग्रंथ—छंदोवृत्ति ऋग्या छंद सूत्र याच्या अनेक आवृत्त्या आहेत त्यांत बंगालच्या एशियाटिक सोसायटीने संवत १९३० मध्यें प्रसिद्ध केलेली चांगली आहे पिंगलाचा हा जुना ग्रंथ असावा यांत अनेक लौकिक वृत्तांचा संग्रह आहे याचें वर्णन विश्व इतिहासात दिलें आहे

वेदांगज्योतिष—गर्गाचार्य व घरल जात ऋक्, यजुस व अथर्व अशीं तीन वेदांगज्योतिष प्रसिद्ध आहेत याजुष ज्योतिष आणि आर्च ज्योतिष हे सोमाकरसुधाकर भाष्यासहित पंडित मासिकाच्या २९ व्या ग्रंथांत आहे

व्याकरण—पाणिनिवृत्त अष्टाध्यायी, कात्यायनाचें यावर वार्तिक व पतंजलीचें महाभाष्य

प्रातिशाख्यें—ऋग्वेदप्रातिशाख्य-माक्समुलरची प्रत लइपझिग १८५६-६९ तैत्तिरीयप्रातिशाख्य—व्हिटनेची प्रत, न्यूहेवन १८८१ शुक्लयजुर्वेदीय कात्यायनप्रातिशाख्य—पी वाय पाठक यांनीं संपादिलें. काशी १८८३-८८ अथर्ववेदप्रातिशाख्य—व्हिटने यांनीं प्रसिद्ध केलें

सूचक वेदाभ्यास सर्वानुक्रमणी मॅकडोनेल संपादित(अनुवाकानुक्रमणीसह), ऑक्सफोर्ड १८८६ आर्षानुक्रमणी, छंदोनुक्रमणी, बृहद्देवता—( बिब्लि इंडिका ) शुक्लयजुर्वेदाची सर्वानुक्रमणीसूत्रें-वेबरसंपादित ( शुक्लयजुर्वेदसंहितेसह ) बनारससंस्कृतसीरीज १८९२-९४ चरणव्यूह-वेबरसंपादित ( इंडि. स्टु. पु. ३ ) बृहद्देवता ही १९०४ ऋग्वेदपदानुक्रमणिका,निर्णयसागर, मुंबई १९०८ ऋचांवणानुक्रमसूची, गणपत कृष्णाजी प्रेस, मुंबई १८९० तैत्तिरीयसंहिता-विषयानुक्रमणिका,आनंदाश्रम प्रे. पुणें यजुर्वेदपदानुक्रमणिका सामवेदपदानुक्रमणिका, अथर्ववेदपदानुक्रमणिका, निर्णयसागर या प्रकारच्या अभ्यासामध्येंच वैदिक कन्कार्डन्स याचा उल्लेख केला पाहिजे हा ग्रंथ प्रो ब्लूमफील्ड यांनीं तयार करून हार्वर्ड ओरिएंटल सीरीजमध्यें प्रसिद्ध केला यांत सर्व वैदिक वाङ्मयातील ओळींची वर्णानुक्रमानें मांडणी केली आहे

## अर्वाचीन वेदाभ्यास

यावर अनेक ग्रंथ आहेत त्यांची यादी दाबी तरही बाद कीच आहे. अनेक ग्रंथांपैकीं महत्त्वाचे यांत फार आहे.

( दर्दर पृष्ठ ११२)